# श्री विष्णुसहस्रनाम चिंतनिका

लेखक : कुंदर दिवाण






महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई

# श्री विष्णुसहस्रनाम चिंतनिका

– कुंदर बळवंत दिवाण




महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई-३२

प्रथमावृत्ती :
१९९८

प्रकाशक : सचिव,
महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ,
नवीन प्रशासन भवन, पहिला मजला,
मुंबई ४०० ०३२.



मुद्रक : व्यवस्थापक,
येरवडा कारागृह मुद्रणालय,
येरवडा, पुणे ४११ ००६.

किंमत : रुपये ४५४/–

एकं सत्
विप्रा बहुधा वदन्ति ।

—ऋग् १.१६४.४६

चोविसनामी सहस्रनामी ।
अनन्तनामी तो अनामी ।
तो कैसा आहे अन्तर्यामी ।
विवेकें ओळखावा ॥

—समर्थ रामदास

# निवेदन

"श्री विष्णुसहस्रनाम" हे एक स्तोत्र आहे. स्तोत्र म्हणजे दुरितनाशक शस्त्र होय. हिंदु धर्मात अशी अनेक स्तोत्रे आहेत. पण "श्री विष्णुसहस्रनाम" या स्तोत्राचे महत्त्व अनन्य साधारण आहे. श्रीमदाद्यशंकराचार्यांनी "गेयं गीता-नामसहस्रम्" असे म्हणून गीता व हे सहस्रनाम, हिंदु धर्माचे मूलगामी, विश्वव्यापी मानवधर्मरूप, स्वरूप सांगणारे आहेत असे म्हटले आहे.

"नामस्मरण" हा नवविधाभक्तीमध्ये सांगितलेला एक प्रमुख भाव आहे. गौण म्हणजे गुणवर्णनपर भक्ती साधणारे नामस्मरण, जन्ममरण टाळणारे आहे, अशी श्रद्धा आहे. हे विष्णुसहस्रनाम स्तोत्र महाभारतात शेवटी आलेले आहे. भीष्माने हे स्तोत्र सांगितले आहे. त्याचे पठण व पाठन करीतच भीष्मांनी आपला देह ठेवला.

हे श्री विष्णुसहस्रनाम केवळ नामांची जंत्री नाही. त्यात धर्मज्ञान, अध्यात्म व सर्वकल्याणकारी कैवल्यसाधक साधनांची, कौशल्याने आंतरिक रचना केलेली आहे. स्तोत्र म्हणजे अर्थवाद. अर्थवादामध्ये स्तुती असते. पण ही स्तुती वरवरच्या अर्थात नसते. वरवरचे शब्द व अर्थ स्तुतिमध्ये पर्यवसित होत असतात. हे पर्यवसान सर्वांनाच सहज समजेल असे समजणे चुकीचे ठरेल. त्यासाठी ह्या स्तोत्रावर भाष्य आवश्यक असते. श्री विष्णुसहस्रनाम स्तोत्रावर श्री. कुंदर दिवाण ह्यांनी असे विस्तृत, सहजगम्य व विद्वत्तापूर्ण भाष्य लिहिलेले आहे. "श्री विष्णुसहस्रनामात अध्याहृत असलेले धर्मज्ञान आजच्या काळाला आणि पिढीला विशद करून सांगणे आवश्यक होते व हे काम आजवर झाले नव्हते. श्री. कुंदर दिवाण यांच्या ह्या विवेचनाने ही मोठी उणीव पूर्णपणे दूर झाली आहे, असे मोठ्या संतोषाने म्हणावेसे वाटते." असे प्रशस्तिपत्र काका कालेलकरांनी दिलेले आहे.

श्री. कुंदर दिवाण ह्यांनी १०७ श्लोकांच्या ह्या श्रीविष्णुसहस्रनामावरील भाष्याला अनेक परिशिष्टे जोडलेली आहेत. श्री विष्णुसहस्रनामासारखीच इतर "सहस्रे" –स्तोत्रे, ह्यांची तौलनिक माहितीही त्यांनी दिली आहे. श्री विष्णूंच्या नामांचे विविधांगी वर्गीकरण व त्या वर्गीकरणानुसार त्या त्या नामाला प्राप्त होणारे अध्याहृत आध्यात्मिक अर्थ, श्री. कुंदर दिवाण ह्यांनी सुस्पष्ट केलेले आहेत. श्री. दिवाणांची विद्वत्ता, आध्यात्मिक क्षेत्रातील त्यांचा अधिकार आणि वेदोपनिषदांसह षड्दर्शनांचा त्यांचा सखोल अभ्यास, वाचकाला स्तिमित करून जाईल.

श्री विष्णुसहस्रनामाची वैदिक परंपरा आहे हे विशद करताना त्यांनी खालील विधान केलेले आहे. ''वेदानुवचन आणि यज्ञ, दान व तप ही वैदिक उपासना आहे. पण तिचा फक्त त्रैवर्णिकांनाच अधिकार आहे. वेदमंत्र हे सर्वांना खुले नाहीत'' हे विधान मात्र गतानुगतिक न्यायाने केलेले दिसते. मूळ वेद स्थूलपणे वाचले तरी लक्षात येईल की, वेदमंत्र सर्वांना खुले आहेत. यजुर्वेदातील ही ऋचा बोलकी आहे.

**''यथेमां वाचं कल्याणी मावदानि जनेभ्यः ब्रह्मराजन्याभ्यां शूद्राय चार्याय च स्वीयचारणाय च''**

''सर्वतोभद्र अशी ही वेदवाणी आम्ही सर्वांनी सांगितली तशी तुम्हीही सगळ्यांना सांगा. ब्राह्मण, क्षत्रिय, शूद्र व घरातील स्वकीय (पत्नी आदी) ह्या सर्वांना हे वेदमंत्र शिकवा, अभ्यासू द्या.'' (यजुर्वेद २६/२) असे वेदवचनच आहे. असो. श्री. कुंदर दिवाण ह्यांनी परिश्रमपूर्वक तयार केलेली ही श्री विष्णुसहस्रनामाची सटीक आवृत्ती प्रकाशित करताना महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाला अत्यंत आनंद होत आहे. सर्व स्तरावरील अभ्यासू व अध्यात्मजिज्ञासू, ह्या आवृत्तीचे सहर्ष स्वागत करतील ह्यात संदेह नाही. महात्मा गांधी, विनोबा भावे, काका कालेलकर ह्या सारख्या थोर विभूतींच्या सान्निध्यात पावन झालेल्या बुद्धिपूत श्री. कुंदर दिवाणांची ही प्रस्फुरित भाष्यवाणी अमृतोपम होय. मानवजातीचे जीवन या अमृताने समृद्ध होईल अशी खात्री आहे. श्री. कुंदर दिवाणांना विनम्र अभिवादन.

दिनांक १८ मार्च १९९७.

डॉ. मधुकर आष्टीकर
अध्यक्ष,
महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ.

□□□

# आशीर्वचन

स्वत:च्या काळापर्यंतच्या हिंदु धर्माला व्यवस्थित रूप देण्याचें व्यास-कार्य ज्यांनीं केलें त्या शंकराचार्यांनीं 'गेयं गीता-नामसहस्रम्' या एका वाक्यांत हिंदु धर्म थोडक्यांत कुठें सांपडेल, आणि त्याची आठवण कशी राहील हें सांगितलें आहे.

ईशोपनिषदांतील पहिला मंत्र ॐ "ईशा वास्यमिदं सर्वं यत्किंच जगत्यां जगत्। तेन त्यक्तेन भुञ्जीथा मा गृध: कस्य स्विद् धनम्।।" ऐकून महात्माजी इतके प्रभावित झाले कीं ते म्हणाले, हिंदु धर्माचीं सगळीं शास्त्रें आणि सगळे ग्रंथ नष्ट झाले आणि हा एकच मंत्र राहिला तरी आपल्या हिंदु धर्माचें सर्वस्व मिळाल्याचा संतोष होईल. अशी अनुभूति झाल्याबरोबर त्यांनीं आश्रमाच्या प्रार्थनेंत सकाळीं आणि संध्याकाळीं हा मंत्र म्हणण्याचा परिपाठ चालू केला.

त्याचप्रमाणें आद्य शंकराचार्यांच्या वेळेपासून श्रीमद्‌भगवद्‌गीता आणि श्रीविष्णु-सहस्रनाम या दोन ग्रंथांचें माहात्म्य स्वीकारलें गेलें आहे. शंकराचार्यांनीं या दोहोंवर आपलें एक एक तृप्तिदायक भाष्यहि लिहिलें आहे. श्रुति-स्मृति-पुराणांचें अध्ययन केल्यानंतर त्यांचा मथितार्थ ध्यानांत ठेवण्यासाठीं आणि आपली धन्यता व्यक्त करण्यासाठीं मनुष्य एखादा श्लोक गाऊं लागतो, किंवा हाऽउ हाऽउ हाऽउ सारख्या एखाद्या अव्ययाचें रटण करूं लागतो. संतांनीं ठरवलें कीं साक्षात्कार झाल्यानंतर देखील त्याच्या आनंदाचें स्मरण कायम ठेवण्यासाठीं नामस्मरण करीत रहावें. या परंपरेला अनुसरून सर्व ज्ञानी भक्त देवाचें एखादें आवडतें नांव घेत असतात. आतां आपला अनुभव आहे, कीं आईला आपल्या मुलाला कवटाळून घेतल्यानंतर देखील संतोष न झाला म्हणजे ती त्याला माझ्या तान्हुल्या, माझ्या छकुल्या म्हणून तऱ्हेतऱ्हेच्या नांवांनीं बोलावते, त्याचप्रमाणें ईश्वराच्या स्वरूपाचें, गुणांचें किंवा दिव्य जन्मकर्मांचें एकदम आकलन होत नाहीं, म्हणून त्याच्या निरनिराळ्या विभूतींचें गद्‌गद् स्मरण करतों. मूर्ति सर्व बाजूंनीं दिसावी म्हणून ज्या-प्रमाणें आपण प्रदक्षिणा करीत करीत मूर्तीच्या निरनिराळ्या बाजू पाहतों, त्याचप्रमाणें ईश्वराचे गुण आठवण्यासाठीं आपण त्याचीं निरनिराळीं गौण नामें घेतों. (येथें गौण शब्द प्रधान आणि गौण अशा अर्थानें घ्यावयाचा नसून गौण म्हणजे गुणवाचक असा त्याचा अर्थ घेतला पाहिजे.)

हिंदु धर्मातील सर्व बाजूंचा अंतर्भाव करणारी एखादी भव्य विभूति असेल तर ती व्यासांची आहे. हिंदु धर्माच्या विकासाचा अशेष अंतर्भाव करतां यावा म्हणून त्यांनीं आपलें काम अनेक जन्म घेऊन पुरें केलें असलें पाहिजे. म्हणूनच व्यास किती झाले याचें संशोधन इतिहास-संशोधकांना करावें लागतें. या व्यासांनीं श्रुति-स्मृति-पुराणांचा अंतर्भाव करण्यासाठीं महाभारत निर्माण केलें. त्या व्यासांच्या मतें तटस्थ आणि सर्व-सेवक अशा विभूति तीन; विदुर, भीष्म आणि कृष्ण. जी योग्यता व्यासांची तीच योग्यता व्यासांनीं भीष्माला देऊन ठेवली आहे. आणि म्हणूनच व्यासांनीं महाभारताच्या शेवटीं शेवटीं सर्व कांहीं सांगून झाल्यानंतर आपल्या बोधाची आणि तृप्तीची उजळणी व्हावी म्हणून भीष्माच्या तोंडीं सर्वव्यापी विष्णूचीं हजार नांवें आठवतील तशीं गाणारें एक सहस्रनाम-स्तोत्र ठेवून दिलें आहे.

ज्याप्रमाणें सर्व उपनिषद्रूपी गाईचें दूध काढण्यासाठीं आणि सुधींना पाजण्यासाठीं गोपाळकृष्णानें भगवद्‌गीता

रचिली आणि त्यासाठीं अर्जुनाला वासरूं म्हणून जवळ उभें केलें, त्याचप्रमाणें भीष्माच्या तोंडून गाइलेलें विष्णुसहस्रनाम ऐकण्यासाठीं प्रत्यक्ष धर्मराज युधिष्ठिराला आपल्या सर्वांचा प्रतिनिधि श्रोता बनविलें आहे.

या विष्णु-सहस्रांत आहे काय? उपनिषदात्मक एकदेखील श्लोक नाहीं; केवळ आठवतील तशीं भगवंताचीं कमी-अधिक हजार नांवें गोविलीं आहेत. धर्म-रहस्य जाणणाराला हीं सर्व गौण नामें स्मृति-संजीवक आहेत आणि सामान्य मनुष्याला केवळ जपाचा संतोष म्हणून धन्य करणारीं आहेत. भीष्माच्या तोंडीं हीं हजार नामें घालतांना आपण कोण-कोणतीं नामें बोलून गेलों याचीं आठवण ठेवण्याची जबाबदारी त्यांनीं स्वत:कडे वा भीष्माकडे सोंपवली नाहीं. भीष्म तर भगवंताचीं नांवें पितामहांचे पितामह व्यासमुनि गातील तशीं आनंदानें गाणारे; थोडीं नांवें पुन: पुन: आलीं याचें वैषम्य कुणाला वाटणार?

ईश्वराच्या विभूति अनंत; भक्ताला एकाच वेळीं कश्या आठवणार? आणि त्या संपणार तरी कश्या? प्राधान्यत: ज्या ज्या विभूति उठावदार असतील त्या त्या त्यांनीं मनांत आणावयाच्या आणि तीं तीं नामें बोलून स्वत:ची वाणी धन्य करावयाची; कांहीं नांवें नव्या संदर्भांत नवाच अर्थ सुचवूं शकतात म्हणून हि पुनरुक्त झालीं असतील, कांहीं नांवें अनुप्रासाच्या तृप्तीसाठीं घेतलीं असतील आणि कित्येक पुनरुक्त नामें पादपूरणासाठीं आपणहून येऊन बसलीं असतील. जिथें अनिर्वचनीय आनंद आठवून आठवून संस्मृत्य संस्मृत्य पुन: पुन: हर्षभरित व्हावयाचें आहे, तिथें नामस्मरणाच्या आनंदांतहि पुनरुक्ति बाधक होत नसते, आनंदाला परिपुष्टच करीत असते.

गीता आणि नाम-सहस्र यांची जोडी आणि त्यांची प्रतिष्ठा पटल्यामुळें नंतरच्या लोकांनीं निरनिराळ्या गीता आणि निरनिराळीं सहस्रनामें उत्पन्न केलीं आहेत. गीतेंत ७०० श्लोक आहेत असें पाहून दुर्गा-सप्तशतीमध्यें देखील ७०० श्लोक असले पाहिजेत, अशा अपेक्षेनें किंवा आग्रहानें सप्तशती हें नाव दिलें, पण श्लोक कांहीं ७०० भरेनात, तेव्हां कित्येक उवाच पदें देखील गणून ७०० संख्या पुरी केली. विष्णुसहस्रनामांत हजार नामें आलीं पाहिजेत; तशीं तीं येत नसतील तर गणना आपल्या हातांत आहे. हजाराची संख्या पूर्ण करणें कांहीं कठिण नाहीं, अशा विश्वासानें हजाराची गणना झाली आहे. आतां या नाम-सहस्रामध्यें ईश्वराचे सर्व गुण किंवा त्याच्या सर्व विभूति आल्या आहेत किंवा तसा प्रयत्न इथें झाला आहे असें मानण्याचें कारण नाहीं. अमुक दिव्य प्रसंगीं जेवढीं नामें आठवलीं आणि जशा क्रमानें आठवलीं वा क्रमरहित आठवलीं तशीं तीं इथें ठेवून दिलीं आहेत. येथें कसलाच क्रम नाहीं, हा अनुभव होतांच महाराष्ट्रीय मनाला नारायण वामन टिळकांच्या कवितेची एक ओळ आठवली, 'किती आपुलीं फुलें उमललीं, कुठें लटकलीं चिंता न च ही वेलीला, सुंदर-तेची ही लीला' विष्णुसहस्रनामांत देखील प्रथमदर्शनीं सुंदरतेची हीच लीला दिसून येते आणि नामसहस्राचा नित्यपाठ करतांना तर सुंदरतेची ही लीला परम सुंदर वाटूं लागते.

एकदां वाटलें होतें कीं, परम सुंदर पितामह भीष्माची अनुज्ञा घेऊन त्यांना आठवलेलीं हीं नि हींच सहस्रनामें निराळ्या क्रमांत बसवून घ्यावींत. तसें केलें असतां नामांच्या अर्थ-स्मरणाला मदत होईल, चिंतन अधिक परिपुष्ट होईल, आणि समग्र श्रुति-स्मृति-पुराणांचें एक आवर्तन केल्याचा थोर संतोषही मिळेल; पण दुसऱ्याच क्षणीं विचार आला कीं, शेंकडों वर्षें झालीं, विष्णुसहस्रनामाचा नित्य पाठ करणाऱ्या असंख्य भक्तांना असला फेरफार सहन होईल काय?

हें सर्व एकमुखानें स्वीकार करतील? कवि टिळकांची दुसरी एक ओळ पुन: आठवली:

'कोमल कौशल्यें नटला।
किती कुणाचा कर असला।
तरी तयानें माझीं कवनें जरा स्पर्शणें।
सहन न होई परि मजला।
त्याहुनि जीव वरा गेला।।

तेव्हां या भक्तांच्या संतोषासाठीं तरी आणि ह्यांच्या आत्महत्येचें पाप आपल्याला लागूं नये म्हणून तरी सहस्रनामाचा क्रम जसा आहे तसाच राहूं दिला पाहिजे असें पोक्त मनानें ठरविलें.

मीं कधीं विष्णुसहस्रनामाचा नित्य पाठ केला नाहीं, भगवद्गीतेचा नित्य पाठ केला नाहीं. भगवद्गीतेचा नित्य पाठ दीर्घकाल चालवल्यानंतर (आळसानें नव्हे तर ) अनुभवानें ठरविलें कीं मधून मधून नित्य पाठ सोडून द्यावा आणि बराच वेळ गेल्यानंतर पुन: तो सुरू करावा, असें केल्यानें नित्य पाठाची यांत्रिक जडता दूर होते, अर्थाकडे विशेष लक्ष जातें आणि विशेष म्हणजे पूर्वी कधीं न सुचलेले नवे भाव व अर्थ उठतात एवढेंच नव्हे तर नवी नवी प्रेरणाहि देतात. या अनुभवानंतर गीताभक्तीच्या प्रेरणेनेंच नित्य पाठ कांहीं दिवस बंद ठेवून तो पुन: चालू करणें पसंत केलें आहे.

विष्णुसहस्रनाम अनेक वेळां वाचलें आहे, भक्तांच्या तोंडून ऐकलें आहे, यांतील नामांचें चिंतन केल्यानंतर तें लिहून काढण्यासाठीं प्रेरणा झाली, म्हणून पुष्पहास सारख्या काव्यमय नामापासून प्रारंभ केला. थोडीं नामें लिहिलीं, आणि तें काम राहून गेलें, श्री. कुंदर दिवाण यांनीं यांतील कांहीं नामांचें चिंतन-विवरण वाचलें असेल. ते स्वत: आपल्या स्वभावाप्रमाणें आणि अध्ययनप्रणालीप्रमाणें विष्णुसहस्राच्या मागें लागलेलेच होते. समानधर्मा या नात्यानें आम्ही सहस्रनामाविषयीं मधून-मधून बोलत होतों आणि 'तुष्यन्ति च रमन्ति च' चा आनंद्र घेत होतों.

पुढें जेव्हां कुंदर दिवाण यांचें काम पुरें होत आलें तेव्हां त्यांनीं मला विचारलें, 'माझ्या पुस्तकाला पुरोवचन लिहाल?' मी तावडतोब त्यांच्या म्हणण्याला रुकार दिला. गांधी परिवारांत कदाचित् सर्वांत मीच वयोवृद्ध असेन. विनोबापेक्षांदेखील दहा वर्षांनीं मी मोठा आहें, आणि प्रस्तावना लिहून देण्याचा माझा परिपाठ फार जुना आहे. आठवत नाहीं किती लोकांच्या कृतींना आजवर प्रस्तावना दिल्या असतील! विष्णुसहस्रनामाविषयीं जाणण्याजोगें जेवढें असेल तेवढें सर्व श्री. कुंदर दिवाण यांनीं मिळविलें असणारच आणि आपल्या विशिष्ट शैलीनें त्यांनीं तें आपल्या या बृहद्ग्रंथांत ओतलें असणारच. तेव्हां ठरवलें, त्या विषयीं आपण कांहीं विशेष लिहूं नये, फक्त लिहावें कीं ग्रंथ आपल्याला खूप आवडला व वाचकांना तो खात्रीनें आवडेल, आणि आजकालच्या वाचकांना धर्मज्ञान प्राप्त करण्याचीं साधनें उपलब्ध नसतात व वेळ काढणें हि त्यांना कठिण, तेव्हां त्यांना या एका ग्रंथाच्या वाचनानें यथेष्ट ज्ञान, माहिती आणि चिन्तन मिळणार, तेव्हां आपण केवळ आपला आनंद व्यक्त करावा आणि युधिष्ठिर, भीष्म आणि व्यास यांचेच आशीर्वाद कुंदर दिवाण यांच्यापर्यंत पोंचवावेत, आणि प्रत्येक प्रस्तावाला ज्याप्रमाणें दुजोरा देण्याचा रिवाज आहे त्याप्रमाणें वरील त्रिपुटीच्या आशीर्वादाला दुजोरा म्हणून शंकराचार्यांचे आशीर्वादहि जोडून द्यावे. शेवटीं मी एवढेंच म्हणेन कीं, सामान्य धार्मिकांमध्यें विष्णुसहस्रनामाची कितीहि भक्ति असली आणि त्याचा नित्य पाठहि करीत असले तरी त्यांतील आशय त्यांना आकळत नाहीं, हृदयंगम होत नाहीं. नामें शब्दमात्र, अक्षरमात्रच राहतात, त्यासाठीं सहस्रनामांमध्यें जें काहीं धर्मज्ञान अध्याहृत आहे तें आजच्या काळाला आणि पिढीला विशद करून

सांगणें आवश्यक होतें. हें काम आज वर झालें नव्हतें. कुंदर दिवाण यांच्या या विवेचनामुळें ही मोठी उणीव पूर्णपणें दूर झाली आहे, असें मोठ्या संतोषानें म्हणावेंसें वाटतें. जिज्ञासु आणि श्रद्धावान् वाचकांना येथें आत्म-चिंतनाला उपयोगी यथेच्छ सामग्री मिळेल, आणि आजच्या पिढीला जें अत्यंत आवश्यक आहे असें धर्मज्ञानहि मिळेल. जे कोणी वाचक हा ग्रंथ साद्यंत वाचतील त्यांना ऋषिमुनींचे आणि आचार्यांचे आशीर्वाद मिळतीलच.

आणि विशेष म्हणजे आपलें प्राचीन धर्मज्ञान जें संस्कृताच्या कोंडींत अडकून पडलें होतें तें लोकभाषेंत आणून देणाऱ्या आणि अधिकारवादाची संकुचितता तोडून समस्त प्रजेला सर्वोच्च धर्मज्ञान मोकळें करून देणाऱ्या संतांचे आशीर्वाद या ग्रंथाला मिळतील. त्यांच्या आशीर्वादाला दुजोरा देण्यासाठींच मीं ही प्रस्तावना लिहिली आहे.

*काका कालेलकर*

ऋषिपंचमी (५-९-१९७०)
सन्निधि, राजघाट, नई दिल्ली.

□□□

# स्मरण देवाचें करावें

( मागां निरोपिलें कीर्तन ।
जें सकलांस करी पावन ।
आतां ऐका विष्णु-स्मरण ।
तिसरी भक्ति ।। )

२–स्मरण देवाचें करावें।
अखंड नाम जपत जावें।
नाम-स्मरणें पावावें। समाधान।।

३–नित्य नेम प्रात:काळीं।
मध्याह्नकाळीं सायंकाळीं।
नामस्मरण सर्व काळीं। करीत जावें।।

४–सुख-दु:ख उद्वेग चिंता।
अथवा आनंदरूप असतां।
नामस्मरणाविण सर्वथा। राहों चि नये।।

५–हर्षकाळीं विषमकाळीं।
पर्वकाळीं प्रस्तावकाळीं।
विश्रांतिकाळीं निद्राकाळीं।
नामस्मरण करावें।।

६–कोडें सांकडें संकट।
नाना संसार-खटपट।
अवस्था लागतां चटपट।
नामस्मरण करावें।।

७–चालतां बोलतां धंदा करितां।
खातां जेवतां सुखी होतां।
नाना उपभोग भोगितां ।
नाम विसरों नये।।

८–संपत्ति अथवा विपत्ति।
जैसी पडेल काळगति।
परी नामस्मरणाची स्थिति। सांडोंचि नये।।

९–वैभव सामर्थ्य आणि सत्ता।
नाना पदार्थ चालतां।
उत्कट भाग्यश्री भोगितां।
नामस्मरण सोडूं नये।।

१०–आधीं अवदसा मग दशा।
अथवा दशेउपरीं अवदसा।
प्रसंग असो भलतैसा।
परंतु नाम सोडूं नये।।

११–नामें संकटें नासती।
नामें विघ्नें निवारती।
नामस्मरणें पाविजेती।
उत्तम पदें।।

१२–भूत पिशाच नाना छंद।
ब्रह्मग्रह ब्राह्मणसमंध।
मंत्रचळ नाना खेद।
नामनिष्ठे नासती।।

१३–नामें विषबाधा हरती।
नामें चेडेचेटकें नासती।
नामें होय उत्तम गति।
अंतकाळीं।।

१४–बालपणीं तरुण काळीं।
कठिण काळीं वृद्धापकाळीं।
सर्व काळीं अंतकाळीं।
नामस्मरण करावें।।

१५–नामाचा महिमा जाणे शंकर।
जना उपदेशी विश्वेश्वर।
वाराणसी मुक्तिक्षेत्र। रामनामेंकरूनि।।

१६–उफराट्या नामासाठीं।
वाल्मीक तरला उठाउठी।
भविष्य वदला शतकोटि।
चरित्र रघुनाथाचें।।

१७–हरिनामें प्रह्लाद तरला।
नाना आघातांपासून सुटला।
नारायणनामें पावन झाला।
अजामेळ।।

१८–नामें पाषाण तरले।
असंख्यात भक्त उद्धरले।
महा पापी तेचि झाले।
परम पवित्र।।

१९–परमेश्वराचीं अनंत नामें।
स्मरतां तरिजे नित्य नेमें।
नामस्मरण करतां यमें।
बाधिजेना।।

२०–सहस्रनामांमध्यें कोणी एक।
म्हणतां होतसे सार्थक।
नाम स्मरतां पुण्यश्लोक।
होइजे स्वयें।।

२१–कांहींच न करोनि प्राणी।
रामनाम जपे वाणी।
तेणें संतुष्ट चक्रपाणि।
भक्तालागीं सांभाळी।।

२२–नाम स्मरे निरंतर।
तें जाणावें पुण्य शरीर।
महा दोषां गिरिवर।
रामनामें नासती।।

२३–अगाध महिमा न वचे वदला।
नामें बहुत जन उद्धरला।
हळाहळापासून सुटला।
प्रत्यक्ष चंद्रमौलि।।

२४–चहूं वर्णांस नामाधिकार।
नामीं नाहीं लहानथोर।
जडमूढ पैल पार।
पावती नामें।।

२५–म्हणोनि नाम अखंड स्मरावें।
रूप मनीं आठवावें।
तिसरी भक्ति स्वभावें। निरूपिली।।

इति श्रीमद्दासबोधे गुरुशिष्यसंवादे चतुर्थ दशके
नामस्मरणनिरूपणं नाम तृतीयः समासः।

□□□



## अर्पण-पत्रिका

जेणें हा जीव दिला दान
तयाचें करीन चिन्तन।
जगज्जीवन नारायण
गाईन गुण तयाचे ॥

आमचे तीर्थरूप श्री. बलवन्त अनन्त दिवाण आणि आमच्या आत्यावाई सखूबाई हीं दोघें भावंडें श्री विष्णुसहस्रनामाचा नित्यपाठ करीत असत. आमच्या जन्माची वार्ता त्यांच्या कानावर आली तेव्हां ते पाठच करीत होते. जें नाम आलें तेंच त्यांनीं आम्हांला देऊन टाकलें. त्यामुळें आमचें हें अद्वितीय नाम.

नामांत काय आहे? दगड म्हणजे धोंडा म्हणजे पाषाण! सर्व अभिन्न एकच. हनूमंन्ताला सीतेनें प्रसन्न होऊन एक मोत्यांची माळ दिली. त्यानें प्रत्येक मोती चावून त्यांत राम पाहिला. त्याप्रमाणें मला ही सहस्रनाममाला मिळाली आणि मीं हि ती चावून चाखून पाहिली. आणि त्यांतील रस आणि कस निवेदिला. तो हा नैवेद्य मी आमच्या तीर्थरूपांना आणि आमच्या कीर्तनकार आत्यावाईंना अत्यन्त भक्तिभावानें अर्पण करीत आहें आणि त्याच बरोबर भाविक भक्त भागवतांना आणि जिज्ञासूंना.

विनीत

# अनुक्रमणी



□□□

# सहस्र-भूमिका

## (१) वैदिक वाङ्मय आणि सहस्रनाम

कोणतीही व्यक्ति सर्वस्वीं एकाकी असूं शकत नाहीं. तिच्या मागें आणि पुढें एक प्रवाह असतो. त्या प्रवाहांत ती व्यक्ति बिन्दुवत् वा ओघवत् वाहत असते. व्यक्तीप्रमाणेंच दर्शन विचार, वा ग्रंथ यांच्या संबंधींहि म्हणतां येईल. त्यांची अभिव्यक्ति ही कुठल्या तरी परंपरेंत झालेली असते. त्या परंपरेचा तो एक अंश असतो, तें एक अंग असतें. अंश कितीहि स्वतंत्र भासले तरी त्यांचा विचार अंशीच्या अनुषंगानेंच करावा लागतो. त्यावांचून त्याचा अन्वयार्थ नीट लागत नाहीं.

हें विष्णूचें नामसहस्र उघडच वैदिक परंपरेचें आहे. वैदिक-वाङ्मय-वृक्षाचें तें शेंडेफळ आहे असेंहि म्हणतां येईल. ऋग्, यजुस्, साम आणि अथर्व या चार संहिता आणि (१) पाणिनीय शिक्षा, (२) कल्पसूत्रें, (३) पाणिनिकृत अष्टाध्यायी-व्याकरण, (४) यास्ककृत निरुक्त (आणि निघण्टु), (५) वराहमिहिरकृत ज्योतिष आणि (६) पिंगलकृत छन्द:शास्त्र हीं वेदाचीं षडङ्गें मिळून दशग्रंथ होतात. हे दशग्रंथ वैदिक वाङ्मयाचा गाभा असून हे ग्रंथ पढलेल्या विद्वानाला दशग्रंथी ब्राह्मण म्हणतात. पण वैदिक वाङ्मय एवढेंच नाहीं. ऐतरेयादि ब्राह्मणें, बृहदादि आरण्यकें, ईशादि उपनिषदें, पूर्वोत्तर मीमांसादि दर्शनें, मन्वादि स्मृति, भारतादि इतिहास, भागवतादि पुराणें, रामायणादि काव्यें आणि त्यावरील सायण-शावर-शांकरादि भाष्यें, नीलकण्ठ्यादि टीका आणि सहस्रावधि निबन्ध प्रबन्ध हा सगळा वैदिक वाङ्मयाचा अफाट विस्तार आहे. या सगळ्यांचें आलोडन एका जन्मांत होणें कठिण. म्हणून म्हटलें आहे—

अनन्तपारं किल शब्द-शास्त्रं
स्वल्पं तथायुर् बहवश् च विघ्ना:।
सारं ततो ग्राह्यम् अपास्य फल्गु
हंसो यथा क्षीरम् इवाम्बुमध्यात्।।

पञ्चतन्त्र कथामुख

या विचारानें वैदिक वाङ्मयाचें मन्थन करून अनेकांनीं अनेक सारें काढलीं आहेत. पैकीं दोन सारें लोकविख्यात असून तितकींच तीं लोकप्रियहि आहेत. एक म्हणजे भगवद्गीता आणि दुसरें हें नामसहस्र. शंकराचार्यांसारख्या जगद्गुरूंनीं त्यांच्यावर भाष्यें लिहिलीं असून 'गेयं गीता-नामसहस्रम्' म्हणून त्यांची सर्वजनांना भलावण केली आहे.

वैदिक परंपरा ही अतिप्राचीन असून वाङ्मयीन प्रमाणांच्या दृष्टीनें तीहून प्राचीनतर प्रमाण वा पुरावा अद्याप उपलब्ध झालेला नाहीं. भारतीय आर्य या परंपरेला सनातन म्हणतात. सनातन म्हणजे अनादि व अनन्त आणि म्हणून चिरस्थायी. अतिप्राचीन कालापासून ती अखंड चालत आलेली आहे आणि आजहि विद्यमान आहे म्हणून सनातन ह्या विशेषणास ती पात्र आहे यात शंकाच नाहीं. म्हणूनच एका हिन्दुस्थानी कवीनें म्हटलें आहे :

'कुछ बात है कि हस्ती मिटती नहीं हमारी।
सदियों रहा है दुश्मन दौरेज़मां हमारा।।
यूनानो मिस्र रूमा सब मिट गये जहांसे
अबतक मगर है बाकी नामोनिशां हमारा।।'

ती आपल्या परंपरेला सनातनत्व देणारी 'कुछ बात' कोणती आहे? नुसतें ज्येष्ठत्व श्रेष्ठत्वाचें प्रमाण होऊं शकत नाही. पांढरी नि लांब दाढी जीर्णत्वाचें लक्षण आहे, वृद्धत्वाचें वा ज्ञानाचें नव्हे. म्हणून भारतीय परंपरेला नुसती आपली दाढी दाखवून भागणार नाहीं. तिला आपलें सत्त्व, ती आपली 'कुछ बात' अन्यत्रच शोधली पाहिजे. पण ती शोधायला लांब जायला नको. तीहि आपल्या परंपरेंत फार पूर्वींच सांगून टाकली आहे.

'न तेन वृद्धो भवति येनास्य पलितं शिर:।
यो वै युवाप्यधीयानस् तं देवा: स्थविरं विदु:।।'

जो वयानें लहान असला तरी ज्ञानोपासक आहे, तो महान् होय, तो वृद्ध होय. अर्थात् ज्ञानोपासना म्हणजेच

सत्योपासना हें भारतीय आर्य परंपरेच्या दीर्घ जीवित्वाचें नि महत्तेचें रहस्य होय. सनातन सत्याचा अखंड शोध हाच वैदिक ऋषींचा धर्म आणि त्यासाठीं कुठल्याहि ठरीव आचाराला वा विचाराला आपल्याला कायमचें बांधून न घेणें, सत्याचें ग्रहण करायला बुद्धि सदैव खुली राखणें हाच त्यांचा संप्रदाय. 'बुद्धेः फलं अनाग्रहः' हें त्या सत्योपासकांचेंच सूत्र होय आणि तेंच सनातनत्वाचें मर्म.

या सत्यग्राही नि अनाग्रही वृत्तीचाच परिणाम हा कीं, या हिन्दु धर्माचें, संस्कृतीचें नि परंपरेचें अमुक एक लक्षण सांगणें अशक्य आहे. ईश्वराला मानणें हें हिंदु धर्माचें व्यावर्तक लक्षण आहे काय? नाहीं. सांख्यवादी नि पूर्वमीमांसक ईश्वर मानीत नसूनहि ते हिंदु आहेत. विष्णुनामसहस्रांत एवढ्याचसाठी 'महर्षिः कपिलाचार्यः' असें नांव येऊं शकलें. वेदांना प्रमाण मानणें हें हिंदु धर्माचें लक्षण आहे काय? नाहीं. सांख्यवादी, चार्वाकवादी (लोकायतिक), योगवादी, जैन, बौद्ध हे सर्व हिंदु असून ते वेदांना मानीत नाहींत. वेदान्तीहि वैदिक यज्ञकांडाला मानीत नसल्यामुळें तेहि वस्तुतः अवैदिकच होत. वर्णाश्रम धर्म मानणें हें हिंदु धर्माचें लक्षण आहे काय? नाहीं. जैन, बौद्धच नव्हेत तर महानुभाव, शीख, ब्राह्मसमाजी इत्यादिहि वर्णाश्रम धर्म मानीत नाहीत. तरी ते सर्व हिंदुच होत. अमुक एका गुरूला मानणें हें हिंदु धर्माचें लक्षण आहे काय? नाहीं. कोणी कोणालाही गुरु मानावें नि भजावें. त्याला प्रतिबंध नाहीं. पीराला भजणारे हिंदु आहेत. महंमदाला व ख्रिस्ताला गुरु मानणारेहि हिंदु असूं शकतात. दयानंद रामकृष्णादि अवतारांना मानीत नाहीत तरी ते हिंदुच आणि दयानंदांनाच मानणारे आर्यसमाजीहि हिंदुच. गोभक्ति हें हिंदु धर्माचें लक्षण आहे काय? नाहीं. गाईला एक पशु, कदाचित् भक्ष्यहि मानणारे, सावरकर हि हिंदुच होत. यज्ञ, याग, व्रत, उपवास, तीर्थयात्रा, दान इत्यादि अमुक एक आचार करणें हें हिंदु धर्माचें लक्षण आहे काय? नाहीं. कोणताही विशिष्ट विधि करणें वा न करणें हें हिंदु धर्माचें लक्षण नाहीं. यज्ञ, दान, तप आणि स्वाध्याय न करणारे हिंदु आहेत. विशिष्ट चिह्न, यज्ञोपवीत, शिखा, भस्म, गंध इत्यादि वा लंगोटी, पंचा, धोतर, साडी वगैरे पोषाख हिंदु धर्माचें लक्षण आहे काय? नाहीं. कोणतेंहि चिह्न वा पोषाख धारण करणें वा न करणें हिंदु धर्माचें लक्षण नाहीं. बिनशेंडीचा, बिन जानव्याचा, भस्म वा गंध न लावणारा, हवा तो पोषाख केलेला हिंदु असूं शकतो. भारत देशाचा अभिमान बाळगणें वा भारतांतच वास्तव्य करणें हें हिंदु धर्माचें लक्षण आहे काय? नाहीं. 'स्वदेशो भुवनत्रयम्' म्हणणारे शंकराचार्य हिंदुच होते आणि अनेक लोक परदेशांत जन्मलेले आणि मेलेले हिंदुच होते आणि आहेत. तात्पर्य, कोणत्याहि व्याख्येंत हिंदु धर्म बसवतां येत नाहीं. व्यवहारतः जो कोणी आपल्याला हिंदु म्हणेल तो हिंदु अशी व्याख्या होऊं शकेल आणि तत्त्वतः जो कोणी सत्यग्राही नि अनाग्रही वृत्ति बाळगून अग्राम्य नि अनार्य जीवनांत उत्तरोत्तर निरन्तर आरोहण करण्याचा सोत्साह पराक्रम करील तोच हिंदु म्हटला पाहिजे, आर्य म्हटला पाहिजे. आणि अशा आर्यत्वाची जगाला दीक्षा देण्याची पात्रता हि त्याच्याच ठाई संभवते. 'कृण्वन्तो विश्वं आर्यम्' विश्वाला आर्यत्वाची दीक्षा देत असे आत्मे जगांत सदेह वा विदेह संचरत असतात. अशा दीक्षागुरूंच्या चिंतनाचा एक नमूना म्हणजे हें नामसहस्र होय.

## (२) महाभारत आणि नामसहस्र

आर्यांचा धर्म, तत्त्वज्ञान, संस्कृति, किंबहुना संपूर्ण लौकिक व पारलौकिक जीवन, यांचें मूळ वेद होत. म्हणून त्यांचें महत्त्व अनन्यसाधारण आहे. त्यांचा अस्वीकार आणि अनादर करणाऱ्या भल्याभल्यांना, त्यांचा विचारांश मान्य करूनहि, भारतीय आर्यांनीं फेकून दिलें आहे. जैन आणि बौद्ध संप्रदायांच्या प्रवर्तकांचें, त्यांच्या वाङ्मयाचें आणि अनुयायी वर्गाचें भारतांतून जवळपास उच्चाटन होण्याचें मुख्य कारण हेंच होय. "अतुलित महिमा वेद की तुलसी कियो विचार। जो निन्दत निन्दित भये बिदित बुद्ध अवतार।।" अशा या वेदांचा विस्तार म्हणजे महाभारत होय. म्हणून त्याला 'पंचम वेद' असें गौरवपूर्ण अपर नामाभिधान लाभलें आहे. 'महत्त्वाद् भारवत्त्वाच्च महाभारतमुच्यते।' महाभारताचें 'हें' महत्त्व आणि 'हा' भार लक्षणीय होय. अशा या महाभारताच्या अनुशासनपर्वांत हें सहस्र आलेलें आहे. भांडारकर प्राच्य विद्या संशोधन मंदिरानें प्रकाशित केलेल्या महाभारताच्या चिकित्सित आवृत्तींत अनुशासन पर्वाचा १३५ वा अध्याय म्हणजे विष्णुसहस्रनामस्तोत्रच होय. प्रास्ताविक आणि उपसंहारात्मक भाग अनुक्रमें श्लोक १ ते १३ आणि श्लोक



वि (वाय) ९७६ (दोन)

१२१ ते १४२ वगळतां प्रत्यक्ष नामसहस्र श्लोक १४ ते १२० ह्या १०७ श्लोकांत आलेलें आहे.

या ग्रंथाला जरी सामान्यत: विष्णुसहस्रनाम वा विष्णुसहस्रनाम-स्तोत्र म्हणण्याचा प्रघात असला तरी त्याचें नाम स्वतः त्या ग्रंथांतच नाम-सहस्र म्हणूनच आलेलें आहे. (पहा श्लोक ४, १२, १२१, १२५, १२९). शंकराचार्यहि त्याचा उल्लेख नाम-सहस्र असाच करतात. पहा 'गेयं गीता-नामसहस्रम्'. या १४२ श्लोकांत कुठेंही सहस्रनाम, विष्णु-सहस्रनाम अथवा विष्णुसहस्रनामस्तोत्र असा उल्लेख आलेला नाहीं.

जयाचें भारत आणि भारताचें महाभारत होतांना ह्या नामसहस्रांत कांहीं प्रक्षेप करणें शक्य झालें नसावें. कारण तें संख्याबद्ध आहे. तथापि प्रास्ताविक आणि उपसंहाररूप भागांत असा प्रक्षेप झाला असावा. शक्य तिथें प्रक्षेपानें ग्रंथ-विस्तार केल्यावांचून भारताचें महाभारत झालेलें नाहीं हें उघड आहे. प्रास्ताविकांत युधिष्ठिराचा प्रश्न आणि त्याला दिलेलें विशृंखल उत्तर पाहिलें म्हणजे इथें प्रक्षेप झाला असावा असा संशय येतो. त्याचप्रमाणें उपसंहारांत एकदां फलश्रुति सांगून संपविल्यानंतर परत वासुदेव-माहात्म्य वर्णून हें त्या वासुदेवाचें नामसहस्र जो गाईल त्याला विपुल यश मिळेल इत्यादि फलश्रुति आली आहे. हा प्रक्षेप विस्तार दिसतो. वासुदेव हें नाम नारायणाहून अर्वाचीन आहे आणि विष्णुहून तर बरेंच अर्वाचीन आहे, असें म्हणतां येईल. विष्णु वैदिक नाम आहे, नारायण पौराणिक आहे आणि वासुदेव ऐतिहासिक आहे असें स्थूल मानानें म्हणणें शक्य आहे. प्राचीन वाङ्मयांत ह्या नामांच्या अभ्यासावरून वा पौन:पुन्यावरून (frequency) त्यांच्या कालानुक्रमाचें असें अनुमान करायला जागा आहे. 'इतीदं' 'य इदं' इथें इदं हें नपुंसकलिंगी सर्वनाम 'सहस्रम्' करितां आलें आहे. पुढे 'इमं स्तवं अधीयान:' इत्यादि पुंल्लिंगी प्रयोग आला आहे. कदाचित् प्रक्षेपामुळें ह्याची गरज उत्पन्न झाली असेल. पण तें कसेंहि असो, इतकें बरीक खरें कीं प्रक्षेप मूळ नामसहस्राच्या संहितेंत झालेला नाहीं. पाठभेद वा अपपाठ त्यांत असूं शकतील, पण प्रक्षेप नाहींत. तथापि भारताचें महाभारत करण्यांत ज्या कांहीं युक्त्या, क्लृप्त्या योजिल्या आहेत त्यांत नलरामादिकांचीं नाना आख्यानें कणिकविदुरादि नीति, यक्षप्रश्नादि संवाद, गीतानुगीतादि उपदेश आणि नामसहस्रादि स्तोत्रें अशा आधींच स्वतंत्रपणें अस्तित्वांत असलेल्या कृतींचा समावेश करणें ही युक्ति विशेष उपयोगी पडलेली आहे असें म्हणतां येईल. अर्थात् सबंधचें सबंध नामसहस्रच महाभारतांत एक प्रक्षेप असूं शकेल.

महाभारत ही एक शतसहस्र संहिता आहे. तिचे मुख्य भाग दोन : १) आख्यायिका, २) तात्पर्य. फळांत एक कवच असतें आणि दुसरें असतें सार. आपण सार घेऊन कवच फेकून देतों. भारताचें सार भारतसावित्री म्हणून प्रसिद्ध आहे. गायत्री मंत्र तो वेदसावित्री तशी ही भारत-सावित्री. आणि तिचेंच परोपरीनें केलेलें समर्थन आणि उपबृंहण म्हणजे महाभारतांत ठाईं ठाईं आलेले असंख्य तत्त्वोपदेश होत. गीता त्या सर्व तत्त्वोपदेशाचा अर्क आहे आणि विष्णुनामसहस्र त्याचा भावानुवाद. शब्द गोवत् स्थूल होत. त्यांचा अर्थ दुग्धवत् सूक्ष्म म्हणावयाचा. पण भाव हा घृतवत् सूक्ष्मतर वा अव्यक्त म्हटला पाहिजे. त्या भावाचें गायन म्हणजे हें नामसहस्र होय. भावमय होऊनच तें गुणगुणायचें आणि त्यांतच आपल्याला विसरून जायचें; हाच त्याचा विनियोग. जो अशी नित्य नामसमाधि लावतो तो मरणकालींहि तींत स्थित होऊन मुक्त होतो. ही प्रयाणकालीन साधना गीतेनें पुढील श्लोकांत वर्णिली आहे.

ॐ इत्येकाक्षरं ब्रह्म व्याहरन् मां अनुस्मरन्।
यः प्रयाति त्यजन् देहं स याति परमां गतिम्॥

तदनुसार हें सहस्र गात आणि ध्यात महाभागवत भीष्म निजधामास गेले. त्यामुळें ह्या नामसहस्राला आध्यात्मिक महत्त्वाबरोबर ऐतिहासिक महत्त्वहि लाभलें आहे. आणि त्यामुळेंच त्याचा भारतीय आर्यांमध्यें व्यापक प्रचार झाला आहे. त्याच्याइतकें लोकप्रिय दुसरें स्तोत्र दाखविणें कठिण आहे.

## (३) विष्णुनामसहस्र आणि इतर सहस्रें

विष्णुनामसहस्र म्हणण्याचा परिपाठ हिंदु समाजांत सर्वत्र आहे. ब्राह्मण आणि इतरहि वर्णांचे लोक त्याचा नित्य पाठ करीत असतात. स्वतंत्ररीत्या आणि पारायणाच्या अन्तीं तें म्हणण्याची प्रथा आहे. भगवान् विष्णु शिवाचें कमलपुष्पांनीं सहस्रार्चन करीत असतां त्यांत एक कमल कमी पडलें तेव्हां त्यानें आपलें एक नेत्रकमल उपटून तेंच वाहिलें आणि आपलें सहस्रार्चनव्रत पार पाडलें अशी आख्यायिका आहे. सहस्राहुति यज्ञाप्रमाणें

हें सहस्र अक्षता, मंजिऱ्या बिल्वदलें वा कमलें वाहून पूजन करण्याची रीति निघाली आणि चालली. त्यामुळेंहि सहस्राचा प्रसार खूप झाला. मंत्र म्हणायचा, स्वाहाकार करायचा आणि आहुति द्यायची त्याप्रमाणें विश्वस्मै नमः विष्णवे नमः असें म्हणायचें आणि देवाला एक एक फूल वहायचें. अशा या यज्ञांत आणि नाम-यज्ञांत देह, प्राण, मन तिहींचा संगम आहे. मनानें दैवताचें ध्यान करायचें म्हणजे त्याचें रूप मनश्चक्षूंसमोर आणायचें, वाणीनें त्याचा मंत्र, स्तोत्र वा नाम उच्चारायचें आणि हातांनीं तत्प्रीत्यर्थ समर्पण करायचें. या तिन्ही कर्मपंथांनीं जेव्हां आपण यजन पूजन करतों तेव्हांच तें उपासनाकर्म सर्वात्मना झालें असें म्हणावयाचें. सर्व उपासनांमध्यें हें तत्त्व कोणत्या ना कोणत्या प्रकारें अनुस्यूत असतें. यज्ञभावनेनें सूत कांतणारा आपल्या मनश्चक्षूसमोर दरिद्र-नारायणाची मूर्ति आणतो, त्याच्या सेवेसाठीं मी हें सूत कातती असें तो म्हणतो, त्याचा मंत्र 'वन्दे मातरम्' असतो, आणि शेवटीं सूत कांतून तें तो 'इदं न मम' म्हणून राष्ट्रदेवाला अर्पण करतो.

विष्णुनामसहस्राची ही लोकप्रियता पाहून इतर संप्रदायांनींहि आपआपल्या दैवतांचीं अशीं सहस्रें रचिलीं आहेत. ललितासहस्र, शिवसहस्र, गणेशसहस्र, गोपालसहस्र इत्यादि अनेक सहस्रें निघालीं. परंतु त्यांना विष्णुसहस्राची सर नाहीं. कारण तीं सांप्रदायिक आहेत. एका विशिष्ट देवतेचीं तीं सहस्र नामें आहेत. त्यांत विष्णुसहस्राची व्यापकता नाहीं, खोली नाहीं, तो तत्त्वस्पर्श नाहीं.

विष्णुसहस्राचीं हीं अनुकरणें जशीं झालीं तसें तें सबंधचें सबंधच इतर पुराणांत उद्धृत झालें आहे. कदाचित् मूळचें महाभारतांतलेंच पण तेंही स्कंद पुराण (५/६३/७६, २०५) नारद-पंचरात्र (४/३ आणि ४/८) त्याचप्रमाणें गरुडमहापुराण (७१५) यांमध्येंहि आढळतें.

विष्णुसहस्राचे अवांतर संक्षेपहि रूढ असावेत असें दिसतें. विष्णुमहापुराणांत विष्णुशतनामस्तोत्र आलें आहे. चित्रशाळा मुद्रणालय, पुणें यांनीं प्रकाशित केलेल्या हरिवंशाच्या परिशिष्टांत तें दिलें आहे. सर्वांत छोटा पण प्रचारानें मोठा संक्षेप म्हणजे संध्येंतील चोवीस नामें होत: तीं सर्व विष्णुसहस्रांतूनच घेतलेलीं असून अधिकतर कृष्णपर आहेत. संध्येंतला मुख्यविधि गायत्रीजप आहे. पण गायत्री सर्व वर्णांना खुली नाहीं म्हणून गायत्रीच्या २४ अक्षरांवरून २४ च नामांची एक नाम-चोविसी तयार केली आणि ती संध्येंत आरंभींच जोडून दिली. ह्या नाम चोविशीचाहि ज्यानें जप केला त्यानें संध्या केली अशी कल्पना. ही सार्ववर्णिक संध्या झाली. पण अराजक असंघटित संकरप्राय हिंदु समाजांत तिचाहि सार्वत्रिक रूढ विधि होऊं शकला नाहीं, ही गोष्ट वेगळी.

## (४) विष्णु-सहस्र आणि गोपाल-सहस्र

विष्णु-परमात्म्याचेंच नांव जर गोविन्द आणि गोपाल आहे तर विष्णु-सहस्र असतांना परत गोपाल सहस्र कशाला? त्याचें कारण गीतोपदेशक देवकीपुत्र वासुदेव वेगळा आणि नन्दनन्दन यशोदेचा लाल राधारमण गोपाल वेगळा. हे दोन कालांतरानें एकवटून पौराणिक कृष्ण-कथा निर्माण झाली आहे. विष्णुसहस्रांत केशिहा आहे चाणूरान्ध्रनिषूदन आहे पण कंसहा नाहीं. वस्तुतः कंस-विध्वंस हें त्याचें एक अवतारकार्य होय. त्याचा उल्लेख असायला पाहिजे होता. पण विष्णु-सहस्रांत ती कृष्णलीला नाहीं. विष्णुसहस्रांत नामें सर्व गौण म्हणजे गुणवाचक आहेत. जीं नामें ऐतिहासिक वा व्यक्तिवाचक घेतल्यावांचून सुटकाच नाहीं अशीं नामें थोडींच आहेत आणि तीं हि अन्यथा लावणें अशक्य नाहीं. गोपाल कृष्णाला पोरपण आहे, पण गीतोपदेष्ट्या वासुदेव कृष्णाला थोरपणच आहे. पण पूर्णाकार मूर्ति रचायची तर नुसतें मुंडकें चालायचें नाहीं नि नुसतें धडहि चालायचें नाहीं. दोहोंचें एकीकरण पाहिजे. पौराणिक कृष्ण-कथेंत तसें तें केलेलें आहे. वस्तुतः कृष्णकथा म्हणजे पूर्णावतार-कथा आहे. माणसाचा पूर्णावतार बाल्य, तारुण्य आणि वृद्धत्व मिळून होतो. त्या तिहींचा स्पृहणीयतम भाग घेऊन कृष्णाचा पूर्णावतार कवींनीं कल्पिला आहे. बाललीला आणि क्रीडा सर्वांना सुखवितात. तारुण्यांतील तारुण्यसुलभ शृंगार आणि वीरता म्हणजे पराक्रम सर्वांना आकृष्ट करतात. वृद्धत्वातील संशयच्छेदी ज्ञान आणि संसारच्छेदी वैराग्य सर्वांना भारून टाकतात. असा त्रिवेणी संगम जिथें झाला आहे तोच पूर्णावतार होय. असा पूर्णावतार स्वभावतांच अपूर्ण असलेल्या मानवाच्या ठाईं संभवत नाहीं आणि त्या पूर्णावताराची ओढहि त्याला कधीं सोडीत नाहीं. तेव्हां कवि पुढें सरसावतो आणि अशा अलौकिक पूर्णत्वाची कथा आपल्या काव्यांत रंगवतो. आणि प्रत्येक मानवाचें तें अंतरतर चिर-अभिलषित असल्यामुळें त्याला तें अतीव सुखवितें. आणि नुसतेंच

सुखवीत नाहीं तर तदर्थ दिव्य करायचें अपार्थिव साहसहि त्याला तें देत असतें. त्याच पूर्णत्वाच्या अनिवार प्रेरणेंतून रामकृष्णादि महापुरुष निर्माण होतात, बुद्ध, येशू, गांधी अवतरतात आणि पूर्ण पूर्णतर होत जातें. प्रत्येक तरंगवलय आपल्या पूर्वीच्या तरंगवलयाहून मोठें असतें तद्वत् मागील अवताराहून पुढचा अवतार हा मोठा असतो. आणि त्या काळचा तोच पूर्णावतार म्हटला जातो. रामावतारीं रामच पूर्णावतार आणि कृष्णावतारीं कृष्णच. पण रामाहून कृष्ण मोठा आणि कृष्णाहून अतिकृष्ण हरि मोठा. 'पूर्णात् पूर्ण उदच्यते'. विष्णुनामसहस्र त्या पूर्णत्वाचें गायन करतें ज्याच्या अगाध जलराशीवर एकामागून एक अवतारांचे तरंग उठत असतात. तथापि वर्तमान अवतार म्हणून भगवान् कृष्णाचा विशेष उल्लेख त्यांत होणें अपरिहार्यच होय आणि म्हणून इतर कोणत्याहि अवताराहून कृष्ण-अवताराचीं वाचकें अधिक आलीं आहेत. (१) अमृतांशूद्भव, (२) यदुश्रेष्ठ, (३) शौरि, (४) वासुदेव, (५) देवकीनन्दन, (६) गदाग्रज, (७) चाणूरान्ध्रनिषूदन, (८) सुयामुन इत्यादि कांहीं नामें स्पष्टच कृष्णव्यक्तिवाचक होत. हीं अगदीं मोजकींच आहेत. आणि त्यांचाहि गुणवाचक म्हणून अर्थ लावणें शक्य आहे. आणि अनेकदां तसा तो लावलाहि आहे. गुणवाचक नामें तर गुणवाचक आहेतच पण व्यक्ति-वाचक नामेंहि वस्तुतः गुणवाचकच होत. व्यक्तित्व म्हणजे तरी काय? विशिष्टगुणसमुच्चयच. त्या (सदसत्) गुणसमुच्चयांतील प्रकृष्ट गुण म्हणजेच मुख्यतः व्यक्तित्व. जसें कर्ण म्हटला म्हणजे दानशूरता. भीम म्हटला म्हणजे बलाढ्यता इत्यादि गुणोत्कर्ष आपल्या डोळ्यांसमोर उभे राहतात. आणि व्यवहारांत त्यांचा आपण तसा प्रयोगहि करतो. 'तो बृहस्पति आहे'. 'ती साक्षात् लक्ष्मी आहे' इत्यादि प्रयोगांत विद्वत्ता, सौन्दर्य इत्यादि गुणांचाच गौरव केलेला आहे हें उघड आहे. गोपालसहस्रांत विशिष्ट नामरूपगुणकर्मावर भर देऊन लीला-प्रधानतेवर भर देऊन, विष्णुसहस्राहून तें वेगळें कल्पिलें आहे. विष्णुसहस्रांत व्यक्तीपेक्षां गुणांवर भर दिलेला असून तें स्थूल अवतार-कथांहून वेगळें, सूक्ष्म भावावर भर देणारें आहे. परमात्म्याचें सर्वात्मक व्यापक रूपगुणवर्णन करणारें आहे तें. अशी दोहोंतील दृष्टि भिन्न आहे. तथापि परस्परांचा अविरोधच समजला पाहिजे. या बाबतींत गीतेच्याच भाषेंत—

'व्यक्तीं अव्यक्त जो पाहे अव्यक्तीं व्यक्त जो तसें।
तो बुद्धिमंत लोकांत जाणे तत्त्व समग्र तो॥''

असें म्हणतां येईल. शेवटीं अगदीं थोडक्यांत नेमकें बोलायचें म्हणजे गोपालसहस्र वा तत्सम इतर सहस्र अन्यदेवता-पर, तर विष्णुसहस्र हें भगवत्-पर होय, असें म्हटलें पाहिजे.

## (५) नाम-महिमा

परमात्मा हा अनन्त आहे. कोणत्याहि दृष्टीनें पहा त्याला इयत्ता नाहीं, मिति नाहीं. त्यामुळें त्याच्या उपासनांनाहि मिति नाहीं. ज्याला जी उपासना लाभली वा आवडली ती त्यानें अंगीकारावी आणि तद्द्वारा परमात्म्याशीं ऐक्य अनुभवावें. या अचिंत्य परमात्म्याच्या उपासनेच्या मुख्य दोन शाखा आहेत. (१) निर्गुण आणि (२) सगुण; तत्त्वतः निर्गुण विचारावरच स्थिर व्हावें लागतें. कारण, अन्तिम विश्लेषणांत नामरूप मिथ्या ठरून वस्तूची केवलताच तेवढी सिद्ध होते. पण त्याचबरोबर तिचें ग्रहण नामरूपावांचून परभारेंच सहसा होत नाहीं. म्हणून सगुणाची कास ही धरावीच लागते. साधनेच्या ह्या दोन अंगांचीं दोन टोकें म्हणजे निर्गुण अंगाला नामहि सहन न होणें आणि सगुण अंगाला स्थूल मूर्तिहि चालणें अशीं म्हणतां येतील. नाम त्या दोहोंचा सुवर्णमध्य आहे. तो शब्दहि सहन न करण्याइतका अति अव्यक्त नाहीं आणि चतुर्भुजादि मूर्ति कल्पिल्याशिवाय भागवयाचें नाहीं इतका अति स्थूलहि नाहीं. नाम हें व्यक्ताव्यक्त आहे. तें अव्यक्ताचाच निर्देश करतें पण त्याचबरोबर व्यक्ताचाहि निषेध करीत नाहीं. कारण, अव्यक्त हें व्यक्तगर्भ आहेच, आणि व्यक्त हें अव्यक्तपर्यवसायीच आहे. किंबहुना अव्यक्तच्छायारूपच आहे. छाया वस्तूहून स्वतंत्र असत नाहीं. त्यामुळें तिचा अत्यंत निषेध म्हणजे एकपरी वस्तुचाच निषेध म्हणावा लागेल तो. आणि तसें करणें कोणालाहि केव्हांहि शक्यच नाहीं. व्यक्ताव्यक्ताचा हा असा परस्पर-संबंध लक्षांत घेऊन उभयवाचक शब्द म्हणजे नाम होय आणि तें सर्व वेदांचें म्हणजेच सर्व ज्ञान-कर्म-उपासनांचें सार होय. असें हें नाम सगुण आहे, निर्गुण आहे, आणि त्या दोहोंच्या पर आहे असा ऋषींचा निष्कर्ष आहे. अशा या नामाचा उपदेश काशींत तो विश्वनाथ सर्वांना सारखा करीत बसला आहे. किंबहुना नामावांचून दुसरें कांहीं तो बोलतच नाहीं.

ज्ञानदेव म्हणतात :

"सार सार सार विठोबा नाम. तुझें सार।
म्हणोनि शूलपाणि जपताहे वारंवार।।"

त्या आदिनाथापासून गुरुशिष्यपरंपरेनें चालत आलेल्या या नामाचाच उपदेश आपल्याला आपल्या गुरूंनीं श्रीनिवृत्तिनाथांनीं दिला आहे. असें ते दुसऱ्या एका भजनांत सांगत आहेत :

"शांतीची पैं शांति निवृत्तिदातारु।
हरिनाम-उच्चारु दिधला तेणें।"

त्याच हरिनामाचा पाठ त्यांनीं आपल्या शिष्य-प्रशिष्य सांप्रदायिकांना म्हणजेच वारकऱ्यांना आणि तद्द्वारा सगळ्या महाराष्ट्राला, किंबहुना जो ऐकेल त्याला, दिला आहे. या हरिनामाचें महत्त्व मध्ययुगीन सर्वच आचार्य, संतमहंत आणि साधु-सज्जनांनीं सर्वत्र दुमदुमविलें आहे. इकडे महाराष्ट्रांत "विठूचा गजर" होता, तर तिकडे बंगालांत "हरि बोल" चा गदारोळ उठला. शंकराचार्यांनीं आसेतु-हिमाचल पादाक्रांत करून सर्वत्र "भज गोविन्दम्, भज गोविन्दम्" ची चर्पटपंजरी वांटली आहे. कबीर, नानक, मीराबाई, तुलसीदास उत्तरेला तर शैववैष्णव भक्त दक्षिणेला; नरसी मेहता पश्चिमेला, तर शंकर माधव थेट पूर्वेला नामघोषानें दिग्दिगन्त दुमदुमवून सोडीत आहेत. असें समग्र भारताला संतांनीं नाममय करून सोडलें आहे. या सर्वांचा प्रिय आणि पूज्य आद्य नाम-ग्रंथ विष्णुनामसहस्रच होय. त्याचाच अनुवाद त्यांनीं आपआपल्या प्राकृत भाषांत विविध पदावलींत केला आहे.

वेदानुवचन आणि यज्ञ, दान व तप ही वैदिक उपासना आहे. पण तिचा फक्त त्रैवर्णिकांनाच अधिकार आहे. वेदमंत्र सर्वांना खुले नाहींत. हें एक आणि दुसरें म्हणजे ज्यांना खुले आहेत त्यांनाहि ते अति दुर्बोध आहेत. यज्ञकर्माचें अनुष्ठान वेद-वेदांगांच्या ज्ञानावांचून आणि साधन-संपत्तीवांचून करणें शक्य होत नाहीं. सूक्ष्म कालज्ञानहि त्यासाठीं हवें. दानालाहि पात्रापात्र-विचार हवा. आणि द्रव्यानुकूलताहि हवीच. तपांत ज्ञान हवें, विवेक हवा आणि कष्टसहिष्णुताहि हवी. या सगळ्या गोष्टी सर्वांना सुलभ नाहींत. नामाला या कशाचीच गरज नाहीं. त्याचा उच्चार कोणीहि आणि केव्हांहि करूं शकतो. त्याचा विधि यज्ञासारखा जटिल नाहीं वा वित्तसाध्यहि नाहीं. आज्याची गरज नाहीं. पत्रपुष्पानें वा तोयदानानेंहि तो भगवान् संतुष्ट होतो. कृच्छ्रचांद्रायणादि विषम व्रतें आचरायला नकोत. नित्य गंगालयाचें स्नान व एकादशीचा उपवास पुरें. मोठ्या कष्टाची गरज नाहीं. असा हा भागवत-संप्रदाय आहे. कोणताहि संप्रदाय म्हटला, उपासना- पद्धति म्हटली कीं, तिचे कांहीं विधिनिषेध हे असायचेच. तसे ते श्रद्धामूलक नामप्रधान भूतसेवामय, भागवत-संप्रदायाचे वा भक्तिपंथाचेहि आहेत. त्यालाच सारांशानें गीतेनें "यज्ञानां जपयज्ञोऽस्मि" म्हणून गौरविलें आहे. यज्ञाचें हें शुद्धीकरण आणि सुलभीकरण वा व्यापकीकरण आहे. उत्तरोत्तर सत्य आणि संयम यांचें अनुसरण करून धर्माचें असें शुद्धीकरण केल्यानेंच तो धर्म सनातन या पदवीस प्राप्त होतो. यज्ञांत अचिंत्य दैवी शक्तीला आवाहन हा मनोयोग, मन्त्रोच्चार हा वाग्योग आणि हवन हा क्रियायोग आहे. भक्तिभावानें नामोच्चार करून आणि हात जोडून व डोकें लववून केलेल्या नमस्कारांतहि तो त्रिविध योग आहे. पण यज्ञांतील तो त्रैवर्णिकाधिकार-वाद, तो अगम्य व असुकर मन्त्रोच्चार आणि ती पशुहिंसा व ते नियमबद्ध हवन हा गौणभाग त्यांत नाहीं, यज्ञाचें तें सार नव्हे, टरफल आहे.

श्रद्धामूलक नामप्रधान भूतसेवारूप या वैष्णव वा भागवत धर्माचें तत्त्वदर्शन अद्वैत, कीं द्वैत, कीं विशिष्टाद्वैत? याचें उत्तर यथारुचि तुम्ही हवें तें समजा, त्याचा त्याबाबत अनाग्रह आहे. तो दोन्ही नामें घेतो—"एको नैक:". तो परमात्मा अद्वितीय एक आहे. तो एकच नाहीं, त्याच्या सवें जीवहि आहे जगत्हि आहे. दिसायला गर्भिणी एक दिसली, तरी तिच्या पोटांत गर्भ ही दुसरी जीवसत्ता नांदत असते, आणि जियें गर्भ नि गर्भिणी आहे तिथें धाताहि आहेच हें सांगणें न लगे. युक्तीनें सर्वच दर्शनें उपपन्न होतात. कोणतेंहि दर्शन स्वीकारलें तरी सर्वत्र नाम हें समानच मान्य आहे. तें दर्शनाच्या पलीकडे आहे. अद्वैतवादी शंकराचार्यांचें विष्णु-नामसहस्रावर भाष्यच आहे. इतर सांप्रदायिकांच्या टीका आहेत. शंकराचार्य शैव होते, इतर आचार्य वैष्णव होते. प्रस्थानत्रयीप्रमाणें नामसहस्राचें सर्वांना समान आकर्षण आहे आणि त्याचा पाठ सर्वच संप्रदायांत होतो.

भलो जो है पोच जो है, दाहिनो जो बाम रे।
रामनाम ही सो अन्त, सबही को काम रे।।

सज्जन असो वा दुर्जन असो, इष्ट असो वा अनिष्ट असो, सर्वांना शेवटीं रामनाम घ्यावेंच लागतें असें तुलसीदासांनीं म्हटलें आहे. तेंच अद्वैती, द्वैती, विशिष्टाद्वैती इत्यादि मतवाद्यांनाहि लागू आहे. कोणतेंहि मत वा उपपत्ति तुम्हीं अंगीकारली तरी उपासना आणि प्रयाणकालीन साधना म्हणून नाममहिमा अभंगच राहतो. गीतेनें म्हटलें आहे :

(१) मां अनुस्मर युध्य च।

(२) ॐ इत्येकाक्षरं ब्रह्म व्याहरन् मां अनुस्मरन्।
य: प्रयाति त्यजन् देहं स याति परमां गतिम्।।

अन्तिम दर्शनाप्रमाणें साधनाबाबतहि भेद आहेत. कोणी ज्ञानमार्गी तें अन्तिम दर्शन प्राप्त करून घेण्यासाठीं महावाक्यविचार वा तत्-त्वं-पदार्थशोधन हाच मार्ग योग्य असें म्हणतात. कोणी योगमार्गी चित्तवृत्ति-निरोध हाच त्याचा शास्त्रीय उपाय होय, असें प्रतिपादितात. कोणी कर्ममार्गी म्हणतात, निषिद्ध कर्मे वर्ज्य करणें, काम्य कर्मे सोडून देणें आणि स्वधर्म-कर्मे फलवासना न राखतां करणें हाच श्रेयोमार्ग आहे; परंतु भक्तिमार्गी म्हणतात, त्या परमात्म्याच्या ठाईं परम श्रद्धा ठेवून त्याचेंच निरन्तर स्मरण करणें आणि सर्व कर्मे त्यालाच समर्पित करणें हाच सर्वोत्कृष्ट श्रेयोमार्ग होय. ज्ञानमार्गांत बुद्धि, योगमार्गांत चित्त, कर्ममार्गांत देहेंद्रियें आणि भक्तिमार्गांत हृदय वा जिव्हाळा हें मुख्य हत्यार आहे. तें हत्यार हस्तगत करून त्यालाच जो उत्तरोत्तर निर्दोष धारदार आणि पाणीदार बनवीत राहील तोच शेवटीं फावणार. सिद्धि ही साधनाधीन असल्यामुळें साधनाचें महत्त्व निरतिशय आहे, हें उघड आहे. पण साधनें अनेक असल्यामुळें त्यांत निवड करावी लागते. साधक म्हणजे सिद्धिक्षम असेल तेंच साधन या पदवीस पात्र होतें. ज्या साधनानें क्षिप्र आणि अल्पायासानें साध्य हस्तगत करतां येतें तें उत्तम साधन म्हणावयाचें. जें साधन अपात्रांतील अपात्रालाहि अशी क्षिप्र व अनायास सिद्धि मिळवून देतें तें तर उत्तमोत्तम साधन म्हणावयाचें. नाम हें असें उत्तमोत्तम साधन आहे.

क्षिप्रं भवति धर्मात्मा शश्वच्-छान्तिं निगच्छति।
कौन्तेय प्रतिजानीहि न मे भक्त: प्रणश्यति।।

अशी या नाम-निष्ठ भक्ति-संप्रदायाची ख्याति आहे. अजामिल, वाल्मीकि, नामदेव इत्यादिकांचीं उदाहरणें त्याचींच आहेत. म्हणून ज्ञानियांचे राजे नि योगियांचे शिरोमणि ज्ञानदेव म्हणतात :

मंथुनी नवनीता तैसें घे अनन्ता।
वायां आणिका पंथा जाशी झणें।।

लोणी जसें सर्व गोरसाचें सार होय, तसें सर्व साधनांचें सार हें नाम होय. सर्व वेदांचें सार ॐकार; शतकोटि-प्रविस्तर रामायणांचें सार रामनाम. हा निष्कर्ष जुनाच आहे आणि तो सार्वत्रिकहि आहे. इस्लाममध्यें अल्लाची नव्व्याण्णव नामें प्रसिद्ध आहेत. ख्रिस्ती पंथांतहि ''देवाचें नाम गाजो'' म्हणून वारंवार आलें आहे. असें हें नाम-माहात्म्य सर्वत्र मान्यच आहे.

सर्व साधनांत याच नामसार भक्तियोगाला भगवंतानें गीतेंत सर्वोत्तम योग म्हटलें आहे:

(१) योगिनामपि सर्वेषां मद्गतेनान्तरात्मना।
श्रद्धावान् भजते यो मां स मे युक्ततमो मत:।।

(२) मय्यावेश्य मनो ये मां नित्ययुक्ता उपासते।
श्रद्धया परयोपेतास् ते मे युक्ततमा मता:।।

इथें भीष्मांनींहि तोच निर्णय दिला आहे:

एष मे सर्वधर्माणां धर्मोऽधिकतमो मत:।
यद् भक्त्या पुण्डरीकाक्षं स्तवैर् अर्चेत् नर: सदा।।

दोन्हीकडे शब्दप्रयोग देखील सारखाच आढळून येतो.

ब्रह्मरूप परायणाचें म्हणजे अन्तिम गन्तव्याचें स्वच्छ दर्शन झाल्यावर आणि त्याला पोंचायचा योग्य मार्ग निश्चित झाल्यावर उरतें केवळ मार्गक्रमण. तेंच साधकाचें कर्तव्य. त्याचाच त्याला ध्यास पाहिजे. ज्ञानदेव त्याबाबत ही सूचना देतात :

सकळ नेणोनिया आन। एक विठ्ठलचि जाण
हेचि भक्ति हेंचि ज्ञान। एक विठ्ठलचि जाण
गुरुगम्य ही खूण। एक विठ्ठलचि जाण
बुझसी जरी तूं निर्वाण, एक विठ्ठलचि जाण
बाप विठ्ठलाची आण। एक विठ्ठलचि जाण

असा एकत्वाभ्यास झाला म्हणजे मग त्याला ती दशा प्राप्त होते जी ज्ञानदेव पुढील भजनांत आपली वर्णीत आहेत—

(१) धर्म जागो निवृत्तीचा हरिनामें उत्साहो।
कर्मधर्म लोपलें माझें फिटला संदेहो।
धर्म अर्थ काम पूर्ण दान मान समूहो।
नेघें मीं इंद्रिय-वृत्ति रामकृष्ण-नामीं टाहो।।

(२) कल्पना मावळली कल्पवृक्ष-तळवटीं।
चिंता हारपली माझी नित्य अमृताची वाटी।
मन हें मग्न जालें नित्य वसे वैकुंठीं।
तापत्रय पाप गेलें नाना दोषांचे थाटी।।

(३) आत्माराम निर्‌गमले वेदशास्त्र-गुह्यज्ञानें।
वासनाचि मोहो जाळी ते विराली नानास्थानें।
फुटले नाना घट तुटलीं बंधनें।
सुटलिया जीवग्रन्थी ऐसें केलें गुरु-ज्ञानें।।

(४) बुद्धि बोध सवंगडे सजीव कर-चरण।
नयनीं नयन जाले चक्षु मी समाधान।
दिव्यदेह अमृत-कळा दशदिशा परिघन।
सर्व हें ब्रह्म जालें फळलें विज्ञान।।

(५) निवृत्ति गुरु माझा अंधपण फेडिलों।
सर्वत्र दृष्टि जाली एकतत्त्वें राहिलों।
निरसली माया मोहो रामांजन लेइलों।
ज्ञानदेव ज्ञानगंगे निवृत्ती बुडविलों।।

या भजनांत म्हटल्याप्रमाणें जेव्हां "सर्वत्र दृष्टि" होते आणि सर्वत्र एकच एक तत्त्व दिसूं लागतें असें नव्हे तर साधक तद्‌रूपच होऊन राहतो, "एकतत्त्वें राहिलों" असें अनुभवतो, तेंव्हांच साधन सुफल संपूर्ण होतें. अशा ब्रह्मभूत पुरुषाचें, महाभागवत भीष्मदेवाचें तें अद्भुत दर्शन या नामसहस्रांत सांठलें आहे. तें एकच एक तत्त्व त्याला सर्वत्र अनुभवास येतें आणि आपल्या त्या भावाविष्ट दशेंत तो "आश्चर्यवद् वदति" चकितवत् बोलतो. ती आश्चर्यवाणी म्हणजे हें नामसहस्र होय. तें अद्‌भुत दर्शन, गीतेच्याच शब्दांत तें अत्यद्भुत रूप अर्जुनाला पहायला मिळालें, इथें त्या अत्यद्भुताचें नाम, विश्वरूपाप्रमाणें तें विश्वनाम, धर्मराजाला ऐकायला मिळालें आहे. शब्दांकित विश्वरूपच तें आहे.

विश्वरूपाचें विश्लेषण करणें शक्य नाहीं. कारण तें अद्‌भुत दर्शन आहे, तें सर्वस्वीं अगोचरच आहे. तीच गोष्ट ह्या नामसहस्राची. त्याचें विश्लेषण होऊं शकत नाहीं, तें एक समग्र दर्शन आहे, एक भावदर्शन आहे. त्याचे तुकडे तुकडे केल्यानें जें दर्शन होईल, तें छिन्नाचें दर्शन होईल, समग्राचें होणार नाहीं. त्या दिक्कालाद्यच्छिन्न वस्तूचें दर्शन दिव्य चक्षूनेंच होणें शक्य आहे. तो दिव्य चक्षु म्हणजे भावावेश होय, भावसमाधि होय.

नाहं वेदैर् न तपसा न दानेन न चेज्यया।
शक्य एवंविधो द्रष्टुं, दृष्टवान् असि मां यथा।।
भक्त्या त्वनन्यया शक्य अहं एवंविधो ऽर्जुन।
ज्ञातुं द्रष्टुं च तत्त्वेन प्रवेष्टुं च परंतप।।

या श्लोकांत गीतेनें तेंच सुस्पष्ट केलें आहे. तें भावदर्शन परम भागवत स्वतःच घेतील.

□□□

ॐ

॥ परमात्मने नमः ॥

# अथ
# श्री विष्णुसहस्रनाम

## *मंगलाचरण*

श्लोक: १, २

**यस्य स्मरणमात्रेण जन्म-संसार-बन्धनात्।**
**विमुच्यते नमस् तस्मै विष्णवे प्रभविष्णवे॥**
**नमः समस्त-भूतानां आदिभूताय भूभृते।**
**अनेकरूप-रूपाय विष्णवे प्रभविष्णवे॥**

अर्थ:

१. ज्याच्या केवळ स्मरणानेंच जन्मजन्मान्तर-रूप संसरणाच्या बन्धनांतून जीवाची सुटका होते त्या सर्वशक्तिमान् विष्णूला नमस्कार असो.

२. नमस्कार असो त्या सर्वशक्तिमान् विष्णूला जो सर्व भूतांचा आदि आहे, ज्यानें ही पृथ्वी धारण केली आहे आणि जो हीं चराचर नानारूपें ल्याला आहे.

टिप्पणी

१. हे मंगलाचरणाचे दोन श्लोक विष्णुसहस्राच्या बाहेरचे आहेत. तथापि ते मंगलाचरण म्हणून पाठारंभीं म्हणण्याचा परिपाठ आहे. मंगलाचरण किती श्लोकांनीं करावें याला नियम नाहीं. तें एका श्लोकानें, एका शब्दानें वा एका अक्षरानेंहि होऊं शकतें. ॐ हें एक अक्षर आहे. अथ हा एक शब्द आहे. आणि 'यस्य स्मरणामात्रेण' हा इथें श्लोक आहे. कुठें तिन्ही, कुठें दोन, कुठें एक आणि कुठें या पैकीं कांहींच नाहीं असेंहि आढळून येतें. जिथें तें उल्लिखित नसतें तिथें तें अध्याहृत आहे असें समजावें. अथवा स्वयं-मंगलरूपाला दुसऱ्या मंगलाची गरज नाहीं असें म्हणावें.

२. "विश्वं विष्णुर् वषट्कारो" पासून "सर्व-प्रहरणायुधः" पर्यंत एकूण १०७ (एकशें सात) श्लोक आहेत. त्यांच्या आरंभीं "यस्य स्मरणमात्रेण" हा मंगलाचरणाचा एक श्लोक जोडून विष्णु-सहस्राच्या श्लोकांची ही अष्टोतरशती स्मरणिका होते. नित्यपाठाला एवढीच पुरेशी आहे. आरंभीचें प्रास्ताविक आणि अंतींचा उपसंहार निरर्थक नसला तरी नित्य-पाठाला गरजेचा नाही. म्हणून माझी पाठावृत्ति अष्टोत्तरशती आहे. स्मरणी अष्टोत्तरशत-संख्यक ग्रथितांची असते, हें प्रसिद्धच आहे.

संख्येला तसें विशेष महत्त्व देण्याचें कारण नाहीं. परंतु विचारवंत आपल्या सर्व कृति गोजून-मापून करतात. कारण संख्या हा हि एक विचारच आहे. आणि त्यामुळेंच ज्ञानाला त्यांनीं सांख्य हें नांव दिलेले

आहे. सांख्यांत सर्व तत्त्वें संख्याबद्ध आहेत, क्रमबद्ध आहेत.

विष्णुसहस्रनाम हि एक सांख्यच आहे. तें नामांच्या सहस्रानें बद्ध आहे. तसा सहस्रनाम हा ग्रंथहि अष्टोत्तरशत श्लोकबद्ध आहे असें म्हणायला हरकत नाहीं. व्यासांना निश्चितच हें संख्यान आवडलें. कारण व्यासांच्या सर्व कृति संख्याबद्ध आहेत. नवांक ही संख्याचक्राची त्रिज्या होय आणि व्यास त्याच्या दुपटीला म्हणतात म्हणून, व्यासांच्या बऱ्याच कृति (९×२)=१८ अष्टादशसंख्यक आहेत. गीता अष्टादशाध्यायिनी आहे. महाभारताचीं पर्वें १८ आहेत. भारतीय युद्धांतील अक्षौहिणी १८ आहेत. पुराणें १८ आहेत. उप-पुराणें १८ आहेत. भागवत ग्रन्थ अष्टादश सहस्र आहे. अशा प्रकारें १८ अष्टादश ही जणूं व्यासांची खूणच आहे. कुठें ना कुठें ती खूण येतेच. विष्णुसहस्र महाभारतांर्गतच आहे. त्याला पुनः १८ संख्येची गरज नाहीं. पण ग्रंथपरिमितीची गरज आहे. ती परिमिति १०८ मानल्यास १०८ संख्येला जें पावित्र्य आहे तें अधिक पवित्र होईल.

३. **जन्मसंसारबन्धन** : जन्मामागून जन्म घेत फिरणें म्हणजे जन्मसंसार होय. तेंच जें बन्धन त्याला म्हणावयाचें जन्मसंसार-बन्धन.

४. **स्मरणमात्रेण** : संसारबंधन आत्मविस्मृतीनें होतें. विस्मरणावर उतारा स्मरणाचा. म्हणून म्हटलें आहे 'स्मरणमात्रेण'. स्वप्नांतील दुःख जागृतीनेंच जायचें. तसें आत्म-विस्मरणामुळें उत्पन्न झालेलें संसार-दुःख स्मरणानेंच जायचें. त्यासाठीं ही अष्टोत्तर शत-ग्रन्थ-स्मरणी. इथें ग्रन्थ म्हणजे श्लोक समजावयाचा. त्यांतील पहिला ग्रन्थ हा मंगलाचरणाचा श्लोक होय.

५. **विष्णु** : गीतेंत ''आदित्यानां अहं विष्णुः'' म्हटलें आहे. अर्थात् अदितिपुत्र सर्व देवांत, प्रकाशकांत, सूर्य हा सर्वोत्तम प्रकाशक होय. अशाप्रकारें विष्णु हा तेजो-देवता होय, सर्वोत्तम तेजःपुंज होय. सूर्य हें आधिभौतिक रूप आहे, सविता हें आधिदैविक रूप आहे आणि परमात्मा हें आध्यात्मिक रूप आहे. कारण तेंच चिद्घन असून सर्व चित्प्रकाशित आहे. त्याचीच उपासना गायत्रींत उपदेशिली आहे. त्यालाच उद्देशून मंत्र आहे—

**उद् वयं तमसस् परि, ज्योतिः पश्यन्त उत्तरम्।**
**देवं देवत्रा सूर्यम्, अगन्म ज्योतिर् उत्तमम्।।**

हा चतुष्पाद अनुष्टुभ् श्लोक आहे. ''देवं देवत्रा सूर्यम्'' हा पाद ''देवं देवत्र सूरिअम्'' असा उच्चारिला असतां श्लोक सुस्वरूप बनतो. यांत उत् उत्तर आणि उत्तम अशा तिन्ही उत्तरोत्तर उंच पायऱ्या आलेल्या आहेत. त्या आधिभौतिक, आधि-दैविक आणि आध्यात्मिक भूमिकांचा उल्लेख करतात. ज्या पुरुषोत्तमाला आम्हांला गांठावयाचें आहे तो परं ज्योति होय. तोच विष्णु.

६. **प्रभविष्णु** : हा विष्णु अधिभूत सूर्य रूपानें भौतिक नैश तमाचा भेद करून वर येतो. अधिदैव सवितृरूपानें तो स्थूल उपाधींचा भेद करून आणखी वर चढतो आणि तोच अध्यात्म परमात्मरूपानें सूक्ष्मातिसूक्ष्म उपाधींचा, सर्व कोशांचा भेद करून सर्वोपरि विराजमान होतो. म्हणून त्याला म्हटलें आहे प्रभविष्णु, सर्व अंतरायांवर मात करणारा. प्रभवति इति प्रभुः। प्रभवितुं शीलं अस्य इति प्रभविष्णुः। सर्व अंतरायांवर मात करतो म्हणून प्रभु आणि असें सर्वत्र प्रभुत्व गाजवणें हेंच ज्याचें शील आहे तो म्हणावयाचा प्रभविष्णु.

७. **आदिभूत** : अव्यक्त प्रकृतीचा आश्रय म्हणून तो अक्षर परमात्मा आदिभूत होय, आदि सत्त्व होय. हें मूळ म्हणावयाचें संसार वृक्षाचें.

८. **भूभृत्** : ही भूमि, हा भूर्लोक, सर्व जीवनिकायांचा आश्रय आहे. आणि त्याचाहि आश्रय प्रकृतीच्या द्वारा तो परमात्माच आहे. म्हणून तो

म्हटला आहे भूभृत्, भूलोकाला धारण करणारा. हा बुंधा म्हणावयाचा.

९. अनेकरूप-रूप : सृष्टींत जीं चराचर नाना रूपें दिसतात तीं सगळीं पांचभौतिक प्रकृतीच्या द्वारा परमात्म्यानेंच धारण केलेलीं होत. म्हणून तो परमात्माच अनेकरूप-रूप म्हटला आहे. हीं सगळीं रूपें त्याचेंच रूप आहे. हीं पानें फुलें म्हणावयाचीं. असा हा समग्र संसार-वृक्ष आहे. आणि तो आदौ मध्यें अन्तीं परमात्मरूपच आहे.

१०. मोगऱ्याचें फूल जसें बहुपुटी असतें, तसें हें विश्वहि बहुपुटी आहे. पुडांत पुडें भरलीं आहेत त्यांत. एका विश्वांत दुसरें विश्व, आणि त्यांत पुनः तिसरें असें तें रचलेलें आहे. विश्वाकार हें एक पुट आहे. त्याच्या पोटांत भूमि हें दुसरें पुट आहे. त्याच्या हि पोटांत शरीर हें तिसरें पुट आहे आणि ह्या तिन्ही पुटांत वा पुरांत तो परम पुरुष वसला आहे. म्हणून तो आदिभूत भूभृत् आणि अनेकरूप म्हटला आहे.

११. मंगलाचरणांतील सृष्टीच्या ह्या सहज उल्लेखावरून तेंच सूत्र घेऊन परमात्म्याचें पहिलें नांव विश्वम् म्हणून स्फुरलें असावें.

□□□

# प्रास्ताविक

श्लोक : १

वैशम्पायन उवाच :

श्रुत्वा धर्मान् अशेषेण पावनानि च सर्वशः।
युधिष्ठिरः शान्तनवं पुनरेवाभ्यभाषत।।

अर्थ : वैशम्पायन म्हणाला–

सर्व धर्म आणि आत्मशुद्धिकारक सर्व यज्ञदानादि श्रवण करून झाल्यावर युधिष्ठिर शंतनुपुत्र भीष्माकडे पुनरपि येऊन म्हणाला :

टिप्पणी

१. धर्म : वर्ण-धर्म, आश्रम-धर्म, राजधर्म, गृहस्थ-धर्म आणि यतिधर्म इत्यादि समाजांतील सामान्य आणि विशिष्ट व्यक्तींचीं विविध कर्तव्यें.

२. पावनें : वर्णाश्रमधर्म हे स्वभावनियत असून त्यांनाच स्वधर्म म्हटलें जातें. हीं शरीरयात्रेसाठीं केलीं जाणारीं सामान्य कर्में होत. या आपआपल्या वर्ण-धर्मांहून व आश्रमधर्मांहून वेगळीं आणि आत्मशुद्धीच्या विशिष्ट हेतूनें आचरिलीं जाणारीं जीं स्वाध्याय-यज्ञ-दान-तपोरूप कर्में तीं औपासनिक कर्में होत. यांनाच पावनें म्हणजे पुण्यकर्में, म्हटलें आहे :

"यज्ञो दानं तपश्चैव पावनानि मनीषिणाम्" हीं विशिष्ट कर्में कोणी शरीरयात्रेसाठीं आचरीत नाहीं, जो शुद्धिकाम असेल तोच तीं आचरतो. पूज्य विनोबांनीं यांनाच (सामान्य) कर्म आणि विकर्म अशा संज्ञा दिल्या आहेत.

३. अशेषेण, सर्वशः 'अशेषेण' म्हणजे झाडून सर्व, निःशेष सर्व. आणि सर्वशः म्हणजे सांगोपांग, समग्र धर्म सांगतांना कोणाचा कोणता हि लहान-मोठा धर्म सांगायचा उरला नाहीं. तो साद्यन्त समग्र सांगितला.

४. पुनरेव : एकदां संपूर्ण ऐकून झाल्यावर युधिष्ठिर पुनरपि भीष्मांकडे येतो. कांहीं तरी अनुक्त अवशिष्ट राहिलें आहे, तें ऐकण्याच्या हेतूनें तो पुनरपि परिप्रश्न करतो.

इथें प्रश्न असा उठतो कीं, स्वधर्म नि औपासनिक कर्म सांगून झाल्यानंतर खरोखर सांगायचें काय शिल्लक उरतें? प्रश्नाला वाव कुठें राहतो? ग्रन्थकाराला काय विवक्षित आहे? व्यासांना इथें भक्तितत्त्व प्रतिपादावयाचें आहे. भक्तीचा जिव्हाळा ही वेगळीच किमया आहे. स्वधर्म हें एक कर्म आहे. यज्ञ-दान-तपें हि विशिष्ट खरीं पण कर्मेंच आहेत. त्या दोहोंहून हि भक्ति हें तत्त्व वेगळेंच आहे. तें कर्म नाहीं. तें विकर्म नाहीं. तें अकर्म आहे. आणि म्हणून तें वरील दोहोंत बसत नाहीं. तो अंतरतर हृदयधर्म आहे. सर्व पावनांत भक्ति परमपावन आहे. रिठे व पाणी यांनीं कपडे धुतले जातात. चित्त धुण्याच्या कामीं इतर पावनें हीं रिठ्यासारखीं आहेत, तर भक्ति ही पाण्यासारखी आहे. नुसत्या पाण्यानें हि कपडे धुतले जातील, पण पाण्यावांचून नुसत्या रिठ्यांनीं वा सोडा-साबणानें कपडे साफ होणें नाहीं. तसें भक्तीवांचून चित्तशुद्धि नाहीं. भक्तीसोबत इतर पावनें असलीं तर 'अधिकस्याधिकं फलम्' म्हणावयाचें. असें जें तें परम पावन भक्तितत्त्व त्याचें प्रतिपादन करण्यासाठीं, त्यावर विशेष भर देण्यासाठीं, परम भागवत भीष्माच्या मुखानें व्यासांनीं विष्णुसहस्रनाम सांगितलें आहे. भीष्माची परम भागवतांत जी गणना झालेली आहे त्याचें कारण हि हें विष्णुसहस्रनाम आहे असें म्हणतां येईल. महाभारतानंतर व्यासांनीं भागवत

लिहिलें त्यांत हि भक्तीचें तत्त्व प्रतिपादणें हाच हेतु आहे. भागवत म्हणजे भगवत्स्तुति-रत्नाकरच. ठिकठिकाणीं त्यांत प्रसंग साधून स्तव केलेला आहे. खरोखर त्यासाठींच, भगवद्यशोगानासाठींच, भागवताची रचना झाली आहे. व्यासांच्या जीवनांत आणि कृतींत त्याची उणीव राहून गेली होती. त्यामुळें सर्व धर्मकर्म करूनहि त्यांना पूर्ण प्रसन्नता नव्हती. पण ती कशामुळें हें त्यांच्या लक्षांत येत नव्हतें. देवर्षि नारदानें तें त्यांच्या ध्यानांत आणून दिलें :

भवतानुदितप्रायं यशो भगवतोऽमलम्।
येनैवासौ न तुष्येत मन्ये तद्दर्शनं खिलम्।।

नारद म्हणतात, हे महर्षि व्यासा, तुम्हीं वेद-विभाग केले. त्यांचा अर्थ सामान्य जनांना कळावा म्हणून महाभारताची रचना केली. असें सर्व कांहीं तुम्हीं केलें, सांगितलें, परंतु भगवंताचें निर्मल यश तुम्हीं अद्याप फारसें गाइलेलें नाहीं. त्याचें स्तवन, नामसंकीर्तन अद्याप तुम्हीं यथेच्छ केलेलें नाहीं. तुम्हांला इतकें सारें करूनहि जी असंपन्नता, अप्रसन्नता वाटत आहे, त्याचें कारण हें आहे, असें मला वाटतें.

तें जें अनुक्त, तें ऐकिण्यासाठीं धर्मराज पुनरपि भीष्माकडे आले आहेत, आणि भीष्मांनीं त्यांना तें नामसहस्राच्या रूपानें सांगितलें आहे. आणि हाच, भक्तीचा, सर्वश्रेष्ठ धर्म होय, असें प्रतिपादिलें आहे. म्हणजे (१) वर्णाश्रमधर्मरूप बाह्य स्वधर्म, (२) स्वाध्याय, यज्ञदानतपोरूप आन्तरिक औपासनिक धर्म आणि (३) जिव्हाळ्याचें भगवन्नामस्मरण हा अन्तरतर धर्म मिळून धर्म-दर्शन पूर्ण होतें. यांत उघडच उत्तरोत्तर धर्म सूक्ष्म आणि श्रेष्ठ आहे. म्हणूनच परम भागवत भीष्माचार्यांनीं आपलें निःसंदिग्ध मत दिलें आहे :

एष मे सर्व-धर्माणां धर्मोऽधिकतमो मतः।
यद् भक्त्या पुण्डरीकाक्षं स्तवैर् अर्चेत् नरः सदा।।

भारतीय जीवन-दर्शनाचें हें मथित आहे आणि हें कुरुवृद्ध पितामह भीष्मांनीं काढलेलें आहे. भारताच्या एकापेक्षां एक वरचढ लोकोत्तर विभूतींत भीष्मांचें स्थान अनन्यसाधारण आहे. त्यांचें जन्म-कर्म दिव्य आहे. ते आदर्श योगी, ज्ञानी, भक्त होते. ते राज्यश्री आणि स्त्री यांचा परित्याग करूनहि अरण्यवासी मुनि झाले नाहींत, पण कमलपत्रवत् जगाच्या भर व्यवहारांत वागत राहिले. म्हणून ते आदर्श कर्मयोगी होते. जीवनाचीं सर्व शास्त्रें नि शस्त्रें यांत ते समान प्रवीण होते. म्हणून ते आदर्श ज्ञानी होते. मुत्सद्दी आणि लढवय्या मिळून पूर्ण शहाणा बनतो. तसे ते आदर्श पूर्ण शहाणे म्हणजे ज्ञानी होते. आणि या विश्वाचें नियमन करणारी जी अचिंत्य सत्ता त्या परमात्म्याचे ते निःसीम भक्त होते. म्हणून ते परम भागवत होत, परम भक्त होत. ते नैष्ठिक ब्रह्मचारी असल्यामुळें परम मातृभक्त होते आणि म्हणून ते पित्याच्या वरानें इच्छामरणीहि होते. शरपंजरीं राहून त्यांनीं कालोपासना केली आणि योग्य कालीं उत्तरायणांत योग्याप्रमाणें प्रयाण-कालीन साधना करून परमात्म-स्मरण करीत देह ठेवला. अशा केवळ धर्ममय पुरुषाहून धर्माचें रहस्य अधिकारवाणीनें सांगणारा दुसरा कोण बरें अधिकारी पुरुष असूं शकेल? म्हणून भगवान् कृष्णानें जिज्ञासु धर्मराजाला भीष्मांकडेच पाठविलें आणि त्या अस्तास जायला निघालेल्या ज्ञान-सूर्याकडून सर्व धर्मज्ञान संपादविलें. स्वतः सर्वज्ञ असूनहि धर्मोपदेशाचा अधिकार भीष्मांचाच मानिला. कृष्णाचा हा खोटा विनय नसून तो वयोज्येष्ठत्व, तपोनित्यत्व आणि ज्ञानश्रेष्ठत्व यांचा योग्य गौरव आहे. जणूं राजसूय यज्ञांत अग्रपूजेचा मान देऊन केलेल्या आपल्या गौरवाची कृष्णानें केलेली ही परतफेडच होय.

युधिष्ठिर उवाच :

श्लोक : २-३

किं एकं दैवतं लोके किं वाप्येकं परायणम्।
स्तुवन्तः कं कमर्चन्तः प्राप्नुयुर् मानवाः शुभम्।।

को धर्मः सर्वधर्माणां भवतः परमो मतः।
किं जपन् मुच्यते जन्तुर् जन्म-संसार-बन्धनात्।।

**अर्थ** : युधिष्ठिर म्हणाला—

२. या लोकांत एकमात्र (आराध्य) दैवत कोणतें आहे? तसेंच एकमात्र (ध्येयभूत) परायण कोणतें बरें आहे? कोणाची बरें स्तुति आणि अर्चना केली असतां मानव कल्याण पावतात?

३. तुमच्या मतें सर्व धर्मांत परम धर्म कोणता आहे? आणि कशाचा बरें जप केला असतां जीव भव-बन्धनांतून सुटतो?

**टिप्पणी**

१. **लोक** : लोक म्हणजे इहलोक, हा मर्त्य लोक. लोक अनेक आहेत, पण इथें मानवांच्या दृष्टीनें प्रश्न असल्यामुळें मर्त्यलोकांतहि आत्मज्ञानक्षम मनुष्य-योनि असा त्याचा विशेष अर्थ समजावयाचा आहे.

२. **दैवत** : दैवत म्हणजे आराध्य देव. काया, वाचा, मनें ज्याची आराधना करतां येते असा सगुण साकार देव.

३. **परायण** : परायण म्हणजे परम गति, परमपद. तें पद कीं जिथें गेलें असतां पुन: संसरण होत नाहीं. तें निर्‌गुण निराकार ब्रह्म दैवत आणि परायण या दोन पदांनीं सगुण निर्गुण दोन्ही रूपांचा उल्लेख केलेला असला तरी तीं दोन्हीं तत्त्वत: अभिन्न परस्परांगभूत आहेत. पहा गीता :

**अवजानन्ति मां मूढा मानुषीं तनुमाश्रितम्।**
**परं भावं अजानन्तो मम भूतमहेश्वरम्।। ९-११**
**अव्यक्तं व्यक्तिमापन्नं मन्यन्ते मां अबुद्धय:।**
**परं भावं अजानन्तो ममाव्ययमनुत्तमम्।। ७-२४**

नाणें नामरूपात्मक म्हणून तुच्छ लेखतां कामा नये. कारण तें (निर्‌गुण निराकार) सोनेंच आहे. सोन्याचें नाणें पाडलें म्हणून (निर्‌गुण-निराकारत्व रूप) सोने-पण नाहीसें होत नाहीं. सोनें तें सोनेंच आहे. नामरूपात्मक नाणेपणानें त्याचें कांहीं बिघडत नाहीं.

४. **शुभ** : शुभ गति, स्वर्गादि पुण्यलोक, यथाकाल अन्तीं मोक्षहि. मोक्षाचा उल्लेख 'मुच्यन्ते' पदानें केला आहे.

५. **स्तुवन्त: अर्चन्त: जपन्** : स्तुति, अर्चा, जप हे मुख्यत: वाक्-काय-मनो-धर्म होत. प्राण-देह-मनोधर्म म्हटलें तरी चालेल. कारण वाणी ही प्राणक्रियाच आहे.

६. **धर्म** : धर्म म्हणजे आचार-धर्म. काय, वाक्, मन हे तीन कर्म-पथ आहेत. त्यांच्या द्वाराच सर्व कर्में होतात. म्हणून अर्चा, स्तुति, जप या पदांनीं त्यांचा उल्लेख केला आहे.

७. **जपन् मुच्यते** : जप हाच परम धर्म आहे. त्यानें सर्व कर्मांचें मूळ मन भगवन्मय होतें आणि तेंच मोचक होय. मन भगवन्मय झालें तर वाणी आणि करणीहि आपोआप तन्मय होईल असा अभिप्राय. प्रश्नांतच उत्तर सुचविलें आहे. पुढें प्रश्नानुरोधानें तसें स्पष्ट उत्तर दिलें आहेच 'किं जपन् मुच्यते' हें असें कूट आहे. तो प्रश्न आहे उत्तरगर्भ. आणि उत्तर आहे प्रश्नगर्भ. किम् हें एक भगवन्नाम आहे. पहा—श्लोक ७८ एको नैक: सव: क: किम्।।

८. **जन्तु** : जन्तु म्हणजे जननशील जीव. आब्रह्मस्तम्बपर्यंतचा सगळा जीववर्ग.

९. इथें या दोन श्लोकांत युधिष्ठिरानें अनेक प्रश्न विचारल्यासारखें दिसत असलें तरी सामग्र्यानें तो एकच प्रश्न आहे. सर्वोत्तम धर्म कोणता? ह्याची स्वभावत:च दोन अंगें होतात. उपास्य आणि उपासना. म्हणून तो विभागून विचारला आहे कीं एकमेव उपास्य दैवत कोणतें आणि त्याचा एकमेव उपासना-विधि कोणता? पुढें उत्तर दिलें आहे—पुरुषोत्तम आणि त्याचा नामसहस्ररूप स्तव. ह्याचाच विस्तार भीष्माच्या उत्तरांत झाला आहे.

भीष्म उवाच :

श्लोक ४ ते ७

जगत्प्रभुं देवदेवं अनन्तं पुरुषोत्तमम्।
स्तुवन् नाम-सहस्रेण पुरुषः सततोत्थितः।।
तमेव चार्चयन् नित्यं भक्त्या पुरुषमव्ययम्।
ध्यायंस् स्तुवन् नमस्यंश् च यजमानस् तमेव च।।
अनादिनिधनं विष्णुं सर्वलोक-महेश्वरम्।
लोकाध्यक्षं स्तुवन् नित्यं सर्वदुःखातिगो भवेत्।।
ब्रह्मण्यं सर्वधर्मज्ञं लोकानां कीर्ति-वर्धनम्।
लोकनाथं महद्भूतं सर्वभूतभवोद्भवम्।।

अर्थ : भीष्म म्हणाले:

४. सर्वलोकैकनाथ आणि देवाधिदेव तो जो सर्वतोनन्तरूप पुरुषोत्तम त्याचें पुरुषानें नामसहस्राच्या द्वारा नित्य उठून स्तवन करावें.

५. (ह्या प्रातःस्मरणानंतर स्नानादि आटोपल्या-वर) त्या सनातन पुरुषाची भक्तिभावानें (षोडशोपचारें) पूजा करावी. तींत आधीं मनानें त्याचें ध्यान करावें, वाणीनें त्याचें स्तवन करावें आणि शेवटीं देहानें त्याला साष्टांग दण्डवत् प्रणिपात करावा. (हा झाला नित्य विधि. पर्वादिकांच्या निमित्तानें प्रसंगीं) त्याचा यज्ञ करावा. महोत्सव करावा.

६, ७. भगवान् विष्णु हा सनातन पुरुष आहे. तो या चतुर्दश लोकांचा स्वामी आहे. त्यांचें निरीक्षण व पालनहि तोच करतो आहे. त्यांतील सर्व जीवांची उत्पत्ति त्याच्यापासूनच झालेली आहे. तो वेद नि वेदोपासक यांचा भक्त आहे, सर्व धर्माचा ज्ञाता आहे. तो लोकांना सद्बुद्धि, सदुक्ति आणि सदाचार यांची प्रेरणा देऊन त्यांची कीर्ति वाढवितो. खरोखर तो विश्वात्मा आहे. त्याचें नित्य स्तवन करणारा सर्व दुःखांतून मुक्त होतो.

टिप्पणी :

१. श्लोक ४ ते ७ हें एक कुलक आहे; चार श्लोकांचें मिळून एकच वाक्य. यांत षोडशनाममाला आली आहे. शेवटचा श्लोक तर केवल नाममयच आहे आणि तो विधेयानंतरहि जोडून दिला आहे.

वेदांतील षोडशर्च पुरुषसूक्त प्रसिद्ध आहे. या सहस्राचेंहि मूळ तेंच सूक्त आहे. तिथून षोडश संख्येला आगळें महत्त्व आलेलें आहे. त्याला अनुसरून षोडशोपचार, षोडशसंस्कार इत्यादि षोडशसंख्यक धर्मांची कल्पना केली गेलेली दिसते. षोडश नाममालाहि त्यापैकींच. अशी षोडशनाममाला रामरक्षेंतहि आलेली आहे. षोडशनाममाला-स्तोत्रें अन्यहि आहेत. इथें आलेली जणूं सहस्राची बीजभूत षोडश नाममाला अशी: (१) जगत्प्रभु, (२) देवदेव, (३) अनंत, (४) पुरुषोत्तम, (५) पुरुष, (६) अव्यय, (७) अनादिनिधन, (८) विष्णु, (९) सर्वलोकमहेश्वर, (१०) लोकाध्यक्ष, (११) ब्रह्मण्य, (१२) सर्वधर्मज्ञ, (१३) कीर्तिवर्धन, (१४) लोकनाथ, (१५) महद्भूत आणि (१६) सर्वभूतभवोद्भव.

ही नाममाला बुद्ध्या षोडशसंख्यक कल्पिलेली नाहीं. तिचें संख्यान सहज आहे. सहजता झऱ्याप्रमाणें उदार असते, तिथें मोजमाप नसतें. इथेंहि नाहीं. लाखोलींत संख्या महत्त्वाची नाहीं, दीर्घकाल नि नैरन्तर्य महत्त्वाचीं आहेत. तद्युक्त लक्ष म्हणजे ध्यान महत्त्वाचें आहे. तें भक्तांचें सहजच असतें आणि म्हणून भगवन्ताचें नाम निघालें कीं त्यांच्या वाणीला पूर येतो. इथेंहि तो तसा आलेला आहे. लाखोली, 'लक्षावलि' शब्द श्लिष्ट आहे. (१)ध्यान-धारा, (२) लक्षसंख्यात्मक धारा असा दुहेरी अर्थ घ्यावयाचा. सहस्रावलींत ही खुबी नाहीं किंवा दशसहस्रावलींतहि नाहीं.

२. पुरुष : पुरुष म्हणजे स्त्री वा पुरुष कोणीहि व्यक्ति, जीव. जीव म्हटल्यानंतर योनीचाहि प्रश्न

उरत नाहीं. गजेन्द्रासारखे पशु नि जटायूसारखे पक्षीहि, तिर्यक् योनींतील जीवहि, भगवत्स्मरण करूं शकतात.

३. **सततोत्थित** : नित्य उठून आणि निरंतर अतंद्रित राहून प्रात:स्मरणांत कधीं अंतर पडूं देऊं नये. ''आसुप्तेर् आमृते: कालं नयेद् वेदान्तचिन्तया'' असा भाव.

४. **ध्यायन् स्तुवन् नमस्यन्** : ध्यान हें मानसिक, स्तवन वाचसिक आणि नमन कायिक कर्म होय. सारांश, सर्वात्मना भगवदुपासना करावी.

५. **यजमान** : ध्यान, स्तुति, नमस्कार हा नित्याचा विधि झाला. यजन हें पर्वविशेषीं करावयाचें. तो नैमित्तिक विधि होय. दोहोंच्या योगें तत्परता साधावयाची.

६. **सर्वदु:खातिग** : दु:खें आध्यात्मिक, आधिदैविक आणि आधिभौतिक अशीं वर्गीकृत केलेलीं आहेत. यांच्या बाहेर दु:ख नाहीं. हीं सगळीं दु:खें भगवदुपासनेनें नाहीशीं होतात. खरोखर होतात का? आणि कशीं होतात? कान्होपात्रा बन्धनांतून मुक्त झाली. दामाजीचें अर्थसंकट दूर झालें. कृष्णदयार्णवाचें कोड गेलें इत्यादि दाखले पुराणांत आणि संत-चरित्रांत आढळतात. हा सर्व भगवद्भक्तीचा परिणाम का? होय आणि नाहीं. होय, असें : भगवद्भक्तीनें सर्वत्र समभाव येतो. तेव्हां सुख-दु:ख, मानापमान, जीवन-मरण, स्वर्ग-नरक सर्व समान होऊन जातात. आणि अशा प्रकारें सर्व दु:खांतून मुक्ति होते. जो भगवन्मय म्हणजे आत्मरूप झाला, ज्याला अनात्म देहाचा विसर पडला, त्याला देहानुगत दु:खाचें काय होय? तो त्यांतून पार मुक्तच आहे. म्हणून म्हणावयाचें भगवद्-भक्तीनें जीव सर्वदु:खातिग होतो. नाहीं, असें : भगवद्-भक्ति कांहीं जादू नाहीं कीं तिनें हवें तें होईल. तशी कल्पना ही एक मूढ श्रद्धा आहे. पाय मोडला तर शल्य-चिकित्सकाकडून शस्त्रक्रियादि करवून घेतल्यानेंच तो ठीक होईल, रामनाम घेतल्यानें ठीक होणार नाहीं. कान्होपात्रा बन्धनांतून मुक्त झाली. कारण ती देहांतूनच मुक्त झाली. तसा भक्त जेव्हां अज्ञानजनित देहादियोगांतूनच मुक्त होतो तेव्हांच तो सर्व दु:खांतून मुक्त होतो. एरव्हीं त्याला सर्व दु:खें इतरांप्रमाणेंच भोगावीं लागतात. तीं तो इतरांप्रमाणें देहासक्त होऊन रडत, कण्हत, कुथत, शापत सहन करणार नाहीं, तर वस्तु-तत्त्व जाणून अनासक्त बुद्धीनें तटस्थपणें डॉक्टर जसा दुसऱ्याचा उपचार करतो त्याप्रमाणें शक्यतेनुसार योग्य तो उपाय करून मोकळा होईल. त्यांत एखादे वेळेस त्याला यश मिळेल, पुष्कळदां मिळणार नाहीं. परंतु त्यामुळें तो दु:खी-कष्टी होणार नाहीं. आत्मवान् होऊन स्व-स्थ राहील. सर्वदु:खातिग होईल तो हा असा. एरव्हीं त्याला देहयोगाबरोबर येणारीं सर्व दु:खें सहनच करावीं लागतात. सहन करूनच सुटावयाचें आहे.

**श्लोक : ८**

**एष मे सर्वधर्माणां धर्मो ऽधिकतमो मत:।**
**यद् भक्त्या पुण्डरीकाक्षं स्तवैर् अर्चेत् नर: सदा।।**

**अर्थ :**

हा मी सर्वधर्मांत उत्तम धर्म मानतों कीं माणसानें नित्य भक्तिभावानें परमात्म्याची स्तवनाच्या द्वारें उपासना करावी.

**टिप्पणी**

१. धर्म : धर्म म्हणजे परमात्म-प्रीत्यर्थ आचारावयाचा विधि. ज्या योगें आत्मप्रसाद लाभतो तोच धर्म होय. ज्या विधीच्या आचरणानें परिणामीं आत्मप्रसाद म्हणजे स्वरूपोपलब्धि होत नाहीं तो व्यर्थ श्रमच होय.

२. सर्व धर्मांत उत्तम धर्म स्तवन वा नामस्मरणच कां? कारण त्यांत यज्ञीय हिंसा नाहीं. दुसऱ्या कोणा होत्रादि सहायकांची अपेक्षा नाहीं. कसलें आज्यादि द्रव्य लागत नाहीं. अमुक तीर्थीं वा क्षेत्रींच करावें अथवा अमुक पर्व-तिथि-मुहूर्तावरच करावें असा देशकालाचा निर्बंध नाहीं. त्यांत हठयोगाचे शारीरिक कष्ट नाहींत. वेदान्ताचा सूक्ष्म वाक्य-विचार नाहीं. ते बौद्धिक विश्लेषण-क्लेश नाहींत. तिथें पाहिजे केवळ भाव आणि भक्ति, श्रद्धा आणि प्रेम. नामस्मरण हें असें अत्यंत स्वाधीन नि सोपें आणि त्याचबरोबर परम पुरुषार्थक्षम म्हणून परम समर्थ साधन होय. म्हणूनच गीतेनें म्हटलें आहे "यज्ञानां जपयज्ञोऽस्मि". मनूनेंहि म्हटलें आहे:

**जप्येनैव तु संसिध्येत् ब्राह्मणो नात्र संशयः।**
**कुर्याद् अन्यत् न वा कुर्यात् मैत्रो ब्राह्मण उच्यते।।**

विष्णुपुराणांत आलें आहे:–

**ध्यायन् कृते, यजन् यज्ञैस् त्रेतायां, द्वापरेऽर्चयन्।**
**यद् आप्नोति तदाप्नोति कलौ संकीर्त्य केशवम्।।**

सारांश, नामजप हा सर्वोत्तम धर्म आहे. आणि तो युगधर्महि आहे. सर्व साधुसंतांनीं नाम-स्मरणावर विशेष भर दिला आहे तो याच साठीं.

सर्वधर्मज्ञ भीष्माचार्यांचें हें सुनिश्चित मत आहे.

**श्लोक : ९ ते १२**

**परमं यो महत् तेजः परमं यो महत् तपः।**
**परमं यो महद् ब्रह्म परमं यः परायणम्।।**
**पवित्राणां पवित्रं यो मङ्गलानां च मङ्गलम्।**
**दैवतं देवतानां च भूतानां यो ऽव्ययः पिता।।**
**यतः सर्वाणि भूतानि भवन्त्यादियुगागमे।**
**यस्मिंश् च प्रलयं यान्ति पुनरेव युगक्षये।।**
**तस्य लोक-प्रधानस्य जगन्नाथस्य भूपते।**
**विष्णोर् नाम-सहस्रं मे शृणु पापभयापहम्।।**

**अर्थ :**

९. तो भगवान् विष्णु परम तेज, परम तप, परम ब्रह्म आणि परम पद आहे.

१०. तो पवित्रांत पवित्र आणि मंगलांत मंगल आहे. तो देवांचा देव नि सर्वभूतांचा सनातन पिता आहे.

११. कल्पारंभीं त्याच्याच पासून हीं सगळीं भूतें उत्पन्न होतात. आणि कल्पांन्तीं त्यांत तीं विलीन होतात.

१२. आतां मी तुला हे पृथिवीपते युधिष्ठिरा! त्या सृष्टिकर्त्या सृष्टिनियन्त्या नि सृष्टिपालक भगवान् विष्णूच्या नामांचें सहस्र सांगतों, तें पाप आणि भय यांपासून सोडविणारें तूं मजपासून ऐक.

**टिप्पणी**

१. **परम तेज :** अग्नि, चन्द्र, सूर्य इत्यादि सर्व तेजें पर-प्रकाशित आहेत. स्वसंवेदनरूप आत्म-प्रकाशन करण्याचें सामर्थ्य त्यांच्यांत नाहीं. तें सामर्थ्य केवळ चैतन्याचें आहे. तें चैतन्य स्वतःला जाणतें म्हणून इतरांनाहि जाणूं शकतें. जें स्वतःला जाणत नाहीं तें इतरांनाहि वस्तुतः प्रकाशित करीत नाहीं, जाणत नाहीं. म्हणून म्हटलें आहे "न तत्र सूर्यो भाति न चन्द्रतारकम्" त्याला प्रकाशित करण्याचें, त्याला जाणण्याचें सामर्थ्य न चन्द्र-तारकांना आहे न सूर्याला. त्याच्याच चित्प्रकाशानें चन्द्र-सूर्यादि तेजें प्रकाशित झालीं आहेत, ज्ञात झालीं आहेत. म्हणून तो परमात्मा म्हणावयाचा परम तेज, परंज्योति.

२. **परम तप :** तपानें सर्व मळ जळून जातो आणि निखळ स्वरूप प्रकाशमान होतें. परम प्राप्तीचें परम साधन तप होय. ज्ञेय-स्वरूप परमात्मा निःशेषजाड्यापह ज्ञानस्वरूप तपानेंच आकळतो, उपलब्ध होतो. म्हणून तो परमात्मा म्हटला आहे परम तप.

३. **परम ब्रह्म :** ब्रह्म म्हणजे बृहत्. देश काल निमित्तादि कुठल्याहि सीमेंत बद्ध होत नाहीं म्हणून तो परमात्मा परम ब्रह्म होय.

४. **परायण :** पर अयन म्हणजे अन्तिम धाम. ''यद् गत्वा न निवर्तन्ते तद् धाम परमं मम।।'' जिथून पुनरावर्तन नाहीं, त्याला म्हणावयाचें परायण. गीतेंत म्हटलेंच आहे–

**आब्रह्मभुवनाल् लोका: पुनरावर्तिनो ऽर्जुन।**
**मां उपेत्य तु कौन्तेय पुनर्जन्म न विद्यते।।**

५. **पवित्राणां पवित्रम् :** पवित्र म्हणजे शुद्धि करणारें द्रव्य. भस्म, तीर्थ, दीप, धूप आणि कसलीहि अडगळ नसलेलें मोकळें-मठ-मंदिर हीं भूमि-जल-तेजो-वाय्वाकाशादि द्रव्यें पवित्र म्हणजे शुद्धिकारक आहेत. पण तीं सर्व बाहय शुद्धि करणारीं आहेत. अन्त:करणाची शुद्धि त्यांच्यायोगें होत नाहीं. ती आत्मज्ञानानेंच होते. म्हणून ज्ञानस्वरूप तो परमात्माच पवित्रांत पवित्र होय.

६. **मंगलानां मंगलम् :** पवित्र हें मल-दोष-हरण करतें तर मंगल हें श्री-गुण-सुखाधान करतें. हरिद्रा-कुंकुम, दूर्वादल, तुलसी-मंजरी, पुष्प-फल इत्यादि मंगलें होत, शुभें म्हणजे शोभाकर द्रव्यें होत, गुणभूत होत, सुखावह होत. पण तीं सगळीं बाह्य नि बाह्याचें अलंकरण करणारीं आहेत. परंतु आपलें अंतराचें अलंकरण तर आत्मज्ञानच आहे, सर्व गुण, सर्व सुख त्यांतच आहे. म्हणून तो ज्ञानस्वरूप परमात्माच परम मंगल होय.

७. **देवतानां दैवतम् :** देवता आराधकाचें अभिलषित पुरवितात, म्हणून त्या देवता म्हटल्या जातात. देवता विशिष्टगुणाभिमानिनी असल्यामुळें त्या तेवढेंच फळ देतात. विद्यादेवता विद्याच देईल, तर लक्ष्मीदेवता लक्ष्मीच देईल. परंतु परमात्मा हा अभिमानरहित असल्यामुळें तो सर्वदानसमर्थ आहे आणि सर्वोत्तमदान-समर्थ आहे आणि अक्षय्यदान-समर्थ आहे. म्हणून तो देवतांचेंहि दैवत वा देवांचाहि देव म्हणावयाचा.

८. **अव्यय: पिता :** जगांतील पिते जन्म देतात, पण ते आपल्या संतानांच्या जन्माला पुरत नाहींत. त्यांना मधेंच सोडून देऊन चालते होतात, मृत्यु पावतात. परंतु परमात्मा हा तसा धोका देणारा पिता नाहीं. तो अविनाशी पिता आहे. सर्व भूतें उपजतात आणि निमतात, परंतु तो परमात्मा अव्यय आहे. तो भूताप्रमाणें उपजतहि नाहीं आणि निमतहि नाहीं. तो सनातन आहे. म्हणून तो म्हणावयाचा अव्यय पिता.

९. **लोक-प्रधान :** लोकानां प्रधान: लोक-प्रधान:, लोका: प्रहिता भवन्ति अस्मात् इति लोक-प्रधान:। सर्वलोक या परमात्म्यापासून उदित होतात म्हणून तो म्हणावयाचा लोकप्रधान. सूर्यापासून सर्व किरण निघतात म्हणून तो किरण-प्रधान होय. तसे हे चतुर्दश लोक, हें सारें विश्व, परमात्म्यापासून निघतें म्हणून तो म्हणावयाचा लोकप्रधान, सृष्टिकर्ता.

१०. **जगन्नाथ :** जगन्-नियन्ता, जगाचें नियमन करणारा, शेवटीं जगाचा उपसंहार करणारा. सूर्य दिनारंभीं किरणांना पसरतो आणि दिनान्तीं ते सर्व खेचून घेतो. त्याप्रमाणें परमात्मा ही सृष्टि करतो आणि ती परत आपल्या ठाईं गिळून घेतो. मागील ११ व्या श्लोकाचाच लोक-प्रधान व जगन्नाथ या दोन पदांनीं केलेला हा अनुवाद होय.

११. **भूपते :** युधिष्ठिराला भारतीय युद्ध जिंकून असपत्न साम्राज्य-लक्ष्मी लाभलेली आहे. म्हणून मुद्दाम त्याला भूपति म्हणून संबोधिलें आहे.

१२. **पापभयापहम् :** पाप म्हणजे दुष्कृत. भय म्हणजे दुर्गति. अज्ञानामुळें दुष्कृति होते आणि तिचें

फळ दुर्गति होते. अज्ञाननिरसनामुळें तीं दोन्ही दूर होतात. म्हणून नामसहस्र हें ज्ञानसहस्रच होय. अर्थातच तें पापभयापह आहे. इथें युधिष्ठिराला स्वजन-वधाच्या पापाचें आणि नरकादि अशुभ गतीचें भय वाटत होतें. त्याचाहि संकेत पापभय हीं पदें करीत आहेत. अर्थात् तें पाप व भय दूर करणारें हें सहस्रनाम आहे. युधिष्ठिराच्या पापाची निष्कृति व भयाचें निवारण या नामसहस्राच्या श्रवणानें होईल म्हणून भीष्म त्याला तें ऐक म्हणून सांगत आहेत.

**श्लोक १३**

**यानि नामानि गौणानि विख्यातानि महात्मनः।**
**ऋषिभिः परिगीतानि तानि वक्ष्यामि भूतये।।**

**अर्थ**

त्या महान् आत्म्याचीं जीं गुणवाचक आणि म्हणून अत्यंत प्रसिद्ध अशीं नामें आहेत तीं वैदिक ऋषींनीं परोपरीनें गाइलेलीं मी सर्वांच्या कल्याणासाठीं सांगत आहें.

**टिप्पणी**

१. **महात्मनः** महात्मा म्हणजे निर्गुण अचिन्त्य परमात्मा. तो तर केवळ अनिर्वचनीयच आहे. त्याला ना जन्म, ना कर्म, ना गुण. त्याला ना नाम ना रूप.

२. **गौणानि** : परंतु अशाहि परमात्म्याला प्रकृतीच्या गुणयोगामुळें जन्म कर्म गुण संभवतात, नामरूप संभवतें. तेव्हांच मग त्याचा जन्म, त्याचें नाम, त्याचें रूप, त्याचें कर्म, त्याचे गुण इत्यादि षष्ठीसंबंध संभवतो. अर्थात् गौण नामें म्हणजे प्रकृतीच्या गुणांच्या अनुषंगानें कल्पिलेलीं नामें. सगुणाचीं नामें. गुण पदानें प्रकृतीचे सत्त्व-रज-तमादि मूलगुण आणि तदन्तर्गत कल्याण-गुण असे दोन्हीहि घ्यावयाचे.

३. **विख्यातानि** : विख्यात म्हणजे सृष्टिरूपानें व्यक्त झालेलीं. ही सृष्टि आम्ही पाहतच आहों. अर्थात् तिचा कर्ताहि कोणी असलाच पाहिजे. त्यामुळें स्रष्टा हें त्याचें नाम विख्यातच होय. अशींच इतरहि नामें. म्हणून त्याचें सर्वांत विख्यात नाम विश्व आहे. म्हणून आधीं घेतलें आहे तें. त्याहून अधिक विख्यात दुसरें काय बरें आहे?

४. **ऋषिभिः परिगीतानि** : हीं नामें मीं नवीन कल्पिलेलीं. नाहींत, तीं पूर्व ऋषींनींच वेदमंत्रांतून गाइलेलीं आहेत, असें भीष्म सांगत आहेत. अनादि परमात्म्याचीं नामें हि अनादिच असणार. तीं आज नवीन कल्पिण्याची गरज नाहीं. नवीन कल्पिणें शक्यहि नाहीं. अर्थ जुनाच आहे तर शब्द नवीन कुठून येणार? नवा वाटणाराहि शब्द तो अर्थाश्रितच असल्यामुळें वस्तुतः जुनाच होय. मंत्रद्रष्ट्या ऋषींनीं गाइलेलीं हीं नामें सर्वचीं सर्व वेदांतून आढळतीलच असें नाहीं. परंतु वेदवाणी ही शब्दमय, शब्द अक्षरमय, अक्षरें वर्णमय आणि वर्ण ध्वनिमय असल्यामुळें ध्वनिरूप वेदांत तीं सर्व निश्चितच आहेत असें म्हणतां येतें. या अक्षर-ध्वनीचें प्रतीक ॐ होय. तोच एकाक्षर ब्रह्म म्हणजे वेद. त्यांत सर्व भूतभविष्यवर्तमान मंत्र आहेत, सर्व नामें आहेत.

५. **भूतये** : भूति म्हणजे भलें, सुखसमृद्धि. कोणाचें भलें? कोणाची सुखसमृद्धि? निरुपपद प्रयोगावरून सर्व भूतांचें भलें. सर्वभूतांची सुखसमृद्धि. अध्याहृत सर्व पदानें आगत अनागत सर्व भूतें घ्यायचीं, पूर्वीं होऊन गेलेलीं, आतां वर्तमान असलेलीं आणि पुढें व्हावयाचीं. आणि भलें म्हणजे कोणतें भलें? जो जें वांछील तें भलें. ''जो जें वांछील तो तें लाहो प्राणिजात''. हीं भगवन्-नामें सर्वांच्या सर्वविध सुख- समृद्धीसाठीं आहेत.

□□□

# अथ विष्णुसहस्रनाम

## शतक पहिलें

### १. विश्व

विष्णु-सहस्रांत वस्तुतः आरंभ विष्णु ह्या नामापासून व्हायला पाहिजे. परंतु तो झाला आहे 'विश्व' ह्या नामापासून. अर्थात् 'विश्व' हें परमेश्वराचें पहिलें नाम होय. आणि तें योग्यच आहे. कारण अव्यक्त परमात्म्याचें मुख्य गमक त्याचें हें व्यक्त विश्वरूप आणि नामच होय. ब्रह्मसूत्रादि शास्त्रांत म्हणूनच तर ''जन्माद्यस्य यतः'' असें त्याचें द्योतन केलें आहे. 'नदीमुखेनैव समुद्रमाविशेत्' या न्यायानें व्यक्त मुखानेंच अव्यक्त आकळावयाचें आहे. हेंहि या विश्व नामानें सुचविलें आहे.

वस्तुतः परमात्मा अचिन्त्य व अप्रमेय आहे. त्याचें वर्णन कसें होणार? पण वर्णनच करावयाचें झालें तर तो सर्वकांहीं आहे असें म्हणूनच करावें लागेल. 'विश्व' ह्या नामानें तेंच प्रारंभीं केलें आहे, आणि मगच ह्या विश्वाचें म्हणजे पूर्णाचे अंश पुढें विवरिले आहेत–शतशोऽथ सहस्रशः नामांचे मागें नामें घेऊन. परंतु तीं सारीं नामें घेऊन हि विश्वाचें म्हणजे पूर्णाचें पूर्णत्व अबाधितच राहतें. तें रितें म्हणजे न्यून वा अपूर्ण होत नाहीं. ईशोपनिषदाचा शान्तिमन्त्र त्याचें यथार्थ वर्णन करतो.

पूर्णं अदः पूर्णं इदं पूर्णात् पूर्णं उदच्यते ।
पूर्णस्य पूर्णं आदाय पूर्णमेव अवशिष्यते ।।

विश्व नामानें केवळ व्यक्तच घ्यावयाचें नाहीं, तर अव्यक्तहि घ्यावयाचें. कारण कोणाचाहि निषेध विश्व करीत नाहीं. आणि म्हणूनच तें विश्व म्हणावयाचें. सर्व निषेधांचा निषेध म्हणजेच अशेष विश्व. असें हें विश्वनाम देवाचें पहिलें, मधलें आणि शेवटलें नाम होय. या विश्वनामांत (१) व्यक्त, (२) अव्यक्त, (३) व्यक्ताव्यक्त आणि (४) नव्यक्त, नाव्यक्त म्हणजेच तुरीय अशा चारी कोटी सामावल्या आहेत. असें हें चतुर्मुख ब्रह्म आहे, विश्वरूप आहे. प्रारंभींच त्याचें आवाहन करून मागाहून त्याचें यथेष्ट विवरण केलें आहे. विश्व हा सहस्रनामाचा संक्षेप आहे, सहस्रनाम विश्वाचा विस्तार आहे. संक्षेप एक आहे, विस्तार अनन्त आहे. सहस्रशब्द अनन्ताचें उपलक्षण आहे.

### २. विष्णु

विष्णु-सहस्रांत विष्णु नामाला दुसरा क्रम मिळाला! चमत्कारिक वाटतें. परंतु तें साभिप्राय आहे. विष्णु म्हणजे वेशनशील, व्यापनशील. जो जो आवास तयार झाला त्यांत त्यांत हा शिरून बसला म्हणून विष्णु. ''तत् सृष्ट्वा तदेवानुप्राविशत्'' अशी श्रुति आहे. आधीं विश्व निर्माण झालें आणि मग त्यांत त्यानें वसति केली. पण हा नुसता प्रवेश नाहीं, तर अनुप्रवेश आहे. अनुप्रवेश म्हणजे सहप्रवेश. निर्मितीबरोबरच प्रवेश, जसा बीजाचा प्ररोहांत होतो. विष्णु तसा ह्या विश्वाकारांत प्रविष्ट झाला आहे. तो बीजरूपानें अन्तर्धान पावून वृक्षरूपानें प्रकटला आहे. आतां बीज दिसत नाहीं, पण वृक्ष दिसतो आहे. भागवतकार म्हणतात : ''जातेऽङ्कुरे कथमु होपलभेत बीजम्'' बीजाचें रोप तयार झाल्यावर तें बीज कसें बरें दिसणार? तें रोपच बीज आहे. तो त्याचा नवा अवतार आहे. देवाचे अनेक अवतार झाले. पण ते सर्व ह्या विश्वावताराच्या पोटांत. खरें म्हणजे त्याचा एकच अवतार झाला आहे आणि तो म्हणजे हा विश्वावतार. तोच मुख्य म्हणूनच त्याचें स्मरण आधीं केलें आणि त्यांत लपलेल्या विष्णूचें मागाहून.

''विश्वं विष्णुः''हीं दोन पदें असून शिवाय तें एक स्वतंत्र वाक्य आहे. वैष्णवांचें तें जीवनसूत्र आहे. तोच त्यांचा धर्म. तुकारामानें त्याचेंच अभंगगायन केलें आहे–''विष्णुमय जग वैष्णवांचा धर्म । भेदाभेद भ्रम अमंगल'' इत्यादि.

अंकांना दुहेरी मूल्य असतें : (१) निरपेक्ष, (२) सापेक्ष वा स्थानीय. त्याचप्रमाणें पदाचें आहे. त्याचें हि निरपेक्ष आणि अन्यसापेक्ष मूल्य असतें, अर्थ असतो. विश्व आणि विष्णु पदांचे स्वतंत्र अर्थ आहेत ते आपण पाहिलेच, पण तीं दोन्ही एकत्र वाचून होणारा अर्थ हि वाचावयाचा. मूळ प्रत्येक पद अनन्त अर्थाचें आणि त्या पदांचा प्रस्तारभेदानें होणारा विस्तार हि तसाच अनन्त.

## ३. वषट्कार

''विश्वं विष्णुः''–म्हणजे ''विष्णुमय जग'' हें दर्शन ज्याला झालें त्याची वृत्ति आणि ज्याला हें दर्शन झालें नाहीं त्याची वृत्ति समान कशी असेल? ज्याला दृष्टि आहे त्याचें चालणें आणि ज्याला ती नाहीं त्याचें चालणें समान असणार नाहीं. एक दृष्टिपूत चालेल. दुसरा अंधभूत ठेचाळेल. अशा या दोन गति आहेत. पैकीं दर्शनवंताची जी वृत्ति वा जीवनसरणी तिचें नांव यज्ञ होय. ती सत्यमूलक आणि संयमप्रधान आहे. उलट अदर्शनवंताची जी वृत्ति तिचें नांव आहे गृध्रवृत्ति. ती मिथ्यादृष्टिमूलक आणि भोगासक्त आहे. एकीचा आश्रय करून साधक अपरिहार्य म्हणून प्राणवृत्तीनें आहारादि सेवून जगतो, दुसरीचा आग्रह धरून सांसारिक अपरिहार्य म्हणूनच त्याग करतो. एरवीं इंद्रियवृत्तीनें जगून, मेला तरी भोग सोडीत नाहीं. मेल्यावर हि परत भोगाची तरतूद करून मरतो. अशा अयज्ञवृत्तीनें इहलोक हि साधत नाहीं मग परलोक कुठला–असें गीता म्हणते : ''नायं लोकोऽस्त्ययज्ञस्य, कुतोऽन्यः कुरुसत्तम''. ही जी इहपर-साधक यज्ञवृत्ति तिचा उद्गार म्हणजे 'वषट्कार' होय. ''विश्वं विष्णुः'' या वैष्णव महामंत्राचा विनियोग म्हणजे वषट्कार. यज्ञमय जीवन ही दर्शन असल्याची खूण होय. दर्शनाची पात्रता आणि तद्द्वारा दर्शन मिळविण्याचा मार्ग हि यज्ञ होय. ''यज्ञेन यज्ञं अयजन्त देवाः'' या वचनांत हाच आशय वैदिक ऋषींनीं सांठविला आहे. वषट्कार शब्द या सर्व अर्थाचा संग्राहक आहे. ''विश्वं विष्णुर् वषट्कारः''हा क्रम संनिकर्षानें आणि समुच्चयानें वरील अर्थ प्रकट करतो. पृथक्त्वानें त्याचे वेगळे वेगळे अर्थ हि यथावत् आहेतच. यापुढें हा संगतींकरणाचा मागोवा क्वचित् विवक्षेनुसार घेऊं.

## ४. भूत-भव्य-भवत्-प्रभु

भूत म्हणजे या सृष्टींत जन्मास आलेलें, भव्य म्हणजे जन्मास यावयाचें आणि भवत् म्हणजे या क्षणीं जें जन्मत आहे तें. या तिहींचा जो स्वामी तो भूत-भव्य- भवत्- प्रभु होय. म्हणजेच विश्वप्रभु. विश्वांत या तिन्हींहून वेगळें दुसरें काय आहे? परमेश्वर हा या विश्वाचा एक मात्र स्वामी आहे. त्याची उत्पत्ति स्थिति आणि गति यांचा म्हणजे समग्र जीवनाचाच तो स्वामी आहे. जीवन शब्दानें त्याची उत्पत्ति-पूर्व स्थिति, उत्पन्न-स्थिति आणि मरणोत्तर गति सर्वांचा निर्देश होतो. थोडक्यांत म्हणजे परमेश्वर हा विश्वाचा म्हणजेच समग्र जीवनाचा स्वामी आहे. भूत-भव्य-भवत्-प्रभु या नामानें हाच आशय व्यक्त केला आहे.

## ५. भूतकृत्

भूत म्हणजे अव्यक्तांतून व्यक्त दशेस आलेलें म्हणजे जन्मलेलें सत्त्व आणि प्रेत म्हणजे व्यक्त दशेंतून अंतर्धान पावलेलें, मरण पावलेलें सत्त्व. सत्त्व म्हणजे सत्तावान् जीव. तो सुप्तचेतन वृक्ष-पाषाण असेल वा चालता बोलता प्राणी असेल. दोन्ही हि सत्त्वेंच. भूत हें सत्त्व आहे तसें प्रेत हि सत्त्वच आहे. कारण तें

हि आहेच. तें आम्हांला चर्मचक्षूनें दिसत नाहीं इतकेंच. परमात्मा हा भूतकृत् आहे. म्हणजे जगांत जें काहीं व्यक्त झालें आहे, जी जी व्यक्ति आहे ती ती सर्व परमेश्वरानें निर्मिलेली आहे, ती परमेश्वराची कृति आहे. परमेश्वराच्या कृतीचा आपण अनादर करूं नये. प्रत्येक व्यक्ति ही परमेश्वरी कृति आहे याचें भान जर आपण राखलें तर आपल्या हातून पाप होणार नाहीं.

### ६. भूतभृत्

परमेश्वर भूतकृत् म्हणजे भूतमात्राला निर्माण करणारा आहे इतकेंच नव्हे तर त्या निर्माण केलेल्या जीवाचें भरण, पोषण करणाराहि, भूतभृत् हि, तोच आहे. आई मुलाला जन्म देते आणि जन्मलेल्या तान्हुल्याला ती पाजते, त्याला ती भरवते त्याप्रमाणें परमेश्वर या विश्वाला जन्म देतो आणि त्याचें भरण-पोषणहि तोच करतो. तो विश्वंभर आहे..

### ७. भाव

भाव म्हणजे अस्तित्व. 'भू सत्तायाम्' म्हणजे भू हा धातु सत्तावाचक आहे. अर्थात् भाव म्हणजे अस्तित्व, असणेपणा परमेश्वर हा भाव-स्वरूप आहे. जी जी वस्तु आहे, क्रिया आहे ती सारी अस्तित्ववाचक आहे. शून्य म्हणजे कांहीं नसणें. म्हणजे अभाव. परंतु तीहि एक वस्तु आहे, एक क्रिया आहे. आकाशाला शून्य म्हणतात. पण शून्य म्हणजे कांहींच नसणें नव्हे. आकाश नसेल तर या विश्वाला प्रकटायला अवकाश कोठून मिळेल? म्हणजे शून्यहि भावरूपच झालें. आतां मरणें अथवा नाहीसें होणें म्हणजे तरी काय? काय तें अभावरूप आहे? नाहीं. कारण व्यक्त दशेंतून अव्यक्त दशेंत जाणें म्हणजे मरणें होय. म्हणजे तें देखील भावरूपच आहे. नितांत अभाव म्हणून कांहीं वस्तु नाहींच. जें आहे तें सारें भावरूप आहे. म्हणूनच परमेश्वराला 'भाव' म्हटलें आहे. अभाव शब्दांत देखील भाव शब्द गृहीत आहे त्याच्या आधारेंच अभावाची रचना झाली आहे. अंधार म्हणजे स्वतंत्र वस्तु नाहीं, तर प्रकाशाचा अभाव म्हणजे अल्प भाव होय. अशा प्रकारें सर्व कांहीं भावरूप आहे. आणि तो भाव सर्वाधार आहे, कारण तो परमेश्वर आहे.

भाव म्हणजे वस्तु. मग तो कल्पित असो, वा वास्तविक, व्यक्त असो वा अव्यक्त, भावरूप असो वा अभावरूप. कोणत्याहि प्रकारच्या भावाला भावत्व देणारें जें तत्त्व तें म्हणजे भाव, सत्त्व. कोणत्याहि वस्तूविषयीं तुम्ही काहींहि विधान कराल त्यापूर्वीं तिचें अस्तित्व तुम्हांला गृहीत धरावेंच लागतें. तें जें सर्वांना भावत्व वा सत्ता देणारें तत्त्व तेंच भाव होय. तेंच परमेश्वरी तत्त्व. तेंच एक भावरूप आहे, सत् आहे. बाकी सर्व अभाव आहे, असत् आहे.

### ८. भूतात्मा

भूतात्मा म्हणजे भूतरूप. परमेश्वर विश्वरूपानें प्रकटला आहे . हें जें प्रकटीकरण तेंच म्हणजे भूतरूप होय. आपणाला ज्या ज्या वस्तूचें ज्ञान होतें ती ती वस्तु भूत होय. कारण जी वस्तु आपल्या मनाच्या, वाणीच्या आटोक्यांत येत नाहीं तिच्याविषयीं आपण कांहींच विधान करूं शकत नाहीं.

### ९. भूतभावन

परमेश्वर भूतभावन म्हणजे भूतमात्राला उत्पन्न करणारा आहे . भूतकृत् आणि भूतभावन दोहोंचाहि अर्थ एकच; परंतु भूतकृत् म्हणजे भूतमात्राला अव्यक्तांतून व्यक्त दशेस आणणारा, त्यांना देहव्यक्ति देणारा असा आशय, आणि भूतभावन म्हणजे भूतमात्राला आत्मरूपानें, जीवरूपानें जीवत्व देणारा, वस्तुरूपानें सत्ता देणारा असा आशय.

''भूत-भव्य-भवत्-प्रभु''पासून ''भूतभावन'' पर्यंत सहस्रकारानें परमेश्वर आणि भूतमात्र यांचा संबंध विशद केला आहे. परोपरीनें आळविला आहे. त्याच्यांत एकरूपता म्हणजे सदृशता आणि

त्याचबरोबर विविधताहि आहे. परंतु त्यांत विरोध नाहीं. तीं विविध नामें परमेश्वराचे विविध आणि विरोधी भासणारेहि गुण वर्णितात. परंतु ते सर्व निर्‌विरोध आणि परस्परपूरक असे आहेत.

परमेश्वराचीं नामें हीं त्याचें नाम, रूप, गुण आणि कर्म त्याचप्रमाणें त्याचें अचिंत्य आणि अनंत स्वरूप प्रकट करण्याचा एक असफल परंतु सूचक प्रयत्न मात्र होय.

भूतभावन म्हणजे भूतांचें भावन संतोषण करणारा असाहि आशय व्यक्त होतो. 'परस्परं भावयन्तः श्रेयः परमवाप्स्यथ' या वचनांत भावनचा हा आशय स्पष्ट झाला आहे.

## १०. पूतात्मा

पूतात्मा म्हणजे ज्याचें हृदय पवित्र आहे असा. या जगांत परमात्म्याहून पवित्र दुसरें काय असेल? परमेश्वर हा ज्ञानस्वरूप आहे आणि ज्ञान हें गीतेंत म्हटल्याप्रमाणें परम पवित्र आहे. म्हणून परमात्मा हा पूतात्मा म्हटला.

## ११. परमात्मा

परमात्मा म्हणजे परम आत्मा, सर्व श्रेष्ठ आत्मा. आत्मा या शब्दानें जड देहापासून तों चिन्मय आत्मतत्त्वापर्यंत सर्वांचा बोध होतो. (१) देह, (२) इन्द्रियें, (३) मन, (४) बुद्धि आणि (५) आत्मा हीं उत्तरोत्तर अंतरतर तत्त्वें होत. हीं सर्वंच आत्म-शब्दानें उल्लेखिलीं गेलीं आहेत. त्यांत देह हा आम्हांला सर्वांत जवळचा आणि आत्मा हा सर्वांत दूरचा वाटतो. वस्तुतः तो आम्हांला सर्वांत जवळचा म्हणजे अगदीं 'स्व'तत्त्व आहे, 'पर' तत्त्व नव्हे. परंतु बहिर्मुख वृत्तीमुळें तें स्वतत्त्वच आम्हांला पर तत्त्व होऊन बसलें आहे. हें ''स्व''तत्त्व म्हणा, कीं ''पर''तत्त्व म्हणा तेंच परम म्हणजे सर्वोत्तम तत्त्व होय. कारण तेंच सर्वाधार असून नित्य शुद्ध, बुद्ध, मुक्त असें आहे म्हणूनच त्याला परमात्मा म्हटलें आहे. सर्वच आत्ममय आहे म्हणून प्रत्येकच आत्मा म्हणावयाचा, पण हें स्वतत्त्व परम आत्मा होय.

''पूतात्मा परमात्मा च'' या क्रमांतून असाहि अर्थ सूचित होतो, कीं जो पूतात्मा आहे तोच परमात्मा म्हणावा. परमात्म्याला प्राप्त करून घेण्याचा उपाय म्हणजे पूतात्मा बनणें. आत्मशुद्धीचें अंतिम टोक म्हणजे परमात्मा. जीवात्मा हा साधनेचा आरंभ-बिंदु, परमात्मा हा साधनेचा समापन-बिंदु आणि पूतात्मा ही साधना-रेखा. साधनेची सुरेखा जीवात्म्यापासून निघून परमात्म्याला पोहचते. दरम्यानची जी साधनधारा ती म्हणजे आत्मशुद्धीचा अजस्र प्रयास. हा अजस्र प्रयासच गीतेनें ''बहूनां जन्मनां अन्ते ज्ञानवान् मां प्रपद्यते'' आणि ''अनेक जन्म-संसिद्धस् ततो याति परां गतिम्''या वचनांत उल्लेखिला आहे.

भगवान् बुद्धानें आत्मा हा पंचस्कंधात्मक मानिला आहे. हा आत्मा म्हणजे स्थूल देह होय. उपनिषदांत इन्द्र आणि विरोचन हे दोघे सुर आणि असुर बंधु प्रजापतीकडे शिकावयाला गेले. त्यांना गुरूनें क्षौरादि करून शुचिर्भूत होऊन यायला सांगितलें. ते आल्यानंतर त्यांना तळ्याच्या आरशांत आपलें रूप पाहायला सांगितलें. म्हटलें, हें जें सुंदर रूप तुम्हांला दिसतें, तोच आत्मा. विरोचनाचें तेवढ्यानें समाधान झालें आणि तो देहात्मवादी होऊन बसला. हाच आसुर संप्रदाय. इन्द्राचें समाधान झालें नाहीं. त्याला शंका आली आणि गुरूनें त्याला उत्तरोत्तर सूक्ष्म विचार सांगितला. या परिप्रश्न-प्रक्रियेनें इन्द्रानें परम आत्मतत्त्व गांठलें. हाच दैव-संप्रदाय होय. आसुर संप्रदाय अवर आत्म्यापाशींच कुंठित झाला म्हणून तत्त्वापासून तो च्युत झाला. भगवान् बुद्धहि जणूं त्यांतच सांपडला आहे.

## १२. मुक्तानां परमा गति

'गति' म्हणजे इहलोकांतून देह सोडून परलोकाला जाणें. 'आगति' म्हणजे परलोकांतून इहलोकांत

जन्मास येणें. अशी ही जीवनाची चक्रगति आहे. हिलाच संसार असें म्हणतात. संसारालाच पुनरावर्तन म्हणजेच पुनःपुनरावर्तन असेंहि दुसरें नांव आहे. या पुनरावर्तनांतून, या वर्ग करण्यांतून सुटण्यालाच अपवर्ग असें नांव आहे. अपवर्ग म्हणजे संसारांतून मुक्ति. पुनरावर्तनांतून सुटका, निकाल. हा निकाल म्हणजे सर्व निकालांचा निकाल आहे. मुक्त पुरुष ज्या अंतिम अवस्थेला जाऊन पोहोंचतात ती स्थिति. परमात्मा हीच मुक्तांची परमा गति होय. म्हणून परमेश्वराला 'मुक्तानां परमा गतिः' असें ठीकच म्हटलें आहे.

जगांत जे सर्व जीव आहेत ते आणि परमेश्वर यांच्यांत तत्त्वतः कांहींच अंतर नाहीं. ते सर्व एकरूपच आहेत. म्हणून मुक्तामुक्त हा भेदहि मिथ्याच आहे. पण हें मिथ्यात्व परमेश्वराच्या दृष्टीनें आहे. जीवाच्या दृष्टीनें तर असंख्यच भेद आहेत. परमेश्वर आणि जीव यांच्यांत आकाश-पाताळाचें अंतर आहेच, परंतु जीवाजीवांतील अंतरहि अपरिमित आहे. मुक्ति म्हणजे हीं सर्व अंतरें पार नाहीशीं होणें. हीं सर्व अंतरें उपाधींच्यामुळें आहेत. सर्व उपाधि गळून पडतील तेव्हां हें अंतरहि गळून पडेल आणि परिपूर्ण सामरस्य होईल. परिपूर्ण सामरस्य म्हणजेच एकमेवाद्वितीयत्व होय. असें सामरस्य जोंपर्यंत होत नाहीं, जोंपर्यंत हें एकमेवाद्वितीयत्व सिद्ध होत नाहीं तोंपर्यंत भेद आहेच आणि जोंपर्यंत भेद आहे तोंपर्यंत भय आहे, तोंपर्यंत मुक्ति नाहीं. कारण मुक्ति म्हणजे भयमुक्तिच होय.

आपल्याकडे मृत जीवाचें श्राद्ध करतात. परंतु मुक्ताचें श्राद्ध नाहीं. मुक्ताला कसलीहि वासना राहत नाहीं. अपेक्षाहि राहत नाहीं. अमुक्ताला म्हणजे जीवाला वासना असते, अपेक्षा असते. तो त्या वासनामय देहानें परलोकांत फिरत राहतो. आणि इहलोकांत जन्म घेतो. त्यामुळें त्याची ती वासना पूर्ण करून त्याला तिच्यांतून मुक्त होण्याला मदत करणें हें आप्तांचें कर्तव्य ठरतें म्हणून श्राद्ध. श्राद्ध म्हणजे प्रेताचें हितचिंतन आणि हितसाधन.

जगांत भूतें, प्रेतें आणि मुक्त अशा तीन कोटी आहेत. भूतांच्याविषयीं भूतांचें कर्तव्य म्हणजे स्वधर्माचरण होय. जे भूतकोटींतून प्रेतकोटींत गेले त्यांच्याविषयींचें कर्तव्य म्हणजे श्राद्ध-धर्म होय. भूतांच्या स्वधर्मांत याचाहि अंतर्भाव होतो. जे मुक्त आहेत त्यांच्याविषयींहि भूतांचें कर्तव्य असतेंच. परंतु हें कर्तव्य त्या मुक्त पुरुषांच्या गरजेमुळें नव्हे तर भूतांच्या गरजेमुळें असतें. भूतप्रेतांविषयींचें कर्तव्य हें भूतांच्या आणि प्रेतांच्याहि गरजेचें असतें, असा फरक. मुक्ताचें स्मरण आणि अनुकरण करून जीव मुमुक्षु बनतो आणि वासनाक्षयानंतर ज्ञानोदय होऊन यथाकाल मुक्त होतो. मुक्तांच्या स्मरणाचें हेंच प्रयोजन. या तिन्ही जीवकोटींबाबतचें मनुष्याचें कर्तव्य म्हणजे त्याचा स्वधर्म होय.

## १३. अव्यय

'अव्यय' म्हणजे ज्याला व्यय नाहीं, वेंच नाहीं असा. जगांत जें जें आपण पाहातों तें सारें व्ययधर्मी, क्षयिष्णु आहे. परमात्मा त्यां सर्वांहून वेगळा आहे. तो अक्षय आहे, अव्यय आहे. चयापचय हा सृष्टीचा धर्म आहे. परमात्मा सृष्ट नाहीं, स्रष्टा आहे. त्यामुळें तो तद्विलक्षण आहे. त्याचें हें वैलक्षण्य सृष्टीचें एकेक लक्षण घेऊन तद्भिन्नत्वानें वर्णिलें जातें. परमात्मा सर्वांहून वेगळा, सर्ववरिष्ठ आणि आपल्या-सारखा आपणच आहे.

## १४. पुरुष

'पुरुष' म्हणजे आत्मा. पुरुष-सूक्तांत वर्णिलेला परमात्मा. पुरुष म्हणजे पुंल्लिंग नर नव्हे, तो तर अलिंग आहे. पुरुष म्हणजे नर असा अर्थ घेतला तर तो सर्वांचा भर्ता आहे. स्वामी आहे. सर्व त्याच्या भार्या आहेत, भृत्य आहेत, हा पुरुष एकशिरा पुरुष

नाहीं. हा सहस्रशीर्षा पुरुष आहे. सर्व विश्वाला व्यापून अनंत उरणारा हा परमेश्वर आहे. ज्याचें वर्णन करतांना वेदांनीं हात टेकले आहेत, तो हा परम पुरुष होय. व्याकरणांतील उत्तम पुरुष आणि वेदान्तांतील पुरुषोत्तम तो हाच.

## १५. साक्षी

जगांत पदार्थांचे दोन वर्ग पडतात. एक द्रष्टा आणि दुसरा दृश्य. जें जें दृश्य वर्गांत आलें तें तें विषय झालें आणि त्याला पाहणारें जें तत्त्व उरलें तें झालें द्रष्टा. म्हणजे विषयी हा जो विषयी द्रष्टा तोच साक्षी होय. जें सर्व ज्ञान होतें तें सर्व द्रष्टृदृश्यभेदानेंच होतें.

## १६. क्षेत्रज्ञ

साक्षी म्हणजे विश्वसाक्षी. प्रत्यगात्माहि साक्षी आहे. पण तो सोपाधिक असल्याकारणानें त्याला विश्वसाक्षी, विश्वात्मा म्हटलें नाहीं. तो क्षेत्रज्ञ म्हटला आहे. साक्षी आणि क्षेत्रज्ञ दोन्ही एकच. साक्षी निरुपाधिक आणि क्षेत्रज्ञ सोपाधिक आहे, इतकेंच.

पुरुष, साक्षी आणि क्षेत्रज्ञ हे तिन्ही शब्द समानार्थकच आहेत. पुरुष शब्द परमत्मावाचक, साक्षी शब्द आत्मवाचक आणि क्षेत्रज्ञ शब्द जीवात्मवाचक आहे असा त्यांत विवेक करतां येईल. या तीन शब्दांच्या आरंभीं अव्यय शब्द आणि अंतीं अक्षर शब्द आला आहे. तेहि त्याचेंच स्वरूप आविष्कृत करतात. सर्व विषय हे व्ययशील आणि क्षरणशील आहेत. पुरुष, साक्षी आणि क्षेत्रज्ञ म्हणून ओळखलें जाणारें चित्तत्त्व हें तद्विपरीत अव्यय आणि अक्षर असें कूटस्थ स्वरूपाचें आहे. अशा प्रकारें हा संपूर्ण श्लोकच कूटस्थ ब्रह्माचें निरूपण करतो. पहिला श्लोक 'विश्वं विष्णुः' इत्यादि, विश्वोपाधिक, विश्वनाथ परमेश्वराचें, सगुणाचें वर्णन करणारा आहे आणि दुसरा श्लोक, 'पूतात्मा परमात्मा' इत्यादि, निरुपाधिक कूटस्थ ब्रह्माचें, निर्गुणाचें निरूपण करतो असें म्हणतां येईल. उपासनेच्या दृष्टीनें सगुणाचें महत्त्व निर्विवाद आहे. म्हणून प्रथम सगुणाचें आवाहन केलें आणि नंतर निर्गुणाचें. सगुणाचें निरूपण उपासनेच्या दृष्टीनें आवश्यक असलें तरी तत्त्वविचाराच्या दृष्टीने अंतिम आदर्श म्हणून निर्गुणच शिरोधार्य करावें लागतें. त्यामुळें तें अपरिहार्य होऊन बसतें. एवढ्याचसाठीं सगुण-निरूपणानंतर लगेंच निर्गुण-निरूपण केलें आहे. गीतेंतहि ठायीं ठायीं सगुण-निर्गुणाची अशी जोडी हातांत हात घालून चाललेली दिसते.

## १७. अक्षर

अक्षर म्हणजे न क्षरणारा, न झिजणारा, कूटस्थ. उपनिषदांत या अक्षराचें परोपरीनें वर्णन केलें आहे. त्यांत "अच्छायं, अनणु" असेंहि वर्णन येतें. ज्या वस्तूला छाया आहे, तिला देह आहे. मग तो अणु-प्रमाण कां असेना! परंतु परमात्म-तत्त्व हें द्रव्याणु-घटित हि नाहीं किंवा छायादिगुणवत् हि नाहीं. आणि असें तें द्रव्य-गुण-क्रियादि-विलक्षण निर्गुण असल्यामुळेंच तें अक्षर म्हणजे कूटस्थ-नित्य म्हटलें आहे. नित्याचें प्रवाह-नित्य व कूटस्थ-नित्य असे दोन प्रकार केले जातात. पैकीं प्रवाह-नित्यता ही वास्तविक नित्यता नव्हे. ती आभासिक आहे. दिव्याची ज्योत एकसारखी तेवत असते. परंतु वस्तुतः प्रतिक्षणीं नव-नवे तैलकण पेटून विझत असतात तींत. त्यांनाच आपण ज्योत म्हणून पाहत असतों. परंतु तेल संपलें कीं हा संततप्रवाह संपणारच. म्हणून ही नित्यता खरी नव्हे. रत्नकिरण त्यामानानें नित्य म्हणतां येईल. पण तो हि एक द्रव्यशक्ति-प्रवाहच आहे. म्हणून तो हि कधींकाळीं संपणारच. जिथें म्हणून द्रव्य, गुण, क्रिया इत्यादींचा संबंध आहे तिथें क्षरण आहेच आहे. ब्रह्म हें तद्विलक्षण असें अक्षर आहे. म्हणून ब्रह्माला अक्षर हें नाम प्राप्त झालें. म्हणून तीच त्याची व्याख्या. गीतेंत "अक्षरं ब्रह्म परमम्" या वचनांत

ती आली आहे. ब्रह्माशिवाय इतर कशालाच अक्षरत्व नसल्यामुळें तेंच एकमात्र अक्षर होय.

अव्यय आणि अक्षर दोन्ही समानार्थकच आहेत. परंतु त्यांत सूक्ष्म भेद करतां येईल. अव्यय म्हणजे समुद्रवत् समृद्ध. समुद्रांतून किती हि पाणी घेतलें तरी तो घटत नाहीं अथवा कितीही पाणी त्यांत ओतलें तरी वाढत नाहीं. पण अक्षर म्हणजे आकाशवत् अच्छेद्य. आकाशांतून तुम्ही थोडें आकाश तोडूं शकत नाहीं किंवा त्याला जोडूं शकत नाहीं. त्याशीं तुम्ही कसलेंच आदान-प्रदान करूं शकत नाहीं. अव्यय पद सगुण, तर अक्षर पद निर्गुण आहे असें म्हणतां येईल.

## १८. योग (योगो योगविदाम्)

ध्येयभूत ब्रह्माशीं, सगुणाशीं वा निर्गुणाशीं साधकाला संगत करून देणारा जो उपाय तो म्हणजे योग होय. यावेगळा जो, तो सर्व अपाय होय, वियोग होय. योग म्हणजे स्वरूपयोग आणि वियोग म्हणजे स्वरूप-वियोग होय. अर्थात् योग म्हणजे वियोगाचा वियोग. गीतेंत ''तं विद्याद् दुःखसंयोग-वियोगं योगसंज्ञितम्'' या वचनांत अशीच व्याख्या केली आहे योगाची.

सगुण-निर्गुण-निरूपण केल्यानंतर सर्वांत महत्त्वाचा विषय म्हणजे त्याचा उपायच होय. आणि तोच योग या पदानें इथें सहस्रकारानें नेमका स्मरला आहे.

आतां हा योग फलतः एक म्हणजे परमानंद-योगरूप असला तरी त्याचे असंख्य मार्ग असूं शकतात केंद्र-किरणवत्. प्रत्येक जीव हा ईश्वरांश असल्यानें तो आपल्या अंशींतच शेवटीं मिळावयाचा आहे. म्हणून त्याची जीवनसरणी एक योगच होय. अशा सर्व योगवेत्त्यांचा जो योग तोच सामान्यतः 'योगविदां योगः' होय. हा योग ''रुचीनां वैचित्र्यात्'' ऋजुकुटिल कसा हि असूं शकेल. हा योग सहस्रवर्त्माच असणार, अनेकच असणार

हे सर्वच जीवन-मार्ग योग असले तरी ज्या प्रमाणें ज्या मार्गानें विनायास आणि लवकरांत लवकर मुक्कामाला पोचतां येतें त्यालाच आपण मार्ग वा राजमार्ग म्हणतों, त्याप्रमाणें ज्या उपायानें जीव सुगमपणें शिवत्व पावतो तोच योग म्हणावयाचा. अशा मुख्य योगाचे जे विशेष ज्ञाते म्हणजे आचार्य त्यांचा जो योग तो योगच विशेषतः इथें ''योगविदां योगः'' म्हणून घ्यावयाचा. हा योग एकच असणार. समत्व हा तो एक योग होय.

समत्वच योग होय आणि समत्वच अन्तिम लक्ष्य होय हें गीतेच्या पुढील दोन वचनांवरून लक्षांत यावें. 'योऽयं योगस् त्वया प्रोक्तस् साम्येन मधुसूदन' आणि 'निर्दोषं हि समं ब्रह्म'. साध्य वा साधन कोणत्याहि रूपानें समत्व हें परमात्मस्वरूप आहे. म्हणून तो परमात्मा योग म्हटला आहे.

## १९. नेता (योगविदां नेता)

नेता म्हणजे पुढारी असें आपण समजतों. पण पुढारी कोण? संकटांत हि पुढें राहून जो मार्ग काढील आणि अनुयायांना मुक्कामाला पोहोंचवील तोच पुढारी! असें पुढारीपण, असें नेतृत्व ज्याच्या ठायीं नीति असेल तोच करूं शकतो. अर्थात् जो नीतिमान् तोच नेता.

आमचा नेता अमुक म्हणून आजकाल लोक एखाद्या प्रतापी व्यक्तीचा जयजयकार करीत असतात. परंतु त्याहि व्यक्तीचें नेतृत्व करणारें जें अंतरतर तत्त्व तेंच खरोखर आमचा नेता आहे. तेंच व्यक्तिमात्राच्या हृदयांत वसलेलें परमात्म-तत्त्व या विश्वाला चालवीत आहे. आणि म्हणून तेंच एकमात्र नेता असून सारें जग हें नीत आहे.

(१) सत्येन लभ्यस् तपसा ह्येष आत्मा
सम्यग्ज्ञानेन ब्रह्मचर्येण नित्यम् ।
अन्तःशरीरे ज्योतिर्मयो हि शुभ्रो
यं पश्यन्ति यतयः क्षीणदोषाः ॥

(२) सत्यमेव जयते नानृतं
सत्येन पन्था विततो देवयानः ।
येनाक्रमन्ति ऋषयो ह्याप्त-कामा
यत्र तत् सत्यस्य परं निधानम् ॥

या उपनिषदांतील श्लोकांत ती नीति थोडक्यांत पण समग्र आलेली आहे. एका शब्दांत सांगावयाचें तर सत्यनिष्ठा ही ती नीति होय. हिचा आरंभ सत्यापासून, मार्ग सत्याचा आणि परिसमाप्तिहि सत्यांतच. अशी ही सत्यनीति आहे आणि तिचा जो स्वामी तो परमेश्वरच आमचा नेता आहे.

विष्णु-सहस्रांत अन्यत्र नेता हें पद आलें आहे. यामुळें इथें ''योगविदां नेता''असें नाम कल्पूनहि व्याख्या करतां येण्यासारखी आहे, आणि तशी ती केलेलीहि आहे. परंतु विष्णुसहस्रांत एकच नाम अनेकदां आलेलें आढळून येतें. त्यामुळें भिन्नतेसाठीं पदभिन्नता कल्पिलीच पाहिजे असें नाहीं.

'योगविदां' हें षष्ठ्यन्त पद पूर्ववर्ती योगपदाशीं संबद्ध न करतां परवर्ती नेता पदाशीं संबद्ध केलें तर त्याची व्याख्या योगवेत्त्यांचा नेता, अग्रणी अशी होईल. योगमार्गानें जाऊन सिद्धि मिळविणारा परमात्म्यापूर्वी दुसरा कोण बरें असूं शकेल? तो स्वतःच ज्ञातृ-ज्ञान-ज्ञेयस्वरूप आहे. त्यामुळें तो सहजच ''योगविदां नेता'' झाला.

## २०. प्रधान-पुरुषेश्वर

प्रधान-पुरुषेश्वर म्हणजे प्रधान आणि पुरुष, अष्टधा प्रकृति आणि असंख्य जीव, यांचा ईश्वर. सांख्य तत्त्वज्ञानाप्रमाणें जगांत अष्टधा प्रकृति आणि असंख्य जीव आहेत. वेदान्त आत्म्याचें नानात्व पारमार्थिक मानीत नाहीं. त्याच्या दृष्टीनें प्रकृति आणि चेतन या दोहोंचा ईश्वर. कोणत्याहि प्रकारें घेतलें तरी परमात्मा हा जडचेतन सर्वांचा स्वामी आहे. जड हें स्वतःचा स्वामी बनूं शकत नाहीं. त्यामुळें चेतन हेंच त्याचा स्वामी होय. चेतनाचाहि स्वामी अचेतन होऊं शकत नाहीं. अर्थात् त्याचा स्वामी तेंच. परंतु उपाधियोगामुळें चेतनामध्यें नानात्व कल्पिल्यास त्यांचें स्वामित्व कोणा एकाकडेच मानावें लागेल. तो जो एक तोच ईश्वर. अंशी हा सर्व अंशांचा स्वामी होय, बिंब हें सर्व प्रतिबिंबांचें स्वामी होय. त्याप्रमाणें ईश्वर हा सर्व जीवांचा स्वामी आहे. आणि जड प्रकृतीचा तर आहेच आहे. त्यामुळें त्याला यथार्थत्वानें प्रधान-पुरुषेश्वर असें म्हटलें आहे.

या श्लोकार्धांत योग, सांख्य आणि वेदान्त या तिन्ही दर्शनांचा विचार येऊन गेला आहे. योग, प्रधान-पुरुष, आणि ईश्वर या तीन पदांनीं त्या तिन्हींचें सूचन होतें.

## २१. नारसिंहवपु

या श्लोकार्धांत संध्येंतील चोवीस नामांपैकीं तीन नामें आलीं आहेत. संध्येंतील चोवीसहि नामें विष्णुसहस्रांतूनच घेतलीं आहेत. वैदिक संध्येचें हें पौराणिक रूप होय. ही चोवीस संख्या आली कोठून? तीहि वेदांतूनच आली आहे. वेदाचें सार गायत्री मंत्र होय. ''गायत्री छन्दसां अहम्'' असें गीतेंत म्हटलें आहे. आणि म्हणूनच संपूर्ण वेद किंवा त्याचा एक भाग मंडल अथवा त्याचा हि एक अंश जें सूक्त तें हि स्वाध्याय म्हणून म्हणतां न आलें तरी द्विजानें गायत्री तरी जपावी. तोच त्याचा स्वधर्म, स्वाध्याय होय. बीजांत संपूर्ण वृक्ष सांठवलेला असतो. तसा या गायत्रीरूप वेदसारांत संपूर्ण वेद सामावला आहे म्हणून नित्य वेदाध्ययनासाठीं एक गायत्री मंत्र हि जपला तरी पुरें. पण हा अधिकार सर्वांना नाहीं. तो फक्त त्रैवर्णिकांना मानिला आहे. तेवढ्यासाठीं त्याचें सार संतांनीं रामनामांत आणून ठेवलें आणि हा ''उघडा मंत्र श्रीराम'' सर्वांना सुलभ झाला. गायत्री मंत्र आचार्य शिष्याला जवळ घेऊन एकांतांत पडद्याआड,

कानांत सांगतात. अर्थात् तो दीक्षेशिवाय कोणाला मिळत नाहीं. आणि ही दीक्षा फक्त अधिकृतालाच मिळूं शकते. म्हणून हा गायत्री मंत्र झांकला मंत्र आहे, रहस्यभूत मंत्र आहे. तसा रामनामाचा प्रकार नाहीं. तो उघडा मंत्र आहे. परंतु वेद हे आपलें धर्ममूल आहे. त्याची खूण आपल्या धर्माचारांत असली पाहिजे. त्याचें तें ऋण आपण सदैव मनांत बाळगलें पाहिजे. यासाठीं गायत्री मंत्रांतील अक्षर-संख्या घेतली. तेव्हां चोवीस अक्षरांचीं चोवीस नामें ही झाली आपली पौराणिक वा प्राकृत गायत्री. आतां हीं चौवीस नावें कोणतीं घ्यायचीं? तर तीं वैष्णवांच्या प्रसिद्ध विष्णुसहस्रांतून घेतलीं. तीं मुख्यतः कृष्णपर आहेत. हें त्यांचा आरंभ केशव नामापासून होत असून अंत श्रीकृष्णनामांत होत आहे आणि मध्यंतरींचीं त्रिविक्रम, वामन, नारसिंह हीं दोन तीन नावें सोडून दिलीं तर बाकीचीं सारीं कृष्णवाचकच आहेत यावरून उघड आहे. भागवत संप्रदायाच्या सद्दींत यांचें प्रचलन झालें असलें पाहिजे. विष्णुसहस्र हें देखील वेदमूलकच आहे. पुरुषसूक्तांतील ''सहस्रशीर्षा पुरुषः'' इत्यादि पदांवरूनच सहस्र नामांची कल्पना स्फुरलेली आहे. त्यामुळें विष्णुसहस्र हें वेद-संमितच होय. आणि त्याचें सार म्हणजे हीं चोवीस नामें होत. अशा प्रकारें वेदांचा सरळ संबंध विष्णुसहस्राशीं आणि त्यांतून निवडलेल्या चोवीस नामांशीं पोहोचतो. तुकारामांनीं म्हटलें आहे ''वेद अनंत बोलिला, अर्थ इतुकाचि साधिला । विठोबासी शरण जावें, निज- निष्ठे नाम गावें ।'' संतांनीं काढलेलें हें वेदांचें सार म्हणजे साराचें सार होय. वेदांचें सार गायत्री आणि गायत्रीचें सार देवाचें नाम होय. ॐ म्हणा, नाहीं तर राम म्हणा; तें एक असून अनंत आहे. तें शतशोऽथ सहस्रशः मनाच्या आवडीनें गायचें. हें नामस्मरण मी समर्थांच्या पुढील ओवीच्या चिंतनांत संपवितों.

चोविसनामी सहस्रनामी ।
अनंतनामी तो अनामी ।
तो कैसा आहे अंतर्यामी ।
विवेकें ओळखावा ।।

आतां नारसिंह-वपु पदाकडे वळूं. नारसिंह-वपु म्हणजे ज्याच्या देहाकृतींत नर आणि सिंह या दोहोंचें दर्शन होतें तो. विष्णूच्या दशावतारांत सृष्टींतील जीवोत्क्रांतीचा संकेत मिळतो. प्रथम मत्स्य केवल जलचर, नंतर कच्छ अधिकतर जलचर आणि कवचधारी पण त्याच बरोबर अंशतः सर्पटणारा स्थलचर, पुढें वराह अंशतः जलचर पण अधिकतर स्थलचर आणि दंतायुध, त्यापाठीं नरसिंह पूर्ण स्थलचर आणि नखदंतायुध. या स्थलचरांत हि पुनः नवी उत्क्रांति दिसून येते. ''वराहापर्यंत केवळ तिर्यक् योनि आहे, तर या नरसिंहापासून मानुष सृष्टीचा आरंभ होत आहे. हा आदि मानुष अर्थात् पशु आणि मानव दोहोंचा सांधा आहे. तो मानवपशु नाहीं तर पशुमानव आहे. त्याची गति मानवत्वाकडे आहे. ही ऊर्ध्वगति आहे. उत्क्रांति आहे. सर्व जीवांचें डोकें जमिनीकडे तर याचें उंच आकाशाकडे आहे. ह्याचा मुखवटा सिंहाचा आहे, पण आहे तो नर. मुखवटा सिंहाचा कां? तर सिंहाप्रमाणें त्याच्या मानेवर लांब केसांचे झुबके पिंजारलेले आहेत. नखें वाढलेलीं आणि तीक्ष्ण आहेत. दांतानीं तो फाडतो तोडतो आहे. कृत्रिम हत्यारें त्यानें अद्याप निर्मिलेलीं नाहींत. तो नखदन्तायुधच आहे. म्हणून तो सिंह. असा हा नरसिंह देवाचा जीवसृष्टींतील पहिला पुरुषावतार आहे. त्यामुळें त्याचें महत्त्व आगळें आहे. तो अभक्तांना, परपीडकांना भयंकर, पण भक्तांना जीव-वत्सलांना अभयंकरच आहे, वरदच आहे. मनुष्य हा जीवसृष्टींतील दुर्बल-जिघांसु, हिंस्रांचा पहिला शास्ता होय. तो द्रोहाचा द्रोह करणारा आणि दयेचा पोशिंदा आहे. त्यामुळेंच सर्व जीवांचें राजेपण, नृसिंहत्व

त्याचेकडे आलें आहे. नृसिंहाची उपासना ही भूतहितेरतीची, अभयाची, दीक्षा होय. मानुष-जन्माच्या साफल्याचें तें दिग्दर्शन आहे. नरसिंहाची उपासना माणसाला पशुत्वांतून, मात्स्यन्यायांतून सोडवून दयेच्या दिव्यत्वाकडे अग्रसर करते.

**उद् वयं तमसः परि, ज्योतिः पश्यन्त उत्-तरम् ।**
**देवं देवत्रा सूर्यम्, अगन्म ज्योतिर् उत्-तमम् ॥**

दयेचा दिव्य किरण जो निर्दयतेच्या तमिस्राचा भेद करून उगवतो त्यावर दृष्टि लावून आम्ही उत्तरोत्तर प्रगति करीत त्या दयासहस्ररश्मीला गांठूं.

सिंह हा भयंकर आहे. नर अभयंकर आहे. नरसिंह हा सज्जनांना अभयंकर असून दुर्जनतेला भयंकर आहे. तात्पर्य, नरसिंहाचें नरसिंहत्व त्याच्या निग्रहसामर्थ्यगर्भ सज्जनानुग्रहरूप अभयंकरत्वांतच आहे. निर्भय होण्याचा एकमेव मार्ग म्हणजे सर्वांना अभय देणें. आन्द्रोक्लिज आणि सिंह यांच्या गोष्टींत अभयाचें हें सामर्थ्य चांगलें प्रकट झालें आहे. सिंह सर्वांना भयंकर पण तो हि आंद्रोक्लिजापुढें नमला, अभयंकर झाला. कारण नरानें आपल्या दयारूप नरत्वानें सिंहाचें हिंस्रत्वरूप भयंकरत्व हिरावून घेतलें आणि त्याला आपला भक्त बनवलें. 'बुभुक्षितः किं न करोति पापम्' म्हणून म्हटलें आहे. पण आंद्रोक्लिजानें आपल्या दयालुत्वरूप नरत्वानें तें खोटें पाडलें. अत्यंत भुकेल्या सिंहानें हि आंद्रोक्लिजाला फाडून खाल्लें नाहीं, कृतज्ञतेनें त्याचे पायच चाटले. अशा प्रकारें नरानें आपलें सिंहत्व, श्रेष्ठत्व, प्रस्थापित केलें. हें श्रेष्ठत्व, त्याच्या सर्वाभयदानांत आहे, अहिंसेंत आहे, अहिंस्रतेंत आहे. सिंहाचें सिंहत्व त्याच्या सर्वाधिक हिंस्रतेंत, भयंकरतेंत आहे, तर नरसिंहाचें सिंहत्व त्याच्या अभयंकरतेंतच आहे.

नरसिंहाचें जें महाभयानक रूप दिसतें तें वस्तुतः नरसिंहाचें नसून हिरण्यकशिपूच्या दुर्जनतेचें आहे. त्याच्या विश्वद्रोहाचें रूप आहे तें. भगवान् नृसिंह तर आदर्शवत् निरञ्जन आहे. त्यांत दिसणारें अक्राळ-विक्राळ रूप त्याचें नाहीं, समोरच्याचें आहे.

## २२ श्रीमान्

श्रीमान् म्हणजे श्रीयुक्त असें समजलें जातें. परंतु श्रीयुक्त आणि श्रीमान् यांत मी अंतर करतों. श्रीयुक्त म्हणजे एखाद्या बाह्य श्री नामक द्रव्यार्थ पदार्थानें युक्त. परंतु श्रीमान् म्हणजे सहज अशा श्रीनामक भावानें, गुणानें संपन्न. युक्त पद बाह्य पदार्थाचें स्वामित्व सूचित करतें. मत्- प्रत्यय अंगभूत विभूतीचें स्वामित्व दर्शित करतो. परंतु हा सूक्ष्म विचार व्यवहारांत पाळला जात नाहीं आणि नेमकेपणानें व्यवहाराचें साधन होणारी शब्दशक्ति अयथावत् अर्थ म्हणजे भ्रांति निर्माण करते, गैरसमजास कारण होते. म्हणून सरस्वतीची उपासना केली पाहिजे. तिच्या उपासनेनेंच सर्व सिद्धि होईल. अशी ती सिद्धिदात्री आहे, म्हणूनच तिला सार-दा म्हणतात.

लक्ष्मी आणि सरस्वती यांचें पटत नाहीं अशी समजूत आहे. पण ती खरी नसून गैर आहे. कारण सर्व सद्गुणांचें परस्परांशीं सख्यच नव्हे तर ऐक्य आहे म्हटलें तरी चालेल. कारण ते सर्व सन्मूलक आहेत. मग लक्ष्मी आणि सरस्वती यांचें पटत नाहीं असें जें म्हटलें जातें तें कां? त्याचें कारण लक्ष्मीविषयींची विपरीत धारणा होय. लक्ष्मी म्हणजे पैसा नव्हे. लक्ष्मी म्हणजे आत्म्याची प्रभा. लक्ष्मी म्हणजे कोणाचा द्रोह न करतां स्व-परिश्रमानें व नेकीनें संपादन केलेली संपत्ति. अर्थात् लक्ष्मी म्हणजे ती संपत्ति कीं जी दैवी गुणांची द्योतक आहे. हिचा सरस्वतीशीं मुळींच विरोध नाहीं. उलट ती पोषकच आहे सरस्वतीला. सुभाषितकारानें "अकृत्वा परसंतापं, अगत्वा खलनम्रताम् । अनुत्सृज्य संतां वर्त्म, यत् स्वल्पमपि तद् बहु ॥" म्हणून ज्या धनाचा उल्लेख केला आहे ती लक्ष्मी होय. परंतु जो असत्य व हिंसा करून

लुबाडला जातो तो पैसा म्हणजे लक्ष्मी नसून अवदसा होय. या अवदसेचा सरस्वतीशीं, कीं जी सर्व-शुक्ला आहे, पूर्ण विरोध आहे. लक्ष्मी ही विष्णूच्या पायांची दासी आहे. अशेष गिळून शेष उरलेला जो आत्म-महिमा त्याच्या अंकावर पहुडलेला जो परमात्मा त्याला चरण-शरण असलेली जी सच्-चिद्-आनंदमयी अनपायिनी स्वरूप-शोभा ती म्हणजे लक्ष्मी होय. जी लक्ष्मी तीच भागवतानें म्हटल्याप्रमाणें, "श्रीगुणा नैरपेक्ष्याद्याः" होत. परमेश्वर हा सदैव श्रीमानच असावयाचा. जसा सूर्य हा द्युतिमान्, चंद्र कौमुदीमान्, अग्नि उष्णतामानच असूं शकतो, तसा परमेश्वर हा श्रीमान् आहे. तो श्रीवियुक्त असूंच शकत नाहीं. श्री ही त्याची निजशक्ति आहे. अंगभूत आहे आणि म्हणून श्रीमान् हें परमेश्वराचें नित्य-विशेषण होय. त्यामुळेंच त्याला भगवान् म्हणतात. त्याचमुळें त्याचा नव्हे तर त्याच्या विभूतींचाहि उल्लेख श्रीपदपूर्वकच केला जातो. जीवाचा उल्लेख तसा श्रीपदपूर्वक केला जात नाहीं, तोहि त्याचमुळे. 'श्रीभगवान् उवाच' असें बोललें जातें, पण 'श्री अर्जुन उवाच', नव्हे तर नुसतें "अर्जुन उवाच", "संजय उवाच", "धृतराष्ट्र उवाच", असेंच म्हटलें जातें. कारण, ते सर्व अनीश्वर आहेत. लक्ष्मी ही ईश्वराची निजशक्ति आहे, अर्धांगिनी आहे. तोच एक लक्ष्मी-पति आहे, बाकी सारे भिक्षापति !

विष्णुसहस्रांत श्रीमान् हें पद तीनदां आलें आहे. त्याशिवाय श्रीश, श्रीपति, श्रीधर, श्रीनिधि, श्रीवास, श्रीनिवास आणि लक्ष्मीवान् इत्यादि हि पदें आलेलींच आहेत. तीं सर्व समानार्थक असून शिवाय विविध आणि विशिष्ट अर्थाचीं वाचक आहेत.

## २३. केशव

केशव पदाची व्युत्पत्ति वा निरुक्ति दोन-तीन प्रकारें लावली जाते. (१) केशव म्हणजे सुंदर केश धारण करणारा, (२) क् अ आणि ईश यांचा अर्थात् ब्रह्मा विष्णु महेश यांचा प्रभु आणि (३) केशी- नामक दैत्याचा वध करणारा. यांपैकीं पहिली व्युत्पत्ति ही शब्द-शास्त्रानुसार ठीक असली तरी ती ईश्वराचें कांहीं चिंतनीय वैशिष्ट्य प्रकट करीत नाहीं. प्रशस्त स्निग्ध नील कुंचित कुंतल धारण करणारा हें वर्णन सामान्य आहे. तें अलौकिक म्हणतां यायचें नाहीं. सुंदर केशकलापानें युक्त अनेक असूं शकतील. त्यांत परमेश्वरी विभूतिमत्त्व कोणतें? इतर दोन अर्थ परमेश्वराचें माहात्म्य आणि पराक्रम सूचित करणारे आहेत खरे, पण ते कृत्रिम आहेत. ते मनास येत नाहींत. म्हणून मी वेगळीच व्युत्पत्ति, निरुक्ति लावतों. 'के जले शवायते इति केशवः' जलशायी. सृष्टीच्या आरंभीं जें अव्यक्तसंज्ञक जलच जल भरूनं होतें त्याच्या तळाशीं जो विश्वाचा अव्यय कंद "आनीत् अवातं स्वधया" प्राणापानाशिवाय स्वशक्तीनें स्पंदत होता, तोच केशव होय. तो श्वसन आणि चलनवलन करीत नव्हता. म्हणून त्याला "शवायते" म्हणावयाचें. पण तो शव नव्हे. शव असता तर पाण्यावर तरंगला असता. हा तर बुडाशीं असणारा अर्थात् तो सर्व प्राणांचें स्तंभन करून बसला होता. बसला होता म्हणणेंहि बरोबर होणार नाहीं. कारण बसण्याला शरीर तोलून धरावें लागतें. तेवढीहि क्रिया तो करीत नव्हता. म्हणून तो निजला म्हणायचें. पण निजण्यांतहि गुणाधीनता येते. तमोगुणाच्या अधीन झाल्याशिवाय निजतां येत नाहीं. म्हणून म्हणावयाचें कीं तो पहुडला होता. पहुडण्यांत स्वातंत्र्य आहे. तेव्हां केशव म्हणजे सृष्टीपूर्वी अव्यक्ताधार होऊन राहिलेला 'स्वे महिम्नि' प्रतिष्ठित परमात्मा. याचेंच ध्यान "शांताकारं भुजगशयनं" इत्यादि श्लोकांत केलें आहे. तिथें केशव ऐवजीं विष्णु पद घेतलें आहे. पण त्याचाहि आशय केशव पदासारखा आहे. सर्व विश्वाकार गिळून अव्यक्ताच्या अंतरांत खोल खोल शिरून बसलेला अक्षर परमात्मा असाच आहे.

सर्वांच्या मुळाशीं स्वयंभु निराधार असें कूटस्थ अक्षर-ब्रह्म निमित्तकारण. त्यानंतर तदाधार अव्यक्त, सर्व व्यक्ताचें उपादान कारण. त्यांतून हें व्यक्त सगुण-साकार ब्रह्माण्ड आणि त्या ब्रह्माण्डाचा एक अंश म्हणजे ही सर्वजीवनिवास अशी पृथ्वी. असा हा सृष्टीचा वंशवृक्ष आहे.

**नारायणः परोऽव्यक्तात्**
**अण्डं अव्यक्त-संभवम् ।**
**अण्डस्यान्तस् त्विमे लोकाः**
**सप्त-द्वीपा च मेदिनी ॥**

या श्लोकांत हाच आशय ग्रथित झाला आहे. इथें जो नारायण म्हटला तोच केशव होय.

## २४. पुरुषोत्तम

पुरुषोत्तम म्हणजे सर्व पुरुषांमध्यें वरिष्ठ पुरुष. पुरुष म्हणजे चेतन. सृष्टींत (१) जड प्रकृति, (२) सवासन जीव, आणि (३) निर्वासन परमात्मा असे तीन पुरुष दिसून येतात. पैकीं जड प्रकृतीला पुरुष मानायला अडचण भासते. जिच्या ठिकाणीं चेतनाचा प्रमुख गुण जो साक्षित्व तो दिसत नाहीं तिला पुरुष कसें मानावयाचें? परंतु हें सारें विश्व पुरुषरूप आहे, आत्मरूप आहे असें श्रुति सांगते : "पुरुष एव इदं सर्वम्" त्या अर्थीं ज्याला आम्हीं जड प्रकृति म्हणतों ती हि जड नसून चेतनच आहे असें मानलें पाहिजे. त्या जडाच्या ठिकाणीं असणारें चेतन परमर्षींच्या सूक्ष्म दृष्टीला दिसतें. म्हणून ते समोर पहात असल्याप्रमाणें म्हणतात :– 'ईशावास्यमिदं सर्वं यत्किंच जगत्यां जगत्' जगांत जें कांहीं जीवन आहे तें सारें ईश्वरानें वसविलेलें आहे. जडाचे ठायीं असलेलें चेतन हें गुप्त आणि सुप्त असें आहे. तें सामान्य दृष्टीला आकळलें नाहीं तरी त्यामुळें तें अचेतन ठरत नाहीं आणि म्हणून त्याचीहि गणना परमार्थांत चेतनांतच करावी लागते. शिवाय चेतनापासून जड आणि जडापासून चेतन निर्माण होत असलेलें आपण पाहतच आहोंत. याचा अर्थ तीं दोन्ही एकराशिच आहेत असा होतो. त्यांतील फरक हा औपधिक आहे, वास्तविक नाहीं. प्रकृतिगत चेतन आणि जीवरूप चेतन हीं दोन्ही चेतनें, हे दोन्ही पुरुष सोपाधिक आहेत. आणि म्हणून या दोहोंहून वेगळा आणि वरिष्ठ असा तिसरा पुरुष परमात्मा हा पुरुषोत्तम म्हटला आहे. "अतोऽस्मि लोके वेदे च प्रथितः पुरुषोत्तमः" असें भगवद्-गीतेंत स्पष्टच म्हटलें आहे. देवाच्या सहस्रनामांत हें नाम सर्वोपरि आहे. देवाचीं सर्व नामें त्याच्या या तीन रूपांचीं, तीन पुरुषांचींच नामें होत. 'या उपाधीमाजीं गुप्त । चैतन्य असे सर्वगत । तें तत्त्वज्ञ संत । स्वीकरिती ॥' ज्ञानदेवांनीं या शब्दांत त्याच सर्वगत चैतन्याचें, परमात्म्याचें, पुरुषोत्तमाचें निरूपण केलें आहे.

व्यवहारांत आपण "मी" हा उत्तम पुरुष, "तूं" हा मध्यम पुरुष, आणि "तो" हा तृतीय पुरुष म्हणतों. आणि या सर्वांना पुरुष-वाचक मानतों. अर्थात् या सर्वांनीं व्यक्त होणारें जडचेतन सर्व पदार्थ पुरुषच आहेत, चेतनच आहेत, असें मान्य करतों हें उघड आहे.

या सर्व पुरुष वाचकांत मी हा उत्तम पुरुष मानिला आहे. कारण तो अंतरतर आहे, आत्मरूप आहे, ज्ञातृस्वरूप आहे. आणि बाकीचे सारे ज्ञेयस्वरूप आहेत, ज्ञानविषय झालेले आहेत. अर्थात् भिन्नत्वानें ज्ञानविषय न होऊं शकणारें जें सर्वांतर्यामी निजरूप तें म्हणजे उत्तम पुरुष उर्फ पुरुषोत्तम होय.

अशा प्रकारें लोकांत म्हणजे व्यवहारांत आणि वेदांत म्हणजे शास्त्रांत अर्थात् सर्वत्रच एकच तत्त्व पुरुषोत्तम म्हणून प्रसिद्ध आहे.

हे पुरुषोत्तम-तत्त्व इतकें प्रसिद्ध आहे कीं त्याला शोधायला निघणाऱ्याचा उपहास व्हावा. अतिप्रसिद्धत्वामुळें तें विस्मृत होऊन गेलें आहे. म्हणूनच संतांनीं म्हटलें आहे–

पानीमें मीन पियासी ।
मोहे सुन सुन आवत हांसी ॥

पुरुषोत्तम म्हणजे पुरुषांमध्यें उत्तम किंवा पुरुषांहून उत्तम, असा द्विविध विग्रह केला जाईल. वेदान्तांतील पुरुषोत्तम हा पुरुषांहून उत्तम आहे, तर व्याकरणांतील पुरुषांत उत्तम आाहे. दोहोंचें तात्पर्य अभिन्नच आहे.

### २५. सर्व

परमेश्वराचें यथार्थ वर्णन कोणत्या शब्दानें करतां येईल? शब्दशक्ति परिमित आहे. परिमितता हेंच तिचें स्वत्व आहे. जो शब्द एकमेवाद्वितीय अर्थ व्यक्त करीत नाहीं तो कसला शब्द! त्याला अशब्दच म्हणावें लागेल. आणि असें जर आहे तर शब्दानें परमेश्वराचें वर्णन कसें करतां येईल. तो परमेश्वराचें असर्वच वर्णन करतो. पण म्हणून शब्द आपलें शब्दत्व, आपला स्वभाव कसा सोडील? तो यथाशक्ति आणि सामर्थ्य एकवटून परमेश्वराला "सर्व" म्हणून संबोधितो. आतां त्याचें निःशेष संपूर्ण वर्णन झालें. तुम्ही त्यांत अमुक एक न्यून म्हणतांच "सर्वांत त्याचा अंतर्भाव आहेच" असें शब्द बजावणार ! या सर्वांत असर्वहि आलें इतकी आहे सर्वाची व्याप्ति. कारण आणि कार्य दोन्ही मिळून सर्व होतें. दोन्ही एकएकटीं असर्व. आतां कारणांत कार्य निहित आणि कार्यांत कारण गृहीत असल्यामुळें त्यांनाहि सर्व म्हणतां येईल. पण मग त्या स्थितींत तीं भिन्नत्वानें कार्यकारण म्हणून राहणार नाहींत. परमेश्वर कारण आणि कार्य दोन्ही असल्यामुळें तो सर्व आहे. 'सर्वं समाप्नोषि ततो ऽसि सर्वः' असें गीतेंत ठीकच म्हटलें आहे.

ज्ञातृ, ज्ञेय आणि ज्ञान हीं तिन्ही तोच असल्यामुळेंहि परमेश्वराचें 'सर्व' नाम अन्वर्थक होय.

### २६. शर्व

शर्व म्हणजे शीर्ण करणारा, परमेश्वर हा कालरूपानें आयुष्याचा, स्वजनांचा, धनाचा ऱ्हास करीत असतो. अशा प्रकारें जीवापासून त्याचे हे सारे पाश तो छेदीत असत्तो. जीवाला या संहार-प्रक्रियेनें तो वैराग्य आणि ज्ञान यांची पुरवणीच करीत असतो. ही त्याची परम कृपाळुता होय. या कृपाळुतेचा चरम टप्पा म्हणजे जीवाला आपलें केवळ निरुपाधि शिवस्वरूप, निजरूप लाभणें. नांव शर्व म्हणजे संहर्ता, अपहर्ता, पण करणीनें उपकर्ता, भर्ता, "नांव सोनूबाई हातीं कथलाचा वाळा" त्याचा हा उलटा प्रकार. ही नाथांच्या घरची उलटी खूण आहे. म्हणूनच जो शर्व, जो हर, तोच शिव, तोच शंकर म्हटला आहे; आणि ठीकच म्हटला आहे.

### २७. शिव

शिव म्हणजे केवल-स्वरूप. जिथें त्रिगुण-प्रपंच शमला आहे. जिथें केवल नैर्गुण्य आहे, जिथें अद्वैत आहे असें तें तुरीय पद म्हणजे शिव. तद्व्यतिरिक्त तें सारें शव. कारण तिथें ना सत्, ना चित्, ना आनंद. श्मशानच म्हणायचें तें. त्या या जगद्रूप श्मशानांत जड जीवरूप शवाच्या मेळाव्यांत शिव ध्यानस्थ बसला आहे. प्रपंचाच्या चितेचें भस्म त्यानें आपल्या सर्वांगावर चर्चिलें आहे. नर-रुंडमुंडांच्या मालिका (त्यांचा शिरच्छेद न करतांच) सूत्रात्मक त्यानें धारण केल्या आहेत. इथें केवल-रूपानें शिव तोच विष्णु आणि विष्णु तोच शिव होय. कारण, वस्तु एक, नांवें अनेक, असा हा प्रकार आहे. जो शिव तोच ब्रह्मा आणि तोच विष्णु. ही मूर्तित्रयी असेल, वस्तुत्रयी नव्हेच. वस्तु एकमेवाद्वितीयच आहे आणि ती तुरीय म्हटली आहे.

### २८. स्थाणु

स्थाणु म्हणजे स्थिर, स्थितिशील. परमात्मा पूर्ण आहे. सर्वार्थ-सिद्ध आहे. त्याला कांहीं एक मिळवावयाचें नाहीं आणि त्यासाठीं म्हणून कांहीं हालचालहि करावयाचें कारण नाहीं. म्हणूनच तो

स्थाणु. ज्याला वासना असतात तो जीव वासनांच्या योगें जळत आणि चळत असतो. परंतु जो स्वयंतृप्त आहे तो परमात्मा कशासाठीं घडपड करील ? तो निरग्नि आणि निष्क्रिय असा संन्यासी आहे. संन्यासी असा या जगांत तोच आहे.

जिथें अपूर्णता असते, तिथेंच गति संभवते. समुद्र पूर्ण आहे म्हणून त्यांत नदीसारखा प्रवाह नाहीं. पण त्यांतहि भरती ओहोटी आहेच. पण ती आकाशांत नाहीं. कारण तें परिपूर्ण आहे. परमात्मा हा त्यापेक्षां किती परिपूर्ण म्हणावा ? आकाश आणि अनीश्वर सारेंच सद्वितीय आहे, तर परमात्मा हा एकमेवाद्वितीय आहे. त्यामुळें तो स्थाणु, कूटस्थ म्हटला. त्याची वाढ-घट होऊं शकत नाहीं, म्हणून स्थाणु. स्थाणु म्हणजे खुंट हा जसा पानां-फुलांनीं वाढत नाहीं, तसा तो तीं गळून घटत नाहीं. तसा हा परमात्मा आहे. त्याला जन्मादि षड्भाव नाहींत. म्हणून तो स्थाणु.

'' सर्वः शर्वः शिवः स्थाणु : '' या चरणांत हरिपाठांत हरपाठ मिसळला आहे. सारेच पाठ त्यांत मिसळले आहेत वस्तुतः. कारण हरिनाम हें सर्व-व्यापी आहे. ज्ञानदेवानें म्हटलेंच आहे. '' एकनाम हरि द्वैत नाम दुरी '' एक हरिनाम घेतल्यावर दुसरें नांव घ्यायला मुळीं कांहीं उरतच नाहीं. असें अद्वैत जिथें झालें, तिथें जें कोणतें नाम घेऊं तें सारेंच हरिनाम झालें. या दृष्टीनें ह्या चरणांत आरंभींच आलेलें सर्वनाम साभिप्राय म्हटलें पाहिजे. हत्तीच्या पावलांत जशीं सर्व पावलें येऊन गेलीं तशीं हरिनामांत सर्व नामें. कारण तें नुसतें सर्वच नाहीं तर अति-सर्व आहे.

मुलाच्या मुखाला चाळा असतो. तो बाराखडी घोकूं लागतो. तसा भक्ताच्या मुखाचा चाळा सहस्रांत वारंवार प्रकटला आहे. आरंभीं जें अक्षर आलें मुखांत, त्यानेंच नाममाला सुचली आणि रचली आहे. 'विश्वं विष्णुर् वषट्कारः' ही व ची बाराखडी. '' भूत-भव्य-भवत्-प्रभु :'' ही आणि त्या पुढीलहि '' भूतकृत् भूतभृत् भावो भूतात्मा भूतभावनः '' ही भची बाराखडी. तशी इथें '' सर्वः शर्वः शिवः स्थाणुः '' ही स-शची बाराखडी आली आहे अथवा म्हणा पाढा आला आहे.

मनाच्या उड्या विलक्षण आहेत. तें कधीं साधर्म्य तर कधीं वैधर्म्य, कधीं संगति तर कधीं विसंगति, कधीं संश्लेषण तर कधीं विश्लेषण, असे नाना भाव लक्षून 'एकत्वेन पृथक्त्वेन बहुधा विश्वतोमुखम्' संचार करीत असतें. मनाचा हा मनस्वीपणा सहस्रांत सर्वत्र पहायला मिळतो.

## २९. भूतादि

भूतादि म्हणजे भूतांचा उगम. ज्याप्रमाणें आपल्या उद्गमस्थानांतून सहस्रावधि बिंदुमालिकांच्या रूपानें प्रवाहित होऊन नदी समुद्राला मिळते, त्याप्रमाणें ही समस्तभूत-सृष्टि परमात्म्यापासून उद्भूत झाली आहे, उद्गत झाली आहे. नदीला एक उद्गम असतो, एक परायण असतें. परायण म्हणजे अंतिम मुक्काम. आणि या दोहोंच्या दरम्यान ती तरंगित होत असते. त्याप्रमाणें ही सृष्टिहि अक्षर परमात्म्यापासून उद्गत होऊन, अव्यय निधिरूप त्याशींच संगत होत असते. मध्यंतरीचें तिचें व्यक्त जीवन, हा सारा प्रपंच, क्षणिक होय, क्षर होय. एखाद्या झाडाचें जीवन केव्हां सफल मानलें जातें ? जेव्हां जें बीज पेरलें तेंच बीज फलरूपानें तें धारण करतें तेव्हां. तसें जेव्हां ही भूतसृष्टि परमात्म्यापासून उद्गत होऊन परत परमात्म्यास गांठते तेव्हांच ती सफल होते, कृतार्थ होते. हाच आशय तुकारामानें—

'' तुका म्हणे बीजें, बीज दाखविलें
पत्र पुष्प आलें, गेलें वायां ॥ ''

अशा शब्दांत प्रकट केला आहे. मधली सृष्टि ही सारी अशी अनित्य आहे. नित्य एक अक्षर परमात्माच आहे, जो ह्या सृष्टीचा उद्गम तसाच

परायण आहे. पुढील नाम ''अव्ययः निधिः'' हें 'भूतादिः'' या पदाबरोबर वाचलें म्हणजे दोहोंची अशी संगति लागते. त्याचसाठीं भूतादीच्या पाठोपाठ ''अव्यय निधि' हें नाम उच्चारिलें आहे.

### ३०. अव्यय निधि

अव्यय निधि म्हणजे अक्षय सांठा, संग्रह. सर्व सृष्टि ही परमात्म्याच्या ठायीं मिळून समाप्त होते. त्यांतच ती भरलेली असते, निहित असते. म्हणून तो निधि. आणि ज्या अर्थीं ही सृष्टि त्या परमात्म्यापासून असंख्य वार निघून त्यांतच निमाली आहे, त्याअर्थीं तो अव्यय होय. कितीहि वेळां ती त्यापासून निघाली तरी त्याचा सांठा अणुमात्र हि रिता झाला नाहीं. एखाद्या जलाशयांतून जर खूप पाट काढले तर तें जलाशय उथळ होतें; प्रसंगीं संपूंहि शकतें. परंतु समुद्र हा कधीं असा रिता वा शून्य होणें नाहीं. त्याप्रमाणें परमात्मा हा अक्षय आहे, नव्हे, अक्षय्य आहे. म्हणून त्याला अव्यय निधि म्हटलें तें युक्तच आहे.

### ३१. संभव

संभव म्हणजे सर्वत्र आणि सर्वदा होणारा. होणारा खरा, पण काय होणारा ? ज्या अर्थीं अमुक एक होणारा असें कांहीं उपपद जोडलेलें नाहीं त्या अर्थी (अर्थात् निरुपपद प्रयोगावरून) सर्व-संभव, सर्व कांहीं होणारा, असा त्याचा अर्थ होतो. जें संभवनीय आहे तें सारें तो आहे आणि असंभवनीय खरोखर काय आहे ? कल्पद्रुमाला सारेंच संभवनीय आहे. तो साक्षात् संभव आहे.

### ३२. भावन

भावन म्हणजे भाव, सत्ता, अस्तित्व देणारा. परमेश्वर सर्व-भावन आहे. तो या चराचर विश्वाला आणि अविश्वाला हि निर्माण करणारा आहे. परमेश्वर विश्व आणि शून्य दोहोंचा हि स्वामी आहे. तो कल्पारंभीं विश्वभावन होतो आणि कल्पांतीं शून्य-भावन होतो. दोन्ही हि स्थितींत तो भावनच आहे. दिसायला तो कल्पारंभीं विश्वसृक् दिसतो आणि कल्पांतीं विश्वांतक भासतो. परंतु वस्तुतः तो अविश्वाची शून्याची, सृष्टि करीत असतो. शून्याची सृष्टि म्हणजे अभावाची सृष्टि नव्हे. शून्याची सृष्टि म्हणजे स्वरूप-स्थिति होय. अशून्याची सृष्टि म्हणजे विश्वरूप स्थिति होय. आणि म्हणूनच तो, सदैव म्हणा वा सर्वत्र म्हणा, भावनच आहे.

### ३३. भर्ता

भर्ता म्हणजे भरण करणारा, जीवाचें जनन झाल्यानंतर त्याचें भरण करावें लागतें. तो स्वतः आपलें भरण करण्यास अक्षम असतो. अशा कृपण म्हणजे कींव करण्याजोग्या पराधीन जीवांना जो मातापित्यांच्या आणि इतर सर्वच पूर्वजांच्या हृदयांत प्रेमाचा, वत्सलतेचा, पान्हा पुरवून त्यांचें भरण आणि पोषण करतो तो परमेश्वर हाच एकमेव भर्ता होय. हें परमेश्वराचें विश्व-भर्तृत्व परोक्ष आहे. त्यामुळें तें आम्हांला दिसत नाहीं. परंतु देवांची रीत ही अशीच असते. ते परोक्षप्रिय आहेत. ते गुप्तपणें सर्व कांहीं करीत असतात आणि तेच करीत असतात. आम्हांला वाटतें, हा करतो तो करतो, आई भरवते, बाप पाळतो. पण हा सर्व वरवरचा देखावा आहे. सूत्रधार वेगळाच आहे. शकुंतलेला पक्ष्यांनीं भरवलें, कण्वानें वाढविलें. वृक्ष-वनस्पतींनीं आणि मृगमृगींनीं तिला स्वजन मानिलें इत्यादि. हें खरें शाकुंतल आहे. त्यांतच परमेश्वराचें भर्तृत्व भरलेलें आहे. तें भर्तृत्व लक्षून तिला जो पुत्र झाला त्याला ऋषीनें भरत नांव दिलें ज्यावरून आपल्या देशाचें व प्रजेचें नांव भारत पडलें आहे.

### ३४. प्रभव

प्रभव म्हणजे प्रकृष्ट भव. प्रथम भव. विश्वोत्पत्तीस कारणीभूत कारणांचा जन्म. परमेश्वर ब्रह्मदेवादि विश्वस्रष्ट्यांना आणि महाभूतादि कारणांना उत्पन्न

करून त्यांच्या करवीं विश्वरचना करतो. हें जें प्रथम भवन, ही जी आद्या सृष्टि, तोच प्रभव होय. परमेश्वर अव्यक्त होता तो प्रथम व्यक्त झाला. अव्यक्त म्हणून सूक्ष्म होता, तो व्यक्त होऊन प्रभूत झाला. म्हणून त्याच्या ह्या प्रथम आणि प्रभूत प्रकटीभवनाला प्रभव म्हणावयाचें. या प्रभवांतूनच मग सर्व सृष्टीचा संभव होतो. म्हटलेंच आहे गीतेंत–

मम योनिर् महद् ब्रह्म तस्मिन् गर्भं दधाम्यहम्।
संभवः सर्वभूतानां ततो भवति भारत ॥

## ३५. प्रभु

परमेश्वर विश्वाचा प्रभव आहे, जननी जनक आहे; तसा ह्या सृष्ट विश्वाचा तो प्रभु म्हणजे पालक हि आहे. ह्या सृष्टींतील चराचर जीवांना तो वासना कर्म आणि ज्ञान देऊन त्यांचें पालन करीत आहे. वासनाधीन होऊन जीव देह धारण करतो, देहानें वासनापूर्तीसाठीं नाना कर्मे करतो, त्यांचें बरें-वाईट फळ भोगतो आणि तद्द्वारा सृष्टीचें आणि आपलें स्वरूप समजूं लागतो. प्राप्त ज्ञानानुसार हळूहळू प्रगति करीत "बहूनां जन्मनां अन्ते," परमेश्वराला म्हणजे पूर्ण ज्ञानाला प्राप्त होतो. या साऱ्या प्रवासांत परमेश्वर त्याचा "सोयरा सांगाती" असतो, प्रभु असतो. "जेथें जातो तेथें तूं माझा सांगाती । चालविसी हातीं धरूनिया" असें हें प्रभुत्व, परमेश्वराचें पालकत्व व चालकत्व, भक्त ओळखतो, अभक्त ओळखत नाहीं इतकेंच. परंतु तो प्रभु तर विश्वप्रभु आहे. भक्तांचा तसा अभक्तांचा हि प्रभु आहे. तो सर्वांना सांभाळीत आहे.

## ३६. ईश्वर

परमेश्वर विश्वाचा प्रभव, प्रभु तथा ईश्वर म्हणजे नियन्ता आहे, शास्ता आहे. हें विश्व त्याच्या आज्ञेंत आहे. त्याच्या आदेशावांचून झाडाचें पान हि हलूं शकत नाहीं. त्याच्या भयानें सूर्य तापतो आहे, मेघ वर्षत आहेत, वारे वाहत आहेत. त्याच्या भयानें पर्वत जागचे हलत नाहींत आणि नद्या सारख्या धावतच आहेत. ईश्वराचें हें ईश्वरत्व म्हणजे वस्तूंचा स्वभावधर्म होय. आपला स्वभावधर्म कोणीं सोडूं शकत नाहीं, त्याविरुद्ध कोणी जाऊं शकत नाहीं. हें ईश्वरी शासन जो मोडूं पाहील, तो मोडेल. जो तें ओळखून स्वधर्माचरण करील तो ईश्वरी कृपेस पात्र होईल. हिंदु धर्माचें म्हणजे वर्णाश्रम-धर्माचें हें प्राणतत्त्व आहे. गीतेंत भगवान् कृष्णानें हेंच परोपरीनें प्रतिपादिलें आहे. गीतेंचा मुख्य संदेश हाच आहे :–

(१)

ये मे मतं इदं नित्यं अनुतिष्ठन्ति मानवाः ।
श्रद्धावन्तोऽनसूयन्तो मुच्यन्ते तेऽपि कर्मभिः ॥
ये त्वेतद् अभ्यसूयन्तो नानुतिष्ठन्ति मे मतम् ।
सर्वज्ञानविमूढांस् तान् विद्धि नष्टान् अचेतसः ॥

(२)

यद् अहंकारमाश्रित्य न योत्स्ये इति मन्यसे ।
मिथ्यैष व्यवसायस् ते प्रकृतिस् त्वां नियोक्ष्यति ॥
स्वभावजेन कौन्तेय निबद्धः स्वेन कर्मणा ।
कर्तुं नेच्छसि यत् मोहात् करिष्यस्यवशोऽपि तत् ॥

(३)

ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति ।
भ्रामयन् सर्वभूतानि यन्त्रारूढानि मायया ॥
तमेव शरणं गच्छ सर्वभावेन भारत ।
तत्प्रसादात् परां शान्तिं स्थानं प्राप्स्यसि शाश्वतम् ॥

प्रभव, प्रभु आणि ईश्वर ही त्रिपदी आहे. ती संपूर्ण विश्वजीवन परमेश्वराधीन आहे हें प्रकट करीत आहे.

### ३७. स्वयंभू

ईश्वर आणि अनीश्वर यांत एक महत्त्वाचा भेद असा कीं अनीश्वर म्हणजे जीव, हा स्वयंभू असत नाहीं, तो कर्म-परतंत्र असून कोणापासून तरी जन्मतो. परंतु ईश्वर हा स्वाधीन आणि स्वयंभू आहे. तो कोणापासून झालेला नाहीं. ईश्वराचा हा भाव दुसऱ्या कोणालाच प्राप्त नाहीं. ते सर्व ईश्वरापासून निर्माण झाले आहेत. पण ईश्वर हा दुसऱ्या कोणापासून, कोणा परमेश्वरापासून, झालेला आहे असें म्हटलें तर तो ईश्वर न राहता अनीश्वर होईल. जगाचें मूल कारण हें एकमेव आणि स्वयंभूच मानावें लागेल. तसें न मानलें तर अनवस्था-प्रसंग ओढवेल. पुराणांतील ती गोष्ट प्रसिद्धच आहे सत्राजिताची. अमक्याचा बाप सत्राजित्, सत्राजिताचा बाप कोण ? तर विनोदी पुराणिक म्हणतात, अठराजित् आणि अठराजिताचा ? एकोणीसजित्. आतां ही मालिका संपायची कुठें ? कुठेंतरी जाऊन ती संपवावीच लागेल. आणि त्याला एक आणि स्वयंभूच मानावें लागेल. परमेश्वर हा तसा या सर्व विश्वाचें आदिकारण आहे, आणि एक म्हणजे तो एकमेवाद्वितीय आणि स्वयंभू आहे.

स्वयंभू शब्दानें तो परमेश्वर स्वतःच म्हणजे (१) आपलेंच उपादान घेऊन आणि (२) आपल्याच शक्तीनें हें विश्व निर्माण करतो असें सुचविलें आहे, असें म्हणतां येईल. कुंभाराला मडकें तयार करावयाचें झालें तर त्याला माती लागते, चाक लागतें, चाक फिरवायला दंड लागतो. अशा प्रकारें बाह्य द्रव्य आणि साधनें त्याला लागतात. परंतु परमेश्वर हा हें विश्व कोळ्याप्रमाणें आपल्या स्वतःपासून आपल्याच शक्तीनें निर्माण करीत असतो. त्याला कुठल्याहि बाह्य उपादानाची आणि उपकरणांची आवश्यकता असत नाहीं. अशा प्रकारें विश्वरूपानें परमात्मा प्रकटला आहे. हें त्याचें स्वयंभूत्वच होय.

ब्रह्मदेवालाहि स्वयंभू म्हटलें जातें. तें तो तत्सृष्ट सृष्टींतील एक जीव नव्हे एवढ्यापुरतेंच होय. वस्तुतः तो पद्मसंभव आहे. परमार्थानें त्याला स्वयंभू मानिल्यास तोच परमेश्वर होईल.

### ३८. शंभु

शम् म्हणजे शांति, शम् म्हणजे सुख, जो शांति म्हणजे विकार-शमनरूप निर्वाण देऊन जीवाला ब्रह्म पदवी प्राप्त करून देतो, ब्रह्म-निर्वाण, परम सुख देतो तो शंभु. जीवमात्राच्या सर्व प्रवृत्ति या सुखासाठीं आहेत. परंतु "ज्यों ज्यों दवा की, मर्ज़ बढता गया" या उक्तीप्रमाणें जीवाच्या धडपडीचा परिणाम सुखांत होण्याऐवजीं दुःखांतच होतांना आढळून येतो. असें कां ? कारण, सुखाची विपरीत कल्पना. सुख म्हणजे विषयोपभोग, असें सामान्यतः मानलें जातें. परंतु वस्तुतः जिला तृप्ति म्हणतात, तिचें स्वरूप भोगवृत्ति-निवृत्ति असेंच नसतें का ? विषय-वितृष्णता हें वस्तुतः तृप्तीचें स्वरूप आहे. जेव्हां माणसाला परमतृप्ति होते, त्यावेळीं त्याला बुभुक्षा असत नाहीं. आणि तेव्हांच त्याला सुखानुभव होतो. सुखाचा अनुभव भोगलालसेंत वा तद्वश होऊन भोग-संपादन क्रियेंत नसतो. तो लालसानिवृत्तींत आणि क्रियोपरमांतच येतो. शंभु असा शांत शिव अद्वैत अनुभवाचा स्वामी आहे. म्हणून दाताहि तोच आहे.

### ३९. आदित्य

आदित्य म्हणजे अदिति-पुत्र, देव. अदिति म्हणजे पूर्व दिशा. पूर्व दिशेकडून सर्व तेजःपुंज ग्रहतारे उगवतात. ते जगाला प्रकाश देतात. त्या प्रकाश देणाऱ्या देवांत, आदित्यांत, सूर्य हा सर्वांत अधिक प्रकाश देणारा म्हणून आदित्य म्हणजे सूर्य हा भगवंताची विभूति मानिली आहे.–"आदित्यानां अहं विष्णुः"– यांत सूर्याचा निर्देश विष्णुपदानें केला आहे. तो भगवान् सूर्य आपल्या किरणांनीं विश्व व्यापून

टाकतो म्हणून तो विष्णु. सर्व आदित्यांत, देवांत, प्रकाशकांत, सूर्य हा सर्वाधिक प्रकाशक, म्हणून तो अर्क म्हणजे पूजनीय झाला. पूर्व दिशेकडून जसा प्रकाश प्रकटतो त्याप्रमाणें पश्चिम दिशेकडून अंधार येतो. हाच दैत्य होय. दिति जी पश्चिम तिचे जे पुत्र ते दैत्य होत. ते सारे अंधाराचे नाना प्रकार होत. या दैत्यांचें आणि आदित्यांचें अनादि कालापासून हाडवैर असून त्यांचें सनातन युद्ध सुरू आहे आणि त्यांत देव हेच विजयी होत आले आहेत. या भौतिक सृष्टीच्या कवचांत दैविक सृष्टि आणि त्या दैविक सृष्टीच्या पोटांत आध्यात्मिक सृष्टि लपलेली आहे. त्यामुळें प्रत्येक घटनेचे तिहेरी अर्थ होत असतात. तमः-प्रकाश हें आधिभौतिक द्वंद्व, त्यांच्या अभिमानी देवता इंद्र आणि वृत्र अथवा देव आणि सैतान. तेंच आधिदैविक द्वंद्व आणि त्यांच्यांतील सदसद् हें आध्यात्मिक द्वंद्व होय. तेंच वेदोपनिषदांनीं आणि पुराणेतिहासांनीं आपआपल्या शैलीनें विवरिलें आहे. त्यामुळें जें विविध वाङ्मय निर्माण झालें आहे त्याच्या जाळ्यांत जनता सांपडली आहे. जो आधिभौतिक सूर्य तोच आधिदैविक विष्णु आणि जो आधिदैविक विष्णु तोच आध्यात्मिक परमात्मा. गीतेंत :

"आदित्यानां अहं विष्णुः,
ज्योतिषां रविरंशुमान्"

या श्लोकार्धांत प्रथम आधिदैविक आणि नंतर आधिभौतिक सत्य प्रकट झालें आहे. रवि आणि विष्णु या दोहोंना विभूति म्हणून संबोधून भगवत्तत्त्व हें आध्यात्मिक होय असें स्पष्ट केलें आहे. प्रकरणार्थ आणि एकूण गीताग्रंथार्थहि तोच आहे.

### ४०. पुष्कराक्ष

पुष्कराक्ष म्हणजे कमलनयन. परमात्मा हा असंग आहे. त्याची ही असंगता, त्याची ही निर्लेपता, दाखविण्यासाठीं त्याचीं सर्वेन्द्रियें कमलरूप वर्णिलीं आहेत. मुख-कमल, नेत्रकमल, करकमल, चरणकमल, हृदयकमल; अशा प्रकारें परमात्मा हा असंगतेची, निर्लिप्ततेची मूर्ति आहे असें वर्णिलें जातें. परंतु या सर्वेन्द्रियांत प्रधान डोळा आहे. त्यामुळें पुष्कराक्ष, पुंडरीकाक्ष इंत्यादि भगवन्-नामें विशेष प्रसिद्ध आहेत. आपल्या शरीरांतील प्रकाश म्हणजे हा डोळा आहे. तो जर शुद्ध राहिला तर सारें शरीर, सारें जीवन शुद्ध होईल. म्हणून दृष्टीची निर्मलता ही सर्वांत महत्त्वाची गोष्ट आहे. हृदयाचे सारे भाव नेत्रांत उमटतात; नेत्र म्हणजे अंतःकरणाचा आरसाच. दृष्टि निर्मल असेल तर हृदय निर्मल आहे, असें आपण समजतों. हृदयाला खिडकी नाहीं, त्यामुळें एखाद्याच्या मनांत काय आहे तें पाहतां येत नाहीं. हा ब्रह्मदेवाचा दोष होय असें ब्रह्मदेवाची जी सर्वोत्तम कृति मानव त्यांत दोषैकदृक् परीक्षकानें काढलेला दोष होय. पण त्या परीक्षकाच्याच दृष्टीचा हा दोष आहे. त्याला दिसायला पाहिजे कीं डोळा हा हृदयाचा आदर्श आहे. तो शरीररूप छायालेखन-यंत्रांतील दृश्य-वेधी खिडकीच आहे. छायालेखन-यंत्रांतील दृश्यवेधी खिडकी बाहेरीलच दृश्यांचा वेध घेते. पण ही खिडकी बाहेरील तसेंच आंतील दृश्याचेंहि दर्शन करवून देते. असें यंत्र आजवर माणूस निर्मू शकला नाहीं. करणाची बरोबरी उपकरण कसें करणार ? भगवंताची निःसंग दृष्टि कमलोपमानानें वर्णिली. पण त्यांतहि पुण्डरीक पदानें निरंजनतेचा, विशुद्धतेचा, अतिशय सूचित केला आहे.

### ४१. महास्वन

महास्वन म्हणजे ज्याचा शब्द मोठा आहे तो. जो शब्द दुसऱ्या शब्दानें झांकला जातो, बुडविला जातो तो शब्द कितीहि मोठा असला तरी तो लहानच म्हणावा लागेल. परमात्मा अंतरात्मरूपानें सर्वांच्या हृदयांत बसला आहे. पुण्याचें अनुमोदन आणि पापाचें

निषेधन करणारा त्याचा अति सूक्ष्म शब्द, बाहेरचा केवढाहि मोठा कोलाहल बुडवून टाकूं शकत नाहीं. त्यामुळें तो महास्वन म्हणावयाचा. शब्द ऐकायला कान लागतो. पण जो शब्द बहिराहि ऐकूं शकतो, तो शब्द किती शक्तिशाली म्हणावा ? अंतरात्म्याचा शब्द हा तसा आहे. म्हणून परमात्म्याला महास्वन म्हणावयाचें.

## ४२. अनादिनिधन

आदि म्हणजे आरंभ आणि निधन म्हणजे अंत. ज्याला आदि असतो, त्याला अंतहि असतो असें आपण सृष्टींत पाहतों. ज्या वस्तूला आदि आहे आणि अंत नाहीं, अशी एकहि वस्तु या सृष्टींत आपल्याला दाखवितां येईल का ? म्हणून या सृष्टीला मृत्युलोक असें ठीक च म्हटलें आहे. ही सारी सृष्टि आद्यन्तवंत आहे. ती स्वतः नाशवंत असून तिच्यांतील यच्चयावत् चराचर मृत्युग्रस्त आहेत. परंतु या सृष्टीचा आदि आणि अंत हे स्वतः मात्र अविनाशी आहेत. सृष्टीचा आरंभ होतो पण त्या आरंभाचा आरंभ होत नाहीं. सृष्टीचा अंत होतो परंतु अंताचा अंत होत नाहीं. सृष्टीचा हा जो अनादि आदि आणि अनंत अंत तोच परमेश्वर होय आणि म्हणून त्याला अनादिनिधन म्हटलें आहे. अनादिनिधन एकत्र म्हणण्यांतील हेतु हा कीं ज्याला आदि आहे त्याला अंतहि आहेच आणि ज्याला अंत आहे त्याला आदिहि आहेच, हें तत्त्व प्रकट व्हावें. आदि आणि अंत एकाच वस्तुचीं दोन टोकें आहेत. कोणतेंहि टोक धरा, दुसरें त्यांत गृहीतच आहे. एका तीराची अथवा नुसत्याच मुखाची वा उगमाची नदी तुम्हीं कधीं पाहिली आहे का ? नदीला तीर आहेत, उद्गम-संगम आहेत, परंतु समुद्राला हें कांहीच नाहीं. सृष्टि नदीवत् आहे. परमेश्वर समुद्रवत् आहे.

## ४३. धाता

धाता म्हणजे या विश्वाचें गर्भाधान करणारा परमेश्वर. मूल हें पित्याचें मानलें जातें. जो आधान करतो, त्याचें मानलें जातें. झाड बीजाचें मानलें जातें, भूमीचें नाहीं. म्हटलेंच आहे गीतेंत :

**मम योनिर् महद् ब्रह्म तस्मिन् गर्भं दधाम्यहम् ।**
**संभवः सर्वभूतानां ततो भवति भारत ॥**

अशा प्रकारें या सृष्टीची प्रकृति ही माता आणि परम पुरुष हा पिता म्हणजे धाता होय. पिता म्हणजे पालनकर्ता. हे पिते अनेक असूं शकतात. राजा हा प्रजेचा पिता म्हटला जातो. गुरुहि पिता होय आणि जनकहि पिता होय. परंतु या सर्व पित्यांत जो जन्महेतु असतो तोच धाता म्हणावयाचा. त्याला कालिदासानें "केवळ जन्महेतु" म्हणून गौणत्व दिलें. परंतु तोच मूळ आहे. आधीं जन्म होईल तेव्हांच मग पुढें त्या जीवाचें रक्षण भरण आणि विनयन होणार.

## ४४. विधाता

परमात्मा हा या विश्वाचा धाता आहेच. पण नुसताच धाता नाहीं, विधाताहि आहे तो. जीवांचें गर्भाधानच करीत नाहीं, त्यांचें विनयाधानहि करतो. त्यांना नुसतें जन्मच देत नाहीं. त्यांचें जन्म जेणेंकरून सफल होईल, तें रक्षण, भरण-पोषण आणि शिक्षणहि तो त्यांना देतो. त्या सर्व आवश्यक तत्त्वांची पुरवणी भरवणी तो करीत असतो. तो सकल-पुरुषार्थाची वासना, तत्पूर्त्यर्थ कर्मचोदना आणि तद्द्वारा विषय-विषयींचें तत्त्वतः ज्ञान देऊन निवृत्ति व निर्वृति यांचेंहि विधान करीत असतो. त्यामुळें तो विधाताहि म्हटला जातो. संसारांतील सामान्य लोकहि आपल्या अपत्याचें नुसतें आधान करून स्वस्थ बसत नाहींत. ते त्यांच्या सकल जीवनाचेंहि विधान करतात, तरतूद करतात. मग परमेश्वर असें विधान करायला कसा

चुकेल ? विधानाशिवाय नुसतें आधान दोषास्पद ठरतें म्हणून धाता आणि विधाता हीं जोड-नामें आलीं आहेत, असें समजावें.

### ४५. उत्तम धातु

धातुः उत्तमः हीं दोन पदें आहेत. ह्यांचा एक नाम म्हणून वा दोन नामें म्हणूनहि विचार होऊं शकेल. एक नाम म्हणून विचार संख्येच्या हिशोबानें करणें, कदाचित् आवश्यक असेल. तसें तें आवश्यक आहे हि आणि शिवाय संस्कृत भाषेच्या वा ग्रंथकाराच्या लकबी प्रमाणें नामापुढें त्याचें विशेषण घातलें आहे समजून हें एकच नाम मानणें योग्य. सामान्यतः विशेषण नामाच्या आधीं लावण्यांत येतें. परंतु नामाला च वस्तु-प्राधान्य आहे. विशेषण तदाश्रितच असतें. त्यामुळें तें मागाहून घेणें अर्थपूर्ण च म्हणावें लागेल. तेव्हां "उत्तमः धातुः" म्हणजे सर्वोत्तम धातु, विश्वाचें निरुपम उपादान, असें घेणें बरें. परमेश्वररूप चित्धातु हें विश्वाचें उपादान होय, ज्यापासून हा विचित्र विश्वालंकार घडवला आहे.

धातुः आणि उत्तमः हीं दोन नामें कल्पिल्यास संख्या-परिगणना बिघडेल वा वेगळी कल्पावी लागेल. म्हणून त्या कल्पाचा विचार करायचें कारण नाही.

### ४६. अप्रमेय

ज्ञान होणें म्हणजे ज्ञेय विषयाचें माप होणेंच होय. माप होणें म्हणजे सीमित होणें, परिमित होणें. जें सीमित आणि परिमित असतें तें सादि आणि सांत असतें. परमात्मा हा असा नाहीं. तो अप्रमेय आहे. ज्ञान-विषय म्हणून त्याचें ज्ञान होऊं शकत नाहीं. कारण तो ज्ञाता आहे. आपल्याला जें ज्ञान होतें तें दिक्काल आणि निमित्त यांनीं बद्ध अशा विषयांचेंच आणि त्याच मर्यादांच्या रूपांत होतें. वस्तु-स्वरूपाचें ज्ञान आपल्याला होत नाहीं. कारण ती वस्तु स्वतः ज्ञाताच असतो आणि म्हणून तो अप्रमेय म्हटला आहे.

परमात्मा अप्रमेय म्हणजे लौकिक प्रमाणांनीं मापला न जाणारा आहे, एवढाच अर्थ घ्यावयाचा. तो जर खरोखरच अज्ञेय असता तर, तो आहे असें तरी कसें म्हणतां आलें असतें? आणि ज्याअर्थीं, तो आहे असें म्हटलें जातें, त्याअर्थीं तो अज्ञेय कसा ? तेव्हां अज्ञेय वा अप्रमेय याचा अर्थ एवढाच कीं तो स्वानुभूतीलाच ज्ञेय आहे. अन्य प्रमाणांनीं ज्ञेय नाहीं, प्रमेय नाहीं. तो केवल स्वसंवेद्य आहे. स्वानुभव हेंच एकमेव त्याचें प्रमाण होय.

ज्ञान हें ज्ञातृ-ज्ञेयविभागात्मक आहे. अनुभव हा विगलित-वेद्यान्तर ज्ञप्तिरूप आहे. ज्ञान ही विभक्ति आहे, अनुभव ही भक्ति आहे. म्हणूनच म्हटलें आहे गीतेंत :

**भक्त्या त्वनन्यया शक्य अहमेवंविधोऽर्जुन ।**
**ज्ञातुं द्रष्टुं च तत्त्वेन प्रवेष्टुं च परंतप ।।**

### ४७. हृषीकेश

हृषीक म्हणजे इंद्रियें. इंद्रियांत मन हें आभ्यंतर इंद्रिय आणि बाह्य पंचेंद्रियें असा विभाग होतो. इष्ट विषयांच्या संनिकर्षानें इंद्रियें आणि मन हर्षित होतात. त्यामुळें त्यांना हृषीक म्हटलें आहे, पण जो हर्ष पावतो, तो खेदहि पावतोच. हा इंद्रियांचा स्वभावच आहे. म्हणूनच गीतेंत म्हटलें आहे :

**इन्द्रियस्येन्द्रियस्यार्थे रागद्वेषौ व्यवस्थितौ ।**
**तयोर् न वशमागच्छेत्, तौ ह्यस्य परिपन्थिनौ ।।**

अशा या इन्द्रियांवर जो स्वामित्व, प्रभुत्व करतो, तो हृषीकेश होय. या जगांत खरोखर हृषीकेश कोण

आहे ? कोण आपल्या इन्द्रियांवर व मनावर पूर्ण स्वामित्व मिळवूं शकला आहे ? कोणाचीं इन्द्रियें आणि मन पूर्ण स्वाधीन आहेत ? सर्व देहधारी जीव इन्द्रियांच्या आणि मनाच्या अधीन होऊन जगत आहेत. एक परमात्माच इन्द्रियांचा व मनाचा स्वामी आहे. म्हणून तोच एकमेव हृषीकेश आहे. गीतेंत स्थितप्रज्ञाच्या लक्षणांत "वशे हि यस्येन्द्रियाणि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता" हा मुद्दा वारंवार आला आहे. घोळून घोळून प्रतिपादिला आहे. हृषीकेशच स्थितप्रज्ञ होऊं शकतो. म्हणून हृषीकेश हें भगवंताचें आगळें आणि आवडतें नांव आहे. गुडाकेश आणि हृषीकेश हीं दोन आगळीं नामें गीतेंत आणि अन्यत्रहि आलीं आहेत. पैकीं गुडाकेश म्हणजे जित-निद्र आणि हृषीकेश म्हणजे जितेन्द्रिय. दोन्ही मिळून रजस्तमांचा पगडा आपल्यावर बसूं न देणारा नित्य-जागृत आत्मवान् पुरुष असा अर्थ निष्पन्न होतो.

## ४८. पद्मनाभ

आमचे पूर्वज ऋषि-मुनि कवि म्हणजे क्रान्तदर्शी होते. त्यांनीं तें आपलें क्रांतदर्शन आपल्या शब्दांत व कृतींत सूचित केलें आहे, ग्रथित केलें आहे. ज्ञानदेवांनीं "वाचे बरवें कवित्व। कवित्वीं बरवें रसिकत्व। रसिकत्वीं परतत्त्व। स्पर्श जैसा॥" ह्या ओवींत ज्या परतत्त्वाचा उल्लेख केला आहे तें परतत्त्व त्यांच्या जीवनांत भरून राहिलें होतें आणि म्हणून त्याचा स्पर्श, त्याचा ठसा ते जें चिंतीत, बोलत वा करीत त्यावर उमटे. "पद्मनाभ" सारखे शब्द त्याचें उदाहरण होत.

कमलकंद हा जलाशयाच्या तळाशीं अदृश्य असतो, त्यांतून कमलनाल उगवून वर येते आणि त्यावर कमल फुलतें. त्याप्रमाणें अव्यक्ताच्या तळाशीं तदाधारभूत सुगुप्त अक्षर परमात्म्यापासून हें व्यक्त लोकपद्म उत्पन्न झालें आहे. म्हणून त्या परमात्म्याला पद्मनाभ म्हटलें आहे. ह्या लोकपद्मांतून जो त्यावर विराजमान तो पद्मसंभव (ब्रह्मा) म्हणून प्रसिद्ध आहे. तोच या व्यक्त विश्वाचा अधिष्ठाता होय. त्याच्याचपासून ही सारी चराचर सृष्टि निर्माण झाली. म्हणून या सर्गाला ब्राह्म सर्ग असें म्हणतात. ह्या सर्गांत स्वतः ब्रह्मदेवाचा समावेश होत नाहीं, म्हणून तो स्वयंभू म्हटला गेला आहे. पद्मनाभ, पद्म, पद्मसंभव आणि पाद्म सर्ग इत्यादि प्रयोग हे एका तत्त्वदर्शनाचें निदर्शन होय. अशा तत्त्वदर्शी कवींनाच "पदवी" म्हणून वेदांनीं गौरविलें आहे. त्यांनींच देवाचीं नाना ध्यानें तत्त्वार्थ लक्षून कल्पिलीं आहेत.

## ४९. अमर-प्रभु

अमर म्हणजे मृत्युरहित असे देव. देवांना मृत्यु कां नाहीं ? कारण ते सद्रूप आहेत. सन्-निष्ठ आहेत. जो सद्रूप झाला, सन्निष्ठ झाला, तो मृत्यूंतून सुटला. अंधार हा अभावरूप आहे, असद्रूप आहे. अंधार म्हणून कांहीं वस्तु नाहीं. तो एक वस्तुशून्य विकल्प आहे. अंधार म्हणजे अप्रकाश. प्रकाशाची अल्पता वा शून्यता म्हणजेच अंधार. जी वस्तु नाहीं ती कशी प्रकाशणार, प्रकटणार ? देव प्रकाशमान आहेत. कारण ते सद्रूप आहेत. असुर मायावी आणि अदृश्य आहेत. कारण ते असद्रूप आहेत.

सत्य हें परमेश्वर होय. त्याचे नाना आविष्कार म्हणजे अंश, देव होत. अंशांचा स्वामी तो अंशी. ज्याअर्थी परमेश्वर हा अंशी आहे त्याअर्थी तो अंशरूप सर्व देवांचा–सर्व विभूतींचा आणि अवतारांचा प्रभु म्हटला आहे. जो प्रभु असतो, तो आपल्या इच्छेप्रमाणें आपल्या अधीनांकडून हवें तसें काम घेतो. परमेश्वरहि त्याप्रमाणें आपल्या किरणांना केव्हां पसरतो, केव्हां गुंडाळून घेतो. तो आपले किरण पसरतो तेव्हां सर्ग होतो. किरण गुंडाळून घेतो तेव्हां प्रलय होतो. ईश्वराचें हें प्रभुत्व जे ओळखतात ते भक्त "सर्गेऽपि नोपजायन्ते प्रलये न व्यथन्ति च" "जगें येवोत जावोत ते अभंग जसे तसे।" अर्थात् अमरप्रभूची–सद्रूपाची जे भक्ति करतात तेच अमर होतात.

## ५०. विश्वकर्मा

मनुष्याची ओळख त्याचें नाम, रूप, गुण आणि कर्म ह्यांवरून होत असते. परमेश्वराचीहि ओळख आम्हांला त्याच्या नाम-रूप-गुण-कर्मावरूनच होणार. परमेश्वराचें कर्म कोणतें ? कर्मातच त्याचे गुणहि प्रकट होत असतात. त्यावरूनच आपल्याला त्याचा परिचय व्हावयाचा. परमेश्वराचें कर्म लहान सहान नसणारच. हें सारें विश्व, ज्याचा थांगपत्ता अद्याप कोणाला लागलेला नाहीं असें हें आश्चर्यमय विश्व, परमेश्वराची कृति आहे. त्यावरूनच त्याचें ज्ञान, त्याचें सामर्थ्य आणि त्याचें असंगत्व इत्यादि गुण आपण ओळखायला लागतों. त्याच्या त्या कर्मावरून आणि त्यांत प्रकटलेल्या त्याच्या गुणाधिगुणांवरून आपण त्याचें नामकरण करतों आणि त्याच्या रूपाचीहि कल्पना करतों आणि विनम्र होऊन म्हणतों

**नमोऽस्त्वनन्ताय सहस्रमूर्तये**
**सहस्रपादाक्षिशिरोरुबाहवे ।**
**सहस्रनाम्ने पुरुषाय शाश्वते**
**सहस्रकोटीयुगधारिणे नमः ॥**

आणि असें म्हणून परत विनम्र होतों.

विश्वकर्मा म्हणजे हें सारें विश्व ज्याचें कर्म आहे तो. त्याच प्रमाणें विश्व म्हणजे सर्व कांहीं ज्यांचें कर्म आहे तो असाहि अर्थ घ्यावयाचा.

या विश्वांत आणि याच्या बाहेर जें कांहीं होतें तें सारें तोच करतो. कारण, तोच एक कर्ता आहे आणि बाकीचें सारें कार्य आहे.

## ५१. मनु

मनु म्हणजे मनन करणारा. आपण निर्माण केलेलें हें चराचर विश्व पाहून त्याचें जीवन कृतार्थ कसें होईल, याचें मनन चिंतन करणारा तो मनु. लोककल्याणाचें मनन करून लोकांना त्यानें आदेश दिला : "मां विजानीहि । एतदेव अहं मनुष्याय हिततमं मन्ये ।" हाच वेद. यांतूनच सारे विधिनिषेध निर्माण झाले. सारीं शास्त्रें आणि वर्णाश्रमादि धर्म यांतूनच निर्माण झाले. हें फार फार प्राचीन काळीं होऊन गेलें. त्याची जी स्मृति उरली आणि प्रमादशील मानवानें ती जी आपल्या मोडक्या तोडक्या भाषेंत ग्रथित केली, तीच आज उपलब्ध असलेली मनुस्मृति म्हणावयाची.

ब्रह्मा, प्रजापति, मनु इत्यादि जे पदाधिकारी आहेत, ते सारे आपण वेगवेगळे मानतों. परंतु हीं सारीं भगवद्रूपें आणि भगवन्नामेंच होत. भगवंतच विश्वरूप कर्माच्या संपादनासाठीं विविध अहंकार, विविध उपकरणें, विविध क्रिया होऊन आपली कर्मसिद्धि आणि समृद्धि संपादित आहे. हाच त्याचा विभूतियोग होय.

## ५२. त्वष्टा

त्वष्टा म्हणजे तासणारा. सुतार तासून तासून नाना बाहुल्या बनवतो. एकीला राजा, एकीला रंक, एकीला विद्वान्, एकीला मूर्ख, एकीला स्त्री, एकीला पुरुष अशीं विविध रूपें आणि नामें तो देतो. त्या प्रमाणें परमेश्वरानें हें वैचित्र्यपूर्ण विश्व रचिलें आहे, या वैचित्र्यपूर्ण विश्वांत वैचित्र्य वस्तुतः नामरूपांचेंच आहे. सर्वांचें उपादान आणि निमित्त कारण एकच आहे, परमात्माच आहे. एकाच शिलोच्चयांतून शिल्पकार ज्याप्रमाणें नाना आकार टाकीच्या योगें निर्माण करतो त्याप्रमाणें परमेश्वरानें हें विश्व निर्माण केलें आहे. संकल्प ही त्याची टांकी आहे आणि नाम-रूपात्मक हें जगत् त्याची अद्भुत शिल्पाकृति आहे.

कलाकार आपली कलाकृति चिरंतन व्हावी म्हणून कलेचें माध्यम स्थायी स्वरूपाचें निवडतो. कागद, लाकूड, माती, दगड, धातु हीं उत्तरोत्तर स्थायी अशीं माध्यमें आहेत. त्यांतून तयार केलेल्या कलाकृति या न्यूनाधिक स्थायी स्वरूपाच्या होतात. परंतु परमेश्वरानें हें विश्व ज्या माध्यमांत तयार केलें आहे

तें माध्यम स्वतः ईश्वरच असल्यामुळें ही ईश्वरी कलाकृति सनातन झाली आहे. परमेश्वराच्या ज्ञानाला, कलेला, सामर्थ्याला तुलना नसल्यामुळें त्याची कलाकृतिहि तशीच अनुपम उतरली आहे. अनन्वयालंकाराचें तें भव्य दिव्य उदाहरणच होय.

### ५३. स्थविष्ठ

स्थविष्ठ म्हणजे अत्यन्त स्थूल. परमेश्वराहून अधिक विशाल, लांब, रुंद, उंच दुसरें काय आहे ? हें सर्वाश्चर्यमय विश्व, ज्याचा थांगपत्ता अद्याप कोणाला लागलेला नाहीं, तेंच ज्याचें रूप आहे, देह आहे, त्याच्या स्थूलतेशीं दुसऱ्या कशाची तुलना करतां येईल ? ''महतो महीयान्'' मोठमोठ्यांहूनहि तें मोठें आहे. आकाश सर्वांत मोठें दिसतें, पण अशा आकाशाचा विस्तार ज्याच्या एका कोपऱ्यांत बसतो तें किती मोठें म्हणावें ? विश्वाहून स्थूल दुसरें काय म्हणतां येईल ?

स्थविष्ठ पदानें विश्वाची दिग्रूप विशालता दाखविली. खालीं वर, आजूबाजूस कुठेंहि पहा, त्याचा विस्तार अनंत आहे. खोल पाहूं लागला तर त्याहि दिशेनें त्याची अनंतता आश्चर्यमय आहे असें दिसून येईल.

### ५४-अ. स्थविर (स्थविर ध्रुव)

परमेश्वराचें हें विश्वरूप देशतः अनंत आहे, तसेंच तें कालतः हि अनंत आहे. वर्तमान क्षणाच्या मागें पुढें पाहूं लागल्यास भूतकाळाचा आणि भविष्यकाळाचा विस्तार अनंतच आढळून येतो. या कालौघाचा आदि आणि अंत लागत नाहीं म्हणून परमेश्वराला स्थविर म्हणजे अत्यंत वृद्ध म्हटलें आहे. परमेश्वराहून अधिक पुरातन कोण आहे ? ज्या ग्रह-गोलांच्या गतीवरून आपण कालगणना करतों ते ग्रह-गोल ज्यानें निर्माण केले आहेत, त्याच्या आयुष्याची गणना कोण कशी करणार ? ज्या चंद्र-सूर्यांच्या गतींवरून आम्ही वर्ष-मास गणना करतों, ते चंद्र-सूर्य किती वेळां उत्पन्न झाले आणि निमाले त्याची गणति नाहीं. प्रत्येक कल्पाच्या आरंभीं परमेश्वर चंद्र-सूर्य पूर्ववत् निर्माण करतो असें वेदांनीं म्हटलें आहे ''सूर्याचन्द्रमसौ धाता यथापूर्वमकल्पयत् ।''

परमेश्वराचें विश्वरूप हें अशा प्रकारें स्थविष्ठ आणि स्थविर आहे. देशतः आणि कालतः तें अनंतच आहे. अनंताचें सारेच अनंत! ही अनंत अनंतता सर्वांशीं दाखविणें अशक्यच. म्हणून स्थविष्ठ आणि स्थविर या दोन पदांनीं ती केवळ दिग्दर्शित केली आहे.

### ५४-ब. ध्रुव (स्थविर ध्रुव)

ध्रुव म्हणजे स्थिर, अचल. प्रतिक्षणीं बदलणाऱ्या, परिवर्तन पावणाऱ्या इथें या विश्वांत सारें अस्थिर आणि चंचलच दिसून येतें. ज्याला ध्रुव म्हणतात तो ध्रुवमत्स्याच्या पुच्छांतील ताराहि अभिजित् नक्षत्राकडे चळत आहे, असें ज्योतिर्विद् म्हणतात. तात्पर्य, ज्यांतील ध्रुवहि अध्रुव आहे असें हें अध्रुव विश्व आहे. पण चंचल आणि अस्थिर हें, जें तसें नाहीं, त्या स्थिर आणि अचलप्रतिष्ठ वस्तूची सूचना करून नाश पावत असतें. ती सूचना मात्र आपण घेतली पाहिजे. स्थलाची वा कालाची सर्व गति कुठल्यातरी स्थिर तत्त्वाच्या आधारेंच होऊं शकते. तें जें सर्व गतीचें आधारभूत निरपेक्ष स्थिर तत्त्व तेंच ध्रुव होय.

स्थविष्ठ, स्थविर आणि ध्रुव या नामत्रयानें परमेश्वर हा सर्वदिग्व्यापी, सर्वकालव्यापी परंतु त्या दिक्कालांनीं अपरिच्छिन्न असा सर्वाधारभूत कूटस्थ-स्वरूप आहे हें सुचविलें.

### ५५. अग्राह्य

अग्राह्य म्हणजे इन्द्रियादिकांनीं ज्याचें ग्रहण होऊं शकत नाहीं असा परमात्मा अतीन्द्रिय असला तरी

तो बुद्धिग्राह्य आहे. बुद्धिग्राह्य जर तो नसेल तर त्याचें भान आणि ज्ञान माणसाला कसें होईल? म्हणून गीतेनें स्पष्टच म्हटलें आहे "बुद्धिग्राह्यम् अतीन्द्रियम्" ऐरणींत घुसून बसलेला हिरा हिरकणीनेंच काढावा लागतो, त्याप्रमाणें आत्मतत्त्वाचें आकलनहि आत्मबुद्धीनेंच होऊं शकतें. याचा अर्थ असा झाला कीं 'स्व' चें ज्ञान स्वतःच होऊं शकतें, परतः नव्हे; आणि म्हणून अग्राह्य म्हणजे 'स्व' तः ग्राह्य, 'पर' तः अग्राह्य असा अर्थ समजावयाचा.

सारें ज्ञान ज्ञातृज्ञेय-विभागानेंच होत असल्यामुळें आणि ज्ञाता स्वतःच ज्ञेय असल्यामुळें त्याचें ज्ञान कसें व्हावयाचें? त्याचें ग्रहण कसें व्हावयाचें ? अविभाज्य तत्त्वाचें विभाजन कसें व्हावयाचें? आणि ज्याअर्थी विभाजन होऊं शकत नाहीं त्याअर्थी त्याचें ग्रहणहि होऊं शकत नाहीं असेंच म्हटलें पाहिजे. म्हणून परमात्मा हा खरोखर अग्राह्यच म्हणावा लागतो. ह्याच दृष्टीनें उपनिषदांनीं " हेतुमत् आणि सुनिश्चित" पदांनीं वारंवार प्रतिपादिलें आहे

"विज्ञातारं अरे केन विजानीयात् ।"

### ५६. शाश्वत

जें काल होतें, तें आज आहे, उद्यां राहणार आहे आणि केवळ उद्यांच नव्हे तर उद्यांच्याहि उद्यां राहणार आहे, तें शाश्वत होय. परमात्मा हा तसा आहे. अठ्ठावीस युगें लोटलीं तरी तो आपला उभाच आहे. वर्तमान क्षण आम्हांला प्रत्यक्ष आहे. त्याचें एक टोंक म्हणजे भूतकाळ आणि दुसरें टोंक म्हणजे भविष्यकाळ होय. जो वर्तमानाला गमावतो तो भूत आणि भविष्य दोहोंचाहि निकाल लावतो. वर्तमान नसणें म्हणजे अस्तित्वच नसणें, ज्याला अस्तित्व नाहीं त्याला भूतकाळ कुठला आणि भविष्यकाळ तरी कसा असणार? तो कालपुरुषाच्या कृपेला पारखा, कर्मफलापासून वंचित राहतो आणि शाश्वत ज्ञानफलापासूनहि वंचित राहतो. कारण नित्यानित्यविवेकाचा विनियोग तो जाणत नाहीं. समर्थांनीं ठीकच म्हटलें आहे :

**जो चंचलासि भजेल । तो सहजचि चळेल**
**जो निश्चळा भजेल । तो निश्चळ चि ॥**

तसेंच याविषयीं पुढील सुभाषितहि प्रसिद्धच आहे.

**यो ध्रुवाणि परित्यज्य अध्रुवं परिषेवते ।**
**ध्रुवाणि तस्य नश्यन्ति अध्रुवं नष्टमेव च ॥**

### ५७. कृष्ण

कृष्ण म्हणजे कर्षणशील. परमात्मा सर्वान्तर्यामि-रूपानें या विश्वाला आपल्याकडे खेंचून राहिला आहे. केन्द्रभूत अंशी परिधिगत अंशांना आपल्या धारणाशक्तीनें, आपल्या आकर्षणबळानें खेंचून धरीत असतो. परमात्मा " भुवनस्य नाभिः" आहे, त्याच्यांत "अरा इव रथनाभौ" हें सारें विश्व आहित आहे.

कृष्ण म्हणजे कर्षणशील कृषीवल. तोहि शेत कसून अन्न पिकवतो आणि "शितें तिथें भुतें" या न्यायानें साऱ्या जगाला आपल्याकडे पोषक रश्मींनीं खेंचीत असतो.

जो शेत कसतो तो फिक्कट राहत नाहीं, त्याची चामडी रापून निघते. म्हणून तो कृष्ण म्हणजे काळा coloured, tanned.

### ५८. लोहिताक्ष

लोहित म्हणजे रक्त, लाल. लोहिताक्ष म्हणजे रक्त-नेत्र. रक्त ही जीवनाची खूण आहे. जीवन ओसरूं लागलें, म्हातारपण आलें, रोगानें ग्रासलें म्हणजे शरीरांतील रक्त कमी होतें आणि शरीर फिक्कट, निस्तेज होऊन त्याला मृतकळा येते. शरीरांतील ही रक्ती नखावरून आणि डोळ्यांवरून चटकन पारखली जाते. डोळा दुरूनच दिसतो. त्याच्या तेजावरून माणसाचें तेज, त्याचें तारुण्य, त्याचें आरोग्य, त्याचें

बुद्धिमत्त्व चटकन डोळ्यांत भरतें. म्हणून नेत्र हा सर्वेन्द्रियांत नेता बनला आहे.

नेत्र शब्दाचा मुळीं नेतृत्वशाली असा धात्वर्थच आहे. अक्षिन् शब्द निराळ्या धातूपासून आलेला आहे. अक्ष आणि अक्षिन् दोन्ही शब्द एकाच अक्ष् धातूपासून आलेले आहेत. अक्ष म्हणजे आस जसा आपल्या आवणांत फिरत असतो तसा डोळाहि आपल्या कोंदणांत सारखा डोलत असतो. म्हणूनच त्याला अक्षिन् म्हणजे भरभरा फिरणारा, डोलणारा म्हटलें आहे.

ज्याचे अक्षि म्हणजे डोळे लाल आहेत तो लोहिताक्ष मुसमुसणाऱ्या तारुण्याचा पुतळा होय. ज्याला जरा आणि मृत्यु शिवत नाहीं, त्याहून अधिक तरुण कोण? आणि त्याच्या डोळ्यांहून अधिक तेजस्वी सुंदर डोळा दुसऱ्या कोणाचा असणार? म्हणून परमात्मा हा लोहिताक्ष म्हटला आहे, तारुण्य हा आयुष्याचा सर्वोत्तम काळ होय. बाल्य आणि वार्धक्य दोन्ही काळांत जीवनाचें शिखर दूरच राहतें. बाल्य आरोह आहे तर वार्धक्य अवरोह आहे. तारुण्य शिखर आहे आणि त्याचें प्रतीक आहे लोहित. ''पांढरे डोळे होणें म्हणजे मृतच होणें होय''.

लोहित म्हणजे रक्त वर्ण, आरोग्य आणि सौंदर्य यांचें प्रतीक आहे. त्यामुळें वैदिक ऋषि प्रार्थना करीत 'पुत्रो मे श्यामो लोहिताक्षो जायेत'. इथेंहि कृष्ण लोहिताक्ष ही दोन नामें जोडूनच आलीं आहेत. भारतीयांच्या मतें आरक्त नेत्र श्यामल तनू ही मधुराकृति होय. युरोप म्हणजे सुरूप म्हटलेल्या लोकांच्याहि मतें श्यामलताच आरोग्याचें व सौंदर्याचें चिन्ह होय. म्हणून युरोपीय लोक ऊन खाऊन आपला वर्ण रापवून घेण्यासाठीं धडपडत असतात.

## ५९. प्रतर्दन

प्रतर्दन म्हणजे संहार करणारा. जादुगार आपली जादूची पोतडी उघडून अद्‌भुत खेळ करून दाखवितो आणि शेवटीं तो सर्व खेळ आटोपून परत आपल्या पोतडींत सर्व साहित्य गोळा करतो. या गोळा करण्यालाच संहार म्हणतात. संहार म्हणजे हिंसा नव्हे. विश्वरूप पटाची तें घडी करून ठेवणें आहे. घडी उलगडणें, उलगडून ठेवणें आणि परत ती घालणें या त्रिविध क्रियेला ईश्वराची लीला म्हणावयाचें. तींत ईश्वर कुठेंहि आपलें स्वातंत्र्य गमवीत नाही. विकाराधीन होऊन तो कोठल्याहि कर्मांत प्रवृत्त होत नाहीं.

कौषीतकि उपनिषदांत इंद्रप्रतर्दन-संवाद आला आहे. त्यांत परमात्मा इंद्र, भक्त प्रतर्दनाला वरदान देतो. भक्त म्हणतो, तूंच माझ्यासाठीं वर वर. देव म्हणतो वर ज्याचा त्यानें वरायचा असतो, दुसऱ्यानें नव्हे. त्यावर भक्त म्हणतो, आम्हां जीवांना तुझ्या मतें जें सर्वांत हितकर असेल तें दे. आणि मग देव हार खाऊन भक्तांसाठीं स्वतःच वर वरतो. ''मां विजानीहि । एतदेव अहं मनुष्याय हिततमं मन्ये ।'' असें इंद्र म्हणतो आणि प्रतर्दन तोष पावतो. देव- प्रतर्दनाबरोबर भक्त-प्रतर्दनाची ही कहाणी मला आठवते. भक्ताच्या स्मरणाशिवाय देवाचें स्मरण पूर्ण होत नाहीं. म्हणून हें स्मरण. भक्त-प्रतर्दनानें आपल्या अहंतेचा संहार केला आहे. ह्या आख्यायिकेंत त्यामुळें देवभक्तांचें अद्वैत झालें आहे. देवहि प्रतर्दन आणि भक्तहि प्रतर्दन.

## ६०. प्रभूत

प्रभूत म्हणजे विपुल. बीज हें एकटें एक असतें. तें जेव्हां रुजून शाखापल्लवांनीं आणि फुलांफळांनीं विस्तार पावतें तेव्हां तें प्रभूत होतें, विपुल होतें. ईश्वरहि त्याप्रमाणें या विश्वाच्या रूपानें प्रभूत झाला आहे. बीज जर प्रभव आणि प्ररोह पावलें नाहीं, तर तें प्रभूत होत नाहीं. जें प्रभूत नाहीं अल्प आहे, त्यांत सुख नाहीं. ''नाल्पे सुखमस्ति'' ''एकाकी न रमते'' इत्यादि उपनिषद्-वचनांत हाच आशय व्यक्त झाला आहे. जें दिसतें आहे तें नाशवंत आहे.

म्हणून या विश्वाचें मूळ कारण विश्वाहून भिन्न कल्पिलें जातें आणि तें ब्रह्म या शब्दानें निर्देशिलें आहे. तें जें ह्या विश्वाचें बीज तें स्वस्थ न राहतां विश्वाकार कां पावलें ? याची मीमांसा अनेकांनीं अनेक प्रकारें केली आहे. त्यांतील एक पक्ष हा ''एकाकी न रमते'' चा आहे आणि एकाकी ब्रह्म एकाकी रमूं न शकल्यामुळेंच त्यानें हा विश्वाकार धारण केला आहे. आणि अशा प्रकारें तें अभूत ब्रह्म प्रभूत झालें आहे.

एकाकी जीवनाच्या कंटाळ्यांतून मुक्त होण्यासाठीं जीवाची सर्व धडपड चालली आहे. त्यांतूनच कुटुंब, समाज आणि राष्ट्रें व राष्ट्रसंघ निर्माण झाले आहेत. कार्यांत प्रकट होणारे गुण कारणांत शोधावे लागतात. कारण '' जें कार्य तें धरिल कीं गुण कारणाचे.'' त्याप्रमाणें शोध केला असतां ब्रह्मांतच या प्रवृत्तीचें मूळ आढळून येतें. आनंद हा ब्रह्माचा स्वभावच आहे. त्यासाठींच तें प्रभूत झालें आहे. आत्माविष्कार करून तें रमत आहे.

## ६१. त्रिककुब्धाम

त्रि-ककुब्-धाम म्हणजे तीन दिशांना आधारभूत असलेला. दिशा चार, आठ, वा दहा प्रसिद्ध आहेत. पण तीन दिशा कोणत्या? अधर, ऊर्ध्व आणि मध्य या तीन दिशांना वा स्थानांनाच तीन दिशा म्हणतां येईल. अथवा लांबी, रुंदी आणि उंची हीं जीं तीन परिमाणें त्याच तीन दिशा म्हणाव्या. परमात्मा म्हणजे मूल वस्तु. त्यांत सर्व परिमाणें आहेत. त्या परिमाणांत वस्तु नाहीं. म्हणून परमात्मा हा त्रिककुब्धाम म्हणावयाचा. धर्मीच्या ठायीं धर्म असतात, धर्मांत धर्मी नसतो. धर्म धर्मिपरतंत्र आहेत. धर्मी स्वतंत्र आहे.

''त्रि-कुकद्-धाम'' अथवा ''त्रिककुभ्''व ''धाम'' असे हि पाठभेद होतात. पण त्रिककुब्धाम हाच पाठ बरा.

## ६२. पवित्र

पवित्र म्हणजे पावन करणारें. दोष, पाप आणि अज्ञान दूर करणारें तत्त्व. सर्व दोष आणि सर्व पापें यांचें मूळ अज्ञान मानिलें आहे. अज्ञान म्हणजे वस्तु-स्वरूपाचें तत्त्वत: अनाकलन. समोर पडलेली वस्तु साप नसून दोरी आहे. असें नि:संशय ज्ञान जोंपर्यंत होत नाहीं तोंपर्यंत मनुष्य भयभीत होऊन वेड्यासारखा वागूं लागतो. तो पळत सुटतो, घाबरतो आणि घाबरवतो अथवा काठी घेऊन त्या दोरीलाच धोपटीत बसतो. तसें करतांना इतरांनाहि आणि स्वत:लाहि तो अपाय करून घेत असतो. हें सर्व अज्ञानजन्य कर्म आहे. यथार्थ ज्ञानाबरोबर हा साराच खटाटोप गळून पडतो आणि मनुष्य स्वस्थ राहतो. न भितां न गांगरतां जें काय कर्तव्य असेल तें तो स्वस्थपणें, स्वाधीनपणें करून मोकळा होतो. म्हणून म्हटलें आहे ''न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते'' दोषांतून आणि पापांतून मुक्त करणारें ज्ञानासारखें दुसरें कांहीं नाहींच आणि परमात्म्याच्या ठायींच लेशमात्रहि दोष नसल्यामुळें आणि सर्व सद्गुण असल्यामुळें तो परमात्माच तें ज्ञान आहे. म्हणून तोच एकमेव पवित्र म्हणावयाचा. जगांतील कोणत्याहि वस्तूच्या ठायीं वा व्यक्तीच्या ठायीं परमेश्वरी केवल पवित्रत्व कल्पितां येत नाहीं. अर्थात् व्यक्तिमात्र सदोष आहे. निर्दोष केवळ एक परमात्माच आहे, आणि म्हणून तोच पवित्र.

## ६३. पर मंगल

जो पवित्र तोच मंगल. ज्याच्या ठिकाणीं लेशमात्रहि अमंगल नाहीं, मल, दोष, अज्ञान नाहीं, तोच परम मंगल म्हणावयाचा. पवित्र आणि मंगल हे दोन शब्द जोडीनें आले आहेत. ते दोन्ही समानार्थकच असतील तर दोन हवेच कशाला? दोन शब्द ज्या अर्थीं वापरले आहेत त्या अर्थीं त्यांत कांहीं वेगळें आणि विशिष्ट सांगावयाचें आहे हें उघड आहे. पवित्र शब्दानें परमात्मा हा सर्व दोषरहित आहे असें

सुचविलें तर मंगल शब्दानें तो सर्व शुभ गुणांनीं युक्त आहे असें सुचवायचें आहे. एक निषेधक लक्षण आहे. दुसरें विधायक आहे.

परमेश्वराचें सारें कांहीं मंगल आहे. त्याचें नाम मंगल आहे. त्याचें रूप मंगल आहे. त्याचे गुण मंगल आहेत. त्याचें कर्म मंगल आहे. त्याचें ध्यान मंगल आहे. त्याचें कीर्तन मंगल आहे. त्याची सेवा मंगल आहे. सारांश कोणत्याहि विधेनें परमेश्वराशीं आपला संबंध जोडणें मंगल आहे. त्रिविधा म्हणा किंवा नवविधा म्हणा, परमेश्वराची भक्ति मंगल आहे. परमेश्वराची विभक्ति म्हणजे परमेश्वराचें विस्मरण हेंच अमंगल आहे. किंबहुना अमंगलाचें मूळ आहे. तुलसीदासांनीं म्हटलें आहे:

**बहु रोग वियोगन्हि लोग हये।**
**भवदंघ्रिनिरादर के फल ये।**
**अति दीन मलीन दु:खी नितही।**
**जिनके पदपंकज प्रीति नहीं।**

सुखांत सुखकर्ता म्हणून आणि दु:खांत दु:खहर्ता म्हणून परमेश्वराचें स्मरण करावें. सुख-दु:खांचा हाच लाभ. हाच विनियोग. हीच भक्ति, हेंच ज्ञान, हेंच धर्मकर्म.

### ६४. ईशान

ईश्, ईश आणि ईशान हे तीन शब्द एकाच धातूपासून आलेले आहेत. तिन्ही ईश्वरवाचकच आहेत. ईश शब्द विपुल आढळतो. ईश् आणि ईशान हे शब्द त्या मानानें तुरळक आहेत. ईश् हा हलन्त शब्द ईश्वर शब्दांत आणि संस्कृतांत स्वतंत्रपणें तर ईशान शब्द ईशान्य शब्दांत आणि संस्कृतांत स्वतंत्रपणें येतो. ईशान म्हणजे ईशनशील. चराचरांचा अन्तर्यामी म्हणून ईश्वराची सत्ता सर्वत्र आणि सर्वदा गाजते आहे. त्याच्या सत्तेनें सर्वांना अस्तित्व आहे, जीवन आहे आणि त्यानें जे वस्तुमात्राला गुणधर्म दिले आहेत त्यांच्या बाहेर ते जाऊं शकत नाहींत. अशा दुहेरी प्रकारें त्याची सत्ता या जगांत चालली आहे. ती ओळखून जे वागतात ते भक्त होत, ज्ञानी होत. ''प्रकृतीसारिखें चालावें। परी अंतरीं शाश्वत ओळखावें।'' या वचनांत समर्थांनीं हें रहस्य,भक्तीचें आणि ज्ञानाचें सांगितलें आहे. ईश्वर जें ईशन करतो तें तो पशुपालाप्रमाणें वा राजाप्रमाणें हातीं दण्ड घेऊन करीत नाहीं. तो तें जगदंतर्यामिरूप आपल्या मायेनें करीत असतो. सर्व जीव आणि जगत् ईश्वरी मायेच्या अधीन आहे. ईश्वर त्या मायेचा स्वामी आहे. सर्व विश्व ईश्वरपरतंत्र आहे, एक ईश्वर च स्वतंत्र आहे. म्हणून तोच एक ईशान, इतर सारे ईशित.

### ६५. प्राणद

प्राणनाशिवाय कोणी प्राणी जगूं शकत नाहीं. वृक्ष वनस्पति हि नाहीं. मृत् पाषाण हि प्राणजीवी आहेत, असें म्हणतां येईल. जिथें म्हणून चयापचय आहे, तिथें प्राणक्रिया आहे, आणि चयापचय सृष्टीचा धर्म आहे. असा एकहि सृष्ट पदार्थ नाहीं कीं जो चयापचयांतून मुक्त आहे. म्हणून हे सर्व चराचर पदार्थ प्राणी आहेत असें म्हटलें पाहिजे. या सर्वांना ही प्राणशक्ति कोण देतो? जो ही शक्ति देतो तो एक परमेश्वरच प्राणद आहे. प्राणापान करण्याची क्षमता नसेल, तर जगांत सारा प्राण भरलेला असून हि त्याचा कांहीं एक उपभोग घेतां यावयाचा नाहीं. प्राणशक्तिशून्य निष्प्राण होईल, निर्जीव मढें होईल.

प्राणद पद सहस्रांत चारदां आलें आहे. तें त्याचें चौपट महत्त्व सांगतें. प्राण शब्द (१) सत्ता (२) शक्ति (३) अन्न आणि (४) जीवन अशा चतुर्विध अर्थानें आलेला आहे. पूर्वपूर्व उत्तरोत्तराचें कारण आहे. उत्तरोत्तर पूर्वपूर्वाचें कार्य आहे.

### ६६. प्राण

प्राण म्हणजे काय? प्राण म्हणजे जीवनसूत्र. त्याच्या इशाऱ्यानें जीवाचें सारें जीवन चालतें. तो सर्व क्रियांचें कारण आहे. सर्व क्रिया अन आहेत, हा

प्राण प्र + अन आहे. जनन, मरण, अशन, पान, स्थान, उत्थान, पतन, गमन, आगमन इत्यादि सर्व अन होत, क्रिया होत. प्राण त्या सर्वांचें कारण आहे. म्हणून तो प्राण. ''को वा अन्यात्, क: प्राण्यात् यद् एष आकाश आनन्दो न स्यात्'' (तै. २.७) या वचनांत उपनिषदांनीं अन् आणि प्र + अन् हे दोन धातु वापरले आहेत. त्यांत अन म्हणजे सर्व व्यापार आणि प्राण म्हणजे तदाधारभूत त्याचें कारण असें जीवन होय. परमेश्वरच सर्वाधार आहे. सर्व क्रियांचें अधिष्ठान आहे, चालक आहे म्हणून तो प्राण म्हटला आहे. ''प्राण: प्रजानां उदयत्येष सूर्य:'' (मै. ६.८) ''या वचनांत प्राण शब्द चालक या अर्थीं आला आहे. इथें हि तोच भाव आहे.''

प्राण पद तीनदां आलें आहे. (१) चालकत्व, (२) पोषकत्व आणि (३) नियामकत्व त्यानें सूचित होतें.

## ६७. ज्येष्ठ

ज्येष्ठ म्हणजे वयानें वडील. परमेश्वर हा सृष्टीचा पिताच नव्हे, त्या पित्याचा हि पिता आहे. सृष्टीचे जे प्रजापति आहेत त्यांचा हि तो पिता आहे. सृष्टीचें मूळ कारण तीन गुण होत. त्या गुणांची जननी प्रकृति होय आणि तिचा स्वामी तो पुरुष होय. आणि परमेश्वर या सृष्टीच्या मातापित्यांचा प्रकृति-पुरुषांचा हि पिता आहे. म्हणून त्याला ज्येष्ठ ठीकच म्हटलें आहे. तोच एक ज्येष्ठ असून बाकीचे सारे कनिष्ठ आहेत. हें जग म्हणजे तत्-सृष्ट-सृष्ट-सृष्ट आहे. ग्रामीण भाषेंत तें त्याच्या लेकाच्या लेकाचा लेक आहे. यावरून त्याचें ज्येष्ठत्व सहज समजणारें आहे.

## ६८. श्रेष्ठ

श्रेष्ठ म्हणजे गुणानें वरिष्ठ, योग्यतेनें वरचढ, सर्वोत्तम. जगामध्यें कांहीं न्यून, कांहीं अधिक, आणि कांहीं समान असे तीन प्रकार संभवतात. परमेश्वराच्या बाबतींत जग आणि जगांतील सारे हे न्यून म्हणजे कमी या कोटींतच पडणार. मग त्याच्या बरोबरीचे कुठून असणार? अधिकाची तर गोष्टच नको! गीतेनें जें म्हटलें आहे : 'न त्वत्समोऽस्त्यभ्यधिक: कुतोऽन्य:' तें याच मुळें. परमेश्वराचें वैभव अचिंत्य आहे. जीव आणि जगत् यांचा त्याच्यापुढें काय पाड? परमेश्वराशीं दुसऱ्या कशाचीच आणि यत्किंचितहि तुलना होऊंच शकत नाहीं. ''कशी तुळितसां तुम्ही प्रकट मेरुशीं मोहरी।–'' असें म्हणणें हि गौणच! मेरु आणि मोहरी यांतील लघु-गुरुत्व अतुलनीय असलें तरी परमाणु आणि पृथ्वी यांच्यांत एकच मृत्-तत्त्व विद्यमान आहे. मात्रेचाच काय तो फरक आहे. परंतु ज्यांच्या कोटीच भिन्न आहेत त्यांची तुलना कशी होणार?

ज्येष्ठ आणि श्रेष्ठ हे शब्द जोडीनें आले आहेत. एक वयोवृद्धत्ववाचक आणि दुसरा ज्ञानवृद्धत्ववाचक आहे. परमेश्वर सर्वादि आणि ज्ञान-स्वरूप असल्यामुळें तोच एक ज्येष्ठ आणि श्रेष्ठ या पदवीस पात्र ठरतो.

## ६९. प्रजापति

प्रजापति म्हणजे सर्व प्रजांचा, सुर, नर, तिर्यक् आदि भूत-सृष्टीचा स्वामी, शास्ता. परमेश्वर भूतमात्राच्या ठायीं वात्सल्य ठेवून या विश्वाचें पालन आणि पोषण करीत असतो. विश्वांत ''जसें कर्म तसें फळ'' असा न्याय लावून तो विश्वाचें शासन करीत आहे. यांतच त्याचें प्रजापतित्व म्हणजे प्रजापालन सामावलें आहे. तसें तो जर न करील , तर त्याच्यावर वैषम्य आणि नैर्घृण्य इत्यादि आरोप येतील. ईश्वराच्या या सर्वभूत-साम्य आणि सर्वभूत-वात्सल्य इत्यादि गुणांचें अनुकरण करून राजे लोक या भूतलावर राज्य करूं शकतात. राजेच काय प्रत्येक जणच असें राज्य करूं शकतो. कुटुंबांत, समाजांत, राष्ट्रांत आणि राष्ट्रसंघांत याच गुणांच्या बळावर राज्य चालूं शकतें. राज्य म्हणजे स्वैर हिंसा नव्हे. राज्य म्हणजे प्रजावत्सलता होय. तेंच प्राजापत्य वा प्रजापतित्व. जगांत असें जें प्रजापतित्व दिसून येतें तें

सारें त्या परमेश्वराचें आहे. यावेगळें जें कांहीं राज्य नांवानें चालतें तें राज्य नसून त्याज्य आहे. आणि प्रत्येक जण त्याचा त्याग करायला धडपडत असतो.

आपल्याकडे राम हा आदर्श राजा म्हणून प्रसिद्ध आहे. कारण तो परम प्रजावत्सल होता, प्रजाप्रियचिकीर्षु होता. मायबापाप्रमाणें स्वसुखनिरभिलाष होऊन त्यानें हें प्रजावात्सल्य केलें. आपल्यालाच एकट्याला राजपद कां असें त्याला वाटे. रघुकुलांत सर्व चांगलें आहे पण ही वडील भावालाच राज्य देण्याची रीत कांहीं बरी नाहीं, अशी त्याची तक्रार होती. रामाचें राज्य नसून प्राज्य होतें. म्हणूनच तो एक राजा झाला.

## ७०. हिरण्यगर्भ

''हिरण्यगर्भः समवर्तताग्रे, भूतस्य जातः पतिरेक आसीत्'' अशी श्रुति आहे. तद्नुसार हिरण्यगर्भ म्हणजे सृष्टीच्या आरंभीं उत्पन्न झालेला तिचा स्रष्टा ब्रह्मदेव होय.

त्याचबरोबर पुढील पद जें भूगर्भ तें हि त्याच्या जोडीनें वाचल्यास सूर्य आणि पृथ्वी यांचा निर्माता असा अर्थ प्रतीत होतो. सूर्यच सुवर्ण होय आणि भू ही अवर्ण होय. आणि हीं दोन्ही एकाच परमेश्वरानें निर्मिलीं आहेत. त्याचेच ते गर्भ होत. सूर्य आणि पृथ्वी हीं या सर्व प्रजेचीं मातापितरें आहेत. सूर्य रेतोधा आहे, पृथ्वी धारिणी आहे. सूर्याचा वर्ण तेजाचा म्हणून सुवर्ण आहे. आणि पृथ्वीचा वर्ण मातीचा म्हणून निस्तेज, काळपट आहे. आम्ही सारी प्रजा पृथ्वीनें धारण केलेलों आणि वाढवलेलों असलों तरी आम्ही भूमिपुत्र नाहीं, मृज्जात नाहीं, आम्ही देवपुत्र आहों तेजोजात आहोंत आणि म्हणून

**''तत् सवितुर् वरेण्यं भर्गो देवस्य धीमहि।''**
**(वरणीय तें सवित्याचें तेज देवाचें ध्यातसूं।)**

## ७१. भू-गर्भ

भू-गर्भ म्हणजे भूमि हा ज्याचा गर्भ आहे, ज्याचें अपत्य आहे, तो परमात्मा. ही सारी जीवनिकाय भूमि, सर्व जीवांचें आश्रयस्थान असलेली भूमि, परमेश्वरानें निर्माण केलेली आहे. तिच्या अंकावर सर्व जीव जन्मले, वाढले आणि तिथेंच विसावले आहेत. अशी ही पृथ्वी जनकजननी-जननी आहे. ''जननी जन्मभूमिश्च स्वर्गादपि गरीयसी'' असें भगवान् रामचंद्रांनीं जननी आणि जन्मभूमि यांचें गौरव गाइलें आहे. या भूमातेच्या बाबतींत वस्तुतः ते दोन्ही गौरव-विषय एकच झाले आहेत. ही भूमाताच आम्हां सर्व जीवांची जननी आहे आणि जन्मभूमि हि आहे. ज्या तेजाचें आम्ही पुत्र आहों तें चिद्घन परमात्मतत्त्व अव्यक्त आणि म्हणून दूरचें आहे. पण जिनें आम्हांला जन्म दिला, जिच्या अंगावर आम्ही वाढलों, बागडलों आणि जिथें विसांवलों, ती ही भूमाता आम्हांला प्रत्यक्ष आहे. तत्त्वतः तिचें स्थान जरी डावें असलें तरी व्यवहारांत तें उजव्याहून उजवें आहे. म्हणूनच ती ''स्वर्गादपि गरीयसी'' म्हटली आहे. म्हणूनच ''सहस्रं तु पितृन् माता गौरवेणातिरिच्यते''असें मनूनें म्हटलें आहे. म्हणूनच भगवान् कृष्णानें इंद्रमख बंद करून गोवर्धन-पूजा लावून दिली आहे.

## ७२. माधव

मा म्हणजे लक्ष्मी, लोकमाता, तिचा जो धव म्हणजे पति तो माधव. माधव शब्दानें जगाचीं माता-पितरें एकदम स्मरलीं आहेत. माधव शब्दांत 'मा' चें महत्त्व विशेष आहे. मा-ख्यात धव तो माधव होय.

माधव म्हणजे मधुकोश. तो परमात्मा सर्व माधुर्याचा निधि आहे. मधमाश्या जशा फुलाफुलांतून मध गोळा करायला धडपडत असतात, तशा सर्व प्रजा त्याच्याच शोधासाठीं, त्याचा लवलेश आस्वादण्यासाठीं धडपडत आहेत.

परमात्मा सर्वमधुर आहे. त्याचें नाम मधुर, त्याचें रूप मधुर, त्याचे गुण मधुर, त्याचें कर्म मधुर. तो मधुराधिपतिच आहे. आणि म्हणून "मधुराधिपतेरखिलं मधुरम्" आहे. मधुर म्हणजे इन्द्रियप्रियच नव्हे तर इन्द्रियद्वारा हृदयप्रिय. म्हणजेच सत्यं शिवं सुंदरम्. नुसता रूपसुंदर सुचिर प्रिय होत नाहीं. नुसता गुण-सुंदर हि सुप्रिय होत नाहीं. तसेंच जो रूपगुणसुंदर आहे तो चित्रभूत असल्यास त्या आभासानें शांति, पुष्टि, तुष्टि व्हायची नाहीं. म्हणून एकसमयावच्छेदेंकरून सत्यं शिवं सुंदरम् तेंच संपूर्ण सुंदर होय आणि त्यानेंच संतृप्ति होते. परमात्माच असा संपूर्ण आहे. म्हणून संत गातात– "रूप पाहतां लोचनीं। सुख जालें वो साजणी।। तो हा विठ्ठल बरवा। तो हा माधव बरवा।।

## ७३. मधुसूदन

मधु-सूदन म्हणजे मधुनामक दैत्याला ठार करणारा. देवाचीं हीं सहस्रावधि नामें "गौणानि" आणि "विख्यातानि" अशीं आहेत. मधु-सूदन हें नाम हि तसेंच असलें पाहिजे. परंतु हा मधु कोण? मधु - कैटभांपैकीं? कर्णमिश्राचा मुलगा म्हणून त्याचा उल्लेख आहे, पण तेवढ्यावरून त्याचा पराक्रम कांहीं कळत नाहीं. कोणतातरी एक राक्षस देवशत्रु होता एवढेंच समजावयाचें. पण हें नाम गौण म्हणजे गुणवाचक घेतलें म्हणजे त्याचा पराक्रम कळतो. राक्षस हे कामरूप म्हणजे हवें तसें रूप घेणारे आहेत. खरें म्हणजे काम हेंच त्यांचें रूप आहे. जीवाला भूल पाडून त्याचा फडशा पाडण्यासाठीं तो काम नाना मोहक रूपें घेऊन येतो. परंतु जागृत अंतरात्मा त्याला ओळखून काढतो आणि त्या त्या रूपांत त्याचा निकाल लावतो. हेंच मधुसूदनत्व होय. भगवान् नुसता मधुसूदन नाहीं, तो मधु-कैटभारि म्हणून हि प्रसिद्ध आहे. हा कैटभ कोण? कामाचा सखा क्रोध. भगवान् कामाबरोबर त्याची छाया जो क्रोध, त्याचा हि निकाल लावत असतो. असा हा जो मधुसूदन तोच कैटभारि होय.

## ७४. ईश्वर

ईश्वर म्हणजे विश्वनियंता. या संपूर्ण विश्वाचें शासन करणारा सर्वशक्तिमान्. कर्तुं, अकर्तुं, अन्यथा कर्तुं सामर्थ्य असलेला असा तो आहे. असें सामर्थ्य दुसरीकडे कुठेंच पाहायला मिळत नाहीं. सर्व जीव हे अनीश्वर आहेत. त्यांच्या ठिकाणीं ईश्वराचें सामर्थ्य कुठून असणार? ते सर्वतोपरी असमर्थ आहेत. म्हणून त्यांचा अधिकार केवळ ईश्वराची अनन्यभावानें भक्ति करणें एवढाच आहे. जगाची रचना करतां येणें ही गोष्ट तरी जीवाला अशक्यच आहे. तो अव्यापारेषु व्यापारच होईल. अशा तऱ्हेचा अव्यापारेषु व्यापार विश्वामित्रानें करून पाहिला म्हणतात. अर्थात् तो त्याला जमला नाहींच! परंतु यांत जीवाचें कांहीं बिघडत नाहीं. न कां करतां येईना विश्वरचना, पण स्व-रचना त्याला कां करतां येऊं नये? आपले मनोविकार, आपले देहधर्म त्याला कां आवरतां येऊं नयेत? तिथें हि बिचारा हार खातो आणि तेंच खरोखर दु:खाचें कारण आहे. त्यासाठीं हि त्याला ईश्वरालाच शरण जावें लागतें. ईश्वराच्या कृपेनेंच तो त्यांत फावतो. ईश्वराचें असें सामर्थ्य ज्याच्या लक्षांत आलें तो त्याला कां न भजेल?

## ७५. विक्रमी

जो विक्रम करतो तो विक्रमी. जगद्रचना हा परमेश्वराचा विक्रमच होय. कांहीं हि दुसरें उपादान नसतांना आणि दुसरीं कांहीं उपकरणें नसतांना त्यानें ही विश्वरचना कशी केली ? अशा तऱ्हेच्या अडचणीला दुसरा कोण अनीश्वर तोंड देऊं शकेल? विश्वरचना करून त्यांत त्यानें धर्माची स्थापना केली आहे. धर्मविरोधीतत्त्वांचें आणि सत्त्वांचें त्यानें शमन केलें आहे. हा हि पराक्रम अद्भुत आहे. त्याच्या

सत्तेच्या विरुद्ध कोणी कितीहि प्रबल प्रतिद्वंद्वी उभा राहिला, तरी त्याला त्यानें लीलया नेस्तनाबूद केलें आहे. आणि अशा प्रकारें सज्जनांचें परित्राण साधलें आहे. सत्याचाच अखेर विजय होतो हें त्यानें वारंवार शाबित केलें आहे. हा त्याचा पराक्रम अनादि कालापासून आजतागायत चालतच आला आहे. सताविरुद्ध उठलेल्या असताची हार ठरलेलीच आहे. आणि हा पराक्रम परमेश्वर कांहींएक न करतांच करीत असतो. असा अनायास विजय दुसरा कोणी जीव मिळवूंच शकत नाहीं. मग तो केवढाहि का पराक्रमी असेना. असें असल्यामुळें परमेश्वरासारखा विक्रान्त परमेश्वरच होय. रामदासांनीं म्हटलें आहे ''केल्यानें होत आहे रे'' पण हा समर्थांचा (रामदासांचा) समर्थ असा समर्थ आहे कीं त्याच्या बाबतींत न केल्यानेंच होत आहे!

## ७६. धन्वी

धन्वी म्हणजे धनुर्धर. भगवान् विष्णूचें शृंगापासून बनविलेलें शार्ङ्ग धनुष्य प्रसिद्ध आहे. रामाचें कुदंडाचें बनलेलें कोदंड प्रसिद्ध आहे. तोहि धन्वीच. विष्णुचाच अवतार तो. जुन्या काळीं शस्त्रास्त्रांमध्यें हळूंहळूं विकास होत गेला आहे. आजहि तो चालूच आहे. प्रथम मनुष्य पशूप्रमाणें नखदंतायुध होता. नरसिंह हा त्याचा प्रतिनिधि आहे. त्यानंतर परशु आला. परंतु परशु हें शस्त्र आहे. त्यापेक्षां धनुर्बाण हें अधिक प्रभावशाली अस्त्र निर्माण झालें. ह्यांचे प्रतिनिधि परशुराम आणि धनुर्धारी राम होत. जुन्या काळीं येथपर्यंतच प्रगति झाली होती. म्हणून धन्वी म्हणजे धनुर्धारी हा अग्रणी, मोठा समर्थ योद्धा, मोठा रणवीर गणला जाई. आणि म्हणून तें पराक्रमाचें चिह्न देवाला बहाल करण्यांत आलें. आतां त्याच्या हातीं अणुगोलच द्यावा लागेल. कारण मानवाच्या विकासाची मजल तेथपर्यंत पोहचली आहे. ''यदन्नः पुरुषो भवति तदन्नास् तस्य देवताः'' या न्यायाप्रमाणें ''यच्छस्त्रः पुरुषो भवति तच्छस्त्रास् तस्य देवताः'' असें म्हणणें युक्त आहे. महाभारतकालीं मानव-संस्कृति धनुर्बाणापर्यंत विकसित झाली होती. म्हणून त्यावेळच्या नामस्मरणांत धन्वी हें नांव येणें स्वाभाविक आहे. एरव्हीं, ज्याच्या संकल्पमात्रें हें जग उदय आणि अस्त पावतें त्याला खरोखर कुठल्या शस्त्राची गरज आहे? तो निःशस्त्रच, सशस्त्रास्त्राहून सशस्त्र आहे. त्याला कुठल्याच शस्त्राची गरज नाहीं. मानवानें आपल्या हौसेसाठीं त्याला नाना शस्त्रांनीं सजविलें आहे इतकेंच.

## ७७. मेधावी

मेधा म्हणजे प्रज्ञा. या प्रज्ञेचे अंतर्ज्ञान आणि बहिर्ज्ञान असे दोन मुख्य भाग आहेत. चेतना, अवधान, स्मरण, ग्रहण, धारण, कल्पन इत्यादि बहिर्ज्ञानाचे विविध पैलू आहेत. अशी मेधा ज्याला आहे तो मेधावी होय, निव्वळ बहुग्रंथ धारण करणारा नव्हे. ज्यानें हें सर्वाश्चर्यमय विश्व निर्माण केलें त्याच्या मेधावितेचा आणखी पुरावा तो काय पाहिजे?

मेध आणि मेधा शब्द यांची कुळी एक आहे. मेध म्हणजे यज्ञ करतां करतां येणारें जें बुद्धिपाटव तें मेधा होय. गांधीदृष्ट नई तालीमचा हा वैदिक आधार होय. कर्मानें बुद्धि उत्पन्न होत नाहीं. पण बुद्धीचें शोधन होऊन तिचें पाटव प्रकट होतें. ती निर्मल उज्ज्वल सुंदर होते. अर्थात् मेधा म्हणजे कर्मकुशल ज्ञान.

'ईश्वर विक्रमी धन्वी मेधावी' हा अनुक्रम जणूं ईश्वरत्वाची व्याख्याच सुचवीत आहे. ईश्वरत्व=ज्ञान+साधन-सामर्थ्य.

धन्वी आणि मेधावी ही जोडी ''यत्र योगेश्वरः कृष्णो यत्र पार्थो धनुर्धरः'' या श्लोकाचें स्मरण करून देते. सामर्थ्याचीं तीं दोन अपरिहार्य अंगें होत.

## ७८. विक्रम

"त्रीणि पदा विचक्रमे" अशी श्रुति आहे. तद्नुसार उत्पत्ति, स्थिति आणि लय या तीन म्हणजे बहुविध पदांनीं ज्यानें हें विश्व क्रमिलें आहे, आटोपलें आहे, तो परमात्मा विक्रम होय. तोच त्रिविक्रम या नांवानें हि प्रसिद्ध आहे.

अदितिपुत्र वामनच त्रिविक्रम झाला आहे. आदित्य प्रथम बाल रूपानें क्षितिजावर येतो तेव्हां तो वामन म्हणजे ठेंगणा असतो. त्यावेळीं त्याच्यापुढें अंधकार-सम्राट् बलि उभा असतो. पुढें तो मध्याह्नीं डोक्यावर चढतो आणि वामनाचा त्रिविक्रम बनतो. तो उंच होतो त्यावेळीं अंधकारसम्राट् भुई-सपाट डोकें नमवतो आणि अक्षरश: त्रिविक्रमाचा चरण शिरोधार्य करून त्यासरशीं पाताळांत जातो. अंधकाररूप सावली हि पददळीं येते आणि स्वर्ग-पृथ्वीचें साम्राज्य प्रकाशमय देवांना परत करतो तो. पाताळांत दृष्टिआड झाला म्हणजे हळूंहळूं आदित्य हि देवकार्य करून अस्तनीं खालीं येतो आणि शांत होतो. हा त्याचा तिसरा क्रम, तिसरा चरण, म्हणावयाचा. असुरराज अंधकार आणि अदितिपुत्र प्रकाश यांच्यातील हें युद्ध सनातनच आहे. प्रत्यह तें होत आहे.

## ७९. क्रम

विक्रम म्हणजे विशिष्ट तीन पदें क्रमणारा. पण क्रम म्हणजे कोणतीं हि विशिष्ट पदें नव्हे तर सर्व सामान्य क्रमण करणारा. गाडींत बसलेला मनुष्य बसलेला असला तरी तो सारखा क्रमण करीत असतो, स्थलांतर करीत असतो. तें स्थलांतर गाडीच्या योगें होत असतें. तसें सर्व सृष्टीचें क्रमण कालक्रमानें सतत होत आहे. तुम्ही बसा कीं निजा तुमचें क्रमण प्रतिक्षणीं होत आहे. मागच्या क्षणाचे तुम्ही या क्षणाला नाहीं आणि या क्षणाचे पुढच्या क्षणाला नाहीं. हा अविरत क्रम कालरूप परमात्म-शक्तीनें चालला आहे. सृष्टीची उत्पत्ति स्थिति आणि लय हा हि क्रमच आहे. सृष्ट पदार्थाचें जनन, मरण आणि पुनर्जनन हा हि क्रमच आहे. जीवांचा बंध-मोक्ष हि तोच. असा हा परमात्मा क्रमाक्रमानें सर्वांना सर्व अवस्थांस पोंचवून कालक्रमण करीत आहे म्हणून तो क्रम.

## ८०. अनुत्तम

उद् वयं तमसः परि
ज्योतिः पश्यन्त उत्-तरम्।
देवं देवत्रा सूर्यम्
अगन्म ज्योतिर् उत्-तमम्॥

या मंत्रांत उत् उत्तर आणि उत्तम हीं पदें आलीं आहेत. त्यांत उत्तम पद श्लिष्ट आहे. उत्तम म्हणजे सर्वोच्च तसें सर्वश्रेष्ठ हि. सूर्योदयाच्या वेळीं नैश तमाच्या माथ्यावर पाय देऊन वर आलेल्या बालसूर्याचें निरीक्षण करीत, त्यानंतर उत्तरोत्तर चढत जाणाऱ्या त्याच्या बिंबाचें अनुदर्शन करीत, मध्याह्नीं तळपणाऱ्या सर्व देवांचा देव असणाऱ्या त्या सहस्ररश्मि सूर्याला आपण जाऊन पोंचूंया—असें या मंत्रांत संकल्पिलें आहे. हा आधिभौतिक अर्थ झाला. त्याचा आधिदैविक आणि आध्यात्मिक अर्थ अनुक्रमें घ्यावयाचा आहे. ते अर्थ हि मंत्रांतील उद् उत्तर आणि उत्तम पदांनीं सुचविलेच आहेत. पण इथें तर परमात्म्याला अनुत्तम म्हटलें आहे! तो वेगळा नाहीं. जो उत्तम तोच अनुत्तम. उत्तम खालून वर पाहतांना, अनुत्तम वरून खालीं पाहतांना. अनुत्तम म्हणजे ज्याहून उत्तम, वरचढ कोणी नाहीं तो. अर्थात् तोच उत्तम होय. परमेश्वराहून ज्येष्ठ श्रेष्ठ वरिष्ठ कोण आहे? म्हणून तो अनुत्तम म्हटला आहे. वस्तुत: अनुत्तर असा शब्द हवा. पण त्या शब्दाचा वेगळा अर्थ होईल असें वाटून कीं काय अनुत्तम म्हटलें. वस्तुत: सर्व जीव अनुत्तम आहेत. परमेश्वर उत्तम आहे, अनुत्तर आहे. जो उत्तम तो अनुत्तम कसा होणार? म्हणून अनुत्तम म्हणजे अनुत्तर समजावयाचें.

## ८१. दुराधर्ष

दुराधर्ष म्हणजे अधृष्य. ज्याच्याशीं सलगी करतां येत नाहीं असा. परमात्मा अव्यक्त-स्वरूप आहे. त्यामुळें त्याच्याशीं कोणी धृष्टता करूंच शकत नाहीं. परक्याचा मुळीं तिथें लागच नाहीं. तो केवळ स्वसंवेद्य आहे. त्यामुळें तो दुराधर्ष आहे.

आईशीं परिचयच नव्हे सलगी असते. त्यामुळें तिचा अनादर घडतो. बापाशीं परिचय असला तरी सलगी होत नाहीं. त्याच्याशीं सर्व व्यवहार जरा दुरून आणि जपूनच होतात. त्याचा अनादर होत नाहीं. व्यक्तीशीं सलगी केल्याबद्दल आणि त्यांतून अनादर घडल्याबद्दल अर्जुनाला क्षमा मागावी लागली आहे. शंकराचार्यांच्या पुढील कवनांत सविनय समर्पण आहे, पण सलगी नाहीं, धृष्टता नाहीं. अविनय नाहीं.

**सत्यपि भेदापगमे नाथ तवाहं न मामकीनस् त्वम्।**
**सामुद्रो हि तरङ्गः क्वचन समुद्रो न तारङ्गः।।**
(षट्पदी)

परमेश्वराच्या जवळ सगळेच जाऊं शकतात—पापी आणि पुण्यशील, सज्जन आणि दुर्जन. पण त्याच्याशीं सलगी आणि धृष्टता कोणीच करूं शकत नाहीं. अंधकार सूर्याशीं सलगी आणि धृष्टता काय करणार? पण किरण हि करूं शकत नाहीं. तो हि सविनय समर्पणच करूं शकतो.

## ८२. कृतज्ञ

कृत म्हणजे आकृत, व्यक्त. तें जो जाणतो तो कृतज्ञ. परमेश्वर जो सर्वान्तर्यामी तो चराचर प्रत्येक घटनेला, प्रत्येक व्यक्तीला, जाणतो; कारण त्याच्याच अध्यक्षतेखालीं सर्व घडत असतें. गीतेनें म्हटलेंच आहे—

**''मयाध्यक्षेण प्रकृतिः सूयते सचराचरम्''**
—गी.९.१०

तसेंच आणखी म्हटलें आहे—

**''वेदाहं समतीतानि वर्तमानानि चार्जुन।**
**भविष्याणि च भूतानि मां तु वेद न कश्चन।।''**
गी.७.२६

परमेश्वर, कृत-ज्ञ आहे, पण कोणतें हि कृत, म्हणजे चराचर भूत, त्याला जाणत नाहीं. कारण तो स्वतःच विज्ञाता आहे. तो ज्ञेय होऊं शकत नाहीं, जड होऊं शकत नाहीं. ''विज्ञातारं अरे केन विजानीयात्'' असें श्रुति कंठ-रवानें सांगत आहे.

लौकिक अर्थानें हि तो कृतज्ञ म्हणजे उपकृतज्ञ आहेच; भक्तानें केलेलें अल्पहि बहु मानणारा आहेच. द्रौपदीचें पत्र, गजेन्द्राचें पुष्प, शबरीचें फल, रंतिदेवाचें तोय ग्रहण करून तो धाला आहे आणि उत्तम गति देता झाला आहे.

सर्वांतर्यामी असल्यामुळें परमात्मा जीवाचें केलेलें सर्व पुण्यापुण्य जाणत असतो. त्याहि अर्थानें तो कृत-ज्ञ म्हणजे वृत्त-ज्ञ आहे.

## ८३. कृति

आ-मूलचूल सर्व वृक्षाकार जसें बीजच होय, तसा हा विश्वाकार हि परमात्म-स्वरूपच आहे. जी जी कृति ती ती सारी कर्त्याची आकृति होय, व्यक्ति होय. संकल्प क्रिया कर्म हा सर्व कर्त्याचाच विस्तार होय. आणि कर्ता ज्या अर्थीं एक परमात्माच आहे त्या अर्थीं सर्व कृति हि त्याची आहे. कृतिमात्र त्याचें रूप आहे. म्हणून तो कृति.

सिद्धीचें साधन कृति आहे. परमात्म्याचा संकल्प हि कृतिच आहे. ज्ञान्याचा वाक्य-विचार, योग्याचा चित्त-निरोध, भक्ताची नवविध भक्ति हीं सर्व कर्मेंच होत. कर्मयोग्याचें स्वधर्माचरण तर उघडच कर्म आहे. सारांश, साधनमात्र कर्ममय आहे, कृतिरूप आहे. परंतु ह्या कृतीचाच जे निषेध व निरोध करतात ते निवृत्तिग्रस्त नैकृतिक होत. नैकृतिक म्हणजे घातकी, आत्मघातकी. गीतेनें ह्यांनाच अयज्ञ म्हटलें

आहे आणि अशा यज्ञहीन जनांना हा लोक हि फळत नाहीं, मग तो परलोक कुठला? असा निरुत्तर करणारा प्रश्न केला आहे. ''नायं लोकोऽस्त्ययज्ञस्य कुतोऽन्य: कुरुसत्तम''–गी. ४-३१. कृतीचा अनादर म्हणजे परमेश्वराचाच अनादर होय. कृतिरूप परमेश्वराला आपली सुकृति समर्पून जीव सिद्धि मिळवतो. ''स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विन्दति मानव:''–गी. १८.४६

## ८४. आत्मवान्

आत्मवान् म्हणजे आत्ममहिम्यानें संपन्न. जीव हा आत्मरूपच आहे. पण अज्ञानानें तो आपल्याला भलतेंच कांहींतरी समजून बसला आहे. त्यामुळें दीन झाला आहे. मेंढ्यांच्या कळपांत सांपडलेल्या सिंहशावकाप्रमाणें तो सिंहगर्जना विसरून बें बें करीत आहे. जेव्हां पिता सिंह त्याचा कान धरून त्याला सांगतो कीं लेका तूं मेंढरूं नाहींस, सिंह आहेस! माझ्यासारखा सिंह आहेस! पहा! आणि असें म्हणून सिंहगर्जना करतो आणि त्याला हि करायला लावतो, त्यावेळीं शावकाचें निजरूपाविषयींचें अज्ञान दूर होऊन त्याला आत्मप्रतीति येते. असा आत्मप्रत्यय-संपन्न जो झाला तो आत्मवान् होय. असा प्रत्यय जोंपर्यंत येत नाहीं, तोंपर्यंत जीवाचें दैन्य हि सरत नाहीं. जीव आणि शिव यांमधील फरक एवढाच. शिव हा सदैव आत्मवान् आहे, आत्मप्रत्ययसंपन्न आहे तर जीव मिथ्याभिमानानें स्वमहिम्यापासून च्युत झालेला आहे. ज्याक्षणीं त्याचा मिथ्याभिमान गळेल, त्याक्षणीं तो आत्मवान् होईल. होईल म्हणजे पूर्वी नसलेला नव्यानें होईल असें नव्हे, तर असलेलाच जणूं होईल. ''तो आत्मभूत होईल, आत्मीभूत होणार नाहीं. तो ब्रह्मभूत होईल, ब्रह्मीभूत होणार नाहीं. ''अभूततद्भावे च्विः'' त्याला लागणार नाहीं. दारु भस्मीभूत होतें. कारण दारु म्हणजे लाकूड आधीं आहे, त्याहून भस्मावस्थेंत भिन्न झालें आहे. जें नव्हतें तें झालें आहे. तसें इथें नाहीं. जें आहे तेंच आहे. पण नव्यानें उपलब्ध झालें आहे, प्रतीत झालें आहे इतकेंच. आत्मा सर्वच आहेत, पण आत्मवान् एक परमात्माच आहे. जो निरंतर आत्म-प्रत्यय-संपन्न आहे, तो निरंतर ''स्वे महिम्नि'' प्रतिष्ठित आहे.

## ८५. सुरेश

सुर म्हणजे देव. प्रकाशाचे प्रतिनिधि. जिथें जिथें प्रकाश आहे, तिथें तिथें सुरतत्त्व आहे. काजव्यांत प्रकाश आहे, तारकेंत प्रकाश आहे, चंद्रांत प्रकाश आहे आणि सूर्यांतहि प्रकाश आहे. प्रकाशकत्वामुळें हे सारेच देव आहेत. परंतु हे सर्व देव अंशभूत आहेत. अंशी परमात्मा आहे. त्याच्याच प्रकाशानें हे सर्व प्रकाशत आहेत. त्यामुळें परमात्मा हा सर्व सुरांचा ईश म्हटला आहे. गीतेंत म्हटलेंच आहे:–

**यद् आदित्यगतं तेजो जगद् भासयतेऽखिलम्।**
**यच् चन्द्रमसि यच् चाग्नौ**
**तत् तेजो विद्धि मामकम्।।** गी. १५-१२

हा आधिभौतिक प्रकाश झाला, त्याच्या अनुग्रहकारी अधिदेवता सूक्ष्मतर आहेत आणि त्यांचें आध्यात्मिक स्वरूप परमात्म्याच्या ठाईं केन्द्रित झालें आहे. भौतिक प्रकाश बाह्य वस्तु प्रकाशित करतो आणि तो जड आहे. परंतु त्याचा उद्गम विभिन्न देवतांपासून असून त्या चेतन आहेत आणि त्या सर्व चेतन-विशेषांचें जें निर्विशेष चेतन तें चिद्घन अध्यात्म होय आणि तोच सुरेश. तोच देवाधिदेव भगवान् विष्णु, जो अंतर्बाह्य सर्वच प्रकाशित करतो. गीतेंत म्हटलेंच आहे–

**यथा प्रकाशयत्येक: कृत्स्नं लोकमिमं रवि:।**
**क्षेत्रं क्षेत्री तथा कृत्स्नं प्रकाशयति भारत।।**

गी. १३.१३

कृत्स्न म्हणजे नखशिखांत आणि अंतर्बाह्य.

## ८६. शरण

शरण म्हणजे थारा, निवारा. जीव दिवसभर धडपड करतो आणि रात्रीं थाऱ्यास, निवाऱ्यास येतो.

तिथें त्याच्या देह-मन: प्राणांस विसांवा मिळतो. तो निर्भय आणि निश्चिंत होऊन तिथें सुखानें पहुडतो. सर्व जीवांचें असें जें परम विश्रामधाम आहे, जिथें पोंचून त्याचे जन्मोजन्मीचे सारे अपमान, दु:ख आणि दैन्य नाहीसें होतें आणि तो परमानन्दाचा धनी होतो, तें म्हणजे परमात्मा होय. इतर शरणें हीं अशीं नाहींत. म्हणून केवळ एक तोच परमात्मा, शरण म्हणावयाचा. इतर जीं कोणतीं शरणें आहेत तीं सारीं अनित्य आणि म्हणून दु:खरूप आहेत. त्यामुळेंच स्वर्गाचें सुखहि सुळावरचीच पोळी होतें. तिनें कोणाच्या तोंडाला पाणी सुटेल? एखादी वस्तु नित्य आहे म्हणूनच ती सुखावह होईल, असें हि नाहीं. संसार शाश्वत झाल्यास काय तो सुखावह होईल ? उलट तो अशाश्वत आहे, हा त्याचा मोठाच उपकार होय. जें नित्य हि आहे, सुखरूप हि आहे, तें जर परकें असलें तर मनुष्याला त्याच्यासाठीं कष्ट सायास पडतील. परंतु तें जर आत्म-अभिन्न असेल तर अयत्नलब्ध होईल आणि तेंच खरें शरण होय. सर्वांतर्यामी परमात्मा हा तसा आहे. म्हणून तो शरण.

बुद्ध मेला, संघ गेला, धर्म परागंदा झाला त्याला शरण जाणार कसें? बुद्ध ज्याला शरण गेला तो सर्वांतर्यामीच सर्वशरण्य होय.

## ८७. शर्म

कृ कर्मन्, धृ धर्मन्, वृ वर्मन् तसा शृ शर्मन् शब्द साधला आहे. कर्म म्हणजे काम, धर्म म्हणजे यज्ञ, वर्म म्हणजे चिलखत, तसें शर्म म्हणजे कल्याण, सुखकर गोष्ट. जें जें सुखावह तें तें भगवद्रूप आहे. आणि सुखावह काय आहे? जें जें दु:खरूप आहे त्याचा त्याग. शर्म शब्द हाच त्याग, हाच दु:ख-वियोग सूचित करतो. असा दु:खवियोगाचा उद्योग करतां करतां शेवटीं जें निष्पन्न होतें तें आत्मरूपच शर्म होय. तदितर सारें अनात्म, अनित्य, दु:ख होय. पण हें जीवाच्या लक्षांत एकाएकीं येत नाहीं. तो सुखाचे प्रयोग करीत राहतो. त्या प्रयोगांतूनच त्याला सुख म्हणून कवटाळलेल्या देह-गेह-स्नेहाचा दु:ख म्हणून त्याग करीत करीत अखेर स्वरूपाशीं येऊन थांबावें लागतें आणि तिथेंच त्याला शर्म लाभतें.

## ८८. विश्वरेता

परमेश्वर विश्वरेता आणि विश्वयोनि दोन्ही हि म्हटला आहे. या विश्वाचें निमित्तकारण आणि उपादान कारण तोच आहे, विश्वाचा पिता आणि माता तोच आहे. विश्वरेता, शब्दानें त्याचें बीजप्रदत्व वर्णिलें आहे. विश्वयोनि शब्दानें त्याचें विश्वमातृत्व निरूपिलें आहे. मूल आई-बाप दोहोंचें हि असतें. परंतु तें नांव पित्याचेंच लावतें. कारण त्याच्याच बीजाचें तें असतें, त्याचेंच तें औरस असतें. तसें विश्व हें परमेश्वराचें औरस आहे, प्रकृति त्याची माता भलें असो. गीतेंत म्हटलेंच आहे

मम योनिर् महद् ब्रह्म तस्मिन् गर्भं दधाम्यहम्।
संभव: सर्व-भूतानां ततो भवति भारत।।
गी. १४-३

अर्थात् परमेश्वर धाता आहे आणि प्रकृति धारिणी आहे. हें चराचर सारें विश्व त्याचें संतान आहे. तथापि त्या संतानानें आपण मृतजात नसून अमृतजात आहों, ''अमृतस्य पुत्र:'' आहों हें विसरतां कामा नये. त्यानें हें सदैवच स्मरलें पाहिजे —सकाळींच नव्हे—कीं ''तद् ब्रह्म निष्कलमहं न च भूत-संघ:''
—शंकराचार्य : प्रात:स्मरण.

## ८९. प्रजाभव

प्रजाभव म्हणजे या नानाविध जीवसृष्टीचा उदय. स्वेदज, अंडज, जरायुज आणि उद्भिज्ज अशा चार जीव-खाणी मानिल्या आहेत. या चतुर्विध प्रजा अथवा मानवांतील ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्रादि चतुर्विध प्रजा. साऱ्या परमेश्वरापासून उत्पन्न झालेल्या आहेत. त्या परम पुरुषापासून प्रकट झाल्या आहेत. म्हणून परमेश्वर प्रजाभव म्हटला आहे.

कित्येक शब्द नित्य-बहुवचनी असतात. जसे सिकता, अक्षता इत्यादि. प्रजा शब्दहि तसाच नित्य-बहुवचनी आहे. कारण, एका कणानें वाळू होत नाहीं. अक्षता म्हटल्या कीं त्या बहुच असावयाच्या. एक दाणा कधीं अक्षत म्हटला जात नाहीं. त्याच प्रमाणें ही जीवसृष्टीहि एका खाणीची वा वर्णाची असत नाहीं. ती नानाविध आणि असंख्य अशीच सदैव दिसून येते. म्हणून प्रजा शब्द हा नित्य बहुवचनी आहे. परमेश्वर अशा ह्या बहुविध प्रजांचा उद्‌भव आहे.

सर्व प्रजांचा परमेश्वरच एक पिता असल्यामुळें, कोणीहि दुसऱ्याहून आपण श्रेष्ठ आहों, असें म्हणतां कामा नये. कारण सर्वांचें मूळ एकच आहे. सर्व शेवटीं त्याच्यांतच विलीन व्हावयाचे आहेत. म्हणून त्याहि दृष्टीनें सर्व निर्विशेषच होत. मध्यंतरीं नाना रूप-गुण-कर्मांची जी उपाधि, जीवा-जीवांत भेद करते, ती मृगजळाप्रमाणें निर्मूल पण सान्त अशी मध्येंच, भासत असते. तिनें आपण भ्रांत होतां कामा नये आणि ''सर्वभूत-हिते रती'' पासून च्युत होतां कामा नये. मशक आणि महर्षि समदृष्टीनें पाहिले पाहिजेत.

**समं पश्यन् हि सर्वत्र समवस्थितमीश्वरम्।**
**न हिनस्त्यात्मनात्मानं ततो याति परां गतिम्।।**

गी. १३-२८

बन्धुत्व केवळ मानवांतच मर्यादित राहूं नये तें जीवमात्रापर्यंत भिडवलें पाहिजे. किंबहुना जीवाजीव विचार ओलांडून गेलें पाहिजे.

## ९०. अहर्

अहर् म्हणजे दिवस. अहोरात्र मिळून होणारा कालखंड. संवत्सररूप कालचक्राचा एक दांता. कालाश्वाला आमच्या जीवनाचा रथ जुंपला आहे. आणि तो अविराम निरंतर धावत चालला आहे. जे त्यांत अप्रमाद आणि ध्यान यांच्या योगें आरूढ होतात त्यांची सुखयात्रा होते. ते अहन् (अहर्‌चेंच एक रूप) म्हणजे अन्-आत्महन् होत. जे प्रमादी ते रथाबरोबर फरफटले जातात, रथचरणतळीं तुडवले जातात, ते आत्महन् होत. ह्याच अहोरात्रिरूप शुक्लकृष्ण गति होत. ''शुक्लकृष्णे गती ह्येते जगतः शाश्वते मते। एकया यात्यनावृत्तिं अन्ययाऽऽवर्तते पुनः।।'' गी. ८-२६ ''नित्य नवा दीस जागृतीचा'' असें झालें पाहिजे. असें जे जाणतात ते अहोरात्र-वेत्ते कालोपासक होत. कालात्म्या परमेश्वराचें कृपावलोकन त्यांनाच लाभतें.

अहर् या नामाचीं अनेक रूपें आढळतात. अह, अहन् अहस्, अहो, अहः, अह्न. प्रातिपदिक या दृष्टीनें अहर् पेक्षां कदाचित् अहन् च योग्य म्हणावें लागेल, पूर्वाह्ण, मध्याह्न, सायाह्न, अह्नाय इत्यादि शब्दांत अहन् चें च दुसरें अकारान्त रूप अह्न बहुप्रचलित दिसतें. द्वादशाह, पुण्याह इत्यादि शब्दांत न गळाला आहे.

'नायं हन्ति न हन्यते' गी. २-१९ हें लक्षण लक्षून हि अहन् हें नाम परमात्म्याला सुयोग्यच म्हटलें पाहिजे. अर्थात् धातु विचारानें हि अहन् हें रूप चिन्त्य आहे.

हन् धातूचें अकरण रूप मानायचें नसल्यास अह् (५ प.) धातू पासून अह अहन् अह्न शब्द आले असें म्हणतां येईल. अह्नोति, व्याप्नोति इति अहः वा अहन्.

## ९१. संवत्सर

संवत्सर म्हणजे ऋतुचक्र. सर्व ऋतूंचें एक आवर्तन. तें समवत् सरतें. जियून निघतें तिथें बरोबर त्याच वेळीं येऊन पोंचतें. म्हणून तें संवत्सर म्हणावयाचें. वत्सर, संवत्सर, परिवत्सर हीं सर्व वर्षाचीं नावें होत. जें १२ मासांत (३६५ दिवसांत)

पूर्ण होतें तें संवत्सर, जें त्याहून कमी मासांत (दिवसांत) पूर्ण होतें तें वत्सर आणि जें त्याहून अधिक मासांत पूर्ण होतें तें परिवत्सर होय. ३० दिवसांचा सामान्य मास आणि १२ मासांचें वर्ष, ह्या सामान्य वा सर्वमान्य गणितानें ३६० दिवसांचें वर्ष होतें. म्हणूनच आपलें वर्तुळ वा वृत्त ३६० अंशांचें कल्पिलें गेलें. ह्या वत्सरवृत्ताचा एक अंश म्हणजे दिवस आणि अशा दिवसरूप सर्व अंशांचें मिळून बनलें तें संवत्सररूप वृत्त. हें कालसंयंत्रांतील एक चाक होय. कल्प, युग, संवत्सर, मास, पक्ष, दिन आणि घटिका, पळें, विपळें इत्यादि त्या संयंत्रातील लहान-मोठीं चाकें होत. या सर्वांचें अव्यक्त चेतन प्रेरक तें कालतत्त्व होय. सूर्यात्मा संवत्सर हा त्याचा प्रतिनिधि होय. जे दिनचर्या, ऋतुचर्या इत्यादि कालोपासना करीत नाहींत ते कालवश होऊन विनाश पावतात. जे कालानुसरण करतात ते काल-कृपेस पात्र होऊन जीवनांत सुखलाभ करून घेतात. हें सर्व संवत्सरफल होय.

## ९२. व्याल

व्याल म्हणजे सर्प, व्याल म्हणजे हत्ती. इथें व्याल म्हणजे सर्प असा अर्थ संनिकर्षानें प्रतीत होतो. "अहः संवत्सरो व्यालः" या चरणांत सर्व शब्द काल-वाचक दिसतात. म्हणून व्याल म्हणजे काळ-सर्प असा अर्थ निष्पन्न होतो. या सर्पाचें नांव शेष वा अनन्त. हा सर्प सृष्टीचा ग्रास करून शेष राहतो म्हणून शेष. सर्वांचा अंत झाला तरी हा शेष राहतो, म्हणून अनन्त. परमात्म्याची ही कालशक्ति त्या शक्तिमंताला आपल्या अंगावर धारण करते. नव्हे, शक्तिमंत हा आपल्या शक्तीवर पहुडला असतो. जो सर्वाधार त्याला दुसरा आधार कोणता? तो "स्वे महिम्नि" प्रतिष्ठित असतो. पण या काल-शक्तीला सर्प कां म्हणावयाचें? कारण सर्पाप्रमाणें तो अलक्षित सर्पटत येऊन ग्रासत असतो, तो सर्पाप्रमाणे अनिमेष, अतंद्रित असतो. तो सर्पाप्रमाणें कात टाकून सदैव नवा, ताजातवाना राहतो. सर्पाप्रमाणें तो अमृतपायी, अमर आहे. या आणि अशा अनेक सर्प-गुणांमुळें काल हा व्याल म्हटला आहे. काल-व्याल म्हणजे परमेश्वराची संहारशक्ति होय. शक्तीहून शक्तिमंत वेगळा आणि उत्तम असून प्रत्यक्षांत दोन्ही एकरूपच होत. वि विशेषेण विविधम्, आ निश्चयेन, अलति भूषयति इति व्यालः. सर्प हा विशेष करून शोभिवंत दिसतो म्हणून हि तो व्याल म्हटला आहे. मृत्यु हा पुष्कळदां अतिशय आकर्षक रूपानें जीवांना आपल्याकडे खेंचीत असतो.

संत नानकांचें वचन आहे : "काल व्याल जो पऱ्यो डोले मुख पसारे मीत। रे मन राम सों कर प्रीत।।" – काळ-सर्प जबडा पसरून अरे तुला गिळायला टपून बसला आहे. तेव्हां हे मना, तूं रामाची भक्ति कर.

## ९३. प्रत्यय

परमात्मा हा प्रत्यय म्हणजे प्रतीतिस्वरूप आहे. ज्ञान जें ज्ञेयज्ञातृविभागानें होतें तें बाह्य असतें. परंतु प्रत्यय हा अभेदानें होतो. त्यांत ज्ञेय आणि ज्ञाता अभिन्नच असतात. म्हणून परमात्मा हा प्रत्ययस्वरूप होय. ज्ञप्तिमात्र होय.

बाह्य ज्ञान हि वस्तुतः प्रत्यय-स्वरूपच असतें. रूप नेत्राच्या वाटें दर्शनेंद्रियाप्रति येतें आणि नेत्रवंताला रूपाचें ज्ञान होतें म्हणजे त्याचा प्रत्यय होतो. विषयाचा विषयी 'प्रति' हा जो 'अय' तोच प्रत्यय होय आणि त्यालाच ज्ञान म्हणून म्हणतात.

अशा प्रकारें बाह्य ज्ञान आणि आत्मज्ञान यांच्या ज्ञानक्रियेंत फरक नाहीं. फरक फक्त ज्ञान-विषयांत आहे. ही जी विषयनिरपेक्ष ज्ञप्ति, केवल ज्ञप्ति, तोच वस्तुतः प्रत्यय होय आणि तोच केवल-स्वरूप परमात्मा होय. म्हणूनच त्याला प्रत्यय म्हणावयाचें.

## ९४. सर्वदर्शन

सर्वदर्शन म्हणजे सर्वसाक्षी. परमात्मा हा का सर्वांची हेरगिरी करणारा आहे? नाहीं. तो हेरगिरी करीत नाहीं, पण कोणती हि गोष्ट त्याच्या नजरेंतून, त्याच्या जाणिवेंतून, सुटूंच शकत नाहीं. कारण तो सर्वांचा अंतर्यामी आहे. मी आपल्यालाच कळूं न देतां कांहीं करणें शक्य नाहीं. मी जागृतींतील सर्व व्यापार जाणिवेनेंच करीत असतो. स्वप्नांचाहि मीच द्रष्टा होतों. सुषुप्तीचें सुख हि मीच अनुभवतों आणि म्हणतों, काय छान गाढ झोंप लागली होती ! सारांश, मी म्हणवणारा अंतर्यामी तिन्ही अवस्थांचा साक्षी आहे. म्हणूनच तो सर्व-दर्शन म्हटला आहे. हरिश्चंद्रानें हें सर्व-साक्षित्व ओळखून आपण स्वप्नांत प्रतिश्रुत केलेलें दान प्रत्यक्षांत, जागृतींत निर्वाहिलें. तो स्वप्नांत हि खोटें बोलत नाहीं असें हरिश्चंद्रा-सारख्याविषयीं आपण विधान करीत असतो. ज्याला सर्वांतर्यामी परमेश्वराचें सर्व-साक्षित्व पटलें तो मला कोणी पाहत नाहीं म्हणून पाप कसें करील? तो पापाचा विचार हि मनांत आणूं शकणार नाहीं. कारण, परमात्मा सारें पाहत आहे—काय क्रिया, काय संकल्प!

## ९५. अज

अज म्हणजे न जन्मणारा, अर्थात् जन्माबरोबर येणारे सर्व विकार हि न पावणारा, असा परमात्मा. जन्मतो तो जन्तु होय, जीव होय. जायते अस्ति वर्धते विपरिणमते जीर्यते वा अपक्षीयते आणि नश्यति वा म्रियते हे जे जन्मादि नि मरणान्त षड्भाव ते जन्मणाऱ्या जीवाला लागू होतात. जो जन्मच पावत नाहीं त्या परमात्म्याला नव्हे. परमात्मा असा अज आणि अविकार आहे.

अजां एकां लोहित-शुक्ल-कृष्णां
बह्वीः प्रजाः सृजमानां सरूपाः।
अजो ह्येको जुषमाणोऽनुशेते
जहात्येनां भुक्तभोगां अजोऽन्यः॥



असा अज शब्द जीवाच्या (आणि आत्म्याच्या) विषयीं उपनिषदांनीं वापरला आहे खरा. पण तो लक्षणेनेंच घ्यावयाचा आहे. अज जो परमात्मा त्याचे अंगभूत जीव आणि प्रकृति हि लक्षणेनें अज आणि अजा म्हटलीं आहेत. प्रकृति ही परमात्म्याची शक्ति आहे, जीव हा अंश आहे. गुळाची गोडी आणि गुळाचा रवा गुळाहून भिन्न म्हणतां येत नाहीं.

## ९६. सर्वेश्वर

जगांत अनेक ईश्वर आहेत, स्वामी आहेत. कोणी जनेश्वर, कोणी वनेश्वर, कोणी भुवनेश्वर. पण सर्वेश्वर एक परमेश्वरच आहे. तो सर्व ईश्वरांचा ईश्वर आहे. तो भूत भविष्य वर्तमान या तिन्ही काळांचा, अधो मध्य ऊर्ध्व या तिन्ही लोकांचा आणि जागृति स्वप्न सुषुप्ति या तिन्ही अवस्थांचा स्वामी आहे. कर्तुं अकर्तुं अन्यथाकर्तुं समर्थ असा तो सर्वसमर्थ सर्वेश्वर आहे. परमेश्वर सर्वेश्वर आहे, कारण तो निजेश्वर आहे, सर्वांचा अंतर्यामी आहे. अंतर्यामी रूपानें तो सर्वांचा शास्ता आहे. जगत्-शासकांचा हि शास्ता आहे. सर्व शासक आपल्या बुद्धीला अनुसरून शासन करीत असतात. पण त्या बुद्धीचे शासन कोण करतो? ''यो बुद्धेः परतस्तु सः'' जो बुद्धीच्या पलीकडे तिचा अधिपति बसला आहे, तोच तिचें शासन करीत असतो म्हणून तो परमात्मा सर्वेश्वर म्हटला आहे. अर्थात् सर्वेश्वर म्हणजे सर्व ईशन तत्त्वांचा ईश्वर, शास्त्यांचा शास्ता.

## ९७. सिद्ध

ज्यांनीं सिद्धि म्हणजे अलौकिक सामर्थ्य अणिमा गरिमा लघिमा इत्यादि संपादिलें आहे, त्यांना सिद्ध म्हणतात. परंतु हें सामर्थ्य अलौकिक असलें तरी अद्भुत नव्हे. ईश्वराला हें आणि ह्याहून हि अचिन्त्य असें सामर्थ्य आहे. खरी सिद्धि म्हणजे मोक्षसिद्धि होय. इतर साऱ्या सिद्धि म्हणजे आडनांवाच्या.

ती खरी सिद्धि ज्यांना सहज-प्राप्त असते ते सिद्ध होत. त्यासाठीं ज्यांना प्रयास करावा लागतो, ते साधक होत. जगांत एका परमेश्वराविना सिद्ध कोण म्हणतां येईल? तोच एक सिद्ध आहे. बाकी सारे जीव साधकच होत. त्यांनाच गौरवानें आणि भविष्यद्-वृत्तीनें सिद्ध म्हटलें जातें इतकेंच. त्यांच्या साधकतेची खूण म्हणजे त्यांचा देह होय. ते साधक नसते, तर त्यांना देहाची गरजच नसती. देह आहे तोंवर साधना शेष आहेच, उरलीच आहे. प्रयाणकालीन साधना तेवढ्याचसाठीं सांगितली आहे. परमेश्वराला अशी कांहीं साधना करावी लागत नाहीं. म्हणून तो सिद्ध; आणि तोच सिद्ध.

## ९८. सिद्धि

सिद्धि म्हणजे सफलता. कोणत्या हि प्रकारची सफलता म्हणजे सिद्धिच होय. आत्मा सत्यसंकल्प आहे. म्हणून तो जो जो ध्यास घेतो तो तो सफल व्हावा असा त्याचा प्रयत्न असतो आणि त्यांत त्याला सफलता मिळते. ही सर्व सिद्धिच होय. अंतिम सिद्धि जी मोक्षसिद्धि तिचेच अंश म्हणजे ह्या सर्व उच्चावच मनोरथ-सिद्धि होत. कारण ह्या सर्व सिद्धि जीवाला वासनामुक्त होण्यात मदत करीत असतात. प्रत्येक सिद्धि ही वस्तुत: वासना-तानवरूपच असते आणि तितक्या अंशानें ती मोक्षसिद्धिच म्हटली पाहिजे. म्हणून सिद्धिमात्र भगवत्स्वरूपच होय. अर्थात् वासनातानव हीच सिद्धि असून तेंच परमात्मस्वरूप होय. परमात्म्याला कशाचीच वासना नसते, कामना नसते. त्याला कांहींएक मिळवावयाचें असत नाहीं. तो पूर्ण-काम, स्वयंतृप्त असतो. हीच सिद्धि. गीतेंत म्हटलेंच आहे भगवंतानें :

"न मे पार्थास्ति कर्तव्यं त्रिषु लोकेषु किंचन नानवाप्तं अवाप्तव्यम्।" गी. ३-२२

## ९९. सर्वादि

सर्वादि म्हणजे सर्वांचें मूळ, विश्वमूल. परमेश्वर ह्या सर्वाचें मूळ आहे. पण त्याचें मूळ वेगळें नाहीं. मुळाला मूळ कुठलें? मुळाला प्ररोह, स्कंध, शाखा, पल्लवादिच असावयाचें. हें सर्व दृश्य त्याचा विस्तार आहे, तो ह्या दृश्य विस्ताराचें अव्यक्त मूळ आहे. म्हणून तो सर्वादि. हें सर्व सादि आहे. ह्या सर्वांचा तो आदि आहे, पण स्वत: तो अनादि आहे. सर्वादि असल्यामुळें तो सर्वांना पूज्य आहे, सर्वांचें तो मातृस्थान आहे, पितृस्थान आहे, गुरुस्थान आहे. परमेश्वर सर्वादि आहे म्हणजे सर्व आदिभूत कारणांचा कारण आहे, या सर्व कारणांची मालिका गीतेनें अशी दिली आहे :

**अन्नाद् भवन्ति भूतानि पर्जन्याद् अन्नसंभवः।**
**यज्ञाद् भवति पर्जन्यो यज्ञः कर्म-समुद्भवः।।**
**कर्म ब्रह्मोद्भवं विद्धि ब्रह्माक्षर-समुद्भवम्।**
गी. ३-१४,१५

कोणतीहि मालिका घ्या, तिचा आरंभ अक्षर परमात्म्यापासूनच व्हावयाचा.

## १००. अच्युत

अच्युत म्हणजे स्वरूपापासून, स्वभावापासून, स्वधर्मापासून केव्हांहि न ढळणारा. नित्य-शुद्ध-बुद्ध-मुक्त हें आहे त्या अक्षर ब्रह्माचें स्वरूप. त्यापासून तें केव्हांहि च्युत होत नाहीं, त्यामुळें त्याला अच्युत म्हणावयाचें. सुवर्णाच्या लगडीचे अलंकार बनविले तरी सुवर्ण हें सुवर्णच राहतें, त्यांत कांहींच भिन्नत्व म्हणजे नानात्व येत नाहीं. हें जें अविकृतत्व तेंच अच्युत तत्त्व होय. ज्ञानेश्वरांनीं हें अच्युत तत्त्व ह्याच दृष्टांतानें असें मांडलें आहे :

**विश्वालंकाराचे विसुरे।**
**जरी आहाति नाना आकारें।**
**तरी घडिले एकें चि भांगारें। परब्रह्में।।**

हा वस्तुत: परिणाम नसून विवर्तच आहे. सुवर्ण अविकृतच राहत असल्यामुळें ह्याला परिणाम कां म्हणावें? अलंकारत्वरूप नानात्व हें नामरूपात्मक असल्यामुळें तें विवर्तरूप मिथ्या होय. दुधाचें दही हा परिणाम म्हणता येईल, पण सोन्याचा अलंकार हा विवर्त होय. कारण तिथें सुवर्णरूप वस्तु अविकृतच राहते. तसें विश्वाकारासकट ब्रह्म हें अविकृत आहे, अच्युत आहे.

## *शतक दुसरें*

### १०१. वृषाकपि

वृषाकपि हा एक वैदिक शब्द आहे. हा शब्द विश्वामित्र शब्दाप्रमाणें प्रथम पदांतीं दीर्घ झाला आहे. म्हणजे तो "वृषश्च असौ कपिश्च" असा कर्मधारय समास आहे आणि त्याचा अर्थ होतो नर कपि वा कपिपुंगव. सृष्टींत निरनिराळ्या योनींत जे सामर्थ्यशाली, नेतृत्वशाली, थोर थोर प्राणी आढळले त्यांनीं मनुष्याचें चित्त नेहमींच वेधून घेतलें आहे. सिंह, व्याघ्र, गजयूथप, वृषभ, तुरंगम, हरिणयूथप म्हणजे काळवीट इत्यादि पशु, कोकिळ, हंस, मोर, गरुड इत्यादि पक्षी यांच्या ऐटदार व्यक्तिमत्त्वानें प्रभावित झाला नाहीं असा कोण आहे? यांच्याचप्रमाणें कपिपुंगवानें हि मानवाचें मन मोहून घेतलें असल्यास नवल नाहीं. मानवाकृतीशीं निकटसाम्य असलेला तो स्वच्छंद शाखामृग मानवाला आवडला; तो त्याला इतका आकर्षक वाटला कीं, त्यानें तें नांव देवाला देऊन टाकलें!

ग्राम्य जीवनाचा त्याग करून अरण्यवास, कंदमूल-फलाशन इत्यादि धर्माचरणामुळें तपस्व्याचा तो आदर्श आहे. अर्थात् धर्मासाठीं कपिवत् आचार करणारा तो वृषाकपि. हा तत्पुरुष समास झाला. अशा तऱ्हेचें धर्माचरण करणारा परमात्म्याहून महान् तपस्वी दुसरा कोण आहे? म्हणून परमात्मा वृषाकपि. त्या अव्यक्त परमात्म्याचा प्रतिनिधि म्हणून अग्नि हि वृषाकपि म्हणून ओळखला जातो. तो हि आरण्यक आणि धडपडणारा आहे. तो वनांत वसतो, सर्व पाश जाळून मोकळा होतो. सतत आपलें निजधाम जो सूर्य त्याचें स्मरण राखून त्याशीं संगत होण्यासाठीं तो विरही उसळत असतो, धडपडत असतो ज्वाला-रूपानें.

### १०२. अमेयात्मा

व्यक्तमात्र परिच्छिन्न आहे, मेय आहे. परमात्मा हा तसा व्यक्त नसल्यामुळें तो अमेयात्मा म्हटला आहे. द्रव्य म्हटलें का, त्याला नाम रूप गुण कर्म लागलेच. मग तें द्रव्य सूक्ष्मातिसूक्ष्म का असेना, तें परमाणुरूप असलें तरी त्या परमाणूला वरील सर्व उपाधि लागलेच म्हणून समजा. ह्या सर्व समुच्चयालाच व्यक्ति म्हणावयाचें. म्हणूनच उपनिषदांनीं ब्रह्माचें वर्णन करतांना अच्छाय अनणु इत्यादि द्रव्य-गुण-क्रिया-निषेधाची भाषा वापरली आहे आणि त्याला निर्गुण ठरविलें आहे. अर्थातच त्याला कोणतेंहि क्रियापद लागूं शकत नाहीं. वाणीनें त्याचें वर्णन आणि मनानें त्याचें मनन होऊं शकत नाहीं. तसें झाल्यास तो "मेय" होईल, तो शब्दाच्या आणि मननाच्या पकडींत येईल. परंतु तो तर अमेयात्मा आहे. कोठल्याहि प्रकारें त्याचें मान होऊं शकत नाहीं. उपनिषदांनीं म्हटलेंच आहे "यतो वाचो निवर्तन्ते अप्राप्य मनसा सह".

### १०३. सर्वयोग-विनि:सृत

आपल्यास जगाचें ज्ञान आपल्या पंच ज्ञानेंद्रियांच्या 'योगें' होत असतें. हाच विषयेंद्रियसंयोग होय. असल्या कोणत्याहि विषयेंद्रिययोगापासून परमात्म्याचें ज्ञान होत नाहीं. म्हणून तो सर्वयोग-विनि:सृत म्हणावयाचा. इन्द्रियें बाह्य करणें, वाणी बाह्याबाह्य-करण, आणि मन व बुद्धि हीं अन्त:करणें होत. अग्नि, विद्युत्, सोम आणि सूर्य ह्या त्यांच्या अधिष्ठात्री देवता मानिल्या आहेत. त्यांच्या योगें परमात्म्याचें आकलन होत नाहीं. म्हटलेंच आहे–"न तत्र सूर्यो भाति न चन्द्रतारका: । नेमा विद्युतो भान्ति

कुतोऽयमग्नि:।। ह्या कोणाहि प्रकाशकांच्या पकडींत तो निर्गुण परमात्मा येत नाहीं म्हणून तो ''सर्वयोग-विनि:सृत'' होय, सर्व पकडींतून निसटलेला होय. पाऱ्याचा रवा चिमटीत धरतां येत नाहीं. धरतांच तो निसटतो. तसा हा परमात्मा कोणत्याहि पकडींत पकडला जात नाहीं. पकडला कीं निसटलाच तो! असा हा परमात्मा निसटू आहे.

योग म्हणजे आत्मलाभाचे उपाय. तद्द्वारा निष्पन्न होणारा म्हणून हि परमात्मा सर्वयोग-विनि:सृत म्हणतां येईल.

## १०४. वसु

''जिथें ज्याचें धन, तिथें त्याचें मन'' अशी म्हणच आहे. धन म्हणजे जीवनाधार होय. पुत्रगर्धी द्रोणानें अश्वत्थामा जीवनाधार मानिला होता. त्यामुळें अश्वत्थामा मेला असें कळतांच जगण्यांत कांहीं अर्थ नाहीं असें समजून त्यानें आपलें जीवन संपविलें. अशाच प्रकारें नाना जीव आपल्या आपल्या आवडीप्रमाणें आपआपलें धन कल्पीत असतात आणि त्यासाठीं जगत आणि मरत असतात. ही जी प्रत्येकाची आंतरिक अनपहार्य आवड आणि कल्पना ती परमेश्वरच होत असतो. तद्द्वाराच जीवाला सुख आणि समाधान लाभत असतें. तद्द्वाराच तो उच्चावच सिद्धि मिळवीत असतो. कान्होपात्रा, पिंगला याहि अशाच प्रकारें सिद्ध झाल्या. जीवाच्या विभिन्न आवडी व कल्पना यांना अनुसरूनच त्यांचे जीवनमार्ग, साधन आणि सिद्धि आकारल्या आहेत. जीवाचें सर्वस्व ज्यांत वसलें आहे तो त्याचा वसु म्हणावयाचा.

तसे सर्वसामान्य अष्टावसु प्रसिद्धच आहेत. ज्यांच्या योगें वसति सुखावह होते आणि ज्यांच्या वियोगें ती दुष्कर होते, त्या अष्ट वसूंत हि अग्नि हा प्रधान होय. कारण त्याच्या योगेंच जंगलांत माणसाला वास्तव्य करणें शक्य झालें आहे. विषारी वायु, व्याघ्रादि हिंस्र श्वापदें आणि थंडीवारा यांच्यापासून निवारा अग्नीनेंच दिला आहे. परंतु अग्नीचें हें बाह्य रूप झालें. त्याचें आंतरिक रूप म्हणजे क्रतु वा जीवाचा संकल्प होय आणि तोच त्याचा वसु.

## १०५. वसुमना

जीव हा वसुमना म्हणजेच संकल्पात्मा आहे. ''श्रद्धामयोऽयं पुरुष:'' गी. १७.३ असें म्हटलेंच आहे गीतेनें. परंतु हा संकल्प आला कोठून? तो परमात्म्यापासूनच आला आहे. ज्याचें मूळ परमात्म्यांत सांपडत नाहीं असें कांहीं एक या जगांत मुळीं नाहींच. म्हणून मूलत: परमात्मा हा संकल्पात्मा आहे आणि त्याचमुळें जीवहि संकल्पात्मा झाला आहे. अंतर इतकेंच कीं, ईश्वर सत्य-संकल्प आहे आणि जीव अनीश्वरत्वागुळें मोघसंकल्प आहे. मोघाशा मोघ-कर्माणो मोघज्ञाना विचेतस:। राक्षसीं आसुरीं चैव प्रकृतिं मोहिनीं श्रिता:।। गी. ९.१२

मोघत्वाचें कारण जीवाची मूढता होय. ती जितक्या अंशानें कमी होईल तितकी सिद्धि, तितकी सफलता अधिक. याचाच अर्थ झाला, संपूर्ण आत्मशुद्धि म्हणजेच संपूर्ण सिद्धि. ज्याच्यांत संकल्पाची आग नाहीं, तो मुर्दा माणूस होय. परमात्मा जिन्दादिल आहे. ही अपरंपार नित्यनूतन सृष्टि त्याची संकल्प-स्फूर्ति आणि पूर्ति होय.

पारशांच्या झेंद अवेस्तांत याशीं तुल्य असा वहुमना शब्द आला आहे. स चा ह करण्याची लकब त्यांची प्रसिद्धच आहे. सिन्धुस्थान=हिन्दुस्थान, सुरत=हुरत, असुर=अहुर इत्यादि शब्द त्याच लकबेचे निदर्शक होत.

## १०६. सत्य

सत् आणि सत्य एकच. तथापि, दोन शब्द ज्याअर्थीं आहेत त्याअर्थीं त्यांत कांहीं विशेष हि असलाच पाहिजे. तो विशेष असा म्हणतां येईल. सत् म्हणजे कूटस्थ-नित्य आणि सत्य म्हणजे त्याला

लक्षून केलेला सरळ व्यवहार, नीतीचा, न्यायाचा व्यवहार. परमेश्वर सत्-स्वरूप आहे म्हणजे तो कूटस्थ-नित्य आहे. आणि त्याचे कायदे सत्य आहेत, अपरिवर्तनीय आहेत. जो त्यांना अनुसरेल तो सरळ मार्गानें त्या सत्याला पोंचेल. जो अनुसरणार नाहीं तो आडवाटेला लागून सत्यापासून दूर पडेल. म्हणजेच वंचित होईल. सताला अनुसरणारें सर्व सत्यच होय. म्हणून दया, क्षमा, शांति इत्यादि सर्व 'सद्'गुण सत्यच होत. सत्यांत असत्य सोडून बाकी सारेंच येतें. परमेश्वराचें नांव सत्, त्याचें रूप सत्, त्याचे कायदे सत्, त्यांना अनुसरणाराला मिळणारें फळ सत्. असा हा परमात्मा सत्य आणि केवळ सत्य आहे.

### १०७. समात्मा

''निर्दोषं हि समं ब्रह्म।'' गी. ५.१९ या गीतोक्त लक्षणाप्रमाणें परमात्मा हा समात्मा म्हणजे साम्यस्वरूप आहे. सर्वदा आणि सर्वत्र तो अविकृत असतो, एकरूप असतो. वैषम्य हा जगाचा स्वभाव आहे, तर साम्य हा परमात्म्याचा स्वभाव आहे. परमेश्वर अंतर्यामिरूपानें सर्वांच्या ठाईं समान वसला आहे. 'जसें कर्म तसें फळ' या न्यायानें तो सर्वांवर समान अनुग्रह करीत आहे. तसेंच कालरूपानें तो सर्वांचा समान संहार करीत आहे. अशा प्रकारें तो केवल निःपक्षपात आहे. म्हटलेंच आहे. गीतेंत–''समोऽहं सर्व-भूतेषु न मे द्वेष्योऽस्ति न प्रियः'' गी. ९.२९. तात्पर्य, तत्त्वतः आणि व्यहारतः हि तो सम आहे. म्हणून तो समात्मा. परमेश्वर साम्यरूप आहे म्हणून त्याला पोंचण्याचा उपाय हि साम्यच होय. तोच योग. इतर सारे योग आडनांवाचे आणि आडवळणाचे होत.

### १०८. संमित

संमित म्हणजे आत्मसंमित, आपल्याजोगा आपल्या आकारा-प्रकाराचा. परमात्मा देही होऊन त्या त्या योनीच्या आकाराप्रकाराचा होतो. तो गजांत गजाकार आणि रजांत रजाकार म्हणजे परमाणुरूप होतो. तो ब्रह्मदेवाच्या ठाईं ब्रह्माभिमानी आणि तृणाच्या ठाईं तृणाभिमानी होतो. त्यामुळें तो ज्याला त्याला आत्मसंमित होय.

असंमित असा हि पाठ संभवतो. असंमित म्हणजे कोणाहिजोगा नसलेला, अप्रतिम. परमात्मा हा कोणासारखा म्हणावा? तो अनन्य-साधारण आहे. ज्याचें नांव घेऊं त्याहून तो वेगळा आणि विलक्षण आहे. तो अशा प्रकारें आपल्यासारखा आपणच असल्यामुळें सहजच असंमित ठरतो.

**तुका म्हणे जें जें बोला। तें तें साजे या विठ्ठला।।**

### १०९. सम

सम म्हणजे वैषम्यरहित. त्रैगुण्य हें वैषम्य होय. परमात्मा हा त्रिगुणातीत असल्यामुळें तो सम आहे. ह्या त्याच्या निस्त्रैगुण्य तुरीय प्रतिष्ठेमुळें कोणत्याहि शीतोष्ण-सुखदुःखादि द्वंद्वांचा त्याच्यावर कांहीं एक परिणाम होत नाहीं. द्वंद्वांचा कसला हि परिणाम होत नसल्यामुळें तो आपलें कार्य रागद्वेषवश न होतां स्वाधीनपणें करतो. तो विश्वाची सृष्टि आसक्तीनें करीत नाहीं किंवा संहार द्वेषानें करीत नाहीं. तो कार्य स्वाधीनपणें विकारवश न होतां करीत असल्यामुळें अर्थात् आत्मतृप्त असल्यामुळें कर्मफळांविषयीं तो सम असतो. सिद्धि मिळो वा असिद्धि, तो कर्तव्य-विमुख होत नाहीं.

अशा प्रकारें तत्त्वतः आणि व्यवहारतः तो सम असतो आणि ही जी त्याची समता तीच त्याची मा म्हणजे सुषमा होय. त्या लक्ष्मीनें तो सदैव युक्त असतो म्हणून तो सम. 'सहितो मया समः।'

### ११०. अमोघ

अमोघ म्हणजे ज्याचा संकल्प कधीं व्यर्थ जात नाहीं तो, सत्य-संकल्प परमात्मा. जीवाचे संकल्प सिद्धीस

जात नाहींत. जे जातात ते त्याच्या सामर्थ्यामुळें नव्हेत, तर परमेश्वराच्या कृपेमुळें होत. परमेश्वराचा संकल्प, त्याची वाणी, त्याची करणी सर्वच अमोघ आहेत..कारण असत्याची छाया हि परमेश्वरास स्पर्शूं शकत नाहीं. जे सत्याची म्हणजेच परमेश्वराची अनन्य भावानें उपासना करतात, त्यांच्या ठाईं हि हें सामर्थ्य प्रकट होतें, अर्थात् सामर्थ्यमात्र सत्याचें आहे आणि तें अमोघ आहे. जेथें सत्य तेथें शक्ति, जेथें शक्ति तेथें सामर्थ्य, जेथें सामर्थ्य तेथें सिद्धि. असें असल्यामुळें सत्यस्वरूप परमात्मा हा अमोघ म्हटला आहे आणि अमोघाची उपासना हि अमोघच. त्याचें स्मरण अमोघ आहे, त्याचें कीर्तन अमोघ आहे, त्याचें वन्दन अमोघ आहे. जे सत्यविमुख होत त्यांचे सारेच मोघ म्हणजे व्यर्थ होय. त्यांनाच गीतेनें आसुरी आणि राक्षसी म्हटलं आहे :-

**मोघाशा मोघकर्माणो मोघज्ञाना विचेतसः।**
**राक्षसीं आसुरीं चैव प्रकृतिं मोहिनीं श्रिताः।।**
गी-९.१२

## १११. पुण्डरीकाक्ष

पुण्डरीक म्हणजे श्वेत कमल आणि अक्ष म्हणजे डोळा. कमळ उमलतें, मिटतें, प्रसन्नता, खिन्नता इत्यादि नाना भाव विखरतें, तें इकडे-तिकडे डोलतें. आंतील मधु-गोलकाचें त्याचीं दलें रक्षण करतात इत्यादि सादृश्यामुळें नेत्राला कमलाची उपमा कवींनीं दिली आहे. कवि नेत्राला त्याच्या तांबुसपणामुळें राजीवाची, त्यांतील क़नीनिकेच्या व पापण्यांच्या काळेशारपणामुळें इन्दीवराची आणि त्याच्या शुभ्र अपांगामुळें पुण्डरीकाची उपमा देतात. त्यांत जें काळें बुबुळ आहे तें जणूं भुंगा होय. शिवाय कमलपत्रावर जल जसें चिकटून बसत नाहीं, त्याप्रमाणें नेत्रावर कोणतें हि रूप चिकटून बसत नाहीं. या दृश्यजगत्कासारांत पोहणारें नेत्र-कमल अलिप्त राहून सर्वत्र संचरत असतें. भगवंताचा नेत्र म्हणजे सूर्य. तो पुण्डरीकाप्रमाणे केवळ विशुभ्र आहे. तो सर्व जगद्व्यापार अलिप्त राहून पाहत आहे. म्हणून भगवंताला पुण्डरीकाक्ष म्हणतात. इतर कोणा हि जीवाला पुण्डरीकाक्ष पद लावलें जात नाही.

## ११२. वृषकर्मा

वृष म्हणजे वृषभ. सिंह हिंसक आणि विघातक शक्तीचा प्रतीक आहे. पण वृषभ अहिंसक आणि विधायक शक्तीचा प्रतीक आहे. त्यामुळें तो धर्माचा पर्याय झाला आहे. कारण धर्म म्हणजे दयाधर्म होय. प्रजांचें पालन हा धर्म आहे. त्याचें एक अंग म्हणजे सज्जनांचा अनुग्रह आणि दुसरें दुर्जनांचा निग्रह होय. निग्रह हा हि सज्जनांच्या रक्षणासाठींच असल्यामुळें तो हि धर्मरूपच आहे, यालाच धर्म-संस्थापन म्हणतात. आणि हें कार्य म्हणजे वृषकर्म होय. धर्मरूप कर्म होय. हें असें निग्रहानुग्रहरूप धर्म-संस्थापन परमेश्वर करीत असतो म्हणून त्याला वृषकर्मा म्हणावयाचें. वृष म्हणजे वृषभ खतामुताची वृष्टि करून शेती सुपीक करतो. शेतीसाठीं गोन्हे आणि दुधासाठीं कालवडी देतो. शेती आणि दूधदुभतें यांच्यायोगें तो प्रजांचें पालन करतो. शेती नांगरून आणि वखरून तणाचा नायनाट करतो. त्यामुळें तो धर्माचा प्रतिनिधि झाला आहे, पर्याय झाला आहे. गोब्राह्मण-प्रतिपालन म्हणजे धर्म आणि धार्मिक यांचें प्रतिपालन होय. केवळ गाय या जनावराचें आणि ब्राह्मण या जातीचें प्रतिपालन नव्हे.

## ११३. वृषाकृति

वृष हीच ज्याची आकृति आहे तो वृषाकृति. परमात्मा हा अव्यक्तमूर्ति आहे. त्याची व्यक्त मूर्ति कोणती म्हणावी? धर्म हीच त्याची मूर्ति होय, खूण होय. जिथें जिथें दयाधर्म नांदतो ती ती परमेश्वराची मूर्ति होय. ''तोचि भगवंताची मूर्ति'' म्हणून तुकारामानें म्हटलेंच आहे. स्वार्थ म्हणजे आपला देह व तदनुबद्ध पुत्रकलत्रादि यांच्यासाठीं जगणें. हा स्वार्थ

जिथें नाहीं ती परार्थैकजीवितता म्हणजे धर्म होय, दया होय. वृष म्हणजे गोजाति त्याची मूर्ति मानिली आहे. जणूं ती परार्थैकजीवित आहे. ती गवत खाऊन आम्हांला अमृत देतें. स्वत: शेतांत राबून शेण-मूत आणि घाम गाळून आम्हाला धन-धान्यानें समृद्ध करते. जिवंतपणीं आपल्या प्रत्येक दानानें ती आम्हांला सुखवितेच, पण मेल्यावरहि हें व्रत सोडीत नाहीं. मरतांनाहि ती आपलें चामडें, हाडें, शिंगें, खुरें आणि रक्तमांस देऊन जाते. अशा परोपकारी जीवाला साक्षात् धर्म म्हणावयाचें नाहीं तर कोणाला म्हणायचें? गाईप्रमाणेंच ब्राह्मणहि परार्थैक-जीवित मानिला आहे. दधीचीनें आपलीं हाडें देवकार्यासाठीं दिलीं.

**ब्राह्मणस्य हि देहो ऽयं क्षुद्रकामाय नेष्यते।**
**तपसे ब्रह्मणे चेह प्रेत्यानन्त-सुखाय च।।**

—मनु

म्हणून गोब्राह्मणांचा, द्विपादचतुष्पादांचा, एक वर्ग होतो. आणि ''गोब्राह्मणेभ्य: शुभमस्तु नित्यम्'' अशी प्रार्थना केली जाते. अर्थात् नि:स्वार्थ ज्ञानवृत्ति हेंच धर्माचें स्वरूप होय आणि तीच परमात्म्याची कुडी. म्हणून परमात्मा वृषाकृति.

सत्त्वशुद्धीसाठीं तपश्चरण आणि स्वाध्याय हा त्याचा देह असे तोंवर एकमेव उद्देश आणि उद्योग असतो आणि तो उद्देश व उद्योग आटोपला म्हणजे देहपातोत्तर अनन्त असें ब्रह्मसुख त्याच्या वांट्यास ठेवलेलें असतें. त्याचसाठीं त्याचा जन्म असतो. गोवंशावर नि:स्वार्थतेचा, परार्थैक जीवितत्तेचा, गुणारोप केला जातो, परंतु ब्राह्मण हा त्या गुणाबरोबरच ज्ञानमय होऊन राहतो हा विशेष. गो केवळ वात्सल्याची मूर्ति तर ब्राह्मण हा भूतहितेरतीची व ज्ञानाची हि मूर्ति होय.

## ११४. रुद्र

परमेश्वर वासना देऊन जीवांना रडवितो म्हणून तो रुद्र. रुद्र ही गणदेवता आहे. रुद्र एकादश मानिले आहेत हे एकादश कोणते.? पांच प्राण, पांच ज्ञानेंद्रियें आणि एक मन यांचा संघ म्हणजे रुद्रगण होय. हा गण जेव्हां देहांतून बाहेर पडतो तेव्हां तो जीवाला आणि त्याच्या आप्तांनाहि रडवितो म्हणून तो रुद्र. त्याला आत्मज्ञानानें शमविलें म्हणजेच तो शिव होतो.

समाजांतील उपेक्षित लोक जे (१) अनाथ मुलें, (२) असहाय वृद्ध, (३) तिरस्कृत रुग्ण, (४) अपहृतस्व विधवा, आणि (५) बेकार म्हणजे समर्थ पण उद्योग-वंचित लोक तसेच, (६) ब्राह्मण निरक्षर, (७) क्षत्रिय अन्यायी, (८) वैश्य कृपण आणि (९) शूद्र वंचक त्याचप्रमाणें, (१०) दरिद्र अनुद्यमी आणि (११) श्रीमंत अदाता हे एकादश गण हि समाजांतील रुद्र होत. जे स्वत: रडतातच, पण समाजाला हि रडायला लावतात. ह्यांना संतुष्ट ठेवलें आणि यांची व्यवस्था केली तरच रुद्र प्रसन्न होतो आणि समाजाला रडवीत नाहीं.

अशा प्रकारें व्यक्ति आणि समाज रुद्रोपासना करील तर ती उपासना व्यक्तीला आणि समाजाला सुखावह होईल. परंतु रुद्राची उपेक्षा झाल्यास तो रडवीलच.

## ११५. बहुशिरा

रुद्र ही गणदेवता तेज:स्वरूप आहे. या तेजाचीं तीन शिरें आहेत. पैकीं एक स्वर्गांत, एक अन्तरिक्षांत आणि एक पृथ्वीवर आहे. अनुक्रमें सूर्य, विद्युत् आणि अग्नि हीं तीं शिरें होत. दोहोंहून अधिक संख्येला बहु म्हणतात. अर्थात् बहुवचनासाठीं किमान तीन तरी संख्या हवीच. तशी ती इथें आहे म्हणून रुद्रस्वरूप परमात्मा हा बहुशिरा म्हटला आहे. अर्थात् बहुशिरा म्हणजे त्रिशिरा होय. बहुशिरा आणि

सहस्रमूर्धा दोन्ही परमेश्वराचींच नांवें. परंतु त्यांचें तात्पर्य वेगळें आहे. बहुपद संख्यावाचक आहे. पण सहस्र हें संख्यावाचक विशेषण असंख्यत्ववाचक आहे. तें परमात्म्याच्या असंख्येयत्वाचा, अनन्तत्वाचा निर्देश करतें. जीवन सुखावह करणारा आधिभौतिक अग्नि, जीवनधारक वैश्वानर-संज्ञक आधिदैविक कायाग्नि हे दोन्ही अग्नि ज्याचे आविष्कार आहेत तो चित्संज्ञक आध्यात्मिक अग्नि हीं त्या रुद्राचीं तीन शिरें होत. पहिलीं तीन लौकिक असून हीं दुसरीं तीन अलौकिक होत.

## ११६. बभ्रु

या रुद्रादि महातपान्त श्लोकांतील पदें रुद्रदेवतावाचक आहेत. अर्थात् रुद्रस्वरूप परमात्मवाचक. बभ्रु हें पद हि अर्थातच रुद्रवाचक घ्यायचें आहे. बभ्रु म्हणजे विचित्र. काळा निळा लाल पिवळा. एका शब्दांत नीललोहित. अग्नि हा नील-लोहित आहे. काळसर, पिवळी, लाल, निळी, हिरवी, जांभळी आणि पांढरी अशा सप्तरंगी वा बहुविध ज्वालांनीं अग्नि पेटतो आणि प्रकटतो. अशा अनेक रंगी ज्वालांनीं नटलेला म्हणून बभ्रु. वस्तुत: तेजोराशि परमात्मा निरञ्जन आहे. पण तें अव्यक्त तेज जेव्हां गुणद्वारा प्रकटतें तेव्हां गुणसंगानें तें शबल होतें. त्यामुळेंच त्याला ब्रभ्रु म्हणावयाचें. तें सत्त्वगुणाश्रयानें शुभ्र, रजोगुणाश्रयानें लोहित आणि तमोगुणाश्रयानें कृष्ण वाटतें. त्रिवेणींत जसे गंगायमुनांचेच प्रवाह दिसतात आणि सरस्वती गुप्त असते, तसे या गुणप्रवाहांतील शुक्ल प्रवाह लुप्तसा असून रक्त व कृष्ण प्रवाह उठून दिसतात. म्हणून अव्यक्त निरञ्जन परमात्म्याचा व्यक्त प्रकाश नीललोहित म्हटला आहे. ब्रभ्रुवाहन शब्दांत बभ्रु शब्द अग्निवाचकच असून बभ्रुवाहन म्हणजे अग्नि ज्यांचें वाहन आहे ते देव होत. ''स देवां एह वक्षति'' ऋ. १.१.२ असें म्हणूनच अग्नीस प्रार्थिलें आहे.

## ११७. विश्वयोनि

परमात्म्याचें तें निरंजन तेज, ज्याचें ध्यान गायत्री मंत्रांत म्हटल्याप्रमाणें आपण करावयाचें आहे, या विचित्र नानावर्णाकृति विश्वाचें मूळ आहे. म्हणून त्याला विश्वयोनि म्हटलें आहे. सूर्यमालादि विश्व हें तेजोनीहारिकेपासून निर्माण झालें आहे असें पदार्थशास्त्रज्ञ मानितात. वेदान्तीहि विश्वोत्पत्ति परमात्मस्वरूप तेजापासूनच चित्तत्त्वापासूनच झाली आहे असें मानितात. तें तेजच सर्व-मूळ आहे. जडाचें मूळ चेतनच असणार. व्यक्ताचें मूळ अव्यक्तच असणार. क्षराचें मूळ अक्षरच असणार. असा तो परम पुरुष आहे. तोच या विश्वाचा आदि पुरुष. जो आदि पुरुष तोच विश्वयोनि. आदिपुरुष ऊर्णनाभवत् आपणच आणि आपल्यापासूनच विश्व निर्मितो. त्यामुळें तोच या विश्वाचें निमित्त आणि उपादान कारण हि झाला आहे. निमित्त कारण या नात्यानें तो पुरुष आहे. विश्वरेता आहे. उपादान कारण या नात्यानें तो प्रकृति आहे, विश्वयोनि आहे. दोन्ही एकस्थ आणि परस्पर संपृक्त आहेत. या तत्त्वज्ञानाचें चित्र अर्धनारीनटेशाच्या रूपानें कवींनीं रेखाटलें आहे. शक्तिमान् आणि शक्ति अभिन्न आहेत, असें तें सुचवितें.

## ११८. शुचिश्रवा

श्रवस् म्हणजे नाम, कीर्ति. ज्याची कीर्ति, ज्याचें नाम, शुचि म्हणजे उज्ज्वल आहे, तो शुचिश्रवा. नाम वा कीर्ति करणीवरून होते. करणी जर उज्ज्वल नसेल तर नाम वा कीर्ति कशी उज्ज्वल होईल? अग्नि-स्वरूप रुद्रपरमात्म्याची करणी प्रकटच उज्ज्वल आहे. म्हणूनच तो शुचिश्रवा होय. ज्याची ही सर्वाश्चर्यमय विश्वरूप कृति सर्वांना प्रकट आहे, त्याचें नाम, त्याची कीर्ति किती उज्ज्वल म्हणावी! तो शुचिश्रवा आहे, उच्चै:श्रवा आहे. त्याची कीर्ति सर्वांच्या कीर्तीला मागें टाकून पुढें सरसावलेली आहे, सर्वातिशायी आहे. अग्नि प्रकाशतो, प्रकाशित करतो, म्हणून तो

देव होय. विश्व हा त्या परमात्मसंज्ञक अग्निदेवाचा प्रकाश होय. त्यामुळें तो शुचिश्रवा आहे, उज्ज्वलकीर्ति आहे.

### ११९. अमृत

''विद्यया अमृतं अश्नुते'' विद्येच्या योगें प्राप्त होणारें जें, तें अमृत होय. विद्येच्या योगें अविद्या-निरसन होऊन आत्मोपलब्धि होते. ती आत्मोपलब्धिच अमृत होय. आत्मोपलब्धीनेंच जीव सर्वदैन्यमुक्त होऊन ''स्वे महिम्नि'' प्रतिष्ठित होतो. अज अजर अमर होऊन अभय होतो. हें अभयच अमृत होय.

अमृत स्वर्गात आहे. आणि स्वर्ग मेल्याशिवाय दिसत नाहीं. याचा अर्थ हा कीं देह आहे तोंवर स्वर्ग मिळत नाहीं आणि स्वर्गीय सुख अमृतहि मिळत नाहीं. ''न हि सशरीरस्य सत: प्रियाप्रिययो: अपहति: अस्ति'' देह आहे तोंवर सुखदु:खोपपत्ति होतच राहणार. आणि असा सुखदु:खांचा उपद्रव जिथें नाहीं तोच स्वर्ग होय आणि ती सुखदु:खातीत साम्यावस्था म्हणजेच अमृत होय.

संसार-समुद्राचें मंथन करून निघालेलें हें जें अमृत तें देवांनीं प्राशिलें म्हणून ते अमर झाले. जे हें परमात्मस्वरूप अमृत आत्मसात् करतात ते अमृतच होतात. ''निर्दोषं हि समं ब्रह्म, तस्माद् ब्रह्मणि ते स्थिता:।'' गी. ५.१९

### १२०. शाश्वत-स्थाणु

प्रतिक्षणीं बदलणाऱ्या या जगांत काय शाश्वत आहे? आणि स्थाणु म्हणजे स्थितिशील तरी काय आहे? काल क्षणश: परिवर्तनशील आहे, तसें द्रव्यजात हि कणश: परिवर्तनशील आहे. सापेक्षतेनें समस्त ग्रासलें आहे. समस्त अनिश्चित आहे. द्रव्य गुण क्रिया फल सर्व कांहीं अस्थिर आहे. हा अस्थिरतेचा प्रवाह गुणजन्य आहे. परंतु जें गुणविलक्षण आहे तें निर्गुण ब्रह्म मात्र गुणांच्या चांचल्यापासून सर्वथा मुक्त असून तेंच कालत: शाश्वत आणि वस्तुत: स्थाणु आहे. म्हणूनच परमात्मा हा शाश्वत-स्थाणु म्हटला आहे. कसली हि विक्रिया त्याच्या ठायीं संभवत नाहीं, म्हणून तो शाश्वत, म्हणून तो स्थाणु. स्थाणु पद पूर्वी येऊन गेलें आहे. इथें तें शाश्वतपदाशीं समस्त होऊन आलें आहे. त्यामुळें तें कालत: आणि वस्तुत: परमात्म्याचें दिक्कालाद्यनवच्छिन्नत्व विभागश: प्रकट करीत आहे.

''युगें अठ्ठावीस विटेवर उभा'' असलेला पांडुरंग हा शाश्वत-स्थाणु होय. शाश्वत-स्थाणु परब्रह्माची ती खूण आहे. संसाररूप भीमानदीचा अनित्यतारूप प्रवाह त्याच्या समोरून वाहत आहे आणि तो त्याचा सनातन साक्षी आहे.

### १२१. वरारोह

ज्याचा आरोह म्हणजे उन्नति वर म्हणजे श्रेष्ठ आहे. तो वरारोह. परमेश्वराहून समुन्नत दुसरें काय आहे? तो उच्चाहून उच्च आहे. तो परात्पर आहे. तो तेजोराशि परमेश्वर अग्निस्तंभ रूपानें प्रकटला. त्याचे आदिअन्त जाणायला ब्रह्मा आणि विष्णु निघाले. परंतु दीर्घ काळ शोध करून हि त्यांना ते आदि अन्त गांठतां आले नाहींत; तेव्हां ते नम्र झाले आणि परमेश्वराच्या अचिंत्य वैभवाचें स्तवन करीत बसले. अशी आख्यायिका प्रसिद्धच आहे.* त्याची उंची किती आहे हें आजवर कोणाला कळलेंच नाहीं. आणि त्याची खोली किती आहे हें हि कळलें नाहीं. असें हें भगवत्तेज वरेण्य आणि वरणीय आहे.

जे वर आहेत ब्रह्म-विष्णुवत् त्यांनाच ते आरोहणीय आहे. इतर प्राकृत त्याच्या जवळ हि जाऊं शकत नाहींत. म्हणूनहि तो परमात्मा वरारोह म्हटला आहे.

---

*** तवैश्वर्यं यत्नाद् यदुपरि विरिञ्चिर् हरिरध:
परिच्छेत्तुं यातौ अनलमनल-स्कन्ध-वपुष:।
ततो भक्ति-श्रद्धाभर-गुरु-गृणद्भ्यां गिरिश यत्
स्वयं तस्थे ताभ्यां; तव किमनुवृत्तिर् न फलति।।**

**—महिम्नस्तोत्र १०**

## १२२. महातपा

आत्मशुद्धीसाठीं जें केलें जातें त्याला तप म्हणतात. मग तें कायिक वाचिक वा मानसिक कसें हि असो. तें सारें तपच होय. सोनें अग्नींत टाकलें म्हणजे त्याचें हीण जळून गळून जातें आणि तें निखळ होतें. तसें योगी तपाच्या भट्टींत आपली आत्मशुद्धि करतात. योगाग्नीनें देहकारण अज्ञान अर्थात् कारणदेह जाळून निखळ आत्मरूप गांठतात. हेंच महातप होय. भगवान् रुद्र हा योगीश्वर आहे. तो योगाग्नि पेटवून देहांतील वासनांना रडायला लावतो त्यांना जाळून भस्म करतो. सारा देह-गेह-स्नेह जाळून साऱ्या अशिव संसाराचें श्मशान करून तो शिव बसला आहे. देह शिल्लक ठेवून केलेली शुद्धि ही खरी आणि पुरी शुद्धि नव्हे. ''शौचात् स्वांग-जुगुप्सा'' असें योगसूत्र आहे. ज्यानें आपला देह आणि देहनिदान अज्ञान जाळून खाक केलें त्याहून अधिक शुचि कोण? शिव हा असा आहे, म्हणून तो महातपा. परमात्माच सदैव देह-संबंध रहित असल्यामुळें तोच एक महातपा म्हणावयाचा. बाकी सारे देहधारी ते किती हि मोठे असले तरी अल्पतपाच किंबहुना अतपस्वीच म्हणावयाचे.

## १२३. सर्वग

सर्वग म्हणजे सर्वगत. परमात्मा या समस्त सृष्टीचें कारण असल्यामुळें तो सर्वगत आहे, सर्वव्यापी आहे. भाजन-भेद असंख्य असले तरी तीं सर्व भाजनें मृण्मात्र होत, मृण्मय होत, मृद्व्याप्त होत. तसें हें सर्व विश्व चिन्मात्र आहे, चिन्मय आहे, चिद्व्याप्त आहे. कारण हें कार्यानुगत, कार्यमात्रानुगत असल्यामुळें तें सर्वग म्हटलें आहे. आणि जें सर्वग तेंच बृहत् म्हणजे ब्रह्म होय. कारण हें कार्या-कार्याहून मोठें आहेच, पण तें सर्व कार्यांना पुरून उरणारें म्हणून हि मोठें आहे. म्हणूनच म्हटलें आहे ''पादोऽस्य विश्वा भूतानि। त्रिपाद् अस्यामृतं दिवि।'' कार्य हें एकदेशीच असावयाचें. अल्पीयसच असावयाचें. कारण हें तसें एकदेशी नाहीं. म्हणून तें सर्वग; म्हणून तें बृहत्. कार्य-विस्तार-व्यापी म्हणून कारण सर्वग म्हणावयाचें, पण कार्य-विस्तारातिरिक्त म्हणून तें बृहत् वा ब्रह्म म्हणावयाचें. कारणाधीनच कार्य असतें, पण कारण कार्याधीन नव्हे. तें स्वतंत्र असतें. म्हणून तें सर्वग म्हणजे सर्वव्यापीच नव्हे, तर सर्वातिशायी आहे.

## १२४. सर्वविद्-भानु

भानु म्हणजे सूर्य हा विश्व-प्रकाशक म्हणून प्रसिद्ध आहे. परंतु तो वस्तुत: केवळ बाह्य-प्रकाशक आहे. तो बाह्याबरोबर अभ्यन्तराचें हि प्रकाशन करीत असता तर त्याला अन्वर्थकपणें विश्व-प्रकाशक म्हणतां आलें असतें परंतु तो तसा नसल्यामुळें त्याला सर्वविद् हें विशेषण जोडून परमेश्वराचें वर्णन केलें आहे. परमेश्वर हाच एक असा भानु आहे, प्रकाशक आहे, कीं जो बाह्याभ्यंतर समस्त विश्व प्रकाशित करतो. सूर्य पृथ्वी अंतरिक्ष आणि आकाश हे तिन्ही हि लोक प्रकाशित करतो, त्यामुळें तोहि जणूं सर्वविद् झाला. तो विश्वाचा वरचा, मधला आणि खालचा भाग जाणतो म्हणून तो हि सर्वविद् म्हटला. आणि त्यामुळेंच त्याची उपमा परमेश्वराला दिली आहे. तथापि तसें करतांना तो असर्ववित् आहे असेंहि सुचवून अनुपम परमात्म्याला, सर्ववित् परमात्म्याला, त्याची उपमा देतां येण्यासारखी नाहीं. याचें हि भान राखलें आहे. सूर्य त्रिलोकीचें प्रकाशन करीत असला तरीहि त्रिलोकी केवळ सूर्यमालेंतीलच असणार. तिच्या बाहेर तिच्याहून मोठ्या किती त्रिलोकी आहेत याची गणना नाहीं. म्हणजे अन्तर्बाह्य दोन्ही क्षेत्रें सूर्य जाणत नाहींच पण बाह्यहि नि:शेष जाणत नाहीं. अशा सूर्याची उपमा परमेश्वराला कशी देतां येईल?

## १२५. विष्वक्सेन

विष्वक् म्हणजे सर्वतोदिश आणि सेना म्हणजे सैन्य. ज्याची सेना सर्वत्र आहे, तो विष्वक्-सेन. सेना हें प्रभुत्वाचें साधन आहे. ज्याच्या पदरीं सेना असते,

तो राज्य करतो. पृथ्वीवरील राजाची सेना मोजकीच असते. त्या लहान मोठ्या सेनेच्या बळावर ते राजे आपलें लहान मोठें राज्य चालवीत असतात. एखादा राजा सार्वभौम म्हणवितो. परंतु त्याचें सार्वभौमत्व आपल्या प्रदेशा-पुरतेंच असतें. संपूर्ण पृथ्वीचें राज्य कोणाचेंच असत नाहीं. पुन्हां सर्व क्षेत्रांत हि त्याची सत्ता चालत नाहीं. विद्या, कला, कुशलता इत्यादि क्षेत्रांत त्याची सत्ता आपल्या प्रदेशांत हि चालत नाहीं. सर्वांच्याच देहावर राजाची सत्ता मानिली, तरी सर्वांच्या मनावर त्याची सत्ता नाहींच चालत, सर्वांच्याच काय पण स्वत:च्या मनावर तरी राजाची सत्ता चालते काय? सारांश, सेनापति म्हणविणारे राजे हे आडनांवाचेच राजे होत. त्यांची सत्ता नाममात्रच. परमेश्वरच एकमात्र सर्व सत्ताधीश आहे. कारण, त्याची सेना सर्वत्र पसरलेली आहे. त्यामुळें सर्वत्र त्याचेंच राज्य आहे. या विष्वक्-सेनाचा सैनिक म्हणजे भूतमात्राचा प्रत्यगात्मा, अन्तर्यामी होय.

## १२६. जनार्दन

जन म्हणजे जीव आणि अर्दन म्हणजे पीडणारा. परमेश्वर जीवांना त्यांच्या कर्माप्रमाणें शुभाशुभ फल देऊन पीडत असतो. पाप कर्माचें फळ दुर्गति देऊन जीवांना तो पाप कर्माचें प्रायश्चित्त करायला लावतो आणि पुण्य कर्माचें फळ सुगति देऊन आणि तद्द्वारा पुण्यकर्माचा क्षय करून कर्मचित लोकांचें अनित्यत्व दाखवून देत असतो. अनित्यत्व आणि दु:खरूपत्व दोन्ही हि त्याज्य होत, हें त्यांना तो स्वानुभवानें पटवीत असतो. ''अनित्यं असुखं लोकं इमं प्राप्य भजस्व माम्'' गी. ९.३३ असें तो जीवांना उपदेशीत असतो. अशुभ गतीनें उघडच दु:ख होत असतें आणि शुभ गतीच्या अनित्यत्वानें हि, त्या लोकांतून पुनरागति झाल्यानें दु:खच होतें. अशा प्रकारें उभयथा परमेश्वर जीवांचें अर्दनच करीत असतो.

या अर्दनांत त्याचा हेतु जीवांच्या ठाईं जिज्ञासुता पेरण्याचा असतो, अर्दन करण्याचा नसतो. आणि सदर अर्दनाचें फलित हि शेवटीं जिज्ञासुतोत्पत्ति द्वारा आत्मज्ञानलाभच असतें. या दोन्ही कारणांनीं जनार्दन म्हणजे जनांना, भक्तांना, त्यांनीं याचिला असतां परम-पुरुषार्थ-लाभ करून देणारा असा अर्थ निष्पन्न होतो.

## १२७. वेद

वेद अक्षरस्वरूप आहेत. आणि ब्रह्माचेंहि तेंच लक्षण आहे. ''अक्षरं ब्रह्म परमम्'' त्यामुळें वेदाला ब्रह्म आणि ब्रह्माला वेद हीं पर्याय नामें झालीं आहेत. वेदाचें हें रहस्य जर ओळखलें नाहीं तर वेदाची किंमत कितीशी? ती हि अक्षरमात्रच म्हणावी लागेल. शब्दाला अर्थ असतो, अक्षराला नाहीं. अक्षर अव्यक्तस्वरूप आहे, शब्द व्यक्त आहे. व्यक्ताची कितीहि किंमत केली तरी ती परिमितच. अव्यक्ताची सर त्याला यायचीच नाहीं. अक्षर अव्यक्त आहे, म्हणून त्याची किंमत अगणितच आहे. वेद हे तसे हि अक्षर-स्वरूपच आहेत. म्हणूनच त्याना अक्षरराशि म्हटलें जातें. आणि त्यांच्या अन्वयार्थाची व्यर्थ लावालाव वैदिक करीत नाहीत. कारण त्यांना एकच अर्थ सुनिश्चित आहे, अक्षर (ब्रह्म). त्याचा परत अर्थ तो काय करायचा? आणि करून हि त्याहून अधिक उंच अर्थ कोणता होणार? ध्रुवाहून वर कुठें जाणार? तिथून जाणें म्हणजे खालींच जाणें. म्हणून वेद म्हणजे अक्षर आणि अक्षर म्हणजे तेंच.

## १२८. वेदवित्

वेदवित् म्हणजे वेद जाणणारा, अर्थात् अक्षरवित्, ब्रह्मवित्. वेदवित् तो नव्हे, जो वेदाचीं अक्षरें जाणतो, तर तो होय जो आत्मज्ञ आहे. वेदाची अक्षरें घोकणारा आणि षडंगांचें अध्ययन करणारा ब्रह्मचारी, यज्ञयागांत आणि संस्कारांत त्यांचा विनियोग करणारा गृहस्थ, तपस्या करून महावाक्य-विचारानें आत्म-चिंतन करणारा वानप्रस्थ आणि ''अहं ब्रह्मास्मि'' म्हणून विदेह विहार करणारा संन्यासी हे सगळे वेदवित्

आहेत. सगळ्यांचा उद्देश वेद आत्मसात् करण्याचा आहे. तदर्थच त्यांचें जीवन आहे म्हणजे प्रयास आहे. त्यांतच परिणति आहे. संकल्प, साधन आणि सिद्धि जर वेदरूप आहे, तर तो वेदवित्च म्हणावयाचा.

**ब्रह्मार्पणं ब्रह्म हविर् ब्रह्माग्नौ ब्रह्मणा हुतम्।**
**ब्रह्मैव तेन गन्तव्यं ब्रह्मकर्मसमाधिना।।**

अशी ब्रह्मकर्मसमाधि ज्याची लागली तो वेदवित् होय. परमात्माच असा वेदवित् आहे. असा वेदवित् परमात्माच होय.

### १२९. अव्यङ्ग

विकलांग म्हणजे व्यंग. जो व्यंग नव्हे तो अव्यंग. परमेश्वर सर्वांग-संपूर्ण आहे. त्याच्यांत अमुक एक अंग उणें आहे असें म्हणतां येत नाहीं. म्हणून तो अव्यंग. परमेश्वर वस्तुत: अव्यक्त-मूर्ति आहे. आणि त्यामुळेंच व्यक्ताबरोबर येणारे जे गुणदोष त्यांतून तो मुक्त आहे. कोणतीहि व्यक्ति कितीहि सर्वांग-सुंदर कल्पिली तरी तिच्या ठायीं कांहींना कांहीं न्यून आढळतेंच आढळतें. कोणी रूपवान् आहे, तर तो गुणवान् नाहीं, कोणी गुणवान् आहे, तर रूपवान् नाहीं. कोणी गुण-रूपवान् आढळलाच तर तो शीलवान् नाहीं. शीलवान् असला तर ज्ञानवान् नाहीं. ज्ञानवान् असला तर चिरंजीव नाहीं. तात्पर्य व्यक्ति म्हटली कीं ती निर्दोष नसायचीच. म्हणून परमेश्वर जो सर्वांग-सुंदर , निर्दोष आहे तो अव्यक्त-मूर्ति आहे. आणि म्हणूनच तो अव्यंग. अनित्यता वा मिथ्यात्व सर्वांत मोठें व्यंग होय. तें सर्व गुणांची माती करतें. परमेश्वराच्या ठाईं तें नाहीं. म्हणून तो अव्यंग आणि सर्वगुणाधार होय.

### १३०. वेदाङ्ग

वृक्षाचें मूळ, स्कंध, शाखा, विटप, पत्र, पुष्प, फळ हीं सर्व अंगें म्हणजे वृक्षच. वृक्ष आणि वृक्षांगें अभिन्नच होत. तद्वत् वेद आणि वेदांगें वेदच, तीं दोन नाहींत. तो सगळा वेदच होय. परमात्मा वेद-स्वरूप आहे तर वेदाचीं अंगेंहि तोच आहे. गूळ आणि गुळाचा रवा वेगळा नाहीं. दोन्ही गूळच. वेदाचीं अंगें कोणतीं? शिक्षा, कल्प, व्याकरण, निरुक्त, छंद आणि ज्योतिष हीं सहा वेदांगें मानिलीं आहेत. त्यांच्याशिवाय वेदांचें यथावत् ज्ञान होत नाहीं. वेद हे नुसते मंत्र नाहींत, त्या सोबत तंत्र हि आहे यज्ञाचें. या दोहोंच्या ज्ञानासाठीं हीं अंगें आवश्यक आहेत. शिक्षेनें मंत्रोच्चार कसा करावा तें कळतें. निरुक्तानें शब्द-ज्ञान होतें. व्याकरणानें पदज्ञान होतें. तर छन्दानें चरण-ज्ञान होतें. चाल कळते. हें मंत्रज्ञान झालें. तंत्रज्ञानासाठीं कल्प आणि ज्योतिष हीं दोन अंगें आहेत. ज्योतिषानें कर्म-काल आणि कल्पानें अधिष्ठानोपकरणादि-सहित विधिज्ञान होतें. हें तंत्र-ज्ञान होय. मंत्र-तंत्र मिळून पूर्ण ज्ञान. हें वर्ण-ज्ञान झालें.

वस्तु-ज्ञानासाठीं आवश्यक अंगें म्हणजे पंच ज्ञानेंद्रियें आणि अन्त:करण हीं षडङ्गें होत. यांच्या द्वारा आत्म्याचें बाह्याभ्यंतर-ज्ञान होतें. हें ज्ञान हाच वेद होय. ऊर्ध्वमूल अध:शाख असलेला हा संसारच त्रैगुण्यविषय वेद आहे. त्याच्या ज्ञानाचीं हीं षडङ्गें. आणि तीं सर्व ज्ञानमय परमात्म-स्वरूपच होत.

### १३१. वेदवित्

मत्स्यावतारांत देवानें वेदांचा उद्धार केला आहे. या वेदोद्धारामुळें तो वेदवित् झाला. अर्थात् ''वेदान् विन्दति इति''वेदवित् म्हटला गेला. देवानें शंखासुराला मारून त्यानें कल्पांतीं चोरून नेलेले वेद परत मिळविले, म्हणून तो वेदवित्. शंख हा जलचराचें कवच आहे. त्या शंखांतून जो अवर्ण ध्वनि निघाला तोच वेद होय. त्यांतूनच पुढें सर्व वर्ण निघाले. त्यांचा समाहार तो ॐ. तो एकाक्षर वेद होय. त्याचा विस्तार ती त्रयी. तिचें परिशिष्ट म्हणजे अथर्ववेद. आणि तिचें उपबृंहण म्हणजे पंचम वेद भारत होय. या सर्व संख्यात आणि असंख्यात वेदांना कारणत्वानें,

अव्यक्ताक्षररूपानें धारण करणारा म्हणून परमेश्वर हा वेदवित् म्हटला आहे. तो 'वेदान् वेत्ति' तसा 'वेदान् विन्दति' म्हणूनहि वेदवित् आहे.

## १३२. कवि

कवि म्हणजे क्रांतदर्शी. आणि क्रांतदर्शी म्हणजे पारदर्शी. जो हें ऐहिक जीवन तेवढें पाहतो, ज्याला पलीकडचें दिसत नाहीं, तो कवि नव्हे. जो या देहाच्या पलीकडचें आत्म्याचें जीवन पहातो तो कवि होय. परमेश्वर विश्वरूपाच्या पलीकडे असलेल्या स्वरूपाला पाहतो म्हणून काय म्हणायचें? तें निजरूपच तो आहे. म्हणून तो कवि म्हणजे तत्त्वज्ञ आहे, एवढेंच नव्हे तर तें स्वतत्त्वच तो आहे.

काव्य करतो त्यालाहि कवि म्हणतात. परमेश्वराचें काव्य कोणतें? ही सृष्टिच परमेश्वराची काव्य-कृति होय–जी नित्य-नूतन आहे, जी अजर आणि अमर आहे. अशी दिव्य भव्य सर्वाश्चर्यमय चिरंतन कलाकृति परमेश्वराहून अन्य कोण करूं शकतो? तुम्ही म्हणाल, काव्य तर शब्दमय असतें. आणि ही सृष्टि म्हणजे तर कांहीं शब्द नव्हे. त्याचें पहिलें उत्तर हें कीं कवीचें कर्म म्हणजे काव्य अशी व्याख्या आहे. मग तें कर्म शब्द, स्वर, रंग, धातु कशांत हि आकृत होवो. तें सारें काव्यच होय. दुसरें उत्तर असें कीं ही सृष्टि नामरूपात्मक आहे. पैकीं नाम प्रथम असून सूक्ष्म आहे. रूपाचा क्रम त्यानंतरचा. तें स्थूल असून सूक्ष्माचें कार्य आहे. आणि असें म्हटलें म्हणजे ही सृष्टि शब्दसृष्टिच ठरते. सृष्टिमूल संकल्पहि वाङ्मयच असतो. त्या वाणीची परा, पश्यन्ती, मध्यमा, वैखरी हीं रूपें होत. वर्णाकृतिहि त्या शब्दाचेंच रूप आहे, हें आधुनिक चित्रवाणीवरून सहज लक्षांत यावें.

## १३३. लोकाध्यक्ष

लोक्यन्ते इति लोकाः। जे प्रकाशित होतात, गोचर होतात, ते लोक होत. ग्रह, नक्षत्र, तारका हे सारे लोकच होत. लोकालोक नामक विश्व-क्षितिज-पर्वतमंडलाच्या आंतील सर्व भुवनें म्हणजे लोक. त्याच्या पलीकडील ते अलोक. तो स्वतः लोकालोक. कारण त्याची एक बाजू तेवढी अवलोकिली जाते आणि दुसरी अवलोकनांत येत नाहीं. तो जणूं लोक आणि अलोक यांचा सांधा आहे. वस्तुतः तो विभाजक आहे लोकालोकांचा. परमेश्वराचें तें अध्यासन आहे. परमेश्वर त्यावरून या सर्व लोकांचें निरीक्षण करीत असतो. म्हणून तो लोकाध्यक्ष म्हटला आहे.

तो लोकाभिमुख आहे म्हणून लोकाध्यक्ष. त्याची पाठ जिकडे आहे तिकडे अलोक आहे. वस्तुतः परमेश्वर सर्वतोमुख आहे. त्याची पाठ कुणीकडेच नाहीं. तो सर्वांच्याकडे समान पहातो आहे आणि म्हणूनच त्याला लोकाध्यक्ष म्हणावयाचें. अर्थात् लोकाध्यक्ष म्हणजे समदृक्. स्वाभिमुख म्हणून लोक त्याला लोकाध्यक्ष म्हणतात. पण ज्यांना आम्ही अलोक म्हणतों त्यांनाहि तो अभिमुखच आहे. सूर्य नारायणाचा प्रतिनिधि आहे, प्रतिमा आहे. प्रत्येकालाच तो ''मां प्रति मां प्रति पश्यति'' असें वाटतें. सूर्य हि म्हणून लोकाध्यक्ष, आमच्यापुरता लोकाध्यक्षच आहे.

## १३४. सुराध्यक्ष

सुर म्हणजे देव हे लोकाध्यक्षच आहेत. पण त्या देवांचा अध्यक्ष कोण? त्यांचा हि वरिष्ठ, त्यांचा हि निरीक्षक, कोणी असेलच. तो जो लोकाध्यक्षांचा हि अध्यक्ष तो परमेश्वर होय. ''महोच्चैः पदानां नियन्ता'' तो आहे. अधिकार-पदांची श्रेणी आपण मानवी राज्यांत पाहतों. दैवी राज्यांत हि तशी ती आहे अशी मानवी कल्पना. तिला अनुसरून लोक-पाल, त्यांत इन्द्र श्रेष्ठ, त्याहून हि परमेष्ठी श्रेष्ठ. हे सर्व सुरवर्य होत. पण त्यांचा हि चरम आणि परम वरिष्ठ तो परमेश्वर होय. तो सुरचक्रवर्ती, सुरमंडलाधीश होय. लोकाध्यक्षांहून हें उच्चतर पद आहे. याहून पर वस्तुतः दुसरें नाहीं.

### १३५. धर्माध्यक्ष

लोकाध्यक्षाहून सुराध्यक्ष वरिष्ठ आणि सुराध्यक्षाहून वरिष्ठ धर्माध्यक्ष होय. हे तिन्ही परमेश्वरच आहेत, तर त्यांत उच्चावचता कशी? उच्चावचता वस्तुत: नाहीं, पण अधिकारत: कल्पिली जाते. नियन्तृ-पद हें सर्वोच्च म्हटलें पाहिजे. नियम्यपद किती हि उच्च असलें तरी तें नियन्त्रकाधीनच म्हणावें लागतें. हें नियामकतत्त्व धर्म होय. त्याचा जो शास्ता तो सर्वनियन्ता म्हटला जातो. परमेश्वर हा तसा ''धर्मस्य गोप्ता'' आहे, ''धर्मस्य प्रभु:'' आहे म्हणून तो धर्माध्यक्ष म्हटला आहे आणि हें पद सर्व पदांहून वरिष्ठ आहे. मानवी व्यवहारात हि असाच क्रम आहे. राज्याधिकारी वर्ग, त्यावर विधायक मंडळ, त्यावर संविधान आणि संविधान-संरक्षक राष्ट्रपति. संविधान-संरक्षकाहून वरिष्ठ कोणी नाहीं. तो सार्वभौम सर्वसत्ताधीश असतो. त्यालाच विश्व-व्यवहारात धर्माध्यक्ष म्हटले आहे. तोच परमेश्वर. त्याचा प्रतिनिधि-भूत राजा होय.

### १३६. कृताकृत:

कृत म्हणजे कार्य आणि अकृत म्हणजे कारण. परमेश्वर हा कृताकृत आहे म्हणजे तो कार्यकारणरूप आहे.

कृतानें आकृत तो कृताकृत असा तत्पुरुष समास हि घेतां येईल. परमात्मा अव्यक्त-स्वरूप आहे. तो व्यक्ताच्या योगें आकृत झाला आहे, आकारास आला आहे.

परमात्मा कार्य-कारणरूप आहे असें म्हणणें म्हणजे तो उभयरूप आहे असेंच नव्हे, तर सर्वरूप आहे असें म्हणणें होय. कारण, जें कारण नाहीं वा कार्य नाहीं अथवा कार्यकारण नाहीं असें या जगांत काय आहे? ब्रह्मरूपानें तो कारण, विश्वरूपानें तो कार्य आणि प्रकृति-गुण-तत्त्वरूपानें तो कार्यकारण आहे.

वस्तुत: परमात्मा कार्यकारण-संपर्करहित केवलस्वरूप आहे. कार्य आभासिक असल्याकारणानें कारणाचें कारणत्व हि मिथ्याच म्हटलें पाहिजे.

''न सत् तन् नासदुच्यते'' गी. १३.१२

### १३७. चतुरात्मा

पाञ्चभौतिक, लिङ्गरूप आणि कारणरूप अशीं तीन शरीरें जीवाचीं मानिलीं आहेत. पाञ्चभौतिक शरीर सोडून जीव लिङ्गरूपानें लोकान्तरास जातो येतो. या लिङ्ग-देहातून तो ज्ञानानें मुक्त झाला तरी कारणरूप देह कल्पान्तापर्यंत राहतो. जेव्हां परमेश्वरी संकल्प मावळतो, तेव्हांच तो कारणरूप देह हि मावळून जीव परिपूर्ण मुक्त होतो. जीवाच्या ह्या ज्या तीन अवस्था तेच तीन आत्मे होत आणि चौथा आत्मा तो निरुपाधिक तुरीय होय. अशा प्रकारे परमात्मा चतुरात्मा म्हटला आहे.

अथवा विश्वाची उत्पत्ति स्थिति आणि संहृति करणारे जे अधिकारी ब्रम्हा विष्णु महेश ते तीन आणि गुणातीत तो तुरीय असें हि चातुरात्म्य कल्पितां येईल.

पहिला कल्प व्यष्टिदृष्टीनें आहे, दुसरा समष्टिदृष्टीनें.

### १३८. चतुर्व्यूह

व्यूह हा वैष्णव वा सात्वत तंत्राचा पारिभाषिक शब्द आहे. मन्त्र मननाचें साधन आहे. तन्त्र तननाचें, म्हणजे कर्म-विस्ताराचें साधन आहे. मन्त्र-सिद्धि म्हणजे मंत्राच्या योगें निगूढ आध्यात्मिक ज्ञान आत्मसात् करणें. तन्त्र-सिद्धि म्हणजे क्रियाकलापाच्या योगें मन्त्रार्थाला मूर्तिमंत करणें. ''देहवंतास अव्यक्तीं सुखें बोध घडे चि ना'' अशी वस्तुस्थिति असल्यामुळें तन्त्राची चलती झाली. यज्ञ हें वैदिक तंत्र आहे. मूर्तिपूजाविधि सात्वत तंत्र आहे. त्यांत वासुदेव संकर्षण प्रद्युम्न आणि अनिरुद्ध हे चार चतुर्व्यूह म्हटले आहेत. हे कृष्णपरमात्म्याचे चार भाव होत. ते या जगाचें परिपालन करीत आहेत.

समूहन म्हणजे एकीकरण. व्यूहन म्हणजे विस्तरण. एकाच आद्या शक्तीचें कार्यानुषंगानें जें विभजन कल्पिलें, तो व्यूह होय. तो व्यूह आवश्यकतेप्रमाणें चतुर्धा, अष्टधा, दशधा अथवा नैकधा कल्पिला जातो. चार ही संख्या इजा, बिजा, तिजा यांच्या पलीकडची असून लक्षणेनें ती समग्रतावाचक आहे. चोहोंकडे म्हणजे सगळीकडे. चतुरात्मा, चतुर्व्यूह, चतुर्दंष्ट्र, चतुर्भुज या चतुरादि पदांत ती अभिधेनें तशी लक्षणनें हि घ्यावयाची आहे.

## १३९. चतुर्दंष्ट्र

दंष्ट्रा म्हणजे दाढ. ज्याला चार दाढा आहेत तो चतुर्दंष्ट्र होय. सिंह, व्याघ्र, नाग इत्यादि हिंस्र श्वापदांना चार चार सुळे असतात. त्याना चतुर्दंष्ट्र म्हणतां येईल. सुळे आणि दाढा हीं वस्तुत: भिन्न आहेत. दाढा चाराहून अधिक असूं शकतील परतु सुळे मात्र, चारच असतात. हत्ती द्विरद आहे आणि सिंहादि हिंस्र चतुर्दंष्ट्र आहेत. हस्ती हस्तवान् आहे, पण सिंहादि शस्त्री आहेत, शस्त्रवान् आहेत. दंष्ट्रा आणि नखें हीं त्याचीं शस्त्रें होत. त्यामुळेंच तो 'वनराज', 'मृगाधिपति' झाला आहे. इथें चतुर्दंष्ट्र म्हणून सिंह आणि नरसिंह दोहोंचा हि निर्देश समजावयाचा आहे. सिंह भगवद्विभूति आहे, तर नरसिंह भगवदवतार आहे.

दंष्ट्रा हें संहाराचें प्रतीक आहे. भगवान् कालरूपानें विश्वाचा संहार करीत आहे. तो काळ असा आहे कीं त्याचा प्रतिकार कोणी करूं शकत नाहीं. म्हणून तो चतुर्दंष्ट्र सिंह म्हणावयाचा. त्याच्या दाढांतून कोण सुटला आहे? नित्य, नैमित्तिक, प्राकृतिक आणि आत्यन्तिक प्रलय हेंच त्या काळाचे चार सुळे होत. त्यांनीं तो सर्वांना ग्रासत आहे. वस्तुत: तो सर्वतो-ग्रासी आहे, सर्व-ग्रासी आहे.

## १४०. चतुर्भुज

चतुष्पाद, चतुर्भुज, चतुर्मुख इत्यादि पदांत चतुर् हें संख्यावाचक नसून तें सर्ववाचक, संपूर्णतावाचक आहे, असें पूर्वी म्हटलेंच आहे. चतुष्पाद पदामध्यें चतुर् शब्द समग्रतावाचक, पूर्णतावाचक आहे. कारण पादशब्द चतुर्थांश-वाचक आहे. पण त्यामुळें पुढें चार या संख्येला पूर्णत्ववाचकता आली आहे. चतुर्भुजादि शब्दांत हि ती तशी आहे. भुज म्हणजे बाहु हा सत्त्वमयी पालनशक्तीचें प्रतीक आहे. ईश्वर चतुर्भुज आहे म्हणजे तो सर्वत: सर्वांचें पालन करीत आहे. तो समग्र पालन-शक्ति आहे. ईश्वर हा सर्वाधीश आहे. त्याला निखिल विश्वाचें परिपालन करावयाचें आहे. त्याला माणसाप्रमाणें दोन हात असून कसें चालेल, त्याला तर चोहोंकडे पहायचें आहे, सांभाळायचें आहे, सावरायचें आहे. त्यामुळें तो चतुर्मुख आहे, चतुर्भुज आहे, चतुर्दंष्ट्र आहे. त्याला सर्वतोदिश उत्पत्ति स्थिति आणि संहृति करावयाची आहे. त्याचा हा सर्वविध व्याप सर्वतोदिश आहे, म्हणून तोच व्यूह आहे. सर्वेश्वराचें सर्व कांही चौरस आहे. सर्वेश्वर सर्व काहीं असू शकेल, एकांगी असूं शकणार नाहीं. तो विकल असणार नाहीं. सकलच असणार, समग्रच असणार.

## १४१. भ्राजिष्णु

भ्राजिष्णु म्हणजे भास्कर, तळपणारा. परमात्मा हा आपल्या प्रचंड तेजानें तळपतो आहे. परमात्म्याचें हें तेज प्रचंड कां आणि तळपतें कां म्हणावयाचें? जगांतील यच्चयावत् तेजें हीं परभृत आहेत, परप्रकाशित आहेत. परमात्म्याचें तेज हेंच एकमेव स्वयंभू आहे. ''यद् आदित्यगतं तेजो जगद् भासयतेऽखिलम् । यच् चन्द्रमसि यच् चाग्नौ तत् तेजो विद्धिमामकम् ।।'' गी. १५.१२ इतर तेजें आंशिक आहेत आणि क्षयिष्णु आहेत. परमात्मतेज हें समग्र

आणि शाश्वत आहे. ''ज्योतिषां रविरंशुमान्'' गी. १०.२१ म्हणून म्हटलें आहे. पण असा तो सहस्ररश्मि सूर्य त्या तेजाच्या नखाची बरोबरी करूं शकत नाहीं.

**दिवि सूर्य-सहस्रस्य भवेद् युगपदुत्थिता।**
**यदि भाः सदृशी सा स्याद् भासस् तस्य महात्मनः ॥**
**गी. ११.१२**

सूर्यादि तेजें कल्पान्तीं लोपतात, कल्पारंभीं उत्पन्न होतात. अर्थात् तीं शाश्वत नाहींत.

**'सूर्याचन्द्रमसौ धाता यथापूर्वं अकल्पयत्'**
**'इमं विवस्वते योगं प्रोक्तवान् अहमव्ययम् '**

परमात्मतेज हें

**'ज्योतिषां अपि तत् ज्योतिस् तमसः परमुच्यते ।**
**ज्ञानं ज्ञेयं ज्ञानगम्यं हृदि सर्वस्य धिष्ठितम् ॥'**
असें आहे. **गी.१३.१७**

परिव्राट् योगानें सूर्यमंडलाचा भेद करून याच स्वयंभू शाश्वत सर्वव्यापी आणि म्हणून सर्वातिशायी तेजाला पोंचत असतो. ह्याच तेजाचें ध्यान गायत्रींत केलें आहे.

## १४२. भोजन

परमेश्वर भोक्ता आहे हें सहज समजूं शकतें. पण तो भोजन कसा ? तो ज्या अर्थीं ज्ञेय आहे, त्या अर्थीं सर्व जीवांचा तो भोज्य आहे, भोजन आहे. ज्ञेयाचें तत्त्वतः ज्ञान हेंच खरें भोजन होय जेणें करून माणसाची क्षुधातृषा हरते आणि माणसाचा चिरंतन योगक्षेम चालतो. भगवान् जेव्हां म्हणतात ''योग-क्षेमं वहाम्यहम्'' तेव्हां तो हा योग-क्षेम अभिप्रेत असतो. ''यज् ज्ञात्वा नेह भूयोऽन्यज् ज्ञातव्यं अवशिष्यते.''–गी. ७.२ ''पीयूषं अमृतं पीत्वा पातव्यं नावशिष्यते'' भाग. ११ तसें हें भोजन आहे. आणि असें हें भोजन एक परमेश्वरच होऊं शकतो. ''येनाहं नामृता स्यां किमहं तेन कुर्याम्'' बृ. २.४.३ तसें विषय-भोग हें भोजन नसून तें विष-पान होय, असें संत सांगतात. भोजन जर कोणतें असेल तर तें ''ज्ञानामृत-भोजन''च होय, ज्या योगें ''क्षुधातृषा हरे, निजभाव जेणें तरे ।''

व्यावहारिक अर्थानें हि आपलें भोजन हें साक्षात् परमेश्वरच आहे. परमेश्वराच्या कृपेनेंच बीज अंकुरतें, वाढतें आणि फळतें. त्या अन्नानेंच सर्व जीव जगतात. असें हें जगज्जीवन अन्न जगासाठीं उत्पन्न करणें आणि तदर्थच अन्न-ग्रहण करणें आणि जगणें म्हणजेच यज्ञ होय. या अन्नोत्पत्तिरूप यज्ञांत सर्वगत ब्रह्म म्हणजे विश्व प्रतिष्ठित असल्यामुळें अन्न हें पूर्ण ब्रह्म होय.

## १४३. भोक्ता

परमेश्वर हा चिद्घन आहे. यच्चयावत् विश्व त्याचा विषय आहे. त्यामुळें विश्व हें त्याचें भोजन म्हणजे भोज्य असून तो त्याचा भोक्ता आहे, विषयी आहे. ज्ञान हा चेतनाचाच धर्म असूं शकतो. त्यामुळें जडमात्र चेतनविषय झालें, चेतनभोग्य झालें. अचेतन चेतनाचा विषय होणें योग्यच आहे. पण चेतन हि चेतनाचाच विषय होय, अचेतनाचा नव्हे. फार तर इतकेंच म्हणतां येईल कीं अल्पचेतन महाचेतनाचा विषय होय. आणि म्हणूनच अष्टधाप्रकृति आणि जीव ह्या दोन्ही परमेश्वरी प्रकृति होत, असें म्हटलें आहे. अर्थात् प्रकृति आणि जीव, जड आणि चेतन, दोन्ही परमेश्वराचें क्षेत्र आहे. त्याचें उपभोग्य आहे. तो परमेश्वरच क्षेत्रज्ञ आहे, भोक्ता आहे. जीवाला क्षेत्रज्ञ म्हटलें जातें. पण तें मर्यादित अर्थानेंच होय. वस्तुतः सारे जीव आपआपल्या देहासकट परमेश्वराचे देह होत. कारण केवळ चिद्घनच सर्व जीवांचा अंतर्यामी आहे.

## १४४. सहिष्णु

सह् म्हणजे जिंकणें. त्यावरून सहिष्णु म्हणजे जिष्णु होय. जें जें संकट येतें त्यावर तो मात करतो म्हणून तो सहिष्णु. देवांना संकट आलें म्हणजे ते शरण गेलेच

विष्णूला आणि त्यानें त्यांचें संकट निवारण केलेंच! पृथ्वीला पापाचा भार झाला म्हणजे ती गेलीच शरण विष्णूला कीं त्यानें तिचें संकट निवारिलेंच ! साधूंना दुर्जनांनीं छळलें म्हणजे ते शरण गेलेच भगवंताला कीं त्यानें त्यांचें रक्षण केलेंच! अशा प्रकारें ''दीनन दुख हरन'' व ''संकटमोचन'' तो आहे. त्यामुळें तो सहिष्णु उर्फ जिष्णु म्हटला आहे. जी कांहीं सत्ता आहे ती सारी सताची आहे. सताच्या विरुद्ध उठलेलें कोणी हि आणि कांहीं हि केवढें हि प्रचंड असलें तरी शेवटीं तें नेस्तनाबूदच व्हायचें आहे. म्हणून परमात्मा हा सर्वसहिष्णु होय. तो मांजर जसें उंदराला क्षणभर चळवळ करूं देतें त्या प्रमाणें तो असताला वळवळ करूं देतो. त्या वळवळीनें त्रस्त लोक अधीर होतात आणि देव आंधळा आहे, झोपला आहे, का, मेला आहे, असें म्हणतात. पण तत्त्वज्ञ ओळखून असतात कीं ''सत्यमेव जयते, नानृतम्'' आणि म्हणून ते सत्योपासना करीत सहन करीत राहतात. आणि भगवान् हि असताची वळवळ दरम्यान सहन करीत असतो. म्हणून हि तो सहिष्णु. 'God sees but waits' म्हणून तो सहिष्णु.

## १४५. जगदादिज

सृष्टीच्या आरंभीं जन्मलेला जो तो जगदादिज होय. हा जगाचा पूर्वज कोण? हा संकल्प होय. आधीं संकल्प उठतो, मग साधन होतें आणि शेवटीं सिद्धि येते. असा हा सृष्टीचा क्रम आहे. म्हणून जगाचा पूर्वज संकल्प वा काम म्हणावयाचा. म्हटलेंच आहे–''कामस् तदग्रे समवर्ताधि । भूतस्य जातः पतिर् एक आसीत्।'' या कामाला वा संकल्पालाच हिरण्यगर्भ अशी सृष्टि-शास्त्रांतील पारिभाषिक संज्ञा आहे. हा संकल्प सर्वतोदिश सृष्टि करणारा असल्यामुळें तो चतुर्मुख कल्पिला, तें यथास्थितच होय. हा चतुर्मुख ब्रह्मा सृष्टीचा पूर्वज असून संबंध सृष्टि ही त्याची प्रजा होय. परमात्मा अज आहे, संकल्पात्मा ब्रह्मा पूर्वज आहे आणि समग्र सृष्टि ही प्रजा आहे. ब्रह्मदेवाला हि अज अशी संज्ञा आहे. पण ती तो ब्राह्म सृष्टि नाहीं एवढ्याच अर्थानें होय. तो अजात नाहीं; तो जात आहे. ''भूतस्य जातः पतिः'' म्हटलें आहे त्याला.

## १४६. अनघ

अघ म्हणजे पाप. पण पाप म्हणजे तरी काय? पाप म्हणून एखाद्या कर्मावर, क्रियेवर, छाप का लागला आहे? नाहीं. एखादें कर्म कधीं पाप म्हणून तर कधीं पुण्य म्हणून ओळखलें जाईल. अर्थात् पाप-पुण्याची कांहीं कसोटी असली पाहिजे. ती कसोटी कोणती? ती कसोटी सत्य होय. जें सत्यास अनुसरून तें पुण्य, जें सत्यापासून दूर जातें तें पाप. तेव्हां पाप म्हणजे सत्यापासून दूर जाणें, आडवाटेस जाणें होय. परमेश्वर सत्य-स्वरूप असल्यामुळें तो सत्य सोडून आडवाटेस जाऊंच शकत नाहीं. त्यामुळेंच तो अनघ म्हटला आहे. जीवांचें अनघत्व आणि परमेश्वराचें अनघत्व यांत महदंतर आहे. जीव सत्य-ज्ञानाच्या अभावीं चांचपडत सत्यानुसरण करतो. ईश्वराला सत्यानुसरणाशिवाय दुसरें कांहीं करतांच येत नाहीं. तेंच त्याला सहज आहे. डोळस सहजच सन्मार्गानें चालतो. परंतु मंद-दृष्टि, काणा अथवा आंधळा जीव मांद्यामुळें चांचपडत, ठेचाळत, कधीं वाटेनें, तर कधीं आडवाटेनें चालतो त्यामुळें त्याला परमेश्वराप्रमाणें अनघ म्हणतां येत नाहीं. कोणी असा केवळ अनघ झाल्यास तो परमेश्वरच होईल.

## १४७. विजय

विजय म्हणजे प्रतिपक्षाचा पराभव करून संपादिलेला जय, स्वोत्कर्ष. सूर्य अंधारावर विजय मिळवतो. तसें सत्य असत्यावर विजय मिळवतें. वस्तुतः सत्य हें अप्रतिमल्ल मल्ल आहे. त्याला प्रतिमल्लाशीं, असत्याशीं, मुळीं कुस्तीच करावी लागत नाहीं. सूर्याला का अंधाराशीं दोन हात करावे लागतात? तो अंधार मुळीं त्याच्यासमोर ठरतच नाहीं. सूर्यापुढें त्यानें आपलें तोंड सदैव काळेंच केलें आहे. तसा

सत्यस्वरूप परमात्मा स्वभावत: विजयी आहे. जे सामान्य शूरवीर असतात त्यांना दोन हात करून विजय मिळवावा लागतो. परंतु महावीर! ''टङ्का-रेणैव धनुष्य: स हि विघ्नान्यपोहति'' तो धनुष्याच्या ज्या-घोषानेंच शत्रूंची दाणादाण करून टाकतो इतका त्याचा दरारा असतो. परमेश्वराला इतकेंहि करावें लागत नाहीं. तो भ्रूभंगहि न करतां विजयी होतो.

''यतो धर्मस् ततो जय:'' असें असल्यामुळें स्वत: धर्म म्हणजे सत्य हें स्वयमेव विजय होय.

## १४८. जेता

जगांत एकापेक्षां एक शूरवीर होऊन गेले आणि त्यांनीं जयामागून जय मिळविले आहेत. परंतु त्यांना हि देहधर्मांनीं व मनोविकारांनीं जिंकलें आहे. ज्याला कोणीं जिंकलें नाहीं, पण ज्यानें मात्र सर्वांना जिंकलें आहे, असा एक परमात्माच आहे. कारण तो अव्यक्तमूर्ति आहे. व्यक्तमात्र गुणबद्ध आहे, गुणजित आहे. जिला क्षुत्‌तृट्, निद्राजागृति, रागद्वेष, शोकमोह वश करीत नाहींत अशी कोण व्यक्ति झाली आहे? हा गुणजन्य पराभव व्यक्तीला क्षणोक्षणीं खावाच लागतो. 'नहि सशरीरस्य सत: अपराभव: अस्ति'. परमात्माच एक निर्‌गुण असल्यामुळें व्यक्ति आणि तदनुगत पराभवमालिका यांपासून मुक्त आहे. आणि म्हणून तो जेता होय, आणि तोच एक जेता होय. अन्य सारे जित. प्रकृतीचे गुण हे कितीहि बलवान् असले, तरी ते हि पालटतात आणि निमतात. त्यामुळें निर्‌गुण परमात्मा त्यांना जिंकतो म्हणावयाचें. तो कूटस्थ नित्य आहे आणि म्हणून त्याला म्हणतात जेता. अन्य सारे हारच खातात.

## १४९. विश्वयोनि (अविश्वयोनि)

परमात्मा हा विश्वयोनि म्हणजे विश्वाचें आदिकारण आहे, हें आपण मागें क्रमांक ११७ मध्यें याच वर्णसमाम्नायाचें विवेचन करतांना पाहिलें आहे. तिथें तो षष्ठीतत्पुरुष आहे. इथें बहुव्रीहि घेऊं या. विश्व हेंच ज्याची योनि म्हणजे उपलब्धिनिमित्त वा साधन आहे तो विश्वयोनि, परमात्मा. अनिर्देश्य अव्यक्त अचिंत्य परमात्मा नामरूपात्मक व्यक्ताच्या उपलब्धीमुळें सूचित होतो. व्यक्ताचा हा मोठाच उपकार आहे. कापराप्रमाणें अव्यक्तप्रकाशन करून व्यक्त विलीन होतें. कारणाचा निर्‌देश करून कार्य कृतकार्य होतें.

अथवा अष्टधाप्रकृतिरूप जें महद् ब्रह्म तें विश्व ज्याची योनि म्हणजे गर्भधानी आहे तो विश्वयोनि. ''मम योनिर् महद् ब्रह्म तस्मिन् गर्भं दधाम्यहम्'' गी. १४.३ असें म्हटलेंच आहे. ईश्वर जीवरूपानें प्रत्येक भूताच्या ठाईं निहित आहे, अंतर्‌यामी म्हणून संनिहित आहे. जीवांशरूप भगवद्‌वीर्य धारण केल्याशिवाय कोणतें हि भूत उद्‌भूत होत नाहीं.

अथवा अविश्वयोनि असा पाठ घ्यावा. विश्व म्हणजे हें नामरूपात्मक जगत् मिथ्या असल्यामुळें त्याचा कोणत्याहि प्रकारें परमात्म्याशीं संबंध पोचूं शकत नाहीं. म्हणून जो विश्वयोनि नव्हे तो अविश्वयोनि. रज्जूवर सर्पाचा, शुक्तीवर रजताचा, वा कनकावर कटकाचा आरोप हा आरोपच आहे. रज्जू शुक्ति आणि कनक वस्तुत: तज्‌जनक नव्हेत, योनि नव्हेत. स्वरूपाविषयींचें अज्ञानच त्याचें कारण होय, योनि होय.

## १५०. पुनर्‌वसु

''पुनरपि जननं पुनरपि मरणं पुनरपि जननी-जठरे शयनम्'' असा ज्याचा कार्यक्रम आहे तो जीव होय. जीवरूपानें परमात्मा नाना योनींत अवतीर्ण होतो आणि त्या त्या योनींची संतति करतो. हें जें योन्यन्तरगमन आणि देहान्तरगमन तेंच पुनर्‌वसुत्व होय.

कल्पान्तीं ही समग्र सृष्टि प्रलीन होते. त्यानंतर परत कल्पारंभीं सृष्टीची पुनरुत्पत्ति होते. अशा प्रकारें वारंवार विश्व निर्मून त्यांत परमात्मा वसति करतो. आणि म्हणून हि तो पुनर्वसु म्हटला आहे.

सर्प ज्या प्रमाणें जुनी कात टाकतो आणि नवी धारण करतो. तसा हा परमात्मा पुराण पुरें टाकून नित्यनूतन घेत राहतो. परमात्म्याचें जें हें नित्यनूतनत्व तेंच पुनर्वसन होय, पुनर्वसुत्व होय. परमात्मा पुनर्वसु आहे म्हणजे तो नित्यनूतन आहे. जो जुन्यालाच चिकटून राहतो तो जीर्ण होय. जीर्ण मरणधर्मी आहे, जो जीर्णाचा त्याग करून नवनव होतो तो पुनर्वसुच अजर आणि अमर होय.

## १५१. उपेन्द्र

इंद्र म्हणजे परमात्म्याला इदंतया पाहणारी देवता. केन उपनिषदांत गोष्ट आली आहे. ब्रह्मानें देवांसाठीं विजय मिळविला. पण देव हा आमचाच विजय आहे आमचाच पराक्रम आहे, अशी बढाई मारूं लागले. तेव्हां त्यांच्या समोर एक यक्ष, यजनीय गूढ ब्रह्म, उभें ठाकलें आणि त्यानें एक गवताची काडी टाकली आणि म्हटलें, तुमचें काय सामर्थ्य आहे तें अजमावा. भुवनभक्षक अग्नि सरसावला. त्याला ती काडी कांहीं जाळतां आली नाहीं. वायु, भुवनभंजन प्रभंजन, सरसावला त्याला ती काडी कांहीं हलवतां आली नाहीं. तेव्हां त्यांना कळलें कीं हा आपला पराक्रम नव्हे, हा आपला विजय नव्हे. तेव्हां 'किमिदं यक्षम्' हा प्रश्न त्यांना पडला आणि इन्द्रानें उमेच्या कृपेनें जाणलें कीं अरे हें तर ब्रह्म आहे. त्याच्याच सामर्थ्यानें आपल्याला विजय मिळाला आहे. अशा प्रकारें इन्द्राला जवळून दर्शन देता झाला म्हणून परमात्मा हा उपेन्द्र म्हटला आहे.

श्रद्धेच्या कृपेनें जीवात्म्याला परमात्म्याचा साक्षात्कार होतो. परमात्मा जीवात्म्याच्या संनिधच आहे. अगदीं अंत:स्थ आहे. परंतु निरहं झाल्याशिवाय तो मोठमोठ्यांना आकळत नाहीं आणि निरहं बालकाला हि तो सुलभ आहे. तो अकिंचनगोचर आहे. सूरदासांनीं याच आशयानें गाइलें आहे– 'निर्बल के बल राम'.

## १५२. वामन

देवांना जिंकून असुरेन्द्र बलि स्वर्गाधिपति होऊन बसला, तेव्हां देवमाता अदिति पुत्रांचें दैन्य पाहून दु:खित झाली आणि तिनें परमेश्वराला व्रतानें प्रसन्न करून घेतलें. भगवान् विष्णु तिच्या पोटीं वामनरूपानें अवतरला आणि त्यानें दैत्यदानवेन्द्र बलीपासून त्रिपाद भूमि मागून त्याला पाताळांत घातलें व इन्द्राला आपलें वैभव परत मिळवून दिलें. तेव्हां ब्रह्मदेवानें आणि प्रजापतींनीं वामनाला यौवराज्याभिषेक केला. त्यामुळें तो उपेन्द्र झाला. अर्थात् जो उपेन्द्र तोच वामन होय आणि तोच त्रिविक्रम रूपानें प्रांशु हि म्हटला आहे. अशा प्रकारें ''उपेन्द्रो वामनः प्रांशुः'' हा संपूर्ण चरण वामनावताराचें वर्णन करतो.

परमात्मा सर्वव्यापी आहे. त्याचें सर्वव्यापकत्व विरुद्धार्थवाची विशेषणांच्या जोड्यांनीं व्यक्त केलें जातें. ईशोपनिषदांत तें असें वर्णिलें आहे

**तद् एजति तद् नैजति, तद् दूरे तद् उ अन्तिके।**
**तद् अन्तर् अस्य सर्वस्य, तदु सर्वस्यास्य बाह्यतः॥**

त्याचप्रमाणें इथें वामन आणि प्रांशु ही जोड विशेषणें आलीं आहेत. उच्चावच सर्वच तो आहे.

**प्रांशुलभ्ये फले लोभाद् उद्‌बाहुरिव वामनः**

या कालिदासवचनांतहि ही जोडी आली आहे.

## १५३. प्रांशु

ईश्वराची उंची किती आहे हें कोण मापूं शकेल? त्याहून उंच असेल तो. असा कोणी नसल्यामुळें त्याच्या उंचीची इयत्ता कोणाला आजपर्यंत काढतां आली नाहीं. त्याच्या उंचीचा अंदाज त्यांनाच लागला,

जे नम्र आणि नम्रतर होत गेले. या नम्रतेचेंच नांव भक्ति आहे. भगवंतानें म्हटलेंच आहे :

**भक्त्या त्वनन्यया शक्य अहमेवंविधोऽर्जुन ।**
**ज्ञातुं द्रष्टुंच तत्त्वेन प्रवेष्टुं च परंतप ।।**
**गी. ११.५४**

**भक्त्या मां अभिजानाति**
**यावान् यश्चास्मि तत्त्वतः ।**
**ततो मां तत्त्वतो ज्ञात्वा**
**विशते तदनन्तरम् ।। गी. १८.५५**

बलि त्रिविक्रमापुढें विनम्र झाला आणि त्यानें त्या प्रांशु परमेश्वराला आपल्या मुठींत ठेवलें. त्याला आपल्या घरचा द्वारपाळ बनविलें. अर्थात् परमेश्वराहून हि परमेश्वराची भक्ति, ही प्रणति, परम आहे, प्रांशुतर आहे, बलिष्ठ आहे. बलिबन्धन खरें, पण बांधणार आणि बांधला जाणारा कोण आहे? बलिबंधन तत्पुरुष कीं बहुव्रीहि? बलि तर मुक्त झाला, देव मात्र द्वारपाळ बनून बांधला गेला! बलिबंधन आरंभीं तत्पुरुष आणि मागाहून बहुव्रीहि, वामन नम्र असल्यामुळें प्रांशु बलीचें बंधन झाला; पण पुढें जेव्हां तो प्रांशु झाला तेव्हां नम्र बलिच त्याचें बंधन झाला आहे.

देवाचें सर्वोत्तम नाम म्हणूनच नमः आहे, जें सहस्राधिक आहे, सहस्रातिशायी आहे. 'सर्वप्रहरणायुध ॐ नमः' म्हणून सहस्राची समाप्ति झाली आहे. अर्थात् एकपरी नमः हा शेंवटचा शब्द आहे, शेंवटचें नाम आहे.

## १५४. अमोघ

जे आसुर आहेत, म्हणजे ज्यांनीं मोहमयी आसुरी प्रकृति अंगीकारिली आहे, ते मोघाश, मोघकर्म, मोघज्ञान म्हटले आहेत. त्या विरुद्ध ज्यांनीं दैवी प्रकृति अंगीकारिली, ते सर्वांचें मूळ परमात्मा आहे हें ओळखून परमेश्वराची निष्काम भक्ति करतात. अर्थात् ते मुक्त्यधिक भक्तिरूप फळ पावतात, आणि अशा प्रकारें अमोघ होतात, कृतार्थ होतात. स्व-रूप परमेश्वराची जे भक्ति करतात, त्यांचे संकल्प व प्रयत्न अमोघ होतात. परंतु जे जाणून बुजूनच असत्य असलेल्या अर्थकाममय संसाराच्या मागें लागतात, ते मोघ होतात, विफल होतात.

**यो ध्रुवाणि परित्यज्य अध्रुवं परिषेवते।**
**ध्रुवाणि तस्य नश्यन्ति अध्रुवं नष्टमेव च।।**

परमात्मा हा साक्षात् सत्य आहे. तो सत्यसंकल्प आहे, सत्यकाम आहे. आणि त्यामुळेंच तो पूर्णकाम आहे. जो पूर्ण-काम तोच अमोघ होय. अमोघाची उपासना करणारा हि अमोघच होतो. म्हणून म्हटलें आहे:

**धर्मे मतिर् भवतु वः सततोत्थितानां,**
**स ह्येक एव परलोकगतस्य बन्धुः।**
**अर्थाः स्त्रियश् च निपुणैरपि सेव्यमाना**
**नैवाप्तभावमुपयन्ति न च स्थिरत्वम्।।**
**महाभारत**

## १५५. शुचि

शुचि म्हणजे शुद्ध. शुद्धि दोन प्रकारची आहे. एक कृत्रिम आणि दुसरी सहज. परमात्मा हा दुसऱ्या प्रकारें शुद्ध आहे. इतर सर्व पहिल्या प्रकारें शुद्ध होतात. वस्त्र मळतें. तें धुतलें म्हणजे शुद्ध होतें. परंतु आकाश मळत हि नाहीं आणि शुद्ध केलें हि जात नाहीं. तें सहजशुद्ध आहे. कधीं कोणाला मळवतां न येणारें असें निर्लेप शुद्ध आहे तें. म्हणून आकाशाला शुचि असें हि एक नांव आहे. आकाशाला वाऱ्यानें सळ पडत नाहीं कीं खळ पडत नाहीं. पावसानें तें भिजत नाहीं कीं थंडीनें थिजत नाहीं. सूर्यतापानें तें पाघळत नाहीं कीं जळत नाहीं. रात्रीचें अंधारें नि ढगांचे भारे सतत येतात जातात, पण त्यांचा डाग त्याला नाहीं. असें तें शुचि आहे. परंतु असें हें आकाश शब्दगुण म्हटलें आहे. गुण म्हटला कीं द्रव्यत्व आलेंच. आणि त्याबरोबर आले सारे उपाधि. परंतु परमात्मा हा

निर्‌गुण असल्यामुळें तोच खरोखर शुचि आहे. त्याला त्रैगुण्याचा संपर्क नाहीं. गुणच दोषरूप आहेत. ते गुणच जियें संभवत नाहींत तें निर्‌गुणच निर्‌दोष होय आणि म्हणून तेंच शुचि. इतर सारें गुणांनीं बरबटलेलें!

## १५६. ऊर्जित

भगवद्‌विभूति दोन प्रकारच्या वर्णिल्या आहेत : १. श्रीमान्, २. ऊर्जित. जगांत हि आपण दोनच विभूति पहातों : १ स्त्री आणि २ पुरुष. स्त्रीतत्त्व हें श्रीमान् आहे, सौन्दर्यशाली आहे. पुरुषतत्त्व ऊर्जित आहे, बलशाली आहे. सारें वैभव या दोन प्रकारांत प्रकटलें आहे. म्हणून या दोन प्रकारांना विभूति म्हटलें आहे. प्रत्येक स्पृहणीय गुण एकतर सौन्दर्योपकारी असेल, नाहींतर बलोपकारी असेल. तिसरा प्रकार नाहीं. सर्व सौंदर्याचा अर्क भक्ति आहे, सर्व बलाचा अर्क ज्ञान आहे. भक्तिमान् व्यक्ति आपल्या परम-हृदयाह्लादक समर्पणानें सर्वभूतात्मभूत होऊन बसते. ज्ञानवान् व्यक्ति आपल्या प्रौढप्रताप परित्यागानें या विश्वाचा एकराट् बनते. एक तत्त्व मेणासारखें मऊ आहे, दुसरें वज्रासारखें कठिण आहे. दोन्ही विश्वविजयी आहेत वामनत्रिविक्रमवत्. दोन्ही भगवद्‌विभूति आहेत. विश्वाची घडामोड करणाऱ्या त्रिगुणांची मात्रा ज्याच्यावर चालत नाहीं आणि जो या आतापि-वातापि-इल्वलांना पचवून ढेकर देतो, त्या ज्ञानघन तुरीयाहून अधिक ऊर्जित कोण म्हणावा?

## १५७. अतीन्द्र

इन्द्राचीं जीं उपकरणें तीं इन्द्रियें होत. अर्थात् इंद्र म्हणजे देही होय. या देही जीवाच्या पलीकडचा तो अतीन्द्र परमात्मा होय. परमात्मा उपेन्द्र हि म्हटला आहे, आणि अतीन्द्र हि म्हटला आहे. परमात्मा जीवाच्या जवळ राहून त्याला हळूहळू आपल्याकडे खेंचीत असतो. त्याला 'स्वे महिम्नि' प्रतिष्ठित व्हायला मदत करीत असतो. म्हणून, म्हणजे ''इन्द्रं उपकरोति'' म्हणून, तो उपेन्द्र झाला. पण हें उपकरण तो जीवाच्या अतीत राहून, दूर राहून, करीत असतो. म्हणून तो अतीन्द्र म्हटला आहे. पक्षिणी पिलाला उडायला कशी शिकविते? ती जवळ राहून पिलाला भरवते. पण चटकन त्याच्या पासून जरा दूर उडून बसते. मग पिलूं तिच्याजवळ फडफडत जातें. अशा प्रकारें आधीं जवळ, मग जरा दूर, त्यानंतर आणखी दूर उडायला शिकवून एके दिवशीं ती त्याला झाड सोडून अंतराळांत झेप घ्यायला लावते, भरारी मारायला शिकवते. परमात्माहि त्याचप्रमाणें जीवाला जीवत्वाच्या अंडांतून बाहेर पडून ब्रह्मांडाच्या वृक्षावर फुदकायला आणि ब्रह्मांडाचा हि त्याग करून शिवत्वाच्या अनन्त आकाशांत भरारी मारायला शिकवतो. इंद्र आणि अतीन्द्र असे हे दोन सखे सुपर्ण होत. दोन्ही जोडीनें राहतात म्हणून सखेसोबती आणि संचार करतात म्हणून सुपर्ण म्हणावयाचे. पण तीं माय-लेकरें आहेत, किंबहुना बिंबप्रतिबिंबें.

## १५८. संग्रह

शेतकरी आरंभीं पेरणी करतो आणि शेवटीं पिकाची सवंगणी करतो. सवंगणी करतो तेव्हां प्रथम तो पुढील पेरणीसाठीं बीजसंग्रह करून ठेवतो. अशा प्रकारेंच परमेश्वर हि सृष्टीची पेरणी व सवंगणी यथाकाल सारखा करीत असतो. या त्याच्या व्यवसायांत रागद्वेष नाहीं. तो आपलें नियत कर्म मात्र करीत असतो. सारी सृष्टी जी निर्माण होते ती त्या परमेश्वरी संग्रहांतूनच होय. मुळांत जर कांहीं संग्रह नसेल तर पेरणी होणार कशी आणि पीक तरी कुठून येणार? म्हणून परमेश्वर हा संग्रहरूप आहे. सारी सृष्टि आरंभीं बीजभूत परमेश्वरांत संगृहीत होती आणि पर्यवसानीं हि ती समग्र त्यांतच संगृहीत होणार आहे, तद्‌रूपानें फलित होणार आहे. मध्यंतरींचा सारा प्रपंच कालौघानें उपजत निमत राहणारा अनित्य आहे. नित्य एक परमात्मा आहे, जो सर्वसंग्रह आहे, सर्वांचें मूळ आणि सर्वांचें फलित आहे.

### १५९. सर्ग

संग्रह म्हणजे समूहन आहे, समाहार आहे, तर सर्ग म्हणजे व्यूहन आहे, विहार आहे. परमात्म्याची जी अतर्क्य शक्ति आहे तिचा आविष्कार म्हणजे सर्ग होय. परमात्म्याच्या अप्रतर्क्य निगूढ शक्तीची अभिव्यक्ति म्हणजे ही जगद्व्यक्ति होय, हा सर्ग होय. त्यामुळें ह्या सर्व व्यक्तींची जी जननी, आदिशक्ति, तीच सर्ग म्हटली आहे. आदिशक्तीपासूनच ही सारी अभिव्यक्ति झाली आहे हें जाणून भक्त त्या सर्गहेतु परमात्म्याला शक्तिरूपानें, मातृरूपानें ध्यातात आणि गातात.

**अहं सर्वस्य प्रभवो मत्तः सर्वं प्रवर्तते ।**
**इति मत्वा भजन्ते मां बुधा भाव-समन्विताः ॥**
गीता १०.८

संग्रह आणि सर्ग ही जोड कल्पना आहे. अस्तमनीं संयमन आपले किरण समेटतो, उदयीं सूर्य ते विखरतो. परमात्मतेज हि तसें कल्पारंभीं सृष्टिरूप आपले किरण पसरतें आणि कल्पान्तीं ते गुंडाळून घेतें. हे दोन्ही व्यापार ज्या तेजाच्या सत्तेनें होतात त्या तेजाचें ध्यान करायला गायत्री सांगते.

### १६०. धृतात्मा

परमात्मा हा धृतात्मा आहे, म्हणजे वशी आहे. त्याचें अन्तःकरण त्याच्या स्वाधीन आहे. जीव आणि शिव यांच्यांत हेंच अंतर आहे. जीवाचें अंतःकरण त्याच्या अधीन रहात नाहीं. नको ते विचार आणि विकार त्याच्या मनांत थैमान घालत असतात. तो असहायपणें त्यांनीं झपाटला जात राहतो. परंतु परमात्म्याला असले विकार शिवत नाहींत. सूर्याला जसा अंधकार माहीत नाहीं, तसा परमात्म्याला मनोविकार माहीत नाहीं. परमात्म्याला मनोविकार माहीत नाहींत, कारण ते सारे उपाधिगत आहेत, आणि परमात्मा आहे निरुपाधि. धृतात्मा कोणी महात्मा असूं शकेल, पण त्याचें तें धृतात्मत्व परमात्म्याच्याहून वेगळें. तें मित आणि अनित्यच असावयाचें, परमात्मा हा केवल धृतात्मा.

### १६१. नियम

धृतात्मा म्हणजे संयमी. संपूर्ण संयमन करणारा. पण हा संयम यमनियमांच्या आधारेंच सिद्ध होतो. म्हणून तो परमात्मा संयमोपायभूत नियमरूप आणि यमरूप आहे, असें क्रमशः म्हटलें आहे. यम नियम आणि संयम ही त्रयी म्हणजे योग होय. अहिंसा सत्य अस्तेय ब्रह्मचर्य आणि अपरिग्रह हीं सार्वभौम महाव्रतें हीं मूळ होत. नियम शौचसंतोषादि हे स्कंध-शाखोपशाखा होत. आणि धारणाध्यानसमाधिरूप संयम म्हणजे पुष्पफळ होय. असा हा आमूलचूल योग-वृक्ष आहे. अथवा हा योगशंकु आहे. यम त्याचा विशाल पाया आहे. नियम त्याच्या भुजा आहेत. संयम त्याचें शिखर आहे.

ईश्वर आणि त्याचे नियम दोन नाहींत. ईश्वरानें सृष्टीला भौतिक, नैतिक, आध्यात्मिक नियम लावून दिले आणि तो निश्चिन्त झाला. जो ईश्वरी नियमानुसार वागेल त्याला सुख आणि जो तद्विपरीत चालेल त्याला असुख होईल. अशा प्रकारें कर्म-फलदायविभागानुसार सबंध सृष्टि नियमबद्ध आहे. असुर समजतात त्याप्रमाणें हें जग असत्य म्हणजे संविधानरहित, अप्रतिष्ठ म्हणजे नियमनरहित आणि अनीश्वर म्हणजे शासकरहित अराजक नाहीं. हें सुव्यवस्थित ईश्वरी शासन आहे. ईश्वर सर्वांचें स्वभावसूत्रानें नियमन करीत आहे.

### १६२. यम

ईश्वर आणि त्याचे नियम दोन नाहींत म्हटलें. पण जगांत आपण कायदे म्हणजे धर्म आणि राजा म्हणजे धर्मगोप्ता असे दोन विभाग पाहतो. राजा केव्हां केव्हां आपले कायदे बाजूला सारून कोणाला दया हि दाखवितो. म्हणजे कायद्यापेक्षां हि राजा हा वेगळा आणि वरिष्ठ दिसून येतो. ईश्वराबाबतहि मनुष्य तशी

कल्पना करतो. आणि म्हणून तो ईश्वर आणि त्याचे नियम यांत भेद करतो. परंतु वस्तुतः ईश्वराचें ईश्वरत्व यांतच आहे कीं तो नियमरूपानें प्रकटून ईश्वररूपानें लोपला आहे. म्हणजे 'ईश्वर=नियम, नियम=ईश्वर' असें समीकरण झालें! (ईश्वरी नियम निरपवाद आहे. निरपवादत्व हीच त्याची दया आहे.) पण तत्त्व आणि व्यवहार या दोन्ही दृष्टींनीं हें गळीं उतरत नाहीं. कारण, नियमांहून नियमयिता वेगळाच असावयाचा. नियमयित्रधीन नियम असूं शकतात, पण नियमाधीन नियमयिता असणार नाहीं. शक्तीहून शक्तिमान् वेगळा आणि वरिष्ठच असणार ना? व्यवहारांत हि नियमयित्याशिवाय नुसते नियम उपलब्ध होत नाहींत. म्हणून नियमयिता कल्पावा लागतो. ह्या दृष्टीनें ईश्वर हा नियमच नव्हे तर यम म्हणजे नियमयिता हि आहे. ईश्वर हें नियमन वा शासन सर्वांतर्यामिरूपानें करतो.

## १६३. वेद्य

वेद्य म्हणजे वेद-प्रतिपाद्य, ज्ञेय, ब्रह्म.

**सर्वे वेदा यत् पदं आमनन्ति**
**तपांसि सर्वाणि च यद् वदन्ति।**
**यद् इच्छन्तो ब्रह्मचर्यं चरन्ति**
**तत् ते पदं संग्रहेण ब्रवीमि॥**
**ॐ इति एतत्।** कठ २.१५

ब्रह्म स्वसंवेद्य असलें तरी त्याचें प्रतिपादन प्रथम वेदांनींच केलें आहे. जे अनुभवी पुरुष आहेत ते आपल्या गुरूंचा हवाला देतात. ते गुरु हि ''इति शुश्रुम पूर्वेषां ये नस् तद् विचचक्षिरे'' असेंच म्हणतात. या सर्व पूर्वजांचा पूर्वज म्हणजे अज परमेष्ठी प्रजापति होय. हा चतुर्मुख ब्रह्मा म्हणजे अनादि ज्ञानस्वरूप चार वेद होत. त्यांच्या गुरुमुखांतून हें ज्ञान परंपरेनें प्राप्त झालें म्हणून तें ''वेद्य'' म्हणावयाचें. म्हणून परमात्मा ''वेद्य'' म्हणावयाचा. माळ्याकडून भाजीपाला मिळतो, पण रत्न घ्यायचें तर त्यासाठीं जवाहिऱ्याकडेच गेलें पाहिजे. त्याप्रमाणें आत्मज्ञानासाठीं वेदांकडेच गेलें पाहिजे.

## १६४. वैद्य

(त्या ब्रह्म-) विद्येचा जो ज्ञाता तो वैद्य होय. ज्याच्यापासून विद्यावंश झाला तोच त्या विद्येचा आदिज्ञाता होय, गुरु होय, स्वामी होय. ही विद्या ज्ञाननिधान परमेश्वरापासून झालेली आहे. म्हणून तोच या विद्येचा म्हणजे वेदांचा स्वामी म्हणावयाचा.

वैद्य आपल्या आयुर्विद्येच्या योगें लोकांना रोगमुक्त करतो, परमात्मा वा गुरु त्याचप्रमाणें आपल्या आत्मविद्येच्या योगें मुमुक्षूंना, भवरोगमुक्त करतो, अनामय करतो. म्हणून हि तो वैद्य होय.

जन्म मृत्यु जरा व्याधि हे सर्व भयाचे विविध भाव होत. आत्मविद्या या सर्व भयांतून सोडवते. म्हणून वैद्य म्हणजे आत्मविद्या-विशारद. हा वैद्यांचाहि वैद्य होय. किंबहुना तोच एक वैद्य असून इतर सारे आडनांवाचे होत, तोतया होत.

## १६५. सदायोगी

स्वरूपावस्थिति म्हणजे योग होय. ती ज्याला सदैव असते तो सदायोगी म्हणावयाचा. जे योगी म्हणवले जातात त्यांचा योग म्हणजे समाधि तात्कालिक असतो. त्या समाधींतून त्यांचें व्युत्थान होतें. हा समाधि कृत्रिम आहे. त्यामुळें तो साधावा लागतो आणि त्यांतून व्युत्थान होतें. परंतु ज्ञान-समाधींत असा प्रकार नाहीं. ज्याला आपण मनुष्य आहों हें ज्ञान झालें तें त्याला आमरण केव्हां हि सोडून जात नाहीं. तें त्याला घोकावें लागत नाहीं.

त्याचा त्याला भार होत नाहीं. त्यांतून त्याचें व्युत्थान होत नाहीं. तसें स्वरूपावस्थान ज्याचें केव्हां हि सृष्टीच्या सर्ग-स्थिति-निरोध कालीं हि नाहींसें होत नाहीं. तो परमात्मा हा सदायोगी होय. ज्याला आत्मज्ञान झालें तो हि तसाच सदा-योगी म्हणावयाचा. म्हटलेंच आहे गीतेंत :

**''इदं ज्ञानं उपाश्रित्य मम साधर्म्यमागताः।**
**सर्गेऽपि नोपजायन्ते प्रलये न व्यथन्ति च॥''**
गी. १४.२

### १६६. वीरहा

वीरहा म्हणजे प्रति-वीरहा. जो कोणी परमेश्वराविरुद्ध उठतो त्याला त्याला परमेश्वर नेस्तनाबूद करतो. परमेश्वर हा सत्यस्वरूप आहे, धर्म-स्वरूप आहे. त्याच्याविरुद्ध उठलेला कोणीहि, तो किती का बलाढ्य असेना, अखेर जमीन-दोस्तच व्हावयाचा. हें आध्यात्मिक सत्य, हा सत्याचा शाश्वत विजय आणि अधर्माचा निश्चित पराजय, गायला अठरा पुराणें झालीं आहेत. तीं संख्येच्या अंतिम म्हणजे अठराव्या स्थानाइतकीं म्हणजे परार्धावधि झालीं तरी तीं हेंच सांगणार : "सत्यमेव जयते, नानृतम्".

### १६७. माधव

उमा-धव आणि मा-धव, शिव आणि विष्णु, दोन्ही आदर्श अभिन्नच आहेत. शिव वैराग्यमूर्ति वा विरक्तिरूप आहे, त्याला उमा वरिती झाली. विष्णु निरिच्छता-मूर्ति वा अनासक्तिरूप, त्याला लक्ष्मी वरिती झाली. उभयत्र परम वैराग्य हें आत्मज्ञानाचें अव्यभिचारी लक्षण आहे. सूर्य जसा सौरी प्रभेनें आपल्या प्रकाशकिरणांनीं, नित्य मंडित असतो तसा ज्ञान-सूर्य ज्ञान-प्रभेनें, वैराग्यादि ज्ञान-किरणांनीं नित्य मंडित असतो. ज्ञान-वैराग्यांची ही अव्यभिचारिता, हा अविच्छेद, असा पति-पत्नीसंबंधानें चित्रित केला आहे मा-धव, उमा-धव म्हणून. वैराग्यप्रभा-भासुर ज्ञान शिव आणि विष्णु दोहोंच्या ठाईं निजरूपानें विराजमान आहे. शिव हा कर्मसंन्यासाचा आदर्श आहे. विष्णु हा कर्मयोगाचा आदर्श आहे. तिसरा आदर्श नाहीं ,म्हणून "एको देव: केशवो वा शिवो वा". म्हणूनच त्रिदेवांतील ब्रह्मदेवाची उपासना नाहीं. तो कांहीं स्वतंत्र आदर्श नाहीं. शिव आणि विष्णु हे दोन्ही आत्मज्ञानाचेच आदर्श असल्यामुळें "शिवस्य हृदये विष्णु:, विष्णोश्च हृदये शिव:" असें म्हटलें आहे. शैव-वैष्णवांत उपासना-भेद असला तरी आदर्शांत भेद नाहीं. म्हणूनच गीतेंत 'द्विविधा निष्ठा' असा प्रयोग येतो. 'द्वे निष्ठे' असा भेद नाहीं. आणि म्हणून त्यांच्यांत विरोध नाहीं. तर आहे "साधु दिसती वेगळाले, परि ते स्वरूपीं मिळाले" असें अद्वैत. सर्वधर्म-समन्वयाचा हा मार्ग आहे.

### १६८. मधु

सामान्यत: उद्भिदाचें सार म्हणजे पुष्प वा फल. पण कित्येक उद्भिज्जाति अशा आहेत कीं त्यांचें सार त्यांच्या मुळांत, बुंध्यांत, त्वचेंत, पानांत वा अन्य अंगोपांगांत आढळून येतें. पण या सारवान् अंगोपांगांत असार भाग हि असतो. तो वगळून घेतलेला जो सारांश तो म्हणजे मधु होय. अर्थात् मधु म्हणजे तो अंश कीं ज्यांत असार कांहींच असत नाहीं आणि ज्याच्या संगोपनासाठीं सारें जीव-जगत् धडपडत असतें. मोहोळांतील प्रत्येक जीव त्या मधूसाठीं जन्मत जगत आणि मरत असतो. मधूवांचून अन्य उद्देश वा उद्योग त्यांना ठाऊक नाहीं. परमात्मा हा या विश्वकुलाचा तसा मधुकंद आहे. सर्व जीव जाणून वा नेणून त्याच्याच साठीं जन्मून जगत आणि मरून जन्मत असतात. असा तो सर्वांचा परम प्रिय आहे. म्हणून तो मधु. ज्यावरून देह-देहांतरांची कुरवंडी करून टाकावी असा तो सर्वांचा सर्वस्व आहे. त्याहून अधिक इष्ट, त्याहून अधिक मिष्ट दुसरें कांहीं नाहीं. म्हणून तो मधु. एवढ्यासाठींच मधुसूक्त गाइलें आहे.

### १६९. अतीन्द्रिय

परमात्मा हा अतीन्द्रिय आहे. म्हणजे तो इन्द्रियांच्या आवाक्याबाहेरचा आहे. तो इन्द्रियांना अगोचर आहे. तो पंच ज्ञानेंद्रियांचा विषय नाहींच पण अतीन्द्रिय शब्दानें मुख्यत: तो मनाचा विषय नाहीं असें म्हणावयाचें आहे. कारण, सर्वेन्द्रियांत मन प्रमुख आहे. "यद् मनसा न मनुते येन आहुर् मनो मतम्। तदेव ब्रह्म त्वं विद्धि नेदं यदिदं उपासते।।" उपासना म्हणजे विषय-ध्यान. विषय स्वत: परिवर्तनशील आहेत. आणि इन्द्रियांसकट मनहि तसेंच चंचल आहे.

अशा स्थितींत विषयेन्द्रिय-संनिकर्षानें जें ज्ञान होतें तें ज्ञान या पदवीस पात्र नसून कल्पनामात्र होय. ईश्वरी ज्ञान हें वस्तुज्ञान आहे, विषयज्ञान ही कल्पना आहे. कल्पनेंत ग्राह्य आणि ग्राहक दोन्ही अस्थिर आणि अविश्वसनीय आहेत. वस्तुज्ञानांत ग्राह्य बोध आणि ग्राहक बुद्धि दोन्ही स्थिर आणि विश्वसनीय आहेत. म्हणूनच ह्या ज्ञानाला ''बुद्धिग्राह्यं अतीन्द्रियम्'' म्हटलें आहे. कोणतें हि ज्ञान बुद्धीनेंच ग्रहण व्हावयाचें मग ते विषयाकार असो कीं निर्विषय असो. इन्द्रियद्वारा होणारें ज्ञानमात्र विषयरूप असतें. आणि ज्ञातृस्वरूप आत्मतत्त्व हें निर्गुण असल्यामुळें तें स्वभावतःच अतीन्द्रिय आहे. त्यामुळें परमात्मा हा अतीन्द्रिय म्हटला आहे.

### १७०. महामाय

माया म्हणजे चातुर्य, इंद्रजाल, जादू. एखादा जादूगार आपले हातचलाखीचे खेळ दाखवून प्रेक्षकांना चकित करतो. त्याच्याजवळ पहाल तर साधन-सामग्री फारशी नसते. एक पोतडी, एक गडी आणि एक छडी. ह्यांच्या साहाय्यानें तो अद्भुत खेळ करून दाखवितो. परंतु परमेश्वर? ''किमीहः किं-कायः स खलु किमुपायस् त्रिभुवनं, किमाधारो धाता सृजति किमुपादान इति च''—(शिवमहिम्न.) त्याच्याजवळ गडी, छडी, पोतडी कांहींच नसतांना तो एकटा एक हें अद्भुत विश्व कसें रचतो. आणि पुनः तें जादूच्या गोष्टीसारखें फसवें नव्हे. तर प्रत्यक्ष शाश्वत उपभोग्य असें, जीवांच्या संपूर्ण जीवनाची ज्यांत परिपूर्ण सोय आहे असें विश्व! या सर्वाश्चर्यमय विश्वाहून अधिक मोठें अद्भुत लाघव कोणतें? म्हणून परमात्मा हा महामाय होय. मायाव्यांना हि त्याची ही माया समजत नाहीं, मग जमणें दूरच. म्हणून तो महामाय.

### १७१. महोत्साह

सर्वाश्चर्यमय विश्वाच्या रचनेंत जसें अतर्क्य बुद्धिवैभव दिसून येतें, तसा अपार उत्साह हि दिसून येतो. एखाद्या महाकवीच्या ठाईं अद्भुत कवित्व असणें पुरेसें नाहीं, महाकाव्य रचण्याची अजस्र स्फूर्ति हि त्याच्या मनांत हवी. मंद स्फूर्तीच्या कवीकडून महाकाव्याची रचना होऊं शकत नाहीं. किंचित्-काव्य प्रसवून त्याची काव्य-स्फूर्ति निपचित पडते. परंतु परमेश्वराची स्फूर्ति अपरंपार आहे. तो अनन्तकोटि-ब्रह्माण्डनायक आहे. त्याची विश्वरचना अव्याहत पूर्ण वेगानें सुरूच आहे. तो सर्गामागून सर्ग रचितच चालला आहे. त्याच्या इतके सर्ग अजून कोणाहि महा-कवीनें रचले नाहींत हें उघड आहे. अशा स्थितींत त्याचा उत्साह, त्याची स्फूर्ति किती म्हणून वर्णावी. ती अगणितच आहे. म्हणून तो महोत्साह होय.

### १७२. महाबल

एखादें महत्कृत्य संपादावयाचें म्हणजे त्यासाठीं नुसतें अफाट बुद्धिवैभव आणि अचाट उत्साह वा स्फूर्ति असून भागत नाहीं. तो ताण सहन करण्याला शारीरिक बळ हि असेंच भक्कम हवें असतें. परमेश्वराच्या ठाईं तें तसें आहे, म्हणूनच तो हें सर्वतोऽनन्तरूप विश्व निर्माण करूं शकला, हें उघड आहे. अखिल भारतीय भूदानयज्ञ-कार्याची उभारणी करायला लागणारी विशाल बुद्धि, अदम्य उत्साह आणि कणखर शरीर दीक्षिताला नसतें, तर तें महत्कार्य संपन्न झालें नसतें. त्यापेक्षां हा सृष्टिरूप यज्ञ किती किती महान् म्हणावा? कोणी हि म्हणेल ''कशी तुळितसां तुम्ही प्रकट मेरुशीं मोहरी?''—(केकावलि) आणि तें ठीकच आहे. त्यांची तुलनाच होणारी नाहीं. परंतु ह्या अप्रस्तुत प्रशंसेनें परमेश्वराचें महाबळ चांगलेंच प्रकट होतें. तेंच तिचें प्रयोजन. परमेश्वराला महामाय महोत्साह आणि महाबळ जें क्रमानें म्हटलें आहे, तें साभिप्राय आहे. विश्वसृष्टीसारखें महान् कर्म करणारा महामाय महोत्साह हि आणि महाबळच असला पाहिजे. त्याचें बुद्धिबळ मनोबल आणि

शरीरबळ तसेंच महान् असलें पाहिजे. ह्या त्रिगुण-संनिपाताशिवाय महत् कार्य संपन्न होत नाहीं. मग तें जीवाचें असो कीं ईश्वराचें असो.

## १७३. महाबुद्धि

महामाय आणि महाबुद्धि हीं दोन नामें आलीं आहेत. तीं उघडच भिन्नार्थक आहेत. त्यांत भिन्न वर्ण-समाम्नाय आहेत. तीं असवर्ण आहेत. परंतु जीं नामें सवर्ण आहेत, तीं हि समानार्थक नाहींत. तीं भिन्नार्थक म्हणूनच पुन: आलीं आहेत. नाहींतर तीं निरर्थक होतील.

माया म्हणजे मय-विद्या, कल्पकता, रचना-कौशल्य. आणि बुद्धि म्हणजे वस्तुयाथार्थ्य हेरण्याची शक्ति. माया हें हस्तलाघव आहे, तर बुद्धि हें तत्त्वनिर्णय-वैशारद्य आहे. कोणी किती हि कल्पक झाला, तरी त्याला ही सर्वाश्चर्यमय विश्वरचना करतां यावयाची नाहीं. कोणी किती हि बुद्धिमान् झाला तरी, त्याला तिचें यथार्थ स्वरूप आकलन व्हावयाचें नाहीं. महाबुद्धिमान् म्हणविणारे तत्त्ववेत्तेहि त्याबाबत आपापल्या उपपत्ति बसवतात इतकेंच. त्यांत तत्त्वनिर्णयापेक्षां त्यांचा रुचि-निर्णयच अधिक. म्हणून महामाय आणि महाबुद्धि एक परमेश्वरच होय. त्याखालोखाल तो कीं जो परमेश्वराचें हें अनन्य-साधारणत्व ओळखून त्याची भक्ति करतो.

''अहं सर्वस्य प्रभवो मत्त: सर्वं प्रवर्तते।
इति मत्वा भजन्ते मां 'बुधा:' भाव-समन्विता:॥''
गी. १०.८.

जे परमेश्वराला भजतात ते परम बुद्धिमान् होत. 'बुद्धिमतां वरिष्ठ' हनुमंताप्रमाणें जे महाभागवत तेच महाबुद्धिमान् होत.

## १७४. महावीर्य

इष्ट कार्य घडवून आणण्याची क्षमता म्हणजे वीर्य होय. संतानोत्पादन- क्षमता म्हणजे वीर्य होय. कार्यक्षम बैजिक शक्ति म्हणजे वीर्य होय. बीजाच्या ठाईं मौलिक शक्ति असते. कालशक्तीनें परिपक्व झालें म्हणजे तें वीर्यवान् होतें. पुढें त्याला योग्य भूमि, खत-पाणी आणि मशागत मिळाली म्हणजे तें समृद्ध होतें, वीर्यवत्तर होतें. एका तिळाचे दहा हजार तीळ होतात. तेव्हां त्या तिळाची वीर्यवत्ता दहा हजारपट वाढली असें म्हटलें पाहिजे. पण ही वाढ मुळांत बैजिक शक्ति-संपन्न असा एक तीळ आहे म्हणून झाली. पोचट म्हणजे निर्वीर्य तिळाची तशी होणार नाहीं. तो स्वत:च कुजून माती व्हायचा. तेवढीच त्याची योग्यता. परमेश्वर जो या अनंत विश्व-कदंबाचा बीजभूत आहे त्याचें वीर्य किती म्हणावें? या विश्व-कदंबावर किती कदंबें लागतात ही गणति कोणी करूं शकत नाहीं. आणि तो परमात्मा इतका वीर्यवान् आहे कीं त्याला त्याची खबर नाहीं. ''किती उमललीं, किती गळालीं चिंता ही नच वेलीला। वीर्याची त्या ही लीला!'' असा महावीर्य आहे तो परमात्मा.

महाबुद्धि आणि महावीर्य या दोन क्रमिक नामांनीं ब्रह्म आणि क्षत्र या दोन मुख्य वर्णांचें समाजांतील नेतृत्व सूचित होतें.

## १७५. महाशक्ति

शक्ति म्हणजे शक्यता. प्रत्येक आम्र बीजाच्या ठाईं आम्रफल निर्माण करण्याची शक्ति असते. पण प्रत्येकच बीजाच्या ठाईं फलोत्पत्ति होण्याचा संभव नसतो. ज्या बीजाच्या ठाईं वीर्य आहे तिथेंच फलसंभव होतो. अपक्व वा जीर्ण बीजाच्या ठाईं ती क्षमता वा वीर्य नसतें. परिणामावरून परिणाम-क्षमतेचें व क्षमतेवरून बैजिक शक्तीचें अनुमान होतें. शक्ति वीर्य विक्रम अशी ही उभारणी आहे. उत्तरोत्तर पूर्वपूर्वाधीन आहे. ''अनन्तवीर्यामितविक्रमस् त्वम्'' गी. ११-४०. असें विश्वरूपाचें वर्णन आलें आहे त्यांत हाच क्रम आला आहे. आणि तो साभिप्राय आहे. हा तत्त्वविचार गृहीत धरून शक्ति शब्द सर्वार्थानें प्रयुक्त

होतो. त्यामुळें महाशक्ति म्हणजे नि:शेष सर्व आणि सर्वविध रूपांत प्रकटणारी शक्ति होय. परमात्मा हा कर्तुं-अकर्तुं-अन्यथाकर्तुं समर्थ आहे म्हणून तो महाशक्ति म्हणावयाचा.

### १७६. महाद्युति

द्युति म्हणजे प्रकाश. हा विश्वरूप प्रकाश ज्याचा आहे तो महाद्युति म्हणावयाचा. हें विश्व परमात्मसत्तेची अभिव्यक्ति होय, प्रकाश होय. ज्याला प्रकाश म्हणतात तो हि परमात्मसत्तेच्या प्रकाशाचा एक किरणमात्र होय. म्हटलेंच आहे–

**यद् आदित्यगतं तेजो**
**जगद् भासयतेऽखिलम्।**
**यच् चन्द्रमसि यच् चाग्नौ**
**तत् तेजो विद्धि मामकम्।।**

गी. १५.१२

थोडक्यांत ''तेजस् तेजस्विनामहम्।'' हें सारें भौतिक तेज म्हणूनच अल्प होय आणि तें आत्मिक तेज महान् होय. तें ज्याचें अंगभूत आहे तो महाद्युति होय. जिथें तेज प्रकटतें तिथें शक्ति गृहीतच आहे. द्रव्याणूंचा स्फोट होतो तेव्हां प्रचंड शक्ति आणि तत्फलित तेज प्रकट होत असतें. म्हणून महाशक्ति आणि महाद्युति हीं नामें कार्यकारणभावानें निगडित झालीं आहेत. त्याचप्रमाणें महाबुद्धि आणि महावीर्य हीं नामें हि. जिथें बुद्धि आहे तिथेंच वीर्य म्हणजे बल हि आहे. निर्बुद्ध शक्तीवर बुद्धिमान् जीव नेहमींच मात करीत असतात, हें आपण पाहातोंच. म्हणूनच म्हटलें आहे– ''बुद्धिर् यस्य बलं तस्य''.

जिथें बुद्धि तिथें बल, जिथें बल तिथें सामर्थ्य, आणि जिथें सामर्थ्य तिथेंच प्रभाव प्रकट होतो. म्हणून 'महाबुद्धि महावीर्य महाशक्ति महाद्युति' हा क्रम साभिप्राय होय.

### १७७. अनिर्देश्य-वपु

व्यक्तीला ओळखायला त्याची कांहीं खूण सांगतां येतें. परंतु अव्यक्ताची अशी कांहीं खूण सांगतां येत नाहीं. अथवा अशी कांहीं खूण सांगतां न येणें हीच त्याची खूण. निर्देश्यमात्र बाह्य होय, ज्ञेय होय. तद्विपरीत ज्ञातृ-स्वरूप हेंच अन्तरतर आणि अनिर्देश्य म्हटलें जातें. अनिर्देश्य-वपु नामानें हेंच अभिप्रेत आहे. अनिर्देश्य-वपु म्हणजेच अव्यक्त-मूर्ति. अनिर्देश्य पदानें गीतेचें निर्गुण ब्रह्माचें वर्णन आठवतें.

**ये त्वक्षरं अनिर्देश्यं अव्यक्तं पर्युपासते।**
**सर्वत्रगं अचिन्त्यं च कूटस्थं अचलं ध्रुवम्।।**

गी. १२.३

या श्लोकांत अक्षर अनिर्देश्य अव्यक्त सर्वत्रग अचिन्त्य कूटस्थ अचल आणि ध्रुव हें जें निर्गुणाचें नामाष्टक आलें आहे ह्यापैकीं कूटस्थ सोडून बाकीचीं सर्व नामें विष्णुसहस्रांत आलीं आहेत. सर्वत्रग ऐवजीं सर्वम् आलें आहे इतकेंच.

विष्णुसहस्रांत ऋषींनीं परिगीत म्हणजे वेगवेगळ्या प्रसंगांत आणि ग्रंथांत गाइलेलीं नामें एकत्र गुंफिलीं आहेत. हा सर्वसंग्रह आहे.

### १७८. श्रीमान्

श्री म्हणजे संपत्ति. ज्यावर आपली मालकी असते त्याला म्हणतात संपत्ति, त्याला म्हणतात स्व. ज्यावर आपली खरी मालकी आहे, जें आपल्यापासून कोणी चोर, राजा वा मृत्यु हिरावून घेऊं शकत नाहीं असें आपलें धन म्हणजे आपलें स्व-तत्त्व होय. तें कधीं परहस्तगत होणें नाहीं. राजस्व राजा नेतो, देवस्व देव घेतो. पण तें खरें ''स्व'' नव्हे. तें अस्वच होय. जें ''स्व'' आहे तें देतां घेतां येत नाहीं. हें जो ओळखतो तो आत्मवान् च श्रीमान् होय. तो धनाच्या, अस्वाच्या, गतागतानें हर्षशोकाकुल होत नाहीं. तो सर्वकाळ समुद्रवत् परिपूर्ण असतो, अचलप्रतिष्ठ असतो. अशा श्रीमंत आणि भिकारी, पंडित आणि मूढ पुरुषाविषयीं म्हटलें आहे-

**हर्षस्थान-सहस्राणि भयस्थान-शतानि च।**
**दिवसे दिवसे मूढं आविशन्ति न पण्डितम्।।**

–भारतसावित्री

### १७९. अमेयात्मा

जें मानविषय होतें तें मेय होय. परमात्मा हा असा कोणाला हि आणि कशानें हि मेय होत नाहीं. म्हणून तो अमेय-स्वरूप होय. तो स्वानुभूत्येकमान आहे. तो केवळ स्वसंवेद्य आहे. मेयमात्र दिक् काल आणि कार्यकारण-भाव यांच्या योगें अवच्छिन्न आहे. परमात्मा हा तसा नाहीं. तो सर्वतोनन्त आहे. मेयमात्र ज्ञेय होय. अमेय परमात्मा हा ज्ञातृस्वरूप आहे, केवळ चिद्रूप आहे. म्हणून कवि त्याचें वर्णन–

**दिक्-कालाद्यनवच्छिन्नानन्त-चिन्मात्र-मूर्तये**
**स्वानुभूत्येकमानाय नमः शान्ताय तेजसे**
**वैराग्य शतक**

अशा शब्दांत करून त्याला नमन करीत असतात.

### १८०. महाद्रिधृक् (धृत्)

जगांत सर्व कांहीं चळत असतें, स्थानच्युत होत असतें. जो चळत नाहीं, आपलें स्थान सोडत नाहीं तो डोंगर च अद्रि होय, अचल होय. पण हे डोंगर हि लहान-मोठे असतात. ज्याच्यापासून डोंगरांचे फाटे निघतात असे जे मूळ आणि मोठे पर्वत त्यांना महाद्रि वा कुलाचल म्हणतात. आणि जे त्यांचे शाखाभूत ते सामान्य अचल होत. भारतवर्षांत महेन्द्र, मलय, सह्य, शुक्तिमान्, ऋक्ष, विंध्य आणि पारियात्र हे सात कुलाचल होत, धारण जसा तंबूला तसे ते या वर्षाला म्हणजे भूखंडाला धरून आहेत. कल्पान्तीं मात्र हे सारे कुलाचल ढळतात व ढासळतात आणि ही अद्रिकीला पृथिवी एकार्णव झालेल्या सागरांत फुटलेल्या ढेकळाप्रमाणें विरून जाते. सर्व जीवांना धारण करते ती धरणी, तिला हि ताणून धरतो तो धरणीधर, म्हणजे महाद्रि. आणि त्याला हि धारण करतो म्हणजे आपल्या जागीं खिळून ठेवतो, चळूं देत नाहीं तो परमात्मा महाद्रिधृत् वा महाद्रिधृक् होय. 'पर्वतीं बैसका न संडावी । हे माझी आण', ज्ञानदेवी परमेश्वराच्या आज्ञेनें पर्वत स्थिर-स्थावर आहेत. त्याचे ते अंकित आहेत. म्हणून परमात्मा महाद्रिधृत् म्हटला आहे. मंदराचल वा गोवर्धन यांचें धारण ही तर त्याची एक अवतारलीला आहे. परमेश्वर पर्वतांना छत्रीप्रमाणें नाहीं धारण करीत, तर गुरुत्वाकर्षणरूप आपल्या स्वाभाविक शक्तीनें धारण करीत आहे. हें झालें महाद्रिधृत्.

महाद्रिधृक् म्हणजे महाद्रीचें धर्षण करणारा, त्यांना तुच्छ लेखणारा. ह्या धृष् धातु च्या पक्षीं हि वरील विवेचन उपयोगी होईल. महाद्रींना त्यानें पाठकुळी घेतलें, छत्रीप्रमाणें धरलें याचा अर्थ त्यांचीं खेळणीं केलीं असा होतो. कल्पांतीं त्यांना ढेकळां-प्रमाणें तो प्रलय-पयोधींत भिरकावून देतो. म्हणून तो महाद्रिधृक् म्हणावयाचा.

धृक् हें रूप धृष् धातूचेंच कल्पिण्याचें कारण नाहीं. तें धृचेंच धृत् प्रमाणें असलेलें वेगळें रूप आहे. धृक् हा पाठ ग्राह्य.

### १८१. महेष्वास

महान् इष्वास, मोठें धनु, ज्याचें तो महेष्वास होय. लहान कमानीची फेक लहान, मोठीची मोठी. म्हणून ज्याचें धनुष्य मोठें त्याच्या बाणाची फेक लांब पल्ल्याची आणि जोरदार होणार. अर्थात् असें मोठें आणि दणकट धनुष्य पेलणारे भुजदंड हि तसेच मोठे बळकट असणार. ईश्वराहून अधिक बलशाही कोण आहे? आणि त्याच्या संहारशक्तीला वश न होणारा कोण आणि कुठें आहे? तो अंतकाचा हि अंतक आहे. म्हणून तो महेष्वास म्हटला आहे. सागरपार लंका, तिच्या कडेकोट बंदोबस्तांत राहणारा रावण. पण तो हि त्याच्या रामबाणानें गतप्राण झाला ना! विश्वांत असें स्थान नाहीं कीं जिथें त्याची पोंच नाहीं, विश्वांत असें कांहीं नाहीं कीं जें त्याच्या कालशक्तीच्या तडाख्यांतून सुटलें आहे.

## १८२. महीभर्ता

ही समुद्रवसना पर्वतस्तनमंडला विशाल पृथ्वी सर्व ज़ीवांना धारण करणारी आणि त्यांचें भरण करणारी आहे. त्यामुळेंच ती मही या महत्पदवीस पात्र झाली आहे. नाहींतर तिच्याहून मोठे ग्रहगोल काय कमी पडले आहेत? पण तिथें जीव नाहींत. कारण तिथें जीवनोपाय नाहीं. तो या पृथ्वीवर आहे. अशी तिची महती आहे. म्हणून ती मही आहे. पण या महीहून हि तो परमात्मा महत्तर आहे. कारण तोच या महीचा भर्ता आहे. तिला निर्मिणारा, तिला उर्वर बनविणारा, तिच्याठाई आपलें बीज पेरून तिला सस्यश्यामल बनविणारा आणि अशा प्रकारें तिचें भरण करणारा तो भर्ता आहे. तो सर्व जीवांचा पिता आहे, पृथ्वी ही त्याची भार्या सर्व जीवांची जननी आहे. ''माता भूमिः पुत्रोऽहं पृथिव्याः'' पण आमचा ''बीजप्रदः पिता'' तो परमात्मा आहे. म्हटलेंच आहे ''गां आविश्य च भूतानि धारयाम्यहमोजसा।''

मही आणि महीभर्ता यांचें हें असें महिमान असल्यामुळें आम्ही गात असतों:

**समुद्रवसने देवि पर्वतस्तनमंडले ।**
**विष्णुपत्नि नमस् तुभ्यं पादस्पर्शं क्षमस्व मे ।।**

## १८३. श्रीनिवास

ज्याच्या अंगावर जितके अधिक अलंकार तितका तो अधिक श्रीमंत, श्रीनिवास, म्हटला जातो. तेंच ज्याच्या अंगावर जितके अधिक अंलंकार तितका तो अधिक सुंदर हि म्हटला जातो. अशी ही दुहेरी श्री आहे. या दुहेरी अर्थानें परमेश्वर हा श्री-निवास आहे. हें श्री-निवासत्व दाखविण्यासाठीं त्याच्या सर्वांगीं अलंकार लेवविले जातात. कारण तो सर्वांगसुंदर आहे ना? एखाद्या अंगोपांगावर अलंकार नसेल तर तेवढाच तो श्री-हीन व्हायचा! परमेश्वराचें हें श्रीनिवासत्व चित्रित करण्यासाठीं कवि त्याला सर्वाभरणभूषित वर्णितात, तसेंच कमलाकर म्हणून हि वर्णीत असतात. मुखकमल, नेत्रकमल, करकमल, पदकमल इत्यादि प्रकारें त्याचें शरीरगत निर्मलत्व, सुगंधत्व, सुकुमारत्व आणि रक्तत्व लक्षून त्याला सुषमाधाम म्हणून सर्वांगीं कमलानें अलंकृत करीत असतात.

सर्व सत्ता सताची आहे आणि म्हणून विश्वांतील सर्व संपत्तीचा, सर्वस्वाचा, स्वामी तो परमेश्वर आहे. त्याच प्रमाणें सर्व शोभा हि, जो आहे त्याचीच आहे. असताला मुळीं सत्ताच नाहीं. तो कसा प्रकाशणार, कसा शोभणार? परमेश्वर हाच एकमात्र सत् असून बाकी सारे असत् आहे. त्यामुळें परमेश्वर हा श्री-निवास होय. असताच्या दैन्याची आणि विशोभतेची, कुरूपतेची, कहाणी ज्ञानदेवानें ''कांट्याच्या अणीवर वसले तीन गांव'' या आपल्या अप्रतिम भारुडांत भरपूर गाइली आहे.

## १८४. सतांगति

इह-जीवन संपवून जीव जिथें जातो, त्या पर-लोकाला गति असें म्हणतात. आतां ही गति सर्वांची समान असणार नाहीं. समान सर्वांची राख होईल. पण गति? ती तर यथाकर्म यथाश्रुतच होणार. त्याबाबत ''अन्ते मतिः सा गतिः'' असा नियम आहे. जड भरत त्याचें उदाहरण आहे. ही अंतकालीन मति जीवनाचें लक्ष्य निश्चित करून तदर्थ आमरण किंबहुना जन्म-जन्मांतरीं जे झुंजत राहतात त्यांनाच प्राप्त होते. ''मां अनुस्मर युध्यच'' मध्यें गीतेनें हाच आदेश दिला आहे. सामान्यतः सर्व जीव वासनाधीन होऊन जगत आणि मरत असतात. मनुष्य हि वासनाधीन असला तरी त्याच्या ठाईं विचारोदय हि आहे. हे विचार वा संकल्प ज्याच्या त्याच्या आवडी-प्रमाणें अनन्त आहेत. त्यांतून संत-सज्जनांच्या आवडी वा श्रद्धा, त्यांचे विचार, त्यांची जीवनें यांची जी काय परिणति होते ती सारी ''सतांगति'' होय.

सर्व जलप्रवाह जसे शेवटीं समुद्रांत एकवटतात तसें सर्व संतांचे जीवन-प्रवाह शेवटीं जिथें एकवटतात तो सज्जीवन-एकार्णव म्हणजे परमेश्वर होय. परमेश्वराची याहून सुगम आणि सुंदर, निश्चित आणि व्यापक व्याख्या दुसरी काय बरें असूं शकेल? नदी पवित्र होय. दोन नद्यांचा संगम पवित्रतर होय आणि त्रिवेणी संगम परम पवित्र. पण जिथें सर्वच नद्या एकवटतात तो सर्व-संगम सागर महातीर्थ होय. तसा परमात्मा हा सर्व महात्म्यांचा महासंग्रह होय. हाच तो क्षीरसागर होय कीं ज्यांत भगवान् विष्णु पहुडला आहे.

## १८५. अनिरुद्ध

योगाची व्याख्या चित्तवृत्तींचा निरोध अशी केली आहे. जिचा निरोध होतो ती निरुद्ध शक्ति नष्ट होते. शरीराचा नाश होतो हें आपण पाहतोंच. पण दृश्य शरीर नाश पावलें तरी त्याबरोबर अदृश्य वासनामय लिंग शरीर नाश पावत नाहीं. तें लोकांतरास जातें, येतें. पण ज्ञानानें त्या वासनाच नाहींशा झाल्या म्हणजे त्या अदृश्य पण लोकलोकांतरसंचारी लिंग शरीराचा हि निरोध होतो. पण परमेश्वरी संकल्प जोंवर आहे तोंवर ह्या लिंगशरीराच्या नाशानंतर हि उपादानभूत अव्यक्त असें कारण-शरीर शिल्लकच राहतें. तें हि जेव्हां परमात्मा कल्पान्तीं सबंध विश्वसृष्टि गिळून केवळ निरुपाधि होऊन स्वस्थ असतो तेव्हां निरुद्ध होतें. आणि ही जी निरुपाधिक केवल-स्वरूप आत्मसत्ता तिचा निरोध केव्हां हि होत नाहीं. म्हणून तीच एकमात्र अनिरुद्ध होय. तदितर सारें आब्रह्मस्तंबपर्यंत निरुद्ध होय. कारण-शरीराचा निरोध हें परमेश्वरी क्षेत्र असल्यामुळें चित्तवृत्ति-निरोध, वासनाक्षय अथवा मनोनाश एवढेंच पुरुषकाराचें क्षेत्र मानावें लागतें. आणि म्हणून योगाची म्हणजे स्वरूपोपलब्धीची व्याख्या चित्तवृत्तिनिरोध अशी केली गेली आहे.

सात्वततंत्रांत अनिरुद्ध हा चतुर्व्यूहांपैकीं एक मानिला आहे. तिथें हि तो तुरीयच आहे; १ वासुदेव, २. संकर्षण, ३. प्रद्युम्न आणि ४. अनिरुद्ध.

## १८६. सुरानन्द

कोणी कितीहि दु:खी असला तरी केवळ निरानन्द असा जीव सांपडावयाचा नाहीं. कारण आनंद हा मुळीं त्याचा स्वभावच आहे. त्याची उत्पत्ति, स्थिति आणि गति सर्व आनदांतच होत असते. पण हा आनंद सर्वांचा समान असत नाहीं. पशूंचा आनंद नि मानवांचा आनंद एक नाहीं. तसा मानवांचा आणि देवांचा हि एक नाहीं. पशूंचा पाशव आनंद पिंड-पोषणपर, मानवांचा मानव आनंद इन्द्रियतोषणपर आणि देवांचा दैव आनंद आत्मप्रसादपर असतो. ''सुखं आत्यन्तिकं यत् तत् बुद्धिग्राह्यं अतीन्द्रियम्'' म्हणून जें म्हटलें आहे तोच सुरानन्द होय. ''योऽन्त:-सुखोऽन्तरारामस् तथान्तर्-ज्योतिरेव य:'' तोच सुर होय, आणि त्याचा जो आनंद निर्वाणपर स्वास्थ्यरूप तोच सुरानन्द होय. परमात्माच जीवाचा परमानन्द होय. आणि तो दैवी गुणांची उपासना करणाऱ्या देवांना प्राप्त होत असतो. ''नदीमुखेनैव समुद्रं आविशेत्'' या न्यायानें दैवी गुणोपासनेच्या द्वारें साधक आणि समाज सुखसागरांत प्रविष्ट होतात. व्यक्तीची साधना आणि समाजाचें शासन नव्हे तर अनुशासन दैवी गुणांच्या आधारें व्हायला पाहिजे. त्यायोगेंच ''आनंदी आनंद घडे इकडे तिकडे चोहिकडे.''

सुरांचा आनंद तो सुरानंद. अथवा सुरांना आनंदवितो तो सुरानंद. कोणत्याहि प्रकारें समास सोडवला वा व्युत्पादिला तरी अर्थांत फरक नाहीं. आध्यात्मिक सुख हेंच परमात्म्याचें स्वरूप होय. म्हणून तो म्हणायचा सुरानंद.

## १८७. गोविन्द

गोविन्द शब्द गो नि विद् पदांपासून व्युत्पादिला जातो. आणि गो चे व विद् चे विविधार्थ घेऊन

प्रतिपादिला जातो. गो म्हणजे गमनशील, चरणशील तत्त्व. आकाशांत गो म्हणजे किरणें, अंतरिक्षांत जलें आणि पृथ्वीवर गाई. आधिभौतिक अर्थ इन्द्रियें, आधिदैविक विविध वाणी, आध्यात्मिक बुद्धि वा ज्ञानें. विद् धातूचें जाणणें आणि मिळवणें असें मुख्य दोन अर्थ आहेत. दोहोंना एकवटून, शोधून हुडकून गोळा करणें, स्वाधीन करणें असा अर्थ होतो.

आत्मा हा इंद्रियांचा, वाणीचा आणि मनाचा शास्ता आहे. तो चरायला गेलेल्या इन्द्रियांना, वाणींना आणि मनोवृत्तींना गोळा करून स्वायत्त करतो, म्हणून तो गोविन्द होय.

परमात्मा हा गोधनाचा वाग्धनाचा आणि चित्त-वित्ताचा अर्थात् सर्वस्वाचा स्वामी आहे, म्हणून तो गोविंद म्हटला आहे. गो म्हणजे पृथ्वी. तद्गत धन तें सारें गोधन होय. 'गा: विन्दते इति गोविन्द: ह्या व्युत्पत्तीबरोबर 'गोभिर् विन्द्यते इति गोविन्द:' अशी हि व्युत्पत्ति लावली पाहिजे. गाय गोठ्यांत परत येते, पक्षी घरट्यांत परत येतो त्याप्रमाणें इन्द्रियें, वाणी, चित्तवृत्ति सर्व आत्म्याच्या ठाईं येऊन विसांवतात. त्याला हुडकून काढतात म्हणून हि तो गोविन्द होय.

गोपाल कृष्णानें गाईंची अपरंपार सेवा केली. त्यामुळें तो गाईंना परमप्रिय झाला होता. त्या त्याला गोविंद म्हणून हांक मारीत. 'गोभिर् निगदित-गोविन्दस्फुटनामानम्' —शंकराचार्य. अर्थात् गोविंद म्हणजे गोपेन्द्र. पशूंत आणि पशुपालांच्या भाषेंत गोपेन्द्रचें गोविंद झालें आहे.

## १८८. गोविदांपति

गो म्हणजे गूढ वाणी अर्थात् वेद. त्या गूढ वाणीचे जे वेत्ते ते गोविद् होत. अशा गोविदांचा जो पति म्हणजे पालक मालक चालक, तो गोविदां पति परमेश्वर होय. परमेश्वर केवळ गोविद् नव्हे किंवा गोविदांवर हि नव्हे. तो त्या सर्व गोविदांचा पति आहे, स्वामी आहे. सर्व गोविद् म्हणजे अध्यात्मवेत्ते त्याचे आज्ञाधारक आहेत. परमेश्वराचा मला असा आदेश झाला आहे असें म्हणून ते जें काय करायचें तें करतात. त्यांच्या लोकविलक्षण कृतीचें जगाला कोडें पडतें. पण ते गोविद् परमेश्वरी आदेशाप्रमाणें चालत असतात. या गोविदांना कोणी संत, कोणी पैगंबर, कोणी मसीहा म्हणतात. परंतु ते सगळे असतात पवित्र अंत:करणांतून येणाऱ्या त्या अशब्द वाणीचे श्रोते, मन्ते, बोद्धे, विज्ञाते आणि कर्ते. या वेद-वाणीचें, या परमेश्वरी आदेशांचें वर्णन वेदांनीं ''सोम: पवित्रं अत्येति रेभन्'' असें केलें आहे. तो सोम, तो ईश्वरी आदेश पवित्र अंत:करणांतून जणूं गर्जत येतो, दरडावत येतो. तो आदेश असा नसतो कीं त्याची कोणी अवज्ञा करूं शकेल, श्रोत्याला तो सर्वात्मना पाळावाच लागतो. संदेश म्हणजे निरोप. तो संदेष्ट्यांच्या द्वारा मिळतो. पण आदेश हा कोणा मध्यस्थाच्या द्वारा मिळत नाहीं, तो सरळच मिळत असतो. असे आदेश, अशी अशरीरिणी वाणी अनुगृहीत सत्-पुरुषांना, साक्षात्कारी पुरुषांना, प्राप्त झाल्याचे दाखले इतिहासांत अनेक आढळतात, थेट अनादि कालापासून आजतागायत.

## १८९. मरीचि

मरीचि म्हणजे तेज:शलाका, प्रकाशाचा किरण. ही बाह्य सृष्टि निर्माण झाली त्यापूर्वीं तिच्या जातकर्माचें जे निरीक्षक व व्यवस्थापक देवानें नियुक्त केले होते ते म्हणजे सप्तर्षि आणि चार मनु होत. हे सर्व ईश्वराचे मानस भाव होत. पैकीं सप्तर्षि हे सृष्टींत जन्मलेल्या जीवांच्या मुक्तीची चिंता वाहणारे होत. त्यांनीं सृष्टिबाळाच्या जीवनाची अशी पूर्ण व्यवस्था लावून दिली आहे. त्या सप्तर्षीं पैकीं एक आणि प्रथम तो मरीचि होय. सूर्य हा सहस्ररश्मि म्हटला जातो. सहस्र ही संख्या अनन्ताचें उपलक्षण होय. अर्थात् सहस्र-रश्मि म्हणजे असंख्य-रश्मिच होय. सहस्र

अनन्ताचें तसा सूर्य हि अनन्ताचें म्हणजे परमात्म्याचें गमक होय. अनन्ताच्या अनन्त किरणांची संख्येनें गणति शक्य नसली तरी मानव बुद्धि हार मानायला तयार नाहीं. तिनें त्यांची विधेनें गणति केली आहे. सूर्य-किरण सप्तविध आहे, सप्तवर्ण आहे. हे सात वर्णच सप्तर्षि होत. कां कीं ते सर्व दर्शनशक्ति-संपन्न आहेत. त्यांच्यापैकीं प्रथम वर्ण जो तांबडा तो मरीचि होय. प्रथम तांबडें फुटतें, आणि मग सूर्योदय होतो. अशा प्रकारें ताम्रवर्ण हा सृष्टीचा आरंभक वर्ण आहे आणि म्हणून तोच मरीचि म्हणावयाचा. ''मरीचिर् मरुतां अस्मि'' म्हणून ४९ मरुद्गणांपैकीं जो प्रमुख मरुत् भगवद्-विभूति म्हणून म्हटला आहे तो या मरीचीहून वेगळा. तथापि तो हि सप्त सप्तकांपैकीं असून सप्तसप्तांत प्रथम होय. मरीचि शब्द मृ-धातुज भासला तरी तो प्राणद आहे. मृग-मरीचिका इत्यादि शब्दांत त्याचें तेज:स्वरूप प्रकट आहे. परमेश्वरी तेजापासून ही सर्व सृष्टि निर्माण झाली आहे आणि तिचा मूलस्तंभ मरीचि आहे. सर्व सृष्टि वर्णमय आहे आणि तिचा पहिला वर्ण मरीचि आहे. सर्व संगीत सप्त-स्वरात्मक तसें सर्व जगत् सप्तवर्णात्मक आहे. आणि मरीचि त्याचा आद्य आहे. म्हणून परमेश्वराला मरीचि म्हटलें आहे.

### १९०. दमन

दमन म्हणजे दान्त, विनीत, शिक्षित करणारा. सर्व-दमन म्हणजे सर्व प्रजांना स्वधर्मानुसार वागायला शिकविणारा. भरत हा सर्व-दमन होता. तो सर्व प्रजांना आपआपल्या स्वधर्मांत नियमित करीत होता. परमात्मा हि तसा ह्या सबंध विश्वाला, त्यांतील वस्तुमात्राला, आपल्या स्वभावानें बांधून गुणकर्म-विभागश: मार्गाधारें वर्तवीत आहे. त्याला आडवाटेला जाऊं देत नाहीं. वळू ठेचून शिकवावयाचा असतो. त्याला दम्य म्हणतात. तो जेव्हां ठेचला व शिकवला जाऊन तयार होतो तेव्हांच तो धुर्य बनतो. सर्व जग दम्य आहे, परमात्मा हा दमन आहे. ह्या दमनापाशीं शंकराचार्यांनीं प्रार्थिलें आहे:

**अविनयमपनय विष्णो**
**दमय मन: शमय विषय-मृगतृष्णाम्।**
**भूतदयां विस्तारय,**
**तारय संसार-सागरत:।।**

हे विष्णो, हे सर्व-दमना, माझा अविनय, माझा बेशिस्तपणा, स्वैराचार घालवून लाव. अर्थात् माझीं इन्द्रियें दान्त, मन शान्त, आणि हृदय भूतदयेनें कोमल-कान्त कर.

इन्द्रियांचें चापल्य आणि मनाचें चांचल्य दूर करून बुद्धि भूतदया-विस्तारस्वरूप स्वधर्मनिष्ठ करणें हेंच विनयाधान होय. तेंच संसारांत तारक.

### १९१. हंस (अहंस)

नीरक्षीरविवेकाबद्दल हंसाची ख्याति आहे. ''हंस: शुचिसद्'' पवित्रतीर्थ-सेवी म्हणून हि तो प्रसिद्ध आहे. तसाच तो शुभ्र आहे. परमात्मा हा तसा ज्ञानस्वरूप असल्यामुळें शुभ्र, सदैव निरस्तकुहक असल्यामुळें परम विवेकी आणि पवित्र हृदयांत वास्तव्य करणारा, ज्ञाननिर्धूत-कल्मष यज्ञ-क्षपितकल्मष अनन्य-भक्तांच्या मानस-सरोवरांत विहार करणारा, म्हणून शुचिसद् होय.

''अहंस:'' असाहि पाठ घेणें शक्य आहे. अहन् स: या पदांची ती संहिता आहे. परमात्मा हा अहिंसक आहे. ''न हिनस्ति आत्मना आत्मानम्''. जिथें एकमेवाद्वितीय असें एकत्व आहे, तिथें कोण कुणाला मारणार?

अहम् आणि स: असा हि द्विपदात्मक पाठ कल्पितां येईल. हृदयांत संस्फुरणारें जें अहमृरूप स्वतत्त्व तें परमात्माच होय. स: म्हणजे तद्रूपानें ओळखलें जाणारें परतत्त्व हि परमात्माच आहे. आणि असें असल्यामुळें 'सोऽहं'-भावानें उपासिलें जाणारें व उपासना करणारें तत्त्व हि तो परमात्माच आहे.

## १९२. सुपर्ण

**द्वा सुपर्णा सयुजा सखाया,**
**समानं वृक्षं परिषस्वजाते ।**
**तयोरन्यः पिप्पलं स्वादु अत्ति,**
**अनश्नन्‌ अन्यो अभिचाकशीति ।।**

''दोन जुळे आणि एकाच नांवाचे पक्षी एकाच वृक्षाचा आश्रय करून रहात आहेत. त्यांच्या पैकीं एक त्या वृक्षाचें फळ चाखतो, दुसरा मात्र ते न चाखतां नुसतें पाहतो'' असा एक उपनिषत्‌-श्लोक आहे. सुपर्ण हें नाव घेतांच तो आठवतो. देहसंज्ञक कर्माच्या वृक्षावर जीवेश्वर हे दोन चेतन रात्रिवासास राहतात. त्यांतील जीव कर्माचें (कर्तृत्व) भोक्तृत्व घेतो, ईश्वर तें न घेतां नुसता साक्षी राहतो. हा जो दुसरा अकर्ता अभोक्ता केवळ साक्षिरूप चेतन तोच हा सुपर्ण होय. पक्षी झाडाला कायमचा बांधलेला नसतो. तो तिथें रैन-बसेरा करून आकाशांत भरारी मारतो. तो सरपटणारा भूचर नाहीं, तर गगनविहारी आहे. तो बद्ध नव्हे, मुक्त-स्वभाव आहे. म्हणून त्याला सुपर्ण म्हणजे पक्षिराज म्हटलें आहे. बिंबप्रतिबिंबवत्‌ ईश्वर आणि जीव हे जुळे आहेत. परंतु बिंब स्वतंत्र आहे. प्रतिबिंब अस्वतंत्र. तें सदैव बिंब-परतंत्र राहतें. म्हणून देवालयांत विष्णूपुढें गरुड हा अंकित म्हणून सदैव उभा असतो. विष्णु सेव्य, सुपर्ण गरुड सेवक, सुपर्ण-स्वामी म्हणून विष्णु सदैव गरुडारूढच असावयाचा, गरुडवाहनच असावयाचा. दोहोंची जोडी कधीं फुटावयाची नाहीं.

## १९३. भुजगोत्तम

सुपर्णाच्या चिंतनांत म्हटलें कीं परमात्मा मुक्त-स्वभाव असल्यामुळें तो आकाशांत भरारी मारणारा आहे, भूमीवर लोळणारा, सरपटणारा नाहीं. परंतु लगेंच पुढें त्याला सरपटणाऱ्यांचा सरदार म्हटलें आहे, भुजगोत्तम म्हणून! ''तुका म्हणे जें जें बोला तें तें साजे या विठ्ठला'' हेंच खरें! भरारी मारणारा, तसा तो सरपटणारा हि आहे. सर्प पन्नग असल्यामुळें आपल्या पावलांची चाहूल लागूं देत नाहीं. तो अनिमेष नेत्रांनीं पाहत असतो. पापण्या नसल्यामुळें त्याचे डोळे कधीं बंदच होत नाहींत. तो लांबलचक असतो. तो अदृश्य असतो, तो काळा असतो. आणि विशेष म्हणजे तो भक्ष्याला पार गट्ट करून टाकतो. तो कात टाकून चिरतरुण आणि प्राणायामानें चिरंजीव झाला आहे. हे सर्व गुण परमेश्वराच्या ठाईं आहेत. परमेश्वर काल-स्वरूप आहे. तो अनादि आणि अनन्त असल्यामुळें सुदीर्घ आहे. तो अदृश्य आणि अव्यक्तगति आहे. चिद्रूपत्वामुळें तो निरंतर साक्षि-भूत आहे. भूतकाळाची कात टाकून तो सदैव नवा नवा होत असतो. असा तो अजर आणि अमर आहे. सर्पाप्रमाणेंच तो निर्भय स्वजात-भक्षीहि आहे. शेवटीं हें सारें स्वजात विश्व तो गिळून टाकतो. त्याचें नांव-निशाण राहूं देत नाहीं. आणि ह्याचें कांहीं एक सुखदुःख त्याला नाहीं. अशा ह्या परमेश्वराला भुजगोत्तम कां न म्हणावें? सर्पाला भोगी म्हणतात, पण खरोखर तो महायोगीच होय. परमात्मा हि तसाच महायोगी आहे. म्हणून तो भुजगोत्तम. परमात्मा हा योग-स्वरूप असल्यामुळें त्याची योगमयता दाखविण्यासाठीं त्याच्या अंगाअंगावर सर्पाची लेणीं लेवविलीं आहेत. शेष-शायी विष्णु योगशायी होय. भुजगभूषण शिव योगीश्वर होय. भुजगशयन विष्णु योगेश्वर होय.

## १९४. हिरण्यनाभ

कमलाच्या कंदाच्या नाभींतून म्हणजे डोळ्यांतून कमलनाल फुटतें आणि त्यावर कमल फुलतें. म्हणून कमलकंद हा पद्मनाभ होय. त्याप्रमाणें ज्याच्या नाभींतून हिरण्य उत्पन्न होतें तो हिरण्यनाभ म्हणायाचा. अर्थात्‌ हिरण्य हें एक पीक आहे. ती एक उद्भिज्ज वस्तु आहे. ती खनिज वस्तु नाहीं. असें हें उद्भिज्ज सोनें म्हणजे जीवनाधार असणारें

अन्नधान्य होय. तें या काळीच्या कुशींतून फुटतें म्हणून हा मृत्‌कणच हिरण्यनाभ होय, सोनें पिकवणारा होय. या कुजणाऱ्या रुजणाऱ्या मृत्कणाच्या ठाईं ही जी अन्नोत्पादन-क्षमता आहे ती .सौर शक्तीच्या अनुग्रहानेंच होय. आणि हें सौर सामर्थ्यहि परमेश्वरी कृपेचेंच फळ असल्यामुळें मूलत: परमेश्वरच हिरण्यनाभ म्हटला आहे. ज्याला हिरण्य म्हटलें जातें तें खनिज हिरण्य हा सौरशक्तीचाच घनीभूत अंश-विशेष होय. म्हणूनच म्हटलें आहे.–''सूर्य आत्मा जगतस् तस्थुषश् च''. पण आतां या दोन्ही हिरण्यांत, उद्‌भिज्ज आणि खनिज हिरण्यांत, उद्‌भिज्ज हिरण्य म्हणजे अन्नधान्य हेंच खरें हिरण्य होय. असें इसापाचा कोंबडा कंठरवानें सांगत आला आहे: पण 'तें एक रामदासें' हि ऐकिलें नाहीं. तेहि 'प्रपंचीं पाहिजे सुवर्ण' म्हणून लिहून चुकले आहेत. अशी आहे हिरण्याची मोहिनी, ही भुलीची भारणी !

## १९५. सु-तप (सु-तपा:)

ज्या ज्या योगें कोणाला कष्ट होतात, कोणाची हिंसा होते, तें तप नसून तो ताप होय, अविचार होय. ज्याच्या योगें आत्मशुद्धि होते आणि सुखवृद्धि होते तें तप होय. अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य, अपरिग्रह इत्यादि यम आणि शौच, स्वाध्याय, संतोष, शरीरश्रम इत्यादि नियम हें नवविध वा बहुविध म्हणा, तप होय. तें काया वाचा मनें आणि निरलसपणें निष्काम भावानें व श्रद्धापूर्वक आचरिलें जातें तेव्हां तें सुतप म्हटलें जातें. असें सुतप आचरीत नरनारायण बदरिकाश्रमांत बसले आहेत. मानवाचें कर्तव्य काय तें आपल्या उदाहरणानेंच, शब्दानें नव्हे, ते सांगत आहेत. वस्तुत: परमात्मा अव्यक्तमूर्ति आहे. पण मानवाला मानवाकृतिच मानवणारी आहे रुचणारी आणि पचणारी आहे म्हणून तो नराकृति नारायण आजतागायत सुचिर तपश्चर्या करीत

**नायं देहो देहभाजां नृलोके**
**कष्टान् कामान् अर्हते, विड्भुजां ये।**
**तपो दिव्यं पुत्रका, येन सत्त्वं**
**शुध्येद्, यस्मात् ब्रह्मसौख्यं त्वनन्तम् ।।**

हा संदेश नव्हे, आदेश देत आहे. असा तो परमात्मा 'सुतपा:' होय.

## १९६. पद्मनाभ

परमेश्वर हिरण्यनाभ तसा पद्मनाभ हि आहे. हिरण्य जड आहे. पद्म चेतन आहे. परमात्मा या जडचेतन समस्त विश्वाचा जनक आहे. त्याच्याचपासून हें सारें चराचर विश्व निर्माण झालें आहे. सर्व उद्‌भिज्जांमध्यें कमळ हें परम सुंदर होय, जसें सर्व खनिजांमध्यें हिरण्य. त्यांच्या स्वजाति-शिरोमणित्वामुळेंच परमेश्वराला पद्मनाभ आणि हिरण्यनाभ म्हटलें आहे. अर्थात् पर्यायानें तीं जड-चेतनांचें प्रतिनिधित्व करतात. आणि अशा प्रकारें परमेश्वर हा स्थावरजंगमांचा जनक म्हटला जातो. पद् धातु गति-वाचक आहे आणि त्यापासूनच पद्म शब्द साधलेला असल्यामुळें तें चराचराचा प्रतिनिधि होतें. जगत् हि गतिशील-असल्यामुळें आणि तें हि गतिवाचक गम् धातुपासून व्युत्पादिलें असल्यामुळें त्याला लक्षणेनें पद्म असें म्हणतात. आणि ज्या अर्थीं हें लोकपद्म अव्यक्त जलाशयाच्या तळाशीं असलेल्या विष्णुरूप कमल कंदाच्या नाभींतून फुटलें आहे आणि व्यक्ताच्या पृष्ठावर येऊन फुललें आहे त्याअर्थीं तो अव्यक्ताच्या बुडाशीं खोल दडी मारून बसलेला व्यक्तमूल अक्षर परमात्माच पद्मनाभ होय.

## १९७. प्रजापति

आईबाप मुलाला जन्म देऊन मोकळे होत नाहींत, तें मूल स्वावलंबी होईपर्यंत त्याचें पालन-पोषण हि करीत असतात. त्याचे जनक पालक हिं होतात.

त्याच प्रमाणें परमात्मा या जगाचा जनक असून तो त्याचा प्रजापति म्हणजे वत्सल पिता हि झाला आहे. लोकपद्माला जन्म देऊन ब्रह्मदेवाच्या रूपानें त्याचा अधिष्ठाता, त्यांतील जीव-निकायांचा पालक हि, तो झाला आहे. अशा प्रकारें 'पद्मनाभ: प्रजापति:' हा क्रम साभिप्राय आहे. खरें म्हणजे 'पुरुष एव इदं सर्वं यद् भूतं यच् च भव्यम्।' या मंत्रांत म्हटल्याप्रमाणें तो परमात्मा समग्र विश्व-जीवनाचा स्वामी आहे. नामदेवानें म्हणूनच गाइलें आहे:–

जीव विठ्ठल आत्मा विठ्ठल
परमात्मा विठ्ठल विठ्ठल।
जनक विठ्ठल जननी विठ्ठल
सोयरा सांगाती विठ्ठल विठ्ठल।

प्रजा शब्द संस्कृतांत सिकता अक्षता इत्यादि शब्दांप्रमाणें नित्य-बहुवचनी असतो. कारण हे शब्द गणवाचक आहेत. वाळूच्या वा अक्षतेच्या एका दाण्यानें वालुका वा अक्षता हा समूहात्मक पदार्थ बनत नाहीं. त्याचप्रमाणें प्रजा ही एका योनीनें वा जीवानें बनत नाहीं म्हणून प्रजापति म्हणजे सर्व जीवयोनींचा आणि त्यांतील सर्व व्यक्तींचा पति होय. राजाला हि प्रजापति म्हणतात. कारण तो हि सर्व वर्णांचा पति असतो. कोणा एकाच वर्णाचा नव्हे. पण प्रजापति पद हें मानवमर्यादित नाहीं. त्यांत जीवमात्र समाविष्ट आहे. म्हणून परमात्माच प्रजापति होय.

## १९८. अमृत्यु

''मृत्यु: सर्वहर:'' म्हटला आहे. परंतु परमात्मा हा अमृत्यु आहे, त्याला मृत्यु नाहीं. त्याचें कांहींएक मृत्यु हरूं शकत नाहीं. वस्तुत: तो मृत्यूचा मृत्यु आहे. मृत्यूचेंच तो हरण करतो. ''जें आपुलें साचें, तें कल्पान्तीं हि न वचे'' तें जें सर्वांचें स्वतत्त्व तेंच अमृत्यु होय. त्याचा अपहार कोण कसा करणार? व्यक्ताला अव्यक्त गिळतें, क्षराला अक्षर गिळतें आणि उरतें केवळ अव्यक्त आणि अक्षर असें एक आत्मतत्त्व. तेंच अमृत्यु होय. त्यालाच अमृत असें म्हणतात.

मृत्यु हा सर्वाचें निराकरण करून अतिसर्व जें अनिराकृत परमात्मतत्त्व, तें दाखवून देतो. म्हणून त्याला आचार्य, परमदेशिक म्हटलें आहे. नचिकेता म्हणूनच त्याच्याकडे जातो आणि ''वक्ता चास्य त्वादृगन्यो न लभ्य:'' म्हणून म्हणतो. त्याच्यापासून तो आत्मविद्या मिळवितो. सर्व अनात्म जगताचें अनित्यत्व आणि म्हणून परिणामीं दु:खरूपत्व पटवून देणारा मृत्यूसारखा दुसरा कोण आहे? अतद्-निराकरणानें तद्-दर्शन करवून देणारा तो परम कृपाळु आहे. अशा प्रकारें ज्ञानप्रदत्वामुळें मृत्यु हा सर्व जीवांचा परमहितकर्ता होय. तो भयंकर नसून वस्तुत: अभयंकर आहे, शुभंकर आहे. परमात्मतत्त्व अभावात्मक नाहीं. परंतु जगांतील सर्व भावांहून तें विलक्षण आहे. त्याचें हें विलक्षणत्व दाखविण्यासाठीं निषेधमुखानें त्याचें वर्णन करावें लागतें म्हणून त्याला अमृत्यु म्हटलें आहे. जीवन म्हटलें म्हणजे आमच्या मर्त्य जीवनाचें रूप आपल्या समोर येणार. पण तें जीवन क्षुधातृषातुर नाहीं. मृत्युग्रस्त नाहीं. म्हणून त्याला अमृत्यु म्हटलें आहे. त्यामुळेंच त्याचें यथार्थ आकलन होतें. ''क्षुधातृषा हरे निजभाव जेणें तरे। तें जीवन दीधलें बाप रखुमादेवीवरें''. तसलें जीवन म्हणजे अमृत्यु होय. तोच परमात्मा.

## १९९. सर्वदृक्

'जायते अस्ति वर्धते विपरिणमते अपक्षीयते नश्यति वा म्रियते' हे वस्तूंचे षड् विकार होत. हे सर्वचे सर्व जो पाहतो तो स्वत: अविक्रिय आत्मा सर्वदृक् होय.

भूत, भविष्य, वर्तमान हे तिन्ही काळ जो स्वत: कालावच्छिन्न न होतां पाहतो, तो अकाल सर्वदृक् होय.

अध-ऊर्ध्व-मध्य वा अवान्तर दिग्भेद अनन्तत्वामुळें ज्याच्या ठाईं संभवत नाहींत आणि म्हणून जो सर्व सान्त दिग्देश पाहतो तो दिग्दिगंतांना सान्तत्वानें पाहणारा अखण्ड मण्डलाकार अनन्त परमात्माच सर्वदृक् होय.

सूर्य तसा डोळा साऱ्या जगाला पाहतो, पण स्वतःला पाहूं शकत नाहीं. अशाला सर्वदृक् कसें म्हणतां येईल? म्हणून जो सबाह्याभ्यंतर पाहतो, तो स्वदृग्च सर्वदृक् होय.

कार्यमात्र कारणाधीन असतें. कारण एक, त्याचीं कार्ये अनेक. जो एका कारणाला पाहतो, तो समस्त कार्यांना पाहतो. म्हणून जो कारणदृक् तोच सर्वदृक् होय. ब्रह्म हें जगाचें कारण असल्यामुळें तें जो पाहतो तो सर्वदृक् होय.

## २००. सिंह

**नाभिषेको न संस्कारः सिंहस्य क्रियते वने।**
**विक्रमार्जित-सत्त्वस्य स्वयमेव मृगेन्द्रता।।**

**सुभाषितसंग्रह**

सिंह हा आपल्या स्वाभाविक महत्तेनेंच वनराज झाला आहे. मृगेन्द्र झाला आहे. तसा परमात्मा हा स्वभावतःच परमात्मा आहे. सर्वश्रेष्ठ आहे. त्या श्रेष्ठतेसाठीं त्याला कांहीं एक करावयाची गरज नाहीं. त्याची सर्वश्रेष्ठता कृतक नाहीं. ''न तत्समोऽस्त्यभ्यधिकः कुतोऽन्यः?'' त्याचें नाम, रूप, गुण, कर्म सर्व अनन्यसाधारण आहे. तो पंचानन असुर-यूथपांचा लीलेनें फडशा पाडतो, असें म्हणणें म्हणजे त्याचा गौरव करणें नव्हे. त्याच्या नामानेंच पापतापांच्या गजघटा बारा वाटा पळ काढतात. त्याचें रूप अतिभयंकर आहे. हिंस्रातिहिंस्र प्राणी हि त्याच्याकडे आपली हिंस्रता टाकून अतिलीन होऊन येतात. सुषुप्तींत सर्व जीव, सिंह व्याघ्र हि, त्याच्याच कुशींत निर्भय होऊन झोपत असतात. त्याचे गुण अनन्त आहेत. त्याच्यासारखा गुणी कोणीच नाहीं. कारण प्रत्यगात्मरूपाने तो सर्वान्तर्यामी, सर्वांच्या सर्व गुणांचा एकमात्र स्वामी आहे. त्याचें कर्म, त्याचा पराक्रम, विश्वविदित आहे. या विश्वाची उत्पत्ति स्थिति गति दुसरा कोण करतो? असा तो परमात्म-सिंह अनात्म-गजयूथ-पंचानन गाजतो आहे!

सर्वदृक् म्हणजे सर्वाध्यक्ष नंतर सिंह पद आलें आहे त्यामुळें त्याचा अर्थ सर्वशास्ता असा होतो. राजा सिंहासनावर बसत असतो. अर्थात् सिंह म्हणजे सर्वशास्ता, सर्वेश्वर.

## *शतक तिसरे*

## २०१. संधाता

जागृति, स्वप्न, सुषुप्ति या तिन्ही अवस्थांतून रोजच्या रोज जीव जात असतो. बाल्य, कौमार, यौवन, वार्धक्य हा कायापालट हि जीवाचा आयुष्यभर चालला असतो. जन्मून मरणें आणि मरून परत जन्मणें असा देह-देहान्तर-प्राप्ति प्रकारहि अखंड सुरूच असतो. या सर्व परस्पर-भिन्न जीवदशांना जोडणारा, त्यांच्या पालटानें न पालटणारा, तोच हा मी असें अनुस्यूत प्रत्यभिज्ञान करून देणारा जो सूत्रात्मा तोच संधाता होय.

जीवात्मा म्हणून जीवाच्या भिन्न दशांनाच तो जोडत नाहीं, तर चिदात्मा म्हणून परस्परभिन्न जीवांना हि तो जोडतो. अग्नि, विद्युत् आणि सूर्य सगळें एकच तेजोरूप होय. तो तूं मी सर्वच पुरुष होय. जीव हि पुरुष, शिव हि पुरुष.

शेवटीं जीव आणि अजीव, जड आणि चेतन हा भेदहि अभेदच होतो. चेतन पुरुषापासूनच नखलोमादि अचेतन जड पदार्थ निर्माण होतात. आणि कार्यमात्र कारणरूप असल्यामुळें हें सारेंच चेतन ठरतें. 'नेह नानास्ति किंचन।' 'पुरुष एव इदं सर्वम्।' असा परम पुरुष वृत्ति, अवस्था, देह-देहान्तरें, पुरुष-भेद आणि प्रकृति-पुरुषभेद इत्यादि कुठल्याहि औपाधिक भेदांनीं छिन्न-भिन्न न होणारा परमात्मा सर्वत्र संधाता आहे. तो कुठें फट राहूंच देत नाहीं. त्याचें संधान कुठें नाहीं असें नाहींच. तो सर्वत्र एकसंध आहे.

## २०२. संधिमान्

परमात्मा सर्वत्र सम असल्यामुळें त्याचा कोणाशीं कधीं विग्रह होत नाहीं. इतकेंच काय, पण कोणाशीं कधीं अवग्रह हि होत नाहीं. त्यामुळें तो सदैव आणि सर्वत्र सन्धिमान् आहें. जगांत दोघांमध्यें कांहीं कारणानें विग्रह होतो आणि कालांतरानें ते संधि करतात. हा संधि हि कालांतरानें मोडतो आणि ते परत अवगृहीत आणि विगृहीत होतात. अशा प्रकारें जगाच्या व्यवहारांचें स्वरूप संधिविग्रहयुक्त आहे. परमात्म्याचें तसें नाहीं. तो सदैव संधिमानच आहे.

**वासे बहूनां कलहो भवेद् वार्ता द्वयोरपि।**
**एक एव चरेत् तस्मात् कुमार्या इव कङ्कणः।।**
**भाग. ११.९.१०**

हें अवधूत-सूत्र त्यानें पक्कें पकडलें आहे. या विश्वांत तोच एकमेवाद्वितीय वसतो आहे. त्यामुळें द्वितीयापासून होणारें भय, वार्ता वा विग्रह त्याला नाहीं. त्यामुळें तो नित्य संधिमानच आहे. सर्वत्र त्याचें मैत्र आहे.

विश्वांत परमात्मा ओतप्रोत भरला आहे. परमात्म्यांत सारें विश्व एकवटलें आहे तंतुपटवत्. कारणरूपानें तो संधाता आहे, कार्यरूपानें संधिमान् आहे. कार्याचा कारणाशीं नित्य संधि असतो. कारणाला सोडून कार्य कधीं राहूं शकत नाहीं. कारण स्वतंत्र आहे. तें स्वरूपानें राहील वा कार्यरूपानें राहील. परमात्मा सर्वत्र संधाता आहे, अनुस्यूत आहे. तसें सारें विश्व त्याच्या ठाईं 'सूत्रे मणिगणा इव' प्रोत आहे, संहित आहे, एकवटलें आहे, म्हणून तो संधिमान्.

## २०३. स्थिर

ज्याचें कोणाशींच वैर विग्रह नाहीं तो सर्वांचा सखा, सर्वांना जोडणारा आणि सर्व ज्याला जोडले आहेत असा, संधाता आणि संधिमानच, स्नेही आणि स्निग्धच, स्थिर म्हणजे अचल-प्रतिष्ठ या पदवीस पात्र होय. ज्याचें कोणाशीं वैर आहे, विग्रह आहे, तो केवढा हि पराक्रमी असो, तो गोत्यांत आल्याशिवाय राहत नाही. तो गोंधळतो, गडबडतो. जगांत निष्कंप स्थिर असें जर कांहीं असेल तर तें एक प्रेमनिधान आत्मतत्त्वच होय, जें जगांत आत्मव्यतिरिक्त दुसरें कांहीं पाहतच नाहीं आणि म्हणून जें सर्वत्र समदृष्टीनें केवळ प्रेमाचाच व्यवहार करतें.

**समं पश्यन् हि सर्वत्र समवस्थितमीश्वरम् ।**
**न हिनस्त्यात्मनात्मानं ततो याति परां गतिम्।।**
**गी. १३-२८**

समदर्शन म्हणजे सर्वत्र आत्मदर्शन, त्याचा विनियोग सम-व्यवहार म्हणजे निरपवाद अहिंसा, तिचें फलित परमसाम्य म्हणजे निष्कंप स्थिरता होय. समदर्शनमूलक अहिंसामय निष्कंप स्थिति ज्यानें स्वभावतःच साधली आहे, तो परमात्माच स्थिर होय.

## २०४. अज

अज म्हणजे जन्मादि-विकाररहित या अर्थानें नञ्समासरूप अज शब्द पूर्वीं येऊन गेलाच आहे. आतां हा दुसरा अज कोणता? हा अज म्हणजे जें अव्यक्त अक्षरब्रह्म त्यापासून होणारा जो प्रथम जंतु ब्रह्मदेव तो होय. तो 'अ'-जात असल्यामुळें अज होय. हा उपपद तत्पुरुष होय. नञ् समास म्हणूनहि त्याची व्यवस्था लावतां येतेच. ही जी सबंध जीव-सृष्टि आहे ती बाह्यसर्गान्तर्गत असल्यामुळें आणि तिच्यांत तो समाविष्ट होत नसल्यामुळें, त्याला अज म्हणजे न जन्मणारा असें म्हटलें जातें. इथें ज म्हणजे जन्मलेला जीव एवढाच अर्थ नाहीं तर ज म्हणजे जन्य, जात असाहि अर्थ घ्यावयाचा आहे. ब्रह्मदेव अज आहे, म्हणजे तो जन्य नसून जनक आहे, असा अर्थ. त्या अर्थानें त्याला स्वयंभू आणि प्रजापति अशीं हि दुसरीं नांवें आहेत. सृष्टीचें मूल तत्त्व हें तत्त्वतः स्वयंभू

आणि विश्वजनक असेंच मानावें लागतें. तसें न मानल्यास जन्य-जनक संबंधाची अनर्थ-परंपरा संपणारच नाहीं.

कारण हें अव्यक्त आणि अक्षर आहे. त्या अर्थानें परमात्मा 'न जायते इति अजः' आहे. त्या अर्थानें अज शब्द पूर्वी येऊन गेला आहे. आतां इथें तो कार्य हें सदैव अव्यक्ताक्षररूप कारणापासूनच झालेलें असतें आणि तें कारण-भिन्न नसतें म्हणून अ-जात, अव्यक्ताक्षरजनित म्हणून अज अशा तत्पुरुष समासाच्या अर्थानें आला आहे. परमात्मा कारण आहे आणि तो कार्य हि आहे. आणि दोन्ही अर्थांनीं तो अ-जच आहे.

अजति गच्छति ह्या व्युत्पत्तीनें कुदत, बागडत जाणारा बोकड हा प्राणी हि तो आहे. सर्वात्मकच तो आहे, त्याअर्थीं अज हि तो आहेच. अजाप्रमाणें विश्वांत स्वच्छंद चरतो आणि संचरतो म्हणून अज.

## २०५. दुर्मर्षण

''अमर्षशून्येन जनस्य जन्तुना,
न जातहार्देन न विद्विषादरः ।''

भारवि : किरातार्जुनीय २-८

त्याची उपेक्षा करावी असा तो निर्वीर्य निरुपद्रव नाहीं. त्याला तुम्ही शत्रु म्हणा वा मित्र म्हणा, कोणत्याहि नात्यानें तुम्हांला त्याची उपेक्षा, अवज्ञा करतां यायची नाहीं. तो तुमची उपेक्षा, अवज्ञा, अपराध सहन करणार नाहीं. तुमच्या उपेक्षेचें फळ तुमच्या पदरीं तो घातल्याशिवाय राहणार नाहीं. घरांत रानांत कुठें हि असो अग्नीची उपेक्षा करतां येत नाहीं, अपराध करतां येत नाहीं. ''होतारमपि जुह्वानं स्पृष्टो दहति पावकः'' हवन हि करणारानें चुकून हि हात लावल्यास त्याला चटका दिल्याशिवाय तो राहत नाहीं. परमात्मा हा तशी खडतर देवता आहे. तो तुमची उपेक्षा हि सहन करीत नाहीं आणि सलगी हि सहन करीत नाहीं. तुम्ही अदबीनें आपली मर्यादा सांभाळूनच त्याची मर्जी संपादन केली पाहिजे. अग्नीची उपासना न करावी तर अंधार, थंडी आणि श्वापदादिकांचें भय यांचें निवारण होत नाहीं. अतिसलगी करावी, त्याला खिशांत ठेवूं म्हणावें, तर तो आपल्याला सचैल जाळून टाकतो. परमात्मा हा तसा दुर्मर्षण आहे, दुर्धर्ष आहे.

## २०६. शास्ता

शस्त्रपाणि राजा अधार्मिकांचें शासन आणि धार्मिकांचें पालन करीत असतो. शास्त्रपाणि गुरु शिष्यांचें अनुशासन करीत असतो. संन्यासी आत्मसंयमन करून आत्मनिष्ठ होऊन राहतो. हे शिष्ट, अनुशिष्ट आणि विशिष्ट उत्तरोत्तर वरिष्ठ होत. आणि त्यांचे शासक अनुशासक आणि विशासक त्यांच्याहून वरिष्ठ होत. या सर्वांच्या नियंत्रणाचें नियमनाचें संयमनाचें जें सूत्र, जो ईश्वरभाव, तोच शास्ता होय. परमात्मा सर्वत्र विराजमान आहे. त्याचें राज्य, त्याचें शासन, अव्याहत अप्रतिहत चालू आहे. पण त्याचें भान कुणालाच होत नाहीं. कारण त्याचें शासन अतिव्यापक आणि अतिसूक्ष्म असें आहे. ''सूक्ष्मत्वात् तत् अविज्ञेयम्''. तसेंच ''हिरण्मयेन पात्रेण सत्यस्यापिहितं मुखम्'' म्हणूनहि. नृपत्व-गुरुत्वरूप अभिमानाच्या सोनेरी मुखवट्यानें ईश्वराचें शासन झांकलें आहे, म्हणून हि तें दिसून पडत नाहीं. अभिमानाचा तो मुखवटा दूर केला, म्हणजे तिथें ईश्वर च असल्याचें आढळून येतें. परमात्म्याचें हें जें अतिसूक्ष्म व सर्वव्यापी ईशन वा शासन आहे, त्यामुळेंच त्याला ईश्वर आणि शास्ता असें म्हटलें जातें.

## २०७. विश्रुतात्मा

विश्रुत म्हणजे प्रसिद्ध. आणि आत्मा म्हणजे नामरूप. ज्याचें नामरूप प्रसिद्ध आहे, तो परमात्मा विश्रुतात्मा होय. कुठें आहे विश्रुत त्याचें नामरूप? लोकांत आणि वेदांत म्हणजे शास्त्रांत हि. ''अतोऽस्मि लोके वेदे च प्रथितः पुरुषोत्तमः'' लोकांत

परमात्मा पुरुषोत्तम ह्या नांवानें आणि वेदांत, शास्त्रांत, पुरुषोत्तम ह्या रूपानें तो प्रथित आहे. लोकांत पुरुषोत्तम रामचंद्र म्हणून आणि शास्त्रांत पुरुषोत्तम अक्षर म्हणून तो परमात्मा प्रथित आहे. ''स्थित-प्रज्ञस्य का भाषा समाधिस्थस्य केशव। स्थितधी: किं प्रभाषेत किमासीत व्रजेत किम्।।'' याचें उत्तर व्यावहारिक वा लौकिक क्षेत्रांत रामायण उर्फ रामचरित होय. तात्त्विक क्षेत्रांत स्थितप्रज्ञ-दर्शन अथवा वेदान्त-विचार होय. हेंच सगुण आणि निर्‌गुण ब्रह्म होय. तत्त्वविचार सात्त्विक आचारांत आणि सात्त्विक आचार तत्त्वविचारांत परिणत होतो. दोन्ही मिळून मानव-जीवनाची परिपूर्णता लक्षित होते. देहनिरपेक्ष आदर्श देहसापेक्ष मानवाला जीवनांत उतरवावयाचा आहे. तसें करतांना, आत्मरूप असि उपसतांना, देहाचा कोश फाटणारच. दाणा काढावयाचा म्हणजे टरफल काढून अलग करावेंच लागतें. असे जे करतात तेच विश्रुतात्मे होतात. परमात्मा स्वभावत:च विश्रुतात्मा आहे. साधक देहकोशांतून आत्मासि प्रवृढ करून विकोश करून विश्रुतात्मा होतो.

## २०८. सुरारि-हा

सुर म्हणजे कोण? 'सु शोभनं राति लाति इति सुर:' जो शोभनमात्र घेतो-देतो तो सुर होय. उलट जो असु म्हणजे अशोभनच घेतो-देतो, तो असुर होय. आतां सु कशाला म्हणायचें? जें आपल्या प्रतिष्ठेला शोभेल तें सु आणि जें तसें नसेल ते असु होय. आत्म्यानें अनात्म्याचा आरोप स्वीकारून अनात्मवत् वागणें हेंच असु होय. तें जो पतकरीत नाहीं आणि सदैव आत्मनिष्ठ राहतो तोच शोभिवंत होतो. पुरुषासारखा पुरुष असून जो स्त्रीप्रमाणें म्हणजे अनात्मवश वागतो त्याचा समाजांत उपहास होतो. एखादी स्त्री स्त्रीत्व म्हणजे वात्सल्य विसरून वागूं लागल्यास, म्हणजे अनात्मवश वागूं लागल्यास तिचा हि समाजांत तसाच उपहास होतो. थोडक्यांत स्व म्हणजे सु आणि सु म्हणजे स्व होय. जें स्वराज्य नव्हे तें सुराज्य असूं शकत नाहीं. तसेंच सुराज्य हें स्वराज्यच असावें लागेल, परराज्य नव्हे. आतां हे जे आत्मनिष्ठ सुर त्यांचे शत्रु ते सुरारि होत. आत्मनिष्ठेचे परिपंथी जे रागद्वेष तेच देवशत्रु होत. परमात्माच त्यांचा नायनाट करतो. म्हणून तो सुरारि-हा. अनात्मभावाचें, रागद्वेषादि विकारांचें हनन ही ऐशी कृपा होय: कोणीहि अनीश, कोणीहि जीव, अहंकारानें तशी फुशारकी मारूं शकत नाहीं. असुरपीडित गोद्विजदेव शेवटीं विष्णूलाच शरण जातात आणि तो त्यांचा कैपक्ष घेतो तेव्हांच त्यांचें रक्षण होतें आणि असुरांचें पारिपत्य होतें. हा 'पुरा' आणि 'नव:' असा पुराणा इतिहास आहे. सुरारिहाचें हें अध्यात्म-रामायण शंकराचार्यांनीं असें विवरिलें आहे.

**तीर्त्वा मोहार्णवं हत्वा रागद्वेषादि-राक्षसान्।**
**योगी शान्तिसमायुक्त: आत्मारामो विराजते ।।**
**शंकराचार्य-आत्मबोध-५०**

## २०९. गुरु

ज्याच्या ठाईं कसलें हि गौरव आहे तो गुरु होय. ज्याच्या ठाईं लघुत्व नाहीं, तुच्छत्व नाहीं, हलकटपणा नाहीं, तो गुरु. दाणा आणि टरफल यांत दाणा गुरु होय, टरफल तुच्छ होय. जो प्रत्येक वस्तूंतील सार घेतो आणि असार टाकून देतो, तो गुरूपासक, तो गौरव-ग्राही, गुरु होय. गौरवग्राही पुरुष दाणा आणि टरफल अलग करून दाणा घेईल आणि टरफल फेकून देईल म्हटलें; परंतु तो टरफलाचें हि गौरव ओळखतो, आणि तें हि मग गोग्रास म्हणून सांठवून ठेवतो. असें गौरवग्रहण करीत करीत त्याला सारें जगच गुरु होतें. तो बहुव्रीहि जगद्‌गुरु होतो. हें जें वस्तू वस्तूच्या ठाईं असलेलें गुरुत्व, तो परमेश्वरी भाव असून तोच खरा गुरु आहे. त्याच्या तुलनेंत इतर सारें जग लघुच होय. म्हणून परमात्मा हाच एकमात्र गुरु म्हणावयाचा. जगांत जें कांहीं गुरुत्व आहे तें सारें त्याचें आहे. प्रत्येक वस्तूला लाभलेलें गौरव म्हणजे त्या वस्तूचें

स्वत्व होय आणि तें स्वत्व, तो स्वभाव, ईश्वरदत्त होय, किंबहुना, स्वत: ईश्वरी भाव होय. म्हटलेंच आहे विभूतियोगांत ''अहं आत्मा गुडाकेश सर्वभूताशय-स्थित:'' 'राहतों आत्मरूपानें सर्वांच्या हृदयांत मी' अर्थात् प्रत्येक वस्तूच्या ठाईं असलेलें स्वत्व हीच भगवंताची पहिली विभूति असून तीच त्या प्रत्येकाची शरण्य आहे, गुरु आहे. ''सर्व-धर्मान् परित्यज्य मां एकं शरणं व्रज'' म्हणून जो आदेश दिला आहे, तो हि ह्याच स्वतत्त्वाला अनुलक्षून होय. त्यालाच सर्वभावें शरण जाऊन चर वा अचर प्रत्येक व्यक्ति सर्व पापांतून मुक्त व्हावयाची आहे. दगडानें आपलें ईश्वरदत्त दगडपण सोडूं नये. सर्वभावें दगडच होऊन रहावें. त्यांतच त्याची पाप-मुक्ति आहे. 'स्वभाव-नियतं कर्म कुर्वन् नाप्नोति किल्बिषम्।' गी. १८.४७

## २१०. गुरुतम

गुरु शरणागत शिष्याच्या नेत्रांत ज्ञानांजन घालून त्याला निर्मल दृष्टि देत असतो. ह्या नव्या दृष्टीमुळें त्याचें परम कल्याण होत असतें. म्हणून ''नास्ति तत्त्वं गुरो: परम्'' असें गुरूचें गौरव गाइलें जातें. जगांत असे गुरु कोण आहेत? जगांत माणसाचा जन्म झाल्यावर त्याला लाभलेले आईबाप हेच त्याचे पहिले गुरु होत. ते त्याला शौचाचार आणि सदाचार शिकवितात. विद्यागुरु त्याला नाना विद्या-कला शिकवितात. सद्गुरु त्याला जीवनसाफल्याचा मंत्र देतात. मानवी जीवन उत्तरोत्तर शुद्ध आणि समृद्ध करून तें सफल करण्याचे हे उपाय आहेत. अंडांतून अंडज बाहेर आलें म्हणजे त्याला नवेंच जग दिसतें. तसें प्रत्येक वेळीं एक एक कवच फोडून मनुष्य नव्यानें जन्मतो, नवीन जगांत दाखल होतो. त्याला नवीन दृष्टि येते, नवीन सृष्टि दिसते. हेंच द्विजत्व होय. प्रथम भौतिक निसर्गसृष्टि, मग मानवी विद्याकला-सृष्टि आणि शेवटीं आध्यात्मिक दिव्य सृष्टि पाहण्यास लागणारी दृष्टि त्याला येते. अशी दृष्टि देणारे हे गुरु सर्वच थोर होत. ते एकापेक्षां एक वरचढ आहेत. परंतु ह्या सर्वांहून हि एक श्रेष्ठ गुरु आहे आणि तो म्हणजे प्रत्येक जीवाच्या ठाईं असलेला त्याचा अंतर्यामी, अंतरात्मा. तो जीवाला क्षणभर हि सोडीत नाहीं. सतत त्याच्या जवळ राहून त्याला सत् काय, असत् काय, काय घ्यावें, काय टाकावें, काय करावें, काय करूं नये, हें सांगत असतो, शिकवीत असतो, प्रेरीत असतो. हाच सर्वांतर्यामी परमात्मा परम गुरु होय, ''गुरुणां गुरु:''होय, गुरुतम होय. कारण तोच अंतिम निर्णय करणारा आहे. सर्वांत अधिक वजन त्याच्याच शब्दाला आहे.

## २११. धाम

क्रियते इति कर्म, तसें धीयते इति धाम. अग्नीचें आधान करण्यांत येतें म्हणून अग्नि म्हणजे तेज हें धाम होय. अग्नीच्या आश्रयानें वसति होते. म्हणून घराला धाम म्हणूं लागले. अर्थात् धाम म्हणजे प्रथम अग्नि आणि मागाहून तदाश्रयानें होणारी वसति वा तदाश्रयभूत घर होय. ज्याच्या आश्रयानें हें समस्त चराचर विश्व राहतें तें जें आत्मतेज, तें जें चित्तत्त्व, तेंच खरोखर धाम होय. ज्याच्या आश्रयानें अग्नि राहतो, तोच खरा अग्नि होय. म्हणून परमात्म्याला धाम म्हटलें आहे. जिथें अग्नि राहतो तें हि लक्षणेनें धामच म्हटलें जातें आणि म्हणून जिथें जिथें परमात्म्याचा वास आहे तीं सर्व धामेंच होत. देवाचीं जीं प्रसिद्ध आणि जागृत स्थानें आहेत त्यांनाच आपण धाम असें म्हणतों. भारताच्या चार दिशांना चार धामें आपण मानतों. बदरी, रामेश्वर, पुरी आणि द्वारका हीं उत्तर, दक्षिण, पूर्व आणि पश्चिम या चार दिशांना असलेलीं चार धामें होत. भगवंताचा तिथें विशेष वास आहे. वस्तुत: चराचर वस्तु, त्या प्रत्येकींत भगवंताचें धाम म्हणजे तेज असल्यामुळें, भगवद्धामच होत, भगवंताचें वसतिस्थानच होत. म्हणूनच प्रल्हादानें

म्हटलें, 'स्तंभांत हि परमेश्वर आहे.' अशी एक हि वस्तु नाहीं, असा एक हि आवास नाहीं, ज्यांत परमात्मा वसलेला नाहीं.

**पुरुष एव इदं सर्वम्।—पुरुषसूक्त, ऋग्. १०**
**ईशावास्यं इदं सर्वम्।—ईशावास्य, यजु. ४०.१**
**वासुदेवः सर्वम्।—गीता ७.१०**

### २१२. सत्य

'सत्यं ज्ञानं अनन्तं ब्रह्म' अशी श्रुति आहे. जें कधीं काळीं मिथ्या होत नाहीं तें सत्य होय. ह्या सर्वाश्चर्यमय सृष्टीचें मूलकारणच सत्य होय. ज्याच्या आश्रयानें सर्व सत्यें सत्य म्हणून प्रतीत होतात तें 'सत्यस्य सत्यम्' ब्रह्मच सत्य होय. सत्य हें सर्व सत्य म्हणून प्रतीत होणाऱ्या पदार्थांचें आधारभूत असतें म्हणून सत्य म्हणावयाचेंच, पण जें मिथ्या म्हणून म्हणावयाचें त्या मिथ्या-प्रत्ययाचेंहि आधारभूत तत्त्व सत्यच होय. रज्जू ह्या पदार्थाचें आधारभूत तत्त्व सत्य होय. त्या सत्यामुळेंच, रज्जूला रज्जूत्व वा सत्यत्व आहे. परंतु त्या रज्जूवर अंधारांत होणारा सर्पाभास हि जो आम्हांला सत्यच भासत असतो त्याचें हि आधारभूत तत्त्व सत्यच असतें. अर्थात् सत्य तें होय जें सत्य असत्य दोहोंचें हि आधारभूत असून ह्या दोहोंहून भिन्न असतें. हें सत्यानृतमूल, सर्वमूल सत्य परमात्मा होय. परमात्मा सर्व कांहीं होऊं शकतो परंतु केव्हां हि तो असत्य होऊं शकत नाहीं. म्हणून तो सत्य. वस्तुतः तोच एक सत्य असून बाकी सारें असत्य होय. कारण, त्या सर्वांना आलटून पालटून सत्यासत्य संज्ञा प्राप्त होत असतात. जागृतींतील सृष्टि स्वप्नांत मिथ्या होते, स्वप्नांतील जागृतींत मिथ्या होते आणि ह्या दोन्ही सुषुप्तींत मिथ्या होतात. ह्या सर्व पालटांबरोबर जें पालटत नाहीं तें अनन्त आणि ह्या सर्व पालटांचें द्रष्टा म्हणून ज्ञानस्वरूप असणारें जें तत्त्व तेंच सत्य, तोच परमात्मा "सत्यं ज्ञानं अनन्तं ब्रह्म."

### २१३. सत्यपराक्रम

पराक्रम करणारे पराक्रमी पुरुष अचाट कर्में करीत असतात आणि तत्परिणामीं त्यांचा पराक्रम सिद्ध होत असतो. परंतु परमेश्वराला आणि त्याच्या भक्ताला असला खटाटोप करावा लागत नाहीं. सत्य हाच त्याचा पराक्रम असतो. आपल्या सत्यानेंच तो आपल्या प्रतिपक्षावर विजय मिळवीत असतो. सत्य हीच त्याची मुत्सद्देगिरी असते आणि असत्यवर्जन आणि तदंतर्गत सर्व अहिंसादि संयम हीच त्याची बहादुरी असते. या दुहेरी आत्मबलानें तो आपल्या प्रतिपक्षाला दोन्ही समितींत— रणाच्या भट-सभेंत आणि मुत्सद्देगिरीच्या भट्टसभेंत, मात देऊन समितिंजय होत असतो. सत्य आणि अहिंसादि संयम हे कृष्णार्जुन जिथें आहेत "तत्र श्रीर् विजयो भूतिर् ध्रुवानीति मतिर् मम" असें मी म्हणेन. "यतो धर्मस् ततो जयः" असेंहि म्हटलें आहे. आणि धर्म कुणीकडे असतो? जिथें कृष्णार्जुन तिथें! धर्मराजाकडे कृष्णार्जुन होते म्हणूनच तो विजयी झाला. आमच्या सत्य आणि अहिंसादि संयम या कृष्णार्जुनांकडे धर्म आहे. अर्थात् सत्य आणि संयम हाच द्विविध धर्म होय. म्हणून त्यांचा सदैव विजयच आहे. परमात्मा सत्य-पराक्रम आहे. या सत्याला पर कोण? कोणी व्यक्ति? नाहीं. त्याला पर म्हणजे प्रतिपक्षी असत्यच. त्यावर तो आपल्या सहज सत्यानें विजय मिळवीत असतो. या सत्य-पराक्रम परमात्म्याचाच एक भक्तमहात्मा हि आधुनिक काळांत होऊन गेला. तो हि सत्य-पराक्रमच. म्हणून त्याचें हि इथें स्मरण केलें. भक्ताच्या स्मरणाशिवाय खरोखर देवाचें स्मरण हि अपुरेंच राहतें.

### २१४. निमिष

अनिमिष म्हणजे ज्यांचे डोळे कधीं मिटत नाहींत ते नित्यसाक्षी देव. अर्थात् जे अनिमिष नाहींत, ते निमिष होत. निमिष म्हणजे वारंवार स्वरूपानुसंधान विसरून अस्वाभाविक वर्तन करणारे मानवादि जीव

होत. कर्तृत्व-भोक्तृत्वादि अहंकार धरणें म्हणजेच निमिषण होय. म्हणजेच स्वभाव सोडून परभाव अंगीकारणें होय. परमात्माच, तें शुद्ध चेतनच, अनिमिष असून कर्तृत्वभोक्तृत्वोपाधि जीवच निमिष होत. आणि ''ममैवांशो जीवलोके जीवभूत: सनातन:'' म्हटलें असल्यामुळें निमिष हें एक परमात्म-नाम झालें.

निमिषणोन्मिषण ही क्रिया आहे. परमात्मा अक्रिय असल्यामुळें तो तींतून मुक्त आहे. पाहणें ही क्रिया कितीहि लघु असली तरी ती क्रियाच आहे आणि म्हणून ती करतांना श्रम होणारच, थकवा येणारच. म्हणूनच पापण्या मधून मधून मिटत असतात, विसांवा घेत असतात. आणि झोपेंत दीर्घकाल मिटून राहत असतात. परंतु परमात्म्याचें पाहणें ही क्रिया नसून तो स्वभाव आहे. परमात्मा हा नित्यदर्शन-स्वभाव असून तो दर्शन-क्रियामुक्त असल्यामुळें तो निमिष म्हणजे डोळे न उघडणारा म्हटला आहे. ही त्याची अक्रियावस्था आणि दर्शनशीलता त्याला योगनिद्रित चित्रित करून दाखविली जाते. डोळे मिटलेले असतात, म्हणून ती निद्रा आणि दर्शनस्वरूप अखंड स्वरूपानुसंधान असतें म्हणून तो योग. परमात्मा हा सदैव योग-निद्रितच असतो म्हणून तो निमिष.

## २१५. अनिमिष

निमिष, पल, घटिका ह्या वा मास ऋतु अयनें ह्या ज्याच्या कला होत तो वत्सरात्मा वा संवत्सरात्मा काल अनिमिष होय. तो कधीं डोळे मिटत नाहीं, झोंपीं जात नाहीं. तो सर्व चराचराची यच्चयावत् हालचाल पहात असतो. त्यांची नोंद घेत असतो. त्यांची गणना वा कलना, करीत असतो. म्हणून त्याला काल म्हटलें आहे. ''काल: कलयतां अस्मि'' असा तो अनिमिष काल भगवद्-विभूति वर्णिला आहेच.

हें कालस्वरूप, परमात्म्याच्या सर्वसाक्षित्वाचा एक आविर्भाव होय. चिन्मात्र परमात्मा जीवाच्या जागृति, स्वप्न, सुषुप्ति या तिहींचा साक्षी आहे, तसा तो जगताच्या उत्पत्तिस्थितिलयांचा हि द्रष्टा आहे. म्हणून तो तुरीय म्हटला आहे. तोच अनिमिष.

भूचर सर्प, जलचर मत्स्य आणि खेचर तारे हे सारे अनिमिष होत. सर्पाणां वासुकिश्चाहम् ''झषाणां मकरश्चाहम्'' आणि ''ज्योतिषां रविरंशुमान्'' म्हणून ज्या भगवद्-विभूति वर्णिल्या आहेत अनिमिष पदानें त्यांचें हि स्मरण होतें.

## २१६. स्रग्वी

स्रक् म्हणजे माला आणि स्रग्वी म्हणजे मालाधारी. मालाधारण कोण करीत नाहीं? मग परमात्म्याला स्रग्वी म्हणण्यांत काय विशेष? सर्व जण जी माला धारण करतात ती थोड्याच वेळांत कोमेजून जाते. शिवाय ती असते उपरी, अंगभूत नसते. आणि बासी होते. परंतु परमात्मा जी माला धारण करतो ती कधीं न कोमेजणारी आणि बासी न होणारी आहे आणि परमात्म्यापासून ती कधींहि वियुक्त न होणारी आहे. सौरी प्रभा ही सूर्याची किरणमाला होय. चांद्री आभा ही चंद्राची माला होय. त्या मालांनीं ते नित्य शोभायमान असतात. म्हणून त्यांना अंशुमाली म्हटलें जातें. परमात्मा हि तसा आपल्या आत्मप्रभेच्या प्रभावळीनें विरोचमान आहे. ती त्याची अनपहार्य अशी अंगभूत स्वरूप-शोभा आहे. सूर्य म्हटला म्हणजे तो सदैव सौरी प्रभेनें मंडितच असावयाचा. तसा परमात्मा हा सदैव आत्मप्रभेनें, आपल्या सत्-चित्-आनंदमयी प्रभावळीनें, विरोचमानच असावयाचा. म्हणून तो स्रग्वी. त्याच्या मालेचीं फुलें कधीं निर्माल्य होत नाहींत. त्याचा चित्प्रकाश कधीं अचित् होत नाहीं. कधीं मळत वा मावळत नाहीं.

## २१७. उदारधी (वाचस्पति उदारधी)

शंकराचार्य 'वाचस्पति उदारधी' हीं दोन पदें मिळून एकच नाम समजतात. तें घेऊनहि वाचस्पति

पदाचें जें ध्यान मागें केलें तें समर्पकच होय. कारण दुसऱ्याच्या मनींचें आर्त आपलें मानण्याहून अधिक उदार बुद्धि दुसरी काय असूं शकेल? ''काहुके मनकी कोउ न जानत, लोगन के मन हांसी'' दुसऱ्याच्या मनांतील व्यथा कोणी जाणत नाहीं. त्याला परदु:ख शीतलच! परंतु परमात्मा हा सर्वांतर्यामी प्रत्यगात्मा असल्यामुळें त्याला प्रत्येकाचें दु:ख स्वत:चेंच दु:ख वाटतें आणि त्यामुळें तो तन्निवारणार्थ तळमळत आणि धडपडत असतो. इतकी प्रगाढ सहानुभूति दुसऱ्या कोणाला वाटते? आई, बाप, गुरु हे हितचिंतक आणि हितकर्ते खरे परंतु त्यांना वाटणारी सहानुभूति ही स्वत: माणसाला अंतर्यामीं वाटणाऱ्या स्वानुभूतीइतकी कशी वाटणार? ती कांहीं झालें तरी सहानुभूतिच, स्वानुभूति नव्हेच. म्हणून सर्वभूतांचा आत्मभूत असलेला सर्वांतर्यामी परमात्मा हाच उदारधी होय. भावनेची इतकी उदारता इतरत्र कुठेंच आढळणार नाहीं. ही उदारता प्रगाढतेंत आणि व्यापकतेंतहि समानच उदार आहे. स्वानुभूतीइतकें खोल आणि सर्वानुभूतीइतकें विशाल वा व्यापक दुसरें काय असूं शकेल? या दोन्ही अर्थांनीं परमात्मा उदारधी आहे. दोन्ही वस्तुत: एकच आहेत.

वाचस्पति हें नाम दोनदां आलें आहे . पण त्याला जोडून दोन वेगवेगळीं विशेषणें घेऊन तीं दोन वेगळीं नामें कल्पिलीं आहेत. (१) वाचस्पति उदारधी, (२) वाचस्पति अयोनिज. (क्र. ५७३)

## २१८. अग्रणी

अग्रे नयति इति अग्रणी:। अशी अग्रणीची व्युत्पत्ति आहे. प्रत्येक वस्तूचीं दोन अग्रें मानतां येतील. एक मूळ आणि दुसरें फळ. पैकीं मूळ अग्र असलें तरी तें भूमिगत असल्यामुळें त्याला अग्र न म्हणतां फळालाच तेवढें अग्र म्हटलें जातें. आणि म्हणून समग्र शब्दानें मुळापासून तों थेट शेंड्यापर्यंत वा फळापर्यंत असा भाव व्यक्त केला जातो. बीजाची परिणति फळांत होते, म्हणून फळच शेंडा होय. अशा प्रकारें अग्रणी म्हणजे फळापर्यंत पोचविणारा, प्रत्येक गोष्ट सफल करणारा, असा अर्थ होईल. परमात्मा अग्रे नेतो, पुढें नेतो म्हणजे तो सफलतेला नेऊन पोंचवतो, असें समजावयाचें. कर्म करणें माणसाच्या हातचें आहे, पण त्याचें फळ त्याच्या हातचें नाहीं. तें परमेश्वराच्याच हातीं सुरक्षित आहे. त्याचा अनुग्रह होईल तेव्हांच तें मिळेल. ज्याअर्थीं फळसिद्धीशिवाय कर्म हीन होय, त्याअर्थीं कर्महि माणसाच्या स्वाधीन म्हणतां येत नाहीं. म्हणून कर्म-हेतूंमध्यें म्हणजे कर्माच्या निष्पादक कारणांमध्यें दैवहि एक कर्मकारण मानलें आहे. त्याचप्रमाणें मुळांत देखील कर्म दैवतंत्रच आहे. जेव्हां ईश्वरी संकल्प असतो तेव्हांच कर्म स्फुरतें. निद्रा मालवते तेव्हांच जागृति पालवते आणि जागृतींतच कर्म स्फुरत असतें. जागृति, स्वप्न, सुषुप्ति हे भाव स्वतंत्र नाहींत; ते प्रकृतींतच आहेत आणि प्रकृति ही ईश्वरतंत्र आहे. सारांश, कर्म-मीमांसा केली तेव्हां दिसून आलें कीं संकल्प, साधना आणि सिद्धि तिन्ही ईश्वराधीन आहेत. म्हणून परमात्मा हा अग्रणी होय. तोच प्रथम संकल्प-स्फूर्ति देतो. नंतर तदनुसार जीवाला प्रयत्न करायला लावतो आणि शेंवटीं ह्या प्रयत्नाला तोच सिद्धीस नेतो. अशा प्रकारें केवळ फलदाता म्हणूनच नव्हे तर आरंभापासून सतत पुढें पुढें नेत असल्यामुळेंहि तो अग्रणी होय. सामान्य अर्थानें प्रत्येक वर्ण, जाति, कुल यांचा जो नायक तो अग्रणी म्हटला जाईल. तेंहि परमात्म्याचें एक रूप होय.

समाजांत भिन्न भिन्न वर्णांचे व व्यावसायिकांचे संघ असतात. त्यांच्यांत जे विवाद वा प्रश्न वेळोवेळीं उत्पन्न होतात त्यांचा निर्णय त्यांचें पंचायतन म्हणजेच पंचायत करीत असते. या पंचायतनाचा जो मुख्य, म्हणजे सरपंच तोच अग्रणी म्हणावयाचा.

## २१९. ग्रामणी

ग्रामं सन्मार्गेण नयति इति ग्रामणी:। जो सबंध गांवाला सन्मार्गास घेऊन जातो तो ग्रामणी होय. कुटुंब म्हणजे व्यक्तिग्राम होय. हा नात्यानें वा रक्त-संबंधानें बांधलेला असतो. कुटुंबापेक्षां मोठा तो कुटुंबग्राम होय. हा सर्व वर्णांचा आणि सर्व कारु-नारूंचा मिळून बनलेला असतो. जनपद ग्राम-ग्राम होय. ग्राम रक्त-संबंधानें नव्हे, तर परस्परोपकारित्वानें बांधलेला असतो. गांवाच्या सुखसोई आणि अडी-अडचणी सर्वांना समान असतात. कुलनायक आपल्या कुलाच्या सुखजीवनासाठीं झटत असतो. ग्रामनायक गावांच्या सुखजीवनासाठीं झटत असतो. गांवांतील सर्व कुटुंबांना सर्वतोपरी सुखी समृद्ध आणि सफल करावें, अशी त्याची महत्त्वाकांक्षा असते. इमारतीचा कुठलाहि भाग, वीट, दगड विरला, फुटला, सुटला तर तेवढ्यानें सबंध इमारतच तितक्या अंशानें कमजोर होते. त्याप्रमाणें सबंध गांवाची इमारत, सबंध ग्रामसमाज गांवातील कोणतेंहि घटक-कुटुंब दु:खी, कष्टी, व्यसनी वा पतित झाल्यानें कमजोर होतो. अशी व्यापक आत्मीयता बाळगून जो ''अवघेचि सुखी असावे ऐसी वासना'' बाळगतो तो ग्रामणी होय. कुटुंब व्यक्त, पण संकुचित असतें. जनपद अतिविशाल आणि अव्यक्त. ग्राम हा ह्या दोघांचा सुवर्णमध्य होय. तो व्यक्त असून संकुचित नाहीं. त्यामुळें तोच सेव्य. तो जो हाताळतो तो कुटुंब आणि जनपद दोहोंचेंहि हितसाधन करतो.

आज असा एक ग्रामणी भारतांत सर्वत्र संचरत असून तो ग्रामस्वराज्य संकल्पून विश्वोदय संपादीत आहे. परमात्म्याचा हा एक अवतार आहे. परमात्मा तर तत्त्व-ग्रामाचा नेता आहे. तो अष्टधा प्रकृति आणि षोढा विकृति या सबंध तत्त्वग्रामाचा नेता आहे. कारण त्या सर्वांचा तो मुख्य आहे.

अग्रणी हा आपल्या पंचायतीच्या द्वारें आपआपल्या वर्णाचें वा व्यवसायाचें नियमन करीत असतो, तर ग्रामणी हा सर्व वर्णांचा व व्यवसायांचा मिळून बनलेला जो समग्र ग्रामसमाज त्याचें नियमन करीत असतो. लोकजीवनाचा पट मूलत: वर्णव्यवसायांच्या आणि ग्रामराज्याच्या आडव्या उभ्या धाग्यांनीं विणलेला आहे.

## २२०. श्रीमान्

श्रीमान् हें पद पूर्वीं दोनदां येऊन गेलें असून परत तें आतां तिसऱ्यांदा आलें आहे. त्यावरून परमात्म्याची त्रिविध श्रीमत्ता प्रकट होते. सत्ता, संपत्ति आणि शोभा अशा त्या तीन विधा होत. परमात्मा सद्रूप असल्यामुळें तो सदैव सत्तासंपन्न असतो. सर्व सद्गुणसंपत्ति वा सर्व स्वत्व हें सताचेंच असावयाचें म्हणून तो संपत्तिमान् आहे. आणि सर्व शोभा, सर्व प्रकाश जें सद्रूप आहे त्याचाच असूं शकतो, असताचा नव्हे, म्हणून सद्रूप परमात्माच कधींहि न लोपणारा, सदैव प्रकाशमान् म्हणून श्रीमान् होय. हें समस्त विश्व परमेश्वराची त्रिविध श्री होय. त्याच्या अस्तित्वाचें, त्याच्या स्वामित्वाचें आणि त्याच्या सर्वाश्चर्यमय मोहकतेचें तें गमक आहे. राजा सत्ताधारी, सर्व संपत्तीचा स्वामी आणि ऐश्वर्य-द्योतक छत्रचामरादि राजवैभवानें व राजतेजानें युक्त तळपत असतो. तेंच राजाचें राजत्व होय. तशी परमेश्वराची श्रीमत्ता म्हणजे त्याचें सर्वेश्वरत्व होय. त्याच्याशीं कोणाची तुलनाच होऊं शकत नाहीं. त्याच्या ऐश्वर्याची इयत्ता सांगणाऱ्याची गति इसापाच्या बेडकीसारखी व्हायची.

## २२१. न्याय

राजा अपराध्याला अपराधानुरूप निगृहीत वा दंडित करीत असतो, आणि सेवा करणाराला सेवानुरूप अनुगृहीत करीत असतो. त्यामुळें त्याला न्यायी म्हटलें जातें. परमात्मा हा न्यायी किती

म्हणावा? तो तर न्यायस्वरूपच आहे. तो राजाप्रमाणें मागाहून न्याय-निवांडा करीत बसत नाहीं. त्यानें कर्माबरोबरच त्याचें फळ हि जोडून दिलें आहे. जसें करावें, तसें भरावें. तद्द्वारा तो परभारेंच न्याय देत असतो. किंबहुना न्याय देणें ही भाषाहि बरोबर नाहीं. कर्मकर्ताच आपल्याला हवा तो न्याय घेत असतो. ज्याला सुख हवें त्यानें सत्कर्म करावें. तें न करणें म्हणजे दु:खाचा न्याय मागणेंच होय. अशा प्रकारें परमेश्वराचा न्याय हा स्वायत्त न्याय आहे. त्यापेक्षां अचूक आणि सुलभ न्याय दुसरा नाहीं. कर्म म्हणजे केवळ कायिक कर्म नव्हे, तर सर्व प्रकारचें कायिक, वाचिक, मानसिक कर्म. तुम्ही जी कोणती मानसिक, वाचिक, कायिक हालचाल कराल ती सर्व क्रिया होय आणि तिचें फळहि अवश्यंभावी आहे. जितकी क्रिया सूक्ष्म तितकें तिचें वीर्य उग्र. कायिक कर्मापेक्षां वाचिक आणि वाचिकापेक्षां मानसिक कर्म हें महत्तर होय आणि त्याचें फळ हि तसेंच गुरुतर आहे. सद्वृत्ति ही सर्वांत मोठी सत्कृति होय.

## २२२. नेता

पूर्वीं नेता हें पद येऊन गेलें आहे. तिथें तें ''योगविदां नेता'' असें आलें आहे. इथें तें निरुपपद प्रयोगावरून सर्वांचा नेता अशा अर्थीं आलें आहे, असें समजावयाचें. परमात्मा हा कोणा व्यक्तीचा नेता नाहीं, तो स्वत: नीतीचाच नेता आहे. नीति कोणती? जो नेत्याचा मार्ग ती नीति. माणूस चालतो तेव्हां त्याच्या चालण्यानें पायवाट तयार होते. ह्या वाटेचा नेता तो माणूसच असतो. इंग्रजींत 'All roads lead to Rome' अशी म्हण आहे. वस्तुत: रोड म्हणजे मार्ग हे नेत नसतात, ते स्वत:च नीत असतात. म्हणूनच त्यांना नीति असें नांव मिळालेलें आहे. ही नीति जो तयार करतो, तोच नेता होय. परमात्म्यानेंच सर्व मार्ग तयार केलेले आहेत. म्हणून तोच नेता होय. सत्य-स्वरूप परमात्म्याची जी पायवाट ती नीति असून तिचा तो नेता आहे. आणि तिनें जाणाऱ्या सर्व सत्यधर्मा अनुयायींचाहि पर्यायानें तो नेता म्हणावयाचा. सत्योपासक ह्या सत्यस्वरूप नेत्याला सत्यमार्ग-दर्शनासाठीं प्रार्थीत आला आहे. ''हिरण्मयेन पात्रेण सत्यस्यापिहितं मुखम्। तत् त्वं पूषन् अपावृणु सत्यधर्माय दृष्टये।।'' ''अग्ने नय सुपथा राये'' हे मार्गप्रकाशक देवा! आम्हांला तूं त्या परमानंदाकडे सुनीतीनें, सरळ मार्गानें घेऊन जा.''

## २२३. समीरण

सं, सर्वं, सर्वत:, सम्यग् स्वं प्रति ईरयति इति समीरण:। अंतर्यामिरूपानें परमात्मा सर्वांना समान प्रेरणा देत आहे, सर्व प्रेरणा देत आहे, म्हणून तो समीरण. सर्व जीव आपल्यावर नि:सीम प्रेम करीत असतात. ही प्रेरणा सर्वांना समान असते. 'आत्मनस्तु कामाय सर्वं प्रियं भवति।' तो जें जिथें जितकें प्रेम करीत असतो, तें तिथें तितकें सर्व आपल्यावरच प्रेम करीत असतो. कारण अशेष प्रेमाचें भाजन तो सर्वांतर्यामी स्वात्मा आहे. चुंबक कांहीं एक हालचाल न करतां लोहखंडाला जसा चोहोंकडून आपल्याकडे खेचीत असतो तसा हा सर्वांतर्यामी परमात्मा सर्वांना सगळीकडून समान आपल्याकडे खेचीत असतो, प्रेरीत असतो. म्हणून तो समीरण. कांहीं नद्या पश्चिम-वाहिनी तर कांहीं तद्-विरुद्ध पूर्ववाहिनी दिसतात. परंतु त्या सर्व शेवटीं एका सागरालाच जाऊन मिळतात. त्या प्रमाणें जगांत जो अनुंकूल वा प्रतिकूल विविध कर्मप्रवाह दिसतो, तो सारा आत्मप्रेमप्रेरित आत्माभिगच असतो.

## २२४. सहस्रमूर्धा

सहस्रमूर्धा ते सहस्रपात् हा श्लोकार्ध सरळ किंचित् पाठान्तरानें पुरुषसूक्तांतून उचलला आहे. विष्णुसहस्राचें हें वेदमूलत्व होय. वेद वस्तुत: सर्वमूलच आहे. कारण तो अक्षरस्वरूप आहे. समग्र

भारतीयतेचें तें माहेर आहे. धर्म, तत्त्वज्ञान, संस्कृति, साहित्य, संगीत, कला किंबहुना भूत भविष्य आणि वर्तमान या सर्वांचा तो मूल-स्रोत आहे.

परमात्मा सहस्रमूर्धा आहे. सहस्रमूर्धा म्हणजे सहस्रबुद्धि. परमात्म्याची बुद्धिशक्ति, ज्ञानशक्ति अगणित आहे. कारण तो स्वत: चित्स्वरूप आहे. सर्व चैतन्य, सर्व बोध, तद्भव आहे. एके काळीं सहस्र ही संख्येची परिसमाप्ति असावी म्हणूनच अगणित, असंख्यात, अमित आणि पर्यायानें अनन्त ह्या अर्थी सहस्रशब्द रूढ झाला, तो आजतागायत तसा आहे. अगणित लोक ह्या अर्थी हजारों लोक असा प्रयोग आपण आज हि करतों. सहस्ररश्मि सूर्य, सहस्रवर्त्मा सामवेद इत्यादि प्रयोग प्राचीन आहेतच. वेदांहून प्राचीन दुसरें लिखाण नाहीं. त्यांत सहस्रशब्द या लक्षणार्थानें विपुल आलेला आहे.

मुख म्हणजे वदन वाक्शक्तीचें उपलक्षण आहे, मूर्धा बुद्धि-शक्तीचें. चतुर्मुख, षण्मुख, दशमुख, सहस्रमुख हे सर्व वाक्शक्तीचे चढते प्रकार होत. द्विशिरा त्रिशिरा हीं नामें आहेत. पण त्यांचा बुद्धीशीं संबंध नसून द्विविभक्त त्रिविभक्त शिर असलेले असा बाह्य कपालाकृतीशीं संबंध आहे. बहुशिरा शब्द विष्णु-सहस्रांत पूर्वी येऊनच गेला आहे. तो हि वेगळा. बहु आणि सहस्र त्याचप्रमाणें शिर आणि मूर्धा, वेगळे आहेत, वेगळ्या अर्थानें घ्यावयाचे आहेत.

## २२५. विश्वात्मा

परमात्मा व्यक्त नाहीं. व्यक्तमात्र त्या अव्यक्त अक्षर पुरुषाचें रूप आहे. म्हणून त्याला विश्वात्मा म्हणजे विश्वरूप म्हणावयाचें. हें विश्वच त्याचें रूप आहे. त्यांतील सर्व शिरें त्याचीं आहेत, सर्व बाहू त्याचे आहेत, सर्व उदरें त्याचीं आहेत, सर्व पाद त्याचे आहेत. म्हणून त्या अव्यक्त आणि अक्षर पुरुषाला सहस्रमूर्धा, सहस्राक्ष आणि सहस्रपात् म्हटलें आहे. मूर्धा आणि पाद हे आद्यन्त होत. नेत्र मध्याचा, मधल्या सर्व अवयवांचा आणि तत्शक्तींचा, प्रतिनिधि आहे. वेदवचनांत पुरुष शब्द आला आहे. पण तो जो सहस्रशीर्षा, सहस्राक्ष आणि सहस्रपाद पुरुष, तो म्हणजे हा विश्वरूप परमात्मा होय हें येथील विश्वात्मा शब्द स्पष्ट करतो. म्हणून इथें हि त्याच्या सर्वशक्तिमत्तेचें द्योतन करण्यासाठीं त्याला सहस्रमूर्धा सहस्राक्ष आणि सहस्रपाद म्हटलें आहे. विश्वरूपाच्या पोटांत द्विपाद चतुष्पाद इत्यादि सर्वच समाज येतात. म्हणून त्यांचें सूचन करण्यासाठीं पुरुषसूक्तांत ''गावो ह जज्ञिरे तस्मात् तस्मात् जाता अजावय:'' तसें ''ब्राह्मणोऽस्य मुखमासीत्'' इत्यादि विवरण आलें आहे. म्हणूनच विश्वनामानें च आरंभ.

## २२६. सहस्राक्ष

परमात्मा सहस्राक्ष आहे, सहस्रनेत्र आहे. अर्थात् तो सर्वसाक्षी आहे. परमात्म्याचें कर्तृत्व-भोक्तृत्वोपाधि जीवाहून भिन्नत्व सहस्राक्ष शब्द सूचित करतो. तो सहस्रविध कर्मांचा म्हणजे सर्व कर्मांचा आणि फलांचा साक्षिमात्र आहे.

न कर्तृत्वं न कर्माणि लोकस्य सृजति प्रभु:।
न कर्मफल-संयोगं स्वभावस्तु प्रवर्तते।।
नादत्ते कस्यचित् पापं न चैव सुकृतं विभु:।
अज्ञानेनावृतं ज्ञानं तेन मुह्यन्ति जन्तव:।।
गीता ५-१४,१५

तो प्रभु म्हणजे स्वरूपावस्थानक्षम आणि विभु म्हणजे सर्वव्यक्ति-व्यापक परमात्मा कोणाला कर्म करायला लावीत नाहीं, कीं त्या कर्माचें फळ हि देत नाहीं, स्वभावत: सर्व घडत असतें. जीव हें न जाणतां आपल्याला कर्ताभोक्ता मानून फसतो आहे. जगाचे सर्व व्यवहार त्याच्या समोर चालले असतात, पण त्याचें शुभाशुभ वा सोयरसुतक त्याला नाहीं, तो केवळ साक्षी आहे.

सूर्य ही परमात्म्याची प्रतिमा आहे. ''सूर्य आत्मा जगतस् तस्थुषश् च'' म्हणून त्याला हि विश्वात्मा सहस्राक्ष आणि सहस्रपात् म्हणतां येतें. तो सर्वज्ञ असल्यामुळें सहस्रमूर्धा हि तो आहेच.

## २२७. सहस्रपात्

सर्व द्विपादांचे आणि चतुष्पादांचे आणि बहुपादांचे पाद हे त्या सर्वांतर्यामी अव्यक्त अक्षर परमात्म्याचेच पाद होत. कारण व्यक्तमात्र अव्यक्ताचाच प्रकाश होय तो. म्हणून तो परमात्मा अपाद, एकपाद, द्विपाद, बहुपाद आणि सहस्रपाद वा अनन्तपाद आहे असें कसेंहि म्हटलें तरी तें त्याला साजणारें आहे. ''तुका म्हणे जें जें बोला। तें तें साजे या विठ्ठला''. अपाद वा पादोदर सरीसृप, एकपाद वृक्ष, द्विपाद मानव, बहुपाद पशु आणि सहस्रपाद घोण इत्यादि जीवजन्तु त्या अव्यक्त आणि अक्षर महापुरुषाचींच रूपें होत. एकदां त्याची ओळख पटल्यानंतर मग फसगत होत नाहीं. ''तत्र को मोहः कः शोकः एकत्वं अनुपश्यतः।'' ज्ञानदेव म्हणतात, ''अनन्तरूपें अनन्त वेशें देखिलें त्यासी। बापरखुमादेवीवरीं, खूण बाणली कैसी.''

सहस्रपात् नाम परमेश्वराचें सर्वगतत्व द्योतित करतें. पायाच्या ठाईं गति असते. त्या गतिशक्तीचें अधिष्ठान परमात्माच असल्यामुळें त्याला सहस्रपात् म्हणजे अनन्तगति वा सर्वगत म्हणणें युक्तच आहे.

## २२८. आवर्तन

आवर्तन म्हणजे आवृत्ति करवणारा. ही सबंध सृष्टि सारखी आवृत्त होत आहे. सर्गामागून सर्ग होत आहे. कल्पामागून कल्प जात आहे. आणि त्या त्या स्थलकालांत असंख्य जीव पुनः पुनः जन्मत आहेत, ब्रह्मदेवापासून तों मशकापर्यंत. अशा प्रकारें परमात्मा हा ह्या सर्व-भूतांचा आवर्तन आहे. त्यांना आपआपल्या कर्मानुसार संसरवीत आहे. परमात्मा स्वतः अनावृत्त कूटस्थ आहे. तो येत नाहीं नि जात नाहीं. तो अठ्ठावीस युगें लोटलीं तरी विटेवर आपला उभा आहे. हा सारा सृष्टि-प्रवाह, ही भयानक भवनदी, ही भीमा, त्याच्या चरणासमोरून वाहत आहे आणि तो तिचा साक्षिभूत उभा आहे.

आवर्तन हें विशेषण न घेतां नाम घेतल्यास परमात्मा हा आवर्तनशील जगद्रूप आहे असेंहि म्हणतां येईल. कारणाहून कार्य अभिन्न असतें म्हणून कार्य हें हि कारणच म्हटलें जातें. तसा कार्यरूपानें हें आवर्तनशील विश्व तो परमात्माच आहे.

परमात्मा कारण आणि कार्य तसा करण हि आहे. विश्वाचें आवर्तन करविणारें जें प्रधान करण तें हि तोच आहे. प्रकृतिच प्रधान करण आहे. कारण

प्रकृत्यैव च कर्माणि क्रियमाणानि सर्वशः।
यः पश्यति तथात्मानं अकर्तारं स पश्यति।।
गी. १३.२९

प्रकृतीच्याच तंत्रानें हें सारें आवर्तन घडत असतें. म्हणून तो परमात्मा स्वतः अकर्ता असल्यामुळें प्रकृतिद्वारा आवर्तन आहे.

अशा प्रकारें परमात्मा हा कारण-रूपानें कार्य-रूपानें आणि करण-रूपानें आवर्तन आहे.

## २२९. निवृत्तात्मा (अनिवृत्तात्मा)

परमात्मा हा निवृत्तिस्वरूप असल्यामुळें तो निवृत्तात्मा होय. अकर्ता, अभोक्ता, केवल साक्षिभूत तो आहे. आधीं प्रवृत्त होऊन मागाहून तो त्या प्रवृत्तीपासून निवृत्त झाला असें नाहीं. तो मूळचाच निवृत्त आहे. प्रवृत्तिमात्र तद्बाह्य आहे. प्रवृत्ति तद्बाह्य आहे खरी, पण तिचा निषेधहि तो करीत नाहीं. कारण निषेध करणें हि प्रवृत्तिच होईल. तेव्हां तो सर्वतोव्यापी प्रवृत्तीच्यासकट, तिच्या भर बाजारांत, अगदीं स्वस्थ आहे.

तो गुणातीत आहे. गुणांच्या पकडींत तो येतच नाहीं.

प्रकाशं च प्रवृत्तिं च मोहमेव च पाण्डव।
न द्वेष्टि संप्रवृत्तानि न निवृत्तानि काङ्क्षति।।
उदासीनवदासीनो गुणैर् यो न विचाल्यते।
गुणा वर्तन्त इत्येव यो ऽवतिष्ठति नेङ्गते।।
गी. १४.२२,२३.

रत्नकिरणांप्रमाणें त्याची समदृष्टि गुण-वायूच्या गतागतानें इंगित होत नाहीं, कंपित होत नाहीं. जागृति, स्वप्न, सुषुप्ति वा उत्पत्ति, स्थिति, लय या व्यष्टिसमष्टींच्या भावांचीं आवर्तनें म्हणजे अनिवार प्रवृत्ति होय. परमात्मा हा तद्विलक्षण असल्यामुळें तो निवृत्तात्मा म्हटला आहे. वस्तुतः तो प्रवृत्ति-विलक्षण तसा निवृत्ति-विलक्षण हि आहे. तो उभय-कोटी-विलक्षण आहे. हें उभय-कोटी-विलक्षणत्वच वास्तविक निवृत्ति असून निवृत्तात्मपदानें त्याचाच निर्देश केला आहे.

इथें अनिवृत्तात्मा असा हि पाठ कल्पितां येतो. ''सर्वं खलु इदं ब्रह्म'' असें असतांना खरोखर तो परमात्मा कोणापासून निवृत्त होणार? तो आपल्यापासून कसा काय निवृत्त होऊं शकेल? त्यामुळें तो अनिवृत्तात्माच होय.

परमात्मा हा अशा प्रकारें निवृत्तात्मा आहे, तसा अनिवृत्तात्माहि आहे.

### २३०. संवृत

(सं) वृ धातूचे मुख्यतः दोन अर्थ होतात. (१) कुंपण घालणें, (२) पसंत करणें, निवडणें आणि ह्या दोन्ही अर्थांनीं परमात्म्याला संवृत म्हटलें आहे.

परमात्मा हा सर्वथा सुरक्षित आहे. कोणीकडून हि त्याचा भेद होऊं शकत नाहीं. त्याच्यांत प्रवेश होत नाहीं. त्याच्यांत विवर मिळत नाहीं. असा तो निगूढ आहे. सबंध बंद आहे. म्हणूनच वेदांना नेति नेति म्हणावें लागलें आहे. ''यतो वाचो निवर्तन्ते अप्राप्य मनसा सह'' म्हणून उपनिषदें त्याचें संवृतत्वच परोपरीनें गात आहेत. ''आश्चर्यवत् पश्यति कश्चिदेनं, आश्चर्यवद् वदति तथैव चान्यः । आश्चर्यवच्चैनमन्य शृणोति, श्रुत्वाप्येनं वेद न चैव कश्चित् ।। गी-२.२९ म्हणून गीतेनें त्या परमात्म्याचें संवृतत्वच निरूपिलें आहे. दर्शन, वचन, श्रवण इत्यादि स्थूल, सूक्ष्म आणि सूक्ष्मतर ज्ञानोपाय तिथें हार खातात. त्यांची कांहीं मात्रा चालत नाहीं. श्रद्धाच ठेवावी लागते. असा तो परमात्मा मोठें कोडें आहे. परम आश्चर्य आहे. आणि असें जें परम आश्चर्य त्याच्या भोंवतीं जर सारें जग गोळा झालें तर त्यांत काय आश्चर्य ? सर्वांना त्याचें कुतूहल आहे. सर्वांना तो अगदीं हवा हवासा वाटतो. सर्व जण त्याचें सर्वात्मना संवरण करतात. त्याच्यावरून त्रिभुवन ओवाळून टाकतात. देहें प्राणें मनें त्यालाच वरतात. असा तो परमात्मा सर्वांचा कंठमणि आहे, सर्वांच्या गळ्यांतील ताईत आहे. जीवांचा जिवलगच तो आहे. तो वित्ताहून, पुत्राहून, प्राणाहून प्रिय आहे म्हणून हि तो संवृत म्हणावयाचा.

परमात्मा हा अशा प्रकारें उभयथा संवृत आहे. तो तत्त्वतः संवृत म्हणजे अप्रतर्क्य, व्यवहारतः संवृत म्हणजे परम प्रिय होय.

### २३१. संप्रमर्दन

परमात्मा हा सर्वांचा गर्व चूर करतो. म्हणून तो संप्रमर्दन होय. ''ब्रह्म ह देवेभ्यो विजिग्ये । तस्य ह विजये देवा अमहीयन्त–

अस्माकमेव अयं विजयः, अस्माकमेव अयं महिमा इति ।''

देवांसाठीं ब्रह्मानें विजय मिळविला. देवांना वाटलें, आपलाच हा विजय आहे, आपलाच हा महिमा आहे. तेव्हां ब्रह्म यक्षरूपानें प्रकटलें आणि त्यानें देवांचा गर्व चूर केला. अशी आख्यायिका उपनिषदांत आली आहे. पुराणांतील दशावतार म्हणजे हि संप्रमर्दनाचाच पोवाडा आहे. खरें युद्ध आध्यात्मिकच आहे. काम, क्रोध, लोभ, मोह, मद, मत्सर हा षड्वर्गच मर्दितव्य आहे. त्यालाच नरम करावयाचें, नामोहरम करावयाचें आहे. परमात्माच तें करतो. म्हणून तो संप्रमर्दन. हें आध्यात्मिक सत्य देवासुर-युद्धाच्या रूपकानें वेदोपनिषदांत आणि पुराणांत शतशोऽथ सहस्रशः वर्णिलें आहे. हा सनातन इतिहास आहे. इतिहास म्हणजे ''इति ह आस''असें गतकाळीं घडलें अशी नोंद. पुराणांत ती कायमची करून ठेवली आहे. ''सत्यमेव जयते नानृतम्'' हीच घटना पुनः पुनः घडत असते. सत्य हें सर्वविजयी सर्वेश्वर होय. तोच सत्येश्वर विष्णु.

त्याचेच अवतार होतात आणि त्या त्या अवतारांत तो अनृताच्या त्या त्या रूपांचा विनाश करतो. तोच शिव, तोच शक्ति, तोच गणपति आणि तोच सूर्य. वैष्णव, शैव, शाक्त, गाणपत्य आणि सौर आपआपल्या दैवतपुराणांत आपआपल्या देवतेचा जो पोवाडा गातात, तो ह्या सत्येश्वराचाच होय. भारतीयांनीं इतिहास लिहून ठेवला नाहीं असा प्रवाद आहे. आणि तो खोटा नाहीं. पण त्याचें कारण त्यांच्या लेखीं इतिहास मिथ्या, इतिहासाचें तात्पर्य पुराण सत्य, हें आहे. सारासार-विवेकानें त्यांनीं सनातन इतिहासरूप सत्याचें पुराण सार म्हणून ग्रहण केलें आहे आणि असार म्हणून स्थूल इतिहास अपास्त केला आहे.

## २३२ (अ) अहःसंवर्तक (अहर्, अहन्, अहस्)

अहर् म्हणजे दिवस (१) एका सूर्योदयापासून दुसऱ्या सूर्योदयापर्यंतचा काल (२) या दिवसाचा एक पक्ष म्हणजे सूर्योदयापासून सूर्यास्तापर्यंतचा काळ (३) या अहोरात्रांत करावयाचें यज्ञकार्य. या तिन्ही अर्थांनीं अहर् शब्द प्रयुक्त होतो. ''आह्निक म्हणजे प्रत्यह करावयाचें संध्योपासनादि नित्य धर्मकृत्य. द्वादशाह म्हणजे बारा दिवस चालावयाचा नैमित्तिक यज्ञ. अग्निहोत्र म्हणजे आमरण चालावयाचें सत्र. अशा प्रकारें नित्य आणि नैमित्तिक धर्मकृत्यांनीं संपूर्ण सुबद्ध जीवन हा वैदिकांचा जीवनाचा आदर्श आहे. यज्ञ हे कालानुसार होत. त्यामुळें कालाचें सूक्ष्म ज्ञान राखणें भाग होतें. कर्माचा काळ चुकल्यास तें कर्म सफल होत नाहीं. काळच त्या कर्माचा रस पिऊन टाकतो. ज्या नक्षत्रामध्यें ज्या धान्याची पेरणी करावयाची, ती तशी न केली तर तें नीट पिकत नाहीं, हा अनुभव आपल्याला आहेच. तेंच जीवनांतील समस्त क्रियांना लागू आहे. म्हणून कालोपासना म्हणजे प्रत्येक क्रिया यथाकाल करणें होय. तो नेमका कर्माचा काळच अ-हन् म्हणजे कर्मफळ न मारणारा वा अ-हर् म्हणजे कर्मफळ न हरणारा होय. भगवान् काळच '' क्रतु-फलविधान-व्यसनी '' आहे. म्हणून तो अ- हन् वा अ-हर् म्हटला आहे. ''अह् (अह्नोति) व्यापने'', या धातूपासून अहस् शब्द व्युत्पादिला तरी तो वरील निरुक्तीशीं अविरोधीच होय. काल हा कर्माला आणि त्याच्या फळाला म्हणजेच समग्र जीवनाला व्यापून असतो, म्हणून तो अहस् होय. अहस्, अहन्, अहर्, अहो, अह अशीं विविध रूपें या नामाची आढळतात. अह्, हस्, हन्, हृ इत्यादि धातु त्यात संभवतात. हस् धातू घेतल्यास काल हा न हसणारा, कोणत्याहि कारणानें प्रसन्न (आणि म्हणून खिन्नहि) न होणारा आहे—परमात्माच असा सर्वव्यापी, कशानें हि मनोविकार न पावणारा, कुणाचें हि हनन न करणारा, कशाचेंहि हरण न करणारा आहे. म्हणून तो अह, अहस्, अहन् आणि अहर् होय.

## २३२ (आ). अहःसंवर्तक (संवर्तक)

प्रवर्तक म्हणजे बाहेर जगांत विष्वक् प्रसृत करणारा. संवर्तक म्हणजे त्याच्या विपरीत बाहेर जगांत प्रसृत झालेल्या पसाऱ्याला आपल्या ठाईं अंतरांत सम्यक् संवृत करणारा. सूर्य उदयकालीं किरण प्रवर्तित करतो. अस्त-समयीं ते खेचून गोळा करून घेतो, संवर्तित करतो. ऊर्णनाभ कोळी तंतु ताणतो, पसरवतो आणि परत तो मिळून घेतो. त्याप्रमाणें परमात्मा हें जग आपल्यांतून विस्तारतो आणि परत आपल्यांत संवर्तित करून घेतो, गिळून घेतो. हा संहर्ता वा समाहर्ताच संवर्तक होय.

आरंभीं ब्रह्मचारी वेदाध्ययनासाठीं घर सोडून गुरुकुल-वास करतो. वेदाध्ययन संपल्यावर त्याचें समावर्तन होतें. तो शेवटीं गुरुकुल सोडून परत आपल्या घरीं येतो. परमात्मा हि सर्व जीवांना त्याच प्रमाणें ज्ञानार्जनासाठीं जगांत पाठवतो. तें ज्ञानार्जन झालें म्हणजे परत त्यांना आपल्याकडे घेऊन जातो. भूतांच्या विद्यालाभार्थ तो परमात्मा भूतांचा प्रवर्तक तसा विद्यालाभोत्तर त्यांचा तो संवर्तक वा समावर्तक होतो.

शंकराचार्य अहः आणि संवर्तक हीं दोन पदें न घेतां दोहों मिळून एक पद घेतात. सहस्रसंख्येच्या निर्वाहासाठीं तसें करणें आवश्यक आहे. अहः शब्द पूर्वीं येऊन गेला असल्यामुळें इथें पुनः अहः हें पद स्वतंत्रपणें घेण्याची गरज नाहींच. पण '' उद्वृत्तो हि ग्रन्थः समधिकं व्याचष्टे '' अथवा ''अधिकस्याधिकं फलम्'' या न्यायानें अहः आणि संवर्तकः हीं दोन पदें घेऊन विवरण केलें.

अहः-संवर्तक हें एक पद घेतल्यास परमात्मा हा अहन् चा म्हणजे दिवसाचा संहर्ता आहे असा अर्थ करावा लागेल.

अर्थात् तो शेवटच्या दिवसाचा शेवट आहे, कालान्तक आहे. अथवा स्थलकालात्मक ही जी व्यक्त सृष्टि तीच त्या अव्यक्त परमात्म्याचा प्रकाश होय, दिवस होय. तिचा तो संहार करतो म्हणून तो अहःसंवर्तक म्हणावयाचा. अहःसंवर्तक म्हणजे दिवसाची धमाल संपवून रात्रीची निःशब्द शांति आणि सुख देणारा.

## २३३. वह्नि

वहन करतो तो वह्नि होय. परमात्मा हा कशाचें वहन करतो ? तो जीवनांचें वहन करतो. जिथें जिथें परमात्मा तिथें तिथें जीवन आहे. 'यत्र यत्र धूमः, तत्र तत्र वह्निः' असा तार्किकांचा न्याय आहे. आध्यात्मिकांचा न्याय ''यत्र यत्र वह्निः, तत्र तत्र जीवनम्'' असा आहे. मनुष्य मेला म्हणजे त्याची तिरडी श्मशानांत घेऊन जातात. तिच्यासमोर अग्निघट घेऊन मृताचा मुलगा वा निकट आप्त चालत असतो. कां ? तो आपल्या त्या अग्निवहनानें सुचवीत असतो, ''बाबा रे आज वर तुझें जीवन वहन करणारा हा अग्नि आतां हि तुझा साथी आहे आणि सारथि आहे. तो तुला परलोकाला घेऊन जाईल.'' परमात्मा हा जीवाचा सखा आहे. तो त्याला केव्हांहि सोडीत नाहीं. तो त्याचा हात धरून, साथ करून, त्याला नेत असतो. म्हणून तो 'वह्निः'. तुकारामानें जें म्हटलें आहे ''जेथें जातों तेथें तूं माझा सांगाती। चालविसी हातीं धरूनिया'' तें या वह्नीला, परमात्म-वह्नीलाच उद्देशून होय. तुका वाण्याच्या वाणींत वेद बोलतो तो असा. वह्नि पदाचेंच रहस्य तुकारामानें आपल्या वचनांत प्रकट केलें आहे. जंगलांतून वाट काढायची ती जंगल जाळून साफ केलें म्हणजे होते. त्यामुळें अग्नि हा अग्रणी झाला आहे. तो पुढें चालतो, वाट करतो तेव्हां त्याच्या मागून लोक जातात. अग्नि हा नुसता मार्गदर्शक नाहीं, तर पथिकृत् म्हणजे मार्ग काढणारा, तयार करणाराहि आहे. त्यावरून तो अनुयायांना घेऊन जातो. म्हणून तो वह्नि होतो. परमात्मा अग्नि म्हणजे अग्रणी आहे आणि तोच वह्नि म्हणजे नेता आहे. म्हणून इह जीवनांत काय आणि पर जीवनांत काय तो सदैव आपल्यापुढें राहतो आणि त्याच्यामागून आपण जातों. त्याचें द्योतक तिरडी समोर चालणारा अग्रणी अग्नि आणि मागून येणाऱ्या जीवाचें लोकांतरास वहन करणारा वह्नि होय.

## २३४. अनिल

अन् म्हणजे श्वासोच्छ्वास करणें, यावरून अनिल म्हणजे अनन-शील, अनप्रचुर, दमदार, चळवळ्या असा अर्थ निष्पन्न होतो. क्रिया असंख्य आहेत, परंतु त्या सर्व विविध क्रियांमध्यें क्रिया-सामान्यरूप क्रियात्व जें आहे तें एकविधच आहे आणि तेंच अनन होय. अर्थात् अनन म्हणजे क्रियांची क्रिया वा क्रियानिधान.

जिथें जीवन आहे, तिथें प्राणन आहे, जिथें प्राणन आहे तिथें क्रिया आहे, म्हणून क्रिया वा हालचाल ही सजीवतेची, प्राणित्वाची खूण मानिली जाते. जिथें प्राण आहे, जीव आहे, तिथें सत्ता आहेच. आणि म्हणून अनिल म्हणजे सद्रूप सर्वशक्ति परमात्मा, जो सर्व क्रियांचें अधिष्ठान होय. त्या परमात्म-तत्त्वाचें वर्णन नासदीय सूक्तांत ''आनीत् अवातं स्वधया तदेकम्'' असें केलें आहे. तें परमात्म-तत्त्व वायूवांचून व स्वशक्तीच्या बळानें स्पंदत होतें, श्वासोच्छ्वास करीत होतें, असें म्हटलें आहे.

ईशोपनिषदांत ''वायुः अनिलं अमृतम्'' असें वचन आलें आहे. त्याचा अर्थ असा कीं शेवटीं हा प्राणवायु त्या अनिलांत लीन होतो आणि तद्द्वारा अमृतांत विलीन होतो. अर्थात् अनिल ही एक मधली पायरी आहे. कूटस्थ चैतन्य, तदाश्रित अव्यक्त प्रकृति, आणि तत्-सृष्ट व्यक्त जीव आणि जगत्, असा हा अवरोह आहे. आरोहांत व्युत्क्रमानें त्यांनाच वायु, अनिल आणि अमृत अशा संज्ञा मिळाल्या आहेत. वस्तुतः जो अमृत पुरुष आहे तोच अनिल आणि तोच वायु म्हणून प्रकटला आहे. निर्गुण सगुण आणि साकार अशीच तीं क्रमिक रूपें आहेत. अक्षरांतून क्षराकडे जातांना वा क्षरांतून अक्षराकडे जातांना मधली अपरिहार्य अशी जी पायरी ओलांडावी लागते, ती म्हणजे अव्यक्त होय. आणि तीच अनिल.

प्राण व्यष्टिरूप आहे, अनिल समष्टिरूप आहे. व्यष्टिरूप असल्यानें प्राण सनिलय आहे. समष्टिरूप असल्यामुळें अनिल अनिलय आहे. आणि म्हणून शंकराचार्य अनिल पदाचें भाष्य अनिलय असें करतात. वस्तुतः निलयाचा अनिल पदाशीं तसा कांहींच संबंध नाहीं.

अशा प्रकारें अनिल म्हणजे सर्वाधिष्ठानभूत कूटस्थ चैतन्य, सर्वकार्यकारणभूत मूल प्रकृति आणि प्रतिदेह वसणारा देही प्राणाभिध जीव होय.

## २३५. धरणीधर

धरणी म्हणजे धरित्री, जीवमात्राला धारण करणारी पृथ्वी, तिला कोण धारण करतो ? तंबूला जसा धारण तसे गुरूत्वाकर्षणानें पर्वत धरणीला ताणून धरतात, म्हणून ते धरणीधर होत. पाण्याला जसा बांध तसे ते भूमीचे बांध होत. भूमि त्यांच्यामुळें फुटत नाहीं. सुबद्ध आणि सुदृढ राहते. अर्थात् पदार्थमात्राच्या ठाईं वसणारी जी ऐशी गुरुत्वशक्ति तोच धरणीधर होय. म्हटलेंच आहे, "गां आविश्य च भूतानि धारयाम्यहमोजसा". अथवा पदार्थमात्राला भिन्न व्यक्तित्व देणारा, त्या त्या व्यक्तींचा धारक जो अहंकाररूप भगवदाविरभाव तोच धरणीधर होय.

भगवान् वराह हा हि धरणीधर होय. त्यानें भू-गोल आपल्या दन्ताग्रानें उचलला आहे. उत्खात-केली करणाऱ्या सूकराच्या सुळ्यावर ढेकूळ चिकटून यावें तसें त्या अव्यक्त महासागराच्या अगाध जलांत संचार करणाऱ्या भगवान् महासूकरानें ही जीवनिकाय पृथ्वी बाहेर काढली आहे, व्यक्त पदवीस आणली आहे.

गोवर्धनधारी भगवान् कृष्ण हि धरणीधर म्हणतां येईल. इंद्रियांचें संवर्धन करणारा हा देह म्हणजेच गोवर्धन होय. गोवर्धन म्हणजे गोचर भूमि, तिचें धारण करणारा तो धरणीधर, देही आत्मा. प्रत्यगात्मस्वरूप परमात्मा हा इंद्रियधारिणी देह-धरणीचा धारक आहे. म्हणून तो धरणीधर म्हणावयाचा.

भूमिरापो ऽनलो वायुः खं मनो बुद्धिरेव च ।
अहंकार इतीयं मे भिन्ना प्रकृतिरष्टधा ।।
अपरेयं इतस् त्वन्यां प्रकृतिं विद्धि मे पराम् ।
जीवभूतां महावाहो ययेदं धार्यते जगत् ।।

भूतमात्राला, चराचर जीवांना धारण करणारी ही जी ऐशी प्रकृति तीच धरणी होय. आणि तिचा हि धारक तो धरणीधर म्हणावयाचा. अर्थात् धरणीधर म्हणजे प्रधानपुरुषेश्वर होय, जीवजगत्-स्वामी परमात्मा होय.

अशा प्रकारें भूमिगत प्रभविष्णु विष्णुशक्ति, म्हणजे गुरुत्वशक्ति, अहंकारसंज्ञक जीव, व्यक्ताचें व्यक्तीकरण करणारा अव्यक्तसंचारी अक्षर पुरुष आदिवराह, देहधारी आत्मा आणि विश्वधारक परमात्मा हे विशिष्ट पण परस्पराविरोधी किंबहुना एकमय भाव, अर्थात् विरूप सरूप आणि एकरूप भाव म्हणजे धरणीधर होय.

## २३६. सुप्रसाद

इष्ट विषयाच्या लाभामुळें जीवाला हर्ष आणि अनिष्ट विषयांच्या आपत्तीमुळें अमर्ष होत असतो. तसेंच या इष्टानिष्टांच्या अपायोपायांच्या आशंकेमुळें भय आणि उद्वेग हि होतच राहतात. चित्ताची जी ही व्याकुलता, कंपितता, आन्दोलितता तींतच सर्व दुःखें सामावलीं आहेत. सर्व दुःखांचें तें माहेरच होय. तद्-विपरीत चित्ताच्या या वृत्तींच्या निरोधालाच योग असें म्हणतात. अर्थात् चित्ताचें निष्कंप समत्व म्हणजे योग होय. चित्ताच्या या समत्वाचेंच दुसरें नांव प्रसाद आहे. "प्रसादे सर्वदुःखानां हानिरस्योपजायते" अथवा " तं विद्यात् दुःखसंयोग-वियोगं योगसंज्ञितम्" या गीतावचनांत हाच आशय व्यक्त झाला आहे.

आतां हा जो योग, ही जी साम्यावस्था, अथवा निर्विकार प्रसन्नता तीच आत्म्याची प्रकृति आहे. म्हणून त्याला सुप्रसाद म्हटलें आहे. परमात्मा हा सदैव सुप्रसादच असावयाचा. त्याच्या ठाईं विकारजनित ज्वलन संभवत नाहीं. म्हणून तो निर्वाणरूप होय, शान्ति-स्वरूप होय, सदैव सहज-प्रसन्न होय. निरुपचार प्रसन्न असल्यामुळें

त्याला सु-प्रसाद म्हटलें आहे. तो निरतिशय-प्रसाद-रूप आहे.

परमात्मा हा प्रसाद-स्वभाव असल्यामुळें तो आपल्या भक्तांना सुलभ-प्रसाद आहे. जो कोणी त्याची उपासना करतो तो ''क्षिप्रं भवति धर्मात्मा शश्वत् शान्तिं निगच्छति''. त्याचे क्लेश जीर्ण पर्णा प्रमाणें, लवकरच गळून पडतात आणि त्याला सर्वांगीं प्रसन्नतेची नवी पालवी फुटते. ''न मे भक्तः प्रणश्यति'' अशी त्याची प्रतिज्ञाच आहे. त्यामुळें हि तो सुप्रसाद होय.

ज्याचें चित्त विकारांनीं जळत असतें, त्याला चंदनहि तापदायक होतें. उलट ज्याचे विकार विझले, निर्वाण पावले, त्याला प्रह्लादाप्रमाणें अग्निहि शीतल होतो.

### २३७. प्रसन्नात्मा

परमात्मा हा प्रसादस्वरूप आहे. हें मागील पदांत सांगितल्यानंतर लगेच पुन्हां त्याला प्रसन्नात्मा म्हणण्यांत काय तात्पर्य आहे ? सुप्रसाद पदानें अन्तःस्वरूप विशद केले आहे, तर प्रसन्नात्मा पद बाह्यरूप विशद करीत आहे. सुप्रसाद पद निर्गुणपर आहे, तर प्रसन्नात्मा पद सगुणपर आहे. परमात्मा प्रसादस्वरूपच असल्यामुळें त्याचा प्रकाश हि प्रसादमयच असणार. म्हणूनच त्याचें अंगप्रत्यंग प्रसन्न रेखाटलें जातें. त्या प्रसन्नतेचें उपलक्षण म्हणून त्याच्या अंगप्रत्यंगांना कमलाची उपमा दिली जाते. कमल निर्मल उज्ज्वल सुंदर असतें. तें आरक्त सुकुमार सुगंधी असतें. तसें त्याचें रूप आहे. त्याची निरतिशय प्रसन्नता सुचविण्यासाठीं त्याला कमलाकर म्हणतात. कमल-मुख, कमल-नयन, कमल-पाणि, कमल-पाद असा तो कमलाकर आहे. त्याच्या अंगप्रत्यंगातून प्रसन्नताच ओसंडतें आहे. या प्रसन्नात्मतेचें वर्णन करताना ज्ञानदेवानें म्हटलें आहे–

**''तें बोलणेंचि सुकुमार । मुख मोहाचें माहेर ।**
**माधुर्या फुटले अंकुर । दशन तैसे ।।**

त्याचे नयन प्रसादवर्षी आहेत, त्याचें वदन प्रसादवर्षी आहे. त्याचे करचरण प्रसादवर्षी आहेत. असा तो प्रसन्नात्मा आहे.

सर्व देव सुरूप सुंदर वर्णिले आहेत, तर सर्व असुर वेडे-विद्रे. याचें कारण जसें अंतर तसें बाह्य, जसें बीज तसें फळ असा न्याय आहे. परमात्मा हा मंगल-स्वरूप आहे. म्हणून त्याला मंगलमूर्ति चित्रित केलें जातें. असुर अमंगल वासनारूप असल्यामुळें ते वेडे-विद्रे आकारले आहेत, कुरूप, भयानक झाले आहेत. कारण, ''जें कार्य तें धरिल कीं गुण कारणाचे''.

### २३८. विश्वधृक् ( धृत्, सृज्, सृट् )

विश्व म्हणजे केवळ ही चराचर सृष्टि नव्हे. तर सत्, असत्, सदसत् आणि नसत्-नासत् या चारी कोटींना आपल्या पोटांत सामावून घेणारें जें बृहत् तत्त्व, ज्याला ब्रह्म म्हणतात, तें होय. विष्णु-सहस्राच्या प्रारंभींच तें स्मरलें आहे. अशा या विश्वाला तदितर कोण बरें धारण करणार ? तें स्वयंभू तसें स्वधृतच आहे. म्हणून विश्वधृत् म्हणजे स्वधृतच होय. मग त्याला विश्वधृत् कां म्हटलें ? एवढ्यासाठीं कीं स्वरूपांत विश्वरूपाचा अंतर्भाव होत नाहीं, पण विश्वांत स्वरूपाचा होतो. चंद्र हा आपल्या सोळाहि कलांचा धारक आहे. तसा परमात्मा हा विश्वधृत् आहे. तो आपल्या सत्, असत्, सदसत् आणि नसत्-नासत् या चारी म्हणजे समस्त कलांना धारण करणारा आहे. कोणतीहि कला दुसऱ्या कोणत्याहि कलेला धारण करूं शकत नाहीं. पण सकल चंद्र समस्त शकलांना धारण करतो. म्हणून तो विश्वधृत् म्हणावयाचा.

विश्वसृक् पाठ घेतल्यास तो विश्वाची सृष्टि करणारा आहे. जो विश्वाची सृष्टि करतो, तोच तिचें धारणहि करतो. चंद्र न चंद्रकलांना जन्म देतो आणि त्यांचें धारण हि करतो. म्हणून तो विश्वसृग् होय.

विश्वधृक् पाठ घेतल्यास तो या विश्वाचें धर्षण करणारा आहे. या विश्वाचें जो उत्पादन करतो तोच त्याचें धारण करतो. आणि जो धारण करतो तोच त्याचें संहरण हि करतो. चंद्र चंद्रकला प्रकट करतो आणि त्यांना क्रमानें गिळून हि टाकतो. म्हणून तो विश्वाची उत्पत्ति स्थिति करणारा परमात्माच विश्वधृक् म्हणावयाचा. पुढील

विश्वभुक् व विभु पदें पाहतां हे पद विश्वसृक् मानणें योग्य होईल.

## २३९. विश्वभुक्

भुज् धातु पालन आणि अभ्यवहार म्हणजे भोजन या अर्थी येतो. विश्वभुक् या दोन्ही अर्थांनीं लावतां येईल. विश्वाचें पालन तो परमात्मा करतोच. परमात्मा हा या विश्वाचें सृजन, पालन आणि संहरण तिन्ही करतो, तथापि पालन हें जीवमान जीवांना विशेष आवश्यक वाटल्यास नवल नाहीं. म्हणून परमेश्वराच्या सत्त्वमूर्ति, त्याचें विश्वपालक अवतार, त्याला ध्येय गेय अनुकरणीय होत. रजोमूर्ति स्रष्टा ब्रह्मदेव वा तमोमूर्ति संहर्ता हर हे परमेश्वराचेच आविर्भाव असले, तरी त्यांचे वारंवार अवतार होत नाहींत. सृष्टि केली कीं स्रष्ट्याचें काम संपलें. संहार केला कीं संहर्त्याचें काम संपलें. परंतु दरम्यान पालनाचें कार्य सुदीर्घ चालत राहतें. त्यासाठीं देवाला, पालनकर्त्या विष्णूला, वारंवार अवतार घ्यावे लागतात. त्यामुळें त्याची उपासना विशेष होय. इतरांची, त्रिमूर्तीपैकीं इतर दोघांची, तशी होत नाहीं. ते परमेश्वराचे आविर्भाव म्हणून वंद्य आहेत. पण आराध्य नाहींत. आराध्य एक सत्त्वमूर्ति विश्वभुक् विष्णुच. म्हणून त्याचीं सहस्र नामें, त्याचीं सहस्र रूपें, त्याचीं सहस्र कर्मे गाइलीं चिंतिलीं, वर्णिलीं जातात. तो त्रिमूर्ति हि विश्वाप्रमाणें त्रैगुण्यांत सांपडला आहे. आणि त्याची सत्त्वमूर्ति तेवढी आराध्य झाली आहे. रजस्तमोगुण वर्जनीय होत. गुणांचा अत्यय हि सत्त्वगुणाच्या आधारेंच व्हावयाचा. तोच प्रपंच आणि परमार्थ दोहोंमधील पूल आहे. गीतेनें म्हणूनच म्हटलें आहे "निस्त्रैगुण्यो भवार्जुन निर्-द्वंद्वो नित्य-सत्त्वस्थो" अर्थात् निस्त्रैगुण्यपदवी गांठायची तर आधीं नित्य-सत्त्वस्थ व्हायला पाहिजे. नित्य-सत्वस्थ व्हायचें तर रजस्तमोवर्जन-पूर्वक निरंतर सत्त्वोपासना केली पाहिजे. श्रद्धा, आहार, यज्ञ, दान, तप हीं सगळीं सात्विकच सेवन केलीं पाहिजेत. गीतेचा सतरावा अध्याय हेंच सांगतो. विश्वभुक् त्याचेंच सूचन करीत आहे.

## २४०. विभु

वि उपसर्ग आणि भू धातु यांच्यापासून विभु शब्द बनला आहे. वि उपसर्गाचे विगत आणि विविध वा विशेष असे अर्थ होतात. आणि भू म्हणजे असणें, होणें. यावरून विभु म्हणजे हें विश्व होणारा, विश्वाकार असणारा असा अर्थ होतो. उपनिषदांत म्हटलें आहे : "अग्निर् यथैको भुवनं प्रविष्टो रूपं रूपं प्रतिरूपो बभूव । एकस् तथा सर्व भूतान्तरात्मा रूपं रूपं प्रतिरूपो बभूव ।" अशा प्रकारें तो सर्वान्तर्यामी निराकार असून सर्वाकार झाला आहे, विश्वाकार झाला आहे. एक असून अनेक झाला आहे. असंख्यात झाला आहे. म्हणून त्याला विभु म्हणतात.

कोणत्याहि आकारानें तो बद्ध होत नाहीं, सीमित होत नाहीं. म्हणून तो विगतभाव, विगतदेह, वि-भु होय. तसेंच ज्यांत प्रत्येक वस्तु दुसरीहून वेगळीच आहे, असें अनंत वैविध्य हेंच ज्याचें स्वरूप आहे, तें अशेष विश्व जो बनला आहे तो विभु होय. अशा प्रकारें तो उभयथा हि विभुच आहे. परमात्म्याचें हें विभुत्व, हें अति-सर्व सर्वव्यापक वैभव, सूचित करण्यासाठीं त्याला आकाश-शरीर म्हटलें आहे. घटांत घटाकार आणि मठांत मठाकार दिसणारें आकाश त्या आकारांनीं सीमित न होणारें असें निराकार आणि निरवयव आहे. तसा परमात्मा हा सर्वांना आंतून आणि बाहेरून व्यापून आहे, पण त्याला मात्र कोणींच आंतून वा बाहेरून व्यापलेलें नाहीं. असा तो घनानन्त विभु आहे. एकमेवाद्वितीयच आहे तो. तिथें जग निरुद्ध आहे.

' विश्वसृड्, विश्वभुग् विभुः ' हीं तीन पदें क्रमशः त्याचें जगदुत्पत्ति-स्थिति-निरोध-रूप त्रैविध्य प्रकट करतात. सहस्रसंख्येच्या गणितासाठीं त्यांना मग तुम्ही एक गणा कीं अनेक म्हणा ! परमेश्वराचें वैभव, सगुण वा निर्गुण कसें हि पहा, अपरंपार आहे.

## २४१. सत्कर्ता

परमात्मा हा समदृक् असल्यामुळें तो सर्वांचा सत्कर्ता आहे. सर्वांचा समादर करणारा आहे. त्याला कोणी उच्च नाहीं कोणी तुच्छ नाहीं, सर्व समान आदरणीय आणि

प्रिय आहेत, घाणींत लोळणाऱ्या कृमींत आणि कमलासनस्थ ब्रह्मदेवांत तो समानच विराजमान आहे. तो '' साधुष्वपिच पापेषु '' समबुद्धि आहे. तो रामांत आणि रावणांत समान रमला आहे. त्यामुळें तो सत्कर्ता होय. जो सर्वत्र स्वतत्त्वच पाहतो, आत्मरूपच पाहतो, तो कुणाचा अनादर करील ? त्याला अनादरविषयच नुरला. असा जो अननादर-विषय केवळ स्वदृक् परमात्मा तोच एक सत्कर्ता होय. इतर सारे द्वंद्वमोहमूढ होत. म्हटलेंच आहे :

**इच्छा-द्वेष-समुत्थेन द्वंद्वमोहेन भारत ।**
**सर्वभूतानि संमोहं सर्गे यान्ति परंतप ।।**

ते परमेश्वराप्रमाणें असें म्हणूं शकत नाहींत कीं ''समोऽहं सर्वभूतेषु न मे द्वेष्योऽस्ति न प्रिय :''. ''न हि सशरीरस्य सतः प्रियाप्रिययोः अपहतिरस्ति'' ज्याला देहाभिमान आहे तो प्रियाप्रियांतून सुटूं शकत नाहीं परमात्मा विदेह आहे. त्याला देहाभिमान नाहीं, त्यामुळें तो कोणत्या हि देहीचा समानच समादर करतो. तो सर्व घटांत एक आत्मसूर्यच प्रतिबिंबित झालेला पाहतो. त्यामुळें अनादर-विषयच त्याला कोणी उरत नाहीं. जिकडे पहावें तिकडे त्याला एकच एक परमादरणीय आत्मतत्त्व दिसतें, आणि त्यालाच तो भजतो. ''नमः पुरस्तात् अथ पृष्ठतस् ते । नमोऽस्तु ते सर्वत एव सर्व।'' म्हणून तो आपल्याला नमस्कार करीत सुटतो. दुसरें कांहीं तो करूंच शकत नाहीं. आत्मा अनात्म्याला जाणतच नाहीं. तो सर्वत्र स्वरूप पाहून नमस्कारीत जातो, सत्कारीत जातो. म्हणून तो सत्कर्ता होय.

## २४२. सत्कृत

परमात्मा सर्वत्र सत्कर्ता आहे, पण सत्कार-विषय हि त्याहून वेगळा नाहीं. ज्याचा सत्कार होतो, जो नमस्कारिला जातो, तो 'हा' देह वा देहाभिमानी नव्हे तर 'तो' आहे, तद्विलक्षण परमात्मा आहे. मूर्ख लोक नमस्कार आपल्याला केला जातो वा केला जात नाहीं असें मानून हृष्ट वा रुष्ट होतात. शंकरानें दक्षाला नमस्कार केला नाहीं म्हणून तो रुष्ट झाला, तेव्हां नमस्कार कोणाला करतात तें शिवानें सतीला समजावून सांगितलें.

**प्रत्युद्गम-प्रश्रयणाभिवादनं**
**विधीयते साधु मिथः सुमध्यमे ।**
**प्राज्ञैः परस्मै पुरुषाय भूयसे**
**गुहाशयायैव न देहमानिने ।।**

परस्परांना थोरांकडून उत्थापन स्वागत अभिवादन दिलें जातें तें देहाभिमानी जीवांना नव्हे, तर त्यांच्या हृदयांत विराजमान असणाऱ्या त्या परमात्म्याला होय. दक्षाचा देहाभिमान चूर करण्यासाठीं आणि त्याचा गैरसमज दूर करण्यासाठीं शंकरानें त्याला नमस्कार केला नाहीं. इसापच्या गोष्टींतील देवमूर्तिवाहक गाढवाची हि अशीच गैर समजूत झाली होती. इतके सगळे लोक आपल्यालाच नमस्कार करीत आहेत असें वाटून तो फुगला आणि ताठला. तो हलेच ना, तेव्हां त्याला बडग्यांचा मार पडला आणि त्याचा ताठा व गैरसमज दूर होऊन तो चालू लागला. सारांश सत्कृत होणारा हा देहाभिमानी '' मी '' नव्हे किंवा त्या देहाला माझा म्हणणारा स्वामित्ववादी हि नव्हे. तो तर निर्मम निरहंवादी सर्वांतरयामी परमात्माच होय. जी वस्तु स्वतःच अनित्य आहे आणि दुःखरूप आहे तिचा सत्कार कोण करील ? तिचें भजन अनाठाईं होणार. म्हणूनच म्हटलें आहे गीतेंत : '' अनित्यं असुखं लोकं इमं प्राप्य भजस्व माम् '' आणि म्हणून विवेकी ज्ञाते त्याचाच सत्कार करतात, त्यालाच भजतात.

## २४३. साधु

अज्ञान, तज्जनित विकार, विकार-प्रेरित दुराचार जो साधतो म्हणजे मारतो तो साधु. अथवा ज्ञान, तज्जनित दैवी गुणसंपदा आणि दैवी गुण-प्रेरित सदाचार जो साधतो म्हणजे संपादितो तो साधु. साध् धातूच्या या दुहेरी अर्थानें साधु शब्द व्युत्पादिला जाऊं शकतो. परमात्मा हा ज्ञानस्वरूपच असल्यामुळें तो सहजच साधु होय. परमात्म्याला जी गोष्ट सहज-सिद्ध आहे, ती जीवांना प्रयत्नपूर्वक साधावी लागते. असा जो काया वाचा मनें

प्रयत्न करतो तो यतिच साधु होय. सिद्ध या अर्थाचा साधुशब्द भविष्यद्-वृत्तिवाचक आहे. याच अर्थानें पुढील गीतावचनांत साधुशब्द आला आहे :—

**अपि चेत् सुदुराचारो भजते मां अनन्यभाक् ।**
**साधुरेव स मन्तव्यः सम्यग् व्यवसितो हि सः ॥**

अग्नींत जो पडला तो ओला सुका कसा हि असो अग्निसात् होणार यांत शंका कसली ? परमात्मा हा केवढा मोठा ज्ञानाग्नि म्हणावा ? त्यांत ज्यानें झेप घेतली, तो तद्रूप झाल्याशिवाय कसा राहील ? त्याच्यांतील हीण जळून खाक होईल आणि सोनें देदीप्यमान होऊन स्वे महिम्नि प्रतिष्ठित होईल.

परमात्मा निर्दोष आणि सर्वगुण-निधान असल्यामुळें साधु होय. त्याचा नारदासारखा स्वाभाविक भक्त तो हि साधु होय. आणि वाल्मीकीसारखा त्याचा सम्यग्-व्यवसित भक्ताचा भक्त हि साधु होय. परमात्मा वस्तुतः साधु होय. सिद्ध स्वभावतः साधु होय. साधक प्रयत्नतः साधु होय.

### २४४. जह्नु

भानु सानु जानु या शब्दांप्रमाणें जह्नु हा शब्द नु-प्रत्ययान्त दिसतो. पण कोणत्या धातूला लागतो आहे तो ? जह् हें रूप हा धातूच्या अभ्यस्त रूपाचा अंश असूं शकेल. तसें मानल्यास जह्नु म्हणजे त्यागशील असा अर्थ होतो. जह्नु राजा परम धार्मिक म्हणजे यज्ञशील होता. त्याच्या यज्ञाला गंगा वाहून घेऊन जाणार असें दिसतांच त्यानें तो सारा प्रवाह पिऊन टाकला आणि भगीरथाच्या विनवणीवरून मागाहून तो सोडून दिला, अशी पुराण-प्रसिद्धि आहे. ह्या मुळें गंगा ही जह्नु-कन्या झाली. तिला जाह्नवी हें नाम पडलें. पण परमात्म्याचें स्वतःच जह्नु नाम असल्यामुळें त्याच्या पादोदक-प्रवाहाला जाह्नवी हें नाम पडलें असें कां न म्हणावें? विष्णु-चरण म्हणजे आकाश, त्यावर ब्रह्मदेवाच्या कमंडलूंतून म्हणजे मेघांतून सांडलेलें पाणी तें विष्णु-पादोदक गंगा होय. तें हिमालय-स्वरूप शिवानें आपल्या शिरीं धारण केलें आणि त्याच्या शिवालकांतून पुढें तें हरिद्वार ऊर्फ गंगाद्वार येथें बाहेर पडलें आहे. अशा प्रकारें गंगा भागीरथी ही त्यागमूर्ति आहे. त्यागांतून तिचा जन्म आहे, त्यागच तिचें स्वरूप आहे. त्यागांतच तिची परिणति आहे. ''चरथ भिक्खवे चारिकं बहुजन-हिताय बहुजन-सुखाय'' हा बुद्धाचा संदेश वस्तुतः भारताचा आहे. हिमालयाचा आहे, गंगेचा आहे. गंगा सतत तो आचरीत आहे. उपदेशीत आहे. बहुजनहिताय बहजनसुखाय ती हिमालयाचें गुरुगह्वर आणि घनगहन सोडून जनपदांतून विहार करीत चालली आहे. हजारों वर्षें झालीं, तिच्या ह्या परार्थ-जीवनांत खंड पडला नाहीं.

जह्नु शब्दाची दुसरी हि व्युत्पत्ति संभवते. 'जं जनं ह्नुते, तिरोभावं नयति, इति जह्नुः ।' परमात्मा हा समस्त व्यक्त सृष्टीला कल्पान्तीं गिळून टाकतो, म्हणून तो जह्नु होय.

### २४५. नारायण

नारायण म्हणून कोणी व्यक्ति नाहीं. तो एक आदर्श आहे. तो नराचा, नर-समाजाचा परम आदर्श आहे. मानवाच्या ज्या नवनव्य भव्य दिव्य आकांक्षा, त्यांच्या हिमालयाचें जें सर्वोच्च शिखर, तें म्हणजे नारायण होय. परमात्मा कसा आहे, हें एक त्या परमात्म्यालाच ठावें. परंतु त्याच्याविषयीं मानव-चिंतनाची उडी जिथवर गेली, तो टप्पा म्हणजे नारायण होय. त्यामुळें नराचा, नरसमाजाचा तो खास देव आहे. त्यामुळेंच त्याला नारायण हें नामरूप प्राप्त झालें. तो देवाचा मानवासाठीं झालेला आद्यावतार होय. 'नरस्य सामर्थ्यं नारं तदेव अयनं यस्य सः नारायणः ।' अशी आहे नारायणाची व्युत्पत्ति. मानव मात्राच्या हृदयांत ज्या नवनव्य भव्य दिव्य आकांक्षांचा क्षीरसागर भरला आहे. त्याच्या तळाशीं मुळाशीं जो पहुडला आहे तो ''तो'' नारायण आहे. त्याच्याच सत्तेनें मानव उड्या मारीत चालला आहे.

नार आणि अयन या दोन शब्दांपासून नारायण हा सामासिक शब्द बनला आहे हें उघड आहे. त्यांतील पहिला शब्द हा किमर्थक आहे, त्याबाबत अनेक अटकळी कवींनीं

केल्या आहेत. त्यांपैकींच " आपो नारा इति प्रोक्ता आपो वै नर-सूनवः " ही एक अटकळ आहे. आप म्हणजे नार हा अर्थ कसा झाला ? ह्या व्यक्त सृष्टीचें मूळ अव्यक्त असलें पाहिजे आणि अव्यक्ताच्या खोलींतच ह्या व्यक्ताचें अक्षर बीज वा कंद असला पाहिजे, अशा विचारसरणींतून नारायण शब्द निघाला आहे. आणि पृष्ठभागावरील सर्व दिसतें, तसें जळांत लपलेलें, समुद्राच्या तळाशीं छपलेलें दिसत नाहीं. म्हणून अव्यक्त-वाचक नार म्हणजे पाणी असा अर्थ केला गेला. व्यक्त लोक-पद्म अव्यक्त जलाशयांतून वर आलेलें असून त्यांचा जलाशयाच्या तळाशीं असलेला अव्यक्त व अक्षर पुरुष हा कंद होय. हाच आशय पुढील श्लोकांत अभिप्रेत आहे—

**नारायणः परो ऽव्यक्तात्**
**अण्डं अव्यक्त-संभवम् ।**
**अण्डस्यान्तस् त्विमे लोकाः**
**सप्तद्वीपा च मेदिनी ।।**

नारदशब्दांत हि नार हा शब्द आला असून तो नर-संपादित समस्त वित्ताचा, ज्ञान-धनाचा, वाचक आहे. नार म्हणजे नरतत्त्व, आदर्श तत्त्व होय.

## २४६. नर

नर आणि नारायण ही अभेद्य जोडी आहे. जिथें नारायण आहे तिथें नर आहेच, आणि नर आहे तिथें नारायण आहेच. जिथें साधक आहे तिथें साध्य आहेच, आणि साध्य आहे तिथें साधक हि आहेच. हीं दोन काठीच्या दोन टोकांसारखीं असून तीं काठीच्या रूपानें एकच होत. मनुष्य चेंडू फेकतो आणि आपणच धावत जाऊन तो पकडतो, त्याप्रमाणें नर आपलें ध्येय नारायणरूप कल्पितो आणि त्या ध्येयाला साधनबळानें आत्मसात् करीत जातो. त्याचा हा स्वभाव आहे. चालतो मनुष्यच, पण त्याला चालवितो त्याचा मुक्काम. त्याप्रमाणें साध्य हें साधकाला आपली सारी बुद्धि-शक्ति एकवटून प्रयत्नवान् करीत असतें. नर हें पूर्व रूप आहे, नारायण हें उत्तर रूप आहे दोन्ही परस्परसापेक्ष असल्यामुळें ती युगल वा यमल होत. या जोडींत प्रमुख कोण ? साध्य या दृष्टीनें नारायण श्रेष्ठ आहे. पण तो नराहून वस्तुतः वेगळा नाहीं. नरच नारायण होतो. आणि ह्या साधक-दृष्टीनें बीजभूत नरच महत्त्वाचा आहे. बीज असेल तर झाड होणार ! आत्मा आहे म्हणून परमात्मा आहे. आत्म्यामुळेच त्याची उपलब्धि होते. म्हणून ज्ञानदेव म्हणतात: " ज्ञानदेवा प्रमाण आत्मा हा निधान " ह्या मुळेंच गीतेंत म्हटलें आहे—

**ब्रह्मणो हि प्रतिष्ठाहं अमृतस्याव्ययस्य च ।**
**शाश्वतस्य च धर्मस्य सुखस्यैकान्तिकस्य च ।।**

नराचें म्हणजे आंत्मतत्त्वाचें सर्वमूलत्व प्रतिपादणारा हाच आशय विनोबांनीं असा गाइला आहे.—

**धर्मासि आधार सुखास मी चि ।**
**ज्ञानासि आधार मोक्षास मी चि ।**
**प्रेमासि आधार ऐक्यास मी चि ।**
**तुझाहि आधार माझाहि मी चि ।।**

## २४७. असंख्येय

संख्या म्हणजे गणना, संख्या म्हणजे ज्ञान. कोणत्याहि गोष्टीचें सम्यक् ख्यान वा ज्ञान त्या गोष्टीच्या अवयवांची, गुणांची, परिणामांची गणना करूनच होत असतें. म्हणून सांख्य म्हणजे संख्याबद्ध वा सम्यक् संपूर्ण ज्ञान होय. परंतु परमात्मा हा अशा प्रकारें ज्ञान-विषय होत नाहीं. तो निरवयव असल्यामुळें त्याच्या अवयवांची, निर्गुण असल्यामुळें गुणांची, आणि अविक्रिय व अद्वितीय असल्यामुळें त्याच्या परिणामांची गणना करणें शक्य नाहीं. त्यामुळें तो असंख्येय होय. ज्या वस्तूंचें संख्यान होतें, गणना होते त्या वस्तु परिच्छिन्न असतात. त्या दुसरी-पासून वेगळ्या पडलेल्या असतात. त्यामुळें त्यांची मोजदाद होते. परंतु आकाशाप्रमाणें जें एथून तेथून एकच एक आहे त्याची गणना काय करणार? त्याला एक म्हणणें सुद्धां गैर वा गौण होय. कारण, जिथें मोजायला मुळीं वावच नाहीं, तिथें एक तरी कसें गणायचें नि म्हणायचें? बरें म्हटलेंच एक, तर त्या एकचा अर्थ संख्यावाचक न

होतां केवलत्व-वाचकच होणार. असंख्येयचा हाच आशय आहे. परमात्मा असंख्येय आहे, म्हणजे तो केवलस्वरूप आहे. त्याला एक म्हणतां येत नाहीं, त्याला नैक म्हणतां येत नाहीं. त्याला आहे म्हणतां येत नाहीं, त्याला नाहीं म्हणतां येत नाहीं. कारण त्याच्याविषयीं कोणतें हि विधान करणें म्हणजे त्याला मर्यादित करणें होय, विशिष्ट करणें होय. पण तो तर आहे केवल निर्विशेष. असंख्येय पदानें हेंच निर्विशेषत्वरूप केवलत्व प्रतिपादिलें आहे.

### २४८. अप्रमेयात्मा

असंख्येय आणि अप्रमेय दोन्ही समानार्थकच आहेत. तथापि असंख्येय पदानें परमात्म्याचें वागविषयत्व प्रति- पादिलें आहे तर अमेयात्मा पदानें त्याचें अचिन्त्यत्व, मनोऽविषयत्व सूचित केलें आहे, असें म्हणतां येईल. " **यद् वाचा अनभ्युदितं, येन वाग् अभ्युद्यते । तदेव ब्रह्म त्वं विद्धि, नेदं यदिदं उपासते ।। यन् मनसा न मनुते येन आहुर् मनो मतम् । तदेव ब्रह्म त्वं विद्धि नेदं यदिदं उपासते ।।** " असें वाङ्मनाच्या आटोक्यापलीकडचें म्हणून परमात्मतत्त्व वर्णिलें आहे. तें केवळ वाङ्मनाच्याच पलीकडचें नाहीं तर, बुद्धीच्या हि पलीकडचें आहे. तें 'बुद्धेः परतः' म्हणून हि म्हटलें आहे. "न तद् भासयते सूर्यो न शशाङ्को न पावकः" या गीतावचनांत डोळा, मन आणि वाणी याच तीन प्रमाणांचा उल्लेख केला असून त्यांचा तिथें लाग नाहीं असें म्हटलें आहे. यांनाच प्रत्यक्ष, अनुमान आणि शब्द प्रमाणें म्हणावयाचें. माणसाजवळ बाह्य ज्ञानसाधनें म्हणजेच प्रमाणें डोळा, चित्त आणि शब्द हींच तीन आहेत. ह्यांच्या पलीकडे ज्ञानसाधन नाहींच. आणि हीं तिन्ही डोळा प्रत्यक्ष-प्रमाण, मनोबुद्धि अनुमान-प्रमाण आणि वाक् शास्त्र-प्रमाण या आत्मतत्त्वाच्या बाबतींत लंगडीं ठरतात. तीं तिथें फारशीं चालूं शकत नाहींत. आणि म्हणूनच त्याला अप्रमेय म्हटलें आहे. तथापि तो स्वसंवेद्य असल्यामुळें स्वतःप्रमाण होय. त्याच्या सिद्धीसाठीं कोणत्याहि बाह्य प्रमाणाची गरजच नाहीं. तो स्वानुभूत्येकमान आहे. स्वतःप्रमाण आहे. केवल स्वानुभूति हेंच त्याचें एकमात्र प्रमाण होय.

### २४९. विशिष्टः (अविशिष्टः)

नानावर्णाकृति-गुण-कर्मवान् जीव आणि जगत् हीं विशिष्ट होत. त्यांच्यांतील प्रत्येक दुसऱ्याहून वेगळा आणि विशिष्ट आहे. एक क्षण दुसऱ्या क्षणासारखा नाहीं. तसा एक कण हि दुसऱ्या कणासारखा नाहीं, इतकेंच नव्हे तर तो या क्षणीं आहे तसा दुसऱ्या क्षणीं नाहीं, असें हें जगाचें वैभव आहे. परंतु परमात्मा त्याहून विशेष आहे. तो काल होता, तो आज आहे आणि उद्यां हि तसाच राहणार आहे. त्यांत कसली हि विक्रिया नाहीं, परिवर्तन नाहीं, विशेष नाहीं. अविक्रिय कूटस्थता हाच त्याचा विशेष आहे. सर्व जग एकीकडे आणि तो एकीकडे. जगाचें कोणतें हि लक्षण त्याला लागावयाचें नाहीं. असा तो अगदीं लोकविलक्षण, मुलखावेगळा आहे. हा त्याचा आगळेपणा हेंच त्याचें वैशिष्टय.

परमात्म्याला आपण विशिष्ट म्हटलें खरें, पण खरें पाहतां तो अविशिष्टच आहे. विशिष्ट होण्यांत काय विशेष आहे ? प्रत्येकच विशिष्ट आहे. परमात्म्याचा विशेष हा कीं तो तसा विशिष्ट होत नाहीं. विशिष्ट होणें म्हणजे मर्यादित होणें. त्याचें व्यावर्तन करणारा असा तद्व्यतिरिक्त दुसरा कांहीं पदार्थच नाहीं. तो सर्व आहे. सर्व तो आहे. "आत्मैवेदं सर्वम् । नेह नानास्ति किंचन।" असें असल्यामुळें तो परमात्मा अविशिष्टच होय, केवल-स्वरूप होय. "पानी तेरा रंग कैसा ? जिसमें मिलाया वैसा." पाण्याला रंग नाहीं, अथवा सर्वच त्याचें रंग आहेत, तसा परमात्मा हा निर्विशेष विशेष होय. विशेष-शेष अशेष होय.

### २५०. शिष्टकृत्

शिष्ट म्हणजे शासन. तें जो करतो, तो शिष्टकृत् होय. परमात्मा हा सर्वांना शासन लावतो, शिक्षण देतो. कशा प्रकारें देतो तो हें शिक्षण ? सर्वांच्या हृदयांत अन्तरात्म-रूपानें राहून. तो सर्वान्तर्यामी, सर्वान्तरात्मा "गुरूणां गुरुः" आहे. विवेकवाणीनें तो सर्वांना सदसताचें ज्ञान

देत असतो. 'हें बरें, हें कर; हें वाईट, हें करूं नको'. असें तो सतत मार्गदर्शन आणि शासन करीत आहे.

तोच अन्तर्यामी बाहेरून हि आई, बाप, गुरु, प्राज्ञ आणि राजा यांच्या रूपानें जीव-जगताचें शासन करीत आहे. "अस्ति ज्यायान् कनीयस उपारे" जिथें धाकटा आहे, तिथें त्याच्याजवळ वडील हि आहेच. जिथें शिष्य, तिथें गुरु हि आहेच. जिथें अज्ञ, तिथें प्राज्ञ हि आहेच. जिथें प्रजा, तिथें प्रजापति हि आहेच. अशा प्रकारें तो समस्त जीवांचें शासन करीत असतो. आई, बाप, गुरु, प्राज्ञ आणि राजा हे सगळे आपल्या अधीन असलेल्यांना स्वभावतःच मार्गदर्शन व शासन करीत असतात. हा त्यांचा स्वभाव, त्यांची वत्सलता, हितैषिता, प्रजा-पालन परमात्म्यानें त्यांच्या हृदयांत ठेवूनच दिलें आहे. वासराला पाजल्या-शिवाय गाईला राहवत नाहीं. बाळाला आगीपासून निवारस्याशिवाय आईला राहवतच नाहीं. शिष्याला ज्ञान भरवल्यावांचून गुरु-माउली राहूंच शकत नाहीं. प्रजेच्या हिताचे कायदे करणें व त्यांचें पालन करवून घेणें हें राजसत्तेला, मायबाप सरकारला चुकत नाहीं. अशा प्रकारें परमात्मा हा अशिष्टांना शिष्ट करतो, शिष्टांना विशिष्ट करतो आणि विशिष्टांना निर्विशिष्ट करून "स्वे महिम्नि" प्रतिष्ठित करीत असतो. त्याचें हें अनुशासन आणि शासन आहे, म्हणून जीव वृजिनार्णवांतून वांचून यथाकाल परमानंदास पात्र होतात. प्रत्येक जीव त्या शिव-पदवीस पात्र होईपर्यंत परमात्म्याचें शासन हें असेंच चालू रहायचें आहे.

## २५१. शुचि

शुचि म्हणजे निर्मल, निर्लेप, निरंजन. परमात्मा निर्मल आहे खरा, पण तसा निर्मल नव्हे कीं जसें एखादें वस्त्र निर्मल असतें. वस्त्र मळतें आणि धुतल्यावर परत तें निर्मल होतें. परमात्मा हा तसा निर्मल नाहीं. तो अंबरासारखा शुचि आहे. अंबर म्हणजे आकाश मुळीं मळतच नाहीं. तें सदैव निर्लेप राहून शुचि आहे. ढगांचे भारे आणि अंधारांचे ढिगारे त्यांत प्रत्यहीं येतात नि जातात, परंतु त्यांच्या योगें तें मळत नाहीं कीं चळत नाहीं. ते निष्पंक आणि निष्कंप राहतें. परमात्मा हा तसा शुचि आहे. त्यावर सृष्टीचीं पटलें येतात नि जातात. पण त्यांचा लेप त्याला लागत नाहीं. परंतु हें हि म्हणणें बरोबर नाहीं–'शिवतां होतसे ओवळें'. पण त्याला मुळीं कोणी दुसरा शिवायलाच नाहीं तर तो ओवळा होणार कसा ? म्हणून तो सदैव सोवळा आहे, शुचि आहे. त्याला शुचि म्हटल्या जाणाऱ्या आकाशाची हि उपमा जमायची नाहीं. कारण तिथें द्वैत आहे. आकाशांत आकाशेतर येतें जातें. इथें दुसरें येणारें जाणारें कांहीं नाहींच. त्यामुळें त्याच्या शुचितेला आकाशाची उपमा जुगत नाहीं. खरोखर तो निरुपमच आहे. अग्नि शुचि म्हटला जातो, पण तिथें धूर आहे; गंगा पवित्र म्हटली जाते, पण ती पावसाळ्यांत गढूळ होते. त्याच्या शुचितेची बरोबरी कोणी करूंच शकत नाहीं. 'देऊं काशाची उपमा । दुजी तुज पुरुषोत्तमा ?' तो आपला आपल्यासारखा आहे. "तो एकवट एकला, रचला ना वेंचला, आदि-अंतीं संचला, अनन्तपणें । तो निर्शून्य निरुपम, निरंजन निर्वाण, ते दशा पितळेचे होन, केवीं पावती ?" म्हणेन मी.

## २५२. सिद्धार्थ

"सिद्धार्थः सिद्धसंकल्पः सिद्धिदः सिद्धिसाधनः"

हा सबंध श्लोकार्ध वा द्विपदी सिद्धिविषयक आहे. त्या पैकीं सिद्धार्थ हें प्रथम नाम होय. विष्णु-सहस्रांतील नामें व्यक्तिवाचक नाहींत, गुणवाचक आहेत. म्हणून सिद्धार्थ हें जरी भगवान् बुद्धाचें एक नाम असलें तरी इथें तें बुद्ध ह्या व्यक्तीचें वाचक नाहीं. पण बुद्धाला तरी सिद्धार्थ हें नाम कुठून ठेवलें? तें ज्याच्या वरून ठेवलें तोच सिद्धार्थ परमात्मा होय. थोराचें नांव पोराला, पूर्वजाचें वंशजाला ठेवलें जातें. परमात्मा पूर्वजांचा हि पूर्वज व थोरांचा थोर आहे. म्हणून सर्व नामें हीं वस्तुतः त्याचींच होत.

सिद्ध आहेत सर्व अर्थ ज्याचे, तो सिद्धार्थ होय. सर्व अर्थ, सर्व काम आत्मभिन्न आहेत. जे जीव आत्मभिन्न अर्थाची कल्पना नि कामना करतात, ते असिद्धार्थ होत.

आणि त्यांचे ते अर्थ अनर्थ होत. ते सिद्धहि झाले, तरी असिद्धच म्हटले पाहिजेत. कां कीं ते अनित्य आणि असुखच आहेत. म्हणून शंकराचार्य म्हणतात "अर्थमनर्थं भावय".

लौकिक अर्थानें हि परमात्मा सिद्धार्थच आहे. कारण जो जो अर्थ तो मनांत आणतो तो तो घडून येतो. त्यानें मनांत भूः भुवः स्वः आणलें आणि उच्चारिलें त्याबरोबर हे भुर्लोक भुवर्लोक स्वर्लोक निर्माण झाले. ह्यालाच ईक्षण असें पारिभाषिक नांव आहे. तो जेव्हां त्यांचें संहरण इच्छितो तेव्हां हें संपूर्ण विश्व त्याच्याठाई, जललहरी जलांत विलीन व्हाव्या तसें, विलीन होतें. अशा प्रकारें तो कर्तुं अकर्तुं अन्यथाकर्तुं समर्थ असल्यामुळें त्याला सिद्धार्थ म्हणतात.

## २५३. सिद्ध-संकल्प

तत्त्वतः सिद्धार्थ तोच व्यवहारतः सिद्धसंकल्प होय. अल्पज्ञ आणि असमर्थ जीव हा सदैव असिद्ध-संकल्पच असावयाचा. त्यानें एखादा संकल्प केला आणि तो सिद्धीस गेला असें दिसलें, तर त्याचें कारण तो त्याचा संकल्प नसून सर्वज्ञ आणि सर्व-समर्थ परमात्म्याचा च तसा संकल्प असतो हें होय. परमात्म्याचा संकल्प जीवाला कळूं शकत नाहीं. कुठें आगगाडींत दैववशात् चढलेल्या मुंगीला ती गाडी कुठें जायची आहे याचें जसें ज्ञान होणें शक्य नाहीं, तसें जीवाचें आहे. परंतु तरी देखील साखरेचा कण तिला कुठें तरी मिळतो आणि ती म्हणते, 'पहा, मी कण शोधून काढला !' जीवाचे संकल्प आणि सिद्धि हीं तशीं आहेत. कुठें तरी परमात्म-संकल्पाच्या रेषेवर जीवसंकल्पाची रेषा पडते आणि तिथें जीवाला सिद्धि मिळाल्याचा आनंद होतो. परंतु ही सिद्धि वस्तुतः आपली नसून परमात्मसंकल्पाची आहे, हें तो समजूं शकत नाहीं. घड्याळांतील प्रत्येक चाक आपल्या ठिकाणीं फिरत असतें परंतु तें स्वतंत्र नसतें. त्याला गति चालक चक्राकडून मिळत असते. हें तें चाक जाणत नाहीं. त्याप्रमाणें जीव ईश-परतंत्र असून ईशाच्या चालकत्वाचा प्रत्यय त्याला जाणवत नाहीं आणि तो आपण स्वतंत्र आहों असें समजून नाचत असतो. पण त्याचा सूत्रधार वेगळाच असतो. ज्यांना ह्या सूत्राची आणि सूत्र-धाराची ओळख पटली, ते बुध म्हणजे तत्त्वज्ञ ईश्वर-परायण होऊन राहतात आणि "Thy will shall be done." "करिष्ये वचनं तव" म्हणतात. सिद्धि-असिद्धि त्यांना समान होते.

**अहं सर्वस्य प्रभवो मत्तः सर्वं प्रवर्तते ।**
**इति मत्वा भजन्ते मां बुधा भावसमन्विताः ।।**

असे तत्त्वज्ञ भक्त संकल्प, साधन, सिद्धि सर्व ईश्वरार्पण करून मोकळे होतात. अशांच्याच विषयीं म्हटलें आहे:

**भोक्तारं यज्ञ-तपसां सर्वलोक-महेश्वरम्।**
**सुहृदं सर्वभूतानां ज्ञात्वा मां शान्तिमृच्छति।।**

## २५४. सिद्धिद

संकल्प, साधन, सिद्धि हा समग्र प्रवाह परमात्माच आहे. हें या द्विपदींत प्रतिपादिलें आहे. इथें तो सिद्धिदाता म्हटला आहे. कोणत्या हि संकल्पाची प्रेरणा ईश्वरापासूनच मिळते. त्या संकल्पाला सफल हि तोच करतो. मध्यंतरीं साधक म्हटला जाणारा खरोखर निमित्तमात्र असतो. तसेंच साधक जें साधन करतो तें क्रिया आणि करण हि तोच असतो. तिथें विजातीय कांहीं नाहीं. फलदातृत्व ईश्वराचे आहे. फल जीवाधीन नाहीं. जीव फक्त कर्माचा अधिकारी आहे. हेंच निमित्तमात्रत्व होय. आंब्याला फळ लागायचें तें यथाकाळच लागतें. अर्थात् फळप्रद, सिद्धिद, काळ झाला. तसे जीव हे सर्व त्या फळ-वृक्षासारखे आहेत. जेव्हां ईश-कृपा होते तेव्हांच त्यांचे संकल्प सिद्ध होतात, त्यांचें जीवन सफल होतें. व्यावहारिक वा पारमार्थिक कोणती हि सिद्धि ही जीवाच्या अधीन नाहीं. तो किती हि प्रयत्न करो, जेव्हां परमात्मकृपा होईल तेव्हांच सिद्धि मिळायची. फळ झाडालाच लागते, तशी सिद्धि ही प्रयत्नान्तींच मिळायची. पण प्रयत्नामुळें मिळेल असें नाहीं. म्हणून म्हणतात भगवान् :

**ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति ।**
**भ्रामयन् सर्व भूतानि यन्त्रारूढानि मायया ।**
**तमेव शरणं गच्छ सर्वभावेन भारत ।**
**तत्-प्रसादात् परां शान्तिं स्थानं प्राप्स्यसि शाश्वतम् ।।**
**इति ते ज्ञानमाख्यातं गुह्यात् गुह्यतरं मया ।**

## २५५. सिद्धि-साधन

सिद्धि-साधन म्हणजे सिद्धि साधणारा. परमात्मा सिद्धि देतो, पण मिळवतो कोण ? जो सिद्धि मिळवतो तो हि परमात्माच असतो. कोण अनीश सिद्धि मिळवूं शकेल ? तें कांहीं सामान्य जीवाचें, नाना उपाधि आधि व्याधि यांनीं पदोपदीं बेजार झालेल्या जीवाचें, काम नव्हे ! तेथें पाहिजे जातीचे, एरा गबाळाचें काम नोहे ! म्हणून जो सिद्धि साधतो तो साधक हि परमात्माच होय. तें अनात्म्याचें वा अनीशाचें काम नव्हे. ही सिद्धि अर्थात् परम सिद्धि मोक्ष होय. त्याच्याच विषयीं म्हटलें आहे :

"मनुष्याणां सहस्रेषु कश्चिद् यतति सिद्धये ।
यततामपि सिद्धानां कश्चिन् मां वेत्ति तत्त्वतः ।।"

कर्ता या अर्थीं सिद्धि-साधन हें पद विवरिलें, तसें करण या अर्थीं हि तें विवरितां येईल. सिद्धीचें जें जें साधन तें हि तो परमात्माच आहे. परमात्मा हा ज्ञानस्वरूप आहे, प्रेम-स्वरूप आहे, सेवास्वरूप आहे. म्हणून त्याचें साधन हि ज्ञान, प्रेम, सेवा हें आहे. हें साधन जो अनन्यभावानें करीत राहतो तो परमात्म्याला साध्य करून घेतो. 'नदीमुखेनैव समुद्रमाविशेत्' हाच न्याय इथें हि लागू पडतो. ज्ञान, प्रेम, सेवा यांच्या जोडीला निरोधाचें कां नाहीं नांव घेत तुम्ही ? असें जर कोणीं म्हटलें, तर त्याला माझें उत्तर हें कीं निरोध चित्ताचा होतो, तें समुद्रस्थानीय परमात्म्याशीं संगम पावत नाहीं. संगम जलाचा जलाशीं होतो, आत्म्याचा परमात्म्याशीं होतो. विजातीयाचा संगम होत नाहीं. शिवाय ज्ञान प्रेम सेवा यांच्या योगें चित्ताचा परोक्षरीत्या निरोधच होत असतो. त्या निरोधाचें जें अपरोक्ष शास्त्र त्याचें नांव योग होय. परमात्मा ह्या दृष्टीनें निरोध-स्वरूप हि म्हटला जाईल. अनात्म्याला तिथें मतज्ञाव आहे. अशा प्रकारें परमात्मयोगाचीं साधनें हि परमात्माच होय. कारण तद्व्यतिरिक्त दुसरें कांहीं त्याला प्राप्त करूं शकत नाहीं. हिरकणीच हिऱ्याला कापूं शकते.

## २५६. वृषाही

वृषाही हें नाम 'वृष + अहन् + इन्' अशा प्रकारें व्युत्पादिलें जातें. धर्मरूप दिवसांचा स्वामी असा त्याचा अर्थ लावला जातो. धर्मरूप दिवसानें सर्वांचे कर्तव्य-पथ यथावत् प्रकाशिले जातात. जो तो आपआपल्या कर्तव्यमार्गानें जाऊन इष्ट स्थळीं पोचूं शकतो. हा धर्म-प्रकाशक दिवसनाथ परमात्मा होय. म्हणून तो वृषाही म्हटला आहे.

चतुष्पाद वृष जसा गोधनाची सृष्टि करून तद्द्वारा सुख-समृद्धीची वृष्टि करीत असतो तसा चातुर्वर्ण्यधर्म, चतुराश्रमधर्म लोकसंग्रह करून सुखसमृद्धीची, चारी पुरुषार्थांची, वृद्धि करीत असतो म्हणून त्याला वृष म्हटलें आहे. किंबहुना धर्माचें लक्षण वृषाच्या म्हणजे वृषभाच्या ठाईं आढळतें म्हणून त्याला वृष म्हणूं लागले. धर्म अव्यक्त तत्त्व आहे, वृष व्यक्त वस्तु आहे. व्यक्तीचें मूळ अव्यक्त मानलें पाहिजे. तद्विपरीत नव्हे.

वृषाही ऐवजीं वृषाहिः असा पाठ घेणें शक्य आहे. सर्प अदृश्यरूपानें संचरला आहे. सर्प जसा धनाचें रक्षण करतो तसा धर्म हि आत्मधनाचें रक्षण करीत असतो. सर्पाचा अपराध केल्यास तो डंखतो तसा धर्माचा अपराध केल्यास, त्या बाबतींत प्रमाद केल्यास, तो हि पाप-फळ देऊन डंखतो. धर्म हा असा अहिवत् निग्रहानुग्रह-समर्थ असल्यामुळें त्याला वृषाहि म्हणतां येईल. अहिराज अनन्त ऊर्फ शेष हा या भूगोलाला धारण करून आहे तसा धर्म हा प्रत्येक वस्तूला धारण करून आहे म्हणूनहि त्याला वृषाहि म्हणावयाचें.

## २५७. वृषभ

सिंह आरण्यक पशूंत श्रेष्ठ, तसा ग्राम्य पशूंत वृषभ श्रेष्ठ होय. पुरुष-सिंह तसा पुरुष-पुंगव म्हणजे पुरुष-श्रेष्ठच. दोहोंत कांहीं फरकच करायचा झाल्यास सिंह-पद पराक्रमवाचक आहे, तर वृषभपद धुरंधरत्ववाचक आहे, असें म्हणतां येईल. एक रणवीर तर दुसरा सभावीर होय. परंतु इथें निरुपपद प्रयोग आहे. त्यामुळें परमात्मा हा वृषभ म्हणजे सर्वश्रेष्ठ आहे असा आशय. तो सर्व क्षेत्रांत सर्व-श्रेष्ठ आहे. तो समरविजयी तसा सभाविजयी हि आहे. योद्धा आणि मुत्सद्दी दोन्ही तो आहे. सर्वच क्षेत्रांत तो सर्वातिशायी आहे. म्हणून तो वृषभ.

सिंह हा पंचानन आहे. चार नखर पंजे आणि दंष्ट्राकराल मुख ह्या पांचांच्या योगें तो महाभयंकर झाला आहे. नखदंतायुध असल्यामुळें तो नुसता शक्तिमान्च नाहीं तर युक्तिमानहि आहे. सशस्त्र हि आहे. बैलाजवळ शिंगें आहेत, पण तीं नख-दंतांसारखीं प्रभावी नाहींत. त्यामुळें तो नुसता बली आहे, शक्तिमान् आहे, युक्तिमान् नाहीं. पण बैलाची शक्ति विधायक आहे. सिंहाप्रमाणें विघातक नाहीं. बैल शिवाचें वाहन झाला आहे. अर्थात् तो कल्याणावह आहे. शेती गोपालन आणि वाणिज्य या सर्व-कल्याणांचा तो आधार आहे. या सर्वांचें तो वाहन आहे. त्याच्या आधारें मानव जातीची संस्कृति आणि सभ्यता घडली आणि चढली आहे. म्हणून परमात्म्याला वृषभ म्हणण्यांत एक विशेष औचित्य आहे. वृषभ धेनूंच्या ठाईं वीर्य-वृष्टि करून गोधनाची सृष्टि करतो, तसा परमात्मा विश्व-जनक असल्यामुळें हि तो वृषभ होय.

## २५८. विष्णु (वृष्णु)

विष्णु नाम पूर्वीं अनेकदां येऊन गेलें आहे. इथें तें पुनः कां ? शंकराचार्य यास्काचार्यांचा हवाला देऊन 'विष्णुर् विचक्रमणात्' अशी नवी व्युत्पत्ति इथें देतात. आणखी हि कांहीं देतां येईल. परंतु हें पद चुकीचें वाचलें जात आहे. हें पद विष्णु ऐवजीं वृष्णु तर नाहीं ना ? मागील संपूर्ण श्लोकार्ध सिध् धातूनें सिद्ध झाला आहे: 'सिद्धार्थः सिद्ध-संकल्पः सिद्धिदः सिद्धिसाधनः' तसा हा श्लोकार्ध वृष् धातूनें सिद्ध झालेला आहे: "वृषाही वृषभो विष्णुर् वृषपर्वा वृषोदरः" त्यांत मधेंच विष्णु कसा शिरला ? तो वृष्णुच अपेक्षित आहे आणि हें अनुमान जर योग्य असेल तर वृष्णु हा नवा पाठ स्वीकारावा. धात्वर्थानुसार त्याचा अर्थ होईल वर्षणशील. परमात्मा हा सतत कृपेचा वर्षाव करीत आहे. ती कृपा समजण्याची पात्रता मात्र पाहिजे. ती पात्रता म्हणजे अढळ विश्वास. परमात्मा मंगलस्वरूप आहे. त्यापासून प्राप्त होणारें सर्व कांहीं मंगलच आहे. त्यानें सुख दिलें तर ती कृपा आहेच, पण दुःख दिलें तर ती शिकवण आहे असें समजून भक्त सुदामवत् सदैव आपला विश्वास जतन करीत असतो. भक्ताच्या जीवनांत सुखदुःखांचा विनियोग केवळ आपला विश्वास दृढ करण्याकडेच होतो. सुखानें तो शिथिल होत नाहीं किंवा दुःखानें विरत होत नाहीं. पेचखिळ्याचा प्रत्येक पेच ज्या प्रमाणें कसला असतां, खिळ्याला अधिक घट्ट रोवतो त्याप्रमाणें सुखदुःखाचे पेच वा आटे भक्ताला आपल्या ईश्वरावरील विश्वासांत अधिक खोल आणि भक्कम रोवत असतात. ऊन-पावसाच्या योगें जसें पीक वाढत जातें तसा त्याचा विश्वास सुखदुःखांच्या योगें वाढत जातो.

## २५९. वृषपर्वा

वृष म्हणजे धर्म वर्णाश्रमादि वा दर्शन-श्रवण-मनन-निदिध्यासनादि ज्याला पोंचायचीं पर्वें म्हणजे सोपानपदें आहेत तो वृषपर्वा. अथवा धर्म हींच ज्याचीं पेरें आहेत तो प्रतिपर्व-रसोदय परमात्मा वृषपर्वा म्हणावा. परमात्मा हाच मानवाचा परम पुरुषार्थ आहे तो मानवाला क्रमाक्रमानें चढून गांठावयाचा आहे. अनेक पारमिता पार करून बुद्धानें बुद्धत्व गांठलें. राजर्षि भरताप्रमाणें "बहूनां जन्मनां अन्ते ज्ञानवान् मां प्रपद्यते" असें गीताहि म्हणतेच आहे. साधनेचे हे जे टप्पे तेच धर्म होत व त्याच पायऱ्या. दैवी गुण, स्थितप्रज्ञाची भाषा म्हणजे व्याख्या, ज्ञान-लक्षणें हे सर्व ते टप्पे होत, पायऱ्या होत. या पायऱ्या जो चढून जाईल तो त्या परात्पर परमात्म-मंदिरांत यथाकाळ पोंचेल.

आत्मदर्शन हें धर्मजीवन-वृक्षाचें उत्तम फळ होय. त्याचा लाभ जेव्हां धर्मजीवनाचा वृक्ष पर्वशः वाढून परिणत होतो तेव्हांच होतो. जो वठला आहे, ज्याला अंकुर फुटून तो स्कंध-शाखा-प्रशाखा-पत्र-पुष्प-क्रमानें फळला नाहीं, तो त्यास पात्र नाहीं. म्हणून परमात्मा हा वृषपर्वा म्हणावयाचा. फळाची पदवी मागील सर्व पायऱ्या क्रमशः चढल्याशिवाय कोणाला हि संपादितां यावयाची नाहीं. म्हणून तो वृषपर्वा.

आत्मदर्शन ही बैजिक (organic) विकासाची परिणति आहे, ती खनिजरचना ( inorganic) नाहीं. हें आत्मज्ञान-पर्यवसायी धर्मजीवनाबाबत मात्र खरें आहे. प्रत्यक्ष आत्मज्ञान हें जागरणवत् वा भ्रान्तिनिवृत्तिवत् तात्कालिक (instantaneous) आहे, क्रमिक नाहीं.

## २६०. वृषोदर

वृषः धर्मः उदरे यस्य सः वृषोदरः । ज्याच्या उदरीं वृष म्हणजे धर्म वाढत आहे तो वृषोदर परमात्मा होय. जलोदर मेघ जलवृष्टि करतो, वृषोदर परमात्मा भुक्तीमुक्तीची वृष्टि करणारा वृष म्हणजे धर्म प्रसवतो. सर्व धर्म त्याच्याच पोटीं जन्मले आहेत. उदर म्हणजे नुसतें पोट नव्हे, तर उदर म्हणजे जन्मस्थान, जन्महेतु. सोदर म्हणजे ज्यांचें उदर अर्थात् जन्मकारण म्हणजे जननी-जनक समान आहेत ते. तदनुसार वृषोदर म्हणजे वृषाचें धर्माचें उदर म्हणजे उत्पत्ति स्थान असलेला परमात्मा होय. अशा प्रकारें वृषोदर हा समास बहुव्रीहि किंवा तत्पुरुष हि मानतां येईल. अर्थात तादृश फरक नाहीं.

औचित्य हें धर्माचें स्वरूप आहे. एकच पुरुष पुत्र पति पिता गुरु स्वामी राजा या नात्यानें वेगवेगळा वागत असतो. त्या त्या नात्यानें त्याला जें वागणें योग्य तो त्याचा धर्म होतो. अर्थात् सर्वत्र औचित्य पाळणें हा त्याचा धर्म झाला. या सर्व प्रसंगांत तो भिन्न भिन्न भूमिका अंगीकरीत असतो, तथापि त्याची मूल भूमिका त्याला विसरतां कामा नये. ती त्याची मूल भूमिका कोणती ? मानव ही का त्याची मूल भूमिका ? मानवव्यवहारापुरती ती आहे असें म्हणतां येईल. परंतु वास्तविक मूल भूमिका त्याची आहे आत्म्याची. तो आत्मा आहे. कोणत्या हि प्रकारें त्यानें त्या भूमिकेशीं अतिचार करतां कामा नये, बेईमान होतां कामा नये. असा जो पुरुष आत्मनिष्ठ झाला तो मग दुसऱ्या कोणत्याहि धर्माचा बांधला राहत नाहीं. भागवतांत म्हटल्याप्रमाणें:—

**" तो देवता पितर वा ऋषि आप्त भूतें,**
**ह्यांचा न सेवक नृपा न ऋणी असे तो ।**
**सर्वात्मना शरण जो चरणांस गेला,**
**सांडून सर्व शरणप्रद श्रीहरीच्या ।।"**

## २६१. वर्धन

वर्धन म्हणजे वाढविणारा. ही जीवाजीव समस्त सृष्टि, हें सर्वतोनन्त विश्व कोण वाढवतो आहे ? परमात्मा. परमात्मा नाना नामरूपें घेऊन सृष्टींचा सारखा गुणाकार करीत चालला आहे. सोन्याचे असंख्य दागदागिने घडत आहेत, वाढत आहेत. आणि सोनेंच ते घडवीत आणि वाढवीत आहे. तृण गुल्म लतौषधि वृक्षवनस्पतिरूप ही समस्त उद्भित्सृष्टि मृत्कण वाढवीत असतो. तसा तो परमात्मा चित्कण या सर्वाश्चर्यमय आणि सर्वतोनन्तरूप सृष्टीला वाढवीत आहे. तें विश्ववटोदर चिद्बीज या संसारवृक्षाला वाढवाढ वाढवीत चाललें आहे.

वर्धकि म्हणजे वाढी वा सुतार. तो जसा एकाच लांकडांतून नाना विसरे तासून काढतो तसा परमात्मा हा हे विश्वरूप विसरे वाढत म्हणजे घडत आहे. म्हणून तो वर्धन म्हणजे वाढी म्हटला आहे. दोन्ही शब्दांत एकच वर्ध् धातु आहे आणि त्याचा अर्थ हि एकच आहे. वस्तुतः लांकूड वा उपादान वाढतें पण वाढत नाहीं. तें जेवढेंचें तेवढेंच राहतें पण वाढतें तें नामरूप होय. नवीन आकार नवीन नांव तयार होतें. नांगर, वखर, डवरा, जूं, चाक, शिवळ, बाहुला, बाहुली इत्यादि. परमात्मा हि तसाच उपादान-भूत आत्मतत्त्वाचींच नाना रूपें आणि नामें तासून तयार करीत चालला आहे. म्हणून तो वर्धन म्हणजे वाढी म्हणावयाचा.

अशा प्रकारें वर्ध् म्हणजे वाढणें, वाढवणें आणि घडणें या दोन्ही अर्थांनीं परमात्मा हा वर्धन आहे.

## २६२. वर्धमान

वर्धन म्हणजे वाढवणारा, तर वर्धमान म्हणजे वाढणारा. वाढवला जाणारा. विष्णुसहस्रांत नामांच्या अनेक जोड्या आलेल्या आहेत. त्या साम्य वैषम्य विरोध पूरण कार्यकारण इत्यादि नाना भाव लक्षून आलेल्या आहेत. सदर वर्धन आणि वर्धमान ही जोडी हि तशीच आहे. इथें कार्यकारण भाव लक्षित होतो. कारण रूपानें परमात्मा वर्धन आहे तर कार्य रूपानें तो वर्धमान संसार आहे.

वस्तुतः ब्रह्मांत वाढघट कांहींच होत नाहीं. तें कूटस्थ आहे. परंतु संसारधर्माचा आरोप त्यावर होतो आणि तें

वाढतें वा वाढवतें म्हटलें जातें. रज्जूवर सर्पाचा आरोप होतो आणि मग ती वस्तु मनोहर वा भयंकर म्हणून नाना धर्मांनीं युक्त संबोधिली जाते. परंतु वस्तुतः ती त्या बऱ्या वाईट कोणत्याही धर्माच्या आरोपांतून मुक्त आहे. कारण ते सर्व गुणधर्म परकीय आहेत.

या नामरूपात्मक जगाला ब्रह्माचा परिणाम मानायचें का विवर्त हा जटिल म्हणा कीं कुटिल म्हणा प्रश्नच आहे. त्याचें उत्तर देतां येत नाहीं. पण हा अनाख्येय संबंध चतुर लोक सुवर्णकंकणवत् विवर्तरूप आहे असें म्हणतात. सराफाला तें निराकार सोनें आहे १००० रुपये तोळा किंमतीचें आणि अलंकाराचा सोस करणाऱ्या माणसाला तेंच सोन्याचें अमूल्य करभूषण आहे. आकार मिथ्या म्हणावा तर निराकार सोन्यानें मनगट भूषवितां येत नाहीं आणि कोणा शायलाक सराफाला आकाराला धक्का न लावतां आपलें सोनें वसूल करून घेऊन जायची परवानगी दिली तर त्याची कांहीं मात्रा चालत नाहीं.

कार्यरूपानें संसार म्हणून परमात्मा वर्धमान आहे तसा कारण रूपानें ब्रह्म म्हणून हि तो वर्धमान म्हणतां येईल. कारण ज्याला जन्म नाहीं तोच खरोखर वाढता आहे म्हटलें पाहिजे. ज्याला जन्म आहे तो तर प्रतिक्षणीं घटतच असतो.

बुद्धानें सिद्धार्थ तर महावीरानें वर्धमान हें नाम धारण करून त्या नामाचें भाष्य आपल्या जीवनानें केलें आहे.

## २६३. विविक्त

विविक्त म्हणजे वेगळा अलिप्त. परमात्मा हा संसाराच्या घडामोडीपासून कोलाहलापासून पार दूर अलिप्त अस्पृष्ट असा शांत शिव अद्वैत आहे. तो एकवट एकला आहे. सर्गाचा उपसर्ग तिथें नाहीं अद्वैताचें एकान्त साम्राज्य आहे तिथें.

ज्ञानदेवानें ह्याच विविक्त दशेचें वर्णन "कांट्याच्या अणीवर वसले तीन गांव, दोन ओसाड एक वसेचि ना" इत्यादि भारूडांत केलें आहे. "जाणत्या बोध, नेणत्या विनोद" अशी आहे ही भारूड-रचना. ज्ञानदेवाची सर्वच रचना अशी उभय-सुखकर व सर्वहितकर आहे. त्यांनीं म्हटलेंच आहे "अध्यात्मशास्त्रीं इये। एक अंतरंग चि अधिकारिये। एरु लोक वाक्चातुर्यें। होईल सुखिया ॥"

परमात्मा विविक्त प्रपंचोपशमस्वरूप असला तरी तो उपशम प्रपंचास पचवून आहे. तो प्रपंचोपेक्षी आहे—जसा समुद्र नदीनद-वेग जिरवून अचलप्रतिष्ठ असतो तसा. "समुद्रीं जळचरा भय नुपजे। आणि जळचरीं नुबगिजे समुद्र जैसा।" जलचर तरंगांच्या योगें समुद्र क्षोभ पावत नाहीं आणि समुद्राच्या योगें जलचर तरंगांना भय वाटत नाहीं. दोन्ही एकमेकांत ओतप्रोत एकमय होऊन राहतात. "अविभक्तं विभक्तेषु" असें तें परमेश्वरी विविक्तत्व आहे.

**आवर्त-बुद्बुद-तरंगमयान् विकारान्।**
**धत्ते जलं सलिलमेव हि तत् समग्रम्॥**

आवर्त-बुद्बुद-तरंगादि विकारांनीं पाण्याचें पाणीपण जराहि मोडत नाहीं. ती जशी सलिल-लीला आहे तशी विश्व ही सलील-लीला आहे. तिच्यायोगें त्याचें विविक्तत्व मोडत नाहीं.

## २६४. श्रुतिसागर

सागर म्हणजे जलधि हा जसा जलौघमात्राचा निधि आहे, परमायन आहे, तसा परमात्मा हा श्रुतिमात्राचें सर्व वेदान्तवचनांचें, पर्यवसान आहे, म्हणून तो श्रुतिसागर होय. म्हटलेंच आहे : "सर्वे वेदा यत् पदं आमनन्ति" सर्व वेदांचें नि वेदान्तवचनांचें तात्पर्य ब्रह्म आहे. ब्रह्मापाशीं येऊन तीं विराम पावतात.

ब्रह्म वा परमात्मा हा सर्व वेदांचें परम आणि चरम गन्तव्य आहे, तसा तो सर्व वेदांचें उद्गमस्थान हि आहे. सर्व जलवाह मेघ जसे समुद्रोत्थ आहेत तसे सर्व वेद, सर्व वेदान्त परमात्म्यापासून उत्पन्न झाले आहेत. म्हटलेंच आहे : "मत्तः स्मृतिर् ज्ञानं अपोहनं च." सर्व शास्त्रज्ञान,

सर्व विज्ञान, आणि सर्व संशयच्छेदी गुरुमुखी ज्ञान हीं सर्व ज्ञानें परमेश्वरापासूनच स्फुरलेलीं आणि लाभलेलीं आहेत. त्यामुळेंहि त्याला श्रुतिसागर म्हणावयाचें.

श्रुति म्हणजे अपौरुषेय ज्ञान. तें ज्ञान म्हणजे सामान्य लौकिक ज्ञान नव्हे. त्याचा सागर परमात्म्याहून वेगळा दुसरा कोण होऊं शकेल ? परमात्मा सर्वच ज्ञानांचा सागर आहे. परंतु त्याला श्रुतिसागर म्हणण्यांत विशेष औचित्य आहे. पौरुषेय ज्ञान म्हणजे कामोपहत-चित्त देहबद्ध अल्पज्ञ जीवाचें भ्रांत शबल ज्ञान. अपौरुषेय ज्ञान म्हणजे निरुपाधि नित्य शुद्ध बुद्ध मुक्त स्वभाव परमात्म्याचें निखळ निभ्रान्त अनन्त ज्ञान. निखळ ज्ञानाचा बिंदु म्हणजे मुक्त पुरुष आणि सिंधु म्हणजे परमात्मा आणि म्हणून तोच श्रुतिसागर होय.

## २६५. सुभुज

सु सुष्ठु शोभनाः भुजाः यस्य सः सुभुजः ज्याचे भुज म्हणजे बाहु चांगले (समर्थ) आहेत तो सुभुज होय. सु म्हणजे चांगले. पण चांगले म्हणजे तरी काय ? तर चांगले म्हणजे पूर्ण समर्थ. हें पूर्ण सामर्थ्य गुणांनीं आणि संख्येनें सिद्ध होतें. परमात्म्याचे बाहु अनंत गुणयुक्त आणि संख्येनें हि अनंत आहेत. म्हणून तो सुभुज म्हणावयाचा. 'सहस्रशीर्षा पुरुषः सहस्राक्षः सहस्रपात्' या पुरुषसूक्तांत बाहूंचा उल्लेख नाहीं तरी 'सहस्रशीर्षा—सहस्रपात्' हा साद्यन्त उल्लेख सर्वावयववाची समजावयाचा आहे. सहस्राक्षः हें पद मधल्या सर्व अवयवांचें वाचक समजावयाचें. परमात्मा "अनन्तबाहूदरवक्त्रनेत्र" म्हणून गीतेनें त्याचेंच उपबृंहण केलें आहे. "भुज् पालने" वरून्च भुज शब्द आला आहे. अर्थात् भुज म्हणजे पालक रक्षक होय. क्षितिभुज् म्हणजे पृथ्वीपालक, लोकरक्षक होय, लोकभक्षक नव्हे. "भुज् भोजने भक्षणे" हा अर्थ इथें नाहीं. अनन्त हस्तांनीं परमात्मा विश्वाचें रक्षण करीत आहे. म्हणून रात्रीं हाडवैऱ्यांना हि झोप घेतां येते. अहिनकुल, काकोलूक, करिहरि सगळे जे निश्चिंत झोपतात ते त्याच्या भुजबळाश्रयानेंच होय. पालनाच्या अनुषंगानें दुष्टदमन हि करावें लागतें. तें हि पालनच म्हणावयाचें. राजा क्षितीचें पालन असेंच करीत असतो. तो दुष्टांचें दमन करून धर्मनिष्ठांचें पालन करीत असतो. निग्रहानुग्रह मिळून पालन होतें म्हणून परमात्मा द्विभुज. एका हातांत असुरनिग्रहकारी गदा तर दुसऱ्या हातांत सुरानुग्रहकारी चक्र त्यानें धारण केलें आहे. चतुर्भुज, अष्टभुज हीं सर्व समसंख्या-घटित बहुभुज नामें, द्विगुणितसंख्यक म्हणून द्विभुजच समजावयाचीं. निग्रहानुग्रहरूपच तीं आहेत. द्विभुज म्हणजे समभुज म्हणजे सु-भुज.

## २६६. दुर्धर

पारा चिमटींत धरतां येत नाहीं. तो फुटफुटून निसटतो. तसें परमात्मतत्त्व हें वाङ्मनोबुद्धीच्या पकडींत सांपडत नाहीं. मुश्किलीनेंच त्याचें आकलन होतें मुश्किलीनेंच त्याचें वर्णन होतें, म्हणून तो परमात्मा दुर्धर होय. ही दुर्धरताच उपनिषदें आणि गीता यांनीं नाना परीनें वर्णिली आहे :

(१) आश्चर्यो वक्ता कुशलो ऽस्य लब्धा

(२) आश्चर्यवत् पश्यति कश्चिदेनं
आश्चर्यवद् वदति तथैव चान्यः ।
आश्चर्यवच्चैनमन्यः शृणोति
श्रुत्वाप्येनं वेद न चैव कश्चित् ।।

योगी ध्यानावस्थित होऊन तद्गतेन मनसा परमात्म्याला हृदयस्थ पाहतात. परंतु ध्यानमार्गानें त्याला अशा प्रकारें स्वाधीन करणें कठिण आहे. म्हणून तो दुर्धर होय. ही अव्यक्त अक्षरोपासना कठिण आहे. म्हणून कोणी व्यक्त सगुण साकाराची उपासना करून त्याला धरूं पाहतात. पण तिथें हि तो अतिसुलभ कांहीं नाहीं. परमेश्वराविषयीं तें प्रेम, तो जिव्हाळा तर उत्पन्न झाला पाहिजे ना ? निरोधाचा आणि भक्तीचा हि मार्ग अवघड म्हणून कित्येक विचाराचा ज्ञानमार्ग अंगीकरतात. ते 'तत् त्वमसि' महावाक्याचा खल करून त्याला गांठूं पाहतात. विचारानें सोलसोलून तत्त्व हस्तगत केलें पण त्याचा प्रत्यय बाणला पाहिजे ना ? तें कसें व्हायचें?

सारांश, कोणत्या हि यत्नानें तो वश होत नाहीं. तर 'यमेव एष वृणुते तेन लभ्य :' ज्यावर तो अनुग्रह करतो त्यालाच तो लाभतो. म्हणून तो दुर्धर म्हटला आहे.

## २६७. वाग्मी

वाचाल म्हणजे वायफळ बोलणारा, बडबड्या. वाग्मी म्हणजे वृथा न बोलणारा, सिद्धवाक्. ज्याचा शब्द व्यर्थ असत नाहीं तो वाग्मी होय. "राजा बोले दळ हाले, मिया बोले दाढी हाले" अशी म्हण आहे. राजाज्ञा जशी कधीं वायां जात नाहीं तसा ज्याचा प्रत्येक शब्द अमोघ असतो तो वाग्मी होय. रामबाण जसा लक्ष्यवेध करून कृतकार्यच व्हायचा तसा त्याचा प्रत्येक शब्द इष्ट कार्य करूनच रहायचा. याचेंच नांव अमोघता. याचेंच नांव वाग्मिता.

"गच्छतः स्खलनं क्वापि भवत्येव न संशय :" या न्यायानें जो बोलतो त्याचें बोलणें क्वचित् चुकायचेंच. पण ज्यानें मौनच घेतलें त्याची चूक होण्याचा, त्याचा बोल फोल होण्याचा संभवच उरला नाहीं. परमात्मा हा तसा वाग्मी आहे. तो मुळीं बोलतच नाहीं. तो सर्वांतर्यामी सर्वसाक्षी अशब्दच सर्व कार्य करवून घेतो. अर्भक न बोलतांच सर्व आज्ञा करीत असतें आणि त्यांची अंमलबजावणी हि तत्परतेनें होत असते. त्याहून अधिक समर्थ बोल कोणते? परमात्मा हा तसा वाग्मी आहे.

अर्थ-प्रकाशन हें शब्दाचें कार्य आहे. तें शब्दापेक्षां अशब्दच अधिक समर्थपणें करतो. शब्द समजास तसा गैरसमजास हि कारण होतो. म्हणून तो असमर्थ होय. बरें, नाना अर्थ प्रकट करणें हें जर शब्दाचें वैभव मानलें तर तें मौनांत जितकें आहे तितकें कांहीं शब्दांत असूं शकत नाहीं. मौनं सर्वार्थसाधनम्. म्हणून त्या हि दृष्टीनें अशब्दच वीर्यवत्तर आहे. असा उभयथा हि परमात्मा हा वाग्मी होय.

वेदासारखी वाणी त्यानें निर्मिली म्हणून हि तो वाग्मी.

## २६८. महेन्द्र

नागेन्द्र म्हणजे अधरलोक-नाथ, नरेन्द्र म्हणजे मध्यलोक-नाथ आणि सुरेन्द्र म्हणजे ऊर्ध्वलोक-नाथ. पण या तिहींचा हि नाथ कोण ? तर तो परमात्मा. म्हणून तो महेन्द्र म्हणावयाचा. महेन्द्र म्हणजे त्रैलोक्य-नाथ, विश्व-नाथ.

जलचरांचा स्वामी वरुण होय. भूचरांचा स्वामी यम होय. खेचरांचा स्वामी इन्द्र होय. या तिन्ही त्या त्या लोकांच्या व प्रजांच्या अभिमानी देवता होत. "झषाणां मकरश्चास्मि", "मृगाणां च मृगेन्द्रोऽहम्", "वैनतेयश्च पक्षिणाम्" ज्या मकर, महिष आणि गरुड यांचा विभूति म्हणून गौरव केला आहे तीं त्या देवतांचीं लांछनें होत. वरुण हा मकर-ध्वज, यम हा महिष-ध्वज आणि इन्द्र हा गरुड-ध्वज होय. पण महेन्द्र या तिहींचा हि स्वामी. त्याचें लांन्छन, त्याचें ध्वजचिह्न, कोणतें? तर या तिहींना एकवटून बनलेला मकरमुख सपक्ष महिष उर्फ सिंह म्हणजे ड्रॅगन होय. आपल्या पुराणांत या अद्भुत सत्त्वाचा समावेश करून घेतला पाहिजे.

आपल्या ठाईं हे तीन लोक, हीं तीन दैवतें देह, प्राण आणि मन ह्या तीन रूपांनीं नांदत आहेत. यांचा जो स्वामी तो सर्वेश्वर परमात्मा महेन्द्र होय.

असें हें अधिभूत, अधिदैव आणि अधि-आत्म आहे. प्रह्लादानें त्या हृदयस्थ महेन्द्राचें असें नमन केलें आहे :

" योऽन्तः प्रविश्य मम वाचमिमां प्रसुप्तां
संजीवयत्यखिलशक्तिधरः स्वधाम्ना।
अन्यांश्च हस्तचरण-श्रवणत्वगादीन्
प्राणान् नमो भगवते पुरुषाय तुभ्यम् ।।"

## २६९. वसुद

जिथें तुमचें धन तिथें तुमचें मन. जिथें मन असें गुंतून राहतें, वसति करून राहतें, तें धन म्हणजे वसु होय. त्यामुळेंच त्याला वसु हें नाम. लहानपणीं मुलाला शंखशिंपलेच किमती वाटतात आणि तो त्यांचा संग्रह करतो. अर्थात् तें त्याचें धन असतें. पण पुढें त्याला तीं कांचखंडें तुच्छ वाटतात आणि मग तीं तो फेकून देतो आणि सोनें नाणें गोळा करूं लागतो. कोणी तीं तुच्छ समजून त्यांचा त्याग करतो आणि कीर्ति मिळवूं लागतो. कोणी विरक्त पैसाअडका आणि नांवलौकिक यांच्या

उद्भ्रांत आणि अशांत जीवनापेक्षां स्वस्थ आणि शांत साधु जीवनाची महती ओळखून त्यांत रमतो. अशा प्रकारें जीवाचें धन सारखें बदलत जातें आणि त्या त्या धनांत त्याचें मन वसत असतें. जीवाचा हा नवनवा अभिलाष तो परमात्मा पुरवीत असतो म्हणून तो वसु-द, वसु देणारा, म्हणावयाचा. परमात्मा हा अभिलषित-चिन्तामणि आहे. तो ज्या त्या जीवाला त्याचें त्याचें अभिलषित पुरवीत असतो. तो "चींटी को कन कन का, हाथी को मन का देननहारा" प्रभु आहे. त्या जगाच्या माउलीला सर्व मुलें सारखीं आहेत. त्यांचें कोड ती सारख्याच जिव्हाळ्यानें पुरवीत असते. ती बाळाला खुळखुळा देते. बाळ्याला माळा देते आणि बाळाजीला ताळा देते आणि त्याची किल्ली. तिला पोर थोर सर्व सारखे. सर्वांचें आर्त ती पुरविते. परमात्मा महाकवीप्रमाणें ओळखतो कीं

"वैराग्ये संचरत्येको नीतौ भ्रमति चापरः।
शृङ्गारे रमते कश्चिद् भुवि भेदाः परस्परम् ।।"

आणि तदनुसार तो सर्वांची आवड पुरवीत असतो. "आवडीचें दान देतो नारायण." म्हणून तो वसुद.

## २७०. वसु

"वसुः अन्तरिक्षसद्" अन्तरिक्षांत जो आसीन आहे तो सूर्य वसु होय. त्याच्यांत हें सर्व विश्व वसलें आहे आणि तो या विश्वांत वसला आहे. म्हणून तो वसु.

आम्ही सूर्यमालेंतील एका ग्रहाचे निवासी. त्यामुळें तो सूर्य आमच्या जीवनाचा स्वामी आहे. तोच आमचा चराचरांचा उपजीव्य होय. म्हणून तोच आमचा वसु. ज्या द्रव्याच्या बळावर जीव आपली उपजीविका करतो तें द्रव्य त्याचें वसु म्हणावयाचें. सूर्य हा तसा आमचा वसु आहे. परंतु सूर्य हि आपल्या ग्रहमालेसकट ज्या तेजाची प्रदक्षिणा करतो आहे तें तेजच वस्तुतः खरें वसु म्हणावयाचें. आणि असें तें तेज सूर्यासकट आपल्या सर्वांच्या अन्तर्यामांत विराजमान आहे. तो जो आपला अन्तर्याम तोच अन्तरिक्ष होय आणि त्यांत नित्य विराजमान, नित्य आसीन जें तेज, जें स्फुरद्रूप आत्मतत्त्व, तेंच आमचें, आमच्या पृथ्वीचें, पृथ्वी ज्याच्या ग्रहमालेंतील एक ग्रह आहे त्या सूर्याचें गौरवामुळें नियन्तृ आहे. म्हणून वस्तुतः तेंच एक वसु म्हणावयाचें.

वसु म्हणजे वसणारा, स्थिर राहणारा. परमात्मा तेवढा वसु म्हणजे स्थिर राहणारा असून बाकीचे सारे फिरणारे आहे. मेढ स्थिर राहते आणि गुरांची पांत चालत राहते. तसें ह्या विश्वांत मेढीप्रमाणें ध्रुव म्हणजे वसु एक परमात्मा असून त्याच्या भोंवती हें सारें विश्व भ्रमत आहे.

अशा प्रकारें निवास करणारा, उपजीव्य असणारा आणि स्थिर अचल राहणारा म्हणून परमात्मा हा वसु म्हटला. त्याचा प्रतिनिधिभूत, सूर्य आणि त्याचेंहि प्रतिनिधिभूत सुवर्ण वसु शब्दानें शब्दित होते. परंतु परम वसु तर तो एक परमात्माच होय.

## २७१. नैकरूप

जगांत आपण नाना रूपें पहात आहोंत. तीं सर्व वेगवेगळ्या पुरुषाचीं मानिलीं तर जगांत नानात्व मानावें लागेल. आणि जिथें नानात्व आलें तिथें भय आलें. स्वामित्वासाठीं दोन कुत्रे भांडतात, दोन भिक्षुक भांडतात, दोन राजे भांडतात. पण जिथें दुसरा नाहींच तिथें भय कुणाचें? "तत्र को मोहः कः शोक : एकत्वं अनुपश्यतः" तिथें सर्व निर्द्वंद्व ! जग हें तसें निर्द्वंद्व आहे, आत्मरूप आहे हें जो ओळखतो त्याचें भय जातें. जो द्वितीयाची कल्पना करतो, त्याच्या मानगुटीस मात्र भूत बसतें. जग जर आत्मरूप आहे तर जगांत दिसणारें नानात्व, हीं नाना रूपें त्या परमात्म्याचींच होत, दुसऱ्या कुणाचीं नाहींत हें ओघानेंच आलें. तो नैकरूप आहे, कारण नैकता आम्ही प्रत्यक्षच पाहत आहों आणि एका परमात्म्यावांचून दुसरा कोणी पुरुष इथें नाहीं, हें हि आम्हीं ओळखून आहों. बहुरूप्याच्या खेळांत बहुरूपी एकदां पुरूषाचें सोंग आणतो एकदां स्त्रीचें, एकदां बाल होतो एकदां वृद्ध, एकदां भिकारी एकदा श्रीमंत. हीं सगळीं त्या एकाचींच रूपें असतात. म्हणून त्याला आपण बहुरूपी म्हणतों. तसा परमात्मा हा एकसमयावच्छेदें करून असंख्य रूपें धारण करून नटला आहे. त्याचें हें बहुरूपत्व नैकरूपत्व म्हणजे सर्वाश्चर्यमय विश्व आहे. ज्याला हें विश्वरूपदर्शन झालें तो समबुद्धि होतो. त्याला मग हा पुरुष ही स्त्री, हा बाल

हा वृद्ध, हा धनी हा दरिद्र, हा पुण्यवान् हा पापी असा कसला हि भेद उरत नाहीं. सर्वत्र तो एक परमात्माच विराजमान आहे असें पाहतो.

ज्याला देवाचें हें नैकरूपदर्शन झालें तो मग विष्णु, शिव, शक्ति, गणेश वा सूर्य हेंच एक तेवढें देवाचें रूप असा ग्रह आणि आग्रह सोडून देतो. त्याला सर्वत्र देवाचा सुकाळ होतो.

## २७२. बृहद्रूप

बृहत् म्हणजे विशाल. ज्याचें रूप विशाल होत जाणारें आहे तो बृहद्रूप होय, आकाशवत्. आकाश क्षितिजाला टेकलें आहे, तिथपर्यंत आकाश पसरलें आहे, असें पाहणाराला वाटतें. त्या क्षितिजाजवळ जाऊन पाहूं लागावें तर तितकेंच आणखी पुढें सरकलेलें दिसतें. अशा प्रकारें तें सारखें वाढत जातें, विस्तारतच जातें. त्याची इयत्ता हातीं लागत नाहीं. असें जें ब्रह्म तें बृहद्रूप होय. आणि त्याची छाया असललें हें जग हि तसेंच बृहद्रूप म्हणावयाचें. बृहताचें सारेंच बृहत्. त्याचें नाम बृहत्, त्याचें रूप बृहत्, त्याचें कर्म बृहत्, त्याची छाया हि बृहत्. म्हणूनच तें बृहद्रूप म्हणावयाचें. ज्याची इयत्ता आपल्याला सांगतां येत नाहीं त्याला आपण मोठें म्हणतों. एखाद्या वस्तूची इयत्ता सांगतां आली तर ती वस्तु मर्यादितच म्हणावी लागेल. मग ती वस्तु किती का मोठी असेना ! परमात्मा हा केवढा मोठा आहे हें सांगतां येणें शक्य नाहीं एवढा मोठा तो आहे. तें सांगण्यासाठींच ही सहस्राची वटवट आहे. सहस्र वटवट करून आणि शेवटीं आपली वटवट बंद करून एकच गोष्ट सांगतें आणि ती ही कीं तो परमात्मा मोठा आहे, खूप मोठा आहे. खूप खूप मोठ्ठा आहे. इसापाची बेडकी आणि तिचें पिल्लूं यांची गोष्ट इथें आठवते. चरत चरत डबक्याजवळ आलेला एक बैल बेडकीच्या पिलाला दिसतो. त्यानें तो प्राणी पहिल्यानेंच पाहिलेला असतो. तो आपल्या आईला सांगतो कीं एक भला मोठा प्राणी आला होता. आई त्याला आपलें पोट फुगफुगवून 'एवढा मोठा !' 'एवढा मोठा !' म्हणून विचारते आणि तें पिल्लूं आणखी खूप मोठ्ठा म्हणत जातें. शेवटीं त्या प्रयत्नांत बेडकी पोट फुटून मरते. श्रद्धेचें पिल्लूं वाणी मातेला ईश्वराचें महिमान, त्याचें बृहद्रूप दिसल्याचें सांगते आणि वाणी माता तोंड फाटेपर्यंत वर्णन करून त्याची इयत्ता सांगूं जाते. परिणाम व्हायचा तोच होतो.

## २७३. शिपि-विष्ट

**शिपिः पशुः, तस्मिन् विष्टः प्रतिष्ठितः धर्मः यज्ञः**

शिपि-विष्ट म्हणजे शिपींत शिरलेला. पण शिपि म्हणजे काय ? शिपि म्हणजे किरण, शिपि म्हणजे पाणी, शिपि म्हणजे त्वचा. पण ह्यांपैकीं एक हि अर्थ मनास येत नाहीं माझ्या. शिपि म्हणजे शिबि वा शिबिका असा अर्थ घ्यावा. शिपिविष्ट म्हणजे मेण्यांत बसलेला. परमात्मा हा प्रकट नाहीं. तो गुहाशय आहे. "गूढमनुप्रविष्ट" आहे. तैल तिळांत आहे, वरून दिसत नाहींच, पण तीळ फोडला तरी हि तें दिसत नाहीं. परंतु वैज्ञानिक प्रक्रियेनें पिळून त्यांतील तेल प्रकट करतां येतें. परमात्मा हि तसाच सर्वांच्या अंतर्यामांत व्याप्त आहे, आविष्ट आहे. वरून तो दिसत नाहींच, पण अंतर्याम फोडला तरी नारळाच्या डोलासारखा वा बदामाच्या बीसारखा तो हातीं लागत नाहीं. तो तर "सत्येन लभ्यस् तपसा ह्येष आत्मा, सम्यग्-ज्ञानेन ब्रह्मचर्येण नित्यम् । अन्तःशरीरे ज्योतिर्मयो हि शुभ्रो, यं पश्यन्ति यतय : क्षीणदोषा : ।।" या उपनिषद्-वचनांत म्हटल्याप्रमाणें सत्याच्या तपानें लाभतो. स्वान्तःपुरांत स्वमहिमावृत असलेली आत्मसुंदरी त्याच्याच दृष्टीला पडते ज्याच्या गळ्यांत ती माळ घालते. आणि ती कोणाच्या गळ्यांत माळ घालते ? तर जो कामरूप दुरासद शत्रूला ठार करून विजयी होतो त्याच्या, जो निरिच्छ होतो त्याच्या. "न मागे तयाची रमा होय दासी ।" अज्ञान-जनित वासनामूलक देह-देहान्तररूप अन्तराय साधक सत्यदर्शन-जनित असंग वा अनासक्ति-मूलक देह-देहान्तरनिरोधरूप स्वास्थ्यानें दूर सारतो तेव्हां तो शिपिविष्ट भेटतो. "तस्य एष आत्मा विवृणुते तनुं स्वाम्."

शिपि म्हणजे किरण असा अर्थ घेतल्यास शिपि-विष्ट म्हणजे प्रभावलिमण्डित. सूर्य हा जसा सदैव किरणमाली

होय तसा परमात्मा हा सदैव आपल्या आत्मतेजाच्या प्रभावळीनें मण्डित असतो. म्हणून तो शिपिविष्ट. शिपिविष्ट म्हणजे खल्वाट, अथवा कुष्ठी हे अर्थ तर इथें केवळ अप्रस्तुतच होत. दोन्ही त्वगृरुग्ण होत. शिपि म्हणजे कातड्याची म्यान असा अर्थ घेतल्यास म्यानेंत जसें खड्ग तसा जो देहकोशांत लपटलेला आहे तो देही आत्मा असा अर्थ होईल. शिपि म्हणजे जल असा अर्थ घेतल्यास परमात्मा हा जलस्थानीय अव्यक्तांत लपलेला आहे असा अर्थ.

### २७४. प्रकाशन

शिपिविष्ट आणि प्रकाशन ही जोडी वैधर्म्यानें जोडलेली आहे. शिपिविष्ट म्हणजे गूढ तर प्रकाशन म्हणजे प्रकट . प्रकट होणारा, प्रकट करणारा परमात्मा हा कारणरूपानें गूढ असला तरी कार्यरूपानें सारखा प्रकटतच आहे, प्रकाशतच आहे. बीज भूमिगत होऊन झाकलेलें असलें तरी तें अंकुर, पानें, फुलें, फळें यांच्यायोगें फांकलेलेंच नाहीं का ? बीजरूपानें झांकलेलें आणि वृक्षरूपानें फांकलेलें. दोन्ही प्रकारें त्याचें वर्णन होईल. आणि परस्परविरुद्ध दिसलें तरी तें अगदीं यथार्थ होईल. तसेंच ह्या परमात्म्याचें आहे. तो कारणरूपानें शिपिविष्ट आहे, गूढ आहे. तर कार्यरूपानें तो प्रकट आहे, प्रकाशन आहे. कार्य हें सदैव कारणालाच प्रकट करीत असतें. पण इथें तर कार्यकारण एक परमात्मा आहे. तो गूढ आपल्या आपल्या गूढतर शक्तींचा शोध घेत त्यांचें प्रकाशन करीत चालला आहे. किती हि प्रकाशन केलें तरी गूढ ज्याअर्थीं शिल्लकच राहतें त्याअर्थीं तो सदैव शिपिविष्टच आहे. अव्यक्ताच्या संपुटांत गुप्तच आहे. पण त्याचबरोबर तो व्यक्त हि आहे. एखादा अट्टल चोर असतो तो लपणांत जाऊन लपून बसत नाहीं, तर सावासारखा सर्वत्र वावरत राहतो. त्यामुळें लपणांत शोध घेऊन त्याचा शोध लागत नाहीं. जो सदैव तुमच्याजवळच वावरत असतो आणि तिथेंच मात्र तुम्ही त्याला पाहत नाहीं. परमात्मा हा तसा अट्टल चोर आहे. तो प्रकटून लपलेला आहे, लपून लपलेला नाहीं. तो जसजसा प्रकटत जातो तसतसा लपत असतो आणि लपलपून प्रकटत असतो. आतां ह्याला काय म्हणायचें तें तुम्ही पहा. शोधा म्हणून तो लपतो, लपून तुम्हांला तो आलपतो. ह्याला लपणें म्हणावें कीं प्रकटणें कांहीं कळत नाहीं. 'समोर कीं पाठीमोरा न कळे। ठकचि पडिलें कैसें ?'

आतां ह्याला काय म्हणावें? झांकलेलें कां फांकलेलें?

### २७५. ओजस्तेजोद्युति-धर

द्युति म्हणजे कांति. हा शारीरिक गुण आहे. तो माणसाच्या वर्णावर अवलंबून नाहीं. एखादा गौरवर्ण पुरुष निपाणी असूं शकेल तर एखादा कृष्णवर्ण हि पाणीदार दिसून येईल. (प्रायः गौरवर्ण कांतिहीन तर कृष्णवर्ण कांतिमान् दिसून येतो.) ही कांति केवळ आरोग्यावर अवलंबून नाहीं तर व्यक्तिमत्त्वावर आणि कौलिन्यावर म्हणजे जातिवंतपणावर हि अवलंबून असते. देशावर हि म्हणतां येईल.

तेज म्हणजे तडफदारपणा, अन्यायासहिष्णुता. स्वतः न्यायनीतिनिष्ठ आणि न्यायनीतीचा कैवारीच तेज प्रकट करतो. ज्याला धर्माची, नीतीची चाड नाहीं तो मनुष्य क्लीब होय—मग तो हिंसक असो कीं अहिंसक असो. न्याय-नीतीच्या प्रस्थापनेसाठीं, म्हणजेच धर्मरक्षणासाठीं जो जिवावर उदार होतो तोच वीर होय—मग तो हिंसक असो कीं अहिंसक. धर्माच्या परित्राणांतच सर्वांचें परित्राण आहे. म्हणून धर्माचें, म्हणजे सत्याचें, म्हणजेच न्यायनीतीचें रक्षण हा राजधर्म होय. राजधर्म म्हणजे राजवत् सर्वश्रेष्ठ धर्म. सर्व धर्मांचा राजाच असा धर्म. हा कांहीं केवळ राजांचा म्हणजे क्षत्रियांचा धर्म नव्हे. तें सत्यपालनाचें, धर्मरक्षणाचें कर्तव्य प्रत्येक मानवाचा धर्म आहे. तो जो पाळतो तो राजाच होय. मग वर्णानें तो कोणी का असेना. असा जो धर्मगुरु राजा तोच तेजस्वी होय.

ओज म्हणजे सत्त्व, बल. सतीच्या ठाईं, धर्मनिष्ठाच्या ठाईं, सत्त्व असतें. त्या सत्त्वाच्या बळावर तो अग्निदिव्य करतो. सत्त्वपरीक्षेंत उत्तीर्ण होतो. श्रद्धाबळसंपन्न पुरुष

हनुमंताप्रमाणें संकटांचे सागर आणि अडचणींचे डोंगर पार करतो आणि कृतकार्य होतो. म्हणून म्हटलें : 'बलं वाव विज्ञानाद् भूयः' हें सत्त्व, हें श्रद्धाबळ सर्व ज्ञानविज्ञानाहून वरचढ आहे. हेंच ओज. उत्तरोत्तर हें पूर्वपूर्वाचें कारण होय. ज्याच्या ठाईं ओज आहे त्याच्या ठाईं तेज येतें. आणि ज्याच्या ठाईं तेज आहे त्याच्या ठाईं द्युति प्रकाशते. आणि ज्या अर्थी आत्मा हा सर्वाधार आहे त्याअर्थी तो ओजस्-तेजोद्युतिधर म्हटला आहे.

## २७६. प्रकाशात्मा

परमात्मा हा प्रकाशात्मा म्हणजे प्रकाशस्वरूप आहे. पण हा प्रकाश भौतिक प्रकाश नव्हे. भौतिक प्रकाश जड आहे. तो आपल्याला स्वतःला जाणायला समर्थ नाहीं. त्याला जाणणारा जो चित् प्रकाश तोच खरा प्रकाश होय. म्हणून म्हटलें आहे

**यद् आदित्य-गतं तेजो जगद् भासयते ऽ खिलम् ।**
**यच् चंद्रमसि यच् चाग्नौ तत् तेजो विद्धि मामकम्।।**

जड जडाला जाणूं शकत नाहीं म्हणून तें सारें चेतनाधीन होय, चेतन-परतंत्र होय. विजेनें विमानें गाड्या चालतात, शहरें प्रकाशित होतात, पण विजेचें बटन वीज दाबत नाहीं. तें चेतनाधीन आहे. तसें हें सारें विश्व चेतन परमात्म्याच्या अधीन आहे. त्याचें केलेलें आहे. त्यानें प्रकाशित केलेलें आहे. कार्यमात्र कारणाच्या अधीन असतें. तसें हें विश्व परमात्मसत्तेच्या अधीन आहे. आणि ती जी परमात्म-सत्ता ती चेतन च असली पाहिजे. कारण त्याशिवाय हें जडचेतन विश्व तदधीन राहूं शकत नाहीं. जड हें चेतनाधीन आणि चेतन हें स्वाधीन असतें. म्हणून कारणस्वरूप परमात्मसत्ता ही चेतन आणि स्वतंत्र होय आणि तदधीन हें विश्व अस्वतंत्र होय.

अंधारांत माणसाला दिसत नाहीं. प्रकाशांत दिसतें. पण गडद अंधारांत हि रात्रींच्या मत्स्य, कच्छ, सर्प, व्याघ्र, दिवाभीतोलूक दिवसाप्रमाणें व्यवहार करीत असतात. ते कोणत्या प्रकाशाच्या आधारें? तो प्रकाश हि सूक्ष्मतर भौतिक प्रकाशच असतो असें जड विज्ञानवादी म्हणतील. पण तें आपाततः खरें दिसलें तरी तसें नाहीं. स्थूल सूक्ष्म कोणत्याहि प्रकाशाचें ग्रहण करणारा नेत्र रूप प्रकाश चेतन आहे. त्यामुळेंच तें ग्रहण होतें. शिवाय नेत्रहीन कोणत्या प्रकाशाच्या आधारें चालतो ? तो प्रकाश भौतिक नाहीं. महात्मा गांधींच्या अन्त्रपुच्छाच्या शस्त्र-क्रियेच्या वेळीं एकाएकीं सर्व दिवे गेले, पण शस्त्र -चिकित्सकानें शस्त्रक्रिया पार पाडली? कोणत्या प्रकाशाच्या आधारें ? तो जो प्रकाश तो चित्प्रकाश होय. परमात्मा तत्-स्वरूप आहे.

## २७७. प्रतापन

विष्णुसहस्राचा उद्गाता भीष्म आणि लिपिकार व्यास दोघेहि मुनि होते.. त्यांच्या मौननिःसृत वाणींत त्यांच्या मनाचे मननाचे अंतःप्रवाह सूक्ष्म दृष्टीला दिसून येतात. नामांचा क्रम कुठें सहज, कुठें साभिप्राय, असा द्विविध दिसून येतो. जिथें एकानामापुढें दुसरें नाम कां आलें याचा कांहीं विशेष हेतु सांगतां येत नाहीं, तिथें तो सहज क्रम म्हणावयाचा आणि जिथें एखादा विशेष हेतु दृष्टीस पडतो, तिथें तो क्रम साभिप्राय म्हणावयाचा. जो क्रम साभिप्राय नाहीं तो सहज असेल, जो सहज नसेल तो साभिप्राय असेल. तिसरा प्रकार संभवत नाहीं. हें संभवनीय आहे, कीं एखाद्याला एखादा क्रम साभिप्राय वाटेल, तर दुसऱ्याला तो सहज. परंतु तो त्यालाहि दोहोंपैकीं कोणतातरी एकच प्रतीत होईल. हेंहि संभवनीय कीं एकालाच तो एकदा साभिप्राय वाटेल, तर अपरदा सहज. पण त्यालाहि एका वेळीं एकच प्रतीति होईल. जसा ज्याचा दृष्टिकोन तसें त्याला दर्शन. अशी वस्तु ही अनेकदर्शनकल्प आहे. म्हणून एकांतवादी न होतां अनेकांतवादी व्हावें लागतें. विष्णुसहस्र त्याचाच पाठ देत आहे. विष्णुसहस्र म्हणजे एक कॅलेडस्कोपच आहे, चित्रदर्शनच आहे. पहावें तेव्हां नवें दर्शन. कवि म्हणतो "प्रतिक्षण नवी च दे रुचि" मी म्हणतों "प्रतीक्षण नवीच दे रुचि.' असो. इथें या विचाराचें प्रयोजन काय ? प्रयोजन हेंच कीं प्रकाशात्मा

ह्या नामानंतर प्रतापन हें नाम आलें आहे आणि तें साभिप्राय आहे. प्रकाशात्मा म्हणजे तेजःस्वरूप. तेजाचे दोन वा दुहेरी आविर्भाव आहेत. एक प्रकाश आणि दुसरा ताप अथवा उष्णता. प्रकाशात्मा पदानंतर लगेंच प्रतापन पद आलें याचें कारण हेंच. तेजःस्वरूप परमात्मा प्रकाश हि देतो आणि प्रताप हि (दाहक औष्ण्य हि) देतो. तो ज्ञानशक्तिसंपन्न तसा कार्यशक्तिसंपन्न हि आहे. प्रकाश ही ज्ञानशक्ति होय, प्रताप वा ज्वलन ही कार्यशक्ति होय. परमात्म्याचें हें द्विविध रूप प्रकाशात्मा आणि प्रतापन या दोन पदांनीं प्रदर्शित केलें आहे. भौतिक तसें आध्यात्मिक तेजहि द्विविध शक्तिसंपन्न आहे. गीतेंत याच दोन आविर्भावांना श्रीमत् आणि ऊर्जित म्हटलें असून ही द्विविध विभूति भगवत्तेजाची आहे असें म्हटलें आहे.

## २७८. ऋद्ध

ऋद्ध म्हणजे समृद्ध. परमात्मा कशानें समृद्ध आहे ? ऐश्वर्य आणि श्री, धर्म आणि यश, ज्ञान आणि वैराग्य या ऋद्धींनीं तो समृद्ध आहे. या षट्संपत्तीलाच भग अशी संज्ञा असून ह्या भगानें जो नित्य संपन्न परमात्मा तो भगवान् म्हटला जातो. परमात्मा हा सच्चिदानंदविग्रह आहे. 'सत्' पासून ऐश्वर्य आणि श्री, 'चित्' पासून ज्ञान आणि वैराग्य आणि 'आनंद' पासून धर्म आणि यश हे भाव द्विगुणित झाले आहेत. त्यामुळेंच तो परमात्मा ऋद्ध झाला आहे. द्विगुणित झाला आहे. भगवान् म्हटला गेला आहे. परमात्म्याचे जितके म्हणून गुण आहेत ते सारे ह्या तिहेरी मूळ भावांतून अंकुरले आहेत. शम, दम, उपरति, तितिक्षा, समाधान आणि श्रद्धा ही साधकाची षट्संपत्ति होय. सिद्धाची म्हणजे परमात्म्याची षट्संपत्ति भग म्हटली गेली तर साधकाची षट्संपत्ति भाग्य म्हटली जावी. ज्यानें भगवान् भेटतो तें भाग्य म्हणावयाचें. परंतु ही तर वस्तुतः सिद्धीची सिद्धता झाली. कारण ऋद्धि म्हणजे ऐहिक सुखसमृद्धि, आणि सिद्धि म्हणजे मोक्षसिद्धि होय. भगवान् हा दोहोंचा हि स्वामी आहे. म्हणूनच तो 'भग'-वान् झाला. ऐश्वर्य हें भगवंताचें निजस्व आहे, सर्वस्व आहे. त्याचे धर्म आणि श्री हें ऋद्धिमूल युगल एक अंग होय; ज्ञान आणि वैराग्य सिद्धिमूल युगल दुसरें अंग होय. पहिलें वामांग तर हें दुसरें दक्षिणांग म्हणावयाचें. यश हें उभयांग-परिपाकरूप फलित होय. त्याची प्रभा होय. वृक्षरूपकानें बोलायचें तर भगवद् वृक्षाचा ऐश्वर्य हा मूलस्कंध होय. धर्म आणि ज्ञान ह्या शाखा होत. श्री आणि वैराग्य हा पुष्पसंभार होय. आणि यश हा जनमन मोहून टाकणारा सौरभ होय. आणि देहधारी जीवांच्या दृष्टीनें ऋद्धिसिद्धि असा विभाग होतो, परंतु निर्गुण परमात्म्याच्या दृष्टीनें दोन्ही एकच.

## २७९. स्पष्टाक्षर

ॐकार हा अस्पष्टाक्षर म्हणतां येईल. त्यांत अउम हे तीन, सर्व वर्णांचे प्रतिनिधि, लपले आहेत. अ कंठ्य उ ओष्ठ्य आणि म् नासिक्य आहे. आणि हींच तीन स्थानें कंठ, ओष्ठ व नासिका आदिमध्यान्तवर्ती असल्यामुळें तीं सर्व वर्णांचे प्रतिनिधि होतात. वाणीचीं हींच तीन पर्यन्तस्थानें होत. त्यामुळें तीं सर्ववर्णांची आणि म्हणून वाणीची प्रतिनिधि म्हणावयाचीं. पण तीं ॐकाराच्या नामांत (उच्चारांत) आदि रूपांत (लेखनांत) अशीं बेमालूम एकवटलीं आहेत कीं तीं स्पष्ट दिसून येत नाहींत म्हणून ॐकार हा अस्पष्टाक्षर म्हणावयाचा. अउम स्वतंत्र ऐकायला येत नाहींत, तसें त्यांचें रूपहि वेगवेगळें दिसत नाहीं. आद्य भाग 'अ' चा द्योतक तर शुंडाकृति भाग 'उ' चा द्योतक आहे आणि तारांकित चंद्रकोर 'म्' चा द्योतक होय. पण तीं अक्षरें ॐकारांत बेमालूम एकवटलीं असल्यामुळें 'न रूपमस्येह तथोपलभ्यते' 'ह्याचें तसें रूप दिसे न येथें' असें म्हणावें लागतें. ॐकार हा जर अस्पष्टाक्षर म्हणावयाचा तर स्पष्टाक्षर कोण ? सर्व वर्ण आणि त्या वर्णांपासून निर्माण झालेलें वाङ्मय हें स्पष्टाक्षर होय. सर्व वाङ्मय हें भगवद्रूप होय. जसें समग्र वृक्षरूप म्हणजे दुसरें तिसरें कांहीं नसून तो बीजाचीच अभिव्यक्तिमात्र होय. त्याप्रमाणें सर्व वाङ्मय हें वक्त्याची अभिव्यक्ति मात्र होय. म्हणून तो परमात्मा स्पष्टाक्षर

म्हणावयाचा. एकमात्र वक्ता तो आहे आणि उक्तमात्र स्पष्टाक्षर वाङ्मय हें त्याचें रूप आहे. इथें कलध्वनि आणि वर्णध्वनि असा भेद करण्याची गरज नाहीं. पक्ष्यांची चिवचिव ही आम्हांला जरी अव्यक्त, अस्फुट, अस्पष्ट वाटली तरी पक्ष्यांना ती स्पष्टच होय, स्पष्टाक्षरच होय. ज्याचा आशय श्रोत्याला कळतो तें सर्व स्पष्टाक्षर होय. ज्याचा आशय कळत नाहीं तें सुव्यक्ताक्षर हि अस्पष्टच म्हटलें पाहिजे. अशा अव्यक्त गूढ वाणीचा प्रतिनिधि आणि प्रतीक ॐकार होय. म्हणून तो प्रत्येक मंत्रोच्चारापूर्वी म्हटला जातो. ॐकारपूर्वक उच्चारलेलें अक्षर, शब्द वा वाक्य मंत्ररूप होय. त्याचा अर्थ असा कीं त्या ॐकारापुढील उच्चारलेलीं अक्षरें गूढ आहेत त्यांचा अर्थ स्थूल, भौतिक वा व्यावहारिक नसून सूक्ष्म, अतिभौतिक, आध्यात्मिक आहे. ही गूढता तेवढी निरखून तीं मंत्राक्षरें प्रत्यक्षावगम निर्गुणगर्भ सगुणपर बनविणारा स्पष्टाक्षर शब्द म्हणजे 'हरि' होय. तोहि संपूर्ण 'अउम्' प्रमाणें रामकृष्णहरि आहे. म्हणून मी म्हणतों स्पष्टाक्षर म्हणजे रामकृष्णहरि. सत्यस्वरूप राम, चैतन्यस्वरूप कृष्ण आणि आनंदस्वरूप हरि म्हणजे "दुःख, दुःखसमुत्पत्ति, दुःखांचा समतिक्रम। दुःखोपशमगामी तो आर्य अष्टांग मार्ग हि।" प्रतिपादणारा भगवान् बुद्ध. हरिः ॐ मध्यें हा स्पष्टाक्षर मंत्र आला आहे.

## २८०. मन्त्र

मन्त्र म्हणजे मननसाधन. मनन करून च ज्यांचा अर्थ लक्षांत यायचा तें अक्षर, तो शब्द, तें वाक्य म्हणजे मंत्र होय. मननाशिवाय त्याचा गूढ आशय, बाह्य लौकिक शब्दाच्या आणि अर्थाच्या कवचाच्या आंत दडलेला, उकलत नाहीं, उलगडत नाहीं. मंत्र मननाचें आलंबन बनून मननास प्रेरणा देतो. मननानें मनावयाचें, चिंतावयाचें मन्तव्यहि तोच होतो. मननक्रिया संपून सहज जपावयाचें जप्य हि तोच होतो. अशा प्रकारें मननपूर्व, मननगत आणि मननोत्तर मननाला आंतून बाहेरून व्यापून राहणारा, जो परमात्मवाचक शब्द मंत्र तो परमात्मस्वरूपच होय. ज्याचा अर्थ प्रकट आहे, तो मंत्र होऊं शकत नाहीं. तो गूढ असेल, गूढार्थगर्भ असेल तरच तो मंत्र होईल. परमात्म्याहून अधिक गूढ आणि गंभीर दुसरें काय असणार ? म्हणून तत्प्रतिपादक शब्द मंत्ररूपच होय. आणि "मौनं चैवास्मि गुह्यानाम्" म्हणून ज्या मौनाचा महागुह्य म्हणून, भगवद्विभूति म्हणून गौरव केला आहे तें मौनच मंत्राचा गर्भ होय. ॐ हा सर्वांत मोठा मंत्र होय. त्याला "ज्येष्ठराजं ब्रह्मणाम्" म्हटलें आहे. सर्व मंत्रांचा, वेदवचनांचा, देवस्तुतींचा तो आद्य आहे, प्रथम आहे, धुर्य आहे, धुरीण आहे. कारण तो सर्व मंत्रांहून गूढ आहे, सर्व वेदांहून अधिक बोलका आहे. नखशिखान्त समग्र वर्णन करणाऱ्या सर्व स्तोत्राहून अधिक समग्र आणि परिपूर्ण आहे आणि इतकें हि असून अतिसंक्षिप्त आहे, केवळ एकाक्षर. परमात्मवाचकता, गूढता, परमपावनता, सिद्धिदायकता इत्यादि सामर्थ्यामुळें मंत्र मंत्र म्हटला जातो. वेदाक्षरें अशीं मानिलीं आहेत म्हणून त्यांना मंत्र ही पदवी मिळाली. तसा सामर्थ्यारोप ज्यांच्यावर केला जातो तीं अन्य अक्षरें हि पर्यायानें मंत्र म्हटलीं जातात 'ॐ नमो भगवते वासुदेवाय" अशा सारखीं. सारांश आत्म-साक्षात्कार करून देण्याचें सामर्थ्य ज्यांच्या ठाईं आहे तीं अक्षरें वेदाचीं वा वेदेतर मंत्र होत.

स्पष्टाक्षर आणि मंत्र हीं दोन व्यावर्तक व पूरक जोडनामें होत. जोड कल्पना आहे ती. दोन्ही मिळून एक नामहि मानणें शक्य आहे. अमत्रं अक्षरं नास्ति.

## २८१. चंद्रांशु

स्पष्टाक्षर आणि मंत्र हीं दोन नामें ज्या प्रमाणें विरुद्धार्थवाची आहेत तशींच हीं पुढील चंद्राशु आणि भास्करद्युति नामें. चंद्र शीतल आहे, आह्लादकारक आहे. त्याची चंद्रिका सर्वांना सुखावह होते. परमात्म्याचें शील तसेंच लोकवल्लभ आहे. त्याचे अद्वेष मैत्री करुणा इत्यादि गुण लोकवल्लभ आहेत. त्याचें रूप लोक-वल्लभ आहे. तें "प्रीतिरसायनं नयनयोर् आनन्दनं चेतसः" आहे. डोळ्यांना सुखविणारें आणि हृदयाला आह्लाद देणारें. तसेंच त्याचें नाम. तें नुसतें राम नाहीं तर रामचंद्र आहे. तो चंद्रवत् रमणीय आहे. नामरूप गुणशील सर्व चंद्रवत्. त्याचे हे सर्व किरण चंद्रिकारूप परम प्रसादवर्षी होत. त्याचें

तेज, तेज आहे पण दाहक नाहीं. तें रसप्रद आहे, पोषक आहे. सूर्यकिरणें रस शोषून घेतात, तर चंद्रकिरणें रसपरिपोष करतात. म्हणूनच म्हटलें आहे :

"पुष्णामि चौषधीः सर्वाः सोमो भूत्वा रसात्मकः"

असा परमात्मा हा चंद्रांशु आहे. त्याचा प्रत्येक अंशु म्हणजे किरण चंद्रवत् शांति पुष्टि तुष्टि देणारा आहे. म्हणून तो चंद्रांशु म्हणावयाचा. चंद्रांशु म्हणजे सुधांशु. क्षुधातृषा-रूप रोग हरून मृत्यूवर मात करणारें द्रव्य म्हणजे अमृत. तें ज्याच्या किरणाकिरणांतून पाझरतें आहे तो सुधांशु होय, चंद्रांशु होय. "क्षुधातृषा हरे । निजभाव जेणें तरे । तें जीवन दिधलें बाप रखुमादेवीवरें ।।" असें त्या परमात्मचंद्राचें आणि त्याच्या अमृतकिरणांचें वर्णन ज्ञानदेवानें ठीकच केलें आहे. चंद्राची ही वत्सलता जिथें जिथें प्रकटली आहे तिथें तिथें चंद्रांशु आहे. चंद्रांशुत्व म्हणजे मातृत्व होय, चंद्रांशु म्हणून परमात्मा हा वात्सल्यमूर्ति माता आहे असें इथें सुचविलें आहे. "मातेचिये खांदीं बाळ नेणे शीण । भावना त्या भिन्न मुंडाविया" तुकारामानें म्हटल्याप्रमाणें चंद्रांशु परमात्म्याला आपण चकोरवत् भजावें.

## २८२. भास्कर-द्युति

भास्करद्युति म्हणजे सूर्यवत् प्रखर तेजस्वी. चंद्रांशुच्या विरुद्ध म्हणजे प्रतिपक्षी असा हा चंडांशु अर्थाचा शब्द आहे. परमात्मा हा मातेप्रमाणें सर्व "सौम्य" गुणांनीं मंडित आहे तसा तो पित्याप्रमाणें भास्कर-गुणांनीं प्रखर हि आहे. तो जीवाचें दुर्वर्तन दुर्विचार दुर्वृत्ति सहन करूं शकत नाहीं. अपराधांची तो क्षमा करीत नाहीं. न्याय्य शासन करतो. तो न्यायनिष्ठुर आहे. मनुष्य मार्ग सोडून चालूं लागला म्हणजे तो त्या कृतीनें आपल्या ध्येयापासून आपोआपच दूर जातो. यांतच न्याय आहे, यांतच न्याय्य शासन आहे परमात्मकृत. तुम्हीं निंबाचें बीं पेरावें व त्याला अमृताचें फळ यावें असें होत नाहीं. आंबा पेरला तरच आंब्याचें अमृत फळ तुम्हांला मिळेल. असा "करावें तसें भरावें" हा ईश्वरी न्याय आहे. ईश्वरी शासनाचा हा अचूकपणा चुकणाऱ्या जीवांना कडक वाटला तर त्यांत ईश्वराचा काय दोष ? वस्तुतः जीवाच्या, प्रमादशील जीवाच्या दुबळेपणानें ईश्वरी निर्दोष साम्याच्या कृपाळु न्यायावर वा न्याय्य कृपाळुतेवर केलेला तो आरोप आहे. मानवाच्या बाबतींत न्याय आणि दया वेगवेगळे गुण आहेत, परंतु ईश्वराच्या बाबतींत ते तसे वेगवेगळे नाहींत. त्याची दया तोच न्याय आहे, न्याय तीच दया आहे. धर्माचा सरळ राजमार्ग त्यानें करून दिला आहे. हा त्याचा न्याय आहे. त्यावरून चालण्याचें वा त्यापासून दूर जाण्याचें स्वातंत्र्य त्यानें जीवांना बहाल केलें आहे. ही त्याची दया आहे. अशा प्रकारें तो चंद्रांशु तसा चंडांशु आहे. दयाळु न्यायी आहे, न्यायी दयावंत आहे.

## २८३. अमृतांशूद्भव

अमृतांशु म्हणजे सुधांशु चंद्र. त्याचा उद्भव म्हणजे उत्पत्ति ज्याच्यापासून झाली तो अमृतांशूद्भव परमात्मा होय. समुद्रमंथनांतून देवासुरांनीं जें मथित काढलें त्यांपैकीं चंद्र हें एक मथित होय. दुधादह्यांत लोणी अव्यक्त रूपांत असतें तें मंथन करून आपण व्यक्त रूपांत आणतों. दुधादह्यांत लोणी असतें म्हणून तें प्रकट होतें. तसें हें विश्व परमात्म्याच्या क्षीरसागरांत अव्यक्त रूपानें होतें तें व्यक्त दशेस आलें आहे. अव्यक्ताच्या पृष्ठावर व्यक्त नवनीतवत् तरंगत आहे. अमृत म्हणजे जीवन. तेंच ज्याचे अंशु म्हणजे किरण तो अमृतांशु होय. षोडशकलांनीं युक्त असें हें विश्वजीवन हाच अमृतांशु. तो ज्याच्या पासून उत्पन्न झाला तो अव्यक्ताक्षर रूप परमात्मा अमृतांशूद्भव म्हणावयाचा. या विश्वजीवनाला चंद्र म्हणण्यांत हेतु आहे. चंद्रांत 'सतत' वृद्धिक्षय दिसून येतो. एक कला लोपते दुसरी प्रकटते ती हि लोपून परत नवी येते. याप्रमाणें चयापचय सतत चालू आहे. म्हणून हें विश्वजीवन अमृतांशु होय. जीवन म्हणून तें अमृत म्हटलें. चयापचयशील म्हणून तें चंद्र म्हणावयाचें. समुद्राच्या पोटांत काय काय सांठलें आहे तें कळत नाहीं म्हणून तो अनाकलन, अव्यक्त आणि तो कधीं आटावयाचा नाहीं, घटावयाचा नाहीं म्हणून

अक्षर. चयापचयशील विश्वजीवनाचें उत्पत्तिस्थान म्हणजे अथांग आणि अखूट जलनिधि म्हणजे अव्यक्ताक्षररूप परमात्मा होय. ह्या अव्यक्ताक्षर महोदधीला क्षीरसागर म्हणावयाचें. कारण तो व्यक्तनवनीत-गर्भ आहे. नीर मंथून क्षीरज नवनीत हस्तगत होत नाहीं. ही सृष्टि सन्मूलक आहे असन्मूलक नाहीं. "असत्यं अप्रतिष्ठं ते जगद् आहुर् अनीश्वरम्" ह्या नास्तिकवादाला इथें थारा दिलेला नाहीं. तो स्वभावतःच खंडित आहे.

## २८४. भानु (अभानु)

भानु म्हणजे प्रकाशक. "तमेव भान्तं अनुभाति सर्वम्" त्याच्या चित्-प्रकाशानें हें सारें विश्व प्रकाशमान होतें. जाग्रत्, स्वप्न, सुषुप्ति या तिन्ही लोकांची प्रतीति ज्याच्या सत्तेनें होते तो सर्वसाक्षी परमात्मा विश्वभानु होय. त्या चित्सूर्यापुढें हा स्थूल सूर्य दर्यामें खसखस आहे. म्हणून त्या परमात्मतेजाला कोटिसूर्यसमप्रभ म्हटलें आहे. म्हटलें आहे "दिवि सूर्यसहस्रस्य भवेद् युगपद् उत्थिता । यदि भाः सदृशी सा स्यात् भासस् तस्य महात्मनः ॥" परंतु तेजांच्या ह्या कोटीच भिन्न आहेत. त्यांची तुलनाच होऊं शकत नाहीं. म्हणून सहस्र, लक्ष आणि कोटि कोणतीहि संख्या तिथें अकिंचित्करच होय. आत्मतेजाची बरोबरी कोणतेंहि जड तेज करूंच शकत नाहीं. खरोखर तें निरुपम आहे, अनुपम आहे, अप्रतिम आहे.

इथें अभानु:असाहि पाठ घेतां येईल तरी अर्थांत फरक पडावयाचा नाहीं. न भानुः प्रकाशकः यस्मात् स अभानुः असा त्याचा विग्रह होईल. भौतिक सूर्य हा भूलोक, अंतरिक्षलोक आणि नक्षत्रलोक सर्वांचें प्रकाशन करतो म्हणून त्याची उपमा चित्सूर्याला दिली जाते : "यथा प्रकाशयत्येकः कृत्स्नं लोकं इमं रविः। क्षेत्रं क्षेत्री तथा कृत्स्नं प्रकाशयति भारत ॥" परंतु वस्तुतः सूर्य कृत्स्न-प्रकाशक नाहीच. तो केवल पृष्ठभागच प्रकाशित करतो, तो हि संपूर्ण नाहीं. जेवढा तदभिमुख असेल तेवढाच. असा अकृत्स्नप्रकाशक भानु नाहीं परमात्मा, म्हणून तो अभानु होय. परमात्म्याहून अधिक प्रकाशक कृत्स्न-प्रकाशक कोणी नाहीं म्हणून हि तो अभानु होय.

सूर्य दिवसां प्रकाशतो, चंद्र रात्रीं. परंतु रात्रंदिवस निरस्त निरुदय अखंड प्रकाशणारा एक परमात्माच आहे. म्हणून तो भानु होय. नित्यभानु होय.

## २८५. शशबिन्दु

शशबिन्दु म्हणजे शश-लांछन चंद्रमा. सूर्य आणि चंद्र ही जोडी आहे. पूर्वी हि ती येऊन गेली आहे. पण तिथें ती चंद्रांशु भास्करद्युति अशी गुणवाचक आली आहे. इथें ती प्रत्यक्षच आली आहे. सूर्य ही पराक्रमाची मूर्ति आहे, देवता आहे, चंद्र ही सौंदर्याची मूर्ति आहे, देवता आहे. शारीरिक आणि आंतरिक असा उभयविध ओजोगुण जिथें जिथें प्रकटतो तिथें तिथें सूर्यतत्त्व जाणावें. जिथें जिथें शारीरिक आणि आंतरिक श्रीगुण प्रकटतो तिथें तिथें चंद्रतत्त्व ओळखावें. प्रखर पराक्रम आणि बुद्धिमत्ता हें सूर्यतत्त्व होय. मनोज्ञ रूप आणि मनोज्ञ गुण, शुचिता प्रांजलता, प्रेमळता इत्यादि, हें चंद्रतत्त्व होय. मानवी जीवन या दोन तत्त्वांनीं संपूर्ण होतें. जीवनाच्या नाण्याच्या ह्या दोन बाजू आहेत. या दोन तत्त्वांचे प्रतिनिधि म्हणजे पुरुष आणि स्त्री. ही जोडी होय. दोहों मिळूनच मानव-जीवन पूर्ण होतें. त्यांत प्रधान आणि गौण असा भेद नाहीं. हा उभयपदप्रधान द्वंद्व समास आहे. ज्याच्या ठाईं ओज आणि श्री हीं शंभर टक्के प्रकटतात तो पूर्णावतार होय. तो पुरुषोत्तम होय. आतांपर्यंत जितके अवतार होऊन गेले ते सर्व पुरुषच आहेत. परंतु पुरुषच असले पाहिजेत, स्त्री असूं शकणार नाहीं, असें नाहीं. "वन्दे मातरम्" म्हणून आम्ही जिचें नमन आणि स्तवन करतो ती शक्तिदेवी अशी पूर्णावतार आहे, पुरुषोत्तमच आहे.

सूर्य प्रकाशक आहे, तर चंद्र प्रकाशित आहे. म्हणून इथें शशबिंदु नामानें प्रकाश्य विश्व असा अर्थ घ्यावयाचा.

भानु हा विश्वभानु आहे तसा शशबिंदु म्हणजे चंद्र हा विश्वचंद्र आहे, विश्वरूप प्रकाश्य आहे. जें जें चित्-तेजानें चेततें, प्रकाशित होतें तें तें सारें चित्त होय, चंद्ररूप होय.

## २८६. सुरेश्वर

**सुखं रान्ति ददति इति सुराः । तेषां ईश्वरः प्रभुः सुरेश्वरः ।**

जे सुख देतात ते सुर आणि त्या सुरांत श्रेष्ठ तो सुरेश्वर होय. सद्गुण सुखास कारण होतात आणि अवगुण दुःखास. म्हणून सद्गुण हेच सुर म्हणावे. सर्वच सुख सारखें नसतें. कांहीं सुख आभासिक तर कांहीं खरें असतें. इथें जें खरें सुख आहे तें घ्यायचें. ज्याचा परिणाम सुखावह तें खरें सुख म्हणायचें. ज्याचा परिणाम दुःखरूप तें सुख नसून सुखाचें सोंग म्हणावें. म्हणून म्हटलें आहे–

**अभ्यासाद् रमते यत्र दुःखान्तं च निगच्छति ।**
**यत् तद् अग्रे विषमिव परिणामेऽमृतोपमम् ।**
**तत् सुखं सात्त्विकं प्रोक्तं आत्मबुद्धि-प्रसादजम् ।।**

मी देह नसून नित्यशुद्धबुद्धमुक्तस्वभाव आत्मा आहें असें भान जसजसें होत जातें तसतसें सुख म्हणजे दुःखनिवृत्तिरूप निजानुभव माणसाला होत असतो. या परम सुखाचा स्वामी तो सर्वांचा स्वात्मा परमात्मा होय. म्हणून तो सुरेश्वर म्हटला आहे. 'सर्वं परवशं दुःखम्।' जें जें पराधीन तें तें सर्व दुःखरूप होय. दुःखाची अशी व्याख्या असल्यामुळें आणि स्वात्म्याहून अधिक स्वाधीन दुसरें कांहीं नसल्यामुळें विवेकानें अनात्ममात्राचा त्याग हेंच परम सुख होय. हाच अलभ्य लाभ आहे. हा सर्व 'सुखाचें आगर। बाप रखुमादेवीवर' अलभ्य आहे. कारण तो सर्वदा सर्वोपलब्धच आहे. हें लक्षांत न येणें हीच माया होय. हीच मोहिनी.

या श्लोकार्धांत अमृतमंथनाची आख्यायिका आली आहे असें म्हणतां येईल. त्यांतील समुद्र, चंद्र, सूर्य, अमृत आणि मोहिनी रूप धारी सुरेश्वर विष्णु हीं बरींच मुख्य पात्रें इथें गोळा झालीं आहेत. मोहिनीनें असुरांना वंचित करून सुरांना अमृतलाभ करून दिला आहे. जे विषयसुख-मोहिनीला भुलले ते असुर आत्मसुखामृताला मुकले. हेंच भगवंताचें मोहिनी रूप होय. जो भगवंताला भजतो तो सुर मोहिनीला न भुलतां 'अमृतत्वाय कल्पते'.

## २८७. औषध

औषध म्हणजे रोगहर द्रव्य. जें जें रोगहरण करतें, तें तें सारें औषधच होय. अशा प्रकारें पाहूं जातां "नास्ति मूलमनौषधम्" असें म्हणावें लागतें. म्हणजे असंख्य रोग आणि त्यांचीं असंख्य औषधें झालीं. पण हा शाखाभेद झाला. मूल तर एकच असलें पाहिजे. हें मूल कोणतें ? तें तोडलें कीं सर्वच शाखा तोडल्या जाणार. निसर्गोपचारक सर्व रोगांचें मूळ विजातीय द्रव्य मानतात आणि त्याच्या निष्कृतीचा उपचार करतात. इथें एक रोगमूल शोधलें जातें आणि त्याचा एक मूलोपचार होतो. स्थूलाचें सूक्ष्म, व्यक्ताचें अव्यक्त कारण मानावें लागतें. म्हणून भौतिक रोगांचें मूळ आध्यात्मिक वा आंतरिकच होय. तें सूक्ष्म आणि अव्यक्त असें सर्व रोगांचें मूळ कारण उर्फ निदान म्हणजे अज्ञान होय. हें अज्ञान म्हणजे अध्यास होय. अतद् चा तद् वर आरोप. हें हि विजातीय द्रव्यच म्हणावयाचें. हें विजातीय द्रव्य दूर केलें म्हणजे स्वगत स्वास्थ्य अनामय स्वरूप, प्रकट होतें. म्हणून अध्यास-निराकरणरूप स्वरूपोपलब्धि-विचार हें औषध झालें. यालाच तत्त्वज्ञान म्हणजे तत्त्वाचें तत्त्वतः ज्ञान म्हणतात. तें जाणून ज्ञाता तज्ज्ञ नाहीं होत, तर तद्रूपच होतो. "भवति ब्रह्मैव, न ब्रह्मविद्" विष्णुसहस्रांतील प्रत्येक नाम हें असें तत्त्वदर्शन असल्यामुळें तें औषधच आहे. तें एकच सहस्रावधि रोगांचें निर्मूलन करतें मग सहस्रावधि नामें कशाला ? तीं रुचिभेदासाठीं आहेत आणि दुसरें म्हणजे ईश्वराचें अनन्तत्व द्योतित करण्यासाठीं होत. अमृताच्या एका बिंदूनेंच अमरत्व प्राप्त होतें तरी परमात्मा हा अमृत-सिंधु होय. बिंदूंत जेवढें सामर्थ्य आहे, त्याहून सिंधूंत

अधिक नाहीं. तो बिंदुच सामर्थ्याचा सिंधु होय. म्हणून इथें इयत्ता नाहीं. इथें आहे केवळ केवलता. परमात्मा भवमहारोगाचें औषध असल्यामुळें तो सर्वच रोगांचें औषध होय, प्रधानमल्लनिबर्हणन्यायानें औषध म्हणजे नुसतें रोगहर द्रव्यच नव्हे, तर मुख्यतः औषध म्हणजे ओषधिज अन्न होय. त्याचें औषधवत् सेवन हेंच रोग-निवारण आहे. औषधवत् म्हणजे हित मित नियमित.

## २८८. जगतः सेतु

सेतु म्हणजे बांध, पाळ ''स एष सेतुर् विधरणः, एषां लोकानां असंभेदाय।'' हा परमात्मा हे लोक फुटून जाऊं नयेत म्हणून त्यांना एकत्र धरून ठेवणारा बांध आहे, असें म्हटलें आहे श्रुतीनें. हा बांध कोणता ? ही पाळ कोणती ? कोणी म्हणतात, काम ही ती पाळ आहे. हें जग 'काम-हैतुक' आहे. कामप्रेरणेनें तें टिकून आहे. जीवांचे सर्व संबंध हे काममूलक आहेत. कामपूर्तीसाठीं ते एकमेकांना धरून आहेत. दुसरे कोणी म्हणतात, हें जग सर्व आर्थहैतुक आहे. त्याच्या सर्व संबंधांच्या मुळाशीं, व्यवहारांच्या मुळाशीं अर्थ हेतु आहे. तुमची कामपूर्ति ही अर्थाधीन आहे आणि धर्मपूर्ति हि तदधीनच. म्हणून हें जग अर्थमूल आहे, अर्थप्रधान आहे. अर्थच त्याचा सेतु आहे. दुसरे कित्येक धर्मवादी म्हणतात धर्मच जगाचा सेतु आहे. अर्थ काम ह्या प्रेरणा नाहींत असें आम्ही म्हणत नाहीं. त्या प्रबल नाहींत, असें हि आमचें म्हणणें नाहीं. परंतु त्या नियामक नाहींत किंवा शाश्वत हि नाहींत. जगांत जे थोर झाले ते कामाढ्य वा अर्थाढ्य लोक नव्हत, तर ज्यांनीं अर्थकामांना तिलांजलि दिली ते धर्मप्राण ऋषि मुनिच होत. त्यांच्याच चरणीं सेठ सावकार आणि राजे महाराजे नम्र होत आले आहेत. धर्मचिंतनासाठीं धनसंपत्ति आणि राज-वैभव सोडून वनवासी झाले आहेत. अर्थात् धर्मच लोकांना एकत्र टिकवून धरणारा बांध आहे. धर्म नसेल तर आई मुलाला, मुलगा आईला पोसणार पाळणार नाहीं. समर्थ असमर्थाला जगूं देणार नाहीं. परंतु जग जगत आहे, कारण धर्म सर्वांचें धारण करीत आहे. अर्थात् जीवनाचा हेतु नि जगाचा सेतु धर्मच आहे. वस्तुतः हे तिन्ही पुरुषार्थच आहेत आणि त्यामुळें ते तिन्ही सेतुच होत. भारा एका बंधानें बांधला जात नाहीं. त्याला दोन तीन बंध बांधावे लागतात तेव्हां तो नीट बांधला जातो. जीवनाचा भारा हि तसाच एकामागून एक अनेक बंधांनीं सुबद्ध झाला आहे. हे तिन्ही पुरुषार्थ काम अर्थ आणि धर्म जगाचे सेतु होत. त्याच्यावर जग टिकत आहे. एक ढिला पडला तर दुसरा आवळून धरतो. जीवनाला तो सुटूं देत नाहीं, फुटूं देत नाहीं. अशा प्रकारें पुरुषार्थमात्र जगाचा सेतु होय, बांध होय. आंणि कोणत्याहि पुरुषार्थाचा आश्रय स्वतः पुरुष म्हणजे आत्मा असल्यामुळें अन्ततो गत्वा परमात्मा हाच या जगाचा सेतु होय. सेतु म्हणजे उत्तारण-साधन पूल. म्हणून तो मोक्षस्वरूप मोक्षदाता आहे.

## २८९. सत्यधर्म-पराक्रम

सत्यधर्म हाच ज्याचा पराक्रम आहे तो परमात्मा सत्य-धर्मपराक्रम होय. सत्यधर्म हा स्वरूपतःच अपराजेय आहे. त्यामुळें त्याचा विरोध करणारा प्रत्येक पराजित झाल्याशिवाय रहायचाच नाहीं. अशी ही सत्याची सत्ता आहे. सत्याची सत्ता म्हणजेच सत्य-धर्म. जगांत एक सत्याचीच सत्ता चालते. असत्याची सत्ताच असूं शकत नाहीं. मग ती चालणार कशी ? म्हणूनच म्हटलें आहे :—

**''नासतो विद्यते भावो नाभावो विद्यते सतः ।**
**उभयोरपि दृष्टोऽन्तस् त्वनयोस् तत्त्वदर्शिभिः ॥''**

**''सत्यमेव जयते नानृतम्'' याचाही आशय हाच.**

ईश्वर हा सत्यस्वरूप आहे. त्यामुळें त्याचा धर्म म्हणजे तत्त्व आणि पराक्रम म्हणजे कार्यरूपानें होणारा आविष्कार सत्य म्हटला आहे. ज्याचें अव्यक्त आणि व्यक्त रूप सत्य आहे तो सत्य-धर्म-पराक्रम होय.

ईश्वरानें जो आदेश दिला आहे, ईश्वरनिष्ठांनीं जो उपदेश दिला आहे तो धर्म होय. त्यांनीं त्याच्या सिद्धीसाठीं, स्थापनेसाठीं जो उद्योग केला आहे तो पराक्रम होय. वेद, उपनिषदें, गीता, मनुस्मृति, भागवत इत्यादि वाङ्मय धर्म होय. परमेश्वरानें धर्मसंस्थापनेसाठीं असंख्य गृहस्थागृहस्थ

सत्पुरुषांसह वेळोवेळीं अवतार घेऊन जो अधर्माचा पाडाव आणि धर्माची स्थापना केली अर्थात् दुष्टांना शासन करून धर्मनिष्ठ सज्जनांना सत्तेवर आणलें तो सगळा उद्योग म्हणजे पराक्रम होय. त्या ईश्वरी पराक्रमाचे, धर्म-संस्थापनेचे पोवाडे म्हणजे पुराणें होत. ईश्वराचे नवच अवतार झाले आहेत आणि खरें म्हणजे नवनवच अवतार होत आले आहेत आणि होत राहणार आहेत. परमात्मा हा असा नवावतार आहे. नवाची ही खुबी दशमध्यें नाहीं शतमध्यें नाहीं नि दशशत मध्येंहि नाहीं. नवेतर कोणत्याच संख्येंत नाहीं ती. तो नित्य नवावतार आहे.

## २९०. भूतभव्यभवन्-नाथ

पूर्वीं भूतभव्यभवत्-प्रभु हें नाम येऊनच गेलें आहे इथें तेंच प्रभुऐवजीं नाथ शब्दाच्या फरकानें आलें आहे. दोहोंत तसा कांहीं भेद नाहीं. परंतु नाथ शब्दानें भूत भव्य भवत् हें अनाथ आहे असें सूचित होत आहे. पूर्वीं होऊन गेलेलें जीवन, वर्तमान जीवन आणि आगामी जीवन म्हणजेच भूत, भवत् आणि भव्य जीवजात होय. या समग्र जीवनाचा पालक पिता तो परमात्मा आहे. जगांत दोनच कोटी दिसून येतात. एक जीव आणि दुसरी अजीव. दोहोंचा हि स्वामी परमात्मा आहे. जगांत जे धनी आहेत त्यांचें हि धन द्विविध आहे एक स्थावर आणि दुसरें जंगम. जमीनजुमला ही स्थावर मालमत्ता झाली. हयगजरथपदाति ही जंगम मालमत्ता झाली. परमात्माहि तसाच स्थिर-जंगमांचा स्वामी आहे. नाथ शब्दानें जीव-संघाचें, भूतकालीन भविष्यत्कालीन आणि वर्तमानकालीन जीवजाताचें, स्वामित्व सूचित होतें. प्रभु शब्दानें भूत भव्य भवत् भुवनांचें, अजीवजाताचें स्वामित्व सूचित होतें. लोक शब्द जीवजात आणि (भुवनरूप अधिष्ठानजात वा) अजीवजात या दोहोंचा हि निर्देश करतो. अशा प्रकारें परमात्मा हा उभयविध धनाचा धनी आहे. केव्हां केव्हां धन शब्द चराचरांना समाविष्ट करून घेतो, केव्हां केव्हां चर वर्जनपूर्वक केवळ स्थावर वा अचर संपत्तीचा तो वाचक असतो. तसा जेव्हां तो केवळ स्थावर वा अजीव संपत्तीचा वाचक असतो तेव्हां त्याच्या बरोबर जन शब्द जोडला जातो समग्र धनाचा उल्लेख करण्यासाठीं. उदाहरणार्थ "सकळ जनधनाचा कोण संतोष आहे" इत्यादि लोकशब्द हि तसाच विशिष्ट वा समग्र अर्थानें वापरला जातो. सारांश प्रभु शब्दानें भुवनाधिपत्य सूचित होतें तर नाथ शब्दानें जीवजातपालकत्व सूचित होतें असें समजावयाचें. भूत भव्य भवत् या कालक्रमांत वर्तमान (भवत्) हा निकट आणि मुख्य म्हणून तो मुख्य अशा उत्तरपदाला जोडून घेतला आहे. आणि भूत व भविष्यत् मागें पुढें राहणारे काळ बाजूला काढले आहेत, असा सूक्ष्म विवेक समजून घ्यावयाचा आहे.

## २९१. पवन

पू म्हणजे शुद्ध करणें, स्वच्छ करणें, ह्या धातुपासून पवन शब्द आला आहे. अर्थात् पवन म्हणजे स्वच्छ, पवित्र करणारा. प्राण रक्त शुद्ध करतो. वाऱ्यानें भूस उडून दाणा चोख होतो म्हणून मुख्यतः वाऱ्याला पवन हें नाम मिळालें आहे. वायूनें धूळ धूर उडून जाऊन भूमि आणि अग्नि स्वच्छ व उज्ज्वल होतात. वायूच्या योगें आकाश निरभ्र आणि पाणी निर्मल (निःशैवाल) होतें. स्वतः वायु निर्गंध आहे. तो दुर्गंध आणि दुःसह सुगंध हि दूर करून सौम्यता आणतो. सर्वांस सुखवितो. म्हणून हि तो पवन होय, पवित्रता-कारण होय. दुःखमात्र मल होय, दोष होय. तो दुःखदोष पवन उडवून लावतो. तो स्वतः अनिकेत निःसङ्गपणें सर्वत्र संचरत राहतो आणि त्यामुळें हि तो जवन म्हटला आहे, पवन म्हटला आहे. तो अनिकेत परिव्राजकच आहे. परिव्रज्येमुळें तो निर्मल राहतो आणि इतरांना हि निर्मल करतो. असा तो उभयतः अन्तर्बाह्य, निर्मल आहे, निर्मल करणारा आहे. म्हणूनच गीतेंत म्हटलें आहे : "पवनः पवतां अस्मि" शोधन करणाऱ्या तत्त्वांत मी पवन आहे. भूमि, जल, अग्नि आणि आकाश हीं चारी महाभूतें पवित्रता देणारीं, शुद्धि करणारीं आहेत. परंतु ह्यांना हि विशुद्धि देण्याचें कार्य वायु करतो. म्हणूनच तो भगवद्विभूति म्हणून गौरविला आहे. खरोखर तो

नित्य-शुद्ध-बुद्ध-मुक्त-स्वभावच आहे. त्यामुळेंच तर ईशोपनिषदांत जीवाची उत्क्रांति 'वायुः अनिलं अमृतम्' अशा शब्दांत सूचित केली आहे. त्यांत पवनत्वच मुख्यतः प्रकट झालें आहे. मेल्या देहाचा लेप चिकटा गेला, मग उरला तो केवळ निर्मल निश्चल पवन. तिथें मृत्यूचा लव नाहीं, लेश नाहीं. म्हणून तोच अमृत. असा हा पवन परमात्म्याहून वेगळा कोण बरें असणार ? तो परमात्माच पवन होय, जो सर्वांतर्यामी वास करून त्यांना पवित्र करीत असतो. सर्व देह आणि देहकारण हें भुसकट उडवून लावतो आणि त्यांतील दाणा आत्मा वेगळा काढून तो तुमच्या हातीं देतो. म्हणून पवन हा परमात्माच होय. परमात्माच पवन होय.

## २९२. पावन

**पवते इति पवनः । पावयति इति पावनः ।**

पवन म्हणजे पवित्र करणारा तर पावन म्हणजे पवित्र करविणारा. पवन नामाच्या विवरणांत आपण पाहिलें कीं पवन हा भूमि, जल, प्रकाश आणि आकाश यांना निर्मल आणि उज्ज्वल करतो. पण तो त्यांनाच निर्मल करीत नाहीं. त्यांना इतरांना हि निर्मल करण्याची प्रेरणा देतो. प्रसन्न भूमि आपल्या प्रसन्नतेनें सर्वांनाच प्रसन्न करतें—जीवांना आणि अजीवांना. ते हि उलट आपल्या प्रसन्नतेनें इतरांना वा परस्परांना प्रसन्न करतात. सदर प्रमाणेंच जल, प्रकाश आणि आकाश यांची प्रसन्नता सर्वत्र परावर्तित होते, प्रतिबिंबित होते आणि सर्वांच्या सार्वत्रिक प्रसन्नतेला कारण होते. असा तो परमात्मा आपल्या स्वाभाविक पवित्रतेनें सर्वत्र पवित्रता पेरीत आणि प्रेरीत जातो. म्हणून तो पावन.

उपनिषदांत म्हटलें आहे : "भीषा अस्मात् वातः पवते". ह्याच्या धाकानें वायु वाहतो. म्हणूनहि तो पावन म्हणजे पळायला लावणारा,* धावायला लावणारा होय. ज्याचा जो स्वभाव आहे तो त्याला बदलतां येत नाहीं. गीतेंत म्हटल्याप्रमाणें "स्वभावजेन कौन्तेय निबद्धः स्वेन-कर्मणा". प्रत्येक जीव, प्रत्येक भूत आपल्या स्वभावधर्मानें बद्ध आहे. हा जो स्वभाव तो त्या परमात्म्याचा आदेशच होय. कारण तो परमात्मा सर्वान्तर्यामी आहे. सर्वांचा स्व आहे, सर्वस्व आहे. "ठेविलें अनन्तें तैसेंचि रहावें । चित्तीं असों द्यावें समाधान" याचाहि अर्थ हाच आहे. स्वाभाविक प्रेरणा ही ईश्वरी आज्ञा होय. तिच्या विरुद्ध जो वागेल तो ईश्वराचा मत्सर करणारा होय.

**ये मे मतं इदं नित्यं अनुतिष्ठन्ति मानवाः ।**
**श्रद्धावन्तो ऽनसूयन्तो मुच्यन्ते ते ऽपि कर्मभिः।।**
**ये त्वेतद् अभ्यसूयन्तो नानुतिष्ठन्ति मे मतम् ।**
**सर्वज्ञानविमूढांस्तान् विद्धि नष्टान् अचेतसः।।**

हा स्वभाव हा ईश्वराचा धाक होय. त्याच्या धाकानें जो तो आपआपल्या स्वभावधर्मानुसार वागत असतो. तसें वागायचा जो इनकार करील त्याचा तो व्यवसाय म्हणजे निश्चय मिथ्या होय. अवश होऊन जें स्वभावानुसरण तोच परमात्म्याचा धाक होय. त्याच धाकानें सूर्य प्रकाशतो, अग्नि जळतो, वारा वाहतो, मेघ वर्षतात, पर्वत स्थिर राहतात. या सर्व क्रियांचा कारक तो परमात्मा आहे, म्हणून पवन हि तो आहे आणि पावन हि तो आहे. तो कर्ता हि आहे आणि करविताहि आहे. मागील पवन आणि पुढील अनल या पदांवरून इथें पावन म्हणजे शुद्धिकारक तीर्थ-जल असा अर्थ अभिप्रेत दिसतो. जल मृगाला पळवितें म्हणून व तें व्युत्पत्तीनें हि पावन तर आहेच. हें सर्व पावन-जात परमात्माच आहे. कारण सर्व मळांत अविद्या हा महामल होय आणि तो पळवून लावणारा ज्ञानस्वरूप परमात्माच होय.

## २९३. अनल

पवन, पावन आणि अनल हा क्रम वात, कफ, पित्त या व्यष्टिगत आयुर्वेदीय त्रिदोषांची वा समष्टिगत वायु, जल आणि अग्नि या अन्तस्तत्वांची आठवण करून देतो. पंचमहाभूतांपैकीं हींच तीन पिंडगत वा ब्रह्मांडगत अशीं उत्पातकारी तत्त्वें आहेत. आकाश आणि भूमि हीं दोन महाभूतें आद्य आणि अन्त्य होत. या दोन अंतस्थ तत्त्वांच्या पुटांत वायु, जल आणि अग्नि हीं विरल, तरल आणि प्रबळ अशीं तत्त्वें अंतर्भूत होतात. म्हणून त्यांना मी अंतःस्थ तत्त्वें म्हणतों. हीं तत्त्वें आकाशाच्या ठाईं बीजरूपानें

अव्यक्त तर भूमीच्या ठाईं फलरूपानें व्यक्तविलीं आहेत. या तीन तत्त्वांच्या समाधानावर प्रकृतीचे स्वास्थ्य अवलंबून आहे. आकाश आणि पृथ्वी हीं टोकाचीं तत्त्वें क्रमशः अत्यंत सूक्ष्म आणि अत्यंत स्थूल अशीं असल्यामुळें तीं स्थिरप्राय आहेत. परंतु या दोन्ही टोकांमधलीं तत्त्वें चंचल आहेत. त्यांच्या चयापचयामुळें प्रकृति आंदोलत राहते. म्हणून या तीन अंतःस्थ धातूंची समाहितता वा समधातुता म्हणजेच स्वास्थ्य होय. आयुर्वेदाची तिवई या तीन तत्त्वांवरच उभी आहे. या तीन तत्त्वांवरच त्याची उभारणी झाली आहे. आयुर्वेदांत कफ, वात, पित्त असा स्थूल, सूक्ष्म आणि सूक्ष्मतर तत्त्वांचा वा धातूंचा क्रम आहे. तरल जल तत्त्वापेक्षां विरल वायुतत्त्व हें उघडच सूक्ष्म आहे आणि त्याहि पेक्षां सूक्ष्म अग्नितत्त्व आहे. तें विरलतर आणि तरलतर आहे. परंतु ह्या तत्त्वांचें आहार्य आविष्कार जल, वायु आणि अन्न होत. ते मात्र द्रवरूप, वायुरूप आणि घनरूप असे परस्परविभिन्न त्रिविध आहेत आणि त्यांत जो क्रम आहे तो यादृच्छिक आहे. त्यांचा क्रमच लावायचा झाला तर अन्न, जल, वायु असा लावावा लागेल. आणि तो स्थूल, सूक्ष्म आणि सूक्ष्मतर असा म्हटला पाहिजे. इथें अनल म्हणजे बाह्य ब्रह्मांडगत अग्नितत्त्व आणि आभ्यंतर पिण्डगत कायाग्निरूप पित्त तत्त्व होय. शरीरांत जेव्हां अन्नेन्धन अग्नि प्रदीप्त असतो तेव्हांच प्राणांचें चलनवलन विशेष होतें. तो मंद पडला कीं प्राण हि मंद पडतो. त्याचें चलनवलन क्षीण होतें. म्हणून अग्नि हा अनल म्हणजे अनवान् प्राणवान् म्हटला आहे. ज्या आत्मतेजाच्या आश्रयानें प्राण राहतो तें उघडच अनल म्हणावयाचें. म्हणून परमात्मा हा अनल होय.

भौतिक सृष्टींत जाळाचें फुरफुरणें आणि उन्हाळ्यांतील वावटळ आणि वादळ अग्नीचें अनलत्व, प्राणकर्षकत्व प्राणप्रचुरत्व सिद्ध करतात.

## २९४. कामहा

" कामहा....... प्रभु : " ह्या श्लोकार्धांत काम ही जी एक मूल मानवी वृत्ति आहे तिच्या विषयीं एक समग्र दर्शनच आलें आहे. काम इष्ट, अनिष्ट आणि मिश्र त्रिविध असूं शकेल. या त्रैविध्यामुळें त्याबाबत त्रिविध विचार संभवतो. इष्ट असेल त्याचा स्वीकार, अनिष्ट असेल त्याचा परिहार आणि मिश्र असेल तिथें इष्टापर्यंत स्वीकार आणि पुढें अस्वीकार वा परिहार. काम ही जर मूल वृत्ति मानली तर तिचा संपूर्ण परिहार म्हणजे निर्मूलन अशक्यच म्हणावें लागेल. म्हणून जे कामाचा समूळ त्याग करूं जातात त्यांच्या ठाईं अनेक विकृति निर्माण होतात. रोगोपचारांत असें वारंवार अनुभवास येतें. जिथें निदान न करतां केवळ बाह्य रोग लक्षणें दूर करण्याचा प्रयत्न केला जातो तिथें अनेक नवनवे रोग उत्पन्न होतात. परंतु जिथें रोगाचें निदान करून मुळांतून रोग नाहींसा करण्यासाठीं नवी विकृति निर्माण होणार नाहीं याची काळजी घेतली जाते तिथें रोगनिर्मूलन न झालें तरी रोगनिरोध होतो. निदान रोग-नियंत्रण होतें. त्यालाच उपचार म्हणावयाचें. तसें न करणें म्हणजे–" मर्ज बढता गया जों जों दवा की " अशी गत ओढवून घेणेंच होय. मग काम-हा म्हणजे काय ? तर अनिष्टकाम-हा, धर्मबाह्य कामाचें अनात्मकामाचें निर्मूलन करणारा.

भगवान् आत्मकाम आहे. जो कोणी अनात्मकाम सोडत नाहीं, भगवान् कालरूपानें त्याला तो सोडायला लावत असतो. भगवंताचें कालरूप हेंच काम-हा आहे. कालरूप भगवानच काम-हा आहे. परंतु आत्मकामना ही सदैव राहणारच. त्या आत्मकामनेचाच विविध आविष्कार म्हणजे नानाविध काम होत. ते सर्व काम हि पर्यायानें जीवाला आत्मकाम आणि आप्तकाम करून सोडीत असतात. कारण " आत्मनस्तु कामाय सर्वं प्रियं भवति " हा आहे सिद्धांत.

## २९५. कामकृत्

कालरूप भगवान् शेवटीं सर्वस्वाचा अपहार करतो, पण दरम्यान तो जीवांचें आप्यायन हि करीत जातो. चंद्राच्या कला प्रथम एकैकशः वाढत जातात आणि त्यांची पूर्णिमा झाल्यानंतर त्या त्याच क्रमानें घटत जातात. हें सर्व

कालाचेंच कर्तृत्व होय. जीवांचे हि तसेंच आहे कालबळानें तो वाढत जातो आणि क्षीण होतो परंतु हें कालकृत कौतुक अज्ञानामुळें तो ओळखीत नाहीं आणि वृथा अहंकार बाळगतो कीं मी वाढलों मी घटलों आणि त्या योगें हर्षशोकाभिभूत होत राहतो. माणसानें जर काळाचें हें सर्व-कर्तृत्व ओळखलें आणि त्याबरोबरच आपलें अकर्तृ अभोक्त स्वरूप हि, तर तो आत्मज्ञ झाला आणि सर्व अभिभवांतून सुटला.

काम-हा आणि काम-कृत् ही अशी जोड कल्पना आहे. जो कामकृत् तोच कामहा हि आहे. या कल्पनेंत इष्टानिष्ट काम असा विवेक नाहीं. सर्वच काम निपटून काढणारा तो कामहा. तसाच सर्वच काम पुरविणारा तो कामकृत् होय.

हा मौलिक वा तात्त्विक विचार झाला. व्यावहारिक विचारांत कामाचा इष्टानिष्टविवेक होतो. तो हि क्रमानें निष्कामता वा आत्मकामता साधायलाच उपकारक होतो. अर्थात् तत्त्वज्ञानोपकारीच असतो तो. तो प्रथम जिज्ञासा उत्पन्न करून मागाहून तिची पूर्तिहि करतो. तत्त्वज्ञान करून देत असतो. तत्त्वज्ञानानें एकाच वेळीं सर्वकाम-पूर्ति आणि आत्मोपलब्धि होत असते.

सर्वकाम-निवृत्ति हें आहे आत्मोपलब्धीचें स्वरूप. ह्याला शास्त्राध्ययन, संसारानुभव, आत्मचिंतन आणि शेवटी प्रयाणसाधना आप आपल्या परी हातभार लावीत असतात. चार आश्रमांची योजना एवढ्याचसाठीं आहे. सोपानाच्या सर्व पायऱ्या वरच्या भूमिकेवर जायलाच सहायक होत असतात. काम हि कामोल्लंघनाला उपकारक हि होतो. ही एक प्रकारें समचिकित्सा होय. गृहस्थाश्रम समचिकित्सा तर वानप्रस्थाश्रम विषमचिकित्सा होय. आहेत दोन्ही हि चिकित्साच.

### २९६. कान्त

कान्त म्हणजे कामनाविषय झालेला प्रिय आवडता. स्त्रीला पुरुष हा कान्त होतो, पुरुषाला स्त्री कान्त होते. स्त्रीपुरुष परस्परांना कान्त मानून भजतात खरे, परंतु खरोखर कान्त कोण असतो ? स्त्रीला पुरुष कान्त वाटतो तो, तो तिची कामनापूर्ति करीत असतो म्हणून होय. पुरुषाला स्त्री कान्त वाटते ती हि, ती त्याची कामनापूर्ति करीत असते म्हणूनच होय. पुरुषाला सुख मिळतें म्हणून स्त्री सुखी होत नाहीं किंवा स्त्रीला सुख मिळतें म्हणून पुरुष सुखी होत नाहीं, तर स्त्रीच्या योगें पुरुषाला आणि पुरुषाच्या योगें स्त्रीला सुख मिळत असतें म्हणून तीं सुखी होत असतात. अर्थात् कान्त हा स्त्री वा पुरुष नसून त्यांचा त्यांचा स्वात्माच खरा कान्त झाला. स्त्री-पुरुषांना परस्परांपासून इष्ट कामलाभ न झाला तर तीं असंतुष्ट आणि रुष्ट होतात आणि प्रसंगीं परस्परांच्या प्राणाचे पिपासु हि. अर्थात् आत्मेतर कोणीहि आणि कांहीहि कान्त नाहीं. एक स्वात्माच खरा कान्त आहे. त्यासाठींच सर्व कांहीं कान्त वाटत असतें. हेंच उपनिषदांनीं गार्गी-याज्ञवल्क्यसंवादांत, परोपरीनें विवरिलें आहे: ''न वा अरे पत्युः कामाय पतिः प्रियो भवति, आत्मनस्तु कामाय पतिः प्रियो भवति। न वा अरे जायायाः कामाय जाया प्रिया भवति आत्मनस्तु कामाय जाया प्रिया भवति ।'' इत्यादि. मीच जर मला अप्रिय झालों तर जगातील कोणतीहि वस्तु मला प्रिय होऊं शकणार नाहीं. आणि क्षणभर मानलें कीं अशी एखादी वस्तु प्रिय होऊं शकते तर ती वस्तुच आत्मा होईल. तुमचें परमप्रेमास्पद परम कान्त असें जें कांहीं आहे तेंच तुमचें निजरूप आहे, तोच आत्मा, तोच परमात्मा. म्हणून तो कान्त म्हटला आहे. हेंच परमात्म्याचें कान्तरूप आठवून संतांनीं तें परोपरीनें आळविलें आहे:–

**रूप पाहतां लोचनीं । सुख जालें वो साजणी**
**तो हा विठ्ठल बरवा । तो हा माधव बरवा**
**बहुता सुकृताची जोडी । म्हणुनी विठ्ठलीं आवडी**
**सर्व सुखाचें आगर । बाप रखुमादेवीवर ॥**

### २९७. काम

काम्यते इति कामः, जो कामिला जातो तो काम. जो कामना करतो तो कामी होय. भगवान् हा पूर्णकाम आहे. त्याला कशाची हि कमतरता नाहीं. ज्याला कशाची तरी

कमतरता, उणीव भासते तो तिची कामना करतो. जो पूर्णकाम आहे तो कशाची कामना करणार ? म्हणून तो निष्काम होय, निरिच्छ होय. जगांत ज्याच्या जवळ कांहींच नाहीं असा कोणी नाहीं. त्याच् प्रमाणें ज्याला कशाची हि ददात नाहीं असा हि कोणी नाहीं. त्यामुळें प्रत्येक जणच धनी आहे आणि अधिकाची कामना करणारा कामी हि आहे. हा जो प्रत्येकाच्या ठाईं काम आहे तो काय आहे ? तो म्हणजे अ-पूर्णाला पूर्ण होण्याची ओढ होय. जों पर्यंत ती पूर्णता प्राप्त होत नाहीं, तों पर्यंत ही ओढ, हा काम राहणारच. ज्या अर्थीं समग्रता, संपूर्णता हें परमात्मस्वरूप आहे त्या अर्थीं त्याचा प्रत्येक अंश हि तदवयवभूत तोच आहे. म्हणून कोणत्या हि गोष्टीचा काम हा शेवटीं पूर्णाचाच काम म्हणजेच परमात्म्याचा काम होय. म्हणूनच म्हटलें आहे, हे देवा, तूं गाय इच्छणाराची गाय होतोस, घोडा इच्छीणाराचा घोडा होतोस '' गोकामस्य गवायसे अश्वकामस्य अश्वायसे. '' सारांश, ज्याचा जो काम तो हे देवा, तूंच होतोस. अशा प्रकारें काममात्र परमात्म-स्वरूप च आहे. म्हणून तो काम होय. जीवाला आपली ही कामना पूर्णाची आहे, अपूर्णाची नाहीं हें कळत नाहीं. म्हणून तो शकलें गोळा करीत बसतो आणि सकळास मुकतो. ज्ञानी सकलास भजतो आणि पूर्ण कुंभ मिळवतो.

## २९८. कामप्रद

मागील नामचिंतनांत म्हटलेंच आहे कीं तो पूर्णात्मा ''गोकामाला गो आणि अश्वकामाला अश्व'' होऊन भेटत असतो म्हणून. त्याचा अर्थ, तो तो काम होऊन प्रभु भक्तांचा काम पुरवीत असतो. म्हणजे तो काम हि आहे आणि कामप्रद हि आहे. इतरत्र म्हणजे जीवाच्या व्यवहारांत दाता आणि दान द्रव्य वेगवेगळीं असतात. परंतु परमात्म्याच्या बाबत असा भेद नाहीं. तोच दाता हि आहे आणि दानविषय हि आहे.

परमात्मा परम वत्सल पिता आहे. तो आपल्या अपत्यांना त्यांच्या त्यांच्या आवडीचें भातुकें देत असतो. त्याला कोणी हेय नाहीं, सर्व समान उपादेय आहेत. सर्वांचा तो समादर करतो. '' चींटी को तो कन कन का, हाथी को मनका देनहारा '' आहे तो. तो सर्वात्मा सर्वांचा प्रियचिकीर्षु आहे. '' नहि गणयति क्षुद्रो जन्तुः परिग्रह-फल्गुताम् '' असें तो म्हणत नाहीं. त्याला जीवाचा स्वाभाविक विकास हवा आहे. म्हणून तो त्यांना विकासानुकूल क्रीडनकें देत असतो. तो महान् मनोविज्ञानी आहे. विरोधानें कामनिरोध होणार नाहीं तर दर्शनानेंच तो होईल हें त्याला पुरतें ठाऊक आहे. म्हणून तो बरें वाईट न म्हणतां सर्वांचे सर्व काम पुरवीत असतो. त्या कामांच्या अनुभवानें त्यांची निःसारता लक्षांत आली म्हणजे जीव आपोआपच त्यांच्यापासून विरत होईल, नुसत्या निषेधानें तें व्हायचें नाहीं. हें जाणून तो ते ते काम पुरवीत असतो आणि त्यांच्या पासून होणारा अपाय ज्याच्या त्याच्या अनुभवास पूर्ण आणून देत त्यांना स्वेच्छया त्यांपासून ती प्रतिनिवृत्त करीत असतो. त्याला सबूरी आहे. विकार मावळेल आणि सत्य प्रकाशित होईल याची त्याला पूर्ण खात्री आहे.

## २९९. प्रभु

परमात्मा हा समग्र संपूर्ण वा अंशी असल्यामुळें तो प्रभु होय. सर्व नद्यांचा पति समुद्र होय, सर्व किरणांचा स्वामी सूर्य होय. नद्या किरणें हीं अंशरूप होत म्हणून तीं अंशीला, समुद्राला, सूर्याला भेटायला धडपडत असतात पाण्याच्या उसळ्या आणि ज्वालांची धडपड आपल्या अंशीला भेटण्यासाठीं चाललेली असते. त्याप्रमाणें सर्व जीवांची आणि जगतांची सारी धडपड प्रभूला, आपल्या समग्रतेला, संपूर्णतेला, भेटण्यासाठीं चाललेली आहे. तुमचा कामना-विषय तुमच्यावर प्रभुत्व गाजवीत असतो. परमात्मा हा तसा सर्वांचा कामना-विषय असल्यामुळें तो सर्वांचा प्रभु होय. '' कामहा कामकृत् कान्तः कामः कामप्रदः प्रभुः '' या श्लोकार्धांतील हा शेवटचा शब्द आहे. तो त्या संगतींत वाचला म्हणजे त्याचा अर्थ होतो कीं तो कर्तुं अकर्तुं अन्यथा कर्तुं समर्थ असा प्रभु आहे. तो काम आहे, कामकृत् आहे, कामप्रद आहे, आणि कामहा हि तोच कान्त परमात्मा आहे. तो कामस्वरूप असल्यामुळें सर्व त्याचीच कामना करतात पण आपण त्या पूर्णात्म्याची कामना करीत आहोंत हें

ओळखत नाहींत. तोच त्यांचे नाना काम होऊन त्यांना ते देत असतो. अर्थात् तो नुसता कामप्रदच नाहीं तर कामकृत्हि झाला आणि कामकृत् व कामप्रद असल्यामुळें तो सर्वांचा कान्त झाल्यास नवल नाहीं. परंतु तो एवढ्यावरच थांबत नाहीं. सर्व कामांचा विघात हि तो करतो. कारण त्याला जीवांना सदैव कामनांचीं शितें वेचत ठेवावयाचें नाहीं. तो त्यांना आपल्या प्रमाणें पूर्ण आणि पूर्णकाम पाहूं इच्छितो. म्हणून तो जीवांना सर्व कामांचें अनित्यत्व आणि दुःखरूपत्व सतत प्रत्ययास आणून देत राहतो आणि अशा प्रकारें तो त्यांना आत्मवान् बनवून आपलें प्रभुत्व प्रगट करीत असतो. "आपुली पदवी सेवकास द्यावी । तो एक गोसावी पांडुरंग।" प्रभु म्हणजे स्वामी आपल्या सेवकांना विपुल भृति आणि वेतन देऊन सुखी करतील, परंतु ठेवतील सेवकच, त्यांना स्वामी नाहीं होऊं देणार. परंतु परमात्मा हा असा प्रभु आहे कीं तो सेवकांना सेवक राहूंच देत नाहीं. त्यांना तो आपल्यासारखेंच प्रभु करतो. म्हणून तो प्रभु. असा प्रभु दुसरा नाहीं.

### ३००. युगादिकृत्

विष्णु सहस्रांत भगवंताचें विश्वेश्वरत्व द्योतित करण्यासाठीं वारंवार स्थल आणि काल यांचा तो स्वामी आहे अशा आशयाचीं नामें येतात. त्यांपैकींच युगादिकृत् आणि पुढील युगावर्त हीं नामें होत. विश्वांत आपल्याला हींच दोन परिमाणें, दिक् आणि काल, दिसून येतात. कोणती हि घटना कुठल्या तरी काळीं आणि कुठल्या तरी स्थलीं झालेली असते. जिला काल नाहीं आणि स्थल हि नाहीं अशी घटना संभवत नाहीं. म्हणून हीं दोन परिमाणें ह्या व्यक्त विश्वाची झालीं आणि ह्यांचा जो स्वामी तो अव्यक्ताक्षर विश्वेश्वर होय. तो स्वतंत्र आहे. दिक्कालांच्या बधनांत तो येत नाहीं. म्हणून त्याला अनन्त असें म्हणतात. देशतः हि अनन्त आणि कालतः हि अनन्त. ज्या घटना, ज्या गोष्टी देशकालबद्ध आहेत त्यांनाच कार्यकारणभाव लागू होतो. परंतु जी वस्तु दिक्कालातीत आहे तिला कार्यकारणभाव लागू पडत नाहीं. ती अमुक एका कारणापासून झाली आणि तिचें अमुक एक कार्य आहे असें म्हणतां येत नाहीं. तसें दाखवितां आल्यास ती हि सावयव आणि साद्यन्त ठरेल. परमात्मा हा तसा नाहीं. म्हणून तो सर्व दिशांचा, लोकांचा आणि सर्व कालांचा स्वामी आहे. त्यानेंच युगादि म्हणजे युगारंभ केलेला आहे असें म्हणावयाचें. कारण दुसरा कोणी तो करूंच शकत नाहीं. जो कोणी तो करील तो अव्यक्त आणि अक्षरच असणार आणि अशी अव्यक्तें आणि अक्षरें अनेक मानण्यांत कांहीं मतलब नसल्यामुळें एक परमात्माच सर्वेश्वर म्हटला पाहिजे, यांतच कल्पना-लाघव आहे.

## शतक चवथें

### ३०१. युगावर्त

युगादिकृत् आणि युगावर्त ही जोड कल्पना आहे. जो युगाचा आरंभ करतो तोच त्याची समाप्ति हि करतो. तो कालस्वरूप परमात्मा क्षणलवनिमेषादि आणि युगमन्वन्तर कल्पान्तावधि कालांशांची कलना म्हणजे गणना करीत असतो. तो त्यांचा आरंभ हि पाहतो आणि समाप्ति हि पाहतो आणि अशा प्रकारें त्यांची कलना करीत असतो. म्हणून तो युगादिकृत् म्हणजे कालारंभ करणारा तसा युगावर्त म्हणजे कृतादि युगांची आवर्तनामागून आवर्तनें करणारा अर्थात् त्यांची मोजदाद करणारा म्हटला आहे. शेतकरी जसा पेरणी करतो आणि कापणी हि करतो आणि हा क्रम चालवीत राहतो. त्याप्रमाणें परमात्मा कालांशांची पेरणी करतो, त्यांची कापणी करतो आणि अशी कालांची पिकांमागून पिकें घेत राहतो. त्यानें आतां पर्यंत किती कला म्हणजे कालांश सवंगले ते कोण सांगू शकेल ? म्हणून त्याला नुसतें युगावर्तच म्हणावयाचें. युगांची किती आवर्तनें त्यानें केली ती त्याची त्यालाच ठाऊक ! युगचतुष्कापैकीं सध्यां अंतिम कलियुग चालू असून त्याचीं २७ युगें झालीं आहेत आणि २८ वें चालू आहे. अशी गणकांची गणना आहे. या गणनेंत पुनः मानव कालगणना आणि दैव कालगणना हा हि भेद आहे.

सहस्रयुगपर्यन्तं अहर् यद् ब्रह्मणो विदुः।
रात्रिं युगसहस्रान्तां ते ऽहोरात्रविदो जनाः ॥

अर्थात् मानवाचीं सहस्रयुगें झालीं म्हणजे ब्रह्मदेवाचा कुठें एक दिवस होतो आणि तेवढींच युगें म्हणजे त्याची

रात्र असें हें अनाद्यनन्त कालचक्र ज्याच्या प्रेरणेनें सतत फिरतेंच आहे तो परमात्मा युगावर्त होय.

३०२. नैकमाय

माया म्हणजे वस्तु-स्वरूपाचें अदर्शन, अवास्तव दर्शन, वास्तव दर्शन एकच असणार. कारण वस्तु एक आहे. परंतु तिचीं अवास्तव दर्शनें वा अन्यथा दर्शनें नैक म्हणजे एकरूप नसणारीं अशीं कैक असणार. म्हणून परमात्मा हा नैकमाय म्हटला आहे. "इन्द्रो मायाभिः पुरुरूप ईयते" असें वेदवचनच आहे. इन्द्र म्हणजे परमात्मा हा आपल्या मायाशक्तीच्या योगें बहुरूप दिसतो. जसा नट नाना मुखवटे घालून नाना सोंगें आणतो तसा तो एकच परमात्मा आपल्या स्वरूपापलापकारी शक्तीमुळें नानारूप दिसतो. परमात्मा म्हणजे वस्तु ही तिच्यावर भासमान होणाऱ्या नाना रूपांचा आधार असल्यामुळें तिला मायावी वा नैकमाय म्हणायचें, परंतु तत्वतः ती वस्तु स्वरूपापलापकारी नव्हेच. द्रष्ट्याचा तो दृग्भ्रम होय, ज्याचा आरोप त्या वस्तूवर केला जातो. अंधारांत एक खुंट आहे. तो कोणाला भूत वाटेल, कोणाला पुरुष, कोणाला स्त्री. पण खुंट हा सदैव खुंटच असतो. तथापि, त्या नाना मिथ्या आरोपांचा आश्रय तो होत असल्यामुळें त्याला नैकमाय म्हणावयाचें. या नैक आरोपांत स्वरूपाचें अदर्शन हा सर्वत्र समान असलेला प्रकार तो तिरोभाव होय आणि त्यांत जो अन्यथा दर्शनाचा प्रकार तो विक्षेप भाव होय. या मायेच्या द्विविधतेमुळे हि परमात्मा हा नैकमाय म्हणतां येईल. मायावी अदृश्य होतो आणि अदृश्य होऊन नाना भयानक सोंगें हि आणतो. अशा द्विविध रूपानें तो आपली माया दाखवीत असतो. म्हणून तो नैकमाय होय. ज्याला साक्षात्कार हवा आहे, दर्शन हवें आहे त्याला हा मायामय अन्तरपट दूर सारावा लागतो.

३०३. महाशन

महत् अशनं यस्य सः महाशनः। ज्याचें खाणें मोठें तो महाशन होय. वैश्वानररूप परमात्मा सर्व अन्न पचवून टाकीत असतो म्हणून तो महाशन म्हणावा. प्राणिमात्राच्या ठाईं जो जठराग्नि वास करतो आहे तोच वैश्वानर होय. तो विश्वांतील अन्नजात पचवीत आला आहे आणि पुढें हि तोच पचविणारा आहे. म्हणून तोच महाशन म्हणावयाचा. या वैश्वानर परमात्म्याला मी आहुति देत आहें, असें म्हणून जो जेवतो वा जेववितो तो यज्ञकर्ता होय. त्याचें तें उदरभरण नोहे, तें यज्ञकर्म जाणिजे. या यज्ञकार्याला समिधा आणि आज्य पुरविणारें जे शेतकरी, कामकरी इत्यादि ते हि त्या भावनेनें कार्य करतील, तर यज्ञकर्तेच म्हणावे. त्यांचें तें अन्नोत्पत्तिरूप कर्म "तदर्थीय" असल्यामुळें तें हि यज्ञकर्मच होय. यज्ञांत मुख्यतः आज्याहुति द्यायची असते. त्यासाठींच जेवतांना भातावर अन्नशुद्धि घालावी लागते. "उदरभरण नोहे, जाणिजे यज्ञकर्म" ह्याची ती खूण आहे. हा जीवयज्ञच खरा यज्ञ आहे. यज्ञ सोडून इतर जें कांहीं केलें जातें तें बन्धन आहे असें गीता कण्ठरवानें सांगते आहे. ह्या यज्ञाबरोबरच प्रजा निर्माण करून ब्रह्मदेवानें त्यांना ह्या जीवयज्ञाच्या योगें समृद्ध व्हा, हा तुमचे सर्व काम पुरवील असें म्हटलें आहे. ह्या यज्ञाचा भोक्ता सर्वान्तर्यामी साक्षात् परमात्मा आहे. त्याहून अधिक मोठा भोक्ता दुसरा कोण असूं शकेल ? त्यानें स्वतःच गीतेंत म्हटलें आहे—

**अहं वैश्वानरो भूत्वा प्राणिनां देहमाश्रितः।**
**प्राणापान-समायुक्तः पचाम्यन्नं चतुर्विधम् ॥**

असा तो विश्वान्तर्यामी वैश्वानर महाशन होय.

३०४. अदृश्य

दृश्य म्हणजे इन्द्रियगोचर. जें जें इन्द्रियगोचर आहे त्याहून परमात्मा भिन्न आहे. म्हणून तो अदृश्य म्हणावयाचा. शब्द, स्पर्श, रूप, रस, गन्ध हे जे पंच विषय ते पंच इन्द्रियें श्रोत्र, त्वक्, नेत्र, जिह्वा आणि नासिका वा प्राण यांच्या पंचायतींत चर्चिले जातात. त्यांच्याविषयीं बरावाईट निर्णय ते पंच करतात. परंतु आत्म्यासमोर ह्या पांचांची पांचावरच धारण बसते. त्यांचें तिथें कांहींच चालत नाहीं. "किमिदं यक्षम्" हें काय अद्भुत ?

पांचा मुलखावेगळें ? तें त्यांना कळत नाहीं, आकळत नाहीं. असें तें अतीन्द्रिय आहे. अगोचर आहे. नुसतें अदृश्य म्हणजे नेत्र-विषय न होणारें तर कितीतरी दाखवितां येईल. पण तें कांहीं परमात्मतत्त्व नव्हे. तें तर 'नेति नेति' म्हणूनच निवडावें लागतें. "तदेव ब्रह्म त्वं विद्धि, नेदं यदिदं उपासते". इन्द्रियें ज्याची उपासना करतात त्याहून तें वेगळेंच आहे, आगळेंच आहे. पंच आपल्या विषयांबाबत निर्णय देतात आणि आपल्या अविषयाबाबत हि. आपल्या विषयाबाबत ते युक्तायुक्त निर्णय देतात आणि अविषयाबाबत निर्णय देतात कीं हा आमचा विषय नव्हे. वरिष्ठ न्यायालयांत जा. हा निर्णय सुद्धां कमी महत्त्वाचा नाहीं. हे वरिष्ठ न्यायालय म्हणजे बुद्धि होय. गीतेंत म्हटलेंच आहे–

"बुद्धिग्राह्यं अतीन्द्रियम्" पण ही बुद्धि म्हणजे तर्क नव्हे. तर स्वानुभवक्षम प्रज्ञा होय. निष्पंक आणि निष्कंप. असा जो बुद्धिमान् तोच अदृश्याला पाहतो.

## ३०५. अव्यक्तरूप (व्यक्तरूप)

अदृश्य आणि अव्यक्तरूप ही जोड कल्पना आहे. अदृश्य पदाचा आशय अव्यक्तरूप हें पद पूर्ण करतें. परमात्मा अतीन्द्रिय आहे एवढेंच नव्हे तर तो वाङ्मन यांच्या हि अतीत आहे, हें अव्यक्तरूप पद सूचित करतें. जें इन्द्रियांना गोचर नाहीं तें मन चिंतूं शकतें किंवा नाहीं हा एक स्वतंत्र प्रश्न आहे. पण घटकाभर मानलें कीं मनाची अशी शक्ति आहे तर तें आत्मतत्त्व त्या मनोमताहून भिन्न आहे असें अव्यक्तरूप हें पद सूचित करीत आहे. जें जें मनांत येतें तें तें सारें व्यक्तच होय. कारण अव्यक्त हें अचिन्त्य आहे. दृश्य हें निर्देश्य आहे तर अदृश्य हें चिन्त्य आहे. परंतु जें निर्देश्य नाहीं आणि चिन्त्य हि नाहीं तेंच अव्यक्त होय. म्हणून अव्यक्तरूप या पदानें इथें तें अचिन्त्य आहे, मन-सगोचर आहे असें सुचविलें आहे.

इथें "अव्यक्तरूप" ऐवजीं "व्यक्तरूप" असा हि पाठ संभवतो. आणि शंकराचार्यांनीं तो तसा घेतला हि आहे. परंतु त्यानें अर्थांत फरक पडण्याचें कारण नाहीं. इथें व्यक्त याचा अर्थ एवढाच की "ध्यानावस्थिततद्गतेन मनसा पश्यन्ति यं योगिनो"–योग्यांना जो ध्यानानें हृदयांत व्यक्त होतो, अनुभवतो तो. जो अनुभवतो तो अव्यक्त कसा म्हणावा ? म्हणून तो व्यक्तरूप होय. अथवा जें सारें व्यक्त आहे तें त्या परमात्म्याचेंच रूप म्हटलें पाहिजे. कारण त्याहून वेगळें इथें कांहीं नाहींच. म्हणून हि तो व्यक्तरूप होय.

परमात्मा आहे तो आहे. त्याला तुम्ही व्यक्त म्हणा कीं अव्यक्त म्हणा. नामान्तरानें नामधारकांत काय फरक पडावयाचा आहे ? कित्येक मुलें बापाला बाबा म्हणतात, कित्येक आबा म्हणतात. कांहीं हि म्हटलें तरी बाप तो बापच राहतो. "तुज सगुण म्हणों कीं निर्गुण रे। सगुण निर्गुण एक गोविंदु रे।।"

## ३०६. सहस्रजित्

जीवाचें जीवन म्हणजे दोन प्रभावी शक्तींचा खेळ आहे. एक पुरुषकार आणि दोन म्हणजे दैव. दिवस आणि रात्रि मिळून जसें संपूर्ण दिनमान होतें त्याप्रमाणें पुरुषकार आणि दैव मिळून जीवाचें जीवमान बनलेलें आहे. कधीं दिवस मोठा कधीं रात्र मोठी असा दिनमानांत चयापचय होत राहतो. तसा जीवनांत हि पुरुषकार आणि दैव यांचा वांटा न्यूनाधिक होत राहतो. कोणाचा वांटा किती आणि किती महत्त्वाचा हें कोण सांगूं शकेल ? एवढें बरीक खरें कीं जशी नदी एकाच तीराची असूं शकत नाहीं, तसें जीवन हि एका पुरुषकारानेंच वा एका दैवानेंच बनत नाहीं. या दोन्ही तीरांमधूनच वाहतें तें. आणि म्हणून या दोन्ही क्षेत्रांत माणसाला आपली कसोटी द्यावी लागते, दिली पाहिजे. त्यानें आपला पुरुष-प्रयत्न म्हणजेच पुरुषकार आजमावून पहावा, आपलें दैव आजमावून पहावें. आपला पुरुषकार आजमावण्याच्या क्षेत्राला म्हणतात युद्ध तर दैव आजमावण्याच्या क्षेत्राला म्हणतात द्यूत. आणि या दोन्ही क्षेत्रांत जो फक्कडपणें खेळतो तो खरा जीवन-जौहरी. दैव जर अटळ आहे तर त्याला टाळा कां आणि भ्या तरी कशाला ? होऊन जाऊं द्या दोन हात ! असें म्हणून जो पुरुषकाराच्या वा दैवाच्या क्षेत्रांत खेळाडू प्रमाणें

हार-जीत सम करून उतरतो तो खरा वीर पुरुष होय. हा असा पुरुषच सहस्रजित् होय, अनन्तजित् होय. सहस्रजित् आणि अनन्तजित् हीं नामें युद्धांत आणि द्यूतांत म्हणजेच उभयविध अशा जीवनांत खेळणाऱ्या पुरुषरूप परमात्म्याची आहेत. अनन्तजित् च्या विरोधांत सहस्रजित् म्हणजे सान्तजित् असें हि म्हणतां येईल. परंतु सहस्र शब्द लाक्षणिक अर्थानें घेतल्यास तो सर्वजित् आहे. परमात्मा मितामित सर्वजित् आहे.

## ३०७. अनन्तजित्

जीवन हें पुरुषकाराचें क्षेत्र आहे का दैवाचें? का दोहोंचें? का आणखी तिसऱ्याचेंच ? याचा निर्णय तत्त्वज्ञांनीं केला आहे. त्यांचा निर्णय हा कीं जीवन हें चिरंतनाचें अधिकार-क्षेत्र आहे, क्षणिकाचें नाहीं. आणि चिरंतन, शाश्वत, नित्य वस्तु धर्म आहे, हें मर्त्य जीवन वा त्याच्यांतील सुखदुःख नव्हे. तें क्षणिक आहे, अशाश्वत आहे, अनित्य आहे. महाभारताचें हें सार आहे. महाभारतांत जीवनाचें अंतरंग आणि बहिरंग यथातथ्य चितारलें आहे. महाभारतांत द्यूत आलें आहे म्हणून महाभारत हें आर्यांच्या अवनतीचें, अपकर्षाचें ऱ्हासाचें चित्र आहे असें समजणारे ऐतिह्यवेत्ते महाभारताचें रहस्यच समजले नाहींत. मनुष्याचें जीवन हें दैव आणि पुरुषकार या दोन आडव्या उभ्या धाग्यांनीं विणलेलें आहे. तीं दोन्ही एकमेकांवर कडी करीत मनुष्याच्या जीवनाचा पट विणीत असतात. मनुष्य प्रयत्न करीत असतो पण त्याचें फळ दैवाधीन असतें. तें कधीं अनुकूल कधीं प्रतिकूल असतें. कधीं यश येईल कधीं अपयश येईल अशा अनित्य आणि अनिश्चित म्हणजेच अध्रुव तत्त्वाच्या हातीं आपलें मोलाचें जीवन कसें देतां येईल. त्याला कांहींतरी मार्गदर्शक ध्रुवतत्त्व हवें. तें कोणतें तें महाभारत दाखवून देत आहे. तें ध्रुवतत्त्व म्हणजे धर्म होय. तें सूत्र जो धरून ठेवतो तो त्या सुतानें स्वर्ग गांठतो. जीवनाच्या युद्धांत वा द्यूतांत मग तो हरो कीं जिंको, हारजीत दोन्ही समानच निरर्थक आहेत. जीवनाचें तारक तत्त्व त्या दोहोंहून वेगळेंच आहे आणि तें आहे सत्य म्हणजेच धर्म. धर्मराजानें द्यूतांत आणि युद्धांत हि त्याचा त्याग केला नाहीं म्हणून तो स्वर्गांत गेला. बाकीचे सारे यशस्वी नि अयशस्वी नरकास गेले. म्हणून धर्मराज हा अनन्तजित् होय. बाकीचे सारे सान्तजित्च. म्हणूनच धर्मराजाचा शंख अनन्तविजय आहे. तोच महाभारताचा नायक आहे.

## ३०८. इष्ट

परमात्मा हा सर्वांचा स्वात्मा असल्यामुळें तो सर्वांना इष्ट वाटतो. प्रत्येकाला आपला जीव प्यारा आहे. परंतु हा असा प्यारा जीव हि मनुष्य केव्हां केव्हां देतो, आत्महत्या करतो, तें कां ? तें हि तो आपल्या जीवासाठींच करीत असतो. त्याला जेव्हां हें जीवन असह्य, अनिष्ट वाटूं लागतें तेव्हां तो त्याचा त्याग करतो. तो ज्याचा त्याग करतो तें अनिष्ट असतें आणि बाह्य असतें; अ-स्व असतें, अनात्म असतें. आपला त्याग कोणाला कधीं करतां येणें शक्य नाहीं. केळीच्या खांबाच्या गाभ्यावर सोपटांचीं अनेक वेष्टणें असतात. तशीं जीवाचीं अनेक वेष्टणें आहेत, कोश आहेत आणि त्यांचा तेवढा त्याग जीव करीत असतो. परंतु त्यांचा जो गाभा तो स्वतः त्याचा त्याग कोण कसा करणार ? तोच तो निजात्मा होय जो सर्वांचें सर्वस्व आहे, सर्वांचें इष्ट आहे. म्हणून तो इष्ट होय, प्रेष्ठ होय.

जो मनुष्याला श्रेष्ठ आणि प्रेष्ठ असतो त्याचेंच यजन म्हणजे भजन पूजन मनुष्य करीत असतो. असा श्रेष्ठ आणि प्रेष्ठ एक परमानन्दस्वरूप परमात्माच होय. म्हणून हि तो इष्ट म्हणजे यजिला गेलेला आहे .स्वर्गांतील अमर हि ज्याचें यजन करतात त्या परमात्म्याचें यजन कोण मर्त्य करणार नाहीं ?

अशा प्रकारें परमात्मा हा प्रिय हि आहे आणि पूज्य हि आहे. तो परम प्रिय आहे, परम पूज्य आहे, तो स्वतत्त्व म्हणून परम प्रिय आहे. परतत्त्व म्हणून परम पूज्य आहे.

## ३०९. विशिष्ट (अविशिष्ट)

परमात्मा हा विशिष्ट म्हणजे वेगळा आणि आगळा आहे. ज्याच्यांत कांहीं अनन्य- साधारण आणि महनीय असे

वैशिष्ट्य असतें त्याला विशिष्ट म्हणावयाचें. परमात्म्याचें वेगळेपण आणि आगळेपण काय वर्णावें? त्याच्या सारखें दुसरें कांहीं नाहींच म्हणून त्याला "हें नव्हे हें नव्हे" असें व्यावर्तन करीत करीत जगावेगळें 'तें'. म्हणावें लागतें. हें झालें त्याचें वेगळेपण आणि त्याचें आगळेपण हि तसेंच आहे. तो नित्य आहे, हें जग अनित्य आहे. तो विज्ञाता आहे, हें विज्ञात आहे. तो आनन्दस्वरूप आहे. हें दुःखरूप आहे. अशा प्रकारें "कः केन संबन्धः" असा तो आगळा आहे. परमात्म्याच्या अशा वेगळेपणामुळें आणि आगळेपणामुळें तो विशिष्ट म्हणावयाचा.

इथें अविशिष्ट असा हि पाठ घेणें शक्य आहे. आणि खरोखर तो परमात्मा 'अणोः अणीयान् आणि महतः महीयान्' नाहीं काय ? तो कोणाहून वेगळा आणि आगळा मुळीं नाहींच. गोच्या ठाईं गोत्व आणि अश्वाच्या ठाईं अश्वत्व तोच आहे. मुंगीच्या ठाईं आणि हत्तीच्या ठाईं जीव रूपानें तोच अविशिष्ट नांदत नाहीं काय ? रोजच्या रोज सुषुप्तींत सर्व जीव त्याच्या ठाईं एकरूप होत नाहींत काय ? तिथें अणुमहत् साध्वसाधु इत्यादि कसलें हि वेगळेपण वा आगळेपण अणुमात्र तरी राहतें का ? त्यामुळें जो विशेष दिसतो तो सगळा निर्विशेषच होय. "आत्मैव इदं सर्वम्, नेह नानास्ति किंचन" इथें दुजें कांहीं नाहींच. एकच एक सर्वत्र भरून राहिलें आहे. त्यामुळें तो परमात्मा अविशिष्ट आहे. उपनिषदांनीं त्याचें अविशिष्टत्व परोपरीनें गाइलें आहे.

**अग्निर् यथैको भुवनं प्रविष्टो**
**रूपं रूपं प्रतिरूपो बभूव ।**
**एकस् तथा सर्वभूतान्तरात्मा**
**रूपं रूपं प्रतिरूपो बहिश्च ॥**

## ३१०. शिष्टेष्ट

शिष्ट म्हणजे अनुशिष्ट, विद्याविनयसंपन्न. त्यांनीं जो यजिला, त्यांना जो प्रिय तो शिष्टेष्ट म्हणावयाचा. असंस्कृत आणि अशिक्षित लोकांचे प्रेम-पूजा-विषय हे मूढ आणि घोर स्वरूपाचे तामस आणि राजस असे असतात. ज्यांची श्रद्धा, बुद्धि आणि दृष्टि विशुद्ध आहे त्यांचें श्रद्धेय ज्ञेय आणि दर्शन मान्य समजावें. तेंच इष्ट म्हणजे शिष्टेष्ट होय. अशिष्टेष्ट म्हणजे अनिष्टच ! माणसाला दोन डोळे आणि एक दृष्टि असते. तिच्या मार्गदर्शनास अनुसरून माणूस चालत असतो. त्याच प्रमाणें माणसाचे, वा जीवाचे म्हणा, श्रद्धा आणि बुद्धि हे दोन डोळे आहेत आणि त्या उभयांच्या समुच्चयानें बनणारी जी दृष्टि तें आहे जीवाचें मार्गदर्शक तत्त्व. त्यालाच मी दर्शन म्हणतों. या दर्शनास अनुसरूनच माणूस व्यवहारांत वागत असतो. म्हणून आपलें दर्शन विशुद्ध ठेवणें आणि तसें तें नसल्यास ज्यांचें दर्शन विशुद्ध आहे असें आपल्याला वाटतें त्यांच्या दर्शनानुसार वागणें हेंच मी मनुष्याला हिततम मानतों. हाच निर्णय गीतेनें "तस्मात् शास्त्रं प्रमाणं ते कार्याकार्य-व्यवस्थितौ। ज्ञात्वा शास्त्रविधानोक्तं कर्म कर्तुं इहार्हसि" या शब्दांत दिला आहे. आपलें दर्शन संशयित, शास्त्राचें दर्शन निःसंशय म्हणून तेंच मान्य करायचें हें ठीक. पण त्यांत शास्त्र हें अमूर्त आणि त्याच्या वचनांचा अर्थ नेहमींच स्पष्ट नसतो वा स्थिर नसतो त्यामुळें परत संशयच्छेदाचा प्रश्न उभा राहतो. अशा वेळीं सर्व संशयांचा छेद करणारा जो धर्मपुरुष तोच शिष्ट होय, आणि त्याला जें इष्ट असतें तेंच भगवन्मत जाणावें. तेंच भगवत्स्वरूप. तेंच शिष्टेष्ट. शास्त्र ज्ञापक पण अमूर्त, शिष्ट वा गुरु आज्ञापक आणि मूर्त, म्हणून तोच शरण्य.

## ३११. शिखण्डी

शिखण्ड म्हणजे तुरा. आणि शिखण्डी म्हणजे तुरेदार. मोर, कोंबडा हे पक्षी तुरेदार आहेत. बैल वशिण्डवाला आहे. असें जें मूर्धन्य वैशिष्ट्य पशुपक्षांत आढळतें त्यांत त्यांचा आत्मगौरव, ऐट, मस्ती दिसून येते. माणसाला देवानें असें शारीरिक शृंग कांहीं दिलें नाहीं, पण बुद्धि-वैभव दिलें आहे. त्याच्या बळावर त्यानें आपल्या पोशाखांत पशुपक्ष्यांचें अनुकरण करून फेटा पगडी हें शिरोभूषण निर्माण केलें. पगडींत नुसताच तुरा काढला आहे तर फेट्यांत तुरा आणि शेमला हि. तुरा पक्ष्यांचें अनुकरण आहे, तर शेमला पशूंचें. पशुपक्ष्यांचे शेपटे व तुरे कसे

फडकतात डोलतात ! माणसाला त्यांचा हेवा वाटल्यास नवल नाहीं. माणसानें ते आपल्या पोशाखांत आणले. पण मोरपिसांतील तो डोळा, काय त्याचें ते विविध रंग आणि छटा ! त्याचें रंग, रूप, चैतन्य सारेंच अद्भुत ! त्याचें अनुकरण कसें करायचें ? तेव्हां ते मोरपीस च सरळ खोवलें आपल्या केशकलापांत वा शिरोवेष्टनांत. ही ऐट उसनी भासली तरी ती उसनी नाहीं. त्यांत सृष्टीशीं आत्मीयता आहे. आपल्या भोवतालच्या सृष्टीचें प्रेम आणि गौरव आहे. गोपाल कृष्णानें हें सृष्टीचें प्रेम आणि गौरव हें सृष्टितादात्म्य यथेष्ट अनुभवलें आणि उमटविलें. खरोखर तो सृष्टीशीं एकरूप झाला होता. तो वनमाली गुंजावतंस वेणुवादक गोपाल ! मोरपीस आपल्या डोक्यांत खोवून तो शिखण्डी झाला, ह्यांत नवल काय ? रानफुलांचें कौतुक करणाऱ्या कृष्णाची सर गुलाबाचें रक्तफूल कोटाच्या गुंडीघरांत लावणाऱ्याला कशी येणार ? एक सृष्टीचा बालक आहे, दुसरा पालक म्हणवतो आहे. सृष्टीशीं तादात्म्य आत्मीयत्व न अनुभवतां जो तिचें फूल धारण करतो तो उसनी ऐट करतो आहे. ती लूट आहे. परंतु जो सृष्टीचा बालक होऊन तिचें स्तन्य पितो, तिच्या अंगावर नाचतो, तिचें गीत गातो, तिचीं फुलें आणि पिसें डोक्यांत खोवतो तो सृष्टीचाच एक नवा नवा आणि हवा हवा वाटणारा कोंब होय. सर्व सृष्टि त्याची आहे आणि तो सृष्टीचा आहे. आणि तोच शिखण्डी म्हणावयाचा. कारण माता आपल्या बालकाला स्वलंकृत करीत असते, शिखण्ड-मण्डित करीत असते. तीं त्याला राजा म्हणते आणि राजवत् नटवते, सजवते. या विश्ववृक्षाचा मूलकंद तो परमात्मा आहे आणि वृक्षाग्रावर येणारी नवी पालवी, त्या कंदाचाच तुरा होय, शिखण्ड होय. म्हणून परमात्मा हा शिखण्डी म्हणावयाचा.

## ३१२. नहुष

नह् ४ उ मढवणें आच्छादणें या धातूपासून नहुष शब्द व्युत्पादिला जातो. नहुष प्रमाणें करुष, पुरुष असे उष प्रत्ययान्त अन्य हि कांहीं शब्द आढळतात. धात्वर्थानुसार नहुषचा अर्थ होईल. मढविणारा, व्यापणारा. या विश्वांत आकाशानें सारें आंतून बाहेरून व्याप्त आहे, पिनद्ध आहे. आकाश असें व्यापक असलें तरी व्याप्य व्यापक असें अंतर तिथें गृहीत आहे. परंतु जिथें व्याप्य आणि व्यापक असें द्वैत शिल्लक नाहीं तिथें किती अधिक ठोस व्यापकता आहे म्हणावी ? परमात्मा हा तसा अपिनद्धा आहे. व्यापक आहे. सोनें जसें अलंकाराला आंतून बाहेरून व्यापून असतें तसा परमात्मा या विश्वाकाराला आंतून बाहेरून संनहन करून राहिला आहे. हा कर्तृवाचक अर्थ झाला. कर्म वाचक म्हणूनहि नहुष शब्द लावतां येईल.

**नाहं प्रकाशः सर्वस्य योगमाया-समावृतः ।**
**मूढोऽयं नाभिजानाति मां एभ्यः परमव्ययम् ॥**

असें जें गीतेंत म्हटलें आहे तें परमात्म्याचें नहुषत्व म्हणजे निगूढत्व च सांगण्यासाठीं होय. परमात्मा हा जगाला अंधार आहे. अंधाराच्या पडद्याआड काय आहे हें आपल्या दृष्टीला दिसत नाहीं तसा परमात्मा हा या विश्वाकार पडद्यानें परिपूर्ण झांकून टाकला आहे. त्याचें परिपूर्ण पिधान झालें आहे. दर्शनीय आणि दृष्टि यांच्या दरम्यान येणाऱ्या अंतरायामुळें दर्शनीय अंशतः वा समग्र झांकलें जातें. ह्यालाच पिधान म्हणतात. विश्वाकार योगमायेनें परमात्म्याचें सामग्र्येण पिधान केलें आहे, अंशतः नव्हे. रज्जूवर सर्पाभास होतो तो आंशिक कधीं असत नाहीं, तो समग्रच होतो. अर्धी रज्जू साप दिसते आहे आणि अर्धी दोरी दिसते आहे असें होत नाहीं. त्या प्रमाणें परमात्मा हा संपूर्णच या समग्र विश्वाकारानें झांकून टाकला आहे. हा विश्वकाराचा भास सगळाचा सगळा नाहींसा होईल तेव्हांच तो नहुष, तो योगमायासमावृत त्रैगुण्य-पिनद्ध हिरण्यपात्र-पिहित परमात्मा दृग्गोचर होईल.

## ३१३. वृष

'संतत संपत सुख के कारण 'हीं सुखकारणें जो वर्षतो तो वृष म्हणजे वर्णाश्रमधर्म होय. पण धर्म नुसतीच संतति संपत्ति देत नाहीं तर तो वस्तुतः मानवाचें जीवित जेणें करून कृतार्थ होतें तो परमपुरुषार्थ म्हणजे मोक्ष हि मिळवून देतो. अशा प्रकारें अभ्युदय आणि निःश्रेयस ह्या दोन्ही ऋद्धिसिद्धि जो यजिला असतां वर्षतो तो वृष म्हणजे

धर्मरूप परमात्मा होय. वर्णधर्म मुख्यतः अभ्युदय आणि आश्रमधर्म निःश्रेयस साधून देतो असें म्हणतां येईल. वर्णधर्माच्या योगें सामाजिक स्वास्थ्य तर आश्रमधर्माच्या योगें वैयक्तिक स्वास्थ्य संपादिलें जातें. व्यवस्थित समाजांतील स्वतंत्र व्यक्ति आणि स्वतंत्र व्यक्तींचा व्यवस्थित समाज जिथें नांदतो तिथेंच धर्म भरभराटतो. समाजाचें तत्त्व व्यवस्था म्हणजे सर्वसुखावह नियंत्रण नियमन होय. व्यक्तीचें तत्त्व स्वातंत्र्य म्हणजे सर्वतंत्र-स्वतंत्र उन्मुक्त जीवन होय. ही दोन दिशांना ताणणारी ढवळ्या पवळ्याची जोडी मानव-जीवनाच्या रथाला जुंपली आहे. ह्यांच्या संगतींत श्रेय आणि विसंगतींत विनाश ठेवला आहे . समाजाच्या नियमनाचें लक्ष्य व्यक्तीचें संपूर्ण स्वातंत्र्य असलें पाहिजे तर व्यक्तीच्या स्वातंत्र्याचें लक्ष्य समाजाचें संपूर्ण हित म्हणजेच सर्वभूतहिते रति असलें पाहिजे. याचा आशय हा आहे कीं, व्यक्ति समाजव्यापी झाली पाहिजे, ती एकदेशी राहतां कामा नये. आणि समाजानें व्यक्तीच्या स्वैरतम आकांक्षांना अनन्त आकाश मोकळें करून द्यायला पाहिजे. म्हणजे व्यक्ति ही समाजाला निजात्मा झाली पाहिजे, परकी वा नियम्य राहतां कामा नये. सारांश दोहोंचें अद्वैत हेंच धर्माचें स्वरूप आहे. तेंच त्यांचें लक्ष्य आहे. आणि तोच सर्व पुरुषार्थांची वृष्टि करणारा वृष आहे. खरोखर ही 'अद्वैत-कुसरी विरळा जाणे'. मानवानें जीवनाचा क्षीरसागर मंथून जें अमृत हस्तगत केलें तें हेंच अद्वैतामृत होय. 'यत् लब्ध्वा पुमान् सिद्धो भवति, अमृतो भवति, तृप्तो भवति, आत्मारामो भवति। यत् प्राप्य न किंचित् वाञ्छति न शोचति.'

### ३१४. क्रोध-हा

परमात्मा हा क्रोधाचें हनन करणारा आहे. मनुष्य वा जीव जो क्रोध करतो तो एखाद्या वस्तुविषयीं त्याला राग म्हणजे आसक्ति असते आणि ती वस्तु त्याच्यापासून दुरावूं नये वा कोणी हिरावूं नये म्हणून त्याला चिन्ता वा भय वाटत असतें म्हणून होय. हा क्रोध म्हणजे क्षोभ वा चल-विचलपणाच होय. "क्रोध कामांत ठेविला" (कामात् क्रोधोऽभिजायते) म्हणून जे स्थितप्रज्ञाच्या लक्षणांत विकार-प्रतीत्यसमुत्पादाच्या विवरणांत वर्णिलें आहे तें ह्याचमुळें होय. हा क्रोध ज्याचा गेला तो स्थितप्रज्ञ झाला. स्थितप्रज्ञाच्या विरुद्ध क्षुब्ध वा कम्पित-चित्त होय. म्हणून रामदासांनी स्थितप्रज्ञाचें लक्षण "करी वृत्ति जो संथ तो संत जाणा" असें बाळबोध पण नेमकें केलें आहे. राग म्हणजे आसक्ति, तिच्या पोटीं भय म्हणजे चिंता आणि तिच्या पोटीं क्रोध म्हणजे चित्तक्षोभ वा कंप उत्पन्न होतो. असें हें विकरणसूत्र आहे. याचाच विस्तार 'ध्यायतो विषयान् पुंसः' इत्यादि श्लोकद्वयांत गीतेनें केलेला आहे. हा क्रोध परमात्मा कसा नाहींसा करतो ? परमात्म्याला आणि त्याच्या भक्ताला आत्मभिन्न दुसरी वस्तुच उरत नसल्यामुळें त्याला कोणत्याहि वस्तूचा अभिलाष आणि राग मुळीं उत्पन्नच होत नाहीं. आत्म्याच्या ठाईं काम आणि राग संभवतः कुंठित होतात. मीच मला कसा इच्छूं आणि चिकटूं ? हें अद्वैत जर बिंबलें तर "अतृणे पतितो वह्निः स्वयमेवोपशाम्यति" या न्यायानें तो क्रोध आपोआप निर्बीज होईल. परमात्मा स्वभावतःच शान्तिरूप असल्यामुळें तो क्रोध-हा म्हटला जातो—जसा प्रकाश हा स्वभावतःच तिमिरहा आहे तसा. जीव क्रोधाचें फार तर दमन वा नियमन करतात. पण त्याचें निर्मूलन वा हनन एक परमात्माच करतो. तो काम-हा आहे म्हणून क्रोधहा आहे. कारण-त्यागानें कार्यत्यागी म्हटला गेला आहे. अज्ञान हें निदान आहे, काम हें पूर्वचिह्न आहे, क्रोध फलित आहे.

### ३१५. क्रोधकृत् (क्रोधकृत्कर्ता)

'कामहा कामकृत्' प्रमाणेंच 'क्रोधहा क्रोधकृत्' ही जोड कल्पना आहे. त्याचें विवेचन हि सदृशच होईल.

परमात्मा ज्ञानस्वरूप असल्यामुळें सर्वच काम-क्रोधादि विकारांचा हन्ता आहे. त्याच प्रमाणें तो सद्वस्तु असल्यामुळें सर्व विकारांचा आभासांचा आधार हि आहे. म्हणून तो एकाच दमांत क्रोध-हा आणि क्रोधकृत्, कामहा आणि कामकृत् म्हटला गेला आहे.

परमात्मा आपल्या भक्तांचा क्रोध ज्ञानदृष्टि देऊन नाहींसा करतो. म्हणून तो क्रोधहा. ज्यांना अशी ज्ञानदृष्टि

नाहीं त्या अज्ञानी जीवांना, आसुर लोकांना तो रागें भरतो म्हणून तो क्रोधकृत्. जाणत्या मुलांवर आईबाप रागावत नाहींत, तर त्यांना बोध देऊन त्यांचा राग दूर करतात. नेणत्या मुलांना समज नसते. त्यांनीं व्रात्यपणा केल्यास आईबाप त्यांना ताडन करतात. बोध देऊन आणि ताडन करून एकच कार्य केलें जातें, उन्मार्गापासून निवारण. परमात्मा हि तसाच क्रोध वरतो हि आणि आवरतो हि. पण दोहोंच्या योगें एकच हितसाधन होतें. म्हणूनच म्हटलें आहे. "क्रोधोऽपि देवस्य वरेण तुल्यः" आई बाप न मारून आणि मारूनहि प्रेम करीत असतात. परमात्मा हि तसाच क्रोध करून आणि न करून कृपाच करीत असतो.

जो आपल्या क्रोधावर क्रोध करतो तो क्रोधहा होतो. जो आपल्यावर क्रोध करतो, जो आपलें अहित चिंतितो, जो आपल्या विकारांना पोसतो तो क्रोधकृत् होतो. अशा क्रोधकृत् उन्मार्गगामी आत्मघातक्यांचा (म्हणजे आसुरांचा) घातक तो क्रोधकृत्कर्ता म्हणावयाचा. क्रोधकृतांचें कर्तन करतो म्हणून तो क्रोधकृत्-कर्ता. परमात्मा हा असुरांचा आणि आसुरांचा कर्दन काळ म्हणून प्रसिद्धच आहे. इथें दोन पदांचा एक सामासिक शब्द कल्पिला आहे. क्रोध-हा, क्रोधकृत् आणि कर्ता या तीन पदांऐवजीं क्रोधहा, आणि क्रोधकृत्-कर्ता अशीं दोनच पदें कल्पिलीं तर परमात्मा हा क्रोधाला मारतोच, पण क्रोध करणाऱ्याला हि ठार करतो असा अर्थ झाला.

शिशुपालाचें डोकें भगवान् कृष्णानें आपल्या चक्रानें कृत्त केलें म्हणून तो द्वेषकृत्-कर्ता झाला. पण इथें तर क्रोध-कृत्-कर्ता आहे. अतः कर्ता हें पद स्वतंत्र घेणें बरें.

### ३१५. (क्रोधकृत्) कर्ता

इथें कर्ता हें पद स्वतंत्र मानलें तर त्याची मागें आलेल्या कर्ता पदाहून कांहीं वेगळी व्याख्या करावी लागेल. त्याच अक्षरराशीची पुनरावृत्ति त्याच अर्थानें झाली असें मानल्यास तो अक्षरराशि गतार्थ होईल. अर्थात् तोच अक्षरराशि पुन्हां आल्यास तो वेगळ्या कारणानें वेगळ्या अभिप्रायानेंच येणार.

कृत् म्हणजे कर्तन करणें, कांतणें, काटणें या धातूवरून कर्ता हा शब्द आलेला आहे. कोणत्या हि कच्च्या मालापासून जो कलाकुसरीचा पक्का माल चक्रावर चढवून तनूकरणानें तयार केला जातो तो कर्तनरूपच म्हणावयाचा. कापसापासून सूत कांतणें, मातीच्या गोळ्यापासून मडकें कांतणें, लांकडापासून भोवरा कांतणें आणि लोखंड, पितळ इत्यादि धातु खरादावर म्हणजे लेथ वा यंत्र यावर चढवून त्यांच्यापासून तकलीची चकती चरख्याची नाभि आदि वस्तु तयार करणें हें सगळें कर्तनच होय. कर्तनांत त्या त्या उपादानाला फिरफिरवून त्याला इष्ट आकार दिला जातो करणांच्या वा उपकरणांच्या द्वारें. कांतण, कुंभार, सुतार, लोहार हे सर्व असे कर्ते होत. परमात्मा हि तसाच कर्ता आहे आणि विश्व हें त्याचें कर्म आहे, कर्तन आहे. तो विश्वकर्ता हें समस्त विश्व कांतीत आहे. नवे नवे धागे तो कांतीत आहे आणि विश्वपट नित्य नवा विणला जात आहे. सारे ग्रहगोल फिरत आहेत, सारे अणु फिरत आहेत आणि नवनवीं रूपें तयार होत आहेत. या सर्वांना यंत्रारूढ करून आकार देणारा तो परमात्मा, तो विश्वकर्मा कर्ता होय.

हा कर्ता शब्द मागील कृ धातूवरून आलेल्या कर्ता पदाहून वेगळा आहे. हा कृत्पासून आलेला आहे म्हणून त्यांत 'त्' चें द्वित्व राहील : कर्त्ता.

### ३१६. विश्वबाहु

परमात्मा हा सर्वांतर्यामी देही असल्यामुळें सर्व देहांच्या सर्व बाहूंचा तो स्वामी म्हणावयाचा. तो सर्व देहांचा आणि त्यांच्या सर्वच अवयवांचा स्वामी आहे. हा वृक्षशाखान्याय झाला. ज्याचा वृक्ष त्याच्याच साऱ्या शाखा हें पुनः सांगण्याची गरज नाहीं, तरी गौरवासाठीं शाखा-पत्र-पुष्प-फलादिकांची गणना करावी तसें हें आहे. परमात्मा हा देही असल्यावर मग त्याला विश्वमुख विश्वबाहु, विश्वोदर, विश्वपाद म्हणण्याची आवश्यकता राहात नाहीं. तरी गौरविण्यासाठीं सहस्रशीर्षा, सहस्राक्ष,

सहस्रपात् अशीं सहस्र सहस्र नामें घेतलीं जातात. तीं सर्व एका देही आत्म्याचाच गौरव करतात. परमेश्वराचें गौरव अनन्तपार आहे. तें संख्येनें वा परिमाणानें कसें मोजतां मापतां येईल ? पण विश्वरूपाच्या दर्शनानें चकित झालेली बुद्धि आणि वाणी परमात्म्याचा महिमा आपल्या शक्तीनुरूप वर्णिल्यावांचून राहूं शकत नाहीं आणि म्हणून मग त्यांतून वेदापासून मौनापर्यंतचें बहुविध वाङ्मय निर्माण होतें. सर्व आध्यात्मिक वाङ्मयाचा मूल स्रोत हें आश्चर्यचकित दर्शनच आहे. ह्या वाङ्मयाच्या अनेक विधा आहेत. त्या श्रोत्यांच्या अधिकारानुरूप ऐसपैस वा संक्षिप्त, गंभीर वा ललित, शास्त्रीय वा लौकिक, कूट वा सुबोध आणि मिश्र रूप धारण करतात. वेद कूट आहेत. पुराणें ऐसपैस आहेत. उपनिषदें गंभीर आहेत, सूत्रें संक्षिप्त आहेत, भाष्यें शास्त्रीय आहेत, गीता मिश्र आहे, स्तोत्रें ललित आहेत, आख्यानें लौकिक आहेत, इतिहास सुबोध आहेत. आणि सर्वांचें प्रयोजन परमात्मदर्शन आहे. विष्णुसहस्रनामें हीं ह्या सर्वांचें सार आहे. त्यांत ह्या सर्व विधा आणि सर्व रस व कस सामावला आहे.

### ३१७. महीधर

धरणीधर नाम पूर्वीं येऊन गेलें आहे. इथें तें महीधर म्हणून आलें आहे. दोहोंत नाममात्रच फरक आहे. तथापि सूक्ष्म पाहिलें तर पृथ्वीचीं जीं अनेक नामें आहेत तीं पृथ्वीचा एक एक विशेष सांगणारी अशीं आहेत आणि त्या दृष्टीनें तीं एक असून विविध आहेत, विशिष्ट आहेत. विशेषांमुळेंच तीं विशिष्ट आणि विविध झालीं आहेत. कवीच्या श्लोकरचनेंत लघुगुरूंच्या पूर्तीसाठीं तीं बनविलेलीं नाहींत. विशिष्ट गुणव्यक्तीकडे लक्ष वेधण्यासाठीं मुख्यतः तीं आहेत. आणि शाब्दे परे च निष्णात कवि त्यांचा तसा प्रयोग करतांना आढळतात. वेचक शब्द, हृद्य रचना, चमत्कृति आणि अलौकिक अनुभूति ह्यांच्या रसायनाचें नांव काव्य आहे. पण ह्या काव्यरचनेचें मूल आणि स्थूल द्रव्य शब्दच आहे. त्याची साभिप्रायता महत्त्वाची आहे. सब घोडे बारा टक्के असें नाहीं. गो म्हणजे जी गमनशील आहे अशी पृथ्वी. भू म्हणजे जी भावनशील आहे ती भूतभावन पृथ्वी. धरणी म्हणजे सर्वांना धारण करणारी चराचरधात्री. क्षमा म्हणजे सर्वांचें सर्वविध जीवन सहन करणारी. पृथ्वी म्हणजे पृथु, विशाल, ऐसपैस असलेली. मही म्हणजे महान्, महनीय असलेली. असे हे शब्द एका पृथ्वीचेच वाचक असून ते विविध गुणांचे द्योतक आहेत. पृथ्वी ही चराचर जीवांची माता असल्यामुळें ती महनीय आहे पूजनीय आहे. म्हणून तिला मही म्हणावयाचें. तिचें पाणिग्रहण आणि धारण सूर्यानें केलें आहे. म्हणून तो महीधर होय. "सूर्य आत्मा जगतस् तस्थुषश्च" म्हणून श्रुति आहे. भूमि माता आणि सूर्य पिता आहे. "गां आविश्य च भूतानि धारयाम्यहमोजसा" म्हणून जें म्हटलें आहे तें सूर्यनारायणाचें पितृत्वच प्रकट करतें. म्हणून महीधर म्हणजे सूर्यनारायणच होय. अथवा मही म्हणजे महत् ब्रह्म वा प्रकृति आणि तिला धारण करणारा परम पुरुष तो महीधर म्हणावा. अव्यक्त प्रकृति ही सर्व व्यक्त विकृतीहून मोठी असल्यामुळें ती मही होय. आणि तिचा हि आधार अव्यक्त आणि अक्षर असा पुरुषच होय म्हणून परमात्मा हा महीधर म्हणावा.

### ३१८. अच्युत

परमात्म्याचीं जितकीं म्हणून नामें आहेत तीं निर्गुणपर वा सगुणपर अशीं द्विविध आहेत. सगुण हि अव्यक्त आणि व्यक्त असें द्विविध, तसेंच व्यक्त हि निराकार आणि साकार असे द्विविध आहे. पुनः साकार हें सूक्ष्म आणि स्थूल असें द्विविध होईल. निर्गुण सगुण, अव्यक्त व्यक्त, निराकार साकार, सूक्ष्म स्थूल ही अशी परमात्म्याची अष्टधा प्रकृति झाली. हिलाच अष्टभुजा म्हणावयाचें. सर्व नामें नि रूपें हिचींच. तो परमात्मा तर सर्व असून सर्वातीत आहे, अति-सर्व आहे.

परमात्म्याचीं जीं निर्गुणपर नामें आहेत त्यांत अच्युत हें नाम सुप्रसिद्ध आहे. शंकराचार्यांचें तें लाडकें आहे.

संध्येची नामावली केशव नामानें सुरू होत असली तरी त्याच्याहि आधीं शंकराचार्य अच्युत नाम ठेवतात आणि "अच्युतं केशवं राम-नारायणम् । कृष्णदामोदरं वासुदेवं हरिम्।" म्हणून आळवतात. संपूर्ण अच्युताष्टक रामकृष्णपर आहे, पण सगुणाच्या डोक्यावर शंकराचार्यांनीं निर्गुण ठेवून दिलें आहे. म्हणूनच ते अच्युत नामानें आरंभ करतात. त्याच नांवानें तें अष्टक प्रसिद्ध आहे. ह्यांत च शांकरी मेख आहे.

अच्युत म्हणजे जो आपल्या सहज स्थितीपासून ढळला नाहीं तो कूटस्थ परमात्मा. अच्युत भाव म्हणजे तुरीय भाव. हा भाव सर्वभावांची क्रीडाभूमि होय. ते सर्व भाव गतागतकारी अन्तवन्त होत आणि अच्युतभाव त्यांच्या गतागतांचा सनातन साक्षी आहे. आणि असा तो कूटस्थ नित्य असल्यामुळेंच शंकराचार्य त्याचेंच प्रातःस्मरण करतात, प्रथम स्मरण करतात. सर्वारंभीं ज्याचें स्मरण करावयाचें तो हाच अच्युत होय. तोच वेदांत ॐ म्हणून आणि लोकांत गणेश म्हणून स्मरला, उच्चारिला आणि पूजिला जातो आहे. जगाच्या खोखोच्या खेळांतील तो आदि-अंतींचा खुंट आहे. म्हणून तो अच्युत.

### ३१९. प्रथित

जो अच्युत तोच प्रथित आहे. प्रथित म्हणजे प्रसिद्ध. कुठें आहे तो प्रसिद्ध ? तो वेदांत म्हणजे शास्त्रांत प्रसिद्ध आहे आणि लोकांत हि प्रसिद्ध आहे. अर्थात् सर्वत्र तो प्रसिद्ध आहे.

**यस्मात् क्षरमतीतोऽहं अक्षरादपि चोत्तमः ।**
**अतो ऽस्मि लोके वेदे च प्रथितः पुरुषोत्तमः ।।**

शास्त्रांत तो प्रकृति आणि जीव या दोन्ही क्षराक्षर पुरुषांहून श्रेष्ठ म्हणून पुरुषोत्तम या संज्ञेनें प्रसिद्ध आहे तर लोकांत तो मध्यम पुरुष तूं आणि प्रथम पुरुष तो या दोन्ही पुरुषांहून अन्तरतर म्हणून श्रेष्ठ सर्वान्तर्यामी मी या पदाचा वाच्य, उत्तम पुरुष म्हणून प्रसिद्ध आहे. पण हा व्याकरणाचा तात्त्विक उत्तम पुरुष सोडून दिला तरी लोकांत परमेश्वर म्हणून तर तो प्रसिद्ध आहेच. या जगाचा कर्ता कोण ? कोण चालवितो हें सारें विश्व ? या विश्वाचा समाहार कोण करतो ? या सगळ्या प्रश्नांचें जगाला ठाऊक असलेलें एकच उत्तर आहे "परमेश्वर". म्हणून तो लोकप्रसिद्ध आहे हें उघड आहे. लोकप्रसिद्ध हा समास सप्तमी-तत्पुरुष तसा तृतीया-तत्पुरुष हि आहे. परमात्मा लोकांत प्रसिद्ध आहे आणि लोकांमुळें हि प्रसिद्ध आहे. शास्त्रांत हि "जन्माद्यस्य यतः" म्हणून लोकावरूनच त्याचें अनुमान केलें आहे. तो वेद-प्रसिद्ध आहे. कारण वेदच त्याचें प्रतिपादन करतात. वेद म्हणतात म्हणून तो आहे म्हणावयाचा. नाहींतर तो आहे कशावरून ? जगाला कांहीं तो कुठें उपलब्ध होत नाहीं. लोक आहे म्हणून तो असला पाहिजे. लोक नाहींसे होतील आणि नव्हते म्हणून हि तो असलाच पाहिजे. असा तो लोक प्रसिद्ध आहे आणि वेदाचा तर तो मुळीं विषयच आहे. म्हणून तो वेद-प्रसिद्ध उघडच आहे. असा तो अति प्रसिद्ध आहे, प्रथित आहे.

### ३२०. प्राण

"प्राणः प्रजानां उदयत्येष सूर्यः" हा पहा सर्व जगाचा प्राण उगवत आहे असें सूर्याला पाहून ऋषि म्हणत आहे. सूर्याला जगाचा प्राण कां म्हटलें ? कारण तो जगाचें जीवन-सूत्र आहे. जीवनाची सर्व हालचाल त्याच्यामुळें होत आहे. त्याच्या स्पंदनाबरोबर जग स्पंदतें. म्हणून तो प्राण म्हटला. परमेश्वर हा तसा या विश्वाचा प्राण आहे. विश्वांतील यच्चयावत् जीवन हें त्याच्यामुळें आहे. म्हणजे चालतें आहे. उषा आणि संध्या या जणूं दोन नाकपुड्या आहेत. त्यांतून आंत बाहेर ये जा करणारा हा सूर्य प्राण होय. परमात्मा हि तसा युगादि आणि युगान्त यांच्यांतून ये जा करणारा या विश्वाचा प्राण आहे. प्राण हा नासाभ्यन्तरचारी आहे. तो आहे कीं गेला हें पाहण्यासाठीं मुमूर्षु जीवाच्या नाकाशीं सूत धरतात. काल हें या विश्वाचें नाक आहे. त्यांतून आंत बाहेर संचार करणारें जें जीवन-सूत्र, तो च प्राण. तो परमात्म्याहून वेगळा काय असूं शकेल ? म्हणून परमात्मा प्राण म्हणावयाचा. सगळीं देहेन्द्रियें आणि मनोवृत्ति झोपल्या तरी जो जागा राहतो

तो प्राण होय. तो जागा राहतो म्हणून स्वप्नसुषुप्तींतहि देहेन्द्रियमनोवृत्तीचें धारण होतें आणि सकाळीं उठल्यानंतर त्यांचे व्यापार पूर्ववत् चालू होतात. तोच जीवनाचा अंगार फुंकून फुंकून फुलवत राहतो, त्याला विझूं देत नाहीं. जें पिंडी तें ब्रह्माण्डीं. दोन्ही कडे एकच एक प्राण स्पंदत आहे आणि त्याच्या स्पंदनाबरोबर सारें चराचर स्पंदन करीत आहे. हें स्पंदन थांबलें कीं देहपात होतो पिण्डाचा आणि ब्रह्माण्डाचा हि. हें स्पंदन स्वलीन होतें नष्ट होत नाहीं. कल्पान्तीं ब्रह्माण्ड अव्यक्तांत अक्षर पुरुषाच्या ठाईं लीन होतें. त्यावेळीं पुरुष योगनिद्रित असतो म्हणजे प्राणशक्ति-स्तम्भन करून असतो. याच स्थितीचें वर्णन नासदीय सूक्तांत—"आनीद् अवातं स्वधया तदेकम्" असें केलें आहे.

## ३२१. प्राणद

जो प्राण आहे, तोच प्राण पुरविणारा प्राणद हि आहे. परमात्मा हा अग्निवत् सर्वव्यापी आहे. पण अग्नि मन्थन करून प्रकट करावा लागतो. तो हि तेव्हांच प्रकटतो जेव्हां त्यांत प्राण संचरतो. निर्वात स्थितींत किती हि मन्थन केलें तरी तो प्रकटणार नाहीं. म्हणून प्राणद हाच खरा जन्मदाता म्हणावयाचा. तोच खरा मातापिता आहे. मातापिता जीवाला जन्म देतात खरे, पण ते जीवांत प्राण-संचार नाहीं करूं शकत. म्हणून प्राणद परमात्माच सर्व व्यक्तींचा मातापिता होय. प्राणच जीव होय आणि तो देणारा परमात्मा होय. "प्राणेन आत्मना अनुप्रविश्य" अशी श्रुति आहे. आणि "वायुः अनिलं अमृतम्" अशी हि श्रुति आहे. ह्या दोन्ही जीवाचें प्राणरूपत्व च सिद्ध करतात. त्या श्रुति जीवाचा प्रवेश आणि निर्गम हे दोन्ही अन्त किंरूप आहेत तें सुचवितात. त्यावरून त्याचें प्राणरूपत्व सिद्ध होतें. त्याचा मध्य तर उघडच प्राणरूप आहे. विज्ञानानें अद्भुत प्रगति केली असली तरी त्याला प्राण निर्माण करतां आलेला नाहीं आणि कधीं काळीं करतां येणें शक्य हि नाहीं. कारण तें ईश्वरी रहस्य आहे. तें त्याच्याच अधीन आहे. जीवाचा तिथें लाग नाहीं. मानव जर प्राण निर्माण करूं शकला तर तोच प्राणद होईल. तो अमर होईल. परंतु अनीश्वराला ही ईश्वरी किमया केव्हां हि हस्तगत होणें नाहीं. म्हणून तो परमात्माच प्राणद होय.

प्राण आणि प्राणद अशा जोड्या विष्णुसहस्रांत कित्येक आल्या आहेत : वसु वसुप्रद, काम कामप्रद, सिद्धि सिद्धिद इत्यादि. जो स्वयं धनरूप धनी आहे तोच धनद होणार. दरिद्र काय देणार ? बिचारा दारिद्र हि देऊं शकत नाहीं, धन काय देईल ?

## ३२२. वासवानुज

वासव म्हणजे इंद्र आणि वासवानुज म्हणजे उपेन्द्र होय. उपेन्द्र हें नाम पूर्वीं येऊनच गेलें आहे. इथें वासवानुज पदानें काय विशेष सांगावयाचें आहे ? वसु अष्ट आहेत. त्यांचा जो स्वामी तो वासव म्हणावयाचा. हे अष्ट वसु कोणते ? पंच ज्ञानेंद्रियें आणि तीन मन, बुद्धि व अहंकार असे हे अष्ट वसु आहेत. यांच्या ठाईं प्राणरूप जीव वसति करून राहतो म्हणून तो वासव म्हणावयाचा. अथवा वसु म्हणजे धन. त्या अष्टविध धनाचा धनी म्हणून वासव. हा जीव हें पूर्व रूप होय. साधनेच्या दृष्टीनें परमात्मा हें साधनेनें सिद्ध करावयाचें उत्तर रूप होय. म्हणून परमात्मा हा वासवानुज, वासवाच्या पाठचा भाऊ म्हणावयाचा. वासवानुज पदानें हाच विशेष सांगितला आहे. काठीचीं दोन टोकें जशीं नित्य संबद्ध असतात तशीं हीं पूर्वोत्तर रूपें होत. ह्यांचें हें नित्य संबध्दत्व उपनिषदाच्या पुढील वचनांत, "सयुजौ" म्हणजे जुळे ह्या पदानें प्रदर्शित केलें आहे : "द्वा सुपर्णा सयुजा सखाया" ह्या वचनांत ते नुसते जुळेच नाहीं तर सनाम हि आहेत असें म्हटलें आहे, "सखाया" म्हटले आहेत. जीवात्मा परमात्मा दोन्ही आत्माच आहेत. सधूम हि अग्निच, निर्धूम हि अग्निच. पण सधूम हें पूर्व रूप आहे, निर्धूम हें उत्तर रूप आहे. अग्नि जेव्हां निर्धूम होऊन आपल्या पूर्ण तेजानें तळपतो तेव्हांच तो "स्वे महिम्नि प्रतिष्ठित" होतो. तसाच जेव्हां जीव निर्वासन होऊन आपल्या विशुद्ध म्हणजेच शिव रूपास प्राप्त होतो तेव्हांच तो "स्वे महिम्नि प्रतिष्ठित" होतो. सधूम अग्निवत् जीव आहे. निर्धूम अग्निवत् जीवन्मुक्त. आणि निरिन्धन शान्त अग्निवत् परमात्मा. जीव सदेह आणि

देहाभिमानी, जीवन्मुक्त सदेहपण निरभिमान आणि परमात्मा विदेह उपशान्त स्वरूप असा आहे. व्यवहारांत अग्रज हा ज्येष्ठ मानला जातो, वरिष्ठ समजला जातो. परंतु इथें परमार्थात तर अनुजच श्रेष्ठ नि वरिष्ठ होय. कारण तें उत्तर रूप आहे. उत्तम आहे.

### ३२३ अपां-निधि

अप् म्हणजे पाणी अपां निधि म्हणजे समुद्र होय. तो सर्व जलांचें, सर्व प्रवाहांचें, मायपोट आहे. सर्व प्रवाह त्यांतून उद्भूत होतात आणि त्यांतच संगत होतात. समुद्राच्या पोटांत काय काय भरलें आहे आणि किती किती भरलें आहे हें कोणाला सांगतां येत नाहीं. परमात्मा हा तसा सर्व संग्रह आहे. तो सर्वांचा उद्भव आहे आणि सर्वांचा निलय हि तोच आहे. हा समस्त संसारप्रवाह त्याच्यापासून निघालेला असून शेवटीं तो त्यांत च विलीन होतो. गीतेंत म्हटल्याप्रमाणें "अव्यक्तादीनि भूतानि व्यक्त-मध्यानि भारत । अव्यक्तनिधनानि एव" हीं सर्व भूतें जीं व्यक्त दिसत आहेत तीं सर्व अव्यक्ताच्या पोटांतून आलेलीं आहेत आणि शेवटीं अव्यक्तांतच गडप व्हावयाचीं आहेत. तें जें अनन्तपार अव्यक्त तोच अपांनिधि होय. मनूनें ह्याच सृष्टिपूर्व अव्यक्ताचें वर्णन पुढील शब्दांत केलें आहे :

**आसीद् इदं तमोभूतं अप्रज्ञातं अलक्षणम् ।**
**अप्रतर्क्यं अविज्ञेयं प्रसुप्तमिव सर्वतः ॥**

हा जो सृष्टिपूर्व अव्यक्तार्णव तोच सृष्टिप्रलयोत्तर हि एकजिनसी दिसावयाचा. मध्यंतरीं त्यावर सृष्टीचे तरंग आणि बुडबुडे क्षणकाल दिसतात इतकेंच. तेहि त्याच्या पृष्ठ भागावरच. तसा हा एकार्णव परमात्म्याहून वेगळा काय असणार ? परमात्म्याचीच ती प्रकृति होय. प्रकृति म्हणजे सहज स्थिति. मूल स्थिति. प्रकृति आणि प्रकृतिमंत हीं आपण वेगळीं करूं शकत नाहीं. औष्ण्य ही अग्नीची प्रकृति होय. प्रभा ही सूर्याची प्रकृति होय. उष्णतेविना अग्नीची, प्रभेविना सूर्याची आपण कल्पनाच करूं शकत नाहीं. परमात्माहि तसा अव्यक्त-प्रकृति आहे. ह्या प्रकृतीला स्त्री आणि प्रकृतिमंताला पुरुष म्हणून कवींनीं जाळीं विणलीं आहेत आणि त्यांत ते स्वतः हि फसले आहेत. अर्धनारी नटेश, वामांकारूढ-सीतामुखकमल-मिलल्लोचन राम इत्यादि दर्शनें, काव्यें आणि चित्रें ह्यांतूनच. मर्यादा-पुरुषोत्तम राम जर सीतेला मांडीवर घेऊन दरबारांत बसतो तर आम्हीं स्त्री-पुरुषांचें स्वैर चित्रण केलें तर सनातनी लोकांनीं, कोल्हेकुई कां करावी, असे कुतर्क कविब्रुव करूं लागतात.

### ३२४. अधिष्ठान

सत् चित् आनन्द हा ब्रह्माचा त्रिविध निर्देश आहे. हें ब्रह्म या जगदाभासाचें अधिष्ठान आहे. म्हणून परमात्म्याला अधिष्ठान म्हणावयाचें. ॐ सारखें जिथें एकच नाम आहे तिथें प्रश्न नाहीं. पण जिथें सत् चिद् आनंद अशीं अनेक नामें आहेत तिथें त्यांच्या क्रमाचा विचार करावा लागतो. आणि त्यांत ज्याला प्राथम्य मिळेल तेंच खरें अधिष्ठान म्हणावें लागेल. आनंद हा चेतनाचा धर्म आहे. अचेतनाचा नव्हे. म्हणून जिथें आनन्द तिथें तदुपादानभूत चैतन्य असलेंच पाहिजे. म्हणून चेतन गृहीत झालें. पण चेतन वा अचेतन हें सन्मूलकच असूं शकेल, असन्मूलक कदापि नाहीं. म्हणून सर्वादि सत् मानावें लागतें. अशा प्रकारें सत् हेंच सर्वाधिष्ठान होय. तें सत् चिद्रूप नसेल तर तिथें अनुभूति, प्रत्यय, जाणीव असूं शकणार नाहीं. म्हणून तेंच चित् हि मानावें लागतें. आणि तें चित् आत्मतुष्ट न मानल्यास तें पराधीन राहील आणि "पराधीन सपनेहुं सुख नाहीं" या न्यायानें तें सदैव दुःखी राहील. परंतु चेतन हा सदैव सुखाकांक्षीच असल्यामुळें तें चित् सुखरूप वा आनन्दरूपच मानावें लागतें. म्हणून त्यालाच आनंद हि म्हटलें आहे. अशा प्रकारें विश्वाधिष्ठान ब्रह्म हें सच्चिदानंदस्वरूप होय. लांबी रुंदी उंची ही जशीं वस्तूचीं त्रिपरिमाणें तशीं सत् चित् आनन्द हीं ब्रह्माचीं त्रिपरिमाणें होत. लांबीचा वा रुंदीचा वा उंचीचा एक कण घेतला तर त्यांत अन्य दोन परिमाणांचा हि कण आल्यावांचून राहत नाहीं. अर्थात् तिन्हीं अभिन्न एकरूप होत. तसाच हा सच्चिदानंद ब्रह्माचा प्रकार आहे. तिन्ही अभिन्न एकरूप होत. हा यांत्रिक समुच्चय नाहीं अथवा हें रासायनिक

मिश्रण हि नाहीं. हें आहे आध्यात्मिक ऐक्य. ह्यांत त्रिदल बिल्वपत्रवत् स्वगत भेदाला हि थारा नाहीं. असत्ता जडता आणि दुःखरूपता यांच्या व्यावृत्तीसाठीं तीं तीन पदें योजिलेलीं आहेत, वस्तुत्रैविध्यासाठीं नव्हे. अपांनिधिपदानें अव्यक्त प्रकृति आणि त्यापुढें लगेंच अधिष्ठान पदानें अक्षर पुरुष इथें अभिप्रेत आहे.

## ३२५. अप्रमत्त

अप्रमत्त म्हणजे आपल्या कर्तव्यांत प्रमाद न करणारा हा जो प्रमाद होतो तो कां ? तो मोहामुळें होत असतो. या मोहाचें स्वरूप काय ? अहंता ममता हें आहे या मोहाचें स्वरूप. हा देह म्हणजे 'मी' आणि या देहाचे संबंधी ते 'माझें' अशा धारणेंतून जी निष्पन्न होते ती वृत्ति, विचार आणि वर्तन ही सगळी मोहाची संतति होय. या मोहमृगजळाच्या पुरांत सारें विश्व जरी बुडालें असलें तरी परमात्मा त्या पासून पूर्ण अलिप्त आहे. कारण तो देहरहित आणि देहाभिमानमुक्त असल्यामुळें त्याला " मी आणि माझें " यांचा दुरूनहि स्पर्श होऊं शकत नाहीं. आणि त्यामुळेंच तो अप्रमत्त म्हटला आहे. तो सर्वांना स्वकर्मानुसार बरें वाईट फळ देतो. त्यांत कुठें हि अणुमात्र देखील पक्षपात होत नाहीं. फलदानांत जसा तो अप्रमत्त आहे, तसा तो ज्ञानदानांत हि अप्रमत्त आहे. कालरूपानें तो सर्वांचें सर्वस्व हरण करीत असतो आणि जीवांना त्यांच्या संग्रहाचें नश्वरत्व आणि दुःखरूपत्व पटवून आत्मज्ञानप्रवण करीत असतो. हें खरें त्याचें कर्तव्य आहे. ज्ञान अज्ञानाचा निरास करील नाहींतर काय करील ? प्रकाश तमाचा लोप करूनच प्रकाशत असतो. तसा परमात्मा अज्ञान-विध्वंस करूनच 'स्वे महिम्नि' प्रतिष्ठित होत असतो, विराजमान होत असतो. आणि ह्या अज्ञान-विध्वंसन कार्यांत तो सदैव अप्रमत्त असतो. जीव हा सदैव प्रमत्त आहे, तसा परमात्मा हा सदैव अप्रमत्त आहे. म्हणूनच म्हटलें आहे भागवतांत :

**प्रमत्तमुच्चैरितिकृत्यचिन्तया**
**प्रवृद्धलोभं विषयेषु लालसम् ।**
**त्वमप्रमत्तः सहसाभिपद्यसे**
**क्षुल्लेलिहानोऽहिरिवाखुमन्तकः ॥**

अप्रमत्त कालस्वरूप परमात्म्याचें आणि प्रमत्त लोभाभिभूत जीवाचें किती समर्पक चित्र रेखाटलें आहे हें! उंदीर खमंग पदार्थ खायला धडपडतो आहे आणि जिभल्या चाटणारा सर्प त्याला गट्ट करायला टपून बसला आहे. उंदराच्या तोंडांत पदार्थ पडण्याआधीं तोच सर्पाच्या तोंडांत पडतो आहे. असा हा जीव प्रमत्त आणि परमात्मा तद्विलक्षण अप्रमत्त आहे.

## ३२६. प्रतिष्ठित

परमात्मा कोणाच्या ठाईं प्रतिष्ठित आहे ? ज्या प्रतिष्ठेवर तो प्रतिष्ठित असेल ती त्याहून वरिष्ठ म्हटली जाईल. आधेयापेक्षां आधार मोठा म्हटला पाहिजे. पृथिवी आप तेज वायु आकाश हीं तत्त्वें एकाहून एक मोठीं अशीं आहेत. अर्थात् तीं पूर्वपूर्वाचा आधार होत. पण त्या आकाशाला हि आपल्या एका कोपऱ्यांत जिरविणारें जें बृहत्तम तत्त्व तेंच ब्रह्म होय. त्याला आधार कुठला ? तें निराधार म्हणायचें का ? नाहीं. तें निराधार नाहीं. तें स्वाधार आहे. तें आपल्याच पायावर उभें आहे. गोत्व गाईच्या ठाईं प्रतिष्ठित आहे आणि गाय गोत्वाच्या ठाईं प्रतिष्ठित आहे. तसें परमात्मत्व परमात्म्याच्या ठाईं प्रतिष्ठित आहे आणि परमात्मा आपल्या परमात्मत्वांत प्रतिष्ठित आहे. जो आपल्या स्वत्वांत प्रतिष्ठित नाहीं तोच अप्रतिष्ठित होय. परमात्मा हा परप्रतिष्ठित नाहीं तो स्व-प्रतिष्ठित आहे. जो स्वप्रतिष्ठित म्हणजे स्वत्वप्रतिष्ठित आहे तोच सुप्रतिष्ठित होय.

परमात्मा हा प्रतिजीव प्रतिदेह प्रतिव्यक्ति प्रत्यगात्म-रूपानें स्थित असल्यामुळें हि तो प्रतिष्ठित म्हणावा. अन्तर्यामी म्हणून सर्वत्र स्थित असल्यामुळें तो प्रतिष्ठित होय. प्रतिव्यक्ति स्थित असलेला हा अन्तरात्माच ब्रह्माची हि प्रतिष्ठा म्हटला आहे :

**ब्रह्मणो हि प्रतिष्ठाहं अमृतस्याव्ययस्य च ।**
**शाश्वतस्य च धर्मस्य सुखस्यैकान्तिकस्य च ॥**

आत्मोपलब्धि हीच सर्व उपलब्धींचा आधार होय म्हणून च तो आत्मा म्हणजे निजात्मा परमात्म्याचा आणि तद्-

द्वारा मोक्षाचा, त्याच प्रमाणें शाश्वत धर्माचा आणि तद्द्वारा परमसुखाचा आधार होय. आणि असें त्याचें गौरव असल्यामुळें तो प्रतिष्ठित म्हणावयाचा. प्रत्यगात्मा सर्वोपलब्धीचा मूलाधार म्हणून प्रतिष्ठित तर परमात्मा सर्वान्तर्यामी म्हणून प्रतिष्ठित.

### ३२७. स्कंद

स्कंद हा देवसेनानी आहे. देवांना हमखास विजय मिळवून देणारा तो कुशल आणि परम यशस्वी सेनापति आहे. कोण आहे हा स्कंद ? गीतेंत दैवी गुणांच्या गणनेंत ज्याचें प्रथम गणन झालें आहे तो अभय हाच स्कंद होय. दैवी गुणांची मालिका च देवसेना होय. तिला सेना म्हणायचें कारण ती आसुर गुणांच्या सेनेचा पराभव करते हें होय. प्रकाश अंधकाराचा पराभव करतो. त्यांचें सनातन युद्ध जुंपलें आहे. तसा हा दैवासुरसंग्राम अखंड चालू आहे. ह्यांत देवसेनानी आसुर सेनेचा पराजय करून विजयी होतो. काम क्रोध लोभ मोह मद मत्सर हा षड्वर्ग आसुरसेनामुख होय ह्यांना षडानन आपल्या सहा मुखांनीं तोंड देतो. अभयमुख पंच महाव्रतें वा यम हींच ती षडाननाचीं सहा मुखें होत. ज्ञानबलबलिष्ठ व्रतें प्रतिद्वंद्वी काम-क्रोधादि आसुर सेनेचें पारिपत्य करतात. ज्ञानबलामुळेंच तीं निर्भयपणें आसुरसेनेला तोंड देतात. आसुर सेना संख्याबलानें कितीहि बलिष्ठ भासली तरी अंधकारवत् अभाव रूप असल्यामुळें तिच्या ठाईं बल असत नाहीं. दैव सेना आत्मज्ञानबल-बृंहित आहे तर आसुर सेना भ्रान्तिगर्वित बलाभासदृप्त आहे. भ्रांतिजनितदोषस्कंदन करून दोषजनितकर्मक्षयकारी आत्मज्ञान दैवासुरसंग्रामांत सदैव विजयी होतें. तेंच देहकारणभूत दोषव्यापाराचें आणि देहधारणशील कर्मांचें स्कंदन करणारें अकुतोभय तत्त्व म्हणून स्कंद म्हटलें आहे. ज्ञानस्वरूप परमात्माच भ्रांतीचें आणि तज्जनित भयाचें स्कंदन म्हणजे निर्मूलन वा ध्वंसन करणारा असल्यामुळें तो ठीकच स्कंद म्हटला आहे. सर्व दैवी गुणसेनेचा सेनानी हि तोच होय. त्याच्याच सैनापत्याखालीं आसुरगुणसेनेचा पराजय होतो आणि ह्या संग्रामांत स्वपक्षाची किंचित् हि हानि होऊं न देतां तो प्रतिपक्षाला संपूर्ण गारद करीत असतो म्हणून सर्व सेनानींत तो श्रेष्ठ होय. म्हणूनच म्हटलें आहे 'सेनानीनां अहं स्कंदः।''

### ३२८. स्कंदधर

स्कंद म्हणजे अनात्मभावाचें व्यावर्तन करणारें आत्मज्ञान हा मूल अर्थ झाला. आणि अशा आत्मज्ञानाची जी गुणप्रभा ती हि पर्यायानें स्कंदच म्हणावयाची. सूर्य आणि सूर्यप्रभा दोन नाहीं, तसें हें ज्ञान आणि ज्ञानप्रभा हि दोन नाहीं. त्यामुळें जो स्कंद म्हटला तोच स्कंदधर हि म्हणावयाचा. भास्वान् म्हणजे सूर्य आणि सूर्य म्हणजे भास्वान्! तसा स्कंद तोच स्कंदधर. जितके म्हणून दैवी गुण आहेत ते सगळे स्कंद होत. प्रत्येक गुण-किरण अवगुण-तमाचें निष्कासन करतो. अक्रोध क्रोधाचें, विराग रागाचें, शान्ति क्षोभाचें, सत्य असत्याचें, प्रेम द्वेषाचें, करुणा निष्ठुरतेचें निष्कासन निर्दलन निर्मूलन करीत आहे. म्हणून हे सर्व दैवी गुणरूप आध्यात्मिक योग स्कंद होत. आणि ज्या अर्थीं हे सर्व आत्म्याचे म्हणा वा आत्मज्ञानाचे म्हणा अंगभूत होत त्याअर्थीं तो आत्मा, तो परमात्मा हा स्कंदधर म्हणावयाचा.

स्कंद धातु उडी मारणें, नाश करणें, उत्सर्ग करणें अशा तीन अर्थांनीं येतो. देवसेनानी स्कंद संसारजालांतून उडी मारून पार गेला म्हणून तो स्कंद होय. त्यानें कामरागादि दोषांचें निर्दलन केलें म्हणून हि तो स्कंद म्हणावयाचा. त्याच प्रमाणें त्यानें वैराग्य आत्मतुष्टि इत्यादि आत्मगुणांचें विकिरण केलें म्हणूनही तो स्कंद होय. परमात्मा हा प्रपंचोपशम शिवस्वरूप असल्यामुळें तो स्कंद तसा स्कंदधर म्हटला गेल्यास नवल नाहीं. त्याहून प्रपंचाच्या अतीत दुसरा कोण गेला आहे? कोणीं सर्व अनात्मभावजनित दोष-सेनचें निकन्दन केलें आहे? कोणीं वैराग्य आत्मतृप्ति आत्मज्योति

इत्यादि आत्मगुण प्रकट केले आहेत? हीं सर्व आत्मज्ञानाचीं लक्षणें आणि कार्ये परमात्म्याहून अधिक प्रकर्षानें कोणीं धारण केलीं आहेत? त्यामुळें तो परमात्मा स्कंदधर म्हटला आहे. स्कंद भीष्म हनुमान् इत्यादि त्याची अर्वाचीन रूपें होत. तीं त्यानें धारण केलीं आहेत म्हणून हि तो स्कंदधर म्हणावयाचा.

## ३२९. धुर्य

धुर्य म्हणजे धुरंधर, धुरेचा. निश्रेयसकारण ज्ञान घ्या कीं अभ्युदय-कारण धर्म घ्या, दोहोंत परमात्मा म्हणजे त्याचें ज्ञान व त्याचें यजनच धुरेचें म्हणजे अग्रिम आहे. चारी पुरुषार्थांचा दाता तो आहे. गीतेंत म्हटलें आहे:

**''भोक्तारं यज्ञ-तपसां सर्वलोक-महेश्वरम्।**
**सुहृदं सर्वभूतानां ज्ञात्वा मां शान्तिमृच्छति।।**

यांत यज्ञ-तपांचा भोक्ता हें पद चिंतनीय आहे. यज्ञानें अभ्युदयकारण धर्माचा तर तपानें निश्रेयस-कारण ज्ञानतपादिकांचा निर्देश केला आहे. अर्थात् सकल पुरुषार्थाचा दाता आणि भोक्ता तो परमात्मा आहे. म्हणून तो धुर्य म्हणावयाचा. भुक्ति हवी असेल तरी त्या विश्वंभरालाच भजलें पाहिजे. मुक्ति हवी असेल तरी त्या मुकुंदालाच भजलें पाहिजे. अशा प्रकारें सर्वतो परी तो परमात्माच अग्रपूज्य आहे. तो सर्वादि आहे. तोच हा विश्वरथ वाहत आहे. म्हणून तो धुर्य. विश्वाचा गुरुभार त्याच्यावांचून दुसरा कोण वाहूं शकेल ? धुरा धारण करण्याची क्षमता असलेल्या पक्क्या बैलाला धुर्य म्हणतात. तो बुद्धिमान् आणि शक्तिमान् असतो गाडी वाहून शकटस्थांना तो इष्ट स्थळीं पोंचवतो. परमात्मा हा तसा आहे. तो या चराचराला वाहून नेत आहे. त्यांना इष्ट स्थळीं पोंचवीत आहे. सर्वांच्या अंतरींचें आर्त त्याला कळतें. त्याविषयीं तो बरेंवाईट न म्हणतां सहानुभूतिच राखतो. सहानुभूति राखून तें तें आर्त मायबापाप्रमाणें पुरवितो याचेंच नांव सर्वभूतसुहृत्. आणि असा तो सर्वभूतसुहृत् असल्यामुळेंच तो धुर्य झाला आहे. शहाण्या बैलांवर भरोसा ठेवून गाडीवान् झोंपी जातो. बैल त्याला सुरक्षित इष्ट स्थळीं घेऊन जातो. परमात्मा हा तसा या विश्वाचा बैल आहे, धुर्य आहे.

## ३३०. वरद

वर म्हणजे आपलें अभिलषित. तें जो देतो तो वर-द होय. परमात्मा हा तसा सर्व जीवांचा अभिलषित-चिन्तामणि होय. प्रवाश्याला थारा, तहानलेल्याला पाणी, भुकेल्याला अन्न अमृत होय. परंतु तृप्तापुढें तुम्हीं अमृत ठेवलें तरी त्याला त्याची मातब्बरी वाटणार नाहीं. त्यामुळें ज्याला ज्याची गरज आणि ओढ आहे ती त्याची मागणी पुरविणें याहून अधिक सुखकर दुसरें कांहीं नाहीं. परमात्मा हा तसा ''आवडीचें दान'' देतो. म्हणून तो वरद होय. तुम्हीं इन्द्रपद मागितलें तर तो इन्द्रपद देईल, निद्रापद मागितलें तर तो निद्रापद देईल. तुम्ही वराल तें तो तुम्हांला देतो. त्यामुळें त्याच्या बऱ्यावाईटपणाची जबाबदारी सर्वस्वीं तुमची आहे. ''ये यथा मां प्रपद्यन्ते तांस् तथैव भजाम्यहम्'' अशी त्या वरदाची प्रतिज्ञा आहे. वराची ही अशी जोखीम असल्यामुळें सहज ज्ञानी भोळा भक्त प्रतर्दनाप्रमाणें देवाला म्हणतो—देवा, तूंच माझ्यासाठीं वर वर. मला काय वरणें योग्य तें तूंच सांग. तूंच वरज्ञ आहेस. उलट प्रह्लादासारखा चतुर भक्त देवानें ''वरं ब्रूहि'' म्हणतांच त्याला ''मला भिकारी बनवूं नको'' म्हणून बजावतो. तो म्हणतो.

**मा मां प्रलोभयोत्पत्त्यासक्तं कामेषु तैर् वरैः।**
**कामानां हृद्यसंरोहं भवतस्तु वृणे वरम्।।**

दोघांनीं वर वरण्यांत अतुल बुद्धिमत्ता दाखविली आहे. ''आत्मानं विजानीहि। एतदेव अहं मनुष्याय हिततमं मन्ये'' म्हणून देवानें प्रतर्दनाला आत्मकामना

बहाल केली, तर प्रल्हादाला निष्कामता बहाल केली. दोन्ही एकच. अनात्मकाम दोहोंना हि समानच निषिद्ध आहे. वरविवेक इष्टच आहे. पण तो भक्तांचा प्रश्न आहे. पण भगवान् तर भुक्ति मुक्ति असला कोठला हि इष्टानिष्टविवेक जाणत नाहीं. त्याच्या लेखीं भुक्ति मुक्ति समानच अर्थ आहेत. जो जी मागेल ती भीक घालणें एवढेंच ब्रीद त्याचें आहे. त्याच्या लेखीं दोन्ही भिकाच.

## ३३१. वायुवाहन

वायुवाहन म्हणजे वायूचें वाहन असणारा अथवा वायु ज्याचें वाहन आहे असा. अशा उभय प्रकारें हा समास विगृहीत करतां येतो. तत्पुरुष समास घेतल्यास परमात्मा हा वायूचें वाहन आहे म्हणजे त्याचें वहन करून नेणारा आहे, असा अर्थ होईल. प्राण ही जीवाची खूण आहे. जिथें प्राण आहे, चलन वलन आहे तिथें जीव आहे असें आपण ओळखतों. गर्भिणीच्या उल्बकोशांतील हि त्या गर्भस्थ जीवाचें स्पन्दन आपल्याला ऐकूं येतें. अर्थात् जिथें जिथें जीव तिथें तिथें प्राण आहे. जीवच वायूचें वाहन आहे. जिथें जीव नाहीं तिथें प्राण नाहीं. म्हणूनच निर्जीवाला आपण निष्प्राण म्हणतों. प्राण ही जीवाची खूण असली तरी प्राण हा नियम्य असून जीव नियामक होय. जीव प्राणनिरोध करून राहूं शकतो. म्हणून जीव हा स्वामी होय, प्राण सेवक. आपण क्षणकाल प्राणनिरोध करूं शकतों, योगी दीर्घकाळ करूं शकतात. परमात्मा स्वेच्छेनें, कल्पान्तीं प्राणनिरोध करून राहतो तो कल्पारम्भीं पुनः प्राण-स्पन्दन करूं लागतो. अशा प्रकारें जीव, आत्मा, परमात्मा हा प्राणाचा वाहक म्हणजे चालक आहे. बहुव्रीहि समास घेतल्यास वायु ज्याचें वाहन तो वायुवाहन असा विग्रह होईल. पण अर्थांत फरक होण्याचें कारण नाहीं. जो चालक असतो तो आपल्या वाहनावर आरुढ होऊन त्याला चालवीत असतो. अर्थात् परमात्मा वा जीव आपल्या प्राणवाहनावर आरुढ होऊन गमनागमन करतो असा भाव. निरनिराळ्या देवतांची निरनिराळीं वाहनें प्रसिद्ध आहेत. त्या वाहनांवरून त्यांच्या आगमनाची वार्ता कळते. तें वाहन त्यांचें निशाणच होय. गरुड-वाहन गरुडध्वज विष्णु आहे, तर वृषभवाहन वृषभध्वज शंकर आहे. जीवात्मा तसा प्राणवाहन प्राण-ध्वज आहे. प्राणाच्या फडफडणाऱ्या ध्वजावरून दुरूनच जीवराजाच्या स्वारीच्या आगमनाची वार्ता कळते. प्राणाच्या हालचालींनीं त्याचा निकट परिचय होतो.

## ३३२. वासुदेव

जो सर्वत्र वसला आहे आणि सर्व ज्यांत वसले आहेत तो वासु म्हणावयाचा. आणि द्योतनशील प्रकाशस्वरूप असल्यामुळें तो देव हि होय. म्हणून वासुदेव. परमात्मा आकाशवत् सर्वांच्या आंत भरला आहे तसा सर्वांना वेढून हि राहिला आहे. "तत् अन्तर् अस्य सर्वस्य तद् उ सर्वस्य अस्य बाह्यत:" तो सर्वांचें सबाह्य अभ्यन्तर व्यापून आहे. कारण तद्भिन्न मुळीं कांहीं वस्तुच नाहीं. "पुरुष एव इदं सर्वम्" ईशावास्यं इदं सर्वम्" "वासुदेव: सर्वम्" हा वेद उपनिषदें गीता यांचा अनुस्यूत विचार आहे. हिन्दुधर्माचा आणि दर्शनाचा मुख्य सिद्धांत तो हाच होय. सर्व विचार आचार आणि उच्चार या सिद्धान्ताचे उपसिद्धान्त आणि विनियोग मात्र होत.

"वसुदेवस्य अपत्यं पुमान् वासुदेव:" ही व्युत्पत्ति तर प्रसिद्धच आहे. त्या वसुदेवपुत्रानें गीतेंत "वासुदेव: सर्वम्" हा जो सिद्धांत सांगितला तो आत्मप्रतीति गुरुप्रतीति आणि शास्त्रप्रतीति एकवटून सांगितला आहे. "वासुदेव: सर्वम्" मध्ये सोऽहंभाव प्रकटला आहे. आणि निर्गुण सगुण आणि साकार यांचें ऐक्य हि त्यांत साधलें आहे. जें तें निर्गुण ब्रह्म तोच सगुण भगवान् आणि तोच हा साकार वासुदेवावतार होय. तिन्ही बाष्प-जल-हिमवत् विभिन्न असून एकरूप होत. आणि म्हणूनच साकार-पूजा, सगुण चिन्तन

आणि निर्गुण श्रद्धा अविरुद्ध असून उपपन्नच होत. म्हणूनच हिन्दु धर्मांत मूर्तिपूजेचा निषेध नाहीं वा सगुण आराधनेचा हि नाहीं. निर्गुणाच्या भूमिकेवर सगुणाच्या विटेवर साकार विठ्ठल भक्तांना भेट देत उभा आहे. इथें तिन्ही एकरूपच आहेत.

## ३३३. बृहद्भानु

सूर्य सगळ्या जगाला प्रकाशित करतो, जाणतो. परंतु तो स्वत:ला प्रकाशित करूं शकत नाहीं, जाणत नाहीं. सूर्य चंद्र अग्नि या सर्वांनाच हें लागू होतें. जो स्वत:लाच जाणत नाहीं तो साऱ्या जगाला तरी काय जाणणार? त्याचें तें प्रकाशकत्व नुसतें नांवाचें. तें खरें नव्हे, खरा प्रकाश केवळ एका चित् सत्तेचाच आहे. म्हणून केवळ तीच एक प्रकाशक असून तदितर सारे प्रकाश्य होत. ह्याच वर्गांत अग्नि चन्द्र तारका आणि सूर्य हीं तेजें येतात. म्हणूनच म्हटलें आहे.

**''न तद् भासयते सूर्यो न शशाङ्को न पावक:''**
**यदादित्यगतं तेजो जगद् भासयतेऽखिलम्।**
**यच् चन्द्रमसि यच् चाग्नौ तत् तेजो विद्धि मामकम्।।**

असें जें हें स्वोपज्ञ स्वज्ञ आत्मतत्त्व तेंच सर्वज्ञ आहे. म्हणून त्यालाच बृहद्भानु म्हणावयाचें. त्याच्या पुढें सूर्यासारखीं तेजें हि अल्पच म्हणावयाचीं. आत्मोपलब्धि-सामर्थ्यच सर्व ज्ञानाचा आधार आहे. तें असेल तर सर्व ज्ञान हस्तगतच आहे. तें नसेल तर सर्व असून नसल्यासारखेंच आहे. कारण त्याची उपलब्धि होणार कोणाला? जडमात्र चेतनपरवश आहे, पण चेतन जडवश नाहीं. त्यामुळें हें सारें विश्व चिद्घन परमात्म्याच्या अधीन आहे. सारें त्याचें स्व आहे, त्याच्या मालकीचें आहे. म्हणून म्हटलें आहे:

**ईशावास्यं इदं सर्वं यत्किंच जगत्यां जगत्।**
**तेन त्यक्तेन भुञ्जीथा मा गृध: कस्यस्विद् धनम्।।**

सर्व वित्त म्हणजे सर्व ज्ञान आणि सर्व धन परमेश्वराचें आहे, बृहद्भानूचें आहे.

## ३३४. आदिदेव

जगत्-कारण असल्यामुळें परमात्मा हा आदिदेव होय. या आदिदेवाचें वर्णन ज्ञानदेव असें करतात :

**सर्वादि सर्वसाक्षी तो। विश्वंभर खल्विदं तो गे बाई।**
**आनन्दा आनन्द तो। प्रबोधा प्रबोध तो गे बाई।**
**बाप रखुमादेवीवरु तो। विटेवरी उभा तो गे बाई।।**

परमात्मा हा स्वत:च आदिरूप असल्यामुळें त्याचें आदि, त्याचें मूळ, दुसरें काय असणार? तो अनादि आहे. झाडाला मूळ असतें, पण मुळाला मूळ कुठलें? हा सर्वादि असलेला सत्यदेव सर्वसाक्षी हि आहे. सर्वांचा ज्ञाता आहे. आणि ज्ञाताच नाहीं तर सुखरूप हि आहे. हा सच्चित्सुखरूप परमात्मा प्रकृतीचा स्वामी असून तो या विटेवर, प्रतिदेहाच्या इष्टिकेवर, उभा आहे.

देव अनेक आहेत. पृथ्वीवर अग्नि हा देव आहे. अन्तराळांत विद्युत् देव आहे, आकाशांत वा स्वर्गांत सूर्य हा देव आहे. कारण ते सर्व विद्योतमान् आहेत. पण या सगळ्या देवांचा देव, या सगळ्या प्रकाशकांचा प्रकाशक तोच खरा देव असून तोच आदिदेव म्हणजे मूळ देव म्हटला आहे. तो देवाधिदेव म्हणजे मागील नामांत ज्याचें विवरण केलें आहे तो बृहद्-भानु होय, चित्सूर्य होय. हें समस्त विश्व त्याचाच प्रकाश होय. अग्नि-विद्युत्-सूर्य हा तर त्या विश्वप्रकाशाचा एक किरणच म्हणावयाचा. या विश्वाचें तें जें मूळ चिदुपादान तोच आदिदेव असून ब्रह्म-विष्णु महेशादि वा सूर्यचंद्रतारकादि देव सगळे अर्वाचीन होत. या आदिदेवाचें नमन आद्य म्हणूनच ज्ञानदेवानें आपल्या ज्ञानेश्वरीच्या आरंभीं केलें आहे :–

**ॐ नमो जी आद्या। वेद-प्रतिपाद्या।**
**जय स्व-संवेद्या। आत्मरूपा।।**

### ३३५. पुरंदर

पुरं दारयति इति पुरंदर:। जो पुर म्हणजे किल्लेकोट फोडून टाकतो, मोडून टाकतो, तो पुरंदर होय. किल्लेकोट फोडायचे ते अर्थात् शत्रूचे होत. परमात्मा हा तसा पुरंदर आहे. तो आपल्या शत्रूचे किल्लेकोट नेस्तनाबूत करतो. अर्थात् त्याला मैदानांत खेचून ठेचून काढतो, ठार करतो. पण परमात्म्याला शत्रु कोण? परमात्म्याचा शत्रु वास्तविक कोणीच नाहीं. पण परमात्म्याच्या ज्ञानाच्या आड येणारा तो त्याचा शत्रु म्हणावयाचा. पण मनुष्य आडवाटेला कां जातो? कोण त्याला आडवाटेस लावतो? ज्याच्यामुळें मनुष्य आडवाटेस जातो, भगवन्ताला विमुख होऊन मृत्यूच्या पापवाटेस लागतो, त्याचें नांव आहे काम. भगवान् त्या परिपन्थी वाटमाऱ्या वैऱ्याचे किल्लेकोट फोडून टाकतो. गीतेंत ह्या बिलंदर वैऱ्याचें आणि पुरंदर परमात्म्याचें हें युद्ध वर्णिलें आहे. बिलंदर घूस बिळ करून त्या बाले किल्ल्यांत घुसून बसते. माणूस तिचीं बिळें खोदून आणि बुजवून नाहींशीं करतो. घुशीला बाहेर काढून तिला ठार करतो. गीतेंत हि तसेंच म्हटलें आहे:

> अथ केन प्रयुक्तोऽयं पापं चरति पूरुष:।
> अनिच्छन्नपि वार्ष्णेय बलादिव नियोजित:।।
> काम एष क्रोध एष रजोगुण-समुद्भव:।
> महाशनो महापाप्मा विद्ध्येनमिह वैरिणम्।।
> इन्द्रियाणि मनो बुद्धिर् अस्याधिष्ठानमुच्यते।
> एतैर् विमोहयत्येष ज्ञानमावृत्य देहिनम्।।
> तस्मात् त्वं इन्द्रियाण्यादौ नियम्य भरतर्षभ
> पाप्मानं प्रजहीह्येनं ज्ञानविज्ञान-नाशनम्।।

कामवैऱ्याचीं पुरें तीन आहेत: इन्द्रियें मन आणि बुद्धि. किल्ल्याला कोट असतात आणि सर्वांत आंत बालेकिल्ला असतो. सर्व मिळून तो किल्लाच. तसेंच हें. परमात्मा हा किल्ला फोडतो आणि जिंकतो. म्हणून तो पुरंदर.

### ३३६. अशोक

मोह आणि शोक हा एक जोड चित्तविकार आहे. जिथें मोह असतो तिथेंच शोक संभवतो. या दोहांना मिळून माया म्हणावयाचें. जीवाला शरीराविषयीं आणि तदनु स्वजन-धनादिकाविषयीं मोह असतो. अज्ञानजन्य तदभिमान आणि आसक्ति असते. परंतु ह्या सर्वच उपाधि नाशवंत असल्यामुळें त्या जीवापासून स्वभावत:च, त्याची इच्छा असो नसो, गळून पडत असतात. मूढ जीव त्याबद्दल शोक करतो. त्यांच्या ठाईं असलेल्या आपल्या आसक्तीमुळें त्यांच्या वियोगाचें त्याला दु:ख होतें. स्वरूपाविषयींच्या आपल्या अज्ञानामुळें जीवमात्र या शोकमोहाच्या चरकांत सांपडला आहे. त्यामुळें मूढ आणि शोचमान हीं जीवाचीं नित्य विशेषणेंच होत. त्याचीं तीं लक्षणेंच होत. या उलट परमात्मा हा ज्ञानस्वरूप असल्यामुळें तो नित्य शुद्ध बुद्ध मुक्त स्वभाव आहे. मोह आणि शोक ह्यांचा संपर्क तिथें संभवतच नाहीं. म्हणून तो अशोक म्हटला आहे. अशोक म्हटला म्हणजे सहजच तो अमोह झाला. कारण शोक हें मोहाचें फळ आहे. त्याच्यांत कार्यकारणसंबंध आहे. म्हणून म्हटलें आहे: **तत्र को मोह: क: शोक: एकत्वं अनुपश्यत:।** सर्व उपनिषदांचें हेंच तात्पर्य आहे. गीता हि उपनिषदच. किंबहुना उपनिषत्सार. तेव्हां तिचें हि तात्पर्य उपनिषदांहून वेगळें कसें असेल? ईशोपनिषदांत "स पर्यगात् शुक्रं अकायं अव्रणं, अस्नाविरं शुद्धं अपापविद्धम्। कविर् मनीषी परिभू: स्वयंभूर् याथातथ्यत: अर्थान् व्यदधात् शाश्वतीभ्य: समाभ्य:।।" या मंत्रांत आत्मज्ञ हा आत्मनिष्ठ कसा असतो तें विवरिलें आहे. ह्याच्याच वरील मंत्रांत तो मोह-शोक-मुक्त असतो हें येऊन गेलें आहे. गीतेची खरी सुरवात हि, "अशोच्यान् अन्वशोचस् त्वम् नानुशोचन्ति पण्डिता:"

या श्लोकानें झालेली आहे. जी गोष्ट साधक प्रयत्नानें साध्य करतो ती परमेश्वरापाशीं स्वत:सिद्ध असते. परमात्मा अशोक आहे, तर ज्ञानी विशोक.

### ३३७. तारण

तारण म्हणजे तारक, तारणारा. परमात्माच एक या मृत्युसागरांत तारण आहे. जें स्वत:च बुडतें, तळ गाठतें तें नश्वर तुम्हांला काय तारणार? तें बुडणार आणि बुडवणार. जें शाश्वत आहे, अजर आहे, अमर आहे, तेंच तारणार. असें तत्त्व एक परमात्माच आहे. आणि म्हणून तेंच तारण, तेंच शरण. ह्या अशा तरण आणि तारण तत्त्वाला सोडून जे देह नि देहानुबंधी नश्वराच्या भजनीं लागतात ते मृत्यूमागून मृत्यूस प्राप्त होतात.

''अप्राप्य मां निवर्तन्ते मृत्युसंसारवर्त्मनि।''

मृत्युसंसारवर्त्म म्हणजे नुसती मृत्यूची वाट नव्हे तर मृत्यूमय वाट, ज्या वाटेवर पदोपदीं मृत्यु भेटतो अशी वाट. हें सर्व जग नश्वर आहे. त्यांतील कशाचा हि आश्रय घेतला तरी तें बुडणार आणि बुडविणार. म्हणून तें मृत्युसंसारवर्त्म होय. एक परमात्मतत्त्वच 'कूटस्थ, अचल, ध्रुव' आहे. म्हणून तेंच एक तारण आणि शरण होय. त्याचाच जीवानें आश्रय करावा. तेंच क्षेम होय. नदीकांठीं मोठमोठीं कांसवें असतात. त्यांना दगड समजून कोणी त्यावर बसतो, पण तें हळूंच पाण्यांत बुडतें आणि बसणाराला बुडवितें. तसा ह्या जगांतील नश्वराचा धंदा आहे. तें जीवाला विसाव्याचें स्थळ वाटतें. तो त्यावर विसावतो न विसावतो तोंच तें त्याला तळ दाखवितें. म्हणून परिमार्गितव्य पद तेंच होय कीं जें शाश्वत आहे. तेंच तारण इतर सारें बुडवण. म्हणून शाश्वत परमात्मा

'हाचि आश्रय कल्याण हाचि आश्रय उत्तम।
हाचि आश्रय पावूनि दु:खांतूनि सुटे नर॥'

—धर्मपद

### ३३८. तार

विष्णु-सहस्रांत 'तार' 'तारण' आणि 'उत्तारण' हीं नामें आलीं आहेत. एकाच तृ धातूचीं तीं रूपें आहेत आणि म्हणून समानार्थकच आहेत. सर्वांचा अर्थ तारणारा, पार उतारणारा, असाच आहे. राम, रामभद्र आणि रामचंद्र तिन्ही एकाचींच नांवें. तसें हें आहे. राम्या, रामा, रामराव अशा प्रकारें वयोभेदानुसार आपण एकाच माणसाला हांक मारतो. जणूं ते तिघे आहेत, वेगवेगळे आहेत! आणि ज्या अर्थीं तीन नामें झालीं आहेत त्याअर्थी त्यांत त्रैविध्य आहे, वैविध्य आहे हें खास. राम्या शेंबडा आहे, रामा शाळकरी आहे, रामराव अधिकारी आहेत. ते एक असून अनेक आहेत. तसा परमात्मा एक असून अनेक आहे. तो निरुंद आणि उथळ, पायीं उतरतां येईल असा, नदीचा उतार वा 'तार' आहे. तो ज्याच्या आधारें तरून जाता येईल अशी सांगड वा नाव आहे, 'तारण' आहे. तो पैलतीराला नावेतून सुखरूप पोंचविणारा नावाडी आहे. 'उत्तारण' आहे. परतीरास पोचायला जें जें सहायक तें तें सर्व तो आहे. तो वर्णाश्रमधर्मरूप 'तार' आहे, ज्ञानरूप 'तारण' आहे, मोक्षदानी 'उत्तारण' आहे. नदी तुम्ही पाईं उतरा, बाहूंनीं तरून जा, वा सांगड-नावांच्या साधनानें पार करा. तें तुमच्या पायांतील, बाहूंतील आणि बुद्धींतील तारक बल देहस्वामी आत्म्याचें आहे, चेतनाचें आहे, तें पाय दंड आणि मेंदू या जड देहावयांचें नव्हे. म्हणून जगांतील सर्व ज्ञान आणि सर्व (क्रिया) बल त्या आत्म्याचें आहे, परमात्म्याचें आहे. तोच सर्व-ज्ञाता आणि सर्व-कर्ता आहे. सर्व धातु ज्ञानवाचक अथवा क्रियावाचक आहेत

आणि या दोहींचें अधिष्ठान तें आत्मतत्त्वच आहे. तार तारण आणि उत्तारण या त्रिविध शब्दांचें अधिष्ठान जसा एकच तृ धातु आहे तसा तार आणि मार या समस्त विविध क्रियांचा तो परमात्माच अधिष्ठान आहे.

## ३३९. शूर

शूर म्हणजे निर्भय, निधड्या छातीचा. याचा विरुद्धार्थक शब्द भीरु, भ्याड, कायर. शूर, वीर, पराक्रमी हे शब्द सगोत्र आहेत, पण वेगवेगळ्या व विशिष्ट अर्थांचे आहेत. शूर म्हणजे निर्भय, संकटास न डगमगतां तोंड देणारा 'युधिष्ठिर'. वीर म्हणजे वीर्यवान्, बलवान्, शत्रूवर तुटून पडणारा 'भीम'. आणि पराक्रमी म्हणजे शत्रूवर वा संकटावर तुटून पडणारा आणि विजयी होणारा 'अर्जुन'. जीवनाच्या समरांत कीर्तिमंत व्हायला निर्भयता, सहनशीलता आणि धडाडी तिन्ही गुण अपरिहार्य आहेत. पण विजयी व्हायला दैवाची अनुकूलता हि हवी. ती नसेल तर द्यूतांत हारी मागून हार खाणाऱ्या युधिष्ठिरासारखी गत व्हावयाची. पांडव द्यूतांत हरले, युद्धांत जिंकले; पण ही हार-जीत मानव-प्रयत्नाधीन नाहीं. ती सर्व ईश्वराधीन आहे. ''कर्मण्येवाधिकारस् ते, मा फलेषु कदाचन'' 'निमित्तमात्रं भव सव्यसाचिन्'' ''अहंकारविमूढात्मा कर्ताहमिति मन्यते'' ''स्वभावस् तु प्रवर्तते'' इत्यादि गीता-वचनें हें स्पष्ट सांगत आहेत. कर्म आणि कर्मफल या दोहोंच्या हि बाबतींत तो केवळ परतंत्र आहे. आणि तो 'पर' म्हणजे परमेश्वर होय. त्यालाच शरण जाणें आणि 'करिष्ये वचनं तव' म्हणणें हेंच ज्ञान, आणि हीच भक्ति होय. हेंच धैर्य आणि शौर्य होय. ''हें चि शूरत्वाचें अंग। हारी आणिला श्रीरंग'' असें म्हणूनच तुकारामानें म्हटलें आहे. ज्याला शरण जाण्यांत शूरत्व आहे तो स्वत: किती शूर म्हणावा? तो परम निर्भय आहे. सर्व मृत्यूला भितात, पण मृत्यूची मात्रा त्याच्यावर चालत नाहीं. इतकेंच नव्हे तर मृत्युच त्याला भितो असा तो परमात्मा शूर आहे. त्याच्या शौर्याचे पोवाडे म्हणजे पुराणें होत. दशावतारांची नि शतावतारांचीं चरित्रें म्हणजे त्याच्या शौर्याचेच पोवाडे होत. एवढें ज्याचें शौर्य प्रसिद्ध आहे तो शूर आहे म्हणून काय सांगायला पाहिजे? अमुक एक कर्म, शुभ वा अशुभ, करणें वा न करणें जीवाच्या अधीन नाहीं. 'कार्यते ह्यवश: कर्म सर्व: प्रकृतिजैर् गुणै:' अधर्म्य द्यूत वा धर्म्य युद्ध पांडवांना टाळूनहि टळलें नाहीं त्यांतील हार आणि जीत हि त्यांच्या स्वाधीनची गोष्ट नव्हे. तें सर्व पराधीन आहे.

## ३४०. शौरि

शूर म्हणजे निर्भय पराक्रमी. अशा लोकांचा जो देश तो शूर (वा शूरसेन) देश. आणि लोक हि शूर म्हणूनच ओळखले जात. ह्या हि अर्थानें परमात्मा हा शूर होय. तो शूरांच्या देशांत आणि कुळांत जन्मला म्हणून, शूर-वंशीय म्हणून शूर.

तसाच शूर जो वसुदेव त्याचा पुत्र म्हणून तो शौरि हि म्हटला जातो.

भगवान् कृष्णानें आपल्या बाललीलांनीं, तरुण पराक्रमांनीं आणि वृद्ध ज्ञानानें संपूर्ण शूर वंश प्रकाशित केला म्हणून हि तो शूरकुलदीपक शौरि म्हणवितो.

असा भगवान् कृष्ण हा शूर पित्याचा, शूर समाजाचा आणि शूर राष्ट्राचा वंशधर-शिरोमणि म्हणून शौरि होय.

शौरि हें परमात्म्याचें गौण म्हणजे गुणवाचक नाम आहे. पण हें तर व्यक्तिवाचक झालें. व्यक्तिवाचक या अर्थानें तें गौण म्हणजे गुणभूत, अंगभूत होय,

प्रधान नव्हे. प्रधान तर गौण म्हणजे गुणवाचकच होय. तथापि व्यक्ति हि गुणामुळेंच व्यक्त झाली, प्रसिद्ध झाली, हें जर आपण लक्षांत घेतलें, तर जें वैयक्तिक म्हणजे व्यक्तिवाचक म्हटलें तेंच मूलत: गौण म्हणजे गुणवाचक ठरतें. अशा प्रकारें पाहिलें म्हणजे विष्णु-सहस्रांतील वैयक्तिक भासणारीं नामें हि वस्तुत: गौणच आहेत, असें दिसून येईल. आणि त्याबरोबरच शौरि हें नाम हि गुणवाचक आहे असें म्हणतां येईल.

व्यक्ति ही अशुद्ध खनिजासारखी असते. तिच्यांत धातूबरोबर हीण हि मिसळलेलें असतें. पण खनिजाची किंमत धातूवरून होते, हीणावरून नव्हे. तशी गुणावरून व्यक्तीची किंमत व्हावी, अवांतर दोषांवरून, अवगुणावरून होतां कामा नये. ही गुणदृष्टि आली तर मनुष्य सारग्राही बनेल आणि सुखी होईल. विष्णुसहस्र हीच दिव्यदृष्टि देते. ती मिळवून जीव परमहंस होतो. मग सर्वत्र त्याला एकच एक निखळ ब्रह्म अनुभवतें. निवडानिवडीला अवकाशच उरत नाहीं.

### ३४१. जनेश्वर

**शूर: शौरिर् जनेश्वर:। ५०; शौरि: शूरजनेश्वर:। ८२**

जायते इति जन:, जन्तु:। जनानां ईश्वर: जनेश्वर:। अशा प्रकारें जनेश्वर म्हणजे सर्वजीवेश्वर होय. परमात्मा हा सर्व जीवांचा, आब्रह्मस्तम्बपर्यंतच्या उच्चावच समस्त जीवांचा शास्ता आहे. सर्व व्यक्ति त्या अव्यक्त परमात्म्याच्या आहेत. त्या सर्व अव्यक्तांतून येतात, अव्यक्ताच्या प्रेरणेनुसार क्षणभर खेळ करतात आणि परत अव्यक्तांत विलीन होतात. एवं अव्यक्त सागरावरील लहरीच त्या. सर्व जन म्हणजे व्यक्ति, अव्यक्ताधीन होत. म्हणून त्या अव्यक्त परमेश्वराला जनेश्वर म्हणावयाचें.

जीवेश्वर या नात्यानें परमात्मा जनेश्वर आहेच पण जीवविशेष जे मानव त्यांचा तो विशेषत: ईश्वर होय. म्हणून हि तो जनेश्वर म्हणावयाचा. मानवाला आपल्या स्वरूपाचें म्हणा वा पररूपाचें म्हणा ज्ञान होण्याची पात्रता आहे. म्हणून परमात्मा हा विशेषत: जनेश्वर म्हणजे नरेश्वर म्हणावयाचा. मानवेतर जीवांना ईश्वराचें म्हणजे आपल्या स्वरूपाचें वा पररूपाचें ज्ञान होण्याची शक्यताच नाहीं. कारण ते राजस तामस उपाधींनीं बद्ध आहेत. तथापि त्यांना त्याचें भान होऊं शकतें.

परमात्मा जनेश्वर म्हणजे मानवेश्वर म्हटला तरी मानवांत हि कांहीं वंश-विशेष असतात. त्यांत तो आविर्भूत होतो. म्हणून तो त्या वंशजनांचा ईश्वर म्हणवतो. म्हणून इथे जनेश्वर म्हणजे शूरजनेश्वर असा अर्थ प्रतीत होतो "शूर:" आणि "शौरि:" या पदांच्या साहचर्यानें. आणि गम्मत अशी कीं हींच पदें पुढें श्लोकांत किंचित् क्रमभेदानें आवृत्त झालीं असून तिथें स्पष्टच 'शूरजनेश्वर:' असें पद आलें आहे. इथें 'शूर: शौरिर् जनेश्वर:, अशीं तीन पदें आहेत, तर तिथें 'शौरि: शूरजनेश्वर:' अशीं दोनच पदें आहेत. दोन्ही चरण वस्तुत: एकार्थकच आहेत. किंबहुना अभिन्नच आहेत. तात्पर्य हें कीं तो जो अव्यक्त परमात्मा तोच हा मानव-रूपानें शूरपुत्र शूरजनेश्वर वासुदेव म्हणून व्यक्त झाला आहे, अवतीर्ण झाला आहे.

इथें जन म्हणजे (१) जीव, (२) मानव आणि (३) शूरजन असा त्रिविध अर्थ लक्षून व्याख्यान केलें आहे.

### ३४२. अनुकूल

परमात्मा हा सर्वांचा स्वात्मा आहे. त्यामुळें सर्वांना तो सानुकूल आहे. त्याहून अधिक हितैषी आणि सुखकर दुसरा कोण बरें असूं शकेल? जगांत

जीवाला माउलीहून अधिक निकट जिव्हाळ्याचें आप्त हितैषी कोणतें हि नातें नाहीं. म्हणून अशा जिव्हाळ्याच्या नात्याला, संबंधाला माउलीं म्हटलें जातें. श्रुति-माउली, गुरु-माउली असे शब्दप्रयोग त्यांतूनच उत्पन्न झाले आहेत:

**पैं अहितापासौनि काढिती। हित देऔनि वाढविती**
**नाहीं गा श्रुतिपरौती। माउली जगा।।**

ज्या कारणास्तव ज्ञानदेव श्रुतीला, वेदांना, माउली म्हणतात, त्याच कारणास्तव लोक ज्ञानदेवांना गुरु-माउली म्हणतात. पण त्याच ज्ञानदेवांनीं आत्म्यालाहि माउली म्हटलें आहे आणि ती आत्म-माउलीच खरोखर खरी आणि पुरी माउली आहे सर्वांची. शंकराचार्यांनीं म्हटलें आहे. ''कुपुत्रो जायेत क्वचिदपि कुमाता न भवति'' एकवेळ कुपुत्र कुठें असूं शकेल पण कुमाता मात्र शोधूनहि कधीं कुठें आढळावयाची नाहीं. पण जगांत केव्हां केव्हां कुमाताहि आढळून येतात, पण आत्म-माउली ही अशी आहे कीं, तिच्या विषयीं मात्र शंकराचार्यांचें वचन शंभर टक्के खरें आहे. तिच्याइतकी अनुकूल, उजू, कोणीच असूं शकणार नाहीं. निज आत्म्यासारखा अनुकूल निज आत्माच! आणि म्हणून तो सर्वांचा निजात्मा, तो सर्वात्मा परमात्माच अनुकूल होय. इतर अनुकूल होणारे देवादि सकारण अनुकूल होणारे आणि म्हणून क्षणिक अनुकूल होत, परंतु परमात्मा हा अकारण अनुकूल होय, सदैव अनुकूलच होय.

### ३४३. शतावर्त

ज्याला नदी पार करायची आहे, त्याला कधीं वारा अनुकूल असतो, कधीं प्रतिकूल असतो. त्याला नदी-प्रवाह केव्हां संथ आणि सरळ असतो, केव्हां क्षुब्ध आणि शतावर्त असतो. अनुकूल आणि शतावर्त हे शब्द साहचर्यानें सदर अर्थ सूचित करतात. जो ''निर्दोषं हि समं ब्रह्म'' हें तत्त्व जाणतो, अर्थात् साम्ययोग आचरतो, त्याला सर्व जग सम म्हणजे अनुकूल होतें. समदृष्टि आणि साम्ययोग तो हा:

**समं पश्यन् हि सर्वत्र समवस्थितमीश्वरम्।**
**न हिनस्त्यात्मनात्मानं ततो याति परां गतिम्।।**

ही समदृष्टि आणि योग ज्याला अवगत नाहीं, जो विषम पाहतो आणि विषम वागतो, अर्थात् जो अहंता-ममता-वश आहे, त्याला हा सगळा संसार शतावर्त आहे. तो आपल्या विषमदृष्टीमुळें एका आवर्तांतून निघून दुसऱ्या आवर्तांत सांपडतो. त्याला हें जग, हें जीवन शतावर्त आहे. कोणीं कितीहि चतुराई केली, तरी तो गोत्यांत आल्याखेरीज राहत नाहीं. गळ्यांत धोंडे अडकवून कोणी पोहूं लागला, तर तो तरणार कसा? तो मुळीं शीघ्रातिशीघ्र आणि बिनचूक बुडण्याचाच बंदोबस्त! तात्पर्य, ज्याला तरायचें आहे, त्याला तो अनुकूल आहे. ज्याला बुडायचें आहे, त्याला तो शतावर्त आहे.

जो तरूं इच्छीत नाहीं, ज्याला बुडायचेंच आहे, त्याची हि तो शतावर्त होऊन सोय करून देतो ह्यांत हि त्या परमात्म्याची अनुकूलताच आहे. केवढें हें स्वातंत्र्य! पण असें भयंकर स्वातंत्र्य देऊनच तो अनुकूल नाहीं तर जितके वेळां जीव बुडूं जातो तितके वेळां त्याला तारण्यासाठीं तो शतशतदा अवतार घेतो, शतावर्त होतो, म्हणूनहि तो अनुकूल होय. तो अनुकूल असून शतावर्त आहे, शतावर्त असून अनुकूल आहे.

### ३४४. पद्मी

पद्मी म्हणजे पद्मधर. सत्त्वमूर्ति भगवान् विष्णु परमात्म्याची पालिनी कला आहे आणि जीवजगताला तीच उपास्य आहे. पण तिची उपासना म्हणजे अंशाची उपासना असें होईल. उपासना समग्राची करायची असते, अंशीची करायची असते, अखंडाची

करायची असते. खंडाची वा खंडिताची उपासना उपासनाशास्त्रांत निषिद्ध आहे. अर्थात् जें कोणतें उपास्य घ्यावयाचें तें सकल, एकमेवाद्वितीय, परमात्मस्वरूप म्हणून घ्यावयाचें असतें. मग तुम्ही गणेश, सूर, शक्ति, शिव वा विष्णु कोणतेंहि कां घ्या ना, त्यांत कांहींच विशेष नाहीं. जें कांहीं वेगळेपण असतें तें वरवरचें आणि गौण असेल. रुचि-वैचित्र्यामुळें असेल. तेव्हां विष्णूची जी उपासना करायची ती, तो एकमेवाद्वितीय परमेश्वर म्हणून करावयाची. त्रिमूर्तीपैकीं एक म्हणून नव्हे. विष्णूचें हें परमेश्वरत्व तो चतुर्भुज शंकचक्रगदापद्मधर म्हणून कल्पून द्योतित केलें आहे. सर्व सृष्टीचा तो कर्ता आणि संहर्ता आहे हें त्याच्या हातात शंख आणि चक्र देऊन सूचित केलें आहे. हें सर्व विश्व अव्यक्तस्वरूप शून्यमूलक आहे हें शंखानें, तसें तें कालग्रस्त आहे हें दुसऱ्या हातांतील कालरूप चक्रानें सूचित होतें. हें विश्वाचें तात्त्विक निदर्शन झालें. व्यावहारिक स्वरूप म्हणजे तें परमेश्वराच्या निग्रहानुग्रहानें चाललें आहे, असें गदा आणि पद्म यांनीं सुचविलें आहे. धर्मपरिपंथी दुष्टांचा निग्रह गदा करते, तर धर्मानुवर्ती सज्जनांचा अनुग्रह पद्म करतें म्हणून तो पद्मी म्हटला आहे. शंख सृष्टीची उत्पत्ति, चक्र संहृति आणि गदा व पद्म हीं तिची स्थिति सूचित करून परमेश्वराचें सर्वशक्तिमत्त्व, सृष्टियुत्पत्तिस्थितिलयकारी अद्भुत सामर्थ्य, प्रकट करीत आहेत. ऊर्ध्वहस्तद्वयगत शंखचक्र विश्वाची उत्पत्ति आणि लय तर निम्नहस्तद्वयगत गदापद्म त्या विश्वांतील प्रजांचें पालन सूचित करतात. गदा संहारसूचक नसून प्रजा-पालनांतर्गत केवळ दुष्टनिग्रहरूप होय. दुष्ट-निग्रह केल्यानेंच प्रजांचें रक्षण होतें. म्हणून दुष्ट-निग्रह हि पालनच होय. पिकाचें निंदण म्हणजे पिकाचें संगोपन व संवर्धनच होय तद्वत्.

### ३४५. पद्मनिभेक्षण

परमात्म्यानें ही सृष्टि निर्मिली. तिचें पालन तो करतो आहे आणि संहार हि. परंतु ह्या जगद्व्यापारांत कर्तृत्व-भोक्तृत्वानें तो स्पृष्ट वा श्लिष्ट होत नाहीं. ही जी त्याची असंगता ती पद्म पदानें द्योतित केली आहे. कमलदलावर पाणी चिकटत नाहीं. इतर कोणत्याहि पुष्पांत व पुष्पदलांत ही खुबी नाहीं. म्हणून पद्मदल घेतलें. नेत्राला पद्मदलाची उपमा देतात, कारण तें नेत्र पद्मदलाच्या पाकळीप्रमाणें आकृत, आरक्त आणि प्रसन्न असतें. अक्षिगोलक आणि त्याच्या भोवतीच्या उघडझांप करणाऱ्या पापण्याच जशा, अशा सारखा पद्मकोष आणि त्याच्या पाकळ्या आहेत. त्या हि उघडतात मिटतात. इत्यादि सादृश्यामुळें पद्माची उपमा नेत्राला योग्यच आहे. पण इथें ती मुख्यत: पद्मपत्राची अलिप्तता लक्षून दिलेली आहे. येथील ईक्षण शब्द हि सूचक आहे. ईश्वर कर्ता, भोक्ता म्हणविला जातो, परंतु वस्तुत: तो केवळ द्रष्टा आहे. हें त्याचें केवळ द्रष्टृत्व ईक्षण शब्दानें सूचित केलें आहे. अर्थात् अकर्तृ-अभोक्तृस्वरूप केवल द्रष्टृत्व प्रकट करणारा हा ईक्षण शब्द आहे. या विशेषाचें इतकें महत्त्व वाटतें सहस्रकाराला कीं, ह्याच अर्थाचे अन्य शब्द मागें हि येऊन गेले आहेत आणि पुढें हि आले आहेत. 'पुष्कराक्ष' (५,५९), 'पुण्डरीकाक्ष' (१२), प्रस्तुतचा 'पद्मनिभेक्षण' (३७), लगेच पुढील श्लोकांत 'अरविन्दाक्ष' (३८) अशीं हीं समानार्थक नामें आलीं आहेत. ग्रन्थतात्पर्याचा निर्णय ज्या गमकांवरून केला जातो त्यांत अभ्यास हें हि एक गमक मानलें आहे आणि ह्या नामाचा म्हणजे, त्याच्या आशयाचा अभ्यास पांचदां झालेला आहे. 'श्रीमान्' 'प्राणद' इत्यादि नामें चार चार वेळां आलीं आहेत, पण पांचदां आलेलें–अर्थात् आशयानें अक्षरश: नव्हे– हेंच एक नाम आहे असें न म्हणतां आलें तरी अशा बहृवभ्यस्त नामांपैकीं हें एक आहे एवढें खास.

### ३४६. पद्मनाभ

पद्म तळ्यांत उगवतें. त्याचें मूळ दिसत नाहीं. त्याला अनेक पाकळ्या असतात. त्या उघडतात

भिटतात. त्याच्यायोगें तळें शोभायमान होतें. तसें हें विश्व अनेक जगतांचें मिळून बनलेलें आहे. त्याचेंहि मूळ दिसत नाहीं. त्याची उघडझांप, संकोच-विकोच, चालूच असतो. त्याच्यायोगें अव्यक्त-जलाशय शोभायमान आहे. असें हें लोकपद्म ज्याच्या नाभींतून निघालें तो अक्षर अव्यय भगवान् विष्णु अव्यक्त क्षीरार्णवाच्या तळाशीं पहुडला आहे. अव्यक्ताची अथांग आणि अपरंपार जलराशि लोकपद्माच्या योगें शोभत आहे, प्रकाशत आहे. हें व्यक्त लोकपद्म आहे, म्हणून त्या अव्यक्ताचें आणि त्याच्या हि तळाशीं दडलेल्या अक्षराचें भान होतें. हें लोक-पद्म नसतें, तर तें कुठून आलें, त्याचें मूळ वा कंद कोणता, इत्यादि जिज्ञासा झाली नसती आणि त्या जिज्ञासेची निवृत्ति जें तत्त्वज्ञान तें हि झालें नसतें. पद्मनाभ हें परमात्म्याचें नाम हा सगळा आशय प्रकट करतें. लोकाला जसें पद्म तसें अण्डहि म्हटलें जातें. पुढील श्लोकांत वरीलच आशय व्यक्त झाला आहे.

**नारायण: परोऽव्यक्तात् अण्डम् अव्यक्त-संभवम्।**
**अण्डस्यान्तस्त्विमे लोका: सप्तद्वीपा च मेदिनी।।**

हाच आशय पद्नाभ पदाला लक्षून मी असा रचीन:—

**पद्मकन्दोऽक्षरं ब्रह्म नालं अव्यक्तमुच्यते।**
**लोकपद्ममिदं यत्र उन्मीलति निमीलति।।**

कल्पारंभीं लोकपद्म फुटतें, कल्पान्तीं तें गळून पडतें. परंतु कंद हा सदैव अक्षर अव्यय. असा विद्यमानच असतो तोच पद्नाभ होय.

पद्नाभ हें नाम केरळांत विशेष प्रचलित आहे. केरळच्या राजाचें कुलदैवत पद्मनाभ स्वामी आहे. त्याचें तिथें भव्य मंदिर आहे.

### ३४७. अरविन्दाक्ष

पुष्कराक्ष, लोहिताक्ष, पुण्डरीकाक्ष आणि हा प्रस्तुतचा अरविन्दाक्ष असे अनेक समानार्थक शब्द सहस्रांत आले आहेत. पण समानार्थक म्हणजे एकार्थक नव्हे. त्यांत छटांचें वैचित्र्य आहे. अभिप्राय-विशेषांचें वैचित्र्य आहे. कमल, पद्म, पुष्कर, अरविन्द, पुण्डरीक आणि सदृश अनेकानेक कमलवाचक शब्द आहेत. ते सगळे सरूप असले तरी एकरूप नाहींत. त्या त्या नामांचें वैशिष्ट्य कालबळानें लोप पावल्यासारखें आहे. तथापि, त्या वैशिष्ट्याचें किंचित् अनुमान करतां येण्यासारखें आहे. कं जलं अलंकरोति इति कमलम्। पदात् पदान्तरं पद्यते इति पद्म। पुष्णन् कर: पुष्पयुक्त: करो वा इति पुष्करम्। अरान् अरचक्रवत् दलान् विन्दते इति अरविन्दम्। अरविं कमलकन्दं ददाति इति वा अरविंदम्। सध्यां अळूच्या कंदाला हिन्दींत अरवी म्हणतात, परंतु तो मूळचा कमलकंदवाचक असला पाहिजे, असें ह्या अरविंद शब्दावरून दिसून येतें. तथापि, तात्पर्यार्थानें सर्व एकच. सर्वच कमलें निर्लेप आहेत, प्रसन्न आहेत, पवित्र आहेत आणि त्यामुळें भगवद्नेत्रांना आणि इतर हि अवयवांना त्याची उपमा दिली जाते. पावित्र्यरूप अन्त:सौंदर्याबरोबर कमलाच्या ठाईं बाह्य रूपसौंदर्यहि भरपूर आहे. त्यामुळें त्याची उपमा भगवदवयवांना देणें उचितच होय. कमल हें गुणसुंदर तसें रूपसुंदर आहे, म्हणजे अन्तर्बाह्य सर्वांगसुंदर आहे. सर्वांगसुंदर परमेश्वराला तशाच उपमानाची उपमा देतां येईल. जगांत सामान्यत: श्री आणि सरस्वती यांचें सख्य नाहीं असें मानलें जातें. पण पद्माच्या ठाईं लक्ष्मी आणि सरस्वती दोघींनींहि निवास केला आहे. सरस्वती ही अन्त:सौंदर्यरूप ज्ञानात्मक आहे म्हणून तिचें आसन श्वेत पद्म, तर लक्ष्मी ही बाह्यसौंदर्यरूप पोषणात्मक सुवर्णवर्ण म्हणून तिचें आसन रक्त कमल मानलें आहे इतकेंच. वस्तुत: तीं कमलाच्या अन्त:सौंदर्याचीं व बाह्यसौंदर्याचीं प्रतीकें मात्र होत. परमात्मा हा असा अरविन्दाक्ष आहे.

### ३४८. पद्मगर्भ

हें लोकपद्म कल्पारंभीं परमात्मकंदाच्या ठाईं अव्यक्तरूपानें निभृत असतें म्हणून तो परमात्मा

पद्मगर्भ म्हटला आहे. सृष्टींत आपण पाहतों कीं, उद्भिज्ज वृक्ष, वनस्पति, ओषधि इत्यादि आरंभीं बीजांतून उत्पन्न होतात आणि परत शेवटीं बीजांतच परिणत होतात. तशी ही समस्त व्यक्त सृष्टि आरंभीं अव्यक्ताच्या ठाईं निभृत असते आणि शेवटीं तिथेंच निहित होते. हा क्रम कल्पारंभीं आणि कल्पान्तीं नि:शेष रूपानें तसा प्रत्यहीं हि होतच असतो. समस्त भूतजात रोजच्या रोज सुषुप्तींत आपलीं नामरूपें विसर्जित करून त्या अव्यक्ताच्या ठाईं एकीभूत होत असतात. तिथें कोणी ब्राह्मण नाहीं, कोणी चांडाळ नाहीं, तिथें कोणी वाघ नाहीं, कोणी गाय नाहीं, कोणी हत्ती नाहीं, कोणी मशक नाहीं. सर्व भेद तिथें नाहींसे होतात. हा अमृतानुभव रोजच्या रोज जीवाला येतच असतो, परंतु अज्ञानामुळें जीव तो विसरतो, ज्ञानी विसरत नाहीं. तो व्यवहारकाळीहि तें आपलें अद्वैत ओळखून असतो. व्यक्तांत दिसणारें द्वैत वा नानात्व औपधिक अतएव तात्कालिक आहे हें तो ओळखून असतो आणि तदनुसार साम्ययोग आचरीत असतो. गीतेंत म्हणूनच पंडिताचें लक्षण,

**विद्या-विनयसंपन्ने ब्राह्मणे गवि हस्तिनि।**
**शुनि चैव श्वपाके च पण्डिताः समदर्शिनः॥**

असें दिलें आहे आणि नाथासारख्यांनीं रामेश्वराला वहायची कावड वाटेंत भेटलेल्या तृषार्त गाढवाला समर्पिली आहे. पितरांचें श्राद्धान्न भुकेल्या महारामांगांना वाढलें आहे. नाथांचें जीवन म्हणजे गीतेच्या आदर्शाचें प्रत्यक्ष उदाहरणच होय. हें लोकपद्म त्या परमात्म-कंदापासून उत्पन्न झालेलें आहे हें जो ओळखतो तो त्याच्या वैचित्र्यानें मोह पावत नाहीं. तो समदर्शी होतो.

### ३४९. शरीरभृत्

परमात्मा हा सर्व शरीरांचें अन्नरूपानें भरण करतो, म्हणून तो शरीरभृत् होय. शरीर म्हणजे शेवटीं शीर्णच होणारें. त्याला अन्नादिकाच्या योगें रोजच्या रोज आणि वेळच्या वेळीं जर नीट लिंपिलें माखलें नाहीं तर तें टिकतें तेवढेंहि टिकावयाचें नाहीं. म्हणून त्याला देह अशी हि दुसरी संज्ञा आहे. अर्थात् देह म्हणजे दिग्ध, लिंपलेला–माखलेला, आत्म्याला चिकटलेला पिंड. जीवरूपानें परमात्मा सर्व देहांना आत्मीयतेनें, ममतेनें, सांभाळीत व पाळीत-पोषीत असतो. म्हणून तो शरीरभृत् ठीकच म्हटला आहे. शरीर जड, तें आपली काळजी काय घेणार? त्याची काळजी चेतनालाच घ्यावी लागणार! म्हणूनहि परमात्मा, आत्मा, जीवात्मा हाच शरीरभृत् म्हणावयाचा.

भृत् म्हणजे भरण करणारा असा अर्थ लक्षून वरील विवेचन केलें आहे. परंतु भृत् हें पद ज्या नामांच्या शेवटीं आलें आहे, तीं नामें पाहिलीं तर भृ म्हणजे भरण करणें यापेक्षां धारण करणें अशाच अर्थानें तें पद आलें आहे असें दिसून येईल. विष्णुसहस्रांत अशीं पदें पुढीलप्रमाणें आलीं आहेतः गुणभृत्, देवभृत्-गुरु, प्राणभृत्, भारभृत्, भूतभृत्, यज्ञभृत्, शंखभृत्, शरीरभूतभृत् आणि हें प्रस्तुतचें शरीरभृत्. तेव्हां शरीरभृत् म्हणजे शरीरधारी असा अर्थ झाला. सर्व शरीरें शारीरक आत्म्यानें धारण केलेलीं आहेत हें उघडच आहे. गाडी जड, ती आपोआप चालत नाहीं. तिला चालक लागतो तसा या शरीराचा धारक, पोषक, चालक तो परमात्मा आहे, तोच त्याचें धारण आणि भरण--पोषण करीत आहे. म्हणून तो शरीरभृत्. निरुपपदप्रयोगावरून ती सर्वशरीरभृत् होय. 'कां रायाचे देह चाळूं। रंका परौतें गाळूं। हें न म्हणेचि कृपाळु। प्राणु पैं गा॥' तो प्राणरूपानें सर्वांची शरीरें समान धारण करीत आहे. भूभृत्सारखे लौकिक शब्दहि भृ धातु भरणवाचकापेक्षां धारणवाचकच अधिक असल्याचें निदर्शक आहेत. दोन्ही अर्थ एकवटून 'भृ पालन करणें' असा अर्थ निष्पन्न होतो.

### ३५०. महर्द्धि

ज्याची ऋद्धि म्हणजे विभूति, वैभव मोठें तो महर्द्धि, परमात्मा. घरेंदारें, शेतीवाडी, गुरेंढोरें, नोकरचाकर, सोनें नाणें, हिरे-माणके इत्यादि म्हणजे ऋद्धि होय. सदर ऋद्धि सुखवस्तु गृहस्थाजवळ असते. त्यापेक्षां मांडलिक, राजा, महाराजा, द्वीपपति, पृथ्वीपति, लोकपाल इत्यादि उत्तरोत्तर समृद्ध पदें होत. पण जो ह्या समस्त विश्वाचा अधिपति आहे त्या परमेश्वराहून अधिक समृद्ध कोण बरें असूं शकेल? सर्व जीव अभिमानी आहेत. मुंगी आपल्या देहाचा नि गेहाचा अभिमान बाळगते आणि ब्रह्मदेवहि बाळगतो. एक अति तुच्छ, एक अति उच्च, एक 'अणोः अणीयान्', एक 'महतो महीयान्.' पण दोन्हीहि अहंममताभिमान-निबद्ध. अर्थात् परिमितच. अभिमान म्हटला की परिच्छेद, मर्यादा आली. परंतु ज्याला असा अभिमान नाहीं तें आत्मतत्त्व यच्चयावत् चराचर विश्वाचा स्वामी होय. तें निरभिमान असल्यामुळें त्याला स्वामी म्हणणेंहि त्यावर आरोप करणेंच होय. पण ज्याअर्थीं जड हें स्वतःचें स्वामी होऊं शकत नाहीं त्याअर्थीं चेतनाकडेच तें स्वामित्व जातें. हें चेतन सर्वगत असल्यामुळें त्याचीच सर्वत्र सत्ता आहे, त्याचेंच सर्वत्र स्वाम्य आहे. म्हणून तो परमात्माच महर्द्धि म्हणावयाचा. इतर सारे उच्चावच आब्रह्मपिपीलक जीव अल्पर्द्धिच होत.

परमेश्वराचें हें महर्द्धित्व, हें वैभव प्रकट करण्यासाठीं त्याचें ईश्वरी रूप अनेकदिव्याभरण, दिव्यमाल्यांबरधर दिव्यगन्धानुलेपन असें सर्वाश्चर्यमय परमर्द्धियुक्त वर्णिलें आणि रेखिलें जातें. परमेश्वराचें हें महर्द्धियुक्त दर्शन, हें महाविभूतिदर्शन केवळ अनन्य भक्तीनेंच होऊं शकतें.

### ३५१. ऋद्ध

महर्द्धि हें पद कर्मधारय कीं बहुव्रीहि म्हणावें? बहुव्रीहि म्हटल्यास तें आणि ऋद्ध हें पद जवळजवळ एकार्थकच होईल. म्हणून तें कर्मधारय म्हणायला हरकत नाहीं. विश्वोत्पत्ति , विश्वस्थिति आणि विश्वलय करणारी जी महती शक्ति तीच महर्द्धि होय. बीजशक्तीच्या ठाईं संपूर्ण विराट वृक्ष प्रकट करण्याचें, त्याचें धारण करण्याचें नि तो परत आपल्या ठाईं सांठविण्याचें सामर्थ्य निहित असतें, म्हणून ती बैजिक शक्तिच खरोखर महती ऋद्धि, महर्द्धि, म्हटली पाहिजे. ही ऋद्धि त्या ऋद्धिमंत परमेश्वराहून वस्तुतः वेगळी नाहीं. परंतु अंशीचें संदर्शन अंशशः त्याचें दर्शन केल्यानेंच होतें. म्हणून अंशांचें पृथक् स्मरण हि अंशिस्मरणच होय. महर्द्धि-पदाप्रमाणें परर्द्धि-पद हि पुढें आलेलें आहे. तें हि असेंच आहे.

इथें जें ऋद्ध पद आलें आहे तें व्यक्तिवाचक म्हणजे अभिव्यक्तिवाचक आहे. विश्वरूप हेंच परमेश्वराचें ऋद्ध वा समृद्ध रूप होय. विश्वाहून अधिक समृद्ध दुसरें काय बरें असूं शकेल? अव्यक्त रूप हें शून्य नव्हे, पण तें आम्हांला गोचर होत नाहीं म्हणून त्याला आम्ही ऋद्ध वा समृद्ध म्हणूं शकत नाहीं. जो समृद्ध असतो, त्याच्या अंगोपांगीं आभूषणें झळकत असतात. तो रिक्त असत नाहीं. तसा शाखोपशाखांनीं आणि पत्रपुष्पफलसमृद्धींनीं जो बहरलेला आहे तो हा परमेश्वरी विश्ववृक्षच समृद्ध वा ऋद्ध म्हणावयाचा. ज्या अव्यक्ताला देह नाहीं, नामरूप-गुणकर्म-फल इत्यादि कांहीं नाहीं त्याला समृद्ध कसें म्हणणार? तो आकाशवत् शून्य म्हणजे रिक्तच म्हटला पाहिजे. त्याच्या विरोधांत व्यक्त विश्वाकार ऋद्ध होय. अव्यक्त परमात्मा व्यक्त विश्वाकारानें ऋद्ध झाला आहे.

### ३५२. वृद्धात्मा

वृद्ध आहे आत्मा म्हणजे बुद्धि ज्याची तो वृद्धात्मा होय. अर्थात् परिणत-प्रज्ञ. शरीराचें म्हातारपण

दोषास्पद आहे. कारण त्यांत बलाचा अभाव आणि रोगांचा प्रभाव होतो. परंतु बुद्धीची प्रगल्भता, तद्रूप वृद्धता दोषास्पद नसून गुणगौरवास्पदच होय. म्हणून वृद्धात्मा म्हणजे परिणत-प्रज्ञ परमात्मा होय. ''ज्ञानं वृद्धोपसेवया'' जें म्हटलें आहे तें अशा परिणत-प्रज्ञांनाच अनुलक्षून होय. वयाबरोबर येणारें वृद्धत्व हें हि वृद्धत्वच होय. चार पावसाळे ज्यानें जास्त पाहिले आहेत त्याच्या ज्ञानांत भर पडलीच आहे असें समजावयाला हरकत नसावी. पण हें अति सामान्य वृद्धत्व होय. सामान्य असलें तरी त्यांत महत्त्व त्याच्या ज्ञानालाच आहे, हें विसरतां येत नाहीं. म्हणून वृद्धत्वाचें रहस्य ज्ञानवत्तेंत आहे, क्षीणायुष्ट्वांत नाहीं. ज्ञानवत्ता हीच वृद्धता असेल, तर तें ज्ञान पूर्णत्वानें कुठें आढळावयाचें? जिथें ज्ञान केवळ म्हणजे निरुपाधि, निखळ असेल तिथें. असें निखळ ज्ञान देहवंताच्या ठाईं कसें कल्पितां येईल? कारण देह हा मुळीं अविद्या-काम-कर्मजनितच आहे. म्हणून निरुपाधि पांचभौतिक-लिंग-कारण देहत्रय-निरपेक्ष असा जो केवळ विदेह चिन्मात्रमूर्ति परमात्मा तोच प्रज्ञानघन वृद्धात्मा होय. सर्व ज्ञान त्याच्याच ठाईं आहे. तथापि या स्थितीच्या अति निकटची स्थिति म्हणजे ज्यांनीं ज्ञानोपासनेनें आपली अविद्या, काम नि कर्मे परिक्षीण केलीं आहेत, हा चालू देह ज्यांचा शेवटचाच आहे, त्या अवधूतांची होय.

## ३५३. महाक्ष

महान्तौ चन्द्र-सूर्यरूपौ अक्षौ यस्य सः महाक्षः। मोठे आहेत अक्ष म्हणजे डोळे ज्याचे तो महाक्ष. महाक्ष म्हणजे विशालाक्ष. विशालाक्ष म्हणजे फुल्लारविन्दायतपत्र-नेत्र. माणसाच्या सर्व अंगांत शिर प्रधान आहे. तिथेंच दोन डोळे, दोन कान, दोन नाकपुड्या व एक तोंड अशा सप्त ऋषींचा निवास आहे. या सप्तर्षींत हि डोळे नेते आहेत. ते ज्याला आहेत तोच देखणा समजला जातो. ते ज्याचे विशाल आहेत, तो तर विशेष देखणा म्हणावयाचा. म्हणूनच वारंवार नेत्रांचा उल्लेख येतो. पुष्कराक्ष, पुण्डरीकाक्ष अरविन्दाक्ष, लोहिताक्ष, महाक्ष इत्यादि. या सर्व पदांचा तात्पर्यार्थ एकच आहे. डोळे मोठे म्हणजे विशाल हवेत. ते कमळाच्या पाकळीप्रमाणें आरक्त हवेत, सुंदर हवेत. भावदर्शी व प्रसादवर्षी हवेत. अलिप्त हवेत. ते दर्शनसंपन्न तर खरेच पण दिदृक्षा-संपन्नहि हवेत. कमळ सूर्यदर्शनोत्सुक सूर्यदर्शनविकासी असतें. तसे डोळे परमात्मदर्शनोत्सुक परमात्मदर्शन-विकासी हवेत. पण परमात्म्याला कुणाच्या दर्शनाची उत्सुकता असणार? त्यालाहि दर्शनोत्सुकता आहे. म्हणूनच तर त्याला डोळे आहेत. आणि त्याला हे आपले निजरूप असलेलें विशाल विश्व पहावयाचें आहे म्हणून ते विशाल आहेत. आणि नुसते विशालच नाहींत तर ते असंख्य आहेत. परमात्मा आपल्या असंख्य नेत्रांनीं, आपल्या सहस्राक्षांनीं हें आपलें अनंत विश्वरूप पाहत आहे, त्याला महाक्ष म्हणण्यांत आणि सहस्राक्ष म्हणण्यांत आणि वारंवार परोपरीनें पुष्कराक्ष, पुण्डरीकाक्ष, अरविन्दाक्ष म्हणण्यांत आणखी एक भाव आहे. आणि तो म्हणजे हा कीं तो परमात्मा केवळ चिद्रूप आहे, चिन्मात्र आहे त्याला मोठे डोळे आहेत असें नव्हे तर तो सर्वांगांनीं डोळाच डोळा आहे, म्हणून तो महाक्ष. बहुव्रीहि तसा कर्मधारय दोन्ही प्रकारें तो महाक्ष आहे.

## ३५४. गरुडध्वज

देवतेच्या तत्त्वाला अनुलक्षून तिची मूर्ति, तिची आयुधें, तिचें वाहन, तिचे गण आणि ध्वजादि चिह्नें कल्पिलीं जातात. सामान्यतः जें वाहन असतें तेच ध्वजावर अंकित असतें. भगवान् शंकर वृषभवाहन व वृषभध्वज आहे, तर भगवान् विष्णु गरुडवाहन आणि गरुडध्वज आहे. भगवान् विष्णूचें वाहन गरुड कां?

परमात्मा हा नामवाह्य आहे म्हणून नाम घेतलें की रूप ध्यानास येतें. अर्थग्रहण पण होतें. पण हें नाम गरुड कसें झालें? गरुड म्हणजे अतिवेगवान् पक्षी. त्याचें उपमान नामाला दिलें म्हणून तें गरुड झालें. शिवाय देवाचें वैदिक नाम आहे ॐ. तें हि पक्ष्याकृति आहे. त्या नामावर ॐ कारावर बसून तो येतो. म्हणून परमात्मा हा गरुडवाहन व गरुडध्वज म्हणावयाचा. ''छन्दोमयेन गरुडेन समुह्यमान:'' असें जें भागवतांत म्हटलें आहे तें वरील आशयानेंच होय. छंद म्हणजे वेद आणि ॐकार म्हणजे अक्षर-वेद होय. एकाक्षर ब्रह्म होय. त्यावर तो परमात्मा, शब्दावर अर्थ आरुढ असतो तसा,—आरुढ आहे. तोच गरुड आणि तोच त्याचें ध्वज-चिह्न. परमात्म्याचें वाहन त्याचें श्रद्धाभक्तिपुर:सर केलेलें मनोमन स्मरण होय. मनाहून अधिक वेगवान् काय आहे? त्या स्मरणाबरोबर भगवान् आविर्भूत होतो, म्हणून त्याला हृत्स्थ म्हटलें आहे. पण नामाचा त्या स्मरणाशीं काय संबंध, असें कोणी म्हणेल. त्याला उत्तर हेंच कीं जिथें स्मरण म्हणजे मनोभाव आहे तिथें वाणी हि आहे. आणि जिथें वाणी आहे तिथें मन हि आहेच. मुंगी म्हणजे मुकी. परंतु ती मुकी नाहीं. कारण तिला मन आहे. ती आपलें मनोगत दुसऱ्या मुंगीला कळवते. ती जी कळविण्याची रीत तीच वाणी होय. थोडक्यांत म्हणजे मन हा वाणीचा गाभा असून वाणी हा मनाचा बाह्य आकार होय. आणि म्हणून जपाला स्मरण आणि स्मरणाला जप म्हटलें जातें. परा पश्यन्ती मध्यमा आणि वैखरी ह्या वाक्पुष्पाच्या चार पाकळ्या होत. आणि मन त्याचा देठ आहे. त्या देठाला त्या चारी पाकळ्या जुडल्या आहेत. अशा प्रकारें चित्त आणि वाणी एकरूप होतात. आणि त्यांच्या ठाईं अर्थरूप गंध आविर्भूत होतो. मनोवाणींच्या उभय पंखांनीं उडणारा हा गरुड अर्थरूप भगवान् विष्णूचें वहन करीत असतो. म्हणून परमात्मा गरुड-वाहन आणि गरुडध्वज म्हणावयाचा.

## ३५५. अतुल

'नास्ति तुला यस्य स: अतुल:' ज्याला तुला म्हणजे बरोबरीचा जोडीदार नाहीं तो अतुल, अजोड वा बेजोड होय. तुलनेसाठीं दोहोंची आणि तुल्यांची गरज असते. परंतु परमात्म्याच्या बाबतींत दोहोंचा हि अभाव आहे. तो 'एकमेवाद्वितीय' असल्यामुळें तुलनेला दुसरा नाहींच. दुसरा कल्पिलाच तरी तो तुल्य असणें शक्य नाहीं. त्यामुळें परमात्मा हा अतुल होय. परमात्माच एक सत् आहे बाकी सारें असत्. अशा स्थितींत सताची तुलना कोणाशीं करायची? बरें जें नाहीं तें असत् आहे म्हटलें तरी त्या सदसतांची तुलना कशी व्हायची? दोहोंत मुळीं साम्यच नाहीं. 'आत्मैवेदं सर्वम्' हें सर्व आत्मरूप आहे असें म्हटलें म्हणजे द्वितीयाभावामुळें तुलना कुंठित झाली. आत्मानात्मविवेक कल्पिला तरी तुलना होऊं शकत नाहीं. आत्म्याची बरोबरी अनात्म्याशीं कशी होणार? दोहोंत कसलेंच साम्य नाहीं. एक सत् दुसरा असत्. एक चित् दुसरा अचित्. एक आनन्द दुसरा अनानंद. तुलना व्हावी कशी? मेरूशीं मोहरी कशी तुळायची? परंतु वरील तुलना ही भावाशीं अभावाची झाली. त्यामुळें तिथें मेरुमोहरीचा दृष्टांत लागू पडत नाहीं. त्यासाठीं एका भावाची दुसऱ्या भावाशीं तुलना हवी. परमात्मा हा सूर्यवत् अंशी असून जगत् हें किरणवत् अंश आहे असें म्हटलें तर ती भावाशीं भावाची तुलना म्हटली जाईल. परंतु इथेंहि तुलना संभवत नाहीं. कारण सकलाशीं शकलाची तुलना कशी होणार? कोणत्याहि प्रकारें विचार केला तरी परमात्मा हा अतुलच होय.

## ३५६. शरभ

''अतुल: शरभो भीम:'' हा चरण, परमेश्वराचें अद्भुत सामर्थ्य प्रकट करतो. त्यांतील प्रत्येक पद त्याचें अलौकिक विस्मयावह पराक्रमशाली व्यक्तित्व

प्रकट करतें. अतुल व भीम हीं दोन विशेषणें आहेत, तर शरभ हें विशेष्य आहे. त्या दोहोंत सांपडलेलें. अतुल कसा, तर शरभासारखा. भीम कसा, तर शरभासारखा. शरभ हें एक नरसिंहासारखें अद्‌भुत सत्त्व आहे. नरसिंहांत नराची बुद्धि आणि सिंहाची शक्ति एकवटली आहे. त्यामुळें तो नरहि नाहीं आणि पशु हि नाहीं, पण त्या मनुष्ययोनि व तिर्यगयोनी या दोहोंहून वेगळा आणि वरिष्ठ देव आहे. तसा शरभ हा हि जलचरांतील मकर, स्थलचरांतील सिंह आणि नभश्चरांतील गरुड यांच्या तत्‌तत् सामर्थ्यानें युक्त असा अद्‌भुत जीव आहे. तो समुद्रांत बुडूं शकतो, आकाशांत उडूं शकतो भूमीवर दौडूं शकतो. तो सर्वत्र अप्रतिहत संचरूं शकतो आणि आपल्या शत्रूचा फडशा पाडूं शकतो. तो 'भयानां भयं भीषणं भीषणानाम्' आहे. त्याच्यापुढें जलभय स्थलभय आकाशभय असलेले मकर, सिंह, गरुड नम्र होतात. ते एकएकटेच नव्हे तर तिन्ही मिळून हि त्याचें कांहीं वांकडें करूं शकत नाहींत. असा तो अतुल आणि भीम शरभ आहे. परमेश्वरी शक्ति ही सर्वांना आधारभूत असल्यामुळें ती अतुल आहे. तिचा सर्वांना धाक आहे. आधाराधेयांची तुलना होऊं शकत नाहीं. आधेयांना आधाराचा धाक असणारच. म्हणून तिला शरभ म्हटलें आहे. शरभ हा एक अद्‌भुत प्राणी आहे. त्याला मी मकर, सिंह, गरुड यांची आद्याक्षरें घेऊन 'मसिंग' म्हणेन. मकर-सिंह-गरुड यांच्या योगानें होणाऱ्या वा मकर-सिंह-गरुड यांच्या गुणनानें होणाऱ्या फलित सामर्थ्याहून हि हें शरभसामर्थ्य आगळें आहे. कारण हें परमेश्वरी सामर्थ्य अ-गणित आहे. त्याचें मोजमाप होऊं शकत नाहीं, गणित होऊं शकत नाहीं.

### ३५७. भीम (अभीमः)

भीम म्हणजे भयंकर. परमात्मा हा सर्वान्तर्यामी आणि विश्वरूप असतांना तो भयंकर कसा म्हणावा वस्तुतः तो भीम म्हणजे भयंकर नाहीं, पण ज्या अर्थीं तो सर्व कांहीं आहे, त्या अर्थीं, भीम म्हणजे भयंकर हि तो आहे म्हणावयाचा. तो ''अणुर् बृहत्'' ''कृशःस्थूल'' असा परस्परविरोधी सर्व भाव आहे. याचा अर्थ तो सर्वाधार सर्वव्यापी आहे समजावयाचा. तीं परस्परविरोधी विशेषणें त्याची व्याप्ति मात्र दाखवितात. पटावर नाना वर्णाकृति चितारलेल्या असतात. त्यामुळें काळा नि पांढरा, वांकडा नि सरळ, सर्व रंग आणि आकार तो पटच होय. तसा हा परमात्मा नामरूपात्मक विश्ववैचित्र्याचा पट आहे. पटाधारें सर्व वैचित्र्य प्रकटलें आहे. पटावांचून त्यांची स्थिति कल्पितां येत नाहीं त्यांच्यावांचून पटाची स्थिति मात्र कल्पितां येते. पट स्वतंत्र आहे. चित्र अस्वतंत्र. हेंच विश्वरूप-दर्शन होय. विश्वरूपदर्शनानें अर्जुन भ्याला, भांबावला आणि खरोखर या परमेश्वरी सत्तेची ही अनन्त विशालता पाहून कोण भांबावून जाणार नाहीं? तो भीम नाहीं, भयावह नाहीं असें कोण म्हणेल?

पश्यामि त्वां सर्वतोऽनन्तरूपम्।
वीक्षन्ते त्वां विस्मिताश्चैव सर्वे।
दृष्ट्वा हि त्वां प्रव्यथितान्तरात्मा।
धृतिं न विन्दामि शमं च विष्णो।

असें म्हणून अर्जुन परमेश्वरी सत्तेची अनंतता पहात पहात भितो आणि भीतभीत परमेश्वरी सत्तेला ओळखता तो म्हणतोः

त्वं आदिदेवः पुरुषः पुराणः,
त्वं अस्य विश्वस्य परं निधानम्।
वेत्तासि वेद्यं च परं च धाम,
त्वया ततं विश्वमनन्तरूप।।

आणि ओळखून नमस्कार करीत सुटतोः

नमो नमस् तेऽस्तु सहस्रकृत्वः
पुनश्च भूयोऽपि नमो नमस् ते।
नमः पुरस्तात् अथ पृष्ठतस् ते,
नमोऽस्तु ते सर्वत एव सर्व।

असा आहे तो परमात्मा भीम म्हणजे भयावह, विस्मयावह.

नास्ति भीमो यस्मात् सः अभीमः।

३५८. समयज्ञ (शमयज्ञ) (सम-यज्ञ,समय-ज्ञ)

समयज्ञ हा वर्ण-समाम्नाय दोन प्रकारें कल्पितां येईल : (१) सम-यज्ञ आणि (२) समय-ज्ञ. या पदांच्या पुढील पदें हविर् हरिः अशीं आहेत. त्यांच्या सांनिध्यावरून मुख्यतः सदर पद, प्रथम कल्प, सम-यज्ञ असें असावें. आणि शंकराचार्यांनीं तें तसें घेतलें हि आहे. तथापि त्याला त्यांनीं दुसरें स्थान दिलें आहे, दुसरा कल्प मानिलें आहे. 'सर्वभूतेषु समत्वं यजनं यस्य सः सम-यज्ञः।'—सर्वभूतांच्या ठाईं समभाव हेंच ज्याचें यजन आहे तो समयज्ञ होय. ''समत्वमाराधनमच्युतस्य'' हें समर्थक प्रह्लादवचन हि पुरावा म्हणून त्यांनीं उद्धृत केलें आहे.

दन्त्य 'स्' ऐवजीं तालव्य 'श्' घेतल्यास सदर पद शम-यज्ञ होईल. आणि तें हि चिन्त्य ठरेल. मनाचें समाधान वा शमन हाच यज्ञ म्हणजे यजन आहे ज्याचें तो परमात्मा शम-यज्ञ होय.

समय म्हणजे सम्यक् अयन, यथाप्रतिज्ञात वागणें. अशा प्रकारें समय म्हणजे १ काल, २ प्रतिज्ञा वा करार असे दोन अर्थ होतात. काल हा अचूक चालत असतो. त्यांत केव्हां हि फरक पडत नाहीं. एक वेळ घड्याळ मंद वा बंद पडेल, एक वेळ सूर्य हि मंद वा बंद पडेल पण कालाच्या गतींत अनियमितता व्हावयाची नाहीं. ''जगें येवोत जावोत तो अभंग जसा तसा '' तो अखंड अस्खलित त्रुटिरहित चाललाच चालला आहे. या कालधर्माला अनुसरून जें यथा-प्रतिज्ञ वागणें त्याला हि समय असेंच अभिधान लक्षणत्वें प्राप्त झालें. या दोहोंना हि परमात्मा हा जाणतो म्हणून तो समय-ज्ञ होय. तो कालगतीचा साक्षी म्हणून सहजच समयज्ञ आहे. त्याच प्रमाणें तो आपली प्रतीज्ञा, ''कौन्तेय प्रतिजानीहि न मे भक्तः प्रणश्यति'' ''तेषां अहं समुद्धर्ता मृत्युसंसार-सागरात्'' अशा प्रकारची, केव्हां हि मोडीत नाहीं, पाळतोच पाळतो, म्हणून हि तो समयज्ञ होय. समय चा तिसरा हि एक अर्थ आहे वेळ व प्रसंग. तो जाणणारा योग्य वेळीं योग्य गोष्ट करतो. परमात्मा हा तसा सर्व गोष्टी यथोचित करतो. म्हणूनहि तो समयज्ञ म्हणावयाचा. तिन्ही अर्थ परस्पर-पूरकच आहेत.

३५९-अ. हवि (हविर्-हरि)

''हविर्-हरिः'' हा वर्ण-समुच्चय एक पद म्हणून घेतला गेला आहे. परंतु हृ धातूपासून येणाऱ्या हर आणि हरि या दोन्ही कृदन्त उपपदांपैकीं उपपद समासांत प्रायः हर हेंच उपपद वापरलें जातें. हरि हें स्वतंत्र पद म्हणूनच प्रसिद्ध आहे. उदाहरणार्थ 'सर्वपापहरो हरिः' या वचनांत हर हें कृदन्त उपपद म्हणून आलें आहे, तर हरि हें स्वतंत्र पद म्हणून आलें आहे. इथें हि तें तसें घ्यायला काय हरकत? हरकत कदाचित् सहस्र संख्येची येईल. पण ती अन्य व्यवस्थेनें निवारतां येण्यासारखी आहे. हर हें कृदन्त हि शंकरवाचक म्हणून स्वतंत्रपणें प्रयुक्त होतें, पण तें उपपद म्हणून हि सर्रास प्रचलित आहे, तसें हरि हें पद उपपद म्हणून प्रचलित नाहीं. म्हणून हवि आणि हरि हीं पदें वेगळीं घ्यायला अनुकूलता अधिक आहे.

मागील पदांत परमात्मा हा सम-यज्ञ वा शम-यज्ञ म्हणून गाइला आहे. अर्थात् समभावाच्या यज्ञांत सर्व विषमता होमायची असते आणि समभावाचा एकमेवाद्वितीय अग्नि तेवढा प्रज्वलित ठेवायचा असतो. हें जें होमिलें जाणारें हविर्-द्रव्य तें हि परमात्मरूपच होय. कारण परिणामावरून वस्तूचें स्वरूप ठरविलें जाते. आंब्याचें फळ लागलें तर म्हणायाचें तें झाड आंब्याचें आहे. निंबोळी लागली तर म्हणायाचें निंब आहे. समभावाचा अग्नि होऊन जें राहिलें तें हविर्-द्रव्य समत्वरूप अग्निच म्हणावयाचें. यज्ञांत उपयोगी पडणारें द्रव्यजात, उपकरणजात, क्रियाजात, सारें यज्ञसात् होत असतें.

तो अग्नि आणि यज्ञकर्ता हि यज्ञसात् च होतो. म्हणून इथें हविर्द्रव्य हि परमात्माच आहे असें म्हटलें आहे.

**ब्रह्मार्पणं ब्रह्म हविर् ब्रह्माग्नौ ब्रह्मणा हुतम्।**
**ब्रह्मैव तेन गन्तव्यं ब्रह्मकर्मसमाधिना।।**

या गीतावचनांत हाच आशय आला आहे. इथें केवळ हवि पद आलें आहे, पण पुढें हा सर्व यज्ञ-संभार आलाच आहे.

### ३५९-आ. हरि (हविर्-हरि)

हरि म्हणजे हर्ता. कशाचें हरण करतो हा हरि? तो कल्पान्तीं या समस्त विश्वाचें हरण करतो. म्हणून तो हरि म्हणावयाचा. तो स्थिति-कालीं दुष्टांचा संहार करतो आणि तद्द्वारा सज्जनांचा उद्धार करतो म्हणून हि तो हरि होय. उत्पत्ति-कालीं चराचर जीव-निकायांच्या रूपानें व्यक्त होऊन तो या विश्वांत विहार करतो म्हणून हि तो हरि. असा हा परमात्मा आदि मध्य अन्त व्यापून हरिच हरि आहे. तो आहर्ता आहे, विहर्ता आहे, संहर्ता आहे.

परंतु इथें परमात्मा हा 'हविर्-हरिः' म्हटला आहे असें म्हटल्यास तो या विश्व-यज्ञांत विश्वाकडून यजिला जाणारा यज्ञ-पुरुष होय. तो या विश्वाचा हविलेला हवि आहरण करीत आहे, असें समजावें. सर्वान्तर्यामी ऊर्फ वैश्वानर रूपानें तोच सर्व हुत अन्नाचा भोक्ता आहे. होत्याची आहुति, पूजकाचा नैवेद्य, भगताचा बळि सर्व तोच हरण करीत असतो.

**यजन्ते सात्त्विका देवान् यक्षरक्षांसि राजसाः।**
**प्रेतान् भूतगणांश्चान्ये यजन्ते तामसा जनाः।।**

या सर्वांच्या यज्ञतपांचा भोक्ता तो परमात्माच असतो आणि तोच त्यांच्या श्रद्धेला अनुसरून त्यांना फळ देत असतो.

**यो यो यां यां तनुं भक्तः श्रद्धयार्चितुमिच्छति।**
**तस्य तस्याचलां श्रद्धां तामेव विदधाम्यहम्।।**

**स तया श्रद्धया युक्तस् तस्याराधनमीहते।**
**लभते च ततः कामान् मयैव विहितान् हि तान्।।**

ईज्य वा यजनीय एकें परमात्मा असून आपआपल्या श्रद्धेनुसार सर्व त्याचेंच यजन करीत असतात. वेदानुवचन, यज्ञ, दान, तप इत्यादि विविध आराधना सर्व त्यालाच उद्देशून केल्या जातात आणि तोच त्यांचा भोक्ता आणि फलदाता हि आहे.

### ३६०. सर्वलक्षण-लक्षण्य

लक्षण्य म्हणजे लक्षणोचित, सुलक्षण. जो सर्व लक्षणांनीं लक्षणीय होय तो सर्व-लक्षण-लक्षण्य म्हणावयाचा. सर्व लक्षणांनीं म्हणजे शुभ चिह्नांनीं युक्त महापुरुष असतो. महापुरुष परमात्माच परिपूर्ण निर्दोष आणि सर्वलक्षण-समन्वित असूं शकतो. म्हणून तोच एक सर्व-लक्षण-लक्षण्य म्हणावयाचा. त्याचीं हीं लक्षणें ज्याच्या ठाईं पुष्कळशीं आढळतात त्याला हि तुलनेनें महापुरुष म्हटलें जातें. जसा कुलक्षण वेनाचा पुत्र पृथु हा परमात्म्याचा नृपावतार सर्वसुलक्षण होता. तो महापुरुष म्हणावयाचा. हस्त-पादादि अवयवांवर हीं चिन्हें जन्मतःच अंकित असतात, असें मानलें जातें. उपार्जित ध्वजच्छत्रादि बाह्य राजचिह्नें वेगळीं. लक्षणें आणि चिह्नें ह्यांतलेंच तें अंतर आहे. लक्षणें जन्म-जात असतात, चिह्नें तद्नुसार उपार्जित होतात. छत्रचामरादि राजचिह्नें काढून ठेवून राजा गुप्त वेशांत फिरूं शकतो पण लक्षणें त्याला काढून ठेवतां येत नाहींत.

पण परमात्मा तर विदेह आहे, त्याचीं लक्षणें कशीं असणार? परमात्मा विदेह निश्चितच आहे, पण त्याचे अवतार असूं नयेत, आविर्भाव असूं नयेत, असें बन्धन कोण लादणार? तो सदेह असून हि विदेहच आहे. त्याची विदेहता देहाच्यायोगें खंडित होत नाहीं. कारण तिथें देहाभिमान नसतो. असे जे परमात्म्याचे

अवतार वा आविर्भाव त्यांच्या ठाईं परमात्म-लक्षणें प्रकटतात. त्या भगवल्लक्षणांवरून आणि त्याच्या दैवी तेजावरून भगवदवतार ओळखला जातो. अतिमानुष कार्यावरून तो जगाला जाहीर होतो इतकेंच. शंखचक्रगदापद्म हीं त्याचीं लक्षणें आहेत. त्याची आज्ञा सर्व जग शिरसावंद्य करतें. कोणी प्रतिकार करायला धजत नाहीं, समर्थ होत नाहीं, हें त्याचें तेजच त्याची प्रकट खूण वा ओळखण होय.

## ३६१. लक्ष्मीवान्

लक्ष्मीवान् म्हणजे श्रीमान्. श्रीमान् पद पूर्वी येऊनच गेलें आहे. तिथें त्याचें विवेचन केलें आहे, तें पहावें. इथें लक्ष्मीवान् हें पद सर्व-लक्षण-लक्षण्य या पदानंतर आलें आहे त्याच्या साहचर्यानें इथें लक्ष्मी म्हणजे सर्व सुलक्षणांनीं अर्थात् लक्ष्मांनीं बनलेली अपूर्व अशी समग्रातिरिक्त शोभा समजावयाची, आणि अशा लक्ष्मीनें जो नित्ययुक्त तो लक्ष्मीवान् म्हणावयाचा. परमात्मा हा विदेह एवढ्याच साठीं म्हणावयाचा कीं देह ही उपाधि म्हटली जाते आणि तो तर निरुपाधि आहे. पण सत्‌चित्‌आनंद हा स्वभावच त्याचा देह म्हटला तर तो निरुपाधि आणि अतएव विदेह असून हि सदेह म्हणावयाला हरकत नाहीं. कारण हा सच्चिदानंदरूप भाव त्याला कायमचा दिग्ध म्हणजे चिकटलेलाच आहे. आणि म्हणूनच शास्त्रांत त्याला सच्चिदानंद-विग्रह म्हटलें आहे. या विग्रहाची जी अपूर्व आणि अलौकिक कान्ति तीच त्याचा परिग्रह होय. तीच लक्ष्मी. मोत्यावर मोत्याचें पाणी त्याला परितः वेढून असतें आणि अविभाज्यपणें संयुक्त असतें. तसा लक्ष्मीचा परिग्रह सच्चिदानंद-विग्रह परमात्म्याशीं नित्य संबद्ध आहे. म्हणून तो लक्ष्मीवान् म्हणावयाचा. आणि सत् चित् आनंद हींच त्या लक्ष्मीचीं घटक लक्षणें म्हणावयाचीं. इथें एकाच वस्तूला, सच्चिदानंदाला, त्याचा विग्रह आणि परिग्रह हि म्हणण्याची आपत्ति येते खरी, परंतु परमात्म्याचें स्वरूपच असें विलक्षण आहे कीं त्याच्या वर्णनास भाषा तोकडीच पडावयाची. सर्व वर्णन वा निरूपण सादृश्यमूलक आहे. आणि परमात्मसदृश परमात्माच असल्यामुळें त्याचें वर्णन यथार्थतया होऊं शकत नाहीं. म्हणूनच त्याला पुढें 'शब्दातिगः शब्दसहः' म्हटलें आहे. तथापि म्हणूंया कीं चंदनाचें नांव चंदन, त्याचें रूप म्हणजे देहहि चंदन, त्याचे हस्त-पादादि अवयव चंदन तसा परमात्म्याचा विग्रह (देह) परिग्रह (स्त्री) सर्व कांहीं परमात्माच आहे.

## ३६२. समितिंजय

समितिं जयति इति समितिंजयः। जो समितीला जिंकतो तो समितिंजय होय. पण समिति म्हणजे काय ? सम् म्हणजे एकत्र आणि इति म्हणजे येणें. जिथें लोक गोळा होतात ती समिति होय. ब्राह्मणांची समिति म्हणजे वादसभा होय आणि क्षत्रियांची समिति म्हणजे रणांगण होय. वैश्यांची समिति म्हणजे बाजार-पेठ होय आणि शूद्रांची समिति म्हणजे कामगारतळ होय. वादसभा प्रज्ञा-प्रकर्षानें, रणसभा शस्त्रास्त्रनैपुण्यानें, बाजारपेठ व्यवहार-कौशल्यानें आणि कामगारसभा निष्कपट सेवा-सामर्थ्यानें जिंकली जाते. ह्या प्रत्येक समितींत स्पर्धा आहे, चढाओढ आहे, लढाई आहे, तींत बुद्धि, बळ, चातुर्य आणि सेवा या गुणांच्या सर्वातिशायी प्रकर्षानें प्रतिपक्षावर विजय मिळविला जातो. हा जो प्रत्येक क्षेत्रांतील विजेता तो समितिंजय होय. हा विजय कोणाचा आहे? आत्मशक्तीचा आहे. प्रत्येकाच्या ठाईं जें आत्मतत्त्व आहे त्याच्याच बळावर तो शारीरिक आणि बौद्धिक, भौतिक आणि आध्यात्मिक, सर्व शक्तींचा उदय, विकास आणि उत्कर्ष साधीत असतो. म्हणून तो सर्वभूतात्मभूत परमात्माच समितिंजय होय. राक्षसांचा, असुरांचा नि देवांचा विजय हा त्यांचा विजय नव्हे तो त्या परमात्म-शक्तीचाच विजय होय. परंतु हें ते ओळखत नाहींत. आणि म्हणूनच त्यांना ''अस्माकमेवायं विजयः, अस्माकमेवायं महिमा''

असा भ्रम होतो. गुरुकृपेनें जेव्हां देवांना त्या परमात्म-तत्त्वाचें भान आणि ज्ञान होतें तेव्हां ते मग ओळखूं लागतात कीं अरे हा तर देहेन्द्रियमनोबुद्धीचा नव्हे तर त्यांना स्वकर्मक्षमता देणाऱ्या त्या आत्मतत्त्वाचाच विजय आहे. इन्द्रियाणि मनो बुद्धिः सत्त्वं तेजो बलं धृतिः। वासुदेवात्मकान्याहुः क्षेत्रं क्षेत्रज्ञ एवच।। योगो ज्ञानं तथा सांख्यं विद्याः शिल्पादि कर्म च। वेदाः शास्त्राणि विज्ञानं एतत् सर्वं जनार्दनात्।।

## ३६३. विक्षर

क्षर, अक्षर, आणि विक्षर हीं तिन्ही पदें विष्णुसहस्रांत आलीं आहेत. जें क्षरणशील, विनाशशील आहे तें क्षर होय. जें क्षर नव्हे, तें अक्षर होय. पण विक्षर म्हणजे काय? तर जें क्षर हि नव्हे, अक्षर हि नव्हे तें उभय-भिन्न पण उभयांना सांधणारें तत्त्व विक्षर म्हणावें, त्यांना जोडणारा पण त्यांच्याहून भिन्न असा तो सेतु होय. हें प्रतिक्षणीं क्षरमाण संपूर्ण दृश्य विश्व म्हणजे क्षर होय. तें अदृश्य, अव्यक्त, अनिर्देश्य, कूटस्थ ब्रह्म अक्षर होय. आणि उभय विशिष्ट आणि उभय-भिन्न देहधारी जीव हा विक्षर होय. जीव जगत् आणि ईश्वर ही पदार्थत्रयी आपण पाहतच आहों. जीव हा पदार्थ परमार्थतः चिन्मात्र आहे तरी जोंवर तो सोपाधिक आहे तोंवर त्याला जड जगताहून आणि चेतन परमेश्वराहून वेगळेंच मानणें भाग आहे. आणि त्यामुळेंच त्याला क्षर हि म्हणतां येत नाहीं आणि अक्षर हि म्हणतां येत नाहीं. म्हणून तो विगतक्षर आणि अनक्षर विक्षर म्हणावयाचा. परमार्थतः अद्वैत असलें तरी व्यवहारतः त्रैतच आहे.

'क्षरं अक्षरं' हीं क्रमिक पदें नपुंसक आहेत तर 'अक्षरः' 'विक्षरः' एकैकशः आलेलीं पुंल्लिंग आहेत. त्यावरून असें दिसतें कीं क्षरं अक्षरं हीं पदें सृष्टीचा चिदचिद्-विभाग सूचित करून आणि तद्द्वारा उभय-विधत्व वर्णून परमात्म्याचें व्यापकत्व सूचित करतात. उलट, 'अक्षरः विक्षरः' हीं पदें स्वतंत्र आलीं असून तीं परमात्मा अक्षरब्रह्म आहे तसा विशेषतः क्षरणशील हा संसार हि तो आहे, असें वैचित्र्य व स्वातंत्र्य प्रतिपादीत आहेत. कारणरूपानें परमात्मा हा अक्षर आहे तर कार्य-रूपानें तो विक्षर आहे. एक स्वरूप आहे, दुसरें विश्वरूप आहे. अथवा परमात्मा हा स्वभावतः अक्षर आहे तर साधक जीव हा प्रयत्नतः ज्ञानसंन्यासानें विगत-क्षर होतो म्हणून तो विक्षर म्हटला जातो, असें समजावें.

## ३६४. रोहित

रोहित नामाबरोबर पुढील सुभाषित आठवतें:—

**अगाधजलसंचारी न गर्वं याति रोहितः।**
**अंगुष्ठोदकमात्रेण शफरी फर्फरायते।।**

तेव्हां रोहित म्हणजे देवमासा. देवमासा या नामावरूनच तें एक देवाचें रूप आहे आणि रोहित हें त्याचें नांव आहे हें सहज लक्षांत यावें. पण याला रोहित नाम कां मिळालें? कारण तो सारखा रोहण करीत गेला, वाढतच गेला म्हणून. प्रथम तो मनूच्या ओंजळींत आला व तत्क्षणीं तो वाढला, तेव्हां त्यानें तो आपल्या कमंडलूंत टाकला. कमंडलूंत हि तो मावेनासा झाला, तेव्हां त्याला त्यानें गंगाळांत टाकलें. त्यानें गंगाळ हि व्यापून टाकलें, तेव्हां त्याला मनूनें रांजणांत टाकलें. पण रांजण हि त्यानें व्यापून टाकला तेव्हां त्याला त्यानें नदींत सोडलें, नदींत तो पाहतां पाहतां वाढत गेला आणि नदी मुखानें समुद्रांत आणि समुद्रांतून महा सागरांत आणि महा सागरांतून प्रलयकाळांत एकार्णवांत संचार करूं लागला. मनूला त्यानें सांगून ठेवलें होतें कीं लवकरच प्रलय होईल आणि त्यांत ही संपूर्ण पृथिवी बुडून जाईल. म्हणून तूं शिखरावर बसून रहा, तुला मी येऊन नावेंत घेऊन जाईन असें हि त्यानें त्याला आश्वासन दिलें होतें. मनूच्या प्रसृतींतील अंगुष्ठमात्र मत्स्यापासून

एकार्णवातांतील पर्वतप्राय आणि अद्भुत सत्त्वापर्यंत ज्याअर्थी तो वाढत गेला त्याअर्थी तो रोहित म्हटला गेला. वामनाचा त्रिविक्रम झाला, म्हणून हि तो रोहित म्हणावयाचा. अनिर्देश्य अव्यक्त तत्त्वापासून इदंतया निर्देश्य ब्रह्माण्डापर्यंत वाढला म्हणून हि तो रोहित होय.

रलयोर् अभेद: या न्यायानें रोहित म्हणजे लोहित हि समजावयाचा. ''उदये सविता रक्त: रक्त: चास्तमने तथा'' म्हणून रोहित म्हणजे सूर्य. तो हि लोहित असून शिवाय उदयापासून आरोहण करीत मध्याह्नीं सर्वोच्च रोहित होतो, आरूढ होतो म्हणून हि रोहित म्हणावयाचा.

## ३६५. मार्ग

मार्ग्यते इति मार्ग: जो शोधला अनुसरला जातो तो मार्ग होय. अर्थात् परिमार्गितव्य पद. गीतेंत म्हटलें आहे–'तत: पदं तत् परिमार्गितव्यं यस्मिन् गता न निवर्तन्ति भूय:' ध्येयभूत, साध्यभूत परमात्माच तें परमपद होय. म्हणून तोच मार्ग म्हणावयाचा. मार्ग्यते अनेन इति मार्ग: ह्याच्या योगें शोधावा, शोधला जातो, अनुसरला जातो, म्हणून मार्ग अशी हि त्याची दुसरी व्युत्पत्ति होऊं शकेल. ज्या साधनानें परमात्मा शोधला जातो, गांठला जातो तें साधन हि परमात्माच होय. परमात्म्याहून वेगळा परमात्म्याला दुसरा कोण गांठू शकतो? म्हणून परमात्मा हाच मार्ग होय, यज्ञ होय. 'यज्ञेन यज्ञम् अयजन्त देवा:' या वेदवचनाचा हाच आशय आहे. साध्य म्हणून तो यज्ञ म्हणजे यजनीय आहे, तर साधन म्हणून तो यज्ञ म्हणजे यज्ञक्रिया हि आहे. उपनिषदांत म्हटलें आहे: ''सत्येन लभ्यस् तपसा ह्येष आत्मा। सम्यग्ज्ञानेन ब्रह्मचर्येण नित्यम्'' हें तें सत्याचरणरूप तप तेंच सत्य-स्वरूप परमात्म्याचें साधन होय. अशा प्रकारें साध्यसाधनांची एकरूपता हा गांधीचा विचार हि जुनाच आहे. तो वैदिक आहे, औपनिषदिक आहे. गीतेनें तर ब्रह्मकर्मसमाधिरूपानें तो परिपूर्णतेलाच पोंचविला आहे. ब्रह्मसंबंधत्वें सर्व कर्तृकर्मक्रियाकलाप ब्रह्म होय.

**ब्रह्मार्पणं ब्रह्म हविर् ब्रह्माग्नौ ब्रह्मणा हुतम्।**
**ब्रह्मैव तेन गन्तव्यं ब्रह्मकर्मसमाधिना।।**

कर्ता, कर्म, करण, संप्रदान, अपादान, अधिकरण आणि संबोधन सर्व कारकें तो एक परमात्मा च आहे. तेव्हां मार्ग्यते अस्मिन् इति मार्ग: असें परत म्हणायला नकोच. जिथें तो सर्वच कारकें आहे असें म्हटलें तिथें कर्म, करण आणि अधिकरण म्हणून त्याचें परत व्याख्यान करण्याची आवश्यकता उरत नाहीं. तसें म्हणणें हें ब्राह्मणपरिव्राजक म्हणण्यासारखेंच होय.

## ३६६. हेतु

हेतु म्हणजे कारण. परमात्मा या विश्वाचें ऊर्णनाभवत् निमित्त आणि उपादान कारण आहे.

**किमीह: किंकाय: स खलु किमुपायस् त्रिभुवनं**
**किमाधारो धाता सृजति किमुपादान इति च।**
**अतर्क्यैश्वर्ये त्वय्यनवसर-दु:स्थो हतधिय:**
**कुतर्को यं कांश्चिन् मुखरयति मोहाय जगत:।।**

परमात्म्याचें ऐश्वर्य अतर्क्य आहे. तेव्हां त्यानें हें विश्व कशापासून, कुठल्या साधनांनीं, कुठें केव्हां, कसें निर्माण केलें इत्यादि शंका घ्यायला अवकाश नाहीं. एक सामान्य जन्तु हि केवळ आपल्यांतूनच एक जाल निर्माण करतो तर ज्याचें ऐश्वर्य अपरंपार आहे त्या ईश्वराला काय अशक्य आहे? म्हणून या चराचर विश्वाचें सर्वकारण तो परमात्माच होय.

हेतु म्हणजे उद्देश असा हि अर्थ घेतां येईल. या संपूर्ण विश्वाचा उद्देश परमात्मदर्शनाहून दुसरा काय असूं शकेल? बीज उगवतें आणि वाढवाढून फळतें

तेव्हांच तें आपल्या उद्देशांत सफळ झालें असें म्हटलें जातें. तें एकदा फळून थांबत नाहीं, तर आपली संपूर्ण हयात त्याचसाठीं खपवतें आणि अशा प्रकारें कृतार्थ होतें. या विश्ववृक्षाचें हि तसेंच आहे. तो हि परमात्मबीजापासून उगवून परमात्मरूपानें परिणत होत आला आहे आणि होत राहणार आहे. ही आत्मपरिणतिच ह्या विश्वाचा उद्देश आहे, हेतु आहे. हा हेतु सफल होऊन कुंठित होत नाहीं. कारण आत्मदर्शन हा आत्म्याचा स्वभाव आहे. गंगा सागराला मिळून मिळतच राहते. कारण तो तिचा जीवनहेतु आहे, स्वभाव आहे. प्रत्येक अंश आपल्या अंशीशीं संगत व्हायला धडपडत असतो. कारण तो त्याचा जीवन-हेतु आहे. तसा परमात्मा ह्या विश्वाचा जीवन-हेतु आहे.

### ३६७. दामोदर

दाम्न: उदरं य: स दामोदर:। जो या विश्वरूप दाव्याचें मायपोट आहे, आश्रय स्थान आहे, तो परमात्मा दामोदर होय. दावें दोन बाजूला दोन खुंटांना बांधलेलें असतें. तसें हें विश्व आदि अंत मध्य भागीं परमात्मसंज्ञक खुंटानें धारण केलेलें आहे. त्याचा आरंभ परमात्म्यापासून होतो आणि अंतहि परमात्म्याच्याच ठाईं होतो. त्या दुहेरी आधारावर तें मध्यभागीं हि अवलंबित असतें, मध्यभागीं खुंटा दिसत नाहीं खरा, पण त्याच्याच आधारावर तें टिकून असतें हें उघड आहे. परमात्म्याचा आश्रय चालू जगांत कुठें दिसून येत नाहीं, पण तें त्यावरच अवलंबून आहे. तें निराधार राहूं शकत नाहीं. तें असत्य, अप्रतिष्ठ, अनीश्वर असूं शकत नाहीं. या जगाला परमात्म्याचा आधार आहे तें ठीक, पण त्याला दावें म्हणण्याचें काय कारण? दाव्याला म्हणजे दावणीला गुरें बांधलेलीं असतात. त्याप्रमाणें नामरूपकर्मांनीं वळलेलें हें जें जगरूप दावें आहे त्याला सर्व चराचर बांधलेलें आहे. ज्याला नाम नाहीं, रूप नाहीं, कर्म नाहीं असें कांहीं तरी या जगांत आहे का? तसें शोधून सांपडणार नाहीं. अव्यक्ताच्या पोटांत सारें व्यक्त सामावलेलें आहे. कारणाच्या पोटांत सारें कार्य सामावलेलें आहे. त्यामुळें तो अव्यक्त परमात्मा दामोदर म्हणावयाचा.

दामोदराचा हा आशय व्यक्त करण्यासाठींच कृष्ण चरित्रांत कृष्णाच्या मुखांत यशोदेला सारें विश्व दाखविलें आहे. अशा प्रकारें दामोदर पदाचा भावार्थ अन्य कथेच्या द्वारें व्यक्त केला गेला आहे आणि दामोदर पदासाठीं कृष्णाला उखळीला बांधून यमलार्जुनमोक्ष करविला आहे. वस्तुत: दाम्ना बद्धं उदरं यस्य स: दामोदर:' ही व्युत्पत्ति समर्पक नाहीं आणि गुणवाचक तर नाहींच नाहीं. देवाचीं सर्व नामें गौण म्हणजे शास्त्रांत गुणवाचक आणि विख्यात म्हणजे पुराणांत प्रसिद्ध आहेत. शास्त्रांत त्यांचा तत्त्वार्थ तर पुराणांत लौकिक अर्थ (म्हणजे मनोरंजक अद्‌भुत आख्यायिका) आला आहे.

### ३६८. सह

सहस् म्हणजे धमक, धडाडी, पराक्रम. युयुत्सु विजिगीषु वृत्ति. कसला हि प्रसंग आला तरी हार खायची नाहीं, त्यावर मात करायची, ही जी वृत्ति तिचें नांव आहे सहस्. परमात्मा या साहसी वृत्तीची मूर्तिच होय. म्हणून तो सह: म्हटला आहे. मनुष्य कशाच्या बळावर संकटांना तोंड देतो आणि विजयी होतो? क्वचित् विजयी न झाला तरी पस्तहिंमत होत नाहीं, परत उठावयाची उमेद बाळगतो. तें जें बाह्य कोणत्याहि वस्तूवर अवलंबून नसलेलें, अन्तरतर बळ तेंच 'सह:' म्हटलें आहे. सर्व जगानें जरी सोडलें तरी जो अन्तर देत नाहीं तोच सह: होय. आणि तोच परमात्मा. अशा या आत्मनिष्ठनें जो युक्त, 'तो आत्मवान् होय. तोच निर्भय. तो सर्वांवर मात करतो. तो सर्वांना पुरून उरतो. म्हणून तें जें अन्तरतर बळ, जें जगानें दगा दिला तरी आपल्या पाठीशीं सदैव उभें

असतें तेंच 'सह' होय. सर्व भक्तांना महान् संकटांत ह्यानेंच तारलें आहे. हाच तो सर्व संकटांचें हरण करणारा हरि आहे. ह्यालाच उद्देशून म्हटलें आहे–''हरिने भजतां हजी कोइनी लाज जती नथी जाणी रे'' ह्यालाच उद्देशून तुकाराम म्हणतो–''जेथें जातों तेथें तूं माझा सांगाती। चालविसी हातीं धरोनिया'' असा तो सदैव सह असतो म्हणून तर तो परमात्मा सह होय. समर्थ म्हणतात–''विलग विषम काळीं सांडिती सर्व माळीं। रघुविर सुखदाता सोडवी अंतकाळीं'' मरणाच्या त्या कठिण प्रसंगीं सर्व सोडून जातात, पण परमात्मा संनिध असतो. जीवाचा तोच एक जिवलग आहे. आमचा 'साथी' तो आहे. 'अपराजित: सर्वसह:' म्हणून पुढें दोन पदें आलीं आहेत तीं हि सहच्या अर्थावर प्रकाश पाडणारीं आहेत. तो सहसंज्ञक परमात्मा कोणाला हार न गेलेला आणि सर्वांवर मात करणारा, केलेला आहे. भीमानें बकासुराचा सर्व मार सहन केला आणि मग त्याला जिंकलें. अर्थात् त्या बकासुरानें मात्र त्याचा मार सहन केला नाहीं. तसा परमात्मा सर्वांचें सर्व सहन करून सर्वांना जिंकतो म्हणून तो 'सह'.

## ३६९. महीधर

धरणीधर आणि महीधर हीं पदें पूर्वीं येऊन च गेलीं आहेत. पुढें हि धराधर पद आलें आहे. अशा प्रकारें भूलोक-धारणाचें मोठें कौतुक आहे. भूलोक-वासी मानव प्राण्याला तसें वाटणें स्वाभाविक आहे.

मही हें पद असें महत्त्वाचें आहे. त्याचें महत्त्व सारखें वाढणारेंच आहे. प्रथम मही म्हणजे हा देह होय, ज्यांत आमचा निवास आहे. ज्याच्या योगें सकळ पुरुषार्थ साधतां येतात, ज्याच्या योगें सच्चिदानंद पदवी हस्तगत करतां येते, तो महान् नर देह मही होय.

ज्या जीवलोकांत असे असंख्य आणि असंख्यविध देह उत्पन्न होऊन वाढतात तो हा जीवलोक, सर्व जीवांचा जीवनाधार, मही होय. मशकापासून महात्म्यापर्यंत सर्वांना त्यांत ठाव आहे, त्यांच्या सर्व आकांक्षांना वाव आहे. म्हणून तो मही होय.

विविध देह आणि त्या विविध आणि असंख्य देहांचा आश्रय असणारी ही भू ज्या विश्वरचनेंत सामावली आहे ती विराट् विश्वरचना हि तिच्या व्यापकतेमुळें मही पदवीस पात्र आहे.

अर्थात् ही समस्त विश्वरचना आणि तिचा अंश द्वीन्ही खरोखर महीच होत. विश्वरचना अद्‌भुत आहेच, पण त्या विश्वाचा परमाणु हि तसाच अद्‌भुत आहे. त्यांत हि अनेकानेक सूक्ष्मातिसूक्ष्म घटकांच्या घडामोडी चाललेल्या आहेत. विश्व स्वत: विश्व आहेच पण त्याचा अंश हि विश्वच आहे. भूमि, तिच्या अंकावर वाढणारा वृक्ष, आणि त्याच्या ही अंकावर वाढणारें फूल सर्व एकमय आहे. तसें ब्रह्माण्ड सप्तद्वीपा पृथ्वी आणि जीवदेह सर्व एक महीरूपच होत. आणि त्या महीचा धर्ता तो परमात्मा आहे. म्हणून तो महीधर म्हणावयाचा.

## ३७०. महाभाग

महान् भाग: यस्य स: महाभाग:। मोठें आहे भाग्य ज्याचें तो महाभाग होय. जगांत भाग्यवान् लोक एकापेक्षां एक आहेत. त्यामुळें त्यांचीं तीं भाग्यें तुलनेंत आणि स्पर्धेंत सांपडलेलीं आहेत. शिवाय तीं नाश हि पावणारीं आहेत. तुल्यता, अभ्यधिकता आणि विनाश यांनीं तीं ग्रस्त आहेत. हीं अशीं जर भाग्यें म्हणावयाचीं तर अभाग्यें कोणतीं? अर्थात् खरोखर हीं भाग्य या पदवीसच लायक नाहींत. मग महाभाग्य ही पदवी तर दूरच! पण ज्या अर्थीं परमेश्वराला महाभाग म्हटलें आहे त्या अर्थीं भाग्यवान् हि कोणी असलेच पाहिजेत. हे भाग्यवान् म्हणजे परमात्म्याचे भक्त होत. आणि त्यांचें भाग्य म्हणजे वैराग्य होय. वैराग्यांत तुल्यता, अभ्यधिकता आणि नाश तिन्ही नाहीं म्हटलें तरी चालेल. 'सर्व वस्तु

भयान्वितं भुवि नृणां वैराग्यमेवाभयम्.' त्याला नाश नाहीं. त्यांत स्पर्धा चालत नाहीं. कोणी कितीही वैराग्य वाढवलें तरी त्याला कोणी हटकूं शकत नाहीं. तिथें कोणाला हटक नाहीं नि कोणाला अटक नाहीं. त्यामुळें तें भाग्य या पदवीस पात्र होय. आणि असें हें भाग्य आत्मज्ञानमूलकच असूं शकत असल्यामुळें आणि तें आत्मज्ञान म्हणजे आत्मनिष्ठा परमात्म्याहून अधिक इतरत्र उपलब्ध होऊं शकत नसल्यामुळें विदेह परमात्मा हा महाभाग होय. ज्या वस्तूचा अभिलाष असेल तिचें त्या अभिलषित्याला दारिद्र्य आहे हें उघड आहे. तो अभिलाष, ती कामना ज्याला मुळीं स्पर्शतच नाहीं त्याहून अधिक महाभाग कोण म्हणावयाचा! परमात्मा आत्मकाम म्हणून महाभाग, तर ज्ञानी भक्त अकामहत म्हणून भाग्यवान् म्हणावयाचा. दोहोंच्याहि भाग्याचें मूळ आत्मज्ञानमूलक वैराग्यच होय.

## ३७१. वेगवान्

वेगवान् म्हणजे चपळ, जलद. जलचरांत मासा, सर्पांत नाग, ग्राम्य पशूंत घोडा, आरण्यक श्वापदांत चित्ता आणि पक्ष्यांत ससाणा वा गरुड हे वेगवान् म्हणून प्रसिद्ध आहेत. बाह्य जगांत वायु आणि अंतर्जगांत मन हि वेगवान् म्हणून प्रसिद्ध आहे. परंतु या सर्वांना प्रतिकार हि असतो. ह्या सर्वांना अंतर कापावयाचें असतें. त्यांनीं किती हि चपळाई केली तरी ती मर्यादितच असणार. ह्या सर्वांत अधिक चपळ म्हणजे मन. तें वायूहून हि सूक्ष्म. त्याला प्रतिकार कमींत कमी. पण त्यालाहि अंतर तर कापावेंच लागतें ना? त्यामुळें त्यांची चपळाई कितीही अचाट असली तरी तिथें क्रिया आहे. आणि त्यामुळें कांहीं ना कांहीं वेळ हा लागणारच. परंतु परमात्मा हा असा सक्रिय वेगवान् नाहीं. तो अक्रिय असून सर्वव्यापी आहे. त्यामुळें त्याच्या वेगाची बरोबरी कल्पनेनें हि कोणाला करतां यावयाची नाहीं. म्हणून म्हटलें आहे:—

**अनेजद् एकं मनसो जवीयः**
**नैनद् देवा आप्नुवन् पूर्वमर्षत्।**
**तद् धावतो ऽन्यान् अत्येति तिष्ठत्**
**तस्मिन् अपो मातरिश्वा दधाति।।**

इंद्रियें, वाणी, मन कोणीहि त्या आत्मतत्त्वाला गाठूं शकत नाहीं. हीं सर्व त्यानें गांठून केव्हांचींच मागें टाकलीं आहेत. आणि तें हि इवलीशी हि हालचाल न करतां. तें परमात्मतत्त्व अक्रिय असून सर्वव्यापी आहे. सर्वव्यापकत्व त्याचें सहज आहे. क्रियासाध्य नाहीं. खरोखर म्हणजे तें सर्व क्रियांचा आधार आहे. सर्व हालचाल, सर्व क्रिया त्याच्याच अंकावर होत असते. परमात्मा एकमेवाद्वितीय सर्वगत असल्यामुळें स्थलान्तराला वाव नाहीं आणि अक्रिय असल्यामुळें कालान्तराला हि वाव नाहीं. म्हणून वेगवान्, सर्वाधिक वेगवान् होय.

## ३७२. अमिताशन

'अमितं अशनं यस्य सः अमिताशनः।'—अमित म्हणजे मात्रारहित आहे अशन म्हणजे आहार ज्याचा तो अमिताशन होय. भीम हा खूप खाणारा होता. पण त्यानें किती हि खाल्लें तरी तें कितीसें असणार? परिमितच म्हणावें लागेल तें. त्याला कांहीं अ-मित, अ-मात्र म्हणतां यावयाचें नाहीं. कोणी हि एक व्यक्ति खाऊन खाऊन खाणार किती? म्हणून भीम काय नि बकासुर काय? सगळ्या व्यक्ति मितंपच च होत. परंतु या सर्वांच्या मुखानें, सर्व देहेंद्रियमनोबुद्धींच्या द्वारा सर्व विषयांचें ग्रहण करणारा जो सर्वभूतात्मभूत परमात्मा तोच एक अमिताशन म्हणावयाचा. सर्व कर्तृत्व-भोक्तृत्वाचा आधार आत्मसत्ता आहे. म्हणून तो परमात्माच एक अमिताशन म्हणावयाचा. अशन ही हि एक क्रिया आहे. पण सर्व क्रियांचा समावेश तिच्यांत होतो. कारण अशन म्हणजे केवळ खाणें नव्हे तर सर्व घडामोडींचें ग्रहण वा ज्ञान होय.

चिद्रूप परमात्मा हा सर्व घडामोडींचा साक्षी असल्यामुळें तो सर्वाशन होय, अमिताशन होय. गीतेच्या पुढील श्लोकांत परमात्म्याचें हें अमिताशनत्वच विवरिलें आहे:–

**वेदाहं समतीतानि वर्तमानानि चार्जुन।**
**भविष्याणि च भूतानि मां तु वेद न कश्चन्॥**

परमात्म्याची चित्सत्ताच सर्वग्रासी आहे. म्हणून परमात्मा हा अमिताशन म्हणावयाचा. इतर कोणी कितीहि मोठा विद्वान् झाला तरी तो सर्वज्ञ होऊं शकत नाहीं. सर्व विश्वांतलें सर्व काळचें सर्व कांहीं एक परमात्माच जाणतो म्हणून तोच अमिताशन, इतर सारे मिताशन, मितंपच च, किंचिज्ज्ञच.

### ३७३. उद्भव

उद्भव म्हणजे उद्गम. हा समस्त व्यक्त सृष्टीचा प्रवाह अव्यक्त नि अक्षर परमात्म्यापासून निरंतर प्रवाहित होत आहे. त्यांत खळ नाहीं. म्हणून तो उद्भव. मूर्त अमूर्त, स्थूल सूक्ष्म, व्यक्त अव्यक्त सारांश यच्चयावत् सगुण वस्तूंचा उद्भव तो निर्गुण परमात्मा होय. जें कांहीं निर्माण व्हायचें तें मूलत: त्यांतूनच होतें. म्हणूनच म्हटलें आहे देवानें–''उद्भवश्च भविष्यताम्'' 'जन्माला येणाऱ्या सर्व वस्तूंचें मायपोट मी आहें.' जगांतील कार्यकारणभाव हा अलीकडचा आहे. नळाच्या तोटींतून पाणी येतें तिथें तें तळ्यांतून येतें, तळ्यांत नदीचें येतें, नदींत डोंगराचें येतें आणि डोंगरांत पावसाचें. पण पाऊस कुठून येतो? तो यज्ञांतून येतो, परमेश्वरापासून येतो. सूर्यरूप परमेश्वरी यज्ञ चालला आहे. त्यांतून पावसाळा, त्यानें सुगी, त्यांतून भूतांचें जीवन. अशा प्रकारें परमात्माच सर्वांचें मूळ होय. तोच उद्भव.

**सर्वांचें मूळ माझ्यांत प्रेरणा मजपासुनी।**
**हें ओळखूनि भक्तीनें जाणते भजती मज॥**
**चित्तें प्राणें जसे मी चि एकमेकांस बोधिती।**
**भरूनि कीर्तनें माझ्या ते आनंदांत खेळती॥**
**असे जे रंगले नित्य भजती प्रीतिपूर्वक।**
**त्यांस मी भेटवीं मातें देउनी बुद्धियोग तो॥**
**करूनि करुणा त्यांची हृदयीं राहुनी स्वयें।**
**तेंजस्वी ज्ञान-दीपानें अज्ञानतम घालवीं॥**
**(गीता–१०.८)**

उद्भव प्रभव संभव सर्व नामें समानार्थकच आहेत. आणि तीं सर्व इथें आलीं आहेत. उद्भव हें नाम तर दोन वेळां आलें आहे: प्रस्तुतचें ''उद्भव: क्षोभणो देव:'' (४१) आणि पुढें ''उद्भव: सुंदर: सुन्द:'' (८५)

### ३७४. क्षोभण

क्षोभण म्हणजे क्षोभ उत्पन्न करणारा. सृष्टीच्या प्रारंभीं जगाचीं सर्व उपादानभूत तत्त्वें कायम असूनहि सृष्टि मात्र निर्माण होऊं शकली नाहीं. सृष्टिकर्माचा अध्यक्ष तो ब्रह्मदेव बुचकळ्यांत पडला. कुठें अडलें, म्हणून तो विचार करूं लागला. पण त्याला कांहीं सुचेच ना. तो थकला आणि देवाला शरण गेला. तेव्हां देवानें आपल्या तेजानें त्या सर्व जडाजड उपादान-तत्त्वांत प्राण फुंकला, त्यांना स्वकर्मक्षम केलें. आणि तेव्हां कुठें तीं क्षोभ पावलेलीं तत्त्वें भराभर सृष्टि रचूं लागलीं. परमात्मा हा असा क्षोभण आहे. स्त्री-पुरुषांच्या ठाईं जोंवर क्षोभ निर्माण होत नाहीं तोंवर अपत्यनिर्माणतत्त्वें असूनहि तीं स्वकर्मक्षम होत नाहींत. क्षोभ निर्माण झाला म्हणजे तीं परस्पर सहकार्य करतात. आणि त्या सहकारांतून ही सृष्टि आकार घेते. प्रकृति-पुरुषरूप जीवाजीव तत्त्वें सृष्टीचीं मूळ उपादानें होत. परंतु तीं त्यांच्यांत क्षोभ होईपर्यंत स्वस्थ पडून राहतात. आणि परस्पर सहकाराअभावीं सृष्टिरचना घडून येत नाहीं. हा क्षोभ व तदुत्थ सहकार परमेश्वरी प्रेरणेनेंच निर्माण होतो. म्हणून परमात्मा हा क्षोभण म्हणावयाचा. वीज आणि विजेचीं उपकरणें दोन्हीहि असून जोंवर आपण बटन

दाबून त्यांच्यांत क्षोभ व सहकार उत्पन्न करीत नाहीं तोंवर तीं कार्यक्षम होत नाहींत, दिवा प्रकाशत नाहीं, पंखा गरगरत नाहीं, रेडिओ बोलत नाहीं. हा आपला नित्याचा अनुभव आहे. हा जसा बाह्य जगांतील अनुभव तसा अंतर्जगांतील अनुभवहि आपल्याला नित्याचाच आहे. देहेंद्रियमनोबुद्धि सुषुप्तींत विलीन होतात. त्यावेळीं त्यांचें अस्तित्व असून नसून सारखेंच. त्यांना परत स्वकर्मक्षम कोण करतें? तो क्षोभणदेवच तें करतो. म्हणून ध्रुव म्हणतो–

**योऽन्तः प्रविश्य मम वाचमिमां प्रसुप्तां**
**संजीवयत्यखिल-शक्तिधरः स्वधाम्ना।**
**अन्यांश्च हस्त-चरण-श्रवण-त्वगादीन्**
**प्राणान्, नमो भगवते पुरुषाय तुभ्यम्॥**

## ३७५. देव

द्योतते इति देवः आत्मरूपानें जो प्रत्येक जीवाच्या हृदयांत द्योतमान होतो तो देव होय. म्हटलेंच आहे:–

**यथा प्रकाशयत्येकः कृत्स्नं लोकमिमं रविः।**
**क्षेत्रं क्षेत्री तथा कृत्स्नं प्रकाशयति भारत॥**

जगाला रवि प्रकाशित करतो. तो भूः भुवर् आणि स्वर् तिन्ही लोक प्रकाशित करतो. संपूर्ण विश्व प्रकाशित करतो. त्याप्रमाणें क्षेत्री परमात्मा संपूर्ण क्षेत्राला अन्तर्बाह्य प्रकाशित करतो. सूर्याला जसा अंधकार ठाऊक नाहीं तसें क्षेत्रज्ञाला अज्ञात असें क्षेत्र नाहीं. हा सर्वान्तर्यामी देव संपूर्ण क्षेत्र जाणतो इतकेंच नव्हे तर भूतभविष्यवर्तमानकालीन यच्चयावत् क्षेत्रेंहि तो जाणतो. म्हणून गीतेंतच पुनश्च म्हटलें आहे:

**वेदाहं समतीतानि वर्तमानानि चार्जुन।**
**भविष्याणि च भूतानि मां तु वेद न कश्चन॥**

सारांश, तो देव समग्र आणि सर्व क्षेत्रांचा ज्ञाता आहे, प्रकाशक आहे. त्याच्या जाणिवेंतून एक कण आणि एक क्षणही निसटूं शकत नाहीं, किंवा त्यांची कुठली हालचालहि सुटूं शकत नाहीं. त्याच्यापासून लपून राहूं शकेल असें कांहीं मुळीं असूंच शकत नाहीं. असा तो देव, देव म्हणजे प्रकाशक आहे, सर्वज्ञ आहे. देव हेंच त्या देवाचें मूळ नाम आहें. खरें नाम आहे. इतर सर्व आडनांवें आहेत. ईश्वर, प्रभु, भगवान् इत्यादि, विष्णु शिव शक्ति इत्यादि, राम कृष्ण हरि इत्यादि. देव म्हणजे देवत्व हेंच त्याचें रूप आहे. प्रकाशन-शीलता हें त्याचें स्वरूप आहे. द्योतन हाच त्याचा गुण आहे आणि तेंच त्यांचें कर्म आहे. अशा प्रकारें नामरूप-गुणकर्मांनीं म्हणजे सर्वतोपरी तो देव 'देव' आहे.

## ३७६. श्री-गर्भ

बीजाच्या पोटांत मूलोपमूल-स्कन्ध-शाखा-प्रशाखा-पत्र-पुष्पसंपत्ति आणि शोभा सांठलेली असते. बीज अंकुरतें आणि त्यांतून आपल्या संपूर्ण वैभवानें वृक्ष मूर्तिमान् होतो. म्हणून बीज हें वृक्षगर्भ म्हणावयाचें. पूर्णिमेचा चंद्र आपल्या षोडश कलांनीं सुधा-सिंचन करून सर्वांना सुखवीत असतो. पण हा सारा कलाकलाप अमावस्येच्या मुकुलित चन्द्रकलिकेंत निभृत असतो. म्हणून त्या चंद्राला कलानिधि म्हणावयाचें, कला-गर्भ म्हणावयाचें. सहस्ररश्मि सूर्य सायंकाळीं आपल्या किरणांचा ताणा गुंडाळून घेतो आणि सकाळीं परत पसरतो. म्हणून तो दिनकर किरणगर्भ म्हणावयाचा. वृक्ष-विस्तार, कला-विस्तार, किरण-विस्तार बीज, चंद्र आणि सूर्य यांची श्रीच होय. त्यामुळें तेहि श्रीगर्भ म्हणावयाचे. परमात्मा हा तसा श्रीगर्भ आहे. विश्वाचा हा विराट विस्तार, हा कलाकलाप, हा प्रकाशपुंज त्या परमात्म्यापासून प्रकटला आहे. म्हणून तो श्री-गर्भ. विश्व हें वैचित्र्याचें आगर आहे. किंबहुना वैचित्र्य म्हणजेच हें विश्व होय. आणि या वैचित्र्यानें ही विश्वाची श्री विनटली आहे.

इन्द्रधनुष्यांतले विविध रंग आणि मोरपिसांतले रंगतरंग हें जें वैचित्र्य त्यानेंच त्यांची नयनमनोहर श्री निर्माण झालेली आहे. तसें ऋजु-कुटिल, शुभाशुभ, पापपुण्यादि विचित्र भावांनीं भरलेलें हें जग श्रीमय होय. त्यांतील ऋजु जितकें श्रीमय आहे तितकेंच कुटिल हि आहे. उपवनांतील सरळ सोट अशोक जितका श्रीमय तितकाच वनांतील कांकडातिकडा वटहि श्रीमय होय. ऋजुकुटिल रेखांनीं चित्रश्री निर्माण होते. तशी ही विश्वश्री आहे जी अव्यक्ताक्षर रूप परमात्मबिन्दूंतून प्रकटली आहे. म्हणून तो अव्यक्ताक्षर परमात्मा श्रीगर्भ होय.

## ३७७. परमेश्वर

ईश्वरभाव म्हणजे प्रजापालन होय. मर्त्यलोकीं राजा प्रजेचें पालन करतो, म्हणून त्याला मनुष्येश्वर म्हणतात. देवलोकीं जो देवांचें पालन करतो, त्याला देवेश्वर म्हणतात. पाताळांत जो असुरांचें पालन करतो, त्याला असुरेश्वर म्हणतात. परंतु या सर्वविध ईशांचें ईशन करणारा जो, तो परमेश्वर म्हणावयाचा. त्या परमेश्वराच्या आधिपत्याखालीं सर्व लहानमोठे, ईश्वर म्हणवणारे, आपआपल्या क्षेत्रांत ईशन करीत असतात. वस्तुतः ते अस्वतन्त्र आहेत. परमेश्वरी सूत्रानुसार त्यांचें ईशन चाललेलें असतें. परंतु ते हें ओळखत नाहींत आणि आम्हीच ईश्वर आहोंत असा अहंकार करतात. त्यांचा प्रलाप गाजत असतो–

**ईश्वरोऽहं अहं भोगी सिद्धोऽहं बलवान् सुखी।**
**आढ्योऽभिजनवान् अस्मि कोऽन्योऽस्ति सदृशो मया।।**

असा उद्दाम अहंकार ईश्वरी संकल्पाच्या भूमिकेवर आदळून दगडावर आपटलेल्या ढेकळाप्रमाणें भुगा होऊन जातो. परंतु जे ईश्वराचे भक्त आहेत ते ज्ञानी "**करिष्ये वचनं तव**" म्हणून नम्र होतात. ते असे प्रलपत नाहींत–

**असौ मया हतः शत्रुर् हनिष्ये चापरान् अपि,**

पण विनम्रपणें म्हणतात–

विश्वांत एक सर्वोपरि सत्ता कार्य करीत आहे. तिला ओळखून माणसानें निःसंग आणि निर्वैर होऊन जगावयाचें आहे. हें जो समजला आणि वर्तला तो कृतार्थ झाला, धन्य झाला. गुरुबोध आणि दासबोध, आचार्यांचा आणि दासांचा बोध, आहे–

**ते धन्या भुवि परमार्थ-निश्चितेहाः**
**शेषास्तु भ्रमनिलये परिभ्रमन्ति ।**

**--शंकराचार्य**

**समजले आणि वर्तले। ते चि भाग्यपुरुष झाले।**
**एर ते उरले। करंटे जन।।**

**--समर्थ**

## ३७८. करण

कोणतें हि कर्मानुष्ठान व्हायला जी कारकसामग्री आवश्यक असते तींत कर्ता कर्म करण आणि अधिकरण हें चतुष्टय गौण होय. प्रधान आणि पांचवें कारक दैव होय. चार बोटें आणि आंगठा मिळून हाताचा पंजा होतो. कार्य त्या पाचां मिळूनच होतें. पण त्यांत मुख्य वांटा आंगठ्याचा असतो. त्याच्या सहकाराशिवाय बाकीचीं चारी लंगडींच म्हणावीं लागतात. या कारक-पंचकांत हि तसेंच आहे. गीतेनें या कारांनाच कारक म्हटलें आहे. या कारकांची संख्या सोईप्रमाणें कमीज्यास्त होते. पण त्यांत एक दैव आणि दैवेतर असा द्विविध विभाग अवश्य असतो. दैव हें अपरिहार्य आणि अविभाज्य एक आहे. दैवेतरांत सोईप्रमाणें संख्येची वाढघट होऊं शकते. कांहीं पशु- पक्षांच्या पंज्यांत दोन, तीन, चार अशीं हि नखें बोटें आढळतात. पण त्यांत एक आंगठा आणि बोट वा बोटें असा विभाग मात्र असतोच असतो. इथें सहस्रानें करणं कारणं असा द्विविध विभाग केला आहे. अर्थात् करण म्हणजे सर्व सहायक सामग्री, दैवेतर सर्व

संभार, कर्ता कर्म करण आणि अधिकरण समजावयाचा. प्रत्यक्ष कर्म संपादन करणारें जरी हें चतुष्टय असलें तरी तें सहायक असल्यामुळें त्याला करण हें नाम योग्यच होय. तरवार शत्रूंचीं मुंडकीं उडविते खरी, पण नुसती ती उठून उडवूं शकत नाहीं. तें कर्तृत्व तरवारबहाद्दराचें असतें. म्हणूनच तो करविता होय. प्रधान होय. प्रधान आणि गौण असा विभाग केला तरी कर्मानुष्ठानाला दोन्ही सारखेच आवश्यक आहेत. म्हणून परमात्म्याला करण आणि कारण म्हणावयाचे.

## ३७९. कारण

कर्मनिष्पादक सामग्रींत ज्या पंचकाचा समावेश होतो त्यांत दैव हें पांचवें म्हणजे अन्तिम आहे. अर्थात् तें कलशरूप आहे. कळसाशिवाय सामग्री ही असामग्री होईल. तें समग्रतेचा एक अपरिहार्य अंश आहे एवढेंच नव्हे, तर तो अंश प्राणभूत आहे. एक पुरुषाकृति सर्वांग-संपन्न आहे पण तींत प्राण नाहीं, तर ती जितकी व्यर्थ म्हणावी लागेल, तितकीच कर्मसामग्री ही दैवाशिवाय व्यर्थ म्हणावी लागेल. हें जें मुख्य कारण, किंबहुना एकमेव कारण दैव त्याचें स्वरूप काय आहे? खरोखर तें अचिन्त्य आहे. पण ईश्वरी संकल्प त्याचें स्वरूप आहे, असें म्हणतां येईल. ईश्वरी संकल्पाचें अनुमान महापुरुषांना होतें, कारण, त्यांना समग्र दर्शन असतें. अल्पज्ञ जीव आपल्या फल्गु कामनांत गुंतलेला आणि गुंडाळलेला असतो. त्याला व्यापक दर्शन नसतें. सिंधु सागराला मिळायला निघालेली असते. पण बिंदु जर तद्‌विरोधी मनसुबे रचील, तर ते विफल होतील, हें उघड आहे. त्याचे अनुकूल मनसुबे सफल होतच असतात. प्रतिकूल विफल होत असतात. आणि या साफल्यावैफल्याच्या भोवऱ्यांत सांपडून बिन्दुस्थानीय जीव सुखदुःख भोगीत संसरत असतो. पण त्याच्या सुखदुःखाची पर्वा न करतां ईश्वरी संकल्प सिद्धीस जात राहतो. हा जो दुर्निवार, नव्हे अनिवार ईश्वरी संकल्प, तोच कारण होय. सर्व कांहीं त्याच्याच बळानें घडून येतें. त्याच्याच अनुकूलतेनें, त्याच्याच अनुग्रहानें सर्व कर्म फलोन्मुख होतें. आणि यथाकाल सफल होतें. त्याच्याच प्रतिकूलतेनें, त्याच्याच निग्रहानें कर्म रुद्ध आणि विफल होतें. म्हणून कर्तुं अकर्तुं अन्यथाकर्तुं समर्थ परमात्मा हाच सर्वकारण होय. देवाचा संकल्प म्हणून त्या सर्वकारणालाच दैव अशी हि संज्ञा दिली आहे. त्याचा संग्रह मी असा केला आहे:

**कर्म-कारणसामग्र्यां गरीयो दैवमुच्यते ।**
**ऐश्वरो मूलसंकल्पो दैवमित्युच्यते बुधैः।।**

## ३८०. कर्ता

''करणं, कारणं कर्ता, विकर्ता गहनो गुहः'' या श्लोकार्धांत, तीन जोड्या आल्या आहेत नामांच्या. पहिली 'करणं कारणं' आपण पाहिली. आता दुसरी 'कर्ता विकर्ता' पहावयाची. त्यानंतर 'गहनो गुहः' ही जोडी पाहूं.

कर्ता आणि विकर्ता म्हणजे काय? तर प्रत्येक वस्तूला षड्भाव होतात—जायते अस्ति वर्धते विपरिणमते अपक्षीयते म्रियते—ते देणारा. हे षड्भावच इथें कर्ता आणि विकर्ता या दोन पदांत संक्षिप्त झाले आहेत. कर्ता म्हणजे जन्म स्थिति वृद्धि देणारा आणि विकर्ता म्हणजे विपरिणाम अपक्षय आणि मृत्यु देणारा होय. त्रैगुण्याला अनुसरून ब्रह्मा-विष्णु-महेश असें त्रैत मानलें गेलें आहे. परंतु खरें पाहिलें, तर या त्रिविध कल्पनेची गरज नाहीं. जन्ममृत्यु, वृद्धिक्षय, स्थिति-गति असें द्वैधच तेवढें सर्वत्र दिसून येतें. आणि, म्हणून त्यांच्या अधिष्ठात्या देवांची हरिहराची तेवढी जगांत पूजा होते. ब्रह्मदेव अभावानेंच आढळतो. त्याची कुठेंच वास्तपुस्त नाहीं. विचारक प्रसंगानुसार विविध विचार मांडतो आणि ते सर्व युक्तिपूर्वक सिद्ध हि करतां येतात. त्यामुळें त्यांच्यांत विरोध कल्पिण्याची गरज नाहीं. कारण युक्तीनेंच त्यांची व्यवस्था झालेली असते. त्यांच्यांतील विरोधाचा परिहार हि

युक्तीनेंच होतो इथें द्वैध विचार मांडला आहे. आणि म्हणून परमात्मा हा कर्ता आणि विकर्ता म्हटला आहे. मुद्रणालयांत अक्षरांचे खिळे जुळविणारा प्रथम त्यांचा संग्रह करतो आणि परत तोच काम झाल्यावर त्यांचा विग्रह करतो. त्या प्रमाणें परमात्मा प्रथम कल्पारंभीं या विश्वाची संघटना करतो आणि नंतर कल्पान्तीं त्याची तोच विघटना करतो. म्हणून तो कर्ता जसा तसा विकर्ता म्हटला आहे. कल्प आणि कल्पान्त अशी एक जुळी आणि सूक्ष्म प्रक्रिया आहे. ती परस्परविनिमित होणारी आहे. म्हणजे एका दृष्टीनें जें घटन आहे, तेंच दुसऱ्या दृष्टीनें विघटन आहे आणि विघटन आहे तें घटन आहे. एकाच वेळीं नदी डोंगराला व मैदानाला झिजवीत असते आणि समुद्राला भरीत असते, तद्वत्. म्हणून परमात्मा हा कर्ता विकर्ता जोडीनें म्हटला आहे. तो नुसता कर्ता नाहीं, नुसता विकर्ता नाहीं, तर कर्ता विकर्ता आहे.

## ३८१. विकर्ता

विकार विक्रिया विकर्म हा सर्व विपूर्वक कृधातूचा गोतावळा आहे. आणि तो सर्व अनिष्ट अर्थाचा वाचक आहे. त्यांतच विकर्ता हा शब्द हि पडतो. परमात्मा कर्ता आहे, तो अकर्ता आहे असें म्हटलें तर तें समजण्यासारखें आहे. पण तो विकर्ता म्हणजे वाईट कर्म करणारा आहे असें कसें म्हणावयाचें? पण इथें तर जणूं तसें म्हटलें आहे. त्याचा अर्थ काय? पाप वा पुण्य करणारांचे व न करणारांचे चार प्रकार संभवतात:

१–केवळ पाप करणारा
२–केवळ पुण्य करणारा
३–पाप-पुण्य दोन्ही करणारा
४–पाप-पुण्य दोन्ही न करणारा

पैकीं केवळ पाप करणारा हा कल्प परमात्म्यालाच काय पण कोणालाच लागूं होऊं शकणार नाहीं. तेव्हां विकर्ता म्हणजे केवळ पाप करणारा असा अर्थ जर होऊं शकत नाहीं, तिथें जर असंभावना संभवते, तर त्याचा दुसरा काय अर्थ करावयाचा? त्याचा अर्थ करावयाचा विशिष्ट कर्म करणारा, विविच्यकर्ता, पापपुण्याचा विवेक करून पुण्य तेवढें करणारा, पाप मात्र वर्ज्य करणारा. यज्ञ दान तप हें पुण्यकर्म आहे, चित्तशुद्धिकारक आहे. चित्तशुद्धिकर तेवढीं कर्में तो करतो, म्हणून तो विकर्ता म्हणावयाचा. अर्थात् केवळ पुण्य करणारा ही जी दुसरी कोटी वर वर्णिली ती त्याला लागू होते. परमात्मा सर्वाधार असल्यामुळें पापपुण्य सर्व कांहीं तो करतो असें म्हटलें जाईल. हा झाला कर्ता म्हणजे सर्वकर्ता. तो निर्गुण असल्यामुळें तो कांहींच करीत नाहीं, असें म्हटलें जाईल. हा झाला केवळ अकर्ता आणि तो पुण्यापुण्य-विवेक करतो असें म्हटलें जाईल. म्हणून तो विकर्ता म्हणावयाचा. हाच अनुकरणीय आदर्श होय.

## ३८२. गहन

गहन आणि गुह ही जोडी परमात्म्याचें अप्रकाशत्व-प्रकाशित करणारी आहे. परमात्म्याचें स्वरूप, सामर्थ्य आणि चेष्टित म्हणजे करणी अगम्य आहे. कोणाला त्याचें यथार्थ आकलन होत नाहीं. करणं कारणं कर्ता विकर्ता या पदांच्या सांनिध्यामुळें गहन आणि गुह हीं पदें अनुषंगानें त्याच्या कर्मशक्तीचें स्वरूप, सामर्थ्य आणि फल निगूढ असल्याचें सूचित करतात. इथें सहजच गीतेचा पुढील श्लोक आठवतो:

**कर्मणो ह्यपि बोद्धव्यं बोद्धव्यं च विकर्मणः।**
**अकर्मणश्च बौद्धव्यं गहना कर्मणो गतिः॥**

कर्मतत्त्व गूढ आहे. कर्म कशाला म्हणावें, विकर्म कशाला म्हणावें आणि अकर्म कशाला म्हणावें?

गीतेप्रमाणेंच भागवतहि म्हणते–

'कर्माकर्मविकर्मेति वेदवादो न लौकिकः' कर्मअकर्म विकर्म हा लौकिक विषय नाहीं. तो वेदाचा विषय आहे. तो शास्त्रीय आहे. अर्थात् शास्त्रानेंच त्याचा उलगडा करायचा आहे. गीताशास्त्रानें त्याचा उलगडा केला आहे. तो थोडक्यांत असा: आत्म्याशीं कर्माचा कांहीं एक संबंध नाहीं. तो अकर्ता आहे. पण देहवंताला कर्म टाळणें अशक्य आहे. आणि कर्म हें सदोष असायचें च. सर्वस्वीं निर्दोष कर्म नाहीं. अर्थात् त्याचें बरें-वाईट फळ हि कर्त्याला मिळणारच. तेव्हां फलरूप कर्म-बंधांतून सुटका व्हायची कशी? त्याला उपाय हाच कीं कर्म करणार नाहीं हा वृथा अहंकार वा हट्ट सोडून द्यायचा. सदोष हि पण स्वभावप्राप्त म्हणजे स्वधर्मरूप कर्म करायचे. पण त्याच बरोबर यज्ञदानतपोरूप चित्तशुद्धिकर विकर्म विशेषें करून करायचें. आणि हीं दोन्ही कर्में मी कर्ता असा संग म्हणजे अभिमान न धरतां, त्यांच्याविषयीं राग-द्वेष न बाळगतां म्हणजे केवळ कर्तव्यबुद्धीनें आणि त्यांचें फळ आपल्याला मिळालें च पाहिजे असा फलाग्रह न धरतां निष्काम भावानें करावयाचीं. अशा युक्तीनें कर्में केल्यास यथाकाळीं अकर्मसिद्धि होते. अर्थात् आत्म्याचें अकर्तृ अभोक्तृ स्वरूप प्रकट होतें; आणि मनुष्य कर्म-बंधनांतून मुक्त होऊन स्वरूपीं प्रतिष्ठित होतो. हा सगळा विषय गहन नाहीं, असें कोण म्हणेल? परमात्म्याचें हें स्वरूप म्हणूनच गहन म्हटलें आहे.

### ३८३. गुह

गुह म्हणजे गुहा-प्रविष्ट, गुह्य, गूढ. परमात्मा हा सर्वांच्या अन्तरांत लपलेला आहे. तो अन्तरतर आहे. केळीचीं सोपटें सोलून सोलून निःशेष काढून टाकलीं म्हणजे तिचा गाभा हातीं लागतो. तो त्या सोपटांत लपलेला असतो. म्हणून तो जसा गुह्य तसा परमात्मा हा अन्नमय, प्राणमय, मनोमय, विज्ञानमय आणि आनन्दमय म्हणवणाऱ्या पंच कोशांच्या आंत दडलेला आहे, लपलेला आहे, म्हणून तो गुह म्हणजे गुह्य म्हणावयाचा. मुंजतृणाच्या कोशांतून जशी मुंजाची शलाका वा इषिका काढावयाची असते, तसा तो गुह म्हणजे गूढ आत्मा या पंचकोशांतून विचारानें बाहेर काढावयाचा आहे. या विचारणेलाच अध्यात्मविद्या म्हणतात. जीवाला 'स्वे महिम्नि' प्रतिष्ठित करणारी ही विद्या आहे. म्हणून ती सर्व विद्यांत थोर म्हटली आहे, 'अध्यात्मविद्या विद्यानाम्'. केळीच्या सोपटाच्या आंत जसें सोपट असतें त्याप्रमाणें हे कोश आहेत आणि त्यांच्या ह्या मालिकेला गुहा अशी संज्ञा आहे. ह्या गुहेंत तो अंतरतर आत्मा लपलेला आहे. म्हणून तो गुह म्हणजे गुह्य होय.

**देहाद् अभ्यन्तरं प्राणः प्राणाद् अभ्यन्तरं मनः।**
**ततः कर्ता ततो भोक्ता गुहा सेयं परंपरा॥**

पंचकोष-विलक्षण, अवस्थात्रय-साक्षी, सच्चिदानंद-स्वरूप तो परमात्मा गुह होय आणि त्याचें ज्ञान तें गुप्त. तेंच परमगुह्य म्हणून राजगुह्य म्हटलें आहे. गुह्यालाच पुढें 'गुह्यो गभीरो गहनो गुप्तः' म्हणून अनेकशः आळविलें आहे. जणूं त्याची गूढता एका पदानें पुरेशी प्रकट करतां येत नाहीं, इतका तो गुह म्हणजे गूढ आहे. परमात्मा झांकलेला म्हणून गुह म्हणावयाचा, तसा तो झांकणारा म्हणून, गूहति इति, गुह म्हणतां येईल. कोणाला झांकलें आहे त्यानें? जगाला? नाहीं, स्वतःला. जगद्रूपानें प्रकटून तो लपला आहे. अलंकाररूपानें प्रकटून सुवर्ण रूपानें तो लपला आहे, सुवर्णाला त्यानें लपविलें आहे. म्हणूनहि तो गुह. गुह म्हणजे देव-सेनानी स्कंद. तो एक परमात्म्याची विभूति आहे. 'सेनानीनां अहं स्कंदः' कामक्रोधादि षड् रिपूंचें स्कंदन करतो म्हणून स्कंद. त्या शत्रूंची त्याच्यापर्यंत पोंच होत नाहीं म्हणून गुह.

### ३८४. व्यवसाय

व्यवसीयते अस्मिन् इति व्यवसायः। ज्याच्या स्वरूपाबाबत व्यवसाय म्हणजे निश्चय केला जातो तो

परमात्मा व्यवसायरूप होय. गुरुमुखानें शास्त्रश्रवण करून आत्मचिन्तनानें हा 'अहं ब्रह्मास्मि'-रूप व्यवसाय केला जातो. या व्यवसायान्त क्रियेलाच आत्मानात्मविचार असें म्हणतात. आत्मा म्हणजे स्थूल, सूक्ष्म आणि कारण संज्ञा धारण करणाऱ्या तीन शरीरांहून विलक्षण, अन्नमय, प्राणमय, मनोमय, विज्ञानमय आणि आनंदमय या पंच कोशांहून वेगळा आणि जागृति स्वप्न सुषुप्ति या तीन अवस्थांचा साक्षी असलेला सच्-चिद्-आनंद-स्वरूप परम अर्थ होय. अनात्मा म्हणजे असद् अचिद् अनानन्दरूप म्हणजेच अनृत-जड-दु:खात्मक असें व्यष्टिसमष्टि शरीरत्रय होय. संशय, असंभावना आणि विपरीत भावना या त्रिदोषांपासून मुक्त असा मी ब्रह्म आहें हा निश्चय ज्याचा झाला तो व्यवसायी पुरुष जीवन्मुक्त ज्ञानी होय. देहपातोत्तर तो ब्रह्मज्ञ नव्हे तर ब्रह्मच होतो. ज्यांचा असा निश्चय होत नाहीं ते अव्यवसायी होत. कोऽहं याचा निर्णयात्मक बोध त्यांना कधींच होत नाहीं आणि ते कधीं याचा तर कधीं त्याचा अभिमान बाळगून अपार संसारांत भ्रमण करीत राहतात. त्यांचें हें भ्रमण परमात्म-कृपेनें त्यांना सद्गुरु भेटून त्यांचें अज्ञान फिटेपर्यंत आणि व्यवसाय भेटेपर्यंत चालूच राहतें. ह्यालाच अनुलक्षून गीतेंत 'व्यवसायात्मिका बुद्धिर् एकेह कुरुनन्दन। बहुशाखा ह्यनन्ताश्च बुद्धयोऽ व्यवसायिनाम्।। इत्यादि प्रकरण वेदवादी अव्यवसायी आणि स्थितप्रज्ञ व्यवसायी म्हणून चित्रित करणारें, आलें आहे.

### ३८५. व्यवस्थान

व्यवस्थाप्यते अनेन इति व्यवस्थान: । सर्वांना परमात्म्यानें व्यवस्था लावून दिली आहे. म्हणून तो व्यवस्थान म्हणावयाचा. कशी काय लावून दिली आहे त्यानें ही व्यवस्था? गुण-कर्म-विभागश:. प्रत्येकाला गुण आणि तदनुसार कर्मे वांटून देऊन ही व्यवस्था लावण्यांत आली आहे. जी व्यवस्था बाहेरून लादण्यांत येते, ती झुगारून देण्याची प्रवृत्ति प्रत्येक जीवांत असते. अर्थात् अशी व्यवस्था ही व्यवस्था न म्हटली जातां जुलूम म्हटली जाते. तो बलात्कार म्हटला जातो. तो टिकूं शकत नाहीं. कारण, 'स्वभाववश हीं भूतें बलात्कार निरर्थक'. जें स्वाभाविक असतें तेंच टिकतें. म्हणून स्वाभाविक आचरणाला व्यवस्था म्हणावयाचें. चातुर्वर्ण्य या तत्त्वावर आधारलेलें आहे म्हणून ती व्यवस्था आहे. अमक्या एका धंद्यांत ज्यास्त पैसा मिळतो म्हणून आपला स्वाभाविक धंदा सोडून म्हणजेच स्वधर्म सोडून जो दुसऱ्या अस्वाभाविक, लोभदृष्ट धंद्याकडे वळतो तो परधर्म करतो. आणि 'परधर्मो भयावह:' परधर्माचरणापासून भय म्हणजे बाधा निर्माण होते. अर्थात् व्यक्तीचें आणिं समाजाचें जीवन सुरळीत चालत नाहीं.

One man's food is another man's poison. या इंग्रजी म्हणीचा हि असाच आशय आहे. ज्यानें त्यानें स्वभावानुसार वर्तावें. हें स्वभाव-नियतधर्माचें आचरण सोडून माणूस भटकतो ह्याचें कारण इंद्रियांचा स्वभाव होय. माणसाचें हित निराळें, इंद्रियांचें प्रिय निराळें. असा विवेक करून माणसानें सदैव स्वहितच पहावें. इन्द्रियांच्या आवडीला वश होऊं नये, बळि पडूं नये. ह्याच विवेकपूत आचरणामुळें धर्माची स्थापना होते. म्हणून परमात्मा विवेकदृष्टि देऊन धर्मसंस्थापना करीत असतो. जो हा विवेक सोडून वागतो तो दु:ख पावतो. धर्माचरणानें सुखी होतो. हेंच व्यवस्थापन. म्हणून परमात्मा हा व्यवस्थान म्हणावयाचा.

### ३८६. संस्थान

'व्यवसायो व्यवस्थान: संस्थान:' हीं क्रमिक पदें एक विचार सूचित करतात. प्रथम एखाद्या कार्याचा

निश्चय होतो. त्यानंतर त्या कार्याच्या साधनांची व्यवस्था करावी लागते आणि शेवटीं तें कार्य संपादून समाप्त केलें जातें. अथ नें आरंभ आणि इति नें समाप्ति होते. संस्थान हें पद तो इत्यर्थ सूचित करणारें आहे. परमात्मा या विश्वकर्माचा व्यवसाय व्यवस्थान तसा संस्थान आहे. आज आपण संस्था संस्थान या पदांचा कांहीं वेगळाच आशय समजतों. परंतु त्या संस्थेशीं वा संस्थानाशीं या परमात्मवाचक संस्थान पदाचा संबंध नाहीं. अथवा असें म्हणूं या कीं, जगांत कायम टिकणारी अशी एकच संस्था आहे. आणि ती म्हणजे स्मशान. सर्वांची परिसमाप्ति त्या संस्थेंत वा संस्थानांत होते. परमात्मा या समस्त संसाराला संस्था देतो, आपल्या ठाईं विराम देतो म्हणून तो संस्थान म्हणावयाचा. जोंधळ्याच्या दाण्यापासून जोंधळ्याचें रोप अंकुरतें आणि वाढतें. हें त्याचें प्रस्थान होय. कणीस धरलें आणि भरलें म्हणजे त्याची वाढ खुंटते. ही कुंठा म्हणजेच संस्थान होय. परमात्मा या विश्वसृष्टीचें साफल्य आहे. आत्मदर्शनावधिच सर्व साधना चालतात. आत्मदर्शन झालें कीं त्या सफल होऊन कुंठित होतात. म्हणून परमात्मा हा या संसारवृक्षाचा फलभूत होत्साता संस्थान म्हणजे संस्था, परिणति, परिसमाप्ति देणारा म्हटला आहे. गीतेंत यालाच उद्देशून 'सर्वं कर्माखिलं पार्थ ज्ञाने परिसमाप्यते' म्हटलें आहे. इथें निःशेष सर्व कर्म म्हणजे वर्णाश्रमधर्मादि वा अन्य यच्चयावत् हालचाल आणि वेदानुवचन यज्ञ दान तप इत्यादि समस्त साधना अर्थात् सर्वविध प्रस्थान ज्ञानांत म्हणजे आत्मज्ञानांत परिसमाप्त होतें म्हणजे सफल होऊन संस्थित होतें, असा सिद्धांत प्रतिपादिला आहे. अशा प्रकारें कर्ममात्राला आणि विकर्ममात्राला अकर्मांत परिणत करणारा तो परमात्मा संस्थान होय.

### ३८७. स्थानद

मागील संस्थान पदानें परमात्मा हा सर्व संसाराला कुंठित करतो म्हणजे आपल्या ठाईं कशालाच वाव देत नाहीं म्हटलें तर स्थानद हें पद तद्विरुद्ध अर्थानें तो सर्वाला म्हणजे कशाला हि स्थान देणारा आहे, वाव देणारा आहे, असें म्हणत आहे. मंद अंधारांत एक दोरी पडली आहे. ती दिसते आहे. पण स्वच्छ दिसत नाहीं. त्यामुळें कोणाला तो आर (सर्प) भासतो, कोणाला तो हार. वस्तुतः दोरीच्या ठाईं ना हार आहे, ना आर. म्हणजे परमार्थतः दोरी हाराला वा आराला, अर्थात् स्वेतर कशालाच, वाव देत नाहीं. आणि तरी ती अन्यथाज्ञानाला, अर्थात् हाराला नि आराला, आधारभूत झालेली आहे. म्हणजे ती वाटेल त्या आभासाला वाव देत आहे. आभास म्हणणें हें परमार्थदृष्ट्या झालें. पण व्यवहारतः तर तिथें पाहणाराला सर्पच दिसतो आहे आणि त्यामुळें भयानें त्याची प्रत्यक्ष गाळण उडत आहे, अथवा हाराच्या प्रत्यक्ष दर्शनानें लोभ सुटत आहे आणि त्यामुळें हि तो तळमळतो आहे. उभयतः तो अधीर होत आहे. म्हणजे हा परमार्थतः आभास असला तरी व्यवहारतः तें सत्यच होय. म्हणून परमात्मा हा सर्वांना स्थान देतो, कशालाच तिथें मतजाव नाहीं असें म्हणावयाचें. मतजाव जर तिथें कुणाला असेल तर तो फक्त मतजावालाच. तो परमात्मा निषेधाचा निषेध अशेष आहे. म्हणून त्याला स्थानद म्हटलें ते ठीकच म्हटलें आहे. सत्याला तिथें स्थान आहेच. कारण स्वतःच तो सद्रूप आहे. पण जें असत् आहे त्याला हि तिथें स्थान आहे. कारण तो सर्वाधार आहे. असत् निराधार राहूं शकत नाहीं. सापाच्या आभासाला हि दोरीचा आधार हवाच. सत् स्वाधार आहे, तर असत् सदाधार आहे, निराधार मुळीं कांहीं असूंच शकत नाहीं. म्हणून परमात्मा हा स्थानद होय. तिथें सत्, असत्, सदसत् आणि नसत् नासत् सर्वांना स्थान आहे.

### ३८८. ध्रुव

ध्रुव म्हणजे अविचल, निष्कंप, सुस्थिर. जग सर्व भ्रमत आहे. त्यांत स्थिर असें कांहींच दिसत नाहीं.

सर्व जंगम आहे, स्थावर कांहींच नाहीं. सर्व स्थावरांत म्हणजे स्थिर भक्कम अशा पर्वतांत हिमालय हा सर्वांत मोठा स्थावर म्हटला आहे. पण खरोखर तो काय स्थिर आहे? त्याचे कडे कोसळत आहेत, नद्या त्याला सारख्या कापीत आहेत. तो प्रतिक्षणीं घटत बढत आहे. आज आम्हांला तो जिथें दिसतो तिथें तो एके काळीं नव्हता आणि कालांतरानें तो तिथून नाहींसा होणार हें निश्चित. अशा या क्षणाक्षणानें व कणाकणानें बदलणाऱ्या ढिगाऱ्याला स्थावर कसें म्हणावयाचें? जें जें संहत आहे, तें तें विहत होणार; संघटित आहे, तें तें विघटित होणार. त्रिगुण आणि पंचभूतें स्वत: संहत आहेत, मग त्यांचें कार्य हें जग तसें आहे त्यांत काय नवल? आणि कारणाबरोबर तें कार्य हि विघटित व विहत झाल्यास नवल काय? सारांश, 'यद् दृष्टं तन् नष्टम्'. हें सारें जग नश्वर आहे, अनित्य आहे, अध्रुव आहे. त्याला मुळीं स्थितिच नाहीं. म्हणूनच तर त्याला जगत् म्हणजे सतत गतिशील, नित्य परिवर्तनशील म्हणावयाचें. जाग्रदवस्थेंतील जग स्वप्नावस्थेंत नाहींसें होतें आणि सुषुप्तावस्थेंत हीं जाग्रत्स्वप्न दोन्ही जगें नाहींशीं होतात. ती सुषुप्तावस्थाहि स्वप्नजागृतींत नाहींशी होते. अशा या अस्थिरतेच्या महासागराच्या तळाशीं जो शान्ताकार पहुडलेला आहे तो तुरीय ध्रुव होय. ''जगें येवोत जावोत तो अभंग जसा तसा'' दोरीवर हाराचे वा आराचे आभास होतात, जातात, दोरी आपली जशीची तशी राहते. तिला त्या आभासांच्या उद्भव-स्थिति-लोपांचा पत्ता हि असत नाहीं. त्याप्रमाणें संसाराच्या उद्भवस्थितिलयांचा ज्याला स्पर्श हि होत नाहीं तें जें कूटस्थ परमात्मतत्त्व तेंच म्हणावयाचें ध्रुव.

## ३८९. परर्द्धि

परा ऋद्धि म्हणजे परर्द्धि होय. वृक्ष बीजांतून अंकुरतो. त्याला मूलोपमूलें फुटतात. स्कंध शाखा प्रशाखा पत्र पुष्प फळ यांनीं तो समृद्ध होतो. त्याची मुळें शेषाच्या टाळूला व शेंडा आकाशाला भेदून जातो. ही सगळी त्याची महर्द्धि वा समृद्धि होय. पण तिला परर्द्धि म्हणतां यावयाचें नाहीं. कारण ह्या बाह्य ऋद्धीचा ह्रास होतो व लोप हि होतो. जिचा कधीं ह्रास वा लोप होऊं शकत नाहीं तीच अव्यय अलय बीजभूत पराऋद्धि म्हणावयाची. अशी परा ऋद्धि म्हणजे या विश्वाचें आदिकारण ब्रह्म होय, परब्रह्म होय. विश्वाचा आकार आला गेला तरी तें कायमच राहतें. तें विश्वाकारानें वाढत नाहीं किंवा त्याच्या लोपानें घटत नाहीं. ती त्याची अन्यनिरपेक्ष स्वायत्त ऋद्धि सदैव पूर्णच असते. म्हणून ती परा ऋद्धि म्हणावयाची. एखादा राजा असतो. त्याला सर्व सुखें असतात, पण संतान नसतें. त्यामुळें त्याची समस्त साम्राज्यलक्ष्मी त्याला तुच्छ भासते. कारण तिला पुढें वारस नाहीं. तात्पर्य काय कीं लक्ष्मीहून लक्ष्मीचा स्वामी हा श्रेष्ठ होय. आणि खरोखर तीच परर्द्धि म्हणावयाची. ज्या संपत्तिजाताला आपण ऋद्धि म्हणतों ती सर्व बाह्य आहे. आत्मभोग्य अनात्म आहे. ती स्वेच्छया अंगीकरणारा वा तिचा स्वेच्छया त्याग करणारा जो स्वतंत्र अन्तरात्मा तोच खरी ऋद्धि होय. आणि त्यालाच परर्द्धि म्हणावयाचें. ही ऋद्धि कोणी काढून घेऊं शकत नाहीं. कारण, ती आमचें निजस्व आहे. आणि जें निजस्व तीच परर्द्धि. याच परर्द्धीला लक्षून ज्ञानदेव म्हणतात:

अमोलिक रत्न सांपडलें तुज ।
कां रे ब्रह्मबीज नोळखसी ।
न कळे न मिळे न भिये चोरा ।
ते वस्तु चतुरा सेविजेसु ।।

## ३९०. परमस्पष्ट

ज्याचें दर्शन स्वच्छ होतें त्याला परमस्पष्ट म्हणावयाचें. आणि स्वच्छ दर्शन कुणाचें होतें? तर जी वस्तु प्रत्यक्ष दिसते तिचें. डोळ्यांसमोर घड्याळ

धरलें तर त्याचे आंकडे स्पष्ट दिसतात. पण घड्याळाचा काच जर मलिन असला वा रंगीत असला तर ते आंकडे तितकेसे स्पष्ट दिसत नाहींत. कारण आंकडे प्रत्यक्ष दिसत नाहींत, मलिन काचाचा अंतराय होतो. काचाचा वा प्लास्टिकचा अंतराय पारदर्शक वा अपारदर्शक आहे, पण इतर अंतराय आल्यास ते आकडे मुळींच दिसणार नाहींत. कारण ते अन्तराय अपारदर्शक असतील. तात्पर्य अंतरायामुळें स्पष्ट दर्शन होत नाहीं. जगांतील सर्व विषयांचें (म्हणजे पंच विषयांचें) ज्ञान आपल्या इंद्रियांच्या द्वारा म्हणजे मध्यस्थीनेंच होतें. हीं इन्द्रियें शाबूत असलीं तर ज्ञान स्पष्ट होतें. तीं अधू असलीं तर उपकरणांच्या सहाय्यानें तें ज्ञान होऊं शकतें. परंतु तें अस्पष्ट न म्हटलें तरी आस्पष्टच म्हणावें लागेल. याचें कारण करण आणि उपकरण यांचा अंतराय आणि दोषास्पद अंतराय होय. परंतु जें ज्ञान मुळीं विषयेंद्रियसंनिकर्ष-जनित नाहींच त्याला काय म्हणावयाचें? त्याला विषयेंद्रियसंनिकर्षजनित ज्ञानाप्रमाणें केवळ स्पष्ट म्हणणें पुरेसें होणार नाहीं. म्हणून त्या अतींद्रिय ज्ञानाला परमस्पष्ट म्हटलें आहे. विषयज्ञान हें ज्ञेय-ज्ञातृ-ज्ञानक्रिया अशा भेदानें होत असतें. आत्मज्ञानांत तसा भेद नाहीं आणि क्रिया नाहीं. जिथें भेद व क्रिया संभवते तिथें स्थल-कालात्मक सांतरायता ठेवलेलीच असणार. त्यामुळें तें किती हि स्पष्ट म्हटलें तरी निरन्तराय व निष्क्रिय ज्ञानासारखें स्पष्ट असूं शकणार नाहीं. म्हणून आत्मज्ञान म्हणजे आत्मतत्त्व हें परमस्पष्ट म्हणावयाचें. परमः स्पष्टः अशीं पदें हि इथें संभवतात. तशीं कल्पिल्यास परम म्हणजे परा मा यस्य सः परमः अर्थात् ज्याची मा म्हणजे लक्ष्मी शोभा परा म्हणजे अलौकिक आहे, तो परम अथवा तद्वाच्यत्वात् परमः तत्पदवाच्य म्हणून परम म्हणावयाचा आणि स्पष्ट म्हणजे प्रत्येकाच्या हृदयांत संविद्रूपानें अहमिति संस्फुरणारा स्वतःप्रमाण म्हणून स्पष्ट म्हणावयाचा.

## ३९१. तुष्ट

''सर्वं परवशं दुःखं सर्वं आत्मवशं सुखम्'' अशी आहे सुखदुःखाची व्याख्या. परमात्मा हा कोणत्याहि कारणासाठीं पराधीन नसल्यामुळें आणि सर्वस्वीं स्वायत्त असल्यामुळें तो तुष्ट म्हणजे 'आत्मन्येव आत्मना तुष्ट' आहे. जीवाला आपल्या सुखासाठीं बाह्य जगावर अवलंबून रहावें लागतें. म्हणजे त्याचें सुख पराधीन आहे. आणि पराधीनतेचेंच दुसरें नांव दुःख असल्यामुळें, तो उद्योग करतो सुखासाठीं आणि त्याला मिळतें मात्र दुःख, असा विपर्यास आणि उपहास होतो. परमात्मा हा सर्वस्वीं स्वतन्त्र असल्यामुळें तो आत्मकाम, आप्तकाम, पूर्णकाम म्हटला जाईल. म्हणून तोच तुष्ट. आणि जे हें परमात्मस्वरूप ओळखतात ते आत्मधन द्विज संतोषवृत्ति म्हटले जातात. ते यदृच्छालाभसंतुष्ट होत. अनिष्ट-हानि आणि इष्टलाभ झाला म्हणजे जीवाला तुष्टि होत असते. परंतु शरीर आहे तोंवर इष्टानिष्टोपपत्ति होतच रहातें. म्हणून संतोष ही विदेह अवधूतांची वृत्ति म्हणावयाची. देहाभिमान्यांना तिची प्राप्ति असंभवच. जे केवळ आत्मनिष्ठ होऊन राहिले त्यांना ती साधावयाची. आत्मज्ञान आणि तितिक्षा हाच तिच्या प्राप्तीचा मार्ग. याचेंच नांव अस्पर्शयोग होय. गीतेंत आरंभींच तो आला आहे :-

**मात्रास्पर्शास्तु कौन्तेय शीतोष्णसुखदुःखदाः।**
**आगमापायिनोऽनित्यास् तांस् तितिक्षस्व भारत।।**
**यं हि न व्यथयन्त्येते पुरुषं पुरुषर्षभ।**
**समदुःखसुखं धीरं सोऽमृतत्वाय कल्पते।।**

देहीचा अस्पर्शयोग म्हणजे तत्त्वज्ञानपूर्वक तितिक्षा आणि विदेहीचा अस्पर्शयोग म्हणजे देहयोगासंभवत्व होय. स्थितप्रज्ञ हा पहिल्याचें उदाहरण होय. परमात्मा हा दुसऱ्याचें. त्यालाच ब्रह्मनिर्वाण म्हणावयाचें. तिथेंच तुष्टि, तिथेंच संतुष्टि. अभाग्याचेंहि भाग्य बनविणारा स्पर्श-मणि म्हणजे संतोष होय.

### ३९२. पुष्ट

तुष्टि आंतरिक भाव आहे, पुष्टि बाह्य. परंतु परमात्म्याबाबत अंतर्बाह्य एकच होऊन जातात. अर्थात् पुष्टि हि आंतरिकच म्हणावयाची. तिचा परिणाम बाह्यत: प्रकट होतो इतकेंच. परंतु परमात्म्याच्या बाबतींत तो हि बाह्यत: प्रकट होणारा नाहीं. कारण परमात्मा गुणातीत आहे. गुणांत चयापचय होत राहतो. म्हणून गुणात्म संसाराचें पुष्टत्वहि अपुष्टच म्हणावें लागतें. परंतु परमात्मा हा गुणातीत असल्यामुळें तिथें गुणजन्य चयापचय संभवत नाहीं. आणि म्हणून तो सदैव चयापचयशून्य अर्थात् स्वरूपस्थितिपूर्ण असतो. हें जें परमात्म्याचें सदा एकरसत्व त्या गुणानेंच तो पुष्ट म्हणावयाचा. ज्यांना बाहेरून पोषण मिळावें लागतें ते पराधीन-पोषण अपुष्ट असूं शकतात किंबहुना राहतातच. परंतु जो स्वरसपुष्ट आहे, त्याला केव्हां हि पोषणाभाव होऊं शकत नसल्यामुळें तो पुष्टच असावयाचा. परमात्मा हा तसा पुष्ट आहे. तो स्वयंपूर्ण असल्यामुळें पुष्ट आहे.

तुष्ट आणि पुष्ट हीं जोडपदेंच समजावयाचीं. आंतरिक तोषाशिवाय नुसती बाहेरील पुष्टि हि टिकत नाहीं. नुसती आंतरिक तुष्टि तदनुकूल बाह्य पुष्टीशिवाय प्रकट होत नाहीं. अर्थात् आंतरिक तुष्टि बाह्य पुष्टीला हि जन्म देतेच देते. अशीं परस्पर-विनिमित होणारीं हीं तत्त्वें आहेत. एकाची उणीव दुसऱ्याची हि उणीव सूचित करते. एकाची सत्ता दुसऱ्याची हि सत्ता प्रकट करते. अर्थात् दोन्ही परस्परपूरक आहेत. तथापि त्यांच्यांत कार्यकारण-भाव आहे. तुष्टि हें कारण आहे, पुष्टि कार्य. आणि म्हणूनच आधीं तुष्ट पद आलें आहे आणि मागाहून पुष्ट पद. पूर्णत्वाचीं तीं गमकें आहेत.

### ३९३. शुभेक्षण

तुष्ट पुष्ट शुभेक्षण हा क्रम साभिप्राय दिसतो. जो जीव असंतुष्ट आणि बुभुक्षित असतो तो जगाकडे शुभदृष्टीनें पाहत नाहीं. तो आर्त जीव जगाला आणि जगदीश्वराला बोल लावतो. जगांत न्याय नाहीं, ईश्वर झोपला आहे, असे तो कटु उद्गार काढतो. हा वस्तुत: जगावर व जगदीश्वरावर आरोप असतो. तो आर्तप्रलाप असतो. उलट जो तुष्ट आणि पुष्ट असतो त्याचीच दृष्टि जगाकडे पाहण्याची शुभ असते, उदार असते. जग किती भलें आहे, परमात्मा किती दयाळु आहे, असें तो म्हणतो. सारांश, पुरुष आपल्या रंगानें जगाला रंगवीत असतो. परमात्मा हा सदैव तुष्ट आणि पुष्ट असल्यामुळें तों जगाकडे शुभेक्षण म्हणावयाचा. जीव मी मर्त्य आहें, दुःखी आहें अशी अशुभ भावना करतो, म्हणून त्याला जग तसेंच अशुभ प्रतीत होतें. परमात्मा मी सच्चिदानन्द आहें अशी शुभ भावना करतो आणि त्याला सारें जग तसेंच दिसतें. जग कसें आहे तें जगाला कांहीं ठाऊक नाहीं. मी पाहीन तसें तें आहे. परमात्मा जगाकडे तत्त्वदृष्टीनें पाहतो. त्याचा निर्णय गीतेच्या शब्दांत असा आहे:—

**नासतो विद्यते भावो नाभावो विद्यते सत:।**
**उभयोरपि दृष्टोऽन्तस् त्वनयोस् तत्त्व-दर्शिभि:।।**

आत्मभिन्न जगांत कांहीं नाहींच आणि तें आत्मतत्त्व आहे सच्चिदानन्दस्वरूप. अशी परमात्म्याची दृष्टि असल्यामुळें तो शुभ-दृष्टि म्हणावयाचा. त्याच्या दृष्टीला अनात्म वस्तूचा मुळीं स्पर्शच नाहीं. रज्जूसर्पाला मनुष्य पाहूं शकेल, पण स्वत: रज्जूच त्या रज्जूसर्पाला कशी पाहणार? ती तर केवळ रज्जूलाच म्हणजे स्वत:लाच पाहणार. परमात्मा हा तसा स्वदृक् आहे. म्हणून शुभेक्षण. 'शुभं ईक्षते इति शुभेक्षण:' असा कर्तरि ल्यूट् घेऊन तत्पुरुष होऊं शकेल. अथवा 'शुभं ईक्षणं दर्शनं यस्य स: शुभेक्षण:' असा बहुव्रीहि हि होऊं शकेल. परमात्म्याचें दर्शन सर्व शुभ म्हणजे शुभंकर आहे. तें मोक्षार्थीला मोक्ष व भोगार्थीला भोग देतें. अभिलषित- चिन्तामणिच तें आहे.

## ३९४. राम

राम हें गौण म्हणजे गुणवाचक नाम आहे, व्यक्तिवाचक नाहीं. म्हणून राम म्हणजे ज्याच्या ठाईं योगी रमतात तो परमात्मा होय. त्या परमात्म्याचा अवतार जो प्रभु रामचंद्र तो हि पर्यायानें रामच. त्याच्या ठाईं सर्व प्रजा रमली होती. प्रत्येक जीव त्याच्या ठाईं रमला आहे तो अन्तर्यामी परमात्मा राम होय. जो ज्याच्या ठाईं रमला आहे तो त्याचा राम होय आणि हा राम दुसरा तिसरा कोणी नसून ज्याचा त्याचा निजात्माच होय. म्हणून तो आत्मारामच इथें राम म्हटला आहे. योग्यांचा नि भोग्यांचा राम हाच. दोघेहि त्यांतच रमत असतात. दोघांनाहि त्याचें यथार्थ आकलन होतच नाहीं. अज्ञानी भोगी मी देहगेहावर पुत्रकलत्रावर प्रेम करीत आहे असें समजतो, वस्तुत: तें त्याचें सारें प्रेम आत्मप्रेम असतें. आत्मसंबंधामुळें त्याला तें प्रिय होत असतें. 'आत्मनस्तु कामाय सर्वं प्रियं भवति'. पण हें तो ओळखत नाहीं. ज्ञानी योगी हि इयत्तया त्याला जाणत नाहीं. तो विगलित-वेद्यान्तर होत्साता तल्लीन होत असतो, स्वलीन होत असतो.

'राजा प्रकृतिरंजनात्' जो आपल्या समस्त प्रजांचें रंजन करतो तो राजा. राजा शब्दाची अशी निरुक्ति आहे. असा राजा कोण आहे जो आपल्या एकूण एक प्रजाजनाचें रंजन करतो? तो एकमात्र आत्मारामच होय. आणि म्हणून आम्ही जेव्हां 'राजा राम राम राम' म्हणतों तेव्हां त्या आत्मारामाचें भजन करीत असतों, कोणा दशरथ-पुत्राचें नव्हे. दशरथपुत्रहि राम म्हटला गेला वा राजा म्हटला गेला तो हि त्या आत्मारामाचा अंशभूत म्हणून वा प्रतिनिधि म्हणूनच होय. म्हणून जगांत राम केवळ एकच आहे आणि राजाहि तो एक रामच आहे. तो आत्माराम सर्वांच्या हृदयांत रमला आहे आणि आपल्या रंजकतेनें सर्वांना रमवीत आहे, भ्रमवीत आहे.

**ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति।**
**भ्रामयन् सर्वभूतानि यन्त्रारूढानि मायया॥**

## ३९५. विराम

विष्णुसहस्रांत एककें द्विकें त्रिकें आलीं आहेत. इथें 'रामो विरामः' हें एक द्विक आहे. द्विक म्हणजे परस्परपूरक जोडी. परमात्मा नुसता राम नाहीं तर त्याच बरोबर तो विरामहि आहे आणि नुसता विराम नाहीं तर त्या सोबतच रामहि आहे. रमण-विरमण हीं एकाच क्रियेचीं दोन रूपें आहेत. दोन गति आहेत त्या. चंद्रमा शुक्ल पक्षांत एकएका कलेनें उमलत जातो आणि तोच कृष्णपक्षांत एकएका कलेनें मिटत जातो. त्याचें हें उन्मीलन-निमीलन सतत चालूंच असते. त्याप्रमाणें सृष्टिरूपानें परमात्म्याचें रमण-विरमण अखंड चाललें आहे. कल्पारंभीं तो रमूं लागतो. एकाचा अनेक होऊन ही सर्वाश्चर्यमय अनन्त सृष्टि रचतो. आणि कल्पान्तीं ती परत ऊर्णनाभाप्रमाणें गिळून घेतो, विरमतो. 'एकाकी न रमते' एकटेपण बरें वाटत नाहीं, म्हणून तो अनेक होतो, विविध सृष्टिरूपानें नटून आपल्याशीं खेळतो. पण खेळून खेळून दमला, कंटाळला म्हणजे तो खेळ टाकून स्वस्थ पहुडतो, विरमतो. ही सगळी त्याची लीला आहे, क्रीडा आहे. आनंदावांचून दुसरा कांहीं हेतु त्यांत नाहीं. आनंदासाठीं रमतो, आनंदासाठी विरमतो. ''आनंदाच्या डोहीं आनंदतरंग'' सारखे उठत आणि निमत आहेत. ते उठले वा निमाले तरी आनंद हा अविकृत जसाचा तसा राहतो. कारण तो स्वभाव आहे. स्वभावाला औषध नाहीं. तिथें तुमचा हा प्रश्न कीं 'असें कां?' चालत नाहीं. सूर्य कां प्रकाशतो, वारा कां वाहतो, झरा कां झुळझुळतो, गाय कां पान्हावते, या सर्वांचें उत्तर एकच–स्वभाव. तसा परमात्म्याचा स्वभाव आहे रमणें-विरमणें तो रमत रमत विरमतो, विरमत विरमत रमतो.

## ३९६. विरज (विरत?)

'रामो विरामो विरतो' असा पाठ सुपाठ होईल. विरज म्हणजे विरजस्क. पण रज म्हणजे काय? रजस् हा प्रकृतीच्या तीन गुणांपैकीं एक होय. पण इथें आत्मा, प्रकृति, गुण इत्यादि सर्वच पदार्थांचा उलगडा करावा लागेल. प्रकृति ही प्रकृतिमान् आत्म्यापासून भिन्नाभिन्न आहे. ती अंगभूत म्हणून अभिन्न, पण बाह्य म्हणून भिन्न आहे. पाणी शांत, तरंगित आणि गोठलेलें अशा तीन अवस्थांत आढळतें. पाण्याच्या प्रकृतीचे हे तीन गुण होत. पाणी आपल्या ह्या त्रिगुणात्मिका प्रकृतीपासून वियुक्त कधींच आढळावयाचें नाहीं. म्हणून ही जी त्रिगुणात्मकता तीच प्रकृति म्हणावयाची. हे तीन गुण ज्या अर्थीं एकसमयावच्छेदें करून प्रकृतींत प्रकटत नाहींत, पण आलटून पालटून प्रकटतात, त्या अर्थीं त्या तिहींहून प्रकृति भिन्न आणि त्यांची आधारभूमि म्हणावयाची. ही प्रकृति जड म्हणजे स्वानुभवाक्षम आहे. तिचा हा सारा गुणकर्म-खेळ जो अलिप्तपणें पाहतो तो आत्मा होय. पिण्डदृष्ट्या क्षेत्रक्षेत्रज्ञ आणि ब्रह्माण्डदृष्ट्या प्रकृति-पुरुष यालाच म्हणतात. परमात्मा वस्तुतः गुणातीत असतां त्याला विरज म्हणण्यांत काय स्वारस्य? त्यांत स्वारस्य हेंच कीं सत्त्वरजतम या त्रिगुणांत व्यवहारदृष्ट्या तारतम्य आहे. इष्टानिष्ट भाव आहे. तमापेक्षां रज आणि रजापेक्षां सत्त्व हें इष्ट म्हणावयाचें. पशु पक्षी तम:प्रधान आहेत. रज:प्रधान मानवाला विरज हें परमात्मनाम महत्त्वाचें वाटेल. मानवाची साधना मुख्यतः रजोगुणावर विजय मिळविण्यांतच आहे. तृष्णा आणि आसक्ति हीं आहेत रजोगुणाचीं लक्षणें. तीं जर मानव जिंकूं शकला तर तो रजोविजयीच झाला म्हणावयाचा. नित्यसत्त्वस्थ झाल्यावरच तो विरज व्हावयाचा.

## ३९७. मार्ग

जो मुक्कामावर पोंचवितो तो मार्ग म्हणजे नीति. जो मुक्काम तो नय. आणि जो नेला जातो तो नेय होय. इथें क्रमानें 'मार्गो नेयो नयः' हीं पदें याच अभिप्रायानें आलीं आहेत. हें एक त्रिक आहे. प्रस्थान-बिंदु आणि संस्थान-बिंदु यांच्यावांचून मार्गाची कल्पना होऊं शकत नाहीं. म्हणून जीव, ज्ञान आणि ब्रह्म अथवा ज्ञाता, ज्ञान आणि ज्ञेय हें त्रिक वा त्रिपुटी कल्पावी लागते. इथें ''नीतिर् नेयो नयोऽनयः'' असा पाठ सुपाठ झाला असता. असो या. मार्गाचें वा नीतीचें स्वरूप काय? 'ज्ञानात् एव मोक्षः' असा वेदान्ताचा सिद्धांत असल्यामुळें ज्ञान हेंच याचें स्वरूप आहे. अवान्तर कर्म उपासना ध्यान इत्यादि सारें ज्ञानसहकारी म्हणून मान्य, परन्तु त्यांची स्वतंत्र योग्यता नाहीं. चित्तशुद्धिद्वारा ज्ञानोत्पत्ति होण्याला त्यांची जेवढी उपयुक्तता तेवढीच त्यांची योग्यता. रत्नच मोलाचें खरें, पण त्यासाठीं चिंधी बाळगावी लागते. रत्नामुळें ती चिंधी चिंधी राहत नाहीं. तीहि रत्नमोलाची होते. त्यासारखें आहे हें. पर्यायानें सर्व मार्ग मुक्कामाला पोंचवितात, पण ज्ञानमुखानेंच पोंचवितात. त्यामुळें ज्ञानच सरळ व प्रत्यक्ष मार्ग म्हणावयाचा. प्रत्यक्ष समुद्राला गंगाच मिळते, इतर तिच्या उपनद्या तिला मिळतात म्हणून समुद्राला पोंचतात म्हणावयाचें. मार्गितव्य मुक्काम एकच आहे. त्याला पोचविणारा मार्गहि एकच आहे पण उपमार्ग अनेक असूं शकतील. या उपमार्गालाहि गौरवानें मार्ग म्हटलें जातें. गीतेंत एवढ्याचसाठीं कर्म, ध्यान, भक्ति यांनाहि ज्ञानाबरोबर योग म्हटलें आहे. या ठळक उपमार्गांशिवाय अवांतरहि उपमार्ग दैवासुरसंपद्‌विभाग-योग, श्रद्धात्रय विभाग-योग गीतेनें प्रतिपादिले आहेत. अध्याय १३-१५ क्षेत्रक्षेत्रज्ञविभाग-योग, गुणत्रयविभाग-योग आणि

पुरुषोत्तम-योग उर्फ पुरुषत्रय-विभाग-योग हा तर प्रत्यक्षच ज्ञान-योग आहे. १८ वा अध्याय उपसंहाराचा असला तरी तोहि वस्तुतः ज्ञान-कर्म-सुखादि-त्रिविध विभाग-योगच आहे. सारांश १३-१८ ही षडध्यायी विभाग-योगात्मकच आहे. आणि विभाग म्हणजे ज्ञान-प्रक्रियाच आहे. या विभागरूप ज्ञान-योगाला शेवटीं स्थान देऊन गीतेनें त्याचें शिरोमणित्वच सूचित केलें आहे. त्यालाच शास्त्रहि म्हटलें आहे. असा हा शास्त्रच म्हटलेला मार्ग म्हणजे ज्ञानमार्ग होय. आणि तोच एक मार्ग ह्या पदवीस पात्र आहे.

## ३९८. नेय

नेय म्हणजे मार्गानें न्यावयाचा मार्गस्थ. जीव हा नेय आहे. कारण तो आपल्याला अपूर्ण समजत आहे आणि अपूर्ण म्हणून पूर्णाला गांठण्यासाठीं धडपडत आहे. त्याची निःशेष धडपड संपली कीं तो पूर्णाला पोंचला म्हणून समजावें. हें सारें जगत् म्हणजे धडपडणारें आहे, गतिशील आहे. कारण तें अपूर्ण आहे. पूर्ण एक परमात्मा आहे आणि म्हणून त्याला पोंचण्याची साऱ्या जगाची धडपड चालली आहे आणि त्याला पोंचेपर्यंत ती अशीच चालावयाची आहे. नदी समुद्रांत मिळेपर्यंत ती वाहतच राहणार. समुद्रांत प्रवाह नाहीं, एकार्णवांत प्रवाह नाहीं.

पण परमात्मा जर पूर्ण आहे तर त्याच्यापासून झालेले हें जग अपूर्ण कसें? तेंहि पूर्णच. त्या पूर्ण परमात्म्याचा जो उद्रेक तो म्हणजे हें जग होय. ती पूर्ण परमात्म्याची परिपूर्णता आहे. पर्वतीय भूमि वा जलाशयें जेव्हां कांठोकांठ तुडुंब भरून जातात तेव्हांच तीं पाझरांच्या व झऱ्यांच्या रूपानें वाहूं लागतात. ही अपूर्णता नसून पूर्णतेचा उद्रेक होय. त्याप्रमाणें हें जग हि परमात्म्याच्या पूर्णतेचा उद्रेक होय, परिवाह होय. बीजांत कोंडलेली बैजिक शक्ति जेव्हां बीजांत सामावून राहूं शकत नाहीं तेव्हां तिला हातपाय फुटतात. तींच मूळें व दळें होत. तसे परमात्मगत अनिवार पूर्णतेला फुटलेले हातपाय म्हणजे हें जग होय. आणि हातपाय स्वस्थ बसण्यासाठीं नाहींत. ते कार्य करीत राहतात, खटपट करीत असतात, त्यांची ती खटपट जेव्हां त्यांना स्वानंद लाभतो तेव्हांच विश्रान्त होते. अशा प्रकारें पूर्णतेंतून पूर्णतेचा उद्रेक आणि उद्रेकांतून परत परिपूर्णतेचा मागोवा असा हा पूर्णाचा खेळ चालला आहे.

## ३९९. नय

''नयति इति नयः—नेता।'' जो नेतो तो नय म्हणजे नेता होय. माणूस बैलाला घराकडे वा शेताकडे घेऊन जातो तेव्हां माणूस हा बैलाचा नेता होतो. परंतु इथें नय म्हणजे तसला नेता नाहीं. तर मुक्काम वाटसराला चालायची प्रेरणा देऊन चालवीत असतो, आपल्याकडे नेत असतो, तसला तो नेता आहे. मार्गावरून मनुष्य जात असतो, त्याचे पाय चालत असतात, पण त्या पायांना चालना गन्तव्य स्थान देत असतें. गन्तव्य नसेल तर मार्गहि सांपडणार नाहीं आणि पायांना चालनाहि मिळणार नाहीं. गन्तव्याच्या अभावीं मार्ग अमार्ग आणि शक्ति-अशक्ति होऊन बसते. असें पाहिलें म्हणजे मार्गितव्याची सत्ताच मार्गाला आणि मार्गस्थाला जन्म देत असते, जीवन देत असते, कृतार्थ करीत असते असें दिसून येईल. सर्व पाणी समुद्राला मिळण्यासाठीं धडपडत असतें. तेंच आपला मार्ग शोधतें आणि तयार करीत जातें. त्याचा मार्ग कोणीं आधीं आंखून दिलेला वा तयार करून ठेवलेला नाहीं. पण हें सर्व तो समुद्रच करवून

घेत असतो. म्हणून सर्व पाण्याचा तो नेता होय. त्याप्रमाणें सर्वांचें गन्तव्य असलेला तो परमात्मा सर्वांना आपल्याकडे नेत आहे. चराचर त्याच्याकडे खेंचलें जात आहे. सर्वांचा ओढा त्याच्याच कडे आहे. जीवांना भलें हें न कळो, न सांगतां येवो, परंतु त्या सर्वांची गति तिकडेच आहे. ज्ञानी तिकडेच चालला आहे. अज्ञानीहि तिकडेच ढकलला जात आहे. सर्वांची परिसमाप्ति त्यांतच व्हावयाची आहे. तो नय आहे आणि त्याच्या नीतींतून कोणीहि वगळला जावयाचा नाहीं. त्याला सर्वच नेय आहेत.

## ४००. अनय (अ-नय, अन्-अय)

'न विद्यते नय: अस्य इति अनय:।' ज्याला कोणी नय म्हणजे नेता नाहीं तो अनय होय. परमात्माच सर्वांचा नेता, त्याला दुसरा कोणी नेता नाहीं म्हणून तो अनय म्हणावयाचा, विनायक म्हणावयाचा. जो विशेष नायक तो विनायक, तसा जो विगत नायक तो हि विनायक. अनय हा असा विनायक आहे.

'न नय: इति अनय:।' जो नय म्हणजे नेता नव्हे तो अनय, अनेता, परमात्माच सर्वरूप असल्यामुळें त्याच्या ठाईं नेय आणि नेता असा भेद करतां येत नाहीं. तत्र को नेय: को नेता एकत्वं अनुपश्यत:?

**नादत्ते कस्यचित् पापं न चैव सुकृतं विभु:।**
**अज्ञानेनावृतं ज्ञानं तेन मुह्यन्ति जन्तव:।।**
**न कर्तृत्वं न कर्माणि लोकस्य सृजति प्रभु:।**
**न कर्मफल-संयोगं स्वभावस् तु प्रवर्तते।।**

बऱ्या-वाईट कर्मांची परमात्मा प्रेरणा देत नाहीं वा त्यांचीं बरीं वाईट फळेंहि तो देत नाहीं. तीं स्वभावानुसार होत असतात. ह्यामुळेंहि परमात्मा हा अनय म्हणजे कुणाला कुठल्या कर्माला वा कर्मफळाला नेणारा म्हणतां येत नाहीं.

वरील विवेचन 'न नय: अ-नय:' अशा तत्पुरुष वा बहुव्रीहि पदाचें झालें. परंतु सदर पद 'न अय: अनय:' असेंहि कल्पिणें शक्य आहे. अय: म्हणजे मार्ग, गति. ती ज्याच्या ठाईं संभवत नाहीं तो अनय:. मागील नीति (मार्ग) नेय नय पदांनीं अयन सुचविलें आहे, गति सूचित केली आहे. इथें तिची असंभावना सुचविली आहे. परमात्मा अगम्य आहे. तुम्ही त्याच्यांत प्रवेश करूं शकत नाहीं कारण प्रवेश करायचा म्हणजे त्याला आत्म-भिन्न कल्पायचें आणि तें तर असंभवनीय आहे. कारण तो परमात्मा स्वत:च सर्वात्मभूत आहे. आपणच आपल्या ठाईं कसें प्रविष्ट व्हायचें? आपल्याच डोक्यावर आपण उडी मारून कसें उभें रहायचें? तें अशक्य म्हणून परमात्मा हा अनय म्हणावयाचा, अगम्य म्हणावयाचा.

## *शतक पाचवें*

## ४०१. वीर

वीर पद सहस्रांत तीनदां आलें आहे. इथें तें आरंभींच आलेलें आहे, तेव्हां स्वतंत्रपणेंच विचार केला पाहिजे. शूर वीर पराक्रमी अशी त्रिपदी प्रसिद्ध आहे. अर्थात् तिन्ही मिळून एक पूर्ण विचार होतो. शूर म्हणजे निर्भय. कसल्याही बिकट प्रसंगानें न घाबरणारा. वीर म्हणजे अशा प्रसंगानें स्फूर्ति चढणारा, उत्साही, जिगीषु आणि पराक्रमी म्हणजे आलेल्या संकटावर तुटून पडून त्याचा नि:पात करणारा. 'देहं वा पातयामि कार्यं वा साधयामि' अशा निर्धारानें झुंजणारा आणि विजयी होणारा. थोडक्यांत निर्भय विजिगीषु समितिंजय म्हणजेच शूर, वीर, पराक्रमी. मर्दपणाची एकापेक्षां एक चढती पायरी आहे ही. (म्हणून त्यांची अक्षरेंहि चढतीं आहेत–तीन, चार, पांच) उलट भ्याड, पुचाट, पळपुटा ही नामर्दीची चढती पायरी होय. शौर्यवीर्य हे आंतरिक भाव होत. पराक्रम त्यांचा दृश्य परिणाम होय. जीवन हेंच रणांगण आहे. त्यांत आपलें कर्तव्य निर्भयपणें, उत्साहानें आणि देहाची तमा न बाळगतां

पार पाडणें हाच शौर्य-वीर्य-पराक्रम होय. गीतेचा हाच संदेश आहे:—

**क्लैब्यं मा स्म गमः पार्थ नैतत् त्वय्युपपद्यते।**
**क्षुद्रं हृदय-दौर्बल्यं त्यक्त्वोत्तिष्ठ परंतप।।**
**निर्वीर्य तूं नको होऊं न शोभे हें मुळीं तुज।**
**भिकार दुबळी वृत्ति सोडुनी ऊठ तूं कसा।।**

परमात्मा वीर आहे. तो आपलें सृष्टिकर्म आणि धर्मसंस्थापनेचें कर्तव्य सोत्साह पार पाडीत आहे. त्याचें वीर्य, त्याचा मानसिक उत्साह आणि उद्यम या सर्वतोन्तरूप विश्वरचनेवरून प्रकटच आहे. अधर्मावर विजय मिळविण्याचा सत्याचा निर्धार आणि उत्साह कधीं कमी झाला आहे का? म्हणून परमात्मा हा एक वीर होय.

### ४०२. शक्तिमतां श्रेष्ठ

वीर पदानंतर लगेंच ''शक्तिमतां श्रेष्ठ'' हें पद आलें आहे. तें पराक्रमी या अर्थाचेंच समजावयाचें. वीर्य हा मूलतः मानसिक वा आंतरिक भाव आहे. ज्याच्या ठाईं मनोबल नाहीं तो फार वेळ टिकाव धरूं शकत नाहीं, मग त्याचें शारीरिक बळ किती का असेना? पण नुसतें मनोबळ पुरेसें नाहीं. त्याबरोबर शारीरिक बळ हि पाहिजे. तुम्हांला लोककल्याणाची खूप हौस आहे, अपार उत्साह आहे, परंतु तुमचें शरीर जर पाप्याचें पितर असेल, शतजर्जर असेल तर तुमच्या हातून काय होऊं शकेल? म्हणून दोन्ही बळें पाहिजेत. सत्त्व हि पाहिजे आणि शक्ति हि पाहिजे. दोन्ही मिळून रीइनफोर्सड् काँक्रीट तयार होतें, जें कार्याचा केवढाहि मोठा भार सहज पेलूं शकतें. गांधीजींजवळ मनोबळ व शरीरबळ दोन्ही होतीं म्हणून ते स्वराज्याची चळवळ सुदीर्घ काळ चालवूं व भगवत्-कृपेनें यशस्वी करूं शकले. ग्रामस्वराज्याच्या चळवळीला हि तेंच लागू आहे. पुरेसें मनोबळ म्हणजे सत्त्व वा वीर्य नसतें आणि आवश्यक शारीरिक काटकपणा नसता तर काय तेरा वर्षें अखंड पदयात्रा आणि ग्रामराज्याची चळवळ विनोबांना करतां आली असती? हें जें भगवद्‌भक्तांचें बळ, त्याच्या अनन्तपट बळ भगवंताचें आहे. म्हणून तो 'शक्तिमतां श्रेष्ठ', सर्व शक्तिमंतांत वरचढ म्हटला आहे. त्याच्या शक्तिमत्तेचें निदर्शन म्हणजे ही विश्वरचना होय. तिचें आकलन सुद्धां मानवबुद्धीला होऊं शकत नाहीं. मग तिच्याशीं झुंज तो काय देणार? तो जितकें तिचें आकलन करतो, तितका तो नम्र होतो. आत्यंतिक भक्तीनेंच त्याच्या आत्यंतिक शक्तीचें दर्शन व्हायचें.

### ४०३. धर्म

धर्म पदाची व्याख्या ''धारणात् धर्मः'' अशी करतात. मग ज्यानें ह्या सबंध विश्वाला धारण केलें आहे तो परमात्मा धर्म कां न म्हटला जावा? जीव जगत् आणि जगदीश्वर ही त्रयी प्रसिद्ध आहे. पैकीं जीव आणि जगत् आम्ही पाहतों आहों. चेतनाचेतन असा त्यांचा विभाग होईल. जीव चेतन, जगत् अचेतन म्हणतां येईल. अचेतन स्वतःला जाणत नाहीं तें चेतनाचेंच भोग्य, चेतनाचेंच आश्रित. आंधळयाला डोळसच मार्गदर्शन करूं शकतो, त्याचा सांभाळ करूं शकतो. म्हणून शेवटीं जगाचा आधार चेतनच म्हणावें लागतें. नखलोमादींचा निर्माता आणि स्वामी चेतनच होऊं शकतो, केव्हां हि अचेतन नव्हे. अग्नीपासून ठिणग्या तसे परमात्म-तेजापासून जीवरूप चेतन स्फुलिंग हि निर्माण होतात असें म्हणावयाचें. अग्नीपासून अग्नि निर्माण होतो, अनग्नीपासून नव्हे. सारांश, हें सर्व चेतनाचेतन विश्व चेतन-मूलक आहे, चेतन-प्रधान आहे, किंबहुना चेतनमयच आहे. म्हणून चिन्मात्रमूर्ति परमात्माच धर्म होय. कांकीं या विश्वाचा धारक तोच असूं शकतो, दुसरा कोणी हि नव्हे. जडवादी मानतात कीं ज्याला तुम्ही चेतन म्हणतां तो हि जडाचाच एक विकास आहे आणि

म्हणून हें सारें विश्व जड आहे. असें मानलें म्हणजे मग ''सर्वं दु:खम्। सर्वं अनित्यम्'' ची सिद्धि झाली. कारण, आनंद हा चेतनाचा धर्म आहे आणि चेतन हें ज्ञप्तिस्वरूप सर्व-विलक्षण आहे. तें घटित-विघटित होणाऱ्या नश्वर संसाराहून विलक्षण असल्यामुळें तें नित्य आहे. अर्थात् तें एकमात्र सत्पद-वाच्य होय. म्हणून तें जें सत् चित् आनंद-पदवाच्य तेंच धर्म होय. त्यानेंच हें सर्व विश्व धारण केलेलें आहे. त्याची सत्ता न स्वीकारणें म्हणजे 'मी नाहीं' म्हणण्यासारखें आहे. तो 'वदतो व्याघात' आहे. बौद्धांचा निर्बुद्धवाद तो हाच.

### ४०४. धर्मविदुत्तम (धर्मविद् उत्तम)

जगांत अनेक धर्म म्हणजे कल्याणाचे मार्ग आहेत. त्यांच्यापैकीं एक हि ज्यानें जाणला तो धर्मविद् होय.

**एवं बहुविधा यज्ञा वितता ब्रह्मणो मुखे।**
**कर्मजान् विद्धि तान् सर्वान् एवं ज्ञात्वा विमोक्ष्यसे।।**

त्या सर्वांचें सामान्य लक्षण गीतेच्या वरील श्लोकांत सांगितलें आहे. आणि तें हें कीं तो प्रत्येक धर्म म्हणजे यज्ञ, ब्रह्माला उद्देशून केलेला असतो आणि क्रियारूप असतो. काय, वाक् आणि चित्त हे तीन कर्मपथ आहेत. आणि या तिन्ही पथांनीं ईश्वराला जोडणारे संभवनीय सर्व योग वेदांत म्हणजे शास्त्रांत सांगून ठेवले आहेत. आतां या असंख्य धर्ममार्गांत कोणता मार्ग उत्तम म्हणायचा? मुक्कामाला पोंचवणारा प्रत्येकच मार्ग आहे आणि ज्याला तो स्वभावत: प्राप्त झाला आहे, तोच त्याला उत्तम. जलचराला जलमार्ग उत्तम, भूचराला भूमार्ग उत्तम आणि नभश्चराला आकाशमार्ग उत्तम. जो जिथें उभा आहे तिथून त्याला मुक्कामाला नेणारा जो मार्ग तोच उत्तम म्हणावयाचा. आणि धर्मविदुत्तम म्हणजे अशा धर्मांच्या वेत्त्यांत श्रेष्ठ कोण? जो चालू क्षणीं धर्माचरण करतो तो. पण हा तर धर्मकर्ता झाला, वेत्ता नव्हे! नाहीं, जो कर्ता तोच वेत्ता म्हणावयाचा. ज्ञान आणि कर्म वेगळें नाहीं. साखर गोड कीं कडू हें जाणणें म्हणजेच चाखणें आणि चाखणें म्हणजेच जाणणें. तद्वत्. जो अमृत सोडून विष पितो तो अमृतवेत्ता कसा म्हणावयाचा? जो अमृत पितो तोच अमृतवेत्ता म्हणावयाचा. तद्वत् जो अधर्म वर्जून धर्मच आचरितो तोच धर्मविद् म्हणावयाचा. आणि जो तो धर्म चालू क्षणीं आचरतो तो धर्मविदुत्तम म्हणावयाचा. धर्म सावकाश आचरावयाचा नसतो. तो चालू क्षणीं आचरावयाचा असतो. कारण मृत्यु केव्हां गांठील त्याचा नेम नाहीं. गेला क्षण हातांतून निसटला, पुढचा हातीं लागेल न लागेल. तेव्हां चालू क्षणच आपल्या हातचा आहे. हातचें सोडून पळत्याच्या पाठीमागें लागण्यांत शहाणपणा नाहीं.

**यो ध्रुवाणि परित्यज्य अध्रुवं परिषेवते।**
**ध्रुवाणि तस्य नश्यन्ति अध्रुवं नष्टमेव च।।**

दोन वस्तु ध्रुव आहेत. एक धर्म आणि दुसरी चालू क्षण. त्यांचा जो योग साधतो तोच धर्मविदुत्तम. ध्येयभूत परमात्मा हा सदैव स्वरूपस्थित असल्यामुळें तो सहजच धर्मविदुत्तम झाला.

### ४०५. वैकुण्ठ

विकुण्ठ पद दोन प्रकारें लावतां येईल (१) 'विगता कुण्ठा यस्य तत् विकुण्ठं पदम्।' (२) 'विशेषेण कुण्ठा यस्मिन् तत् विकुण्ठं पदम्।' ज्याला कुण्ठाच नाहीं तें विकुण्ठ अथवा ज्यांत भलतीच कुण्ठा आहे तें विकुण्ठ. या विकुण्ठ पदाचा जो भाव तो वैकुण्ठ अथवा ''विकुण्ठ एव वैकुण्ठ:'' असेंहि म्हणतां येईल.

परमात्मा सर्वतन्त्र-स्वतन्त्र आहे. त्याला कुठेंच अटकाव नाहीं, कुण्ठा नाहीं. कारण अटकाव करायला दुसरें मुळीं कांहीं नाहींच. कुण्ठा म्हणजे मर्यादा

आडकाठी, दुसरें काहीं असेल तरच होणार ना? जिथें अद्वैत आहे, किंबहुना ऐक्य आहे, तिथें कोण कोणाला मर्यादा घालणार? म्हणून परमात्मा हा वैकुण्ठ होय.

परमात्मा ज्याअर्थी वैकुंठ आहे, परिपूर्ण मुक्त आहे. त्याअर्थी त्याच्या ठाईं बन्धाला, कोणत्या हि प्रकारच्या मर्यादेला मुळीं वाव नाहीं. सर्व गुण आणि गुणजन्य हा समस्त संसार कुण्ठास्वरूप आहे. तो सर्व विशिष्ट आहे आणि परमात्मा आहे निर्विशेष. त्यामुळें त्याच्या ठाईं त्याला मतजाव आहे, निरोध आहे, कुण्ठा आहे. गुण गुणाच्या ठाईं प्रवेश करतात, इंद्रियें आणि विषय एकमेकांत ये-जा करतात परंतु त्यांचा प्रवेश आत्मतत्त्वांत होऊं शकत नाहीं. कारण तें केव्हांहि विषयीभूत होऊं शकत नाहीं. तें स्वतःच विषयी आहे.

आकाश तत्त्व अत्यन्त सूक्ष्म आणि व्यापक आहे. त्यामुळें तें सर्वत्र आहे. पण त्यांत मात्र कशाचा हि प्रवेश होऊं शकत नाहीं म्हणून त्याला शून्य म्हणतात. आत्मतत्त्व हें तर त्याहून किती तरी सूक्ष्म आणि व्यापक. त्यांत आकाशतत्त्वाचा हि प्रवेश होऊं शकत नाहीं. कारण तें निर्गुण आहे. आणि म्हणून तें वैकुण्ठसंज्ञ होय. आकाश सगुण शब्दगुण.

### ४०६. पुरुष

'वैकुण्ठः पुरुषः प्राणः' हा क्रम जणूं निर्गुण सगुण साकार भाव सुचवीत आहे, अदेह विदेह आणि सदेह भाव सुचवीत आहे. परमात्मा, आत्मा, जीवात्मा त्याचींच दुसरीं नामें. सशरीर तो जीवात्मा, शरीर-मुक्त तो आत्मा अथवा मुक्तात्मा आणि शरीरसंभव-संपर्कविदूर अर्थात् केवलस्वरूप तो परमात्मा म्हणावयाचा. इथें पुरुष पद आत्मवाचक म्हणजे मुक्तात्म-वाचक अर्थात् अधियज्ञ समजावयाचें आहे. नामदेवानें आपल्या एका अभंगांत या तिहींचा उल्लेख केला आहे तो असाः

जीव विठ्ठल, आत्मा विठ्ठल, परमात्मा विठ्ठल विठ्ठल. एक विठ्ठलच जीव, आत्मा, परमात्मा झाला आहे. चित्सत्तेचाच हा सारा विलास आहे. चित्सत्तेचा उद्रेक म्हणजे हा सारा संसार-प्रवाह होय. कोणती हि गति म्हटली म्हणजे ती आरोहावरोहात्मकच असावयाची. चिद्-विलासांत हि तसा आरोहावरोह आहे. ब्रह्माचा अध्यात्म कर्म अधिभूत हा अवरोह होय. अधिदैव अधियज्ञ आणि प्रयाणसाधना हा आरोह होय. गीतेच्या आठव्या अध्यायांत हा विषय संक्षेपानें आला आहे. अक्षर ब्रह्मापासून स्वभाव, स्वभावापासून विसर्ग आणि विसर्गाची जगत् व जीव अशीं द्विरूप परिणति म्हणजे हा संसार होय. पुढें जीव उत्क्रान्त होऊन मानव झाला आणि यज्ञ करून साधना करून साधक बनला—योगी बनला. तोच शेवटीं प्रयाण कालीन साधना करून देह आणि देहानु संसार यांतून परिमुक्त होऊन स्वरूपीं युक्त झाला म्हणजे आरोह संपला आणि एक अवरोहारोह-चक्र पूर्ण झालें.

**यथा नद्यः स्यन्दमानाः समुद्रे**
**गच्छन्त्यस्तं नामरूपे विहाय।**
**तथा विद्वान् नामरूपाद् विमुक्तो**
**ब्रह्माक्षरं धाम निजं समेति।।**

आणि हाच पुरुष होय. पुरुष शब्दाच्या अनेक व्युत्पत्ति वा निरुक्ति आहेत. 'पुरु+सः=पुरुषः' ही माझी भर होय. 'इन्द्रो मायाभिः पुरुरूप ईयते' हें वेदवचन तिला अनुकूल आहे, आधार आहे. तो नाना रूपांनीं नटला आहे म्हणून तो पुरुष. 'सहस्रशीर्षा पुरुषः सहस्राक्षः सहस्रपात्' या प्रसिद्ध पुरुष सूक्तांत सहस्रपदानें पुरुत्वच प्रकटलेलें आहे. म्हणून 'पुरुः सः पुरुषः' ही निरुक्ति यथास्थित होय.

### ४०७. प्राण

प्राणाचें चलनवलन हें जीवनाचें उप-लक्षण मानलें जातें. म्हणून जीवाला प्राणी आणि प्राण्याला जीव

म्हटलें जातें. अर्थात् देहधारी जीव तो प्राण म्हणावयाचा. वस्तुत: प्राण ही जीवनाची खूण आहे. प्रत्यक्ष जीव वेगळी वस्तु आहे. योगी प्राणनिरोध करून हृदयस्पंदन थांबवून राहूं शकतो, ह्या वरून जीव व प्राण एक नव्हेत हें सहज समजण्यासारखें आहे. तथापि त्यांचें घनिष्ठ साहचर्य आहेच. योगी कांहीं काळ प्राणनिरोध करून भलें राहो, पण तो कायमचा तसा राहूं शकत नाहींच. शिवाय निरोध म्हणजे अभाव नव्हेच. तें स्तंभन आहे. ज्ञातृतत्त्व आणि कर्तृत्व हीं दोन्ही मिळून राहतात. ज्ञातृतत्त्व आधारभूत आणि कर्तृतत्त्व तदाश्रित असा बाह्यत: आम्ही विभाग करतों इतकेंच. ज्ञातृतत्त्व हें सदैव एकरूप राहतें. कर्तृतत्त्व कधीं उन्मीलित कधीं निमीलित स्वभावानुसार होत राहतें. आणि त्यालाच आम्ही जीवन मरण वा उत्पत्ति प्रलय म्हणत असतों. ज्ञातृतत्त्व म्हणजे पुरुष आणि कर्तृतत्त्व म्हणजे प्रकृति होय. ज्ञातृतत्त्वाचा प्रतिनिधि जीव म्हटला जातो. प्रकृतितत्त्वाचा प्रतिनिधि प्राण. पण इथें तर परमात्म्यालाच प्राण म्हणून संबोधिलें आहे. त्याचें कारण अखेर प्राणाचें सारें चलनवलन आत्मसत्तेच्याच अंकावर होत असतें हें होय. तिच्यांत कसलें हि परिवर्तन होत नाहीं. सर्व परिवर्तनांची ती साक्षी आहे. त्या सर्व परिवर्तनांच्या उद्भव-स्थिति-प्रलयांची ती आधार भूमि आहे. आणि ह्यामुळें एकच तत्त्व बोलायचें तर तें आत्मा म्हणावें लागेल. दोन तत्त्वें म्हणजे पुरुष आणि प्रकृति अथवा जीव आणि प्राण. आणि अशा प्रकारें ह्या युक्तीनें हवें तसें तत्त्वसंख्यान परस्पर-विरोध न येतां करणें शक्य होतें. 'एक तत्त्व हरि, द्वैतनाम दुरीं। अद्वैत-कुसरी विरळा जाणे' असें ज्ञानदेवानें म्हटलें आहे. ती अद्वैतकुसरीच सहस्र परोपरीनें शिकवितें आहे. ''जीव विठ्ठल आत्मा विठ्ठल परमात्मा विठ्ठल विठ्ठल'' गाणारा नामदेव एकतत्त्वच गात आहे. द्वैत न मोडतां अद्वैताची ही कुसरी आहे.

### ४०८. प्राणद

प्राणदपद पूर्वी दोनदां येऊन गेलें आहे आणि पुढें एकदां यावयाचें आहे. असें हें पद सहस्रांत चारदां आलें आहे. तीन ठिकाणीं तें प्राण पदाच्या जोडीनें आलें आहे, हें लक्षांत घेतां तें समानार्थकच मानलें पाहिजे. परमात्मा प्राणस्वरूप आहे, जीवरूप आहे, पण त्याच बरोबर तो त्या प्राणाचा स्वामी हि आहे. जो स्वामी, तोच दाता होऊं शकतो. ज्याच्या जवळ जें धन नाहीं तें तो देणार कसा? याचा अर्थ असा झाला कीं तो परमात्मा प्राणस्वरूप दान हि आहे आणि त्याचा दाता हि आहे. जगांत अवांतर दानें देणारे हि फारसे नाहींत, पण प्राणदान देणारा तर परमेश्वरावांचून दुसरा कोणी नाहींच. म्हणून प्राण आणि प्राणद हीं पदें वारंवार आलीं आहेत. भक्त भगवंताचा हा अनन्य उपकार सदैव स्मरतात– ''जेणें हा जीव दिला दान तयाचें करीन चिंतन'' असें ते तुकारामाप्रमाणें गात असतात. सहस्रांत हि त्यामुळेंच तें वारंवार आलें आहे.

''प्राणान् यच्छति ददाति इति प्राणद:'' अशा व्युत्पत्तीनें प्राणद पदाचें विवरण वर आलें आहे. पण ''प्राणान् द्यति खण्डयति'' अशी हि त्याची दुसरी व्युत्पत्ति होऊं शकेल. भगवान् कालरूपानें सर्वांचे प्राण तोडून नेत असतो. जो श्वास घेतो तो टाकावा लागतो. जो टाकला तो परत येत नाहीं. अशा प्रकारें कालरूप भगवान् प्राण्यांचे प्राण क्षणाक्षणाला तोडून घेत आहे. म्हणून हि तो प्राणद म्हणावयाचा. शेवटीं मरणसमयीं तो पंच हि प्राण तोडून नेती म्हणून हि तो प्राणद म्हणावयाचा.

दा म्हणजे तोडणें आणि देणें म्हणजे एकापासून घेऊन दुसऱ्याशीं जोडणें होय. हे दोन अर्थ दिसतात

परस्परविरुद्ध, पण वस्तुत: ती एकच क्रिया नाहीं का? एखादी वस्तु द्यायची म्हणजे कोणापासून तरी ती घ्यावी, दूर करावी लागते. अपादानाशीं संप्रदान जुडलें आहे. दोन्ही हि दानेंच. दोन्ही मिळून परमात्मा प्राणद आहे. आरंभीं प्राण देतो, शेवटीं घेतो, म्हणजे प्राणद.

## ४०९. प्रणव

प्र नु स्तुतौ पासून प्रणव शब्द साधला आहे. अर्थात् प्रणव म्हणजे प्रकृष्ट स्तव, सर्वोत्तम स्तुति. ॐकारालाच प्रणव म्हणतात. ॐ सर्वोत्तम स्तुति कसा काय झाला? वेदच वस्तुत: परमात्म्याची सर्वोत्तम स्तुति होय. इतर काव्येतिहास आणि ग्रंथ लौकिक वाणी असल्यामुळें त्यांनीं सुचविलेला अर्थ लौकिकच म्हणावयाचा. परंतु वेद अलौकिक आहेत, अपौरुषेय आहेत आणि म्हणून पुरुषबुद्धिकृत भ्रमाला त्यांत अवकाश नाहीं. ही एक श्रद्धा आहे. पुरुष किती हि शुद्ध झाला तरी तो त्रिगुणाचा पुतळा. तिथें परिपूर्ण निर्दोषता संभवनीय नाहीं. म्हणून पौरुषेय उत्तम स्तुति हि अपौरुषेय वाणीची बरोबरी करूं शकणार नाहीं. पण अपौरुषेय वाणी वेद हे अपरिमित आहेत. ते कंठस्थ ठेवणें महाकठिण. त्यामुळें त्यांचा पूर्ण अर्थ ज्यांत आहे आणि जें कण्ठस्थ करायला, लक्षांत ठेवायला अत्यंत सोपें आहे असें जें पद असेल तेंच सर्वोत्तम म्हटलें पाहिजे. ॐ हें तसें पद आहे. तें एकाक्षर आहे. तो एकाक्षरी वेद आहे. लोक सप्तश्लोकी गीता, चतु:श्लोकी भागवत, एकश्लोकी रामायण असे संक्षेप करतात. पण एकाक्षर वेद याहून अधिक संक्षेप तो कोणता असूं शकेल? इथें शंकर भगवान् हि सार-संक्षेपांत हरले आहेत. त्यांनीं शतकोटि रामायणाचा सारसंक्षेप ''राम'' या द्व्याक्षरांत केला आहे. पण ऋषींनीं तर एकाक्षरांत सर्व वेद गुंडाळले आहेत. आणि त्यामुळेंच तो प्रणव म्हणजे सर्वोत्तम स्तुति म्हटला गेला. एक अमृतबिन्दु हि मर्त्याला अमर करूं शकतो. त्यासाठीं अमृतसिन्धूची आवश्यकता नाहीं. कारण अमृत सिन्धु त्याहून अधिक कांहींच करूं शकत नाहीं. मग त्याच्या ऐसपैस-पणाची मातब्बरी ती काय राहिली? जें अनन्त वेद प्रतिपादितात तेंच एकाक्षर ॐकार सांगतो आणि परिपूर्ण सांगतो. म्हणून ॐकार ही सर्वोत्कृष्ट स्तुति होय, प्रणव होय. ॐकाराचें हें लाघवच त्याचें प्रकृष्टत्व होय, त्याचें गौरव होय.

## ४१०. पृथु

पृथु म्हणजे विस्तीर्ण. स्थूलाहून सूक्ष्म हें विस्तीर्ण असतें, पण स्थूल सूक्ष्म दोन्ही व्यक्तच होत. या व्यक्ताहून अव्यक्त हें विस्तीर्ण होय. पण व्यक्त व अव्यक्त हीं दोन्ही सगुणच होत. त्याहून निर्‌गुण हें विस्तीर्ण होय. पण सगुण निर्‌गुण हीं दोन्ही भावच होत. त्याहून अभाव हा विस्तीर्ण होय. पण ज्याला या कोणत्याच एका कोटींत टाकतां येत नाहीं, तो जो भावाभाव-विलक्षण भाव तोच पृथु म्हणावयाचा. कारण तो अनिर्‌वचनीय आहे. त्याला कोणत्या हि पदानें विशिष्ट करणें शक्य नाहीं, मर्यादित करणें शक्य नाहीं. म्हणून जो असीम निर्‌मर्याद तोच परमात्मा पृथु म्हणावयाचा, भूमा म्हणावयाचा. ज्याला विशेषण-विशिष्ट करतां येतें तें केवढें हि विशाल असलें तरी तें मर्यादित झालें, अल्प झालें. परमात्मा हा तसा नाहीं. तो भूमा आहे. पृथु आहे. केवलस्वरूपी आहे.

परमात्मा हा भावाभाव सर्वच जिरवतो म्हणून जसा तो पृथु म्हटला तशी ही सर्वंसहा हि पृथ्वी म्हटली आहे. ती सर्वच प्राण्यांना सुष्टांना आणि दुष्टांना समानपणें वाहते आहे, साहते आहे. म्हणजेच ती पृथ्वी म्हणजे पृथु होय. तिच्याच सारखी जी आई ती हि आपल्या उच्चावच अपत्यांना समान पाहते आणि साहते म्हणून ती हि पृथा वा पृथु होय. ''जननी जन्मभूमिश्च स्वर्गादपि गरीयसी'' असें जें रामचंद्रानें म्हटलें तें त्यांच्या पृथुत्वामुळेंच होय. ह्या

पृथुत्वाच्या कसोटीनें च भगवान् विष्णु देवांत थोर ठरला आहे. त्यानें मानापमान समान लेखले म्हणून तो पृथु म्हणजे मोठा, वरचढ ठरला. अमानित्वादि महनीय गुण अंगीं असल्यामुळें वेनपुत्र पृथु हा अन्वर्थक झाला. तो भगवान् विष्णूचा अवतार मानला गेला. पृथा म्हणजे कुन्ती ही आपल्या आणि आपल्या सवतीच्या पुत्रांना समानभावानें वागवत होती. म्हणून तिचें पृथा हें नाम अन्वर्थक होय. अशा प्रकारें पृथु, पृथा आणि पृथ्वी हे तिन्ही प्रथित भाव त्या मूल ध्येय पृथु परमात्म्याचेच होत, जे आम्हांला चिन्त्य आणि अनुकरणीय आहेत.

### ४११. हिरण्यगर्भ

"हिरण्यगर्भ: समवर्तताग्रे भूतस्य जात: पतिरेक आसीत्" अशी श्रुति आहे. अर्थात् हिरणगर्भ म्हणजे या भूतसृष्टीच्या आरंभीं विष्णूच्या नाभिकमलापासून उत्पन्न झालेला पद्मसंभव ब्रह्मा होय. तो भूतादि असून आदिभूत आहे. जसा सूर्य हा सूर्य किरणाच्या आदौ झालेला असून मागाहून त्याच्या पासून सर्व किरण फांकतात तद्वत्.

विश्वोत्पत्ति, म्हणजे या ग्रह-नक्षत्र-तारकापुंजांची उत्पत्ति, तेजोमेघापासून झाली आहे, असें आधुनिक विज्ञान सांगतें. पौराणिक भाषेंत तोच आदि तेजोमेघ हिरण्यगर्भ म्हटला आहे. त्या चतुर्मुख तेजोमेघानें चारी दिशांस अनंत लोकांची अनंत कोटि ब्रह्मांडांची निर्मिति केलेली आहे. तो जो आदि तेजोमेघ त्याच्या पोटांत सर्व धातुमय ज्वलद्रस भरला असून त्यालाच हिरण्य म्हटलें आहे. आज आपण सुवर्णाला हिरण्य म्हणतों. परंतु हिरण्यगर्भांत गर्भरूपानें राहिलेलें जें हिरण्य आहे तें भौतिक सुवर्ण नसून तें सर्वधातुमूल जगदुपादानभूत चिद्धातुरूप होय. अचेतनापासून हें विश्व निर्माण होऊं शकत नसल्यामुळें जगदुपादान आणि निमित्त चेतनच मानावें लागतें. आणि त्यालाच इथें हिरण्य म्हटलें आहे. त्याच चिद्हिरण्याचे हे विश्वरूप नाना अलंकार घडले आहेत. यालाच अनुलक्षून ज्ञानदेवानें म्हटलें आहे. "विश्वालंकाराचे विसुरे। जऱ्ही आहाति नाना आकारें। तऱ्ही घडिले एकेंचि भांगारें। परब्रह्में।।" हें सर्व विश्व हिरण्यमय आहे, चिन्मय आहे. आणि हें हिरण्मय विश्व ज्याचा गर्भ होय तो परमात्मा हिरण्यगर्भ म्हणावयाचा. तो मृद्गर्भ नाहीं, जड गर्भ नाहीं, तर हिरण्यगर्भ आहे चिन्मय आहे. हें हिरण्य ज्याला लाभलें, सर्वत्रोपलब्ध झालें, त्याहून अधिक श्रीमंत कोण? यालाच अनुलक्षून रामदासांनीं संतांना श्रीमंत म्हटलें आहे– 'ऐसे जे संत श्रीमंत...........'

### ४१२. शत्रुघ्न

जीव देहाभिमानामुळें इतराहून आपल्याला वेगळा मानतो आणि इतरांशीं असूया स्पर्धा विरोध वैर करतो. अर्थात् अज्ञानजन्य मोहामुळें जीव 'मी माझा' 'तूं तुझा' अशी कल्पना करून आसक्ति आणि वैर करीत असतो. याचेंच पर्यवसान वैयक्तिक पारिवारिक सामाजिक आणि राष्ट्रीय व आन्तरराष्ट्रीय वैमनस्य विरोध विग्रह आणि युद्ध महायुद्ध व जागतिक युद्ध यांत होत असतें. याचा अर्थ हा झाला कीं शत्रु म्हणून वस्तुत: कोणीच नाहीं. आपलें अज्ञानच आपलें शत्रुत्व करीत आहे. हें शत्रुत्व जो घालवितो तोच वस्तुत: शत्रुघ्न आहे. अर्थात् केवळ एक आत्मज्ञान च शत्रुघ्न आहे. तेंच अज्ञान आणि तज्जन्य आसक्ति व वैर यांचा नायनाट करतें. परमात्म्याहून अधिक ज्ञानी दुसरा कोण असूं शकेल? स्वयमेव ज्ञानाहून अधिक ज्ञान कुठें असणार? म्हणून परमात्मा हा शत्रुघ्न ठीकच म्हटला आहे. त्याची ही जगद्रचना म्हणजे जीवांना ज्ञान शिकविण्याची शाळाच आहे. डोळस आणि आंधळे दोन प्रकारचे लोक जगांत आहेत. डोळस मार्ग कोणता अमार्ग कोणता हें पाहून अमार्ग टाळून मार्गानें चालतात आणि यथासमय मुक्कामाला पोंचतात. आंधळे मार्गामार्गज्ञान राखीत नाहींत आणि एक तर ते डोळसांच्या आश्रयानें

मुक्काम गांठतात अथवा आड-वाटेला जाऊन ठेचा खात, चुकत सुधरत, मुक्कामाला पोंचतात. अर्थात् ठेचा खाऊन त्यांना ज्ञानदृष्टि येते आणि ते वाटेस लागतात. आणि माणूस एकदां वाटेस लागला म्हणजे तो आज ना उद्यां मुक्कामास पोंचलाच म्हणून समजा. शास्त्र हा मार्ग आहे, शास्त्रद्रोह अमार्ग. ज्ञानी डोळस होत. श्रद्धावंत नम्र भक्त होत. आणि जे ज्ञानी हि नाहींत आणि भक्त हि नाहींत ते अज्ञानी व अभक्त जीव करंटे होत. आपले आपण वैरी होत. सर्वात्मक परमात्म्याला शत्रुच नाहीं. मग तो शत्रुघ्न कसा होणार? परंतु तरी हि तो शत्रुघ्न म्हटला आहे. कारण जो सर्वांचा शत्रु तो मोहच त्याचा हि शत्रु म्हटला जाईल आणि त्याला तो आपल्या सहज ज्ञानामुळें ठार करतो म्हणूनच तो शत्रुघ्न म्हणावयाचा.

### ४१३. व्याप्त

व्याप्त म्हणजे कारणरूपानें सर्व विश्वांत व्यापक असणारा. अथवा कार्यरूपानें विस्तारलेला, व्याप्य. कर्तरि वा कर्मणि दोन्ही प्रकारें तो लावतां येईल. कार्यात्मना तो व्याप्य आहे, कारणात्मना व्यापक आहे. आणि असें असून तो अनेक नाहीं, एकच आहे कनक-कुण्डलवत्. जगाकडे कार्यदृष्टीनें पाहिल्यास जगांत नामरूपात्मक नानात्व दिसून पडतें. परंतु कारण दृष्टीनें पाहिल्यास सर्वत्र एकच एक चिद्वस्तु डोळयांत भरते. या दोन दृष्टींनाच पल्लवग्राही दृष्टि आणि मूलग्राही दृष्टि म्हणतात. "तत् सृष्ट्वा तदेव अनुप्राविशत्" या श्रुतींत परमात्मा सृष्टींत अनुप्रविष्ट म्हणजे सहप्रविष्ट असल्याचें म्हटलें आहे. त्यांत त्याची कार्यकारणवत् व्याप्यव्यापकताच व्यक्त केली आहे. वस्तुतः कार्य आणि कारण आणि त्यांच्यांतील कार्यकारणरूप संबंध कल्पनामात्रच आहे. जिथें एकत्व आहे तिथें भेदाला वाव कुठला? आणि त्या भेदांतील संबंधाला तरी वाव कुठून असणार ? आकाशांत अभ्र येतात. त्यांचे नाना आकार होतात. प्रेक्षक त्यांना नाना नामें देतात. वस्तुतः अभ्रावांचून तिथें दुसरें कांहींच नसतें. तिथें अभ्र-सिंहानें अभ्र-गजाला पळविलें वा ठार केलें तरी त्यांत हन्तृ-हत-हननादि कल्पनामात्र होत. 'गजोऽपि मिथ्या पलायनमपि मिथ्या' तद्वत् हा सृष्टि- व्यापार असल्यामुळें कार्यकारण आणि त्यांतील संबंध सर्वच निर्मूल आहे. आहे केवल केवलता. म्हणूनच म्हटलें आहे गीतेंत–

**मया ततमिदं सर्वं जगद् अव्यक्तमूर्तिना।**
**मत्स्थानि सर्वभूतानि न चाहं तेष्ववस्थितः।।**
**न च मत्स्थानि भूतानि पश्य मे योगमैश्वरम्।**
**भूतभृन् न च भूतस्थो ममात्मा भूतभावनः।।**

### ४१४. वायु

सहस्रांत परमात्म्याला वारंवार प्राण म्हणून संबोधिलें आहे. इथें त्याला वायु म्हटलें आहे. दोहोंत काय विशेष? विशेष हाच कीं प्राण नासाभ्यन्तरचारी आहे, तर वायु सर्वत्रग महान् आहे. तो विश्वान्तराल-संचारी आहे. आपण झोपलों तरी प्राण झोपत नाहीं तो जागता राहतो पहारेकऱ्याप्रमाणें. त्याचा देहाच्या द्वारांत पहारा चालू असतो, त्याचें चंक्रमण सुरू असतें. तसा हा वायु जग निश्चेष्ट असलें तरी त्याची चेष्टा, हालचाल, सुरूच असते. प्राण ज्या नाड्यांनीं म्हणजे नाल्यांनीं वाहतो त्या इडा पिंगला प्राण-वाहिनी नाकपुड्या आलटून पालटून वाहत असतात. तसा वायु हि कधीं दक्षिण ध्रुवावरून तर कधीं उत्तर ध्रुवाकडून वाहत असतो. तसाच तो कधीं प्राणापान जसे आंतबाहेर ये जा करीत असतात तसा हा वायु हि दर्याबंदरांतून गिरिकंदरांत आणि गिरिकंदरांतून दर्याबंदरांत वाहत असतो. या जागतिक प्राणापानालाच उद्देशून वेदांत म्हटलें आहे, "द्वौ वातौ वातः आसमुद्रात् आपरावतः". एक वायुलहरी बाहेरून आंत जाते, दुसरी आंतून बाहेर येते. असे हे दोन वायु-प्रवाह म्हणजे जगाचे प्राणापानच होत.

प्राण्याच्या अधीन प्राण असतात. प्राणी जीवात्मा लोकांतराला गेला म्हणजे प्राण हि त्याच्या बरोबर जातात आणि प्राण्याचा देह निष्प्राण होतो. तसा हा जगदायु वायु हि परमात्म्याच्या अधीन आहे. पण तो परमात्मा आम्हांला कुठें दिसतो आहे? त्याची खूण हा वायु तेवढा आम्ही पाहतों. त्याचें अचाट सामर्थ्य आम्ही अनुभवतों. आणि म्हणून त्याच्याच नावानें आम्ही त्या परमात्म्याला ओळखतों संबोधतों. जो अनाम त्याचें नाम, जो अरूप त्याचें रूप, जो अगुण त्याचे गुण आणि जो अकर्मा त्याचें कर्म आम्ही गात असतों.

## ४१५. अधोक्षज

मनुष्याला जें ज्ञान होतें तें सारें इन्द्रियज म्हटलें पाहिजे. मनुष्य कल्पना करतो त्याचा हि आधार इन्द्रियद्वारा पंच विषयांचा त्यानें पूर्वी घेतलेला आस्वादच असतो. तो जगांत राहतो त्यावरून तो स्वर्गादि लोकांची कल्पना करतो. इथल्या वाटिकेवरून स्वर्गीय नंदनवनाची कल्पना करतो. इथल्या गायनावरून स्वर्गीय गन्धर्वालापाची कल्पना करतो. इथल्या षड्रसावरून स्वर्गीय अमृताची कल्पना करतो. इथल्या स्त्रीसुखावरून स्वर्गीय अप्सरांच्या सहवासाची कल्पना करतो. इथल्या जरा-मृत्यूवरून स्वर्गीय अजर अमृत जीवनाची कल्पना करतो. सारांश, त्याचें सर्वविध ज्ञान इन्द्रियजन्यच म्हणावें लागतें. परंतु परमात्मा हा या इंद्रियजन्य ज्ञानाच्या कक्षेंत येणारा नाहीं. जें कांहीं तुम्ही पहाल कल्पाल त्या सर्वाहून तो वेगळा आहे. आणि हा वेगळेपणा दाखविण्यासाठीं त्याला अतीन्द्रिय म्हणावें लागतें. मनुष्य व त्याचें ज्ञान इंद्रियांनीं इतकें कांहीं गुंडाळलेलें आहे कीं इन्द्रिय आणि अतीन्द्रिय दोहोंची विभाजक रेखा इन्द्रियेंच होतात. आणि म्हणून त्या परमात्म्याचा इन्द्रियांशीं दुरून हि संबंध नसतांना त्याला अतीन्द्रिय वा अधोक्षज म्हणावें लागतें. अधोक्षज म्हणजे इन्द्रियें अंतर्मुख केलीं, बंद केलीं वा उपडीं घातलीं असतां मनुष्याला अन्तर्यामीं येणारा जो निर्विषय स्वानुभव तो. तेंच परमात्म्याचें स्वरूप होय. तें अमक्यासारखें आहे असें म्हणतांच येत नाहीं. कारण तें जें अमकें तें इन्द्रियगोचर आहे. त्याला आहे नाहीं हि म्हणतां येत नाहीं. कारण आहे नाहींच्या आमच्या कल्पना हि इन्द्रियजन्यच आहेत. जें इन्द्रियजन्य नाहीं, इन्द्रियजन्य- कल्पनादुष्ट नाहीं असें कांहींच नाहीं. म्हणून त्याला नेति नेति च म्हणावें लागतें. तें असें हि नाहीं आणि तसें हि नाहीं. तुम्ही कोणता हि क्रियाकारकवान् शब्द वापरा. तो सर्व तिथें लटका पडतो. म्हणूनच रामदासांनीं ''कळे ना कळे ना कळेना कळेना।'' असें म्हणून हात टेकले आहेत. नव्हे, माथें टेकलें आहे.

## ४१६. ऋतु

''ऋतुः सुदर्शनः कालः'' हा सबंध चरण एक संपूर्ण काल-कल्पना मांडीत आहे. काल ही एक अव्यक्त आणि अचिन्त्य अशी वस्तु आहे. पण तिचें अर्वाचीन रूप म्हणजे कल्प, युग, मन्वन्तर, राजशक इत्यादि कालखंड; संवत्सर ऋतु मास पक्ष अहोरात्र इत्यादि कालावयव आणि प्रहर, घटिका, पल, क्षण, लव, निमेष इत्यादि कालांश हे मात्र व्यक्त आणि चिन्त्य आहेत. कालाचा विचार यांच्याच आश्रयानें करावा लागतो. ह्यांचीं प्रतिनिधिभूत ऋतु आणि सुदर्शन म्हणजे संवत्सर हीं पदें इथें आलीं आहेत. युग, कल्प हे कालखंड फार मोठे म्हणून कल्पनेच्या कक्षेंत धरतां येत नाहींत, तसे लवनिमेष हे अति सूक्ष्म म्हणून ते हि बुद्धीच्या चिमटींत धरतां येत नाहींत. पण ऋतु आणि ऋतुचक्रस्वरूप संवत्सर मात्र सहज लक्षांत येणारे आहेत. ऋतूच्या पालटानें सृष्टींत स्पष्ट फरक दिसून येतो. शिशिरऋतूंत वनराजि सर्व साज टाकून निराभरण होते. तर वसंतांत ती नटते सर्वाभरण-भूषित होते. ग्रीष्मांत सर्व सृष्टि तप्त आणि वर्षाऋतूंत तृप्त होते. भूमि जीवनरसानें संतृप्त

होते, नद नदी वापी कूप तडाग तुडुंब भरून जातात. शरद् ऋतुंत सर्व सृष्टि प्रसन्न होते, संपन्न होते. मेघाडंबर जाऊन आकाश स्वच्छ होतें, जलें स्वच्छ होतात, कमलें फुलतात, शेतें खुलतात. हेमंतांत शेतांतील सोनें घरांत येतें, घरें भरतात धनधान्यानें दुधातुपानें; हिरव्या चाऱ्यानें व गार वाऱ्यानें द्विपाद आणि चतुष्पाद हृष्टपुष्ट होतात. अशा प्रकारें ऋतूमुळें म्हणजेच क्रमिक नियमित परिवर्तनामुळें सर्वत्र 'शान्तिः पुष्टिस् तुष्टिः' होते. म्हणून परमात्मा हा ऋतु होय.

ऋच्छति इति ऋतुः। ऋत आणि ऋतु ऋधातू-पासूनच आलेले शब्द आहेत आणि दोहोंचा अर्थ समान आहे. ऋत म्हणजे अचूक परिणाम. अर्थात् नियम. ऋतु हि अचूक येतो. त्यांत अंतर पडत नाहीं. परमात्मा हा अचूक फलदाता आहे. म्हणून ऋतु होय. फल अचूक पण यथाकाल देतो तो. म्हणून हि तो ऋतु होय.

## ४१७. सुदर्शन

सुदर्शन म्हणजे ज्याचें दर्शन शुभ आहे तो परमात्मा. ज्याच्या दर्शनानें समस्त पापताप नाहींसे होतात तोच सुदर्शन म्हणावयाचा. मनुष्य अनेक पापें करतो आणि परिणामीं ताप पावतो याचें कारण त्याला शाश्वत आणि अशाश्वत यांचा विवेक नसतो हें आहे. तो या सांसारिक भोग्यजातास शाश्वत समजून त्याच्या लाभासाठीं वाटेल तें पाप करतो. हें भोग्यजात केवळ अशाश्वतच नाहीं, तर दुःखरूप हि आहे. आरंभीं तें अमृतासारखें आणि परिणामीं विषासारखें आहे. पण जीवाला इतका पोंच नसतो इतकी दीर्घदृष्टि नसते. त्यामुळें तो मोहाला बळि पडतो. भोग्यजाताचें हें अशाश्वतत्व दुःखरूपत्व जर कळलें आणि वळलें तर जीव पापप्रवृत्त होणार नाहीं. कालरूप भगवान् जीवांना त्यांचें आयुष्य बळ रुचि क्षणाक्षणानें क्षीण करून हा बोध देत असतो. काळाच्याच योगें भोग्यजाताची क्षणभंगुरता आणि दुःखपरिणामिता हि अनुभवाला येत असते. ज्ञानी जिह्वेप्रमाणें संसाराची कटुता क्षणांत समजून उमजतात आणि निवृत्त होतात. अज्ञानी जीवांना जन्म ते जन्म चाटू प्रमाणें संसारांत बुडून राहून हि त्याची कटुता कळत नाहीं. सर्पदष्टाला जसा निंबाचा पाला गोड वाटतो तसा त्यांना हा संसार गोडच वाटत राहतो. आणि म्हणून सुदर्शन-चक्रांत ते भरडले जातात. ज्ञान्यांना सुदर्शन संसारापासून बचावतें तर अज्ञान्यांना तें भरडतें. विश्वरूप भगवान् म्हणतात—'कालोऽस्मि लोकक्षयकृत् प्रवृद्धो लोकान् समाहर्तुमिह प्रवृत्तः' या कालात्मा विश्वरूपाच्या हातांतील सुदर्शनचक्र म्हणजे संवत्सरचक्र होय. या संवत्सररूप चक्राचा वर्षमान हा बुधला होय, अयनें त्याचे दोन बंध होत. बारा मासांचे चोवीस पक्ष त्याचे आरे होत. सहा ऋतु त्याचीं पाठीं होत. आणि काल हीच त्याची वाट वा नेमि होय. हें चक्र भगवंताच्या हातांत अविरत घुमत आहे आणि जीवांचा यथाकर्म यथाश्रुत फलोदय होत आहे. आत्मसत्तेच्याच आधारें हा स्थलकालात्मक सृष्टिप्रपंच घडत मोडत असल्यामुळें भगवंताच्या हातांत तत्प्रतीक शंखचक्रें दिलीं आहेत. संवत्सरात्मक ऋतुचक्र हि सुदर्शनच होय. त्याला जो अनुसरून वागेल, जो ऋतुचर्या पाळील, त्याला तें सुदर्शन होईल, सुख दाखवील. मग तो वैदिक ऋषींच्या वाणींत म्हणेल "वसन्त इत् नु रन्त्यो ग्रीष्म इत् नु रन्त्यः। वर्षाण्यनु शरद् हेमन्तः शिशिर इत् नु रन्त्येः।।" सर्व काळ रमणीय आहेत. सुखद आहेत.

## ४१८. काल

"कालः कलयतां अस्मि" काळ हा सर्वांची मोजणी, गणति करणारा आहे. किती किती ब्रह्मा विष्णु महेश होऊन गेले या गणति काळाजवळ आहे. अर्थात् काळ हा अनन्त आहे. या सान्त सृष्टीचा तो शेष आहे, अवशेष आहे. सर्व नाहींसे झाले तरी तो

नाहींसा होत नाहीं. तो शिल्लक राहतो. शेष राहतो. अर्थात् शेष आणि अनन्त हीं ह्या काळाचींच नामें होत. हा काल परमेश्वराची प्रकृति होय. माणूस जसा आपलाच हात उशाला घेऊन झोपतो तसा परमात्मा आपल्या कालशक्तीच्या शय्येवर पहुडलेला आहे. तो आपल्या प्रकृतीला संगें घेऊन स्वस्थ सुखानुभव करीत आहे. काल ही परमात्म्याची प्रकृति आहे म्हणजे परमात्मा आणि तो अभिन्न आहेत..काल अनन्त, दिक् अनन्त, चित् अनन्त, अशीं अनन्तें अनन्त कल्पिलीं आपल्या आकलनासाठीं तरी तीं वस्तुतः सर्व एकमयच होत. कारण अनन्त ही वस्तु सर्वव्यापक किंबहुना सर्वात्मकच म्हटली पाहिजे. तिथें दुसऱ्याला अवकाशच नाहीं. स्वभावतःच ती अद्वितीय वस्तु आहे. म्हणून विश्वांत सर्वतोऽनन्तरूप एक परमात्म-वस्तुच आहे. 'नेह नानास्ति किंचन' इथें वेगळें दुसरें कांहीं नाहीं. मग ह्या एकालाच आम्ही कालकल्पना करून काल म्हणतो, दिग्देशकल्पना करून दिक् म्हणतों, वस्तुकल्पना करून आत्मा म्हणतों ह्या त्रिपरिमाणांनीं रहित अशी एकहि वस्तु तुम्हांला दाखवितां किंवा कल्पितां तरी येईल का? सुतराम् नाहीं. म्हणून ह्या त्रिधा कल्पित एकालाच सहस्रनामांनीं, नव्हे सहस्रावधि नामांनीं, पुकारलें जातें यथारुचि यथावसर.

### ४१९. परमेष्ठी

परमे तिष्ठति इति परमेष्ठी। जो सर्वोत्तम पदीं विराजमान आहे तो परमात्मा परमेष्ठी होय. वास्तविक परमेष्ठ असें रूप व्हायला पाहिजे. परंतु नारी कोणत्या रूपावर भाळेल त्याचा नेम नाहीं. वाणीनें परमेष्ठ ऐवजीं इन्नन्त परमेष्ठी रूपच पसंत केलें आहे. आणि स्वयंवरवधू-पित्याप्रमाणें वैयाकरणाला वरप्रयोगशरण व्हावें लागलें आहे. परमेष्ठी प्रमाणें जगजेठी हें मराठी पद हि इन्नन्तच आहे. तें वस्तुतः जगज्ज्येष्ठ पासून आलेलें आहे. या दोन्ही पदांचा उल्लेख नामदेवानें आपल्या एका सुंदर अभंगांत एकत्र केला आहे–''गंगा वामांगुष्ठीं, नाभी परमेष्ठी, सखिये जगजेठी देखियेला'' इथें परमेष्ठी पद ब्रह्मदेवाच्या अर्थानें आलें आहे. भूतमात्राच्या दृष्टीनें तो प्रजानाथ उघडच परम म्हणजे सर्वोच्च पदीं विराजमान आहे. परंतु तें पद कांहीं सर्वोत्तम पद, परम पद नव्हे. कारण ''आब्रह्मभुवनाल् लोकाः पुनरावर्तिनोऽर्जुन'' थेट ब्रह्मलोकापासून खालपर्यंतचे झाडून सारे लोक जन्ममृत्यूच्या फेऱ्यांत सांपडलेले आहेत. अर्थात् तें अचिरंजीव पद उत्तम नव्हे. उत्तम पद तें होय, जिथें गेलें असतां पुनरावर्तन नाहीं. ''यद् गत्वा न निवर्तन्ते तद् धाम परमं मम'' अर्थात् आत्मलोक हाच सर्वोत्तम लोक होय. तिथें परमात्मा विराजमान आहे. म्हणून तो परमेष्ठी. भूर्लोकापासून वर आणि खालीं लोककल्पना केली आहे. प्रथम वर वरच्या भूमिकांची कल्पना केली ती भूर् भुवर् स्वर् महर् जनस् तपस् आणि सत्यम् अशी सप्तलोकात्मक आहे. ही सप्तलोककल्पना योगारोहाच्या सप्त भूमिका होत. ह्या जशा योगाच्या पायऱ्या कल्पिल्या तशा भोगाच्या हि कल्पिल्या आणि त्यांना तल अतल वितल तलातल रसातल आणि महातल वा पाताल अशा संज्ञा दिल्या. योगाच्या भूमिका आहेत. भोगाचीं तलें आहेत. भूमिकांवर आरोहण आहे. तलांत अधोगति आहे. चढत चढत माणूस शिखराला पोंचतो. बुडत बुडत तो रसातलाला महातलाला जातो. रस, कामिनी आणि कांचन हें आहे भोगाचें त्रिविध सार. त्या विषयीं परम लोभतो तो भोगी. भोगी म्हणजे साप असा हि एक अर्थ आहे. आणि तो साप राहतो बिळांत म्हणून उत्तरोत्तर अधिक लंपटतेची जी सप्तधा परिकल्पना ती म्हणजे तलादि अधोलोकांची कल्पना होय. पातालांत, म्हणजे भोग्यांच्या परम लोकांत, अमृताचीं कुंडें, नागकन्या आणि रत्नांच्या राशि आहेत. अशी ही लोककल्पना ऊर्ध्वमुख आणि अधोमुख पसरून चतुर्दश झाली आहे. आत्मसत्ता सर्वाधार आणि सर्वातीत आहे. तीच परमेष्ठी.

### ४२०. परिग्रह

परितो गृह्णाति इति परिग्रहः। जो चोहों बाजूनें जीवाला आणि जगताला वेढून आहे तो परमात्मा परिग्रह होय. या जीवजगतांच्या जन्मापूर्वी आणि ह्यांच्या मरणानंतर जो अनादि आणि अनन्त परमात्मा द्रष्टृस्वरूप, निरन्त अवस्थित आहे तोच परिग्रह होय.

**बहूनि मे व्यतीतानि जन्मानि तव चार्जुन।**
**तान्यहं वेद सर्वाणि न त्वं वेत्थ परंतप।।**
**वेदाहं समतीतानि वर्तमानानि चार्जुन।**
**भविष्याणि च भूतानि मां तु वेद न कश्चन।।**

या गीतावचनांत परमात्म्याची परिग्रहता सर्वज्ञताच वर्णिली आहे. गृह्णाति इति ग्रहः। जो धरतो, झपाटतो तो ग्रह होय. परंतु हा ग्रह म्हणजे झपाटणारा भूतयोनि जीव कोणाला तरी केव्हां तरी झपाटतो. आणि त्या झपाटण्यांत वा झडपणींत मग जीव ताळ्यावर राहत नाहीं. स्वतंत्र राहत नाहीं. तो त्या ग्रहाच्या लहरीप्रमाणें वागत असतो, ग्रह-परतंत्र असतो. हें जीवजगत् हि तसें परमात्म्याच्या सत्तेनें परितः म्हणजे सर्वतो परि झपाटलें आहे. आणि कायमचें झपाटलें आहे, तो नाचवील तसें नाचत आहे. सर्वस्वीं परतंत्र आहे. म्हणून तो परमात्मा परिग्रह म्हणावयाचा. 'परितः गृह्यते इति वा परिग्रहः'। अथवा जिकडे पहावें तिकडे आढळणारा, चोहों बाजूला जो हा पसरला आहे, तो पसारा म्हणजे परिग्रह होय. हा सगळा विश्वाचा विस्तार म्हणजे परमात्म्यांचा पसाराच होय. परमात्म्याचा विग्रह म्हणजे मूर्ति आम्हांला दिसत नाहीं. पण हा परिग्रह म्हणजे प्रपंच आम्हांला सर्वत्र दिसत आहे. तोच परमात्मा आहे. तोच त्याचा विग्रह आहे. पृथ्वी त्याचें पादपीठ आहे. स्वर्ग त्याचें मस्तक आहे. चंद्रसूर्य डोळे आहेत. वायु त्याचा श्वास आहे. दिशा त्याच्या भुजा आहेत. अन्तराल त्याचें धड आहे. असा हा परमात्मा परिग्रह रूप पसरला आहे. त्याची संपूर्णमूर्ति अनन्त आणि विश्वतोमुख असल्यामुळें आम्ही सामग्र्यानें पाहूं शकत नाहीं. तथापि जें जें दिसतें तें सारें त्याचेंच रूप आहे. तीं त्याचींच अंगोपांगें आहेत.

### ४२१. उग्र

अर्जुन विश्वरूपाला पाहून म्हणतो–''आख्याहि मे को भवान् उग्ररूपः'' परमात्म्याचें जें निर्गुण रूप आहे तें अचिंत्य आहे. त्याचा कालतः, देशतः आणि वस्तुतः विस्तार अचिंत्य आहे. मग अवर्णनीय म्हणून काय म्हणायचें? तथापि माणसाला आकलन होण्यासाठीं तो अचिंत्याचें चिंतन आणि अवर्णनीयाचें वर्णन करूं जातो. आणि तेंच खरोखर उग्र आहे, भयावह आहे. माणसाला गोंधळांत टाकून देणारें आहे. इंद्रियमनोग्राह्य वस्तु माणसाला सुविज्ञेय होते आणि तीच त्याला रुचते व पचते म्हणून तिला तो गोड मानतो. पण जी अतीन्द्रिय अवाङ्मनसगोचर वस्तु आहे ती त्याला आकलन होऊं शकत नाहीं आणि तिची ती अनाकलनीयताच त्याला भेडसावते, व्यथित करते. त्यामुळेंच तो तिला पाहून म्हणतो ''दृष्ट्वाद्भुतं रूपमुग्रं तवेदं लोकत्रयं प्रव्यथितं महात्मन्, दृष्ट्वा लोकाः प्रव्यथितास् तथाहम्'' दोन पाय, दोन हात, दोन कान, दोन डोळे व एक डोकें असलेला माणूस सर्वसामान्य आहे. पण ज्याला अनेक डोकीं आहेत असा माणूस असामान्य म्हणावा लागेल. भयानक हि म्हणावा लागेल. ज्याला असंख्य डोकीं आहेत तो तर अद्भुतच म्हटला पाहिजे. भयावहच म्हटला पाहिजे. ज्या आत्मसत्तेनें हें सर्वतोऽनन्तरूप विचित्र विश्व धारण केलें आहे तिला अद्भुत, भयानक वा उग्र म्हणायचें नाहीं तर काय म्हणावयाचें? तें कांहीं सौम्य रूप नव्हे. रुचणारें पचणारें रूप नव्हे. परमात्म्याचें विश्वरूप एका बाजूनें निर्गुण तर दुसऱ्या बाजूनें तें सगुण साकार हि आहे आणि हीं दोन्ही हि दर्शनें अनाकलनीयं अतएव व्यथित करणारींच आहेत.

दोन्ही हि दर्शनें अद्भुत आणि भयानकच आहेत. राक्षस भयानक असतोच पण त्याची छाया हि भयानक असते तद्वत्. ज्याशीं गुजगोष्टी कराव्या असें तें दर्शन नव्हे. ज्याला डोळे भरून पहावें, ज्याला बाहू भरून कवटाळावें, ज्यावर रुसावें, ज्याबरोबर बसावें, हंसावें असें जें स्वरूप तसें तें सौम्य नव्हे. म्हणून परमात्मा हा उग्र होय. अग्नींत सर्व दग्ध होतें म्हणून अग्नि हा उग्र होय. परमात्मसत्तेच्या तेजांत सर्व विश्व वितळून पार नाहींसें होतें. म्हणून परमात्मा हा उग्र म्हणावयाचा. सूर्यतेजांत अंधार उरत नाहीं तसा परमात्मतेजांत हा प्रपंच नाहींसाच होतो. म्हणून परमात्मा हा उग्र म्हणावयाचा.

### ४२२. संवत्सर

संवत्सर हा कालगणनेचा एकम् आहे. म्हणून तो कालाचा प्रतिनिधि होय. आमचें संपूर्ण जीवन कालाधीन आहे. कालशक्तीनें ग्रहगोल उदयास येतात मावळतात. कालशक्तीनेंच त्यांचें जीवन चाललेलें आहे. असा हा काल सर्वनियामक आहे. पण मनुष्याला वाटतें मग आमचें कर्तृत्व तें काय राहिलें? आम्ही काय निव्वळ काळाच्या हातांतील बाहुलें आहों? महाभारतांत ह्याबाबत विचार आला आहे. तो दिसायला विरोधी आहे. "कालो वा कारणं राज्ञो राजा वा कालकारणम्—इति ते संशयो मा भूत् राजा कालस्य कारणम्" काळ हा राजाचा नियामक नसून राजाच काळाचा नियामक आहे. म्हणजे चांगल्या वा वाईट काळाचें प्रवर्तन राजा करीत असतो. पण हा विचार गोंडस असला, माणसाचें आत्मस्वातंत्र्य प्रस्थापित करणारा दिसला तरी तो मिथ्या आहे. महाभारताचें सार गीता आहे आणि तींत स्पष्ट म्हटलें आहे कीं "मयैवैते निहता: पूर्वमेव निमित्तमात्रं भव सव्यसाचिन्" अर्जुना जें मीं पूर्वीच योजिलें आहे, त्याला अनुसर. त्या कामीं निमित्तमात्र हो. अहंकार करूं नकोस. हें मी करीन, तें मी करणार नाहीं. असें म्हणूं नकोस. अरे करणारा तूं नाहींस. "ईश्वर: सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति। भ्रामयन् सर्वभूतानि यन्त्रारूढानि मायया।।" तो परमात्मस्वरूप काळच सर्व कांहीं करीत नि करवीत आहे. कृष्णालाहि कौरवांचा नि यादवांचा विनाश टाळतां आला नाहीं. पौरुष प्रयत्न जर काळप्रवाह बदलवूं शकत असता तर कृष्ण या नरवीरांना कां नाहीं वांचवूं शकला? कृष्णाला तें नको होतें असें तर नाहींच. दुर्निवार कालगतीनें ते वैरवश होऊन विनाश पावले. हा काल म्हणजे कोणी जड प्राकृत शक्ति नव्हे. ती ईश्वरी प्रकृति होय. अर्थात् ईश्वराहून ती अभिन्न आहे. ती अनन्त आहे, ज्ञानस्वरूप आहे, सद्रूप आहे. तिची प्रवृत्ति सान्त साहंकार अज्ञ जड जीवाला आकलन होऊं शकत नाहीं. जीवाचें सर्वांत मोठें ज्ञान कर्तृत्व हेंच कीं त्यानें त्या पराशक्तीला वश होऊन रहावें. अर्जुन शेवटीं तेंच करतो. 'करिष्ये वचनं तव' म्हणतो. हा काळच अशा प्रकारें सर्व कांहीं यथावत् करतो. तो कधीं रुकत नाहीं चुकत नाहीं, म्हणून तोच संवत्सर म्हणावयाचा.

### ४२३. दक्ष

दक्ष म्हणजे क्रियादक्ष, कर्तव्यदक्ष. आपल्या कर्तव्यांत अप्रमत्त. "सत्यात् न प्रमदितव्यम्। धर्मात् न प्रमदितव्यम्। स्वाध्याय-प्रवचनाभ्यां न प्रमदितव्यम्।" अशा प्रकारें श्रुतीनें अप्रमादाचा म्हणजेच दक्षतेचा उपदेश दिला आहे. "ब्रह्म सत्यं, जगत् मिथ्या, जीवो ब्रह्मैव नापर:" हें जें परमसत्य आहे जीव जगत् आणि ईश्वर यांच्या स्वरूपाविषयींचें, त्या विषयीं अन्यथा धारणारूप प्रमाद होतां कामा नये. त्या ज्ञेय ब्रह्मानंतर तन्निष्पन्न कर्तव्यब्रह्म जो यज्ञरूप धर्म त्याविषयीं प्रमाद होतां कामा नये. अर्थात् कोणाहि जीवाचा द्रोह होतां कामा नये. 'सर्वभूतहिते रति' धरली पाहिजे. आणि ह्या ज्ञेय आणि कर्तव्य ब्रह्माचा बोध आंत आणि बाहेर सतत जागता रहावा म्हणून वेदाध्ययन आणि वेदप्रवचन म्हणजेच स्वाध्याय, प्रवचनरूप

ब्रह्मघोष होत राहिला पाहिजे. त्यांत एक दिवसहि प्रमाद होतां कामा नये. असें हें त्रिविध ब्रह्मचर्य म्हणजेच अप्रमाद वा दक्षता होय. परमात्मा दक्ष आहे. अर्थात् तो ज्ञप्ति, कृति आणि उक्ति या जीवनाच्या त्रिपरिमाणांच्या विषयीं दक्ष आहे, त्रिदक्ष आहे. तो परमात्मा, सहज त्रिदक्ष आहे. आम्हांला त्या बाबत प्रयत्न करावयाचा आहे. प्रयासपूर्वक दक्ष व्हावयाचें आहे. ज्या विषयीं आम्हांला दक्ष असायला पाहिजे त्याबाबत आम्ही पूर्ण विस्मृत असतों. अशी आहे जीवाची आणि परमात्म्याची दोन ध्रुवासारखी परस्परविरुद्ध स्थिति. ''दूरमेते विपरीते विषूची'' असें उपनिषद् म्हणतें तर गीता तेंच ''या निशा सर्वभूतानां तस्यां जागर्ति संयमी। यस्यां जाग्रति भूतानि सा निशा पश्यतो मुने:'' या शब्दांत प्रकट करते. साध्या मराठींत बोलायचें म्हणजे हा असा जिवाशिवाचा छत्तीसचा आंकडा आहे. परमात्मा दक्ष आहे, आम्ही प्रमत्त आहों. पण आम्हांला या प्रमादाच्या अध्रुवाकडून त्या दक्षतेच्या ध्रुवाकडे प्रगति करावयाची आहे. असा हा जीवनाचा अक्ष आहे, ज्या भोवतीं जीवलोक भ्रमत आहे.

## ४२४. विश्राम

विश्रम्यते अस्मिन् इति विश्राम:। परमात्म्याच्या ठाईं सर्व विश्व विश्राम करतें म्हणून तो विश्राम होय. कल्पांतीं विश्व विश्वेश्वराच्या ठाईं विश्रमतें म्हणूनच केवळ तो विश्राम नाहीं तर नित्यच तें त्याच्या ठाईं विश्रमत असतें. जीव आणि जड सुषुप्तींत त्याच्या ठाईं विश्रान्त होत असतात. त्याच्या ठाईं विश्रान्त होऊन म्हणजे आपला थकवा घालवून ते तिथून परत संजीवन घेऊन नित्यश: परत कार्यक्षम होत असतात. असें संजीवन जर मिळालें नाहीं तर जीवाजीव स्वकार्यक्षमता जी ते श्रमून क्षीण करून बसले असतात, परत भरून काढूं शकणार नाहींत. जीव उघडच श्रमतात आणि विश्रान्त होऊन ताज्या दमानें परत कामाला लागतात हें आपण पहातोंच. पण अजीव जड यंत्र देखील एकसारखें काम करीत राहूं शकत नाहीं. त्यालाहि विश्रान्तीची अपेक्षा असते. तेंहि विश्रान्त होऊन परत पूर्ववत् कार्यक्षम होतें. यन्त्रज्ञ असें म्हणतात. हें बिश्रमण आणि संजीवन ज्यांत आणि जिथून होतें तोच परमात्मा होय. परमात्म्याच्या ठाईं सारें विश्व विश्रान्त होत असतें. त्यावेळीं प्रत्येक भूत म्हणजे जीवाजीव सत्त्व आपलें वेगळेपण टाकून एकमय होत असतें. सुषुप्तींत ब्रह्मा आणि मशक, व्याघ्र आणि शशक असा कांहींच भेद उरत नाहीं. तिथें सर्व नानात्व नाहीसें होऊन एकाकारता, केवलता नांदत असते. हाच विश्राम होय. हाच परमात्मा. नाम आणि रूप धारण करणें हा खरोखर श्रम आहे. भार आहे. मी अमुक आहें, अमुक अमुक माझें कर्तव्य आहे, या विचारानें भूतमात्र भारावलें आहे. हें दडपण गेल्याखेरीज जीवाला विसांवा कुठला? म्हणूनच ज्ञानदेवासारखे तत्त्वज्ञ म्हणतात: ''माझें असतेपण लोपो। नाम-रूप हारपो। ज्ञणें मज वासिपो। भूतजात'' आत्मज्ञाची, सर्वभूतहितेरताची, ही परम गति होय, परमावधि होय. आणि ''अत्र विश्वं भवत्येकनीडम्'' इथेंच विश्वाला परिपूर्ण विसावा लाभत असतो.

## ४२५. विश्वदक्षिण

दक्षिण म्हणजे अनुकूल. उजवा हात हा उजवा म्हटला आहे याचें कारण तो कामाला अनुकूल, उजू पडतो. डावा हात हा डावा म्हटला आहे कारण तो प्रतिकूल पडतो. आडवा पडतो. उजव्या सारखा उजू म्हणजे सरळ पडत नाहीं. म्हणून दाक्षिण्य म्हणजे सारल्य होय, आनुकूल्य होय. जगांत प्रत्येक जीव कोणाला तरी सरळ, कोणाला तरी वांकडा असा असतो. तो आप्तेष्टांशीं सरळ वागतो, परक्यांशीं वांकडा वागतो. जीव हा जगांत असा स्वपरभेद करून वागत असल्यामुळें सर्वत्र शत्रुमित्र निर्माण करतो आणि त्यांच्या स्नेहांत आणि वैरांत बद्ध होतो.

त्यामुळें त्याचें सारें जीवन गुंतागुंतीचें व विषमय होऊन बसतें. हें द्वैत, हा भेद गेला तर जीवन सुतासारखें सरळ होऊन जाईल. मग कोणी परका नाहीं. सर्वच आत्मवत् होऊन जातील आणि आसक्ति व वैर यांचें निर्मूलन होऊन जीवन अमृतमय होऊन राहील. परमात्मा हा असा आहे. तो विश्वदक्षिण आहे. सर्वांना समान सानुकूल आहे तो. तो कुणालाहि प्रतिकूल नाहीं. सर्वांना तो निर्विशेष अनुकूलच अनुकूल आहे. "एकलौतिया बालका। वरि पडौनि ठाके अंबिका। तैसा जो सकलिका। भूतां समु" असें त्या विश्वदाक्षिण्याचें वर्णन ज्ञानदेवानें केलें आहे. तथापि मातेची माया आसक्त असते, एकदेशी असते. त्यामुळें त्या मायलेकरांच्या जिव्हाळ्यांची उपमा परमात्म्याच्या विश्वदाक्षिण्याला देणें अतिच गौण होय. पण एकुलत्या एका अपत्यावरील आईच्या प्रेमातिशयाला अनासक्त व सर्व व्यापक कल्पिलें म्हणजे त्या विश्वदाक्षिण्याची किंचित् कल्पना येऊं शकेल. या विश्वदाक्षिण्यालाच गीतेनें परमयोग म्हटलें आहे :

"आत्मौपम्येन सर्वत्र समं पश्यति योऽर्जुन।
सुखं वा यदि वा दु:खं स योगी परमो मत:।।"

## ४२६. विस्तार

विस्तार म्हणजे विश्वविस्तार. हा विस्तार परमात्मस्वरूपच आहे. परमात्म-सत्तेहून तो भिन्न नाहीं. बीजच वृक्षाकार धारण करतें, अर्थात् तें बीजाहून भिन्न नव्हे तद्वत्. तत्त्वत: तें अभिन्न आहे, पण कार्यत: तर तें भिन्नच म्हटलें पाहिजे. मुळाहून कांहींच वेगळेपणा नसेल तर त्याला विस्तार कसें म्हणतां येईल? बीज 'अणोर् अणीयान्' आहे तर कार्यरूप वृक्ष 'महतो महीयान्' आहे. म्हणून परमात्मा हा विश्वरूपानें विस्तार म्हणावयाचा. पण वरील दोहोंत, कार्य-कारणांत , दिसून येणारें हें अंतर, आभासिक म्हटलें तरी नाकारतां येत नाहीं. आणि त्यामुळेंच विस्तार पदाला अवकाश झाला आहे. जर आभासिकहि अन्तर नसेल तर मग तें स्वरूप केवल एकत्व म्हणावें लागेल. पण तसें केवलत्व मानल्यास कार्यकारणरूप वा कसलाच संबंध संभवणार नाहीं. म्हणून वेदान्त अद्वैततत्त्व प्रतिपादितो, एकत्व वा केवलत्व नव्हे. हें जग दिसायला जग, असायला ब्रह्म आहे. जगत् आणि ब्रह्म यांचा हा संबंध अद्वैतरूप आहे. यालाच विवर्त म्हटलें आहे. हा विवर्त रज्जूसर्पवत् म्हणावा कीं सुवर्णकंकणवत्? रज्जूसर्पवत् म्हटल्यास सर्प भ्रांति ठरतो आणि सुवर्णकंकणवत् म्हटल्यास कंकण भ्रांति नसून वस्तु आहे असें भासतें. वस्तुत: ती हि भ्रांतिच आहे. रज्जूवत् सुवर्णच सत्य आहे. सर्पवत् कंकणाकार मिथ्या आहे, भ्रांति आहे. ही साधार भ्रांतिच विस्तार होय. हा भ्रांतिमय विस्तार वस्तुतः तदाधारभूत अक्षर वस्तूहून अभिन्न असल्यामुळें परमात्मा हा विस्तार म्हटला आहे. तसा या विस्तारानें तो पूर्ण परमात्मा घटत नाहीं वा वाढत नाहीं. म्हणूनहि तो विगतस्तार विस्तार म्हणावयाचा.

## ४२७. स्थावर (स्थाणु)

स्थावरश्च असौ स्थाणुश्च स्थावरस्थाणु:। स्थावर-स्थाणु हें एक नाम आहे. आधीं स्थाणु स्थावर म्हणजे अचल. जंगमाचा, चलाचा, हा विपर्यास होय. या परिवर्तनशील जगांत स्थिर, स्थावर काय आहे? खरोखर एका परमात्म्यावांचून कांहीं सुद्धां स्थिर नाहीं, स्थावर नाहीं. म्हणून जें स्थावर तोच परमात्मा होय. नद्या प्रवाह-नित्य आहेत आणि पर्वत कूटस्थनित्य आहेत. आणि म्हणून चिरस्थायी म्हणून त्यांचा उल्लेख केला जातो. रामायणाबद्दल म्हटलें आहे "यावत् स्थास्यन्ति गिरय: सरितश्च महीतले। तावद् रामायण, कथा लोकेषु प्रचरिष्यति" अर्थात् जशी गंगा, जसा हिमालय चिरस्थायी आहेत तशी रामायणी कथा चिरस्थायी आहे. पर्वताच्या स्थावरतेबद्दल उत्तर-

रामचरितांत पुढीलप्रमाणें उल्लेख आला आहे:

**पुरा यत्र स्रोतः पुलिनमधुना तत्र सरितां**
**विपर्यासं यातो घनविरलभावः क्षितिरुहाम्।**
**बहोर् दृष्टं कालाद् अपरमिव मन्ये वनमिदं**
**निवासः शैलानां तदिदमिति बुद्धिं द्रढयति।।**

अर्थात् सर्व कांहीं बदललें आहे, पण पर्वताच्या टेकड्या जिथल्या तिथें उभ्या आहेत त्यामुळें खात्री पटते आहे कीं तीच ही पंचवटी, तोच हा परिसर! म्हणजे या पृथ्वीवर सर्वांत स्थिर स्थावर कांहीं असेल तर त्या डोंगरांच्या टेकड्या होत. आणि ह्यालाच अनुलक्षून गीतेंत म्हटलें आहे ''स्थावराणां हिमालयः'' जगांत डोंगर स्थावर आहेत आणि त्या स्थावरांत मोठा आहे हिमालय. म्हणून तो भगवद्-विभूति म्हटला. भगवंताच्या अनंत गुणगौरवाचा जो जो अंशभाक् तो तो भगवद्-विभूति होय. परमेश्वराहून स्थावर, चिरस्थायी दुसरें कांहींच नाहीं. म्हणून खरोखर तो एक परमात्माच स्थावर म्हणावयाचा. 'तस्मिन् स्थावर इत्यनन्यविषयः शब्दो यथार्थाक्षरः।' परंतु जगांत त्याचा जो उत्तम प्रतिनिधि तो हि गौरवानें भगवद्-विभूति म्हटला गेला इतकेंच. वस्तुतः तर सशैलवनकानना ही पृथ्वी आणि जी तिचा एक अंश आहे ती ही अनंतपार सृष्टि कल्पान्तीं नाहींशीच होणारी आहे आणि प्रतिक्षणीं हि परिवर्तन पावणारी आहे.

### ४२७. (स्थावर) स्थाणु

स्थावर आणि स्थाणु दोन्ही पदें स्थाधातूपासूनच आलेलीं आहेत. स्थावर म्हणजे अचल, तर स्थाणु म्हणजे अविक्रिय. स्थावर पदानें बाह्यतः तो कांहीं हालचाल करीत नाहीं, जागचा हलत नाहीं असें सुचविलें, तर स्थाणु पदानें अभ्यन्तरतः हि त्याच्यांत कांहीं चलन होत नाहीं, कसली क्रिया होत नाहीं असें सुचविलें आहे. वृक्ष जागचा हलत नाहीं, पण त्याच्यांत 'जायते अस्ति वर्धते विपरिणमते अपक्षीयते म्रियते' ह्या षड् विक्रिया दिसून येतात. परंतु परमात्मा हा अक्रिय तसा अविक्रिय हि आहे. तो कसलीहि हालचाल करीत नाहीं आणि त्याच्यांतहि कसली हालचाल होत नाहीं, परिवर्तन होत नाहीं. म्हणून तो स्थाणु म्हणावयाचा. स्थाणु म्हणजे खुंट. खुंटाला, लांकडाच्या दांडक्याला मुळें फुटत नाहींत किंवा फळें जुटत नाहींत. तो आपला जसाचा तसा असतो—अक्रिय अविक्रिय. परमात्म्याची ही अविक्रियता लक्षून तो शालग्राम वा लिंग म्हणून पाषाण-प्रतीकांत कल्पिला व पूजिला जातो. पण तो परमात्मा कुठें आणि कुठें तो पाषाण, दोहोंचा काय पाड? ज्ञानदेवानें म्हटल्याप्रमाणें 'तो निर्शून्य निरुपम निरंजन निर्वाण। ते दशा पाषाण केवीं पावती?' तो खरोखर निरुपम आहे. पण त्याचें उत्प्रेक्षण असल्या उपमांनीं मानव करीत असतो. वस्तुतः तो परमात्मा निर्गुण निराकार सर्वव्यापक. त्याची मूर्ति कल्पिणें अर्थात् त्याला देश काल नाम रूप लिंग गुण कर्म चिकटविणेंच चूक. पण उपासक उपासनेसाठीं तसें करतो आणि जनतेच्या भ्रमाला तें कारण होतें. गीतेंत भगवंतानें स्पष्टच म्हटलें आहे :

**न कर्तृत्वं न कर्माणि लोकस्य सृजति प्रभुः।**
**न कर्मफलसंयोगं स्वभावस्तु प्रवर्तते।।**
**नादत्ते कस्यचित् पापं न चैव सुकृतं विभुः।**
**अज्ञानेनावृतं ज्ञानं तेन मुह्यन्ति जन्तवः।।**
**अव्यक्तं व्यक्तिमापन्नं मन्यन्ते मां अबुद्धयः।**
**परं भावमजानन्तो ममाव्ययमनुत्तमम्।।**

सारांश, परमात्मा हा जन्मत नाहीं वा जन्माला घालत नाहीं. तो करीत नाहीं वा करवीत नाहीं. तो अक्रिय आणि अविक्रिय आहे. त्याचेंच नांव स्थाणु.

### ४२८. प्रमाण

वस्तूचें यथार्थ ज्ञान म्हणजे प्रमा. तें करून देणारें जें साधन त्याचें नांव प्रमाण होय. अशीं प्रमाणें म्हणजे प्रत्यक्ष, अनुमान शब्द इत्यादि होत. पण हीं

सर्व आत्मप्रत्यय-पर्यवसायीच होत. सर्व प्रवाह जसे शेवटीं समुद्राला च मिळायचे तशीं सर्व प्रमाणें शेवटीं आत्म्याच्या ठाईंच पर्यवसित व्हावयाचीं. सर्वांचा म्हणजे सर्व ज्ञानांचा आणि क्रियांचा आधार स्वात्मा आहे. त्याला सोडून कुठलेंच ज्ञान वा कर्म होऊं शकत नाहीं. म्हणून एकमात्र प्रमाण तो सर्वान्तर्यामी निजात्माच होय. म्हणूनच ज्ञानदेवानें म्हटलें आहे: ''ज्ञानदेवा प्रमाण आत्मा हा निधान'' हा सर्वाधार आत्माच ज्ञानदेवाला प्रमाण आहे आणि पाणिनीय शिक्षेंत वाक्प्रवर्तन कसें होतें याचें विवरण करतांना म्हटलें आहे ''आत्मा बुध्द्या समेत्यर्थान् मनो युङ्क्ते विवक्षया। मन: कायाग्निमाहन्ति स प्रेरयति मारुतम्।। मारुतस् तूरसि चरन् मन्द्रं जनयति स्वरम् ।'' अर्थात् जीवात्मा बुद्धीच्या द्वारा विषयांपर्यंत पोंचून त्यांच्या विषयीं बोलायची इच्छा मनाच्या ठाईं उत्पन्न करतो. आणि पुढें मन कायाग्नि चेतवून तद्द्वारा वायूला प्रेरणा देतें आणि तद्द्वारा वैखरी प्रकटते. या सर्व प्रकियेंत आत्मा च स्वतंत्र आहे. इतर बुद्धि मन इन्द्रियें वाक् सर्व पराधीन आहेत. साधनीभूत आहेत. आणि म्हणून या संपूर्ण प्रक्रियेचा कर्ता जसा आत्मा आहे तसा आणि त्या हि आधीं तो ज्ञाता आहे. म्हणूनच गीतेंत म्हटलें आहे ''ज्ञानं ज्ञेयं परिज्ञाता त्रिविधा कर्मचोदना। करणं कर्म कर्तेति त्रिविध: कर्म -संग्रह:।'' आधीं कर्मचोदना आणि मग कर्म-संग्रह. आणि या दोहोंचा हि आधार आहे तो आत्मा. म्हणून तोच प्रमाण होय. तोच एक स्वाधीन आहे, स्वतंत्र आहे, तो कोणावर अवलंबून नाहीं, पण सर्व त्याच्यावर अवलंबून आहेत अर्थात् खरें प्रमाण तोच म्हटला पाहिजे. त्याच्या वांचून कोणतें हि प्रमेय सिद्ध होऊं शकत नाहीं, कोणतें हि प्रमाण होऊं शकत नाहीं. तोच एक प्रमेय आहे आणि तोच प्रमाण. कारण तो स्वत:च प्रमास्वरूप आहे संविद्रूप आहे. ही संविद्च विज्ञाता आहे, विज्ञेय आहे, विज्ञान आहे.

### ४२९. (अव्यय) बीज

अव्यय बीज हें एक नाम आहे. सविशेषण विशेष्य. परमात्मा हा या विश्व-कदंबाचें अव्यय बीज आहे. त्या अव्यक्त बीजापासून हा व्यक्त वृक्षाकार संभूत झाला आहे. 'यद् दृष्टं तद् नष्टम्' या न्यायानें हा शेवटीं केव्हांतरी म्हणजे कल्पांतीं नाहींसा होणारच. पण तेव्हां हि अव्यक्त हें कायमच राहील म्हणून परमात्मा हा अव्यय बीज म्हणावयाचा. गीतेंत म्हटलेंच आहे:

**अव्यक्तादीनि भूतानि, व्यक्त-मध्यानि भारत।**

**अव्यक्त-निधनानि**

अव्यक्तापासून निघून हें व्यक्त विश्व परत अव्यक्तांत लीन होतें. मध्यंतरीं तें कांहीं काळ भासमान होत राहतें इतकेंच. व्यक्त येतें आणि जातें. परंतु अव्यक्त ना येत ना जात. म्हणून तें अव्यय होय. तसेंच हा विश्वकदंब त्याच्याच पासून आलेला म्हणून त्याला बीज म्हणावयाचें. एरव्हीं तो ना बीज, ना फळ. तो केवलस्वरूप आहे. त्याच्या विषयीं सर्व विधानें जीं केलीं जातात तीं असताच्या अपेक्षेनेंच होत. तुलनेनें तोच आहे म्हणावयाचें. तें हि कांहीं नाहींसें होतें त्या असताच्या अपेक्षेनेंच होय. एरव्हीं त्याला आहे तरी कसें म्हणणार. वृक्षाच्या अपेक्षेनें त्याला बीज म्हणावयाचें तसेंच व्ययीच्या, नाशवंताच्या, अपेक्षेनें त्याला अव्यय म्हणावयाचें. एरव्हीं तो ना बीज, ना अव्यय. तो आपला निरपेक्ष केवलस्वरूप आहे. अव्यय बीज म्हणण्यांत आणखी एक हेतु आहे. बीजाचा अंकुर होऊन तो वाढतो आणि बीज नाहींसें होतें. म्हणजे हें बीज जेव्हां व्यय पावतें तेव्हां त्याच्या बदल्यांत उद्भिज्ज मिळतें. बीजाचा व्यय झाला नाहीं तर उद्भिज्जाचा आय होणार नाहीं. एकच लाडू खायचा हि आणि हातीं ठेवायचा हि, जमायचें नाहीं. परंतु परमात्मा हा तसा आहे.

### ४२९. अव्यय (बीज)

तो एकाच वेळीं बीज आणि वृक्ष आहे. व्यय न पावतां, विकृत न होतां, वृक्षाकार धारण करणारें

बीज आहे तो. भागवतकार म्हणतात, ''जातेऽङ्कुरे कथमु होपलभेत बीजम्'' अंकुराकार प्रकटल्यावर बीज कुठून सांपडणार? हा विश्वाकार प्रकटला मग तें ब्रह्मबीज कुठून दिसणार? परंतु वेदान्त म्हणतो, हें ब्रह्म तसें नाहीं. तें एकाच वेळीं अव्यक्त आणि व्यक्त आहे. व्यक्ताच्या उत्पत्तिस्थितिलयांच्या योगें अव्यक्ताच्या अव्यक्तत्वाचें कांहीं हि बिघडत नाहीं. तें अविकृत जसेंचें तसेंच राहतें. ज्ञानदेवानें म्हटल्याप्रमाणें ''तो एकवट एकला, रचला ना वेंचला। आदि-अंतीं संचला'' आहे. रज्जूवर सर्पाचा आभास झाल्यानें, राहिल्यानें वा मिटल्यानें रज्जूचें रज्जूपण कांहीं घटतें वाढतें का? त्या आभासाचा त्यावर कांहीं एक परिणाम होत नाहीं. परमात्मा हा तसा अव्यय अविक्रिय असून या विश्वाकाराचें बीज म्हणजे आधारभूत सत्तत्त्व आहे. वृक्षबीजरूपकांत आणखी हि एक भाव भरला आहे. कणीस हातीं आल्यावर धांडा कापूनच फेकायचा असतो. संग्राह्य असतें बीजच. त्या प्रमाणें या विश्वकदंबाचें बीज जें परमात्मतत्त्व तेंच घ्यावयाचें आणि हा सारा पसारा फेंकून द्यावयाचा. शेतकरी जो सगळा उदीम करतो तो बीजासाठीं, बीज-संग्रहासाठीं. बीज-संग्रह झाल्यावर तो इतर साऱ्या पसाऱ्याची विल्हेवाट लावतो. तत्त्वज्ञ हि तसाच उदीम करतो. तो ब्रह्मबीज घेऊन विश्वाचें भूस उपणून टाकतो. म्हणूनच परमात्मा हा अव्यय बीज म्हणावयाचा.

## ४३०. अर्थ

अर्थ म्हणजे पदार्थ, द्रव्य. पदकोशांत पदें म्हणजे शब्द दिलेले असतात आणि त्यांचे पर्याय वा प्रतिशब्द दिलेले असतात, परंतु त्यांचे अर्थ म्हणजे पदार्थ वा द्रव्यें हीं असतात जगांत, कोशांत नव्हे. कोशांत म्हणजे त्या पुस्तकांत तुम्हाला तें ज्या द्रव्यांचें बनलें आहे तीं द्रव्यें म्हणजे कागद, शाई आणि धागा तेवढीं मिळतील. दुसरा कोणता हि अर्थ तुम्हांला तिथें सांपडणार नाहीं. तद्वत् या विश्वामध्यें या अनंतपार आणि वैचित्र्यपूर्ण विश्वामध्यें तुम्हांला फक्त एकच पदार्थ दिसेल, आणि तो म्हणजे ब्रह्म, तो म्हणजे आत्मा. बाकी सारीं त्याचीं नामें आणि रूपें म्हणजे निव्वळ पर्याय होत. कुंभाराच्या आव्यांत गाडगीं मडकीं हांडकीं अनेकानेक असतात, पण तिथें पदार्थ म्हणाल तर एकच असतो—माती. कुंभाराचें विश्व मृण्मय असतें. तसें हें परमेश्वराचें विश्व चिन्मय आहे. इथें चिद् वस्तूवेगळें विश्व दुसरें कांहीं नाहीं. ती चिद्वस्तुच तेवढा अर्थ असून बाकी सर्व अनर्थ होय. अर्थ म्हणजे अर्थनीय, प्रार्थनीय वस्तु. हा अर्थपदाचा दुसरा अर्थ होय. पहिला अर्थ म्हणजे सद्वस्तु, दुसरा अर्थ अर्थनीय, अभिलषणीय वस्तु. तिसरा अर्थ द्रव्य. सुवर्णरजतादि मूल्यवान् वस्तु. सत्ता, प्रेमास्पदता आणि बहुमूल्यता तिन्ही जिथें पर्याय होतात तिथें म्हणजे त्या परमात्म्याच्या ठाईं उघडच अर्थघनता आहे. म्हणून तो परमात्मा कोणत्या हि अर्थानें घ्या अर्थच आहे. परम अर्थ आहे, तो पुमर्थ आहे. तो सर्वार्थ आहे, तो स्वार्थ आहे.

## ४३१. अनर्थ

परमात्मा हा परमार्थत: अर्थ आहे, पण लौकिक अर्थानें तो अनर्थच आहे. परमेश्वराची भक्ति केल्यानें, त्याला प्रसन्न करून घेतल्यानें, तुम्हांला का पैसा मिळणार आहे, का बायको मिळणार आहे. का स्वर्ग मिळणार आहे? तुकाराम आपला अनुभव सांगतो : ''देवाची ते खूण आला ज्याच्या घरा। त्याच्या पडे चिरा संसारासी''. त्याची सावकारी गेली, धंदा बसला, घरांतली चीजवस्त गेली, बायको मेली, पोरें मेलीं. स्वर्ग मिळणें दूर, हा लोक हि पारखा झाला. घरीं सदा ददात. नामदेवानें हि हेंच म्हटलें आहे:

**''वैष्णवा घरीं सर्व काळ। सदा झणझणती टाळ**
**कण्या भाकरीचें खाणें। गांठीं रामनाम नाणें**
**बैसावयासी कांबळा। द्वारीं तुळसी रंगमाळा''**

म्हणजे काय कीं दारिद्र्य ही त्यांची मिरास आहे. तें त्यांचें नित्यविशेषण आहे, जसें श्रीयुक्त हें

नारायणाचें. तो नित्य श्रीयुक्तच असावयाचा. नारायण म्हणजे लक्ष्मीनारायणच. तसा त्याचा भक्त म्हणजे ददातनारायण. सगळ्या अर्थांचा तिथें अभाव असावयाचा. देह, गेह, धन, जन, मान सगळें त्याला सोडून जाणार. उरणार त्याच्याजवळ एक निजात्मा. आणि तोच परमात्मा होय. अशा ह्या परमात्म्याला अनर्थ नाहीं तर काय म्हणावयाचें? ह्याच्या नादीं लागला तो इह लोक परलोक दोहोंना हि मुकला. त्याची पुत्रैषणा वित्तैषणा लोकैषणा संपली. त्याला भिक्षाचर्य आणि ब्रह्मचर्य म्हणजे वनवासच सुचायचा रुचायचा आणि अशाचें पारमार्थिक सूत्र म्हणजे ''अर्थमनर्थं भावय नित्यम्''. उलट लोकायतिकांचें सूत्र असतें:

यावत् जीवेत् सुखं जीवेत् ऋणं कृत्वा घृतं पिबेत्।
भस्मीभूतस्य देहस्य पुनरागमनं कुत:।।

अशा प्रकारें परमात्मा हा पारमार्थिकांच्या दृष्टीनें अर्थ तर लोकायतिकांच्या दृष्टीनें अनर्थ आहे. आणि म्हणूनच गीतोपनिषदादि आरण्यक ग्रंथ का भरल्या घरांत बसून वाचायचे? ते तर आरण्यांतच जाऊन वाचले जातील. अंधार आणि उजेड एकत्र कसे नांदणार? भक्तीच्या उजेडांत धनजनमान देहगेह हा अंधार राहूं शकत नाहीं. तिथें बैसावयासी कांबळा आणि कण्याभाकरीचें खाणेंच असावयाचें.

जो स्वत:च अर्थरूप आहे म्हणून ज्याला दुसरें कांहीं अर्थ, अर्थनीय नाहीं, तो अनर्थ.

### ४३२. महाकोश

मन्त्र, कोश, दुर्ग, सेना, प्रजा आणि चार हे राज्याचें षडंग बल होय. सुगुप्त मन्त्र म्हणजे मसलत बुद्धिमान् आणि एकनिष्ठ मंत्रिमंडलावर अवलंबून असते. कोश म्हणजे राज्याचा खजिना. तो राज्यांतील कृषि व उद्योग धंदे आणि व्यापार ह्यांच्यावर अवलंबून असतो. दुर्ग म्हणजे किल्ले. हे परचक्राच्या वेळीं आश्रयाचें स्थान होय. सेना म्हणजे फौज. ती उघडच परचक्रापासून बचाव करते. प्रजा म्हणजे संतुष्ट आणि स्वाभिमानी एकात्म लोक आणि चार म्हणजे हेर. आपला भेद दुसऱ्या राष्ट्राला द्यायचा नाहीं. पण दुसऱ्यांचा काढायचा. त्यासाठीं चार-संस्था. हीं षडंगें ज्या राज्याचीं भक्कम असतात तें राज्य टिकतें. भामाशाह यानें प्रताप राण्याला कोश उपलब्ध करून दिला म्हणून तो मोगलांशीं टक्कर घेऊं शकला. मराठ्यांचें कोशबळ तोकडें होतें. म्हणून त्यांचें राज्य स्थिर होऊं शकलें नाहीं. अशा प्रकारें कोश एक महान् बळ आहे. राज्य काय, कुटुंब काय, कोशाची उपेक्षा केल्यानें नीट चालत नाहीं. आज भारताचें कोशबल क्षीण आहे. त्यामुळें तो परचक्राला आणि स्वचक्राला म्हणजे दुर्भिक्षादि संकटाला समर्थपणें तोंड देऊं शकत नाहीं. बुद्धिपूर्वक मानवशक्तीचा सम्यक् उपयोग सर्व संपत्तीचें मूळ आहे. एका शब्दांत बोलायचें तर बुद्धि च सर्व संपत्तीचें मूळ आहे. कारण द्रव्य, पशु, मानव या सर्वांची नियामक ती बुद्धि च आहे. आणि तिचा हि नियामक अन्तर्यामी आत्मा आहे. आणि म्हणून परमात्मा हा महाकोश म्हणावयाचा. तो सर्वांचें मूळ आहे. सर्व संपत्ति त्याच्याच सत्तेनें त्याच्याच कृपेनें लाभत असते. सकाळीं उठल्याबरोबर करदर्शन करण्याची प्रथा आहे. तें करतांना मंत्र म्हणतात -''कराग्रे वसते लक्ष्मी: करमध्ये सरस्वती। करमूले तु गोविन्द: प्रभाते करदर्शनम्।'' त्याचा हि आशय हाच. आत्मसत्तेच्या आश्रयानें सर्व संपत्ति राहते. म्हणून सकाळीं करदर्शन करावें. अर्थात् त्यांत पहावें कीं परमात्मा हाच गोविंद आहे. तो गो म्हणजे बुद्धि, गो म्हणजे वाणी आणि गो म्हणजे देहेंद्रियें अर्थात् सर्व संपत्ती च्या स्रोतांचा स्वामी आहे. म्हणून तो महाकोश म्हणावयाचा.

### ४३३. महाभोग

ज्या विहिरीला जिवंत झरे नाहींत ती कितीहि मोठी असली आणि तिच्यांत किती हि पाणी असलें तरी तिला अल्पच म्हणावें लागेल. कारण तिचा

जलाचा सांठा अक्षय नव्हे. तो जलाचा महाकोश म्हणतां यावयाचा नाहीं. जो परभृत नाहीं, पण स्वतःच संपत्तीचा अजस्र स्रोत आहे तोच महाकोश म्हणावयाचा. जो समुद्राप्रमाणें सगळीकडचें पाणी गोळा करतो तो नव्हे, तर जो समुद्राप्रमाणें, (मानस) सरोवराप्रमाणें आपल्या अनावर जलोद्रेकांनीं दिगंत परितृप्त करून गंगासागर आणि सिंधुसागर निर्माण करतो तोच महाकोश होय. अदाता सागर कृपण होय. दाता झरा उदार होय आणि तोच महाकोश. त्याचप्रमाणें महाभाग. ज्याच्या अधीन भोगाची सामग्री नाहीं तो पराधीन पुरुष महाभोग असूं शकत नाहीं. सत्राजिताकडे स्यमंतक मणि होता. तो प्रत्यह त्याला सुवर्ण देई. त्यामुळें त्याचा भोग सहजच इतरांहून आगळा होता. इतर मितंपचच होते त्याच्यापुढें. कारण त्यांचा आय पराधीन असल्यामुळें मोजका होता. आणि ह्याचा आय होता अमित. कांकीं तो होता स्वाधीन. त्याप्रमाणें ज्याच्या भोगाचें साधन स्वाधीन आहे तोच महाभोग म्हणावयाचा. ज्याचें भोग-साधन पराधीन आहे. तो केवढा हि मोठा पगारदार असला तरी तो अल्पभोगच म्हणावयाचा. म्हणूनच जुनी म्हण आहे "उत्तम शेती, मध्यम व्यापार, अधम नोकरी" शेती उत्तम कां? कारण ती स्वायत्त आहे. मेहनत करा आणि खा. व्यापार मध्यम, कारण त्यांत कांहीं अंशीं पराधीनता आहे. माल मिळाला पाहिजे, तेव्हां व्यापार होणार. नोकरी चाकरी अधम. कारण तींत तुम्ही सर्वस्वीं पराधीन असतां. मालक देईल तेव्हां आणि तितका तुमचा तुकडा. म्हणून म्हणतात "पुस्तकी विद्या आणि परस्वाधीन जिणें नाहीं कामाचें, नाहीं कामाचें." परमात्मा हा सर्वस्वीं आत्म-निष्ठ असल्यामुळें तो महाभोग होय.

"आत्मन्येवात्मना तुष्टो महाभोगः स उच्यते"

### ४३४. महाधन

ज्याच्या योगें आपलें ऐहिक जीवन चालतें त्या द्रव्याला म्हणतात धन. याचें महत्त्व माणसाला किती वाटतें तें सांगायला नको. माणूस शतदरिद्र असला तरी तो आपल्या मुलामुलींचीं नांवें हीरालाल, मोतीलाल, सोनाबाई, पुतळीबाई अशीं ठेवतो. मी दरिद्र असलों तरी माझीं मुलें मिळवितील संपत्ति, अशी तो आशा करीत असतो. त्या आशेवर तो जगत असतो. धन आणि धनाची आशा त्याला जगवीत असते. कारण त्या धनानेंच ऐहिक जीवनांतील सर्व सुखें माणसाला मिळवितां येतात अशी त्याची श्रद्धा असते. आणि म्हणून शंकराचार्यांनीं किती हि सांगितलें की "अर्थमनर्थं भावय नित्यम्" तरी त्याचा तो आपल्या श्रद्धेप्रमाणें नेमका विरुद्ध अर्थच घेत असतो. अर्थ हाच अर्थ आहे, इतर सारा अनर्थ आहे अशी तो मनोमन खूणगांठ बांधून असतो. आणि या श्रद्धेला अनुरूप असेंच त्याचें जीवन असतें आणि व्यावहारिक सत्य आणि पारमार्थिक सत्य अशीं दोन जगें मानिलीं म्हणजे दोहोंची व्यवस्था लागते. एका क्षणाला मनुष्य एकाच जगांत जगूं शकतो. ती निवड त्याला करावयाची असते. ऐहिक पुरुष व्यावहारिक सत्य मानून जगत असतो. पारमार्थिक पुरुष पारमार्थिक सत्य लक्षून चालत असतो. त्याचें सूत्र असतें "ब्रह्म सत्यं, जगत् मिथ्या। जीवो ब्रह्मैव नापरः" आणि ही श्रद्धा, हा बोध आणि तदनुसार जीवनाची सरणी ही असतें त्याचें धन. त्याला च महाधन म्हणावयाचें. कारण ऐहिक धन अशाश्वत आहे, तर हें धन शाश्वत जीवनाची पुंजी आहे. या पुंजीवर परमार्थाचा उदीम होत असतो. ऐहिक धनानें मनुष्याच्या मुखाला काळोखी फासली जाऊं शकते, अर्थात् तें अधन म्हणावयाचें. परंतु पारमार्थिक धनानें मनुष्याचें मुख उज्जवल होतें, जीवन धन्य होतें. म्हणून तेंच खरें धन म्हणावयाचें. आणि जें खरें तेंच महान्. परमात्मा हा तसा महाधन आहे. महाकोश, महाभोग, महाधन हीं तिन्ही पदें बहुव्रीहि आहेत.

### ४३५. अनिर्विण्ण

"ब्राह्मणो निर्वेदं आयात्, नास्ति अकृतः कृतेन" असें उपनिषद्वचन आहे. कर्माच्या योगें अकृत

म्हणजे अकृत्रिम आत्मभाव लाभत नसतो हें ओळखून "ब्राह्मणानें म्हणजे विज्ञानी पुरुषानें निर्वेदास जावें म्हणजे वेदोक्त काम्य कर्माच्या पार व्हावें, कर्मोत्साह सोडावा." इथें निर्वेद शब्द श्लिष्ट आहे. तो वेदोक्त कर्मकाण्डाचा निषेध करतो आणि त्याच बरोबर उपनिषदुक्त योगाचा विधि सांगतो. हा योग, त्याला तुम्ही कोणतें हि नांव द्या, निर्वेदमूलक आहे. म्हणून तो निर्वेद या पदानेंच व्यक्त केला जातो. उपनिषदांप्रमाणेंच गीतेनें हि हा निर्वेद शब्द साभिप्राय आणि श्लिष्ट वापरला आहे. त्याचा अनुवाद होऊं शकेल, भाषांतर होऊं शकणार नाहीं. गीताईत "आलें येईल जें कानीं तेव्हां जिरविशील तूं" म्हणून जे "तदा गन्तासि निर्वेदं श्रोतव्यस्य श्रुतस्यच" याचें मराठी केलें आहे तें मुळांतील खुबी, श्लेष, व्यक्त न करणारें आहे. गीतेच्या दुसऱ्या अध्यायांतील सांख्यबुद्धि आणि योगबुद्धि या दोहींना गुंडाळणारा असा हा निर्वेद शब्द आहे. उपनिषदांच्या निर्वेद शब्दाप्रमाणेंच ब्राह्मण शब्द हि गीतेनें विज्ञानी या विशिष्ट अर्थानें वेदवादीच्या विरुद्ध अर्थानें वापरला आहे. बुद्धिशरण तो ब्राह्मण, फलशरण तो कृपण. गीतेच्या दुसऱ्या अध्यायांतील ४०-५३ हे श्लोक वेदवाद विरुद्ध उपनिषद्विचार थोडक्यांत पण साम्प्रयानें व्यक्त करणारे आहेत. या प्रकरणांत उपनिषदांतील अनेक शब्द गीतेनें जसेचे तसे वापरले आहेत.

पण हें तर सर्व निर्वेदाचें विवरण झालें. परमात्म्याला इथें तर अनिर्विण्ण म्हटलें आहे. परमात्म्याला कर्म-निर्वेद नाहीं. वीट नाहीं. तो उत्साहानें अनन्त कर्मे करीत आहे. पण हा उत्साह फलासक्ति नसल्यामुळेंच आहे. अहंता ममता फलासक्ति रागद्वेष इत्यादि भाव कर्मशक्ति क्षीण करणारे आहेत. अज्ञानामुळें जीव त्यांना कर्मप्रेरक समजतो. ईश्वर सर्वज्ञ. तो त्यांतून सहजच मुक्त आहे. आणि म्हणून तो अनिर्विण्ण म्हटला आहे. त्याची कर्मस्फूर्ति अजस्र आहे. पण त्या कर्माचा त्याला यत्किंचित् हि भार नाहीं. कारण, ते कर्म अकर्म झालेलें असतें.

## ४३६. स्थविष्ठ

स्थविष्ठ म्हणजे अत्यंत स्थूल. हा जो व्यक्त विश्वाकार दिसतो आहे तोच स्थविष्ठ परमात्मा होय. ध्रुवतारका आणि सूर्यचन्द्र ग्रह नक्षत्रें, मेघ आणि विद्युद्, वृष्टि आणि वारे, डोंगर, टेकड्या, नद्या-नाले, ताल-तलाव आणि सागरोपसागर व महासागर ह्या उत्तम, मध्यम आणि अधम लोकांतील, स्वर् भुवर् आणि भूर् लोकांतील, मुख्य मुख्य घटकांनीं नजरेंत भरणारा जो परमात्मा तोच स्थविष्ठ होय. हा समस्त व्यक्त विश्वाकार म्हणजे स्थविष्ठ परमात्मा म्हटल्यानंतर कवींनीं त्रिभुवनें सप्त भुवनें वा चतुर्दश भुवनें घेऊन त्याच्या अवयवांची आपआपल्या रुचीप्रमाणें कल्पना केली आहे. ह्या स्थूल नि स्थविष्ठ परमात्म्याचें स्वर्ग मस्तक आहे. चंद्रसूर्य डोळे आहेत. अग्नि मुख आहे. आकाश शरीर आहे. दिशा हस्त आहेत. काल चरण आहे आणि ही पृथ्वी पादपीठ आहे असें स्थूल मानानें म्हणतां येईल. या विश्वरूपाला पाहून अर्जुन भ्याला. त्याला विश्वरूपाच्या प्रवृत्तीचा कांहीं बोधच होईना. देशतः आणि कालतः या अनंताचा या विश्वाच्या भूगोलाचा आणि इतिहासाचा काय बोध आहे? हा बोध देशकालोपाधिक बुद्धि पेलूं शकत नाहीं. त्याचा विचार करतांना हि घाबरी होते. त्यासाठीं निरुपाधिक भूमिकेवर चढावें लागतें. जगद्गुरु भगवान् कृष्ण त्या भूमिकेवरून अर्जुनाला तो आत्मबोध देत आहे. कोणता आहे तो बोध? "ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति। भ्रामयन् सर्वभूतानि यन्त्रारूढानि मायया।। तमेव शरणं गच्छ सर्वभावेन भारत। तत्प्रसादात् परां शान्तिं स्थानं प्राप्स्यसि शाश्वतम्।" परोक्षतेनें दिलेला हाच बोध सरते शेवटीं भगवान् अपरोक्षत्वें देत आहेत. "सर्वधर्मान् परित्यज्य मामेकं शरणं व्रज। अहं त्वा सर्वपापेभ्यो मोक्षयिष्यामि मा शुचः" दिक्कालाद्यतीत चिन्मात्र होऊन राहिल्या खेरीज या विश्वांत कुठें हि क्षेम नाहीं. इतर सारें क्षयी आहे. आणि सारी प्रवृत्ति, सारी

विश्वप्रक्रिया संहाराची आहे. हाच तो परमार्थबोध होय. `भगवान् म्हणून म्हणतात ''ऋतेऽपि त्वा न भविष्यन्ति सर्वे।''

### ४३७. अभू

भवति इति भूः। न भूः अभूः। जो होतो तो भू होय. जो भू नव्हे तो अभू म्हणावयाचा. सर्व व्यक्त सृष्टि भू आहे. होणारी आहे, जन्मणारी आहे. परंतु परमात्मा हा अभू आहे, न होणारा, न जन्मणारा आहे. जें होतें त्याच्या पाठीमागें षड्विक्रिया लागतात–जन्मणें, असणें, वाढणें, बदलणें, झिजणें, मरणें. परंतु जो मुळीं जन्मतच नाहीं त्याच्या मागें उघडच कोणती हि विक्रिया लागूं शकत नाहीं. परमात्मा हा तसा अविक्रिय होय. म्हणून तो अभू म्हणावयाचा. परमात्मा हा वस्तुतः सर्व-विलक्षण आहे. जगांतील कोणत्याहि वस्तूनें त्याचें वर्णन व्हावयाचें नाहीं म्हणून ह्या सर्वांचा निषेध करावा लागतो. त्याचें वर्णन करतांना अभूः हा नञ्समास हि तसाच आहे. नेति नेति हाच त्याचा आशय. आत्मतत्त्व जन्मत नाहीं मरत नाहीं, असत नाहीं नसत नाहीं, वाढत नाहीं घटत नाहीं. तें केवलस्वरूप आहे. अनिर्वचनीय आहे. आहे म्हटलें तर तें विक्रियेंत पडतें. असणें ही षड्विक्रियेपैकीं एक आहे. दोन स्थित्यंतरांमधील स्थिति म्हणजे असणें होय. म्हणून त्याला आहे म्हणतां येत नाहीं. नाहीं म्हटलें तरी तें विक्रियेंत सांपडतें. आणि जी वस्तु सद् आहे तिला नाहीं कसें म्हणावयाचें? म्हणून त्याला नाहीं हि म्हणतां येत नाहीं. जी वस्तु पूर्वी नव्हती ती नंतर आली म्हणजे तिला झाली म्हणतात. पण जें निरन्तर आहेच आहे त्याच्या बाबतींत होणें या क्रियेला वावच कुठें आहे? म्हणून तें होत नाहीं, जन्मत नाहीं. तें शाश्वत असल्यामुळें मरणें हि त्याला लागू पडत नाहीं. वाढणें म्हणजे आधींच्याहून मोठें होणें आणि घटणें म्हणजे आधींच्याहून लहान होणें. पण जिथें आधीं मागाहून असा कालविभाग संभवत नाहीं त्याच प्रमाणें जिथें नवीन कांहीं जोडतां येत नाहीं किंवा मुळांतून कांहीं खोडतां येत नाहीं तिथें वाढघट कशी व्हावयाची? त्यामुळें याहि विक्रिया त्याच्या ठाई संभवत नाहींत. हें समस्त विचित्र विश्व षड्विक्रियांचा खेळ आहे. पण त्यांत तो परमात्मा कुठेंच सांपडत नाहीं. तद्-विलक्षणता हेंच त्याचें लक्षण. अभू त्याचाच द्योतक वाचक होय.

### ४३८. धर्मयूप

धर्मरूप यूप तो धर्मयूप होय. यूप ही यज्ञीय परिभाषा आहे. यूप म्हणूजे यज्ञीय पशु बांधावयाची मेढ वा खांब. आमचें जीवन हा यज्ञीय पशु आहे. यज्ञात त्याचा बळि द्यावयाचा आहे. अर्थात् आमचें संपूर्ण जीवन धर्ममय म्हणजे यज्ञमय झालें पाहिजे. यज्ञांत खपलें पाहिजे. असें जेव्हां होईल तेव्हांच यज्ञ संपन्न होईल. हा सामान्य यज्ञ नव्हे. सामान्य यज्ञ स्थूल असतो. भौतिक असतो. मर्यादित कालाचा असा असतो. परंतु हा जीवन-यज्ञ आजीवन चालावयाचा आहे आणि ह्यांतील यजमान, यजमान-पत्नी, यज्ञवेदी, यज्ञाग्नि, यूप, पशु, आज्य, समिधा इत्यादि सर्व यज्ञसामग्री जीवनरूप असते. हा आध्यात्मिक यज्ञ होय. ज्ञानी पुरुष हा असा यज्ञ करीत असतो. ''सर्वं कर्माखिलं पार्थ ज्ञाने परिसमाप्यते'' सर्व कामांची परिणति अखेर ज्ञानांतच व्हायची आहे. यज्ञ, योग, पूजा इत्यादि विधि अखेर आध्यात्मिकतेंत परिणत होतात. त्रिसुपर्णांतील पुढील वचनाचा हाच आशय आहे. ''ॐ तस्यैवंविदुषो यज्ञस्य, आत्मा यजमानः, श्रद्धा पत्नी, शरीरं इध्मं, उरो वेदिः, लोमानि बर्हिः, वेदः शिखा, हृदयं यूपः, काम आज्यं, मन्युः पशुः, तपः अग्निः, दमः शमयिता, दक्षिणा वाक् होता, प्राणः उद्गाता, चक्षुः अध्वर्युः, मनः ब्रह्मा, श्रोत्रं अग्नीत्।। सर्ववेदसं वै एतत् सत्रम्।'' धर्मवेगळा जीवन वेगळें असें द्वैत राहतां कामा नये. धर्म हेंच जीवन असें झालें पाहिजे. आमचीं आदर्श काव्यें रामायण महाभारत आहेत. त्यांचे नायक राम आणि

धर्मराज युधिष्ठिर होत. दोघे हि धर्मपुरुष आहेत. रामराज्य आणि धर्मराज्य हे पर्यायच आहेत. राम म्हणतो : ''नाहं अर्थपरो देवि लोकं आवस्तुमुत्सहे। विद्धि मां ऋषिभिस्तुल्यं केवलं धर्ममाश्रितम्।'' धर्मराज म्हणतो—धर्म फल-लोभानें आचरावयाचा नसतो. मी धर्माचा वाणी नाहीं. इकबाल म्हणतो ''कुछ बात है कि हस्ती मिटती नहीं हमारी'', ती कुछ बात हा धर्माचा आदर्श, हा धर्माचा आग्रह आहे.

''ज्यांत आपलें संपूर्ण जीवन होमायचें तो धर्म हाच यज्ञ होय आणि त्यांत ज्याला आपला हा जीवपशु बांधला आहे तो यूप म्हणजे परमात्मा होय, आमचें जीवन त्याच्या हातीं आहे.

### ४३९. महामख

ज्याचा मख मोठा तो महामख परमात्मा होय. क्षुद्रदेवतांचे क्षुद्र मख होतात. परमात्मा हा महादेव म्हणून त्यांचा होणारा जो मख तो महामख म्हणावयाचा. एखादा यज्ञ लहान किंवा मोठा कशावरून म्हणावयाचा? जितका सोहळा मोठा तितका तो मोठा यज्ञ म्हटल्यास महत्त्व देवतेला न दिलें जातां बाह्य आडंबराला दिलें जातें म्हणून हें लक्षण अन्वर्थक नव्हे. तर जिथें महादेवाची, परमात्म्याची, आराधना होते तोच महामख म्हटला पाहिजे. पण एखाद्या यज्ञांत परमात्मा यजिला पूजिला भजला जातो कीं अन्य कोणी देवता हें कसें ठरवावयाचें? त्याची सोपी खूण आहे. जिथें कुठल्या कामनेनें यज्ञ होतो तिथें तो अन्यदेवताराधन आहे असें समजावें. जिथें अशा कुठल्याहि कामनेनें आराधन होत नाहीं तो आत्मयज्ञ समजावा, आणि असा निष्काम आत्मयज्ञच महामख होय.

ज्या यज्ञाचा सोहळा दीर्घकाल चालतो आणि ज्यांत असंख्य लोक भाग घेतात तो उघडच महामख म्हणावयाचा. पण हा असा मख कोणाचा होतो? एक परमात्म्याचाच. म्हणून तो महामख. कामनेनें ज्या देवतांचे यज्ञ होतात ते यज्ञ कामना करणारेच करणार आणि कामना-पूर्ति होईपर्यंतच करणार. म्हणून हे असले यज्ञ अल्प वा क्षुद्रच म्हटले पाहिजेत. परमात्म्याच्या यज्ञाला निमित्त नाहीं म्हणून तो निरवधि चालणार आणि सर्वच त्यांत भाग घेणार. म्हणून तो सर्वान्तर्यामी परमात्माच महामख होय. सर्व जीव निजान्तर्यामीवर अनिमित्त आणि निरवधि प्रेम करीत असतात. अशा प्रकारें निरपवाद सर्व जीव ज्यावर प्रेम करतात आणि नित्यनिरन्तर करतात त्याहून मोठा मख, मोठा सोहळा, कोणाचा म्हणावा?

सारांश, कोणत्या हि दृष्टीनें पहा, मोठी देवता म्हणून पहा वा मोठा सोहळा म्हणून पहा, परमात्माच महामख होय.

### ४४०. नक्षत्रनेमि

सूर्य-चन्द्रादि ग्रह-गोल ज्या क्रान्तिवृत्तांतून फिरत आहेत ते क्रांतिवृत्त बारा राशींत आणि सत्तावीस नक्षत्रांत विभागलेलें आहे. अशी ज्याची नक्षत्रमय नेमि म्हणजे वाट आहे तो नक्षत्रनेमि म्हणावयाचा. नक्षत्र म्हणजे वाटेवरचा तळ. सर्व तेज परमात्म्याचेंच असल्यामुळें चंद्रसूर्यादि तेजोराशि हे भगवद्विभूति होत. आणि म्हणून त्यांच्या अनुषंगाने परमात्मा हा नक्षत्रनेमि म्हटला आहे.

शंकराचार्यांनीं नेमि म्हणजे नाभि वा मध्य वा केन्द्र अशासारखा अर्थ घेतला आहे. हें जें तारकामय ज्योतिश्चक्र आहे त्याला शिशुमार संज्ञा आहे. त्या शिशुमार संज्ञक ज्योतिश्चक्राचा नाभि, बुधला ध्रुव होय. त्या ध्रुवाच्या ठाईं हें समस्त ज्योतिश्चक्र केन्द्रित असून त्याच्याच प्रेरणेनें प्रेरित होत आहे. अशा प्रकारें ध्रुवसंज्ञक परमात्मा हा ज्योतिश्चक्राचा अन्तर्यामी नियन्ता म्हणून नक्षत्रनेमि म्हणावयाचा.

रथचक्राचीं मुख्य अंगें नाभि म्हणजे बुधला, अर वा शंकु म्हणजे आरे, प्रधि म्हणजे पाठे आणि नेमि म्हणजे वाट वा धाव होत. ह्या परिभाषेंत नेमिशब्द चक्रकेंद्र-वाचक नाहीं तर चक्रपरिधि-वाचक आहे हें उघड आहे. ''नीचैर् गच्छत्युपरि च दशा चक्रनेमिक्रमेण'' ''आ मनोर् वर्त्मन: परं न व्यतीयु: प्रजास्तस्य नियन्तुर् नेमिवृत्तय:'' इत्यादि उदाहरणांत नेमि शब्द परिधि- वाचकच आहे. नाभि या अर्थानें तो कुठेंच आलेला नाहीं. मग शंकराचार्यांनीं तो त्या अर्थीं कसा घेतला? बहुतकरून तसा अर्थ ''ईश्वर: सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति। भ्रामयन् सर्व भूतानि यन्त्रारूढानि मायया।'' या वचनाकडे दृष्टि देऊन केला असावा. स्वाध्याय- ब्राह्मणग्रंथांत शिशुमारचक्राच्या वर्णनांत ''विष्णुर् हृदयम्'' असें वचन आलें असल्याचें त्यांनीं म्हटलें आहे. तथापि नेमिशब्दाचा नाभि असा अर्थ अपरिहार्य नाहींच. पुढें हि 'गभस्तिनेमि' आलें आहे तिथें हि त्यांनीं '' गभस्तिचक्रस्य मध्यें सूर्यात्मना स्थित: असें म्हटलें आहे .नेमिशब्दाचा अर्थ मध्य नाहींच. तथापि नक्षत्रनेमि गभस्तिनेमि हे बहुव्रीहि समास कल्पिले म्हणजे नक्षत्रें आहेत नेमि म्हणजे परिधि ज्याचा, गर्भस्ति म्हणजे किरण आहेत नेमि ज्याचा तो केन्द्रस्थानीय परमात्मा असा अर्थ निष्पन्न होतो आणि शंकराचार्यांचा हि आशय तोच.

## ४४१. नक्षत्री

उपकरणार्थीं त्र प्रत्यय लागून वक्त्र श्रोत्र नेत्र गात्र पात्र इत्यादि शब्द साधले आहेत. तसाच नक्षत्र हा शब्द नक्ष् म्हणजे जाणें, प्रवास करणें त्याला उपयोगी जें विश्रामस्थान तें नक्षत्र होय. चंद्रसूर्यादिकांचीं आपल्या नित्य प्रवासांतील अशीं हीं घरें सत्तावीस वा अठ्ठावीस मानिलीं आहेत. अश्विनी भरणी कृत्तिका रोहिणी इत्यादि त्यांचीं नांवे होत. या नक्षत्रांच्या नांवातील बरीचशीं पदें स्त्रीलिंगी आहेत असें दिसून येतें. कारण 'गृहिणी गृहमुच्यते.' गृहिणी शिवाय घर वसत नाहीं. अर्थात् हीं सत्तावीस अठ्ठावीस घरें म्हणजे चंद्राच्या तितक्या पत्नी आणि त्यांचीं तीं वेगवेगळीं भवनें होत. खलाशी हे नित्य प्रवासी असतात. त्यामुळें त्यांचीं देशोदेशीं बंदराबंदरावर घरें असतात. चंद्र सूर्य हे हि तसेंच आकाश-समुद्रांतील दर्यावर्दी होत. त्यांची सफर सारखी चालली असते. म्हणून त्यांचीं हीं इतकीं घरें आणि गृहिणी.

सर्व तेज परमात्म्याचें आहे आणि चंद्रसूर्य ह्या त्या तेजाच्या ठळक विभूति आहेत. म्हणून त्या विभूतींना अनुलक्षून परमात्मा हा नक्षत्री म्हणावयाचा. पण त्याच बरोबर तो परमात्मा आत्मतेजोरूपानें प्रत्येक जीवाच्या किंबहुना भूताच्या ठाईं ज्या अर्थीं विसावला आहे, वसला आहे, त्या अर्थीं हि तो नक्षत्री होय, आवासी होय. त्याचे असे हे आवास सत्तावीस वा अठ्ठावीस नाहींत तर अगणित आहेत. तो जगन्निवास आहे. सर्व त्याचेच निवास आहेत. अगणित आहेत. तो ''ईशावास्यं इदं सर्वं यत्किंच जगत्यां जगत्'' या जगतामध्यें म्हणजे चतुर्दश हि भुवनांमध्यें जें कांहीं जगत् म्हणजे येणारें जाणारें आहे तें सारें ईश्वराचें आवास्य आहे, आवासस्थान आहे. त्या प्रत्येकाच्या ठाईं ईश्वराची वसति आहे. ओसाड असें या जगांत कांहींच नाहीं. सर्वत्र ईश्वराची वसति आहे. तो वासुदेव वसला आहे. जन तेवढी वसति आणि विजन म्हणजे ओसाड असें नाहीं. तें रितें नाहीं, पूर्ण आहे. परमात्म्यानें परिपूर्ण आहे.

## ४४२. क्षम

क्षम म्हणजे समर्थ, क्षम म्हणजे क्षमावान्. जो समर्थ असतो तोच क्षमा करूं शकतो. उंदीर मांजराला क्षमा करूं शकत नाहीं. कुत्रा मांजराला क्षमा करूं शकतो. उंदराच्या ठाईं मांजराचें पारिपत्य करण्याचें सामर्थ्य नाहीं कुतऱ्याच्या ठाईं तें आहे. अहिंसा ही क्षमा आहे, तो सामर्थ्याभाव नव्हे. अक्षमाची, असमर्थाची, अहिंसा ही अहिंसा नसून तो हिंसासामर्थ्याभाव आहे, दुबळेपणा आहे. मनानें द्वेष करूं शकत असतां जो आपल्यावर अन्याय वा जुलूम

करणाऱ्याचा द्वेष करीत नाहीं, वाणीनें निंदा करीत नाहीं, कृतीनें अपाय करीत नाहीं तर त्या विषयीं आदर प्रेम बाळगतो, त्याचे गुण घेतो, त्याला आत्मीयतेनें उपकरतो, पण त्याच्या अन्यायाला वश होत नाहीं तो अहिंसकच क्षम होय. तोच आपल्या सर्वदु:खसहनशीलतेनें आणि परानुकंपेनें प्रह्लादवत् सत्याग्रही क्षम होय, क्षमावान् होय. परमात्मा हा सर्वसमर्थ असतां तो अज्ञान जीवांचे अनाचार आणि अत्याचार आशावन्त राहून सहन करीत आहे. क्षमा करीत आहे. अज्ञान आणि अतएव दुर्वृत्त मुलगा शहाणा होईल, नीट वागेल अशी आशा बाप सदैव बाळगून असतो आणि मुलाविषयींचें वात्सल्य कमी होऊं देत नाहीं, त्याचा तिरस्कार करीत नाहीं, उपचार करतो, उपकार करतो. परमात्मा हा तसा निग्रह-समर्थ असून आशा बाळगून अनुग्रह च करीत आहे. क्षमा करीत आहे. म्हणून तो क्षम दयानंदांनीं महादेवाच्या पिंडीवर उंदरांना उड्या मारतांना पाहिलें आणि हा असा कसा देव जो आपल्या प्रजेला दंगामस्ती करूं देतो? त्यांना आवरतां हि येत नाहीं त्याला? अशा विचारानें त्यांनीं मूर्तिपूजा निषिद्ध ठरविली आणि आर्यसमाजाची स्थापना केली. पण ह्या पंडिताला असें कां सुचलें नाहीं कीं महादेव किती क्षमाशील आहे! तो आपल्या प्रजेचा अविनय पोटांत घालीत आहे? आईच्या अंगावर मुलें बागडणार नाहींत तर काय भुताच्या अंगावर बागडणार? परमात्मा बापासारखा समर्थ आणि आईसारखा क्षमाशील आहे. म्हणून तो क्षम.

### ४४३. क्षाम

जो क्षम आहे, ज्याच्या ठाईं क्षमेची क्षमता आहे, तो धष्टपुष्ट राहत नाहीं. सतत सहनच करीत राहिल्यामुळें तो क्षाम म्हणजे कृश होतो. म्हणून ''क्षम'' बरोबर ''क्षाम'' पद आलें आहे. तपस्वी हा क्षामच असावयाचा, कृशच असावयाचा. गोरखनाथ गुरूची ओळखण सांगत आहेत. ''ज्याचे हात पाय लठ्ठ आहेत, डोळे ज्याचे तांबडे आहेत असा कोणी गोसावी भेटला म्हणजे ओळखावें कीं हा कांहीं गुरु नव्हे. पण ज्याचे हातपाय कृश आहेत, डोळे ज्याचे निर्मळ आहेत असा सत्पुरुष भेटला म्हणजे समजावें कीं गुरु भेटला'' योगी पुरुष हा पिंडपोषक असूं शकत नाहीं. मग तो पीन म्हणजे धष्टपुष्ट कसा असणार? तो क्षामच राहील. तो व्यसनी हि असूं शकत नाहीं. गांजा, भांग तो पिऊं शकत नाहीं. म्हणून त्याचें नेत्र निर्मल असतील. व्यसन तसे विकार हि त्याच्या ठाईं नसणार. म्हणून हि त्याचें नेत्र निर्मल असतील. त्यांत बाह्य व्यसनें किंवा आभ्यंतर क्रोधादि विकार यांचें प्रतिबिंब पडलेलें दिसणार नाहीं. म्हणून गोरखनाथ म्हणतात :

**दुबरे गाता निर्मल नेता। भई रे पूता गुरुसों भेंट**

गोरखनाथांच्या या मार्मिक वचनांत वैराग्य आणि ज्ञान हींच गुरूचीं लक्षणें होत म्हणून म्हटलें आहे. परमात्मा हा तर गुरूणां गुरुः त्याच्या ठाईं यांचा परमोत्कर्षच असणार. कृशतेचा परमोत्कर्ष म्हणजे विदेहता होय आणि निर्मलनेत्रत्वाचा परमोत्कर्ष म्हणजे केवल ज्ञप्ति मात्रत्व होय. परमात्मा हा अशा प्रकारें क्षाम आहे. तिथें सगळे देह गळून पडले आहेत, क्षीण झाले आहेत, उरलें आहे केवळ एक चित्. त्याहून अधिक रोड दुसरें काय असूं शकेल? म्हणून त्याला म्हणावयाचें क्षाम. सर्व अनात्म गळून देह गेह -स्नेह जळून उरलेला जो निखळ आत्मा तो क्षाम.

### ४४४. समीहन

सम्यक् ईहते इति समीहन:। जो सम्यक् ईहा म्हणजे क्रिया करतो तो समीहन म्हणावयाचा. सम्यक् क्रिया कोणती म्हणावयाची? जिचा संकल्प ठीक आहे, जिचें क्रियासंपादन ठीक आहे आणि जिचें फल हि ठीक आहे ती क्रिया ठीक म्हणावयाची. जिचा संकल्प अनाशक आहे, जिचे स्वरूप अनाशक आहे,

जिचें फल अनाशक आहे ती क्रिया समीहा म्हणावयाची, सम्यक् क्रिया म्हणावयाची. जीवाच्या सर्व क्रिया अविद्या-मूलक कामप्रधान आणि अतएव बंधक होत असल्यामुळें त्यांना समीहा म्हणतां येत नाहीं. त्यांच्या योगें आदिमध्यावसानीं हिंसा होते म्हणून त्या जीव-क्रिया हिंसक होत, नाशक होत. परमात्मा आत्मभिन्न कांहीं पहात नसल्यामुळें आणि निष्काम असल्यामुळें त्याचें क्रियाजात अहिंसक होय, आणि म्हणून तो समीहन म्हणावयाचा. गीतेच्या पुढील श्लोकांत समीहेचें वर्णन आहे.

''यस्य नाहंकृतो भावो बुद्धिर् यस्य न लिप्यते।
हत्वापि स इमांल् लोकान् न हन्ति न निबध्यते।''

ज्याच्या कृतींत अहंकार नाहीं अर्थात् जो कोणत्याहि जन्माचा वा वर्णाश्रमादींचा अभिमान बाळगीत नाहीं, ज्याला फलकामनेचा चिकटा, संपर्क नाहीं, त्यानें जरी विश्वसंहार केला तरी तो हिंसा करीत नाहीं आणि बांधला जात नाहीं. अर्थात् आत्मज्ञानमूलक आणि फलेच्छारहित कर्म हेंच सम्यक् होय, आणि तसें जो करतो तोच समीहन म्हणावयाचा. असा पुरुष हा ईश्वरच होय. ईश्वर म्हणून कोणी वेगळी व्यक्ति नाहीं. जीवाला फलसिद्धीसाठीं संकल्प कल्प आणि अनुग्रह या प्रक्रियेंतून या प्रकल्पांतून जावें लागतें. ईश्वराचा संकल्पच सर्व कांहीं आहे. त्याच्या संकल्पानें च हें विश्व निर्माण झालें आहे. म्हणून तो समीहन म्हणजे संकल्पन होय. सं संपूर्ण सम्यक् च ईहति कल्पते इति समीहनः।

## ४४५. यज्ञ

''यज्ञ इज्यो महेज्यश्च क्रतुः सत्रं सतां गतिः'' या श्लोकार्धांत प्रायः यज्ञप्रकरण आलें आहे. यज्ञ, क्रतु आणि सत्र हे यज्ञाचे विविध प्रकार आहेत, तर सामान्य यजनीय म्हणून आणि परम यजनीय म्हणून इज्य आणि महेज्य पदें आलीं आहेत. सर्व यजन-विधि परमात्मस्वरूपच आहेत, कारण ते सर्व शेवटीं परमात्म्यालाच सरळ वा पर्यायानें पोंचवितात. त्याच प्रमाणें कोणतें हि इज्य म्हणजे दैवत हें हि परमात्मस्वरूपच आहे. कारण तें परमात्म्याच्याच कोणत्या ना कोणत्या गुणाचें प्रतीक होय आणि परमात्म्याचें आकलन करायला उपयोगी होय. अशा प्रकारें सर्व पूज्य पूजक आणि पूजा ग्राह्यच होत. त्यांच्यांत विविधता आहे. पण विरोध नाहीं.

इज्यते असौ इदं अनेन वा इति यज्ञः। जें यजिलें जातें तें दैवत, तें हविर् द्रव्य अथवा जेणें यजन होतें तें कर्म यज्ञ म्हणावयाचें. श्रद्धापूर्वक ज्याचें यजन होतें तो परमात्मा, तें परम दैवत, यज्ञ होय. ज्या हविर् द्रव्यानें त्याचें यजन होतें ती सगळी यज्ञसामग्री यज्ञ होय. ज्या विधीनें यज्ञ संपन्न होतो तो सगळा यजन-विधि यज्ञ होय. यजमान या यज्ञाच्या योगें शेवटीं यज्ञस्वरूप होतो, देवतास्वरूप होतो. याच स्थितीला वा गतीला स्वर्ग म्हणावयाचें. या स्वर्गांत देव म्हणजे पूर्वींचे साध्योपासक, यज्ञकर्ते, वसतात. या स्वर्गालाच प्रस्तुत श्लोकार्धांत 'सतांगतिः' म्हटलें आहे. सज्जन सत्कर्मानें सतांगतीला पोंचत असतात. सज्जन यज्ञकर्ते, सत्कर्मे नानाविध यज्ञ आणि सतांगति म्हणजे परमात्मा म्हणावयाचा.

## ४४६. इज्य

इज्य म्हणजे यजनीय. प्रत्येक श्रद्धावान् आपल्या श्रद्धेप्रमाणें एका दैवताची एका महनीय आदर्शाची कल्पना करीत असतो आणि त्याच्या प्राप्तीचा प्रयत्न करीत असतो. तो आदर्श त्याला आपल्या स्थितीपासून गति देऊन प्रगत करीत असतो, उन्नत करीत असतो. सतत चालना देऊन जीवाला स्वरूप-स्थितीकडे प्रगत करणारा प्रत्येक आदर्श हा परमात्म-स्वरूपच होय. म्हणून प्रत्येक इज्य, प्रत्येक दैवत, प्रत्येक ध्येय हें परमात्मस्वरूपच म्हणावयाचें. बालजीव बालपणीं शंख शिंपले गोळा करतो. पुढें ते फेकून

देऊन मोठेंपणी तो सोनें नाणें गोळा करूं लागतो. पुढें त्याची हि खैरात करून तो नांवलौकिकाच्या मागें लागतो. पुढें नांवलौकिक हि तुच्छ मानून तो अंतर्मुख होतो, आणि शेवटीं अंतरतर परमात्म्याला ओळखून स्वस्थ होतो, शांत होतो. या प्रत्येक अवस्थेंत जें त्याला मोलाचें वाटतें तें दुसऱ्या अवस्थेंत त्याला फोल वाटतें. म्हणून तें टाकून तें नवें मूल्य शोधून त्याच्या प्राप्तीचा प्रयास करूं लागतो. अशा प्रकारें करतां करतां तो शेवटीं परम मूल्य, परम अर्थ जो सर्वात्मा स्वात्मा त्याला गांठतो. अशा प्रकारें तो परम अर्थ असलेला परमात्माच अर्थनीयतेच्या तद्रूपानें पायरी पायरीनें जीवाला प्रचोदना देत असतो, आपल्याकडे ओढीत असतो, आत्मसात् करीत असतो. म्हणून अल्प हि मूल्य तुच्छ म्हणतां कामा नये. कांकीं तें कांहीं झालें तरी मूल्य आहे. तसेंच अत्युच्च हि मूल्य, तें कितीहि महान् असलें तरीं, मूल्यच आहे, मूल्याहून अधिक कांहीं नाहीं. म्हणून त्याचा हि फार बडेजाव करण्याचें कारण नाहीं.

**दधि मधुरं मधु मधुरं द्राक्षा मधुरा सितापि मधुरैव।**
**तस्य तदेव हि मधुरं यस्य मनो यत्र संलग्नम्॥**

बालकाला शिंपल्याची जेवढी क़िंमत तेवढीच पालकाला मोत्याची. कोणी कोणाला हीन लेखायला नको. कोणी आपल्याला आगळें लेखायला नको. कां कीं "निर्विशेषो विशेष:". लहान ही मूल्यच, मोठें हि मूल्यच.

## ४४७. महेज्य

अर्थमात्र तत्त्वत: परमार्थच आहे. पर्वत आणि परमाणु दोन्ही पृथ्वीतत्त्वच. मात्रेचा फरक असो, तत्त्वत: तीं दोन्ही एकच. हें जरी खरें असलें तरी पर्वत तो पर्वतच. मेरूची तुलना मोहरीशीं करतां येणार नाहीं. त्याप्रमाणें इज्य आणि महेज्य एक म्हणतां येणार नाहीं. ताकवणी आणि अमृत यांची तुलना होऊं शकत नाहीं. "बहुनां जन्मनां अन्ते ज्ञानवान् मां प्रपद्यते। वासुदेव: सर्वमिति स महात्मा सुदुर्लभ:।" अनेक जन्मांच्या पुण्याईनेंच ज्याला महात्मे प्राप्त करून घेतात तो परमात्मा हा महेज्य होय. महात्मेच त्याला भजतात. इतर पामर जीव क्षुद्र देवतांच्या भजनीं लागतात, कारण त्यांच्या भक्तीनें त्यांच्या कामना पूर्ण होत असतात--

"क्षिप्रं हि मानुषे लोके सिद्धिर् भवति कर्मजा." कर्मसिद्धि त्वरित होते. राज्य मिळवायचें आहे. तें मिळविण्याचे मार्ग आहेत. ते मार्ग अंगीकारले साम, दाम, दंड, भेद कीं राज्य मिळतें. परंतु ही कर्मसिद्धि त्वरित मिळते याचा अर्थ असा नव्हे कीं प्रयत्न केल्या-वांचून च ती मिळते अथवा तीसाठीं आवश्यक कालावधि लागत नाहीं. त्वरित याचा अर्थ इतकाच कीं ज्ञानसिद्धीच्या मानानें अतिच सुलभ आहे ती. ज्ञानसिद्धि कर्मसिद्धीच्या मानानें अत्यंत दुर्लभ आहे. सुळावरची पोळी आहे ती. ज्ञानदेवानें तिचें अद्भुत वर्णन केलें आहे-"शीत वेढावें। उष्ण पांघुरावें। वृष्टीचिया असावें। घरा आंतु॥" इत्यादि. अहंता अस्मिता अविद्या यांच्या कचाट्यांतून आपली सुटका करून घेणें सोपें नाहीं. एक वेळ ज्ञानदेवांनीं वर्णिलेलें अशक्य कर्म होईल, पण ज्ञानसिद्धि कोणा विरळाच भाग्यवंताला वरावयाची. "गत-संगस्य मुक्तस्य ज्ञानावस्थितचेतस: यज्ञायाचरत: कर्म समग्रं प्रविलीयते॥ तद्बुद्धयस् तदात्मानस् तन्निष्ठास् तत्परायणा:। गच्छन्त्यपुनरावृत्तिं ज्ञाननिर्धूत-कल्पषा:" असे नित्ययुक्त ज्याची उपासना करतात तो परमात्माच महेज्य होय. तदितर सर्व इज्य अन्यदेवता होत.

## ४४८. क्रतु

यज्ञ, मेध, क्रतु, सत्र इत्यादि अनेक शब्द समानार्थक आहेत, परंतु ते एकार्थक नव्हेत. यजनरूप तो यज्ञ. पावनरूप तो मेध. संकल्परूप तो क्रतु.

सदनरूप तें सत्र. असे विशिष्ट भाव लक्षून हे यज्ञवाचक शब्द प्रचलित झाले आहेत. यज्ञ आणि क्रतु दोन्ही एकच असतील तर दोन शब्द झालेच कां? परमात्मा हा यज्ञ आहे आणि तो क्रतु हि आहे. ज्या यज्ञांत यूप असतो तो क्रतु होय असें शंकराचार्यांनीं विवरिलें आहे. आज आम्हांला यज्ञ लाक्षणिक माहीत आहे. प्रत्यक्ष यज्ञ केव्हांचाच लोपला आहे. त्याची गरज उरली नसल्यामुळेंच तो अव्यक्तलीन झाला आहे असें म्हणायला हरकत नसावी! कित्येक वेदाभिमानी शिळ्या कढीला ऊत आणण्याचा प्रकार कधीं कधीं करतांना आढळतात. पण गेलेला क्षण जसा परत कधीं आणतां येत नाहीं त्याप्रमाणें यज्ञधर्म हि पुन: आणतां येणार नाहीं. जो ओढून ताणून आणला जाईल तो अस्सल असणार नाहीं. तो नक्कलच असणार. तो सहज वा स्वभाव-नियत नसल्यामुळें तो रुजणार नाहीं, टिकणार नाहीं. दयानन्दांचा तो प्रयत्न दयाजनकच आहे. गीतेच्या काळींच तो संपुष्टांत आल्यासारखा झाला होता. म्हणून गीतेंत ''एवं बहुविधा यज्ञा वितता ब्रह्मणो मुखे। कर्मजान् विद्धि तान् सर्वान् एवं ज्ञात्वा विमोक्ष्यसे।'' असें म्हणून समारोपिलें आहे. सर्व यज्ञांत ज्ञान-यज्ञ च श्रेयस्कर, म्हटला आहे–''श्रेयान् द्रव्यमयाद् यज्ञाज् ज्ञानयज्ञ: परंतप'' ''यज्ञानां जपयज्ञोऽस्मि''असें आणखी पुढें म्हटलें आहे. सारांश, यज्ञाची सारखी पुनर्व्याख्या नि व्यवस्था होत आली आहे. सर्वांचा सार हा कीं (१) श्रद्धामूलक (२) मनोयोगपूर्वक (३) मन्त्रोच्चारसहित (४) हस्तद्वारा केलेलें (५) भगवदर्पण (६) कर्म म्हणजे यज्ञ होय. या षडंगांपैकीं एक हि न्यून राहिल्यास तो यज्ञ हीन होतो. क्रतु हा असा कर्मज यज्ञ आहे आणि तद्द्वारा साधक साध्यदेव बनतो. म्हणून परिणतीच्या दृष्टीनें परमात्मा हा क्रतु म्हटला आहे.

## ४४९. सत्र

दीर्घकाल चालणाऱ्या यज्ञाला सत्र म्हणतात. यज्ञाची दीक्षा घेणाऱ्या यजमानाला यज्ञ संपेपर्यंत व्रतस्थ रहावें लागतें. जो आजीवन व्रतस्थ राहिला त्याहून मोठा सत्री कोण म्हणावा? सहस्रसम सत्र चालल्याचें पुराणांतरीं वाचतों. ह्या सत्रांत दीक्षित कोण? तो सहस्र समा वाचायला पाहिजे ना? असलीं सत्रें हीं सामाजिकच म्हणावीं लागतील. म्हणजे एक यजमान यज्ञसात् झाला कीं दुसरा त्याची जागा घेतो आहे आणि सत्र अखंड चालतें आहे. राज्य हें असेंच एक सत्र आहे. राज्याचा एक राजा वा प्रधान पडला तरी दुसरा त्याच्या जागीं येतो आणि तो राज्य चालवतो. त्यांत कधीं खंड पडावयाचा नाहीं. परचक्र आलें, पराभव झाला, तरच त्यांत खंड पडावयाचा. तसा होईपर्यंत तो पडूं न देणें हें राजाचें कर्तव्य होय. सत्र सुफल संपूर्ण होईपर्यंत दीक्षित यजमान आणि अध्वर्यु प्रभृति याज्ञिक स्वकर्मक्षम राहिले पाहिजेत. जीवन हें एक सत्रच आहे. त्याचीं तीन सवनें: प्रात:सवन गायत्र, माध्यंदिन-सवन त्रैष्टुभ, सायंसवन जागत. गायत्र सवन चोवीस वर्षांचें, त्रैष्टुभ सवन चव्वेचाळीस वर्षाचें आणि जागत सवन छप्पन्न वर्षांचें. एकूण एकशें चोवीस वर्षांचें हें आयु:सत्र होतें. दीक्षित होऊन जो हें असें सत्र करील तो सत्री सत्ररूप परमात्म्याला पोंचेल यांत काय नवल? यज्ञाचीं षडंगें मागील चिंतनांत ग्रथित केलींच आहेत. परंतु यज्ञाची दीक्षा ही देखील तितकीच महत्त्वाची आहे. दीक्षिताला यज्ञ संपेपर्यंत व्रतस्थ रहावें लागतें असें वर म्हटलें च आहे आणि ही व्रतस्थताच यज्ञ-साफल्याची किल्ली आहे. मौन, ब्रह्मचर्य, अहिंसा, सत्यवचन इत्यादि ह्या सत्राची दीक्षा होय. दीक्षेचा भंग झाल्यास यज्ञ सफल न होतां विफल होतो. इतकेंच नव्हे तर तो यज्ञकर्त्यावर उलटतो सुद्धां, तो अभिचरतो. उदाहरणार्थ टेंभा जर नीट धरला नाहीं, उलटा धरला, तर त्याच्या ज्वालांनीं तो धरणाऱ्याचाच हात भाजेल, त्या प्रमाणें. म्हणून यज्ञाइतकीच किंबहुना त्याहून अधिक दीक्षा महत्त्वाची ठरते.

## ४५०. सतांगति

गति म्हणजे मरणोत्तर स्थिति. आगति म्हणजे इहलोकस्थिति. अर्थात् सतांगति म्हणजे सज्जन

मरणोत्तर ज्या स्थितीला पोंचतात ती स्थिति. मरणोत्तर जीवाची काय स्थिति होते तें कोण सांगणार? गेलेला परत येऊन सांगत नाहीं. तेव्हां तो केवळ श्रद्धेचा आणि अनुमानाचा विषय राहतो. चांगल्या कर्माचें चांगलें फळ, वाईटाचें वाईट अशी श्रद्धा बाळगून लोक सत्कर्माच्या गतीला स्वर्ग, दुष्कर्माच्या गतीला नरक म्हणतात. या दोहोंहून स्वतंत्र आणि कर्मफल-मुक्त स्थितीला मोक्ष म्हणतात. सज्जन नरकाला जात नाहींत. ते जाणार म्हणजे स्वर्गाला वा मोक्षालाच. स्वर्गाला सज्जन सत्कर्मानें जातो तर तोच ज्ञानाच्या योगें मोक्षाला जातो. अर्थात् परम सत्कर्म म्हणजे ज्ञानच होय. कारण त्यायोगें गति आणि आगति यांचे हेलपाटे चुकतात आणि म्हणूनच वैदिक सकाम यज्ञकर्माच्या योगें क्षणिक स्वर्ग मिळविण्याचा विचार गौण होय. औपनिषदिक निष्काम उपासनेच्या योगें आत्मज्ञान मिळवून अनंत मोक्ष मिळविण्याचा आदर्शच मानवोचित होय असा आचार्यांचा निष्कर्ष आहे. पण त्यांत सकाम कर्मयोगाला गौणत्व दिलें असलें तरी त्याचा निषेध नाहीं, निषेध फक्त दुष्कर्माचा आहे. निर्मल आत्मज्ञान एकाएकीं होत नाहीं. त्यासाठीं सत्कर्मयोग आचरीत हळूंहळूं ज्ञाननिष्ठायोग्यता मिळवीत राहिलें पाहिजे. यथाकाळीं ती लाभून जीव ज्ञानवान् होतो आणि ब्रह्मज्ञ नव्हे तर ब्रह्मच बनतो. या परम गतीला गांठीपर्यंत तिच्या सकट ज्या साऱ्या गति यथाकर्म आणि यथाश्रुत या सत्कर्मयोग्याला लाभतात त्या सर्व सतांगति होत. परमात्म्याचेच ते सर्व आविर्भाव होत. परमात्मचंद्राच्याच त्या सर्व कला होत प्रति- पदे पासून पौर्णिमेपर्यंतच्या.

## ४५१. सर्वदर्शी

'यज्ञ इज्यो—सतांगतिः' या श्लोकांर्धात मुख्यतः यज्ञ आणि यज्ञफळ, यांचा विचार आला आहे तर 'सर्वदर्शी—ज्ञानमुत्तमम्' या त्याच्या पुढील श्लोकार्धांत ज्ञान आणि ज्ञानफल यांचा विचार आला आहे. कर्म आणि ज्ञान यांच्या विषम फलांबद्दल फार जुन्या काळापासून मीमांसा होत आली आहे. कर्म-मीमांसेला पूर्व मीमांसा, तर ज्ञान मीमांसेला उत्तर मीमांसा संबोधिलें जातें. पूर्व मीमांसा आणि उत्तर मीमांसा दोन्ही वेदार्थाचा निर्णय करतात. ''आम्नायस्य क्रियार्थत्वात् आनर्थक्यं अतदर्थानाम्'' असा पूर्व मीमांसेचा निर्णय आहे तर उत्तर मीमांसा तें सूत्र 'आम्नायस्य दर्शनार्थत्वात् आनर्थक्यं अतदर्थानाम्' असें वाचतें. अर्थात् उत्तर मीमांसेच्या मतें ज्ञाननिष्ठासाधन कर्मच कर्तव्य आहे आणि तोंवरच कर्तव्य आहे जोंवर ज्ञाननिष्ठा उत्पन्न झालेली नाहीं. ती उत्पन्न झाल्यावर कर्म निरर्थकच होय. 'न यावज्जीवं कर्तव्यप्राप्तिः कस्यचिदपि कर्मणः' असा तिचा निर्णय आहे. पूर्व मीमांसा अचरम आहे, हें तिला दिलेल्या पूर्व ह्या विशेषणावरून सूचित होतें. तसेंच उत्तर मीमांसा ही चरम आहे. हें तिला दिलेल्या उत्तर ह्या विशेषणानें सूचित होत आहे. प्रस्तुत श्लोकांत हि त्या प्रमाणेंच प्रथम यज्ञादि कर्मकांड आणि अनंतर ज्ञानकांड आलेलें आहे. उपासना ह्या दोहोंचा सांधा आहे. ती कर्मप्राय पण ज्ञानप्राण असते. तींत कर्म असतें पण तें सकाम असत नाहीं, तींत ज्ञान असतें पण तें अक्रिय असत नाहीं. कर्मकांडांतील सकामता ज्ञान सहन करूं शकत नाहीं. ज्ञानकांडांतील निष्क्रियता कर्मकांड सहन करूं शकत नाहीं. उपासना त्या दोहोंचे दोष वगळून गुण घेते आणि दोहोंचा समन्वय करते. ही ज्ञानार्थक निष्कामकर्मयोगरूप उपासना यावज्जीव चालू शकते. जोंवर देह आहे तोंवर ती कर्तव्यच आहे.

चित्सत्तेवांचून कशाचीहि उपलब्धि होत नसल्यामुळें परमात्मा हा सर्वदर्शी म्हणावयाचा. त्याची लब्धि म्हणजे सर्वोपलब्धिच होय. 'वेद अनंत बोलिला। अर्थ इतुका चि साधिला, विठोबासी शरण जावें, निजनिष्ठे नाम गावें।।'

## ४५२. विमुक्तात्मा

परमात्मा आणि त्याचा परम भक्त सर्वदर्शी होय. तो सर्वकांहीं पहातो, पण लिप्त कुठेंच होत नाहीं. ''यथा पुष्करपत्रे आपो न श्लिष्यन्ते एवं वै तत्'' कमलदलाला जल-स्पर्श होत नाहीं, तसें त्याला

कोणतें हि दृश्य चिकटत नाहीं. त्याची सदैव विविक्तदृष्टि असते. त्याला कुठलें हि कर्म वा त्या कर्माचें फळ केव्हां हि स्पर्शत नाहीं. सूर्य जगाचे सर्व व्यवहार पाहतो, पण तो ते व्यवहार करत नाहीं. करायला सांगत नाहीं वा त्यांच्या सुखदु:खांनीं हर्षशोक पावत नाहीं. तें कांहींएक त्याच्या गांवीं असत नाहीं. तसा परमात्मा हा विमुक्तात्मा आहे. त्याच्या द्रष्टृत्वाला कर्तृत्व भोक्तृत्व दुरून हि शिवत नाहीं:

**न कर्तृत्वं न कर्माणि लोकस्य सृजति प्रभु:।**
**न कर्मफल-संयोगं स्वभावस् तु प्रवर्तते।।**
**नादत्ते कस्यचित् पापं न चैव सुकृतं विभु:**
**अज्ञानेनावृतं ज्ञानं तेन मुह्यन्ति जन्तव:।।**

विमुक्तात्मा या सामासिक पदांत विमुक्त आणि आत्मा दोन शब्द आहेत. विमुक्त कुणाला म्हणायचें? विमुक्तीचें स्वरूप काय? विमुक्ति म्हणजे प्रकृतीच्या गुणधर्मांचा आपल्या ठाईं अविद्येमुळें करून घेतलेल्या अध्यासाचें निरसन होणें. ज्याचा आत्मा म्हणजे बुद्धि अविद्याध्यारोपित अध्यासांतून मुक्त झाली तो विमुक्तात्मा होय. वस्तुत: तर आत्मा हा सदैव मुक्तच आहे. तो बंधनांत पडला आणि मग मुक्त झाला अशी स्थिति नाहीं. तो तर नित्यशुद्धबुद्धमुक्त-स्वभाव आहे. ''न वा बद्धो न वा मुक्तो, इत्येषा परमार्थता'' चंद्राला ग्रहण लागत नाहीं किंवा त्याचा त्यांतून मोक्ष हि होत नाहीं. ग्रहण होत असतें तें आमच्या दृष्टीला, आणि मोक्षहि होत असतो तिचाच. एकाच वेळीं कांहींना ग्रहण आणि कांहींना अग्रहण हा अनुभव नित्याचाच आहे. ज्याच्या दृष्टीआड छाया आली त्यालाच ग्रहण आहे, ज्याच्या दृष्टीआड छाया आलेली नाहीं त्याला अग्रहणच आहे. परमात्मा हा असा चंद्रवत् नित्यच विमुक्त आहे, आणि त्याच्या दृष्टीवर केव्हां हि छायापटल येत नसल्यामुळें तो विमुक्तात्मा हि आहे.

### ४५३. सर्वज्ञ

सर्वदर्शी आणि सर्वज्ञ वस्तुत: दोन्ही एकच. तथापि धात्वर्थानें त्यांत फरक केला आहे. दर्शन म्हणजे पाहणें आणि ज्ञान म्हणजे जाणणें. साखर पाहतां येते. ती आपण पाहतों. पण नुसत्या पाहण्यानें तिचें ज्ञान होत नाहीं. ती चाखावी लागते, ती चाखतो तेव्हांच तिचें ज्ञान होते: पण आपण म्हणतों, पहा बरं सरबतांत साखर बेताची झाली कीं कशी? या प्रयोगांत दर्शन हें केवळ दर्शनवाचक नाहीं तें लक्षणेनें ज्ञानवाचक आहे. दर्शन, श्रवण, रसन स्पर्शन घ्राण हीं सर्व ज्ञानेंद्रियेंच होत ना? इंद्रियांत दर्शन प्रधान असल्यामुळें तें ज्ञानवाचक, सर्वविषयग्रहण-वाचक झालें आहे. आणि त्यामुळेंच सर्वदर्शी आणि सर्वज्ञ एकच होत असें वाटतें. पण वस्तुत: दोन्ही भिन्नार्थक आहेत. पंच बाह्य ज्ञानेन्द्रियें आणि पंचधा आभ्यंतर अंत:करण यांच्यायोगें आणि यांच्या वियोगें म्हणजे यांच्या वांचून हि जो जाणतो तो जाणणाराच सर्वज्ञ म्हणावयाचा. निरिंद्रियांपासून सर्वेन्द्रियांपर्यंत असंख्य जीवयोनि आहेत. त्या सर्व योनींतील जीवांना होणारें ज्ञान हें सगळें एका क्षेत्रज्ञालाच होत असतें, आणि म्हणून सर्वांचा स्वात्मा तो परमात्मा हा सर्वज्ञ म्हणावयाचा.

जागरित वैश्वानर, स्वप्नस्थ तैजस, सुषुप्त प्राज्ञ हीं ज्याचीं त्रिरूपें आहेत तो तुरीयच जागृति-स्वप्न-सुषुप्तिरूप तिन्ही जगें जाणत असल्यामुळें सर्वज्ञ म्हणावयाचा. तुरीयेतर वैश्वानर तैजस आणि प्राज्ञ हे केवळ एकएकच जग जाणणारें म्हणून असर्वज्ञ होत.

तुरीय हा केवळस्वरूप असल्यामुळें तिथें ज्ञेय-ज्ञातृ-ज्ञान ही त्रिपुटी, हा प्रपंच संभवत नाहीं. म्हणून त्याला सर्वज्ञ म्हणणें नीट नाहीं. त्यामुळें सुषुप्त प्राज्ञ हाच सर्वज्ञ पदवीस पात्र म्हणावयाचा. कारण सुषुप्तींत त्याच्या ठाईं सारें विश्व एकीभूत असतें आणि त्याला तो आनंद म्हणून अनुभवीत असतो. म्हणूनच 'प्राज्ञ' ला उद्देशून मांडुक्यांत म्हटलें आहे ''एष सर्वेश्वर:। एष सर्वज्ञ:। एषोऽन्तर्यामी। एष योनि: सर्वस्य प्रभवाप्ययौ हि भूतानाम्।''

## ४५४. (उत्तम) ज्ञान

उत्तम ज्ञान हें सविशेषण एक नाम आहे. ज्ञानांत तर-तम-भाव कसा करायचा? वस्तुत: ज्ञानांत अधम मध्यम उत्तम असा कांहीं फरक नाहीं. ज्ञान हें ज्ञान आहे. तें लहान-मोठें, हलकें-भारी, अधम उत्तम असें कांहीं नाहीं. तथापि उपाधिवशात् तें अधमोत्तम भासतें. अग्नि सधूम असतो, विद्युत् निर्धूम परंतु चंचल असते. सूर्य निर्धूम आणि स्थिरप्रभ असतो. हें त्रिलोकांतील त्रिविध तेज आहे. प्रकाशक आहे. पहिल्याचा प्रकाश धूमिल धूसर, तर दुसऱ्याचा क्षणिक असतो. परंतु तिसऱ्याचा ना अंधुक ना क्षणिक असा स्वच्छ आणि सतत असतो. आणि म्हणून तो उत्तम म्हणावयाचा. तसें जें ज्ञान नि:संदेह आणि शाश्वत आहे तें उत्तम म्हणावयाचें. जीवाला आत्मभिन्न जें ज्ञान होतें तें स्वायत्त नसतें. तें ज्ञेयाधीन राहतें त्यामुळें तें संदेहास्पद आणि अशाश्वत असतें. बाह्य पदार्थाचें यथार्थ ज्ञान होत नाहीं आणि तो पदार्थ बाह्य असल्यामुळें तो बदलतो आणि नाहींसा हि होतो. त्याची स्मृतिं हि जीवाला भाररूप असल्यामुळें ती तो विसरतो. परंतु आत्मज्ञान हें असें नाहीं. त्यांत ज्ञातृज्ञेय अभिन्न असतात. आणि त्याची विस्मृति कधीं हि होत नाहीं. त्यामुळें तें स्वायत्त नि:संदेह आणि शाश्वत होय. आणि म्हणून त्याला उत्तम म्हणावयाचें. ''यज् ज्ञात्वा नेह भूयोऽन्यज् ज्ञातव्यं अवशिष्यते'' ''जें जाणूनि पुढें येथें जाणावेंसें न राहतें'' असें जें ज्ञान तें हें आत्मज्ञान होय. आणि तेंच उत्तम. ज्ञातृज्ञेय-भेदानें होणाऱ्या विषयज्ञानाला ज्ञान आणि ज्ञातृ-ज्ञेय-ज्ञान-विभागरहित एकरस ज्ञानाला अनुभव अथवा विज्ञान अशी परिभाषा आहे. इथें 'उत्तम ज्ञान' पदानें त्या अनुभवाचा वा विज्ञानाचा निर्देश केला आहे. ''अनुभव रहणीविण कायसें श्रवण? गर्भअंध नेणे रत्न-किरण'' ''ब्राह्मणस्य विजानत:'' इत्यादि वचनांत ही परिभाषा आली आहे.

## ४५४. उत्तम (ज्ञान)

उत्तम हें स्वतंत्र पद नाहीं तें ज्ञानाचें विशेषण म्हणून आलें आहे. म्हणून त्याचा स्वतंत्र विचार करण्याचें कारण नाहीं. तथापि त्याचा थोडा अधिक विचार करूं या. व्याकरणांत प्रथम पुरुष, मध्यम पुरुष, उत्तम पुरुष अशा संज्ञा येतात. प्रथम पुरुष म्हणजे परोक्ष वा दूरचा हा अर्थ. द्वितीय पुरुष म्हणजे ज्याच्याशीं आपण साक्षात् बोलतों तो प्रत्यक्ष अर्थ आणि उत्तम पुरुष म्हणजे अंतरतर स्वत: बोलणारा स्वतंत्र पुरुष हा अर्थ, म्हणजे वक्त्याचा निजात्मा. या परिभाषेच्या मुळाशीं जो जितका निकटचा तो तितका वरचा अशी कल्पना आहे. आणि निकटतम तर प्रत्येकास त्याचा निजात्माच होय. आणि म्हणून तो उत्तम म्हटला. स्वात्म्याहून निकटतर दुसरें काय आहे? तसेंच जो दुसऱ्यावर अवलंबून नाहीं पण ज्यावर दुसरें अवलंबून आहे, तोच ज्येष्ठ श्रेष्ठ वरिष्ठ आणि उत्तम म्हणावयाचा. म्हणून आत्मज्ञान हेंच उत्तम. आपल्याला उपलब्ध होणाऱ्या सर्व ज्ञानांचा आधार आत्मज्ञान आहे. म्हणून तें उत्तम होय. तें दुसऱ्या कशावरहि अवलंबून नाहीं, पण त्यावर मात्र सर्व ज्ञानें अवलंबून आहेत. कोणती हि उपलब्धि आत्म्यालाच होते. म्हणून सर्वोपलब्धीचा हा मूलाधार उत्तम म्हटला आहे.

उत् या उपसर्गाला तरतम प्रत्यय लागून उत्तर आणि उत्तम शब्द झाले आहेत. एका मंत्रांत हे तिन्ही एकत्र आढळतात. तो मंत्र असा:

उद् वयं तमसस् परि। ज्योति: पश्यन्त उत्तरम्।
देवं देवत्रा सूर्यम्। अगन्म ज्योतिर् उत्तमम्॥

सकाळीं सूर्योदयाला नैश तमाच्या माथ्यावर पाय देऊन वर आलेलें तेज उत्तर म्हणजे वरवर चढत असलेलें ध्यात मध्याह्नीं तळपणाऱ्या, सर्व देवांत थोर देव असलेल्या सूर्याला, त्या सर्वोत्तम तेजाला पोचूं या. अर्थात् साधनेच्या आरंभीं अज्ञान भेदून प्रकाशमान

झालेल्या चढत्या तेजाचा मागोवा घेत, त्याचें अनुसंधान करीत, आम्ही त्या देदीप्यमान आत्मसूर्याला, आत्मतेजानें विश्व प्रकाशमान करणाऱ्याला, गांठूं. आत्मभिन्न कांहीं उरूं न देणाऱ्या त्या तेजाला, त्या उत्तमाला गांठूं या.

### ४५५. सुव्रत

''सुव्रतः सुमुखः सूक्ष्मः सुघोषः सुखदः सुहृत्'' हा सुकाराचा श्लोकार्ध आहे. एक सूक्ष्म पद सोडलें तर बाकीचीं सर्व सु'' पूर्व आहेत. सर्वांचें तात्पर्य, तो परमात्मा सुरूप आहे, सर्वतोभद्र आहे, हें आहे.

स्वेच्छेनें वरण केलेला आणि प्राणपणानें पाळावयाचा नियम म्हणजे व्रत होय. कोणीं कांहीं हि मागितलें तरी त्याला नाहीं म्हणावयाचें नाही हें कर्णाचें व्रत होतें. कांहीं झालें तरी सत्यच बोलायचें हें युधिष्ठिराचें व्रत होतें. ''द्विः शरं नाभिसंधत्ते रामो द्विर् नाभिभाषते'' असें रामाचें व्रत होतें. अशीं हीं नाना व्रतें आहेत. आणि तीं आचरणारे सगळे सुव्रत होत. या सर्व व्रतांच्या मुळाशीं आत्मनिष्ठा दिसून येते. म्हणून आत्मनिष्ठता हेंच एक सुव्रत होय. आणि तें जो पाळतो तो सुव्रत म्हणावयाचा. आत्मा आत्मनिष्ठ नाहीं राहणार तर काय राहील? तो आत्मनिष्ठेहून वेगळें कांहीं करूंच शकत नाहीं. म्हणून परमात्मा हा सुव्रत होय. सुव्रत म्हणजे स्वव्रत. स्वहून म्हणजे आत्म्याहून अधिक सुरूप दुसरें कांहीं नाहींच. तो आत्मा निर्दोष आणि सर्वमंगल-निधि आहे. तन्निष्ठता हेंच एक व्रत आहे. इतर सगळीं व्रतें त्याचे अंश होत. आत्मपरायण पुरुषच वृजिनार्णव तरून जातात :

**तद्‌बुद्धयस् तदात्मानस् तन्‌निष्ठास् तत्‌परायणाः।**
**गच्छन्ति अपुनरावृत्तिं ज्ञाननिर्‌धूत-कल्पषाः।।**

गीतेंत भगवान् शेवटीं हीच एक निष्ठा उपदेशितात.

**सर्व-धर्मान् परित्यज्य मां एकं शरणं व्रज।**
**अहं त्वा सर्व-पापेभ्यो मोक्षयिष्यामि मा शुचः।।**

जो आत्मनिष्ठ झाला त्याला दुसरे किरकोळ धर्मविधि लागू नाहींत. भागवतांत म्हणूनच म्हटलें आहे:—

**तो देवता पितर वा ऋषि आप्त भूतें**
**यांचा न सेवक नृपा! न ऋणी असे तो।**
**सर्वात्मना शरण जो चरणांस गेला**
**सांडूनि सर्व शरणप्रद श्रीहरीच्या।।**

### ४५६. सुमुख

सु म्हणजे शोभन मुख आहे ज्याचें तो सुमुख होय. मुखाची शोभनता त्याच्या वर्णाकृतींवर अवलंबून नाहीं. तर तद्‌दर्शनानें होणाऱ्या लाभावर ''परिणामावर अवलंबून आहे. ज्याच्या मुखावलोकनानें सर्व अमंगल टळतें नि सर्व मंगल वळतें तो सुमुख म्हणावयाचा. ॐकारस्वरूप, गणपति हा सुमुख म्हटला आहे ''सुमुखश्चैकदन्तश्च'' इत्यादि. सर्व अमंगलांचें निरसन व सर्व मंगलांचें संपादन ज्ञानामुळें होतें. म्हणून ज्ञानस्वरूप गणपति, सर्व अक्षर-गणाचा मुख्य ॐकार, सुमुख म्हटला आहे. आणि परमात्मा हा केवळ ज्ञान-स्वरूप असल्यामुळें ॐकारस्वरूप गणपति हें त्याचेंच नामरूप होय.

ॐकारस्वरूप गणपति हा परमात्म्याचा अक्षरावतार आहे. पुरुषावतारांत प्रभु रामचंद्र सुमुख होत. ते सर्व प्रजाजनांना चंद्रवत् प्रियदर्शन होतेच. पण त्या शिवाय त्यांची सुमुखता म्हणजे स्थितप्रज्ञता होय. सुख-दुःखांनीं त्यांच्या मुखावर, मुद्रेवर, विकारदर्शन होत नसे. ते कोणत्या हि प्रसंगीं आत्मनिष्ठ राहत. स्थितप्रज्ञाचीं लक्षणें गीतेंत दिलीं आहेत. पण त्याचें चरित्र म्हणजे रामायण होय. अर्जुनानें विचारलें:

**स्थिरावला समाधींत स्थितप्रज्ञ कसा असे।**
**कृष्णा सांग कसा बोले कसा राहे फिरे कसा।।**

भगवान् म्हणाले—

कामना अंतरांतील सर्व सोडूनि जो स्वयें।
आत्म्यांत चि असे तुष्ट तो स्थितप्रज्ञ बोलिला।।
नसे दु:खांत उद्वेग सुखाची लालसा नसे।
नसे तृष्णा भय क्रोध तो स्थितप्रज्ञ संयमी।।

संयमी स्थितप्रज्ञाचें चरित्र म्हणजे रामायण. तुलसीदासांच्या एकश्लोकी रामायणांत तें असें गाईलें आहे:

प्रहृष्टतां या न गताभिषेकतस्
तथा न मम्ले वनवास-दु:खत:।
मुखाम्बुजश्री रघुनंदस्य मे
सदास्तु सा मंजुलमंगल-प्रदा।।

## ४५७. सूक्ष्म (सुक्ष्म)

परमात्मा हा प्रथम सुव्रत म्हणजे सुशील म्हटला. त्यानंतर तो सुमुख म्हणजे प्रसन्नवदन म्हटला. आतां त्याला सूक्ष्म म्हटलें आहे. हें पद सुमुख आणि सुघोष यांच्या मध्यें आलें आहे. तेव्हां त्याचा अर्थ सूक्ष्मदृष्टि असा दिसतो. त्याचें दर्शन सूक्ष्म, तेव्हां त्याचा अर्थ सूक्ष्मदृष्टि असा दिसतो. त्याचें दर्शन सूक्ष्म आहे. शुभ आहे. तो तत्त्वदर्शी आहे. म्हणून तो सूक्ष्म. सूक्ष्म पाहतो तोच उत्तम पाहतो. त्यालाच परमलाभ होतो. ''विशालाभ्यां आभ्यां किमिह नयनाभ्यां खलु फलं, न याभ्यां आलीढा परमरमणीया तव तनू:'' ज्या नेत्रांना भगवद्दर्शन, तत्त्वदर्शन, आत्मदर्शन झालें नाहीं त्यांना सूक्ष्मेक्षण वा सुलोचन कसें म्हणतां येईल? पण कोणी आक्षेप घेतील, कीं इथें सु हि नाहीं आणि ईक्षण हि नाहीं. तुम्ही सूक्ष्म म्हणजे स्वीक्षण असा कसा अर्थ करतां? त्यावर उत्तर हेंच कीं हा श्लोकार्ध सुच्या पाढ्याचा आहे आणि त्यांत हें पद आलें आहे, सुव्रताचें हें विवरण आहे. सुव्रत म्हणजे सुशील कसा? तर त्याचें दर्शन भलें आहे, त्याची दृष्टि भली आहे, त्याची वाणी भली आहे, त्याची प्रत्येक कृति भली आहे. त्याचें हें सारें बाह्य भलें आहे कारण त्याचें अंतर भलें आहे. तो सुहृद् आहे. अर्थात् तो अंतर्-बाह्य सुरूप आहे. या सुप्रवाहांत ''सूक्ष्म'' स्वीक्षणवत् झाल्यास नवल नाहीं.

अथवा ''सूक्ष्म'' पद हें ''सुक्ष्म'' समजावें. ''सु शोभना क्ष्मा येन स: सुक्ष्म:'' ज्याच्या योगें ही क्ष्मा म्हणजे पृथ्वी शोभन झाली आहे तो परमात्मा 'सुक्ष्म' म्हणावयाचा. परमात्मा हा या पृथ्वीचा, या सृष्टीचा पति आहे आणि म्हणून ती सौभाग्यवती आहे. सृष्टीची नश्वरता हि सुंदर आहे कारण तिला शाश्वताचा आधार आहे. ह्या जात्या जगांत कांहींच राहतें नसेल तर मग सारेंच मुसळ केरांत म्हणावें लागेल. पण तसें नाहीं. एका परमात्म-सत्तेचा बळकट आधार आहे या सर्वाला. म्हणून तो परमात्मा ''सुक्ष्म'' होय. सु म्हणजे भक्कम आणि क्ष्मा म्हणजे आधार आहे जो तो सुक्ष्म म्हणावयाचा. अविज्ञेय असल्यामुळें परमात्मा हा सूक्ष्म म्हटला जातो. हा अर्थ तर प्रकटच आहे. ''सूक्ष्मत्वात् तद् अविज्ञेयम्'' हें गीतेचें वचन प्रसिद्धच आहे.

## ४५८. सुघोष

''शोभन: घोष: यस्य स: सुघोष:'' ज्याचा घोष शोभन आहे तो तो सुघोष म्हणावयाचा. वेदो-नारायणाचा घोष शोभन होय म्हणून तो वेदस्वरूप परमात्मा सुघोष म्हटला आहे. या सुघोषतेचें कारण ज्ञानदेवानें असें दिलें आहे: ''पैं अहितापासौनि काढिती। हित देऔनि वाढविती। नाहीं गा श्रुती-परौती। माउली जगा।''

आध्यात्मिक ज्ञानस्वरूप असलेले वेद मानवाचा परम पुरुषार्थ मानवाला कंठरवानें सांगत आहेत. म्हणून ते उघडच सुघोष होत. इथें सु म्हणजे हिततम आणि सु म्हणजे सुनिश्चित दोन्ही अर्थ एकवटले आहेत. ''प्रज्ञानं ब्रह्म। अयं आत्मा ब्रह्म। तत् त्वं असि। अहं ब्रह्मास्मि।'' हा जो चतुर्मुखानें चौफेर केलेला उपदेश त्यामुळें परमात्मा हा सुघोष म्हटला आहे.

नकुलाचा शंख हि ''सुघोष'' होता. शंख सुघोष कां? तर त्यांतून निघणारा घोष हा ॐ कार स्वरूप आहे म्हणून. हा एकाक्षर ब्रह्म म्हणजे वेद होय. शंखासुरानें समुद्रतळाशीं चोरून नेलेला वेद तो हाच. मत्स्यावतारांत भगवंतानें प्रलय-पयोधींतून शंखोद्धार करून ज्या वेदाचें रक्षण केलें तो हाच. मत्स्यावतार ज्यामुळें अवतार म्हटला गेला ती महनीय घटना हीच. हिलाच अनुलक्षून जयदेवानें गाइलें आहे—

**''प्रलय-पयोधि-जले धृतवान् असि वेदं।**
**विहित-वहित्रचरित्रमखेदम्।।''**

पत्राची किंमत त्याच्या मजकुरावरून होते. मजकूर तुच्छ असेल तर पत्र तुच्छ आणि उच्च असेल तर उच्च म्हटलें जाईल. तसाच कोणता हि मंत्र त्याच्या अर्थावरून, अभिप्रायावरून उच्चावच ठरत असतो. हा एकाक्षर मंत्र संपूर्ण वेदार्थाचा वाचक असल्यामुळें तो एकाक्षर ब्रह्म म्हटला गेला आहे. ब्रह्म शब्द वेद आणि वेदार्थ दोहोंचा हि वाचक आहे. त्यामुळें एकाक्षर ब्रह्म म्हणण्यांत विशेष स्वारस्य आहे. अक्षरब्रह्म हा श्लिष्ट प्रयोग आहे. त्यांतील दोन्ही पदें अक्षर आणि ब्रह्म श्लिष्ट म्हणजे द्व्यर्थ आहेत.

चिरका, चिडका नसलेला गंभीर घोष सुघोष होय. असा ब्रह्म घोष हा उघडच सुघोष म्हणावयाचा. परमात्म्याचेंच तें एकरूप होय.

## ४५९. सुखद

ज्याचें शील शोभन आहे, ज्याचें दर्शन शोभन आहे, ज्याचें प्रेक्षण शोभन आहे, ज्याची वाणी शोभन आहे तो सुखद नाहीं तर काय असेल? तो परमात्मा आपल्या नाम, रूप, गुण, शील या सर्वांच्या योगें सर्वांना सुख देणारा आहे. नामानें, कीर्तिनें तो श्रवणांना सुखावह होतो, रूपानें तो नेत्रांना सुखावह होतो, गुणानें तो अंतराला सुखावह होतो, शीलानें तो शत्रु मित्र उदासीन आणि मध्यस्थ या चतुर्विध समाजाला सुखावह होतो. शत्रु म्हणजे प्रतिकूल लोक. त्यांच्या अज्ञानजन्य प्रतिकूलतेचाच विरोध करून आणि एरव्हीं त्यांच्या विषयीं आत्मौपम्य बाळगून तो शत्रूंना सुखावह होतो. राम ''मरणान्तानि वैराणि'' म्हणून रावणाचें और्ध्वदैहिक यथासांग करवतो. मित्र म्हणजे अनुकूल लोक. राम सुग्रीवासारख्या मित्राला राज्य व पत्नी मिळवून देतो. उदासीन म्हणजे कोणाला च शत्रु वा मित्र न मानतां तटस्थ राहणारा यति-वर्ग. आज हि आपण पाहतों कीं तटस्थतेची नीति चालवणारीं राष्ट्रें आहेत. आणि त्यांना विरोधी राष्ट्रें चाहत आहेत. त्यांच्या तटस्थतेच्या नीतीची कदर करीत आहेत. त्याच प्रमाणें समाजांतील द्वंद्वापासून पूर्ण अलिप्त असणारे जे यति त्यांचें हि समाजांत महत्त्वाचें स्थान आहे. त्यांचें रक्षण झालें पाहिजे. रामानें अशा उदासीन ऋषींचें रक्षण केलें. या तिन्ही वर्गांहून भिन्न आणखी एक वर्ग आढळून येतो. तो उदासीन नाहीं, पण दोन्ही परस्पर-विरोधी असलेल्या आपल्या शत्रूंत आणि मित्रांत सलोखा व्हावा यासाठीं मनापासून झटत असतो. हा मध्यस्थवर्ग होय. रामायणांत मध्यस्थ नाहीं आणि भारतांत हि मध्यस्थ नाहीं. हुडकूनच काढावयाचें म्हटल्यास बलरामाला उदासीन व विदुराला मध्यस्थ म्हणतां येईल. पण आधुनिक भारतात गांधी-इंग्रज ह्यांच्यांतील लढ्यांत जयकर सप्रू हे मध्यस्थ म्हणून होते. आणि त्यांना सहायक तो मध्यस्थ वर्ग म्हणावयाचा. या सर्वांना परमात्मा प्रत्यागात्मरूपानें सानुकूल असल्यामुळें सुखद होय. सुखद हा निरूपपदप्रयोग आहे म्हणून त्याचा अर्थ सर्व-सुखद होतो. तो अमक्याला सुखद असें नाहीं.

## ४६०. सुहृत्

परमात्मा हा सुहृद् आहे. सर्वांविषयीं निरपेक्ष निरतिशय आणि निरन्तर सद्भावच त्याच्या ठाईं वसत आहे. जगांत माता ही आपल्या अपत्याविषयीं

प्रेमपूर्ण असते असें मानलें जातें. म्हणूनच म्हणतात ''कुपुत्रो जायेत क्वचिदपि कुमाता न भवति''. कुपुत्र असूं शकतो पण कुमाता मात्र कुठें हि आढळावयाची नाहीं. आपल्या अपत्या विषयीं अत्यंत वात्सल्य असलेल्या मातेचें प्रेम हि निरपेक्ष म्हणतां येत नाहीं. ''हा आपले पांग फेडील, आपल्याला सद्‌गति देईल, आपलें नांव जगांत चालवील'' अशी अपेक्षा तिची असतेच. पुत्राहून अधिक प्रेम ती आपल्यावरच करीत असते. पुत्रावर हि ती तो आपला पोटचा गोळा, आपला जीवाचा जीव म्हणूनच प्रेम करीत असते. ''आत्मा वै पुत्र नामासि'' म्हणून प्रेम करीत असते. आणि हें प्रेम पुष्कळदां खंडित होतें, आजीवन हि चालत नाहीं आणि मरणोत्तर वा जन्मपूर्व त्याचा विसर पडतो, अभाव असतो. परंतु परमात्मा हा सर्वांचा निजात्मा आहे आणि म्हणून त्याचें प्रेम हें निरपेक्ष निरतिशय आणि निरंतर आहे आणि तें सार्वत्रिक आहे, विश्वव्यापक आहे. त्याला हा आपला परका असला भेदच ठाऊक नाहीं असें त्याचें वात्सल्य महोदार आहे. त्याच्यासारखें हृदय, त्याच्या सारखें वात्सल्य, त्याचेंच. म्हणून तो सुहृद्.

सुव्रत पासून सुरू झालेला सुकार इथें सुहृत् मध्यें संपला आहे. कोणतें हि व्रत हि असेंच कायावाचा मनें त्रिशुद्धी आचरावयाचें आहे. इथें सुहृत् पदानें त्यांतील मन:पूर्वकता श्रद्धापूर्वकता अभिप्रेत आहे. सुघोषपदानें समंत्रता सुचविली आहे. आणि सुव्रतादि पदांनीं सुतंत्रता उल्लेखिली आहे. जीवनाची ही अशी त्रिपथगा आहे. या श्लोकार्धात ती समग्र आली आहे.

### ४६१. मनोहर

''मनोहरो जितक्रोधो वीरबाहुर् विदारण:'' या श्लोकार्धांत धीरोदात्त नायकाचें वर्णन आलें आहे. परमात्मा हा पुरुषोत्तम आहे. आदर्श पुरुष आहे. त्याचें नाम-रूप मनोहर आहे. नाम श्रुतिहर, रूप नेत्रहर आणि तद्द्वारा तो मनोहर. रामाचें नाम श्रुतिसुभग, तसें रामाचें रूप नयनरम्य आहे. आणि या बरोबरच त्याचें शील हि तसेंच मधुर आहे. तो जितक्रोध आहे. नाम रूप गुण शील सर्वच सुखद असल्याखेरीज त्याला मनोहर म्हणतां यावयाचें नाहीं. पण खरोखर एखादा पुरुष मनोहर आणि जितक्रोध म्हणजे गोरा गोमटा आणि गोड स्वभावाचा असला तर तेवढ्यानें का तो प्रिय आणि पूज्य होईल? नाहीं. तिथें पराक्रमाची हि अपेक्षा आहे. गोरीगोमटी आणि गोड स्वभावाची एखादी अबला हि असूं शकेल. म्हणून जितक्रोधाला जोडून वीरबाहु पद आलें आहे. तो पराक्रमी असेल. दुर्वृत्तांचें शासन आणि धर्मनिष्ठांचें पालन करणारे त्याचे भुज असतील. आपल्या प्रजेंतील, समाजांतील दुर्‌जन-सज्जनांचे निग्रहानुग्रह करण्याचें सामर्थ्य हवेंच, पण तेवढ्यानें संपलें नाहीं परचक्र परतवून लावण्याचें, आक्रमण मोडून काढण्याचें, आक्रामक शक्ति फोडून टाकण्याचें आंतरराष्ट्रीय विदारक सामर्थ्य नि बळ हि त्याला हवें. तरच तो पुरुषोत्तम ठरावयाचा. रामाच्या ठाईं हें समस्त होतें. त्यानें आपल्या मधुर नामरूप-गुणशीलानें स्वजनांना सुखविलें, भुजबळानें दुर्‌जनांना नमविलें आणि पराक्रमानें रावणासारख्या दुष्टांना नेस्तनाबूद केलें. आधुनिक काळांत गांधींनीं हि असेंच केलें आणि पुढें हि तो परमात्मा असेंच करीत राहणार. कारण त्याच्या अवतारांचें हेंच प्रयोजन आहे. तो जर असा सर्वोत्तम नसता तर सर्वांचें मन कसा हरण करूं शकला असता? परमात्मा हा मनोहर आहे. कारण कोणत्याहि दृष्टीनें पहा त्यांत कोठलें हि वैगुण्य आढळावयाचें नाहीं. त्याच्यांत सर्व सद्‌गुण एकवटले असून त्यांचें तो निधान आहे. नको तें अणुमात्र नाहीं, हवें तें परिपूर्ण आहे. म्हणून मनोहर.

### ४६२. जितक्रोध

क्रोध म्हणजे काय? नुसतें रागावणें म्हणजे क्रोध नव्हे. क्रोध हा सर्व विकारांचा मूल विकार होय.

विकार म्हणजे, चलन, स्वरूपापासून जें चळणें त्याचेंच नांव क्रोध, त्याचेंच नांव विकार. क्रोध शब्दापेक्षां कोपशब्द हा या अर्थाला अधिक जवळचा आहे. कुप् म्हणजे चळणें. वेदांत कुप् धातु चळणें या अर्थानें येतो. तिथें ''चुकोप'' म्हणजे चळला, ढळला, हलला असा अर्थ होतो, रागावला असा नव्हे. परंतु रागांत मनुष्य ताळ्यावर राहत नाहीं असें पाहून रागावण्यास कोप क्रोध हे शब्द रूढ झाले आहेत. तेव्हां जितक्रोध या शब्दाचा अर्थ होईल जो स्थितप्रज्ञ आहे, ज्याची आत्मनिष्ठा डगमगत नाहीं, असा निष्कंप आत्मबुद्धीचा पुरुष. असा पुरुष आपले सर्व व्यवहार विकारवश न होतां स्वाधीनपणें करतो आणि म्हणून तो अमोघवीर्य असतो. त्याचें वचन कधीं वितथ व्हायचें नाहीं. त्यानें उचलेलें पाऊल कधीं मागें हटायचें नाहीं. त्याचा मनोरथ मुक्कामाला पोंचणारच. त्याचा क्रोध हा क्रोध नसतो तर तो त्याचा निश्चय असतो आणि म्हणून त्याला देव हि धावरतात. 'कस्य विभ्यति देवाश्च जात-रोषस्य संयुगे?' 'नक्रः स्वस्थानमासाद्य गजेन्द्रमपि कर्षति' स्वस्थानाच्या आश्रयानें मगर हत्तीला हि मात देतो. तसा जितक्रोध पुरुष आपल्या भूमिकेवर दृढ राहून, स्वस्थ राहून, जगाला जेर करतो. तो आपली आत्मनिष्ठा कधीं सोडीत नाहीं. त्यामुळें तो ध्रुव असतो आणि जगाला त्याच्या भोवतीं फिरणें भाग पडतें. सरळाला सरळ करतां येत नाहीं. जें वांकडे असेल तेंच सरळ होणार.

परमात्मा हा नित्यशुद्ध-बुद्ध-मुक्त-स्वभाव असल्यामुळें सदैव जितक्रोधच आहे. जे त्याची उपासना करतात ते हि तसेच होतात:

**न क्रोधो न च मात्सर्यं न लोभो नाशुभा मतिः।**
**भवन्ति कृतपुण्यानां भक्तानां पुरुषोत्तमे।।**

### ४६३. वीरबाहु

वीरौ पराक्रम-शालिनौ बाहू यस्य सः वीरबाहुः। ज्याचे भुजदंड पराक्रमशाली आहेत तो वीरबाहु होय. वीर कोण? जो 'घरच्यांवरी खाय दाढा, बाहेरीं दीन बापुडा' तो? नाहीं. जें जिथें उचित तेंच जो करतो तो वीर होय. राम सीता-वियोगानें विह्वल होतो. कौटुम्बिक जीवनांत तो असा कुसुम-कोमल आहे परंतु रणांत? रणांत तो शिलासंघात-कर्कश आहे. अर्थात् जिथें कोमलता हवी तिथें तो कमालीचा कोमल आहे आणि जिथें कठोरता हवी तिथें तो कमालीचा कठोर आहे. न्यायसभेंत तो न्यायनिष्ठुर आहे. तिथें सीता त्याला पत्नी नाहीं, ती एक सर्व सामान्य प्रजाजन आहे, युरोपियन न्यायदेवता आंधळी आहे (कवि-समया प्रमाणें) ती तोंड पाहून न्याय देत नाहीं. ती व्यक्ति-निरपेक्ष न्याय देते. पण भारतीय कविसमय असा नाहीं. भारतीय न्यायदेवता आंधळी नाहीं ती डोळसच आहे. पण ती समदृक् आहे. न्यायासनासमोर राजारंक सर्व सारखे. सर्व स्वकर्मफलभाक् आहेत. जसें कर्म तसें फळ. न्यायासन हें पाहत नाहीं कीं कर्म कोणीं केलें. तें फक्त कर्म पाहतें आणि कर्मानुसार फळ देतें. परमेश्वरी सत्ता आणि त्या सत्तेचे प्रतिनिधि राजे धर्मलंडांचा निग्रह आणि धर्मनिष्ठांचा अनुग्रह, करतात, म्हणून परमात्म्याला वीरबाहु म्हणावयाचें.

'बाहू राजन्यः कृतः' असें जें पुरुष-सूक्तांत आलें आहे त्याचा हि आशय हाच. निग्रहानुग्रहाचें कार्य क्षत्रिय करतात. म्हणून ते परमात्म्याचे भुज होत. ब्राह्मण त्याचें मुख होत. कारण ते परमेश्वरी आज्ञा, वेद, बोलतात. वैश्य त्याचें उदर होत. कारण परमेश्वरी दयेचा ते संग्रह आणि विस्तार करतात. सर्वांना धनधान्य पुरवितात. शूद्र त्याचे पाद होत. कारण विश्वरूपाचे ते पाईक आहेत. जिथें सेवेची गरज तिथें ती ते पुरवीतच असतात. अशा प्रकारें परमात्माच चतुर्वर्णरूपानें अवतरला आहे. आणि म्हणून वीर म्हणजे क्षत्रिय आहेत बाहु ज्याचे तो परमात्मा वीरबाहु म्हणावयाचा.

### ४६४. विदारण

विदारयति इति विदारण:। जो कोंडी फोडून जातो तो विदारण म्हणजे कोंडीफोड्या होय. परमात्मतत्त्व हें अत्यंत स्वतंत्र वृत्तीचें तत्त्व आहे. तें कुठें हि गिरफदार होत नाहीं, कैद होत नाहीं. त्याला जिथें जिथें कोंडून पकडावें तिथून तिथून तें निसटलेंच म्हणून समजा. असें तें हातावर तुरी देणारें आहे. देहेन्द्रियमनोबुद्धि या कोणाच्याच पकडींत तें येत नाहीं. म्हणजे पकडींत न येणें हेंच त्याचें लक्षण.

**यस्यामतं तस्य मतं मतं यस्य न वेद स:।**
**अविज्ञातं विजानतां विज्ञातमविजानताम्।।**

असें तें विलक्षण आहे. अत्यन्त सूक्ष्म वस्तु पकडतां येत नाहीं. तशी अत्यन्त विशाल वस्तु हि पकडतां येत नाहीं. परमात्म-तत्त्व हें तसेंच सुसूक्ष्म आहे तसेंच असीम आहे. ज्ञानदेवानें त्याची सुसूक्ष्मता आहे आणि असीमता उपमा-दृष्टांतांनीं अशी वर्णिली आहे :

**''मोतियाचें पाणी। भरूं न ये वो रांजणीं।**
**गगनासी गवसणी। घालितां न ये।।**

पाणीदार मोत्याचें पाणी रांजणांत भरून ठेवतां येत नाहीं किंवा आकाश थैलींत भरून घेऊन जातां येत नाहीं. त्याची मोट बांधतां येत नाहीं. सर्व कोंड्या फोडून पार होणारें तें अति पटाईत तत्त्व आहे. म्हणून त्याला विदारण म्हणावयाचें.

विदारणाचा अवतार, प्रतिनिधि, त्याचा भक्तहि कोणाच्या कचाट्यांत सांपडत नाहीं. तो संस्था संघ संघटनें यांच्या जाळ्यांत सांपडत नाहीं. आपल्या आत्मबुद्धींत भक्कम तो कोणत्याहि प्रपंचांत पडत नाहीं. कोणाच्या हि भूलथापेंत येत नाहीं. आपल्या आत्मबुद्धीच्या योगें सर्व कोंड्यांतून तो सही सलामत बाहेर पडतो.

आदर्शभूत पुरुषोत्तम शत्रूंच्या कोंड्या फोडून आणि जाळीं तोडून पार होतो आणि आपल्या राष्ट्राचा, समाजाचा आणि मानवतेचा उद्धार करतो. तो मनोहर म्हणजे रूपवान्, जितक्रोध म्हणजे धीर बुद्धिमान्, वीरबाहू म्हणजे बलवान् आणि विदारण म्हणजे सर्व संकटांवर मात करणारा पराक्रमी परम पुरुषार्थवान् असतो.

### ४६५. स्वापन

स्वापन म्हणजे स्वाप वा झोप आणणारा. सर्व जीव जिच्या अधीन होऊन रोजच्या रोज श्रान्ति-परिहार पावून ताजे तवाने होतात त्या निद्रेला, ती तमोगुण कार्य असली तरी, वाईट कसें म्हणायचें? ती सर्व जीवांना आपल्या अंकावर झोपविणारी जननीच होय. श्रम चिंता भय सर्व विसरून जीव तिथें विश्रान्त होतात आणि सुखावतात.

''यदग्रे चानुबन्धे च सुखं मोहनमात्मन:। निद्रालस्य-प्रमादोत्थं'' म्हटलें आहे खरें, पण त्याशिवाय जीवाचें चालणारें नाहीं. माणसाला एक दिवस जरी जागरण झालें तरी तो अस्वस्थ होतो. निद्रानाश हा रोग आहे, विकृति आहे. ज्याला रोज सुखानें झोपायला मिळतें त्याच्या सारखा भाग्यवान् तोच. तो आलस्य म्हणजे कर्मस्फूर्तीचा अभाव आणि प्रमाद म्हणजे जागृतीचा स्मृतीचा दक्षतेचा अभाव. पण हे दोष निद्रा नीट न झाल्यामुळें होतात, निद्रेमुळें नव्हे. म्हणून निद्रा हें मोठें वरदानच होय. तें दिव्य औषध आहे, अद्‌भुत रसायन आहे. जणूं सर्वेन्द्रियांना तिथून संजीवनच मिळतें. हें संजीवन पुरविणारा जो परमात्मा तो म्हणूनच स्वापन म्हटला आहे.

आलस्य आणि प्रमाद हे दोष आहेत तशी निद्रा नाहीं. निद्रा ही गरज आहे. ती पूर्ण झाल्यानंतर लगेंच शय्यात्याग करून उत्साहानें कामाला न लागणें हा आळस आहे. कामाला लागल्यानंतर त्यांत यत्किंचित् अनवधान हा प्रमाद आहे. आळस आणि प्रमाद यांचा त्यागच विहित आहे. निद्रेचें यावदर्थ मित सेवन अनिषिद्ध आहे. झोप भूक तहान मैथुनेच्छा इत्यादि जन्ममृत्युजराव्याधींप्रमाणें देहस्थितीचीं अंगें आहेत. समूळ देहाचें निराकरण झाल्याखेरीज त्यांचें

निराकरण होऊं शकत नाहीं. त्यांचें नियंत्रण नियमन तेवढें शक्य आहे आणि तें युक्तिपूर्वक करणेंच इष्ट. ही युक्तिच पुढील स्ववशपदानें सुचविली आहे.

### ४६६. स्ववश

''कामात्मता न प्रशस्ता नचैवेहास्त्यकामता'' कामात्मता इष्ट नाहीं आणि जीवाला अकामता जमत नाहीं. हें आहे जीवनाचें कोडें. आत्मा हा निरुपाधि असल्यामुळें आमचा आदर्श तो आहे. आदर्श देहनिरपेक्षच असायला पाहिजे. कारण तेंच परम सत्य आहे. परंतु जीवन तर देहसापेक्षच आहे. म्हणून देहाची उपेक्षा हि करतां येत नाहीं. या दोहोंचा समन्वय धर्म करतो. तो आत्म्याचें आत्म्याला आणि देहाचें देहाला द्यायला सांगतो. आत्मा साध्य आहे. देह साधन आहे. 'या देहाचेनि साधनें सच्चिदानंद पदवी घेणें' हें आपलें कर्तव्य आहे, असें धर्म शिकवितो. देहधारणा तों पर्यंत आवश्यकच आहे, जोंवर चरम देहानें सगळे मागील पुढील जन्म छेदले नाहींत, सगळे देह समूळ काटले नाहींत, तोंवर देह हें साधन सांभाळलें पाहिजे. त्यासाठीं त्याची झोंप भूक तहान पाहिली पाहिजे. पण गरज भागवणें निराळें नि चोचले पुरविणें निराळें. पहिल्या प्रकाराला प्राणवृत्ति व दुसऱ्याला इंद्रिय-वृत्ति म्हणतात. धर्म प्राणवृत्तीनें जगायला सांगतो. इंद्रियवृत्तीचा निषेध करतो. ''भुकेला कोंडा, निजेला धोंडा'' ही म्हण प्राणवृत्तीची आहे. ''भोजनीं न युक्त त्याग किंवा राग। युक्त ती निःसंग कार्यदृष्टि'' ही जीवनाच्या कोड्याची सोडवणूक आहे. स्ववशपदानें हेंच अभिप्रेत आहे. स्ववश कोण? जो इंद्रियाधीन न होतां स्वाधीनपणें त्यांना राबवून घेतो तो स्ववश होय. गीतेच्या पुढील श्लोकांत त्याचेंच वर्णन आलें आहे.

**रागद्वेषवियुक्तैस्तु विषयान् इन्द्रियैश्चरन्।**
**आत्मवश्यैर् विधेयात्मा प्रसादं अधिगच्छति।।**
**यस् त्विन्द्रियाणि मनसा नियम्यारभतेऽर्जुन।**
**कर्मेन्द्रियैः कर्मयोगं असक्तः स विशिष्यते।।**

हा जो विधेयात्मा, हा जो अनासक्त कर्मयोगी, तोच स्ववश होय. आणि गीतोक्त योग तो हाच. विदेह परमात्मा सहजच स्ववश आहे. परंतु त्याचा उपासक देहधारी असल्यामुळें त्याला तारेवरची कसरत करावी लागते. आत्मदर्शनासाठीं जिजीविषा बाळगून जगायचें तर आहार घेणें भाग आहे. आहार घ्यावा तर त्यांत रागद्वेष शिरकाव करतात. तेव्हां राग-द्वेषांच्या आहारीं न जातां आहार घेणें हीच साधकाची युक्ति. ही युक्ति करीत असतां आत्मदर्शनाच्या उद्दिष्टाचा विसर पडूं न देणें हीच त्याची भक्ति आणि युक्ति. भक्तीच्या संगतीची परिणति म्हणजे मुक्ति होय.-''नाहीं देवापाशीं मुक्तीचें गांठोडें। आणुनी निराळें द्यावें हातीं।।'

### ४६७. व्यापी

कार्याला कारण व्यापून असतें म्हणून कारण हें व्यापी म्हणावयाचें. परमात्मा हा जगत्कारण असल्यामुळें तो जगद्व्यापी अथवा विश्वव्यापक म्हणावयाचा.

**मया ततमिदं सर्वं जगद् अव्यक्तमूर्तिना।**
**न च मत्स्थानि भूतानि पश्य मे योगमैश्वरम्।।**

कारणानें सगळीं कार्यें व्यापून टाकलेलीं आहेत. म्हणून कार्यें कारणांत भरलीं आहेत म्हणावयाचें. पण कारण कार्यांत भरलें आहे. असें नाहीं म्हणतां यावयाचें. कारण, कारण हें कार्याहून मोठें असून कार्यापूर्वी आणि कार्यानंतर हि अस्तित्वांत असतें. त्या स्थितींत तें स्वस्थच असतें. परस्थ असूं शकत नाहीं, कार्यस्थ असूं शकत नाहीं. कारण, त्याचा तर अभावच असतो. यापुढें जाऊन म्हटलें आहे, कार्यें हि कारणस्थ नाहींत, कारण त्यांना कारणाहून मुळीं वेगळें अस्तित्वच नाहीं. ज्यांना स्वतंत्र अस्तित्वच नाहीं तीं कार्यें कारणांत असतात म्हणण्यांत काय अर्थ? सताच्या ठाईं असत् भरलें आहे असें कसें

म्हणतां येईल? 'एकं सत्' हेंच पूर्ण वचन आहे. जें एकमेवाद्वितीय आहे तें दुसऱ्याच्या ठाईं व्यापून आहे अथवा दुसरें त्याच्या ठाईं भरलें आहे असें म्हणणें म्हणजे दुसऱ्याचें अस्तित्व मान्य करणेंच होय. तें दुसऱ्याच्या ठाईं नाहीं हें म्हणणें हि तेंच होय. सारांश, दुसऱ्याचा संपर्क, दुसऱ्याची छाया, दुसऱ्याचें नांव हि त्या परमात्म्याला सहन होणारें नाहीं. असा तो असहिष्णु आहे. एकमेवाद्वितीय. परंतु तारतम्यानें बोलावयाचें झाल्यास कारण म्हणून तो व्यापी म्हटला आहे. गीतेच्या वरील त्रिपदींतील हेंच तें पहिलें पद होय. (१) मी सर्व भूतांना गुंडाळून बसलों आहें. (२) भूतें मला गुंडाळून बसलेलीं नाहींत (३) मी हि भूतांन गुंडाळून बसलेलों नाहीं. पहिलीं दोन पदें कार्यभाव मान्य करून तारतम्यवाचक आहेत. शेवटलें तिसरें पद कार्यकारण, भावाचें द्वैत अमान्य करून केवलत्व-वाचक आहे.

## ४६८. नैकात्मा

नैकात्मा म्हणजे नैकस्वरूप. परमात्मा केवलस्वरूप म्हटला म्हणजे मग जें हें विचित्र जग दिसतें तें काय आहे म्हणून म्हणावयाचें? तें हि परमात्मस्वरूपच जर आहे, तर उघडच तो परमात्मा नैकात्मा झाला. मागील व्यापी पदानें तो कारण-स्वरूप असल्याचें म्हटलें तर इथें नैकात्मा पदानें तो कार्यरूप हि आहे असें म्हटलें आहे. कारण एक असतें, कार्यें अनेक असतात, कार्य आणि कारण दोन्ही मिळून तो परमात्मा नैकात्मा होतो. घट आणि मृत्तिका दोन्ही एकच आहे म्हणाल तर आमचा घट देऊन टाका आणि आपली मृत्तिका घेऊन जा भरा पाणी! पण तें शक्य नाहीं म्हणून नैकात्मता मानणें भागच आहे.

ब्रह्मा म्हणून तो सृष्टीची उत्पत्ति करतो, विष्णु म्हणून तो तिचें पालन करतो, महेश म्हणून तो तिचा लय करतो आणि गुणातीत होऊन स्वस्थ होतो. आणि म्हणून तो म्हणावयाचा नैकात्मा.

सृष्टीच्या वैविध्यामुळें आणि तदतीततेमुळें स्रष्टा नैकात्मा झाला तसा हा समाज-पुरुष हि कार्यभेदानें नैकात्मा झाला आहे. ज्ञानोपासनेसाठी तो ब्राह्मण, प्रजापालनासाठीं क्षत्रिय, धनोपार्जनासाठीं वैश्य आणि सेवाचाकरीसाठीं तो शूद्र झाला आहे.

समाजपुरुषाप्रमाणें व्यक्ति हि विकासावस्थाभेदानें नैकात्मा आहे. ती विद्याध्ययनासाठीं ब्रह्मचारी, प्रजोत्पादनासाठीं गृहस्थ, तपस्येसाठीं वनस्थ आणि देहाभिमानमुक्तीसाठीं संन्यासी होत असल्यामुळें नैकात्मा आहे.

जीवात्मा पूतात्मा परमात्मा अशी हि आत्म्याची नैकात्मता उघडच आहे. देहाद्यभिमानी जीव जीवात्मा होय. अनहंवादी वा सोऽहंवादी जीव पूतात्मा होय आणि नित्य शुद्ध बुद्ध मुक्त-स्वभाव निरुपाधिक आत्मा परमात्मा होय. नामदेवानें 'जीव विठ्ठल आत्मा विठ्ठल परमात्मा विठ्ठल विठ्ठल' या अभंगात ही नैकात्मता च उल्लेखिली आहे. अशा प्रकारें नैकधा नैकात्मता दिसून येते.

## ४६९. नैककर्मकृत्

परमात्मा हा सर्वात्मक असल्यामुळें तो सर्वविध कर्म करणारा आहे. एकच वा एकविधच कर्म तो करीत नाहीं. म्हणून तो नैककर्मकृत् म्हटला आहे. नैककर्मकृत् म्हणजे सर्व-कर्म-कृत् समजावयाचें. सर्व कर्म गुणानुसार त्रिधा विभागलें जातें. राजस सात्त्विक तामस. रजसुपाधिक चेतना कडून होणाऱ्या कर्ममात्राला विश्वोत्पति, सत्त्वोपाधिक चेतंनाकडून होणाऱ्या कर्ममात्राला विश्वपालन आणि तमसुपाधिक चेतना कडून होणाऱ्या कर्ममात्राला विश्वसंहार अशा वैश्विक संज्ञा आहेत आणि तत्तद्‌गुणोपाधिक चेतनाला ब्रह्मा विष्णु महेश. गुणोपाधि घेऊन नैकात्मा झालेला तो चेतन नैककर्में करतो. तोच त्रिगुणातीत चेतन प्रपंचोपशम शान्त शिव अद्वैत चतुर्थ म्हटला जातो आणि चतुर्मूर्ति म्हणून त्याचें वर्णन होतें:

**बहलरजसे विश्वोत्पतौ भवाय नमोनम:**
**प्रबलतमसे तत्संहारे हराय नमोनम:।**

**जनसुखकृते सत्त्वोद्रिक्तौ मृडाय नमोनम:।**
**प्रमहसि पदे निस्त्रैगुण्ये शिवाय नमोनम:।।**

परमात्मा हा असा नैकात्मा आणि नैककर्मकृत् असल्यामुळें विश्वात्मभावानें तो म्हणूं शकतो ''बहूनि मे अकृता कृतानि'' ''तस्य मे तत्र न लोम च नामीयत।'' कौषीतिक ३.१ करूं न नयेत अशा हि बहुत गोष्टी मीं केल्या आहेत पण माझा बाल हि वांकडा होत नाहीं. सर्वकर्तृत्व आणि वस्तुत: तदतीतत्व दोन्ही त्यांत एकसाथ प्रतिपादिलें आहे. परमात्म्याची सर्वाधारता आणि निरुपाधिक केवलता लक्षून असें परस्पर विरुद्ध प्रतिपादन व्यवस्थितच होय. परमात्म्याला तुम्ही एकात्मा म्हणा कीं नैकात्मा म्हणा, तो एकदेशी होऊं शकत नाहीं. आणि म्हणून तो नैकात्मा नैककर्मकृत् इत्यादि म्हटला आहे.

'स्वापन: स्ववशो व्यापी' हा चरण स्वतंत्र आहे 'नैकात्मा नैककर्म कृत्' हा स्वतंत्र. कुठें चरण, कुठें श्लोकार्ध, कुठें श्लोक, कुठें युग्मक, कुठें कुलक अशी ऱ्हस्वदीर्घ संगति वा सूत्र विवक्षेनुसार आढळून येतें. जिथें अशी संगति नसेल तिथें, प्रत्येक पद स्वतंत्र आहेच. संगतिसूत्रांत हि प्रत्येक पदाचें स्वातंत्र्य अबाधित आहेच 'सूत्रे मुक्तामणेरिव.'

## ४७०. वत्सर (१) वत्स-र, (२) वत्-सर

''वत्सरो वत्सलो वत्सी'' हा चरण वत्स-केन्द्रित आहे. क्रमश: र ल आणि इन् प्रत्यय लागून वत्सर वत्सल आणि वत्सी हे शब्द बनले आहेत, आणि त्याप्रकारें ते समानार्थक दिसतात. तथापि रूढार्थानें ते भिन्न आहेत. वत्सर म्हणजे वर्ष, वत्सल म्हणजे अपत्य-सदय आणि वत्सी म्हणजे वत्सवान्, वत्सप.

वत्सर हा शब्द वत्स+र असा अथवा वत्+सर असा हि लावतां येईल. प्रतिवर्ष नवें पीक घरांत गोठ्यांत शेतांत रानांत येत असतें, त्यामुळें वर्ष हें 'वत्सान् राति ददाति इति वत्सर:' अशा व्युत्पत्तीनें वत्सर म्हटलें गेल्यास काय नवल? काल-स्वरूप परमात्मा च प्रतिवर्ष पाऊस पीक प्रजा देत असतो. त्यामुळें तो वत्स-र होय. प्रत्येक जीवाच्या दृष्टीनें त्याचा वंश हा सर्वांत महत्त्वाचा विषय आहे. वंशकर पुत्र नसेल तर त्याची सारी धनदौलत राज्यवैभव त्याला निरर्थक वाटतें. तें सारें लावारिश होणार. म्हणून आमचें सर्वस्व पुत्र आहे. तद्द्वारा आम्ही संतत राहतों आणि या समस्त मिळकतीचे मालक होतों. असें हें सर्वस्वरूप संतान देणारा परमात्मा म्हणून वत्सर होय.

वत्सर म्हणजे वर्ष हें यथावत् सरत असतें म्हणून तें वत्सर म्हणावयाचें. आधीं पावसाळा येतो, मग येतो हिवाळा, नंतर उन्हाळा येतो आणि परत पुन: पावसाळा, हिवाळा, उन्हाळा. हें कालचक्र असेंच वर्षानुवर्षे युगानुयुगें सतत चालत राहतें म्हणून तो कालात्मा परमात्मा वत्सर होय. वत्सर हें सामान्य वर्ष होय. संवत्सर आणि परिवत्सर हीं विशिष्ट वर्षे होत. चांद्र बारा मास अथवा ३६० दिवसांचें वर्ष म्हणजे वत्सर, सौर बारा मास अथवा ३६५ दिवसांचें वर्ष म्हणजे संवत्सर आणि नाक्षत्र बारा मास उर्फ तीनशें सहासष्ट दिवसांचें वर्ष म्हणजे परिवत्सर होय.

## ४७१. वत्सल

वत्स घरीं असतें आणि गाय रानांत चरायला जाते. वत्साला भरपूर दूध पाजायला यावें म्हणून ती कोंवळें लुसलुशीत गवत आणि अग्रअग्रें खात असते. जातांना खातांना म्हणजे दोन्ही अर्थांनीं चरतांना तिला सतत वत्साचें ध्यान असतें. तिच्या दृष्टीसमोर सतत तें वत्स असतें. त्याच्या स्मरणानें सायंकाळीं ती घरीं परततांना धांवत असते आणि तिला आपला पान्हा आवरत नाहीं. तिच्या स्तनांतून दूध गळूं लागतें. त्याची धार लागते. धावत हंबरत येऊन जेव्हां ती वत्साला चाटते त्याला पाजते तेव्हांच तिला चैन पडते. अशा अपत्यप्रेमाला म्हणतात वत्सलता. परमात्मा हा असा वत्सल आहे. 'वत्सं लाति आददाति इति वत्सल:।' वत्साला अपत्याला घेतो

कुरवाळतो म्हणून वत्सल. प्रत्येकाला आपल्या विषयीं जें प्रेम वाटतें तसें तें दुसऱ्या कोणाला वाटूं शकत नाहीं. असें अकारण अनिवार प्रत्येकावर प्रेम करणारा सर्वांचा प्रत्यगात्मभूत परमात्मा हा वत्सल नाहीं म्हणायचा तर काय म्हणायचा? त्याच्याहून अधिक वत्सल कोण आहे? सर्व नातीं प्रेमाचीं असलीं तरी तीं अकारण नाहींत. तुम्ही माझे कोणी असाल तर तुमच्या विषयीं मला प्रेम वाटेल. सर्व प्रेमाच्या नात्यांत मायलेकरांचें प्रेम सर्वोपरि मानिलें जातें. तिथें प्रेमाला दुसरें कांहीं कारण लागत नाहीं. हा माझा पुत्र आहे, ही माझी आई आहे एवढेंच कारण त्या प्रेमाला पुरेंसें आहे. नाम रूप गुण कर्म कशाची हि अपेक्षा तिथें नाहीं. इतर नात्यांत तसें नाहीं. म्हणून तीं नातीं कनिष्ठ होत. परंतु मायलेकरांच्या नात्याहून हि परमात्म्याचें नातें आगळें आहे. तिथें जन्माचा, रक्ताचा हि संबंध नाहीं. परमात्मा तुमची माता नाहीं, परमात्मा तुमचा पुत्र नाहीं, तर तो तुमचा निजात्मा आहे. तोच तुम्ही आहां. 'तत् त्वं असि'. त्याहून हि अधिक निकट, अंतरतर दुसरें कांहीं असूं शकत नाहीं. दुसरें अधिक प्रिय आणि प्रेमळ असूं शकत नाहीं. म्हणून परमात्मा हा निरतिशय वत्सल होय. त्याला वत्सल म्हणणें हि गौणच. पण गाईच्या वत्सलतेहून अधिक वत्सलता आम्हांला आढळत नाहीं. म्हणून आम्ही परमात्म्याला वत्सल म्हणून संबोधितों इतकेंच.

### ४७२. वत्सी

वत्सी म्हणजे वत्सवान्, ज्याला संतान आहे तो. जगांत सर्व वस्तूंचें निःसंतान होईल पण परमात्म्याचें कधीं व्हायचें नाहीं. तो सनातन आहे, त्याची संतति आत्मरूपानें कधींच कुंठित होत नाहीं. म्हणून त्याला वत्सी म्हणावयाचें.

दुसऱ्या हि अर्थानें तो वत्सी आहेच. धर्मरूप तो वृष असून या गोरूपधारी पृथ्वीचा तो पति आहे. अर्थात् पृथ्वीवर जे सारे जीव आहेत, आणि मुख्यतः मानव, ते सर्व त्याची प्रजा म्हणजे वत्सच होत.

कृष्णावतारांत भगवान् वत्सप होता; बालपणीं वासरांचा कळपच तो राखीत असे म्हणून हि तो वत्सी म्हणावयाचा.

भगवान् विष्णु श्रीवत्स-लाञ्छन म्हणून प्रसिद्धच आहे. तेव्हां त्या हि अर्थानें तो वत्सी म्हटला जाईल.

''न हि वंध्या विजानाति गुर्वीं प्रसववेदनाम्'' या न्यायानें ज्याला वत्स नाहीं, अपत्य नाहीं तो वात्सल्य काय जाणणार? पण परमात्मा हा तसा नाहीं. त्याला असंख्य वत्स आहेत आणि त्या सर्वांवर त्याची समान माया आहे. आणि म्हणून तो वत्सी होय, प्रजावान् होय. श्रुतीनें म्हटलें आहे. ''मातृमान् पितृमान् आचार्यवान् वेद'' ज्याला आई आहे, बाप आहे, गुरु आहे त्यालाच संस्कार लाभत असतात आणि अशा संस्कृत जीवालाच ज्ञान लाभत असतें. निगुऱ्याला नव्हे. परंतु वत्सी शब्द असें सांगत आहे कीं ज्याला पुत्र पुत्री आहेत छात्र छात्रा आहेत त्यालाच वात्सल्य काय आहे हें कळत असतें आणि अशा वात्सल्यवान् पुरुषालाच कृतार्थता लाभत असते. वत्सी अपत्यवान् पुरुषांनाच प्रजामृतत्व लाभत असतें. निपुत्रिकांना तें अमृतत्व लाभत नाहीं. ते अलब्ध-पिंडोदक अकीर्तिमान् जणूं देहाबरोबरच भस्मीभूत होतात. त्यांचें नांव-निशाण राहत नाहीं. परमात्म्याची सृष्टि जीवजगत् आहे तोंवर परमात्म्याचें नाम प्रत्यहीं घेतलें जाणार. म्हणून तो वत्सी.

### ४७३. रत्नगर्भ

प्रस्तुत श्लोकांत प्रत्येक चरण स्वतंत्र सूत्राचा आला आहे. 'स्वापनः स्ववशो व्यापी। नैकात्मा नैककर्मकृत्। वत्सरो वत्सलो वत्सी।' हे तीन चरण आपण पाहिले. आतां चौथा चरण पहावयाचा आहे. 'रत्नगर्भो धनेश्वरः।' या चरणांत रत्न आणि धन हे शब्द समानार्थकच समजावयाचे आहेत. आणि त्यामुळें हीं दोन्ही पदें परस्पर-पूरक झालीं आहेत. मुक्ता प्रवाळ कौस्तुभा सारखीं रत्नें समुद्रांतून

निघालीं आहेत. सुवर्ण रजत हिरे माणकें डोंगर खाणींतून आलीं आहेत. म्हणजे कांहीं जलज कांहीं भूमिज अशीं हीं रत्नें आहेत. आकाश वायु अग्नि यांच्यातून आम्हांला अशीं रत्नें मिळत नाहींत. तीं फक्त जल आणि भूमि या दोनच महाभूतांतून मिळतात. रत्नगर्भ पदानें रत्नाकर समुद्राचा आणि धनेश्वर पदानें मुख्यत: हेमगिरि मेरूचा संकेत केला आहे. दोन्ही भगवद्-विभूतिच आहेत. 'सरसां अस्मि सागर:।' 'मेरु: शिखरिणां अहम्।' असा गीतेंत त्यांचा निर्देश आला आहे.

धान्य पशु यांची पैदास माणूस करतो. परंतु सोनें रुपें हिरे माणकें यांची पैदास माणसाला करतां येत नाहीं. ती ईश्वरी सृष्टि आहे. म्हणून परमात्मा हा रत्नगर्भ म्हणावयाचा. रत्नादि त्याचे गर्भ होत. त्याच्यापासूनच त्यांची पैदास होते.

रत्नें ही मौल्यवान् आहेत, कारण तीं दुर्मिळ आहेत, अविनाशी आहेत. इतर वस्तु कुजतात, नाश पावतात, परंतु हिरा हा लक्षावधि वर्षे जसाचा तसा राहतो.

**अच्छेद्योऽयं अदाह्योऽयं अक्लेद्योऽशोष्य एवच।**
**नित्य: सर्वगत: स्थाणु: अचलोऽयं सनातन:॥**

हीं आत्म-लक्षणें त्याला कांहीं अंशीं लागू पडतात.

### ४७४. धनेश्वर

''भौमं दिव्यं चान्तरिक्षं वित्तं अच्युतनिर्मितम्'' जें सगळें धन आहे भूमिगत अन्तरिक्षगत वा आकाशगत तें सगळें ईश्वरनिर्मित आहे. आणि म्हणून परमात्मा हा धनेश्वर होय. धनाची काय व्याख्या आहे? जें जीवनोपकारक तें धन. या व्याख्येप्रमाणें ज्याला सामान्यत: धन म्हणतात ते बहुमूल्य पाषाणखंड आणि कृमिनिष्ठीवनरूप प्रवालमुक्तादि जलज द्रव्य आणि हेमरजतादि चकचकीत मृत्पिंड खरोखर धन नसून निधन होत आणि यांनाच अनुलक्षून शंकराचार्य ''अर्थमनर्थं भावय नित्यम्'' म्हणून उपदेशितात. हा उपदेश इतर कोणी ऐको वा न ऐको, इसापाचा कोंबडा मात्र. बरोबर ऐकतो. तो उकिरड्यावर पडलेल्या रत्नाला लाथाडतो आणि धान्याचा कण तेवढा टिपून घेतो. शंकराचार्य कुक्कुटमंत्रच मानवाला समजावून सांगत आहेत. रत्नादिकांच्या नि सोन्याचांदीच्या मागें लागून मानवानें जीवन विकृत व क्षीण करून टाकलें आहे. हिरकणी खाऊन जीव जातो तर दाण्याची कणी खाऊन जीव जगतो. त्यामुळें अगदीं अक्षरार्थानें हि अर्थ हा अनर्थ कसा आहे तें लक्षांत यावें. सूर्यप्रकाश हि दिव्य धन होय, वर्षा हें आन्तरिक्ष धन होय आणि सर्वविध अन्न हें भौम धन होय. आणि या सगळ्या धनाचा स्वामी तो परमात्मा आहे. कारण सर्व जीवन आणि जीवनोपकारक सर्व त्याच्याच पासून उत्पन्न झालेलें असून तोच त्यांचा स्वामी आहे.

'वित्तेशो यक्षरक्षसाम्' म्हणून कुबेर हा भगवद्विभूति मानला आहे. कोषाध्यक्ष आहे तो. सर्व नव निधि त्याच्या अधीन आहेत. पण धनसंग्रहामुळें त्याचें हि जीवन विकृत झालें आहे. तो कु-बेर बनला आहे. 'कु कुत्सितं बेरं शरीरं यस्य स: कुबेर:' अशी आहे कुबेराची व्युत्पत्ति. हें असलें सर्व धन कुबेराला समर्पण करून मानवानें यक्षराक्षसांच्या धन-तृष्णा आणि भोगासक्ति यांच्या तावडींतून आपली सुटका करून घ्यावी.

### ४७५. धर्मगुप्

'धर्मगुब् धर्मकृत् धर्मी' हा चरण उघडच धर्मसूत्रित आहे. या पुढील चरणांत दोन वार्तिकें आलीं आहेत ''सदसत्'' आणि ''क्षरमक्षरम्'' ह्रस्व तें वार्तिक, दीर्घ तें सूत्र म्हणावयाचें.

परमात्मा हा धर्मगुप् म्हणजे धर्माचें रक्षण करणारा आहे. तो धर्मकृत् म्हणजे धर्म-विधान करणारा आहे. तो धर्मी म्हणजे धर्मवान् आहे.

ज्या गुणधर्मामुळें एखादा पदार्थ नामरूपास येतो तो कारणभूत स्वभावधर्म होय. उदाहरणार्थ गुडाची

गोडी हा गुडाचा धर्म होय. त्या गोडी ह्या गुणधर्मामुळेंच त्या पदार्थाला गुड हें नाम आणि रूप मिळालें आहे. प्रत्येक पदार्थाचा धर्म त्याचा जीवन-हेतुभूत होऊन त्याला धारण करीत असतो. म्हणून तो धर्म म्हणावयाचा. या धर्माचें रक्षण प्रत्यगात्मरूपानें परमात्मा करीत असतो म्हणून तो धर्मगुप् होय. व्यक्ति-धर्म तसा समाज-धर्म हि असतो. हा समाज-धर्म म्हणजे व्यक्तींची पारस्परिक व्यवस्था होय, जिच्या योगें व्यक्ति आणि समाज दोन्ही यथाकाल कृतार्थ होतात. या सामाजिक व्यवस्थेलाच वर्णाश्रमधर्म म्हणावयाचें. या धर्माचा रक्षक म्हणून परमात्मा धर्मगुप् म्हणावयाचा. परंतु व्यक्ति व समाज हि स्वतंत्र नाहींत. तीं विश्वरचनेचीं अंगभूत आहेत. तें जें विश्व त्याची हि एक व्यवस्था आहे, धर्म आहे. त्या धर्माचें तो परमात्मा रक्षण करीत आहे. म्हणून हें विश्व चाललें आहे. विश्व चाललें आहे, म्हणून समाज टिकला आहे. समाज टिकला आहे म्हणून व्यक्ति नांदते आहे. म्हणून तो परमात्मा धर्मगुप् होय. यालाच अनुलक्षून म्हटलें आहे. ''यथातथ्यतोऽर्थान् व्यदधात् शाश्वतीभ्यः समाभ्यः'' त्या परमात्म्यानें हें सारें विश्व अनादि कालापासून यथावत् धारण केलें आहे. टिकवून धरलें आहे. ''त्वमव्ययः शाश्वतधर्मगोप्ता'' गीतावचन हि त्याचाच अनुवाद करीत आहे.

## ४७६. धर्मकृत्

जनता ही धर्मी आहे. तिचा कांहींएक जीवनाचा आदर्श असतो. त्या आदर्शाला अनुलक्षून तिचे विचारक आणि कारभारी जनतेसाठीं एक संविधान तयार करतात. आणि ह्या संविधानाचें, ह्या धर्मसंहितेचें परिपालन जनतेची संसद् करीत असते. या त्रयीलाच इथें 'धर्मी धर्मकृत् आणि धर्मगुप्, म्हटलें आहे. भारतीय जनतेचा धर्म म्हणजे भारतीयता होय. या भारतीयतेच्या संगोपनासाठीं आणि विकासासाठीं गांधी, नेहरू, आंबेडकर यांनीं जें संविधान रचलें तें भारतीय संविधान होय आणि त्याचें परिपालन करवून घेण्याची व्यवस्था म्हणजे भारतीय परमोच्च न्यायासन आणि संसद होय. ही त्रयी सुसंस्कृत व विकसित राष्ट्रांनाच असते असें नाहीं. एखादी वन्य जाति घेतली तरी तिच्यांत हि तुम्हांला ही त्रयी आढळून येईल. सारांश जिथें जीवन आहे तिथें आदर्श आहे आणि तिथें न्याय व दण्ड ही व्यवस्था हि आहेच. आहे. मग तशी ती या विश्वाची कशी नसेल? हें विश्व धर्मी आहे. त्याचा एक आदर्श आहे, धर्म आहे तदनुसार त्याची धर्मसंहिता आहे, आणि आहे एक धर्मशासन. जें जितकें मर्यादित तितकें त्याचें स्वरूप स्थूल, जें जितकें व्यापक तितकें त्याचें स्वरूप सूक्ष्म. हें विश्व अति व्यापक आहे म्हणून त्याचें स्वरूप अव्यक्त आहे. त्याचा धर्म, त्याची धर्मसंहिता, त्याचें धर्मशासन अव्यक्त आहे. सत्य हा त्याचा धर्म आहे, सत्यच त्याचें संविधान आहे, आणि सत्यच त्याचा गोप्ता आहे. या परम सत्याला धरून सर्व संविधानें रचलीं आहेत. म्हणून परमात्मा हा धर्मकृत् म्हणावयाचा. कोणती हि संहिता वेदाची अवेस्त्याची बायबलची कुराणाची वा मार्क्सची तदुपजीवीच आहे.

## ४७७. धर्मी

धर्मी म्हणजे धर्मवान्. जिथें जिथें धर्म आढळून येतो तिथें तिथें धर्मी हा असलाच पाहिजे. धर्म हा केव्हांहि धर्मिपरतंत्रच असणार. वस्तु असेल तरच तिला नाम असेल, रूप असेल, गुण असतील. लांबी रुंदी उंची म्हणजे आकृति. पांढरा वा केशरी वर्ण. आणि ही आकृति व वर्ण दोहों मिळून रूप होते. ह्या रूपाला बर्फी असें नांव मिळतें. सुगंधी, गोड म्हणून तिचे गुण वर्णिले जातात. शेर सव्वा शेर म्हणून तिचें वजन होते. ४०/५० रुपये तिची किंमत केली जाते. पण हें सगळें होतें तें त्या खव्याचें, त्या मूल द्रव्याचें. तें मूल द्रव्य नसेल तर नाम रूप गुण कुणाचा आश्रय करतील? म्हणून धर्मी हा सर्वमूल होय. जनता नसेल तर तिचा आदर्श कुठला? तदनुसार संविधान

कुठलें आणि शासन तरी कुठलें आणि कुणाचें करणार? प्राज्याची व्याख्या केली जाते:

Government of the people, for the people and by the people.

प्रजाघटित, प्रजाप्रातिनिधिक आणि प्रजाकर्तृक. परंतु प्रजाच नसली तर मग कांहींच असणार नाहीं. अर्थात् सत् असेल तर सत्ता असणार. आणि हा सत् च धर्मी होय. सद्रूप परमात्माच या विश्ववैचित्र्याचा आधार आहे. हें सारें धर्मवैचित्र्य आहे, कारण तो धर्मी आहे. जगद्रूप हा परिणाम, हा विवर्त दिसतो आहे, कारण तदाधारभूत सद् वस्तु तो परमात्मा विद्यमान आहे. रज्जू नसेल तर सर्पाभासहि होणार नाहीं. या विश्वाचें अधिष्ठान तो परमात्मा धर्मी होय आणि तद्रूप जीव हि जीवनाधिष्ठानभूत धर्मी म्हणावयाचे. इथें 'धर्मी धर्मकृत् आणि धर्मगुप्' या पदत्रयीनें जीवनाचा एक संपूर्ण विचार व्यक्त झाला आहे. मग तुम्ही तो वैयक्तिक सामाजिक वैश्विक कोणत्याहि भूमिकेवर पहा आणि पडताळा.

### ४७८. सत्

'सदसत् क्षरमक्षरम्' हा चरण एका दृष्टीनें मागील चरणाशीं जोडलेला आहे आणि स्वतंत्र हि आहे. त्यांतील दोन वार्तिकें 'सदसत्' आणि 'क्षरमक्षरम्' हीं म्हटल्यास संबद्ध आहेत, म्हटल्यास स्वतंत्र आहेत. सबंध सहस्रालाच हें लागू आहे.

मागील पदांत धर्म आणि धर्मी यांचा संबंध आपण पाहिला आणि परस्परविरुद्ध विधानें केलीं. धर्म हा धर्मीचा जीवन-हेतु असल्यामुळें तो कारणभूत होय आणि धर्मी हें कार्य होय असें एकदां म्हटलें. पुन: असें हि म्हटलें कीं धर्म हे धर्मिपरतंत्र असतात, द्रव्याश्रित असतात म्हणून धर्म गौण होत, आणि धर्मीच वास्तव आहे. अशा प्रकारें वृक्षबीजन्यायानें इथें अनिर्णयाची आपत्ति येते असें वाटेल, परंतु त्याचा परिहार सूक्ष्म विचारानें सहज होणारा आहे. कारण आणि कार्य यांचा विचार केला म्हणजे हें कोडें उलगडतें. कारण हें सदैव मूल म्हटलें पाहिजे आणि म्हणून तेंच एकमेव सत् होय. कार्य हें कांहीं झालें तरी मागाहून उत्पन्न होऊन आणि किंचित् काल दृग्गोचर होऊन परत कारणांत विलीन होणारें असें असतें. म्हणजे त्याची स्थिति ही स्वतंत्र नाहीं. म्हणून तेंच असत् म्हणावयाचें. असा विचार केला म्हणजे विश्व हें कार्यरूप असल्यामुळें तें असत् होय आणि ब्रह्म हेंच एकमात्र सत् होय. वेदान्ताचा हाच निर्णय आहे. केव्हां सदसत् ह्या संज्ञा उलट सुलट झालेल्या आढळून येतात. त्याचें कारण सदसत् ह्या संज्ञा सापेक्ष आहेत हें होय. सत् म्हणजे हें दृश्यमान विश्व असा अर्थ घेतल्यास ब्रह्माला असत् म्हणावें लागतें. अर्थात् जें कार्य नव्हे तें. पण वस्तुत: जें स्वतंत्र आहे, विश्वाचें अधिष्ठान आहे, अपरिवर्तनशील आहे, तेंच सत् ह्या पदवीस पात्र आहे आणि म्हणून विश्वाला असत् म्हटलें जाईल. परंतु ह्या सर्व सापेक्ष कल्पना वा शाब्दिक कोलांट्या होत. वस्तुतत्त्व असतें तसेंच असतें म्हणजे कारण तें कारणच राहतें आणि कार्य तें कार्यच म्हटलें जातें. परमात्मा हा कारण रूपानें सत् आहे आणि कार्य रूपानें असत् आहे. आणि हेंच पुढील पदांनीं 'क्षरमक्षरम्' स्पष्ट केलें आहे.

### ४७९. असत्

''असदेव इदं अग्र आसीत्, ततो वै सद् अजायत'' आरंभीं हें सगळें असत् होतें आणि त्यांतून पुढें मग हें सत् झालें, असें उपनिषदांत म्हटलें आहे तर दुसरे एके ठिकाणीं नेमकें याच्या विरुद्ध म्हटलें आहे– 'कथं असत: सत् जायेत' अहो ज्याला मुळीं अस्तित्वच नाहीं त्यापासून हें जग कसें निर्माण होणार? संख्येपासून असंख्य सृष्टि होईल, पण शून्यापासून कशी होणार? पहिलें विधान व्यावहारिक आहे, दुसरें तात्त्विक आहे. हें दृश्यमान व्यक्त जगत् अव्यक्तांतून आलेलें आहे, हा पहिल्या वचनाचा आशय. दुसरें वचन त्याचा निषेध करीत नाहीं पण त्याला नेमकें करतें. तें म्हणतें तें जें अव्यक्त तेंच सत् म्हणजे त्रिकालाबाधित आहे. आणि त्या त्रिकालाबाधित सत्

पासूनच हें असत् म्हणजे त्रिकालाबाधित नसलेलें कार्यरूप स्थूल जगत् निर्माण झालें आहे. उत्पत्तिपूर्व आणि लयोत्तर स्वरूपानें विद्यमान नसलेलें कार्य हें सत् संज्ञेस पात्र नाहीं. त्याला असतच म्हटलें पाहिजे; आणि म्हटलें पाहिजे सतापासूनच हें सारें झालें आहे, असतापासून नव्हे. तात्पर्य दोन्ही विधानें यथार्थ असून त्यांच्यांत विरोध नाहीं. त्यांची व्यवस्था भूमिका-भेदानें लागते आणि विरोध-परिहार होतो. जें व्यावहारिक भूमिकेवरून सत् म्हटलें जातें तेंच पारमार्थिक भूमिकेवरून असत् आणि असत् तें सत्. सदसताची ही भिन्नभूमिक परिभाषा व्यामिश्र आहे, गुंतागुंतीची आहे. म्हणून त्यालाच पुढील पदांत क्षराक्षर म्हटलें आहे. तिथें हा घोटाळा नाहीं. जें क्षरतें तें क्षर (असत्) आणि जें क्षरत नाहीं, त्रिकालाबाधित अविकृत राहतें तें अक्षर (सत्) होय.

### ४८०. क्षर

'क्षरः सर्वाणि भूतानि कूटस्थोऽक्षर उच्यते' अशा शब्दांत क्षराक्षराची व्याख्या गीतेंत केली आहे आणि ती ठीकच आहे. परमात्मा कार्य-कारणरूपानें सत् आणि असत्, क्षर आणि अक्षर दोन्ही म्हटला जातो. कार्यकारण या शब्दप्रयोगांत कार्य आधीं आलें आहे आणि कारण मागाहून. कारण, प्रथम नजरेंत भरतें तें स्थूल. स्थूलाकडून मग विचारानें मनुष्य सूक्ष्माचें ग्रहण करतो. ही जी स्वाभाविक ज्ञान-प्रक्रिया तिलाच अनुसरून सदसत् आणि क्षराक्षर ही परिभाषा आलेली आहे. तेव्हां कार्य म्हणजे सत्, कार्य म्हणजे क्षर आणि कारण म्हणजे असत्, कारण म्हणजे अक्षर–असें हें समीकरण निष्पन्न होतें. ज्याला इथें सत् वा क्षर म्हटलें त्यालाच गीतेंत अधिभूत अशी व्यापक संज्ञा आली आहे. भूत म्हणजे झालेलें. झालेलें अर्थात् व्यक्त झालेलें, व्यक्तीभूत. आणि या व्यक्तमात्राला अधिष्ठून राहतें. तें अधिभूत म्हणावयाचें, दुसऱ्या शब्दांत, अधिभूत म्हणजे भूतत्व, भूतभाव. या भूताचा अभिमान बाळगणारा जो भाव तो अधिदैव म्हटला आहे. जो हा असा व्यक्ताचा अभिमान सोडून देणारा विविक्तभाव अथवा विवेक तोच अधियज्ञ होय. या विविक्तभावाला "अधियज्ञ म्हणण्याचें कारण असत्-त्याग हा यज्ञाचा गाभा आहे. "अग्नये स्वाहा, इदं न मम" असें म्हणून आहुति दिली जाते. ज्ञान-यज्ञांत या हवनाचें पर्यवसान अज्ञान-त्यागांत होतें आणि म्हणून तन्निष्पन्न जो भाव तो अधियज्ञ म्हटला जातो. यांत जडाभिमान नसला तरी चेतनाभिमान आहे, सोऽहंभाव आहे. हा हि आठव जेव्हां मुरतो तेव्हां ब्रह्मनिर्वाण निष्पन्न होतें. त्यालाच अक्षर अशी संज्ञा आहे. जीवाच्या उत्क्रांतीचा हा क्रम आहे: जडता अहंता सोहंता निरहंता. हें अखंडमंडल असें सतत चाललें आहे. सर्व जीवजगत् त्यावर आरूढ परिभ्रमत आहे.

### ४८१. अक्षर

जें क्षर नाहीं तें अक्षर म्हणजे कूटस्थ म्हणावयाचें. सर्व कार्यें "जायते अस्ति वर्धते विपरिणमते अपक्षीयते म्रियते" या षड् भावांनीं ग्रासलेलीं आहेत. म्हणून तीं क्षर म्हणावयाचीं. जें तसें नाहीं, तद्विलक्षण आहे तें अक्षर होय, कारणरूप होय, कूटस्थ होय. ब्रह्म हें तसें या जगत्-कार्याचें कारण आहे. म्हणून त्याला अक्षर म्हटलें आहे गीतेंत, तर ब्रह्माला अक्षर म्हणण्याऐवजीं अक्षरालाच ब्रह्म म्हटलें आहे:

"अक्षरं ब्रह्म परमम्"

वेदाला हि ब्रह्म संज्ञा आहे. कारण, तो ब्रह्म-प्रतिपादक आहे. या वेदाचें विश्लेषण केलें तर काय दिसून येतें? वेद म्हणजे वाणी. तिचा प्रतिनिधि म्हणजे वाक्य. तें बनलें असतें शब्दांचें. ते शब्द बनले असतात अक्षरांचे आणि हीं मूलाक्षरेंच तेवढीं अक्षर म्हणजे अविनाशी आहेत. त्यांच्या पासून बनलेले शब्द, त्या शब्दांचीं बनलेलीं वाक्यें सगळीं अक्षरशेष होतात. म्हणून अक्षर म्हणजे कारण होय.

छापखान्यांत आपल्याला अक्षरांचें हें अक्षरत्व चांगलें प्रत्ययास येतें. हजारों पुस्तकें छापलीं जातात पण तीं सगळीं आयसाक्षरांत परिणत होतात. अखेर हीं आयसाक्षरें गाळून त्यांचा अय:पिंड बनतो. तो आणखी गाळला म्हणजे मृण्मय होतो. ती मृद् अखेर चिन्मय होते. हें जें असें कारणांचें कारण तेंच परम अक्षर म्हणजे अन्तिम तत्त्व होय. आणि तेंच सर्वकारण ब्रह्म म्हटलें आहे.

''अक्षरं ब्रह्म परमम्'' या वाक्यांत परमं हें विशेषण कुणाचें? तें साहचर्यानें ब्रह्माकडे जातें. म्हणून त्याचा अर्थ होतो जें अक्षर तें ब्रह्म असून तें अन्तिम होय.

## ४८२. अविज्ञाता

''विज्ञातारं अरे केन विजानीयात्'' या वचनांत श्रुति त्या परमात्म्याला विज्ञाता म्हणत आहे. जें ज्ञान होतें तें सगळें ज्ञातृज्ञेय-विभागानें होतें. म्हणजे जिथें कुठें ज्ञानोपलब्धिप्रक्रिया होते तिथें ती या विभजनानेंच होते. असें कोणतें हि ज्ञान होणें संभवनीय नाहीं कीं जिथें हा असा विभाग होत नाहीं. म्हणून श्रुति म्हणते कीं या प्रक्रियेंत जें विज्ञात्रंग तेंच ज्याचें स्वरूप आहे तोच विज्ञाता होय आणि तो केव्हांहि विज्ञेयांग होत नाहीं. आणि म्हणून ती म्हणते, विज्ञाता रे कसा विज्ञानविषय होणार? तो जर विज्ञान-विषय झाला तर तो विज्ञातृरूपानें मिटेल. आणि स्वरूप-त्याग त्याला शक्यच नाहीं म्हणून तो सदैव विज्ञाताच राहतो. पण इथें तर त्याला अविज्ञात म्हटलें आहे, तें कसें? तें असें: ज्ञेय विषय सर्व नश्वर असल्यामुळें ज्या वेळीं ज्ञातृभिन्न ज्ञेयच मुळीं नसतें तेव्हां काय जाणणार? आणि ज्ञात्याला तरी ज्ञाता म्हणण्यांत काय अर्थ राहिला? आणि म्हणून जो विज्ञाता, तोच वस्तुत: अविज्ञाता म्हणावयाचा. ''प्रपचोपशमं शान्तं शिवं अद्वैतं चतुर्थं मन्यन्ते''. जिथें प्रपंचाला वाव नाहीं तिथें ज्ञातृज्ञेयज्ञान ही त्रिपुटी मावळली. तिथें सर्व च मावळलें, उदेलें एकच एक शांत तेज, ज्याचें वर्णन ज्ञानदेव पुढीलप्रमाणें करतात:

''मावळवीत विश्वाभासु। नवल उदेला चण्डांशु। अद्वयाब्जिनी-विकाशु। वंदूं आतां।। जो अविद्या-राती रुसोनिया। गिळी ज्ञानाज्ञान-चांदणिया। जो सुदिन करी ज्ञानिया। स्वबोधाचा।।'' इत्यादि. यांत वर्णिलेला जो हा अद्‌भुत चित्सूर्य, जो विश्वप्रपंच प्रकट करीत नाहीं सामान्य सूर्याप्रमाणें, पण तो सर्व भेद-प्रपंच गिळून एकला एक राहतो, तो हा अविज्ञाता होय.

अथवा विविधं गुणविचित्रं विश्वं जानाति इति विज्ञाता, न विज्ञाता अविज्ञाता नित्यनिरस्तप्रपंच-त्वात् स्वदृक्त्वात्। जो विविध पाहतो तो विज्ञाता. जो एकविध पाहतो तो अविज्ञाता. जीव विज्ञाता म्हणावयाचा. परमात्मा तद्विलक्षण अविज्ञाता.

## ४८३. सहस्रांशु

सहस्र पद सहस्राचें स्वाभाविकच आवडतें पद आहे. त्यामुळें तें वारंवार आलें आहे. सहस्रांशु म्हणजे सहस्ररश्मि. सहस्रश: अंशव: यस्य स: सहस्रांशु:। ज्याचे अंशु म्हणजे भानु अर्थात् किरण सहस्रश: म्हणजे हजारों पसरले आहेत तो सहस्रांशु होय. ही अनंतपार सृष्टि म्हणजेच परमात्म्याचे सहस्रांशु होत, त्याचा अनंत विस्तार होय. हा विस्तार देशत: जसा अनंत, तसा कालत: हि अनंतच आहे. आणि वस्तुत: तर तो अनन्त च आहे. आणि म्हणून अनन्त हें त्याचें एक विशेष नाम आहे. आणि सहस्र पदाचें जें वारंवार आवर्तन झालें आहे तें हि त्याचमुळें होय. असंख्येयत्व दाखविण्यासाठीं हि संख्येचा उपयोग करावा लागतो. कशी विलक्षणता आहे पहा! हा असा विरोधाभास परमात्म्याच्या वर्णनांत वारंवार उत्पन्न होतो. कारण खरोखर तो आश्चर्यमूर्तिच आहे. म्हणून गीतेनें ठीकच म्हटलें आहे—आश्चर्यवत् पश्यति कश्चिदेनं, आश्चर्यवत् वदति तथैव चान्य:। आश्चर्यवत्

चैनमन्य: शृणोति, श्रुत्वाप्येनं वेद न चैव कश्चित्।।'' एखादा अष्टपैलू हिरा पाहूं लागलों तर कोणता पैलू अधिक सुंदर आहे हें सांगणें कठिण होऊन बसतें. जो पहावा तो सुंदरच वाटतो, अप्रतिम वाटतो. तुलना कशी ती करतांच येत नाहीं. मग जो सहस्रपैलू आहे, सहस्रांशु आहे त्या परमात्म्याबद्दल बोलतांना बोबडी वळली तर काय नवल? एक साधें मोराचें पीस घेतलें व त्याचा डोळा पाहूं लागलों तर, त्याचे ते नाना रंग, त्या रंगांतील नाना तरंग त्या रंगतरंगांतील नाना आकृति आणि भाव पाहूं लागलों तर माणूस दंग होऊन जातो, मग त्या परमात्म्याबद्दल काय बोलावयाचें? बोलावयाचेंच नाहीं. तद्गतेन मनसा सर्वात्मना त्याच्या चरणीं लीन व्हायचें.

## ४८४. विधाता

सृष्टीचीं जीं प्रत्यक्ष कारणें आहेत तीं सृष्टीचे धाते होत. ब्रह्मा, विष्णु, महेश, प्रजापति, मनु इत्यादि सृष्ट्यनुग्रहकारी देवता, त्या देवतांच्या अधीन असलेलीं सृष्ट्युपादानें आणि उपकरणें म्हणजे धाते वा धातृतत्त्वें होत. सांख्यांत यांचें संख्यान झालें आहे. या तत्त्वविचाराला पौराणिकांनीं लोकरोचक रूप दिलें आहे. दोन्ही मूलत: एकच. एक तात्त्विक रूप, दुसरें लौकिक रूप. सृष्टीचीं हीं सर्व कारणें चिन्त्य आहेत. परंतु ह्या पलीकडे जें अचिन्त्य मूल कारण आहे तेंच इथें विधाता म्हटलें आहे. त्याचाच उल्लेख गीतेंत पुढील प्रमाणें केलेला आहे.

**कविं पुराणं अनुशासितारं**
**अणोर् अणीयांसमनुस्मरेद् य:।**
**सर्वस्य धातारमचिन्त्यरूपं**
**आदित्यवर्णं तमस: परस्तात्।।**

या समग्र श्लोकांतील प्रत्येक पद मोठें अर्थपूर्ण आहे, परंतु 'सर्वस्य धातारं अचिन्त्यरूपम्' यांत सर्वार्थसार येऊन जातें. तो परमात्मा या निखिल विश्वाचा धाता म्हणजे कर्ता आहे आणि तो अचिन्त्य आहे. अचिन्त्य आणि धाता पदें एकत्र केलीं म्हणजे विधाता होतो. इसापनीतींतील बेडकी आणि तिचें पिलूं या कथेंतील मोठा प्राणी जो बैल त्याचें मोठेपण जसें बेडकीला आपलें पोट फुगवून दाखवितां आलें नाहीं आणि त्या प्रयासांत प्राणास मात्र मुकावें लागलें तसें मानवी बुद्धीचें ईश्वराच्या महत्तेचें आकलन करतांना होतें. तिच्या चिंध्या होऊन जातात, आणि बेडकीच्या पिला सारखें ईश्वरी महत्तेच्या अचिन्त्य वैभवानें भारावलेलें विनम्र श्रद्धामय व्यक्तित्व तेवढें उरतें. विष्णुसहस्र त्याचाच परिपाक आहे. त्याचेंच निदर्शन आहे. या सहस्रमुखानें सहस्रश: वर्णन करून आणि त्या महत्तेचा पार न पावून शेवटीं नम: म्हणून डोकें टेकलें आहे.

## ४८५. कृतलक्षण

कृतात्मा कृतबुद्धि कृतार्थ कृतकृत्य इत्यादि शब्दांप्रमाणें हा कृतलक्षण शब्द आहे. कृतं नित्यनिष्पन्नं चैतन्यरूपं लक्षणं यस्य स: कृत-लक्षण:। कृत म्हणजे सहजसंपादित आहे ज्याचें लक्षण म्हणजे स्वरूप तो कृतलक्षण परमात्मा होय. परमात्मा हा नित्य-शुद्धबुद्धमुक्त-स्वभाव आहे. त्याचें हें लक्षण स्वत:सिद्ध आहे. तें बाह्य नाहीं, म्हणून संपादनीय नाहीं. तें स्वरूप आहे म्हणून स्वत:सिद्ध आहे, सहज आहे. जें मिळविलें जातें तें गमविण्याची शक्यता असते. त्याच्या योग-क्षेमाची चिंता वहावी लागते. पण कृतलक्षणांत ही भानगड नाहीं. आणि ह्या स्वरूपलक्षणाला अनुलक्षूनच भगवंतानें आश्वासन दिलें आहे आपल्या भक्ताला 'योगक्षेमं वहाम्यहम्' म्हणून. भगवंत भक्ताचा हा स्वरूपलक्षणरूप योगक्षेम वहात असतो. तो त्याच्या संसाराची चिंता नाहीं वहात. तुकारामाचा योगक्षेम त्यानें कसा वाहिला? धन गेलें, मान गेला, बायको पोरें अन्नान्न होऊन मेलीं. तो केवळ विदेह होऊन राहिला, आत्मनिष्ठ होऊन राहिला. हाच त्याचा

भगवंतानें वाहिलेला योगक्षेम! भारतसावित्रीचाहि कंठरव हाच नाहीं काय? काय म्हणतात व्यास? 'धर्मे मतिर् भवतु वः सततोत्थितानां, स ह्येक एव परलोकगतस्य बन्धुः। अर्थाः स्त्रियश्च निपुणैरपि सेव्यमाना नैवाप्तभावमुपयन्ति न च स्थिरत्वम्।। जीव बाहेरून जें जें मिळवितो तें तें त्याचें आपलेसें होत नाहीं, त्याच्याजवळ स्थिर रहात नाहीं. मग राहतें काय? राहतें त्याचें लक्षण, त्याचें निजधन. म्हणून त्या निजधनाचीच काळजी घ्या. धर्माची आस्था बाळगा. इतर तुमचे सारे उद्योग अर्थ आणि काम संपादनाचे, श्री आणि स्त्री यांना प्रसन्न करण्याचे फुकट आहेत असें व्यास महर्षि एक लक्ष संहिता लिहून शेवटीं तात्पर्य म्हणून कंठरवानें सांगत आहेत. हा मानव-जीवनेतिहासाचा व्यास-मुनिकृत सनातन संदेश आहे, निष्कर्ष आहे. परमात्मा हा सिद्ध आहे. परंतु त्याचे उपासक साधक आहेत. सिद्धाचें जीवन सहज असतें. साधकांना तें विवेकविचारपूर्वक प्रयत्नानें संपादावयाचें असतें. सिद्ध कृतलक्षण म्हणजे सहज स्वरूप आहे. साधक संपादित स्वरूप आहे.

## ४८६. गभस्तिनेमि

गभस्तयः किरणाः, नेमिः परिधिः, यस्य सः गभस्तिनेमिः। गभस्ति म्हणजें किरण हेच ज्याची नेमि म्हणजे परिधि वा धाव आहेत तो केन्द्रभूत सूर्य गभस्तिनेमि म्हणावयाचा. मागें नक्षत्रनेमि पद आलें आहे. त्यानें चंद्र परिलक्षित होतो, तर इथें गभस्तिनेमि पदानें सूर्य. त्रैलोक्याचें राज्य करणारें राजे खरोखर दोनच आहेत : एक, नक्षत्रनेमि चंद्र आणि दोन, गभस्तिनेमि सूर्य. दिवसां सूर्य तर रात्रीं चंद्र सत्ता गाजवीत असतो. दोघे मिळून रात्रंदिवस त्रैलोक्याचें राज्य करीत असतात. त्यामुळें खरे राजे हे दोनच होत. त्यांच्या वरूनच क्षत्रियांचे सूर्यवंश आणि चंद्रवंश असे दोन वंश कल्पिले आहेत. या मुख्य दोन वंशांशिवाय अग्निवंश हि कल्पिला जातो. जेव्हां सूर्य चंद्र नसतात तेव्हां अग्नि हा त्यांचा प्रतिनिधि राज्य करतो. म्हणून तो तिसरा वंश मानला गेला. पण खरें म्हणजे तो राजा नव्हे, तर राजाचा प्रतिनिधिच होय. तथापि, तो आमच्या फार उपयोगाचा आहे. चंद्रसूर्य दिव्य आहेत, हा भौम आहे. भौमच नव्हे तर अगदीं घरगुती, हातचा; म्हणून ऋषि त्याची फार प्रेमानें उपासना करतात. म्हणतात– "स नः पितेव सुनवे। अग्ने सूपायनो भव। सचस्वा नः सुअस्तये।। हे अग्निदेवा तूं पित्याप्रमाणें आमच्या भेटीसाठीं आमच्या संनिध रहा आणि आम्हांला चांगल्या चांगल्या भेटी दे. आमचीं कोडें पुरव. तेजोराशि परमात्म्याच्या सूर्य, चंद्र आणि अग्नि ह्या तीन विभूति आहेत. म्हणून त्यांना अनुलक्षून परमात्म्याला कुठें नक्षत्रनेमि कुठें गभस्तिनेमि म्हटलें आहे. त्याला ज्वालानेमिहि म्हणतां येईल. खरोखर जो कोणता प्रकाश आहे तो त्या परमात्म्याचा आहे. म्हणून त्याला तिन्ही पदें सहजच शोभतात. म्हटलेंच आहे गीतेंत : "यद् आदित्यगतं तेजो जगद् भासयतेऽखिलम्। यत् चन्द्रमसि यत् चाग्नौ तत् तेजो विद्धि मामकम्।"

## ४८७. सत्त्वस्थ

सत्त्व म्हणजे सत्ता. सत्त्व म्हणजे सत्त्वगुण. सत्त्व म्हणजे जीव, सत्त्ववान् पदार्थ. तात्पर्य सत्ता शब्दाचे भाव गुण द्रव्य असे अर्थ होतात. जो कोणता चराचर पदार्थ आम्हांला आहे म्हणून कळतो त्या पदार्थाच्या ठाईं सत्त्वगुण आणि सत्ता हीं उघडच आहेत. तीं असल्यावांचून त्याचें अस्तित्वच प्रतीत होऊं शकत नाहीं. पदार्थमात्राच्या ठाईं असणारें हें जें विविध सत्त्व त्या सत्त्वांत परमात्मा वास करीत आहे. म्हणून तो सत्त्वस्थ म्हणावयाचा. हिरण्यकशिपूला हें तत्त्वज्ञान नव्हतें. तो आत्मभिन्न कोणी ईश्वरसंज्ञक तिऱ्हाईत वस्तु आहे, अशी कल्पना करीत होता आणि म्हणून प्रह्लादाला तुझा ईश्वर कुठें आहे दाखव म्हणून विचारणा करीत होता. ज्या सत्तेच्या बळानें सर्व सत्त्व अस्तित्वांत आहेत ती सत्ताच तो परमात्मा, तो परमेश्वर असल्यामुळें प्रह्लाद म्हणत होता कीं

'स्थिरचर व्यापुनि सगळें तो जगदात्मा दशांगुळें उरला' आहे. या खांबांत आहे? म्हणून विचारतांच त्यानें सहजच सांगितलें अलबत्. खांबावर प्रहार करतांच खांब कडकडला. कडकडाट त्या स्तंभवासी सत्तेचा, परमेश्वरी सत्तेचाच होता. स्तंभाची झिलपी निघाली, हिरण्यकशिपूच्या पोटांत शिरली आणि तो जमिनीवर पडला आणि मेला. कोणाच्या मांडीवर पडला तो? तो परमेश्वराच्या मांडीवर पडला होता. परमेश्वराच्या करजांनीं त्याचें विदारण झालें होतें. अशा प्रकारें सत्तामात्र त्या परमेश्वराची आहे आणि जें काय घडतें घडलें वा घडणार आहे तें सारें त्या परमात्मसत्तेच्या अंकावरच होय. हें तत्त्वदर्शन ज्याला झालें तो सर्वत्र सत्त्वस्थ परमात्म्याला पाहतो. कोणता हि काल कोणतें हि स्थल, कोणती हि घटना त्याच्या सत्तेवाचूंन नाहीं हें त्याला करतलामलकवत् प्रत्यक्ष दिसत असतें. या सत्त्वदर्शनाचेंच नांव आहे त्रिकालज्ञता, सर्वज्ञता. हें तत्त्वदर्शन सत्त्वोपासनेनें बुद्धि विशुद्ध झाली म्हणजे होतें. आणि ह्याहि अर्थानें परमात्मा हा सत्त्वस्थ होय.

### ४८८. सिंह

यद् यद् विभूतिमत् सत्त्वं श्रीमद् ऊर्जितमेव वा। तत् तदेवावगच्छ त्वं मम तेजोंश-संभवम्।। या गीतावचनाप्रमाणें जें जें विभूतिमत् सत्त्व आहे तें सर्व ईश्वरी आहे. सिंह ही हि तशीच एक ईश्वरी विभूति आहे. म्हणून परमात्म्याला इथें सिंह म्हटलें आहे. पूर्वीं हि एकदां सिंह शब्द येऊन गेला आहे. पक्षांत गरुड, वन्य पशूंत सिंह, ग्राम्य पशूंत वृषभ, जलचरांत मकर अशा ह्या भगवद्-विभूति प्रसिद्ध आहेत. सिंह हा नुसता ऊर्जित म्हणजे बलवान्च नाहीं तर तो श्रीमान् हि आहे. धीर गंभीर महासत्त्व आहे तो. त्याचें भव्य रूप, त्याचा घनगंभीर आवाज, त्याचा अतुल पराक्रम सर्व आदर्श आहे. त्याचा एवढा गौरव आहे कीं ह्या पशूचें पुच्छ आपल्या नामाला जोडण्यांत माणसाला धन्यता वाटूं लागली. थोरपणा दाखवायला तो आपल्याला पुरुषसिंह म्हणवूं लागला. एकट्या दुकट्या व्यक्तिच नव्हेत तर एक जात ची जात आपल्याला सिंह म्हणूं लागली. नानकादि गुरूंचे शीख म्हणजे शिष्य आपल्याला सिंह म्हणजे सिंह पदवीनें विभूषित करतात. सिंहाप्रमाणें ते आयाळ ठेवतात, सिंहाच्या नखदंतायुधांप्रमाणे सदैव कृपाण बाळगतात. सिंहा प्रमाणें निर्भय आणि पराक्रमी जीवन आकांक्षितात. जो कोणी असा आदर्श बाळगतो तो सिंह पदवीस पात्र आहे. परंतु सिंहनामांत आणखी हि एक भाव आहे. सिंह हा ग्राम्य नाहीं, तो आरण्यक आहे. जे ग्राम्य जीवन जगतात, ते सिंह पदवीस पात्र नाहींत. भगवान् बुद्धानें ऐहिक सुखोपभोगाचें ग्राम्य जीवन त्याज्य ठरवून आरण्यक मुनिवृत्ति, संयम आणि तत्त्व-चिंतन यांचें जीवन अंगीकारलें म्हणून त्यांना शाक्यसिंह म्हणत. सांसारिक जीवन भयग्रस्त आहे. त्यांत खरा पराक्रम नाहीं. जन्ममृत्यु-जराव्याधिदुःखदोषांपुढें तें हार खातें पण संन्यास अकुतोभय आहे. तो तत्त्वज्ञानानें आणि तत्त्वज्ञानपूर्वक संन्यस्त वृत्तीनें जगून मृत्यूवर मात करतो आणि अमर होतो. हेंच सिंहत्व होय. आर्यत्व होय. परमात्म्याहून अधिक निर्भय आणि मृत्युंजय दुसरा कोण आहे? म्हणून तो सिंह.

### ४८९. भूतमहेश्वर

गीता ही उपनिषदांचें उपनिषद् आहे. आणि उपनिषदें हि स्वतःच वेदांचें उपनिषद् म्हणजे रहस्य होत, सार होत. म्हणजे गीता ही साराचें सार झाली. 'दुग्धं गीतामृतं महत्' चा हि आशय हाच आहे. तथापि तो न ओळखतां तें गीतेला दूध म्हणणें न्यून आहे. वास्तविक म्हटलें पाहिजे कीं गीता हें घृत आहे, उपनिषदें लोणी आणि वेद दूध. गीता ही जशी वेदाचें परम सार आहे तसें सहस्र हि आहे. वेदाचें तात्त्विक सार म्हणजे ब्रह्मसूत्रें, वेदाचें सात्त्विक सार म्हणजे गीता आणि भाविक सार म्हणजे सहस्र होय. सूत्रें सुबद्ध आहेत. तो विचार-ग्रंथ आहे. गीता प्रवाही आहे. आचाराचा तो धर्मग्रन्थ आहे. सहस्र मोकळें

आहे. तो उच्चारग्रंथ आहे, जपग्रंथ आहे, गेय आहे. तिन्ही एकात्म आहेत. उपनिषदें ब्रह्मसूत्रें आणि गीता यांना परमार्थाची प्रस्थानत्रयी म्हणजे परमार्थाला पोंचविणारे तीन मार्ग म्हटलें आहे. पण मी तर सूत्रें गीता आणि सहस्र हीच प्रस्थानत्रयी म्हणावी म्हणेन. उपनिषदें आर्यांच्या आध्यात्मिक विचारांची खाण आहे. त्रयीच कां? चतुष्क, पंचक कां नाहीं? कारण आमच्या प्राचीनतम ज्ञानाचे वेदाचे, तीनच प्रकार ऋक् यजुस् साम अथवा आधुनिक भाषेंत बोलायचें तर पद्य गद्य आणि गेय केले गेले आणि रूढ झाले आहेत म्हणून.

महाराष्ट्रासाठीं म्हणजे मराठी भाषिकांसाठीं देवाचा प्राचीन निरोप्या जो ज्ञानदेव त्यानें हि प्रस्थानत्रयी करून ठेवली आहे—अनुभवामृत, ज्ञानदेवी आणि हरिपाठ. आधुनिक निरोप्या विनोबानें दिलेली प्रस्थानत्रयी म्हणजे स्थितप्रज्ञदर्शन, गीताप्रवचन व गीताई ही होय.

पण ह्या सगळ्यांचें इथें काय प्रयोजन? हेंच कीं महेश्वर (गी. १३. २२) भूतमहेश्वर (गी. ९. ११) लोकमहेश्वर (गी. १०. ३) सर्वलोकमहेश्वर (गी. ५. २९) हीं नामें उपनिषदें आणि गीता ह्यांतून वारंवार आलेलीं आहेत आणि इथें हि तें आलें आहे. आलें आहे तें त्यांच्या परंपरेतून. म्हणून ती परंपरा पाहिली. महेश्वर म्हणजे अव्यक्त अक्षर परमात्मा. त्या अव्यक्त अक्षर परमात्म्यांतून भूतें येतात आणि कांहीं काल व्यक्त दशेंत राहून परत त्यांतच लीन होतात. म्हणून परमात्मा हा भूत-महेश्वर, लोक-महेश्वर म्हणावयाचा. पहा गीता : ''अवजानन्ति मां मूढा मानुषीं तनुमाश्रितम्। परं भावं अजानन्तो मम भूतमहेश्वरम्॥''

### ४९०. आदिदेव

''आदिदेवो महादेवो देवेशो देवभृद्गुरुः'' हा श्लोकार्ध उघडच देवसूत्रित आहे. एक संपूर्ण कल्पनासूत्र यांत आहे. तो परमात्मा हा आदिदेव आहे. तोच सृष्टीच्या पूर्वीं विद्यमान हि असलेला या सृष्टीचा आरंभक आहे. म्हणजे आरंभाचा हि तो आरंभक होय. म्हणून त्याला आदिदेव म्हणावयाचें. रामदासांनीं याचेंच वर्णन ''मुळारंभ आरंभ जो निर्गुणाचा''असें केलें आहे. या आदिदेवाला सृष्टिशास्त्राच्या भाषेंत ब्रह्मा असें नांव आहे. 'ब्रह्मा देवानां प्रथमः संबभूव। विश्वस्य कर्ता भुवनस्य गोप्ता.' ब्रह्म हें जगत्- कारण आहे. तें ब्रह्म आणि हा ब्रह्मा एकच असला तरी ब्रह्म ही वेदान्त-परिभाषा आहे आणि वस्तुतः सृष्टीशीं त्याचा संबंध नाहीं. परंतु ब्रह्मा हा या सृष्टीशीं अपरिहार्यपणें निगडित आहे. त्यामुळें वेदान्त-विचार सांगतांना त्याला ब्रह्म म्हणतात तर सृष्टिशास्त्रांत त्याला ब्रह्मा म्हणतात. आणि या दोन्ही हि कल्पांना आदिदेव हा शब्द कवटाळतो. परमार्थ-विचार घ्या कीं सृष्टि-विचार घ्या, तो परमात्मा आदिदेव आहे. वेदांतील विभूति-योगांत म्हणूनच 'ब्रह्मा देवानां पदवीः कवीनां, ऋषिर् विप्राणां, महिषो मृगाणाम्। श्येनो गृध्राणां, स्वधितिर् वनानां, सोमः पवित्रं अत्येति रेभन्'' असें वर्णन आलें आहे. गीतेंत तर विश्वरूपदर्शनांत आदिदेव शब्दच वापरला आहे 'त्वं आदिदेवः पुरुषः पुराणस् त्वं अस्य विश्वस्य परं निधानम्। वेत्तासि वेद्यं च परं च धाम, त्वया ततं विश्वम् अनन्तरूप॥ परमात्म्याचा जो दिक्कालाद्यतीत महिमा मुख्यतः त्याला उद्देशून आदिदेव महादेव देवेश आणि देवभृद्गुरु हीं नामें आलीं आहेत. तो महिमा इतका मोठा आहे कीं एका नामानें त्याचें वर्णन होऊं शकत नाहीं म्हणून एकसाथ चार नामें उच्चारलीं! आणि वस्तुतः सहस्राचें हि हेंच रहस्य आहे.

### ४९१. महादेव

परमात्मा सर्वादि असल्यामुळें तो आदिदेव म्हटला तसा तो सर्वांहून वयानें ज्येष्ठ आणि गुणांनी श्रेष्ठ असल्यामुळें महादेव म्हटला आहे. तो आदिदेव असल्यामुळें सर्वदेव त्याचे अनुज होत. तो परमात्मा अशा प्रकारें सर्व देवांचा सहजच अग्रज झाला. म्हणून तो वयानें मोठा म्हणावयाचा. गुणांनीं तो श्रेष्ठ

म्हणावयाचा तर तो कसा? सर्व गुण सत्त्वाधिष्ठित असल्यामुळें आणि परमात्मा हा सद्रूप असल्यामुळें तो सहजच सर्व गुणांचा आधार झाला. आणि म्हणून तो सर्व गुण-संपन्न गुणश्रेष्ठत्वानें महादेव म्हणावयाचा. देवता विशिष्ट-गुणमूर्ति होत. परंतु देव हा सर्वगुण-साम्ग्यरूप आहे. त्यामुळें असा परमात्मा हा महादेव आणि इतर देवता अंशरूप असल्यामुळें सामान्य देव म्हणावयाचे.

उत्पत्ति स्थिति लय हे सृष्टीचे आणि सृष्ट पदार्थांचे अपरिहार्य असे भाव आहेत. त्यांत निवडीला, पसंतीला वाव कुठें आहे? जो वर्तमान आहे त्याला आदि आहे, अंत आहे. असें जर आहे तर आदि मध्य अंत या विविध भावांत तरतमभावाला वाव नाहींच. ते तिन्ही समान आहेत. निर्विशेष आहेत. म्हणून त्यांच्या अनुग्राहक देवता ब्रह्मा विष्णु महेश यांच्यांत हि लहान मोठा कोणी नाहीं.

तत्त्वत: हें ठीक झालें, पण व्यवहारत: वर्तमानच महत्त्वाचें आहे. कारण खरोखर तेंच आहे. भूत आणि भविष्य अनुमित आहे, काल्पनिक आहे. जो हातचें सोडून पळत्याच्या पाठीमागें लागतो त्याचें सगळेंच गमावतें. उलट ज्यानें चालू क्षण साधला त्यानें मागचा पुढचा हि साधला आहे. म्हणून त्रिगुणांत सत्त्वोपासना, कालांत वर्तमानोपासना श्रेयस्कर. तिचा अधिपति विष्णु म्हणून महादेव म्हणावयाचा.

### ४९२. देवेश

जो परमात्मा आदिदेव महादेव म्हटला तोच देवेश हि आहे. अंशी हा अंशांचा ईश म्हणजे स्वामी असतो. तसा सद्रूप परमात्मा सर्व सद्गुणांचा सर्व सद्वस्तूंचा स्वामी होय. तो सर्वसत्ताधीश आहे, सर्व ज्याच्या ठाईं पर्यवसित होतात, संहृत होतात. देव म्हणजे प्रकाशमान. जें जें प्रकाशमान आहे तें तें सर्व देव आहे. सत्य च प्रकाशमान आहे, असत्य प्रकाशाभावरूप अंधकार होय. असत्याहून अधिक अप्रकाशमान अंधकाररूप दुसरें काय बरें असूं शकेल? अंधकार अंधकार म्हणून म्हणवला जाणारा प्रकाशाभाव हि खरोखर तितका अंधकार नाहीं जितकें असत्य आहे. कारण अभाव हि एक भाव आहे, पदार्थ आहे. पण असत्य हा तसा हि अभाव-पदार्थ नाहीं. अर्थात् भावाभावरूप जो कांहीं प्रकाश उर्फ देवभाव या विश्वांत आढळतो त्या सर्वांचा स्वामी तो सद्रूप परमात्माच होय आणि म्हणून त्याला देवेश म्हणावयाचें.

आदिदेव महादेव देवेश देवभृद्गुरु हीं चार पदें क्रमश: ब्रह्मा विष्णु महेश आणि परमात्मा यांचीं वाचक आहेत असें म्हणतां येईल. सूर्य प्रात:काळीं आपले सहस्रकिरण पसरूं लागतो मध्याह्नीं तो संपूर्ण विराजमान असतो. सायंकाळीं तो आपले सर्व किरण गुंडाळून घेतो. रात्रीं हीं तिन्ही कार्यें वर्जून तो स्वस्थ राहतो. या चार अवस्थाच उत्पत्ति स्थिति लय आणि निर्वाण म्हटल्या आहेत आणि त्यांचे अधिष्ठाते देवच ब्रह्मा विष्णु महेश आणि परमात्मा म्हणावयाचे.

इथें विष्णु जो पालक तो महादेव म्हटला आहे आणि महेश जो संहारक तो देवेश म्हटला आहे. ईश ईशान महेश महेशान हीं महादेवाचीं संहारकाचीं नांवें प्रसिद्धच आहेत. कार्यानुषंगानें तो परमात्माच ब्रह्मा विष्णु महेश म्हटला जातो हें उघड आहे.

### ४९३. देवभृद्-गुरु

परमात्मसत्ताच कार्यानुषंगानें ब्रह्मा विष्णु महेश पदवी धारण करते म्हणून तो परमात्मा देवभृद् म्हणजे सर्व देवांचें भरण पोषण करणारा, त्यांचें पालन करणारा म्हणावयाचा. माता पिता आणि दृष्टिदाता हे गुरु म्हणविले जातात. परमात्मा हा तसा सर्व देवांना जन्मदाता अन्नदाता आणि ज्ञानदाता हि असल्यामुळें तो देवभृद्-गुरु म्हटला आहे. ''यो ब्रह्माणं विदधाति पूर्वं यो वै वेदांश्च प्रहिणोति तस्मै'' इत्यादि श्रुतींप्रमाणें परमात्मा हा देवांचा गुरु आहे.

देवभृद् आणि गुरु अशीं दोन पदें हि घेणें शक्य आहे. तथापि संख्या-निर्वाहासाठीं आणि गुरुपदाची

आवृत्ति टाळण्यासाठीं हें एकपद मानलें आहे. आणि देव-प्रधान च हा श्लोकार्ध आहे म्हणून हि स्वतंत्र गुरु पद घेण्यापेक्षां देवभृद्-गुरु असें संयुक्त पद घेणेंच अनुकूल हि आहे. ग्रंथकार हा नेहमींच "न्यून तें पुरतें अधिक तें सरतें" करून घ्या म्हणत असतो. तदनुसार देवभृत् मधेंच गुरुभाव हि येऊन जात असला तरी निर्गुण केवलस्वरूप परमात्म्याचें सर्वातिशायित्व प्रकट करण्यासाठीं इथें गुरुपद आलें आहे असें समजावें.

गुरुत्व कशांत आहे? जीवननिर्वाह-कार्यांत गुरुत्व आहे. जें जें जीवननिर्वाहक आहे तें गुरु आहे. आई बाप गुरु जन्म देतात, भरण पोषण करतात, रक्षण करतात, शिक्षण देतात. थोडक्यांत जीवनाला व जीवन-साफल्याला आवश्यक तें सर्व ते पुरवितात. म्हणून ते गुरु होत. परमात्मा हा तसा या विश्वाचा गुरु आहे. पण तो परात्पर गुरु, 'गुरूणां गुरुः' आहे. विश्वाचे जे पालक ते देव. त्या देवांचा जो पालक ब्रह्मदेव म्हणजे देवभृत् आणि त्याचा हि जो पालक तो देवभृद्-गुरु. "यो ब्रह्माणं विदधाति पूर्वं यो वै वेदांश्च प्रहिणोति तस्मै" इत्यादि वचनांत हेंच परमात्म-गौरव गाइलें आहे.

### ४९४. उत्तर

उत्तरति सर्वं अतिवर्तते इति उत्तरः। अथवा उद्+तरं उत्तरः, उच्चतरः। उत्तर म्हणजे पुढचा, पलीकडचा, वरचा. पूर्वोत्तर, अधरोत्तर, दक्षिणोत्तर इत्यादि शब्दांत उत्तर पदाचा असा प्रयोग आढळून येतो. या शिवाय प्रश्नोत्तर हा हि प्रयोग आहेच. त्यांत शंकासमाधान असा अर्थ आहे. सर्वत्र उत्तर म्हणजे उच्चतर श्रेयस्कर श्रेष्ठतर असा अर्थ आहे. पूर्व मीमांसा उत्तर मीमांसा या प्रयोगांत तो श्लिष्ट आहे. पूर्व मीमांसा म्हणजे पूर्व कालीन तसा प्रारंभिक कच्चा वेदार्थ. उत्तर मीमांसा म्हणजे उत्तर कालीन तसा अन्तिम पक्का वेदार्थ. परमात्मा हा तसा अन्तिम सिद्ध स्वरूप आहे. सिद्धान्त आहे. म्हणून तो उत्तर म्हणावयाचा. साधक जीव हें पूर्व रूप होय, सिद्ध आत्मा हें उत्तर रूप होय. जीव आणि सृष्टि हे पूर्व रूप होय. ब्रह्मनिर्वाण हें उत्तर रूप होय. अशा प्रकारें परमात्मा हा या समस्त व्यक्त विश्वाचें उत्तर रूप आहे. सर्व विश्व त्याच्या ठाईं पर्यवसित होतें, परिनिष्ठित होतें, म्हणून तो उत्तर.

परिनिष्ठा या अर्थानें उत्तर पद आपण पाहिलें. तो त्याचा अर्थ आहेच, पण त्याशिवाय त्यांत आणखी खोल अर्थ भरला आहे. अन्तिम काय आहे? स्थिति की गति? मृत्यु की जीवन? परिनिष्ठा परिसमाप्ति ही अभावरूप शून्यरूप नाहीं. ती भावरूप आहे, जीवनरूप आहे आणि हें भावजीवन केव्हां हि गति-मत्च असणार, तें विझलेल्या दिव्याचें दीपनिर्वाण नाहीं, तर तेवणाऱ्या दिव्याचें दीपनिर्वाण आहे. "निवातस्थो यथा दीपो नेङ्गते सोपमा स्मृता। योगिनो यतचितस्य युञ्जतो योगमात्मनः॥" तेवणाऱ्या दिव्यांत तेल आणि वात जळत असते म्हणून तिथें निर्वाण म्हणजे ज्वलन-शान्ति नाहीं. पण रत्नदीपांत तेल वात नसून तेज तेवत राहतें. तेंच दीपनिर्वाण होय. तेज म्हणून तो दीप होय. ज्वलन नाहीं म्हणून तेंच निर्वाण होय. ब्रह्म-निर्वाण ही तशी गति आहे. सदैव आपलें उत्तररूप गांठण्याचा अजस्र प्रयास हेंच त्याचें स्वरूप. "प्रतिक्षणवर्धमानं अविच्छिन्नं सूक्ष्मतरं अनुभवरूपम्।"

### ४९५. गोपति

गो म्हणजे गाय, गो म्हणजे इंद्रियें, गो म्हणजे वाणी, गो म्हणजे ज्ञान, गो शब्द गम् धातूवरून आला आहे असें धातुवादी म्हणतात. शब्दवादी वा नामवादी म्हणतात गो नामावरून गम् धातु आला आहे. क्रिया स्वतंत्र नाहीं. ती कर्त्रधीन आहे. जगांत नामें आहेत आणि तीं क्रिया करतात. वारा वाहतो. या प्रयोगांत

म्हणूनच आधीं वारा हा कर्ता योजला जातो आणि नंतरच वा शेवटीं क्रियापद येतें. आधीं क्रियाच होती आणि मागाहून कर्ता आला असें कधीं संभवूंच शकत नाहीं म्हणून धातूवरून नामें आलीं नसून नामावरूनच धातु आले असें म्हटलें पाहिजे. तें कसें हि असो एवढें खरें कीं गो हें सत्त्व वा तत्त्व गमनशील आहे. गो गाय कुरणांत चरते. इन्द्रियें आपआपल्या विषयांत वावरतात. वाणी हि मनाच्या खुंट्यापासून सुटून आणि हृदयाच्या गोठ्यांतून बाहेर पडून व्यवहरते. ज्ञान सर्वत्र संचरतें. असें हें सर्व उच्चावच सूक्ष्मादि स्थूलान्त गोतत्त्व सर्वत्र भरलें आहे. असें पाहतां हें सारें व्यक्ताव्यक्त विश्वच गोरूप आहे म्हटलें तर त्यांत काय वावगें आहे? या विश्वगोचा जो पति म्हणजे स्वामी तो गोपति होय. तो गोपतिच या 'जगत्यां जगत्' चा, गतिमान जगांतील गतिशील पदार्थांचा, नियन्ता आहे. मात्र तो स्वत: गतिमय जगाच्या यातायातींतून परिपूर्ण मुक्त आहे. तो केवळ आहे, तो जो स्थिर शाश्वत परमात्मा तोच गोपति म्हणावयाचा. आमचीं प्राणेन्द्रियमनोबुद्धि सतत चलन वलन करीत असतात, पण त्यांचा स्वामी मात्र स्वस्थ उभा आहे. तो त्यांची सारी हालचाल नुसता पहात असतो. त्याच्या पाहणींत ह्या सगळ्या गाई चरत असतात. तो आपला 'त्रिभंगी देहुडा ठाण मांडूनियां राहे। कल्प -द्रुमातळीं वेणु वाजवीत आहे। गोविंदु वो माये। गोपाळु वो माये। सबाह्य अभ्यंतरीं अवघा परमानंदु माए। शून्य स्थावर जंगम व्यापुनी राहिला अकळ। बाप रखुमादेवीवरु विठ्ठल सकळ।।'.

## ४९६. गोप्ता

या त्रेपन्नाव्या श्लोकांत जसे 'गोपतिर् गोप्ता' हे शब्द जोडीनें आले आहेत तसेंच ते पुढें त्रेसष्टाव्या श्लोकांत हि आले आहेत. इथें व्यापक अर्थानें तर तिथें ते विशिष्ट अर्थानें आले आहेत. इथें गोपति म्हणजे जगत्पति तर तिथें तो धेनुपालक आहे. इथें गोप्ता म्हणजे विश्वगोप्ता, जगद्रक्षक तर तिथें तो गोपालक, गोरक्षक आहे.

परमात्मा या विश्व-गोकुलाचा पति म्हणजे पालक आहे. जशी एखाद्या गोकुलाची, खिल्लाराची वाढ त्याच्या गोपतीवर, वळूवर अवलंबून असते, तशी या विश्वाची उत्पत्ति वृद्धि परमात्म्यावर अवलंबून आहे. गोकुलाचें संवर्धनच तो गोपति करीत नसतो, तर त्याचें संगोपन हि तो करीत असतो. म्हणून त्याला गोप्ता म्हणावयाचें. परमात्मा हि तसाच या सृष्टीचा स्रष्टा आणि तिचा गोप्ता म्हणजे रक्षक आहे, पालक आहे, पिता आहे.

गोपति आणि गोप्ता हे शब्द गोकुलांतील जीवनाचे वाचक आहेत. कुटुंबांत हि आपण पाहतों कीं एकच व्यक्ति पति आणि पिता ह्या नात्यांनीं कुटुंबाची वृद्धि आणि संरक्षण करीत असते, संवर्धन आणि संगोपन करीत असते. परमात्मा हि तसाच या विश्व-कुटुंबाचा जनक आणि पालक आहे आणि प्रसंगीं जसा पिता कुटुंबाला शासन हि करतो तसा परमात्मा हि या विश्वाचा संहार हि करतो. याचेंच नांव आहे संसारसृष्टि स्थिति निरोध. इथें गोपतिर् गोप्ता या जोड नांवांत पहिल्या दोन कार्यांचा उल्लेख आला आहे. परंतु तिन्ही कार्यें प्रतिक्षणीं चाललींच आहेत. प्रतिक्षणीं नवी सृष्टि निर्माण होत आहे. पूर्वक्षणीं निर्मित सृष्टीचा योगक्षेम चालत आहे आणि तिचा उत्तर क्षणीं निरोध होत आहे, तिचें विसर्जन होत आहे. पण हें सत्र चर्मचक्षूला नाहीं दिसत. म्हणून पुढील पद सांगतें कीं तो परमात्मा ज्ञानगम्य आहे. दिव्य चक्षूनेंच परमात्म्याचा हा ईश्वरी योग पाहतां येतो.

## ४९७. ज्ञानगम्य

परमात्मा हा चिन्मात्र असल्यामुळें तो ज्ञानानेंच गम्य होणारा आहे, स्वसंवेद्य आहे. पंच विषय

इंद्रियगम्य आहेत. स्मरणें मनोगम्य आहेत. विषयांचें आणि स्मरणाचें इष्टानिष्टत्व बुद्धिगम्य आहे. पण स्वत: अवगन्ता किंगम्य आहे? तो या कोणालाच गम्य नाहीं. इन्द्रियमनोबुध्द्यादिकांचा तो विषय नाहीं. तो या सगळ्यांचा विषयी आहे. तो कोणाचा हि विषय होत नाहीं. याचा अर्थ तो जड कोटींत पडूं शकत नाहीं, तो चेतन आहे. जो चेतन आहे तो अचेतन, जड कसा होणार? विषयी विषय कसा होणार? ज्ञाता ज्ञेय कसा होणार? असें जर आहे तर मग तो स्वसंवेद्य तरी कसा म्हणावयाचा? चेतनाचा तो स्वभावच आहे. जो स्वत:लाच जाणत नाहीं तो दुसऱ्या कशाला हि जाणूं शकत नाहीं. जो मूर्छित वा मृत आहे तो कोणाला हि जाणूं शकत नाहीं. कारण तो मुळीं स्वत:लाच जाणत नसतो. सर्वोपलब्धीचें द्वार स्वोपलब्धि आहे. ती चेतनाची अंगभूत आहे, त्याचा स्व-भावच आहे, म्हणून त्याला स्वसंवेद्य म्हणावयाचें. इथें हि एक सूक्ष्म भेद आहे. इतर वस्तु ज्ञेय म्हटल्या आहेत, तो स्वतः संवेद्य म्हटला आहे. विषयवत् तो ज्ञेय नाहीं म्हटलेला आणि ज्ञानगम्य म्हणण्यांत तोच आशय आहे. ज्ञानस्वरूप आत्मा ज्ञानगम्य आहे म्हणजेच तो स्वसंवेद्य आहे. ज्ञानदेवानें या परमात्मतत्त्वाला म्हणूनच आद्य म्हटलें आहे आणि स्वसंवेद्य म्हटलें आहे.

**ॐ नमो जी आद्या। वेदप्रतिपाद्या ।**
**जय स्वसंवेद्या। आत्मरूपा।।**

सर्वोपलब्धीचें मूळ ती स्वोपलब्धिच असल्यामुळें तिला ज्ञानदेव आत्मरूप स्वसंवेद्य व आद्य या विशेषण-त्रयीनें विशिष्ट करीत आहेत. ''ज्ञानं ज्ञेयं ज्ञानगम्यं हृदि सर्वस्य विष्ठितम्'' ज्ञानस्वरूप असलेलें हें ज्ञेय अमानित्वादि विंशति ज्ञान-लक्षणांनीं आकळावें असें गीता सांगते. अर्थात् ज्ञानगम्य म्हणजे ज्ञान-लक्षणांच्या योगें प्राप्त करून घ्यावयाचा परमात्मा. हा हि ज्ञानगम्य पदाचा विशिष्ट अर्थ. दोन्ही अविरोधी व पूरक होत. एक निष्ठा आहे, दुसरा मार्ग आहे. शंकराचार्य तत्कालीन वादानुसार कर्मद्वारा वा ज्ञानकर्मसमुच्चयद्वारा नव्हे तर केवळ ज्ञानानेंच तो परमात्मा गम्य आहे म्हणून तो ज्ञानगम्य म्हणावयाचा असा सांप्रदायिक अर्थ घेतात. तो हि या पदांतून निघूं शकतो. तथापि तो इथें अभिप्रेत आहे असें नाहीं.

## ४९८. पुरातन

परमात्मा हा सर्वोपलब्धिकारण असल्यामुळें, म्हणजे त्याच्या आधीं कोणत्या हि वस्तूचें अस्तित्व प्रतिपादणें संभवनीय नसल्यामुळें तो उघडच पुरातन होय. त्याच्याहून प्राचीन दुसरें कांहीं नाहीं, इतकेंच नव्हे तर तसें कांहीं असूं शकत नाहीं. म्हणून विश्वरूप दर्शनांत अर्जुन म्हणतो :

''त्वं आदिदेवः पुरुषः पुराणः'' अर्थात् तो परमात्मा सर्वादि असून प्राचीनतम आहे. त्याच्या मानानें जगांतील जुन्यांतील जुनें हि अगदीं अलीकडचें म्हणावें लागेल. काल आणि स्थल ह्या कल्पना व्यक्त सृष्टींतील आहेत. अव्यक्तांत स्थलकालांचा काय हिशोब? जिथें भूत भविष्य वर्तमान, कल्प कल्पांतर, वर्ष मास, दिवसरात्र असला कांहीं विभागच नाहीं, तिथें तुम्ही कालाची गोष्टच काय करणार? परंतु ती अव्यक्ताची वार्ता व्यक्ताच्या भाषेंत सांगणें भाग पडतें म्हणून मग त्या परमात्म्याला पुरातन सनातन नित्य अनादि अनन्त युगादिकृत् म्हणावें लागतें. ही व्यक्त-सापेक्ष भाषा असली तरी ती अव्यक्ताचा बोध करून देणारी, अव्यक्ताचा संकेत करणारी आहे. तिनें व्यक्ताचा किंबहुना तत्सदृशाचा हि अर्थ घ्यावयाचा नाहीं. तर तो जो केवल अचिन्त्य अक्षर अव्यक्त अनिर्देश्य परमात्मा त्याचाच भाव लक्षावयाचा आहे. इथें हि पुरातन पद तसेंच समजावयाचें आहे. त्यानें कालसापेक्ष कुठला हि कल्प कल्पावयाचा नाहीं. युगादिकृत् म्हटलें म्हणजे युगाची, त्याच्या आरंभाची, त्याच्या कार्याची कल्पना आली. पण ही कल्पना व्यक्त-सापेक्ष असल्यामुळें, चिन्त्य कोटींत पडत असल्यामुळें परमात्म्याच्या अचिन्त्य अव्यक्त ऐश्वर्याची यथार्थ कल्पना द्यायला अक्षम आहे. परमात्म्याचें हें

जें अतुल सर्वातीत सर्व-विलक्षण केवलस्वरूप ऐश्वर्य त्याचें ज्ञान करून घेणाराला होत नाहीं. तें वेदाला होत नाहीं, निर्वेदाला होतें. म्हणून म्हटलें आहे :

**यस्यामतं तस्य मतं मतं यस्य न वेद सः।**
**अविज्ञातं विजानतां विज्ञातं अविजानताम्।।**

## ४९९. शरीरभूतभृत्

भृतकृत् भूतभृत् भूतभावन इत्यादि अनेकपदें मागें येऊन गेलीं आहेत. परंतु तिथें भूतशब्द सत्त्ववाचक आहे इथें शरीरभूतभृत् पदांत तो तत्त्ववाचक आहे. शरीर हें पांचभौतिक म्हटलें जातें. म्हणजे आकाश वायु तेज आप आणि पृथ्वी या पांच महाभूतांपासून चराचर सृष्टीच्या शरीराची रचना झालेली आहे. कोणतें हि स्थूल शरीर या तत्त्वांचेंच बनलेलें आहे. त्या सर्व शरीरोपादानभूत पंच महाभूतांचा हि त्रिगुणात्मक प्रकृतिरूपानें भर्ता तो परमात्मा आहे. म्हणून त्याला म्हटलें आहे शरीर-भूत-भृत्.

पांचभौतिक शरीर पंचभूतांपासून बनलें आहे, पण लिंगशरीर आणि कारणशरीर हीं सूक्ष्म आणि सूक्ष्मतर शरीरें पांचभौतिक म्हणतां येणार नाहींत. लिंगशरीर हें विषयग्राहक पंचेन्द्रिय-शक्तींचें व मनाचें मिळून बनलेलें मानलें आहे आणि कारणशरीर हें अविद्यास्वरूप. हीं दोन्ही शरीरें प्रकृतिगुणजन्य च असल्यामुळें त्यांचें स्वरूप प्राकृतच होय.

सारांश, सर्वभूतांची सर्व म्हणजे स्थूल लिंग कारण शरीरें प्राकृत होत आणि अव्यक्त-प्रकृतिरूपानें परमात्मा सर्व व्यक्त विसर्गाचा भर्ता आहे म्हणून तो म्हणावयाचा शरीररभूत-भृत्. जगांत नानाविध आवास बांधलेले आपण पाहतों–पर्णकुटी, मातीचीं घरें, चुनेगच्ची हवेल्या, अयोवज्रचूर्णनिर्मित भवनें इत्यादि. या सर्वांचें उपादान तृणदारुमृद्धातु होत. भूमि ही जशी भवनभूतभृत् म्हणावयाची तसा परमात्मा हा शरीरभूतभृत् होय. सर्व व्यक्त अव्यक्तांतून निर्माण झालेलें आहे. व्यक्तिमात्राचा मूलाधार तें अव्यक्त आहे. अव्यक्तप्रभव त्रिगुण आहेत. त्या अव्यक्ताच्या रूपानें तो अक्षर परमात्मा इथें शरीरभूतभृत् म्हटला आहे.

## ५००. भोक्ता

परमात्मा प्रकृति-रूपानें, अव्यक्त-रूपानें, शरीर-निर्माणसामग्री पुरविणारा आहे, असें मागील पदांत म्हटलें आहे, तर इथें त्या सामग्रीनें निर्मित शरीराचा अभिमानी बनून तद्द्वारा उच्चावच कर्में करणारा आणि त्यांचीं पुण्यापुण्य फळें भोगणारा जो जीव तो हि तोच आहे असें म्हटलें आहे. ''कार्य-कारण-कर्तृत्वे हेतुः प्रकृतिरुच्यते। पुरुषः सुखदुःखानां भोक्तृत्वे हेतुरुच्यते'' कार्य म्हणजे शरीर आणि त्याचें कारण म्हणजे गुण या दोहोंचा हेतु प्रकृति आहे. आणि जीव आहे त्या देहांत उत्पन्न होणाऱ्या सुखदुःखांचा ज्ञाता म्हणजे भोक्ता. आणि हे दोन्ही भाव म्हणजे शरीर आणि जीव ईश्वराची प्रकृतिच होय. ''भूमिरापोऽनलो वायुः खं मनो बुद्धिरेव च। अहंकार इतीयं मे भिन्ना प्रकृतिरष्टधा। अपरेयमितस्त्वन्यां प्रकृतिं विद्धि मे पराम्। जीवभूतां महाबाहोः ययेदं धार्यते जगत्।।'' प्रकृति म्हणजे अविच्छेद्य अंगभूत भाव. कासव आपलीं अंगें केव्हां पसरतो केव्हां आवरून घेतो, पण असतो तो सदैव सांगच. तसाच परमात्मा हि आपली द्विविध प्रकृति कल्पारंभीं पसरूं लागतो आणि कल्पान्तीं आवरून घेतो. पण ती प्रकृति असते सदैव त्याची अंगभूतच; आणि म्हणूनच तिला प्रकृति म्हणावयाचें.

कोणताहि प्राणी घेतला तर त्याच्या ठाईं भोगायतन शरीर आणि भोक्ता जीव असा विभाग

आढळून येतो. या दोहोंत भोगायतन ती जड प्रकृति असून भोक्तृत्व चेतनधर्म आहे. कारण जडाला ज्ञान होऊं शकत नाहीं. पण हें सुखादुःखात्मक ज्ञान भ्रांत आहे, म्हणून या जीवाला जीव म्हणावयाचें, नाहीं तर तो शुद्ध चेतनच आहे, शिवच आहे. म्हणूनच भोक्ता जीव ही परमात्म्याची प्रकृति म्हटली गेली. भ्रांत भोक्तृत्वरूप जडत्व त्यांत प्रतिबिंबित आहे. शुद्ध चेतन परमात्मा हा असा प्रकृतिपुरुषेश्वर आहे. दोन्ही त्याची प्रकृतिच होय, डावें उजवें अंग होय. ''शरीर रूपी झाडावर जीवेश्वररूप दोन पक्षी राहतात. त्यापैकीं जीव पक्षी हा त्या वृक्षाचीं सुखदुःखरूप कर्मफळें खातो आणि दुसरा ईश्वररूप पक्षी नुसता तटस्थ पहात असतो'' असें वर्णन याच भावांना अनुलक्षून उपनिषदांत आलें आहे.

## *शतक सहावें*

### ५०१. कपीन्द्र

कपि शब्द सहस्रांत तीनदां आला आहे—वृषाकपिः श्लोक ११, कपीन्द्रः श्लोक १३ आणि कपिः श्लोक ९६. वृषाकपि पदाची व्याख्या भारतांत 'कपिर् वराहः श्रेष्ठश्च धर्मश्च वृष उच्यते। तस्माद् वृषाकपिं प्राह काश्यपो मां प्रजापतिः (भा शां ३४३-५९) अशी दिली आहे. ही आर्ष निरुक्ति आहे. आर्षवचन प्राचीनतम परंपरेवर आधारलेलें असतें. त्यामुळें तें चिंत्य आहे. तदनुसार वृषाकपि म्हणजे यज्ञ-सूकर असा अर्थ निष्पन्न होतो. प्राचीन वैदिक धर्म म्हणजे यज्ञ होय. आणि सूकरानें ही (वृजिन-) अर्णवमग्न मही रदाग्रानें उचलली अशी प्रसिद्धि आहे. दोहोंच्या संयोगांतून असा भाव निघतो कीं या जगाचा उद्धार यज्ञानें व्हावयाचा आहे. यज्ञाधारच तें आहे. गीतेंत हा विचार स्पष्टच आला आहे: पहा ''यज्ञार्थात् कर्मणो ऽन्यत्र लोको ऽयं कर्मबन्धनः। गीता ३.९ ते तस्मात् सर्वगतं ब्रह्म नित्यं यज्ञे प्रतिष्ठितम्'' गीता ३.१५.

हें झालें वृषाकपि पदाबाबत. कपीन्द्र पद हि तदर्थकच दिसतें. पुढील भूरिदक्षिण पदाच्या साहचर्यानें सदर पूर्ववर्ती कपीन्द्र पद हि यज्ञवाचक मानणें शक्य आहे. दोन्ही पदें जोडून वाचल्यास जो भूरिदक्षिण तो कपीन्द्र म्हणजे महावराह होय, महायज्ञ होय, धर्मश्रेष्ठ होय असा अर्थ निष्पन्न होतो.

कपि म्हणजे वराह हा अर्थ न घेतां कपि म्हणजे वानर असा अर्थ घेऊन कपीन्द्र म्हणजे वानरांचा स्वामी श्री राम असा अर्थ करतां येतो, पण तो गौण आहे. सहस्रांत पौराणिक आख्यायिका नसून तात्त्विक चिंतन आहे. सहस्रांत राम आहे पण तो दाशरथि नाहीं, तो आत्माराम आहे. कृष्ण आहे पण तो राधाकृष्ण नाहीं, देवकीनन्दन आहे, अदितिनन्दन आहे. तो कंस-हन्ता नाहीं, पण मधुसूदन आहे चाणूरान्ध्रनिषूदन आहे. तदनुसार कपीन्द्र म्हणजे यज्ञेश्वर होय.

पुढें ९६ व्या श्लोकांत ''कपिलः कपिरव्ययः'' या वचनांत हि अव्ययः कपिः म्हणजे अव्ययधर्म असाच आशय आहे. कपींत लालतोंडे आणि काळतोंडे असे दोन प्रकार आढळतात. अग्नि हि तसा आहे. तो पेटतो तेव्हां तो लालतोंड्या असतो एरव्हीं काळतोंड्या. आणि सर्व अग्नींत यज्ञाग्नि हा श्रेष्ठ होय, म्हणून परमात्मा कपीन्द्र म्हणावयाचा. अथवा कपीन्द्र म्हणजे वानरयूथमुख्य हनुमान् हि समजायला हरकत नाहीं. भगवद्विभूति च आहे ती.

### ५०२. भूरिदक्षिण

बह्व्यः दक्षिणाः अस्य इति भूरिदक्षिणः यज्ञपुरुषः परमात्मा। ज्याला विपुल दक्षिणा मिळते तो यज्ञपुरुष परमात्मा भूरिदक्षिण म्हणावयाचा. ज्याची फी मोठी तो मोठा डॉक्टर, तसा ज्याची दक्षिणा मोठी तो मोठा यज्ञपुरुष, मोठा देव. परमात्मा हा सर्वांत मोठा

यजनीय आहे, देव आहे, तो सर्व भूतांचा अन्तर्यामी आहे. सर्व भूतें सर्व पूजा त्यालाच अर्पण करतात. जो विशिष्टत्व राखून अभिमान बाळगून इंद्र चंद्र झाला, त्याचा भाग मर्यादित झाला. पण जो सर्वभूतात्मभूतात्मा आहे त्या परमात्म्याच्या ऐश्वर्याची बरोबरी कोण करूं शकतो? त्याच्या इतका करभार, त्याच्या इतकी दक्षिणा कोणालाच मिळूं शकत नाहीं.

भूरि: दक्षिणा दाक्षिण्यं अस्य इति भूरिदक्षिण: परमतत्पर: परमात्मा। ज्याची दक्षिणा म्हणजे दाक्षिण्य मोठें तो, भूरिदक्षिण परमतत्पर परमात्मा म्हणावयाचा. 'कपीन्द्रो भूरिदक्षिण:' हें वचन या हि अर्थानें मोठें समर्पक आहे. कपीन्द्र हनुमान् हा भूरि-दक्षिण म्हणजे सदैव हात जोडून सेवातत्पर किंकर उभा आहे. परमात्मा हा जसा परम सेव्य आहे, तसा तो आदर्श सेवक हि आहे. भक्तानें हाक मारण्याची देर की तो सेवेस हजर! गजेन्द्रानें हांक मारली तर तो तत्काळ धावून आला. प्रह्लादानें खूण केली, इषारा केला त्या बरोबर तो खांबांतून प्रकटला. याहून अधिक दक्षता, अधिकतत्परता ती कोणती म्हणावी? परमात्मा अन्तर्यामी असल्यामुळें तुमच्या नुसत्या स्मरणा बरोबर, इषाऱ्याबरोबर तो तुमच्या सेवेस हजर होतो. तुम्ही झोपलां तरी तो जागत असतो. त्याचे डोळे अनिमेष पाहत आहेत. तुम्ही उठला तर कमरेवर हात ठेवून तो तुमच्या हुकमाची वाट पाहत उभाच आहे.

### ५०३. सोमप

सोमपान आणि सामगान म्हणजे सुखाची परमावधि होय. शरीराला पान आणि मनाला गान गारीगार करून सोडतें. देहप्राण आणि मन या दोहोंतून एकालाच सुख लाभल्यानें पूर्ण संतोष होत नाहीं. म्हणून वैदिक धर्मांत सोमपान आणि सामगान यांचें अनन्यसाधारण महत्त्व आहे. हें सुख भौतिक असलें तरी तें उपेक्षणीय नाहीं. पण तिथेंच थांबतां येत नाहीं. कारण तें अक्षय्य नाहीं. म्हणून माणूस अक्षय्य सुखाच्या शोधांत लागला आणि त्यानें जें आध्यात्मिक अक्षय्य सुख शोधून काढलें त्याला हि त्यानें सोमच म्हटलें. जें ठाऊक असतें त्याचें उदाहरण वा उपमा मनुष्य समजावून सांगतांना अव्यक्ताला देत असतो आणि तें स्वाभाविकच आहे. तदनुसारच माणसाची भाषा आणि वाङ्मय वाढत गेलीं आहेत. आध्यात्मिक भाषा ही प्राय: रूपकात्मक असते त्याचें कारण हि हेंच आहे. इथें हि तोच प्रकार झाला आहे. भौतिक सोमवल्ली, तिची आधिदैविक देवता सोम आणि तिचा आध्यात्मिक अर्थ म्हणजे स्वरूप परमानन्द हे तिन्ही अर्थ अपेक्षेनुसार घेतां येतात. अधिभूत अधि-दैव आणि अध्यात्म ह्यांना क्रमानें १, २, ३ असे अंक दिल्यास त्यांचे प्रस्तार १,२, ३; १+२, १+३,२+३, आणि १+२+३ असे सप्तविधच होतात. गरजेप्रमाणें एकत्वेन पृथक्त्वेन आणि बहुधा अर्थ करावयाचा. वैदिक मंत्रांत हे सर्व प्रस्तार समाविष्ट आहेत. त्यामुळें मंत्रांचा अर्थ एकेरी नाहीं तो संमिश्र आहे. मोगऱ्याचें फूल जसें सातपुटी असतें तसा वैदिक मंत्राचा वा शब्दाचा अर्थ हि साप्तभौमिक असतो. सोम पद हि तसेंच आहे. त्यामुळें त्याचा एकेरी अर्थ अनेकदां नीट बसत नाहीं. 'सोम: पवित्रं अतिएति रेभन्' या वेदवचनांत सोमचा एकेरी अर्थ घेऊन चालणार नाहीं. भौतिक सोम (रस) गाळण्यांतून गाळून आवाज करीत येतो आणि दैविक सोम म्हणजे चंद्र अर्थात् त्याचे किरण आकाशाच्या गाळण्यांतून गाळून जणूं आनंदोल्लास करीत येतात. आध्यात्मिक सोम म्हणजे आत्मज्ञान पवित्र अंत:करणांतून गर्जत येतें. असें एकाच मंत्राचे अनेक अर्थ एकमेकांचा निषेध न करतां पण एकमेकांना पोटांत घालून येतात. इथें सोमप म्हणजे सोमयागांत यजिला जाणारा यज्ञभुक् परमात्मा होय.

## ५०४. अमृतप

सोमप आणि अमृतप हीं दोन पदें जोडून आलीं आहेत. त्यांत तुलना आणि तफावत दाखविण्याचा हेतु आहे. प्रत्येक आदर्श जीवाला एका उंच भूमिकेवर घेऊन जायला मदत करीत असतो. म्हणून तो प्रत्येक आदर्शच परमात्मस्वरूप आहे. तथापि भूमिकानुसार त्यांच्यांत तरतमभाव हा राहतोच. इथें हि या दोन पदांत तसाच तो आला आहे. पार्थिव भोगापेक्षां दिव्यभोग श्रेयस्कर. लोकायतिक हे नास्तिक. ते पार्थिव भोगवादी होत. ते म्हणतात, हें आयुष्य आहे तोंवर खा प्या मजा करा. मेल्यानंतर सगळाच कारभार आटोपला. ''यावत् जीवेत् सुखं जीवेत्; ऋणं कृत्वा घृतं पिबेत्। भस्मीभूतस्य देहस्य पुनरागमनं कुत:।'' हा त्यांचा जीवनाचा आदर्श आहे. वैदिकांना तो मान्य नाहीं. ते आस्तिक आहेत. देह मेला म्हणून जीवन संपलें असें नाहीं. इहलोकाप्रमाणें परलोक हि आहे. त्या परलोकांत जीव कर्मानुसार सुखदु:ख भोगतो असें ते मानतात आणि म्हणून पाप वर्ज्य करून यज्ञानें पुण्य संपादावें आणि पुण्यबलानें स्वर्गांत विपुल सुख भोगावें असें त्यांचें म्हणणें आहे. त्यांचा हा वेदवाद गीतेच्या श्लोकांत असा आला आहे ''त्रैविद्या मां सोमपा: पूतपापा यज्ञैरिष्ट्वा स्वर्गतिं प्रार्थयन्ते। ते पुण्यमासाद्य सुरेन्द्रलोकं अश्नन्ति दिव्यान् दिवि देवभोगान्।। ते तं भुक्त्वा स्वर्गलोकं विशालं, क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशन्ति। एवं त्रयीधर्ममनुप्रपन्ना, गतागतं कामकामा लभन्ते।।'' लोकायतिकांपेक्षां वैदिकांचा विचार बरा म्हटला तरी तो निर्दोष नाहीं. त्यांत शाश्वती नाहीं. पार्थिव भोग जसे क्षणिक तसे दिव्य भोग हि नश्वर आहेत. मग त्यांच्याबद्दल विचारी माणसाला उत्साह कसा वाटणार? म्हणून वेदान्ती म्हणतात, बाबा रे तुझा तो सुरारस काय नि सोमरस काय किती हि आनंद देणारा वाटला तुला, तरी तो आज ना उद्यां संपला म्हणजे पुन: येरे माझ्या मागल्याच ना? पुन: दु:खच ना? म्हणजे सगळें मुसळ केरांत! तेव्हां त्यांत कांहीं सार नाहीं. जें चिरंतन अक्षय सुख त्याचीच कास धरली पाहिजे आणि असें जें आहे तें आहे आत्मज्ञान. तोच मानवाचा खरा आदर्श आहे. त्यासाठींच त्यानें जगावें मरावें आणि तरावें. तेंच अमृत. त्याचें पान करतो तो अमृतप होय. परमात्मा हा असा परमादर्शरूप असल्यामुळें तो अमृतप होय. वैदिकांच्या भूमिकेवरून तो सोमप तर वेदान्ताच्या भूमिकेवरून तो अमृतप होय.

## ५०५. सोम

''सोमपो ऽमृतप: सोम:'' हा चरण एका विचाराच्या सूत्रांत गुंफलेला आहे. तो विचार मागील दोन पदांच्या चिंतनांत आपण पाहिला. तिथेंच सोमपदाचें हि विवेचन आलें आहे. परंतु तिथें 'सह उमया सोम:' हा सहबहुव्रीहि समास आणि विग्रह आपण पाहिला नाहीं. उमेसहित असलेला शिव तो सोम म्हणावयाचा. विष्णु-सहस्रांत हा सोम म्हणजे सांब कसा शिरला? त्याचें इथें काय प्रयोजन? इथें शिव विष्णु ब्रह्मा या देवतांचें स्मरण नसून हें एका परमात्म्याचें स्मरण आहे. त्यामुळें इथलीं सर्व पदें परमात्मवाचक आहेत, अन्यदेवतावाचक नाहींत. त्यामुळें शिववाचक वा विष्णुवाचक वा अन्य देवदेवतावाचक पदें सर्व परमात्मवाचक समजावयाचीं आहेत. तदनुसार सोम हें पद हि परमात्मवाचकच घ्यावयाचें आहे. काय कल्पना आहे या पदांत? परमात्मा हा चेतन असल्यामुळें तो सदैव स्मृतिमान् असतो. स्वानुभवयुक्त असतो, आत्मज्ञानयुक्त असतो. हें आत्मज्ञान ही आत्मविद्याच इथें उमापदानें लक्षित आहे. आणि ज्या अर्थी तो चिद्रूप परमात्मा सदैव आत्मविद्यानाथ आहे त्याअर्थी तो सोम म्हटला आहे. ॐकार हा जसा एकाक्षर ब्रह्म आहे तसा उमा शब्द हि द्व्यक्षर ब्रह्म म्हणतां येईल. निदान, तिला ब्रह्मविद्यावाचक मानायला कांहींच हरकत नाहीं. दोन्ही पदांत अउम हेच वर्ण आले आहेत. केनोपनिषदांत

उमा हैमवती आली आणि तिनें देवांना ब्रह्माची ओळख करून दिली अशी आख्यायिका आलेली आहे. तदनुसार उमा म्हणजे ब्रह्मविद्या हें समीकरण दृढ होतें.

सोम हा अमृतस्यंदी म्हणून प्रसिद्ध आहे. परमात्मा हा तसाच जीवांना ज्ञानामृतानें अमर करतो, त्यांना परम सुख देतो, मोक्ष देतो, म्हणून हि तो सोम म्हणावयाचा.

आणि 'नक्षत्राणां अहं शशी, पुष्णामि चौषधीः सर्वाः सोमो भूत्वा रसात्मकः' म्हणून सोम ही भगवद्-विभूति तर प्रसिद्धच आहे.

सारांश, अभिधा लक्षणा वा व्यञ्जना कोणत्या हि अर्थानें तो परमात्मा सोम आहे : नक्षत्रनाथ, विद्यानाथ, मोक्षनाथ; पोषण शिक्षण रक्षण देणारा.

## ५०६. पुरुजित्

पुरुजित् सहस्रजित् अनन्तजित् अशीं हीं पदें सहस्रांत आलीं आहेत. तिन्ही पदांचें तात्पर्य एकच आहे. परमात्मा हा द्यूतांत वा युद्धांत, दैवदृष्ट्या वा पुरुषकारदृष्ट्या विजेता आहे. विजयी आहे. तो पुरु म्हणजे विपुल धन जन जिंकतो. हार त्याला ठाऊक नाहीं. तो प्रत्यक्ष युद्धांत वा तत्प्रतीक सोंगट्यांच्या खेळांत द्यूतांत सारखा जितीवर जीत मिळवीत जातो. त्याचा प्रत्येक वार, त्याचें प्रत्येक दान त्याला जय मिळवून देत असतें. तो सारखा शकुनीप्रमाणें जितं जितं म्हणत जातो आणि जिंकीत जातो. अशा प्रकारें तो पुरुजित् सहस्रजित् अनन्तजित् होतो. परमात्म-सत्ता सर्वोपरि आहे. तिच्या अधीन सारें विश्व आहे. त्यामुळें तीच एक विजयी आहे. जीवांचे क्षणिक जयपराजय त्या सत्तेपुढें सारखेच आहेत. ताटांतील काय नि वाटींतील काय दोन्ही घास शेवटीं जसे खाणाऱ्याच्या पोटांतच जातात तसे सर्व जीव आणि त्यांचे उद्योग आणि त्यांची हार जीत सगळेंचें सगळें त्या परमात्म-शक्तींत विलीन होतें. सर्व जलप्रवाह जसे शेवटीं समुद्रांत समाप्त होतात तसे जीवांच्या जीवनाचे ओघ त्यांच्या सर्व बऱ्यावाईट प्रवृत्तींसगट आणि त्यांच्या यशापयशासकट परमात्मसत्तेंत समाप्त होतात. म्हणून तो परमात्मा पुरुजित् म्हणावयाचा. त्या परमात्मशक्तीला जो वश होऊन राहिला तो हि पुरुजित् म्हणावयाचा. कारण त्याची स्वतंत्र अशी हार जीत आतां राहिलीच नाहीं. गीतेंत भगवान् जीवाला हाच उपदेश देत आहेत—'निमित्तमात्रं भव सव्यसाचिन्' बरें वाईट सर्व ईश्वरी संकल्पानुसार घडत आहे. मी बरें कर्म करणारा म्हणून फुशारकी मारूं नको किंवा मी वाईट कर्म करणारा म्हणून खट्टू होऊं नको. पण ओळख कीं आपण ईश्वरी हातांतलें एक हत्यार आहों. तो हवा तसा त्याचा वापर करीत आहे म्हणून त्यालाच वश होऊन रहावयाचें. यशापयश त्याचें. आपण त्यांत कुठेंच कांहीं नाहीं. 'मा व्यथिष्ठाः। युध्यस्व। जेतासि। भुंक्ष्व राज्यं समृद्धम्।' भक्ताला भगवंताचें हें सरळ आश्वासन आहे. अभिवचन आहे.

## ५०७. पुरुसत्तम

पुरुषोत्तम गतिसत्तम अशीं आणि अशा सारखीं पदें सहस्रांत अनेक आलीं आहेत. त्यांत उत्तर पद प्रायः श्रेष्ठार्थक असतें आणि पूर्वपद नाम असतें. आणि हीं पूर्वोत्तर दोन पदें निर्धारणार्थक षष्ठीनें जोडलेलीं असतात. ही षष्ठी कुठें लुप्त असते, कुठें अलुक्. पुरु-सत्तम . गतिसत्तम, पुरुषोत्तम, धर्मविदुत्तम, यदुश्रेष्ठ हीं सामासिक उदाहरणें होत. क्षमिणां वरः, गोविदां पतिः, योगविदां नेता, शक्तिमतां श्रेष्ठः श्रीमतां वरः, सर्वशस्त्रभृतां वरः हीं हि एक प्रकारें सामासिक च होत. पण इथें अलुक् समास आहे, असें म्हणतां येईल. या वरील दोन प्रकारच्या सामासिक नामांत सूक्ष्म पाहतां असें दिसतें कीं जियें निर्धारण

आहे तिथें षष्ठीचा प्रत्यय वापरला आहे आणि जिथें निर्धारण नाहीं तिथें समास केला आहे. पुरुषोत्तम हा समास पुरुषेषु उत्तमः असा सोडवला जाईल. इथें निर्धारण नाहीं. अथवा तो असा हि सोडवणें शक्य आहे उत्तमः पुरुषः पुरुषोत्तमः इथें हि निर्धारण नाहीं. परंतु जिथें अनिर्धारणरूप सहज श्रेष्ठत्व प्रतिपादिलें नसून विशिष्टांत वरिष्ठ असा तौलनिक भाव असेल तिथें प्रायः षष्ठीचा प्रत्ययच वापरला आहे. क्षमिणां वरः आणि क्षमिवरः एक नाहीं. पहिल्यांत निर्धारण आहे, दुसऱ्यांत तुलना न करतां सामान्यपणें श्रेष्ठत्व प्रतिपादिलें आहे. तद्नुसार पुरु-सत्तम म्हणजे "पुरुषु सत्तमः" अथवा "सत्तमः पुरुः" असा विग्रह होईल. पहिला सप्तमीतत्पुरुष समास म्हटला जाईल व दुसरा कर्मधारय. दोहोंचा अर्थ एकच. श्रेष्ठ पुरु. गतिसत्तमः म्हणजे श्रेष्ठ गति. वीणावरः म्हणजे श्रेष्ठ वीणा. हीं उदाहरणें हि तशींच आहेत. पण पुरु म्हणजे काय? पुरु हें विशेषण कीं नाम? तें नामच म्हटलें पाहिजे. पुरु म्हणजे पुरुष, पुरु म्हणजे नर..... आणि पुरुसत्तम म्हणजे नरोत्तम पुरुषोत्तम. जडाहून चेतन श्रेष्ठ आहे. त्या चेतनांत उद्भिज्ज स्वेदज अंडज जरायुज हे उत्तरोत्तर श्रेष्ठ होत. जरायुजांत चतुष्पादांहून द्विपाद श्रेष्ठ. त्यांत हि चक्षुष्मान्. चक्षुष्मंतांत हि धीमान् श्रेष्ठ होय. अशा प्रकारें "पुरुषु बहुषु सत्तमः पुरु-सत्तमः" या हि अर्थानें पुरुसत्तम पद लावतां येईल. अर्थांत फरक नाहींच. असा जो पुरुसत्तम आहे तो परमात्माच म्हणावा. 'पुरुषात् न परं किंचित्, सा काष्ठा सा परा गतिः' पुरुसत्तम आणि गति-सत्तम हीं दोन्ही पदें वरील वचनांत उपनिषदानें गोविलीं व विवरिलीं आहेत.

## ५०८. विनय

प्रस्तुत श्लोकाच्या पूर्वार्धांत दोन सूत्रें "सोमपोऽमृतपः सोमः" आणि "पुरुजित् पुरुसत्तमः" येऊन गेलीं. उत्तरार्धांत हि तशींच दोन आलीं आहेत. "विनयो जयः सत्यसंधः" आणि "दाशार्हः सात्वतां पतिः" म्हणजे प्रत्येक चरण एक सूत्रवत् आहे. वस्तुतः सहस्रांतील प्रत्येक नामच एक सूत्र आहे. सूत्राची व्याख्या आहे "स्वल्पाक्षरं असंदिग्धं ग्रन्थतात्पर्यबोधकम्। अस्तोभं अनवद्यं च सूत्रं सूत्रविदो विदुः" ही व्याख्या सहस्रांतील प्रत्येक नामाला लागू पडते. खरोखर सहस्र हा एक अतिविशद गूढ सूत्रग्रंथ आहे. इतका सुलभ कीं कोणी हि तो आस्वादावा. इतका दुरूह कीं भल्या भल्यांना हि उलगडूं नये. काव्याच्या द्राक्षापाक आणि नारिकेलपाक अशा दोन जाति कल्पितात. रघुवंशादि काव्यें द्राक्षापाक होत तर शिशुपालवधादि काव्यें नारिकेलपाक होत. द्राक्ष तोंडांतच टाकायचें काम, पण खोबरें खायचें म्हणजे कोण खटपट. एकांत सर्वत्र सौलभ्य आहे तर दुसऱ्यांत सर्वत्र काठिन्य भरलें आहे. द्राक्ष नीरदाला हि खातां येईल पितां येईल, तर नारळ दन्तीला हि मुश्किलीनें सोलून फोडून काढून चावचाव चावून खावा लागेल. परंतु एकसमयावच्छेदें करून उभयपाक असें काव्य म्हणजे हें सहस्र आहे. तें दगडासारखें अभेद्य पण रसासारखें आस्वाद्य आहे—शर्कराखंडवत्. खडीसाखरेचा खडा दांतवाल्याला नि बिनदांतवाल्याला हि सारखाच आस्वाद्य आहे. कठिण असून रसाळ, रसाळ असून कठिण. खडीसाखरेचा खडा संपून जातो, पण हा नामाचा खडा जिभेवर सतत द्रवत राहून हि संपत नाहीं.

विशेषेण नयति इति विनयः। परमात्मा हा सत्य आणि संयम उर्फ अहिंसा यांच्या योगें साधकाला गन्तव्याला नेऊन *पोचवितो म्हणून तो विनय. विनयांत सत्य नसेल तर विनय म्हणजे चापलूसी वा चाटुकार होईल आणि संयम उर्फ अहिंसा नसेल तर विनय म्हणजे औद्धत्य म्हणावें लागेल. नेतृत्वाला दोन गुण वा बलें लागतात. एक दर्शन आणि दोन चरण. सत्य हें दर्शन-बल आहे, अहिंसा हें चरण-बल आहे. विनयांत हीं दोन्ही बलें एकवटलीं आहेत. म्हणून विनय हा परमात्मा होय.

'विनयो जय: सत्यसंध:' हा नवाक्षर चरण झाला. शास्त्रमर्यादेसाठीं विन ह्या अक्षरांना एकाक्षरी भाव झाला आहे असें समजावें. गीतेंत हि असा एकाक्षरी भाव आला आहे पहा– 'मदनुग्रहाय परमम्।'-११-१

५०९. जय:

परमात्मा विनय आहे आणि म्हणून तो जय हि आहे. जय म्हणजे जिंकणारा. जीवनाच्या युद्धांत कोणाचा जय होतो? जो सत्याग्रही आहे त्याचा. सत्यासाठीं अहिंसेचा आग्रही तो सत्याग्रही होय. युद्ध हें मुत्सद्दी आणि योद्धा दोहों मिळून जिंकलें जातें. जीवनाच्या युद्धांत सत्य हा मुत्सद्दी आणि अहिंसा म्हणजे संयम हा योद्धा आहे. विनयांत सत्य आणि अहिंसा दोन्ही एकवटलीं आहेत आणि म्हणून जिथें विनय तिथें जय हा ठेवलेलाच आहे. म्हणून म्हटलें आहे 'विनयो जय:.' सत्यांत साध्य आणि साधन दोहोंचा हि अंतर्भाव होतो. म्हणून एकच नांव घ्यायचें झालें तर सत्य घेतलें जाईल. दोन नावें घ्यायचीं तर सत्य आणि संयम घेतलीं जातील. संयमाचें अंत:स्वरूप अहिंसा आहे. अस्तेय अपरिग्रह ब्रह्मचर्य प्राणाघात-निवृत्ति हीं सर्व संयमाचीं विविध रूपें होत. आणि सर्व संयम–धर्मांचें तात्पर्य अहिंसाच आहे. इतकेंच नव्हे तर सत्याचें हि तात्पर्य कार्यदृष्टींत अहिंसा च म्हणावें लागतें. कारण सर्वत्र समदर्शन हेंच सत्य आहे. आणि या दर्शनांतून निष्पन्न होणारा जो व्यवहार व्यापार तोच अहिंसा म्हटला जातो. द्वैतकल्पनेंत भय आहे, हिंसा आहे. आणि तदुत्थ सर्व व्यवहार व्यापार हिंसा म्हटला जाईल. म्हणूनच म्हटलें आहे गीतेंत–

**समं पश्यन् हि सर्वत्र समवस्थितमीश्वरम्।**
**न हिनस्त्यात्मनात्मानं ततो याति परां गतिम्।।**

ज्यानें समदर्शनरूप परम सत्य ओळखलें तो हिंसा कोणाची करणार? ज्याची हिंसा करायची तो हि तर तोच आहे. आपलीच हिंसा कोण करील? पण समदर्शन म्हणजे सर्वत्र परमात्मादर्शन एकाएकीं होत नाहीं. ती अहिंसेची परमावधि आहे. तो अहिंसेचा समुद्र आहे. त्या समुद्राला नदीच्या वाटेनें पोंचावें लागतें. म्हणून म्हटलें आहे 'अहिंसा परमो धर्म:'. ''अहिंसा हें परम साधन आहे. याच्या योगें तें परम साध्य गांठतां येतें. औष्ण्य अग्नीचा, प्रकाश सूर्याचा जसा स्वभाव आहे स्वधर्म आहे. तसा अहिंसा हा आत्म्याचा स्वभाव आहे, स्वधर्म आहे. आणि म्हणून हि अहिंसा हा परम धर्म होय. आणि ज्या अर्थीं 'नहि स्वभावो भावानां व्यावर्तेत्' पदार्थांचा स्वभाव बदलूं शकत नाहीं त्या अर्थीं एक त्याचा च जय आहे या जगांत. परमात्मा हा असा सदैव स्वभावस्थित असल्यामुळें त्याचा म्हणजे त्याच्या आत्मधर्माचा सत्य अहिंसादिकांचा जय आहे. म्हणून तो जय होय. ''सत्यमेव जयते'' ''यतो धर्मस् ततो जय:'' या सर्व वचनांचें हि हेंच तात्पर्य.

५१०. सत्यसंध

सत्या संधा प्रतिज्ञा यस्य स: सत्यसंध: । ज्याची संधा म्हणजे प्रतिज्ञा सत्य आहे तो सत्यसंध परमात्मा होय. परमात्म्याची काय प्रतिज्ञा आहे? ''सत्यमेव जयते, नानृतम्'' ''कौन्तेय प्रतिजानीहि न मे भक्त: प्रणश्यति'' इत्यादि परमात्म्याच्या प्रतिज्ञा आहेत. सत्यच एक आहे. तेंच असतावर सदैव विजयी होतें. त्याला जो धरून राहतो तो परमात्म्याचा भक्त कधीं हि नाश पावत नाहीं. कारण त्यानें शाश्वताचा आश्रय केलेला असतो, अशाश्वताचा नव्हे. परमात्मा हा जीवाप्रमाणें कसली कामना धरीत नाहीं वा तिच्यासाठीं कसला संकल्प करीत नाहीं वा त्याच्या सिद्धीसाठीं कांहीं प्रतिज्ञा करीत नाहीं. त्याचें स्वरूपावस्थान, त्याचा स्वभाव हीच त्याची प्रतिज्ञा होय. सूर्याला प्रकाशच देत राहीन अशी प्रतिज्ञा करावी लागत नाहीं. तो त्याचा स्वभाव आहे. त्या प्रमाणें सत्य हीच ज्याची संधा म्हणजे व्रत वा शील आहे तो परमात्मा सत्यसंध होय. परमात्मा हा या दोन्ही अर्थांनीं सत्यसंध होय. सत्य हीच त्याची प्रतिज्ञा आहे आणि

ती त्याची प्रतिज्ञा सत्य आहे, अवितथ आहे. संधा पद संपूर्वक धा धातू पासून व्युत्पादिलें जाईल. अर्थात् संधा म्हणजे सम्यक् धारणा. ज्याची धारणाच सम्यक् नाहीं त्याची प्रतिज्ञा सत्य होऊं शकत नाहीं अग्नीनें म्हटलें कीं मी उष्ण नाहीं राहणार, शीत होईन, तर त्याची ही प्रतिज्ञा खोटी पडेल. कारण या प्रतिज्ञेला सम्यग् धारणेचा आधार नाहीं. स्वभावाविरुद्ध कोणती हि प्रतिज्ञा होऊं शकत नाहीं. जो कोणी ती तशी करील तो लटका पडेल. तो सत्यसंध नाहीं होणार. परमात्मा हा सत्यसंध आहे, कारण त्याची धारणा सम्यक् आहे. मी सत् चित् आनन्द आहें अशी त्याची धारणा आहे. आणि ही त्याची धारणाच त्याची प्रतिज्ञा आहे. त्याच्या या प्रतिज्ञेत केव्हांहि अंतर येत नाहीं. जो अशी आत्मनिष्ठा राखतो तोच विनय तोच जय आणि तोच सत्यसंध होतो. तोच विजेता, तोच जेता, तोच तीर्ण-प्रतिज्ञ होतो. परमात्माच एक असा आहे म्हणून तो ''विजयो जयः सत्यसंधः'' म्हटला आहे.

## ५११. दाशार्ह

''दाशार्हः सात्वतां पतिः'' हा चरण वंशानुकीर्तन करणारा आहे. सहस्रांत भगवंताच्या ''प्राचीन पदाचें'' म्हणजे प्रागैतिहासिक वा अनैतिहासिक अव्यक्त स्वरूपाचें चिंतन आहे, त्यांत ''अर्वाचीन पदाचें'' म्हणजे अवतारादिकांचें आख्यान नाहीं. कारण प्रारंभींच भीष्म म्हणतात : ''यानि नामानि गौणानि विख्यातानि महात्मनः। ऋषिभिः परिगीतानि तानि वक्ष्यामि भूतये'' म्हणजे परमात्म्याचीं जीं गौण अर्थात् गुणवाचक नामें तीं सांगतों, (व्यक्तिवाचक नाहीं सांगत) हें विधान योग्यच आहे, पण अपवादानें हि नियमच सिद्ध होतो. कृष्णावतार हा तसा अपवाद आहे. मनुष्य किती हि तत्त्वचिंतक असला तरी तो देही आहे हें विसरतां येत नाहीं आणि ''अव्यक्ता हि गतिर् दुःखं देहवद्भिरवाप्यते'' अव्यक्ताचें आकलन देहधारी माणसाला कठिणच जातें म्हणून तो व्यक्ताचा आश्रय करीत असतो. आणि त्यामुळेंच स्वदेशीय आणि स्वकालीन महापुरुषाचा, परमेश्वरी अवताराचा, प्रभाव कोणी हि टाळूं शकत नाहीं. खरोखर त्यांच्या द्वाराच त्या अव्यक्त महात्म्याचें परमात्म्याचें किंचित् किंचित् भान आणि ज्ञान आम्हांला होत असतें. आणि म्हणून अव्यक्ताच्या चिंतनांत हें व्यक्ताचें नामरूप-गुणशील-कीर्तन येतें. गुरूविषयींची ही कृतज्ञता आहे. मनुष्य कितीहि ज्ञानी झाला तरी तो कृतज्ञता सोडूं शकत नाहीं. ही कृतज्ञता हि मर्यादाशील असावी. कुलस्त्री जशी पतीचें नांव घेत नाहीं आणि घेते तेव्हां तें उखाण्यांत घेतें त्या प्रमाणें शंकराचार्यांसारखे थोर पुरुष आपल्या गुरूचें नांव खुबीनें घेतात ''भज गोविन्दं भज गोविंदम्'' म्हणून. इथें हि सहस्रकार ''दाशार्हः सात्वतां पतिः'' म्हणून तशीच खुबीदार म्हणजे श्लिष्ट कृतज्ञता प्रकट करीत आहे. ''दाशो दानं तं अर्हति इति दाशार्हः परमात्मा'' ''दशार्ह-कुलोद्भवत्वाद् वा दार्शाहः श्रीकृष्णः। अर्थात् दाशार्ह म्हणजे परमात्मा, तसा व्यासमुखानें भीष्म म्हणतात, माझ्या पुरता श्रीकृष्ण दाशार्ह होय. ज्यांना माझा गुरु दशार्हकुलोद्भव श्रीकृष्ण मान्य नसेल त्यांच्यावर तो मी लादत नाहीं, त्यांना तो दानार्ह परमात्माच दाशार्ह होय. भीष्मानें श्रीकृष्णाची अग्रपूजा केली होती, हें स्मरणीय.

## ५१२. सात्वतांपति

यदु हा वंशपुरुष प्रसिद्ध आहे. त्यावरून यादववंश प्रसिद्ध झाला. तसा दशार्ह वा सात्वत् नामक कोणी वंशपुरुष होऊन गेल्याचें आज ज्ञात नाहीं, पण एकेकाळीं तें असलें पाहिजे. वंशांत अनेक महापुरुष होतात. आणि कालांतरानें तो एकच वंश त्यांच्या नांवानें ओळखला जाऊं लागतो. सूर्य मनु इक्ष्वाकु रघु एकाच वंशांतील महापुरुष. त्या प्रत्येकाच्या नांवानें तो वंश वा कुल ओळखलें जातें. तसेंच यदु,

दशार्ह, सात्वत्, वृष्णि इत्यादि वंशपुरुषांवरून वा कुलपुरुषांवरून तो वंश वा वंशांतर्गत तें कुल वा कुलान्तर्गत एखादें उपकुल प्रसिद्ध होतें. चंद्र वंश, यदु कुल, वृष्णि उपकुल असा विवेक लक्षांत घ्यावयाचा. पण हा विवेक सर्वत्र पाळला जात नाहीं आणि ठोबळ मानानें वंशकुलादि पदें निर्विशेष पर्याय म्हणून वापरलीं जातात.

सात्वत् हे सात्वत् वंशीय लोक होत. या लोकांची जी कुलदेवता ती "सात्वतां पतिः" म्हटली गेली. कुलदेवता प्रथम एक अव्यक्त शक्ति असते. कालांतरानें तिला व्यक्ति बनविलें जातें. म्हणजे तिचें जन्म गुण कर्म गाइलें जातें. अशा रीतीनें "अव्यक्तं व्यक्तिमापन्नं मन्यन्ते मां अबुद्धयः। परं भावम् अजानन्तो ममाव्ययमनुत्तमम्" हा जो गीतेनें पारमार्थिक तत्त्व आणि लौकिक व्यवहार यांचा प्रकार वर्णिला आहे तो सर्वत्र म्हणजे सर्व देशांत नि सर्व कालांत सर्व संप्रदायांत निर्माण होतो. तसाच तो सात्वतांत म्हणजे वैष्णवांच्या संप्रदायांत झालेला आहे. या कुलदेवतेचें स्वरूप काय ह्याचा विचार तत्त्वज्ञ भलें करोत, पण उत्सवप्रिय लोक तिला आपल्या आवडी प्रमाणें नाम-रूप-गुण-कर्में चिकटवून तिचा गोंधळ मांडीत आले आहेत. त्यांचें जें तंत्र उभें झालें तें सात्वत तंत्र म्हणून प्रसिद्ध आहे. भारतांत मुख्यतः वैदिकांचा यज्ञ-मार्ग, आणि शाक्त-शैव-वैष्णवादिकांचा तंत्रमार्ग असे दोन संप्रदाय चालत आले आहेत. आजच्या हिंदु धर्मांत दोन्ही संप्रदाय एकवटून मंत्र-तंत्र-युक्त पूजा-विधि होत असतो. मंत्र वैदिक आणि उपचार तांत्रिक होत. मंत्रांनीं आम्नात आणि तंत्रांनीं उपचरित एक परमात्माच आहे. "सात्वतां पतिः" पदानें इथें तो उपचरित परमात्मा, उल्लेखिलेला आहे. सात्वतां पति पदानें मानुषी तनु धारण करणारा सगुण साकार अवतीर्ण परमात्मा समजावयाचा. हा अवतार हि त्या निर्गुणाचा आहे हें विसरावयाचें नाहीं. अवतार शब्दच तें सांगत आहे. मंत्र प्राचीन घेऊन तंत्र अर्वाचीनच नव्हे तर आधुनिक घ्यावयाचें, या योगें परंपरा आणि प्रगति यांचा समन्वय साधून जीवन समुन्नत होईल.

### ५१३. जीव

'जीवो विनयिता साक्षी' हा चरण एक सूत्र आहे. यांत तीन पदें मिळून एक विचार ग्रथित केला आहे. जीवाच्या तीन भूमिका यांत वर्णिल्या आहेत. पहिली भूमिका जड जीवाची. जीवनप्रधान तो जीव. जगणें हाच एकमात्र ज्याचा हेतु आहे, उद्देश आहे तो जीव होय. त्याला अधिक उच्च उद्देश नाहीं, अथवा दिसून येत नाहीं. कृमि कीटकादि जीवांचा जीवनांत कोणता उद्देश दिसून येतो जगण्याव्यतिरिक्त? जीवनाचा विशेष विचार तिथें नाहीं. या जड जीवांत जेव्हां आपलें जीवन सोद्देश आहे, सहेतुक आहे अशी विचार-जागृति होते तेव्हां तो जीव विनयिता बनतो आपल्या जीवनाला तो विशिष्ट दिशेनें नेतो. आपल्या जीवनाला तो विशिष्ट आकार देऊं इच्छितो आणि तदनुसार चेष्टा म्हणजे हालचाल करूं लागतो. हा असा धडपड्या जीव तो विनयिता म्हणावयाचा. नाना वासना आणि नाना संस्कार यांनीं प्रेरित होऊन तो नाना अवस्थांतरें भोगीत असतो. या अभिमानी जीवाच्या विनयिता भूमिकेहून साक्षी ही भूमिका वरची आहे. या भूमिकेवर जीव आपल्या जीवनाच्या वासना, तत्प्रेरित कर्में आणि त्या कर्मांचीं फळें यांचा तटस्थपणें विचार करतो. त्यांच्या प्रवाहांत तो वाहून जात नाहीं, पण तटावर उभा राहून त्या प्रवाहाचीं वळणें वांकणें रंगतरंग पाहत असतो. या तीन भूमिकांना तामस, राजस आणि सात्त्विक म्हणतां येईल. तमांत अप्रवृत्ति, रजांत प्रवृत्ति आणि सत्त्वांत निवृत्ति वरचढ असते. या तीन भूमिकांवरील जीवांनाच आसुर, मानुष आणि दैव संज्ञा आहेत. ज्या अर्थीं एक परमात्म-सत्ताच सर्वत्र नांदते आहे त्याअर्थीं तीच हे तिन्ही भाव आहे असें म्हणावयाचें. म्हणून परमात्म्याला जीव म्हटलें आहे.

## ५१४. विनयिता

शंकराचार्यांनीं विनयिता म्हणजे विनयित्व आणि त्याचा साक्षी तो विनयिता-साक्षी असें सामासिक पद घेतलें आहे. परंतु त्यांतून तर्कसंगत कांहीं अर्थ निघत नाहीं. त्यामुळें परत विनयिता आणि असाक्षी अशीं दोन पदें कल्पिलीं आहेत. परंतु परमात्म्याला असाक्षी म्हणणें हि ओढून ताणून अर्थ करणें होय. जो आत्मभिन्न जग पाहत नाहीं तो परमात्मा हि असाक्षी म्हणावयाचा. हे दोन्ही हि कल्प मला नीट दिसत नाहींत. विनयिता आणि साक्षी अशीं दोन पदें घेणेंच श्रेयस्कर. मागें साक्षी पद येऊन गेलें आहे तेव्हां तें पुन: घेणें योग्य नाहीं अशा विचारानें असाक्षी पद कल्पिलें आहे. पण हा विचार न म्हणतां अविचार म्हणवा लागेल. समानाक्षर पदें सहस्रांत अनेकदां आलीं आहेत. त्यांचा भिन्न अर्थ घेतां येतो. तसा घेतां न आला तरी तें पद ज्या आनुपूर्वींत येतें ती भिन्न असते आणि त्यामुळें त्या पदाला एक वेगळा अर्थ वा वेगळी अर्थच्छटा प्राप्त होते. आणि म्हणून तें पद अनावृत्तच म्हणतां येतें. इथें तर सामासिक विनयिता-साक्षी असें पद घेऊन वा विनयिता व असाक्षी अशीं दोन पदें कल्पून कांहीं सरल अर्थ निष्पन्न होत नाहीं. त्यामुळें आणि जीवो विनयिता साक्षी असा क्रम साभिप्राय आहे असें मागील चिंतनांत सुचविलें आहे व तदनुसार विनयिता व साक्षी अशीं दोन पदें घेणें प्रशस्त होय. सहस्रसंख्यातिक्रम होऊं नये म्हणून दुसरें एखादें नाम कमी करावें लागेल. आणि तसें तें याच श्लोकार्धांत करतां येतें हें पुढें दाखविलें आहे.

विनय् नाम धातूपासून विनयिता हें रूप साधलें आहे. विनयिता विशिष्ट दिशेनें आपलें विनयन करणारा. अथवा विनयिता म्हणजे गुरु ईश्वर, जो आपल्या अधीन जीवा-शिष्यांना सन्मार्गानें परम पदाला पोंचवितो तो.

## ५१४. साक्षी (असाक्षी)

साक्षी हें पद जीवनाचें एक अत्यंत गूढ आणि परम सत्य प्रकाशित करतें. जीवाच्या ठाईं असलेलें जें अन्तरतर तत्त्व त्याचें स्वरूप विशद करणारें हें पद आहे. जीव सतत ''मी हें करतों. मी हें सुख-दु:ख अनुभवतों''. असें म्हणत असतो. परंतु प्रकृतीच्या, परापर प्रकृतीच्या, ह्या भावांहून वेगळा असा एक जो भाव तटस्थपणें या दोहोंचें हि, कर्तृत्वाचें नि भोक्तृत्वाचें अवलोकन करतो तो साक्षी होय. गीता या परात्परभावाचें वर्णन असें करते:

**न कर्तृत्वं न कर्माणि लोकस्य सृजति प्रभु:।**
**न कर्मफलसंयोगं स्वभावस् तु प्रवर्तते।।**
**नादत्ते कस्यचित् पापं न चैव सुकृतं विभु:।**
**अज्ञानेनावृतं ज्ञानं तेन मुह्यन्ति जन्तव:।।**

हा जो केवळ साक्षिभाव तेंच परमात्म्याचें स्वरूप आहे. तें जीवाचें निजधाम आहे. तें त्याचें माहेर आहे. तदितर सारा संसार आहे. संसारांत जीव-वधूला परतंत्र होऊन रहावें लागतें. माहेरीं ती स्वतंत्र असते—स्वच्छंद अनिर्बंध स्वानंद! केवल स्वानन्द उसळत असतो तिथें: ''आनंदाचे डोहीं आनंदतरंग। आनंदचि अंग आनंदासी'' असें केवळ अद्वैत तिथें नांदत असतें.

'जीवो विनयिता साक्षी' म्हणजे जीव, जीवेश्वर आणि मुक्तेश्वर ह्या तीन भूमिका होत. जीव अज्ञानोपाधिक आणि अस्वतंत्र, जीवेश्वर स्वतंत्र पण ज्ञानोपाधिक, मुक्तेश्वर ज्ञानाज्ञानमुक्त केवल निरुपाधिक स्वतंत्र. हाच तो त्या विष्णूचा त्रिविक्रम होय. पुढील पदांत त्याच्या ह्या त्रिविक्रमाचें अमित-विक्रम म्हणून गौरव गाइलें आहे. आणि ह्या त्याच्या मित वा अमित विक्रमाचें तात्पर्य मुकुंद पदानें प्रकट केलें आहे.

परमात्मा हा सदैव स्वदृक् असल्यामुळें तो साक्षी होय. पण त्याच कारणामुळें तो संसाराचा असाक्षी आहे. त्याला संसार ठाऊकच नाहीं. ''तुका म्हणे जें जें बोला। तें तें साजे या विठ्ठला'' म्हणून असाक्षी पदाचा हि आम्ही समादर करतों.

## ५१५. मुकुन्द

### अमितविक्रम मुकुन्द .

'मुकुन्दो ऽ मित-विक्रमः' हा चरण मागील चरणांत मांडलेल्या विचाराचा समारोप करतो. खरोखर परमात्मा, तो मुक्तिदाता मुकुंद, अमित- विक्रम आहे. त्यानें जीव, ईश्वर आणि परमात्मा अशा तीन भूमिका पादाक्रांत केल्या असल्या तरी त्याच्या पराक्रमाला गणति नाहीं. जितक्या म्हणून भूमिका तुम्ही कल्पाल तितक्या सर्व त्यानें पादाक्रांत केलेल्या आहेत. कां कीं सर्व कांहीं चेतनाचें अंकित आहे. एक विश्व, दोन लोकालोक, तीन स्वर्ग मृत्यु पाताल, भूर् भुवर् स्वर्, सप्त लोकः भूर् भुवर् स्वर् महर् जन तप सत्य अथवा चतुर्दश भुवनें: सप्तलोक आणि सप्ततलें (तल अतल वितल सुतल तलातल रसातल पाताल) अशा अनेकानेक लोककल्पना केल्या जातात. त्या सर्वांना एका मोचक चेतनानें पादाक्रांत केलेलें आहे म्हणून तो परमात्मा अमित-विक्रम मुकुंद होय. अमित-विक्रम हें मुकुंदाचें नित्यविशेषण आहे. म्हणजे अमित-विक्रम मुकुंद हें सविशेषण नाम आहे. हीं दोन नामें नाहींत. अमित-विक्रम हें पद पुढें हि एकदां ''प्रद्युम्नो ऽ मितविक्रमः'' श्लोक ६८ असें आलें आहे. तिथें हि तें नित्यविशेषण म्हणून आलें आहे. श्री म्हणजे श्रीमान् हें जसें भगवंताचें नित्य- विशेषण आहे तसें अमितविक्रम हें हि त्याचें नित्य- विशेषण आहे. जेव्हां जेव्हां भगवंताचा उल्लेख होईल तेव्हां तेव्हां तो श्री भगवान् असाच होतो, तसा मुकुंद प्रद्युम्न या भगवदवतारांचा हि उल्लेख अमितविक्रम या विशेषणानें युक्त असाच व्हावा. तसा संकेत दोन्ही ठिकाणीं जोडून आलेल्या अमितविक्रम या पदानें मिळतो. श्री आणि पराक्रम याच दोन भगवद्विभूति म्हणून गीतेंत उल्लेखिल्या आहेत. ''यद् यद् विभूतिमत् सत्वं श्रीमद् ऊर्जितमेव वा'' या वचनांत त्यांचा निर्देश आला आहे. अर्थात् ह्या दोन विभूतींनीं परमात्मा आणि त्याचे अवतार हे सदैव विशिष्ट असतात, डाव्या उजव्या अंगांनीं जसा पुरुष सदैव युक्त असतो त्या प्रमाणें. परमात्म्याचें अतुल सामर्थ्य, त्याचा अमित विक्रम मुकुंद पद व्यक्त करतें. 'मुकुं मुक्तिं ददाति इति मुकुंदः।' प्रत्येक संकटांतून जो सोडवितो तो मुकुंद होय. सर्व संकटांचें गांठोडें म्हणजे संसार. त्यांतूनच तो सोडवितो म्हणून तो मुकुंद म्हणावयाचा. मृत्युसंसारसागरांतून सोडवितो म्हणून तो मुकुंद.

## ५१६. अमित-विक्रम

### मित-विक्रम

अमित-विक्रम हें परमात्म्याचें नित्यविशेषण असतें, त्याच्या अवतारांचें तें विशेषण असलें तरी तें पद कोणीं स्वतंत्र घेतलें म्हणून कुठें बिघडलें? ''सर्वे वेदा यत् पदं आमनन्ति'' सर्व ग्रंथ, सर्व शब्द ज्याचें वर्णन करतात असेंच तें पद आहे. सर्व नामें, सर्व सर्वनामें, सर्व विशेषनामें, सर्व विशेषणें, सर्व क्रियापदें, सर्व अव्ययें त्या एकाचेंच वर्णन करतात. कारण तें एकच पद आहे. कारण तो एकच पदार्थ आहे—ॐकारांत पद आणि पदार्थ एकवटलीं आहेत. ॐ हें पद आहे म्हणजे तें गन्तव्य स्थान आहे, तें पद आहे म्हणजे तद्वाचक नाम आहे. असा पद शब्द श्लिष्ट आहे. वेद-मंत्राच्या आरंभीं ॐकाराचा जो उच्चार केला जातो त्याचें कारण हेंच. त्या ॐकाराचें परोपरीनें केलेलें व्याख्यान म्हणजे वेद होत. तो ॐकार, तो परमात्मा खरोखर अमितविक्रम आहे. त्यामुळें त्याचें किती हि पोवाडे गाइले तरी ते अपुरेच आहेत. '' विष्णोर् नु

वीर्य-महिमां कतमो ऽर्हतीह?' साम्प्रयानें त्या परमात्म्याचे पराक्रम कोण वर्णू शकेल बरें? सहस्र हि सहस्रमुखानें तें नि:शेष गाऊं शकेल असें नाहीं. म्हणूनच म्हटलें आहे भागवतांत:

जो ते अनन्त-गुण अन्तचि ज्यांस नाहीं
मोजूं म्हणे निपट तो नर बालबुद्धि।
कोणी रज:कण कदापि गणेल भूचे
जो सर्वशक्ति भगवान् न कदापि त्याचे।।

परमात्म्याचे पराक्रम अमित आहेत, अगणित आहेत. त्याचीं नाम-रूप-गुण-कर्मे सगळींच अनन्त आहेत, सगळींच अमित आहेत. प्रत्येक स्थळीं आणि प्रत्येक काळीं त्याचें अवतारकार्य चालूच आहे. त्यामुळें त्याचे दहा वा चोवीस अवतार झाले असें गणन होऊं शकत नाहीं. तें मानवी स्मरणशक्तीच्या मर्यादेचें गणन आहे, सर्वतोनन्त परमात्म्याचें वा त्याच्या अमित पराक्रमांचें नव्हे. म्हणून तो परमात्मा अमित-विक्रम होय.

'त्रीणि पदा विचक्रमे त्रेधा निदधे पदम्' असा त्रिविक्रम म्हणून वेदांत आणि दशावतार म्हणून लोकांत आणि विपूर्वक चक्रमे ह्या क्रियापदावरून इथें 'मित-विक्रम' हें पद स्मरलें आहे, असें म्हणतां येईल. म्हणून तो परमात्मा मित-विक्रम होय.

## ५१७. अम्भोनिधि

"अम्भोनिधिर् अनन्तात्मा महोदधिशयोऽन्तक:" या श्लोकार्धांत परमात्म्याचें जगदादिमध्यान्तकृत् रूप वर्णिलें आहे. तो अम्भोनिधि आहे. अम्भोनिधि म्हणजे समुद्र तर तो आहेच. "सरसां अस्मि सागर:" अशी ती भगवद्-विभूतिच वर्णिली आहे. आकाश डोंगर समुद्र नदी सूर्य चंद्र तारे इत्यादि ज्या ठळक गोष्टी आपल्या विशिष्ट महत्तेनें आपलें लक्ष प्रथमदर्शनींच वेधून घेतात त्या भगवद्विभूति नि:संशयच आहेत. अम्भोनिधि समुद्र हि तशीच एक भगवद्विभूति आहे. पण इथें आणखी खोल अर्थ अभिप्रेत आहे. अम्भस् म्हणजे सृष्टीचें मूल अव्यक्त उपादान. शुक्रशोणितापासून म्हणजे रसापासून जीवसृष्टि होतें असें आपण पाहतों. त्याप्रमाणें या सृष्टीचें मूळ द्रव्य हि रसरूप असलें पाहिजे. तो जो रस तेंच अम्भस्. त्याचा परमात्मा हा निधि आहे संग्रह आहे. म्हणून तो अम्भोनिधि म्हणावयाचा. तो परमात्मा अनन्तवीर्यामितविक्रम आहे. त्याचें वीर्य अपरंपार आहे. म्हणूनच तो सृष्ट्युत्पत्तिरूप अमित विक्रम करूं शकला आहे. अव्यक्त बैजिक शक्ति आणि व्यक्त निर्माणक्षमता म्हणजे वीर्य होय. तेंच अम्भस्. त्याचा सागर तो अम्भोनिधि परमात्मा या अनन्तपार सृष्टीचा, या सर्वतोनन्त विश्वाचा जनक आहे. हें अचाट सृष्टिकर्म, हा अमित विक्रम त्याचा आहे. जीव एखादें कांहीं कौतुकास्पद काम करतो तर त्यासाठीं किती कुथतो, परंतु परमात्मा ही सारी सृष्टि कशी लीलेनें निर्माण करता झाला आहे? त्याचा त्याला इतका हि श्रम नाहीं कष्ट नाहीं. यावरून त्याच्या अनन्तवीर्यवत्तेचें अनुमान होतें. असा तो अम्भोनिधि आहे.

## ५१८. अनन्तात्मा

अनन्तात्मा म्हणजे अनन्तरूप. परमात्मा हा देशत: कालत: आणि वस्तुत: अनन्त आहे. देशत: पाहूं गेल्यास दश दिशांत तो अफाट पसरलेला आहे. कुठें हि म्हणून त्याचा अंत गाठतां येत नाहीं. आमचा भूगोल सूर्यमालेंतील एक ग्रह. सूर्यमालेंतील ग्रहांचीं अंतरेंच आम्हांला किती अगडबंब वाटतात? पण ती सूर्यमाला ज्या आकाशगंगेचा एक बिन्दुमात्र होय ती किती विशाल म्हणावी? आणि ती हि ज्या अनन्तपार आकाशाच्या अवकाशांत कणमात्र तरंगत आहे तो देशविस्तार केवढा म्हणून म्हणावा! मानवी बुद्धिशक्ति तिथें कुंठित होते. म्हणून महिम्नकार ठीकच म्हणतो :

वियद्व्यापी तारागणगुणितफेनोद्‌गमरुचिः
प्रवाहो वारां यः पृषतलघुदृष्टः शिरसि ते।
जगद् द्वीपाकारं जलधिवलयं तेन कृतमिति
अनेनैवोन्नेयं धृतमहिम दिव्यं तव वपुः॥

कालतः हि तो परमात्मा किती अफाट आहे? या विश्वाचा आरंभ केव्हां झाला हें कोण सांगूं शकेल? काल हा हि जिथें एक सृष्ट पदार्थच आहे. तिथें सृष्टीचा आरंभ कोण कसा सांगणार? आणि अन्त तरी कसा सांगणार? ज्या परिभाषेनें आणि ज्या परिमाणानें कालगणना करावयाची ती परिभाषा ते परिमाणच जिथें उपलब्ध नाहीं तिथें कालगणना व्हावी कशी? मध्यंतरीं कांहीं कालगणना आम्ही करतों, पण ती किती बिनबुडाची आहे? तिला कांहीं आधार आहे काय? सारांश काळाचाहि आदि मध्य अन्त लागत नाहीं आणि वस्तुतः हि तो परमात्मा अनन्तच आहे. चिद्‌द्रव्याचें मोजमाप घेतांच येत नाहीं. कारण हें द्रव्य निरणु आहे, अनणु आहे. अणूला लांबी रुंदी भार असूं शकतो. पण जिथें असा अणु आणि तद्‌घटित द्रव्यच नाहीं तिथें मान वा इयत्ता संभवत नाहीं आणि म्हणून ती चिद्‌वस्तु अनन्त आहे, सान्त नव्हे. सारांश, ''नान्तं न मध्यं न पुनस् तवादिं पश्यामि विश्वेश्वर विश्वरूप।'' असें म्हणावें लागतें. हा अनन्त-विस्तार त्याचाच आहे.

### ५१९. महोदधिशय

अव्यक्तार्णवांतून हें अनन्तार लोकपद्म उत्पन्न होतें आणि परत त्या अव्यक्तार्णवांत तें लीन होतें. ज्या वेळीं तें लीन होतें तेव्हां तें कुठें जातें? तेव्हां तें अक्षरकंद रूपानें जलाशयाच्या तळीं पहुडलेलें असतें. म्हणून अव्यक्ताक्षररूप, त्या जगाच्या अक्षय कंदाला, परमात्म्याला, महोदधिशय म्हटलें आहे. अव्यक्त हें अनन्तपार आहे आणि सर्व व्यक्त-सृष्टीचें मातृस्थान आहे म्हणून त्याला महोदधि म्हटलें आहे. पल्वलादि क्षुद्र जलाशय सुकूं शकतात. पण महोदधि कधींच सुकत नाहीं. इतर सर्व जगत्कारणें क्षीण होतील, लीन होतील, पण अव्यक्तच क्षीण वा लीन कसें होणार? म्हणूनच

**''अव्यक्तादीनि भूतानि व्यक्तमध्यानि भारत
अव्यक्तनिधनान्येव''**

म्हटलें आहे. खरोखर हें व्यक्त हि अव्यक्तमयच आहे. तरंग उठण्यापूर्वीं तो जलरूप असतो, तो निमाल्यावरहि जलरूपच होतो आणि तरंगाकार काय जलावेगळा असतो? नाहीं, तो हि जलमयच असतो. तसें हें विश्व हा व्यक्ताकार हि, अव्यक्तमयच आहे. आम्हांला तें दिसत नाहीं, कळत नाहीं. म्हणून हि म्हणावयाचें कीं तो अव्यक्त परमात्मा महोदधिशय आहे, अव्यक्ताच्या खोलच खोल अथांग गहनतेंत गंभीरतेंत दडलेला आहे, लपलेला आहे. अव्यक्तांत तर तो उघडच लपलेला आहे, पण व्यक्तांत तो त्याहूनहि अधिक अगम्य होऊन बसलेला आहे. एखादा बिलंदर चोर जसा साव म्हणून समाजांत वावरत राहून संदेहास्पदतेपासून मुक्त रहावा, त्याप्रमाणें दिसायला व्यक्त पण वस्तुतः अव्यक्त असा हा परमात्मा या विश्वाकारांत लपलेला आहे. म्हणून तो उदधिशय न म्हणतां महोदधिशय म्हटला आहे. व्यक्त गिळून अव्यक्तांत निश्चेष्ट पहुडलेला अकृत्यशेष अर्थात् कृतकृत्य परमात्मा हा महोदधिशय म्हटला आहे. कर्तव्य संपल्यावर माणूस आराम करतो, पहुडतो. त्या प्रमाणें उत्पत्ति- स्थिति-लयकार्यांतील शेवटचें लयकार्य हि करून झालें आणि म्हणून जो झोपला आहे तो महोदधिशय म्हणावयाचा. अशा प्रकारें उदधि महा आणि शय हीं पदांगें साभिप्राय आहेत. खरोखर पद-पदांगांचा अर्थ-गौरव महोधिगंभीर आहे.

### ५२०. अन्तक

अन्त म्हणजे काय? नाश विनाश कीं क्षय अपक्षय? अन्त म्हणजे नाश नव्हे वा अपक्षय हि नव्हे, तर अन्त म्हणजे स्वाभाविक परिणति. 'फलपाकान्ता

ओषधय:' फळें म्हणजे धान्यें परिपाकास आलीं असतां जीं संपतात सुकतात तीं तृणें म्हणजे ओषधि होत. अर्थात् फलपाक.हा त्यांचा अंत होय. इथें अन्त म्हणजे विनाश वा अपक्षय म्हणतां येणार नाहीं. हा अंत म्हणजे स्वाभाविक परिणति होय. शालि-गोधूमादिकांची स्वाभाविक परिणति जशी त्या त्या धान्यांत होते तशी ह्या विश्वाची, ह्या समस्त सृष्टिप्रपंचाची परिणति ब्रह्म होय. आणि म्हणून परमात्मा हा अन्तक म्हणजे परिपाककृत् म्हणावयाचा. तो स्वत:च परिपाकरूप आहे आणि तो परिपाक घडवून आणणारा हि तोच आहे. बीजच स्वत: फल आहे आणि फल-क्षम हि तेंच आहे, फळेपर्यंत वाढणारें हि तेंच आहे, तद्वत्. ''तुका म्हणे बीजें बीज दाखविलें। पत्र पुष्प आलें गेलें वाया।।''. प्रत्येक वस्तूची स्वाभाविक परिणति जें आत्मदर्शन तें होई पर्यंत त्या वस्तूची जीवनप्रवृत्ति होत असते. गंगा सागराला मिळेपर्यंत वाहतच राहणार. सूर्याला मिळेपर्यंत अग्निज्वाला धडपडत राहणार. प्रत्येकाला अन्तरूप हें आत्मदर्शन करवून देणारा जो सर्वान्तर्यामी परमात्मा तोच अन्तक म्हणजे अन्तकृत् होय. सर्व कर्मांचा, सर्व प्रवृत्तींचा, सर्व खटपटींचा सर्व धडपडींचा अंत करतो तो अंतकृत् होय. जों पर्यंत हें साफल्य लाभत नाहीं तों पर्यंत या विश्वांतील प्रवृत्ति खळणार नाहीं. लहान मोठीं सर्व साफल्यें त्या त्या प्रवृत्तींचा अन्त होत आणि आत्मदर्शन हें त्या सर्व साफल्यांचें साफल्य होय. परमात्मा हा साफल्यापासून साफल्यास पोंचविणारा म्हणून अंतक आहे. हें विश्व ब्रह्ममय असल्यामुळें वस्तुत: त्याचा नाश वा क्षय होऊंच शकत नाहीं. होतो तो केवळ साफल्यरूप अन्त. सर्व मार्ग ज्या गन्तव्याला पोंचून कुंठित होतात तें परम पद परमात्मा असल्यामुळें तो परमात्मा अंतकृत् अन्तक म्हणावयाचा. सर्वहर मृत्यु हा कांहीं अंतक म्हणतां येत नाहीं. कारण त्यानंतर हि वासना शिल्लकच राहतात. पण आत्मदर्शनानंतर त्या वासनाहि शिल्लक राहत नाहींत. म्हणून तेंच खरोखर अंतक होय. परिसमापन होय.

### ५२१. अज

हें पद यापूर्वीं दोनदां येऊन गेलें आहे. (पहा श्लोक ११, २२) याची व्युत्पत्ति (१) अजते कूर्दन् गच्छति इति अज:। (२) जायते इति ज:, न ज: अज:। आणि (३) अ: विष्णु: तस्मात् जात: अज:। अशी बहुधा लावतां येते. पैकीं तिसरी व्युत्पत्ति कृत्रिम आहे तथापि ती हि चिन्त्य आहे.

जीव स्वच्छंद जगत नाहीं. त्याला आपल्या वासनांना वश होऊन जगावें लागतें. वासनानुकूल त्याची बुद्धि निर्णय करते, मन संकल्प करतें, वाणी बोलते आणि कर्मेन्द्रियें कर्म करतात. त्यांत स्वच्छंदता वा स्वातन्त्र्य नाहीं. परमात्मा हा असा अवश नाहीं, तो वशी आहे. तो देहेन्द्रियप्राणमनोबुद्धींचा किंकर नाहीं, तर त्यांचा स्वामी आहे, आणि म्हणून तो 'अजते स्वच्छंदं विहरति इति अज:' म्हणावयाचा.

बोकड हा प्राणी हि स्वच्छंद नाचत बागडत असतो म्हणून त्याला हि अज म्हटलें जातें आणि तो ''अति मात्रं जायते'' म्हणून हि अज म्हणावयाचा. एका वेळीं अनेक पिलें आणि वर्षांतून अनेक वेतें तो देतो म्हणून हि तो अज म्हणावयाचा. परमात्म्याच्या ठाईं बोकडाचें हे दोन्ही गुण दिसून येतात. म्हणून त्याला अज म्हटलें आहे आणि वारंवार म्हटलें आहे. अजपाल आर्यांना त्या अजपालनापासून यज्ञासाठीं आज्य आणि आज्याहुति देऊन यज्ञ करतां करतां हें अजनामरूप तत्त्वज्ञानाज्य हि लाभलें आहे. आर्य आरंभीं अजपालन आणि मागाहून गोपालन करूं लागले. त्यामुळें त्यांनीं परमात्म्याला व आपल्यांतील थोरांना मोठ्या प्रेमानें अज म्हणजे बोकड हें नांव दिलें आहे. रघुपुत्र अज प्रसिद्धच आहे. गोपालन सुरूं झालें तसें ऋषभ, गोतम, इत्यादि नामांना महत्त्व आलें आणि अजनाम मागें पडलें. इति ऐतिह्य. तथापि पुढील उपनिषद्वचनांत

अज अजा हीं नामें अमर होऊन बसलीं आहेत : अजां एकां लोहित-शुक्ल-कृष्णां, बह्वी: प्रजा: सृजमानां सरूपा:। अजो ह्येको जुषमाणो ऽनुशेते, जहात्येनां भुक्तभोगां अजो ऽन्य:।। ह्या वचनांत अज पद जीव आणि शिव या दोहोंसाठीं हि आलेलें आहे.

'अज: सर्वेश्वर: सिद्ध:' या वचनांत अजपद परमात्मवाचक, अजो दुर्मर्षण: शास्ता या वचनांत ईश्वर-वाचक आणि प्रस्तुत ''अजो महार्ह: स्वाभाव्य:'' या वचनांत तें जीव-वाचक आलें आहे असें म्हणतां येईल. सर्व प्रतिबिंबें बिंबापासूनच उत्पन्न होतात म्हणून बिंबस्थानीय परमात्म्यापासून सर्व प्रतिबिंब-स्थानीय जीव निर्माण झाले आहेत, असें म्हणतां येतें. म्हणून तिसरी व्युत्पत्ति 'आत् विष्णो: जायते इति अज:' हि इथें उपपन्न होते.

## ५२२. महार्ह

महं पूजां अर्हते इति महार्ह:। मह म्हणजे पूजा, तिला अर्ह म्हणजे पात्र तो महार्ह म्हणावयाचा; अथवा ''महान् अर्ह: अर्घ: यस्य स: महार्ह:'' ज्याचें अर्ह म्हणजे मोल मोठें तो महार्ह म्हणावयाचा; अथवा महद्भिरपि अर्ह्य: इति महार्ह:'' मोठमोठ्यांनी हि जो अर्हित होतो पूजित होतो तो महार्ह म्हणावयाचा.

महार्ह हा शब्द दशार्ह सारखाच आहे. हा समास तत्पुरुष कीं बहुव्रीहि? महं अर्हते इति महार्ह: हा, उपपद तत्पुरुष झाला. महान् अर्ह: यस्य स: महार्ह: हा बहुव्रीहि झाला. दोहोंचें तात्पर्य एकच आहे. जो बहुमूल्य असतो त्याचीच पूजा केली जाते, तुच्छाची नव्हे. परमात्मा परम मूल्य आहे म्हणून तो परम पूज्य.

परमात्म्याचें मोल दशार्ह शतार्ह पदानें प्रकट होऊं शकत नाहीं. त्याचा अर्ह म्हणजे मोल अगणित आहे. म्हणून तो महार्ह म्हणावयाचा. स्वात्म्याहून अधिक मोलाची वस्तु या जगांत दुसरी नाहीं. म्हणून तो सर्व भूतात्मभूतात्मा परमात्मा महार्ह होय.

परमात्म्याचा उत्कर्ष सर्वातिशायी असल्यामुळें तो उघडच महार्ह म्हणजे पूजार्ह होय. ज्याचा उत्कर्ष आपल्याहून अधिक त्याला आपण मान देतो. ज्याचा उत्कर्ष लोकोत्तर त्याची आपण पूजा करतों. ज्या परमात्म्याच्या अचिन्त्य वैभवाची बरोबरी हि कोणी करूं शकत नाहीं त्याचा उत्कर्ष किती म्हणावा? असा परमात्म्याचा महिमा असल्यामुळें सहजच तो पूजार्ह महार्ह होय.

तो परमात्माच एक स्तवार्ह आहे, पूजार्ह आहे, नमस्कारार्ह आहे. म्हणून म्हटलें आहे ''भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु.''

## ५२३. स्वाभाव्य

स्वाभाव्य म्हणजे स्वाभाविक, जें कृत्रिम नव्हे तें. परमात्मतत्त्व हें सहज आहे. तें करावें मिळवावेसें नाहीं. शरीर जन्मतें मरतें, तें घटित होतें. विघटित होतें तें मिळवावें लागतें सोडावें लागतें. सर्व व्यक्तींचें हेंच भवितव्य आहे. सर्व पदार्थांची हीच गति आहे. या अवगतींतून मुक्त जर कांहीं असेल तर तें आत्मतत्त्व होय. तें एखाद्या बाह्य पदार्थाप्रमाणें सोन्याप्रमाणें मिळवावें लागत नाहीं. तें आप्य नाहीं, संस्कार्य नाहीं किंवा कार्य नाहीं. तें आपलें आहे म्हणून तें स्वाभाव्य म्हणावयाचें. इतर सारें अस्वाभाविक कृत्रिम. आणि जे जें कृत्रिम तें तें सारें नश्वर आणि दुखद होय. म्हणून स्वाभाव्य भगवान् म्हणतात–''अनित्यं असुखं लोकं इमं प्राप्य भजस्व माम्'' बाबा रे, हें सारें जग अनित्य आहे, असुख आहे. त्याच्या नादीं लागूं नको. मी जो नित्य आणि सुखरूप त्या मला भज. परंतु सम्यग् दृष्टीच्या अभावीं लोक आडवाटेस लागतात आणि नाना यज्ञ तपें दानें करतात, शास्त्रें घोकतात. आणि त्यांच्या योगें कुठलें तरी कृत्रिम फळ घेऊन बसतात. सम्यग् दर्शनानें जें लाभतें तें नाना भ्रान्त उद्योगांनीं कसें लाभणार? म्हणून भगवान् म्हणतात :

नाहं वेदैर् न तपसा न दानेन न चेज्यया।
शक्य एवंविधो द्रष्टुं दृष्टवान् असि मां यथा।।
भक्त्या त्वनन्यया शक्य अहं एवंविधोऽर्जुन।
ज्ञातुं द्रष्टुं च तत्त्वेन प्रवेष्टुं च परंतप।।

आणि ही अनन्य भक्ति म्हणजे सम्यग्दर्शनच होय. शंकराचार्यांनीं याच अभिप्रायानें म्हटलें आहे :

स्व-स्वरूपानुसंधानं भक्तिरित्यभिधीयते।

आत्मतत्त्व हें असें अकृत्रिम आहे. स्वाभाविक आहे. म्हणूनच तें महार्ह म्हटलें आहे. अज म्हटलें आहे. आत्मतत्त्व हिऱ्याप्रमाणें स्वाभाविक आहे, महार्ह आहे, अज आहे. ''हिरा ठेवितां ऐरणीं, वांचे मारितां जो घणीं। तो तोचि मोल पावे खरा, करणीचा होय चुरा।।''

## ५२४. जितामित्र

जितानि अमित्राणि रिपवः येन सः जितामित्रः। ज्यानें शत्रूंना जिंकून घेतलें आहे तो जितामित्र म्हणावयाचा. परमात्मा हा सदैव जेता आहे, विजयी आहे. कारण तो सदैव जितात्मा आहे, वशी आहे. ज्यानें आपल्या मनाला इंद्रियांना जिंकून घेतलें आहे तो विधेयात्माच अजेय राहून इतरांवर. मात करूं शकतो. म्हणूनच नीतिकार चाणक्यानें म्हटलें आहे ''श्रियो मूलं इन्द्रियजयः''. जो आपल्या इंद्रियांवर ताबा मिळवतो तो श्रीचें नि विजयश्रीचें भाजन बनतो. म्हणजे अध्यात्मविद्या ही केवळ आध्यात्मिक अनाधिभौतिक क्षेत्रापुरती उपयोगी आहे असें नव्हे, तर ती संपूर्ण जीवनाचेंच शास्त्र आहे असें तो सुचवीत आहे. महात्मा गांधींनीं आपल्या जीवनानें हें पुनः सिद्ध केलें आहे. अर्थात् शत्रु हे मूलतः आध्यात्मिकच आहेत. त्यांचा ज्यानें पराजय केला तो सर्वत्र विजयीच आहे. म्हणून गीतेंत म्हटलें आहे, ''इन्द्रियस्येन्द्रियस्यार्थे रागद्वेषौ व्यवस्थितौ। तयोर् न वशमागच्छेत् तौ ह्यस्य परिपन्थिनौ।'' शब्द स्पर्श रूप रस गन्ध हे जे पंचेन्द्रियांचे पंच विषय त्यांच्या ठाईं इंद्रियांची जी आवड-नावड, जो राग-द्वेष तेच ह्या जीवाचे खरे शत्रु होत. आत्मधन घेऊन निजधामास चाललेल्या मोक्षमार्गस्थाचे ते वाटमारे होत. त्या परिपन्थी राग-द्वेषांना जो दाद देत नाहीं, त्यांच्यावर जो मात करतो, तो जितामित्र होय. तो राज्यश्री मिळवितो. तो खरा राजमान्य राजश्री. या जितामित्र राजश्रीचें चरित्र म्हणजे अध्यात्मरामायण शंकराचार्य पुढील प्रमाणें वर्णितात:

तीर्त्वा मोहार्णवं, हत्वा रागद्वेषादि-राक्षसान्।
योगी शान्ति-समायुक्त आत्मारामो विराजते।।

खरोखर हें रामायण म्हणजे दैवी मानवाचा सनातन इतिहासच होय. आधिभौतिक तो इतिहास, आधिदैविक तें पुराण, आध्यात्मिक तो वेद वा वेदान्त होय. आणि मानव जीवनांत हीं तिन्ही एकवटलीं आहेत. परमात्मा तिन्ही क्षेत्रांत जितामित्र आहे.

## ५२५. प्रमोदन

परमात्मा हा सर्वान्तर्यामी सच्चिदानंदस्वरूप असल्यामुळें तो प्रमोदन म्हणजे प्रकृष्ट मोद देणारा म्हटला आहे. जो मोद क्षणिक आहे, अथवा जो दुःख-शोकाभिभूत होतो तो प्रमोदपदवीस पात्र नाहीं. खरें म्हणजे त्याला मोद हि म्हणणें गैरच. जीवाला विषयेन्द्रियसंनिकर्षानें लाभणारा जो मोद तो सदैव पराधीन असतो. इन्द्रियें आणि विषय दोन्हींवर जीवाची सत्ता चालत नाहीं. इन्द्रियें भुकेलीं असतात तेव्हां विषय मिळत नाहींत, विषय मिळाले असतां इंद्रियें भुकेलीं असत नाहींत असेंच पुष्कळदां घडतें. जेव्हां इन्द्रियें भुकेलीं असतात आणि त्यांना त्यांचे विषय मिळतात तेव्हां कांहीं आस्वाद मिळतो खरा पण तो किती क्षणिक? तो तृप्तिप्रद न होतां तृष्णाग्नि पेटविणाराच होतो. आणि लब्धप्रणाशाचा शोक व अलब्धाची तृष्णा यांच्या कचाट्यांत सांपडून जीवाचे

हाल हाल होत असतात. पण असे हाल चालले असतांनाच जीव अबुध्या वा बुध्या जेव्हां केव्हां स्वस्थ होतो तेव्हां त्याला अतीन्द्रिय आणि निर्विषय असें आत्मसुख मिळत असतें. आणि त्यामुळेंच खरोखर तो जगत असतो. पण हें त्याला कळत नाहीं. जें वैषयिक सुख त्याला मिळत असतें वास्तविक त्याचा हि आधार हें निर्विषय सुख म्हणजे स्वानुभूतिच असते हें त्याच्या लक्षांत येत नाहीं. आणि म्हणून तो वैषयिक सुखालाच सुख मानून त्यासाठीं धडपडत असतो. पण ही त्याची धडपड फुकट असते. कारण इंद्रिय वा विषय दोहोंपैकीं एकावर हि त्याची सत्ता असत नाहीं. आणि समुद्रांतील जहाजावरील पक्षी कोणत्या हि दिशेला उडाला आणि किती हि त्यानें भराऱ्या मारल्या तरी अखेर कुठें आधार न मिळून जसें त्याला परत जहाजावरच यावें लागतें आणि विश्रमावें लागतें त्याप्रमाणें सर्व जीवांना विषयेन्द्रियजनित सुखाच्या शोधांत हताश होऊन परतावें लागतें आणि स्वस्थ व्हावें लागतें. ही स्वस्थताच प्रमोद आहे. ती जो देतो तो प्रमोदन म्हणावयाचा.

## ५२६. आनन्द

'आनन्दो नन्दनो नन्द:' हा नन्दचा पाढा आहे. परमात्मा हा आदि-मध्य-अंतीं सर्वत्र नन्दस्वरूप आहे, असा त्याचा आशय. एक द्वि त्रि केंल्याशिवाय आपलें कोणतें हि काम पूर्ण होत नाहीं. पूर्णता आदि मध्य आणि अन्त मिळूनच व्हायची. म्हणून आपल्या धर्मांत संस्कृतींत व्यवहारांत, तीनचें मोठें महत्त्व आहे. तीन पुरुष, तीन लिंगे, तीन वचनें, तीन काळ, तीन लोक, तीन गुण, तीन देव इत्यादि त्रैत सर्वत्र दिसून येतें. या सगळ्याचें कारण हेंच कीं प्रत्येक वस्तु त्रिधा विभक्त होते. तिला आदि असतो, अन्त असतो आणि दोन्ही टोकांच्या दरम्यान मध्य असतो. त्यामुळें ती त्रिरूप म्हटली जाते. तिन्ही अंगें मिळून तिची पूर्णता आकळली जाते. प्रत्येक वस्तूची ही तीन पदें लक्षूनच आमचा परम मन्त्र जो गायत्री त्याचा छन्द हि त्रिपाद झाला आहे. जगांत समपाद प्राणी आढळतात. द्विपाद चतुष्पाद षट्पाद अष्टपाद इत्यादि परंतु विषमपाद प्राय: आढळणार नाहींत. पण वेद गायत्री मंत्रांत तीन पायांनीं चालतो आहे. सृष्टीची अलौकिकता प्रकट करण्यासाठीं, सर्वत्र भरलेलें त्रैत प्रकट करण्यासाठीं जणूं गायत्री सर्वत्र त्रिपदा झाली आहे. लौकिक छंद द्विपाद चतुष्पाद प्राण्याच्या अनुकरणानें द्विपद चतुष्पद झाले आहेत, पण गायत्री मंत्र लौकिक नाहीं त्याची दृष्टि दिव्य आहे. गायत्री मंत्र म्हणून सर्वत्र अव्यक्त रूपानें वसलेलें त्रैत पाहणारा तो त्रिपाद झाला आहे. व्यक्तमात्र त्रिपाद आहे. आदिमध्यान्त- मय आहे, त्रिगुणात्मक आहे, असें जणूं तो सांगतो आहे. सृष्टि अशी त्रिरूप दिसली तरी तत्त्वत: ती एकरूप आहे. आनन्दरूपच आहे असें 'आनन्दो नन्दनो नन्द:' हा चरण सांगत आहे. जें आदौ जें अन्तीं असतें तेंच त्याच्या मध्ये हि असतें. सृष्टीचा आदि सच्चिदानंद परमात्मा आहे त्याचा अन्त हि तोच आहे हें जर खरें तर त्याचा मध्य हि तोच म्हटला पाहिजे. घटाचा आदि मृत्तिका अन्त हि मृत्तिका आहे तर मध्यरूप जो घट तो हि मृण्मयच आहे किंबहुना मृत्तिकाच आहे. तद्वत् हें विश्व आदौ मध्ये अन्तीं आनन्दरूप आहे, सच्चिदानन्द परमात्म-स्वरूप आहे. ''आनन्दो नन्दनो नन्द:'' ही त्रिपदा गायत्री हेंच गात आहे.

## ५२७. नन्दन (अनन्दन)

परमात्मा आनन्दस्वरूप आहे, आनन्दबीजरूप आहे. आणि जियें बैजिक शक्ति असते तियें स्वजाति-निर्माण क्षमता, स्वसंतति-निर्माणक्षमता हि असते. ''एको ऽहं बहु: स्यां प्रजायेय'' अशी प्रेरणा असते. ही प्रेरणा म्हणजे आत्म-दर्शनाची इच्छाच होय. ही इच्छा हा बीजाचा, जीवाचा स्वभावच असतो. जियें अशी प्रेरणा नाहीं, क्षमता नाहीं तें मुळीं बीजच नव्हे.

परमात्मा ज्या अर्थी ह्या सर्व विश्वाचें बीज आहे त्या अर्थी त्याच्या ठाईं ही आत्मदर्शनाची अनिवार प्रेरणा आणि अक्षय क्षमता आहे हें उघडच आहे. अर्थात् तो आनंद करणारा, स्वानंदविहार करणारा आहे. म्हणून तो नन्दन म्हटला आहे. हें विश्व सारखें वाढतें आहे आणि त्याच्या ह्या वाढीमुळें च वर्तमान भूत आणि भविष्य हा काल-विभाग होत आहे असें महान् वैज्ञानिक जयंत नारळीकर प्रतिपादन करत आहेत. तें कसें हि असो. विश्व हें नित्य विकासशील आहे. तें प्रस्तरीभूत चयापचय-रहित जड नाहीं, हें खास. तें जीवनस्वरूप आहे. ती एक जिवंत प्रक्रिया आहे. त्याचा अणुरेणु आनन्दबीज आहे आणि तो स्वभावत:च सतत रुजत अंकुरत फुलत आणि फळत चालला आहे. ही सगळी आनंदाचीच प्रक्रिया आहे, हिला अन्त नाहीं, कारण हा स्वभाव आहे. स्वभावाचा अन्त म्हणजे आत्महत्या. आणि असें सामर्थ्य कोणांतच नाहीं. कारण तें स्वभावाच्या विरुद्ध आहे. पाणी पाण्याला बुडवूं शकत नाहीं, अग्नीनें अग्नीला जाळायला भडकणें म्हणजे शतगुणित होणें होय. तसें आनंदानें आनंदाला लोपवणें म्हणजे महानन्द होणें होय. तोच नन्दन. ''पुत्राद् इच्छेत् पराजयम्'' असें आपण म्हणतों. कारण पुत्र हें आमचें उत्तर रूप आहे. तें आम्हांला नन्दन म्हणजे आनंदविणारें आहे. परमात्मा तसा या विश्वाचें उत्तरोत्तर रूप आहे. म्हणून तो नन्दन होय. विश्वनन्दन होय.

## ५२८. नंद (अनन्द)

परमात्मा आनन्दाचें बीज आहे, आनन्दाचा वृक्ष आहे, आनन्दाचें फळ आहे. आणि सर्व मिळून तो आनन्द आहे. ''आनन्दो नन्दनो नन्दः'' या त्रिपदीचा हा आशय आहे. अर्थात् नन्द या पदानें इथें फलरूपता वर्णिली आहे. आनन्दाच्या वृक्षाचें फळ आनन्दाशिवाय दुसरें काय असणार? म्हणून उपनिषद् म्हणतें ''आनन्दाद् ह्येव खलु इमानि भूतानि जायन्ते, आनन्देन जातानि जीवन्ति, आनन्दं प्रयन्ति अभिसंविशन्ति इति'' बीज शक्ति कीलक तिन्ही आनन्दच आहे. जीवाच्या ठाईं कांहीं स्वाभाविक प्रेरणा असतात. त्या प्रेरणांना अनुसरून त्याची बुद्धि निश्चय करते, मन संकल्पविकल्प करतें कर्मेंद्रियें कर्म करतात. आणि ह्या सर्व उद्योगांचें अभीष्ट जीव मिळवीत असतो. ह्या मूल प्रेरणांचें तदुत्थ प्रवृत्तींचें, आणि तज्जनित फळाचें विश्लेषण केल्यास तीं तिन्ही आनन्दात्मकच आहेत असें दिसून येतें. कर्मजनित वा श्रुतज्ञानजनित ज्या गति जीवाला लाभतात त्यांचे तीन प्रकार होतात: (१) अनिष्ट (२) इष्टानिष्ट आणि (३) इष्ट. अनिष्ट गतीला नरक, इष्टानिष्ट गतीला स्वर्ग आणि केवळ इष्ट गतीला मोक्ष म्हणतात. परंतु ह्या तिन्ही गतींचें स्वरूप वस्तुतः आनंद-प्रेरितच नाहीं काय? आणि जें आनंदजनित आहे तें आनंदात्मक नव्हे काय? ''जें कार्य तें धरिल कीं गुण कारणाचें।'' कार्यकारणांचा अभेदच म्हटला आहे. पापी म्हटलेला पाप करतो तें आनंदासाठींच करतो. पुण्यशील म्हटलेला पुण्याचरण करतो तें हि आनंदासाठींच करतो. आणि पाप पुण्य-विनिर्मुक्त ज्ञानी जें करतो वा करीत नाहीं तें सारें तो निरतिशय आनंद मिळावा म्हणूनच होय. सारांश, जीवमात्राचें अभीष्ट आनंदच आहे. त्याच्या जीवनांत तुम्हांला भलें भेद दिसो, पण त्या सर्वांची प्रेरणा आणि फलित आनंदच आहे ह्यांत शंका नाहीं म्हणून परमात्मा हा नन्द म्हटला आहे. आनन्द हें बीज, नन्दन ही शक्ति आणि नन्द हें कीलक म्हणावयाचें.

## ५२९. सत्यधर्मा

सत्यधर्मा हा एक वैदिक शब्द आहे. तो सत्य-धर्मन् या दोन शब्दांचा समास असून हा समास बहुव्रीहि आहे. सत्यं धर्म यस्य सः सत्यधर्मा. सत्यच ज्याचा धर्म आहे तो सत्यधर्मा होय. परमात्मा हा उघडच

सत्यधर्मा आहे. धर्म म्हणजे वस्तूचा धारक गुण. उदाहरणार्थ उष्णता हा अग्नीचा धारक गुण आहे. त्या शिवाय तो असूंच शकत नाहीं. या धर्माला अनुसरून जें जीवन जें कर्म त्यांना हि धर्म म्हटलें जातें. वैदिक धर्म म्हणजे यज्ञ-याग प्रवृत्ति; उपनिषद्-धर्म म्हणजे विचार, निवृत्ति; बौद्ध धर्म म्हणजे सम्यगाचार; ख्रिस्ती धर्म म्हणजे प्रेम; महंमदी धर्म म्हणजे इस्लाम वा ईश्वरशरणता. हे सगळे धर्म जीवनरूप आहेत. त्या धर्मजीवनांचें जें फलित त्याला हि धर्म म्हटलें जातें. 'न हि सत्यात् परो धर्म:' 'अहिंसा परमो धर्म:' इत्यादि वचनांत हा निष्ठारूप वा फलरूप धर्मच अभिप्रेत आहे. सारांश, धर्म पदानें मूल धारक नि प्रेरक तत्त्व, तदनुसार जीवन-प्रणाली आणि तद्द्वारा प्राप्त परम पद या तिहींचा हि बोध होतो. सत्यधर्मा पदानें मुख्यत: निष्ठारूपतेचा बोध होतो. परमात्मा हा सदैव स्वरूपावस्थित असतो. तो केव्हां हि स्वरूप-च्युत होत नाहीं. म्हणून तो सत्यधर्मा होय. पण हा गुण तर प्रत्येकाच्याच ठाईं आहे. अग्नि आपलें उष्णत्व, जल आपलें रसत्व कुठें सोडतात? पण ह्या सर्वांचें जें स्वरूपनिष्ठत्व तेंच सत्य होय आणि तें सत्य हि ज्या सर्वाधार सत्तेंत प्रतिष्ठित आहे ती सर्वसामान्य सत्ता हाच ज्याचा धर्म होय तो परमात्मा सत्यधर्मा होय. त्याच्या सत्तेवांचून कांहीं एक असूं शकत नाहीं. हेंच ईशन होय. एरव्हीं ईश्वर कांहीं एखाद्या दंडधर राजाप्रमाणें शासन करीत नाहीं. परमात्म्याची ही जी सत्ता तीच एक सत्य आहे आणि बाकी सारें लटकें आहे. 'ब्रह्म सत्यं जगत् मिथ्या' हा वेदान्त डिण्डिम हेंच गर्जून सांगत आहे. मिथ्या वा लटकें म्हणजे काय? जें आपल्या बळावर उभें नाहीं त्याला लटकें म्हणावयाचें. जग हें लटकें वा मिथ्या आहे याचा अर्थ तें स्वाधार नाहीं, पराधार आहे इतकेंच. तें निराधार आहे असा अर्थ नव्हे. तो जो पर आधार तोच सत्य- धर्मा परमात्मा होय. तोच एक स्वाधार आहे. म्हणून तोच एक सत्य आहे म्हणावयाचें. इतर सारें मिथ्या वा लटकें.

### ५३०. त्रिविक्रम

परमात्मा हा अमित-विक्रम असून तो त्रिविक्रम हि म्हटला आहे. त्रि हें पद संख्यावाचक तसें साम्रग्य-वाचक हि म्हणतां येईल. समग्रता आदि मध्य आणि अन्त मिळून होते. आमचें जीवन कायिक वाचिक मानसिक या तीन कर्मपथांनीं संपूर्ण होतें. म्हणून त्रिशुद्धि म्हणजे संपूर्ण शुद्धि म्हणावयाची. तसें हें विश्व त्रिलोकात्मक आहे. तिन्ही लोकांना ज्यानें विक्रान्त केलें, पादाक्रान्त केलें तो त्रिविक्रम म्हणावयाचा. हे तीन लोक अधोमध्योर्ध्व लोक म्हणा वा भूत भव्य भवत् भुवनें म्हणा. अथवा देशकालवस्तुरूप त्रि परिमाणें हेंच त्रिपदानें अभिप्रेत आहे असें म्हणा. अथवा जागृति स्वप्न सुषुप्ति या तीन दशाच त्रि होत. त्यांना तो परमात्मा उल्लंघून तुरीय म्हणून विक्रान्त असल्यामुळें तो त्रिविक्रम म्हणावयाचा. पूर्व क्षितिज-गत उदीयमान सूर्य हा वामन होय. भुईसपाट असल्यामुळें ठेंगणा होय. पण तोच जेव्हां क्षितिजावर चढून आणि अशा प्रकारें भूलोक पादाक्रांत करून अन्तरिक्ष उल्लंघितो तेव्हां तो भुवर्लोक पादाक्रान्त करून आकाशाच्या माथ्यावर चढतो, स्वर्लोक पादाक्रांत करतो. आणि अशा प्रकारें तो वामनच त्रिविक्रम म्हटला जातो. तो जेव्हां ख-स्वस्तिकीं आरूढ होतो, पूर्ण तेजानें तळपत असतो, तेव्हां अंधकाररूप असुरराज बळि ज्यानें तिन्ही भुवनें व्यापून टाकलीं होतीं तो पाताळांत, भूगोलाच्या तळाला, दडपला जातो. तथापि सूर्य हा नेहमीं सूर्यास्तसमयीं तमोद्वाराशीं उभा असल्यामुळें तो बळीचा द्वारपाळ म्हटला जातो. हा जो तम:प्रकाशाचा संग्राम आहे तोच अधिभौतिक आधिदैविक आणि आध्यात्मिक क्षेत्रांत, इतिहासांत पुराणांत आणि वेदवेदान्त शास्त्रांत, परोपरीनें वर्णिला आहे. परमात्मा हा या तिन्ही क्षेत्रांत विक्रान्त असल्यामुळें हि खरोखर तो त्रिविक्रम म्हणावयाचा. परमात्मा हा सत्यधर्मा असल्यामुळेंच तो त्रिविक्रम आहे, विश्वविक्रम आहे.

## ५३१. महर्षि (कपिलाचार्य)

"महर्षि: कपिलाचार्य:" हें सविशेषण एक पद आहे तथापि हीं दोन पदें घेणें हि शक्य आहे. कपिलांना आचार्य म्हटल्यानंतर पुन: महर्षि हें विशेषण जोडण्याची खास गरज नाहींच. शिवाय "महर्षीणां भृगुरहम्" आणि "सिद्धानां कपिलो मुनि:" असा गीतेंतील द्विविध उल्लेख हि चिन्त्य आहे. महर्षि वेगळे, सिद्ध वेगळे. ज्याला एखाद्या आध्यात्मिक सत्याचें दर्शन झालें तो ऋषि होय. "स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध अधिकार आहे" अशा सारखें सत्य ज्याला स्फुरलें तो ऋषि म्हणावयाचा. परंतु ज्याला ह्या विश्वाचें, ह्या जीवनाचें नि:संदेह आणि समग्र ज्ञान झालें आहे आणि त्या ज्ञानानुसार ज्याचें समग्र जीवन कायिक वाचिक मानसिक आणि भूत भवत् भविष्यत् गंगौघवत् चाललें आहे तो महर्षि म्हणावयाचा. "ब्रह्म सत्यं, जगत् स्फूर्ति:, जीवनं सत्यशोधनम्" चा द्रष्टा हा असा महर्षि होय. हा आजच्या काळचा झाला. गीतेच्या काळचा म्हणजे गीतेच्या स्मरणांतला असा महर्षि म्हणजे भृगु. उपनिषदांत आलें आहे "भृगुर् वै वारुणि:, अधीहि भगवो ब्रह्मेति पितरं उपससार" वरुणाकडून भृगूला जी ब्रह्मविद्या मिळाली आणि जी त्यानें आचरून संप्रदायांत प्रवर्तित केली तिच्या बळावर तो महर्षि झाला. अर्थात् महर्षि म्हणजे संप्रदाय-प्रवर्तक ऋषि होय. आणि ज्या अर्थी सर्व संप्रदाय-प्रवर्तकांचा हि गुरु परमात्मा आहे त्या अर्थी तो महर्षि होय, किंबहुना परमर्षि होय. जीवनसूत्र धर्म आणि तत्फलित सुख, ज्ञान आणि तत्फलित मोक्ष, प्रेम आणि तत्फलित ऐक्य, किंबहुना तो आणि हा यांचा आधार एक निजात्माच आहे. तो स्वाधार सर्वाधार निजात्मा ज्यानें साक्षात् केला प्रत्यक्ष केला तो ऋषि होय, महर्षि होय, परमर्षि होय. हे आत्मज्ञान ज्याला साधना करून मिळवावें लागतें तो साधक. ज्याला तें उपजतच असतें तो सिद्ध. जो साधकांचा नि सिद्धांचा उपास्य आहे तो परमात्मा परम सिद्ध म्हणावयाचा. कपिलाचार्य हे असे सिद्ध होते. परम सिद्धाचे अवतार होते.

## ५३१. (महर्षि) कपिलाचार्य

ऋषिं प्रसूतं कपिलं यस् तं अग्रे ज्ञानैर् बिभर्ति जायमानं च पश्यत् । इत्यादि श्रुति आहे. हा कपिल आणि सांख्याचार्य कपिल एकच का? शंकराचार्य कपिल पदानें सांख्याचार्य समजत नाहींत. कपिल म्हणजे पहिला जीव ब्रह्मदेव असा त्यांचा अभिप्राय दिसतो. ब्रह्मदेवालाच अग्रे म्हणजे सृष्टीच्या प्रारंभीं परमात्म्यानें ज्ञान भरविलें होतें. त्यामुळें श्रुतिवचनांतील कपिल हा सांख्याचार्य नव्हे.

पण मी तर म्हणेन कीं प्रत्येक जीवच कपिल आहे. त्याला जन्मतांच परमात्मा संवेदना देत असतो. आणि म्हणून कपिल म्हणजे जीवमात्र. तो जन्मत: कपिल असतो, कृष्णवर्ण असतो. वारेनें वेष्टिलेला आणि अज्ञानानें हि वेष्टिलेला म्हणून कपिल. गर्भोपनिषदांत ह्या कपिलाच्या दशेचें वर्णन आलेलें आहे.

परंतु आदि जीव ब्रह्मा अथवा जीवमात्र यांची कांहीं आचार्य म्हणून प्रसिद्धि नाहीं. ती प्रसिद्धि तर सांख्याचार्य कपिलाचीच आहे आणि म्हणून कपिलाचार्य म्हणजे कर्दम आणि देवहूति यांचा पुत्र आणि मनूचा दौहित्र च समजला पाहिजे. प्रकृति आणि पुरुष हा पहिला ज्ञानविभाग, पुरुष एकधा, प्रकृति अष्टधा विकृति अष्टाविंशतिधा इत्यादि त्याचा विस्तार पहिल्या प्रथम कपिलाचार्यांनीं शास्त्रीय पद्धतीनें मांडला म्हणून ते आचार्य म्हणविले गेले. त्यानंतर त्याचा विकास त्यांच्या शिष्यांनीं केला आणि सांख्यविचार आणि संप्रदाय जगांत मान्यता पावला. हें जें महनीय तत्त्वसंख्यान कपिलांनीं केलें त्यांत आजतागायत कोणी कांहीं म्हणण्यासारखी भर घालूं शकले नाहींत. किंबहुना सर्व ज्ञानाचा तें आधार

होऊन बसलें आहे. त्यामुळें कपिल हेच एक आचार्य पदवीस पात्र आहेत. इतर सारे त्यांचे ऋणी शिष्य होत. आज आम्हीं आचार्य पदवी वाटेल त्याला बहाल करून सवंग करून टाकली आहे. पण ती पदवी जैमिनि, बादरायण, कपिल, पतंजलि, गौतम, कणाद अशा मौलिक विचारकांनाच शोभते. या सर्वांत कपिल हे अग्रगण्य आहेत म्हणून ते परमात्म्याचा एक अवतार म्हटले गेले आहेत आणि हा अवतार ज्ञानावतार आहे.

## ५३२. कृतज्ञ

### [(१) कृत-ज्ञ : (२) कृत+ज्ञ]

''कृतं जानाति स्मरति इति कृतज्ञः।'' अथवा ''कृतश्च असौ ज्ञश्च इति कृतज्ञः'' अशा दोन प्रकारें हें पद व्युत्पादितां येतें. कृतज्ञ पदाचा रूढ अर्थ आहे आपल्यावर केलेला उपकार स्मरणारा. पण परमेश्वरावर कोण कसा उपकार करणार? म्हणून मग दुसरी व्युत्पत्ति कल्पिली. पण कृत म्हणजे कर्म असा धात्वर्थ घेतल्यास जें जें केलें तें तें जाणणारा म्हणून परमात्मा हा कृतज्ञ म्हणतां येतो. शिवाय उपकार असा हि अर्थ कृत पदाचा घेतला तरी कांहीं बिघडण्याचें कारण नाहीं. उपकार म्हणजे अनुकूल कर्म. जीव परमात्म्याला प्रिय असें जें जें करतो तें तें तो परमात्मा विशेषेंकरून जाणतो, अनुमोदितो मग तें किती का तुच्छ असेना. म्हणून तो कृतज्ञ. गीतेंत म्हटलेंच आहे

**पत्रं पुष्पं फलं तोयं यो मे भक्त्या प्रयच्छति।**
**तद् अहं भक्त्युपहृतं अश्नामि प्रयतात्मनः।।**

निष्काम भक्ताचें पत्र पुष्प असो पण नुसतें प्रेमानें घेतलेलें नाम, केलेलें स्मित, मनोमन केलेलें स्मरण किंबहुना प्रेममय विस्मरण हि परमात्म्याला अत्यंत प्रिय आहे. तें हि तो ओळखतो म्हणून तो परमात्मा कृतज्ञ होय.

**रामहिं केवल प्रेम पियारा।**
**जानि लेहु जो जाननिहारा।।**

रामाला केवळ एक प्रेमच प्रिय आहे. कोणीहि हें केव्हांहि कुठें हि पडताळून घ्यावें. सर्वांनाच निरपवाद जर प्रेम प्रिय आहे, तर प्रेमाला वश न होणारा असा प्राणी कोणी असूंच शकत नाहीं आणि म्हणून 'प्रेमैव कार्यं प्रेमैव कार्य म्' प्रेमच कर्तव्य आणि निरपवाद कर्तव्य आहे. सत्याग्रहाचा हाच मूलाधार आहे. सूर्यापुढें जसा अंधकार आपलें तोंड काळें करतो, त्यापुढें येतच नाहीं तसा प्रेमापुढें शत्रु ठरतच नाहीं. त्याचें शत्रुत्व प्रेमानें केव्हांच ठार केलेलें आहे.

कृतश्च असौ ज्ञश्च इति कृतज्ञः ही कृत्रिम व्युत्पत्ति आहे. तिचा अर्थ तो परमात्मा ज्ञेय आणि ज्ञाता दोन्ही आहे असा होईल.

## ५३३. मेदिनीपति

भूगर्भ ८, महीभर्ता २०, मेदिनीपति ५७, त्याच प्रमाणें धरणीधर २५, महीधर ३४, ४०, धराधर ८०, असे समानार्थक अनेक शब्द सहस्रांत आले आहेत. त्यांचा आशय हि समानच आहे. भू म्हणजे जन्मभू, मही म्हणजे थोर, पूजनीय, धरणी आणि धरा दोहोंचा हि अर्थ धारण करणारी, धारण करणारी म्हणजे जन्मापूर्वीं गर्भरूपानें जन्मोत्तर अंकावर आणि मरणोत्तर पदराखालीं झांकून धारण करणारी. अशी जी सर्वजीव-निकायाला धारण करणारी आणि आपल्या स्तन्यानें पोषून पुष्ट करणारी, मेदुर बनविणारी, तीच मेदिनी हि म्हठली गेली आहे. या अशा मेदिनीचा स्वामी, तिला हि आपल्या अंकावर धारण करणारा तो मेदिनीपति भगवान् विष्णु होय, परमात्मा होय. इथें भूमि म्हणजे केवळ भूलोकच नव्हे तर लोकमात्र समजावयाचें आहे. जिथें जिथें जीवकला आलोकित झाली आहे, प्रकाशित झाली आहे, तो सर्वजीवनाधार लोकपदवीस पात्र होय. तोच इथें

मेदिनी म्हटला आहे. चिंधीची कांहीं किंमत नाहीं, पण ती रत्न सांभाळून असते म्हणून तिची किंमत रत्ना-इतकीच म्हणावी लागते. त्याप्रमाणें या विश्वाची किंमत कांहीं नाहीं. परंतु ज्या अर्थी तें ईशावास्य आहे, परमात्म्याचें निकेतन आहे त्याअर्थी त्याची किंमत अगणित आहे. तें ब्रह्म-संमित आहे. तिथें आत्मकला प्रकटली आहे, परमात्मसत्ता विनटली आहे. दिव्यांत भांडें, तेल, वात वगैरे अनेक वस्तु असल्या तरी त्यांची किंमत ज्योत असेल तरच. ती ज्योत तिथें प्रकटते म्हणून त्या समूहाला दिवा म्हणायचें. त्या प्रमाणें या लोकाला तो परमात्म्याचा आलोक धरतो म्हणूनच लोक म्हणायचें. तो परमात्मालोकच त्याचा पति आहे. असा हा परमात्मा मेदिनीपति म्हणावयाचा.

## ५३४. त्रिपद (त्रिपद् त्रिपदः)

उपनिषदांत आत्मा हा चतुष्कल वा चतुष्पाद म्हटला आहे. विश्व तैजस प्राज्ञ आणि तुरीय हीं त्याचीं नामें आहेत. परंतु इथें तर तो परमात्मा त्रिपद म्हटला आहे. त्रिपद म्हणजे तीन पदें असलेला. कोणतीं हीं तीन पदें? पुरुष सूक्तांत म्हटलें आहे–''पादोऽस्य विश्वा भूतानिं त्रिपाद् अस्यामृतं दिवि'' या सृष्टींत जो व्यक्त झाला आहे तो त्या परमात्म्याचा एक पाद आहे, उरलेले तीन पाद ते अव्यक्त आहेत आणि म्हणून ते स्वर्गांत आहेत असें म्हटलें आहे. व्यक्तमात्र येतें जातें, परंतु अव्यक्त हें ना येत ना जात. तें सदैव एकरूप राहतें. म्हणून तेंच अमृत. तेंच परमात्म्याचें खरें रूप म्हणावयाचें. त्यालाच अनुलक्षून परमात्मा इथें त्रिपद म्हटला आहे.

अथवा सत् चित् आणि आनन्द हा जो परमात्म्याचा त्रिविध निर्देश तोच त्रिपद पदानें अभिप्रेत आहे असें समजावें.

**असतो मा सद् गमय। तमसो मा ज्योतिर् गमय।**
**मृत्योर् मा अमृतं गमय।**

या उपनिषद्-वचनांत ह्या त्रिपद परमात्म्याचाच तिहेरी उल्लेख केलेला आहे. गायत्री या तीन पदांना अनुलक्षूनच तर त्रिपदा झाली नाहीं ना? त्रिपद परमात्म्याचा मन्त्र म्हणून त्रिपदा.

अथवा ''त्रीणि पदा विचक्रमे'' तो तीन पदें चालला म्हणून त्रिपद म्हणावयाचा. त्रिपद म्हणजे त्रिविक्रम. परमात्मा आदि मध्य आणि अन्त अशीं तीन पदें टाकून हें विश्व निर्मितो पाळतो आणि संहरतो. म्हणून हि तो त्रिपद. चौथें पद टाकण्याला कांहीं उरतच नाहीं, जागाच नाहीं, म्हणून परमात्मा हा त्रिपद म्हटला आहे.

परमात्मा हा जसा त्रिपद आहे तसा हा विश्वाकार हि त्रिपदच आहे. आदिमध्यान्तमयच आहे. म्हणून त्रिपद म्हणजे अविश्व आणि विश्व दोन्ही समजावें वस्तु आणि वस्तुच्छाया अभिन्नच होत. वस्तु त्रिपद तर तिची छाया हि त्रिपद च म्हटली पाहिजे.

## ५३५. त्रिदशाध्यक्ष

### [(१) त्रिदश+अध्यक्ष, (२) त्रिदशा+अध्यक्ष]

त्रिदश म्हणजे त्रिंशत् देव त्यांचा जो अध्यक्ष तो त्रिदशाध्यक्ष म्हणावयाचा. पण हे त्रिंशत् देव कोणते? दश दिशांचे पालक ते दिक्पालच त्रिभुवनानुसार त्रिदश देव होत. कोणत्या हि लोकांत दश दिशा असायच्याच. या विश्वाचे अधोमध्योर्ध्व लोक कल्पिले जातात. तदनुसार त्यांचे तीस दिक्पाल होणार. त्यांचा सर्वांचा जो एक अध्यक्ष तो परमात्माच त्रिदशाध्यक्ष म्हणावयाचा. सप्त वा चतुर्दश लोकांची कल्पना केली तरी ती या त्रिभुवन कल्पनेंत समाविष्ट होते. अधोलोक आणि ऊर्ध्व लोक मिळून दोन झाले. उरलेले सर्व लोक मध्य लोकांत समाविष्ट होतील. मिळून लोक तीनच.

अथवा त्रिदशा म्हणजे जाग्रत् स्वप्न सुषुप्ति या अवस्था, त्यांचा जो अध्यक्ष तुरीय तो परमात्मा

त्रिदशाध्यक्ष म्हणावयाचा. प्रात:स्मरणांत शंकराचार्यांनीं म्हटलेंच आहे--'यत् स्वप्न-जागर- सुषुप्तमवैति नित्यं, तद् ब्रह्म निष्कलमहं, न च भूतसंघ:।' तो अ+त्रि तुरीय परमात्माच त्रिमित दशांचा साक्षी आहे. तोच जाणतो कीं मी जागा आहें, मला स्वप्न पडत आहे वा पडलें होतें. अथवा मी गाढ झोपलों होतों. हा जो स्मृतिमान् तो त्या तिन्ही अवस्थांहून भिन्न असून तोच त्यांच्या गतागतांचा कूटस्थ नित्य साक्षी आहे. म्हणून तो तुरीय परमात्मा त्रिदशाध्यक्ष म्हटला आहे.

अथवा त्रिदशा म्हणजे प्रत्येक वस्तूची उत्पत्ति-पूर्व स्थिति, उत्पत्तिकालीन स्थिति आणि उत्पत्यनन्तरची लय स्थिति समजाव्या. या विश्वाच्या या तिन्ही अवस्थांचा साक्षी तो परमात्मा आहे. म्हणून तो परमात्मा त्रिदशाध्यक्ष म्हटला आहे. गीतेनें यालाच अनुलक्षून म्हटलें आहे ''मयाध्यक्षेण प्रकृति: सूयते सचराचरम्। हेतुनानेन कौन्तेय जगद् विपरिवर्तते।''

## ५३६. महाशृंग

महत् शृंगं यस्य स: महाशृंग:, प्रलयपयोधिसंचारी मत्स्यावतार:। मोठें आहे ज्याचें शृंग तो महाशृंग, कल्पान्तैकार्णवसंचारी मत्स्यावतारी भगवान् विष्णु. कल्पान्तीं जेव्हां सारे महासागर एक होतात तेव्हां सारें जग बुडालें तरी धर्म बुडत नाहीं. कारण तो या जगाचा धारक आहे आणि जो त्या धर्माला चिकटून राहतो, किंबहुना धर्मरूपच होऊन राहतो, तो धर्मिष्ठ हि बुडत नाहीं, त्याच्या रक्षणासाठीं भगवान् अवतीर्ण होतात. ते त्याला धर्मासकट आपल्या उत्तुंग एकशृंगाला बांधलेल्या नौकेंत घेऊन प्रलयकाल संपेपर्यंत प्रलयपयोधि-पर्यटन करीत राहतात आणि जेव्हां नवीन कल्पारंभ होतो तेव्हां पाण्याच्या पृष्ठभागावर आलेल्या पृथ्वीच्या कडेला नाव लावून आपण निघून जातात. आणि मग तो धर्मिष्ठ मनु या पृथ्वीतलावर आपलें मन्वन्तर सुरू करतो. या महाशृंग मत्स्यावताराचें चरित्र जयदेवानें आपल्या अष्टपदींत असें गाइलें आहे ''प्रलयपयोधिजले धृतवान् असि वेदम्। विहित-वहित्रचरित्रमखेदम्। केशव धृत-मीनशरीर, जय जगदीश हरे।।'' भगवंतानें मत्स्यावतार धारण करून वेद-रक्षण केलें. काय, वेदाची पोथी त्यानें आपल्या पाठीवर वाहिली? नव्हे, त्यानें धर्मिष्ठ म्हणजे वेदाज्ञापालक मनूला वांचवून वेद वांचवला. धार्मिकाच्या ठाईं धर्म प्रतिष्ठित असतो. धार्मिक वांचला तर धर्म वांचला म्हणावयाचा. आईच्या रूपानें वात्सल्य जगांत नांदत आहे. गुरूच्या रूपानें ज्ञान विराजत आहे. राजाच्या रूपानें धर्मशासन गाजत आहे. एरव्हीं हे अव्यक्त धर्म तुम्हांला कुठें भेटणार? धर्म हि जगांत धर्मिष्ठाच्या रूपानेंच भेटावयाचा. असा एक हि धर्मिष्ठ या जगांत राहिला तरी त्याच्या रक्षणासाठीं परमात्मा अवतार घेतो. तो संख्येचें रक्षण नाहीं करीत, धर्माचें करतो. जे सत्यरूप धर्माला आपण वांचावें म्हणून सोडतात, ते अखेर बुडतात. जो प्रलय झाला तरी धर्माला सोडींत नाहीं तोच वांचतो, त्याच्याचसाठीं परमात्मा अवतीर्ण होतो.

## ५३७. कृतान्तकृत्

### [(१) कृत+अन्तकृत्, (२) कृतान्त+कृत्]

कृतमात्रस्य अन्तं करोति इति कृतान्तकृत्। जो जें जें केलें आहे, घडलें आहे, तें तें मोडतो, तो कृतान्तकृत् म्हणावयाचा. अर्थात् कृतान्तकृत् म्हणजे विश्वसंहारक, व्यक्तमात्र गिळून टाकणारा. परमात्मा हें विश्व घडतो घडवतो, राखतो आणि शेवटीं तें तो मोडतो. ह्या तिन्ही हि गोष्टी तो करीत असला तरी विश्वाची रचना आणि स्थिति ह्या अवस्था तात्कालिक आहेत, क्षणिक आहेत. नित्य आणि सहज स्थिति म्हणजे तो परमात्मा हें विश्व गिळून आहे. म्हणून तो परमात्मा शान्त शिव अद्वैत म्हटला जातो. वस्तुत: त्याच्या ठाईं उत्पत्ति-स्थिति-लय संभवतच नाहींत. हा असंभवच इथें कृतान्तकृत् पदानें अभिप्रेत आहे. उत्पत्तिस्थितिकृत् हे तात्कालिक आहेत. कृतान्तकृत् हा शाश्वत आहे, ध्रुव आहे. म्हणून तो महादेव.

कृतान्त म्हणजे यम. त्याला जो करतो निर्मितो तो हि कृतान्त-कृत् म्हटला जाईल. यमाची सत्ता सर्वांवर चालते. पण विष्णु-भक्तांवर, परमेश्वराच्या भक्तांवर चालत नाहीं. परमात्म्याचे भक्त म्हणजे अनात्म देहाचा संग सोडून केवळ आत्माराम. असलेले पुरुष होत. अशा आत्मभूत पुरुषांवर कृतान्ताची सत्ता कशी चालणार? जें कृत आहे त्यावरच ना त्याची सत्ता चालायची? आत्मवस्तु कृत नाहीं, ती स्वयंभू आहे. म्हणून ती आणि तद्रूप यांवर कृतान्ताची सत्ता चालत नाहीं, हें युक्त च आहे. पण अशा या कृतान्ताला परमात्मा निर्मितो तो कां? वस्तुतः तो कांहींच करीत नाहीं. तो सर्वाधार असल्यामुळें तो कृतान्तकृत् म्हटला आहे इतकेंच. पाण्यावर तरंग उठतात, खेळतात आणि निमतात. पण हें कांहीं त्या पाण्याचें कर्तृत्व नव्हे. वायुलहरीनें हें होत असतें. तसें स्वभावतः जगदुत्पत्तिस्थितिलयादि घडत आहे. पण परमात्मा आधारभूमि असल्यामुळें., अधिष्ठान असल्यामुळें तो विश्व-कर्ता भर्ता हर्ता म्हटला जातो इतकेंच. परमात्मा प्रत्यक्ष कर्ता नाहीं, पण अधिष्ठान म्हणून करविता म्हटल्यास काय हरकत? कृतान्त-कृत् म्हणून परमात्म्याचें हेंच सर्वकर्तृ अकर्तृत्व प्रकट केलें आहे.

## ५३८. महावराह

सामान्य डुक्कर आपल्या तुण्डाग्रानें नासिकाग्रानें चिखल चिरतो, भुई उकरतो. त्याच्या सुळ्यावर चिखलाचा गोळा चिकटून येतो. मातीचें ढेंकूळ चिकटून येतें. ही पृथ्वीहि एक मातीचा गोळाच आहे. आम्ही त्याला भूगोल असें भव्य नांव देतों, पण आहे तो एक चिखलाचा गोळाच. हा चिखलाचा गोळा ज्यांत चौऱ्यांशी लक्ष योनि जीव-जीवाणु वळवळत आहेत, अव्यक्तार्णवाच्या तळाशीं कुठें तरी होता. त्याला व्यक्ताच्या पृष्ठावर कोणीं बरें आणलें? अव्यक्तार्णवांत मुसंडी मारून ''घ्राणेन पृथ्व्याः पदवीं विजिघ्रन्'' हुंगहुंगून पृथ्वीचा शोध घेऊन कोणा महासत्त्वानें तिचा ठाव काढला, आणि तिला आपल्या रदाग्रानें कंदुकवत् उचलून व्यक्त पृष्ठावर आणून ठेवलें? तो जो महासत्त्व परमात्मा तोच महावराह होय. हा इतिहास विश्वोत्पत्तीच्या पुराणांत सांपडतो, आधुनिक मानवेतिहासांत तो सांपडणार नाहीं. इतिहासाचा विषय अतिच अर्वाचीन आहे. त्याचे स्थळ- काळ अतिच मर्यादित आहेत. पुराणांचा विषय झालेले स्थळ-काळ ब्रह्माण्डव्यापी आणि कल्पकल्पान्तर-गत आहेत. त्यांतील वर्ण्य विषय हि तसेच गंभीर आहेत. सृष्टि-दिक्-काल-स्रष्टे देव, ऋषि, मनु, वेद, यज्ञ, स्वर्ग, नरक, यक्ष, रक्ष, असुर, नाग किन्नर, गंधर्व, सिद्ध आणि परमात्म्याचे विविध अवतार आणि त्याच्या भक्तांचीं चरित्रें हा सगळा विषय अलौकिक आहे, दिव्य आहे, भव्य आहे, गुह्य आहे. महावराहाचें चरित्र त्यापैकींच. आज वराहाला तुच्छ जीव समजलें जातें. ती एक शिवी होऊन बसली आहे. पण ही भूल आहे. वराह हें सामान्य सत्त्व नव्हे. त्याची बुद्धि, त्याचें बळ, त्याची निर्भयता, त्याचा पराक्रम प्रशंसनीय आहे. तो प्रसंगीं वाघाला आणि सिंहाला हि मात देतो. त्यांना तो भीत नाहींच. तो उपनिषदांत वर्णिल्याप्रमाणें 'अवाकी अनादरः' आहे. तो कोणाची पत्रास राखत नाहीं. हिरण्याक्षासारख्या धुडाला त्यानें खेळवलें आणि एका धडकेंत लोळवलें आणि पृथ्वीला सपत्र नलिनी प्रमाणें तो उचलून घेऊन आला.

## ५३९. गोविन्द

गोविन्द हें परमात्म्याचें नांव मोठें अर्थपूर्ण आहे. गो आणि विद् धातु यांच्यापासून तें बनलें असून या दोहोंचे जितके कांहीं अर्थ होतात ते सर्व त्यांत समाविष्ट होतात. गो म्हणजे पृथ्वी, गाय, इन्द्रियें, वाणी, ज्ञान आणि विद् म्हणजे जाणणें, मिळवणें इत्यादि. गो शब्द गम् धातुपासून व्युत्पादिला जातो. अर्थात् गो म्हणजे गमनशील प्राणी, चरणारा प्राणी. पृथ्वी सतत परिभ्रमते, गाय वनोपवनें हिंडते चरते,

इन्द्रियें आपल्या विषयांत फिरत चरत असतात, वाणी सर्वत्र वावरत असते, ज्ञान सर्वत्र संचरत असतें. त्याला अगोचर कांहींच नाहीं. अशा प्रकारें गोतत्त्व हें स्थूल सूक्ष्म सूक्ष्मतर आणि अति सूक्ष्म रूपानें सर्वत्र नांदतें आहे. या सूक्ष्मातिसूक्ष्म आणि स्थूलातिस्थूल गो-तत्त्वाला ज्यानें आकळलें आहे तो परमात्माच गोविंद म्हणावयाचा. सर्व विश्व जाणिवेच्या अधीन आहे. ज्या बाबत जाणीव नाहीं ती वस्तु आहे म्हणतां यावयाची नाहीं. चराचर सर्वांचें अस्तित्व चेतनाधीन आहे. चेतन नसेल तर अमुक एक वस्तु आहे हें कळणार कोणाला आणि ती मिळवणार तरी कोण? जी वस्तु मुळीं जाणवतच नाहीं ती मिळवली हि जाऊं शकत नाहीं. म्हणून जाणणें आणि मिळवणें वस्तुतः अभिन्नच होत. परमात्मा हा चिद्रूप असल्यामुळें सर्व गोतत्त्व सूक्ष्मादि-स्थूलान्त तदधीनच आहे. तो मात्र कोणालाच आकळतां येत नाहीं. धरतां येत नाहीं. कारण तो केवळ विषयी आहे, विषय नाहीं. म्हणून ईशोपनिषद् म्हणतें ''अनेजत् एकं मनसो जवीयः। नैनत् देवा आप्नुवन् पूर्वमर्षत्। तत् धावतोऽन्यान् अत्येति तिष्ठत्। तस्मिन् अपो मातरिश्वा दधाति।। परमात्मा हा असा गोविंद आहे. पृथ्वी, गाय, इन्द्रियें, वाणी, ज्ञान सर्व त्याच्या अधीन आहे. ज्ञान आध्यात्मिक, वाणी आधिदैविक आणि इन्द्रियादि आधिभौतिक होय. आणि या तिहींना त्यानें आकळलें आहे म्हणून तो गोविंद म्हटला आहे. अथवा इन्द्रियें त्याचें रूप पाहतात, वाणी त्याचें नाम गाते, चेतना तत्प्रविष्ट होऊन तदात्म होते म्हणून हि तो गोविन्द म्हटला आहे. 'गोभिर् वित्तः इति गोविन्दः। वित्त विन्न विन्द हीं तिन्ही विद्चीं क्तान्त रूपें होत. विन्द हें रूप आर्ष होय. अथवा 'गोविं गव्यं ददाति इति गोविन्दः' जो गोसार देतो तो गोविंद. भगवान् कृष्णानें पृथ्वीचें सार ओषधि, ओषधींचें सार, दूध, आणि त्या दुधाचें हि सार नवनीत दिलें आहे. तसेंच वाणीचें सार वेद, त्या वेदांचें सार उपनिषदें आणि त्यांचें हि सार गीता जगाला दिली आहे म्हणून तो गोविंद; लौकिक आणि अलौकिक दोन्ही अर्थांनीं तो गोविन्द आहे.

## ५४०. सुषेण

सु शोभना सेना यस्य सः सुषेणः। ज्याची सेना स्वकार्यक्षमतेमुळें शोभिवंत आहे तो सुषेण म्हणावयाचा. परमात्म्याची सेना कोणती? संकल्प हीच परमात्म्याची सेना म्हणावयाची. परमात्म्याच्या संकल्पमात्रें हें विश्व उदयास्त पावत असतें. असें ज्याचें सामर्थ्य आहे तोच सुषेण. आपली यत्किंचित् हानि न होऊं देतां जी प्रतिपक्षाला शमवते तीच सेना सु म्हणजे उत्तम म्हटली पाहिजे. अशी सेना एका परमात्म्यावांचून दुसऱ्या कोणाची दाखवतां येईल. इतर कोणती हि सेना किती हि समर्थ असली तरी आपली मुळींच हानि न होऊं देणें तिला शक्य नाहीं. त्याच प्रमाणें आपल्या अंगीकृत कार्यांत पूर्ण सफळ होणें हि तिच्या हातचें नाहीं. कारण सर्व कार्याच्या कारणांत दैव हें एक असें कारण आहे, आणि इतकें जबरदस्त कारण आहे, कीं त्यावर कोणा हि जीवाचा जरा हि अधिकार पोंचत नाहीं. तें खास देवाच्याच हातचें आहे. म्हणून तोच एक सुषेण म्हणावयाचा.

परमात्म्याप्रमाणें परमात्म्याचे अवतार हि सुषेणच म्हणावयाचे. परमेश्वरी संकल्पानेंच ते प्रेरित असतात. त्यामुळें वानरसेनेच्या बळावर हि त्यांची मोहीम यशस्वी होते. वानर बलवान् नखदन्तायुध तरी असतात. पण निर्बळ, नखदन्त हि अकिंचित्कर असलेले निःशस्त्र नर त्यांच्या सेनेच्या बळावर हि त्यांचा सत्याग्रह यशस्वी होतो. उलट महाबलवान् शस्त्रास्त्र-सुसज्ज चतुरंग सेना समन्वित रावण जरासन्ध हिटलर टोजो सारखे हि परास्त होतात. कारण तिथें प्रेरणा परमात्म्याची नसते. तर अहंकाराची असते. ''अहंकारं बलं दर्पं कामं क्रोधं च संश्रिताः। मां आत्म-पर-देहेषु प्रद्विषन्तोऽभ्यसूयकाः'' असे ते आसुरभावाविष्ट ईश्वराचा विरोध करीत असतात. परमात्म-संकल्प-शरणता हीच सुषेणता होय. ती जिथें आहे 'तत्र श्रीर् विजयो भूतिः' आहे. ती जिथें नाहीं, तद्विरोध जिथें आहे तिथें विनाश ठेवला आहे.

## ५४१. कनकाङ्गदी

कनकाङ्गदी म्हणजे सुवर्ण-केयूरवान्. सोन्याचे बाजूबंद ल्यालेला तो कनकाङ्गदी म्हणावयाचा. भगवान् गदी तसा कनकाङ्गदी हि आहे. तो जनार्दन गदा धरून वैऱ्यांना तर्जनच करीत नाहीं, तर कनकाङ्गद धारण करून भक्तांना सुखार्जन हि होतो. तो गदी होऊन अभक्तांना दुःखकर्ता आणि कनकाङ्गदी होऊन भक्तांना सुखकर्ता झालेला आहे. परमात्म्याचे विग्रह असंख्य शस्त्रास्त्रांनीं तसेच असंख्य अलंकारांनीं नटविलेले आपण पाहतों. भगवंताला हा अलंकारांचा व शस्त्रास्त्रांचा इतका सोस कां? भगवंताला अलंकारांचा सोस नाहीं नि शस्त्रास्त्रांचा हि नाही. परंतु तीं दोन्ही त्याची अंगभूत आहेत. परम सुंदर परमात्म्याचीं हीं अंग-प्रत्यंगें अत्यंत आकर्षक अर्थात् नयनमनोहर आहेत. ही त्याची दिव्य शोभा, हीं परमाह्लादकता सूचित करण्यासाठीं त्याचें रूप नखशिखांत अलंकृत केलें जातें. कनकाङ्गदी हें पद उपलक्षणात्मक आहे. तसेंच तो सर्वप्रहरणायुध हि वर्णिलेला आहे. कारण जे परमात्म्याला मानीत नाहींत, त्याचा विरोध करतात, त्याच्या प्रजेला व भक्तांना छळतात, त्यांना तो भयावह आहे. त्याची ही अभक्त-भयावहता प्रकट करण्यासाठीं त्याच्या सर्वांगीं शस्त्रास्त्रें विराजमान आहेत. अभक्तांना त्याची दृष्टि कालाग्नि समान दाहक आणि वाणी वज्रसमान विदारक आहे. त्याचें सर्वांग त्यांना भयावह आहे. म्हणून तो परमात्मा सर्वप्रहरणायुध वर्णिला जातो. सर्वत्र तो सर्वप्रहरणायुध वर्णिला वा रेखाटला जात नाहीं. कारण तसें करण्याची गरज नसते. त्याच्या हातांत एक छडी हि पुरे आणि एक मुद्रिका हि बस आहे. ती छडी वा मुद्रिका उपलक्षण होय. तेवढ्यानें त्याचें परम भयावहत्व व परमाह्लादकत्व सूचित होतें. परमात्मा हा केव्हां हि निरायुध आणि निरलंकार वर्णिला जात नाहीं याचें रहस्य हेंच. परमात्मा हा सदैव निग्रहानुग्रहसमर्थ आहे. हें रहस्य तीं भूषणायुधें सूचित करतात.

## ५४२. गुह्य

गुह्य म्हणजे अनाकलनीय रहस्यभूत वस्तु. गुह्य गोष्टी पुष्कळ असूं शकतील, पण त्या सर्वांत मौन हें परम गुह्य समजलें जातें. गीतेंत म्हणूनच म्हटलें आहे "मौनं चैवास्मि गुह्यानाम्" भगवान् म्हणतात, सर्व गुह्यांत मी मौन आहें. इथें गुह्य पदानें तेंच गुह्यतम अभिप्रेत आहे. उपनिषदांत गोष्ट आहे. एक अन्तेवासी आचार्यांकडे गेला आणि मला ब्रह्म समजावून सांगा म्हणाला. आचार्य कांहींच बोलले नाहींत. त्यानें पुनः तोच प्रश्न केला. तरी ते बोलले नाहींत. त्यानें आणखी तिसऱ्यांदा तो प्रश्न विचारला. आचार्य तरी बोलले नाहींत. क्षणभरानें पुढें ते त्याला म्हणाले, भल्या मुला! तुला तीनतीनदां सांगितलें कीं तो आत्मा शान्त आहे, मौन आहे, पण तूं लक्षांतच घेत नाहींस. तें ब्रह्म शब्दांनीं सांगतां येण्याजोगें नाहीं, खुणेनें दाखवितां येण्याजोगें नाहीं. मनानें चिंतितां येण्याजोगें नाहीं. तें अनिर्वचनीय, अनिर्देश्य, अचिंत्य आहे. त्यामुळें तें परमगुह्य म्हणावयाचें. तें गुहेंत दडलेलें आहे. अगदीं अंतरतर आहे. तिथें कोणाचाच लाग लागत नाहीं. म्हणून तें गुह्य म्हणावयाचें. उपनिषद् म्हणतें "यद् वाचानभ्युदितं येन वाग् अभ्युद्यते। तदेव ब्रह्म त्वं विद्धि नेदं यदिदं उपासते।। यन् मनसा न मनुते येनाहुर् मनो मतम्। तदेव ब्रह्म त्वं विद्धि नेदं यदिदं उपासते।। जें जें म्हणून आपण पाहतों ऐकतों कल्पितों त्याहून तें वेगळें आहे, पार वेगळें आहे, अगदीं मुलखावेगळें. त्यामुळें त्याला गुह्य म्हणावें लागतें. तत्सम कांहीं नाहींच पण तत्तुल्य हि नाहीं. मग त्याचें आकलन कसें करावें? साम्य-वैषम्यानुराधानें आपण एखाद्या वस्तूची कल्पना करीत असतों. इथें तर साम्य नाहींच पण वैषम्याचा हि आश्रय घेऊन त्याची वैलक्षण्यानें कल्पना करतां येत नाहीं. कारण त्यांत संबंध जोडला जातो आणि तो गुह्य परमात्मा तर केवलस्वरूप आहे. त्याचें वैलक्षण्य तरी कसें दाखविणें शक्य आहे? म्हणून त्याला गुह्य म्हणावयाचें.

## ५४३. गभीर

"गुह्यो गभीरो गहनो गुप्तः" हें एक सूत्र आहे. सर्वांचें मिळून तात्पर्य हें कीं तो परमात्मा अगम्य आहे. "अव्यक्ता हि गतिर् दुःखं देहवद्भिर् अवाप्यते " 'देहवंतास अव्यक्ती सुखें बोध घडेचि ना' गीतेच्या शब्दांत तेंच असें निरूपिलें आहे. तात्पर्य जरी एक असलें तरी तें व्यक्त करणाऱ्या पदांच्या छटा वेगवेगळ्या आहेत. गुह्य म्हणजे गूढ, अव्यक्त. गभीर म्हणजे अथांग, खोलच खोल, अतल. गहन म्हणजे निबिड, घनदाट, अभेद्य. आणि गुप्त म्हणजे आवृत, योगमाया-समावृत, अन्तरित, अन्तर्हित.

नदी खोल आहे, डोह तीहून खोल आहे, सरोवर आणखीच खोल आहे, आणि समुद्र तर खोलच खोल आहे. पण यांच्या खोलीला इयत्ता आहे. आत्मतत्त्वाच्या खोलीला मुळीं इयत्ताच नाहीं, मापच नाहीं. कारण, आत्मतत्त्व हें निर्गुण आहे, निराकार आहे. आकाराला मोजमाप असतें, निराकाराला कुठचें? जें निराकार, अव्यक्त, अचिन्त्य आहे त्या निर्गुणाची अगाधता किती वर्णावी! त्या अगाधतेची, गंभीरतेची अनुभूति ज्ञानदेव अशी गातात "जाणोनियां नेणपण अंगीं बाणलें। नेणोनियां जाणपण सहज नेणवलें वो माये।। आत्मज्ञानाची गति जाली निवांत। प्रबोधतत्त्व मी पावलें वो माये" तें आत्मतत्त्व, तो प्रबोध मुरलेल्या जाणिवेच्या स्वरूपाचा म्हणजे प्रगाढ निभृततेचा आहे. तीच गभीरता होय. तिथें जाणीव असून तिची खळबळ नाहीं, चळवळ नाहीं, वळवळ नाहीं. आहे केवळ निःस्पंद निभृत गभीरता, प्रबोधाची सान्द्रता. या गंभीर परमात्म्याचेंच वर्णन नासदीय "आनीद् अवातं स्वधया तदेकम्" असें करतें. उथळ पाण्याला खळखळाट फार, अशी म्हण आहे. पण आत्मतत्त्व त्याच्या अगदीं विरुद्ध आहे. उथळ पाण्यांत तुम्ही आरपार पाहूं शकतां, पण खोल पाण्यांत कशाचाच थांग पत्ता लागत नाहीं. तसें आत्मतत्त्व अथांग आहे, गभीर आहे. अर्थात् अप्रतर्क्य आहे. म्हणून परमात्मा गभीर म्हटला आहे.

## ५४४. गहन

परमात्मा हा गहन आहे. त्यांत कुणाचाच प्रवेश होत नाहीं. सर्व पदार्थांत हिरा हा सर्वांत कठिण अभेद्य मानला जातो. पण त्याला हि पैलू पाडले जातात. त्याचें तोल होतें, त्याचें मोल होतें. म्हणजे या प्रकारें त्यांत इंद्रियांचा मनाचा प्रवेश झालाच. जगांत अशी कोणतीहि वस्तु आढळत नाहीं कीं जींत इन्द्रियांचा आणि मनाचा प्रवेश होत नाहीं. प्रत्यक्ष वस्तूंत इंद्रियांचा प्रवेश होतो. त्यांचा शब्द स्पर्श रूप रस गन्ध इन्द्रियांकरवीं जाणला जातो. रुपया घेतला तर त्याचा खणखण वा बद्द आवाज, त्याचा गुळगुळीत वा खरबरीत स्पर्श, त्याचा गोल आणि दन्तुर आकार त्याच प्रमाणें त्याचा पांढुरका रंग हें रूप, त्याची विशिष्ट चव म्हणजे रस आणि त्याचा तो तापवला असतां येणारा गन्ध श्रोत्र त्वक् नेत्र रसना आणि घ्राण या इंद्रियांना गोचर होतो. परोक्ष वस्तूची कल्पना मन करतें. त्या कल्पनेचा आधार हि विषयेन्द्रिय-संनिकर्षज पूर्वानुभवच असतो. अशा प्रकारें प्रत्यक्षाप्रत्यक्ष वस्तुमात्रांत प्रवेश होत असतो. परंतु जें अव्यक्त आहे, अतीन्द्रिय आहे, वाङ्मनाला अगोचर आहे, त्यांत कोणाचा प्रवेश होऊं शकेल? आत्मतत्त्व हें असें आहे. तिथें इन्द्रियें वाणी मन कोणाचीच पोच नाहीं. मग त्यांत शिरकाव कुठला तें अतीन्द्रिय असलें तरी बुद्धिग्राह्य म्हटलें आहे. पण ही बुद्धि म्हणजे काय आहे? काय ती अन्तःकरण पंचकापैकीं एक आहे? नाहीं. ही बुद्धि म्हणजे आत्म्याचा स्वभाव होय. आत्मा बाह्य कुठल्या हि करणांवाचून जो निजानुभव घेत असतो ती त्याची शक्ति इथें बुद्धि समजावयाची आहे आणि ती आत्म्याहून अभिन्न आहे. अर्थात् तो परमात्मा केवळ

स्वसंवेद्य आहे, स्वेतरास अगोचर आहे. म्हणून तो गहन म्हणावयाचा.

## ५४५. गुप्त

परमात्मा गुप्त आहे. गुप्त म्हणजे अप्रकट, अदृश्य, अनिर्वचनीय, अचिन्त्य. ज्याचा थांगपत्ता लागत नाहीं त्याला गुप्त म्हणतात. तसा परमात्मा हा इदंतया न दाखवितां येणारा तत्पदवाच्य म्हणून गुप्त म्हणावयाचा. वस्तुतः कोणतें हि दर्शक सर्वनाम त्याला लागू पडत नाहीं. त्याला हा म्हणावें तर तो चा निषेध होणार. बरें तो म्हणावें तर हा चा निषेध होणार, आणि तो तर आहे सर्वगत. परंतु सर्वगत असून हि तो दिसत नाहीं. कारण तो सूक्ष्म, आहे. ''सूक्ष्मत्वात् तद् अविज्ञेयं दूरस्थं चान्तिके च तत्'' आकाशवत् तें आत्मतत्त्व दूर आणि जवळ सर्वत्र भरून आहे, पण सूक्ष्मत्वामुळें तें दिसत नाहीं, लक्षांत येत नाहीं. अर्थात् तें अलक्ष्य असल्यामुळें त्याला गुप्त म्हटलें जातें. पण वस्तुतः तें कशानें झांकलें जाणारें नव्हे. जें झांकणार तें झांकावयाच्या वस्तूहून मोठें असतें. पण असें मोठें त्याहून दुसरें नाहींच. म्हणून त्या आत्मतत्त्वालाच बृहत् म्हणून ब्रह्म संज्ञा दिली जाते. अर्थात् ब्रह्म म्हणजे न झांकलें जाणारें अति विशाल, सुबृहत्. पण असें हें बृहत् इथें गुप्त म्हटलें आहे. कारण तें कोणा अतिसूक्ष्म बुद्धीच्या प्रज्ञावंतालाच उपलब्ध होतें. 'दृश्यते त्वग्रया बुध्या' चर्मचक्षूच्या ढोबळ दृष्टीला तें दिसत नाहीं. चर्म-चक्षूनें जें दिसतें. त्या इन्द्रियगोचर विषयांनीं आमची बुद्धि पटलावृत झालेली आहे, त्यामुळें सर्वत्र गडगंज भरलेला परमात्मा आम्हांला दिसत नाहीं. तें पटल दृष्टीवरून दूर सारलें म्हणजे मग तें गुप्तच प्रकट होतें आणि जें आजवर प्रकट होतें तें कायमचें लोपतें. ज्याला भान झालें तो रज्जूच्या ठाईं सर्पभ्रम पाहत नाहीं. त्याला रज्जू भेटते, सर्पिणी तुटते. तें सर्पभय कायमचें मिटतें. ही निर्भयताच मुक्ति होय. गुरुकृपेनें ज्याला ही दृष्टि लाभली त्या तत्त्वार्थाच्या पायाळूला मग तें गुप्तधन सर्वत्र दिसूं लागतें व तो गातो ''गुरुकृपांजन पायो मेरे भाई। रामबिना कुछ जानत नाहीं।। अंतर राम बाहर राम। जहां देखौ वहां राम ही राम। जागत राम सोवत राम। सपने में देखौं राजाराम।।

## ५४६. चक्रगदा-धर

राजा राजदण्ड कशासाठीं धारण करतो? दुष्टांचें शासन आणि सज्जनांचें पालन करून धर्माची संस्थापना करण्यासाठीं. भगवान् हि तसाच या विश्वाचें निग्रहानुग्रहरूप राज्य करण्यासाठीं शस्त्र धारण करीत आहे. जो कोणी धर्मबाह्य वर्तन करील त्याला आपल्या अनिष्ट कर्माचें अनिष्ट फळ मिळाल्याशिवाय रहाणार नाहीं. तसेंच जो कोणी धर्मानुसार वागेल त्याला आपल्या इष्ट कर्माचें इष्ट फळ हि मिळाल्याशिवाय रहावयाचें नाहीं. करावें तसें भरावें या न्यायाची अचूक अंमलबजावणी ईश्वरी राज्यांत होत असते. त्याची हमी भगवान् आपल्या चक्र-गदा-धारणानें जगाला देत आहे. चक्र भक्त-संकट-मोचन, तर गदा दुष्टदमन आहे. सुजन-प्रतिपालन हें मुख्य आहे. दुर्जन-दमन हें तदंगभूत गौण आहे. म्हणून चक्र हें भगवन्मूर्तीच्या हातांत वर तर गदा खालीं धरलेली दाखविली आहे. राज्य म्हणजे राजकर्म. तें आहे धर्म-संस्थापन; प्रजापालन तदंगभूत होय. तसेंच ईश्वरी अवतार-कार्य धर्म-संस्थापन आहे. आणि त्याचें अंगभूत आहे प्रजापालन. त्या प्रजापालनाचे दोन विभाग म्हणजे सज्जनानुग्रह आणि दुर्जननिग्रह होत. आणि त्यांचें प्रतीक म्हणजे चक्र आणि गदा. आणि म्हणून भगवान् चक्रगदा-धर म्हटला आहे. मानवाची बुद्धि अल्प. ती न्यायाचें काय नि अन्यायाचें काय याचा निर्णय बिनचूक करूं शकत नाहीं. पुष्कळदां तर न्यायाच्या नांवाखालीं अन्यायच

होतो आणि चोर सुटून संन्यासीच सुळीं जातो, असें आपण पाहतों. परंतु सर्वज्ञ आणि सर्वशक्ति परमात्म्याच्या न्यायदानांत अशी गफलत संभवत नाहीं. म्हणून तोच राजराजेश्वर होय. त्याच्याच शासनांत आपण रहावयाचें आहे. इतर कोणी राजा आणि त्याचें शासन हरिदासांना ठाऊक नाहीं. त्यांच्या दृष्टीसमोर सदैव चक्रगदाधर उभा असतो. त्यामुळें ते अगदीं निर्भय असतात. त्यांना भगवंताच्या हातांतील चक्र म्हणजे सर्वतोभद्र सुदर्शन निःशंक शांति-सुखाची शाश्वती देत असतें. खरोखर तें चक्र म्हणजे स्वस्तिकच होय. त्याच्या हातांतील कौमोदकी गदा आपल्या नांवाप्रमाणें जगांतील दुर्जनतेचा दुर्गंध दूर करून या पृथ्वीला आपल्या पराक्रमानें कुमुदवत् मुदित करीत असते. भक्तांना तिच्या दर्शनानें दुष्टतेचें पारिपत्य होईल याची हमी मिळते आणि ते दुर्जनांच्या दुर्जनतेला भीक न घालतां आपली सज्जनता कधीं सोडीत नाहींत.

## ५४७. वेधा

"विदधाति इति वेधाः" अशी व्युत्पत्ति दिली जाते या पदाची, तथापि ती नियमित नाहीं. 'पृषोदरादित्वात् साधुः' म्हणावें लागतें. "यो ब्रह्माणं विदधाति पूर्वं यो वै वेदांश्च प्रहिणोति तस्मै" असें उपनिषद्वचन आहे. त्याचा अर्थ असा कीं सृष्टीच्या प्रारंभीं देवानें सृष्टिकर्ता प्रजापति निर्मिला आणि त्याला सृष्टिज्ञान-रूप वेद हि दिले. कोणता हि व्यापार करायचा झाला म्हणजे आधीं व्यापारी लागतो व त्याच्या जवळ व्यापारासाठीं भांडवल हि लागतें. हीं दोन्ही जुळलीं म्हणजे मग व्यापार होतो. त्याप्रमाणें देवानें आधीं स्रष्टा ब्रह्मदेव पैदा केला आणि त्याला स्वकार्योपयोगी ज्ञानरूप भांडवल पुरविलें आणि सांगितलें कीं कर आतां आपलें सृष्टिकर्म. हें सगळें विधान करणारा जो परमात्मा तोच इथें वेधा पदानें अभिप्रेत आहे. वेधा पदानें ब्रह्मदेवाचाहि उल्लेख केला जातो, पण तो अर्वाचीन आहे, गौण आहे. ब्रह्मदेवादि हे स्वतन्त्र नाहींत. ते नियुक्त आहेत आणि 'स्वतन्त्रः कर्ता' अशी कर्त्याची व्याख्या असल्यामुळें वेधाः म्हणजे विश्वकर्ता या पदानें परमात्माच अभिप्रेत आहे हें उघड आहे. विश् म्हणजे माणसें, जीव आणि त्यांनीं युक्त तें विश्व म्हणावयाचें. असें हें जीवनिकाय विश्व जो करतो तो विश्वकर्मा होय, वेधा होय. परमात्म्याची ही विश्वनिर्मिति कशी होते? "एकोऽहं बहुः स्याम् प्रजायेय" असा संकल्प जीवाच्या ठाईं आधीं उठतो. हाच ब्रह्मदेव होय. तो मग जीवधानी कुलायरूप सृष्टि करतो, आणि तिथें प्रजा वाढवीत जातो. प्रत्येक जीवाच्या ठाईं आढळणारी ही जी स्वाभाविक प्रेरणा तीच खरोखर सृष्टिकर्त्री आहे. तीच वेधा या पदवीस पात्र आहे. ती प्रेरणा ईश्वरी असल्यामुळें तिचें कार्य जें हें विश्व तें हि ईश्वरी आहे आणि म्हणून शाश्वत आहे.

## ५४८. स्वाङ्ग

स्वयमेव कार्यस्य करणे अङ्गं सहकारि अस्य इति स्वाङ्गः। शंकराचार्य अशी व्युत्पत्ति देतात या पदाची. ईश्वरानें हें जग निर्मिलें तेव्हां तें निर्मितांना त्यानें कोणते हात पाय वापरले? जी जी म्हणून सावयव वस्तु आहे ती नाश पावते असें आपण जगांत पाहतों. सांग वा सावयव शरीरालाच "जायते अस्ति वर्धते विपरिणमते अपक्षीयते म्रियते" हे षड्भाव लागू होतात. मग तें शरीर 'अणोरणीयान्' असो कीं 'महतो महीयान्' असो. तें नाश हें पावणारच. परंतु जिथें आकार नाहीं, छाया नाहीं, अणु नाहीं, भार नाहीं, गुण नाहीं त्या निर्गुण आत्मतत्त्वाला षड्भाव नाहींत, अर्थात् नाश हि नाहीं. तें परमात्मतत्त्वच इथें स्वाङ्ग म्हटलें आहे. त्याला वेगळें अंग नाहीं. सर्व वस्तूंत अंगंगिभाव असतो. परंतु परमात्मवस्तूंत तसा नाहीं. तें केवलस्वरूप आहे. त्याच्या ठाईं जें अंगी तेंच अंग म्हणावें लागतें. म्हणून तें स्वाङ्ग म्हटलें आहे.

स्वः आत्मा एव अङ्गं शरीरं यस्य सः स्वाङ्ग चंदनवत्। स्वङ्ग निराळें, स्वाङ्ग निराळें. ज्याचीं सर्व अंगोपागें सुंदर आहेत अव्यंग आहेत, तें स्वङ्ग म्हणावयाचें. परंतु स्वङ्ग झालें तरी तें षड्भाव-रहित नव्हेच. परंतु स्वाङ्ग हें षड्भाव-मुक्त आहे आणि म्हणून खरेपणानें तेंच स्वङ्ग होय. जें जरदङ्ग वा गलदङ्ग आहे तें स्वङ्ग कसें म्हणावें? जें नाशवंत आहे त्याला सुंदर म्हणतां येत नाहीं. सुळावर चाललेल्याला धन जन यौवन काय सुख देणार? काय गोड वाटणार? महमूद गजनवीनें हिंदुस्थानांत अनेक स्वाऱ्या केल्या आणि अपार लूट केली. सोनें रुपें हिरे माणकें यांनीं कोठार भरून ठेवलें. पण मरतांना बिचारा त्यांच्याकडे पहात ही अगणित संपत्ति आपल्याला सोडून जावें लागत आहे म्हणून ढळढळां रडत मेला. त्याच्या बरोबर एक फुटकी कवडी हि गेली नाहीं. त्याचा खजिना हि गेला नाहीं किंवा जनानखाना हि गेला नाहीं. जीवाबरोबर त्यानें आचरलेल्या धर्माहून वेगळें दुसरें कांहीं एक जात नाहीं. सगळें इथेंच सोडून जावें लागतें. धन, पशु, भार्या, जन, देह. म्हटलेंच आहे "धनानि भूमौ, पशवश्च गोष्ठे, भार्या गृहद्वारि, जनः श्मशाने। देहश् चितायां, परलोक-मार्गे कर्मानुगो गच्छति जीव एकः॥" आणि म्हणून सन्त एक धर्मच धरून राहतात आणि देह-गेहस्नेह सोडून देतात. त्यांच्या समोर सदैव स्वाङ्ग परमात्मा उभा असतो आणि त्यावरून ते आपलीं सर्व अंगोपांगें म्हणजे देह आणि देहानुगत सर्व भोग ओवाळून टाकतात. केवल तत्परायण होऊन राहतात. "किमीहः किंकायः स खलु किमुपायस् त्रिभुवनं किमाधारो धाता सृजति?" असा प्रश्न. त्याचें उत्तर 'स्वाङ्गः लुतावत्'. त्यानें हें सर्व स्वतःच निर्मिलें. त्याला बाह्य हात पाय उपाय वा उपादान कांहीं लागत नाहीं. आपल्या अचिंत्य सामर्थ्यानें हें जग तो स्वतःच निर्मितो म्हणून तो स्वाङ्ग.

## ५४९. अजित

जो कोणीं हि कधीं हि जिंकला नाहीं तो अजित होय. परमात्मा हा एकमेवाद्वितीय असल्यामुळें त्याला कोण नि काय जिंकणार? त्यामुळें तो अजित म्हटला आहे. त्याचे सगुण साकार ईश्वरी अवतार जरी घेतले तरी ते हि अजितच. त्या अवतारांना हि कोणी कधीं जिंकूं शकला नाहींच. आपल्या प्रतिपक्षावर त्यानें सदैव मातच केली आहे. ईश्वरी अवतार कोणत्या हि का रूपांत असे ना, त्याचा शब्द कधीं व्यर्थ जावयाचा नाहीं. वस्तुतः हीच अवताराची ओळखण आहे. ज्ञानदेवानें ठीक च म्हटलें आहेः " तयासि ओळखावया हेंचि खूण। जें जगें नमस्कारिजे तयाची आण " ईश्वरी सामर्थ्य आणि प्रभाव अचिंत्य आहे. त्या विरुद्ध जें क़ांहीं उठेल तें पडलेंच म्हणून समजा. राम आणि कृष्ण या अवतारांनीं वानरां आणि गुराख्यांकडून अद्भुत पराक्रम करविला. त्या वानरांची नि गुराख्यांची काय बुद्धि, काय शक्ति? परंतु तिथें भगवंताचें अधिष्ठान होतें. "याति हीन मति हीन, कर्म हीन" पण भगवच्छक्त्यनुगृहीत असल्यामुळें त्या क्षुद्र नरावानरांनीं अचाट शक्तीच्या राक्षसांना पछाडलें. ज्यांनीं जगाला त्राहि भगवन् करून सोडलें होतें त्या दैत्य-दानवांना असुर-राक्षसांना त्यांनीं नेस्तनाबूद केलें. असें ज्याच्या सेवकांचें सामर्थ्य त्या स्वामीच्या सामर्थ्याची कल्पनाच केलेली बरी. तो परमात्मा तर अजित आहेच आहे, पण त्याचे दास हि अजित आहेत. त्यांच्यावर जग कधीं हि विजय मिळवूं शकलें नाहीं. म्हणूनच गांधीजी म्हणत, सत्याग्रहाला पराजय ठाऊक नाहीं. तें सदैव विजयी तत्त्व आहे. सत्याग्रहाचा आधार तें अजित आत्मतत्त्व आहे. इतर कोणतें हि अनात्मबल त्याचा आधार नाहीं. सत्याग्रही आत्मनिष्ठ असल्यामुळें त्यावर जगांतील कोणत्या हि बळाची मात्रा चालत नाहीं. प्रह्लादादि सत्याग्रहींनीं हें वारंवार दाखवून दिलें आहे. हरिदासांची आत्मनिष्ठा अजित आहेच, तशी हरीची इच्छा हि अजित आहे.

इथें अजित पदानें त्या हरीच्या इच्छेचें सर्वातिशायित्व प्रकट केलें आहे. जित असा पाठ घेतल्यास जित म्हणजे स्वभक्त-जित म्हणावयाचें. बळीनें त्याला आपला द्वारपाळ बनविलें नाहीं काय?

## ५५०. कृष्ण

आरंभीं सातव्या श्लोकांत कृष्ण पद येऊन गेलें आहे. हें इथें एकोन साठाव्या श्लोकांत पुन: आलें आहे. विष्णुसहस्रांतील नामें व्यक्तिवाचक नाहींत, गुणवाचक आहेत. त्यामुळें एक कृष्ण म्हणजे भगवान् गोपाळकृष्ण आणि दुसरा कृष्ण म्हणजे कृष्ण द्वैपायन व्यास असा अर्थ लावून व्यवस्था करतां आली तरी तींत गुणवाचकत्व प्रकटत नाहीं. म्हणून कृष् धातूला कर्तरि आणि कर्मणि न प्रत्यय लागून कृष्ण म्हणजे कर्षण करणारा आणि कृष्ण म्हणजे कर्षिला गेलेला असे अर्थ लावतां येतील.

परमात्मा हा आपल्या अचिन्त्य गुणगौरवानें विश्वाला आकर्षून राहिला आहे. प्रत्येक जीवाच्या ठाई आत्मरूपानें राहून तो त्याचें परमप्रेमास्पद झाला आहे. त्यामुळें तो सहजच कृष्ण म्हटला गेला.

ह्या परमात्म्याचे अवतार हि असेच आकर्षक झाले आहेत. परंतु त्यांत देवकीपुत्र भगवान् कृष्ण विशेषत: कृष्ण म्हणजे आकर्षक झाला आहे. त्यानें आपल्या नाम-रूप-गुण-कर्मांनीं मोहून टाकलें होतें. त्याच्या मुरलीच्या मधुर रवानें गाई गुरें वृक्ष लता जल व जलचरें हि मुग्ध होऊन स्तब्ध होत. त्याच्या बोबड्या बोलांनीं आईबाप, मुरलीच्या बोलांनीं संवगडी आणि गीतेच्या बोलांनीं सारें विश्व मुग्ध झालेलें आहे. त्याचें शैशव कौमार तारुण्य व प्रौढत्व सर्वच आकर्षक आहे म्हणून तो कृष्ण आकर्षक आहे तसा आकृष्ट हि तोच आहे. परमात्म्याच्या ठाई त्याला परम प्रेमास्पद निजात्मा जाणून आकृष्ट होणारा प्रत्येक जीवच कृष्ण आहे. परंतु व्यासासारखे परमात्म्याचें अचिन्त्य माहात्म्य ओळखून ''तद्बुद्धयस् तदात्मानस् तन्निष्ठास् तत्परायणा:'' होणारे भगवद्-भक्त हे विशेषत: कृष्ण म्हणावयाचे. द्रौपदी अर्जुन आणि व्यास हे आर्त सखा आणि ज्ञानी भक्त कृष्ण पदवीस पात्र झाले होते. इथें कृष्ण पदानें शंकराचार्यांनीं व्यास घेतले आहेत आणि तें योग्यच आहे. ''मुनीनामप्यहं व्यास:'' म्हणून व्यासांचें भगवद्विभूतित्व प्रसिद्धच आहे. व्यक्ति ही वस्तुत: अव्यक्ताचाच प्रकाश आहे. त्यामुळें परिणामत: व्यक्तिवाचकें हि गुणवाचकेंच ठरतात—कर्ण म्हणजे औदार्य, व्यास म्हणजे ज्ञान, तद्वत्.

## ५५१. दृढ

परमात्मा हा सदैव स्वरूपस्थित असल्यामुळें तो दृढ म्हटला आहे. ''जें आपुलें साचें, तें कल्पान्तीं हि न वचे'' म्हणून त्यालाच धरून जो राहतो तो दृढ राहतो, भक्कम राहतो. उलट जें आपलें स्वरूप नाहीं, स्वभाव नाहीं, स्वधर्म नाहीं त्याचा जो आश्रय करतो तो अनात्मवश गौरव-च्युत होऊन भटकत भटकत राहतो. म्हणून सर्व वेद आणि संत म्हणतात :

''सुनु मन मूढ सिखावन मेरो। हरिपद-विमुख लह्यो न काहु सुख, सठ यह समुझ सबेरो।'' बाबा रे, स्वधर्मनिष्ठ वर्तून स्वभावानुसंधानानें स्वरूप-स्थित हो. अन्यथा तुला कुठें हि सुखविश्राम लाभणार नाहीं, तुला सर्वत्र भ्रमत रहावें लागेल. 'नक्र: स्वस्थानमासाद्य गजेन्द्रमपि कर्षति' मगर आपल्या मर्यादेंत राहून मर्यादातिक्रम करणाऱ्या गजेंद्राला देखील खेंचून नेतो. तद्वत् स्व-स्थ पुरुष अनाक्रान्त राहून जगाला जेर करूं शकतो. परमात्म्याहून अधिक स्व-स्थ दुसरा कोण असूं शकेल? म्हणून परमात्मा हा दृढ म्हटला आहे. त्यावर कोणाचीच कांहीं मात्रा चालत नाहीं. उलट त्याची मात्र सत्ता सर्वांवर चालते. परमात्म-केंद्र जगच्चक्राला स्वत: अविचल राहून, दृढ राहून, घुमवीत आहे. जे या दृढ केंद्राला धरून राहतात ते

सुटतात. जे त्याच्यापासून भटकतात ते भरडले जातात. समर्थ म्हणतात, 'जो चंचला भजेल। तो सहजचि चळेल। जो निश्चला भजेल। तो निश्चल चि।।' गीतेचा संदेश आणि आदेश हाच आहे ''सर्व-धर्मान् परित्यज्य मां एकं शरणं व्रज। अहं त्वा सर्व-पापेभ्यो मोक्षयिष्यामि मा शुच:'' जो दृढ परमात्म्याची उपासना करील तो दृढ होईल. त्यावर जगाच्या गतागताचा कांहीं एक परिणाम व्हावयाचा नाहीं. ''जगें येवोत जावोत ते अभंग जसे तसे.''

## ५५२. संकर्षण (अच्युत)

कल्पारंभीं युगपत् विश्वत: विश्वसृष्टि होते, तर कल्पांतीं युगपत् विश्वत: विश्वसंहार होतो. त्या संहारकार्याचा कर्ता तो संकर्षण म्हणावयाचा. आपण सूर्योदयाला पाहतों युगपत् विश्व धवलूं लागतें आणि प्रकटतें. सूर्यास्ताला तेंच अंधारतें आणि लोप पावतें. लोप पावतें म्हणजे नाहींसें होतें. पण नाहींसें होणें म्हणजे नष्ट होणें नव्हे, तर अगोचर होणें. ज्याचें मूळ शाश्वत आहे तें नि:शेष नाहींसें कसें होणार? या विश्वाचें मूळ तें शाश्वत ब्रह्म आहे. तें कल्पारंभीं आपल्या अजस्र शक्तीनें हा विश्व-विस्तार करतें. आणि तेंच कल्पान्तीं त्याचा समाहार करतें. हें समाहार-कर्मच त्याला संकर्षण-पदवीस पात्र ठरवतें. कालानुसार मूलगत अचिन्त्य शक्ति उत्स्फूर्त होऊन रसोत्कर्षवशात् पत्र-पुष्प-फलादि विविध सृष्टि करते आणि यथाकाल तीच समाहृत होऊन रसापकर्षवशात् सर्व पत्र पुष्प फल संभार विसृष्ट करून भूमिगत होऊन मूलस्थित होऊन राहते. या विश्ववल्लरीचा हि असाच प्रकार निरंतर चालू आहे. परमात्म्याची कालशक्ति जिच्यामुळें हें सृष्टिस्थितिसंहारचक्र अखंड परिवर्तमान आहे,. तिच्या एको आविर्भावाचें, संहारक आविर्भावाचें नांव आहे संकर्षण. या संकर्षणालाच शेष आणि अनन्त अशीं नांवें दिलीं आहेत. सृष्टीचा संहार झाल्यानंतर हि तो अवशिष्ट राहतो म्हणून शेष. आणि सबंध सृष्टीचा अंत झाला तरी त्याचा होत नाहीं म्हणून तोच अनन्त. कल्पान्तीं होणाऱ्या संहाराहून वेगळा प्रतिक्षणीं होणारा जो संहार तो हि संकर्षण-शक्तीनेंच होत असतो. परंतु तो एकसमयावच्छेदेंकरून होणाऱ्या सृष्टिस्थितिसंहाररूप विश्वाचा एक अंश असल्यामुळें लक्षांत येत नाहीं. तो अलक्ष्यगति आहे. शिवाय त्याचें स्वरूप अतर्क्य आहे. नदीच्या प्रवाहानें एकीकडे भू भूधर खचत असतात तर त्याच वेळेला दुसरींकडे ते रचत असतात. ही क्रिया सुसूक्ष्म असल्यामुळें आमच्या लक्षांत येत नाहीं आणि तिला सृष्टि म्हणावें वा संहार म्हणावें हें ठरत नाहीं वस्तुत: ही एक स्थिति च आहे ''गतिरूप स्थिति'' आणि जी गतिरूप आहे तिला स्थिति म्हणणें तुम्हांला विसंगत वाटत असेल तर म्हणा ''स्थितिरूप गति.'' कारण गतीनें तत्त्व-संख्येंत वा मात्रेंत कांहींच फरक पडत नाहीं. आणि जिथें फरक होत नाहीं त्यालाच तर स्थिति म्हणतात ना?

## ५५२. (संकर्षण) अच्युत

अच्युत म्हणजे आपल्या स्वत्वापासून न ढळणारा. परमात्मा हा सदैव स्वरूपीं प्रतिष्ठित असल्यामुळें तो अच्युत म्हटला आहे. हें पद पूर्वीच दोन वेळां येऊन गेलें आहे. परमात्म्याची ही अच्युतता सहज आहे. त्याला अनात्मधर्म स्पर्शूं शकत नसल्यामुळें तो अच्युत आहे, सर्वगत असल्यामुळें तो अच्युत आहे, सर्वशक्तिमान् असल्यामुळें तो अच्युत आहे. या सहज अच्युताचेंच स्मरण करून साधकानें हि ती अच्युतता आपल्या अंगीं बाणवली पाहिजे. परमार्थत: आपण अच्युतच आहोंत. आणि दिसणारे सर्व विकार अनात्मधर्म आहेत हें ओळखून इष्टानिष्ट प्रसंगीं हर्षामर्षरहित राहिलें पाहिजे. आणि क्वचित् चित्तांत क्षोभ झाला तरी तो इन्द्रियद्वारा वाणीद्वारा प्रकट होणारा नाहीं, याची खबरदारी घेतली पाहिजे. या लक्ष्मण-रेखेचें उल्लंघन होणार नाहीं याचा निर्धार

असला पाहिजे, निग्रह असला पाहिजे, अर्थात् बुद्धींत आत्मा हा अच्युत आहे, निर्विकार आहे हें तत्त्वत: ज्ञेयदर्शन झालेलें असलें पाहिजे, हा बोध ठसलेला असला पाहिजे. ही मूळ वस्तु आहे. त्यानंतर चित्तांत अक्षोभ्य शान्ति नांदली पाहिजे. चित्त आणि वाणी केव्हांहि विकारवश होतां कामा नये, उत्तप्त होतां कामा नये. चित्तांत रागभयक्रोध यांचे तरंग उठतां कामा नयेत. ही चित्तरक्षाच मुख्य कर्तव्य आहे. तथापि तें तितकेंसें सोपें नाहीं. तें ईश्वरी कृपेच्या अधीन आहे. म्हणून च गीतेंत म्हटलें आहे ''शाक्नोतीहैव य: सोढुं प्राक् शरीरविमोक्षणात्। कामक्रोधोद्भवं वेगं स युक्त: स सुखी नर:'' चित्तांत विकारांचे सूक्ष्म तरंग उठले तरी ते वाणींत आणि कृतींत उमटूं न देतां जिरविणें ही युक्ति तरी साधकानें मरणापूर्वी साधून घ्यावी. ही धर्ममर्यादा आहे. हें व्यवहाराचें सूत्र आहे. ही मर्यादा, हें सूत्र ज्यानें सांभाळलें आहे त्यानें आपलें आद्य कर्तव्य पार पाडलें. या इन्द्रिय- संयमाच्या पायावर मन:शांतीचें मंदिर आणि त्यावर आत्मज्ञानाचा कळस चढावयाचा आहे. गीतेनें जें आध्यात्मिक जीवनाचें महामंदिर रचिलें आहे, रेखाटलें आहे तें हें असें आहे. त्यांत जी परमात्म- देवता विराजमान आहे ती अच्युत आहे. संध्येंत केशव नारायण अशी नाममाला आली आहे. पण तत्त्वज्ञ शंकराचार्य ''अच्युतं केशवं रामनारायणम्'' असें गातात. त्यांनीं अच्युताला अग्रस्थान दिलें आहे. त्याची अग्रपूजा केली आहे. स्तोत्रकार शंकराचार्यांच्या समोर केशव नारायण हीं संध्येतलीं नामें उघडच आहेत. पण त्यांत त्यांनीं आरंभीं अच्युताला ठेवून दिलें आहे. हरीच्या आधीं त्यांचा हा ॐ आहे. 'हरि: ॐ' मध्यें ॐ च्या आधीं हरि उच्चारिला आहे. शंकराचार्य 'ॐ हरि:' म्हणत आहेत. ॐ म्हणजे निर्गुण परब्रह्म. हरि म्हणजे सगुण परमात्मा.

### ५५३. वरुण

वृणोति व्याप्नोति सर्वम् इति वरुण:। परमात्मा हा जगत्-कारण असल्यामुळें कारणात्मना तो हें सर्व कार्यात्मक विश्व व्यापून आहे आणि कारण हें कार्य-रूपाहून स्वतंत्र हि राहत असल्यामुळें तें कार्याला नुसतें व्यापूनच नाहीं तर वेढून हि आहे. म्हणजे कार्यातिरिक्त हि आहे. म्हणजे परमात्मा या विश्वाला आंतून आणि बाहेरून व्यापून आहे. ईशावास्यांत आलेंच आहे–तद् अन्तर् अस्य सर्वस्य तद् उ सर्वस्यास्य बाह्यत:।'' पुरुषसूक्तानें हि म्हटलेंच आहे–''एतावान् अस्य महिमा अतो ज्यायांश्च पूरुष:'' हें दृश्य कार्यरूप जगद्ब्रह्म म्हणजे त्या कारणात्मक परमात्म्याचा महिमा होय. पण तो कारणरूप परमात्मा ह्या महिम्याहून मोठा आहे. खूप खूप मोठा आहे. ''पादो ऽस्य विश्वा भूतानि, त्रिपाद् अस्यामृतं दिवि''हा दृश्य महिमा पादमात्र आहे. त्याचा अधिकतर भाग तर अदृश्य आहे, स्वर्गात आहे. हा सगळा व्यक्ताव्यक्त-महिमा वरुण पद प्रकट करतें.

''वरुणो यादसां अहम्'' म्हणून जी भगवंताची जलचर विभूति प्रसिद्ध आहे ती येथील वरुण पदाहून वेगळी म्हटली पाहिजे. येथील वरुण पद परमात्म-वाचक आहे, तद्विभूतिवाचक नाहीं. तथापि जल म्हणजे अव्यक्त आणि तद्गत म्हणून जलचर वरुण अशी कल्पना केल्यास विभूति आणि विभूतिमान् दोन्ही एक न म्हटले तरी अभिन्न झाले. वैदिक शब्द आध्यात्मिक स्वरूपाचे, पौराणिक आख्यायिका आधिदैविक स्वरूपाच्या आणि ऐतिहासिक घटना अधिभौतिक स्वरूपाच्या होत आणि तिन्ही एकमेकांचा निषेध वा विरोध न करतां बटमोगऱ्याच्या अनेक-दली फुलाप्रमाणें एकत्र नांदत असतात. आम्ही हातांत पाणी घेऊन जेव्हां एखादा संकल्प सोडतों तेव्हां त्या जलगँत वरुण देवतेच्या त्या अव्यक्त

सर्वगत अक्षर परमात्म्याच्या साक्षीनें तो संकल्प सोडत असतो. आमच्या हातांत तर साधें भौतिक पाणी असतें. परंतु तें पाशहस्त वरुण देवतेचें, त्या सर्वव्यापक परमात्म-सत्तेचें म्हणजेच वरुणाचें प्रतीक असतें आणि त्याच्या साक्षीनें आमचा संकल्प आणि धर्मकर्म होत असतात. तो सर्वगत सर्वसाक्षी परमात्मा आमचें मनोगत, वचन आणि कर्म महात आहे. त्याला आम्ही फसवूं शकत नाहीं. म्हणून त्याच्या साक्षीनें जें करूं तें सत्यच करूं. त्यांत कपट असणार नाहीं. असा हातीं जल घेण्याचा अर्थ.

## ५५४. वारुण (वारुण वृक्ष)

या श्लोकांतील पूर्वार्धांत आलेलीं ''संकर्षणो ऽच्युत:'' हीं दोन पदें शंकराचार्यांनीं सविशेषण एक नाम मानिलें आहे. परंतु मी तीं दोन पदेंच घेणें योग्य समजतों. कारण अच्युत हें संकर्षणाचें विशेष मानण्यांत कांहीं औचित्य नाहीं. उलट उत्तरार्धांतील वारुणो वृक्ष: हीं पदें जीं शंकराचार्यांनी दोन वेगळीं घेतलीं आहेत तींच सविशेषण एक नाम मानायला पाहिजेत. कारण वारुण म्हणून कोणी खास प्रसिद्ध नाहीं आणि परमात्म्याला केवळ वृक्ष म्हणण्यांत हि स्वारस्य नाहीं. पण 'वारुणो वृक्ष:' म्हणण्यांत औचित्य आहे. परमात्मा हा वरुण म्हटला आहे. वरुण म्हणजे सर्वव्यापी अव्यक्त पुरुष. त्याचा वंशविस्तार म्हणजे हें अनन्तकोटिब्रह्माण्ड होय. तोच वारुण वृक्ष. बीज आणि वृक्ष दोन्ही एकरूपच होत. तद्वद् वरुण आणि वारुण वृक्ष एक परमात्माच होय. एक बीजरूप दुसरा वृक्षरूप. एक भूमिगत अव्यक्त, तर दुसरा विश्वव्यापी व्यक्त. हें व्यक्ताव्यक्त समस्त विश्व परमात्मस्वरूप आहे हें ' वरुणो वारुणो वृक्ष:' या दोन पदांचें तात्पर्य होय.

वरुणस्य अपत्यं पुमान् वारुण: ''वसिष्ठो ऽ त्रिर् वा'' अशी वारुणाची व्युत्पत्ति आणि अर्थ दिला जातो आणि वारुण असें स्वतंत्र पद घ्यायचें तर असा अर्थ करणें भाग आहे. लोकांत वारुणी जशी प्रसिद्ध आहे तसा वारुण नाहीं. पण लोकांत नसला तरी तो वेदांत प्रसिद्ध आहे. ऋग्वेदांत्त वसिष्ठ-दृष्ट वरुण देवतेचीं चार दोन सूक्तेंच नाहींत, मंडलचें मंडल आलें आहे. त्यामुळें वारुण म्हणजे वसिष्ठ हा अर्थ योग्यच आहे. हा पितृपुत्ररूप रक्तवंश कीं गुरुशिष्य-रूप विद्या-वंश म्हणावा? इथें तो उभयरूप दिसतो.

वसिष्ठ विद्या आणि विनय यांनीं संपन्न अशा ब्राह्मण्याचा म्हणजे ज्ञानविज्ञान-संपन्न परमोच्च व्यक्तित्वाचा आदर्श आहे. त्यांचें दर्शन आणि दैवी गुणसंपद् यांनीं वेद-पुराणें भरून गेलीं आहेत. उघडच असें जीवन प्रात:स्मरणीय झालें. देवाचें प्रतिनाम झालें, प्रतिमान झालें.

## ५५५. वृक्ष

प्रत्येक भूत जर त्या परमात्म्याचाच आविर्भाव आहे तर वृक्ष हि त्याचेंच नांव आहे, यांत काय नवल? ''केषु केषु च भावेषु चिन्त्योऽसि भगवन् मया'' या प्रश्नाचें उत्तर देतांना भगवान् आपल्या आत्मविभूति सांगतात त्यांत ''अश्वत्थ: सर्व-वृक्षाणाम्'' म्हणून वृक्ष-विभूति हि आली आहे. पण तिथें अश्वत्थ ही विभूति आहे, वृक्ष नव्हे. वृक्ष ही साधी विभूति म्हणावयाची. इथें वृक्ष हीच विभूति आहे. प्रत्येक वृक्ष भगवद्-विभूति च आहे. लहान मोठा कोणता हि वृक्ष निरर्थक नाहीं. तो सर्वांगानें उपयोगी आहे म्हणजे अत्यन्त उपयोगी आहे. तो छाया पत्र पुष्प फल देतो. इन्धन देतो. अन्न आणि औषधी देतो. वस्त्र देतो, घर देतो. आणि केवळ द्विपादांनाच नव्हे तर चतुष्पादांना हि. केवळ भूचरांनाच नव्हे तर खेचरांनाहि आणि जलचरांना सुद्धां. खरोखर चराचर सर्वच जीवांचा तो उपजीव्य आहे. परार्थ जीवनाचा तो आदर्शच आहे. जीवाची आद्येष्टि आणि अन्त्येष्टि त्याच्याच समिधांनीं होते. त्याचा जीवनयज्ञ हि

त्याच्याच आहुतींनीं संपन्न होत असतो. प्राण्यांच्या दुधावर आणि मांसावर हि जीव जगत असतो. पण तें दूध आणि तें मांस हि तृण-वीरुध आणि वृक्ष वनस्पति पचवूनच तयार झालेलें असतें. मासे शैवाल जातीय तृणवनस्पति खाऊन पुष्ट होतात. अजहरिणादिक हि तृणादिकांवरच पुष्ट होतात. आणि अशा शाकाहारी प्राण्यांचेंच मांस मांसाहारी प्राण्यांना लागतें. मांसाहारी प्राण्यांचें मांस कोणी पसंत करीत नाहींत. म्हणजे मूलतः सर्वांचें उपजीव्य वनस्पतिजगतच आहे. आणि याच दृष्टीनें शाकाहार हाच आहार आहे. वृक्षाचें विभूतित्व यांतच आहे. असा हा वृक्ष वृश्च् धातूवरून व्युत्पादिला जातो. आणि वृक्ष म्हणजे छेद्य असा अर्थ केला जातो. पण खरोखर वृक्ष उच्छेद्य नसून संवर्धनीय आहे. संगोपनीय आहे. वृक्षांचा नाश म्हणजे आपल्या मित्रांचा नाश होय. वृक्षांना मी आपले हिरवे मित्र म्हणतों. ते शाश्वत संपत्तीचे स्वामी आहेत, श्रीपति आहेत. श्री म्हणजे शोभा आणि श्री म्हणजे संपत्ति या दोन्ही अर्थांनीं तें श्रीपति होत.

## ५५६. पुष्कराक्ष

पुष्कराक्ष पद पूर्वी पांचव्या श्लोकांत एकदां येऊन गेलें आहे. इथें एकोणसाठाव्या श्लोकांत तें पुन्हां आलें आहे. 'पुष्कराक्षो महास्वनः' आणि 'पुष्कराक्षो महामनाः' दोहोंत पुष्कळच साम्य आहे. विशेषतः ध्वनि-साम्य. शब्द (म्हणजे ध्वनि) आणि अर्थ यांत अक्षर तत्त्व ध्वनिच आहे आणि अर्थ तर बदलत जातो. देशकालनिमित्त-भेदानें त्याचे अर्थ बदलत जातात. संस्कृतांत अश्व म्हणजे घोडा. तोच इंग्रजींत ॲस म्हणजे गाढव होतो. केवढा झाला हा अर्थ-भेद! पण शब्द तोच. तोच हा शब्द अशी प्रतीति त्यांच्या अक्षरावरून होते. भवभूति रामगुखानें म्हणतो–

पुरा यत्र स्रोतः पुलिनमधुना तत्र सरितां
विपर्यासं यातो घनविरलभावः क्षितिरुहाम्
बहोर् दृष्टं कालात् अपरमिवमन्ये वनमिदं
निवासः शैलानां तदिदमिति बुद्धिं द्रढयति।।

डोंगर स्थायी आहेत, नद्यांचे प्रवाह व वनें अस्थायी. तसें अक्षर स्थायी आहे, अर्थ अस्थायी आहे. म्हणून नित्यानित्यविवेकी नित्याचें वरण करून अनित्याविषयीं वितृष्ण होतात.

पण ह्या प्रकारें तर पदांची पुनरावृत्ति होते! खरें आहे. पण पुनरावृत्ति हा ग्रंथाचा दोषच नाहीं गुण हि आहे. तात्पर्य-निर्णयाचें तें एक लिंग म्हणजे गमक आहे. आणि ग्रंथकाराचें हृद्गत समजण्याला तें उपयोगी आहे.

पुनरुक्तीचा दोष-परिहार आनुपूर्वीभेदानें आणि अर्थभेदानें होतो हें पूर्वी दाखविलेंच आहे. त्या विचारानुसार येथील आनुपूर्वी वेगळी आहेच आणि अर्थाच्या भेदाचा हि विचार होऊंच शकतो. पूर्वी पुष्कराक्ष म्हणजे 'पुष्करे इव अक्षिणी यस्य सः पुष्कराक्षः' असा उपमित-बहुव्रीहीचा अर्थ घेतला आहे. इथें तो पुष्कराणि एव अक्षीणि यस्य सः पुष्कराक्षः असा अवधारण-बहुव्रीहीचा अर्थ घ्यावयाचा. हीं पुष्करें कोणतीं? आकाशांत सूर्यचंद्रतारका आणि भूमीवर कमलादि पुष्पेंच पुष्करें होत.

शंकराचार्य हें पद ''पुष्करं हृत्पुण्डलीकं अक्षति व्याप्नोति इति पुष्कराक्षः असें लावतात. म्हणजे जो निर्मल शुद्ध हृदयांत वसतो तो परमात्मा पुष्कराक्ष झाला.

## ५५७. महामना

महत् मनः यस्य सः महामनाः। मोठें आहे ज्याचें मन तो महामना म्हणावयाचा. पण मोठें म्हणजे काय? आणि मन म्हणजे तरी काय? ''संकल्पविकल्पात्मकं मनः'' अशी मनाची व्याख्या केली जाते. हत्तीचा कान जसा कधीं निश्चळ असत नाहीं, सतत चळवळ करीत असतो तसें आपलें मन कांहीं ना कांहीं व्यापार करीत असतें. झोपेंत हि तें स्वस्थ बसत नाहीं. तिथें त्याचें

व्यापार स्वप्नाकार धारण करीत असतात. सुषुप्तींत तें निःस्पंद होतें असें म्हणतां येईल. पण तिथें हि तें नव्या जोमानें उसळी घेण्यासाठीं जणूं दबा धरून असतें. म्हणजे तें सक्रियच असतें. एकूण काय कीं त्याला स्वस्थता म्हणून ठाऊक नाहीं. आतां हें जीवाचें मन लहान म्हणायचें कीं मोठें? त्याचे संकल्प विकल्प क्षुद्र असतात म्हणून तें क्षुद्र म्हणजे लहान होय. पण ईश्वराचे संकल्प विकल्प विश्वाची घडामोड करणारे होत म्हणून त्याला महामना म्हणावयाचे. कुत्र्याचें मन हाडें नि कुत्री आणि माणसाचें मन पेढे नि स्त्री यांत गुंडाळलेलें असतें. दोहोंचें हि सार हें कीं जीवाला "अशनापिपासे एव अभिमते भवत: " त्याला खाणें पिणें नि मैथुनसुखच हवें हवेंसें वाटतें. त्याच्याबाहेर त्याच्या मनाची उडी नाहीं. परंतु परमात्म्याचें मन विलक्षण आहे. तें विश्वाची घडामोड करीत असतें. त्याला जीवांच्या कामनांचा नि संकल्पांचा स्पर्श नसतो. या महापुरुषाचे जे सेवक ते भगवद्-भक्त हि असेच महान् असतात. 'अन्या जगद्धितमयी मनसः प्रवृत्तिः' असते त्यांची. त्यांना आपला स्वार्थ नसतो, भूतहितेरति असते, आणि करुणा-परवश होऊन ते वर्तत असतात. "महान्तस् ते समचित्ताः प्रशान्ता विमन्यवः सुहृदः साधवो ये" अशी आहे महन्ताची म्हणजेच महामनांची व्याख्या.

## ५५८. भगवान्

भगवान् हें पद केवळ एका परमात्म्यालाच लावलें जातें. त्याला दुसरा कोणी हि पात्र नाहीं. अलीकडे आणि पूर्वी हि भगवान् पद गौरवानें थोर पुरुषांना जोडलें गेलें आहे. पण तो केवळ अन्याय आहे. भगवान् श्रीधरस्वामी, भगवान् रमण महर्षि, भगवान् रामकृष्ण, भगवान् पाणिनि इत्यादि. या प्रयोगांत विवेक नाहीं, मर्यादा नाहीं, औद्धत्य आणि अहंकार आहे. जे खरे थोर असतात ते तर आपल्याला दास म्हणून घेतात. त्यांतच आपला गौरव समजतात. उलट त्या दासांच्या चरणरजाची हि लायकी नसणारे आपल्याला स्वतःच भगवान् बिरुद लावून मिरवतात. अथवा दुसरे त्या पदानें आपल्याला गौरवितात हा अन्याय खुशाल चालू देतात. हिन्दु धर्मांत गुरुवादानें विवेकहीनता आणि अमर्यादता बोकाळली आहे. या मूर्खतेला आणि अत्याचाराला गुरु शिष्य बळि पडले आहेत. मानवाची मूर्ति मंदिरांत स्थापणें आणि त्याची पूजा अर्चा करणें हें गर्ह्य आहे. पण हे असले चाळे रामकृष्ण मिशन सारखे संप्रदाय धर्माच्या नांवावर चालवीत आहेत. ब्राह्मसमाजानें ईश्वरी मूर्तीचाच निषेध केला तर रामकृष्ण संप्रदायानें गुरूचीच मूर्ति स्थापण्याचा अत्याचार मांडला आहे. खरा हिंदुधर्म या दोन्ही टोकांना टाळून मध्यस्थ मार्ग प्रतिपादितो. तो थोरांत थोर मानवाला हि देव बनवून त्याचे देव्हारे करणें अक्षम्य समजतो आणि अचिंत्य सामर्थ्याच्या अव्यक्त परमेश्वराची मूर्तिपूजा क्षम्य मानतो. ही क्षम्याक्षम्यता कशाच्या आधारें ठरविली? भगवान् पदाच्या व्याख्येच्या आधारें. भग आणि भगवत् पदाची व्याख्या पुढील दोन श्लोकांत आली आहे:

"ऐश्वर्यस्य समग्रस्य धर्मस्य यशसः श्रियः। ज्ञानवैराग्ययोश्चैव षण्णां भग इतीरणा" तथाच उत्पत्तिं प्रलयं चैव भूतानां आगतिं गतिम्। वेत्ति विद्यां अविद्यां च स वाच्यो भगवान् इति" या श्लोकांत वर्णिलेली योग्यता कोणत्या हि देहधारी जीवाच्या ठाईं संभवत नसल्यामुळें भगवत् पदवीस तो पात्र होऊं शकत नाहीं. म्हणून भगवत्पदवाच्य तो एक अव्यक्त अक्षर परमात्माच होय.

## ५५९. भगहा

ऐश्वर्य आणि श्री, धर्म आणि यश, ज्ञान आणि वैराग्य या कार्यकारण भावानें निगडित असलेल्या जोड्या आहेत. जिथें ऐश्वर्य तिथेंच श्री असावयाची. जिथें धर्म तिथेंच यश असावयाचें. जिथें ज्ञान तिथेंच वैराग्य असावयाचें. या षड्गुणांपैकीं तीनच तुम्हांला

मिळतील असें म्हटल्यास निवड करावयाची ती ऐश्वर्य, ज्ञान आणि धर्म यांचीच करावी लागेल. ते हस्तगत झाले म्हणजे उरलेले तीन गाई मागें वासरूं यावें तसे येतील. या तिहींचीं शास्त्रीय नांवें सत् चित् आनन्द अशीं आहेत. परमात्मा सच्चिदानन्दविग्रह आहे. ईश्वर षड्गुणैश्वर्यसंपन्न भगवान् आहे. एक वेदान्त-परिभाषा आहे, दुसरी तदाधारें पौराणिक परिकल्पना आहे. सूर्याची जशी सौरी प्रभा चन्द्राची जशी कौमुदी त्याची नित्य अंगभूत असते तसे हे त्रिधर्म वा षड्गुण परमात्म्याचे अंगभूत होत. म्हणून तो सच्चिदानन्द-विग्रह म्हणावयाचा, भगवान् म्हणावयाचा. हे गुण त्याला आपल्या पासून केव्हांहि दूर करतां यावयाचे नाहींत म्हणून त्यांना विग्रह म्हणजे विशेषत: वेढून बसलेले अर्थात् शरीर म्हटलें आहे. शरीर शब्द शीर्ण होणारें म्हणजे फाटून गळून पडणारें या अर्थाचा आहे, तर विग्रह शब्द घट्ट चिकटून बसणारा या अर्थाचा आहे शरीर अनात्म, परधर्म आहे. विग्रह स्वरूप, आत्मधर्म आहे. जीवाला शरीर आहे, परमात्म्याला विग्रह आहे. तो भगवान् परमात्मा जीव ज्याला भग म्हणजे भाग्य समजून बसला आहे त्या अनात्म शरीराचे आणि तदनुगत भोगांचें कालरूपानें सतत हनन करीत असतो त्याला आत्मलाभ करून देण्यासाठीं. म्हणून तो भगवान् परमात्माच भग-हा म्हणावयाचा.

भं आकाशं गच्छति व्याप्नोति इति भगं तेज:। भं शून्यं विनाशं गच्छति इति भगं शरीरम्। या दोन प्रकारें मी भगपद व्युत्पादितों आणि तदनुसार भगवान् आणि भगहा पदें लावतों.

## ५६०. आनन्दी (अनन्दी-नन्दी)

परमात्म्याला दु:खाचा स्पर्शच होऊं शकत नसल्यामुळें तो सहजच आनन्दी म्हणावयाचा. आनन्द हा त्याचा स्वभावच आहे. आणि स्वभाव हा कधीं हि दुरावत नसल्यामुळें तो आनन्दी, सदैव आनन्दी होय. ज्यांचें सुख बाह्यावर अवलंबून असतें स्वभावगत नव्हे तर परभावगत असतें ते कधीं सुखी तर कधीं दु:खी होणार हें ठरूनच गेलें. जीवाचें सुख हें असें बाह्यावर परधर्मावर अनात्मधर्मावर, अवलंबून असल्यामुळें तो कधीं हि आनन्दी म्हणतां यावयाचा नाहीं. त्याचा दिसणारा आनंद पाहतां पाहतां नाहींसा होतो, इतकेंच नव्हे तर दु:खरूप धारण करतो. अशा बेभरवंशाच्या आनन्दाला आनन्द कसें म्हणावें ? तो आनन्द म्हणजे तोतया होय. तो खरें म्हणजे दु:खच म्हटला पाहिजे. मायावी राक्षस किती हि मोहक रूप घेऊन आले तरी ते मेले म्हणजे आपलें खरें राक्षसी रूप धारण करीत. तिथें त्यांची माया टिकत नसे. तसेंच या नामधारी आनंदांचें आहे. ते निमाले म्हणजे त्यांची दु:खरूपता उघडी पडते. त्यांचें मायावीपण जे ओळखतात ते त्यांच्या योगें फसत नाहींत. जगाच्या मायावीपणाला अनुलक्षून भगवान् स्पष्टच गीतेंत म्हणतात:

''अनित्यं असुखं लोकं इमं प्राप्य भजस्व माम्।'' बाबा रे सगळें जग हें अनित्य आहे आणि तें असुख हि आहे. नित्यत्वाचा आणि सुखरूपत्वाचा त्यावर जो आरोप केला जातो तो भ्रान्ति आहे. त्या मृगजळाच्या मागें लागूं नको तर मला भज. आत्मजीवन जग. तेंच तुला शाश्वत आनन्दलोकाला पोंचवील. जग हें अनित्य आहे म्हणून तें दु:खरूप आहे असें नव्हे, दु:ख हें अनित्यतामूलक आहे असें नव्हे, तर तें अनित्य तर आहेच पण स्वतंत्रपणें दु:खरूप हि आहे. अनित्य असो अगर नसो तें दु:खरूपच आहे. जे अनित्यतेच्या कारणानें संसारापासून विरक्त होतात त्यांचें वैराग्य कच्चें. पण जे संसार हा समग्र दु:खच आहे याची खूणगांठ बांधून विरक्त होतात त्यांचें वैराग्य सच्चें. अशा सच्चा लोकांनाच आनन्दी परमात्म्याचें, परमात्म्याच्या आनंद-लोकाचें दर्शन होतें. ''बाह्य-स्पर्शष्वसक्तात्मा विन्दत्यात्मनि यत् सुखम् । ब्रह्मयोग-युक्तात्मा सुखमक्षयमश्नुते।।''

## ५६१. वनमाली

''वनमाली हलायुधः '' ही जोडी आहे. कृष्ण बलराम यांची ती वाचक आहे. वयोनुक्रमानें ती रामकृष्ण अशी म्हणजे हलायुधो वनमाली अशी यायला पाहिजे होती. परंतु हा क्रम नायकोपनायक नामानें आला आहे. रामावतारांत राम नायक व लक्ष्मण सहायक झाला. आणि वयोनुक्रम हि तसाच होता. राम वडील, लक्ष्मण धाकटा. परंतु कृष्णावतारांत वडील बलराम आणि धाकटा आहे कृष्ण. तथापि नायक कृष्णच आहे आणि बलराम उपनायक अथवा सहकारी आहे. नरनारायणावतारांत हि तसेंच आहे. ज्यांचीं जीवनकार्यें अभिन्न होतीं आणि जे जुळे नसून जुळ्याप्रमाणें राहिले असे हे नरनारायण, रामलक्ष्मण, रामकृष्ण संयुक्त वा जोड अवतार होत.

'वनमाली हलायुधः' हा जोड अवतार दुसऱ्या हि प्रकारें जोडच आहे. वनमाळी म्हणजे गोपाल आणि हलायुध म्हणजे शेतकरी. गोपालन आणि कृषि हा एक जोड धंदा आहे. ते परस्पर पूरक आहेत. वनसंवर्धन गोपालन आणि कृषि हा एक संपूर्ण कार्यक्रम आहे आणि तोच विश्व-संजीवन आहे. त्याच्या विकासासाठीं राजा. विश्व-संजीवनाच्या आड येणारे कंस जरासंध राजे जीवनद्रोही असुर म्हणून कृष्णानें त्यांचा हस्तें परहस्तें कांटा काढला, आणि जगाचें जीवन निष्कंटक केलें. हें धर्मसंस्थापन होय. त्यासाठींच परमात्मा वारंवार अवतार घेतो.

''वनानां माला वनमाला तद्वान् असौ वनमाली'' असा या पदाचा विग्रह आणि व्युत्पत्ति. परंतु कोणाहि व्यक्तीला अशी वनांची माला अंगावर लेणें शक्य नाहीं. म्हणून वन म्हणजे वन्य पुष्पें असा अर्थ केला जातो आणि वन्य पुष्पांची माला घालणारा भगवान् कृष्ण वनमाली म्हटला जातो. परंतु हा वस्तुतः विश्वाकार परमात्मा आपल्या अंगावर वनांच्यामाळा मिरवत नाहीं काय? आणि म्हणूनच परमात्मा हा वनमाली होय. केवळ वन्य पुष्पांच्या माळा घालतो म्हणून नव्हे.

## ५६२. हलायुध

हल म्हणजे नांगर ज्याचें आयुध आहे तो हलायुध बलराम होय. आयुध शब्दापासून आउत शब्द आला आहे. आउतें निराळीं, हत्यारें निराळीं अशी कल्पना कित्येक करतात. आणि म्हणतात, आयुधें म्हणजे आउतें हीं शेतीचीं औजारें, विधायक उपकरणें होत आणि हत्यारें म्हणजे युद्धाचीं औजारें, हत्येचीं विनाशक साधनें होत. पण धात्वर्थानें पाहिलें तर आयुध म्हणजे आउत हें युद्धाचें साधन ठरतें आणि हतियार हें हस्तकार म्हणजे हस्तोपकरण ठरतें जसें हतोडा. हत्या शब्दाशीं अर्थाअर्थी त्याचा कांहीं संबंध नाहीं. आतां या आयुधांनीं लढायचें कुणाशीं आहे? हलानें शेतीशीं शेतींतील अडचणींशीं झगडायचें आहे. म्हणजे हली मुसली हा शेतकरी आहे. तो नांगरून शेती पिकवतो व पीक निघालें कीं तें मुसळानें कांडून व सुपानें पाखडून चोख दाणा कणगींत भरून ठेवतो.

'इस समस्या का हल' असा प्रयोग हिंदींत होतो. तिथें हल म्हणजे सोडवणूक. शेतीच्या कठिण प्रश्नांची सोडवणुक हल म्हणजे नांगर करतो म्हणून तो सर्व सोडवणूकीचें साधन झाला आहे. आणि खरोखर अन्न समस्येचा हल हलावाचून दुसरा नाहीं आणि म्हणून समस्यांची समस्या जी अन्नसमस्या, अन्नसंकट त्याचें निवारण हलच आहे. तें ज्याचें आयुध तो जीवनोपयोगी परिश्रम करणारा शेतकरी हाच हलायुध होय. तो परमात्मा होय. हा हली परमात्मा दूर कुठें दडलेला नाहीं. तो तुमच्या भोवतीं शेतांतून उन्हांत राबत घाम गाळत आहे, पावसांत भिजत आहे, हिंवांत कुडकुडत आहे. फाटक्या कपड्यांत उपाशा पोटीं तुमच्यासाठीं

कापूस आणि हापूस, ज्वारी आणि बाजरी, डाळी आणि साळी, गहूं आणि बहु पिकवीत आहे. तो कमरेवर हात देऊन नुसता उभा नाहीं.

### ५६३. आदित्य

''अदितेः अपत्यं पुमान् आदित्यः'' अदितींचा पुत्र तो आदित्य म्हणावयाचा. भगवान् वामन, अदिति आणि कश्यप महर्षि यांचा पुत्र, इथें आदित्य पदानें विशेषतः अभिप्रेत आहे, असें म्हणतां येईल. अथवा आदित्य म्हणजे अदितिपुत्र देवमात्र घेतां येतील. जो जो अदितिपुत्र आदित्य तो तो परमात्मस्वरूपच होय.

प्राची दिशा म्हणजे अदिति होय. तिच्यांतून उगवणारा प्रत्येक तारा आदित्य होय, देव होय. परंतु त्यांत सर्वांत तेजस्वी जो सूर्य तो विशेषतः आदित्य म्हटला जावा हें स्वाभाविकच आहे. त्यालाच पुढच्या पदांत ज्योतिरादित्य म्हटलें आहे. अर्थात् तद्‌विरुद्ध इथलें आदित्य पद देवांतील आदित्य जो वामनावतार विष्णु तद्‌वाचकच समजावयाचें.

''आदित्यानां अहं विष्णुः''या वचनाच्या आधारें देवांमध्यें श्रेष्ठ देव जो विष्णु तोच इयें आदित्य पदानें अभिप्रेत आहे असें म्हणावें. हा विष्णु आणि वामन दोन नव्हेत. वामनच त्रिविक्रम होऊन त्रिलोकांत व्याप्त झाला म्हणून त्याला विष्णु पदवी प्राप्त झाली आहे. अदितीच्या सर्व पुत्रांत धाकटा म्हणून तो वामन म्हटला गेला आणि त्रिविक्रमशाली म्हणून विष्णु, व्यापनशील.

सूर्यास्तानंतर पूर्व क्षितिजावर उगवणारे सर्व चंद्र तारे येऊन गेल्या नंतर शेवटीं सूर्य उगवतो आणि तो उगवल्यानंतर, कोणी उगवतांना दिसत नाहीं. म्हणून तो सर्वांत धाकटा.

''आदित्यो ज्योतिरादित्यः'' हीं पदें आणि गीतेंतील ''आदित्यानां अहं विष्णुः ज्योतिषां रविरंशुमान्'' हीं वचनें क्रम आणि तात्पर्य यांत समान आहेत. गीता व विष्णु सहस्र यांचें ग्रंथ-कर्तृत्व एकाच व्यक्तीचें आहे असें यावरून सूचित होतें असें म्हणतां येईल.

आदित्य आणि ज्योतिरादित्य दोन्ही वस्तुतः अभिन्न आहेत. एक आधिदैविक तर दुसरा आधिभौतिक आहे. पण दोहोंचा हि द्वादशसंख्येशीं संबंध नाहीं. इथले आदित्य असंख्यच आहेत.

### ५६४. ज्योतिरादित्य

मूल आध्यात्मिक तेजच आदित्य वा देव या पदवीस पात्र होय. त्यावर उपासनेसाठीं पुरुषत्वाचा जो आरोप तो आधिदैविक आदित्य विष्णु म्हणावयाचा. आणि प्रत्यक्षांत जो सर्व-लोक-नमस्कृत तेजोराशि सूर्य तोच आधिभौतिक ज्योतिरादित्य होय. सर्व प्रकाश त्या एका अव्यक्त अक्षर परमात्म्याचाच आहे. म्हणून आम्ही एखाद्या अति स्थूल भौतिक पदार्थाचा सूर्याचा, यज्ञीय अग्नीचा वा सायं दीपाचा पूजादि उपचार करतों तेव्हां तो अनाठाईं नसतो. तो यथास्थानच असतो. कारण तो उपचार त्या अव्यक्त अक्षर पुरुषाचाच असतो. आम्ही सूर्याची उपासना करीत नाहीं, तर सूर्यनारायणाची करतों. सूर्य-बिम्बाच्या रूपानें प्रकटलेल्या त्या नारायणाचीच करीत असतों. सबंध हिंदु धर्माच्या आचार विधीचा हा मूलाधार आहे. हिन्दुधर्मांत काय काय विचित्र आचार आहेत! दगडाची पूजा, झाडाची पूजा, पशूची पूजा, पक्ष्यांची पूजा, सर्पाची पूजा, जलचराची पूजा, लिंग आणि मूर्ति, अश्वत्थ आणि तुलसी, गाय आणि नंदी, गरुड आणि कावळा, नाग आणि साप, कासव आणि कालव—एक ना दोन सहस्रावधि पूज्य देवता आहेत. त्या सर्व त्या अव्यक्त परमात्म्याच्या गुणमूर्ति होत, विभूति होत. त्यांची पूजा ही त्यांची नसून त्या परमात्म्याची असते. पण हें हिन्दु धर्मांतील रहस्य बाहेरच्या लोकांना कळत नाहीं आणि केव्हां केव्हां हिन्दु म्हणवणाऱ्या लोकांना हि आकळत नाहीं. त्यामुळें ते त्याचा निषेध करतात वा उपेक्षा करतात.

गांधीजींनीं हि अशाच मुळें आपल्या प्रातःस्मरणांतून सूर्याला बाद केलें आहे. त्या स्मरणांत भूदेवता आहे, सरस्वती आहे, गुरु आहे, विष्णु आहे, महादेव आहे पण सूर्य नाहीं. कारण सूर्य म्हणजे अगदीं स्थूल भौतिक वस्तु! किटसन बत्तीचा मोठा प्रकार! त्याचें काय स्मरण करायचें? अशी तुच्छ भावना. पण यांत हिन्दु धर्माच्या तत्त्वांच्या आणि शंकराचार्यांनीं लावून दिलेल्या पंचायतनपूजा व्यवहाराचा हि अनादरच दिसून येतो. पण मानवाचें अज्ञान क्षम्यच आहे. आणि त्यामुळेंच तो परमात्मा सहिष्णु झाला आहे.

## ५६५. सहिष्णु

(१ सहन करणारा २ जिंकणारा)

शिव शक्ति गणपति सूर्य आणि विष्णु या पांच देवतांची उपासना करावी अशी पंचायतन व्यवस्था शंकराचार्यांनीं लावून दिली. या पांचांत सूर्य आणि विष्णु एक गट आहे, शिव शक्ति गणपति हा दुसरा गट आहे. दोन गटांचे प्रमुख अर्थात् शिव आणि विष्णु होत. "एको देवः केशवो वा शिवो वा" या कविवचनांत हि या विचारालाच पुष्टि देण्यांत आली आहे. तथापि नीट पाहिल्यास सूर्य हीच मुख्य देवता असून तीच लोके वेदे च प्रथित आहे. सर्व वेदांचें सार गायत्री मंत्र या सवितृदेवाच्याच तेजाचें ध्यान करायला सांगत आहे. त्याची मूर्ति स्वयंभू आहे. ती घडवावी लागत नाहीं, स्थापावी लागत नाहीं. तिचें आवाहन नाहीं, विसर्जन नाहीं, तिचा पूजा प्रकार हि अत्यंत साधा आहे. नम्रतेनें दोन हात जोडले कीं झालें काम! सूर्योदयाला सर्व लोक त्याला नमस्कार करतात. सूर्यास्ताला हि परत करतात. वैदिक धर्माप्रमाणें प्राचीन पारशी धर्म हि सूर्योपासकच आहे. अशा या सूर्य देवतेची उपेक्षा कशी होऊं शकेल? तथापि उपेक्षकांना हि तो सहस्राक्ष परमात्मा क्षमाच करतो. तो जीवांच्या अज्ञानाची कींव करतो. त्यानें न्याय करावयाचा म्हटल्यास कोण वांचूं शकेल? सर्व दण्डित होतील. पण तो परमात्मा सहिष्णु आहे. तो सर्व सहन करतो आणि आशा बाळगतो कीं हे जीव आपलें अज्ञान उमगतील आणि आपल्याला भजतील.

सह् धातू ला स्नु प्रत्यय लागून जयिष्णु स्थास्नु इत्यादींप्रमाणें हा शब्द बनला आहे. सह् धातु वैदिक आहे. आणि त्याचा अर्थ जिंकणें, मात देणें असा आहे. म्हणजे सहिष्णु आणि जयिष्णु हे एकार्थक झाले. सहिष्णु मध्यें कसोटीला उतरून जिंकणें असा भाव आहे. निघर्षण-च्छेदन-ताप-ताडणांनीं कनक-कसोटी होते. त्यांत तें उतरलें म्हणजे तें जिंकलें. परमात्मा हा तसा सर्व संकटांना पुरून उरतो म्हणून तो सहिष्णु म्हणावयाचा. "हिरा ठेवितां ऐरणीं। वांचे मारितां जो घणीं। तोचि मोल पावे खरा। करणीचा होय चुरा।" परमात्मा खरा हिरा आहे. तो सर्व आघात सहन करून त्यांवर विजय मिळवितो. म्हणून तो सहिष्णु.

## ५६६. गतिसत्तम

गति म्हणजे मरणोत्तर जीवाचें गन्तव्य स्थान. अशीं स्थानें किती आहेत आणि कोणकोणतीं आहेत? त्यांचें नियामक तत्त्व कोणतें? या प्रश्नांचें उत्तर थोडक्यांत हेंच कीं जसें कर्म तशी गति. आणि कर्म हें प्रतिजीव वेगवेगळें असल्यामुळें गतींना मिति नाही. पण स्थूलमानानें पापपुण्याच्या न्यूनाधिक्यानुसार त्या दोन गतींच्या मध्यें पुण्यबहुल आणि पापबहुल असंख्य गतींची स्थिति कल्पिली जाईल. ह्या सर्व गति अथवा लोक कर्म-चित म्हटले आहेत. कर्मचित म्हणजे कर्मानें संपादिलेले. परंतु ह्या सर्व लोकांची, पुण्य लोकांची व पाप लोकांची, अवांतर हेयोपादेयता कांहीं हि असो हे सर्व क्षयिष्णु लोक आहेत, काल-हत लोक आहेत. पुण्य वा पाप संपलें म्हणजे त्या लोकांतून तुम्हांला प्रस्थान करावें लागतें. ते लोक शाश्वत नाहींत. पाप लोक शाश्वत नाहींत हें तर वरदानच म्हटलें पाहिजे. पण पुण्यलोक हि नश्वर असणें हें दुःखद आहे. आणि

म्हणून असल्या पुण्यगति कीं ज्या अनिच्छेनें सोडाव्या लागतात कोण पतकरणार? मनुष्य तर असेंच इच्छील कीं असा आनंद-लोक आम्हांला मिळावा कीं जिथून पुनरावर्तन नाहीं असा जो लोक, जी गति तीच सत्तम म्हणजे उत्तम, चिरंतन गति म्हणावयाची. ही गति कोणत्याहि कर्मानें, पुण्य कर्मानें हि, हस्तगत होऊं शकत नाहीं. कारण कर्मानें संपादिलेलें सर्व नश्वर असतें असा सिद्धांत आहे. मग शाश्वत आनंद-लोक कसा संपादावयाचा? वेदान्त म्हणतो– आत्मज्ञानानें. आत्मज्ञानानें जी गति लाभते तीच शाश्वत असते. म्हणून तीच सत् म्हणजे नित्य आणि सुखरूप होय. तिच्याहून अधिक नित्य आणि सुखरूप दुसरें कांहीं नसल्यामुळें तिलाच सत्‌तम म्हटलें आहे. अशी ही गति म्हणजे आत्मगति होय. म्हणून परमात्मा हा गतिसत्तम म्हटला आहे. गतिश्चासौ सत्तमश्च गति सत्तम:। अशी या पदाची फोड केली जाते. तात्पर्य अभिन्नच आहे.

## ५६७. सुधन्वा

सु शोभनं धनु: अस्य इति सुधन्वा। लक्ष्य-भेदक्षम धनुच चांगलें म्हटलें जाईल. आणि लक्ष्य म्हणजे पुमर्थ. त्याचा अचुक वेध घेणारें आणि त्याला संपादणारें शार्ङ्ग धनु म्हणजे हा नरदेह होय. 'शरीरमाद्यं खलु धर्मसाधनम्' म्हणून म्हटलेंच आहे. धर्माचरणानें माणसाला सर्व पुरुषार्थ प्राप्त करून घेतां येतात. पण तो धर्म नरदेहानेंच आचरतां येतो म्हणून नरदेहच सु म्हणजे उत्तम, धनु म्हणजे साधन होय. परमात्मा नाना देह धारण करण्याचे प्रयोग करीत करीत नरदेह धारण करता झाला आणि तिथें तो कृतकृत्य झाला. त्या देहानें त्यानें परम पुरुषार्थ संपादिला. म्हणून तो नरदेहच त्याचें उत्तम धनु, उत्तम साधन होय. म्हणून असें समर्थ साधन स्वामित्वानें बाळगणारा म्हणून तो सुधन्वा म्हणावयाचा.

**प्रणवो धनु: शरो ह्यात्मा ब्रह्म तल्लक्ष्यमुच्यते।
अप्रमत्तेन वेद्धव्यं शरवत् तन्मयो भवेत्॥**

प्रणव म्हणजे प्रणवोपासन हें धनुष्य होय. तद्द्वारा प्रेषित आत्मशर लक्ष्य ब्रह्माचा वेध घेतो. ह्या विचारानुसार जो अक्षरोपासक तो सुधन्वा झाला. लक्ष्यरूपानें परमात्मा ब्रह्म आहे, पण वेधकर्ता या नात्यानें तोच सुधन्वा आहे, योद्धा आहे. तोच आत्मराज्य मिळवतो.

हा पारमार्थिक अभिप्राय झाला. लौकिक अभिप्रायानें हि परमात्मा हा सुधन्वा आहे. त्याचें धनुष्य सर्वांत मोठें आणि मजबूत आहे. तें दूरपात करणारें आहे. शत्रु त्याच्या प्राणांतक बाणापासून बचावूं शकत नाहीं. तें अमोघ आहे. इंद्रधनुष्याहून मोठें मजबूत आणि सुंदर धनुष्य कोणतें आहे?

शस्त्रांच्या उत्क्रांतींत धनुर्बाणाला दारूच्या बंदुकीच्या शोधापूर्वी विशेष महत्त्व होतें. त्यामुळें त्या काळच्या माणसानें तत्कालीन उत्तम शस्त्रानें परमात्मा सुसज्ज कल्पिणें रास्तच आहे. आज तो सुधन्वा न म्हटला जातां परमाणविक शस्त्रधारी म्हटला जाईल. सुधन्वाचाहि तोच आशय समजावयाचा. तो सर्वातिशायी आहे. आपल्या कालांतील सर्वांत शूरवीर पराक्रमी आहे. अग्रेसर आहे. तो धनुर्धारी राम आहे. ॲटमबॉंबवाला नाहीं आतम बॉंबवाला!

## ५६८. खण्ड-परशु (अखण्ड-परशु)

'सुधन्वा खण्डपरशुर् दारुणो द्रविणप्रद:' हा श्लोकार्ध भगवान् परशुरामाचें स्मरण करणारा आहे. भगवान् परशुराम ही विभूति इतर सर्व विभूतींहून आगळी आहे.

मत्स्य कच्छ वराह हे तीन अवतार तिर्यक् योनींतील होत. सृष्टीच्या प्रारंभींचे होत. त्यानंतर जेव्हां या पृथ्वीतलावर मनुष्यावतार झाला तेव्हां त्या मनुजावतारांत आरंभींच्या काळीं नरसिंह वामन

परशुराम हे तीन ब्राह्म अवतार झाले त्यानंतर राम कृष्ण बुद्ध हे क्षात्र अवतार झाले. यापुढें वैश्य-शूद्रावतार व्हायचे आहेत. आणि व्हावयाचे आहेत नारी-अवतार. ही एक उत्क्रांति-प्रक्रिया आहे.

परशुरामावताराचें वैशिष्ट्य पुढील श्लोकांत असें वर्णिलें आहे: ''अग्रतश्चतुरो वेदा: पृष्ठत: सशरं धनु:। इदं ब्राह्मं इदं क्षात्रं शापादपि शरादपि।।''तो समितिंजय अवतार आहे. तो विद्वानांची समिति आपल्या बुद्धिबळानें जिंकतो तसा शूरवीरांची समिति आपल्या बाहुबळानें जिंकतो. त्याच्याजवळ शापसामर्थ्य आहे, तसें शस्त्र-सामर्थ्य हि आहे. तो मुत्सद्दी हि आहे आणि लढवय्या हि आहे. तो पूर्ण शहाणा आहे. तो शान्तिनेताहि आहे नि युद्धनेता हि आहे. तो कोणत्या हि आघाडीवर पुढारीच आहे. इतर सर्व अवतार एकेरी आहेत. परशुराम हा असा दुहेरी वा संपूर्ण अवतार होय.

परशुरामाजवळ जरी धनुष्य होतें तरी त्याचा मुख्य खंड म्हणजे परशु. परशु ने म्हणजे कुऱ्हाडीनें जंगल तोडायचें आणि धनुर्बाणानें मृगया करायची अशा प्रकारें नर्मदेचा परिसर वसवून मग तो अपरान्ताकडे वळला. त्यानें नर्मदेच्या मुखापासून थेट कन्या कुमारी पर्यंत असह्य सह्याद्रीला जंगलें तोडून सह्य बनविलें. तिथें वसति वसवली. तेथील अपावनांना पावन करून त्यांना आर्य बनवलें. अगस्त्यानंतर एवढा मोठा राष्ट्रनिर्माता दुसरा झाला नाहीं. दक्षिणेचा पूर्व घाट अगस्त्यानें तर पश्चिम घाट परशुरामानें वसविला आहे. या दोहोंचें कार्य पुढें रामानें लंकाविजय करून पूर्ण केलें. अखण्ड-परशु असाहि पाठ घेणें शक्य आहे. ज्याच्या परशूंत खण्ड पडला नाहीं तो अखंड-परशु म्हणावयाचा. परमात्म्याचा काल-कुठार कुठें खंडित वा बोथट झालेला नाहीं. म्हणून तो अखण्ड-परशु म्हणावयाचा.

## ५६९. दारुण

परशूच्या खांड्यानें जंगलें तुटलीं तशीं नर-राक्षसांचीं मुंडकें हि तुटलीं. आर्यांची वसाहत जी दक्षिणेला सरकत गेली ती का दारुण कर्म केल्याशिवायच झाली असेल? वनांचा नि जनांचा दारुण संहार करूनच हें शक्य झालेलें आहे. लोक म्हणतात आमचा इतिहास कां नाहीं? त्यांना हें कळत नाहीं कीं हा असा दारुण इतिहास लिहिण्यांत आणि तो जपून ठेवण्यांत स्वारस्य काय? तो विसरलेलाच बरा. तो इतिहास नकोच. आणि हवाच असेल तर ह्या दारुण शब्दांत लपलेला बघा. काळ चाळणी मारीत आहे. जें शुभ, मंगल, महनीय आहे तें राहो, अशुभ अमंगल क्षुद्र जावो. हाच खरा इतिहास. परशुरामानें, त्याच्या पूर्वजांनीं आणि वंशजांनीं हि दारुण कर्म केलें आहे. त्यामुळें तो तद्रूप परमात्मा दारुण म्हटला आहे. कोणतें हि महद् भाग्य दारुण कर्म केल्यावांचून मिळत नाहीं हाच तर मुळीं इतिहास आहे. रामायण भारत भागवत आणि पुराणें यांचा सर्वांचा हाच निष्कर्ष आहे:''अकृत्वा दारुणं कर्म नाप्नोति महतीं श्रियम्''. परशुरामानें कुरुक्षेत्रांत उन्मत्त क्षत्रियांना मारून त्यांच्या रुधिरानें पांच ह्रद भरून ठेवले. आणि ही संपूर्ण पृथिवी जिंकून ब्राह्मणांना दान केली. स्वत: अकिंचन राहून महेंद्र पर्वतावर तो तपश्चर्या करीत आहे. तत्पूर्वी हि पित्याच्या आज्ञेनें त्यानें आईचा शिरच्छेद केलाच होता. हें सगळें चरित्र दारुण नाहीं असें कोण म्हणेल? रामानें हि पित्याच्या वचनासाठीं चौदा वर्षे वनवास केला व राक्षसांचा संहार करून लंका जिंकली. कृष्णानें हि कंसजरासंधकौरवांचा नि:पात केला. हें असें दारुण कर्म प्रत्येक अवताराच्या वांट्यास आलेंच आहे. कोणत्याहि महद्यशाचें कोणत्याहि महद्भाग्याचें तें एक अपरिहार्य अंग आहे. पण ती बाजू प्राय: दडून असते, दडवून ठेवली जाते. परंतु जिथें जिथें तुम्हांला कळस दिसेल तिथें तिथें पाया हा जसा असलाच पाहिजे. त्या प्रमाणें जिथें जिथें वैभव आढळून येईल तिथें तिथें त्याच्या बुडाशीं, दारुण कर्म आहे हें लक्षांत घेतलें पाहिजे.

## ५७०. द्रविणप्रद

परमात्मा दारुण आहे तसा तो द्रविणप्रद हि आहे. तो उग्र तप करवून मनो-वाक्-काय-गत मलाचें निर्दहन करतो खरा आणि त्यायोगें तो दारुण वाटतो हें हि खरें, पण तत्परिणामीं तो आत्मधनाचा परम लाभ हि करवून देतो. ती साधना संपेपर्यंत तो दारुण आहे. जोंवर यत्किंचित् मल आहे तोंवर त्याच्या शुद्धीसाठीं तो तपाचे चटके देत नि जपाचे नगारे वाजवीत राहतो. त्यांत तो अगदीं निर्दय बनतो. पण आत्मशुद्धीचा गड चढून आत्मदर्शन झालें कीं त्याची दारुणता मावळते व द्रविणप्रदता उगवते. तो परम आल्हाददायक आत्मधन साधकाच्या हवालीं करतो. अशा प्रकारें तो द्रविणप्रद होतो. आत्मलाभ जो करून देतो तो राज्यादि भौतिक लाभ देतो ह्यांत काय नवल? ''नहि वित्तेन तर्पणीयो मनुष्य:''जीवाला वित्तमात्रानें परितोष होण्यासारखा नाहीं तर परमात्मा आपल्या भक्तांना हें असलें हीन द्रव्य कां देतो? तो भक्ताची आस्था आणि रुचि वाढविण्यासाठीं असें करीत असतो. तो त्याच्या उच्चावच कामना पुरवीत असतो. आणि त्याला आपल्याकडे खेचीत असतो. असली सकामभक्ति गौण खरी, पण ती हि भक्तिच आहे आणि म्हणून असल्या भक्तीला हि शास्त्रांत स्थान आहे. आणि त्यामुळेंच सर्वशास्त्रांत तोंड भरून फलश्रुति दिल्या आहेत:

**''यश: प्राप्नोति विपुलं ज्ञाति-प्राधान्यमेव च।**
**अचलां श्रियमाप्नोति श्रेय: प्राप्नोत्यनुत्तमम्।''**
**इत्यादि**

आणि सगळ्या पुराणांत याच्या असंख्य साक्षी दिलेल्या आहेत. परशुरामानें सबंध पृथ्वी ब्राह्मणांना दान दिली. रामानें बिभीषणाला नि सुग्रीवाला राज्य दिले. कृष्णानें पांडवांना साम्राज्य मिळवून दिलें. सुदाम्याला सुवर्णनगरी दिली. दामाजीची रसीद भरली इत्यादि भगवंताच्या द्रविणप्रदत्वाच्या कथांना खरोखर मिति नाहीं. 'भौमं दिव्यं चान्तरिक्षं वित्तं अच्युतनिर्मितम्' भूमि अंतरिक्ष आणि आकाश यांत आढळणारें सर्व द्रव्य त्या परमात्म्यानें निर्मिलेलें आहे आणि उपजीविकेसाठीं जगाला दिलेलें आहे. त्यामुळें तो परमात्मा उघडच द्रविणप्रद आहे. ज्या कोणाला जें कांहीं द्रविण मिळालें आहे तें सारें त्या परमात्म्यानेंच दिलें आहे. म्हणून तो द्रविणप्रद म्हणावयाचा.

## ५७१. दिव:स्पृक् (दिविस्पृक्)

दिवि दिवं स्पृशति व्याप्नोति इति दिविस्पृक्। जो स्वर्गाला पोंचला आहे, जो स्वर्गांत भरला आहे तो दिविस्पृक् म्हणावयाचा. परमात्मा आम्हांला दिसत नाहीं. जें दिसतें तें हें दृश्य विश्व आहे. तें जरी ईश्वर-निर्मित आहे तरी तें कांहीं ईश्वर म्हणतां येत नाहीं. त्याहून तो वेगळाच असला पाहिजे. या व्यक्त विश्वाहून जर तो वेगळा आणि वरिष्ठ आहे आणि तो जर या व्यक्ताकारांत कुठें सांपडत नाहीं तर मग त्याचा शोध घ्यायचा कुठें? जियें घ्यायचा त्याचेंच नांव दिव्यलोक स्वर्ग. त्या अलौकिक अगोचर अव्यक्त दिव्य लोकांत तो परमात्मा राहतो. जे त्या अव्यक्त अक्षराला जाणतात ते हि दिविस्पृक् होतात. स्वर्गीय स्पर्श अनुभवतात. ऐहिक स्पर्श हा मृतस्पर्श आहे. स्वर्गीय स्पर्श म्हणजे अमृतस्पर्श होय. स्पर्श म्हणजे त्वगिन्द्रियाचा आपल्या स्पर्शनीय विषयाशीं संनिकर्ष एवढाच अर्थ नाहीं, तर विषयमात्राचा स्पर्श, विषयेंद्रिय-संनिकर्षज सुखदु:खादि अनुभव. जीवाला बाह्याभ्यन्तर स्पर्श आहे त्यामुळें तो स्पर्शज सुख स्मरतो, तदितर सुख विस्मरतो. परंतु परमात्म्याला बाह्य-स्पर्शच नाहीं; तो सदैव स्वान्त:सुख-परितृप्त आहे. म्हणूनच त्याला म्हणायचें दिविस्पृक्. वस्तुत: तें अभ्यन्तर सुख स्पर्शरूप नव्हे, पण स्पर्शभिन्न सुखाची कल्पनाच जीवाला होत नसल्यामुळें त्या अस्पर्श-सुखाला, त्या दिव्य सुखानुभूतीला तो

दिविस्पृक्ता वा दिव्य स्पर्श म्हणतो. दिव्यत्वाची कल्पना पार्थिवाच्या तुलनेनें वा विरोधानें, साम्यानें वा वैषम्यानें हि देणें शक्य नाहीं. पण जीवाला त्याहून वेगळी भाषाच बोलतां येत नसल्यामुळें त्याचा काय अपराध? आणि त्यामुळेंच तो परमात्मा ''शब्दातिग: शब्दसह:'' म्हटला आहे. त्याचा अनुभव शब्दांच्या पार पलीकडला आहे पण तरी तो शब्दांत मांडावा लागतो आणि तो परमात्मा तें सहन करून घेतो.

## ५७२. सर्वदृक् व्यास

'सर्वदृग्व्यास:' हें एक नाम कीं दोन नामें? एक नाम मानिल्यास तें एक समस्तपद हि मानणें शक्य आहे. अथवा सविशेषण नाम आहे म्हणून तीं दोन पदें मानतां येतील. एक नाम मानिल्यास तीं उघडच दोन पदें होणार. शंकराचार्यांनी हें एक समस्त नाम मानिलें आहे. पूर्वी बाविसाव्या श्लोकांत सर्वदृक् पद येऊन गेलें आहे. त्यामुळें हि सर्वदृग्व्यास असें एक पद मानणें बरें असा त्यांचा अभिप्राय दिसतो. तथापि मला तो त्या कारणानें अपरिहार्य वा आवश्यक वाटत नाहीं. सर्वदृक् पद दुसऱ्या अनेक नामांप्रमाणें पुन: येऊं शकतें. व्यास पदाला त्याची खास अपेक्षा आहे असें हि नाहीं. तथापि सहस्रसंख्या-परिमिति-परिपालनार्थ एक नाम घेणें आवश्यक मानल्यास सर्वदृग्व्यास म्हणजे सर्वदर्शी त्रिकालज्ञ व्यास असा अर्थ होईल. व्यासांची विभूति इतकी मोठी आहे कीं गीतेंतहि भगवंताला ''मुनीनां अप्यहं व्यास:'' असें म्हणावें लागलें आहे. त्याचाच हा पुनरुच्चार आहे. व्यस्यति इति व्यास:। जो वेदांचा व्यास म्हणजे विभाग करतो तो व्यास होय. त्याच बरोबर जो विस्तार करतो तो हि व्यासच म्हणावयाचा. व्यासांनीं वेदमंत्रांचे प्रथम ऋक् (पद्य), यजुस् (गद्य), साम (गेय) असे तीन विभाग केले आणि त्यांना परिशिष्ट म्हणून अथर्ववेद जोडून दिला. ह्या मुख्य वेदविभागांचे परत शाखाभेद केले. ऋग्वेदाचे २१, यजुर्वेदाचे १०१, सामवेदाचे १००० आणि अथर्ववेदाचे ९ पोट विभाग केले. वेदांचा हा व्यास मंत्राक्षरांपुरता झाला. अर्थाचें काय? त्यासाठीं परत त्यांनीं महाभारत रचिलें. वेदाचें तात्पर्य गीतेच्या व आख्यानांच्या रूपानें त्यांत विशद केलें आहे–समासानें व व्यासानें. आणि शेवटीं भगवद्गान म्हणून भागवत रचून ते कृतकृत्य झाले आहेत. आणि त्यामुळेंच परमात्म्याला व्यास म्हणवून घ्यावें लागलें आहे. संपूर्ण ज्ञान-वर्तुळाचा तो व्यासरूप आहे. त्याच्या ह्या सर्वदृक्तेमुळेंच तो सर्वदृक् व्यास म्हटला गेला. म्हणूनच म्हटलें आहे. 'अचतुर्वदनो ब्रह्मा द्विबाहुरपरो हरि:। अभाललोचन: शंभु:' ज्याच्या भक्ताचा एवढा महिमा तो परमात्मा केवढा मोठा म्हणावयाचा? त्याचें सर्वदृग्-व्यासत्व केवढें म्हणावयाचें?

## ५७३. वाचस्पति (अयोनिज)

''वाचस्पति: उदारधी:'' पूर्वी तेविसाव्या श्लोकांत येऊन गेला आहे. इथें एकसष्टाव्या श्लोकांत तो पुन: आला आहे ''वाचस्पति: अयोनिज:''. ब्रह्मणस् पति बृहस् पति वाचस् पति हे आणि असलेच इतर शब्द अलुक् समास म्हणायचे कीं ब्रह्मणस् बृहस् वाचस् हे शब्द मनस् वचस् सरस् शब्दाप्रमाणें सकारान्त शब्द म्हणावयाचें? ज्या अर्थीं ब्रह्मणस् बृहस् वाचस् अशीं सकारान्त प्रातिपदिकें आढळत नाहींत त्याअर्थीं तीं षष्ठ्यन्त पदें मानणेंच भाग आहे. तथापि प्राचीनतर वैदिक भाषेंत तीं प्रातिपदिकवत् असावींत अशी शक्यता आहे. मराठी 'देवाशपथ', 'दीनानाथ' प्रमाणें वाचस्पति इत्यादि अलुक् समास वैदिक भाषेंत विशेष रूढ असावेत. दोन तीन शब्दांचे सुटसुटीत सोपे समास हें मराठीप्रमाणें वैदिकभाषेचें वैशिष्ट्य आहे. अभिजात संस्कृतांत आगगाडीच्या डब्यांच्या मालिकेसारखे लांबच लचक समास मराठींत तसेंच वैदिक संस्कृतांत आढळत नाहींत. वैदिक आणि मराठी या भाषांत असें आणि असलें साम्य पुष्कळच आहे.

पण हा वाचस्पति कोण? जो बृहस्पति, जो ब्रह्मणस्पति, जो गणपति तोच वाचस्पति होय. जी सगळी स्तुति आहे, जो उच्चार आहे, जें वर्णन आहे त्या सर्वांचा स्वामी तो अक्षर परमात्मा आहे आणि तोच इथें वाचस्पति म्हटला आहे. या अक्षर परमात्म्याला ॐ म्हणतात. तें एकाक्षर ब्रह्मच वाचस्पति होय. त्याचेंच प्रतिपादन सगळे वेद, सगळ्या वाणी, सगळे वर्ण करतात आणि म्हणूनच तो वाचस्पति म्हणावयाचा. त्यामुळेंच कोणत्या हि वेदमंत्राचा उच्चार करावयाचा झाल्यास आरंभीं ॐकाराचा घोष केला जातो. कारण, त्या सर्ववर्णोच्चारांचा तोच प्रतिपाद्य अर्थ होय, विषय होय. वाक् आणि अर्थ हे नेहमीं संयुक्तच असावयाचे. म्हणून हि कोणता हि मंत्र म्हणावयाचा झाला कीं ॐकाराचा उच्चार हा आधीं करावा लागतो. वाणी निरर्थक असूं शकत नाहीं. ती अर्थाधीनच असावयाची. अर्थाश्रितच असावयाची. तो जो अर्थ तोच वाचस्पति होय. तोच वाणी-विनायक होय.

### ५७३. (वाचस्पति) अयोनि-ज वाचस्पति

सर्वदृग् व्यास: या पूर्ववर्ती नामाप्रमाणेंच ''वाचस्पति: अ-योनिज:'' हें नाम हि सविशेषण एक नाम मानिलें आहे. वाचस्पति जगांत पुष्कळ असूं शकतील, पण ते सगळे योनिज आहेत. जन्मलेले जन्तु आहेत. परमात्मा हा त्यांच्या पंक्तीला कसा बसणार? तो वाचस्पति खरा, पण अ-योनिज आहे. तो न जन्मतांच वाचस्पति आहे. तो स्वयंभू वाचस्पति आहे. जगांत जन्मलेले जे वाचस्पति आहेत त्यांनीं 'वाचां आचार्यताया: पदमनुभवितुं कोऽस्ति धन्यो मदन्य:' अशा बढाया किती हि मारल्या तरी त्यांच्या वाणीला अर्थाचेंच अनुसरण करावें लागतें. परंतु हा स्वयंभू अयोनिज परमात्मा असा वाचस्पति आहे कीं त्याच्या वाणीच्या मागें अर्थ धावून येतो. 'वाचं अर्थोऽनुधावति' तो 'भू:' म्हणतो आणि त्या मागोमाग भूर् लोक तिथें प्रकट होतो. तो 'भूव:' म्हणतो आणि भुवर्लोक तिथें आविर्भूत होतो. तो 'स्व:' म्हणतो आणि त्या सरशीं स्वर्लोक तिथें उपस्थित होतो. हें सामर्थ्य दुसऱ्या कोणत्या वाचस्पतीचें आहे? ते आडनांवाचे वाचस्पति ईश्वरी सृष्टि पाहतात आणि तिच्या सौंदर्यानें भारले जाऊन गाऊं लागतात. कवन करूं लागतात. त्यांना या सृष्टींत नाहीं असें कांहीं एक करतां येत नाहीं. इसापनीतींतील बेडकीला जसा बैलाचा मोठेपणा आकळूं शकला नाहीं आणि ती आपल्या त्या महासत्वाच्या इयत्तेच्या कल्पनेंत फुगून गतप्राण झाली त्याप्रमाणें परमात्म्याच्या सृष्टीची म्हणजे त्या परमात्म्याच्या इयत्तेची कल्पना करतांना कविजनांची, वाचस्पतींची वाक्शक्ति फुगून फुगून फाटून जाते पण तिला त्या महासत्वाची परमात्म्याची, त्या अयोनिज वाचस्पतीची यत्किंचित् हि यथार्थ कल्पना होत नाहीं.

आयोनिज पद स्वतंत्र मानिल्यास अयोनिज म्हणजे स्वयंभू अज परमात्मा असा अर्थ होईल. परमेश्वरी अवताराचें दिव्यत्व द्योतित करण्यासाठीं ते हि अयोनिज वर्णिले जातात. नित्य शुद्ध बुद्ध मुक्त स्वभाव आत्मतत्त्व योनिज असूं शकत नाहीं. तें कोणाचा पुत्र नाहीं, कोणाचा पिता नाहीं. देवकी-पुत्र वासुदेव रुक्मिणीरमण सत्यभामापति प्रद्युम्न-पिता इत्यादि कोणत्याहि नात्यांच्या गोत्यांत तो येत नाहीं. म्हणून तो अयोनिज म्हटला आहे.

### ५७४. त्रिसामा

त्रीणि सामानि अस्यास्तीति त्रिसामा। ज्याचीं तीन सामें म्हणजे वैदिक गीतें प्रसिद्ध आहेत तो त्रिसामा होय. परमात्मा ऋचांनीं स्तुत, यजूंनीं हुत आणि सामांनीं गीत झाला आहे. कोणतीं हीं तीन सामें? बृहत्साम तथा दुसरीं दोन सामें म्हणजे रथंतर आणि वामदेव्य हीं होत. आज सामगायन स्मृतिशेष झाल्यासारखें आहे. पण साम म्हणजे काय? साम म्हणजे परमात्म्याशीं समरस झालेल्या भक्तांचा परमानंदानुभूतीचा हर्षोद्गार, धन्योद्गार. उद्गारांचा

शब्दार्थ पहायचा नसतो, भावार्थ घ्यायचा असतो. हुरा, वाहवा, ओहो इत्यादि उद्‌गारांचा शब्दार्थ कांहीं सांगणें कठिण आहे, पण त्यांचा भाव हर्षोल्लास आनंदातिशय व्यक्त करणारा आहे एवढें निश्चित. तसेंच ''हावु हावु हावु'' या सामगानाचा अर्थ काय म्हणून विचाराल तर कांहीं सांगतां यावयाचें नाहीं, पण त्यांचा भाव परमानन्द व्यक्त करणारा आहे. मनुष्य खातो पितो आणि खुशींत आला म्हणजे गातो. तसा वेदानुयायी जेव्हां यज्ञ करून सोमपान करतो तेव्हां अत्यंत प्रसन्न होऊन सामगायन करूं लागतो. अशीं जीं अनेक सामें गाइलीं गेलीं त्यांतील तीन विशेष प्रसिद्ध म्हणून तो सामगीत परमात्मा त्रिसामा म्हटला गेला. त्रयी म्हणजे तीन वेद हे जसे त्रिविध (गद्य पद्य आणि गेय) होत, तशीं ही तीन सामें हि त्रिविध असूं शकतील. एक क्रियावस्था व्यक्त करणारें, दुसरें ज्ञानावस्था व्यक्त करणारें आणि तिसरें भावावस्था व्यक्त करणारें. क्रियावस्थेंत तो विवेकी केवळ सत्क्रिया करतो आणि तिचेंच साम गातो. ज्ञानावस्थेंत तो एकत्वोपासक बरेंवाईट कोणतेंहि कर्म करीत नाहीं आणि अक्रियेतेचेंच, अकर्माचेंच साम गातो. भावावस्थेंत तो बरीं-वाईट सारींच कर्मे करतो आणि विश्वात्मभावाचेंच साम गातो. असा तो परमात्मा त्रिसामा आहे.

### ५७५. साम-ग

परमात्मा साम-गीतच नाहीं, साम-गायक हि आहे. सामस्वरूप परमात्मा साम-गान करणार नाहीं, तर काय अ-साम-गान करील? यज्ञ, सोमपान आणि सामगान ह्या वैदिक परिभाषेचे आधिभौतिक आधि-दैविक आणि आध्यात्मिक असे तिन्ही अर्थ लक्षांत घ्यावयाचे आहेत. केवळ एकच अर्थ घेण्यानें वैदिकांना अन्याय होईल. कोणती हि उपासना घ्या तिच्यांत हे तिन्ही भाग असावयाचेच. कोणतें हि उपासनीय कर्म घेतल्यास त्याचें बाह्य विधि-विधान व अनुष्ठान, त्याची अधिष्ठात्री उपास्य देवता आणि तिचे आध्यात्मिक स्वरूप त्यांत गृहीत असते. इथें वैदिक उपासनेंत साम्यस्वरूप साम हें अध्यात्म, इन्द्र देवता हें अधिदैव आणि यजन व प्रसादस्वरूप सोमपान हें अधिभूत होय. 'देहवंतास अव्यक्तीं सुखें बोध घडेचिना' ही आहे वस्तुस्थिति. आणि देवतेचें स्वरूप असतें अव्यक्त, आध्यात्मिक हें हि तितकेंच निश्चित. अशा स्थितींत देहवंतानें त्या विदेह अव्यक्त स्वरूपाला आकळायचें कसें? त्याची जी पद्धति तिचेंच नांव उपासना होय. शास्त्रकार त्या अव्यक्ताला आकळण्यासाठीं त्याचें एक रूप व नाम कल्पितात. तीच उपास्य-देवता. तिच्या नामरूपाविषयीं त्यांचा कांहीं आग्रह नाहीं. ''एकं सत्, विप्रा बहुधा वदन्ति अग्निं यमं मातरिश्वानमाहुः'' असें त्यांनीं स्पष्टच सांगून टाकलें आहे. त्या देवतेच्या उपासनेचा विधि हि त्यांनीं यथा- दैवत कल्पिलेला आहे. तो विधि देहेन्द्रियांनीं अनुसरायचा, वाणीनें देवतेचें स्तवन करायचें, मनानें तिच्या अचिन्त्य महिम्याचें स्मरण करायचें, श्रद्धाभक्तिपूर्वक तिला आत्मनिवेदन करायचें आणि अशा प्रकारें तिच्या आध्यात्मिक स्वरूपाचें अनुसंधान करून तिशीं स्वात्मभावानें समरस व्हायचें. अशी आहे ही ऋषिमुनि-साधुसंतांची उपासना पद्धति. या उपासनेला दृढ चालवून जेव्हां साधक सिद्ध होतो तेव्हां तो सामग बनतो, साम्याला प्राप्त होऊन सामगान गातो. असा सिद्ध परमात्म-निर्विशेषत्वामुळें परमात्माच होय. त्यालाच इथें सामग म्हटलें आहे.

### ५७६. साम

''त्रिसामा सामगः साम'' हें एक सूत्र आहे. ह्यांत साध्य साधक आणि साधन तिहींचा अन्तर्भाव झालेला आहे. तिन्ही मिळून एकच वस्तु सिद्ध होत असल्यामुळें तीं तिन्ही अभिन्नच होत, एकरूपच होत. परमात्माच साधक बनून साधन अंगीकारतो आणि साध्य गांठतो. त्याचा हा छंद आहे. त्याचा हा स्वभाव आहे. तो सामग साधक बनून सामाच्या साधनानें त्रिसामा जो परमात्मा त्याला गांठतो.

सागराला मिळून हि गंगा वहातच राहते तसा तो साध्याला गांठूनि हि साधन आचरीत च राहतो. साध्याला गांठणें ही सिद्धि होय. पण सिद्धि मिळाल्यावर हि साधन चालूच ठेवणें ही संसिद्धि होय.

सामन् हा शब्द ब्रह्-मन्, कर्-मन्, धर्-मन्, शर्-मन् इत्यादि मन्प्रत्ययान्त कृदन्तांप्रमाणें सा-मन् असा आहे. मन् प्रत्यय हा करणार्थक आहे. ब्रह्मन् म्हणजे स्तवनोपयोगी साधन अर्थात् स्तोत्र. ना-मन् म्हणजे नमनोपयोगी साधन अर्थात् अभिवादन. तसेंच समनोपयोगी वा शमनोपयोगी साधन तें साम म्हणावयाचें. सामगायनानें, साधक-विश्व साम्य पावतो. ''निर्दोषं हि समं ब्रह्म'' निर्दोष म्हणजे निष्प्रपञ्च आणि सम म्हणजे निर्विशेष निरहं जें तत्त्व तेंच ब्रह्म होय आणि त्या ब्रह्माच्या साम्याला पोंचण्याचें साधन तें साम होय. त्या सामाच्या योगें सर्व दु:ख प्रपंचाचा उपशम, सर्व सुख-शान्तीची उपलब्धि अर्थात् परिपूर्ण साम्यलाभ होतो. या परम साम्यदशेची प्राप्ति साम-गायनानें होते. शब्द हा स्पन्दरूप आहे. त्या स्पन्दापासून जशी सृष्टि होते तसा सामोपासनेनें शब्द-स्पन्द-निरोध होऊन सृष्टि-वैषम्योपशम होतो. आणि उरते एक केवळ साम्यरूप शान्ति वा शान्तिरूप साम्य. हें साम साक्षात् परमात्माच आहे. ''वेदानां सामवेदोऽस्मि'' म्हणून जें म्हटलें आहे तें ह्याचमुळें होय.

## ५७७. निर्वाण

हा बासष्टावा श्लोक संपूर्णच अति उच्च भूमिकेचा आहे. यांत जीवनांतील परम साध्य आणि त्याचीं साधनें या दोन्ही मूल्यांचा विचार येऊन गेला आहे. जीवनाला अर्थ मोल आणि साफल्य देणारीं हीं मूल्यें आहेत. यांची उपेक्षा म्हणजे जीवनद्रोहच होय, आत्मद्रोहच होय. साम, निर्वाण, शम, शान्ति, परायण, संन्यास, निष्ठा अशीं हीं महनीय पदें आहेत. या पदांना कोण श्रेयस्काम सोडील?

निर्वाण म्हणजे ज्वलनशान्ति, आग विझणें. ज्याला आपण जीवन म्हणतों तें दैहिक जीवन वस्तुत: जीवन नसून आग आहे. ती आग जोंवर जळत आहे तोंवर निर्वाण, शान्ति कुठली? जीवन हें आग विझवून शान्ति शीतलता सुख तृप्ति देणारें असतें. अर्थात् तिथें आग असूं शकत नाहीं. उलट तिचा अभाव हें त्याचें पहिलें लक्षण आहे. म्हणजे सर्व दु:खदाहोपशम-लक्षण हें निर्वाण जीवनाचें अभावात्मक निवृत्त लक्षण होय. त्याचें स्वरूप तर परमानन्द आहे.

दैहिक जीवन वासनामूलक कर्मप्रधान आणि दु:खोदर्क आहे. वासनेचा अग्नि सारखा धुमसत असतो. त्याचा कर्ममय धूर आणि धग माणसाला सतत धडपडायला लावत असतात. परिणाम हा कीं सुखासाठीं खटपट करायची व दु:खी कष्टी व्हायचें. यांतून, या सतत जळत राहण्यांतून माणसाची सुटका म्हणजेच निर्वाण होय.

पण ह्यांतून सुटका व्हायची कशी? ज्ञानानें. ज्ञानच मोचक आहे. आधीं ही आग म्हणजे आगच आहे हें लक्षांत यायला पाहिजे. हें पहिलें आर्य सत्य होय. याचें नांव संसार-दु:ख. नंतर त्याचें कारण अविद्या, वासना होय हें लक्षांत घ्यायचें. तदनुसार अविद्या हें दुसरें आर्यसत्य होय. रोग आणि रोगनिदान ही जशी कार्यकारणांची जोडी तशी पुढची जोडी आरोग्य आणि आरोग्योपाय ही होय. तदनुसार अनामयपद, मोक्ष वा निर्वाण हें तिसरें आर्यसत्य होय. आणि चौथे आर्यसत्य म्हणजे मोक्षकारण विद्या. या चार आर्य सत्यांच्या ज्ञानानें आणि ज्ञानपूर्वक जीवनानें निर्वाण-लाभ व्हायचा.

## ५७८. भेषज

परमात्मा हा भेषज आहे, औषध आहे. कशाचें? संसाररोगाचें, भवरोगाचें. भव म्हणजे जन्म आणि त्यापाठोपाठ येणारी व्याधिजरामृत्यु इत्यादि अनर्थ-परंपरा म्हणजे संसार. या सर्व परंपरेचा

दिसणारा आरंभ भवापासून होत असल्यामुळें या संपूर्ण परंपरेला भवरोग असें नांव मिळालें आहे. पण या भवाचें तरी मूळ काय? प्राक्तन कर्म. त्या कर्माचें मूळ वासना वा तृष्णा. तिचें मूळ अज्ञान, अविद्या. अर्थात् सर्व अनर्थांचें निदान अज्ञान वा अविद्याच होय. आणि परमात्मा हा स्वत: ज्ञानस्वरूप असल्यामुळें तो त्या अज्ञानरोगाचें औषध म्हटला आहे.

रोग आणि रोगनिदान, आरोग्य आणि आरोग्याचे उपाय हा जसा चिकित्साशास्त्राचा चतुर्व्यूह होय त्याच प्रमाणें संसार आणि तत् कारण अविद्या, मोक्ष आणि तत्कारण विद्या हा अध्यात्मशास्त्राचा चतुर्व्यूह होय. दोन्हीकडे जो उपाय आहे तेंच भेषज होय. आणि तें आहे ज्ञान.

इथें क्रमानें निर्वाण आणि भेषज हीं दोन पदें मोक्ष आणि त्याचें कारण ज्ञान या अर्थाचीं आहेत. चतुर्व्यूहांपैकीं आरंभीचीं दोन पदें संसार आणि अविद्या इथें अध्याहृत समजावयाचीं. निर्वाणपद भेषज आध्यात्मिक आहे हें सुचवितें. भेषजपद निर्वाण हें अनामयपद आहे असें सुचवितें. ''पदं गच्छन्त्यनामयम्'' म्हणून निर्वाणाला अनामयपद गीतेनें म्हटलेंच आहे. चिकित्साशास्त्रीय परिभाषा अध्यात्मशास्त्राला लाविली आहे. कारण चिकित्साशास्त्र लोक-प्रथित आहे. अध्यात्मशास्त्र गूढ आहे, रहस्य आहे. ज्ञाताची उपमा अज्ञाताला दिली जाते. तद्विपरीत नव्हे. आणि म्हणूनच पुढील पदांत परमात्म्याला भिषक् म्हणजे वैद्य म्हटलें आहे.

## ५७९. भिषक्

परमात्मा भिषक् आहे, म्हणजे वैद्य आहे. तो जीवाला विद्या म्हणजे ज्ञान देऊन भवरोगांतून मुक्त करतो. सामान्य वैद्य रोग्याला नुसतें औषध देतात. त्यामुळें रोगी आपल्या पीडेंतून तात्पुरता मुक्त होतो. पण रोग कशामुळें आला आणि गेला तो कशामुळें गेला याचें सोपत्तिक ज्ञान त्याला होत नाहीं. आणि त्यामुळें तो परत परत रोगाच्या तावडींत सांपडत राहतो. परंतु परमात्मा हा

''ददामि बुद्धियोगं तं येन मां उपयान्ति ते।
तेषामेवानुकम्पार्थं अहं अज्ञानजं तमः।
नाशयाम्यात्मभावस्थो ज्ञानदीपेन भास्वता।''

या गीतावचनांत प्रतिज्ञात केल्याप्रमाणें आपल्या भक्तांना हृदयस्थ गुरुरूपानें ज्ञान देऊन अज्ञानमुक्त करीत असतो. शास्त्र-प्रतीति गुरु-प्रतीति आणि आत्म-प्रतीति अशा तीन पायऱ्या आहेत ज्ञानाच्या. शास्त्रांत सगळें ज्ञान सुव्यवस्थित मांडलेले असतें. त्यावरून अधिकारी जिज्ञासूला ज्ञान मिळतें, पण कांहीं संशयहि राहतो. तो संशय अनुभवी गुरूच्यामुखानें श्रवण करून दूर होतो. पण खरी आत्मप्रतीति तेव्हांच बाणते कीं जेव्हां शास्त्र द्वारा आणि गुरुमुखानें मिळालेलें ज्ञान आपणच आपल्या ठाईं पडताळून पाहून सुप्रतीत आणि सुप्रीत होतों. हीच खरी प्रतीति होय. आणि ही आत्मभावांतूनच येत असते. म्हणून म्हटलें आहे भगवंतांनीं ''आत्मभावस्थो ज्ञानदीपेन अज्ञानजं तमः नाशयामि.'' ही प्रतीति देणारा जो हृदस्थ परमात्मा तोच इथें भिषक् म्हटला आहे. त्या प्रतीतिरूप औषधानें भवरोग नाहींसा होतो, भवभय नाहींसें होतें. हा सर्प नसून रज्जूच आहे असा प्रत्यय आल्यानंतर सर्प गेला मग त्याचें भय कुठून राहणार? 'तत्र को मोहः कः शोकः एकत्वं अनुपश्यतः?' जिथें देहात्मबुद्धिरूप मोह गेला तिथें देह गेल्याचा शोक कुठला? तिथें केवळ आत्म्याचें एकत्व, निर्मोह ज्ञान नांदत असतें. परमात्मा हें असें निर्मोह ज्ञान देऊन स्वभक्तांवर परम अनुकंपा करीत असतो. वैद्य हा परम कारुणिक असावा असें म्हटलें जातें. परंतु ज्ञान हें स्वभावतःच करुणा असल्यामुळें ज्ञानी गुरूचें परम कारुणिक हें नित्य विशेषण होय. परमात्मा हा असा परम कारुणिक भिषक् आहे.

## ५८०. संन्यासकृत्

परमात्मा संन्यासकृत् म्हणजे सर्वकर्म-संन्यासी आहे. ज्ञानी आहे. तो कोणतें हि कर्म करीत नाहीं. कर्ममात्र अविद्यामूलक आणि देहग्रहणहेतुभूत अर्थात् संसारदायक असल्यामुळें तो सर्व कर्मांचा संन्यास करतो. ''न हि अकृतः कृतेन'' परमपुरुषार्थ मोक्ष हा अकृत म्हणजे कोणत्या हि कर्मानें संपादिला जाणारा नव्हे. तो आत्म्याचा स्वभाव आहे. म्हणून कर्म साधन नव्हे. तें मोचक साधन नाहीं, इतकेंच नव्हे तर तें बन्धन आहे. कर्माच्या योगें प्राप्त होणारें सर्व लोक नश्वर आहेत, पुनरावर्तनदायी आहेत, संसारावह आहेत. मग वर्णाश्रमधर्म सर्व निरर्थकच, किंबहुना अनर्थावहच म्हणावयाचे? नाहीं. ते निष्काम आचरले तर ज्ञाननिष्ठायोग्यता प्राप्त करून देतात. वर्णाश्रमधर्माचरण न करणें म्हणजे स्वैर वागणें होय. त्या योगें ज्ञाननिष्ठायोग्यता प्राप्त होणें नाहीं. आणि म्हणून निष्काम स्वधर्माचरण हें निरर्थक नव्हे. तद्द्वारा ज्ञाननिष्ठायोग्यता मिळवून आणि ती योग्यता आल्यानंतर सर्वकर्म-संन्यास करून साधक मोक्षास पात्र होतो. पण स्वतंत्ररीत्या कर्माला मोक्षोपाय म्हणून कांहीं किंमत नाहीं. ती ज्ञानालाच आहे. कारण मिथ्या-ज्ञानजनित दोषांचा परिहार कोणत्याहि कर्मानें होऊं शकत नाहीं. तो केवळ ज्ञानानेंच संभवतो. म्हणूनच म्हटलें आहे ''त्यागेन एकेन अमृतत्वं आनशुः'' ज्ञानमूलक सर्वकर्मत्यागानेंच अमृतत्व म्हणजे मोक्ष सिद्ध होतो. मोक्षसिद्धि अविद्या-दोषमूलक कर्में सारींच गळून पडलीं म्हणजे होते. आणि ही मोक्षप्रतिबंधककर्म-निवृत्ति केवळ ज्ञानानेंच होते, कोणत्याहि कर्मानें नव्हे. अविद्या आणि तन्मूलक दोष हें कर्माचें कारण होय. आणि स्वर्गनरकादि-लोकप्राप्ति हें त्याचें कार्य म्हणजे फळ होय आणि हीं अशीं स-कार्यकारण कर्में सगळींच मोक्षप्रतिबंधरूप आहेत. हा प्रतिबंध तेवढा नाहींसा होणें म्हणजे मोक्ष होय. तो आयताच आहे. कोठल्याहि कर्मानें ठोकून पिटून घडवायचा नाहीं आहे. अर्थात् आत्मज्ञानानें होणारा सर्वकर्म-संन्यास हीच मोक्ष-सिद्धि आहे. म्हणून परमात्मा हा संन्यासकृत् म्हटला आहे. कांहीं कर्में करायचीं कांहीं सोडायचीं हा संन्यास नव्हे. संन्यास म्हणजे संपूर्ण न्यास, कर्ममात्राचा न्यास. आणि असा संपूर्ण न्यास एक परमात्मा करूं शकतो. देहधारी केवळ लाक्षणिक संन्यासच करूं शकावयाचा.

## ५८१. शम

परमात्मा संन्यासकृत् म्हणजे संन्यासी आहे, तसा संन्याशांचा धर्म जो शम तो हि तो आहे. शम म्हणजे निवृत्ति. कर्मयोग्यांचा धर्म प्रवृत्ति तर ज्ञानयोग्यांचा, संन्याशांचा धर्म निवृत्ति होय.

**आरुरुक्षोर् मुनेर् योगं कर्म कारणमुच्यते।**
**योगारुढस्य तस्यैव शमः कारणमुच्यते।।**

योगी ब्रह्मचर्याश्रमांत गुरुशुश्रूषा, गृहस्थाश्रमांत दान आणि वानप्रस्थाश्रमांत नियम-पालन वा व्रताचरण करून प्रवृत्तिद्वारा आपलें श्रेयःसाधन करीत असतो. तेंच तो संन्यासाश्रमांत प्रवृत्तीचा त्याग करून शम सेवून निवृत्तिद्वारा साधीत असतो. साधकाला सतत आपला विकास साधायचा असतो. हा विकास कृत्रिम नियम-पालनानें होत नाहीं तर आंतरिक वृत्तींना अनुसरून होत असतो. या स्वाभाविक वृत्तींना अनुसरून होणाऱ्या कर्मांनाच गीतेनें सहज कर्म म्हटलें आहे. आणि तें सहज कर्म, सदोष असलें तरी हट्टानें सोडतां कामा नये. कारण तद्द्वारा हळूं हळूं वृत्ति पालटत जाते. जसजशी वृत्ति पालटत जाते तसतसा धर्म हि पालटत जातो आणि शेवटीं साधकाला शम उर्फ निवृत्तिधर्म प्राप्त होतो. तोच इथें संन्यासकृत् पदानंतर त्या संन्याशाचा परम धर्म आणि चरम धर्म आला आहे. चरम धर्म चरम दशेलाच प्राप्त होईल. कच्च्या केळ्यांत परिपक्व केळ्याचा शब्द स्पर्श रूप रस गंध कसा येणार?

क्रमाक्रमानें स्वाभाविक वाढ होऊन परिपाकास आल्यावांचून जबरदस्तीनें तो आणतां येणार नाहीं. पण तो आल्यावांचून पूर्णता हि नाहीं. पूर्व अवस्थेंत कर्म उर्फ प्रवृत्ति स्वास्थ्ययोगाचें कारण आहे. जों पर्यंत गन्तव्य गांठलें, नाहीं तों पर्यंत चालत रहाणेंच श्रेयस्कर. गन्तव्य गांठल्यानंतर चालणें बंद करणेंच श्रेयस्कर. स्वस्थ राहणेंच श्रेयस्कर.

परमात्म्यानें नरनारायणरूपानें संन्यास आश्रमाची स्थापना केली, शम हा धर्म उपदेशिला आणि स्वत: शान्त होऊन तो बदरिकाश्रमांत विराजमान आहे. ''संन्यासकृत् शम: शान्त:'' हा चरण नरनारायणाचें हें चरित्र सांगत आहे.

## ५८२. शान्त

शान्त म्हणजे निवृत्त, स्वस्थ. अशान्त पुरुष मिथ्याज्ञानजनित वासनेनें प्रेरित होऊन अपार कर्मे करीत असतो. तो त्या कर्मांत इतका गढून जातो कीं त्या कर्मांचा काय परिणाम आहे, काय फळ आहे याचा विचार करायला हि त्याला अवकाश होत नाहीं. जन्मायचें, कर्मे करायचीं, त्या कर्मानुसार स्वर्गनरकादि फल भोगायचें आणि फल भोगून झालें म्हणजे परत जन्मायचें असा त्याचा कार्यक्रम अव्याहत सुरू असतो. याचेंच नांव आहे संसार. पण कोणी एखादा धीर पुरुष ही कोंडी फोडतो. तो कर्मप्रवाहांत वाहून न जातां विचाराची लव्हाळीं पकडून शास्त्राच्या भूमिकेला लागतो. शास्त्राधारें कार्याकार्याचा निश्चय करतो. चोरी मारी जोरी इत्यादि निषिद्ध कर्मे तो करीत नाहीं. पुत्रैषणा वित्तैषणा लोकैषणा सोडून तत्प्रेरित सारीं काम्य कर्मे हि तो करीत नाही. पण देहयात्रेसाठीं आणि समाज-धारणेसाठीं स्वभावनियत वर्णाश्रमधर्म तो फलकामना सोडून आचरीत रहातो आणि त्याबरोबर चित्तशुद्धी-साठीं तप:स्वाध्यायरूप उपासना साक्षेपानें करीत राहतो. असें जीवन जगतां जगतां आपलीं संपूर्ण चित्तशुद्धि केव्हां झाली याची हि त्याला शुद्ध रहात नाहीं आणि तो संन्यासी होतो. त्याचे सर्व संकल्प मावळतात आणि तो शान्त म्हणजे समाहित होतो, स्वस्थ होतो.

**यदाहि नेन्द्रियार्थेषु न कर्मस्वनुषज्यते**
**सर्वसंकल्प-संन्यासी योगारूढस् तदोच्यते।।**

असा जो कर्म-प्रवाह तरून ज्ञानाच्या भूमिकेला लागलेला आणि वैराग्य अनासक्ति आणि सर्वसंकल्प-संन्यास या उत्तरोत्तर उन्नत शिखरांवर आरोहण करून ब्रह्मनिर्वाणाचें परम पद पावलेला पुरुषच शान्त होय. तोच परमात्मा. कारण त्याहून परम दुसरें कांहीं नाहींच. त्यालाच पुढील पदांत निष्ठा म्हटलें आहे. निष्ठा म्हणजे पराकाष्ठा, आत्मशुद्धीची पराकाष्ठा, अर्थात् ब्रह्मनिर्वाण.

## ५८३. निष्ठा

निष्ठा म्हणजे नि:शेष स्थिति, मुक्काम. गंगा सागराला मिळेपर्यंत वाहते. पण सागर-संगम झाल्यानंतर तिचा प्रवाह संपतो. अर्थात् सागर हा गंगेची, समुद्र हा नद्यांची, निष्ठा होय. त्याप्रमाणें सर्व साधनांची परिसमाप्ति म्हणजे परमात्मा होय. म्हणून तो निष्ठा म्हटला आहे. निष्ठा दोन असूं शकत नाहींत. सर्वोच्च शिखर एकच असूं शकते, दोन स्वर्गमाथा (एव्हरेस्ट) असूं शकत नाहींत त्याप्रमाणें. म्हणूनच गीतेंत 'द्वे निष्ठे' असा अनेकवचनी प्रयोग आला नाहीं, तर द्विविधा निष्ठा असा एकवचनी प्रयोग आला आहे. 'लोकेऽस्मिन् द्विविधा निष्ठा पुरा प्रोक्ता मयानघ। ज्ञानयोगेन सांख्यानां कर्मयोगेन योगिनाम्।। कर्मयोग आणि कर्मसंन्यास एकाच निष्ठेचीं दोन अंगें आहेत. एका अंगाला कर्मयोगाची तर दुसऱ्या अंगाला कर्मसंन्यासाची मुद्रा असलेलें हें एक नाणें आहे. नाण्याचें सोनें एकच आहे. मूल्य एकंच आहे. म्हणूनच म्हटलें आहे गीतेनें :

**सांख्य-योगौ पृथग् बाला: प्रवदन्ति, न पण्डिता:।
एकमप्यास्थित: सम्यग् उभयोर् विन्दते फलम्।।**

दोहोंचें फळ एकच आहे. अर्थात् गन्तव्य स्थान-दृष्ट्या दोन्ही एक आहेत. मार्गत: ते वेगळाले आहेत. एखादी नदी पश्चिमवाहिनी असेल एखादी पूर्व-वाहिनी. त्यांचे प्रवाह दिसायला वेगवेगळे आणि परस्पर-विरुद्ध असून हि शेवटीं दोन्ही जसे समुद्रांतच मिळतात त्या प्रमाणें सर्व साधनांची परिणति शेवटीं परमात्म-दर्शनांतच होते. म्हणून तो परमात्माच एक निष्ठा होय. महिम्नाच्या पुढील श्लोकांत हाच आशय व्यक्त झाला आहे:

त्रयी सांख्यं योग: पशुपति-मतं वैष्णवमिति,
प्रभिन्ने प्रस्थाने परमिदमद: पथ्यमिति च।

रुचीनां वैचित्र्याद् ऋजुकुटिल-नानापथ-जुषां,
नृणां एको गम्यस् त्वमसि पयसां अर्णव इव.।।

## ५८४. शान्ति

'संन्यासकृत् शम: शान्त:' हा चरण पुंल्लिग आहे, पुरुषवाचक आहे; तर ' निष्ठा शान्ति: परायणम्' हा चरण अलिंग आहे, पद-वाचक आहे. दोहोंचें हि तात्पर्य एकच आहे. दोन्ही सर्वोच्च आदर्श व्यक्त करतात. पहिल्या चरणांत तो सगुण साकार आहे, तर दुसऱ्यांत निर्‌गुण निराकार. एक व्यावहारिक आदर्श आहे, दुसरा पारमार्थिक वा शास्त्रीय आदर्श आहे.बिन्दूची व्याख्या करायची झाल्यास ती शास्त्रीय परिभाषेंत ज्याला लांबी नाहीं रुंदी नाहीं अशा सारखीच करावी लागणार. म्हणून तीच वास्तविक होय. पण प्रत्यक्ष फळ्यावर बिंदु काढावयाचा झाल्यास तो कांहीं तरी आकार घेणारच. आणि आकार म्हटला कीं त्याला मोजमाप आलेंच. म्हणजे व्याख्या काल्पनिक झाली. सारांश परमार्थत: व्यवहार काल्पनिक आणि व्यवहारत: परमार्थ काल्पनिक अशी विप्रतिपत्ति येते. पण हें मानव जीवनाचेंच कोडें आहे. आदर्श हा देहनिरपेक्ष आहे. आणि आमचें जीवन आहे देहसाक्षेप. त्यामुळें तेवढा फरक पडावयाचाच. पण तो आम्हांला बाधक नाहीं साधकच आहे. आदर्श हा देह-निरपेक्ष असल्यामुळें, निर्‌गुण असल्यामुळें देही मानवाला उत्तरोत्तर प्रगति करावयाला संपूर्ण वाव आहे. सत्य अहिंसा ब्रह्मचर्य यांच्यांत तो उत्तरोत्तर प्रगति करूं शकतो. त्यामुळेंच राम, कृष्ण, हरि (शाक्यसिंह), हे सत्य, प्रेम, करुणा यांचे प्रगततर अवतार होतात. आदर्शाला पोंचण्याच्या मानवाच्या प्रयत्नाचे ते उच्चांक आहेत. ईशु, गांधी, विनोबा हे हि असेच नवे उच्चांक आहेत. ते सारे मानवाचे चिर अभिलषित जी निर्वाण-परमा शान्ति तिचे पाईक आहेत. त्या शान्तीवरून ते आपले देह ओवाळून टाकीत आहेत. ओवाळून टाकायला मानवाला शिकवीत आहेत. अशी ती शान्ति परम आहे. तिलाच पुढील पदांत परायण म्हटलें आहे.

## ५८५. परायण (म्), परायण:

परायणम् कीं परायण:? दोन्ही पाठ आहेत. शंकराचार्यांनीं त्यांचा उल्लेख केला आहे. आणि मागील पदाच्या चिंतनांत केलेल्या विवेचनानुसार दोन्ही घेणें शक्य आहे. तथापि तिथेंच विवरिल्याप्रमाणें निर्‌गुणपर घेणें मी पसंत करतों. कारण अन्तिम आदर्श निर्‌गुणच आहे.

''निष्ठा शान्ति: परांयणम्'' हीं तिन्हीं पदें जर समानार्थकच आहेत तर तीं तीन हवींच कशाला? समानार्थक असून हि त्यांत आपआपलें वैशिष्ट्य आहे. निष्ठा सर्व सामान्य आदर्शवाचक पद आहे. त्या निष्ठेचे सगुण अंग म्हणजे शान्ति आणि निर्‌गुण अंग म्हणजे परायण होय.

स्थितप्रज्ञाची जी ब्राह्मी स्थिति वर्णिली आहे ती शान्तिपदानें अभिप्रेत आहे. तिचा उल्लेख हि तिथें आलेलाच आहे. आणि तिलाच ब्राह्मी स्थिति म्हणतात असें हि म्हटलें आहे.

"विहाय कामान् यः सर्वान् पुमांश्चरति निःस्पृहः। निर्‌ममो निरहंकारः स शान्तिं अधिगच्छति। एषा ब्राह्मी स्थितिः पार्थ।"

या पलीकडची पायरी म्हणजे ब्रह्मनिर्वाण. काय अंतर आहे या दोहोंत? ब्राह्मी स्थितींत आणि ब्रह्म-निर्वाणांत? ब्राह्मी स्थिति आणि ब्रह्मनिर्वाण या दोहोंच्या मध्यें देहाचा अंतरपाट आहे. तो पडदा तेवढा दूर झाला कीं दोहोंचें द्वैत फिटतें आणि दोन्ही एक होतात. एक साकार, दुसरें निराकार; एक लाट, दुसरें पाणी सपाट. दोन्ही एक. तरंगाकार दिसत होता तो गेला. बाकी वस्तुतः अंतर कांहींच नाहीं. तथापि साकाराला परायण म्हणतां यावयाचें नाहीं. निराकारच परायण. परायण पदाचें हेंच तात्पर्य. पर म्हणजे पलीकडलें, परम आणि अयन म्हणजे धाम. अर्थात् परायण म्हणजे अनिर्देश्य अव्यक्त अक्षर असें तें परंधाम. आकार-विकार-प्रकारातीत कांहीं तरी.

## ५८६. शुभाङ्ग

शुभानि अङ्गानि यस्य सः शुभाङ्गः। ज्याची अंगोपांगें शुभ आहेत तो शुभांग होय. देह हा बोलून चालून विटाळाचा गोळा आहे. तो ज्यानें धारण केला त्याला शुभांग कसें म्हणावें? देहाचा जन्मच शुक्र शोणितांतून झालेला. मलमूत्र, लालाश्लेष्म, रक्त मांस, अस्थिचर्म इत्यादींनीं तो आंतून बाहेरून भरलेला. त्याला तुम्हीं किती हि निर्मल ठेवण्याचा प्रयत्न केला तरी तो कितीसा शुद्ध होणार? त्यामुळें देहाभिमानी जीवाला केव्हां हि शुभांग म्हणतां यावयाचें नाहीं. त्यामुळें केवळ कपड्यालत्त्यांच्या व शरीराच्या बाह्य स्वच्छतेकडे व सौंदर्याकडे लक्ष देणाऱ्या आणि आन्तरिक ज्ञान आणि सद्‌गुण यांची उपेक्षा करणाऱ्या गाजरपारखी लोकांचा संत उपहास करतात. "ऐसें कैसें हें सोवळें। शिवतां होतसे ओवळें? महारासि शिवे। कोपे, ब्राह्मण तो नव्हे" असे ते सवाल करतात आणि बजावतातः ज्या अविद्याकामकर्मांच्या योगें देहरूप विटाळाचा गोळा उत्पन्न होतो तें सकार्यकारण समग्र अज्ञानच जिथें संभवत नाहीं तें आत्मतत्त्वच वस्तुतः शुभाङ्ग होय. तिथें आंतबाहेर, खालींवर, मागें पुढें, इकडे तिकडे चोहींकडे एकच एक निखळ ज्ञान ओतप्रोत भरलें आहे. "चंदनाचे हात पाय हि चंदन। चंदनचि अंग चंदनासि" असा जो चिन्मात्रमूर्ति परमात्मा तोच शुभांग होय. असें जें सर्वांगशुभ ज्ञान त्याच्या साठींच जो काया वाचा मनें रात्रंदिवस झटतो आहे, तो हि भविष्यद्‌वृत्तीनें शुभांग म्हणावयाचा. हाच आशय गीतेच्या पुढील श्लोकांत आला आहे. "न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते। तत् स्वयं योगसंसिद्धः कालेनात्मनि विन्दति।।" अविद्या हा महाफळ होय. तिचा ज्याला यत्किंचित् हि स्पर्श नाहीं तो परमात्माच शुभांग म्हणावयाचा.

## ५८७. शान्तिद

विहाय कामान् यः सर्वान् पुमांश् चरति निःस्पृहः। निर्‌ममो निरहंकारः स शान्तिं अधिगच्छति।। या श्लोकांत शान्ति कशी प्राप्त होते हें गीतेनें थोडक्यांत सांगितलें आहे. मनुष्य बाह्य भोग आणि ते भोग भोगण्याची मनांतील लालसा दोन्ही सोडून देतो, शरीरासकट कोणत्याहि वस्तूला माझी म्हणत नाहीं आणि मी म्हणजे कोणी अमुक असा अभिमान धरीत नाहीं तेव्हां त्याला शान्ति लाभते. जो सतत मला हें हवें तें पाहिजे असें म्हणत असतो, त्याला नव्हे. सुखशान्ति सर्वांनाच पाहिजे आहे. पण 'पाहिजे' सोडल्यावांचून ती कोणालाच मिळत नाहीं. हाच पेंच आहे. "न मागे तयाची रमा होय दासी।" रमा दासी होते खरी, पण जो आपल्या कामनेचा दास झाला त्याची नव्हे, तर जो तिचा स्वामी आहे त्याची! हें स्वामित्व कसें लाभावें? त्याची रीत अशीः रागद्वेष-वियुक्तैस्तु विषयान् इन्द्रियैश् चरन्। आत्मवश्यैर् विधेयात्मा प्रसादं अधिगच्छति।। रागद्वेष परी जातां आलीं हातांत इन्द्रियें। स्वामित्वें विषयीं वर्ते त्यास

लाभे प्रसन्नता।। प्रसादे सर्वदु:खानां हानिर् अस्योपजायते। प्रसन्नचेतसो ह्याशु बुद्धिः पर्यवतिष्ठते।। प्रसन्नतेपुढें सर्व दु:खें जाती झडूनियां। प्रसन्नतेनें बुद्धीची स्थिरता शीघ्र होतसे।। पुढें थोडक्यांत सार सांगितलें आहे:

नास्ति बुद्धिर् अयुक्तस्य, न चायुक्तस्य भावना। न चाभावयतः शान्तिः अशान्तस्य कुतः सुखम्।। अयुक्तास नसे बुद्धि त्यामुळें भावना नसे। म्हणूनि न मिळे शान्ति शान्तीविण कसें सुख।। इन्द्रियसंयम, स्थिरबुद्धि, भावना, शान्ति आणि सुख असा हा क्रम आहे. पूर्व पूर्व उत्तरोत्तराचें कारण आहे. इन्द्रियसंयम बीज आहे. बुद्धि भावना शक्ति आहे आणि शांतिसुख फलित आहे. हें जें फलरूप शांतिसुख साधकाला मिळतें तें त्याला अंतरात्म्यांतून मिळत असतें. तें दुसऱ्या कशाहि पासून मिळत नाहीं. म्हणून सर्वान्तर्यामी परमात्मा हा शान्ति म्हटला आहे. ही शान्ति आत्मभिन्न कोणी देऊं शकत नाहीं. ती अनन्य भक्तीनेंच मिळते.

### ५८८. स्रष्टा

कृतीहून कर्ता हा केव्हांहि मोठाच. पण मोठेपणाचा अंदाज त्या कृतीहून येतो. कोणी रामायणासारखें साहित्य, हरिकीर्तनासारखें संगीत, कैलासासारखें कलाशिल्प निर्मिलें तर त्याची आपण कोण प्रशंसा करतो. पण या सर्वांहून अनंत पटीनें अद्भुत अशी ही अनन्तपार विचित्र सृष्टि ज्यानें सृजिली त्या स्रष्ट्याचा महिमा किती म्हणून वर्णावा? त्याचा महिमा स्रष्टा या पदाहून कमी आणि स्रष्टा या पदाहून अधिक वर्णितां येत नाहीं. म्हणून परमात्मा स्रष्टा म्हणावयाचा. नामाहून कमी परिचय काय देणार? म्हणून परमात्म्याचें नाम स्रष्टा. महत्तम पराक्रमाहून, कार्याहून, वाखाणणी काय करणार? आणि सृष्टीहून अधिक मोठी कलाकृति कोणती? म्हणून स्रष्टा ही त्या परमात्म्याची उत्तम स्तुति होय, सर्वोत्तम प्रशस्ति होय.

परमात्मा ह्या विश्वसृष्टीचा जनक असल्यामुळें त्याचे आज्ञांकित होऊन राहणें हा आमचा परम धर्म होय. पित्राज्ञेचें पालन याहून मोठा धर्म नाहीं. रामानें परशुरामानें आपल्या आचरणानें तो धर्म उपदेशिला आहे. आमचें जीवन आणि जीवनांतील सर्व लाभ ज्याच्यामुळें आम्हांला प्राप्त झाले त्याचें ऋण आमच्यावर किती म्हणावें? तें आम्हांला केव्हां हि फेडणें शक्य नाहीं, पण तें मनांत बाळगून जर आम्ही त्याची प्रीति संपादण्यांसाठीं सतत झटत राहिलों तर अंशतः आम्ही उतराई झालों असें होईल. त्यासाठीं सतत आम्ही त्याची सेवा करूं आणि मेवा मिळवूं. त्याची प्रीति संपादिल्यानेंच आमचे सर्व मनोरथ पूर्ण होतील. म्हणून म्हटलें आहे: ''एतावत्येव शुश्रूषा कार्या पितरि पुत्रकैः। बाढं इत्यनुमन्येत गौरवेण पितुर् वचः।। असें झालें पाहिजे. तेणें करूनच ते कृतार्थ होतील. वेदाज्ञा वा शास्त्राज्ञा ही परमात्म्याची परम पित्याची आज्ञा होय. ती जो पाळतो तोच आज्ञाकारी पुत्र. 'शान्तिदः स्रष्टा।' हा क्रम असें हि सुचवितो कीं परमात्मा हा ज्यांनीं त्रिविधतापतप्त होऊन मोक्षरूप शान्तीची हौस बाळगली त्यांना तो शांति देतो; आणि ज्यांनी अद्याप संसाराचा अनुभव पुरा घेतला नाहीं, त्याचा मोह ज्यांना अद्याप उरला आहे त्यांना तो संसार देत जन्मास घालतो. सारांश, 'आवडीचें दान देतो नारायण'. तो मुमुक्षूला मुक्ति आणि बुभुक्षूला भुक्ति देतो. याचेंच नांव 'शान्तिदः स्रष्टा.'

### ५८९. कुमुद

कौ भूम्यादिसृष्टौ मोदते इति कुमुदः। कु म्हणजे भूरादि सृष्टि, जो तिच्या ठाईं मोद पावतो तो कुमुद. परमात्मा स्रष्टा आहे हे मागील पदांत सांगून या पुढील च पदांत सांगत आहेत कीं तो या पृथिव्यादि सृष्टींत मोद पावत आहे. कर्ता आपल्या कृतींत मोद पावत असतो. तो मोदासाठीं कृति करतो. कृतीच्या संकल्पांत तो मोद पावत असतो. कृति करतांना मोद पावत असतो,कृति झाल्यावर तिच्यायोगें तो मोद

पावत असतो. सृष्टि हें आनंदाचें कर्म आहे. परमात्मा स्रष्टा बनून जीवांना आपलें अनुकरण करायला सांगत आहे. कांहीं नवीन उत्पन्न करून त्या स्रष्ट्याची पूजा करा. कर्म हें त्या सृष्टिकर्त्याची पूजा होय. जे सृष्टीची झीजच करतात, ती भरून काढण्यासाठीं आणि जीवनासाठीं नवनिर्मिति कांहीं करीत नाहींत, ते सृष्टिकर्त्याचा अवमान करतात. त्याची अवज्ञा करतात. परमात्म्यानें ही अनन्त कोटि ब्रह्माण्ड सृष्टि सृजिली आणि तो स्रष्टा झाला. पण तेवढ्यानें तो कृतकृत्य झाला नाहीं. सृष्टि निर्मून तिच्या विषयीं तो उदासीन झाला नाहीं. तर तींत तो मोद पावतो आहे. तिच्यांत तो रस घेत आहे. जीवांच्या सकल पुरुषार्थांची तो तरतूद करीत आहे कर्म आणि ज्ञान यांच्या योगें. आणि अशा प्रकारें तो या लोकांत, जीवलोकांत, मोद पावत आहे. बालक शंखशिंपले आणि रंगी बेरंगी कांचेचे तुकडे गोळा करण्यांत रमतो, पालक सोने-नाणें आणि हिरे माणकें गोळा करण्यांत रमतो. परंतु तत्क्षणीं दोहोंना हि जर समानच संतोष होत आहे तर संग्राह्य वस्तुविशेषांचा विशेष तो काय राहिला? 'निर्विशेषो विशेषः' असेंच म्हटलें पाहिजे. जीवांच्याहि ज्या तुच्छातितुच्छ वा उच्चातिउच्च अभिलाषा आहेत त्यांच्यांत तरी विशेष काय आहे? सर्व पुरुषार्थ या दृष्टीनें समानच आहेत. परमात्मा जीवरूपानें त्या सर्वांत समान रमत आहे, समान मोद पावत आहे. मुंगीला साखरेचा कण वेचतांना जो आनंद, तोच हत्तीला उसाची मोळी चघळतांना होतो. एका कीटकाला कीटकीशीं रमतांना जो रस मिळतो तोच इंद्राला उर्वशीशीं रमतांना आणि तोच योग्याला समाधींत. संतोष जर समान आहे तर अवांतर उच्चावच परिग्रहभेदाची किंबहुना भोगाची वा त्यागाची हि किंमत सारखीच. या दृष्टीनें परम पुरुषार्थ नि अवर पुरुषार्थ वा सामान्य पुरुषार्थ हा भेद अकिंचित्कर आहे. जीव एकाच ठाईं रमत नाहीं. त्याला बदल हवा असतो. चंचरीक या फुलावरून त्या फुलावर बागडत जातो. तसा जीव एका ठाईं थारत नाहीं. त्याला मोक्ष मिळाला तरी तिथें हि तो फार वेळ रमत नाहीं. तो अवताराकडे वळतो आणि याचेंच नांव कुमुद. 'कौ पृथिव्यां अवतारशतं गृह्णन् मोदते इति कुमुदः' म्हटलेंच आहे, ''परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम्। धर्म-संस्थापनार्थाय, संभवामि युगे युगे।।'' मुक्तांना आणि मुक्तेश्वराला वैकुंठांत काम काय? वैकुंठांत हि आराम हरामच आहे. तिथें स्वस्थ बसून करमलें तर पाहिजे? मग ते मुक्त आणि मुक्तेश्वर या पृथ्वीवर, या जीवलोकांत मोद करायला येतात. ते सगळीं कर्में करतात, पण त्यांत फलहेतु नसतो. आणि अशा प्रकारें ते मोक्ष च धरेवर आणीत असतात.

### ५९०. कुवलेशय

कुं पृथिवीं वलति वेष्टते इति कुवलं जलम्, तस्मिन् जले अव्यक्तसंज्ञके शेते इति कुवलेशयः। कुवल म्हणजे पृथ्वीला वेढून असणारें पाणी. त्या अव्यक्त संज्ञक जलराशींत जो तळाला पहुडला आहे तो अव्यक्तमूल अक्षर परमात्मा कुवलेशय म्हणावयाचा. हें अनंत कोटि ब्रह्माण्ड, हा सगळा अपरंपार सृष्टीचा पसारा कोठून आला? हें व्यक्त त्या अव्यक्तांतून आलें आहे. हें व्यक्त विश्व प्रकट आहे, सुज्ञात आहे. तें प्रत्यक्षादि लक्षणांनीं मेय आहे, तर्कादींनीं अनुमेय आहे. तें इन्द्रियगोचर आहे, तें सक्रिय आहे. परंतु अव्यक्त तद्विपरीत आहे. त्याचें वर्णन मनूनें असें केलें आहे:

**असीत् इदं तमोभूतं अप्रज्ञातं अलक्षणम्।**
**अप्रतर्क्यं अविज्ञेयं प्रसुप्तमिव सर्वतः।।**

अशा या अव्यक्तार्णवाच्या तळाशीं तें अक्षर विश्वबीज निलीन आहे. तिथून हा विश्वाचा प्ररोह प्रसृत झाला आहे. तोच कुवलेशय म्हणावयाचा.

परमात्म्याची, भगवान् विष्णूची, क्षीरसागरशायी तशी शेषशायी म्हणून हि प्रसिद्धि आहे. जलाप्रमाणें हा शेष हि अव्यक्तस्वरूपच आहे. सर्व व्यक्ताकार

मावळल्यानंतर जो शेष म्हणजे अवशेष राहतो तो अव्यक्तच म्हणावयाचा आणि त्याच्याच तल्पावर विश्वाधार परमात्मा पहुडलेला असतो. म्हणून कुवल म्हणजे शेष नाग. या अर्थी कुवल शब्द असा व्युत्पादिला जाईल. ''कु कुत्सितं वक्राकारं वलति सर्पति इति कुवल: सर्प: तस्मिन् शेते इति कुवले शय:''

कु: कुहकं अन्धकार:, तस्य वलं मण्डलं कुवलम्। तस्मिन् कुवले अन्धकार-मण्डले दिनात्यये शेते इति कुवलेशय: सूर्य:। सूर्य दिवसभर चालतो आणि सायंकाळीं अस्तास जाऊन अंधकाराच्या वळयांत पडद्या आड जणूं आराम करतो, झोप घेतो म्हणून तो कुवलेशय होय.

ध्रुव प्रदेशांत ४।४ महिन्यांची रात्र असते. त्या काळांत सूर्य त्या अंधारांत जणूं झोपून राहतो म्हणूनहि तो कुवलेशय.

या अंधकारालाच वेदांत वृत्र म्हटलें आहे आणि वृत्र हा एक साप आहे अशी हि कल्पना केली आहे. त्यामुळें त्याच्या वेटोळयांत अडकून राहिलेला सूर्य हा कुवलेशय म्हटला आहे. दीर्घकाल अज्ञानांधकारांत निश्चेष्ट पडून राहणारा जीव कुवलेशय म्हणावयाचा. तो सूर्यवत् निशात्ययीं अंधकाराला परास्त करून प्रकाशमान् व्हावयाचा आहे इतकेंच.

## ५९१. गोहित

गोभ्य: हित: गोहित:। गोजातीला हितकर तो गोहित म्हणावयाचा. ''गोहितो गोपतिर् गोप्ता वृषभाक्षो वृषप्रिय:'' हा श्लोकार्ध गोमहिमा गाणारा आहे. गोसेवा हा हिंदु धर्माचा, आर्य धर्माचा, वैदिक धर्माचा वर्णाश्रम धर्माचा एक अनन्यसाधारण विशेष आहे. जैन बौद्ध ख्रिस्ती महंमदी शिंतो ताओ कन्फ्यूशस इत्यादि कोणत्याहि धर्मांत तुम्हांला हा विशेष आढळावयाचा नाहीं. गोजातींत काय विशेष आहे कीं तिची सेवा हा धर्माचा एक महत्त्वाचा घटक व्हावा? वैदिक धर्मांतील इंद्राचा मख बंद करून गोपालकृष्णानें गोवर्धनाची पूजा सुरू केली. इतकें गोसेवेला महत्त्व कशानें प्राप्त झालें? राजे गोब्राह्मण-प्रतिपालक असें बिरुद मिरविण्यांत भूषण मानूं लागले तें कां? प्रार्थनेंतहि ''गो-ब्राह्मणेभ्य: शुभमस्तु नित्यम्'' अशी गोहितकामना केली जाते ती कां? मानवजीवनाच्या साफल्यांत गोसेवेचा तसाच कांहीं तरी महत्त्वाचा वांटा असला पाहिजे हें उघड आहे. आयुष्य बल आणि बुद्धि या सर्वांची वाढ गोरसावर अवलंबून आहे. गोरसामुळें हिंसारूप मांसाहारांतून मानव मुक्त होऊं शकतो. भारतीय कृषीची उत्पादक शक्ति गोजातीवर अवलंबून आहे. मशागत आणि खत पाणी तिच्या पासूनच मिळतें. मानवाच्या प्रेमाचा विकास मानवेतरापर्यंत होण्यांत मानवाचा संतोष भरला आहे. इत्यादि अनेक महनीय कारणांस्तव गोसेवा म्हणजे मानव-सेवा, सर्व-सेवा होऊन बसली आहे. आणि म्हणून मानवाचा परमात्मा गोहित झाला आहे. गोहित म्हणजे गोवंशाचा हितकर्ता. गोसेवेचें इतकें महात्म्य आहे कीं गवाश लोक हि गोसेवेकडे वळले आहेत आणि गोरसावांचून दुसरें दूध त्यांच्या देशांत नाहींच. मुळाला पाणी घातलें म्हणजे तें जसें सर्व झाडाला पोंचतें त्याप्रमाणें गोसेवा केली म्हणजे ती विश्व-सेवा होते. म्हणून परमात्मा हा गोहित म्हटला.

## ५९२. गोपति

जो विश्वपति आहे तो परमात्मा गोपति हि आहे हें सांगायला नको. तथापि ब्राह्मणपरिव्राजक-न्यायानें इथें तो गोपति म्हटला आहे. गोपालनानें विश्वपालन होतें. झाडाला पाणी घालायचें म्हणजे जसें आपण तें मुळाला घालतो तसें गोपालनानें विश्वपालन होतें. म्हणून तो परमात्मा विशेषेंकरून गोपति म्हटला आहे. गोरस भूलोकींचें अमृत आहे.

अमृत हें जसें संजीवन आहे तसें दूध संजीवन आहे. तें औषध आहे. सर्व ओषधींचा रस त्यांत आहे. गाई रानावनांत नाना ओषधिवनस्पतींचा तृणलतांचा सरस कोमल अग्राग्रभाग चरतात आणि त्यांचें सारच असें दूध आपल्या आपत्यां बरोबर आम्हांला देतात. त्यांचा हा केवढा उपकार! सर्व धातुमय भूमीचा रस आणि कस वनस्पतींत येतो. त्या वनस्पतींचा हि रस आणि कस दुधांत उतरतो. त्यामुळें दूध म्हणजे साराचें हि सार होय. त्याहून अधिक पोषक हितकर दुसरें नाहीं. मध कांहीं अंशीं त्याच्या सारखें म्हणतां येईल. पण त्यांत मांस आणि मेद वाढविणारी ओजोद्रव्यें आणि तेजोद्रव्यें (प्रोटीनस्, फॅट्स्) मुळींच नाहींत. पण मधुरस आणि क्षार तेवढे आहेत आणि ते फार मोलाचे आहेत. दोहों मिळून पूर्ण अन्न होतें. मांसाहाररूप हिंसेंतून सुटायचें तर मांसाहारांतील तत्त्वें मिळवून देणारें आणि अहिंसक असें साधन हवें. तेंच गोपालन होय. गोरसांतून प्राणिज प्रोटीन फॅट पुरेसें मिळतें. तेंच पूरक नि तारक खाद्यान्न होय. निव्वळ धान्य फलाहारानें पूर्ण आरोग्य-साधन होऊं शकत नाहीं. म्हणून परमात्मा गोपति म्हटला आहे तें ठीकच आहे. गो म्हणजे बुद्धि वाणी किरण इत्यादि अर्थ घेऊन हि गोपति शब्द व्युत्पादिला जाईल. पण ते सर्व लाक्षणिक आहेत. वाच्य अर्थ तर गो म्हणजे गाय बैलच होय.

## ५९३. गोप्ता

गोप्ता म्हणजे रक्षक, पालक. कुणाचा रक्षक? व्यक्तींचा? नाहीं. तो धर्मरक्षक आहे. भारतीय धर्म-युद्धांत अठरा अक्षौहिणी वीर, निवडक जवान, कामास आले. त्यांचें रक्षण त्यानें केलें नाहीं. उलट त्यांचा नाशच त्यानें केला असें म्हटलें जाईल. पण त्याची पर्वा त्यानें केली नाहीं. त्यानें धर्मरक्षण केलें. न्याय-रक्षण केलें. असत्य अन्याय दंडेली चालूं दिली नाहीं. "सत्यमेव जयते" हें सिद्ध केलें, हेंच धर्मरक्षण. हेंच तो करतो म्हणून तो गोप्ता म्हटला आहे. तो धर्माचा, धर्ममर्यादेचा रक्षक आहे. प्राण आणि धन यांचा रक्षक नाहीं. ह्या वस्तु सर्व नश्वर आहेत. अनश्वर एक धर्मच आहे. आणि तोच एक रक्षणीय आहे. म्हणून गीतेनें त्याला नुसते गोप्ता न म्हणतां धर्मगोप्ता म्हटलें आहे.

त्या धर्माचे प्रतिनिधि वा प्रतीक म्हणजे गो आणि ब्राह्मण होत. गो अभ्युदयाचें प्रतीक तर ब्राह्मण निःश्रेयसाचें प्रतीक; अभ्युदय निःश्रेयस दोहों मिळून धर्म पूर्ण होतो. म्हणून त्या धर्म-गोप्त्याचे प्रतिनिधि राजे गोब्राह्मण-प्रतिपालक असें बिरुद मिरवतात. त्याचें तात्पर्य अर्थात् धर्म-गोप्ता हेंच आहे.

परमात्मा धर्म-गोप्ता नसेल तर धर्माचरण कोण करील? नीतीचा धर्माचा अन्तिम आधार आस्तिक्य आहे. जे नास्तिक आहेत त्यांची नीति, त्यांचा धर्म अत्यन्त विषम परिस्थितींत टिकणार नाहीं. सर्व-साक्षी परम न्यायी सर्वशक्तिमान् फलदाता परमेश्वर बसला आहे अशी दृढ श्रद्धा असेल तरच धर्माचरण व्हायचें. अशा श्रद्धेच्या अभावीं "यावत् जीवेत् सुखं जीवेत् ऋणं कृत्वा घृतं पिबेत्। भस्मीभूतस्य देहस्य पुनरागमनं कुतः।। असे अभद्र विचार च सुचायचे आणि असली नास्तिकताच सर्व पापाचें मूळ आहे. म्हणून परमात्मा हा गोप्ता म्हणजे धर्मगोप्ता म्हटला आहे.

## ५९४. वृषभाक्ष

वृषभस्य अक्षिणी इव अक्षिणी यस्य सः वृषभाक्षः। ज्याचे डोळे बैलाच्या डोळ्यांसारखे मोठाले आणि कृष्णाञ्जन सुरेख आहेत तो वृषभाक्ष म्हणावयाचा. सुंदर डोळ्यांना सामान्यतः मत्स्याची, हरिणाच्या वा खंजपक्षाच्या डोळ्यांची उपमा देतात. अथवा कमलदलाची देतात. परंतु बैलाच्या डोळ्यांची उपमा क्वचितच आढळेल. इथें हि गाईच्या डोळ्यांची नव्हे तर बैलांच्या डोळ्यांची उपमा दिली आहे हें विशेषतः अवधेय आहे. गाईच्या डोळ्यांपेक्षा बैलांचे डोळे अधिक पाणीदार आणि आकर्षक असतात.

(आकर्ण) विशालता, कमनीयाकृति, तेजस्विता हे डोळ्याचे मुख्य सौंदर्य गुण होत. प्रसन्नता, गंभीरता वा चंचलता, धीरता वा लज्जालुता इत्यादि भाव त्याची वृद्धि करतात. बारीक रेखीव कमानदार काळ्याभोर भुवया आणि लांब कृष्णस्निग्ध पापण्या हीं हि डोळ्यांच्या सौंदर्याचीं महत्वाचीं अंगें होत. अशा डोळ्यांनीं युक्त पुरुषाला म्हणजे व्यक्तीला देखणा देखणी म्हटलें जातें. म्हणजे सौंदर्याचे डोळा हें मुख्य उपादान होय. एखादा मनुष्य किती हि सुंदर असला आणि तो जर का आंधळा असला तर त्याच्या सौंदर्याची अति हानि होते, बरबादी होते. असा अंध म्हणजे अदेखणा केवळ सौंदर्यराज्यालाच नव्हे तर प्रत्यक्ष राज्याला हि अपात्र ठरतो धृतराष्ट्राप्रमाणें.

परमात्म्याला वृषभाक्ष म्हणण्यांत केवळ त्याच्या डोळ्याची सर्वदर्शित्वरूप विशालता, मनोज्ञतारूप अन्तर्दर्शिता, ज्ञानदृष्टिरूप तेजस्विता इत्यादि महद्‌गुणच सूचित करायचे नाहींत, तर वृषभ आणि अक्ष या शब्दांमुळें त्याची धर्मदृष्टि विशेषतः व्यक्त करावयाची आहे. धर्म हा चतुष्पाद वृष वा वृषभ म्हणून कल्पिला गेला आहे. सत्य दम दया आणि दान हे त्याचे चार पाद होत. या चार गुणांशांनीं मिळून धर्म संपूर्ण होतो. अक्षि शब्द उघडच दृष्टिवाचक आहे. सारांश परमात्मा हा धर्मदृष्टि आहे हें सूचित करण्यासाठीं त्याला वृषभाक्ष म्हटलें आहे.

## ५९५. वृषप्रिय

वृषः प्रियः यस्य सः वृषप्रियः। ज्याला वृष प्रिय आहे तो वृषप्रिय वा प्रिय वृष म्हणावयाचा. धर्म चतुष्पाद कल्पिला असल्यामुळें वृष म्हणजे धर्म असा अर्थ होतो. शिवाय धर्मच सर्व सुखाची वृष्टि करतो म्हणून हि तो वृष म्हटला आहे. वृषभ खतामुताची व दूध दुभत्याची वृष्टि करून सुखाची सृष्टि करतो त्या प्रमाणें सत्य संयम दया दान रूप चतुष्पाद धर्म चारी पुरुषार्थांची सृष्टि करतो म्हणून तो वृष होय. जगांत आत्मद्रोही कोणीच असूं शकत नाहीं. भ्रमामुळें आत्मद्रोहाचें कृत्य माणसाकडून होऊं शकतें. पण म्हणून तो आत्मद्रोही नाहीं म्हटला जाणार. भ्रान्त म्हटला जाईल. स्वभावतःच सर्व जण सुखकाम असल्यामुळें आणि सुखाचाच हेतु धर्म असल्यामुळें सर्व जीव वृषप्रियच होत, धर्मप्रियच होत. म्हणून सर्वात्मा परमात्मा हा वृषप्रिय म्हटला आहे.

सत्य म्हणजे सत्यज्ञान हा धर्माचा पहिला पाद होय. सर्व कार्याकार्य-निर्णय ज्ञानाधीन आहे. म्हणून तो पहिला. ते सत्यज्ञान ज्या योगें आटोक्यांत येतें तो संयम हा दुसरा पाद म्हणावयाचा. त्या सत्यज्ञानाची व तत्साधनभूत संयमाची ओळखण ज्या गुणावरून मिळावयाची तो दयाभाव हा तिसरा पाद होय. पण सत्य ज्ञानाची व संयमाची बैठक असल्याची खूण दयाभाव हा भाववाचक गुण झाला. त्याचें प्रत्यक्ष अनुभवास येणारें कार्य त्याचा विनियोग म्हणजे दान होय. तो चौथा पाद म्हणावयाचा. या चारांपैकीं एकहि अधू वा उणा असला तर सांग संपूर्ण धर्म होत नाहीं आणि अर्थातच जीवितसाफल्य साधत नाहीं. असा हा जीवितसाफल्य-हेतु, सर्वसुख-हेतु चतुष्पाद धर्म म्हणजे वृष ज्याला प्रिय नाहीं असा करंटा कोण आहे? म्हणून तो सर्वात्मा परमात्मा वृषप्रिय म्हटला आहे.

## ५९६. अनिवर्ती

निवर्तणें म्हणजे परत फिरणें, पाठ दाखविणें अर्थात् अनिवर्ती म्हणजे माघारा न फिरणारा, रणांत अभिमुख मरणारा, निर्‌भय जिवावर उदार होऊन लढणारा परम वीर पुरुष. परमात्मा हा असा परम वीर आहे. त्याला परत फिरणें ठाऊक नाहीं. तो कार्याकार्यनिर्णय करून जें कार्य तेंच करतो. आणि एकदां हातीं घेतलें कीं तें तडीस नेल्याखेरीज सोडत नाहीं. पण या जगांत परमात्म्याला काय कार्य आहे? जो पूर्णकाम त्याला कार्य कसलें? जियें काम तियें कर्म, तियें कर्मफल-वासना. पण परमात्म्याच्या ठाईं

या दैन्याचा पूर्ण अभाव असल्यामुळें त्याला मुळीं काम कर्म नि वासना यांचा संपर्कच नाहीं. तो अकर्ता आहे, अभोक्ता आहे, आणि या आपल्या स्वभावापासून तो केव्हांहि मागें पाय घेत नाहीं, माघारा फिरत नाहीं. म्हटलेंच आहे: "आत्मा कर्त्रादिरूपश् चेत् मा काङ्क्षीस् तर्हि मुक्तताम्। नहि स्वभावो भावानां व्यावर्तेत् औष्ण्यवद् रवे:।। आत्मा हा नित्य शुद्ध बुद्ध मुक्त स्वभाव असल्यामुळें तो कर्तृत्व भोक्तृत्वादि धर्मापासून नित्य निवृत्त आहे, पण आपल्या अकर्तृत्वादि स्वभावाबाबत अनिवर्ती आहे. आणि त्याच मुळें मुक्तीची आशा मनुष्य करूं शकतो आणि इतर सर्व आशा त्याच्या व्यर्थच होत. पण मग याचा अर्थ मानवाला कांहीं कर्तव्यच नाहीं असा होईल? होय, कर्तव्यबुद्धि सोडणें एवढेंच त्याचें कर्तव्य आहे आणि तेंच पुढील पद सांगत आहे. निवृत्तात्मा. निवृत्ति, सर्वकर्मसंन्यास हेंच त्याचें कर्तव्य. कर्म, योग, भक्ति आणि ज्ञान या सर्व योगांचें हेंच तात्पर्य आहे. जीव संसारांत येतो म्हणून परत जातो, निवर्ततो. परंतु जो जन्मतच नाहीं त्या अज परमात्म्याला निवर्तणें संभवत नाहीं. म्हणून तो अनिवर्ती.

## ५९७. निवृत्तात्मा

निवृत्तात्मा म्हणजे निवृत्तस्वरूप, शान्त. परमात्मा सर्व प्रवृत्तींपासून निवृत्त आहे. तो संकल्पवृत्ति आणि प्रवृत्ति म्हणजे क्रिया यांच्यापासून मुक्त आहे. मनुष्य जेव्हां एखादी क्रिया करतो तेव्हां आधीं त्याच्या मनांत रागद्वेषरूप तरंग उठतात. हीच वृत्ति मनांत उंचबळली म्हणजे मग मनुष्य स्वस्थ बसूं शकत नाहीं. तो तदनुसार हालचाल करूं लागतो. हीच प्रवृत्ति परंतु अविद्या-जनित म्हणजे मी अपूर्ण आहें, मला कांहीं मिळवायचें आहे, अशा कल्पनेंतून उत्पन्न कामच जिथें संभवत नाहीं तिथें रागद्वेष कुठून उठणार? आणि जिथें वृत्तिच नाहीं तिथें प्रवृत्ति कशी होणार? म्हणून चिन्मात्रमूर्ति पूर्णकाम परमात्मा हा नित्य निवृत्तात्मा आहे. नित्य शुद्ध बुद्ध मुक्तस्वभाव असें आत्मतत्त्व स्वयंसिद्ध असल्यावर क्रियाकर्माला मुळीं वावच कुठें आहे? वाव फक्त त्या क्रियाकर्मांच्या 'क्रियाकर्माला' च आहे. आत्मतत्त्व आणि त्याचा स्वभाव मुक्ति आप्य नाहीं, कार्य नाहीं, संस्कार्य नाहीं. त्यामुळें त्याच्या प्राप्तीसाठीं कांहीं कर्तव्य असूं शकत नाहीं. तें नैष्कर्म्यरूप आहे. त्याच्या प्राप्तीसाठीं कार्य हा वदतो व्याघात झाला. श्रुति 'आत्मा वा अरे द्रष्टव्य: श्रोतव्यो मन्तव्यो निदिध्यासितव्य:' असें म्हणते. 'कर्तव्य:' म्हणत नाहीं. कोणी म्हणेल अहो पाहणें ऐकणें चिन्तणें ध्यास घेणें हीं हि कर्मेंच! पण हीं निवृत्त कर्मे आहेत. ज्ञाननिष्ठायोग्यता बाणेपर्यंत त्यांचें प्रयोजन. त्यानंतर तीं हि नको. वाक्यविचार प्रतीति झाल्यानंतर संपतो. उरते केवळ आत्म-प्रतीति. आणि ती आहे केवळ शमस्वरूप. म्हणून परमात्मा हा निवृत्तात्मा म्हटला आहे.

## ५९८. संक्षेप्ता

कल्पारंभीं परमात्मा हा विश्वपट उलगडून पसरतो. तेव्हां ही सर्वतोऽनन्तरूप सर्वाश्चर्यमय विचित्र सृष्टि प्रकट होते. देशत: कालत: त्या विश्वरूपाचा कुठें अन्तच लागत नाहीं. अगणित अमित अप्रमेय अचिन्त्य असें हें विस्तृत आणि प्रति-क्षण विस्तारशील विश्व आहे. पण ह्या विश्वपटाची तो परमात्मा कल्पान्तीं घडी घालतो. तेव्हां हा समस्त विचित्र व्यक्ताकार एका एकरूप अव्यक्तांत समाविष्ट होतो. ही संक्षेप-प्रक्रिया भागवतांत अशी वर्णिली आहे:—

'ठेपतां लय धातूंचा काल आदि न अंत ज्या। अव्यक्तीं करितो लीन व्यक्ता द्रव्यगुणात्मका।। होय घोर अनावृष्टि भूलोकीं शतवार्षिकी। तेव्हां तो सूर्य अत्युग्र जाळी हे लोक तीनहि।। पाताळांतूनि शेषाचा मुखानल उफाळला। वातें भडकला जाय सर्वतोदिश जाळित।। प्रलयंकर मेघांची वर्षा मुसळधार

ती। चाले अखंड शें वर्षे बुडे तेथ विराट् जळीं।। तेव्हां पुरुष वैराज देह टाकूनिया विराट्। विलीन होय अव्यक्तीं जसा अग्नि निरिंधन।। हरूनि गंध घे वायु तेव्हां भूमि विरे जळीं । जळ तें मिसळे तेजीं वायूनें हरतां रस।। तमानें हरतां रूप तेज वायूंत तें मिळे। अवकाशें हृतस्पर्श वायु पावे नभीं लय।। कालात्में हरतां शब्द अहंकारीं शिरे नभ। इंद्रियें बुद्धि तेथेंचि मन वैकारिकांसह।। गुणांसह अहंकार महत् तत्त्वांत तो शिरे। होय लीन महत्तत्त्व ईशमायेंत शेवटीं।। ही विश्वसंक्षेपरूप ईशमाया म्हणजे परमात्म्याची अंगभूत अव्यक्त प्रकृति होय. ज्या क्रमानें सृष्टि अव्यक्तांतून प्रसृत होते त्याच्या उलट क्रमानें ती अव्यक्तांत निलीन व विलीन होऊन संक्षेप पावते. हें ज्याच्या शक्तीनें होते तो परमात्मा संक्षेप्ता म्हणावयाचा. विश्लेषण आणि संश्लेषण अथवा व्यूहन आणि समूहन मिळून ज्ञानाची पूर्णता होत असते. परमात्म्याचा सृष्टिकल्प हि तसाच व्यूह आणि समूह मिळून झाला आहे. स्रष्टा व्यूहन करतो, संक्षेप्ता सृष्टीचें समूहन करतो. हा संपूर्ण सृष्टिकल्प ज्यानें ओळखून घेतला तो मग त्यांत सांपडत नाहीं. तो मुक्त होतो.

## ५९९. क्षेमकृत्

क्षेम म्हणजे निर्भय स्थान, सुरक्षित आश्रय,शरण. रक्षणासाठीं माणसें घराचा, किल्ल्याचा, रानावनाचा वा डोंगरद-यांचा आश्रय घेतात. परंतु हा आश्रय माणसांना अविद्येपासून कुबुद्धीपासून कुवासनेपासून सोडवूं शकत नाहीं. जन्म मृत्यु जराव्याधि दुःखदोषांपासून सोडवूं शकत नाहीं. मग असल्या शरणांची मातब्बरी ती काय? हीं शरणें म्हणजे आश्रय-स्थानें सुरक्षित नाहींत. म्हणजे तीं क्षेम नाहींत.

**घेती आश्रय रानांचा पर्वतांचा हि पुष्कळ।**
**उद्यान-वृक्ष चैत्यांचा भयसंत्रस्त मानव।।**
**न हा आश्रय कल्याण न हा आश्रय उत्तम।**
**न हा आश्रय पावूनि दुःखांतूनि सुटे नर।।**
**गेला शरण बुद्धास धर्मा संघास जो तसा।**
**सम्यक् प्रज्ञाबलें देखे आर्यसत्यें चतुर्विध।।**
**दुःख दुःख-समुत्पत्ति दुःखांचा समतिक्रम।**
**दुःखोपशमगामी तो आर्य अष्टांग मार्ग हि।**
**हाचि आश्रय कल्याण हाचि आश्रय उत्तम।**
**हाचि आश्रय पावूनि दुःखांतूनि सुटे नर।।**
**सुख उत्पत्ति बुद्धांची सुख धर्मोपदेश तो।**
**सुख संहति संघाची तपस्या सुख सांघिक।।**

वरील धर्म वचनांत म्हटलें आहे कीं सद्गुरु, सद्गुरूपदिष्ट धर्म-संप्रदाय आणि त्या सद्गुरूचे व गुरूपदिष्ट संप्रदायाचे भक्तगण हाच क्षेम असा आश्रय आहे. या शरणांत आश्रय घेणारेच भवभयांतून मुक्त होतात. हे त्रिशरण कोण निर्माण करतो? तो परमात्माच हे क्षेम, हें रक्षण, निर्मितो. कारण तोच ''गुरूणां गुरुः'' आहे. तोच शास्त्रयोनि आहे, तोच भक्तसंघाचा संघटक आहे. म्हणून तो सर्वादि च क्षेमकृत् म्हणावयाचा. आत्मज्ञानरूप क्षेम परमात्म्यानें सर्व जीवांच्या परम कल्याणासाठीं कायमचें करून ठेवलें आहे. गुरुरूपानें तोच त्याचा उपदेश देतो. तोच शास्त्ररूपानें धर्म-मार्ग होतो आणि तोच भक्त-संघरूपानें त्याचें अनुसरण करीत त्याचा परस्परांना बोध देत आणि त्याचें कीर्तन करीत मोद पावत आणि रमत असतो. (पहा गीता १०, ८-११).

## ६००. शिव

''संक्षेप्ता क्षेमकृत् शिवः'' हा चरण एक-सूत्र आहे. विश्वाचा संक्षेप म्हणजे संहार करून क्षेम म्हणजे संपादित संरक्षण करणारा तो परमात्मा आत्मवान् शिव म्हणजे परमपवित्र आहे, सर्व अज्ञानरूप अशिवां-पासून मुक्त केवल मंगलस्वरूप आहे. आनंदस्वरूप आहे. संक्षेप्ता व क्षेमकृत् हीं पदें जणूं व्यावृत्तीनें व वस्तु-विधानानें शिवाची व्याख्याच करीत आहेत. संक्षेप्ता म्हणजे प्रपंचोपशम करणारा आणि क्षेमकृत् म्हणजे आत्मनिष्ठ असें जें तत्त्व तें म्हणावयाचें शिव.

''प्रपंचोपशमं शान्तं शिवं अद्वैतं चतुर्थं मन्यन्ते'' या वचनांत या शिवाला तुरीय म्हटलें आहे. महिम्न त्याचाच महिमा असा गातें:–

**बहल-रजसे विश्वोत्पत्तौ भवाय नमोनमः**
**प्रबल-तमसे तत्-संहारे हराय नमोनमः।**
**जन-सुखकृते सत्त्वोद्रिक्तौ मृडाय नमोनमः**
**प्रमहसि पदे निस्त्रैगुण्ये शिवाय नमोनमः॥**

भव मृड हर हीं अर्वाचीन पदें होत. शिव हें सर्वोत्कृष्ट सर्वातीत परात्पर पद आहे. तें चरम आणि परम पद आहे.

सत्त्वोदय, सत्त्वोत्कर्ष, सत्त्वोद्रेक म्हणजे दया क्षमा शान्ति हा वैष्णवांचा सगुण संप्रदाय. वैराग्य वाक्यविचार संन्यास हा शैवांचा निर्गुण संप्रदाय हे दोन्ही योग-संन्यास मार्ग मुक्कामाला एक होतात. तीच हरिहर भेट. शैव त्या पदाला शिवरूप पाहून 'नमः शिवाय' हा पंचाक्षरी मंत्र जपतात, वैष्णव त्या पदाला भगवद्रूप पाहून ''नमो भगवते वासुदेवाय'' असा एकादशाक्षरी मंत्र जपतात, इतकेंच. वैष्णवांचा संक्षिप्त मंत्र ''राम'' आहे तर शैवांचा ''शिव'' आहे. दोहोंचें तात्पर्य अभिन्न आहे हें ओळखणारे म्हणून शिवराम नाम धारण करीत असतात. आवडीप्रमाणें हवें तें नाम घ्यावें. वैदिक आरंभीं ॐ जोडून देतात.

## *शतक सातवें*

### ६०१. श्रीवत्स-वक्षा

श्रीवत्स नामक चिह्न ज्याच्या वक्षःस्थळीं आहे तो श्रीवत्सवक्षा म्हणावयाचा. माणसाच्या काय पण सर्वच प्राण्यांच्या शरीरावर निरनिराळीं चिह्नें जन्मतःच असतात. काळे पांढरे लहान मोठे नाना आकृतीचे तीळ आणि डाग असतात. असले डाग वा लांछनें ही जन्मखूण म्हणून ओळखली जाते. ती कोणाला बदलतां येत नाहीं. भगवान् विष्णूच्या छातीवरील असलीच जी खूण तिचें नांव श्रीवत्स. म्हणून तो श्रीवत्सवक्षा म्हटला आहे.

लांछन म्हणजे चिह्न असण्यांत काहीं विशेष नाहीं. पण प्रिय व्यक्तीचें सारेंच कौतुकास्पद वाटतें त्यामुळें त्याच्या गुणांचें तसें दोषांचें सर्वांचेंच कौतुक होत असतें. हा सारा प्रेमाचा पागलपणा आहे. आपल्या प्रेमानें न्हाऊं घालून आणि लेववून ज्याच्या कडे पाहूं तो सुंदरच वाटायचा. म्हणजे सौंदर्य हें वस्तुनिष्ठ न राहतां आत्मनिष्ठ झालें. समोरची वस्तु कशी हि असली तरी जशी ती मी पाहीन तशी ती मला दिसेल. अर्थात् ''आत्मनस्तु कामाय सर्वं प्रियं भवति''. म्हणजे परम प्रेमास्पद आत्मा आहे आणि तो ज्याला जेव्हां जितकें चाहील तितका तेव्हां तो गोड वाटेल. चंद्र आम्हांला प्रिय आहे म्हणजे आत्मीय आहे त्यामुळें त्याचा डाग हि आम्हांला गोडच वाटतो. आणि आम्ही त्याला मोठ्या प्रेमानें शशलाञ्छन म्हणतों. खरोखर लाञ्छन केव्हांहि वाईटच, पण तें देखील कौतुकास्पद झालें आत्मीयतेमुळें. परमात्मा हा साक्षात् सर्वान्तरयामी सर्वात्मा त्यामुळें तो नि त्याचें अवतारादि सारे आम्हांला गोड झाल्यास नवल काय? मधुराधिपतेर् अखिलं मधुरम्!

परम पुरुषाची आदिशक्ति म्हणजे श्री. तिचें वत्स म्हणजे हें विश्व. तें विश्व ज्याच्या वक्षःस्थळीं विराजमान आहे तो श्रीवत्सवक्षा म्हणावयाचा. खरोखर हें विश्वच परमात्म्याचें लाञ्छन म्हणजे खूण वा गमक होय. आणि म्हणूनच तो श्रीवत्सलाञ्छन म्हणावयाचा.

### ६०२. श्रीवास

श्रीवत्सवक्षा पासून श्रीमान् पर्यंत श्रीचा पाढा आला आहे. श्रीपूर्व जितकीं पदें आठवलीं तितकीं एका सूत्रांत इथें ग्रथित झालीं आहेत. श्रीवास आणि श्रीनिवास असलीं केवळ एका उपसर्गानेंच भिन्न असलेलीं हि पदें आलीं आहेत, तर ज्याचा श्रीशीं नाममात्रच संबंध आहे असें श्रेय सारखें हि पद येऊन गेलें आहे. शब्द म्हणजे ध्वनि आणि अर्थ म्हणजे

अभिप्राय ह्या दोन वाणीच्या चाकोऱ्या आहेत. या चाकोऱ्यांनीं वाणीचा संचार होत असतो. केव्हां ती शब्दाच्या चाकोरीकडे कलते, केव्हां अर्थाच्या केव्हां दोन्ही वर समान चालते. इथें ती नादलुब्ध झाली आहे, शब्दाकडे झुकली आहे, असें म्हणतां येईल.

सरस्वतीचे उपासक प्राय: अकिंचनच राहिले आहेत. त्यामुळें श्रीचें आकर्षण त्यांना स्वाभाविकच विशेष आहे. बिचारे सारखे श्री घोकीत असतात. सगळ्या गोष्टींचा आरंभ श्रीनें करतात. पत्र असो पोथी असो जमाखर्चाची चोपडी असो आरंभीं श्रीची स्थापना होते. पण श्री त्यांना प्रसन्न होत नाहीं ती नाहींच. कारण त्यांच्यापाशीं साहस नाहीं. आणि "साहसे श्री: प्रतिवसति." जिथें साहस तिथें श्रीचा वास असतो. परमात्मा हा श्रीवास आहे अर्थात् तो साहसरूप आहे. जे निष्क्रिय विचारच करीत बसतात त्यांच्या ठाईं उद्यम कुठला? आणि उद्यम नाहीं, उद्योग नाहीं त्यांना लक्ष्मी कुठून मिळणार? "उद्योगिनं पुरुषसिंहमुपैति लक्ष्मी:। दैवं बलीय इति कापुरुषा वदन्ति।।" उद्योगी आणि पराक्रमी पुरुषांना लक्ष्मी वरीत असते. आळशी आणि पराक्रमशून्य म्हणजेच साहसहीन कायरांना भ्याडांना लक्ष्मी वरीत नाहीं, ती कधीं लाभत नाहीं. परमात्मा हा श्रीवास आहे म्हणजे तो साहसमूर्ति आहे, निरलस उद्योगी आणि संकटांवर मात करणारा पराक्रमी आहे, "अनारम्भो हि कार्याणां प्रथमं बुद्धिलक्षणम्" म्हणणारा नाकर्ता नामर्द नाहीं.

## ६०३. श्रीपति

जो श्रीचा वास म्हणजे आश्रय आहे तोच तिचा पति म्हणजे स्वामी हि असावयाचा. कार्य हें सदैव कारणाश्रित असतें. पण कारण हें केहांहि कार्याधीन असत नाहीं. तें स्वतंत्र असतें आणि म्हणूनच तें पति संज्ञेस पात्र होय. अलंकार सुवर्णाश्रित आहेत. ते सोन्याला वगळून राहूं शकत नाहींत. परंतु सोनें अलंकाराधीन नाहीं. ते अलंकारावांचूनहि लगडीच्या रूपानें असूं शकतें आणि म्हणून कारण हें स्वाधीन असून तें कार्याचें स्वामित्व राखतें असें म्हटलें जाईल. तद्नुसार सर्वकारण परमात्मा हाच श्रीपति म्हणजे सर्व श्रीचा, कार्यरूपानें फांकलेल्या ह्या संपत्तीचा स्वामी होय.

गुण द्रव्याश्रित म्हटले जातात. पण द्रव्य आणि गुण यांत द्रव्य स्थूल आणि गुण सूक्ष्म म्हटले जातील. आणि कार्य स्थूल, कारण सूक्ष्म असतें. या दृष्टीनें पाहतां द्रव्यच गुणाश्रित म्हटलें पाहिजे. गुण तन्मात्रस्वरूप होत. पाणी स्थूल आहे. त्याचें कारण एच् टू ओ वायुरूप सूक्ष्म आहे. तो वायुच रसरूप आणि जलाचें तन्मात्र म्हणावयाचें. पण द्रव्याहून गुणरूप तन्मात्र सूक्ष्म म्हटलें तरी तें व्यक्त च होय. त्याहून सूक्ष्म म्हणजे अव्यक्तच. आणि तेंच या विश्वाचें कारण म्हटलें जाईल. अशा प्रकारें मूल कारणाचा शोध घेतां घेतां विचारक त्या अव्यक्त अक्षराला जाऊन पोंचतो. आणि तोच अक्षर पुरुष या समस्त विश्वश्रीचा पति आहे असें लक्षांत येतें. म्हणून त्याला श्रीपति म्हटलें आहे. या श्रीपतीचाच दक्षिण भारतांत तिरुपति बनला आहे. श्रीचें द्रविड भाषेंत तिरु असें रूप झालें आहे. त्या तिरुपतीचें मंदिर गिरीवर आहे. तें सूचित करतें कीं तो जगावेगळा परात्पर कूटस्थ आहे. भक्तजन सर्वसंपत्ति त्याच्या चरणीं अर्पण करतात. आणि आपण नव्हे तर परमात्मा श्री-पति आहे हें तथ्य व्यक्त करतात.

## ६०४. श्रीमतांवर

परमात्मा हा श्रीमतांवर म्हणजे श्रीमंतांतील श्रीमंत आहे. याचा अर्थ असा झाला कीं श्री बाळगणें, श्रीमंत होणें चांगलें आहे. त्यांत गैर कांहीं नाहीं, इतकेंच नव्हे तर तें प्रशस्त आहे. आणि ज्याअर्थी कोणाचें हि जीवन श्रीविना चालूं शकत नाहीं त्याअर्थी ती संपादणें हें प्रत्येकाचें कर्तव्यच आहे. पण मग

''अर्थमनर्थं भावय नित्यं नास्ति ततः सुखलेशः सत्यम्''

इत्यादि अर्थनिन्दा परमार्थाच्या, वेदान्ताच्या, ग्रंथांत केली आहे, हें कसें? या तथाकथित वेदान्त ग्रंथांत आणि परमार्थग्रंथांत कनक आणि कांता यांची भरपूर निंदा केलेली आहे. तिचें तात्पर्य ह्या दोन विषयांसंबंधीं जीवाच्या ठाईं असलेली अविवेकपूर्ण आसक्ति आणि अतिरेक दूर व्हावा इतकेंच आहे. लोक एका टोकाला जातात तेव्हां त्यांना रस्त्यावर आणण्यासाठीं शास्त्र दुसऱ्या टोकाला खेंचतें. आणि त्यामुळें तें त्यांच्या विषयीं वैराग्यभावना जागृत होईल अशी आशा आणि अपेक्षा बाळगतें. पण वैराग्यभावना मोहापगमाचा, सत्य ज्ञानाचा, परिणाम आहे. तो खोट्या स्तुतिनिन्दांनीं कसा येणार? या मुळेंच पुराणादिकांतील असल्या स्तुतिनिंदा अकिंचित्कर झाल्या आहेत. अर्थ हा अर्थनीय आहे म्हणूनच अर्थ म्हटला आहे. तो अनर्थ कसा? स्त्री ही दयिता आहे. ती स्त्री जीवघेणी म्हणण्यांत काय अर्थ? असें अवास्तव बोलणेंच वस्तुतः अनर्थ होय. जो अर्थ सद्गुणांचा परिणाम आणि सत्कार्याचा कारक आहे तो श्री होय. अशी श्री संपादून श्रीमंत होणें स्पृहणीय आहे, कर्तव्य आहे. परोपजीवी होऊन म्हणजे परद्रोह करून पिंड पोसणें म्हणजे पापच पोसणें होय. आणि श्रीमंत तर पुण्यशील पुण्यात्मा असतो. गीतेंत म्हणूनच भगवान् म्हणतात ''शुचीनां श्रीमतां गेहे योगभ्रष्टोऽभिजायते'' जिथें दैवी संपद् आहे आणि भौतिक अनुकूलता आहे अशा पवित्र श्रीमंताच्या घरीं अपूर्ण योगसाधनेचा योगी जन्म पावतो.

## ६०५. श्रीद

श्री-द म्हणजे श्री देणारा. उघडच आहे कीं जो श्रीमंत असेल तोच श्रीद होईल. म्हणूनच 'श्रीमतांवर' पदापाठोपाठ 'श्रीद' पद आलें आहे. त्याच बरोबर तें असें हि सूचित करीत आहे कीं श्रीमतांवर कोण, तर जो श्रीद असेल तो. कंजूष माणसाला कृपण म्हणतात. ''तो धनवान् भलें असो पण तो श्रीमान् नव्हे'' त्याच्या ठाईं कार्पण्य आहे, दीनता आहे. श्रीमान् हा उदारच असावयाचा. त्याच्या ठाईं कृपणतारूप कद्रूपता, श्रीहीन करंटपणा नाहीं, अदातृत्व नाहीं. त्याच्या ठाईं आपण जें देतों त्याचें फळ, त्याचा मोबदला मिळावा अशी हि वासना नाहीं. निःसंकोच निरपेक्ष दातव्य म्हणून तो देत असतो. तोच श्रीद म्हणावयाचा. अर्थात् त्याची श्रीमंती ही त्याच्या हृदयाची उदारता होय. ती त्याच्या द्रव्यसंपत्तीवर अवलंबून नाहीं. सर्वांतर्यामी परमात्मा जो प्रसन्न होतो तो ह्या हृदयाच्या उदारतेवरच होय. हिचेंच नांव हृदयशुद्धि, हिचेंच नांव आत्मशुद्धि. हिलाच प्रयतात्मता म्हटलें आहे.

**पत्रं पुष्पं फलं तोयं यो मे भक्तः प्रयच्छति।**
**तद् अहं भक्त्युपहृतं अश्नामि प्रयतात्मनः।।**

अर्थात् श्रीदतेंत श्रीमत्ता हवी, दातृत्व हवें, फलनिरपेक्षता हवी. हे तिन्ही गुण जिथें एकवटले आहेत तोच श्रीद म्हणावयाचा. परमात्मा हा असा श्रीद आहे आणि आम्हांला तो अनुकरणीय आहे. लोकांना तुमच्या धनाची मातब्बरी नाहीं, तुमच्या हृदयाच्या उदारतेची, तुमच्या निरपेक्ष प्रेमभावनेची मातब्बरी वाटते. ती निरपेक्ष प्रेमभावना ज्याच्यांतून ओसंडत आहे खरोखर तोच श्रीद म्हणावयाचा.

ज्याला ज्याचें महत्त्व वाटतें त्याला तें श्री होय. आणि असली सारी श्री आत्मशक्तीनेंच मिळत असते. म्हणून तो परमात्मा श्रीद म्हणावयाचा. या श्रींत मुक्ति नि भुक्ति दोन्ही हि येऊन जातात.

## ६०६. श्रीश

श्रीश म्हणजे श्रीचा ईश. श्रीश आणि श्रीपति यांत खरोखर काय फरक आहे? जल-ज नीर-ज, वारि-ज यांत जेवढा फरक आहे तेवढाच इथें हि. केवळ

शाब्दिक फरक आहे. जो पति तोच ईश आणि जो ईश तोच पति. पति शब्द भर्तृभार्यासंबंध सुचवितो तर ईश शब्द राजप्रजासंबंध सुचवितो असा श्लेष काढणें शक्य आहे. पति पदांत पालन तर ईश शब्दांत ईशन म्हणजे शासन सूचित होत आहे असें म्हणतां येईल. परंतु ईशनालाच पालन व पालनालाच ईशन म्हणतात. त्यांत खरोखर कांहींच फरक नाहीं. राजा राज्य करतो म्हणजे प्रजापालन करतो. यालाच गीतेंत क्षात्रकर्म सांगतांना ईश्वरभाव म्हटलें आहे. ''दानं ईश्वरभावश्च क्षात्रं कर्म स्वभावजम्'' ईश्वरभाव म्हणजे ईशन, म्हणजे प्रजापालन. सारांश, जो श्लेष काढला तो हि उडून गेला. पति आणि ईश या दोन शब्दांत धातु भिन्न असले तरी त्यांचा अर्थ एकच आहे. त्यामुळें त्या बाजूनें दोन पदांची उपपत्ति नीट लागत नाहीं. आतां श्री पदाचा विचार करूं. श्रीपति पदांत श्री म्हणजे लक्ष्मी असा व्यक्तिवाचक अर्थ घेणें शक्य आहे. कारण समुद्रमंथनाच्या वेळीं निघालेल्या लक्ष्मी नें सर्व सुरासुरांना सोडून विष्णुलाच वरलें आहे. म्हणून तो श्रीवर श्रीपति म्हणावयाचा आणि विश्वांत ज्या कोणत्या श्री म्हणजे संपदा आहेत त्यांचा स्वामी तो श्रीश म्हणावयाचा.

पण जगांत श्री तरी किती आहेत? जितके देह तितक्या श्री आहेत असें म्हणतां येईल. त्या देहांनाच पुर उर्फ धानी अशी संज्ञा आहे. आणि त्यांचें ईशन करणारा जो आत्मराजा तोच श्रीश म्हणावयाचा. प्रत्यगात्मरूपानें परमात्मा हा सर्व पुरींचा ईश पुरीश वा पुरुष होय. तोच इथें श्रीश पदानें अभिप्रेत आहे, असें म्हणतां येईल.

जडाला स्वत:चा कांहीं उपयोग नाहीं त्यामुळें तें सदैव चेतनोपयोगी चेतनाधीनच रहायचें. म्हणून श्री म्हणजे ती जड प्रकृति आणि श्रीश म्हणजे तो प्रकृति-स्वामी परमात्मा होय.

## ६०७. श्रीनिवास

श्रीपति आणि श्रीश पदें दोन पण अर्थ एक. तशींच श्रीवास आणि श्रीनिवास हीं नामें होत. दोहोंत खरोखर तसें कांहीं अंतर नाहीं. पण ज्या अर्थीं दोन पदें आलीं आहेत त्याअर्थीं त्यांच्यांत कांहीं फरक असलाच पाहिजे. शंकराचार्यांनीं तसा तो सूचित केला आहे. श्रीवास म्हणजे श्रीचा वास, तर श्रीनिवास म्हणजे श्रीमंतांत वास असा अर्थ शंकराचार्य करतात. श्री पदानें श्रीमंत सूचित होतात असें त्यांनीं म्हटलें आहे. मला तर तो जगन्-निवास पदासारखाच बहुव्रीहि वाटतो. तथापि शंकराचार्यासारख्यांचा अर्थ हि गोड आहे. तुलसीदासजींनीं हि आपल्या रामायणांत रामानें निवास कुठें करावा हें सांगतांना बहार केली आहे. त्यांनीं म्हटलें आहे कीं भगवंताचा निवास दैवी संपदेच्या पुरुषांत असतो. अशांच्याच हृदयांत रामानें निवास करावा, असें ते म्हणतात: ''जिनके कपट दंभ नहिं माया। तिन्हके हृदय बसहु रघुराया'' सत्य हें सद्गुणांत वास करीत असतें. गुण हें कार्यरूप व्यक्त आहेत, सत्य हें कारणरूप अव्यक्त आहे. दोहोंचें साहचर्य नित्य आहे. पण कोण कोणाचा आधार आहे याबाबत भ्रम राहूं नये. ''पात्राधारं घृतं घृताधारं वा पात्रम्'' असा संशय नसावा. कार्यच कारणाश्रित असावयाचें, कारण केव्हां हि कार्याधार नव्हे—हा निर्णय आहे. म्हणून सर्वसद्गुण-संपत्तीचा आश्रय सद्रूप परमात्माच होय. म्हणूनच तो श्रीचा निवास म्हणावयाचा. सौरी प्रभा सूर्याची, कौमुदी कुमदबांधवाची, तशी श्री म्हणजे लक्ष्मी ही भगवंताची अंगभूत आहे, नित्य आश्रित आहे. तद्विपरीत नव्हे. या श्रीच्या पाठ्याचें हेंच तात्पर्य आहे.

## ६०८. श्रीनिधि

तेजोनिधि म्हणजे जसा सूर्य, जलधि म्हणजे जसा समुद्र तसा श्रीनिधि म्हणजे परमात्मा होय. जलधींतून

सर्व जलें बाष्परूपानें अंतराळांत वर जातात. प्रावृड्रूपानें तीं परत भूमीवर खालीं येतात आणि प्रवाहित होऊन परत समुद्रांत निहित होतात. त्या प्रमाणें विश्वरूपानें प्रकटलेली आणि अनादि कालापासून प्रवाहित झालेली ही सृष्टिश्रीसरिता ज्या अचिन्त्य-शक्ति परमात्म्यापासून निघून परत त्यांतच मिळून मिळतच आहे तो परमात्माच श्रीनिधि म्हणावयाचा. ही जडचेतन सर्व सृष्टि त्या चिन्मात्रमूर्ति परमात्म्यापासून निर्माण होऊन त्यांतच शेवटीं विलीन व्हावयाची आहे. म्हणून तो श्रीनिधि. संपत्ति स्थावर जंगम म्हणून दोन कोटींत विभागिली जाते. जड प्रकृति ती स्थावर संपत्ति आणि जीव ही जंगम संपत्ति होय. या द्विविध संपत्तीचा, श्रीचा, निधि तो परमात्माच आहे.

परमात्म्याचें हें श्रीनिधित्व प्रकट करण्यासाठीं त्याच्या अंगोपांगीं रत्नजडित सुवर्ण भूषणें लेवविलीं जातात. नखशिखान्त तो अलंकारांनीं मढविला जातो.

पण परमात्मा हा सहजसुंदर आहे. त्याला बाहेरच्या जड जवाहरांनीं नटविण्याची गरज नाहीं. त्याची सृष्टि हि तशीच सहज सुंदर आहे. त्या सृष्टीचा अंशभूत मानव प्राणी हि तसाच सहजसुंदर आहे. पण हें मूढ जन ओळखत नाहीं आणि कृत्रिम शोभा करतो. पण त्यायोगें त्याची शोभा मात्र होते. उसनी ऐट, कृत्रिम भूषा आत्म्याच्या स्वाभाविक प्रतिष्ठेला दूषण आहे हें त्याच्या लक्षांत येत नाहीं. आणि दूषणालाच भूषण म्हणून तो मिरवतो.

## ६०९. श्रीविभावन

श्रीविभावन म्हणजे श्री-विविध-भावन, नानाविध आविर्भाव करणारा. परमात्म्यानें ही स्थावर जंगम सृष्टिरूप विविध शोभा निर्माण केली आहे. त्यानें नाना जीव, नाना कर्में आणि नाना कर्मफलें निर्मिलीं आहेत. अनेक पुण्यलोक आणि अनेक पापलोक त्यानें निर्मिले आहेत. सात्त्विक राजस तामस प्रकृतींच्या असंख्य जीवयोनि या विश्वांत नांदत आहेत. पुराण-कारांनीं त्यांची संख्या ८४ लक्ष दिली आहे. अगणित वा असंख्येय योनींचें गणन वा संख्यान कसें केलें त्यांनीं? प्रथम त्यांनीं सर्व त्रिगुणात्मक म्हणून तीन ही संख्या घेतली. प्रत्येक गुणाच्या योनि शुद्ध आणि मिश्र अशा द्विविध कल्पिल्या. शुद्ध तर एकच असणार, पण मिश्र सत्त्वप्रधान रज:प्रधान व तम:प्रधान अशा तीन होणार. एकूण चार उपशाखा झाल्या. यांच्या प्रत्येकीं पुन: सात छटा कल्पिल्या सप्तलोकानुसार. सप्तलोक भूर् भुवर् स्वर् महर् जन तपस् आणि सत्यम् असे कल्पिले असून सर्व विश्व या सप्तांनीं मिळून बनलेलें आहे अशी कल्पना आहे. म्हणजे ३ × ४ × ७=८४ ही संख्या आली. शुद्ध गुणांच्या योनि एकलक्ष मानून घेतल्या. मिश्र गुणांच्या त्या प्रत्येकीं १ लक्षाप्रमाणें तीन लक्ष झाल्या आणि त्यांच्या गुणांच्या व लोकांच्या पटीनीं त्या एकूण ८४ लक्ष गणल्या, लक्षाची संख्या कोणती तरी एक संख्या घेणें जरूर म्हणून मानून घेतली. सहस्र आणि कोटि या संख्यांच्या मधली अशी ती मध्यम संख्या आहे. कमी नाहीं नि अधिक हि नाहीं. बोलायला कुठली तरी एक संख्या हवी असते. आपण म्हणतो "तुझ्या सारखे ५६ पाहिले." आतां ५६ या संख्येला काय अर्थ आहे? तिचा अर्थ पुष्कळ एवढाच घ्यावयाचा. तो घेऊन शिवाय एखादा सांख्यवादी असें म्हणूं शकेल कीं दिशा आठ आहेत आणि प्रत्येक दिशेला सात सात अशा प्रकारें ७ × ८=५६ ही संख्या आलेली आहे. असेल हि तसें. ८४ लक्ष योनि या संख्येलाहि तोच न्याय लागू होतो. हा सगळा वि या उपसर्गाचा विस्तार आहे.

## ६१०. श्रीधर

श्रियं धारयति इति श्रीधर:। जो श्रीला धारण करतो तो श्रीधर. जलधर मेघ हा जलधारण करतो म्हणजे तो जलगर्भ असतो. तसा परमात्मा हा श्रीधर म्हणजे श्रीगर्भ आहे. त्याच्या ठाईं श्रीगर्भ वाढत आहे.

त्याच्यापासूनच श्रीचा जन्म होतो. सूर्यापासून जसें तेज प्रकटतें, अग्निपासून जसें औष्ण्य, चन्द्रापासून जशी आह्लादकता त्या प्रमाणें परमात्म्यापासून श्री प्रस्फुटित होते. म्हणून तो म्हणावयाचा श्रीधर. श्रीगर्भ पद तसें पूर्वीं येऊनच गेलें आहे. त्यामुळें त्याच अर्थानें श्रीधर शब्द लावणें गतार्थ होईल, तर श्रीला पत्नीत्वानें स्वीकारणारा, तिला आपल्या अंकावर धारण करणारा असा अर्थ करावयाचा. ''पण मग त्याच अर्थाचें पद श्रीपति आलेलेंच आहे. अर्थ जरी समान झाला तरी अक्षरें वेगळीं आहेत असें म्हणावें तर श्रीनिवाससारखीं पदें दोनदां आलीं आहेत आणि श्रीमान् हें पद तर चारदां आलें आहे. जिथें अर्थ हि भिन्न नाहीं आणि अक्षरसमाम्नाय हि वेगळा नाहीं तिथें आनुपूर्वी वेगळी आहे असें म्हणतां येतें आणि तेवढ्यापुरतें तरी तें पद वेगळें ठरतें. बरें हें आनुपूर्वीभिन्नत्व सोडलें तरी अभ्यास हें एक मोठें तत्त्व त्यांत आढळतें. त्या योगें त्या पदाचे ग्रंथकाराला विशेष महत्त्व आहे, त्याचें तें प्रतिपाद्य आहे, हें स्पष्ट न सांगतां प्रकट होतें. त्या योगें ग्रंथतात्पर्य-निर्णयाला साहाय्य मिळतें. ग्रंथकाराच्या मनोवृत्तीवर प्रकाश पडतो. जुने बहुतेक सर्व ग्रंथकार ऋषिमुनि ब्राह्मण होते आणि ब्राह्मण म्हणजे परलोकपरायण द्ररिद्र लोक; त्यामुळें त्यांच्या लिखाणांत श्रीविषयीं संपत्तीविषयीं अभिलाष वारंवार दिसून आल्यावांचून राहिला नाहीं. वेदांतील श्रीसूक्तापासून तो आजच्या हरिदासाच्या ''जोंवर पैसा तोंवर बैसा'' या उक्तीपर्यंत आपल्याला तो अखंड आढळून येतो. परंतु असें असलें तरी बिचारे आजतागायत शब्दश्रीधरच राहिले आहेत. कारण लाजिरवाणी भिक्षावृत्ति त्यांनीं अवलंबिली. भीक मागून का कोणी सुखी झाला आहे?

## ६११. श्रीकर

श्रीकर हें सामासिक पद दोन प्रकारें सोडवितां येतें : श्रियं करोति इति श्रीकरः। अथवा श्रीः एव कराः यस्य सः श्रीकरः।'' पहिला उपपद तत्पुरुष तर दुसरा बहुव्रीहि समास आहे. तदनुसार उभयथा अर्थ केला जाईल.

परमात्मा उघडच श्री म्हणजे संपत्ति निर्माण करणारा आहे. तो जीवांची वेगवेगळीं शरीरें, त्यांचीं वेगवेगळीं कर्मे आणि त्या कर्मांचीं वेगवेगळीं फळें निर्मीत आहे. जीवांच्या भोगासाठीं त्यानें हा जीव-लोक कर्मभूमि म्हणून निर्मिला आहे, तर स्वर्गनरकादि अन्य लोक भोगभूमि म्हणून निर्मिले आहेत. लोक जीव कर्मे आणि फळें अशीं चतुर्विध श्री त्यानें केलेली आहे. म्हणून तो श्रीकर होय.

ही लोक जीव कर्म फल अशी चतुर्विध श्री म्हणजे शोभा ज्याचे किरण होत तो परमात्मा श्रीकर म्हणावयाचा. तो या विश्वश्रीच्या प्रभावळींत विराजमान आहे. लोकरूपानें जीवरूपानें कर्मरूपानें आणि फलरूपानें जो हा प्रकाश चोहोंकडे पसरलेला दिसतो आहे तो सर्व त्याचा आहे. तो लोक जीव कर्म फल किरणमाली परमात्मा श्रीकर होय.

परंतु ही सगळी विश्वश्री अर्वाचीन आहे. वरवरची आहे. ह्या हिरण्मय पात्रानें झांकलेली जी परा श्री आहे मोक्षाख्य, ती हि तो परमात्मा आपल्या अनन्य भक्तांसाठीं करीत असतो. तो अनन्यभक्त ही विलोभनीय विश्वश्री पाहून मोहित होत नाहीं. तिच्यांत गुंगून आणि गुंतून राहत नाहीं. तो म्हणतो

**हिरण्मयेन पात्रेण सत्यस्यापिहितं मुखम्।**
**तत् त्वं पूषन् अपावृणु सत्यधर्माय दृष्टये।।**

देवा, तुझें खरें श्रीमुख जें या मोहक विश्वरूपानें मुखवट्यानें झांकलें आहे तें हा मुखवटा दूर करून मला दाखव. आणि भक्तवत्सल देव हि आपल्या अनन्य भक्ताला आपलें तें निजरूप हा मायेचा पसारा दूर सारून दाखवीत असतो. आणि म्हणून हि तो परमात्मा श्रींकर म्हणावयाचा '' यं एव एष वृणुते तेन लभ्यः तस्यैष आत्मा विवृणुते तनुं स्वाम्।।''

## ६१२. श्रेय

श्रेय म्हणजे हित, पथ्य. परमात्मा हा हिततम आहे, म्हणून तो श्रेय म्हणावयाचा. जें जें हितकर आहे तें तें श्रेयस्कर होय. परंतु श्रेय, परम हित तर एक परमात्माच आहे. या परम श्रेयालाच दुसरें नांव मोक्ष असें आहे. तत्साधनभूत तें तें श्रेयस्कर म्हणावयाचें. अनुमोक्ष म्हणावयाचें. तत्प्रतिकूल तें तें अश्रेयस्कर, प्रतिमोक्ष वा वृजिन म्हणावयाचें. उपनिषदांत म्हटलें आहे:

श्रेयश्च प्रेयश्च मनुष्यमेत:। तौ संपरीत्य विविनक्ति धीर :।
श्रेयो हि धीरो ऽभिप्रेयसो वृणीते। प्रेयो मन्दो योगक्षेमाद् वृणीते।।

जीवनांत माणसापुढें पदोपदीं हित आणि प्रिय उपस्थित होत असतात. गुणदोषज्ञ त्यांची पारख करून निवड करीत असतो. तो प्रिय सोडून हितच निवडून घेतो, पण पारख नसलेला अडाणी संसारोपयोगी म्हणून प्रिय पसंत करतो. सारांश, जीवन म्हणजे एक परीक्षा आहे. एक सुदीर्घ परीक्षा. पदोपदीं येणारे मोहाचे प्रसंग हे प्रश्न होत. ते तुम्ही कसे सोडवितां, श्रेय निवडतां कीं प्रेय, यावरून तुम्ही पास नापास ठरणार. जो प्रतिक्षणीं अप्रमत्त राहून सदैव श्रेयच निवडत राहतो तो जीवनाच्या शेवटच्या क्षणीं हि श्रेयाचीच निवड करून श्रेयोरूप होतो. श्रेयोमंदिराचा कळस श्रेयाची एक एक वीट रचूनच गांठतां येईल. तीव्र मुमुक्षुता हा या श्रेयोमंदिराचा भक्कम पाया होय. या परमार्थनिश्चयानंतर अप्रमाद आणि वीर्य म्हणजे अतंद्रित आणि सोत्साह साधना त्या मंदिराचा मध्य होय. अभयरूप मोक्ष हा कळस त्या मंदिरावर शेवटीं चढावयाचा. असें हें श्रेयोमंदिर श्रेय:काम पुरुषाला रचावयाचें आहे. एका जन्मांत तें बांधून झालें तर उत्तमच. अन्यथा अनेक जन्मांत तें बांधून पूर्ण करावयाचें. तें पूर्ण करूनच अनपायिसुखरूप श्रेय लाभावयाचें. श्री पदावरून श्रेय म्हणजे श्रीचें हें पद लावलें जाईल. श्रेयस् हें पद तुल्य म्हणतां येईल म्हणूनच तें श्रीच्या पाठ्यांत आलें आहे.

## ६१३. श्रीमान्

श्रीमान् हें परमात्म्याचें नित्य विशेषण आहे. कारण तो सदैव स्वरूपस्थित आहे. जीव हा स्वरूपच्युत असल्यामुळें तो सदैव दीनच असावयाचा. परमात्मा नित्य परितृप्त असल्यामुळें त्याच्या ठिकाणीं कसलें हि दैन्य संभवत नाहीं. उलट जीवाला नाना कामना क्षणोक्षणीं तोडीत असतात. ''बह्व्य: सपत्न्य इव गेहपतिं लुनन्ति''. अनेक बायकांच्या दाढल्यासारखी त्याच्या जीवाची सारखी ओढाताण चाललेली असते. अशा दुर्भग पुरुषाला श्रीमान् कसें म्हणतां येईल? परंतु व्यवहारांत तर आपण प्रत्येकालाच श्रीयुत श्रीमान् म्हणत असतों हें कसें? त्याचें हि कारण वर दिलें तेंच आहे. जीवाचें जीवत्व हें औपाधिक असल्यामुळें तें क्षणिक आहे. तो मूळचा निरुपाधिक शिवच आहे. अर्थात् तो परमात्मस्वरूपच आहे. अशा स्थितींत तो श्रीमान्च नव्हे काय? आणि म्हणूनच सर्वांना परमात्मस्वरूप लक्षून आपण श्री हें उपपद चिकटवीत असतों. श्री अमुक म्हणजे परमात्मस्वरूप अमुक आणि श्री तमुक म्हणजे परमात्मस्वरूप तमुक होय. सर्वत्र एक आत्मश्री परिलक्षित होत आहे. तिनें रिता असा ठाव नाहीं. ज्याला सर्वत्र हें आत्मश्रीचें दर्शन झालें खरोखर तोच श्रीमान् होय. ''तत्र को मोह: क: शोक: एकत्वं अनुपश्यत:'' जो सर्वत्र एक आत्मश्रीच विराजमान पाहतो आहे त्याला मग मोह कसचा आणि शोक कसचा? कुठल्या वस्तूची आसक्ति त्याला वाटेल आणि कुठल्या वस्तूच्या साठीं तो शोक करील? सर्वत्र त्याला तर एकच एक आत्मश्री भरून राहिलेली आहे. सर्व व्यवहाराचा आधार तत्त्वदर्शन आहे. सर्वांना श्रीपूर्वक संबोधणें सर्वांना नमस्कार करणें म्हणजे तें दर्शन प्रकट करणें होय. भगवान् शंकर हें रहस्य पार्वतीला सांगत आहेत:

प्रत्युद्गम-प्रश्रयणाभिवादनं
विधीयते साधु मिथ: सुमध्यमे।
प्राज्ञै: परस्मै पुरुषाय भूयसे
गुहाशयायैव, न देहमानिने।।

## ६१४. लोकत्रयाश्रय

परमात्मा अधोमध्योर्ध्व तिन्ही लोकांचा आश्रय आहे. म्हणजे लोकमात्राचा तो आश्रय आहे. आदि अन्त आणि मध्य मिळून पूर्णता होते म्हणून तीन ही संख्या घेतली आहे. अर्थात् ती पूर्णतावाचक आहे, संख्यावाचक नाहीं. देह प्राण मनो-लोक म्हणा, वा जागृति स्वप्न सुषुप्ति-लोक म्हणा, किंवा भूमि अन्तरिक्ष द्युलोक म्हणा, अथवा भूत भवत् भविष्यत् सृष्टि म्हणा, कोणत्याहि प्रकारें या त्रिधा विभक्त विश्वाचा, या व्यष्टि समष्टि, चेतनाचेतन, अन्तर्बाह्य, स्थलकालात्मक समग्राचा मूल आधार तो परमात्मा आहे. त्याच्याच सत्तेच्या अंकावर हे तिन्ही लोक लोळत आहेत, खेळत आहेत. पण परमात्मा या विश्वाला आश्रय आहे तो कसा? डोक्यावर घागर असते तशा प्रकारें का तो या लोकत्रयाला धारण करतो? शेषाच्या डोक्यावर ही पृथ्वी आहे म्हणतात. ती का डोक्यावर धारण केलेल्या घागरीसारखी आहे? नाहीं, हें विश्वरूप कार्य तो परमात्मा कारण रूपानें धारण करीत आहे. सर्पाभासाला रज्जू कारण व्हावी तसा तो परमात्मा या विश्वाकाराला कारण झाला आहे. वस्तुत: रज्जूचा आणि सर्पाचा कांहीं एक संबंध नाहीं. तसा या विश्वाकारचा आणि त्या निराकार परमात्म्याचा हि कांहीं संबंध नाहीं. तरी रज्जूची सत्ताच जशी त्या असद्रूप सर्पाभासाची आश्रयभूमि होते, त्याप्रमाणें परमात्मा या लोकत्रयाचा आश्रय होय. गीतेंत म्हटलेंच आहे:

अव्यक्तं व्यक्तिमापन्नं मन्यन्ते मां अबुद्धय:।
परं भावं अजानन्तो ममाव्ययमनुत्तमम्।।

थोरांच्या मतें हा विवर्त आहे. बहुतेक तो रज्जूसर्पवत् म्हणतात, कोणी सुवर्णकंकणवत् म्हणतात. कारणाचें अपरिणामित्व आणि कार्यासंसृष्टत्व हें आहे विवर्ताचें रहस्य. मग तो विवर्त तुम्ही कसा हि का म्हणा ना?

## ६१५. स्वक्ष

सु शोभने सोमसूर्यवत् अक्षिणी यस्य स: स्वक्ष:। ज्याचे डोळे चंद्रसूर्यासारखे सुंदर आहेत तो परमात्मा स्वक्ष म्हणावयाचा. पण डोळ्यांचें साजरेपण कशांत म्हणावयाचें? निर्मल, आरक्त, पाणीदार, विशाल, काळीभोर बुभुळें व कडा आरक्त, आणि लांबसडक पापण्या व बांकदार सुरेख भुवया असलेले डोळे सुंदर म्हटले जातात. पण हे असे सुंदर डोळे निद्राधीन होतात, मलिन होतात. परंतु परमात्म्याचे डोळे हे अनिमेष अतन्द्रित रात्रंदिवस पहात असतात. दिवसां सूर्य रात्रीं चंद्र आणि जेव्हां चंद्र सूर्य नसतील तेव्हां अग्नि हा परमात्म्याचा डोळा जागत असतो नि बघत असतो. म्हणून परमात्म्याचें हें सर्वसाक्षित्व व नित्यसाक्षित्व प्रकट करण्यासाठीं त्याला कधीं स्वक्ष तर कधीं त्र्यक्ष म्हणतात. स्वक्ष नि त्र्यक्ष दोहोंचें हि तात्पर्य एकच. सर्वसाक्षित्व व नित्यसाक्षित्व हेंच स्वक्षत्व होय आणि तें परमेश्वराचें अनन्यसाधारण आहे. म्हणून परमात्माच एक स्वक्ष होय. आतां डोळा दृश्य पाहतो आणि त्यायोगें रागद्वेषादि विकारांनीं विकृत होतो. हा असा विकाराधीन होणारा डोळा स्वक्ष म्हटला जाणार नाहीं. ज्याची दृष्टि बाह्य विषयांच्या इष्टानिष्टतेनें दूषित होत नाहीं तोच स्वक्ष म्हणावयाचा. परमात्मा विश्वाचे सर्व व्यवहार पाहतो परंतु त्यांचा कांहीं एक परिणाम त्यावर होत नाहीं. तो अविषक्तदृष्टिच राहतो. आणि हें अविषक्तदृष्टित्वच मुख्यत: स्वक्षत्व होय, दुसरा असा कोणता डोळा आहे जो दृश्याच्या इष्टानिष्टतेनें सुखी वा दु:खी होत नाहीं, विकृत होत नाहीं?

## ६१६. स्वङ्ग

सु शोभनानि अङ्गानि यस्य स: स्वङ्ग:। ज्याचीं सर्व अंगें शुभ आहेत तो स्वङ्ग म्हणावयाचा. पूर्वी

याच अर्थाचा शुभाङ्ग शब्द येऊन गेला आहे. मग शुभाङ्ग आणि स्वङ्ग यांत अन्तर काय? अन्तर कांहीं नाहीं, पण विशेष आहे असें म्हणतां येईल. सौंदर्ये दोन प्रकारचीं आहेत. एक चर्मचक्षूला दिसणारें, दुसरें दिव्यचक्षूला दिसणारें. पहिल्या प्रकारच्या सौंदर्यानें युक्त व्यक्तीला आपण रूपसुंदर म्हणतों, तर दुसऱ्या प्रकारच्या सौंदर्यानें युक्त व्यक्तीला गुणसुन्दर म्हणतों. दोन्ही सौन्दर्यें एकवटलेलीं क्वचितच पहायला मिळतात. मोर रूपसुंदर आहे, तर कोकिल गुणसुंदर आहे. परमेश्वरानें प्रत्येक जीवाच्या ठाईं स्वाभिमानासाठीं कांहीं गुण व अनतिमानासाठीं म्हणजे अगर्वासाठीं कांहीं न्यून ठेवून दिलें आहे. पण स्वत: तो परमात्मा केवळ निर्‌दोष परिपूर्ण आहे. जेव्हां आपण त्याच्या सकलसुंदरसंनिवेश रूपानें अभिभूत होतो तेव्हां आपण त्याला स्वङ्ग म्हणतों. जेव्हां त्याच्या दैवीगुण संपदेनें, त्याच्या ज्ञानवैराग्यादि गुणांनीं अभिभूत होतों तेव्हां त्याला शुभाङ्ग म्हणतों. ''शुभानि अङ्गानि यस्य स: शुभाङ्ग:'' तसा ''शुभं एव अङ्गं यस्य स: शुभाङ्ग:'' असा हि विग्रह समजावयाचा. भेलीचें कोणतें हि अंग चाखलें तरी तें जसें गोडच लागतें तसें ज्याचें कोणतें हि अंग सुरूप आहे सुखकर आहे तो परमात्मा स्वङ्ग होय. कापूर जसा सर्वांगीं निर्मल उज्ज्वल सुंदर तसा परमात्मा हा आंत बाहेर खालीं वर इकडून-तिकडून चोहींकडून सु-अंग आहे, अव्यङ्ग सुंदर आहे.

स्वङ्ग पद सुषमाङ्गत्वहि प्रकट करतें. सूर्य कुणीकडून हि पहा तो संमुख आहे. ज्याला त्याला तो आपल्याकडेच बघतो आहे असें वाटतें. इतर कोणीहि असा स्वङ्ग नाहीं. तो एकाकडे पहात असेल तर दुसऱ्याकडे पाठ करून बसेल. तसें परमात्म्याचें नाहीं. तो सर्वांना संमुख आहे. म्हणून हि तो स्वङ्ग म्हणावयाचा. तो सर्वतोमुख आणि सर्वतोभद्र म्हणून स्वङ्ग होय.

### ६१७. शतानन्द

शतं आनन्दा: यस्य स: शतानन्द:। शंभर आनंद ज्याचे आहेत तो शतानन्द म्हणावयाचा. शत संख्या इथें पूर्णार्थ वाचक आहे. अर्थात् शतानन्द म्हणजे पूर्णानन्द. परमात्मा हा पूर्णानन्द आहे. त्याचा आनन्द अन्यून परिपूर्ण आहे. कारण तो चिन्मात्रमूर्ति आहे. अचेतनाला आनन्दोपलब्धि होऊं शकत नाहीं. हिमालय प्रचंड मोठें धूड आहे, पण त्यापेक्षां एक लहान मुंगी हि महान् आहे. कारण ती चेतन आहे. तिला सुखदु:खाचा अनुभव घेतां येतो. जगांत पांच विषय आहेत: शब्द स्पर्श रूप रस गन्ध. पांचच कां? सहावें इन्द्रिय कुणाला नाहीं म्हणून. पण या पांच विषयांचा आस्वाद सर्वच जीवांना मिळतो असें नाहीं. कांहीं जीव एकेन्द्रिय कांहीं द्वीन्द्रिय कांहीं त्रीन्द्रिय कांहीं चतुरिन्द्रिय आणि कांहीं पंचेन्द्रिय असतील. पुन्हां हीं इन्द्रियें पूर्ण समर्थ असतीलच असें नाहीं. दिवाभीताला दिवसां कांहीं दिसत नाहीं तर इतर प्राण्यांना रात्रीं कांहीं दिसत नाहीं. म्हणून माणूस थोड्याच अंतरावरचें पाहूं शकतो, तर गिधाड घारी खूप दूरचें पाहूं शकतात. म्हणजे या इन्द्रियांच्याहि शक्ति वेगवेगळ्या आहेत. या परिमित शक्तींमुळें त्यांचा आनंदहि परिमितच म्हणावा लागेल. म्हणजे विषय हि मित आहेत आणि त्यांचें ग्रहण करणाऱ्या इन्द्रियांची शक्ति हि परिमित आहे, तेव्हां त्यांच्यापासून जीवांना मिळणारा आनंद हा सुपरिमितच म्हटला पाहिजे. त्यामुळें विषयेंद्रियसंनिकर्षज आनंद भोगणाऱ्या जीवांना मितानन्द च म्हणणें भाग आहे. परंतु आनन्दोपलब्धीसाठीं ज्याला विषयेन्द्रियांवर अवलंबून रहावें लागत नाहीं त्याच्या आनंदाला मिति नाहीं. म्हणून तो 'आत्मन्येवात्मना तुष्ट' परमात्मा म्हणावयाचा शतानन्द उर्फ पूर्णानन्द. या पूर्णानन्दाचें अंशांशु सेवन करीत ब्रह्मादिस्तंबपर्यंत सर्व जीव जगत असतात. स्तंब म्हणजे गवताचा थोंब सुप्तचेतन असतो, तर ब्रह्मा हा जीवांत सर्वांत पूर्ण जागृत चेतन असा मानला गेला आहे. त्याला जो

आनंद लाभतो तो त्याच्याहून चेतनेच्या खालच्या भूमिकेवर असलेल्या जीवांना कुठून लाभणार? पण ब्रह्मा हि ज्या अर्थी अभिमानी जीवच आहे त्याअर्थी त्याचा हि आनंद हा अशतानंद होय, न्यूनच होय. अतीन्द्रिय आत्मानन्दच शतानन्द म्हटला जाईल. म्हणून परमात्मा हा शतानन्द. इन्द्र म्हणजे परमात्मा हा शतमख तसा तो शतानन्द हि म्हणावयाचा.

### ६१८. नन्दि

हें पद नन्दि कीं नन्दी? दोन्ही पाठान्तरें आढळतात. शंकराचार्यांनीं नन्दी असें इन्नन्त घेतलेलें आहे. तथापि इकारान्त पाठच बरा. नन्दिवर्धन इत्यादि नामांत तो आलेला आहे. नन्दि म्हणजे साक्षात् आनन्द आणि नन्दी म्हणजे आनन्दवान्. मागील पदांत म्हटलें आहे कीं तो शतानन्द आहे, तर इथें म्हटलें आहे तो आनन्दस्वरूप आहे. आत्मप्रतीति ही अविभाज्य एकरूप एकरस आहे. तथापि तिचें हि विश्लेषण वेदान्तांत सत् चित् आनन्द अथवा अस्ति भाति प्रियः या तीन पदांनीं केलें जातें. पण ''दे पदांत मज उत्तर एका'' असें जर कोणी म्हणेल तर त्याला आनन्द हें पद सांगावें लागेल. आनंदांत सत् आणि चित् हीं दोन्ही संगृहीतच आहेत. आनंदाची उपलब्धि जडाला होऊं शकत नाहीं म्हणून परमात्मा हा आनन्दस्वरूप म्हटला म्हणजे तो चित्स्वरूपहि ठरलाच. आणि त्याबरोबरच सत्स्वरूप हि. कारण कोणत्याहि वस्तूला सत्ता असल्याशिवाय तिच्या विषयीं बरें वाईट कुठलें हि विधान मुळीं करतांच यावयाचें नाहीं. बरें, पण आत्मस्वरूप हें आनंदात्मकच आहे कशावरून? कारण कोणा हि जीवाला आपण कधीं नसावें. असें मुळीं वाटूंच शकत नाहीं म्हणून. त्याच बरोबर जीव दुःख नसावें असेंच सदैव इच्छीत असतो म्हणूनहि. अर्थात् दुःखाभावरूपच त्याचें स्वरूप असलें पाहिजे. आणि म्हणून त्याला आनन्दरूप म्हणावयाचें. नन्दि पद तोच आशय व्यक्त करीत आहे. तो परमात्मा आनन्दी नव्हे, तर साक्षात् आनन्दरूप आहे. म्हणून मी उपनिषदाच्या भाषेंत म्हणेन : ''आनन्द उपलब्धव्यश् चिदात्मकतयैव सः। सदात्मैवोपलभ्येत सच्चिदानन्द ईश्वरः।।''

### ६१९. ज्योतिर्गणेश्वर

ज्योतिषां गणः ज्योतिर्गणः, तस्य ईश्वरः सः ज्योतिर्गणेश्वरः परमात्मा। ज्योति म्हणजे तेजोगोल, त्यांचा जो गण म्हणजे समुदाय त्याचा जो ईश्वर म्हणजे नियन्ता तो ज्योतिर्गणेश्वर परमात्मा म्हणावयाचा. गीतेंत ''नक्षत्राणां अहं शशी'' आणि ''ज्योतिषां रविरंशुमान्'' अशीं दोन वचनें आलीं आहेत. आतां नक्षत्रें काय नि ज्योतिःपुंज काय दोन्ही तेजोगोलच होत. ग्रह-पथांतील जे सप्तविंशति-संख्यक तारका-पुंज आणि इतर दृश्य तारागण तेच मुख्यतः नक्षत्र पदानें अभिप्रेत आहेत. हीं नक्षत्रें नयनाह्लादक आहेत. परंतु विजा आणि असलेच दुष्प्रेक्ष्य प्रखर किरणपुंज हे ज्योतिर्गण होत. आणि सौम्य नयनाह्लादक तेजःपुंजांचा राजा तो चंद्र होय आणि दुष्प्रेक्ष्य उग्र तेजःपुंजांचा राजा तो सूर्य होय. गीतेच्या वरील दोन वचनांचा हाच आशय. अर्थात् ज्योतिर्गणेश्वर म्हणजे मुख्यतः भगवद्-विभूति सूर्य समजावयाचा. परंतु सूर्य हा कितीहि दुष्प्रेक्ष्य असला तरी तो नयनविषय होणारा आहे. त्या दृष्टीनें तो कांहीं तितका दुष्प्रेक्ष्य म्हणतां यावयाचा नाहीं कीं जितका जो मुळीं चर्मचक्षूंनीं पाहतांच येत नाहीं तो म्हणतां येईल. म्हणून त्याला सूर्यकोटिसमप्रभ म्हणतात. गीतेंत ह्यालाच उद्देशून म्हटलें आहे:

''दिवि सूर्यसहस्रस्य भवेद् युगपदुत्थिता।
यदि भाः सदृशी सा स्यात् भासस् तस्य महात्मनः।।''

तसेंच पुढें हि म्हटलें आहे तिथेंच : ''तेजोभिरापूर्य जगत् समग्रं, भासस् तवोग्राः प्रतपन्ति विष्णो।''

परमात्मा हा प्रकाशक असल्यामुळें तो तेजोरुप आहे आणि तें तेज अलौकिक असल्यामुळें तें चर्मचक्षूंना असह्य आहे आणि त्यामुळेंच तो ज्योतिर्गणेश्वर झाला आहे. त्याच्या प्रचंड तेजापुढें सूर्यादिकांचीं तेजें हीं कांहींच नव्हत; तीं खद्योतवत् होत किंबहुना दिवाचंद्रवत् होत.

## ६२०. विजितात्मा

विजितात्मा आणि लगेंच पुढील पद विधेयात्मा हीं दोन पदें मिळून एक विचार पूर्ण होतो. दोहोंनीं मिळून पूर्ण जय सूचित केला आहे. शत्रूंना बाह्यतः जिंकून घेतलें तरी मनांतून ते बंडखोरच राहतात. पण त्यांची ही बंडखोरी जाऊन तिथें आज्ञानुवर्तित्व, अनुकूलत्व आलें म्हणजे मग ते पूर्ण जिंकले गेले असें म्हणावयाचें. विजितात्मा हें पद बाह्य विजय सूचित करतें तर विधेयात्मा हें पद आभ्यंतर विजय सूचित करीत आहे. विजय संपादावयाचा तो ब्राह्याभ्यन्तर संपूर्ण संपादावयाचा. आतां इथें बाह्य विजय म्हणजे इंद्रियजय समजावयाचा. आधीं इंद्रियजय संपादावयाचा आणि मग मनोजय साधावयाचा. ''वशेहि यस्येन्द्रियाणि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता''.

**तस्मात् त्वं इन्द्रियाण्यादौ नियम्य भरतर्षभ।**
**पाप्मानं प्रजहि ह्येनं ज्ञानविज्ञान-नाशनम्।।**

इत्यादि गीतावचनांत हाच क्रम वारंवार विस्तारानें विशद केला आहे. इंद्रियजय प्राथमिक स्वरूपाचा आहे. त्याची परिणति मनोजयांत झाली पाहिजे. त्याशिवाय तो पूर्ण म्हणतां यावयाचा नाहीं. ज्याचीं इंद्रियें दान्त आणि मन शान्त झालें आहे तो योगी म्हणजे ब्रह्मभूत झाला समजावा. म्हटलेंच आहे: जितात्मनः प्रशान्तस्य परमात्मा समाहितः। शीतोष्ण-सुखदुःखेषु तथा मानापमानयोः।। माणसाची शान्ति आणि समता बाह्यतः शीतोष्ण-जनित सुखदुःखांच्या योगें आणि अभ्यन्तरतः मानापमान-जनित असंतोषाच्या योगें भंग पावत असते. परंतु ज्याचीं इन्द्रियें दान्त आणि मन शान्त आहे, तो मात्र बाह्याभ्यन्तर कोणत्या हि कारणानें क्षोभ पावत नाहीं. हीच ब्राह्मी स्थिति होय.

## ६२१. अविधेयात्मा

## (विधेयात्मा)

विधेयो आज्ञानुवर्ती आत्मा अन्तःकरणं यस्य सः विधेयात्मा। ज्याचा आत्मा म्हणजे अन्तःकरण आज्ञाधारक आहे तो विधेयात्मा म्हणावयाचा. आमचीं इन्द्रियें मोठीं चपल आहेत, जाऊं नये तिथें पाय धावतात, पाहूं नये तें डोळे पहातात, करूं नये तें हात करतात, ऐकूं नये तें कान ऐकतात, बोलूं नये तें तोंड बोलतें, चाखूं नये तें जीभ चाखते अशा प्रकारें आमचीं कर्मेन्द्रियें आणि ज्ञानेन्द्रियें स्वैर वागत असतात. आपल्या स्वामीचा द्रोह करीत असतात. पण ह्यांना लगाम घालणें तितकेंसें कठिण नाहीं. चपळ पायांना एकहात भर दोरी बांधून टाकूं शकते. चवचाल डोळ्यांना चार बोटांची पट्टी बंद करूं शकते. पण मनाला तुम्ही अशा प्रकारें लगाम घालूं शकत नाहीं. तें अशरीर, गुहाशय, एकट, दूरंगम, यत्रकाम-निपाति, चपल आणि चंचल असें आहे. त्यामुळें तें दुर्निवार आणि सुदुर्धर आहे. त्याचा निग्रह कसा करायचा? निग्रह दुष्कर आहे, पण अशक्य नाहीं. त्याचा हा निग्रह अतिमानस भूमिकेवरूनच होऊं शकतो. हेंच अध्यात्म होय. आत्मा हा गुणातीत आहे. त्याच्याच आश्रयानें गुणांवर प्रभुत्व मिळवितां येतें. किंबहुना तो आत्माच विधेयात्मा आहे. त्याला गुणांचा प्रवाह वाहून नेत नाहीं. तो तटस्थ पांडुरंग गुणप्रवाह पाहतो आहे. या भीमेच्या प्रवाहांत क्षणो-क्षणीं बदल होत आहेत, पण पांडुरंग आपला जसाचा तसा! अट्ठावीस युगें लोटलीं तरी त्यांत पालट नाहीं. त्याच्या चरणांना जो धरून राहिला, तोच या प्रवाहांतून तरला. तोच विधेयात्मा. म्हणून ज्ञानदेव काकुळतीनें म्हणतात

अरे मना तूं पापिष्ठा। किती हिंडसी रे नष्टा
सैरा शिणसी रे फुकटा। विठ्ठलीं विनटा तूं होईं।।

तूं अनिवार नावरसी। तुझेनि संगें नाडले ऋषि
तूं तंव अपभ्रंशीं पाडिसी। म्हणोनि गेले गुरुसी शरण।।

न संडीं हरिचरण। नाहीं नाहीं जन्म मरण
अवीट सेवीं नारायण। तेणें मीतूंपण एकसिद्ध

ज्ञानदेव शरण हरी। मन हिंडे चराचरीं
न संडीं चरण अभ्यंतरीं। नित्य श्रीहरि हृदयीं वसे।।

पाठान्तर अविधेयात्मा हि संभवनीय आहे. त्याचा अर्थ परमात्मा कोणालाहि कार्य नाहीं. तो स्वयंभू आहे तो अकृत्रिम आहे. तो स्वतंत्र, स्ववश आहे.

## ६२२. सत्कीर्ति

सत् इत्येवंरूपा कीर्तिर् यस्य सः सत्कीर्तिः। परमात्मा प्रसिद्ध आहे याचा अर्थ तो आहे म्हणून प्रसिद्ध आहे, नाहीं म्हणून नव्हे. त्यामुळें त्याला म्हणावयाचें सत्कीर्ति. गीतेंत म्हटलें आहे. ''सद्भावे साधुभावे च सदित्येतत् प्रयुज्यते। प्रशस्ते कर्मणि तथा सच्छब्दः पार्थ युज्यते।'' अर्थात् सत्पद अस्तित्व साधुत्व आणि सदाचार याअर्थीं प्रयुक्त होतें. हा अर्थक्रम विकासक्रम हि सुचवीत आहे. एखादी वस्तु आधीं असेल तरच तिथें गुण आणि कर्म मागाहून लक्षांत घेतां येतील. तिन्ही धर्म जेव्हां प्रकटतात तेव्हांच त्या वस्तूचें खरें आणि पुरें सत्त्व सिद्ध होतें. ईश्वर आहे, तो सर्वगुणसंपन्न आहे आणि त्याचें हें विश्वरूप कर्म प्रशस्त आहे, सुंदर आहे. ह्या कारणानें तो सत्कीर्ति म्हटला आहे. नुसतें अस्तित्व निर्गुण आहे, निर्विशेष आहे. अव्यक्त आहे. त्यावरून व्यक्तीची ओळख पटत नाहीं. त्यासाठीं त्याच्या गुणांची, सत् चित् आनंद धर्मांची ओळख व्हायला पाहिजे. पण गुण हे हि अमूर्तच आहेत. ते गम्य असले तरी तिथें साकारता नाहीं. त्यासाठीं रूप हवें. तें कर्मांत साकार होतें. कृतीच्या रूपानें आपल्याला व्यक्तीचा परिचय होतो. अग्नि आहे, उष्णता हा त्याचा धर्म आहे आणि पाक वा रसोई हें त्याचें कार्य आहे. त्या कार्यावरून त्याचा पूर्ण परिचय होतो. परमात्मा हा सत्कीर्ति आहे हें त्याच्या ह्या विश्वरूप कृतीवरून प्रत्ययास येते. या कृतीवरून त्याचें अचिंत्य सामर्थ्य प्रकट होतें. व्यक्तीचा पूर्ण परिचय त्याच्या नामरूपगुणकर्मावरून होत असतो. आणि तसा तो विश्वरूपानें परमात्म्याचा होतो. म्हणून तो सत्कीर्ति होय. सत् कार्यरूपं विश्वं कीर्तिर् यस्य सः सत्कीर्तिः। हें विश्वच ज्याचें ज्ञापन आहे तो सत्कीर्ति म्हणावयाचा. विश्वाचा उद्भव स्थिति आणि लय सर्वच त्या परमात्म्याचें ख्यापन करतात. जें त्याचें ख्यापन वा कीर्तन करीत नाहीं असें मुळीं कांहीं नाहींच.

## ६२३. छिन्न-संशय

छिन्नः संशयो यस्य सः छिन्नसंशयः। छिन्न झाला आहे संशय ज्याचा तो छिन्नसंशय होय. परंतु संशय छिन्न व्हायचा म्हणजे आधीं तो व्हायला पाहिजे. अर्थात् हें सिद्धीस पोंचलेल्या साधकाचें लक्षण झालें. ज्याला मुळीं संशयच होत नाहीं आणि जो दुसऱ्याचे संशय दूर करतो त्याला म्हणावें लागेल संशयच्छेत्ता. आणि गीतेंत गुरुरूप परमात्म्याला म्हणूनच म्हटलें आहे : ''त्वदन्यः संशयस्यास्य च्छेता न ह्युपपद्यते''। हे गुरुदेवा ह्या कर्तव्यमोहरूप संशयाचा निराकर्ता तुजहून वेगळा मला इथें कोणी दिसत नाहीं. अर्थात् गुरुदेव आहे संशयच्छेता आणि अधिकारी शिष्य आहे छिन्न-संशय. छिन्नसंशय पद इथें तो विद्यासंप्रदाय सूचित करीत आहे. या संप्रदायांत विद्या अविद्येचें निरसन गुरुशिष्यरूपानें करीत आहे असें दाखविलें जातें. विक्रेता आणि ग्राहक मिळून व्यवहार होतो. त्या प्रमाणें गुरुशिष्य मिळून विद्या-संप्रदाय चालतो.

त्यामुळें इथें गुरु वा शिष्य यांना गौणत्व आहे, प्राधान्य आहे विद्यासंप्रदायाला. दोन्ही मिळूनच तो संप्रदाय चालवितात. त्यामुळें गुरूबरोबरच शिष्याला हि महत्त्व आलें आहे. मग परमात्मा छिन्नसंशय साधक सिद्ध म्हटला म्हणून बिघडलें कोठें? छिन्नसंशय पदाचा ''छिन्नः संशयो येन सः छिन्न-संशयः'' असा हि विग्रह करतां येईल. तो गुरुलक्षण सूचित करतो. अशा प्रकारें गुरु-शिष्य उभयरूप तो विद्यासंप्रदाय-प्रवर्तक आहे. संशय, संशयच्छेदन आणि निःसंशयता मिळून ही प्रक्रिया पूर्ण होतें आणि ती सगळीच तो परमात्मा आहे. छिन्नसंशय पद ती समग्र सूचित करीत आहे. अर्जुनाप्रमाणें संशयसंप्राप्ति होणें हें हि मोठ्या योग्यतेचें आहे. ज्याला जगांत जगतांना कुठला हि संशयच उत्पन्न होत नाहीं तो मनुष्य नसून पशुच म्हणावा लागेल.

## ६२४. उदीर्ण

उद् उपसर्ग ईर् धातु आणि निष्ठा प्रत्यय त यांच्यापासून उदीर्ण हें पद व्युत्पादिलें आहे. त्याचा अर्थ होतो उदित, उद्गत. उदीर्ण आणि उदार एकच. उदीर्ण म्हणजे ओसंडणारा, उद्रिक्त. झरा आपलें पाणी आपल्या ठाईं सामावूं शकत नाहीं, तो तें जगाला देत सुटतो. आणि तसा जो आपली शक्ति आपल्या ठाईं सामावूं शकत नाहीं आणि म्हणून बाहेर ओतीत असतो तो उदीर्ण होय. परमात्मशक्तीचा हा असा उद्रेक म्हणजे हें विश्व होय. दिक्कालद्रव्यात्मक या विश्वाचा सारखा प्रवाह चालला आहे. त्यांत कुठें खंड नाहीं. तें सारखें वाढत आहे, ओसंडत आहे. नलाचें दातृत्व वर्णितांना कवि म्हणतो कीं तो नल इतका उदार होता कीं त्याच्याकडे येणारे याचकच दाते बनले. त्यांना नलाकडून इतकें दान मिळालें कीं त्यांनीं तें वाहून नेतां येत नाहीं म्हणून रस्त्यांत भेटलेल्या इतर याचकांना देऊन टाकलें आणि त्यामुळें त्या याचकांना नलाकडे जाण्याचें कारणच उरलें नाहीं. परमात्मा हि तसाच उदार आहे. त्याच्या उदारतेचें दर्शन प्रत्येक जीवाच्या ठाईं होत आहे. कोणता हि जीव स्वस्थ नाहीं. तो सारखा खटपट करीत आहे. ही सगळी खटपट त्याच्या शक्तीचा उद्रेक नाहीं तर काय म्हणायचें? आस्तंबब्रह्मपर्यंत सारे जीव नव सृष्टि करीत आहेत. प्रति क्षणीं ती वाढत आहे. हा सगळा उद्रेक त्या उदीर्णाचा आहे. वेलीवर किती कळ्या आल्या किती गळाल्या त्याचा हिशोब तिच्यापाशीं नाहीं. ती आपली असंख्य फुलें फुलवीतच राहते. तशीं उदीर्णाच्या वेलीवर किती विश्वें लागलीं नि किती गळालीं याचा त्याला हि पत्ता नाहीं. तो आपला हीं विश्वें फुलवीत चालला आहे. त्याच्या त्या विश्व-सृजनशक्तीला पार नाहीं. म्हणून तो उदीर्ण होय.

## ६२५. सर्वतश्चक्षु

सर्वतः सर्वदिक्षु चक्षूंषि यस्य सः सर्वतश्चक्षुः। ज्याला सगळीकडे डोळे आहेत तो सर्वतश्चक्षु म्हणावयाचा. आम्हांला एकीकडेच डोळे आहेत. त्यामुळें पाठीमागें काय चाललें आहे तें आम्हांला दिसत नाहीं. तिकडे डोळे फिरवावे तर इकडचें दिसत नाहीं. परंतु परमात्मा हा एकसमयावच्छेदेंकरून सर्वसाक्षी आहे. त्याला एकाच वेळीं सगळीकडचें सर्व कांहीं दिसतें आहे. सर्वतश्चक्षु आणि सर्वसाक्षी दोहींचा आशय एकच, पण सर्वतश्चक्षु सर्व दिशांत पाहणारा तर सर्व साक्षी म्हणजे सर्व कांहीं पाहणारा असा अर्थभेद सूचित होतो. परमात्मा चिन्मात्र मूर्ति आहे. त्यामुळें जें कांहीं घडतें तें सर्व त्याच्या साक्षित्वानेंच घडतें. किंबहुना साक्षित्व नसेल तर घडणें या क्रियेला मुळीं अस्तित्वच येणार नाहीं. म्हणून परमात्मा हा सर्वतश्चक्षु सर्वसाक्षी म्हटला आहे. कोणतें हि विधान होतें तेव्हां त्याचें ज्ञातृत्व तिथें आधींचेंच आहे हें गृहीत धरावें लागतें. ज्ञातृतत्त्व नसेल तर कोणत्याहि वस्तूचें वा घटनेचें अस्तित्व सिद्ध होऊं शकणार नाहीं. चित्सत्तेचें हें सर्व-साक्षित्व नि सर्वाधारत्व परोपरीनें वर्णिलें आहे. सहस्राक्षः सहस्रपात् या पदांचें हि तेंच तात्पर्य आहे.

तो सर्व कांहीं पाहतो, तो सर्व मार्गांनीं चालतो. म्हणजे सर्व ज्ञातृत्व त्याचें आहे, सर्व कर्तृत्व त्याचें आहे. त्याच्या वांचून कांहीं नाहीं निं कांहीं होत नाहीं. जो परमात्म्याचें हें सर्वतश्चक्षुष्ट्त्व ओळखतो तो चोरून लपून कांहीं करूं शकणार नाहीं. जें कांहीं त्याच्याकडून घडेल त्याचा हि तो साक्षीच राहील. म्हणजे त्याचा हि अभिमान तो बाळगणार नाहीं. हें कर्म मीं केलें, ह्याचें हें फळ मी भोगीन असें तो म्हणूं शकणार नाहीं. केवळ साक्षी होऊन राहील. सर्वतश्चक्षु म्हणजे त्याला सर्व बाजूंनीं नुसते डोळेच डोळे आहेत. इतर कोणते हि अवयव त्याला नाहींत. तो नुसता चक्षु आहे, द्रष्टा.

## ६२६. अनीश

### (अ-निश, अन् ईश)

अनिश: कीं अनीश: ? अनिश हा पाठ संभवनीय आहे. न निशा यस्य स: अनिश:। आम्हांला दिवस रात्रि हा भेद आहे. पण सूर्याला तसा कुठला ? बिचाऱ्याला अंधार आणि रात्र हा काय प्रकार असतो तें माहीतच नाहीं. बरें त्याला तो दाखविणें हि शक्य नाहीं. या दृष्टीनें सूर्य-विभूति परमात्मा हा अनिश आहेच, शिवाय रात्र रात्र म्हणून जिला म्हणतात ती तुम्हां आम्हांला रात्र आहे, पण ज्यांना आपण रात्रिंचर म्हणतों त्या दिवाभीतादि पशुपक्ष्यांना रात्रच दिवस होय. तुमची रात्र झालीं कीं त्यांचा दिवस उजाडतो. अशा स्थितींत वस्तुत: रात्र मुळीं कोणती नाहींच. परमात्मा हा सर्वतश्चक्षु आहे, तसा तो सर्वत्रचक्षु हि आहे. त्याला दिवसां दिसते तसें रात्रीं हि दिसतें. तो सर्वसाक्षी आहे. तो नित्यसाक्षी आहे.

अनीश हा रूढ पाठ स्पष्टच आहे ''न ईश: अनीश:।'' जो ईश नव्हे तो अनीश. पण ज्याला आम्ही सतत ईश ईश्वर परमेश्वर म्हणतों त्याला अनीश कसें म्हणावयाचें ? म्हणून मग त्याचा विग्रह ''न ईश: यस्य स: अनीश:'' असा केला जातो. ज्याचा कोणी ईश नाहीं तो अनीश. म्हणजे ईश्वरांचा हि ईश्वर, परमेश्वर. परंतु अनीश पदाचें रहस्य वेगळेंच आहे. ईशन वा शासन हें हि एक कर्तव्य आहे. तो एक भार आहे. तो भार भारवाही वाहील, परमात्मा त्यांतून मुक्त आहे. तो शिष्य म्हणजे शासनाधीन नाहीं इतकेंच नव्हे तर शास्ता म्हणजे शासनाधिकारी हि नाहीं. या दोहोंतून हि तो परिपूर्ण मुक्त आहे. शासन-मुक्तीच्या योगें शासनाधीन मुक्त होतात इतकेंच नव्हे तर शासनाधिकारी हि मुक्त होतात. भारताला स्वातंत्र्य लाभल्यानें भारतच मुक्त झाला नाहीं तर इंग्लंडहि शासनभारांतून मुक्त झाला आहे. मुक्ति ही उभय मुक्ति, उभय पक्षांची मुक्ति असते. म्हणून ईश असणें म्हणजे एक प्रकारें गुलामच असणें होय. खरी मुक्ति अधिकार सहन करीत नाहीं, ईशन सहन करीत नाहीं आपल्यावर दुसऱ्याचें आणि त्याच बरोबर आपलें हि दुसऱ्यावर ईशन ती सहन करीत नाहीं. परमात्मा हा तसा अनीश आहे.

## ६२७. शाश्वत-स्थिर

''शाश्वतस्थिर:'' हें एक पद कीं अनेक? शंकराचार्यांनीं तें एक घेतलें आहे. बहुत करून संख्यासंतोषासाठींच तें असावें, नाहींतर शाश्वत आणि स्थिर या दोन भिन्न विशेषणांचा समास किमर्थ? असें वाटेल. पण तसें नाहीं. त्यांत खोल अर्थ आहे. शाश्वत म्हणजे त्रिकालाबाधित आणि स्थिर म्हणजे दिगबाधित वा अविचल. हीं दोन विशेषणें दिक्काल-व्यापित्व द्योतित करणारीं आहेत. एक विशेषण तो परमात्मा कालव्यापक, तर दुसरें तो दिग्व्यापक आहे. असें सांगत आहे. हीं दोन स्वतंत्र घेतलीं वा एकत्र घेतलीं तरी अर्थांत फरक होण्याचें कारण नाहीं. पण एक समास घेण्यांत कदाचित् असा आशय असावा कीं हें दृश्य विश्व स्थलकालात्मक आहे. कोणती हि घटना घेतली तर तिला काळाचें तसें स्थलाचें अधिकरण हवें. त्या उभयविध अधिकरणावांचून कोणत्याहि घटनेची स्थिति असूं शकत नाहीं. आणि

म्हणून तो सर्वाधार परमात्मा एकसमयावच्छेदेंकरून शाश्वतस्थिर म्हटला आहे. काल-प्रवाह आणि दिक्-प्रवाह दोहोंचा हि तो आधार आहे. त्याच्याच अंकावर काल आणि दिक् बागडत आहेत. परमात्मा आम्ही आमच्या आकलनासाठीं उभयाधिकरणरूप शाश्वत-स्थिर म्हटला तरी वस्तुत: तो एकच आहे. अन्तत: काल आणि दिशा हि अभिन्नच आहेत. त्यामुळेंच आमच्या भाषेंत स्थलवाचक व कालवाचक अव्ययें उभय अर्थांनीं येतात. पुढें ये, पुढें येईन; मागें सर, मागें असें झालें'' या प्रयोगांत पुढें व मागें हीं अव्ययें क्रमश: स्थलवाचक (वा दिग्वाचक) आणि कालवाचक आहेत. कां बरें हीं अव्ययें उभयवाचक आहेत? दिक्कालांचें अद्वैत आहे म्हणूनच नव्हे काय? शाश्वत- स्थिर हें उभयाधिकरण-वाचक एक पद त्याचमुळें आलें आहे. त्याचमुळें तें समस्त झालें आहे.

## ६२८. भूशय

भुवि शेते इति भूशय:। जो भुईवर झोपला तो भूशय म्हणावयाचा. भुईवर कोण झोपतो? सर्व जण पर्यंकावर झोपत नाहींत, खाटेवर झोपत नाहींत, एवढ्याच मुळें ते भूशय म्हणतां यावयाचे नाहींत, पलंगावर वा खाटेवर न झोपले तरी लोक आंथरुणावर झोपत असतात. तें आंथरुण गादी, सतरंजी, घोंगडी तरट वा तृणपर्णांचें कां असेना, तें जमिनीवर झोपत नाहींत. जमिनीवर दोनच पुरुष झोपतात. एक अवधूत आणि दुसरा रणांगणांवर देह ठेवणारा वीर पुरुष. अवधूत हा देहत्यागापूर्वीच आत्मज्ञानामुळें विदेह झालेला असतो. देह उभा आहे, का पडला आहे याची शुद्ध त्याला नाहीं. दारुड्याला जशी आपल्या वस्त्राची शुद्ध नसते तशी अवधूताला आपल्या देहाची. शेगांव विदर्भचे गजानन महाराज हे असे अवधूत होऊन गेले. त्यांचा देह केव्हां केव्हां घोड्याच्या पायांतळीं हि पडलेला राही. पण त्या विदेह म्हणजे निरहंकार पुरुषाला घोड्यानें कधीं तुडविलें नाहीं. अशांच्याच विषयीं भारतीय हृदयाला परमादर वाटतो. अवधूतांहून मोठा या जगांत दुसरा कोणी नाहीं. त्यांच्या खालोखाल जे स्वामिकार्यासाठीं अंगीकृत कार्यासाठीं देहाची तमा न बाळगतां वीरगतीस पोंचले त्या परम वीरांची कदर जग करतें. ते जरी ज्ञानी नव्हते तरी त्यांचा त्याग असामान्य आहे. अलौकिक आहे. ते जिवंतपणीं अवधूतासारखें धराशायी जरी झाले नाहींत तरी मरतांना होतात. मरणारा प्रत्येक धराशायी होतो असें म्हणूं नका. मरायला टेकलेल्याला घोंगड्यावर काढतात आणि सरणावर ठेवतात, जमिनीवर नव्हे. खरोखर भूशय कोणी विरळाच सांपडतो कीं ज्यानें ज्ञानामुळें देहाला फेकून दिलेलें आहे, वा कार्य-गौरवामुळें देहाला तृणप्राय लेखिलें आहे. उरलेलें सारें जग पिंडपोषक देहाभिमानी आहे. म्हणूनच वरील दोहोंची गौरव-गाथा गाइली आहे:

द्वौ अस्मिन् पुरुषौ लोके सूर्यमण्डल-भेदिनौ। परिव्राड् योगयुक्तश्च रणे चाभिमुखो हत:।। परंतु परमात्मा भूशय कसा? खरोखर तो भूशय नाहीं वा दिविशय नाहीं, तो केवल-स्वरूप आहे. पण जो भूशय आहे जो परमात्माच आहे. कारण त्यानें सर्वस्वाचा त्याग केला आहे. अहंताममतेचा त्याग केला आहे.

## ६२९. भूषण

''भूशयो भूषणो भूति:'' हें भूसूत्र आहे. प्रत्येक पद स्वतंत्र असून तिन्हीं मिळून हि एक आशय व्यक्त होत आहे. भूशय म्हणजे अवधूत पुरुष या विश्वाचें भूषण आहे. तो या विश्वाची भूति म्हणजे समृद्धि आहे. भूशय म्हणजे भुईवर रांगणारा मुलगा जसा घराचें भूषण होय, घराची भूति होय, समृद्धि होय, त्या प्रमाणें परमानन्द-मग्न अवधूत हा या विश्वाचें भूषण होय, विश्वाचें वैभव होय. वंशकर पुत्राला आपण कुलदीपक म्हणतो. तो कुलाला दीपवितो भूषवितो, त्याला आपण सोन्या हिऱ्या लाल म्हणून आळवतों. म्हणजे तें कुलाचें धन म्हणून गौरवितों.

तसा अवधूत हा या विश्वाचें भूषण होय, विश्वाचें वैभव होय. आत्मज्ञानाहून अधिक मोलाची वस्तु या जगांत कांहीं नाहींच. आणि तें आत्मज्ञान ज्यानें मूर्तिमंत केलें त्याहून अधिक भूषणावह आणि अधिक मोठें वैभव दुसरें काय असूं शकेल? अशाच ब्रह्मभूत पुरुषाविषयीं भगवान् म्हणतात : ''न ब्राह्मणैस् तुलये भूतमन्यत् पश्यामि विप्राः किमतः परं नु?'' त्या अवधूताच्या बरोबरीचें हि मला कोणी दिसत नाहीं, मग त्याहून वरचढ कुठून बरें असणार? सूर्य आणि सूर्याचे किरण जसे या जगाचे प्रकाशक आहेत, शोभा आहेत, तसे परमात्मा आणि परमात्मस्वरूप त्याचे भक्त हे या जगाचें भूषण होत, जगाला भूषविणारे होत. भूषण पदाचे भूषणभूत आणि भूषविणार असे दोन्ही अर्थ होतात. परमात्मा हा या जगाचें भूषण हि आहे आणि त्याला भूषविणाराहि आहे. अवधूतरूपानें तो भूषणभूत आहे आणि विश्व-चैतन्यरूपानें तो भूषविणार आहे. जडाला अस्तित्व आणि सौंदर्य चेतनामुळेंच प्राप्त होतें. म्हणून परमात्मा हा भूषण म्हणावयाचा. प्रेताला ना जाणीव ना शोभा. चेतना-वांचून तें मढें आहे, दूषण आहे. म्हणून चिद्रूप परमात्मा भूषण म्हणावयाचा.

## ६३०. भूति

भूति म्हणजे भाव, आविष्कार. परमात्मा हा सद्रूप आहे. पण त्याची सत्ता आम्हांला प्रतीत होते त्याच्या विश्वरूप भूतीवरूनच. म्हणून त्याला म्हणावयाचें भूति. जें आहे, तेंच होतें. जें नाहीं, तें होत नाहीं. आकाशांत बाष्परूपानें जल असतें. तेंच शीतल वायुस्पर्शानें घनीभूत होऊन जलकण बनतें आणि वृष्टि रूपानें वर्षतें. जेव्हां त्या अव्यक्त रूपाची ही भूति होते तेव्हांच आम्हांला तें व्यक्त होतें. हीच भवभूति होय. भव म्हणजे अव्यक्त सत्ता. तिचा आविर्भाव म्हणजे भूति. अतिसूक्ष्म तृणबीज भूमिगत आहे. तें आम्हांला दिसत नाहीं. परंतु वृष्टि होतांच तें अंकुरतें आणि हिरवळीच्या रूपानें दृग्गोचर होते. ही दृग्गोचरताच भूति म्हणावयाची. ह्या भूतीवांचून त्या भूमिगत वा भूशय तृणबीजाची सत्ता आम्हांला उपलब्ध होत नाहीं. भूति वा विभूति म्हणजे भस्म असा हि अर्थ रूढ आहे. भवभूति म्हणजे शंकराचें अंगभस्म. शंकर हा अग्निस्वरूप आहे. आग्नितत्त्व अव्यक्त आहे. पण त्याचें अस्तित्व भस्मावरून प्रकट होतें. रानांत वणवा पेटतो. तो रान जाळून शांत होतो. उरते त्याची भूति भस्म राख. ती सांगते कीं इथें रुद्र येऊन गेला आहे. त्याचें हें अंग भस्म इथें पडलेलें आहे. अशा प्रकारें सद्वस्तूचा आविर्भाव त्या अव्यक्त सद्वस्तूला प्रकट करीत असतो. तो आविर्भावच भूति होय. मग ती भस्म असो वा विश्वाकार असो.

## ६३१. विशोक

''विशोकः शोकनाशनः'' हें पदद्वय मिळून एक सूत्र आहे. एक विचार त्यांत आला आहे. विद्याभ्यास द्विविध म्हणतां येईल. गृहीतागम आणि प्रदेयागम. पोहायला येऊन जो स्वतः पर्तीर गांठूं शकतो तो गृहीतागम म्हणावयाचा. पण तो जो स्वतः तर परतीर गांठतोच पण इतरांना हि परतीराला पोंचवितो तो प्रदेयागम म्हणावयाचा. गृहीतागम हा तरणक्षम आहे, तर प्रदेयागम हा तारणक्षम आहे. जो तरणक्षम नाहीं, तो तारणक्षम असूं शकत नाहीं पूर्ण पुरुष हा तरण-क्षम तसा तारणक्षम हि असतो. परमात्म्याहून पूर्ण पुरुष दुसरा कोण असणार? नारद गुरु सनत्कुमाराकडे जातो आणि म्हणतो हे भगवन् आपण शोक तरून गेलेले आहां, विशोक आहां. मला शोकाच्या पैल तीराला घेऊन चला. ''शोकस्य परं पारं तारयतु भगवान्'' नारद चौदा विद्यांत पारंगत असून हि शोकांत बुडाला होता. त्याला ती परा विद्या येत नव्हती, जिनें मनुष्य शोकनदी तरून जाऊन आनंदाच्या मधुवनांत पोंचतो. पंडित आणि नाविक यांची आख्यायिका आठवते इथें. सर्व शास्त्रें पढलेला पंडित जीवनाचें शास्त्र शिकला नाहीं, त्यामुळें नौका

उलटतांच गटंगळ्या खाऊं लागला. हें जीवनाचें शास्त्रच अध्यात्मशास्त्र होय. यालाच पराविद्या म्हणतात. हिच्या बळावरच मनुष्य विशोक होतो. परमात्मा हा सर्वशास्त्रयोनि असल्यामुळें तो विशोक तसा शोकनाशन आहे यांत नवल काय? विशोकपद इथें मुख्यत: निर्मोह ज्ञानी अशा अर्थानें आलेलें आहे. असा आत्मज्ञानी पुरुषच शोक-नाश करूं शकतो आणि म्हणूं शकतो: ''अशोच्यान् अन्वशोचस् त्वं प्रज्ञावांश्च भाषसे। गतासून् अगतासूंश्च नानुशोचन्ति पण्डिता:।''

### ६३२. शोक-नाशन

शोकनाशन म्हणजे शोक नाहींसा करणारा, शोकाचें निराकरण करणारा. उपनिषदें गीता इत्यादि वेदान्तविचाराचें अभियान मोह-शोकांच्या विरुद्ध आहे. तो विचार, तें अध्यात्मज्ञानच शोकनाशन आहे. ईशोपनिषदांत म्हटलें आहे: ''तत्र को मोह: क: शोक: एकत्वं अनुपश्यत:'' गीतेंत आलें आहे: ''पृच्छामि त्वां धर्मसंमूढचेता:'' आणि ''नहि प्रपश्यामि ममापनुद्यात् यत् शोकमुच्छोषणमिन्द्रियाणाम्'' म्हणजे दोन्हीकडे मोह आणि शोक ही जोडी आली असून त्यांतील क्रम हि समानच आहे. मोह हें कारण आहे, शोक हें त्याचें कार्य आहे. मोह गेला कीं शोक हि जातो. म्हणून अर्जुनानें शेवटीं कबूली दिली आहे : ''नष्टो मोह:, करिष्ये वचनं तव''. अशा प्रकारें उपनिषदांच्या अध्यात्मविद्येनें मोह आणि शोक नाहींसे होऊन मनुष्य निर्भय होतो, कृतकृत्य होतो. त्या आत्मविद्येचा ''गुरूणां गुरु:'' जो परमात्मा तो म्हणूनच शोकनाशन म्हटला आहे. गीतेचा वक्ता तोच आहे तो ऐतिहासिक पुरुष नाहीं. कारण, ऐतिहासिक म्हणजे अमुक एका काळीं होऊन गेलेला. परंतु गीतावक्ता तसा नाहीं. त्या विषयीं त्याचा श्रोता अर्जुन म्हणतो आहे: ''सनातनस् त्वं पुरुषो मतो में'' तो सनातन आहे, त्रिकालाबाधित आहे. तो सदैव सर्वांचा हृदयस्थ आहे. त्याला शरण जा. तो आपला मोह दूर करून शोक नाहींसा करतो आणि आपल्याला अकुतोभय करून सोडतो, परमानन्दमग्न करतो.

### ६३३. अर्चिष्मान्

अर्चिष्मान् म्हणजे निर्धूम उज्ज्वल अग्नि. यज्ञोपासक ऋषींनीं अग्नीच्या दोन अवस्था पाहिल्या, एक सधूम मलिन आणि दुसरी निर्धूम उज्ज्वल. आणि त्या आपल्या अनुभवाप्रमाणें असुखावह व सुखावह असल्याचें हि त्यांच्या सहजच लक्षांत आलें. जीवनाचें हि असेंच आहे असें त्यांनीं पाहिलें. म्हणून त्यांनीं शुक्ल कृष्ण गति मानल्या. शुक्ल गतीनें इष्ट लोक आणि कृष्ण गतीनें अनिष्ट लोक लाभतो असें त्यांना दिसून आलें. इह लोक घ्या परलोक घ्या, त्या उभय लोकांत तारक शक्ति दोनच आहेत, एक मार्गदर्शक आणि दुसरी मार्गक्रमक. एकीचे प्रतिनिधि आहेत डोळे आणि बुद्धि, दुसरीचे प्रतिनिधि आहेत पाय आणि स्फूर्ति (उर्फ आरोग्य वा कर्मशक्ति). अग्नि जेव्हां निर्धूम उज्ज्वल जळत असतो तेव्हां मार्गदर्शन हि चांगलें होतें व शीतभयादींचें निवारण होऊन मार्गक्रमण हि चांगलें होतें. त्या उलट सधूम अनुज्ज्वल स्थितीचें आहे. तींत डोळ्यांत धूर भरतो व शीतभयादींचें हि निवारण होत नाहीं. यालाच अनु-लक्षून उपनिषदांच्या गीतेच्या ऋषींनीं अर्चिरादि मार्ग म्हणजे देवयान आणि धूमादि मार्ग म्हणजे पितृयाण कल्पिले. त्याचें सरळ तात्पर्य आहे कीं जीवन जितकें ज्ञान आणि उद्यम यांनीं शुद्ध आणि समृद्ध होईल तितकें तें इहपर सुखाचें होईल. आणि जितकें तें ह्या दोन साधनांत क्षीण वा न्यून राहील तितकें तें दु:खाचें होईल. परमात्मा अग्निवत् उत्तम बुद्धि-स्फूर्तियुक्त प्रकाशक नि प्रेरक असल्यामुळें तो अर्चिष्मान् म्हटला आहे.

### ६३४. अर्चित

अर्चित म्हणजे पूजित. पूंजिलेला खरा, पण कोणीं? ज्या अर्थीं कोणा एका पूजकाचें नांव दिलेलें

नाहीं त्या अर्थीं विश्वानें पूजिलेला असा आशय. तो परमात्मा विश्वपूजित आहे. सर्वाश्चर्यमय हें विश्व निर्माण करणारी, सर्व ज्ञानाचें आणि सर्व शक्तीचें माहेर अशी एक अचिन्त्य शक्ति आहे अशी श्रद्धा म्हणजे सामान्य तर्कानें सिद्ध न करतां येणारी पण अपरिहार्य अशी जाणीव सुप्त गुप्त अस्फुट स्फुट अशा स्वरूपांत प्रत्येक जीवाच्या जीवांत निहित असते. तिच्यायोगें तो त्या सर्वशक्तिमान् परमेश्वराला मानत असतो आणि आपल्या परंपरेनुसार आणि बुद्धिशक्तीनुसार ध्यान भक्ति कर्म योगांनीं म्हणजेच मनोवाक्काय-क्रियांनीं त्याला पूजीत असतो. पूजीत नाहीं असा कोणीच नाहीं. कारण नाहीं म्हणणारा स्वत: आणि त्याचें तें नास्तिदर्शन त्या परमात्म्याचीच एक छटा आहे. आणि नास्ति वा शून्य म्हणून तो त्यालाच पूजीत असतो. पण हें त्या नास्तिकाला कळत नाहीं, इतकेंच. जसा एखादा वेडा लपावा आणि त्यानें ओरडून सांगावें कीं "अहो मी पहा हा लपलों आहें" तसें तें वदतोव्याघातरूप आहे. नास्ति हें हि ईश्वराचेंच रूप आहे आणि त्याची पूजा न करणें हि त्याची पूजा आहे असें म्हटल्यानंतर त्या परमेश्वराच्या पूजेंतून कोण कसा सुटणार? परमात्म्याची शक्ति ही अशी अचिन्त्य आहे कीं ती अनुकूल प्रतिकूल तटस्थ आणि मध्यस्थ अशा विविध वादांची विषयीभूत झाली आहे, क्षेत्र बनली आहे, आखाडा झाली आहे. सर्व नद्या जशा एका समुद्रासच मिळतात तशी सर्व ध्यानें भाषणें आणि कर्में त्या एका परमात्म-शक्तीलाच शरण जातात. म्हणून तो पूजित.

## ६३५. कुम्भ

कुम्भ म्हणजे कलश. परमात्म्याला कुम्भ, कलश म्हणण्यांत काय बरें हेतु? आपण पूजेंत कलश-पूजन करतों, घट-स्थापना करतों, भरल्या घागरीचें दर्शन शुभ शकुन म्हटला आहे. अशा प्रकारें घट कलश कुम्भ अत्यंत शुभ मानला आहे. कारण तो वरुणालय आहे, परमात्म्याचें वासस्थान आहे. परमात्म्याच्या ठाईं सर्व शक्ति, सर्व देवता निहित आहेत. म्हणून कलश-पूजन करतांना म्हणतात: "कलशस्य मुखे विष्णु: कण्ठे रुद्र: समाश्रित:। कुक्षौ तु सागरा: सर्वे."

सारांश, कलश म्हणजे सर्वात्मा वा सर्वदेवतात्मा होय. म्हणून परमात्मा कुम्भ म्हटला आहे. अर्थात् कार्यारम्भीं घटाची स्थापना म्हणजे परमात्म्याचें अधिष्ठान होय. रामदासांनीं म्हटलें आहे कीं आपल्या प्रत्येक कार्याला भगवंताचें अधिष्ठान पाहिजे. तरच तें सफल होईल. म्हणून आपण घट-स्थापना करीत असतों. कलश-पूजन करीत असतों. कलश-जलानें राजाला मूर्धाभिषेक होतो. म्हणजे परमात्म्याच्या आशीर्वादानें तो राजा बनतो. त्यासाठीं वरुणालयाचें, चारी महासागरांचें, जल आणावें लागतें. म्हणजे तो जो सर्वव्यापी परमात्मा म्हणजेच वरुण त्याची जलरूप संमति आणि आशीर्वाद आणून मगच राजा मान्य व्हावयाचा.

हा झाला तात्त्विक वा आध्यात्मिक अर्थ. व्यावहारिक अर्थानें हि कुम्भ म्हणजे हातचा जलाशय अत्यंत महत्त्वाचा आहे. त्याच्या वांचून शुद्धि व्हावयाची नाहीं. तहान भागावयाची नाहीं. जीवन चालावयाचें नाहीं. जीवनाची शुद्धि आणि समृद्धि त्याच्या अधीन आहे. म्हणून हि परमात्मा हा ठीकच कुम्भ म्हटला आहे. पुढील पदें "विशुद्धात्मा विशोधन:" हीं कुम्भाच्या गौरवाची फोड करतात, तसें मागील अर्चित पद हि त्याची पूजनीयता प्रकट करतें. किंबहुना "अर्चित: कुम्भ:" हें एक सविशेषण पद हि म्हणायला हरकत नाहीं.

## ६३६. विशुद्धात्मा

त्रिशुद्ध: आत्मा देहेन्द्रियमनोबुद्धय: यस्य स: विशुद्धात्मा. ज्याचा आत्मा म्हणजे देह, इन्द्रियें, मन, बुद्धि परिशुद्ध आहेत तो विशुद्धात्मा होय. योगी आत्मशुद्धीसाठीं सतत झटत असतात. देहें प्राणें मनें जी शुद्धि ती त्रिशुद्धि म्हणजे पूर्ण शुद्धि म्हटली जाते.

या तीन कर्मपथांनीं शुद्ध झाल्याखेरीज आत्मशुद्धि म्हणजे आत्म्याचा शोध होत नाहीं. आत्म्याचें भान आणि ज्ञान व्हायला सर्वांगीण शुद्धीची अत्यंत आवश्यकता आहे. महाभारतांत उत्तंकाची आख्यायिका प्रसिद्ध आहे. तो गुरुदक्षिणा म्हणून राणीचीं कुंडलें मागायला जातो, पण राजगृहांत राणी त्याला दिसत नाहीं. कारण तो अशुचि होता. भक्षण केल्यानंतर त्यानें मुख-प्रक्षालन केलें नव्हतें. त्या प्रमाणें हृदयमंदिरांतील त्या परम सुंदर आत्ममूर्तीचें दर्शन संपूर्ण आत्मशुद्धीवांचून होत नाहीं. आत्मशुद्धीच्या शिखराचेंच नांव विशुद्धात्मा आहे. आत्मशुद्धीच्या एकापेक्षां एक उंच टेकड्यांचें आरोहण करीत करीत तें सर्वोच्च शिखर तो स्वर्गमाथा, गांठायचा आहे. पतंजलि मुनींनीं अशा त्रिशुद्धीचा प्रयास केला होता म्हणून त्यांचें स्मरण असें केलें आहे.:

**योगेन चित्तस्य पदेन वाचां**
**मलं शरीरस्यच वैद्यकेन।**
**योऽपाकरोत् तं प्रवरं मुनीनां**
**पतंजलिं प्राञ्जलिरानतो ऽस्मि।''**

गंगेचा प्रवाह जसा समुद्राला अविरत मिळत असतो तसा ज्याचा आत्मशुद्धीचा अविरत प्रयत्न आहे तोच गौरवानें विशुद्धात्मा म्हणावयाचा. वस्तुत: परमात्मा हा आत्मशुद्धीचा समुद्र आहे. त्या समुद्राला आमचे शुद्धीचे प्रयत्न-प्रवाह मिळावयाचे आहेत. तो सहजच नित्य शुद्ध-बुद्ध-मुक्त-स्वभाव आहे आणि आम्हांला आत्मशुद्धीच्या द्वारें त्या निजपदवीस पोंचावयाचें आहे.

## ६३७. विशोधन

विशेषेण शोधयति इति विशोधन:। जो विशेषत: शोधन करतो तो विशोधन म्हणावयाचा. शोधन करणारीं द्रव्यें आणि क्रिया अनेक आहेत. परंतु त्या सर्वांत आत्मज्ञान हें परम शोधन म्हटलें आहे. ''नहि ज्ञानेन सदृशं पवित्रं इह विद्यते'' असें गीतेनें म्हटलेंच आहे. निरनिराळ्या पदार्थांच्या शुद्धीसाठीं निरनिराळीं द्रव्यें व प्रक्रिया वापरल्या जातात. वस्त्र पात्र गात्र वेगवेगळ्या प्रकारें शुद्ध केलें जातें. त्याच प्रमाणें काय वाक् चित्त यांचें हि शोधन केलें जातें. परंतु तेवढ्यानें खरी वा पुरी शुद्धि होत नाहीं. त्यांची ही शुद्धि विशुद्धीच्या ऐल थडीच राहून जाते. विशुद्धि म्हणजे ज्या अविद्येच्या योगें जीव जन्म-कर्म-फल-परंपरेंत सांपडतो, त्या परंपरेंतूनच, त्या संसारांतूनच सुटणें होय. जन्माच्या पाठीं व्याधि, जरा, मृत्यु, दु:ख आणि दोष लागतात. म्हणून तो जन्मच नाहींसा करणारें जें आत्मज्ञान तें विशोधन म्हणजे परम पवित्र म्हटलें जातें. मृगजळच आटल्यावर त्यांत पडणें बुडणें नि रडणें कुठून? तत्र को मोह: क: शोक: एकत्वं अनुपश्यत:? स्वप्नांतल्या अनर्थांनीं मनुष्य ओसणावतो, पण जागृत झाल्यावर स्वप्नासकट ते सारे अनर्थ आणि तो विलाप विलयास जातो. त्यासाठीं धावाधाव आणाआण नि लावालाव कांहींच करावी लागत नाहीं. आत्मज्ञान हें तसें विशोधन आहे. आत्मा आणि आत्मज्ञान हें अभिन्न असल्यामुळें तो परमात्मा विशोधन होय.

## ६३८. अनिरुद्ध

अनिरुद्ध प्रद्युम्न संकर्षण आणि वासुदेव हा वैष्णव तंत्राचा चतुर्व्यूह म्हटला जातो. सांख्यांचे प्रकृतीचे तीन गुण आणि आत्मा हा जसें एक चतुष्टय आहे तसाच हा चतुर्व्यूह. त्यापैकीं इथें अनिरुद्ध आणि प्रद्युम्न हे दोन व्यूह ''अनिरुद्धो प्रतिरथ: प्रद्युम्नो ऽमितविक्रम:'' या श्लोकार्धांत आले आहेत. शंकराचार्य हीं चार नामें घेतात. परंतु तीं सविशेषण दोन नामें असावीं : अप्रतिरथ अनिरुद्ध आणि अमितविक्रम प्रद्युम्न. अप्रतिरथ आणि अमितविक्रम हीं त्यांचीं नित्य विशेषणें होत. ''मुकुंदो ऽमित विक्रम:'' हें नाम हि असेंच सविशेषण एक पद आहे ''संकर्षणो ऽच्युत:'' हें देखील तसें मानणें शक्य आहे. चतुर्व्यूहांपैकीं प्रत्येक नित्य-विशेषण-युक्त असावा.

महाभारतांत बलराम कृष्ण प्रद्युम्न आणि अनिरुद्ध हे चौघे तुल्यबलसामर्थ्य अप्रतिरथ अमितविक्रम मानिले आहेत. रूप गुण शीलानें ते सर्व समान तळपणारे होते. व्यूहकल्पना बाजूला सारून स्वतंत्रपणें हि त्यांचा विचार करतां येतोच. आणि तसा तो करणें श्रेयस्करच आहे. तथापि मानवी जीवन हें एकेरी नाहीं. तें अनेकपदरी आहे. बटमोगऱ्यांत जसे एकाच फुलांत सात थर असतात तसें मानवी जीवन हि अनेक थरांचें बनलें आहे. त्यांत पारमार्थिक सत्य, आणि व्यावहारिक अनृत या दोन टोकांच्या मधें या दोहोंच्या मिश्रणाच्या अनेक छटा पसरल्या आहेत. म्हणूनच म्हटलें आहे शंकराचार्यांनीं कीं ''सत्यानृते मिथुनीकृत्य प्रवर्तितो ऽयं लोकव्यवहार:'' अनिरुद्ध पद हि तसेंच पारमार्थिक तत्त्वविचार, ऐतिहासिक व्यक्ति आणि कविकल्पना यांच्या पदरांचा अनेकपदरी आणि अनेक रंगी गोफ आहे. तत्त्वविचार निश्चित, ऐतिह्य अनिश्चित आणि कविकल्पना अनियंत्रित आहे. त्यांचें फलित त्यामुळें वैचित्र्यपूर्णच असणार. तथापि दाणा आणि भूस उपणलें वा पाखडलें म्हणजे भूस उडून जातें व दाणा हातीं लागतो. परमात्मशक्ति ही निर्‌गुण असल्यामुळें ती अनिरुद्ध होय. इतर सारें निरुद्ध होतें.

### ६३९. अप्रतिरथ

नास्ति प्रतिरथ: प्रतिभट: यस्य स: अप्रतिरथ:। ज्याला प्रतिरथ म्हणजे प्रतियोद्धा नाहीं तो अप्रतिरथ म्हणावयाचा. परमात्मा हा एकमेवाद्वितीय आहे त्याला प्रतिस्पर्धी कुठून असणार? त्याची बरोबरी करणारा हि कोणी नाहीं मग त्याहून वरचढ कसा असेल? म्हणून म्हटलें आहे अर्जुनानें : ''न त्वत् समोऽस्त्यभ्यधिक: कुतोऽन्यो, लोकत्रयेऽप्यप्रतिमप्रभाव:'' देवा, तुझा प्रभाव तिन्ही लोकांत अतुल आहे. अप्रतिरथ पदाचा वाच्यार्थ आहे, ज्याला प्रति म्हणजे प्रतिपक्षीय अर्थात् तोंड देणारा रथ नाहीं असा. लक्ष्यार्थानें रथ म्हणजे रथी, योद्धा, वीर असा अर्थ घ्यावयाचा. कारण, कोणता हि रथच कोणाला अनुकूल वा प्रतिकूल असत नाहीं. तें एक जड साधन आहे. शत्रुमित्रत्व हा चेतनाचा धर्म आहे. परमात्म्याचा निरोध होऊं शकत नाहीं, कारण तो सर्वगत आहे. तसा त्याचा विरोध हि होऊं शकत नाहीं कारण तो एकमेवाद्वितीय आहे. असा तो निर्‌निरोध आणि निर्‌विरोध आहे. प्रद्युम्नपुत्र आणि कृष्णपौत्र अनिरुद्ध तर बाणाच्या किल्ल्यांत कैद झाला होता आणि त्याची सुटका कृष्णाला बाणाचा विरोध मोडून काढून करावी लागली होती. अव्यक्त सर्वगत तत्त्वाची बरोबरी व्यक्त एकदेशी महापराक्रमी हि सत्व कशी करणार? पण गौरवानें निरुद्धाला अनिरुद्ध आणि प्रतिरथीनें हटकलेल्याला अप्रतिरथ, अप्रतिमल्ल म्हटलें जातें. कारण तो विजयी झालेला आणि महापराक्रमी असतो.

### ६४०. प्रद्युम्न

'सखू मरो बकू मरो डुमन्या माझा कामाचा'! इतर सगळ्या कला विद्या भले जावोत पण माझा वीर्यसंग्रह शाबूत राहो. तो जीवनशक्ति-स्रोत आहे.

प्रकृष्टं द्युम्नं लिङ्गं यस्य स: प्रद्युम्न:। ज्याचें द्युम्न म्हणजे पौरुष प्रकृष्ट आहे तो प्रद्युम्न म्हणावयाचा. ज्याच्या ठाईं पौरुष म्हणजे स्त्रीत्व वा पुरुषत्व दुर्‌बल आहे, प्रक्षीण आहे तो प्राणी निस्तेज आणि बावळट दिसतो. तो जगांत शोभा पावत नाहीं. त्याची शोभा होते. अशा क्लीबाची जगांत कदर होत नाहीं. त्यांत नवल नाहीं, पण तो आपल्याच दृष्टीनें पतित दीन हीन होतो. तो आत्मग्लानीच्या खोल गर्तेत पडतो. नरक नरक ज्याला म्हणतात तो हाच होय. असे नरक-पतित केव्हां केव्हां आत्महत्या करून बसतात. हाच रौरव नरक होय. या स्थितीचें दुसरें टोंक म्हणजे प्रद्युम्नत्व होय. त्यालाच स्वर्गीय नंदनवन म्हणावयाचें. तिथें जीवनाच्या सर्व सुखोपभोगांची क्षमता षोडशकलांनी नांदत असते. जग सदैव उपभोग्य सामग्रीनें परिपूर्ण आहे, पण आमच्या जवळ

उपभोगक्षमता कुठें असते? आम्हांला तहान भूक मैथुनेच्छा सारखी असत नाहीं. त्यामुळें तेवढ्यापुरतें भोग्यजात असून नसल्यासारखें होतें. पण ज्यानें आपलें हें उपभोगक्षमतारूप यौवन आणि पौरुष अक्षीण राखलें आहे तोच यावदर्थ उपभोक्ता प्रद्युम्न म्हणावयाचा. त्याला यथासमय तृषा क्षुधा निद्रा काम इत्यादि सर्व भाव आहूतवत् उपस्थित होतात, आणि तो यावदर्थच त्यांचें सेवन करतो. निद्रा घ्यायची गरज असतांना तो एका क्षणांत निद्राधीन होतो, घोरूं लागतो. त्यासाठीं त्याला निद्रागुटिका घ्याव्या लागत नाहींत. किंवा संभोगासाठीं मकरध्वजवटिका घ्याव्या लागत नाहींत. तो यथाप्रसंग सर्वकार्यक्षम असतो. परंतु कोणीं किती हि दक्षतेनें ही क्षमता-सिद्धि साधली तरी ती क्षीण आणि क्षीणतर होतेच होते. कारण ती देह-सापेक्ष आहे. परंतु परमात्म्याची ही क्षमता केव्हां हि क्षीण होत नाहीं. कारण ती देहसापेक्ष नाहीं, निरपेक्ष आहे. त्यामुळें तोच एक प्रद्युम्न म्हणावयाचा. आम्हीं सापेक्ष पौरुष साधलें तरी पुष्कळ.

## ६४१. अमित-विक्रम

न मितः अमितः। अमितः विक्रमः यस्य सः अमित-विक्रमः। ज्याचा विक्रम अमित म्हणजे इयत्तेनें मापलेला मोजलेला नाहीं तो म्हणायचा अमित-विक्रम. ज्या गोष्टी मूर्त आहेत, व्यक्त आहेत, सगुण आहेत त्यांचें मोजमाप उत्तरोत्तर कठिण होत जातें. हें दृश्य विश्व मूर्त आहे. पण याची गणति करतां येतै का? ग्रह नक्षत्र तारका मोजतां येणें शक्य आहे? ऋतुपर्णाला गणितविद्या अवगत होती. त्यानें एका प्रचंड वृक्षाचीं पानें किती ते गणितानें सांगितलें होतें. पण त्याला हि पृथ्वीचे रजःकण आणि आकाशांतील ग्रहगण मोजणें शक्य झालें नसतें कदाचित्. पण हल्लींचे ज्योतिर्गणिती ग्रहांचीं वजनें, त्यांच्या कक्षांची लांबी, त्यांचीं अंतरें इत्यादींचें गणित अचूक करतात. पण दिशा, काल, मन, प्रकृतीचे गुण इत्यादींचें मोजमाप अद्याप कोणाला काढतां आलें नाहीं. मग गुणांच्या पलीकडे असलेले निर्गुण आत्मतत्त्व त्याचें मोजमाप कोण कसें घेणार? जिथें द्रव्य गुण क्रिया दिक्काल संभवतात तिथें मोजमाप हि संभवतें. आणि कोणाला तसें मोजमाप काढतां न आलें, तरी तें काढणें शक्य आहे. पण जिथें या कशाचाच लाग नाहीं तिथें तुम्ही काय मोजणार? म्हणून परमात्मा हा अप्रमेय होय. त्याची ही अप्रमेयताच त्याचा अमितविक्रम.

निर्गुण परमात्म्याचा महिमा अमित आहेच पण सगुण परमात्म्याचा महिमा हि अमितच आहे. निर्गुण-महिम्यांत मितीला प्रवेशच नसल्यानें अमित तो आहे, तर सगुण-महिमा नित्य वर्धिष्णु आणि अनन्त असल्यामुळें अमित आहे. हें विश्वच सगुण परमात्म्याचा विक्रम आहे आणि तो स्वभावतः अनन्त आहे.

## ६४२. कालनेमि-निहा

भगवान् विष्णु ही परमात्म्याची पालनी कला असल्यामुळें विश्वद्रोही असुरांचा नाश आणि परद्रोह परनिन्दा आणि परस्वापहार वर्ज्य करून जे काया वाचा मनें विश्वरूप परमात्म्याची सेवा करतात त्या भक्तांचा प्रतिपाळ हें त्याचें ब्रीद आहे आणि तद्द्वारा धर्मसंस्थापना हें त्याचें अवतार कार्य आहे. असा हा सत्त्वावतार भगवान् विष्णु आपला स्वधर्म पालन करीत असतांना त्याला किती असुरांचा नाश करावा लागला त्याची गणति नाहीं. तथापि कांहीं मोठीं धेंडें पुराणान्तरीं नोंदलेलीं आहेत. त्यांपैकीं कालनेमि हा एक असुर होय. त्यानें विश्वद्रोह कसा केला आणि त्याबद्दल भगवंतानें त्याला कसें शासन केलें हें हिं तिथेंच पहावयाचें. तथापि त्या सर्वांचें सामान्य चरित्र गीतेच्या सोळाव्या अध्यायांत दिलेलें आहे.

**अहंकारं बलं दर्पं कामं क्रोधं च संश्रिताः।**
**मां आत्म-पर-देहेषु प्रद्विषन्तोऽभ्यसूयकाः।।**

**तान् अहं द्विषतः क्रूरान् संसारेषु नराधमान्।**
**क्षिपाम्यजस्रं अशुभान् आसुरीष्वेव योनिषु।।**

संक्षेपानें असुरांचे हे गुण आणि हीं कर्में आहेत आणि त्यांची गति हि काय होते तें हि इथें दिलें आहे. काम क्रोध लोभ हें त्याचेंच अतिसंक्षेपरूप होय. तलवार बोथट असेल तर ती हनन करूं शकणार नाहीं. काम क्रोध लोभ हें त्रितय ती धार होय जिनें तो काल जगाचा संहार करीत असतो. हाच कालनेमि असुर म्हणावयाचा. त्याचा संहार भगवान् विष्णु करतो आणि प्रजेला सुखवितो. म्हणून तो कालनेमि-निहा म्हटला आहे.

### ६४३. वीर

ज्यानें कालनेमि राक्षसाला ठार केलें तो उघडच वीर म्हणावयाचा. वीर म्हणजे वीर्यवान्, बलशाली. ज्याच्या ठाईं वीर्य नाहीं तो निर्‌भय हि असत नाहीं नि पराक्रमी हि असत नाहीं. भीम हा वीर होता. तो बकासुराकडे जायला भ्याला हि नाहीं आणि त्याच्याकडे जाऊन त्याचा पराभव, त्याचा नाश केल्याशिवाय तो राहिला हि नाहीं. याच शूरत्वाचें नि पराक्रमित्वाचें कारण त्याचें वीर्य, त्याचें बलच होय. वीर्याशिवाय म्हणजे शारीरिक व मानसिक बलाशिवाय अशी निर्‌भयता आणि असा पराक्रम संभवत नाहीं. वीर हा आपल्या स्वतःच्या बळावर एकाकी पराक्रम करतो. तो गणाची अपेक्षा करीत नाहीं. म्हणून अशा वीर पुरुषाला पुरुषसिंह म्हणतात. सिंहाच्या ठाईं हस्तीसारख्या महासत्वावर त्याच्या कळपावर, एकट्यानें धाड घालण्याची हिंमत असते. तो आपल्या शक्तीनें आणि युक्तीनें गजाचें गंडस्थळ फोडतो. इतकें असतें त्याचें बल आणि पराक्रम. परमात्मा हा असा वीर आहे. तो काळाला हि भीत नाहीं. तो एकटाच सर्वांचा संहार करतो. त्याला कुणा दुसऱ्याच्या मदतीची गरज नाहीं. असा तो निडर, ताकतवान आणि शत्रूवर तुटून पडून काम फत्ते करणारा आहे.

''एकेनापि हि शूरेण पादाक्रान्तं महीतलम्। क्रियते भास्करेणेव स्फारस्फुरितरोचिषा।'' सूर्य जसा एकाकी पौरुष करणारा शूरवीर आहे तसा परमात्मा हि एकाकीच पराक्रम करणारा आहे. त्यानें एकट्यानें हें विश्व निर्मिलें पाळलें आणि संहरिलें आहे. म्हणून तो वीर. त्याच्या इतकें वीर्य दुसऱ्या कोणाच्या ठाईं आहे? कालनेमिनिहा वीर हें एक सविशेषण पद हि घेणें शक्य आहे.

### ६४४. शौरि

शूरस्य अपत्यं पुमान् शौरिः। शूर वंशीय वसुदेवाचा पुत्र म्हणून कृष्ण हा शौरि म्हटला आहे. पूर्वी ३७ व्या श्लोकांत हि हें पद येऊन गेलें आहे. किंचित् क्रम-भेदानें हाच चरण तिथें आला आहे. येथील पाठ हा मूळचा वा समीचीनतर म्हणतां येईल. हें नामसहस्र विष्णूचें असलें तरी तें कृष्णावतारांत रचलेलें आहे. त्यामुळें त्यांत कृष्णपरता वारंवार प्रकट झालेली आढळणें स्वाभाविक आहे. तथापि गोपाळ कृष्णाचा आणि त्याच्या गोकुललीलांचा इथें पत्ता नाहीं. एवढ्याच साठीं मागाहून विष्णुसहस्राच्या धर्तीवर गोपाल-नामसहस्र. गोपाळकृष्ण नाम कोणी भक्तानें रचिलें आहे. इतकेंच काय पण इथें तो कंसहन्ता हि नाहीं, जरी चाणूरान्ध्र-निषूदन तो आहे. त्याची वेणू वा मुरली इथें नाहीं, नवनीत-चौर्य नाहीं, गोवर्धन-धारण नाहीं, राधा नाहीं, गोपीरास नाहीं, तो रुक्मिणी-नाथ नि द्रौपदीबन्धु नाहीं. पाण्डवांचा कैवारी हि तो नाहीं. तें सारें कृष्णचरित्र पुष्कळ मागाहून कविजनांनीं कल्पिलें व रंगविलेलें आहे. उपनिषदांतील देवकीपुत्र कृष्ण, भारतांतील वासुदेव कृष्ण, हरिवंशादि पुराणांतील गोपाळकृष्ण आणि परवर्ती कवींचा राधाकृष्ण ही कृष्णचरित्राची उतरती भांजणी आहे. रामचरित्र उत्तरोत्तर उदात्त रंगविलें गेलें आहे, तर कृष्णचरित्र उत्तरोत्तर रंगेल झालें आहे. खरा कृष्ण गुप्तच राहिला आहे. त्यानें आपल्या चरित्राचें

रहस्य गीतेंत सांगून ठेवलें आहे:

**अव्यक्तं व्यक्तिमापन्नं मन्यन्ते मां अबुद्धय:।**
**परं भावं अजानन्तो ममाव्ययमनुत्तमम्।।**
**गीता ७-२४**

याचाच अनुवाद रामदासांनी ''जगीं थोरला देव तो चोरलासे'' म्हणून केला आहे. तथापि हें आपलें थोरलें देवपण मनुष्यरूपांत अवतरतें आणि तें आपण अवमानितां कामा नये असें हि गीतेंत स्पष्ट केलें आहे.

**अवजानन्ति मां मूढा मानुषीं तनुमाश्रितम्।**
**परंभावं अजानन्तो मम भूत-महेश्वरम्।।**

**गीता ९.११**

कृष्ण हा मानव कृष्ण नाहीं, तो कृष्ण देव आहे. मानव हा मानव नाहीं तो देव आहे हें गीतेनें विशद केलें आहे. व्यक्त हा अव्यक्ताचाच प्रकाश आहे, म्हणून व्यक्ताव्यक्त भेद वा सगुण निर्गुण भेद गौण होय. हाच अद्वैत विचार. सहस्रांत कृष्ण-चरित्र असें नामांकित झालें आहे. (१) अमृतांशूद्भव (२) यदुश्रेष्ठ (३) शौरि (४) वासुदेव (५) देवकीनंदन (६) कृष्ण (७) गदाग्रज (८) वेदवित्.

## ६४५. शूरजनेश्वर

चंद्रवंशांत जन्मला म्हणून अमृतांशूद्भव, चंद्रवंशांतील यदुकुलांत जन्मला म्हणून यदुश्रेष्ठ, यदुकुलांतील शूर गोत्रांत जन्मला म्हणून शौरि, शूर गोत्रांतील वसुदेवाचा पुत्र म्हणून वासुदेव, आणि देवकीच्या पोटीं जन्मला म्हणून देवकीनंदन, कृष्ण हें त्याचें ठेवलेलें व्यक्तिवाचक नांव म्हणून कृष्ण, त्याचा धाकटा भाऊ गद म्हणून गदाग्रज, आणि ज्ञानी म्हणून वेदविद् इत्यादि नामें त्याला प्राप्त झालेलीं आहेत. एवढाच त्याचा वैयक्तिक परिचय सहस्रांतून आढळतो. गरुडध्वज, शंखचक्रगदापद्मधारी, चाणूरान्ध्रनिषूदन इत्यादि विशेषणें हीं जुनींच विष्णूचीं आहेत. तीं खास कृष्णाचीं म्हणतां येत नाहींत. तो शूर गोत्रांतील लोकांचा नायक म्हणून त्याला शूरजनेश्वर म्हटलें आहे. सहस्रांत त्याची वैयक्तिक माहिती मिळते ती एवढीच. या राईचा कविजनांनीं पुढें पर्वत केला त्याला कारण कृष्णाचें अलौकिक ज्ञान होय. मनुष्य हा दिसतो तसा मृण्मय नाहीं, तो चिन्मय आहे, हें ज्ञान वेद-वेदान्ताचें मथित म्हणून कृष्णानें जगाला दिलें. त्यामुळें तो अवतार गणला गेल्यास नवल काय? आणि जिथें सामान्य व्यक्ति हि मूलत: परमात्म-स्वरूपच आहे तिथें कृष्णासारखी विभूति जगद्गुरु, परमात्मा म्हणून गौरविली आणि चित्रिली गेल्यास काय नवल? तुम्ही कोणा हि व्यक्तीची अथवा दगडाची का उपासना करा ना पण हें विसरूं नका कीं उपासना त्या निर्गुण निराकार परमात्म्याची होत आहे. त्याचा हा व्यक्ताकार प्रकाश आहे. हें अभिज्ञान झाल्यावर मग कशाची फिकीर नाहीं. पण तें नसेल तर तुमचें सर्व धर्मकर्म अशास्त्र-विहित झालें म्हणून समजा.

## ६४६. त्रिलोकात्मा

शूरसेनजनपदांत वसणाऱ्या शूर प्रजेचा नायक तो कृष्ण मानव देहानें जरी साडेतीन हात आकाराचा असला तरी तो आत्मरूपानें त्रिलोकव्यापी आहे; त्रिलोकात्मा आहे. या त्रिभुवनांत एकच एक आत्मतत्त्व भरून राहिलें आहे. आंव्यांतील लहान बोळक्यापासून महान् रांजणापर्यंत सगळें जसें मृण्मय आहे तसेंच्या तसें या विश्वांतील अणुरेणूपासून ब्रह्माण्डा पर्यंत सर्व चिन्मय आहे. तिथें दुसरें कांहीं नाहीं. आंव्यांतील मडकीं जशीं पेटलेल्या अग्नींत भाजून निघतात तसें हें चराचर विश्वब्रह्माण्ड दाही दिशांत भरून पेटून राहिलेल्या चित्तेजांत भाजून निघत आहे. किंबहुना अग्नींत पडलेलें तृण जसें अग्निसात् होतें तसें हें विश्व ब्रह्मसात् झालें आहे. म्हणून विश्वरूप पाहणारा तो अर्जुन शौरि शूर-जनेश्वर त्या कृष्णाला म्हणतो आहे: ''तेजोभिरापूर्य जगत् समग्रं, भासस् तवोग्रा: प्रतपन्ति विष्णो'' हे औटहात मोटक्या कृष्णा, तूं तो त्रिलोकात्मा विष्णु,

आहेस. तुझ्या उग्र तेजानें दाही दिशा केवल तेजोमय होऊन राहिल्या आहेत. मूर्त व्यक्त सगुणाला मर्यादा आहे. त्यामुळें तें एकदेशी आहे. पण जें अमूर्त अव्यक्त निर्गुण त्याला मर्यादा कुठली ? म्हणून तें त्रिलोकात्मा आहे, सर्वव्यापी आहे. व्यक्त हा अव्यक्ताचाच प्रकाश-किरण आहे याची ओळख पटल्यावर मग द्वैत उरत नाहीं. पण अशी ओळख पटेपर्यंत हा औट हात आकाराचा कृष्ण जो या कालांत जन्मलेला त्यानें प्राचीन काळच्या विवस्वानाला योग कसा काय सांगितला आहे, प्रश्न पडतो. आणि म्हणून तो अर्जुनमुखानें म्हणतो: ''या काळचा तुझा जन्म सूर्याचा तो पुरातन। तूं बोलिलास आरंभीं हें मी जाणूं कसें बरें?'' पण जेव्हां त्याला व्यक्ताव्यक्तांच्या अद्वैताचें अभिज्ञान होतें तेव्हां मग तो म्हणतो: ''सनातनस् त्वं पुरुषो मतो मे''–'मी मानितों तूं परमात्मतत्त्व' अशा प्रकारें जो शौरि शूर-जनेश्वर तोच त्रिलोकात्मा त्रिलोकेश होय.

## ६४७. त्रिलोकेश

त्रिपद इथें बहुवचन वाचक नाहीं, तर समग्रतावाचक आहे. आदि अंत आणि मध्य हे त्रि मिळून पूर्ण होतें. म्हणून त्रिलोक म्हणजे संपूर्ण विश्व होय. त्याचा जो ईश तो त्रिलोकेश म्हणावयाचा. समग्राचा स्वामी असमग्र वा एकदेशी कसा होणार? जो सर्वव्यापी आहे, अनन्त आहे, तोच स्वामी होऊं शकेल या विश्वाचा. आणि म्हणून जिच्या पासून हें सारें विश्व निर्माण झालें, जिच्या अंकावर तें खेळत आहे, जिच्या ठाईंच तें अन्तीं विलीन व्हायचें आहे ती जी चित्सत्ता तीच त्रिलोकेश होय. समुद्रापासून लाटा निर्माण होतात, त्याच्याच पृष्ठावर त्या लोळत व खेळत असतात आणि शेवटीं त्यांतच त्या विलीन होतात तद्वत्. अथवा रज्जूपासून सर्पाभास निर्माण होतो, त्या रज्जूवरच तो भासत राहतो आणि शेवटीं सत्यज्ञानानें त्या रज्जूच्याच ठाईं विलीन होतो तद्वत्. समुद्राची सत्ता वास्तविक आहे, रज्जूची सत्ता हि तशीच वास्तविक आहे. त्यावर भासमान् होणारा तरंग वा सर्प हेंच खरोखर आभासिक अवास्तविक आहेत. या दोन आभासांत फरक नाहीं असें नाहीं. पण तो फरक अप्रस्तुत आहे, अकिंचित्कर आहे. वस्तूच्या सत्तेवरच अवस्तु वस्तुज्ञानाच्या अभावीं भासमान होत आहे ह्यांत संदेह नाहीं. आणि तेंच अभिप्रेत आहे. वस्तूवरच अवस्तूचा भास उत्पन्न होतो, वस्तूवरच तो टिकून असतो आणि शेवटीं वस्तूच्या ठाईंच तो विलीन होतो म्हणून, म्हणजे वस्तु उरते व तो नाहींसा होतो म्हणून, त्रिलोकाभासाचा स्वामी त्रिलोकेश ती चिद्वस्तु होय, जिला ब्रह्म म्हणतात.

## ६४८. केशव

केशव म्हणजे केशवान्. पण केश म्हणजे काय? सगुण पक्षीं केश म्हणजे अलक. केश हे अलंकाररूप होत. सिंहाची आयाळ, घोड्याची आयाळ किती सुंदर दिसते! खल्वाट पुरुष चांगला दिसत नाहीं: त्याची टकल्या म्हणून हेटाळणी होते. उलट बाल वृद्ध स्त्री पुरुष यांच्या सुंदर केशकलापाबद्दल त्यांची प्रशंसा होते. अर्भकाचें जावळ, बालकाचीं झुलपें, तरुणाचे कुरळे वा मोडदार केस तशा टोकदार दाढीमिशा, तरुणींचे केशपाश, वृद्धाचे रुबाबदार मानेवर रुळणारे केस व छातीवर रुळणाऱ्या दाढ्या यांच्या वर्णनांनीं काव्यें व व्यवहार भरला आहे. केसांचें आकर्षण ऋषिमुनींना हि फार. गृहस्थांचे केस त्यांच्या विपुल सौभाग्याचें व विलासाचें द्योतक तर वनस्थांचे त्यांच्या विरक्तीचें व सुदीर्घ तपाचें द्योतक. दोघांना हि आपल्या केसांचा अभिमान. असे हे सगळे केशवच होत. भगवान् कृष्ण ह्यांचा शिरोमणि, म्हणून तो केशव म्हणून विशेष प्रसिद्ध. सहस्रनामांतून संध्येचीं २४ नामें निवडलीं गेलीं आणि त्यांत हि पहिलें नाम केशव आहे. असें आहे केशव नामाचें आगळें महत्त्व.

पण हें महत्त्व त्याच्या आध्यात्मिक आशयामुळेंच असूं शकतें. तो आध्यात्मिक आशय निर्‌गुण पक्षीं असा आहे: केस म्हणजे पुरुषावयवांचा अति सूक्ष्म अंश. पुरुषेन्द्रियें म्हणजे त्याच्या विविध शक्ति होत. अर्थात् सर्व स्थूल सूक्ष्म आणि अति सूक्ष्म शक्तींचा जो स्वामी तो केशव म्हणावयाचा. हाच भाव भागवताच्या पुढील श्लोकांत विशद झाला आहे:

योऽन्तः प्रविश्य मम वाचमिमां प्रसुप्तां
संजीवयत्यखिलशक्तिधरः स्वधाम्ना।
अन्यांश् च हस्तचरण-श्रवणत्वगादीन्
प्राणान्, नमो भगवते पुरुषाय तुभ्यम्।।

अर्थात् केशव म्हणजे अखिल शक्तिधर परमात्मा होय.

## ६४९. केशिहा

केशिनं हन्ति इति केशिहा। जो केशीनामक दैत्याचा वध करिता झाला तो केशिहा कृष्ण. जे जे वधार्ह त्यांचा वध देव करीत आला आहे. केशी हा हि त्यापैकींच. सत्य संयम दया क्षमा शान्ति इत्यादि संजीवनरूप दैवी गुणांचे जे मारक जीवन-द्रोही काम क्रोध लोभादि आसुर गुण तेच वधार्ह होत. त्यांचे अभिमानी जे भ्रांत आणि उद्दाम जीव तेच राक्षस, तेच असुर. त्यांचा नाश म्हणजे त्या आसुर गुणांचा नाश भगवान् करीत असतो. ते जीव तर आत्मरूप असल्यामुळें त्यांचा नाश होऊंच शकत नाहीं. आणि म्हणून पुराणांत वर्णिलें जातें कीं त्या त्या असुराचा नाश देवानें केला आणि त्याची प्राण-ज्योत देवांत मिसळून गेली, देवाच्या ठाईं विलीन झाली. अशा प्रकारें देव त्यांचा उद्‌धार करतो, त्यांना सद्‌गति देतो. आत्मा अमर असल्यामुळें तो केव्हांहि मरत नाहीं आणि देह मर्त्य असल्यामुळें तो मेल्याशिवाय रहात नाहीं. अशा स्थितींत दोन्ही दृष्टीनीं वध म्हणजे एक निरर्थक क्रिया होते. म्हणून वधाचा खरा आशय अभिमाननाश, अज्ञान-नाश एवढाच होऊं शकतो. तें अज्ञान, तो अभिमान कायम आहे तोंवर त्या आसुर जीवाचा नाश होऊंच शकत नाहीं. स्थूल देह पडल्यावर हि तो लिंगदेहानें कायमच असतो. आणि तो परत जन्मत राहतो. मधु कैटभ, हिरण्याक्ष हिरण्यकशिपु, रावण कुम्भकर्ण अशा तीन जन्मांत ते शप्त असुर वावरत राहिले. त्यांची मुक्ति झाली नाहीं. ह्याचें हि कारण तेंच. रक्तबीजाच्या रक्तबिन्दूगणिक नवे रक्तबीज तयार होत ह्याचें हि कारण तेंच. तात्पर्य अज्ञाननाश झाल्याखेरीज देहांतून मुक्ति नाहीं. परमात्माच तो अज्ञाननाश करण्यास समर्थ म्हणून तो असुरहन्ता; म्हणून तो केशिहा, म्हणून तो कंसहृत्.

## ६५०. हरि

हरति इति हरिः। जो हरण करतो तो हरि म्हणावयाचा. पण कशाचें हरण? दुःखाचें? नाहीं. कारण, दुःखें असंख्य आहेत. मग कशाचें? दुःखमूळाचें. दुःखमूळ उपटलें कीं सर्व दुःखें उन्मूळतात. हें दुःखमूळ कोणतें? पाप. पण पापांत हि तर असंख्य प्रकार आहेत. होय, पण त्यांचें सर्वांचें मूल स्वरूप अज्ञान आहे. म्हणून हरि म्हणजे अविद्याहंता. ज्यामुळें जीव अविद्या काम कर्म जन्म मृत्यु जराव्याधि दुःखांत सांपडतो तें सर्वदोषमय मूळ अज्ञानच तो नाहींसें करतो आणि म्हणून तो हरि म्हणावयाचा. जीवाचें दुःखजंजाळ अन्यथा दूर व्हायचें नाहीं. जागृत जीवाला आपल्या पापाचें सतत भान होत राहतें दुःखानुभवामुळें. त्यामुळें तो ''पापोऽहं पापकर्माहं पापात्मा पापसंभवः। त्राहि मां पुण्डरीकाक्ष सर्वपापहरो हरिः।।'' असें पुकारीत हरीला शरण जात असतो. आणि हरि त्याचें अज्ञान हरण करून त्याला ''तत् त्वं असि'' म्हणून दाखवून देत असतो. आणि तो हि मग ''पापो ऽहं पापकर्माहं'' हें रडगाणें सोडून देऊन 'सोऽहं'' ची ललकारी देत मुक्तविहार करूं लागतो.

हरि शब्दाचा सिंह असा हि अर्थ आहे. आणि तो हि इथें लागू पडतो. हा हरि, हा आत्मसिंह मेंढ्यांच्या कळपांत सांपडून में में करणाऱ्या आपल्या छाव्याला, जीवाला, पाहतो आणि त्याचा कान धरून ग्राम्य कळपांतून त्याला अरण्यांत घेऊन जातो आणि म्हणतो लेका, हें में में काय करतोस? अरे सोऽहं ची गर्जना कर ही अशी माझ्या सारखी आणि मग तो हि आत्मज्ञानवान् मुक्तात्मा में में सोडून सोऽहं ची गर्जना करूं लागतो. अशा प्रकारें तो हरि आपल्या छाव्याचें हरण करीत असतो म्हणून तो हरि म्हणावयाचा.

## ६५१. कामदेव

जीवाच्या हृदयांत अनेक ज्ञात अज्ञात बऱ्यावाईट स्थूल सूक्ष्म वासना वास करीत असतात. किंबहुना या वासनांचेंच तें बनलेलें आहे. कोशकीटक आपल्या उदरांतून तंतु काढून त्याचा कोश बनवितो आणि त्यांत आपल्याला सुरक्षित समजतो. तद्वत् जीव हि नाना वासनांच्या कोशांत आपल्याला संवृत करून राहतो. कोशावांचून जणूं तो जगूंच शकत नाहीं. कुठल्या ना कुठल्या वासनेचें वसन त्याला हवेंच. तो नग्न दिगंबर राहूं शकत नाहीं. या सर्व वासनांचें वर्गीकरण धर्म अर्थ काम आणि मोक्ष या चतुर्वर्गात प्राचीन विचारकांनीं केलें आहे. आधुनिक कदाचित् कांहीं वेगळें करतील. वर्गीकरण कसें हि केलें तरी तात्पर्यांत फरक नाहीं. वासनामय कोश आहेच आहे. प्राचीनांनीं तर कमालच केली आहे. निर्वासन होणाच्या आकांक्षेला हि त्यांनीं वासनाच मानलें आहे. तिला त्यांनी पुरुषार्थ, परम पुरुषार्थ असें भव्य नांव दिलें आहे इतकेंच. हें जें वासनेचें आकाशवत् सर्व व्यापकत्व तोच कामदेव होय. म्हणजे काम हा मूलतः आत्मभिन्न पण छायावत् आत्मज नि आत्मानुगत भार आहे. ''कामस् तदग्रे समवर्तनाधि। मनसो रेतः प्रथमं यद् आसीत्'' अशा शब्दांत त्याचें वर्णन वेदांत केलें गेलें आहे. विश्व-सृष्टि करणारा जो पहिला देव निर्माण झाला तो हा प्रजापति कामदेव होय. हा कामदेव आत्मदेवाचा आत्मज आहे. त्यामुळें तो आत्मा आणि जीव यांच्या मध्यें अंतरपाट झाला आहे. तो दूर झाला म्हणजे जिवाशिवांचें लग्न होतें. याला ओळखायचें आहे. त्याची ओळख होणें म्हणजे त्याच्या कचाट्यांतून सुटणें, सुटका होणें. त्याला ओळखतांच तो चोरासारखा पलायन करतो. भगवान् बुद्धानें याला ओळखलें तेव्हां त्यांना साक्षात्कार झाला आणि ते म्हणाले:

**अनेक जन्म-संसार आलों धावत सारखा।**
**गृहकारक शोधीत, दुःख हें जन्मजन्मणें।।**
**देखिला गेहकारा तूं करिशी न पुनः घर।**
**भंगले सगळे वांसे तुझें आढें हि मोडलें।**
**निर्वाणगत चित्तानें तृष्णांचा क्षय गांठिला।।**

जीवाचें कारागार निर्मिणाऱ्या या माराला ओळखलें कीं तो मरतो. त्याचें कारागार जमीन दोस्त होतें आणि जीव निजधामास जातो. अशा या माराला देव कां म्हटलें? 'आत्मा वै पुत्रनामासि' म्हणून, तो आत्मज आहे म्हणून.

## ६५२. कामपाल

काम हा आत्मज भाव असल्यामुळें परमात्मा हा उघडच कामपाल झाला. काम हा इष्ट असो अनिष्ट असो, तो कोणाला टळत नाहीं. कारण तो प्रकृतिगत आहे. त्याचें स्वरूप शुद्ध आणि शुद्धतर करीत जाणें एवढेंच माणसाला करणें शक्य आहे. पण त्याला अजिबात नाहींसा करणें कसें शक्य आहे? कारण सर्वांचा प्रभव आत्मा आहे. आणि तो तर नित्य आहे. त्यामुळें आत्यन्तिक नाश कोणत्याच वस्तूचा संभवत नाहीं. तो काम वा अन्य कोणता हि भाव शुद्ध सूक्ष्म आणि व्यापक होत होत अखेर आत्मरूप होऊन जातो. आत्म्याचें जें हें सर्वाश्रयत्व तेंच त्याचें पालकत्व होय. आणि त्या अर्थानें तो कामपाल म्हटला आहे.

कामापासूनच ही सर्व सृष्टि होत असल्यामुळें त्या प्रजापतिकामाचा आश्रय म्हणून तो परमात्मा विशेषतः कामपाल म्हटला आहे. ''ब्रह्मा देवानां प्रथम: संबभूव। विश्वस्य कर्ता भुवनस्य गोप्ता।'' हा जो आदि प्रजापति ब्रह्मा तोच कामदेव असून त्याचा जनिता आणि पालक तो परमात्मा आहे. म्हणून त्याला कामपाल म्हटलें आहे. कामपाल म्हटल्यानंतर कामसृष्ट विश्वाचा हि तो पालक आहे हें नव्यानें सांगण्याची गरजच राहत नाहीं. या हि अभिप्रायानें तो कामपाल म्हटला आहे. या ठिकाणीं काम शब्द जो आला आहे तो मूल सूक्ष्मतम अर्थाचा आहे. मदन वा मैथुनेच्छा या अति स्थूल आणि ग्राम्य अर्थाचा तो नाहीं. भगवान् विष्णु परमात्म्याची पालनी कला म्हणून तो कामपाल म्हटला अथवा रुद्र संहारिणी कला म्हणून तो काम-हा म्हटला तरी त्यांत स्थूल अर्थ नाहीं. त्याचा आशय आध्यात्मिक आणि पारमार्थिक आहे. इथें सहस्रांत तोच अभिप्रेत आहे. आणि म्हणून कामपाल आणि कामहा हीं दोन्हीं हि पदें इथें आलीं आहेत.

### ६५३. कामी

कामी म्हणजे कामवान् विषयैषी. कामदेव म्हणजे कामात्मा, कामपाल म्हणजे कामाश्रय आणि कामी म्हणजे कामक्रियावान् हीं तीन पदें बीज-शक्ति-कीलकसूचक आहेत. तिन्ही मिळून वस्तु संपूर्ण होते. आधीं बीज पाहिजे. त्या बीजांत अंकुरण्याची शक्ति असतेच. पण ती सुप्त असते. ती सक्रिय व्हायला पाहिजे. ही सक्रियता म्हणजेच प्रेरणाशक्ति होय. आणि ती प्रेरणा सफल झाली, कृतार्थ झाली म्हणजे तिला म्हणायचें कीलक. इथें म्हणजे कीलकरूप फलदर्शनांत बीजाचें आणि प्रेरणेचें कार्य संपतें असें नव्हे. ही एक आवृत्ति झाली. बीजगत सर्व शक्ति नि:शेष रिक्त होईपर्यंत अशा अनेक आवृत्त्या होतच राहतात. आणि तेव्हांच बीजाचें व प्रेरणेचें कार्य संपतें. परमात्मा हा कामाचें बीज आहे. कामप्रेरणा हि तोच आहे आणि कामभोगसंपन्न हि तोच आहे. हें विश्व म्हणजे भोग्यजात आहे. तें जीवमात्राच्या रूपानें परमात्मा भोगून राहिला आहे. तो हें विश्व विषयीभूत करीत आहे. आणि म्हणून हि तो कामी म्हणावयाचा. काम शब्द संस्कृतांत तीन अर्थांनीं येतो (१) मूल मनोभाव वा वृत्ति या अर्थानें हा प्राय: एकवचनी येतो. उदाहरणार्थ–काम एष क्रोध एष''. कामं क्रोधंच संश्रिता:'' इत्यादि. (२) आंतरिक वासना या अर्थानें. या अर्थी हा प्राय: बहुवचनी येतो आणि त्या सोबत त्यागणें क्रियापदाची अपेक्षा असते. उदाहरणार्थ (१) प्रजहाति यदा कामान् सर्वान् पार्थ मनोगतान् (२) विहाय कामान् य: सर्वान् (३) संकल्पप्रभवान् कामान् त्यक्त्वा सर्वान् अशेषत:'' इत्यादि. (४) बाह्य भोग्य पदार्थ या अर्थानें. या अर्थी हि हा प्राय: बहुवचनी आणि इच्छिणें, घेणें, भोगणें या क्रियापदांची अपेक्षा राखणारा असतो. उदाहरणार्थ– (१) लभतेच तत: कामान् मयैव विहितान् हि तान् (२) तद्वत् कामा यं प्रविशन्ति सर्वे (३) कामैस् तैस् तैर् हृतज्ञाना: प्रपद्यन्तेऽन्यदेवता:'' इत्यादि. इथें इन्नन्त पद तद्युक्त या अर्थानें आलें असल्यामुळें कामी म्हणजे भोग्यजातसंपन्न असा अर्थ घ्यावयाचा, भोगाभिलाषी असा नव्हे.

### ६५४. कान्त

शम् पासून शान्त तसें कम् पासून कान्त पद आलें आहे. कान्त म्हणजे कमनीय, सुंदर, प्रिय. परमात्मा हा नितान्त कान्त आहे. परम सुंदर आहे. स्त्रीला पुरुष कान्त वाटतो, पुरुषाला स्त्री कान्ता वाटते. वस्तुत: कान्तत्व न स्त्री ना पुरुष असें तें आत्मरूप आहे. आणि त्यालाच इथें कान्त म्हटलें आहे. पण ही प्रतीति अज्ञ जीवाला होत नाहीं. त्याला वाटतें, तें जें स्त्रीरूप वा पुरुषरूप आहे तेंच कान्त होय. पण त्याची त्याची कान्ति रोग, जरा, मरण यांच्यायोगें क्षणोक्षणीं क्षीण व नष्ट होत असते, पण त्यामुळें कान्ता-

विषयींची प्रीति क्षीण होत नाहींच उलट वाढते आणि मरणाला पुरून उरते. अर्थात् या अव्याहित अजर अमर प्रीतीचा विषय असलेलें कान्त तत्त्व देहाहून भिन्न आहे हें उघड आहे. जाणून वा नेणून जीव त्यावरच प्रेम करीत असतो. म्हणून तो उपनिषदाचा ऋषि म्हणतो ''न वै अरे पत्युः कामाय पतिः प्रियो भवति आत्मनस्तु कामाय पतिः प्रियो भवति। न वै अरे जायायाः कामाय जाया प्रिया भवति, आत्मनस्तु कामाय जाया प्रिया भवति।'' इत्यादि. सारांश, परम सुंदर, परम प्रेमास्पद या विश्वांत जर कांहीं असेल तर तें परमात्मतत्त्वच होय. कारण तें कधींच दगा देत नाहीं. त्याची कान्ति कधींच काळवंडत नाहीं. स्त्री पुरुषांची अंगकांति अत्यंत दगाबाज आहे. ती व्याधिजरामरण यांनीं सदैव ग्रासलेलीच आहे. देहा इतकी बेभरंवशाची वस्तु दुसरी कोणती आहे? आणि त्याच्या इतकें दुःखदोषास्पद तरी दुसरें काय आहे? म्हणून परमात्मा हाच कान्त म्हणावयाचा.

कः ब्रह्मा, कल्पान्ते तस्य अन्तं करोति इति कान्तः। ही व्युत्पत्ति कृत्रिम आहे आणि अनावश्यक हि.

## ६५५. कृतागम (१)

कृताः आगमाः वेदशास्त्राणि येन सः कृतागमः। ज्यानें वेदशास्त्रें केलीं तो कृतागम म्हणावयाचा. सर्व ज्ञान चिद्वस्तूपासूनच संभवत असल्यामुळें तो चिन्मात्रमूर्ति परमात्मा कृतागम म्हटला आहे. आगम हे मानवी भाषेंत प्रकट झालेले असले तरी त्यांची मूळ प्रेरणा दैवी आहे आणि म्हणून ते ईश्वरी शब्द म्हटले जातात, अपौरुषेय मानले जातात. ज्या प्रमाणें मूल होते आईला पण तें बापाच्याच बीजाचें मानलें जातें. त्या प्रमाणें शास्त्रांची मानवी भाषा हि आईप्रमाणें होय आणि विचारबीज दैवी होय. म्हणून आगम अपौरुषेय आणि दैवी वा ईश्वरी मानिले गेले आहेत. सर्व धर्म आणि धर्मग्रंथ ईश्वरी आहेत. पण त्याच बरोबर मानवी भाषेंत आणि मानवी आचारांत प्रकट झाल्याकारणानें ते निर्दोष राहिले नाहींत. निर्दोष केवळ एक परमात्मा आहे आणि त्याच्या ठाईंच असलेलें धर्मज्ञान हि तसेंच निर्दोष आहे. आणि त्याचाच तो कर्ता आहे म्हणून तो कृतागम म्हणावयाचा.

वेद कुराण बायबल इत्यादि धर्मग्रंथ कांहीं अपौरुषेय नव्हत, ते पुरुषकृतच आहेत आणि त्यांत हीण मिसळलेलें आहे. त्यांतील निर्मल ज्ञानाचा मूल्यवान् धातुभाग शोधूनच घेतला पाहिजे. आपण तामस राजस आहार सोडून जसे सात्त्विक दूध फळें घेतों, केळें खातों तेव्हां हि साल काढून टाकतों आणि गर खातों. खाल्यावर हि आपलें आंतडें त्यांतील सार भाग घेतें आणि असार टाकून देतें अशी ही सारग्राही विश्लेषणप्रक्रिया जो निरंतर करीत राहतो तोच खरोखर कृतागम म्हणजे परिष्कृतागम म्हणावयाचा. चिन्मात्रमूर्ति परमात्मा सहजच परिष्कृतागम आहे. मानवाला परिश्रम पूर्वक तसें व्हावयाचें आहे. तो सतत ज्ञानाची चाळणी करीत राहिल्यास यथाकाळीं त्याला निखळ ज्ञान लाभेल आणि तो कृतागम होईल.

## ६५५. कृतागम (२)

कृतागम म्हणजे वेदशास्त्रकृत् अशा अर्थानें आपण तें पद पाहिलें. पण खरोखर इथें आगम पदानें वेदशास्त्र असा अभिप्राय घेण्याचें कारण नाहीं. वस्तुतः आगम पद निगम पदाच्या वेगळें आणि विरुद्ध म्हणून हि घेतलें जातें. ''निःशेषं गम्यते एभिः इति निगमाः वेदाः'' अशी निगमपदाची व्युत्पत्ति आहे, तर ''आ किंचित् गम्यते एभिः इति आगमाः'' अशी आगमपदाची व्युत्पत्ति आहे. वेद आणि वेदानुसारी सारीं शास्त्रें प्रायः निगम म्हटलीं जातात. वेद हेच वस्तुतः निगम म्हणायचे, पण गौरवानें आणि तात्पर्यानें वेदानुसारी शास्त्रेंहि निगम पदांत अन्तर्भूत होतात. पण आगम

हे विशेषत: वेद प्रमाण न मानणाऱ्या संप्रदायांचे धर्मग्रंथ होत. जैन आणि बौद्ध संप्रदायांच्या प्रमाण ग्रंथांना जैनागम बौद्धागम म्हटलें जातें. इथें कृतागम पदानें सुचविलें आहे कीं तो परमात्मा केवळ वेदच नव्हे तर जैन बौद्ध ईसाई महंमदी इत्यादि संप्रदायांच्या धर्मशास्त्रांचा हि कर्ता आहे. जगांत जेवढे म्हणून धर्म-ग्रंथ आहेत आस्तिक नास्तिक अज्ञेयवादी एकेश्वरवादी अनेकदेवतोपासक आणि असलेच इतर त्या सर्वांचें मूळ तो परमात्मा आहे. म्हणून स्वधर्मनिष्ठानें इतर निष्ठांचा निषेध निन्दा निरादर न करतां त्यांच्या योगें स्वधर्मनिष्ठेचें उपबृंहण करावें. स्वधर्म हा परिशुद्ध आणि परिपूर्ण आहे, त्यांत जे दोष आढळतील ते बाहेरचे आहेत, इतरत्र जे गुण आढळतील ते मूळ स्वधर्माचेच अंगभूत आहेत असें लक्षांत घेऊन दोषांचें वर्जन आणि गुणांचें अर्जन करीत चलावें. या योगें अधर्म-विधर्मांचा छेद उडून स्वधर्म नि धर्म दृढावेल. नीष्ठा डोळस व प्रवाही होईल, खोल होईल. तिचें डबकें होणार नाहीं.

## ६५६. अनिर्देश्य-वपु

अनिर्देश्यं एव वपु: यस्य स: अनिर्देश्यवपु:। जें हें म्हणून कोणाला दाखवतां येत नाहीं तें अनिर्देश्य म्हणावयाचें. तें अनिर्देश्यच वपु म्हणजे शरीर वा मूर्ति आहे ज्याची तो अनिर्देश्यवपु म्हणावयाचा. परमात्मा हा असा अनिर्देश्यवपु आहे. हा पहा परमात्मा म्हणून कधीं कोणाला दाखवतां आलेला नाहीं. जें कांहीं दाखवलें जाईल तें 'हें' होईल 'तें' होणार नाहीं. परमात्मा हें नाहीं तें आहे. आणि 'तत् त्वं असि' या महावाक्यांत जीव हि वस्तुत: तेंच आहे हें अभिज्ञान करून दिलें आहे. पण जगांत तर कोणी रामकृष्ण कोणा विवेकानंदाला मीं देव पाहिला आहे म्हणतात. हें कसें? कोणा नामदेवापाशीं प्रत्यक्ष देव येऊन दूध पितो हें कसें? हें वाच्यार्थानें सत्य नव्हे. त्याचा आशय इतकाच कीं त्यांना परमात्म्याची अपरोक्षानुभूति झाली. अतीन्द्रिय आणि स्वसंवेद्य अशा आत्मतत्त्वाचा साक्षात्कार झाला. यावेगळें जें कांहीं अज्ञजन-रोचनार्थ सांगितलें जातें आणि नसत्या चमत्कारांनीं पुराणादिक वाङ्मय भरून वाहतें आहे तें सारें भ्रामक आहे, हेंच अनिर्देश्यवपु हें पद सांगतें आहे. गीतेनें हेंच स्पष्ट केलें आहे.

''अव्यक्तं व्यक्तिमापन्नं मन्यन्ते मां अबुद्धय:। परं भावं अजानन्तो ममाव्ययमनुत्तमम्।'' अव्यक्त-स्वरूप परमात्म्याला व्यक्त मानणें, तो जन्मतो आणि लीला करतो म्हणणें, अबुद्धीचें आहे, मूर्खपणाचें आहे. उपासनेसाठीं त्या अव्यक्ताचें आम्ही ध्यान कल्पितों, त्याचें आवाहन करतों आणि विसर्जन हि करतों. पण तसें करतांना आम्ही हें विसरून चालणार नाहीं कीं तो परमात्मा तर अनिर्देश्यवपु आहे, अरूप आहे.

## ६५७. विष्णु

विश्वं वेवेष्टि व्याप्नोति इति विष्णु:। जो हें सर्व व्यापून राहिला आहे तो विष्णु. विष् ३ प आणि विश् ६ प या दोन्ही धातूंपासून हा शब्द व्युत्पादिला जातो. विष हें तत्काल सर्व शरीरांत पसरतें, व्याप्त होतें, म्हणून तें विष म्हटलें आहे. विष्णु हि विषवत् व्यापक आहे, केवल तो संजीवनौषधवत् संजीवक आहे इतकेंच. विष मारक आहे. तर विष्णु जीवक आहे. एखाद्याला सर्पदंश झाला तर सर्पविष वेगानें त्याच्या अंगांत पसरतें. तें हृदयापर्यंत पोंचण्यापूर्वीं आणि त्यायोगें हृदय नि:स्पंद होण्यापूर्वी जर दुसरें अतिवेगवान् संजीवन रक्तवाहिनींत सूचिप्रविष्ट केलें तर तें त्या विषाला मारून त्या पुरुषाला वांचवतें. म्हणून असलें हें व्याधिविनाशन हि विष्णु म्हणतां येईल. औषध हें रोगविषाहून अधिक वेगवान् आणि अधिक समर्थ असायला पाहिजे. विष्णु नाम हें तसें आहे. तें सर्व रोगांचें औषध आहे. कारण त्याच्या वेगाहून अधिक वेग आणि त्याच्या सामर्थ्याहून अधिक सामर्थ्य दुसऱ्या कशाचेंच संभवत नाहीं. त्याच्या वेगाचें सामर्थ्याचें नि व्याप्तीचें वर्णन ईशोपनिषत् असें

करते: ''तें एकलें न हालेचि मनाहूनि हि वेगवान्। न पवे इंद्रियांनीं तो तेणें पूर्वीचि गांठिलीं।। उगें चि धावत्या गात्रां टाकी मागें बसूनि तें। त्याच्या बळेंचि प्राणाचें सारें चलन चाललें।। तें चळे न चळे तेंचि तें समीप नि दूर तें। भरूनि सर्व तें राहे राहे वेष्टूनि सर्व तें।।'' इन्द्रियें प्राण आणि मन यांना क्रिया करावी लागते, पण तें चिद्रूप विष्णुतत्त्व अक्रिय आहे. कांहीं न करतांच तें सर्वत्र नि सर्व आहे. त्यामुळें त्याची बरोबरी दुसरें कांहीं हि करूं शकणें संभवनीय नाहीं. त्यामुळें म्हणतात ''अकालमृत्युहरणं सर्वव्याधि-विनाशनम्। विष्णुपादोदकं तीर्थं जठरे धारयाम्यहम्।।'' ज्यानें हें आत्मतत्त्वामृत घेतलें त्याला देह नि देहानुगत आधि व्याधि उपाधि कसे बाधणार? प्रकाशाला अंधार भिववूं शकत नाहीं. अमृत प्यालेला पुरुष जसा मरणाला भीत नाहीं तसा आत्मज्ञान झालेला पुरुष देहाच्या योगाला वा वियोगाला भीत नाहीं. कारण तो सर्व स्थितींत तुल्यार्थदर्शी असतो. हें सर्वत्र दर्शनच वैष्णव धर्म होय.

## ६५८. वीर

वीरपद सहस्रांत अनेकदा आलें आहे. शिवाय वीर-हा पदांत हि तें आलें आहे. धीर पदाची व्याख्या ''विकारहेतौ सति विक्रियन्ते येषां न चेतांसि त एव धीराः'' अशी केली जाते. अर्थात् ज्यांच्या बुद्धींत ज्ञान प्रकाशित झालें आहे आणि त्याचा प्रकाश इंद्रियद्वारा आचरणांत फांकत आहे, ते धीर होत. म्हणजे ज्यांना कळतें आणि वळतें हि ते धीर होत. त्याप्रमाणें संग्रामांत जो मनांतून निःशंक आणि जिवावर उदार होऊन पराक्रमाची पराकाष्ठा करणारा अनिवर्ती योद्धा तो वीर होय. म्हणजे ज्याच्या अंतरांत निर्भयता असून ती ज्याच्या व्यवहारांत प्रकर्षानें प्रकटते तो वीर होय. मृत्यु म्हणजे देहपात हा सर्वांत कठिण प्रसंग मानला आहे. त्याप्रसंगीं ''बिरुदाचे दादुले हिंवताती'' मोठ्या मोठ्यांची पांचावर धारण बसते. त्या वेळीं हि ज्याची बुद्धि निष्कंप राहते तो साक्रेटिसासारखा पुरुष स्थितप्रज्ञ होय, धीर होय. ही धीरता समाधि घेतांना परी-क्षिली जाते. तशीच रणांगणांत जिवावर उदार होऊन लढतां लढतां देह ठेवतांना जी परीक्षिली जाते ती वीरता होय. हे दोघे हि, धीर नि वीर, सूर्यमंडल, भेदी म्हणून समान गौरविले आहेत: ''द्वौ एव पुरुषौ लोके सूर्यमण्डल-भेदिनौ। परिव्राड् योगयुक्तश्च रणे चाभिमुखो हतः।।'' ब्राह्मणानें धीर आणि क्षत्रियानें वीर असणें हें परम श्रेयस्कर होय आणि समान गौरवास्पद होय. याचें वास्तविक तात्पर्य हें आहे कीं प्रत्येक आत्यन्तिक त्याग हा समान गौरवास्पद आहे. वर्णाश्रमधर्माचें हें रहस्य आहे. ब्राह्मण क्षत्रिय वैश्य आणि शूद्र हे आपआपलें कर्तव्य सर्वस्वाचा त्याग करून पार पाडतील तर ते सर्व मोक्षाचे म्हणजे परम श्रेयाचे समान अधिकारी होतील. स्वकर्तव्य पार पाडतांना जो देह म्हणजे जीवित समर्पून मोकळा होतो त्याहून अधिक कोणी कांहीं करूं शकत नाहीं असे वैश्य स्त्री शूद्र हि ब्राह्मणक्षत्रियांइतकेंच सूर्य मंडळभेदी होत. ही आत्यंतिक स्वधर्मनिष्ठाच मोक्ष-दायिनी आहे. आणि म्हणूनच म्हटलें आहे स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः।''

## ६५९. अनन्त

नास्ति अन्तः देशतः कालतः वस्तुतश्च यस्य सः अनन्तः। ज्याला देशतः कालतः आणि वस्तुतः हि अन्त नाहीं तो अनन्त होय. हें विश्व देश-काल-द्रव्यात्मक त्रिविध आहे. आणि तें सान्त आहे. याहून सर्वथा भिन्न तें अनन्त म्हणावयाचें. कल्पान्तीं पंचभूतात्मक द्रव्य आणि देश व काल सर्व निर्गुण ब्रह्माच्या ठाईं विलीन होतात. त्यानंतर निरुपाधि निराकार अव्यक्त आणि निर्गुण असें जें अचिंत्य तत्त्व उरतें म्हणजे शेष राहतें तेंच अनन्त होय. त्याचा केव्हां हि अन्त होत नाहीं आणि त्याला अगुणत्वामुळें कुठली हि सीमा, मर्यादा, अन्त हि

संभवत नाहीं त्यामुळें हि तें अनन्त होय. कोठला हि द्रव्याणु घेतला म्हणजे त्याच्या पाठीमागें देश आणि काल लागतात. अणु म्हटला म्हणजे त्याला आकार आला अर्थात् तिथें पूर्वपश्चिम दक्षिणोत्तर अधरोर्ध्व आणि अवान्तर दिशा आल्याच. त्याच बरोबर हा विशिष्ट अणु या क्षणीं आहे, यापूर्वीं तो नव्हता, यानंतर तो नाहींसा होणार, ही भाषा हि आलीच. म्हणजे काल तत्त्व तिथें दाखल झालें. परंतु जिथें द्रव्याणुच नाहीं तिथें गुण, क्रिया, देश, काल कांहींच संभवत नाहीं आणि असें निर्गुण तत्त्वच अनन्त पदवीस पात्र आहे. अन्यत् सर्व सान्त होय. या अनन्ताची सगुण मूर्ति उपासनेसाठीं कल्पिली ती हि "अनन्तश्चास्मि नागानाम्" म्हणून अनन्त म्हटली गेली. याच्या आधारावर विश्व आणि विश्वात्मा पहुडला आहे, विराजमान आहे. हें सत्य कविजन आपल्या आवडीप्रमाणें नाना प्रकारें वर्णितात. "एकं सत् विप्रा बहुधा वदन्ति" या वेदवचनांत हाच आशय प्रकट झाला आहे. हें अनन्त तत्त्व जड नसून चेतन आहे म्हणून त्याला 'न अग' नाग म्हटलें आहे. हें स्वप्न जाग्रत् सुषुप्त अवस्थांचें नित्य साक्षी आहे म्हणून हि तें नाग होय. नागाचे डोळे पक्ष्मरहित अनिमेष असतात. नागाची चाहूल लागत नाहीं. हें तत्त्वहि तसेंच अविज्ञातगति आहे. नाग आपल्या अपत्याला खाऊन टाकतो. तसें हें तत्त्व विश्वाला गिळून टाकतें. इत्यादि भाव लक्षून अनन्ताला नाग कल्पिलें आहे. या कविकल्पनेंत दर्शन आहे. अनन्ताची कल्पना अनन्ताची बरोबरी करूं शकत नाहीं. म्हणून त्या कल्पिताला चतुर्दशी दिली. पंचदशी म्हणजे पौर्णिमा त्या अचिन्त्य अनन्ताची होय. या अनन्ताच्या नागफण्यांत आणि चतुर्दशी तिथि कल्पनेंत दर्शनाइतकेंच काव्य हि भरलें आहे. किंबहुना दर्शन आहे म्हणूनच काव्य आहे.

### ६६०. धनंजय

धनं जयति इति धनंजयः। जो धन जिंकतो तो धनंजय म्हणावयाचा. जिंकणें धातूवरून युद्ध वा द्यूत यांत धन जिंकणारा असा अर्थ निष्पन्न होतो. म्हणजे जो बलसामर्थ्यानें वा बुद्धिसामर्थ्यानें दुसऱ्याला द्वंद्वांत परास्त करून त्याचें धन जिंकतो तो धनंजय. जो धोपट मार्गानें मेहनत मजुरी करून, कलाकौशल्याचीं कामें करून, व्यापार उदीम् करून वा कारखानदारी करून धनोपार्जन करतो तो कांहीं धनंजय नव्हे. तो वैश्य, तो शूद्र होय. तो धन उत्पन्न करणारा आहे, जिंकणारा नव्हे. ब्राह्मण हि धनंजय नव्हे. तो भिक्षुक आहे. तो निरीच्छ राहून विद्याध्यन आणि तप करीत राहतो. उरला एक क्षत्रिय तोच धनंजय. तो धनाचें उत्पादन हि करीत नाहीं किंवा तें मागत हि नाहीं. आपल्या बाहुबलानें वा बुद्धिबलानें तें तो दुसऱ्या पासून जिंकून घेतो. आणि हें गौरवास्पद मानलें आहे. मेहनत मजुरी करणें हीन, भीक मागणें लाजीरवाणें, मग धनोपार्जनाचा एकच मार्ग उरतो आणि तो म्हणजे अपहार. चोर डाकू तो धनापहार रात्रीं चोरून लपून करतात, क्षत्रिय दिवसां ढवळ्या राजरोस एकमेकांशीं भांडून करतात. ज्याच्या मनगटांत आणि मेंदूत अधिक बळ असेल त्यानें दुसऱ्याला पराभूत करून धनापहार करावा. त्याचेंच नांव धनंजयत्व. महाभारत काळीं अर्जुन हा एकवीर मानला जात होता. म्हणून तो धनंजय. भारतीय युद्ध हि त्यानें च जिंकलें. म्हणूनच तो "पाण्डवानां धनंजयः" म्हणून भगवद्विभूति गणला गेला. आतां महाभारत काळापेक्षां मानवसमाज प्रगत झाला आहे. आणि हें धनंजयत्व आतां गौरवास्पद न रहतां रौरवास्पद झालें आहे. टोजो हिटलर यांनीं हा रौरव गांठला. आतां सर्वोदयाचा उदय झाला आहे. आणि ऐतखाऊ लोकांना धनंजय म्हणून गौरविलें जाणार नाहीं. जो यथाशक्ति काम करील आणि यज्ञशेष भक्षील तोच धनंजय.

### ६६१. ब्रह्मण्य

हा ७१ वा श्लोक संपूर्णच ब्रह्मपर आहे, ब्रह्माचा पाढा आहे. प्रिय जनाचें नांव आलें म्हणजे जसें त्याच्या

प्रेमाचें भरतें येऊन प्रेमी त्याच्या विषयीं अनावर बोलत सुटतो तसें इथें सहस्राला झालें आहे. ब्रह्म हें त्याचें परब्रह्म आहे. त्याचें दैवत आहे. याहून मोठें परायण दुसरें नाहीं, याहून मोठें दुसरें दैवत नाहीं. म्हणूनच प्रास्तविक भागांत आलें आहे– ''परमं यो महद् ब्रह्म परमं यः परायणम्'' इत्यादि. या ब्रह्माच्या प्रेमापाई वेद अक्षरशः घोष करीत आहेत, शिवसनकादिक मौन सेवीत आहेत, संत जय जय करीत आहेत आणि सारें विश्व कळत नकळत आपल्या सर्व क्रियाकलापासह त्यांत प्रविष्ट होत आहे. सर्वांच्या सर्व प्रवृत्ति आणि निवृत्ति हि त्यांतच समाविष्ट होत आहेत. गीतेंत यथार्थच म्हटलें आहे:

**यथा नदीनां बहवोऽम्बुवेगाः**
**समुद्रमेवाभिमुखा द्रवन्ति।**
**तथा तवामी नरलोकवीरा**
**विशन्ति वक्त्राण्यभिविज्वलन्ति।।**

या श्लोकांतील नरलोक-वीराः या पदा ऐवजीं मी म्हणेन विश्वाची सगळी प्रवृत्ति. आणि ही प्रवृत्ति सगळी असल्यामुळें त्यांतच त्याची निवृत्ति हि येऊन जाते. असें जें हें सर्वंकष ब्रह्म त्याचा जो हितकर्ता, उपासक तो ब्रह्मण्य होय. परमात्मा हा पहिला ब्रह्मण्य आहे. कारण तो चिद्रूप आहे. चित्तत्त्वच जाणूं शकतें, केव्हां हि अचित् नाहीं. म्हणून स्वतः ब्रह्मच ब्रह्मण्य म्हणजे ब्रह्मोपासक म्हटलें आहे. तें जें अक्षर पर ब्रह्म त्याच्या उपासनेनें ज्यांनीं आपलें संपूर्ण जीवन ब्रह्ममय करून टाकलें आहे ते लोक हि गौरवानें आणि तात्पर्यानें ब्रह्म म्हटले जातात. अशा ब्रह्ममूर्ति ब्राह्मणांचे जे उपासक ते हि ब्रह्मण्य होत. भगवान् कृष्ण असे ब्रह्मण्य होते. शिवाजी महाराज ब्रह्मण्य होते. सर्वांनीं असें ब्रह्मण्य व्हावयाचें आहे. ब्रह्माधिगमाचा तो सोपा उपाय आहे. असे सगुणोपासक देवाला फार आवडतात. पुत्राहून पौत्र अधिक प्रिय असतो त्या न्यायानें.

## ६६२. ब्रह्मकृत्

ब्रह्म करोति इति ब्रह्मकृत्. जो ब्रह्म म्हणजे ब्रह्मस्तोत्र, वेदमन्त्र करतो तो ब्रह्मकृत् म्हणावयाचा. जो ब्रह्माचें परमत्व जाणतो तो ब्रह्माची स्तुति करणार नाहीं तर काय करील? तें त्याला अपरिहार्य आहे. पण वेदमंत्रांच्या ऋषींना तर द्रष्टे म्हटलें जातें, कर्ते नव्हे? बरोबरच आहे तें. कारण, कर्तृत्व सगळें प्रकृतीचें आहे आणि ऋषि तर आत्मरूप झालेले. त्यांच्या ठाईं कर्तृत्व कसें असणार? म्हणून त्यांना मंत्रकर्ते न म्हणतां मंत्रद्रष्टे म्हटलें जातें. शिवाय, कवि काव्य करतो त्यांत आपण ज्याची प्रशंसा करतो ती त्याची प्रतिभा वा दर्शनच असतें, त्याची शब्दरचना नव्हे. शब्दाकार तर त्याच्या त्या प्रतिभेनें वा दर्शनानेंच धारण केलेला असतो. म्हणून कवीला द्रष्टा म्हणण्यांत त्याचा खरा गौरव आहे, कर्ता म्हणण्यांत नव्हे. कर्ता म्हणण्यांत खरोखर त्याचा अवमान आहे. जेव्हां कवि कलाकार गायक तन्मय होऊन काव्य कलाकृति गायन करतो तेव्हां ते परम सुंदर होतें. आणि हें आपण केलें असें त्याला वाटत नाहीं तें आपल्या हातून झालें असें तो म्हणतो. कसें झालें हें त्याला कळतच नाहीं. ही जी अहंमुक्ति, कर्तृत्वमुक्ति तेंच ब्रह्म आहे. तीच महान् कला आहे. आणि तिचा कर्ता तो परमात्मा आहे. सर्वांत मोठें काव्य सर्वांत मोठें चित्र वा शिल्प, सर्वांत मोठें गायन म्हणजे हें विश्व आहे. तें गुणानें आणि परिमाणानें हि सर्वांत मोठें म्हणून ब्रह्म होय आणि त्याचा कर्ता तो ब्रह्मकृत्. अक्षर ब्रह्म हें कारण होय. तें स्वयंभू आहे. त्याचा कर्ता कोणी संभवत नाहीं. परंतु शब्दब्रह्म वेद वा कार्यब्रह्म हें विश्व कृतच असूं शकतें. आणि त्याचा कर्ताहि कोणी असलाच पाहिजे. आणि तो सर्वशक्तिमान् आणि सर्वज्ञच असला पाहिजे, हें उघडच आहे. अर्थात् तो कोणी सामान्य जीव संभवत नाहीं म्हणून तो परमात्माच कर्ता आहे या शब्द-ब्रह्माचा नि कार्यब्रह्म विश्वाचा. त्याचाच उल्लेख पुढील पद ब्रह्मा म्हणून करतें.

## ६६३. ब्रह्मा

ब्रह्मा म्हणजे ब्रह्मदेव. या समस्त सृष्टीचा शब्दसृष्टीचा नि भूतसृष्टीचा तोच कर्ता होय. 'ब्रह्मकृत् ब्रह्मा' हें वाक्य तो अर्थ व्यक्त करीत आहे. सृष्टींतील प्रत्येक पद सापेक्ष आहे. या सापेक्षतेला अनुसरून तें ब्रह्म सर्वकारण म्हणून ब्रह्मा म्हटलें गेलें. वस्तुत: तें कारण हि नाहीं. तें आहे केवल. त्याच्या बाबत कोणता हि शब्द आपल्या सापेक्षतेमुळें यथार्थाक्षर होऊं शकत नाहीं, तोकडा पडतो. तथापि या कार्यब्रह्माच्या अपेक्षेनें त्याला संबोधावयाचें म्हणजे त्याला कारण म्हटलें पाहिजे. आणि तो सर्वकारण-भावच इथें ब्रह्मा म्हणून म्हटला आहे. म्हटलेंच आहे ''ब्रह्मा देवानां प्रथम: संबभूव, विश्वस्य कर्ता भुवनस्य गोप्ता। स ब्रह्मविद्यां सर्वविद्याप्रतिष्ठां, अर्थर्वाय ज्येष्ठपुत्राय प्राह।।'' तो आदिदेव ब्रह्मा झाला आणि त्यानें हें विश्व निर्मिलें आणि त्याच्या मार्गदर्शनासाठीं त्याला वेद उपदेशिले आणि जीवनासाठीं यज्ञाची योजना केली. असें त्याचें कर्म अन्यून परिपूर्ण आहे. गीतेंत हि याचा उल्लेख आहे:

(१) ''सहयज्ञा: प्रजा: सृष्ट्वा पुरोवाच प्रजापति:। अनेन प्रसविष्यध्वम् एष वो ऽस्त्विष्टकामधुक्।। (२) ''ब्राह्मणास् तेन वेदाश्च यज्ञाश्च विहिता: पुरा।'' इथें ब्राह्मणा: म्हणजे ब्राह्मणादि चतुर्वर्णात्मक समस्त प्रजा असा आशय. त्याच प्रमाणें यज्ञ म्हणजे नुसतें हवन नव्हे तर यज्ञादि वर्णाश्रमधर्म होय. विश्वाभिमानी विश्वकर्ता या नात्यानें परमात्मा ब्रह्मा तर अकर्ता या नात्यानें तोच ब्रह्म होय. ''चातुर्वर्ण्यं मया सृष्टं गुणकर्म-विभागश:। तस्य कर्तारमपि मां विध्यकर्तारमव्ययम्।। या गीतेच्या श्लोकाचा हाच आशय आहे.

## ६६४. ब्रह्म

ब्रह्मा हें अर्वाचीन पद आहे. तर ब्रह्म हें प्राचीन पद आहे. अभिमानमूलक कर्तृत्व भोक्तृत्व जिथें संभवत नाहीं तें निर्गुण निराकार पद प्राचीन म्हणजे मूळ होय. सगुण साकार हें अर्वाचीन म्हणजे मागाहूनचें आहे, बुंधा शाखा पत्र पुष्प फल इत्यादि रूप आहे. पण ज्या प्रमाणें जिथें मूळ तिथेंच बाह्य शाखा पत्र पुष्प फलादि वृक्ष-विस्तार संभवतो आणि जिथें तो विस्तार आहे तिथें वृक्षमूल हि असलेंच पाहिजे, त्याप्रमाणें सगुण निर्गुण हीं नित्यसंश्लिष्ट आहेत, एकवटलीं आहेत. जिथें दार्शनिक तत्त्वविचार कर्तव्य असतो तिथें तें ब्रह्म म्हणजे अक्षर ब्रह्म समजावयाचें. जिथें व्यावहारिक धर्मविचार म्हणजे लोकजीवनाचा विचार कर्तव्य असतो तिथें ब्रह्म म्हणजे सगुण समजावयाचें. तोच ब्रह्मा, तोच ईश्वर. तो गुणकर्म- विभागश: सर्व जीवांचें नियंत्रण करीत असतो. त्यानें दिलेला आदेश म्हणजे हि ब्रह्म होय. त्यालाच वेद म्हणतात. त्यानें लावून दिलेला आचार हि ब्रह्म होय. त्यालाच (यज्ञादि वर्णाश्रम) धर्म म्हणतात. अशा प्रकारें ब्रह्म पद हें अनेक अर्थांनीं येतें पण तें असा विवेक करून घेतलें असतां परस्परविरुद्ध वा व्यामिश्र न राहतां विविध पण अविरुद्ध व सुसंगत असेंच असल्याचें दिसून येईल. जीव देहसापेक्ष असल्यामुळें त्याला सगुणाचा विचार टाळतां येत नाहीं. आणि अन्तिम तत्त्व निर्गुणच असूं शकतें म्हणून तें त्याला विसरतां येत नाहीं. यामुळें सगुण-निर्गुणाची जोडी ही सदैव सर्वत्र असावयाचीच. इथें हि ती तशी आढळते ब्रह्मा ब्रह्म म्हणून.

## ६६५. ब्रह्म-विवर्धन

अक्षर ब्रह्म ज्ञेय आहे, शब्दब्रह्म अध्येतव्य आहे, यज्ञब्रह्म आचरणीय आहे, जगद् ब्रह्म सेव्य आहे. पण विवर्धनीय ब्रह्म कोणतें? विवर्धनीय ब्रह्म आहे तप. जसजसें तप करावें तसतसें ब्रह्म वाढतें. जसजसें सोनें तापवावें तसतसें हीण जळून खाक होतें आणि विशुद्ध सोनें प्रकट होतें. हें निखळ सोनें हस्तगत होणें म्हणजेच ब्रह्म वाढणें होय. वस्तुत: ब्रह्म वाढायची घटायची वस्तु नाहीं. तें कूटस्थ आहे. अर्थात् त्याची वाढ म्हणजे

साधकाच्या जीवनांत त्याच्यावरील पटलांची आवरणांची विक्षेपांची उत्तरोत्तर घट होय. सूर्य हा सदैव समानच प्रकाशमान आहे. परंतु जसजसा अंधार कमी होतो तसतसा सूर्य म्हणजे सूर्यप्रकाश वाढला असें म्हणावयाचें. तप हें तसें अज्ञानपटलाचें निवारण आहे. तें वाढवावें तितकें थोडें आहे. म्हणून ज्यांचा परमार्थनिश्चय झाला आहे ते ब्राह्मण सदैव तपः-स्वाध्याय-निरत राहतात. तपानें ते दोष क्षीण करीत जातात आणि स्वाध्यायानें ध्येयाचें आकलन करीत जातात. गन्तव्य गांठायचें म्हणजे आधीं गन्तव्याचा निश्चय झाला पाहिजे. स्वाध्यायानें तो होतो. पण गन्तव्य नुसतें अवगत झाल्यानेंच अधिगत होत नाहीं. त्यासाठीं अभिक्रम करावा लागतो. हा अभिक्रम म्हणजे गन्तव्याभिमुख प्रवासच तप होय. त्या स्वाध्यायपूर्वक तपाच्या योगें ब्रह्म अवगत आणि अधिगत होतें. म्हणून वेदाध्ययनाला आणि तपश्चर्येला मिळून ब्रह्मचर्य म्हटलें जातें. या ब्रह्मचर्याची वाढ म्हणजेच ब्रह्मविवर्धन होय. ब्रह्मचर्याचें उद्दिष्ट ज्या अर्थीं तें अक्षर ब्रह्मच आहे त्या अर्थीं त्या परमात्म्याला ब्रह्म-विवर्धन म्हणजे ब्रह्मचर्याची वृद्धि करणारा असें म्हटलें आहे. ''तपो ब्रह्म। तपसा ब्रह्म विजिज्ञासस्व।'' असें उपनिषद्वचन आहे. नैष्ठिक ब्रह्मचर्याच्या तपानें उत्तरोत्तर ब्रह्माचा शोध घ्यावा. या निरंतर शोधाचा प्रेरक म्हणून तो परमात्मा सहजच ब्रह्म-विवर्धन म्हटला आहे.

## ६६६. ब्रह्मविद्

ब्रह्म वेत्ति, विन्दते वा इति ब्रह्मविद्। जो ब्रह्म जाणतो वा मिळवतो तो ब्रह्मविद् म्हणावयाचा. ब्रह्माचें मुख्यतः तीन अर्थ होतील. (१) अक्षर ब्रह्म (२) वेद (३) तप. तपानें आत्मशुद्धि करून आणि वेदानें म्हणजे जपानें आत्मबुद्धि दृढ करून साधक अक्षर ब्रह्माला यथाकाळीं प्राप्त करून घेतो. इथें विद् म्हणजे जाणणें आणि विन्द् म्हणजे मिळवणें एक होऊन जातात. हीं दोन नाहींत. जसें खडी साखरेचा स्वाद जाणणें आणि चाखणें ह्या दोन क्रिया नाहींत त्याप्रमाणें. अतद्-व्यावृत्ति आणि तद्बुद्धि दोहों मिळून ब्रह्मलब्धिः अतद्-व्यावृत्तिपूर्वक तन्-निश्चय करावयाचा असतो. तो तपानें नि जपानें होतो. लक्ष्य-वेध करतांना धन्वी काय करतो? तो एकाग्र होतो. म्हणजे शून्याग्रता व अनेकाग्रता वर्ज्य करतो आणि लक्ष्यगत दृष्टीनें शरसंधान करून लक्ष्य-वेध करतो. ह्याला अनुलक्षून रूपकाच्या भाषेंत म्हटलें आहे : ''प्रणवो धनुः शरो ह्यात्मा ब्रह्म तल्लक्ष्यमुच्यते। अप्रमत्तेन वेद्धव्यं शरवत् तन्मयो भवेत्।'' ब्रह्मविद् हा अशा प्रकारें मोठा निशाणबाज आहे. क्षत्रियाच्या धनुर्विद्येहून ही ब्रह्मविद्या कमी पराक्रमाची अपेक्षा करीत नाहीं. पराक्रमाची पराकाष्ठा आहे ही. धनुर्विद्या-विशारद वीर म्हटला तर हा ब्रह्मविद्या-विशारद महावीर म्हटला जाईल. कारण ही अत्यन्त सूक्ष्म वस्तु आहे. साध्य साधन आणि साधक तिन्ही अन्त्यन्त सूक्ष्म आणि अन्तरङ्ग विषय आहेत. वस्तु जितकी स्थूल तितकी ती सोपी. उलट जितकी ती सूक्ष्म तितकी ती कठिण. म्हणून ब्रह्मविद् हा खरोखर परमवीर होय. इथें येरा गबाळाचें काम नाहीं. जातीचा हवा. तेंच पुढील पद ब्राह्मण म्हणून स्पष्ट करीत आहे.

## ६६७. ब्राह्मण

ब्रह्मण उपासकः ब्राह्मणः। ब्रह्माचा जो उपासक तो ब्राह्मण. ब्रह्म म्हणजे अक्षर ब्रह्म, वेद आणि तप या तिहींचा तो अनन्य पर्युपासक असतो. कांकीं तो त्याचा स्वभाव असतो. तो त्याचा जन्मसिद्ध अधिकार असतो. त्याचा जीवनमंत्र असतो. ''ब्राह्मणस्य हि देहो ऽयं क्षुद्रकामाय नेष्यते। कृच्छ्राय तपसे चेह प्रेत्यानन्तसुखाय च॥'' ''नायं देहो देहभाजां नृलोके कष्टान् कामान् अर्हते विड्भुजां ये। तपो दिव्यं पुत्रका येन सत्त्वं शुध्येत् यस्मात् ब्रह्म-सौख्यं त्वनन्तम्॥'' विष्ठेंतील कृमींना हि जे क्षणिक व दुःखपर्यवसायी

तुच्छ भोग मिळत असतात त्यांच्या प्राप्तीसाठीं माणसानें खटपट करणें हें माणुसकीला शोभणारें नाहीं. त्यानें दिव्य तप करून सत्त्वशुद्धि कमवावी आणि तद्द्वारा अनन्त ब्रह्मसौख्य मिळवावें हेंच योग्य होय. हेंच शोभिवंत होय. असा उत्तुंग ध्येयवाद ज्यानें अंगीकारिला तो ब्राह्मण म्हणावयाचा. आपल्या विषयीं हीन भावना करून आत्म्याची अवगणना करायची आणि मग आपल्याजोगा हीन आदर्श पत्करायचा हा महान् अपराध होय. हें अघोर महापातक होय. पृथग्जन हाच प्रमाद करतात आणि त्याची कटु फळें भोगीत राहतात. त्यांच्यातील ''स्वयंधीर पंडितंमन्यमान'' म्हणजे स्वत:च आपल्याला मोठे विद्वान् आणि पंडित म्हणवून घेणारे पण वस्तुत: मूढ लोक उपदेशीत असतात, ''उगाच सिंह-गर्जना करण्याचा प्रयत्न करूं नका. आपल्या बेताचा बें बें आवाज करा'' ''उगाच काळी चार मध्यें गाण्याचा प्रयत्न करूं नका. आपली काळी दोन पट्टीच बरी'' तात्पर्य–

**बिकट वाट वहिवाट नसावी, धोपट मार्गा सोडुं नको।**
**संसारामधिं ऐस आपुला उगाच भटकत फिरूं नको।**

असा त्यांचा उपदेश असतो. पण हा अवनतीचा मार्ग आहे. उन्नतीचा मार्ग वेगळा. तो ''उत्तिष्ठत जाग्रत प्राप्य वरान् निबोधत'' अशी ललकारी देतो. तो माणसाला ''तत् त्वं असि'' चा प्रत्यय आणून देतो. याहून माणसाला अधिक बलवान् करणारा विचार दुसरा नाहीं. आणि ब्राह्मण याच बळाचा उपासक असतो. तो याहून खालच्या पायरीवर राहूं इच्छीत नाहीं. त्यासाठीं ब्राह्मणाला किती हि कष्ट पडले तरी ते तो स्वेच्छेनें व मोठ्या आनंदानें झेलतो, पण हलकें पत्करीत नाहीं. ''मत्तेभेन्द्र-विभिन्न-कुम्भ-कवल- ग्रासैक-बद्धस्पृहः। किं जीर्णं तृणमत्ति मानमहतां अग्रेसर: केसरी।।'' ब्राह्मणाचा हा असा बाणा असतो आणि म्हणून ते या लोकांत अवतरलेलें ब्रह्मच होत, परमात्मस्वरूप होत.

## ६६८. ब्रह्मी

ब्रह्मैव स्वं यस्य सः ब्रह्मी। ब्रह्मच ज्याचें धन होय तो ब्रह्मी म्हणावयाचा. इन् प्रत्यय स्वामित्ववाचक आहे. त्यामुळें ब्रह्म हें स्व-म्हणजे धन झालें. कोणी धनाढ्य असतात, तसा ब्रह्मी हा ब्रह्माढ्य होय. ब्रह्म म्हणजे वेद आणि वेदार्थ दोन्ही. त्या उभयविध धनानें संपन्न झाला तो ब्रह्मी म्हणावयाचा. आधीं तो नुसता वेदाक्षरेंच घोकतो. मग त्यांचा सांगोपांग अर्थ हि समजून घेतो. अर्थ म्हणजे आधीं शब्दार्थ आणि मग पदार्थ हि. त्यासाठीं त्याला ब्रह्मचर्य म्हणजे गुरुकुलवास करावा लागतो आणि पुढें आजीवन गुर्वाज्ञेंत रहावें लागतें. असें तप म्हणजे भोगवर्जन करून तो वेदाध्ययन करीत राहतो तेव्हां त्याला ब्रह्मवर्चस् प्राप्त होतें. ब्रह्मवर्चस् म्हणजे निष्ठापूर्वक आजीवन निरंतर साधना करून संपादिलेला जो शुद्ध उच्चार, शुद्ध आचार, शुद्ध विचार रूप संस्कार, त्याच्या योगें आलेलें व्यक्तिमत्त्व वा अधिकार होय. श्रीमंत जसा आपल्या वैभवानें मिरवतो तसा हा ब्रह्मवर्चस्वी पुरुष आपल्या ब्रह्माच्या तेजानें तळपत असतो. हें ब्रह्मवर्चसच ब्रह्मस्व होय. हें ज्याच्या कमाईचें आहे, मालकीचें आहे तो ब्रह्मी म्हणावयाचा. धनी जसा धनाला जपत असतो तसा ब्रह्मी हा आपल्या ब्रह्माला जपत असतो. धनी आपल्या धनाचा ऱ्हास होणार नाहीं, त्याची वृद्धिच होत राहील यासाठीं सतत झटत असतो तसा हा ब्रह्मी आपल्या ब्रह्माची म्हणजे तपाची काळजी घेत राहतो. तो सतत त्याची वाढ करीत जातो. वेदी द्विवेदी त्रिवेदी चतुर्वेदी होतो. दशग्रंथी होतो. शतग्रंथी होतो, सर्वज्ञ होतो, ब्रह्मच होतो.

## ६६९. ब्रह्मज्ञ

ब्रह्मी हा मुख्यत: ग्रंथी होय, तर ब्रह्मज्ञ हा ग्रंथार्थज्ञ होय. ब्रह्मी म्हणजे शाब्द ब्रह्मांत निष्णात तर ब्रह्मज्ञ पर ब्रह्मांत निष्णात समजावयाचा. ''शाब्दे परे च

निष्णात'' तो आचार्य म्हणावयाचा. अलीकडे आचार्य शब्द फार सवंग झाला आहे. आणि त्या आचार्यावर पुन: प्राचार्य आहे! हा महान् शब्द-शक्तीचा अपमान आणि अपव्यय होय. एक: शब्द: सम्यग् ज्ञात: सम्यक् प्रयुक्त: स्वर्गे लोके कामधुक् भवति'' असें महर्षि म्हणतात. म्हणून नेमकेपणा पाहिजे. ''वागर्था नियता: सर्वे वाङ्मूला वाग्विनि:सृता:। तां तु य: स्तेनयेद् वाचं स सर्वस्तेयकृत् नर:'' जो शब्दांचा गैरवापर करतो तो चोर होय. नव्हे महाचोर होय. शब्दशक्तीचें हें महत्त्व ओळखून शब्दांचा नेमका आणि नेटका उपयोग करायला शिकणें परमावश्यक होय. ''सर्वं कर्माखिलं पार्थ ज्ञाने परिसमाप्यते'' या न्यायानें वेदाध्ययन- कर्माचें पर्यवसान हि ज्ञानांतच व्हायला पाहिजे. ब्रह्मी आणि ब्रह्मज्ञ ही जोडी हेंच सांगत आहे. तुम्ही ब्रह्मी म्हणजे वेदी चतुर्वेदी झालां, दशग्रंथी झालां आणि क्रम-जटा-घनान्त जरी पढलां तरी जोंवर आत्मज्ञान झालें नाहीं तोंवर तें कर्म व्यर्थ म्हणजे निष्फळच म्हणावें लागेल. याचा अर्थ तें वेदाध्ययन योग्य दिशेनें व्हायला पाहिजे. वेदानुवचन आणि यज्ञयागादि काम्य कर्मे आडवाट आहे, वेदान्त-विचार ही योग्य दिशा आहे. त्या दिशेनें तें झाल्यास सफल होऊन ब्रह्मी ब्रह्मज्ञ होतो. वस्तुत: आत्मज्ञानी हा न ब्रह्मी न ब्रह्मज्ञ होतो, तो तर ब्रह्मच होतो. ब्रह्मी म्हणजे ब्रह्माचीं वेदाचीं अक्षरें बाळगणारे आणि ब्रह्मज्ञ म्हणजे त्या वेदाचें तात्पर्य जाणणारे. पण आत्मज्ञ पुरुष वेदाच्या अक्षराचें ओझें बाळगत नाहीं वा त्याचा अर्थ इतिहास- भूगोलाच्या माहितीप्रमाणें जाणत नाहीं. तो तर तें ब्रह्मच आपण आहों असें अनुभवता होतो आणि अनुभवतां अनुभवतां अनुभवत आहों हें हि विसरून जातो. ही दशा ज्ञानदेव अशी वर्णितात:

''जाणोनियां नेणपण अंगीं बाणलें। नेणोनियां जाणपण सहज नेणवलें वो माये। आत्मज्ञानाची गति जाली निवान्त। प्रबोधतत्त्व मी पावलें वो माये।।''

### ६७०. ब्राह्मणप्रिय

ब्राह्मण-प्रिय हा समास तत्पुरुष आणि बहुव्रीहि दोन्ही घेतां येईल. ब्रह्म म्हणजे वेदस्वरूप परमात्मा ब्राह्मणांना प्रिय आहे म्हणून तो ब्राह्मण-प्रिय होय. उलट ब्राह्मण म्हणजे ब्रह्माचे उपासक ब्रह्माला, परमात्म्याला, प्रिय झाल्यास नवल काय? म्हणून हि तो ब्राह्मण-प्रिय म्हणावयाचा. इथें मुख्यत: बहुव्रीहि घ्यावयाचा. गीतेंत १२ व्या अध्यायांत सगुणोपासक व निर्गुणोपासक भक्तांच्या मार्गांची तुलना करून शेवटीं उभय भक्तांचीं

''अद्वेष्टा सर्वभूतानां मैत्र: करुण एव च।
निर्ममो निरहंकार: समदु:खसुख: क्षमी।''

इत्यादि लक्षणें दिलीं आहेत आणि आठव्या श्लोकांत उपसंहार करतांना म्हटलें आहे कीं हे असे भक्त भगवंताला अत्यंत प्रिय आहेत. 'भक्तास् ते ऽतीव मे प्रिया:' ब्राह्मण-प्रिय पद हि तोच आशय व्यक्त करीत आहे. ब्रह्माचे म्हणजे वेदाचे तसेच अक्षर ब्रह्माचे जे उपासक ब्राह्मण ते परमात्म्याला प्रिय होत. वेदाचेंच अध्ययन, वेदाचेंच अध्यापन, वेदोक्तच बोलणें, वेदोक्त च चालणें वेदानुसारच जातकर्म, वेदानुसारच मृतकर्म, असे जे केवळ वेदमय झाले, ब्रह्ममय झाले, त्या ब्राह्मणांहून श्रेष्ठ तर राहोच पण तत्तुल्य हि कोणी नाहीं असें भगवंत म्हणतात—

न ब्राह्मणैस् तुलये भूतमन्यत्
पश्यामि विप्रा: किमत: परं नु?

त्यामुळें ब्राह्मण भगवंताला अत्यंत प्रिय होत. उलट ब्रह्माहून पर या विश्वांत दुसरें कांहींच नाहीं असा ब्राह्मणांचा निश्चय आहे. म्हणून ब्राह्मण केवल ब्रह्मपरायण होऊन राहतात. अशा प्रकारें बहुव्रीहि व तत्पुरुष दोन्ही अर्थांनीं तो परमात्मा ब्राह्मणप्रिय आहे. अक्षर ब्रह्म निर्गुण आहे. शब्द ब्रह्म सगुण आहे. पण भौम ब्रह्म म्हणजे ब्राह्मण साकार आहे. त्याच्या मुखानेंच आम्हांला वेद आणि वेदार्थ कळावयाचा. म्हणून त्याहून श्रेष्ठ या विश्वांत खरोखर दुसरें कांहीं

नाहीं. म्हणून मी चंडिदासाच्या शब्दांत म्हणेन: "शुनो रे मानुष भाई। सबार उपरे मानुष सत्य। ताहार उपरे नाई" ब्राह्मण हा मनुष्याचा आदर्श आहे. एवढ्याच साठीं बुद्धदेवानें आपल्या धर्मपदांत शेवटचा वर्ग ब्राह्मणवर्ग केला आहे.

### ६७१. महाक्रम

मागील ७१ व्या श्लोकांत ब्रह्माचा पाढा होता. या ७२ व्या श्लोकांत यज्ञाचा पाढा आहे. पुढील श्लोकांत स्तुति-स्तोत्राचा पाढा आला आहे. आधीं देवता-दर्शन मग तिचें यजन आणि शेवटीं स्तुतिस्तोत्राच्या गजरांत पूजाविधीची समाप्ति. या तीन श्लोकांतील हा असा क्रम आहे. भारतीय आर्यांचें प्राचीन आणि अर्वाचीन जीवन गंगौघवत् एका उद्देशानें, एका प्रेरणेनें अखंड वाहत आहे. ओघ इकडे तिकडे वा कमी अधिक भलें होवो, पण त्यांत कुठला हि फरक पडलेला नाहीं. वैदिक कालीं वरुणेन्द्ररुद्र देवता होत्या, त्यांचे यज्ञयाग होत, त्यांचीं सूक्तें गाइलीं जात. आज आम्ही रामकृष्णादिक देवतांना भजतों, त्यांना धूप दीप दाखवितों आणि त्यांचीं भजनें व धून गातों. यजन-पूजनांत कालौघाबरोबर कांहीं अंतर येणें स्वाभाविक आहे, पण निर्मळ भक्तिभाव तोच आहे. देवता तेव्हां हि अनेक होत्या आज हि आहेत, पण 'एकं सत्' चीच उपासना होत होती नि होत आहे.

वेदाचीं पदें मोजलेलीं आहेत आणि त्यांचा क्रम हि निश्चित झाला आहे. संहितेंत तो बद्ध आहे. हा क्रम चार दोन वेद-पदांचा नाहीं, सहस्रावधि पदांचा आहे. म्हणून तो वेदात्मा महाक्रम होय. त्याच प्रमाणें यज्ञांतील क्रियांचा हि क्रम निश्चित आहे. तो हि साधा नाहीं. गुंतागुंतीचा आहे. त्यामुळें हि तो यज्ञात्मा महाक्रम म्हणावयाचा. सृष्टीचा क्रम घेतला तरी तो हि लहान सहान म्हणतां यावयाचा नाहीं. त्रैगुण्य नि पंचीकरण कांहीं साधी व स्वल्प प्रक्रिया नव्हे. ती हि गुंतागुंतीची व सुदीर्घ आहे. निर्गुण ब्रह्मापासून साकार साहंकार पांचभौतिक सृष्टि आणि परत त्या साकार साहंकाराचा निर्गुण निराकारांत विलय हा क्रम साधा सोपा नि लहान सहान कसा म्हणतां येईल? म्हणून तो विश्वात्मा महाक्रम म्हणावयाचा. क्रम म्हणजे अनुक्रम, तसा क्रम म्हणजे पदक्षेप हि अर्थ आहे. पदक्षेप या अर्थीं परमात्मा त्रिविक्रम आहे. त्यानें तीन पदक्षेपांत तिन्ही लोक व्यापून टाकले आहेत. त्यामुळें तो महाक्रम म्हणावयाचा.

### ६७२. महाकर्मा

कर्माची महत्ता त्याच्या परिमाणावरून नि परिणामावरून मापली जाईल. दोन्ही दृष्टींनीं परमात्म्याचें कर्म महान् ठरतें. परिमाणाच्या दृष्टीनें सर्वाश्चर्यमय या अनन्त विश्वाहून मोठें दुसरें काय आहे? आणि हें सृष्टिकर्म कोण अनीश करूं शकेल? गीतेनें म्हटलें हि आहे—"भूतभावोद्भवकरो विसर्गः कर्मसंज्ञितः" हा विसर्ग, ही महान् विसृष्टि परमात्म्यानें केली आहे. म्हणून तो परमात्मा महाकर्मा म्हणावयाचा. महाकर्मा म्हणजे च विश्वकर्मा. परमात्म्यानें ही सृष्टि कशासाठीं निर्मिली आहे? या सृष्टिकर्माचें फलित काय? सर्व जीवांना, आब्रह्मस्तम्बपर्यंत सर्वजीवांना, आपआपल्या कर्मानुसार आणि ज्ञानानुसार भोग आणि मोक्ष मिळावा हें फलित आहे. मुंगीला कणभर आणि हत्तीला मणभर खाद्य तो पुरवितो. जीव आपलें जीवन जगत असतांना उत्तरोत्तर त्यांची भोगवासना चढत आणि वाढत जाते आणि तदनुसार योनि पालटत जाते. शेवटीं ते ज्ञान-क्षम मनुष्य योनीला प्राप्त होऊन परम पुरुषार्थरूप मोक्षलाभ करून घेतात. मोक्षाहून मोठा भोग दुसरा नाहीं. अशा प्रकारें कर्माचें साफल्य ज्ञानांत होतें हें तें महाफल होय. हें महाफल ज्या कर्माचें ते करणारा तो महाकर्मा म्हणावयाचा. अशा प्रकारें उभयविध दृष्टीनें परमात्मा महाकर्मा होय. पण जो त्याचें अनुकरण करील तो हि महाकर्मा होईल. परमात्मा हें सर्व महाकर्म करतो पण त्यांत त्याला स्वत:ला कांहीं अवाप्तव्य असत नाहीं. तो सूर्यवत् निर्हेतुक रागद्वेष न करतां सहज म्हणजे

प्रकृतिनियत आणि म्हणून जन्मत: प्राप्त कर्म करतो आणि आजीवन करीतच राहतो. तसें जो करील तो हि महाकर्मा म्हटला जाईल. कारण त्याचें तें कर्म महाफल होय. अशा कर्मालाच यज्ञ असें म्हटलें आहे. हा यज्ञ लहानापासून मोठ्यापर्यंत सर्व करूं शकतात. वर्णाश्रमधर्मांचें हें रहस्य आहे. स्वधर्मनिष्ठाच मोक्ष-दायिनी आहे.

### ६७३. महातेजा

महत् तेज: यस्य स: महातेजा:। महान् आहे तेज ज्याचें तो महातेजा म्हणावयाचा. ''महाक्रमो...महा हवि:'' हा संपूर्ण श्लोक यज्ञाचा पाढा असो अगर नसो परंतु तो महा चा पाढा खास. प्रत्येक पद महत्पूर्वक आलें आहे. या महत् ची व्याख्या काय? कशाला महत् म्हणावयाचें? जें परिणामानें आणि परिमाणानें मोठें तें मोठें म्हणावयाचें. ही व्याख्या बुद्धिगम्य आहे. परंतु सर्वांत सोपी आणि अचूक व्याख्या ही की जें जें ईश्वराचें, परमात्म्याचें तें तें सर्व मोठें होय. कारण, परमात्म्याहून मोठें दुसरें कांहीं नाहींच. आणि त्यामुळें त्याशीं संबंद्ध तें सर्व मोठें होय. जगांत सर्वांत अमंगल म्हणजे स्मशान. तिथून जाऊन आल्यावर संचैल स्नान करून शुद्ध व्हावें लागतें. पण तिथलीच राख शिव आपल्या अंगाला फासतो आणि मग तीच राख न राहतां विभूति बनते. तें परम वैभव होतें. ''भवअंग भूति मसान की सुमिरत सुहावनि पावनी'' ती विभूति कुबेर शिरोधार्य करतो. आपली सगळी दौलत त्या राखेवरून तो ओवाळून टाकतो. ही महत्ता हें गौरव त्या तुच्छ राखेला कुठून आलें? शिवाच्या स्पर्शानें. तुच्छ नि निरुपद्रवी कोळसा अग्नि संस्पर्शानें अंगार बनतो, देवता बनतो. साधी तांब्याची तार विद्युत्-संस्पर्शानें तार रहात नाहीं ती विद्युतच होते, तद्वत् कोणता हि तुच्छातितुच्छ आचार उच्चार विचार ईश्वरी संस्पर्शानें महान् होतो. त्याचें पार रूपच पालटून जातें. देवासमोर लावलेलें नीरांजन, त्याचें तेज किती? पण तें आम्ही घेतों आणि धारण करतो, आत्मसात् करतो. कारण तें महान् आहे. अर्थात् ईश्वरी आहे. ईश्वराप्रीत्यर्थ केलेला रावाचा यज्ञ महातेजा होय. त्या महायज्ञा-इतकेंच देवासमोर पेटविलेलें रंकाचें नीराजन हि महान् आहे, महातेज आहे. कारण, ईश्वर महान् आहे आणि सर्व प्रकाशक आहे. आणि सूर्य चंद्र अग्नि इत्यादि महान् तजें तदिद्ध तत्प्रतीक असल्यामुळें तो महातेजा म्हटला आहे. सर्व प्रकाशकत्व चेतनाचें आहे म्हणून तो चिद्घन परमात्मा महातेजा म्हणावयाचा.

### ६७४. महोरग

उरसा गच्छति इति उरग:। महांश्च असौ उरगश्च इति महोरग:। जो पोटावर सरपटतो तो उरग म्हणावयाचा. जो मोठा सर्प तो महोरग म्हणावयाचा. ''सर्पाणां अस्मि वासुकि:'' म्हणून वासुकि हा महोराग भगवद्विभूति वर्णिला आहे. तो भगवद्विभूति कां मानला गेला? अमृतमंथनाच्या वेळीं तो दोर बनून त्यानें अमृत मिळविण्यांत साहाय्य केलें म्हणून. पण हें अमृत कोणतें? आणि तें कसें मिळवायचें? देवांनीं मिळविलें आणि ते अमर झाले. पण त्याचा आम्हांला लाभ काय? आम्हींहि तें मिळवावें आणि अमर व्हावें हाच त्या आख्यायिकेचा बोध. ''अप्रमादो ऽमृतपदं प्रमादस्तु मृते: पदम्'' असें भगवान् बुद्धानें म्हटलें आहे. जो गाफिल राहिला तो मेला, अमृतास मुकला. जो सदैव डोळ्यांत तेल घालून जागला तो जगला. अमृत झाला. सर्प कधीं झोपत नाहीं, डोळे मिटत नाहीं. तो अष्टौप्रहर जागत असतो. तो अरण्यांत एकान्तवास करतो. तो प्राणायाम करतो. तो मौन सेवन करतो. तो सदाशुचि असतो. असा योगयुक्त असल्यामुळें तो अमृतभाक् झाला आहे. आणि अशा त्याच्या योगस्वरूपतेमुळें संयममूर्तित्वामुळें शंकरानें त्याला सर्वांगीं भूषण म्हणून धारण केलें आहे. अर्थात् ज्याच्या ठाईं जितका अधिक संयम तितका तो

महोरग म्हणावयाचा. परमात्मा हा तर साक्षात् संयम आहे. म्हणून तो महोरग म्हटला आहे.

मत्स्य कच्छ वराह नारसिंह वामन ही जी जीवोत्क्रांति तींत सर्प आणि गरुड यांची हि गणति व्हायला पाहिजे. ती कच्छपाच्या सोबतच व्हायला पाहिजे. सर्प हा कच्छपाप्रमाणें जलचर व स्थलचर दोन्ही आहे. गरुड नभश्चरांचा शिरोमणि आहे ''वैनतेयश्च पक्षिणाम्'' म्हणून भगवद्विभूति मान्य आहे. जीवोत्क्रांतींतील उरगांचें स्थान महोरगपद सूचित करीत आहे. मूल हि लहानपणीं उरगच असतें. मानवी विकासांत हि उरगत्वाला असें स्थान आहे. सर्व जीवांशीं असें हें आपलें नातें आहे. रांगतें मूल माती चाटतें तें वराहत्व होय. गर्भस्थ असतांना तें मत्स्य कच्छ असतें. तीक्ष्ण नखदन्तायुधत्व म्हणजे नरसिंहत्व होय. त्याचें जावळ म्हणजे केसरित्व होय. पुढें त्याचें बटुत्व म्हणजे वामनत्व होय. पुढें तो नर बनतो आणि मग नारायण. असे हे मनुष्याचे दशावतार होत.

## ६७५. महाक्रतु

महान् क्रतुः यस्य सः महाक्रतुः। अथवा महांश्च असौ क्रतुश्च महाक्रतुः। ज्याचा क्रतु मोठा तो महाक्रतु म्हणावयाचा. अथवा मोठा क्रतु तो महाक्रतु म्हणावयाचा. एक समास बहुव्रीहि तर दुसरा कर्मधारय होय. दोन्ही प्रकारें परमात्मा हा महाक्रतु होय. पण क्रतु म्हणजे काय? क्रतु म्हणजे यज्ञ हा सर्व सामान्य अर्थ झाला. पण यज्ञांत आणि क्रतूंत काय अन्तर कोणताहि यज्ञ व्हायचा झाला म्हणजे आधीं त्याचा संकल्प व्हावा लागतो. संकल्पाशिवाय यज्ञ होऊं शकत नाहीं. म्हणून यज्ञ हा क्रतु म्हटला गेला अर्थात् सर्व यज्ञांचा यज्ञ वा मूल यज्ञ म्हणजे क्रतु होय. पण संकल्प व क्रतु यांत काय अंतर? संकल्प क्रियान्वित होईलच असें नाहीं, क्रतु हा सदैव क्रियेंत परिणत होतो. तो केव्हांहि मनांतच जिरत नाहीं तर क्रियारूपानें अवश्य प्रकटतो, साकार होतो. तो वांझोटा विचार नाहीं, तर अमोघ विचार होय. परमात्म्याच्या मनांत आलें, सृष्टि व्हावी आणि ही विश्वसृष्टि झाली. ही सर्वाश्चर्यमय अनन्तपार सृष्टि त्या परमात्म्याच्या क्रतूचें फलित आहे. म्हणून तो परमात्मा महाक्रतु म्हटला आहे. हा झाला बहुव्रीहि विचार. कर्मधारय विचारानें प्रत्येक व्यक्ति प्रत्येक जीव म्हणजे एक क्रतु आहे. क्रतूमुळें तो जन्माला आला आहे. क्रतूमुळें तो जगत आहे. क्रतूसाठींच तो देहान्तर करणार आहे. या त्याच्या क्रतुमयतेमुळें जीव हा क्रतु म्हटला आहे. जीवाचे क्रतु हे अल्प असतात, परंतु परमात्म्याचा क्रतु लहान म्हणतां यावयाचा नाहीं. कारण, त्याचें फलित हें विश्व महान् आहे. त्यांत सर्व चराचरांचे क्रतु समाविष्ट आहेत. परंतु कोणा एकाच्या मोठ्यांतील मोठ्या जीवाच्या हि क्रतूंत परमात्माचा क्रतु सामावणार नाहीं. म्हणून तो महाक्रतु होय. सकलक्रतु होय. जीव शकलक्रतु होय.

## ६७६. महायज्वा

यज्वा म्हणजे यजनशील. महायज्वा म्हणजे परम यजनशील. ''नायं लोकोऽस्त्ययज्ञस्य कुतोऽन्यः कुरुसत्तम'' अयज्ञ पुरुषाला हा लोक देखील लाभत नाहीं तर मग परलोक कुठला, असें गीता बजावते आहे. म्हणजे प्रत्येकाला यज्ञ कर्तव्य आहे आणि त्यावांचून त्याचें इहपरजीवन चालूं शकत नाहीं. या यज्ञाची केन्द्रीय कल्पना काय? केन्द्रीय कल्पना ही कीं माझा लाभ काय असें मनांत न आणतां दुसऱ्यासाठीं त्याग करावयाचा. थोडक्यांत म्हणजे आपल्यासाठीं नव्हे तर दुसऱ्यासाठीं जगावयाचें. जो असा यज्ञ करतो तो सुटतो, जो यज्ञहीन जगतो तो बांधला जातो:. ''यज्ञार्थात् कर्मणोऽन्यत्र लोकोऽयं कर्मबन्धनः'' यज्ञजीवनाच्या विरुद्ध देहभावना खालीं खालीं खेचीत असते. ती उत्तरोत्तर क्षीण करीत करीत पार नाहींशी करून टाकणें म्हणजे यज्ञमय होणें

होय. देहधारी जीव कितीहि निःस्वार्थ झाला, कितीहि परार्थैकजीवित झाला तरी देह आहे तोंवर कांहीं ना कांहीं स्वार्थ त्याला चिकटून आहे असेंच म्हणावें लागेल. आणि म्हणून तो अल्पयज्वाच म्हटला जाईल, परंतु परमात्मा हा देहबुद्धीसकट देहमुक्त असल्यामुळें तोच एक केवल यज्ञमय जीवन जगणारा होय आणि म्हणून त्याहून मोठा यज्वा दुसरा नाहीं. वेदशास्त्रें विधिनिषेधमय आहेत. "अमुक कर, अमुक करूं नकों" असें तीं सांगतात. त्यांच्या ह्या विधिनिषेधाचें सूत्र यज्ञवृत्ति आहे. जें यज्ञाला साधक तें कर, जें यज्ञाला बाधक तें करूं नको, हा इत्यर्थ. निरहंकार आणि देहमुक्त ज्ञानी पुरुषाला कर्तव्यप्राप्ति होत नाहीं. ती साहंकार आणि देहवंत अज्ञानी पुरुषालाच होते. त्यानें आपला स्वभावप्राप्त धर्म म्हणजेच स्वधर्म फलनिरपेक्षवृत्तीनें आचरावा. तत्परिणामीं जिज्ञासा उत्पन्न होऊन आत्मज्ञानाच्या योगें यथाकाळीं तो देहबुद्धि आणिं देह दोहोंतून हि मुक्त होतो. असा मुक्त पुरुषच महायज्वा म्हणावयाचा. परमात्मा हा सहजच तसा आहे. आम्हांला प्रयत्नपूर्वक तसें व्हायचें आहे. जीवन ÷ अहंभाव = यज्ञ असें हें समीकरण यांतून निष्पन्न होतें.

### ६७७. महायज्ञ

महायज्ञ हें पद इतर महापदपूर्वक आलेल्या पदांप्रमाणें बहुव्रीहि वा कर्मधारय आहे. "महान् यज्ञो यस्य सः महायज्ञः। अथवा महांश्च असौ यज्ञश्च महायज्ञः" असा त्याचा अनुक्रमें विग्रह होतो. दोन्ही रीतींनीं महायज्ञ पद लावतां येतें, आशयांत कांहीं फरक पडत नाहीं. विश्वजीवनरूप यज्ञ ज्याचा चालला आहे तो परमात्मा उघडच महायज्ञ होय. सर्वांचे यज्ञ त्याच्या महायज्ञाचे अंशभूत च होत, म्हणून परमात्माच एक महायज्ञ म्हणावयाचा. कोणतें हि शकल तें केवढें हि मोठें असलें तरी सकलाची वा समग्राची बरोबरी करूंच शकत नाहीं. त्याहून तें अल्पच म्हटलें जाईल. म्हणून समग्रच एक महान् होय. आणि तेंच बृहत् वा ब्रह्म म्हटलें आहे.

जो नैमित्तिक यज्ञ तो राजसूय वाजपेय अश्वमेध इत्यादि अल्प म्हणावयाचा. परंतु जो नित्याचा यज्ञ तो महायज्ञ म्हणावयाचा. हव्य कव्य काकबलि वैश्वदेव अतिथिपूजन हे पंच महायज्ञ म्हटले आहेत. कारण ते नित्यच करावयाचे आहेत. आणि समग्रतेचें सार्वदेशिकता हें जसें एक अंग आहे तसें सार्वकालिकता हि दुसरें अंग आहे. म्हणून नित्ययज्ञ वा जीवनरूप यज्ञ हा महायज्ञ होय. आणि तो समग्रतेमुळें परमात्मस्वरूपच होय. अशा प्रकारें देशतः आणि कालतः तो परमात्मा महायज्ञ म्हटला आहे. सर्व यज्ञांचें फलित कल्मष-क्षपण आहे. आणि तें होतें निःशेष, आत्मज्ञानानें. म्हणून जो आत्मज्ञानी निरहंकार परार्थैकजीवित पुरुष तोच महायज्ञ म्हणावयाचा. अशा पुरुषाचें समग्र जीवन यज्ञमय म्हटलें आहे. "तस्य एवं विदुषः यज्ञस्य, आत्मा यजमानः, श्रद्धा पत्नी, शरीरं इध्मं, उरो वेदिः, सर्ववेदसं वै एतत् सत्रं, यत् मरणं तद् अवभृथः." त्याचें जीवन तो यज्ञ, मरण ती यज्ञाची सांगतां. अशा यज्ञमय जीवनाचें उदाहरण दधीचि ऋषि होते, महात्मा गांधी होते.

### ६७८. महाहवि

महत् हविः यस्य सः महाहविः। अथवा महत् च अदः हविश्च महाहविः। "मोठा हवि ज्याचा तो महाहवि, अथवा, मोठा हवि तो महाहवि म्हणावयाचा. हवि म्हणजे आज्य, होमद्रव्य. यज्ञांत जी आज्याची आहुति दिली जाते ती परिमाणानें मोठी अशी कितीशी असणार? सम्राटाचा हि यज्ञ असला तरी तो समारम्भ समाप्त होणारच. म्हणजे त्यांतील आज्य परिमितच म्हणावयाचें. परंतु ज्या यज्ञाला आरंभ नाहीं आणि अन्तहि नाहीं तो यज्ञ महान् होय आणि त्यांतील होमद्रव्य हि तसेंच महत् वा अपरिमित होय.

परमात्म्याचा हा सृष्टिरूप यज्ञ तसाच आहे. तो केव्हां आरब्ध झाला आणि केव्हां समाप्त व्हावयाचा हें कोणाला हि सांगतां येत नाहीं. तो आपला अनाद्यनन्त चालूच आहे. आणि त्यांत होमिलें जाणारें द्रव्य म्हणजे हा व्यक्ताकार हि अपरिमित आहे. गंगा सागरांत मिळतच मिळत आहे. तसा हा व्यक्ताकार अव्यक्तांत सारखा होमिला जात आहे. त्यांत खंड नाहीं. अव्यक्तमूर्ति परमात्म्याचें हें सृष्टिरूप यजन चाललें आहे. हा सगळा व्यक्ताकार त्या अव्यक्ताक्षर परमात्म्याच्या प्रचंड चिदग्नींत होमिला जात आहे आणि अव्यक्तसात् होत आहे. याच यज्ञीय अग्नीला उद्देशून तो ऋग्वेदाचा ऋषि म्हणतो आहे: "अग्निं ईळे पुरो हितम्। यज्ञस्य देवं ऋत्विजम्। होतारं रत्नधातमम्।। स नः पितेव सूनवे। अग्ने सूपायनो भव। सचस्वा नः सुअस्तये।।" शेवटीं हा अग्निच आपला सखा साथी मार्गदर्शक आहे हें ओळखून तो त्याला परोपरीनें आळवीत आहे. सदैव आमच्या जवळ रहा म्हणून त्याला विनवीत आहे. त्याला घरीं दारीं श्मशानीं सांभाळीत व कवटाळीत आहे.

### ६७९. स्तव्य

ज्या चित्सूर्याच्या अंशापासून ही चराचर सृष्टि उत्पन्न झाली आहे, ज्याच्या प्रेरणेनें ती जगत आहे आणि ज्यांतच शेवटीं ती विलीन व्हायची आहे त्या परमात्म्याहून अधिक स्तुत्य दुसरें काय असूं शकेल? म्हणून तो परमात्मा स्तव्य म्हटला आहे. सर्व जलौघांचें परायण जसा समुद्र तसा स्तुतिमात्राचा विषय एक तो परमात्मा आहे. तुम्हांला या जगांत जें जें प्रशंसनीय आढळतें तें तें सारें त्या आत्मशक्तीपासून उत्पन्न झालेलें, त्या आत्मशक्तीच्याच प्रेरणेनें टिकून असलेलें आहे. अशा स्थितींत तुम्हीं एखाद्या वीराची विद्वानाची कलावंताची श्रीमंताची वा सेवकाची जी स्तुति करतां ती सगळी त्या परमात्मशक्तीचीच होय. या सगळ्या व्यक्ताकाराच्या मागें उभ्या असलेल्या त्या अव्यक्त सूत्रधाराची होय. क्रांतदर्शी कवि त्याला आपल्या दिव्य दृष्टीनें पाहत असतात. सामान्य जीव त्याला पहात नाहींत. ते आपल्या आईबापांना जन्मदाते समजतात, गुरुंना ज्ञानादाते मानतात, धन्याला अन्नदाते म्हणतात. परंतु या सर्व स्तुतीचें भाजन खरोखर तो अव्यक्तमूर्तिच असतो. आईबाप, गुरु, स्वामी इत्यादि जे हे सारे देव म्हणजे पूज्य हितकर्ते त्यांना केलेला नमस्कार त्या परमात्म्यालाच पोंचतो.

**आकाशात् पतितं तोयं यथा गच्छति सागरम्।**
**सर्वदेव-नमस्कारः केशवं प्रति गच्छति।।**

परंतु हें रहस्य जे ओळखीत नाहींत. अर्थात् जे स्थूल आई-बापांना वगैरेच आपण नमस्कार करीत आहों असें समजतात "तत्त्वेनातश् च्यवन्ति ते" ते तत्वज्ञानापासून च्युत होतात. त्यांना तें महत् फळ मिळत नाहीं. वेदांत नाना देवतांच्या रूपानें ह्या परमात्म्याचीच परोपरीनें स्तुति केली आहे. पहिल्याच मंत्रांत त्याला ईड्य म्हटलें आहे.ईड्य म्हणजेच स्तव्य.

### ६८०. स्तवप्रिय

परमात्मा हा स्तव्य म्हणजे स्तवार्ह आहे इतकेंच नव्हे तर तो स्तवप्रिय हि आहे. त्याला आपली स्तुति आवडते. परंतु महद्गुणांत तर आत्मस्तुति नि परनिन्दा अमान्य आहेत. होय, खरें आहे. पण तिथें आत्मपरभाव म्हणजे देहभाव होय, अनात्मभाव होय. जो आत्मरूप झाला तो परक्या देहाची, अनात्म्याची स्तुति कशी करील? त्याच प्रमाणें ज्याला सर्वत्र अभेद झाला, तो देहभेदानें परकेपणाचा आरोप कुणावर करणार आणि स्वतःचीच निन्दा कशी करणार? त्यामुळें तो "तुल्य-निन्दास्तुतिर् मौनी" असतो. तो आत्मनिष्ठ पुरुष असत् म्हणजे नसल्या देहाची स्तुति करूं शकत नाहीं आणि त्याची निन्दा करणें हि साप म्हणून दोरीला बडवण्यासारखें व्यर्थ समजतो, मूर्खपणाचें समजतो. आणि म्हणून तो मौन सेवन करून राहतो, आत्मचिन्तनांत मग्न असतो. जें असत् आहे,

जें बोलून चालून मुळीं नाहींच, त्या नसल्याची स्तुति-निन्दा म्हणजे नसती उठाठेव होय. ती कोणीहि शहाणा माणूस करूं शकणार नाहीं. पण जें सत् आहे, तें सदैव अनिन्द्य होय. त्याचा निषेध होऊं शकत नाहीं. त्याचें गुणगौरवच होणार. आणि परमात्मा हीच एक सद्वस्तु असल्यामुळें तोच एक स्तव्य आहे आणि सताला सत्यच स्वभावत: प्रिय असणार म्हणून तो स्तवप्रिय म्हटला आहे. पण हा स्तव असा आहे कीं तो स्तुति केली तरी होतो नि निन्दा केली तरी होतो. गुलाब सुंदर आहे, गुलाब कांटेरी आहे. ही दोन वाक्यें स्तुतिपर निन्दापर आहेत. पण दोन्ही गुलाबाचें अस्तित्वच, त्याची सत्ताच, प्रकट करतात. आणि हीच ती त्याची सत्ख्याति स्तव होय. आणि ती त्या सद्रूप परमात्म्याला प्रिय आहे.

एखाद्यानें घरांतून ओ देणें आणि मी घरीं नाहीं हो असें म्हणून ओ देणें दोहोंचा अर्थ एकच. त्याप्रमाणें.

## ६८१. स्तोत्र

जो स्तवार्ह आहे, जो स्तवप्रिय आहे तो परमात्मा स्तोत्र हि म्हटला आहे. कारण, तोच स्तोत्राचा विषय झालेला आहे. स्तोत्र म्हणजे विधान, वाक्य. कोणतें हि विधान कोणाला तरी उद्देशूनच होऊं शकतें. उद्देश्यच जर नसेल तर वाक्यप्रयोग होऊं शकणार नाहीं. म्हणून ''प्राधान्येन व्यपदेशा भवन्ति'' या न्यायानें उद्देश्यच वाक्य म्हणावयाचें. तेंच वाक्याचें उत्तमांग होय. सर्व विधानांचें उद्देश्य सद्वस्तुच संभवतें, असद् वस्तु नव्हे. म्हणून तो सन्मूर्ति परमात्माच वाक्यात्मक स्तोत्र होय. याच अभिप्रायानें ज्ञानदेव म्हणतात:

ॐ नमो जी आद्या। वेद-प्रतिपाद्या।
जय स्वसंवेद्या। आत्मरूपा।।

हे आत्मदेवा, तुझें प्रतिपादन करण्यासाठीं वेद्र झाले आहेत. तूं प्रतिपाद्य नसतास तर वेद-वाणी प्रवृत्तच झाली नसती. तूं आद्य आहेस. इतर सारें तुझें अनुगत आहे, त्वदुत्थ आहे. सर्व वाणीचा विषय तूं आहेस. परमात्म्याचें हें आद्यत्व आणि वाग्विषयत्व, नव्हे वाग्विषयीभूतत्व प्रकट करण्यासाठीं वेद-मंत्राच्या प्रत्येक उच्चारापूर्वी ॐकाराचा घोष केला जातो. तो ॐ कारच परमात्मा आहे. तोच आद्य वेद आहे. तोच प्रणव म्हणजे उत्तम स्तोत्र आहे. हा ॐकार , हा आद्य वेद, हा प्रणव शंखांतून प्रकटला आहे. कारण तो अव्यक्त ध्वनि आहे. तो अवर्ण घोष आहे. म्हणून सर्व वर्णगणापूर्वी त्याचा उच्चार केला जातो. त्या गणपतीला नमस्कार केला जातो ॐ नम: म्हणून. हाच ओनामा होय. समस्त वर्णात्मक स्तोत्र शेवटीं त्यांतच समाप्त व्हायचें. म्हणून शेवटीं हि त्याचाच घोष होतो ॐ नम: म्हणून. सहस्राच्या हि शेवटीं तसा तो झाला आहे. असा तो परमात्मा सर्व-वर्णप्रतिपाद्य अक्षर-स्वरूप ॐकार म्हणून स्तोत्र म्हटला आहे. स्तूयते अनेन इति स्तोत्रम्।

## ६८२. स्तुति

स्तोत्र स्तुति आणि स्तोता हीं तीन पदें इथें क्रमानें आलीं आहेत. या त्रयीच्या आरंभीं स्तव्य आणि स्तव-प्रिय ही जोडी हि आली आहे. या पदपंचकानें असें सुचविलें आहे कीं तो परमात्मा स्तवन-क्रियेला आवश्यक सर्वच अंगें आहे. प्रथम तो स्तुतिपात्र आहे. इतकेंच नव्हे तर ती स्तुति त्याला आवडते असें म्हटलें आहे. कित्येक थोर पुरुषांना आपली स्तुति आवडत नाहीं. कारण ते स्तोत्याच्या मताप्रमाणें आपल्याला स्तुतियोग्य समजत नाहींत. म्हणजे स्तुति-पात्राहून, त्या परमात्म्याहून, आपल्याला वेगळे समजतात. आणि त्या अर्थानें खरोखरच ते स्तव्य नव्हत. परंतु स्वत: परमात्म्याला असा अनात्माभिमान नसल्यामुळें तो स्तव्य तर आहेच पण स्तवप्रिय हि आहे. त्याला स्तुतीचा स्वीकार करतांना संकोचाचें

कांहीं कारण दिसत नाहीं. अशा स्तव्यस्तवप्रियत्वानंतर म्हणजे स्तुतिक्रियेला योग्य अधिष्ठान लाभल्यानंतर स्तुतिक्रियेचीं आवश्यक अंगें (१) ज्या साधनानें स्तुति व्हायची ती शब्दरचना म्हणजे स्तोत्र (२) तें स्तोत्र समर्पिण्याची क्रिया आणि (३) ती स्तुतिक्रिया करणारा स्तोता यांची आवश्यकता असते. ती सर्व आवश्यकता तो परमात्मा पुरविणारा आहे. कारण तो स्वयंपूर्ण आहे, सर्वतंत्रस्वतंत्र आहे. ''स्तव्यः स्तवप्रियः स्तोत्रं स्तुतिः स्तोता'' या पदपंचकानें हा सर्व आशय प्रकट केला आहे.

ॐ कार हें एकाक्षर ब्रह्म म्हणजे स्तोत्र होय. त्याचा विस्तार म्हणजे सर्व वेद आणि सगळें वाङ्मय म्हणावयाचें. त्या समस्त वैदिक लौकिक वाङ्मयानें तो स्तव्य नि स्तवप्रिय परमात्माच स्तविला जात आहे. ही स्तुति म्हणजे स्तवनक्रिया वागूरूपानें सतत होत आहे कावळ्याच्या कोकलण्यापासून तों कविकोकिलाच्या कूजनापर्यंत. सर्व वाणी त्या परमात्म्याचीच स्तुति करीत असतात. सर्व क्रिया कर्तृरूपच होत. स्तुति ही एक क्रियाच आहे. त्यामुळें सर्वकर्ता जो परमात्मा तद्रूपच ती होय. म्हणून तो परमात्मा स्तुति म्हटला आहे.

## ६८३. स्तोता

''स्वतन्त्रः कर्ता'' म्हणजे वाक्यांत जीं अनेक पदें येतात त्यांत जें पद स्वतंत्र असतें तें कर्ता होय. क्रियापद त्या कर्त्याच्या अनुरोधानें आणि इतर पदें त्या क्रियापदाच्या अनुरोधानें बदलत असतात. पण जें स्वतः इतर कोणाच्या तंत्रानें बदलत नाहीं तें स्वतंत्र पद कर्ता म्हटलें जातें. व्याकरणांतल्या प्रमाणें व्यवहारांत हि जो स्वतंत्र पुरुष असतो तो कर्ता म्हटला जातो. कुटुंबांत पुरुष कर्ता असतो, तदधीन स्त्री असते आणि इतर मंडळी त्यांच्या कलानें रहात असतात. जगद्व्यवहारांत हि असें पाहतां एक तो चेतन परमात्माच कर्ता होय. प्रकृति आणि जीव तदधीन आहेत. कर्तृत्व सगळें त्या चेतन परम पुरुषाचें म्हटलें म्हणजे वस्तुसत्तेचें ज्ञान, त्या वस्तूच्या गुणगौरवाचें भान आणि गौरवबोधजनित त्या वस्तूंविषयीं स्तवन-प्रवृत्ति त्याचीच म्हटली पाहिजे हें उघड आहे. परमात्माच हा अशा प्रकारें स्तोता होय. दुसरा कोण बरें अनात्मा जड मूढ स्तोता बनूं शकेल? स्तोतृत्वाला वस्तूपलब्धि, वस्तुगुणगौरव-बोध, गौरवबोधजनित स्तवनप्रवृत्ति आणि स्तवनक्षम वाक्पाटव हवें. तें सगळें त्या परमात्म्याच्या ठाईं आहे. त्यानेंच आत्मज्ञान करून देणारें वेदोपनिषदादि आरण्यक वाङ्मय निर्मिलें आहे. त्यांतूनच उपनिषदें ब्रह्मसूत्रें आणि गीता ही प्रस्थानत्रयी निघाली. या आरण्यक वाङ्मयांतून भाव आणि शब्द घेऊन अनुभवी संत आणि आचार्य यांनीं जी संस्कृत प्राकृत प्रासादिक स्तोत्र-रचना केली आहे तीच सरस्वती होय. तिचें दर्शन प्रयागांत होत नाहीं. कलियुगांत गुप्त झालेली सरस्वती ती हीच होय. त्या परमात्मस्वरूप स्तोत्याच्याच कृपेनें ह्या आध्यात्मिक सरस्वतीचें दर्शन होतें.

## ६८४. रणप्रिय

रणप्रियता हें दूषण कीं भूषण? वस्तुतः तें दूषणच म्हटलें पाहिजे. शान्ति हीच मानवाची चिर अभिलाषा असूं शकते. आणि अन्तीं सर्व वैरविरोध विझून शान्तिच व्हायची आहे. प्रपंचाच्या पूर्वीं शान्तिच होती आणि शेवटीं हि शान्तिच व्हायची आहे. अर्थात् शान्ति ही प्रकृति असून वैरविरोध ही विकृति आहे. मग तो परमात्मा रणप्रिय कां म्हटला जावा? वस्तुतः तो मिथ्याआरोप आहे. सूर्य का कुठें अंधाराशीं लढायला जातो? का सत्य असत्याला आह्वान देऊन त्याशीं द्वंद्व करतें? प्रकाशाचा अंधकाराशीं स्वभावतःच विरोध आहे. सत्याचा असत्याशीं स्वभावतः विरोध आहे. आणि सत्याच्या ह्या असत्याशीं असलेल्या स्वभावसिद्ध विरोधालाच परमात्म्याचें रणप्रियत्व म्हणावयाचें. इतरांचा विरोध नैमित्तिक व

तात्कालिक असतो. पण हा सत्याचा असत्याशीं नित्य आहे, निरंतर आहे. यालाच उद्देशून तुकाराम म्हणतो : ''रात्रंदिवस आम्हां युद्धाचा प्रसंग। अंतर्बाह्य जग आणि मन'' परमात्मा एकमेवा- द्वितीय असल्यामुळें तो निर्द्वंद्व आहे. त्याला झगडा नाहीं. जिथें द्वितीय म्हणजे आत्मभिन्न दुसरा उपस्थित होतो तिथें द्वंद्व आलें, झगडा आला. आणि हें जग म्हणजे तर द्वंद्वांचा नुसता बाजारच आहे. त्यांत प्रत्येकाचें दुसऱ्याशीं भांडण चाललें आहे. दुसऱ्याशीं भांडण तर समजण्यासारखें आहे; पण आपलेंच आपल्याशीं भांडण होत असतें. जिभेला मसालेदार तिखट पदार्थ हवेत, तर पोटाला ते नकोत. इन्द्रिया इंद्रियांत असा झगडा चालला आहे. या सगळ्या इन्द्रियांचा पुन: मनाशीं झगडा, शेवटीं मनासकट देहाचा आत्म्याशीं झगडा. याचाच उल्लेख तुकाराम करतो. असें हें जीवनाचें रणांगण आहे. आणि त्यांत मुमुक्षु वीर लढत असतो आणि परमात्म-कृपेनें विजयी हि होत असतो. परमात्म्याला हें रण आवडतें म्हणून तो रणप्रिय म्हटला आहे.

## ६८५. पूर्ण

पूर्णता गौरवास्पद आहे. न्यूनता लघुत्वसूचक आहे. परमात्म्याच्या ठाईं पूर्णता आहे. त्याच्यांत कसलीच उणीव नाहीं. म्हणून तो पूर्ण होय. जसें गोडीचेंच नाव गूळ, तसें पूर्णतेचेंच नांव परमात्मा आहे, म्हणून त्याला पूर्ण म्हणावयाचें. जगांत आपण पाहतों की एक वस्तु आज पूर्ण आहे, तर उद्यां ती न्यून होते. आज पौर्णिमा आहे तर उद्यां कला कमी होत अमावास्येला नाहींशी होऊन परत वाढूं लागते. म्हणजे जगांतील पूर्णिमा वा पूर्णता ही खरी पूर्णता नव्हे. ती क्षयग्रस्त आहे. ''क्षयान्ता निचया: सर्वे, पतनान्ता: समुच्छ्रया:। संयोगा विप्रयोगान्ता मरणान्तं च जीवितम्।। हाच या व्यक्त विश्वाचा कायदा आहे, स्वभावधर्म आहे. किंबहुना चयापचय हेंच या जगाचें स्वरूप आहे. अर्थात् इथें पूर्णता म्हणजे केवलस्वरूप पूर्णता तुम्हांला पहायला मिळायची नाहीं. ती त्या निर्गुण निराकार अव्यक्ताच्या ठाईंच निहित आहे. तिथें चयापचय नाहीं, अखंडैकरूपता आहे, कूटस्थता आहे. म्हणून तें पूर्ण होय. त्यांत वाढ होऊं शकत नाहीं किंवा त्यांतून घट हि करतां येत नाहीं. ईशोपनिषदाच्या शान्तिमंत्रांत ह्या पूर्णाचें पूर्ण वर्णन आलें आहे. ''तें पूर्ण आहे, हें पूर्ण आहे. पूर्णापासून पूर्ण निष्पन्न होतें. पूर्णांतून पूर्ण काढून घेतलें तरी पूर्णच शेष राहतें.'' असें हें पूर्ण जो जाणतो तो कुठल्या हि विपत्तीनें खचत नाहीं आणि केवढ्याहि संपत्तीनें फुगत नाहीं. दोन्ही समानच मिथ्या असल्याची, वरवर दिसणारें आभासिक असल्याची खूणगांठ त्यानें बांधलेली असते. वस्तुत: जें आहे तें परिपूर्ण आहे या विषयीं तो सुप्रतीत असतो. त्यामुळें त्याला शान्ति शान्ति आणि शान्तिच असते. कुठला हि क्षोभ असत नाहीं. उद्यां राज्य मिळणार म्हणून तो हरखून जाऊन टिऱ्या बडवीत नाहीं किंवा राज्याऐवजीं वनवास नशिबीं आला म्हणून कपाळ पिटीत नाहीं. कुठल्या हि हानिलाभाचा त्याच्यावर कांहींहि परिणाम होत नाहीं. तो सदैव आत्मकाम आणि आप्तकाम असतो. पूर्णकाम असतो. पूर्णोपासनेचें हें फळ आहे.

## ६८६. पूरयिता

''पूर्ण: पूरयिता'' ही जोडी एकच भाव विशद करते. पूरयिता हा पूर्ण पदाचाच विस्तार आहे. पूरयिता हें पद परिपूर्णता सूचित करीत आहे. जी आपल्या ठाईं कोंडून पडली आहे ती कसली पूर्णता? जी भरभरून ओसंडून वाहते आहे ती अतिरिक्तताच खरी पूर्णता म्हणावयाची. तो समुद्र पूर्ण आहे, पण झरा हा परिपूर्ण होय. कारण तो पूरयिता आहे. ज्या गंगाप्रवाहानें (गंगा-) सागर बनविला तो गंगेचा झरा पूर्णतर होय. तो समुद्रवत् केवल आदाता नाहीं, तर दाता आहे. झऱ्याला सतत देणेंच ठाऊक. झऱ्याच्या

पूर्णतेचा, त्याच्या दातृत्वाचा त्याच्या महोदारतेचा उद्घोष त्याचें पाणी पिऊन तृप्त होणारे जीवजन, तृणवन आणि पक्षिगण कंठरवानें सतत करीत आहेत. त्याच्या दातृत्वानें सर-सरोवर आणि सागरोपसागर भरलेले आपण पाहतोंच आहों. असा जो केवळ पूर्ण नव्हे तर पूर्णयिता आहे तोच खरा पूर्ण वा परिपूर्ण म्हणावयाचा. ज्याला कुणापासून कशाची अपेक्षा नाहीं. तो पूर्ण होय आणि असा निरपेक्ष असून जो विश्वाला सर्वतोपरी परिपूरित करीतच चालला आहे, त्यांत कुठें खंड म्हणून नाहीं, तो पूरयिता म्हणावयाचा.' बदरिकाश्रमांत नरनारायण ऋषि तपश्चर्या करीत बसले आहेत. त्यांचा तपोभंग करण्यासाठीं इन्द्रानें कामदेव वसंत आणि देवस्त्रिया इत्यादींचें सैन्य पाठविलें होतें. पण ते ऋषि पूर्णकाम होते. त्यांना कशाचीच ददात नव्हती. उलट त्यांनींच ज्या वरस्त्रियांचें अमिष देव दाखवीत होते. त्यांच्याहून अतिशय सुंदर अशा अप्सरा त्यांना दाखविल्या. त्यांच्या रूपानें व गंधानें देव हतप्रभ झाले. तेव्हां नारायणानेंच त्यांना त्या अप्सरांपैकीं एक देवलोकास घेऊन जाण्यासाठीं सांगून अनुगृहीत केलें. हें त्या परमात्म्याचें पूरयितृत्व होय. परमात्मा स्वतः निरपेक्ष असल्यामुळें पूर्णकाम आहे आणि सर्व पुरुषार्थाचा दाता असल्यामुळें पूरयिता म्हटला आहे. पूरयिता म्हणजे सर्वकामपूरयिता.

## ६८७. पुण्य

पुण्य म्हणजे पावन, पवित्र. सहस्राच्या प्रास्ताविक भागांत "पवित्राणां पवित्रं यो मंगलानां च मंगलम्" म्हणून ज्याचें गौरव आलेंच आहे. तो परमात्मा सर्व शुद्धिकारक तत्त्वांत, म्हणजे पुण्यांत, परम श्रेष्ठ आहे. तो परम पवित्र आहे. शुद्धि म्हणजे मलापनयन. शरीराचा मल दूर करायला मृद् जल अग्नि इत्यादि उतरोत्तर पावन तत्त्वें आहेत. त्यांच्यायोगें आपण गात्र-शुद्धि तशीच वस्त्रपात्रादि-शुद्धि करीत असतों. परंतु अन्तःशुद्धि त्यांच्या योगें होत नाहीं. मनाचा मल धुवायला त्यांचा उपयोग होत नाहीं. तो मनाचा मल म्हणजे मनोविकार होत. काम क्रोध लोभ मोह मद मत्सर आणि तज्जनित आसुर दुःशील यांच्या योगें सगळें जग जळत आहे. यांतून, या संसारतापांतून, या भूतद्रोहाच्या वणव्यांतून वांचवून शान्ति देणारें जें आत्मज्ञान तेंच पुण्य होय. आणि परमात्मा हा ज्ञानस्वरूप असल्यामुळें तो सहजच पुण्य म्हटला आहे. सर्व प्रमाद, अपराध, पातकें स्वरूपाच्या अज्ञानामुळेंच होत असतात. म्हणून तें अज्ञान महापाप होय, महामल होय. आणि तें पाप दूर करणारें आत्मज्ञान परम पवित्र होय, परम पुण्य होय. त्या आत्मज्ञानाचा प्रसार घरोघर व्हावा अशी तळमळ संतांना लागून राहिली आहे याचें हि कारण हेंच होय. सामाजिक सुखशान्तीचा आधार राजाची बाह्य दण्डनीति नसून ऋषींचें आंतरिक आत्मज्ञान आहे, तन्मूलक धर्मनीति आहे, सदाचार आणि सद्व्यवहार आहे. हें वैदिक दर्शन आहे. भारतीय समाजशास्त्र या आधारावरच रचलेलें आहे. भारतीय शिक्षणशास्त्र हि याच बुनियादीवर उभें आहे. परंतु आधुनिक काळांत पाश्चात्त्यांच्या आक्रमणामुळें या सगळ्याचा विसर पडला आहे. आणि भारतीय नेतृत्व भ्रान्त झालें आहे. देहासक्ति आणि देहपरायणता हें त्याचें फलित आहे. हीच आसुर संस्कृति.

## ६८८. पुण्यकीर्ति

पुण्यकीर्ति म्हणजे पुण्यश्लोक. ज्याची कीर्ति म्हणजे नामस्मरण पावन आहे तो पुण्यकीर्ति होय, पुण्यश्लोक होय. "पुण्यश्लोको नलो राजा पुण्यश्लोको युधिष्ठिरः। पुण्यश्लोका च वैदेही, पुण्यश्लोको जनार्दनः॥" असें पुण्यश्लोक पुरुषांचें स्मरण आपण करीत असतो हे पुरुष पुण्यश्लोक कशानें झाले? त्यांच्या धर्मनिष्ठेमुळें, धर्ममय जीवनामुळें. निष्ठा तत्त्वदर्शनरूप असते. धर्म आचारस्वरूप असतो.

ज्याला गन्तव्याचाच पत्ता नाहीं त्याला मार्गाचा शोध कसा लागणार? आणि मार्ग माहीत नसतांना तो मार्गक्रमण कसें करूं शकेल? त्यासाठीं तपस्या, साधना कशी करणार? ज्यांचा परमार्थनिश्चय झाला आहे आणि त्यासाठींच ज्यांनीं आपलें समग्र जीवन समर्पिलें आहे तेच पुरुष पुण्यश्लोकपदवीस पात्र होत. प्राचीन काळींच असे पुरुष होऊन गेले असें नाहीं. आधुनिक काळांत हि असे पुरुष झाले नि आहेत. रामकृष्ण अरविंद गांधी स्वाइटझर विनोबा हे असेच पुण्य पुरुष होत. चिंचीचें नांव घेतल्याबरोबर जसें तोंडास पाणी सुटतें, तसें ह्यांचीं नांवें घेतल्याबरोबर पुण्य जीवनाचा रस निर्माण होतो, मनुष्य पुण्यजीवनाकडे वळतो. म्हणून हे पुण्यश्लोक होत. पण ह्या महापुरुषांना हें स्वच्छ तत्त्वदर्शन आणि त्याच्या प्राप्तीसाठीं लागणारी अनन्यता कोण देतो? कोणाच्या नामस्मरणानें त्यांना हें बळ मिळतें? हें बळ तो आदर्शमूर्ति अन्तर्यामी परमात्माच देत असतो. म्हणून तोच एक खरा पुण्यकीर्ति म्हणावयाचा. त्याच्या अंशमात्रानें हे सारे महापुरुष पुण्यश्लोक म्हटले जातात.

### ६८९. अनामय

न आमय: अस्मिन् इति अनामय:। ज्याच्या ठाईं कसला हि आमय म्हणजे रोग संभवत नाहीं तो निर्गुण निराकार निरुपद्रव परमात्मा अनामय म्हणावयाचा. जन्म मृत्यु जरा व्याधि दु:ख दोष ही उपद्रव-मालिका ही अनर्थ-परंपरा देहानुषंगी आहे, देहाबरोबर ती येते. पण देहांतून सुटका झाली तर तीच काय पण तिची छाया हि उरणार नाहीं. म्हणून आमचा आदर्श हा देहनिरपेक्ष आहे. आम्ही देही असलों तरी आमचा आदर्श देहबद्ध नाहीं. या ''नरदेहाचेनि साधनें। सच्चिदानन्दपदवी घेणें'' हें आमचें उद्दिष्ट आहे. देहातीत आरोग्य देहांत गुंतून कसें साधणार? देहासक्ति तर त्या आरोग्याचा उघड उघड विरोध आहे. म्हणून त्या परम आरोग्याचा उपाय परम वैराग्य आहे. हें परम वैराग्य आत्मज्ञानानेंच लाभतें. आधीं अंधकार मावळतो आणि मग उष:काल होतो असें म्हणतां येणार नाहीं. कार्य-कारणांची अशी गल्लत करतां कामा नये. आत्मज्ञान कारण आहे, वैराग्य त्याचें कार्य आहे. कारणाधीन कार्य असतें, कार्याधीन कारण नव्हे. तेव्हां आत्मज्ञानाचा उदय झाला म्हणजे देहासक्तीचा अंधकार नाहींसा होतो. ही ब्राह्मी स्थिति होय. आसक्ति मावळून देह हि गळाला कीं आत्मज्ञानाचा सूर्योदय झाला म्हणून समजावें. हेंच ब्रह्मनिर्वाण. आणि हेंच अनामय पद म्हणावयाचें. ''न हि सशरीरस्य सत: प्रियाप्रिययोर् अपहतिर् अस्ति'' जोंवर शरीर आहे तोंवर उपद्रव, कांहीं अनुकूल कांहीं प्रतिकूल वेदना, होतच राहणार. साम्याचा अनुभव, तो अमृतानुभव, अज्ञान आणि अज्ञानजनित देह या दोहोंतून परिमुक्त पुरुषालाच संभवतो. अनामय पद देहमुक्ति आणि अमृतपद तदुत्तर आत्मानुभव सूचित करणारें आहे. ''पदं गच्छन्त्यनामयम्'' ''अमृतत्वाय कल्पते'' इत्यादि गीतेच्या वचनांत तीं आलीं आहेत.

### ६९०. मनोजव

मनस: जव इव जव: यस्य स: मनोजव:। ज्याचा जव म्हणजे झेप मनासारखी आहे तो मनोजव म्हणावयाचा. वेग हें तारुण्याचें लक्षण आहे. आमचा बलवंताचा आदर्श म्हणजे मारुति. त्याचें वर्णन मनोजव मारुततुल्यवेग असें आलें आहे. म्हातारा हा वृत्तीनें नाउमेद आणि शरीरानें गलितगात्र असतो. त्याच्या मनांत ना स्फूर्ति, ना शरीरांत त्राण! पण तरुण कसा असतो : ''आशिष्ठो द्रढिष्ठो बलिष्ठ:'' त्याच्या मनांत अपार स्फूर्ति आणि शरीरांत विजेसारखी चपळाई असते. त्याच्या देहामनांत नुसता संचार असतो. परमात्मा हा तर चिर तरुण आहे. त्याच्या ठाईं जरा हि निराशा निरुत्साह नाहीं कीं आळस ढिलेपणा नाहीं. 'आंग मनापुढे घे दौडा' अशी तडफ त्याच्या ठिकाणीं आहे. त्याच्या मनांत

येण्याचा नि तोंडातून शब्द बाहेर पडण्याचा अवकाश कीं ती गोष्ट अमलांत आलीच म्हणून समजा. तो भूः म्हणाला आणि हा भूर्लोक झाला. परमात्मा हा असा सत्यसंकल्प असल्यामुळें तो मनोजव म्हटला आहे. आमचें मन कुठें हि निमिषार्धांत जातें. याहून अधिक वेगाची कल्पना आम्हांला करतां येत नाहीं. शब्दाचा वेग, प्रकाशाचा वेग एकापेक्षां एक वरचढ आहे. पण वेगांत मनाची बरोबरी करणारी वस्तु दुसरी नाहीं. म्हणून मनाची उपमा दिली. वस्तुतः ती उपमा अगदींच तोकडी आहे. गन्तव्याहून म्हणजे पोंचायच्या स्थळाहून अधिक वेग कोणत्या गन्त्याचा असूं शकेल? मन हें कांहीं झालें तरी गन्तृ आहे, वाटसरू आहे. तें गन्तव्य जें आत्मतत्त्व त्याहून, मुक्कामाहून अधिक चपळाई करूं शकत नाहीं. म्हणून उपनिषदांनीं म्हटलें आहे ''अनेजत् एकं मनसो जवीयः'' तें आत्मतत्त्व एकच एक आणि हालचाल न करणारें (अर्थात् सर्वव्यापी) असून मनाहून वेगवान् आहे.

## ६९१. तीर्थकर

तीर्थकर म्हणजे तीर्थ करणारा. पण तीर्थ म्हणजे काय? तीर्थ शब्दाचे तीन अर्थ होतात (१) पुण्योदक (२) विद्या (३) सोपान वा पूल. आणि तिन्ही अर्थांनीं हें पद लावतां येईल. विष्णुपदापासून म्हणजे आकाशापासून गंगेचा म्हणजे जलप्रवाहाचा उद्‌गम झालेला असल्यामुळें भगवान् विष्णु हा तीर्थकर म्हटला आहे. आधीं तें तीर्थ ब्रह्मदेवानें आपल्या मेघरूप कमंडलूंतून विष्णुपदावर ओतलें. तिथून तें विष्णुपदावनेजन पर्वताकार शंकरानें आपल्या शिरावर धारण केलें. आणि तिथून मग तें जलचर सगर-पुत्रांच्या उद्धारासाठीं जीवनासाठीं भगीरथाच्या मागोमाग म्हणजे निम्नानुसरणानें प्रवृत्त झालें आणि सागरास मिळालें आहे. असें हें तीर्थ परमात्म्याच्या व देवांच्या कृपेनें लाभलेलें आहे. म्हणून तो परमात्मा तीर्थकर होय. मानवाचेंच केवळ नव्हे तर सर्वच जीवांचें जीवन जीवनाधीन आहे, तीर्थाधीन आहे. आणि हें तीर्थ, हा जीवनाचा जिव्हाळा, जीवनाची ही ओल परमात्म्यापासून लाभलेली म्हणून तो तीर्थकर म्हटला आहे. पण एवढ्यानें जीवितसाफल्य होत नाहीं. तें विद्येनेंच होतें. म्हणून विद्या हेंच खरें तीर्थ म्हणावयाचें. विद्येवांचून जें जीवन तें जीवन नसून तो नुसता जीवनाकार आहे. खरें जीवन ज्ञानमय आहे. तें ज्ञान, ती विद्या परमात्म्यापासूनच गुरुद्वारा माणसाला मिळतें. त्या बळावरच तो आज आकाशाला गवसणी घालूं पहात आहे. त्यानें आश्चर्यकारक प्रगति केली आहे. म्हणून तो ज्ञानदाता तीर्थकर म्हटला आहे. पण एवढ्यानें हि खरें वा पुरें साफल्य लाभत नाहीं. तें आत्मज्ञानानेंच लाभतें. तेंच ज्ञान सोपानरूप आहे. भवनदीच्या पार उतरवणारें आहे. म्हणूनहि किंबहुना म्हणूनच तो परमात्मा तीर्थकर म्हणावयाचा. तीर्थकरचेंच दुसरे रूप तीर्थंकर होय. त्या एकट्या परमात्म्यापासूनच आमचें जीवन, आमचें ज्ञानमय पोषण आणि आत्मज्ञानपूर्वक साफल्य होतें. म्हणून आपण सर्व सतीर्थ आहों आणि तो परमात्मा आमचा तीर्थरूप आहे, तीर्थकर आहे.

## ६९२. वसुरेता

वसु रेतः यस्य सः वसुरेताः। वसु हें ज्याचें रेत म्हणजे वीर्य होय, गमक होय तो वसुरेता म्हणावयाचा. पण वसु म्हणजे काय? वसु म्हणजे हिरण्यरत्नादि धन. हिरण्यगर्भ शब्द वसुरेताचा समानार्थक म्हणतां येईल. परमात्मप्रतीक सूर्य हा हिरण्यगर्भ आहे, वसुरेता आहे. सगळी धातु-संपत्ति त्याच्या ठाईं एकवटली आहे. त्याच्यापासूनच ती सूर्यमालेतील ग्रहांना अंशतः लाभली आहे. असल्या सूर्यमाला या अनन्तकोटि ब्रह्माण्डांत किती आहेत कोण सांगूं शकेल? या सर्वांच्या ठाईं जें उपादानभूत वसु आहे तें परमात्म्याचें रेत होय, परमात्म्याचें वीर्य नि गमक होय. मुलगा बापाचें गमक असतो म्हणूनच तो मूलगः म्हणावयाचा. ''मूलं गमयति बोधयति

इति मूलगः'' मूल पाहिलें म्हणजे त्याचा बाप असला पाहिजे हें अनुमान सहजच होतें. तसें वसु म्हणजे व्यक्त द्रव्य पाहिलें म्हणजे त्याचा स्वामी तो जो अव्यक्त परमात्मा तो असला पाहिजे असें सहजच अनुमान होतें. म्हणून वसु म्हणजे हा द्रव्यात्मक व्यक्ताकार ज्याचें रेत म्हणजे गमक आहे तो अव्यक्त अक्षर परमात्मा वसुरेता म्हणावयाचा. कोळ्याचें जाळें पाहून जसें त्याचें निमित्त व उपादान दोन्ही हि कारणें असलेल्या कोळ्याचें सहजच अनुमान होतें तसें हें जगद्रूप वसु पाहून त्या जगत्कर्त्याचें अनुमान होतें. रेतस् शब्द वीर्यवाचक आहे. वीर्य म्हणजे निर्माण- क्षमता. ही क्षमता द्विविध आहे– उपादानरूप आणि निमित्तरूप. उपादान द्रव्यरूप, तर निमित्त शक्तिरूप आहे. दोन्ही मिळून क्षमता होते. ही द्विविध क्षमता परमात्म्याच्या ठाईं आहे. म्हणूनच हा व्यक्ताकार त्यानें निर्मिला म्हणावयाचा. रेतस् शब्द चिन्ह वा गमक म्हणून हि येतो–''मनसो रेतः प्रथमं यदासीत्'' इत्यादि उदाहरणें आहेत. हे दोन्ही अर्थ इथें एकवटले आहेत.

### ६९३. वसुप्रद

वसुप्रद म्हणजे फलप्रद. जीव कांहीं संकल्प करतो. त्या संकल्पानुसार कर्म करतो. पण त्या कर्माचें फल मिळणें न मिळणें त्याच्या अधीन नाहीं. परमात्म्याचा अनुग्रह होईल तरच तें मिळणार. म्हणून परमात्मा हा वसु म्हणजे कर्मफल देणारा म्हटला आहे. सगळीं कर्में परमात्म्याच्या व्यापक योजनेनुसार यथाकाळ फळत असतात. ही योजना जीवाला कळत नाहीं त्यामुळें जीवाचीं कर्में कधीं फळतात तर कधीं जळतात. जेव्हां परमात्म्याच्या व्यापक योजनेस तीं धरून असतात तेव्हां तीं फळतात, जेव्हां ती प्रतीप जातात तेव्हां जळतात. ''दैवं चैवात्र पञ्चमम्'' म्हणून जें म्हटलें आहे तें हेंच होय. दैव म्हणजे देवचिकीर्षित, दैवी योजना. परमात्मा फलदाता असला तरी तुम्ही कांहीं न करतांच तुम्हांला तो देतो असें नव्हे. तसें केल्यास तुम्ही भिकारी ठरतां. परमात्मा जीवांना स्वाभिमानशून्य भीक मागणारे मानीत नाहीं, तर स्वाभिमानी मजूर मानतो. चाकरी करा, भाकरी खा. जो मजुरी न करतां खाईल तो चोर ठरेल. भीक मागणें अनाचार आहे. चोरी करणें दुराचार आहे. हीं दोन्ही टोंकें वर्ज्य करून काम करून पोट भरणें हा मधला मार्गच सदाचार होय. याचेंच नांव यज्ञ आहे. जो असा प्रामाणिक धंदा म्हणजे यज्ञ करतो त्याला परमात्मा इष्ट फळ देतो. त्याची इह लोकीं शरीर-यात्रा चालते. तो राजमान्य होतो. राजा त्याचें रक्षण करतो. जो असा प्रामाणिक उद्योगधंदा करीत नाहीं. त्या भिकाऱ्याची लोकांत मानहानि होते. आणि चोर समाज-बहिष्कृत होऊन राजदंडित होतो. मरणोत्तर त्यांना सद्गति मिळत नाहीं. ते नरकास जातात. अर्थात् परमात्मा हा इष्टकामधुक् आहे. इष्टफलदाता आहे. इथें इष्ट पद श्लिष्ट आहे. इष्ट पद क्लिष्ट आहे. इष्ट म्हणजे इच्छा, इष्ट म्हणजे यज्ञ-कर्म. परमात्मा जशी इच्छा, जसें कर्म, तसें फळ देतो.

### ६९४. वसुप्रद

वसुप्रद हें पद लगेंच मागें येऊन गेलेलें असून तें परत आलें आहे. सहस्रांत आवृत्त पदें अनेक आहेत, पण याच्या सारखें निरन्तर म्हणजे लागोपाठ द्विवार आलेलें पद दुसरें नाहीं. आधीचें वसुप्रद पद मागील चरणाच्या किंबहुना श्लोकार्धाच्या शेवटीं आलेलें असून हें पुढील श्लोकार्धाच्या आरंभीं आलेलें आहे. त्यामुळें इथें दामयमक साधलें गेलें आहे. कवनांत अशी रचना पुष्कळदां सहज होत असते. तशीच ही आहे. पण टीकाकाराला त्यांत साभिप्रायता दिसते आणि तो त्याच पदाचें वेगळें विवरण करतो. कारण शक्यतों सबंध रचना साभिप्राय आणि अर्थपूर्ण आहे, निर्दोष व गुणसंपन्न आहे, असें दाखवून देणें हेंच तर त्याचें काम! शिवाय मूळ शब्दरचना ही अव्यक्तवत् असते. तिच्यांतून कितीहि व्यक्त अर्थ काढला तरी

तो योग्यच आहे. तो काढून घेतल्यावर मूळ अव्यक्त स्थानीय शब्द परत पूर्ववत्‌च अन्यून पूर्ण राहतो. दुसऱ्या टीकाकाराला हि तो कामधुक्‌च होतो. हवा तो आणि हवा तितका अर्थ खुशाल दोहून घ्यावा. शब्द हवा तितका अर्थ वहन करील पण अनर्थ अणुमात्र हि सहन करणार नाहीं, एवढें मात्र लक्षांत असूं द्यावें.

परमात्मा उपनिषदांत वसुदान म्हटला आहे. वसुदान म्हणजेच वसुप्रद. मागील पदाच्या चिंतनांत आपण पाहिलें कीं परमात्मा हा वसुप्रद म्हणजे कर्मफलप्रद आहे. इथें तेंच पद त्याहून उच्च अर्थानें ज्ञानफल-प्रद या अर्थानें आलें आहे. परम पुरुषार्थ, मोक्ष या अर्थानें आलें आहे. वसु म्हणजे द्रव्य, अर्थ. जो परम अर्थ होय तोच इथें वसु पदानें घ्यावयाचा. मागील पदांत त्रिवर्ग, धर्म अर्थ, काम, घेतला आहे. वसु शब्दाचें धन, फल आणि आत्मलाभ असे सामान्य आणि विशिष्ट अर्थ होतात. यथावसर ते घ्यावयाचे.

### ६९५. वासुदेव

"पुरुष एव इदं सर्वम्" "ईशावास्यं इदं सर्वम्" वासुदेवः सर्वम् (इति)" हीं क्रमानें वेद उपनिषदें आणि गीता यांत आलेलीं वचनें आहेत. आणि तीं सर्व समानार्थक आहेत. एकच भाव आणि एकच भाषा हि या वचनांत आलेली आहे. वैदिक धर्माचा हा मूलमंत्र आहे. आजतागायत तो अक्षुण्ण चालत आला आहे आणि पुढें हि चालत राहील. त्यांतच आमचें सारें दर्शन आणि आमचा धर्म सांठवलेला आहे. या तीन वचनांत जसें एकत्व आहे तसें कांहीं भिन्नत्व हि आहे. बाष्प, जल आणि हिम हीं तिन्ही एकाच वस्तुचीं जशीं उत्तरोत्तर स्थूल रूपें होत तशीं आत्मा, ईश्वर आणि अवतार हीं निर्‌गुण सगुण आणि साकार एकाच परमात्म्याचीं रूपें होत. "देहवंतास अव्यक्तीं सुखें बोध घडे चि ना" म्हणून उपासनेसाठीं सगुण-साकाराची कास धरली जाते. पण तिथें हि निर्‌गुणमाहात्म्याचें विस्मरण चालणारें नाहीं. राजानें भिकाऱ्याचें सोंग घेतलें तरी त्याला मनोगन ओळखणारे त्याच्याशीं राजा म्हणूनच व्यवहार करतील. तद्वत् सगुण साकार अवताराशीं वा व्यक्तीशीं वागतांना तो निर्‌गुण निराकार अव्यक्त भाव आहे हें ओळखूनच वागायला हवें. हा माझा पुत्र मित्र शत्रु म्हणून विषम व्यवहार करतां कामा नये. वासुदेवानें गीतेंत स्वमुखानें हेंच तर सांगितलें आहे: "अव्यक्तं व्यक्तिमापन्नं मन्यन्ते मां अबुद्धयः। परं भावं अजानन्तो ममाव्ययमनुत्तमम्" अर्जुन हि आपण व्यक्ताकारानें फसलों आणि त्या निर्‌गुण निराकार सर्वव्यापी विश्वरूपाचा अवमान केला या बद्दल क्षमा मागतो आहे: "सखेति मत्वा प्रसभं यदुक्तं हे कृष्ण हे यादव हे सखेति। अजानता महिमानं तदेदं मया प्रमादात् प्रणयेन वापि।। यच्चाव-हासार्थमसत्कृतोऽसि विहार-शय्यासन-भोजनेषु। एकोऽथवाप्यच्युत तत्समक्षं तत् क्षामये त्वां अहमप्रयेयम्।।" म्हणून 'वसुदेवस्य अपत्यं पुमान् वासुदेवः' अशी जरी व्युत्पत्ति असली तरी तो व्यक्त वासुदेव हि तो अव्यक्त परमात्माच होय, जो प्रति-वसु म्हणजे प्रतिव्यक्ति वसला आहे. अर्थात् वासु म्हणजे वसु-अधिष्ठात्री देवता.

### ६९६. वसु

वसति सर्व अस्मिन् इति वसु। अथवा सर्वस्मिन् वसति इति वसु। हें समस्त विश्व ह्याच्या ठाईं वसतें म्हणून हा वसु म्हणावयाचा. अथवा हा सर्वांच्या ठाईं वसला आहे म्हणून वसु म्हणावयाचा. सर्पाभासाचें अधिष्ठान् जशी रज्जू तसा परमात्मा हा या विश्वाभासाचें अधिष्ठान होय. म्हणून तो वसु म्हणजे विश्वावसु म्हणावयाचा. शंकराचार्यांनीं आपल्या प्रातःस्मरणांत या वसूचें असें स्मरण केलें आहे : "यस्मिन्निदं जगदशेषमशेषमूर्तौ रज्जवां भुजंगम इव प्रतिभासितं वै।" रज्जूची सत्ता नसेल तर सर्पाभास हि होऊं शकणार नाहीं. म्हणून परमात्म्याची जी चित्‌सत्ता आहे तिच्या अधिष्ठानावर हें सर्व विश्व उभें आहे.

ज्यांच्या आश्रयानें वसति होते त्यांना वसु म्हटलें आहे. हे असे वसु अष्ट मानिले आहेत (१) सूर्य म्हणजे स्वच्छ सूर्यप्रकाश आणि कालसाधन, (२) अग्नि म्हणजे शीत-भय-निवारण आणि पाकयज्ञ, (३) जल म्हणजे स्नानपानादि-साधन आणि औषध, (४) भूमि म्हणजे वसतीस योग्य आणि सुपीक क्षेत्र. त्याचबरोबर गोचरभूमि व श्मशानभूमि हि, (५) वायु म्हणजे स्वच्छ वाहता आणि वर्षावह पवन, (६) आकाश म्हणजे निरभ्र चंद्रतारकाखचित खुलें आकाश, (७) ध्रुव म्हणजे दिग्देशसाधन आणि उत्तर गोलार्धांतील इष्टतर निवसन आणि (८) राजा म्हणजे दर्शनसंपन्न नेता. हे अष्ट वसु जिथें उपलब्ध असतील तिथें वसाहत करावी. या सर्वांत मुख्य नेताच आहे. म्हणून विशेषेंकरून तो वसु म्हणावयाचा. Where there is no vision, people perish. याचा हि आशय हाच आहे. मानवाला आपलें जीवन सफळ करायचें असेल तर त्यानें दर्शनसंपन्न महापुरुषाचा संश्रय केला पाहिजे.

भूतमात्राच्या ठाईं अंतरात्मरूपानें परमात्मा वास करीत असल्यामुळें तो वसु म्हणजे विश्वावसु होय. ''अग्निर् यथैको भुवनं प्रविष्टो, रूपं रूपं प्रतिरूपो बहिश्च। एकस् तथा सर्वभूतान्तरात्मा, रूपं रूपं प्रतिरूपो बहिश् च'।

## ६९७. वसुमना

वसौ मनो यस्य सः वसुमनाः। वसूंत धनांत ज्याचें मन आहे तो वसुमना म्हणावयाचा. सर्व जीवांचें मन वसूंत लागलेलें आहे. जिथें ज्याचें धन तिथें त्याचें मन. ब्राह्मणांना विद्या हेंच धन वाटतें, म्हणजे तें सर्वस्व वाटतें. म्हणून ब्राह्मण हा विद्याधन म्हणावयाचा. क्षत्रीयांना मानच धन वाटतें. वैश्यांना गोभू-हिरण्यरत्नादिच धन वाटतें तर शूद्रांना दोन वेळ खायला मिळणें हेंच धन होय. ज्याला जें धन वाटतें तिथें त्याचें मन असतें. त्याच्या सर्व क्रिया, सर्व जीवन तत्परायण असतें. लोहाला चुंबक खेचून घेतें तसें वित्त चित्ताला खेंचून घेतें. कारण तें जीवनाधार आहे. आणि जीवनाची उपेक्षा कोणीहि करूं शकत नाहीं. जे महाभाग जीवावर उदार होतात ते देखील जीवनाचा गाभा, जीवनाचें उत्तमांग राखण्यासाठीं च होतात, म्हणजे ते खऱ्या जीवनासाठीं वरवरच्या वा स्थूल जीवनाचा त्याग करतात. शरीरावर प्रहार होऊं लागले तर हाताचा बलि देऊन डोक्याचा बचाव केला जातो, त्याप्रमाणें जीवनाच्या गाभ्यासाठीं मनुष्य वरवरच्या जीवनावरणांचा त्याग करीत असतो. अर्थात् ज्याचा त्याग तो दुसऱ्या कशाहि साठीं करूं शकत नाहीं तेंच खरें त्याचें वित्त होय आणि त्या आत्मवित्तालाच इथें वसु म्हटलें असून तो परमात्मा ह्याच अर्थानें वसुमना आहे. सगळे जीव हि वस्तुतः म्हणजे अन्तिम विश्लेषणांत ह्याच अर्थानें वसुमना आहेत. पण त्याची जाणीव त्यांना नसते इतकेंच. सामान्य नीतिवचनें आणि गीतेसारखीं परमार्थवचनें हि हीच गोष्ट आपआपल्यापरीनें सांगतात. ''आत्मानं सततं रक्षेत् दारैरपि धनैरपि'' आणि ''मय्येव मन आधत्स्व'' हीं वचनें ह्या आत्मधनाचीच जोपासना करायला सांगत आहेत. त्याचीच चिंता करायला सांगत आहेत.

## ६९८. हविः

हवि हें यज्ञाचें एक अंग आहे. पुरुषाप्रमाणें वेद षडंग कल्पिला आहे, तसा यज्ञ हि षडंग कल्पिला जाईल: (१) हुतभुक् यज्ञपुरुष (२) हुतवह अग्नि (३) हवन-द्रव्य म्हणजे हव्य (४) हवनोपकरणें (५) होता आणि (६) हवनक्रिया वा हवि. आतां या सर्वांत महत्त्व कशाला असेल तर तें हवनक्रियेला होय. कारण हवनक्रिया केली असतां सर्व उपस्थित होतात. पण हवनक्रिया न केली तर इतर सारे असून नसल्यासारखेच होत. हवन करावें तेव्हांच यज्ञदेवता हुतभुक् म्हटली जाईल, तेव्हांच अग्नि हुतवह होईल. तेव्हांच हुतद्रव्य हव्य म्हटलें जाणार, तेव्हांच कुण्ड-भाण्ड-स्रुक्-स्रुवादि

हवनोपकरणें म्हटलीं जाणार आणि तेव्हांच यज्ञकर्ता होता म्हटला जाणार, तत्पूर्वी नव्हे. म्हणजे यज्ञाचें मर्म यज्ञकर्म आहे, हवि आहे. आणि म्हणून परमात्मा यज्ञ-कर्म आहे, हवि आहे. आणि म्हणून परमात्मा हवि म्हटला आहे. वस्तुतः तर तो यज्ञपुरुष आहे. परंतु यज्ञक्रियेमुळेंच सर्व यज्ञांगें निर्वर्तित होत असल्यामुळें त्या यज्ञक्रियेला, हविर्हवनाला, विशेषेंकरून यज्ञत्व येतें. म्हणून तो यज्ञात्मा परमात्मा हवि म्हटला आहे. पण हविशब्दानें तर हवनक्रियेऐवजीं मुख्यतः हवन-द्रव्यच अभिप्रेत आहे असें नव्हे का? तसें म्हणतां येईल, पण हव्य आणि हवि यांत अंतर आहे. हव्य म्हणजे हविर्द्रव्य आज्य-तिल-तण्डुलादि आणि हवि म्हणजे हविर्भाग आहुति जी स्वाहाकाराबरोबर अग्नींत अर्पिली जाते. आणि त्यामुळें हवि म्हणजे हवन, अर्पणक्रिया, स्वाहाकार असा अर्थ निष्पन्न होतो. परमात्मा हा यज्ञपुरुष असल्यामुळें कोणत्याहि यज्ञांगानें त्याचें स्मरण होऊंच शकतें. इथें तें हवि पदानें केलें आहे.

## ६९९. सद्गति

"सद्गतिः सत्कृतिः सत्ता सद्भूतिः सत्-परायणः" या श्लोकार्धांत सद्रूप परमात्मा गाइला असून त्याला सत्योपासक कसा पोंचतो त्याचें सूत्र हि आलें आहे. प्रथम परमात्मा हा सद्गति आहे. 'सती गतिर् यस्य सः सद्गतिः' ज्याचें ज्ञान सद्रूप आहे तो सद्गति म्हणावयाचा. जीवाचें ज्ञान बहिर्मुख असल्यामुळें तो असद्गति होय, अनात्मगति होय. परमात्माच एक नित्य शुद्ध बुद्ध मुक्त स्वभाव आहे. आणि म्हणून तो सद्गति सद्बोध म्हटला आहे. अर्थात् सद्गति म्हणजे आत्मज्ञ.

सतांगतिः म्हणजे सज्जनांची अन्तिम निष्ठा म्हणून हि तो सद्गति म्हटला जाईल. सत् म्हणजे आस्तिकच त्याला प्राप्त करून घेऊं शकतात. जो 'परमात्मा नाहींच' म्हणून बसला तो त्याच्या प्राप्तीचा प्रयास कसा करणार आणि त्याला पावणार तरी कसा? त्याची सद्गति व्हायची नाहीं, दुर्गतिच होणार. 'अयं लोको नास्ति परः' असेंच जो मानून बसला त्या नास्तिकाची सद्गति कशी होईल? शरीराच्या मरणा-बरोबरच आपण हि मेलों, संपलों असेंच तो मानणार. मग त्याला सद्गति कुठली? आणि या जगांत हि तो नीतीनें कशाला वागणार? "यावत् जीवेत् सुखं जीवेत् ऋणं कृत्वा घृतं पिबेत्। भस्मीभूतस्य देहस्य पुनरागमनं कुतः" असेंच तो म्हणणार. ज्याला सद्बोध नाहीं, तो सत्कृति कशी करणार? जो आत्मा मानतो, ईश्वर मानतो, परलोक मानतो, जो कर्मफल मानतो तो सत्कृतीची सदाचाराची चाड बाळगील. पण जो देहात्मवादी आहे तो सद्गति म्हणजे आस्तिक नव्हे, मग सत्कृति म्हणजे सदाचार तो कसा होणार? तो सदाचाराची चाड कां बाळगील? सत्कृति वा सदाचार हें आस्तिकतेचें प्रमाण आहे. नुसतें मी आस्तिक आहें हो असें कंठरवानें सांगणें नव्हे. उलट तो खरा नि पुरा सदाचारच नव्हे कीं ज्याच्या मुळाशीं आस्तिकता नाहीं, सद्दर्शन नाहीं.

## ७००. सत्कृति

परमात्म्याची गति म्हणजे ज्ञान जसें आत्मनिष्ठ असल्यामुळें सद्रूप आहे, तशी त्याची कृति हि आत्मनिष्ठ असल्यामुळें सद्रूपच आहे, रज्जूला जसा आपल्या ठाईं सर्पाभास होणें शक्य नाहीं, तसा परमात्म्याला आपल्या ठाईं जगदाभास आत्मभिन्नत्वानें होणें शक्य नाहीं. तथापि जगद्रूप ही परमात्म्याची कृति तदधिष्ठित म्हणजेच सदधिष्ठित असल्यामुळें ती सत्कृति होय आणि तो परमात्मा हि सत्कृति म्हणावयाचा. रज्जूत्वानें सर्पभास सत् म्हणावयाचा. एरव्हीं तो सर्पत्वानें मिथ्या आहेच. "ब्रह्म सत्यं जगद् मिथ्या" या वेदान्तडिण्डिमघोषाचें हेंच तात्पर्य आहे. हें तात्पर्य लक्षून जें वर्तन, जो व्यवहार, जी

कृति घडेल ती सत्कृति होईल. म्हणूनच म्हटलें आहे "न क्रोधो न च मात्सर्यं न लोभो नाशुभा मतिः। भवन्ति कृतपुण्यानां भक्तानां पुरुषोत्तमे॥" ज्याला सद्वस्तूची आत्मतत्त्वाची ओळख पटली आहे तो देहात्मबुद्धि बाळगून 'मी माझा' ही भेदभावाची भाषा सोडील. कपट हिंसा लोभ इत्यादि असद्भावांनीं अभिभूत होणार नाहीं. त्यांच्या आहारीं जाऊन पशुवत् कोणाशीं हि वैर विरोध करणार नाहीं. सर्वत्र विवेकयुक्त समतेचा व्यवहार करील. असा साम्ययोगी पुरुषच सत्कृति म्हणावयाचा. ही सत्कृति सद्दर्शन-मूलच असेल. किंबहुना सर्वत्र समदर्शन हीच सत्कृति होय. कारण कोणती हि कृति देहाश्रित असल्यामुळें तिच्यांत वैषम्य-वैर्घृण्यादि दोष कमी अधिक मात्रेंत येणारच येणार. कुठें बसायचें झाल्यास ती जागा झाडून बसावें लागणार. तसें करतांना तिथल्या जीवांना मुंग्या वगैरेंना हुसकवून द्यावें लागणार. पाणी प्यायचें झाल्यास गाळावें लागणार. खायचें म्हणजे हि इतर जीवांचा द्रोह होणार. या सूक्ष्म आणि दूरच्या गोष्टी सोडून मानवव्यवहार घेतला तरी त्यांत या समळ्या विषम प्रकारांना टाळतां येत नाहीं. अनिच्छन्नपि देहानुषंगामुळें भूत-द्रोह होतो. म्हणून देहभाव विसरून आत्मचिन्तन करणें, आत्मनिष्ठ होणें हीच सत्कृति म्हणावयाची आणि तींत परमात्म्याहून श्रेष्ठ दुसरा कोणी असूंच शकत नाहीं म्हणून तो सत्कृति.

## शतक आठवें

### ७०१. सत्ता

सद्गति म्हणजे सद्दर्शन आणि सत्कृति म्हणजे सदाचार यांच्या योगें साधकाचें जीवन उत्तरोतर सद्रूप बनत जातें. शेवटीं देहादि सर्व असत् गळून जाऊन, जळून जाऊन तो निखळ "सत्ता" म्हणजे सद्भाव बनतो. त्याच्या ठाईं असताचा लवलेशहि राहत नाहीं. "सा काष्ठा सा परा गतिः" ही चरम आणि परम स्थिति होय. इथें नाम रूप गुण कर्म कशाचाच संपर्क असत नाहीं. असतें तें केवळ असतेपण. त्यालाच सत्ता म्हणावयाचें. पण हें असतेपण हि नसतेपणाच्या कल्पनेवांचूनचें केवलस्वरूप असतेपण समजावयाचें. कारण तें अद्वितीय आहे. नसतेपणाच्या विरोधांत उभें राहणारें किंवा दुसऱ्या असतेपणाच्या वेगळेपणानें हि उभें ठाकणारें असतेपण तें नव्हे. आणि तें भावरूप असल्यामुळेंच तर त्याला सत्ता म्हणावयाचें. म्हणून त्याला वेगळें विरोधी या दोन कल्पांबरोबर अभावरूप वा शून्य हि म्हणतां यावयाचें नाहीं. वस्तूमात्राचे होणारे जे हे तीन कल्प, त्यांपैकीं कशांतच त्याची गणना होऊं शकत नाहीं म्हणून ती "सत्ता" तें असतेपण खरोखर निरुपमच होय. त्याला साम्यानें विरोधानें वा अभावानें हि दुसऱ्याच्या जोडीस उभें करतांच येत नाहीं. त्याला प्रतिपक्ष कल्पितांच येत नाहीं असें तें एकमेवाद्वितीय आहे, केवलस्वरूप आहे. तें सजातीय विजातीय भेदरहित एकमेवाद्वितीय असलें तरी एकाच देहाचे जसे मुंडकें धड हातपाय असे विभाग असतात तसे स्वगत भेद हि त्यांत असूं शकतील म्हणावें तर तें हि नाहीं. एकनाथांनीं म्हटल्याप्रमाणें तो सन्मात्र परमात्मा "पाठ ना पोट अवघा निघोट" असा "सर्वांगीं देखणा सर्वावरिष्ठ" आहे. ही परमात्मसत्ता "वैदिक ऋषींनीं "यतेमहि स्वराज्ये व्यचिष्ठे बहुपाय्ये" इत्यादि मंत्रांत स्वराज्य म्हणून संबोधिली आहे. तिच्या संपादनासाठीं त्यांनीं पराक्रमाची पराकाष्ठा केली आहे. आणि या सत्तेसाठीं सर्वांनीं खुशाल स्पर्धा करावी. तिथें कुणास कुणाचें भय नाहीं, कशाचें भय नाहीं. ती अकुतोभय आणि सर्वतोभद्र आहे. अनतिस्पृहणीय आहे.

### ७०२. सद्भूति

चंदनाचा वृक्ष जसा सर्वांगीं चंदन असतो तसा परमात्मा हा सत् आहे. त्याचें बीज पत्र पुष्प फळ सारें सत् आहे. हा सारा विस्तार, ही भूति सद्रूपच आहे. म्हणून तो परमात्मा सद्भूति म्हणावयाचा. सूर्य प्रकाश-स्वरूप असतो आणि त्याची प्रभा हि प्रकाशमयच.

तद्वत् परमात्मा हा सद्रूप आहे आणि त्याची भूति म्हणजे विश्ववैभव हि, प्रभावळ हि सत्स्वरूपच.

प्रकाशाशीं जसा अंधाराचा सांधा कुठें हि केव्हांहि जुळूंच शकत नाहीं तद्वत् सताशीं असताचा संपर्क होऊं शकत नाहीं. प्रकाशाचा अभाव म्हणजे अंधकार. त्याचा प्रकाशाशीं संबंध कसा असणार? पण तर्ककुशल या असंबंधालाच विरोध-संबंध म्हणून मोकळे होतील. पण सताचा असताशीं एवढा हि संबंध नाहीं. तो सद्रूप परमात्मा सदसद्विभागाला गिळून विराजमान आहे. ही जी त्याची अतिसदसत् सत्ता ती त्याची भूति म्हणावयाची.

एका बीजापोटीं फळें कोटि-कोटि होतात. ही त्या बीजाची भूति होय. तशी सताची भूति म्हणजे हा विश्वाकार विवर्त होय, असें हि म्हणतां येईल. पण विवर्ताच्या योगें मूळ वस्तु वाढत नाहीं वा घटत नाहीं. तद्वत् सन्मात्र परमात्मा सद्भूतिरूप विश्वाकाराच्या योगें वाढत वा घटत नाहीं. तो कूटस्थनित्य अविकृतच राहतो. वस्तुतः ही अविकृतताच त्या सद्रूपाची भूति होय. पण अज्ञानानें विवर्ताला, या विश्वाकाराला भूति म्हटलें जातें. जनकासारखे ज्ञानी या सद्भूतीच्या बळावरच 'मिथिलायां प्रदीप्तायां न मे दह्यति किंचन' असे आत्मप्रत्ययाचे बोल बोलत असतात. अशा प्रकारें खरोखर ती सद्भूति किंचनमात्र जरी अहंता ममता उरली असेल तर त्याला तो अकिंचन-धन, तो सद्भूति परमात्मा, भेटावयाचा नाहीं.

## ७०३. सत्परायण (:)

सन् च असौ परायणं च सत्-परायण: ! सत् असून जो परायण म्हणजे परम गति होय तो परमात्मा सत्-परायण म्हणावयाचा. असत् ही वस्तुतः गतिच असूं शकत नाहीं, मग परम गति कशी असणार? सर्वांचा निषेध एक वेळ होऊं शकेल, पण सत् चा निषेध होऊं शकत नाहीं म्हणून तेंच पर अयन, परम गति होय. सत्च परमात्मा असून तोच पर म्हणजे श्रेष्ठ अयन वा गति होय म्हणून त्याला सत्परायण म्हणावयाचें. आपण गाढ झोंपतों तेव्हां कुठें जातों? तेव्हां हें विचित्र विश्व विलीन होऊन जातें आणि मी मनुष्य, ब्राम्हण, पुरुष, अमुक, असा इत्यादि अहंभाव हि नाहींसा होऊन जातो. उरतें तें एक सत्. आणि तें उरतें म्हणूनच त्याला सत् म्हणावयाचें. त्यांतच सारें पिण्ड तसें ब्रह्माण्ड प्रत्यह आणि प्रतिकल्प विलीन होत असतें. म्हणूनच तें म्हणावयाचें परायण. सर्वांची गति त्यांतच होते. त्यांतच सारें विलीन होतें. हें जें चराचर दिसतें तें सारेंच नाहींसें होतें म्हणून तें सत् या पदास पात्र नव्हे, तर जें अव्यक्त अक्षर आहे,ज्यांत हें चराचर लीन होतें तेंच सत् होय. तें स्वतः कुणांतच लीन होत नाहीं तर सदैव स्वे महिम्नि प्रतिष्ठित असतें. सदैव स्वरूपस्थित असतें.

हें जें सत्, हें जें परायण त्यालाच जे अनन्य भावें शरण गेले तेच या लोकीं सत्पुरुष होत. त्या सत् पुरुषांच्या ठाईंच ती परमात्मसत्ता आविर्भूत होते. म्हणून हि तो परमात्मा सत्परायण म्हणजे सत्पुरुष ज्याचें उत्कृष्ट स्थान होय असा म्हटला आहे. अशा सत्पुरुषाहून श्रेष्ठ या जगांत कांहीं नाहीं. तुकारामानें आपल्या साध्या सोप्या पण मार्मिक मराठींत हेंच असें सांगितलें आहे: "तीर्थीं धोंडा पाणी ! देव रोकडा सज्जनीं!"

## ७०४. शूरसेन

मागील श्लोकार्धांत निर्गुण निराकाराचें तर "शूरसेनो यदुश्रेष्ठः सन्निवासः सुयामुनः" या श्लोकार्धांत सगुण साकाराचें नामसंकीर्तन केलें आहे. निर्गुण निराकार हेंच चरम आणि परम तत्त्व आहे. पण तें आहे अचिन्त्य आणि अनिर्देश्य. त्याचें आकलन सहसा होत नाहीं. म्हणूनच म्हटलें आहे: "अव्यक्ता हि गतिर् दुःखं देहवद्भिर् अवाप्यते ".

पण त्या अचिन्त्यवैभव निर्‌गुण निराकाराचा संकेत सगुण साकार महापुरुषांच्या जीवनावरून होत असतो. म्हणून अवतार आणि महात्मे यांचें मोल आम्हा देहवंतांना विशेष आहे. त्यामुळेंच तुकाराम म्हणतो: "देव सारावे परते। संत पूजावे आरतें" ज्ञान आणि वैराग्य यांचा अलौकिक आदर्श आपल्या जीवनानें लोंकांत प्रत्यक्ष दाखविणारे सत्पुरुष नसते तर शास्त्रें प्रत्यक्ष प्रमाणाच्या अभावीं लटकीं ठरलीं असतीं. म्हणून गीतेइतकेंच रामायणाचें महत्त्व आहे. किंबहुना रामायणावरून जितका गीतेचा बोध गळीं उतरतो तितका प्रत्यक्ष गीतेवरून उतरत नाहीं, म्हणून रामायणाचें महत्त्व विशेष आहे. रामायणाचें म्हणजे महापुरुष-चरिताचें इथें या श्लोकार्धांत भगवान् कृष्णाचें स्मरण केलें आहे भगवान् कृष्ण हा शूर-सेनाच्या जनपदांत आणि कुळांत हि जन्मलेला. म्हणून तो शूरसेन म्हटला आहे. सिंहवत् सेन हें पद गौरवार्थानें नामांना जोडलें जातें. जसें शूरसेन वीरसेन हरिषेण भीमसेन इत्यादि. मथुरामंडल हें शूर नांवाच्या आणि अन्वर्थक म्हणजे पराक्रमी लोकांचें जनपद होतें. सुंदर स्त्रिया आणि पराक्रमी पुरुष यांच्या बद्दल प्रसिद्ध होतें. आज हि आहे असें म्हणतां येईल. त्यांच्यांत भगवान् कृष्ण हा सुंदर गुणी तसाच ज्ञानी पराक्रमी पुरुषोत्तम जन्मला. "हनुमदादि शूराणां सेना यस्य सः शूरसेनः" असा हि विग्रह होऊं शकेल. पण तो इथें अप्रस्तुत.

## ७०५. यदुश्रेष्ठ

भगवान् कृष्ण हा शूरसेन जनपदांत जन्मलेला म्हणून शूरसेन तसा त्या जनपदांतील यदुकुलांत जन्मलेला म्हणून यादव होय. यादवांत त्याच्या योग्यतेचा दुसरा कोणी नव्हता. म्हणून तो यदुश्रेष्ठ म्हटला आहे. आपल्या मार्गदर्शनासाठीं जसा आपल्या हातचा दिवाच आपल्याला मोठा तसा ज्या त्या जाती जमातीला तिच्यांतील थोर पुरुष असतो. त्यानें आपल्या क्षेत्रांत हें नेतृत्व केलें म्हणजे त्याचें थोरपण, त्याचें नेतृत्व सार्थक झालें म्हणावयाचें. जग अफाट आहे, त्याचें नेतृत्व करण्याचा आव माणसानें कां आणावा? त्यानें आपल्या भोवतालचें मर्यादित क्षेत्रच आपलें जग मानून संतोष कां करूं नये? तेवढ्यांत त्यानें आपलें पुरुषोत्तमत्व प्रकट केलें म्हणजे तो जगाचा हि पुरुषोत्तम झाला. त्यानें आपल्या काळीं पुरुषोत्तमत्व प्रकट केलें कीं तो सर्व काळचा पुरुषोत्तम झाला. खरोखर माणसाला एवढेंच करणें शक्य आहे. त्यानें ही आपली मर्यादा ओळखावी. जो आपल्या काळांतला आणि कुळांतला उत्तम तोच सर्वोत्तम होय. भगवान् कृष्ण असा होता म्हणून त्याची धर्मराजाच्या राजसूय यज्ञांत अग्रपूजा झाली. त्या काळच्या समाजांत तो ज्ञानानें पराक्रमानें शीलानें गुणानें नि रूपानें हि अप्रतिम होता. म्हणून तो अग्रगण्य ठरला. मुख्य म्हणजे त्याचा प्रभाव. हा प्रभावच ईश्वरावतारत्व होय. प्रत्येक युगांत ईश्वर असा अवतार घेत असतो. त्या अवताराचें गमक त्याचा तो अलौकिक प्रभावच होय. त्याच्या विरुद्ध जो उठेल तो पडेल, जो त्याची आज्ञा शिरोधार्य करील तो वांचेल, वागेल. भगवान् कृष्ण हा असा अवतार होता. त्याचा प्रभाव अनुल्लंघ्य होता.

## ७०६. सन्निवास

सतां निवासः सन्निवासः। जो सज्जनांचा निवास म्हणजे आश्रय होय तो सन्निवास म्हणावयाचा. तत्पुरुष वा बहुव्रीहि कोणता हि समास कल्पिला तरी अर्थांत तादृश भिन्नता नाहीं. तात्पर्य एकच. परमात्माच सर्वसज्जनांचा आश्रय होय, शरण्य होय. सन्मात्राचा हि आश्रय तोच होय. कांहीं जें कांहीं परमात्म्याला सोडून राहील तें सहजच लटकें पडेल. कारण परमात्मा हा स्वतःच सन्मूर्ति होय, सत्तामात्रशरीर होय.

सतां निवासो यस्मिन् सः सन्निवासः। अशा सप्तमी बहुव्रीहीऐवजीं "सन्त एव निवासो यस्य सः सन्-निवासः" असा षष्टी बहुव्रीहि हि घेतां येईल.

सत्परायण पदाच्या चिन्तनांत हा विचार विशद झाला आहे. म्हणून इथें त्याचें अधिक विवेचन करण्याची आवश्यकता नाहीं. श्रीनिवास श्रीनिकेतन इत्यादि समास सामान्यत: सप्तमी बहुव्रीहि घेतले जातात आणि सन्निवास हें पद हि तसेंच आहे. आणि संत व भगवंत यांत अंश-अंशिभाव असल्यामुळें हि तें तसें सप्तमी बहुव्रीहि घेणेंच श्रेयस्कर. तथापि कार्यांत कारणाचा अन्वय असतो या नात्यानें षष्ठी बहुव्रीहि घेणें शक्य आहे. गीतेंत म्हटलेंच आहे ''ये भजन्ति तु मां भक्त्या मयि ते तेषु चाप्यहम्'' परंतु तिथें हि आधीं भक्त भगवंतात राहतात असें विधान करून मागाहून गौरवानें भगवंत हि भक्तांत राहतो असें विधान केलें आहे, हें चिन्त्य आहे. पण सन्निवास हें पद इथें सगुण पक्षीय आहे. म्हणून सज्जनांचा आश्रय सज्जनांचा पाठीराखा असा त्याचा विशिष्ट अर्थ इथें अभिप्रेत आहे. ''परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम्, धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे'' या श्लोकांतला साधु-परित्राता दुष्ट-दमयिता आणि धर्मसंस्थापक परमेश्वरी अवतार होय असा त्याचा आशय आहे. पांडवांचा कैवारी, कौरवांचा शास्ता आणि धर्माला म्हणजे न्यायाला व धर्मराजाला सिंहासनावर प्रतिष्ठापित करणारा भगवान् कृष्ण हा तत्कालीन अवतार होय भगवंताचा:

## ७०७. सुयामुन

सु शोभनो यामुनः सुयामुनः। सुन्दर जो यामुन तो सुयामुन भगवान् कृष्ण. यमुनेच्या तीरावर ज्यांनीं वसति केली ते यामुन म्हणावयाचे अर्थात् यामुन म्हणजे यमुनातीरवासी. त्यांत जो ज्ञानानें तपस्येनें प्रभावानें शोभायमान तो सुयामुन म्हणावयाचा. हा असा शोभिवंत यमुनातीर-निवासी म्हणजे भगवान् कृष्ण होय. त्यानें तिथें यमुनेच्या पुळिणावर, यमुनातीरावरील मधुकुंजांत, यमुनेच्या काळ्या जळांत गोपगोपींसह स्वच्छंद विहार केला, गाईगुरांसह तो रमला; यमुनेच्या जळचरांशीं, तिच्या तीरावरील मर्कटादि वनचरांशीं, आकाशांतील काकपिकादि खेचरांशीं तो समरसला आणि आपलें वेगळेपण आपलें थोरपण पार हरवून बसला. अशा त्या सर्वभूतात्मभूत झालेल्या गोपाळ कृष्णाहून अधिक सुशोभन दुसरा कोण बरें आहे? ''पाण्डित्यं निर्विद्य बाल्येन तिष्ठासेत्'' या उपनिषद्वचनाचा त्याचें चरित्र म्हणजे पदार्थपाठच होय. असा महाज्ञानी जेव्हां एखाद्या समाजांत जन्मतो आणि वावरतो, त्यांत अगदीं मिसळून जातो तेव्हां तो समाज पार्थिव राहत नाहीं त्याचें दिव्य रूपांतर होतें. तिथें आनंदीआनंद नांदतो. तिथें भूवर वैकुंठ अवतरतें. यमुनातीरीं गोकुलांत असेंच झालें होतें. तेथील मृत्कण मृण्मय राहिले नव्हते. ते चिन्मय झाले होते. तेथील सारें विश्व चिद् रसांत विलीन झालें होतें, विरघळून गेलें होतें. तिथें अद्वैतामृताचा एकार्णव हेलावत होता. यमुनेच्या काळ्या पाण्यानें कृष्ण काळा झाला नव्हता तर त्या कृष्णाच्या सान्द्र चैतन्यानें सारें कृष्णमय झालें होतें. म्हणून भक्त गातात:

**रात्र काळी घागर काळी।**
**यमुना जळें हीं काळीं वो माये।**
**विष्णुदास नाम्याची स्वामिनी काळी।**
**कृष्णमूर्ति बहु काळी वो माये।।**

## ७०८. भूतावास

मागील श्लोकांत सगुण पक्ष आल्यानंतर परत या श्लोकार्धांत निर्गुणाकडे गति झाली आहे. नदीला जसे दोन तीर असतात आणि प्रवाह कधीं या तीराकडून तर कधीं त्या तीराकडून वाहतो त्या प्रमाणेंच विचार-प्रवाहाचें हि आहे. तो कधीं सगुणाकडे तर कधीं निर्गुणाकडे वळतो. वस्तुत: तो उभयकूल-विशिष्ट दिसत असला तरी अकूलच असतो. कूल तद्बाह्य आहेत. तो आपला स्वस्थ असतो. केवल स्वरूप असतो तो. कोणत्या हि कूलाकडून प्रवाहित झाला तरी प्रतिकूलाला सोडून असत नाहीं. त्याला पर्यायानें धरून असतो. अर्थात्

सगुण सदैवच निर्गुणगर्भ असतें आणि निर्गुण सगुणगर्भ असतें. सगुणाला सदैव निर्‌गुणाची मर्यादा असते आणि निर्‌गुणाला सगुणाचा जिव्हाळा ओलावा रेखा असते, गालबोट असतें.

परमात्मा हा भूतांचा आवास आहे, आश्रय आहे. भूतें व्यक्त आहेत. त्या व्यक्ताचा आश्रय अव्यक्त आहे. अव्यक्तांतून हीं सगळीं भूतें येतात, कांहीं काळ या जगाच्या रंगभूमीवर वावरतात आणि परत तीं त्या अव्यक्ताच्या पडद्याआड नाहींशीं होतात. म्हणून तो परमात्मा भूतावास म्हणजे भूतांचा आश्रय म्हटला आहे. ''भूतानां आवास:'' वा ''भूतानां आवास: अस्मिन्'' असा विग्रह करून या सामासिक पदाचें चिंतन केलें. आतां ''भूतानि आवास: यस्य स: भूतावास:'' असा षष्ठीबहुव्रीहि घेऊन हि अर्थ करतां येईल. म्हटलेंच आहे– ''ईश्वर: सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति'' अर्थात् ईश्वर हा हृदयांत जीव रूपानें स्थित आहे. म्हणून हि तो भूतावास म्हणावयाचा. या भूतावासाला पाहत असल्यामुळेंच प्रह्लादानें हिरण्यकशिपूला म्हटलें कीं तो परमात्मा जळीं स्थळीं काष्ठीं पाषाणीं सर्वत्र विराजमान आहे.

## ७०९. वासुदेव

मागील पदांतील (आ) वास पदाचें दाम म्हणजे सूत्र पकडून हें वासुदेव पद स्फुरलें आहे. म्हणजे हें दामयमक आहे. आणि त्याचा आशय हि पूर्व पदासारखाच आहे. ''भूते भूते आवसति इति भूतावास:'' भूतमात्राच्या ठाईं तो परमात्मा वसला आहे म्हणून तो भूतावास म्हणावयाचा. आणि वासुदेव म्हणजे हि तेंच. ''ईशावास्यं इदं सर्वम्'' या वेद वाक्याचा अनुवाद वासुदेव पद करतें. वासुदेव म्हणजे हें सारें जग वसविणारा. जगांत जें कांहीं आहे तें सर्व ईश्वरानें वसविलेलें आहे. वसविणारा म्हणून वासु आणि ईश्वर म्हणजे देव. असें हें निरुक्त आहे. ही व्युत्पत्ति नव्हे. निरुक्त कल्पनाप्रधान वा भावप्रधान असते, व्युत्पत्ति ही शब्दनिष्ठ असते, व्याकरणविषय असते. निरुक्ति कल्पनाप्रधान वा भावप्रधान असली. तरी तिला हि शब्दाचा आधार लागतोच. पण ती शब्दबद्ध नसते. स्वैर अर्थानें त्या शब्दांचा ती उपयोग करून घेते. तिची शब्दावर अर्थ बसविण्याची प्रक्रिया स्वैर असते. व्याकरण-व्युत्पत्तीनें जिथें इष्ट अर्थ संपादितां येत नाहीं तिथें निरुक्ति उपकारक होते. (१) वसुदेवस्य अपत्यं पुमान् वासुदेव: (२) वासयति इति वासु:। वासुश्च असौ देवश्च इति वासुदेव: (३) वासयति आच्छादयति इति वासु: माया। वासो: मायाया: देव: पति: इति वासुदेव:। इत्यादि प्रकारें वासुदेव शब्दाची व्युत्पत्ति लावली जाते. आणि ती ठीकच आहे. एवढें मात्र खरें कीं एक व्यक्तिवाचक वासुदेव आहे आणि दुसरा सर्वान्तर्यामी परमात्मवाचक आहे. हे दोन्ही कुठें फुटतात, कुठें एकवटतात. ''अविभक्तं विभक्तेषु विभक्तमिव च स्थितम्'' असे ते आहेत. नदीचे अनेक प्रवाह होतात आणि परत ते एक होतात, तसे हे अर्थ आहेत. ते एक असून अनेक होतात, अनेक होऊन हि एकच असतात असा हा वासुदेव-महिमा आहे. 'वासुदेव: सर्वम्' हा गीतेचा मंत्र आहे. ती गीता- सावित्री आहे.

## ७१०. सर्वासुनिलय

सर्वेषां असूनां निलय: सर्वासुनिलय:। जो सर्वप्राणांचा आश्रय आहे तो परमात्मा सर्वासुनिलय म्हणावयाचा. जी कांहीं हालचाल या जगांत दिसते ती सगळी प्राण-लक्षण होय. ''यत्र यत्र धूमस् तत्र तत्र वह्नि:'' त्या प्रमाणें ''यत्र यत्र गतिस् तत्र तत्र प्राण:'' असा न्याय आहे. हा सर्व हालचालींचें निमित्त असलेला प्राण अखेर कुठें विसावतो अथवा कुठून प्रकटतो? वायु आकाशांत विलीन होतो आणि तिथूनच तो उद्‌भूत होतो. प्राण हा हि तसाच आकाशवत् अव्यक्त परमात्म्याच्या ठाईं विलीन होतो. तेव्हां त्याची गति कुंठित होते. मग तो कोणत्या हि लोकाला जात नाहीं. तो वैकुंठवासी होतो, स्वस्थ होतो. पण ही परम

गति होय. ''यद् गत्वा न निवर्तन्ते तद् धाम परमं मम'' म्हणून तिचेंच वर्णन केलें आहे. गुणबद्ध जीव गुणानुसार भ्रमत राहतो. ''ऊर्ध्वं गच्छन्ति सत्त्वस्था मध्ये तिष्ठन्ति राजसाः। जघन्यगुणवृतस्था अधोगच्छन्ति तामसाः'' म्हणून गीतेनें गुणानुसार त्रिधा गति दाखवून दिली आहे. पण जो गुणातीत झाला त्याला आत्मगतीवांचून दुसरी गति नाहीं. ही जी आत्मगति उर्फ गतिनिरोध तोच सर्वासुनिलय परमात्मा होय. कल्पान्तीं सर्व सृष्टितत्त्वें प्राणाबरोबर परमात्म्याच्या ठाईं विलीन होतात. म्हणून तो सर्वासुनिलय म्हणावयाचा. कल्पारम्भीं परत तीं सृष्टितत्त्वें परमात्म्याच्या प्राणाबरोबर बाहेर पडतात. यालाच अनुलक्षून नारदानें म्हटलें आहे—''मरीचिमिश्रा मुनयो प्राणेभ्योऽहं च जज्ञिरे'' पिंण्ड घ्या कीं ब्रह्माण्ड घ्या दोहोंकडे एकच सूत्र आहे. आत्म्याच्या ठाईं सर्व प्राण, सर्व शक्ति निहित होतातः ''वायुः अनिलं अमृतम्। अथ इदं भस्मान्तं शरीरम्'' मुक्त पुरुषाचे प्राण अनिल म्हणजे निःस्पन्द होऊन अमृत म्हणजे चयापचरहित होऊन बसतात. कल्पान्तीं सर्वांचेच प्राण परमात्म्याच्या ठाईं विलीन होतात. पण कल्पारंभीं ते पुनः गुणकर्मानुसार जन्म घेतात. त्यांचें हें यातायात ज्ञानानें मुक्ति होईपर्यंत चालूच राहतें.

### ७११. अनल

परमात्मा हा अनल म्हणजे अग्निस्वरूप आहे. ऊब ही जीवनाचें गमक आहे. ज्या शरीरांत ऊब नाहीं, जें प्रेतवत् थंड झालें आहे, गार पडलें आहे, तें मृत समजलें जातें. त्यामुळें अग्नि म्हणजे जीवन होय. परमात्मरूप अग्नि हा सर्वांना प्रकाशकत्वामुळें सत्ता आणि औष्ण्यामुळें जीवन देणारा होय. अग्नीच्या दाहकता आणि प्रकाशकता ह्या दोन शक्ति होत. आणि परमात्म्याच्या ठाईं जो चिदग्नि आहे त्याच्या हि त्या दोन शक्ति आहेत म्हणून परमात्मा हा अनल म्हणावयाचा. जें कांहीं प्रकाशित होत आहे तें सारें त्या चित् तेजानेंच होत आहे. त्याच्या प्रकाशावांचून कोणती हि वस्तु असल्याचें कळूं शकत नाहीं. अर्थात् तिला सत्ता लाभते, जीवनाचा उबारा लाभतो तो त्या चित्तेजामुळेंच होय. इथें अग्नीचें प्रकाशकत्व आणि जीवनदातृ उष्णत्व वा सत्तादातृत्व एकवटलें आहे असें म्हणतां येईल. अर्थात् अग्नीच्या दोन शक्ति म्हणण्यापेक्षां अग्नीची दुहेरी शक्ति म्हणणें बरें. परमात्म्याच्या चिद्रूप अग्नींत जणूं हें विश्व उजळत आहे आणि जळत आहे. ''तेजोभिरापूर्य जगत् समग्रं, भासस् तवोग्राः प्रतपन्ति विष्णो'' असें ह्या विश्वाच्या चिन्मय रूपाला पाहून अर्जुन म्हणत आहे. प्रत्येक वस्तु त्या प्रचंड चित्तेजानें जळत आहे, उजळत आहे, असें त्या अनल परमात्म्याचें विश्वरूप दर्शन अर्जुनाला होत आहे. अनल पद अन+ल अथवा अन्+अलम् अशा हि प्रकारें लावतां येईल. जिथें अग्नि आहे तिथें प्राण आहेच. प्राणाशिवाय अग्नीचें अस्तित्व संभवत नाहीं. म्हणून तो अनल म्हणजे अनवान् म्हटला आहे. परमात्मा हा जीवनस्वरूप अग्नि आहे. आणि त्याच्याशीं प्राण हा सदैव युक्त असतो. प्राण गेला कीं अग्नि शमला असें समजलें जातें. ''केन प्राणः प्रथमः प्रैति युक्तः'' या प्रश्नाचें उत्तर चिद्ग्नि असें आहे. त्या चित्स्वरूप अग्नीनें प्रेरिलेला प्राण हालचाल करीत असतो. ''दुष्पूरेणानलेन च'' या गीतावचनांत अनलाचें अनलम्पण व्यक्त झालें आहे. तें तिथें कामाग्नीसंबंधानें आलेलें आहे. पण अग्नि सर्व कांहीं भस्म करून परत अधिक भक्षायला सिद्ध असतो म्हणून तो अनल होय. परमात्मस्वरूप चिद्ग्नीला हि हें विश्वाचें पेटवण पुरत नाहीं. त्याला पुरून तो उरतो म्हणून तो अनल.

### ७१२. दर्पहा

'दर्पहा दर्पदो दृप्तः' हें एक त्रिक असून तिन्ही पदें मिळून एक विचार प्रकटला आहे. एकएकटें पद घेतल्यास तो विचार एकांगी होईल. असा एकांगी विचार होऊं नये. विचाराची समग्रता आकळली

जावी याची सहस्राला भारी चिंता आहे. त्यामुळें ठाईं ठाईं आपाततः विरोधी पदांचीं एककें द्विकें तशींच त्रिकें आलेलीं आहेत. वस्तुतः तीं विरोध-दर्शक वा पृथक्त्वदर्शक वा अभावदर्शक नसून व्यापक समग्रता-दर्शक आहेत. हें समग्र दर्शनच भगवद्दर्शन वा आत्मदर्शन होय, विश्वरूपदर्शन होय. कोणतें हि एकांगी दर्शन हें सम्यग्दर्शन असूं शकत नाहीं आणि म्हणून तें आत्मदर्शन हि म्हणतां यावयाचें नाहीं. कारण आत्मा एक आहे, अन्यून आहे, परिपूर्ण आहे. त्यांत विजातीय, सजातीय वा स्वगत कसला हि भेद नाहीं. तो एकरस आहे. म्हणून सर्वविरोधपरिहार-रूपच तो आहे. सर्व समन्वयरूपच तो आहे. अर्थात् त्याचें दर्शन हि तसेंच. इथें कांहीं एककें द्विकें त्रिकें नमूद करूं या; कृताकृतः, भोजनं भोक्ता, वामनः प्रांशुः, निमिषोऽनिमिषः, कामहा कामकृत्, क्रोधहा क्रोधकृत्, एको नैकः, दण्डो दमयिता दमः, नियन्ता नियमो यमः, शब्दातिगः शब्दसहः इत्यादि. या विचित्र पदपदावलीवरून परमात्म्याची व्याप्ति त्याची समग्रता व्यक्त केली गेली आहे. इथें दर्पदो दर्पहा दृप्तः या पदत्रयांत तीच लक्षित आहे. तो परमात्मा दर्प-हा म्हणजे दर्पाचें हनन करणारा आहे. ''अहंकारं बलं दर्पं कामं क्रोधं च संश्रिताः। मां आत्म-परदेहेषु प्रद्विषन्तो ऽभ्यसूयकाः'' असे जे असुर म्हणजे आसुर गुणांनीं प्रेरित आणि विश्वकंटक ''कोऽन्योऽस्ति सदृशो मया'' म्हणणारे बलदृप्त हिरण्यकशिपु रावण कंसादि त्यांचा तो निःपात करतो, असें दिसतें. पण वस्तुतः तो त्या व्यक्तींचा नव्हे त्या शक्तींचा नाश करणारा आहे. म्हणून तो दृप्त-हा न म्हणतां दर्प-हा म्हटला आहे. रामानें रावणाला पाडलें पण त्याचें और्ध्वदैहिक विभीषणाकडून यथासांग करवून घेतलें!

### ७१३. दर्पद

परमात्मा असुरांचा दर्प चूर्ण करतो, तर देवांचा दर्प वाढवतो. दर्प म्हणजे बळाचा उत्सेक. असुरांच्या बळाचा उद्रेक जगाच्या दुःखाला नि नाशाला कारण होतो, म्हणून तो परमात्मा सहन करीत नाहीं, त्याचें हनन करतो. परंतु देवांच्या बलाचा उद्रेक जगाच्या कल्याणाला आणि समृद्धीला कारण होतो, म्हणून त्यांचा तो पाठपुरावा करतो. त्या दैवी बलाचें आप्यायन करतो, गुणन करतो. शंकर म्हणजे महादेव. त्याच्या बलाचा उद्रेक त्याच्या हलाहल-पानांत दिसून येतो. याच्यायोगें काय झालें? जगावरील महान् संकट टळलें. लोक बचावले आपल्या बुद्धि, बल, संपत्ति आणि श्रम या चतुरंग बलाचा म्हणजे सर्व शक्तींचा निष्काम भावनेनें लोककल्याणार्थ विनियोग करण्यांतच आपलें परम श्रेय आहे या श्रद्धेचें साधनेचें आणि निष्ठेचें नांव आहे देवत्व. त्याचा महान् आदर्श म्हणजे भगवान् शंकराचें चरित्र होय. त्यामुळेंच तो महादेव झाला आहे. असा देवांचा दर्प, दैवी संपत्तीवरील आत्यंतिक विश्वास तो परमात्मा वाढवीत असतो. महात्मा गांधींचा हा असा विश्वास त्यानें इतका वाढविला होता त्यानें इतका वाढवला होता कीं अखेर त्या पाईं त्यांचें बलिदान झालें. या दर्पामुळेंच मनुष्य गडद निराशेंतहि आशा बाळगून राहतो आणि आपला विश्वास जतन करतो. त्यांचें त्यागमय जीवन व बलिदान हें त्यांच्या या निष्ठेचें प्रमाण होय, साक्ष्य होय. परमात्मा दर्प-हा हि आहे. आणि दर्प-द हि आहे. जसा वैद्य एखाद्या रोग्याला उपवास करायला सांगतो तर दुसऱ्याला पुष्टिवर्धन (टॉनिक) घ्यायला सांगतो. पण त्यांत कांहीं विसंगति वा विरोध नसतो. त्यांत एकच सूत्र तो अनुसरत असतो. तसेंच परमात्म्याचें आहे. ज्याचा दर्प नाहींसा करणें इष्ट त्याचा तो नाहींसा करतो आणि ज्याचा दर्प वाढवणें इष्ट त्याचा तो वाढवतो. आणि अशा आपाततः विरुद्ध क्रिया पूर्ण सुसंगत ठरतात व्यापक तत्त्वांच्या अधिष्ठानावर. आणि तें अधिष्ठानच तो परमात्मा होय.

### ७१४. दृप्त

ज्याच्यांत अपरंपार बळ आहे, तें बळ ज्याच्यांत मावत नाहीं, तो म्हणावयाचा दृप्त. असा दृप्तच

दुसऱ्याचा दर्प जिरवूं शकतो आणि दुसऱ्याला हिंमत देऊं शकतो. म्हणून परमात्मा "दर्पहा दर्पदो दृप्तः" म्हटला आहे. दृप्त नरसिंहानें हिरण्यकाशिपूचा दर्प जिरवला आणि भक्त प्रह्लादबाळाचा दर्प, आत्मविश्वास सतत वृद्धिंगत केला. प्रभु रामचंद्रानें रावणाचा दर्प खर-दूषण-त्रिशिरादि राक्षसांना वधून आणि प्रत्यक्ष त्याला व कुंभकर्णाला ठार करून जिरवला आणि नल नील हनुमदादि वानरांचा दर्प समुद्रोल्लंघन, लंकादहन, सीताशुद्धि, सेतुबंधन इत्यादि सुयशाच्या योगें वृद्धिंगत केला. हें दुहेरी कार्य तो स्वतः दृप्त होता, आत्मशक्तिसंपन्न आणि आत्मशक्तिमत्तेच्या प्रत्ययानें परिपूर्ण होता म्हणूनच करूं शकला हें उघडच आहे. दर्प, दर्पण (म्हणजे दृप्तीकरण) आणि दर्पहनन या सर्वांचा आधार एक आत्मशक्तिच आहे हें जो ओळखतो तो 'दर्पहा दर्पदो दृप्तः' चें रहस्य ओळखतो असें म्हणावयाचें. यासंबंधीं केनोपनिषदांतील आख्यायिका सहज आठवते. 'दर्पहा दर्पदो दृप्तः' या वचनावर ती चांगला प्रकाश टाकते. देवांना एकदां ब्रह्मानें विजय मिळवून दिला, तर त्यांना वाटलें "अस्माकमेव अयं विजयः, अस्माकमेव अयं महिमा." हें झालें दर्पद रूप. त्यानंतर त्यानें अग्नि वायु इत्यादि एकएका देवाला बोलावून त्याच्यापुढें गवताची काडी टाकून ती जाळायला उडवायला सांगितलें. पण आत्मशक्तीवांचून त्यांना तें करतां आलें नाहीं. अशा प्रकारें त्यांचें मानमर्दन वा दर्पदलन केलें. हें झालें दर्पहारूप. आणि इतकें सर्व करून त्या देवांना तें यक्ष बुचकळ्यांत टाकून निघून गेलें. हें झालें त्याचें दृप्त रूप. परमात्मा हा असा 'दर्पहा दर्पदो दृप्तः' आहे. तो नुसताच दर्पहा वा दर्पद वा दृप्त नाहीं. हें असंशय आणि समग्र ज्ञानच मोचक आहे. तें ज्याला झालें "असंमूढः स मर्त्येषु सर्वपापैः प्रमुच्यते."

## ७१५. दुर्धर

परमात्मा हा अव्यक्तमूर्ति असल्यामुळें त्याला सहजासहजीं आकळतां येत नाहीं. "अव्यक्ता हि गतिर् दुःखं देहवद्भिर् अवाप्यते" म्हणून गीता म्हणतच आहे. पण याचा अर्थ असा नव्हे कीं व्यक्त हें फार सुलभ आहे. "क्लेशोऽधिकतरस् तेषां अव्यक्तासक्त-चेतसाम्" या वचनांतील अधिकतर या पदाकडे लक्ष द्यायला पाहिजे. व्यक्ताच्या उपासनेंत क्लेश नाहींत असें नाहीं. त्यांत क्लेश आहेतच, पण अव्यक्तोपासनेंत ते अधिक आहेत असें म्हटलें आहे. तुम्ही सगुणोपासना करा कीं निर्गुणोपासना करा, दोन्हीकडे भरपूर क्लेश आहेत. आकाशवत् निराकार आणि निर्गुण परमात्मा

"अच्छेद्यो ऽयं अदाह्योऽयं अक्लेद्योऽशोष्य एव च।
नित्यः सर्वगतः स्थाणुर् अचलोऽ यं सनातनः।।"

असें मानणें सुलभ आहे, परंतु देहधारी अवतार, वा प्रतीकरूप शालग्राम हा तसा मानणें सुलभ नाहीं. पण सगुणोपासनेंत साकारोपासनेंत आपण तसें मानून चालत असतों. इतकेंच नव्हे, तर सगुणसाकारोपासनेंत परमात्म्याचा अवमान होतो. "अवजानन्ति मां मूढा मानुषीं तनुमाश्रितम्। परं भावं अजानन्तो ममाव्ययमनुत्तमम्।।" हें भय निर्गुणोपासनेंत राहत नाहीं. अर्जुनाला व्यक्ताच्या अवज्ञानाबद्दल असत्-काराबद्दल क्षमा मागावी लागली आहे. सारांश, सगुण घ्या कीं निर्गुण घ्या परमात्मा हा आकळायला सोपा नाहीं. तो दुर्धरच आहे. ज्ञानदेव योगी होते. त्यांना जीवनकळा साधली होती. पण नामदेव भक्त होते. त्यांना नामामृत गोडी साधली होती. ते यात्रेला निघतांना विठ्ठलाकडे गेले. त्याची परवानगी घेतली तेव्हां निघाले. हें देवभक्तांचें हार्द पाहून ज्ञानदेव विरघळून गेले. त्यांच्या योगानें अव्यक्तोपासनेनें नामदेवाच्या सगुणोपासनेला भक्तीला साष्टांग नमस्कार घातला. त्यांना ती कठिण वाटली आहे. सारांश कोणत्या हि प्रकारें सगुण वा निर्गुण भक्ति ही सुळावरील पोळी आहे. म्हणून तो परमात्मा दुर्धर होय.

## अथ

'अथ' हें कांहीं सुबन्त नाम नाहीं. तें आहे एक अव्यय. सहस्रांत प्रायः अशीं पदें नाहींतच. 'च' हें

अव्यय ६ सहा वेळां आलें आहे. एव हें अव्यय दोन वेळां आलें आहे. खरें म्हणजे दोन्ही ठिकाणीं 'एव च' असें आलें आहे. 'अथो', 'ननु' इत्यादिकांप्रमाणें 'एवच' हें एक संयुक्त पद मानणें शक्य असल्यास स्वतंत्र 'च' दोन कमी होतील. 'अथ' हे इथें एकदांच आलें आहे. हीं अशीं तीन अव्ययें पादपूरण म्हणून नऊ वेळां आलेलीं सोडलीं तर बाकीचीं सर्व सुबन्त पदें आहेत. सहस्रनामाचें खरोखर हें एक वैशिष्ट्यच म्हटलें पाहिजे. सहस्र संख्या सांभाळण्यासाठीं कोणतीं पदें सविशेषण एक नाम मानावीं, कोणतीं पादपूरण मानावीं, कोणतीं 'कथितः' सारखीं आख्यातवत् मानावीं हा विचाराचा मुद्दा आहे आणि सहस्रमित म्हणजे केवळ सहस्र न समजतां पस्तूरीसह अष्टदशादि संख्याधिक सहस्र मानणें योग्य वाटल्यास तसें हि करणें शक्य आहे आणि मग अथ हें हि कदाचित् एक स्वतंत्र पद मानलें जाऊं शकेल. कारण 'अथ' आणि 'ॐ' हे दोन अव्यय शब्द मांगलिक मानले आहेत. अथ हें पद आरंभसूचक आहे. परमात्मा हा सर्वादि सर्वारंभक असल्यामुळें तो अथ म्हणावयाचा. 'ॐ' हें जसें एक महत्त्वाचें एकाक्षर परमात्मवाचक नाम आहे तसें 'अथ' हें व्यक्षर नाम आहे. 'ॐ' प्रमाणें तें एकाक्षर नसलें तरी व्यक्षर द्विमात्र आहे. आणि 'ॐ' हें 'अथ' प्रमाणें व्यक्षर नसलें तरी द्विमात्र आहे. दोहोंचें वजन सारखेंच आहे. 'ॐकारपूर्वक वेद मंत्राचा उच्चार होतो तर अथकारपूर्वक शास्त्रादिकांचा आरंभ होतो. 'अथातो ब्रह्मजिज्ञासा।' 'अथातो भक्तिं व्याख्यास्यामः।' 'अथ शिक्षां प्रवक्षामि।' इत्यादि, नवीन ग्रंथ, नवीन प्रकरण, नवीन मुद्दा मांडतांना अथ चा प्रयोग होतो. अशा प्रकारें 'अथ' हें मंगल नाम म्हणतां येईल, जरी तें सुबन्त नाहीं.

## ७१६. अपराजित (अ-पराजित, अपर-अजित)

न पराजितः अपराजितः। ज्याला कोणीं पराजित केलें नाहीं तो अपराजित म्हणावयाचा. परमात्म्याला पराजित कोण करणार? जो पराजित करणारा तो हि तोच आहे. त्यामुळें अपराजित हा अपर-अजितच म्हणावयाचा. स्वतःच स्वतःची पराकाष्ठा (रेकॉर्ड) मोडणाराला पराजित कसें म्हणतां येईल? तो त्याचा नवा विजयच होय. ज्यानें स्वपरभेद मानिला त्याला द्वंद्व-भय राहणार, पराभव संभवणार. परंतु ज्याला परका काय पण दुसरा हि नाहीं त्याला एकमेवाद्वितीयाला पराभव कसा संभवेल, त्यावर मात कोण करील? ज्यानें आपल्याला देहादिकांच्या अभिमानानें पृथक् करून घेतलें त्यानें आपले प्रतिद्वंद्वी निर्माण केले. त्याला त्यांच्या पासून भय उत्पन्न होणार, त्याला आपला पराभव पहावा लागणार. तुमच्यां विरोधांत दुसरा उभा राहणें हाच पराभव. ज्याला विरोध करायलाच मुळीं दुसरा कोणी उरला नाहीं, त्याला सर्वभूतें आत्मरूप झालीं! त्याचा पराभव संभवत नाहीं. बापाला मुलाकडून झालेली आपली हार हार वाटत नाहीं, भूषण वाटते. ती हार तो हारवत् मिरवतो. कारण पुत्र कोणी दुसरा तो मानीत नाहीं. त्याला तो आपला आत्माच मानतो. तद्वत् ज्याला हें सारें जग आत्माच झालें त्याला पराभव कुठला? परमात्माच या विश्वरूपानें नटला असल्यामुळें त्याला दुजा कोणी नाहींच, प्रत्येकच तो आहे. मग त्याला पराभव देणार कोण आणि दिला असें मानलें तर पराभव त्याला विभव वाटेल विजय वाटेल—जसा रामानें केलेला आपला पराभव परशुरामाला वाटला. ज्यानें पराभवाला हि विजयरूप देण्याची युक्ति हस्तगत केली तोच अपराजित. राजकोटच्या प्रकरणांत गांधींनीं आपला विजय फेकून दिला. कारण तो अनात्म-विजय होता. ''दुःखं शेते पराजितः'' हें गांधी ओळखत होते.

## ७१७. विश्वमूर्ति

या सत्त्याहत्तराव्या श्लोकांत मूर्तिपदाचें सूत्र आहे. ह्या सूत्रांत जितके आणि जसे मणि ओवतां आले तेवढे ओवले आहेत. परमात्मा अव्यक्त अमूर्तिमान्

आहे इथपासून तों विश्वमूर्ति आहे इथपर्यंत भरारी मारलेली आहे. विचारानें विचार समग्रतेला कव घालणारा असल्यामुळें त्यांत परस्पर-विरोधी दोन्ही टोकें येतात, आणि त्या दोन्ही टोकांच्या दरम्यान संभवणारी सर्व विविधता येते. या श्लोकांत आपल्याला हें समग्र दर्शन होतें.

''विश्वं मूतिर् यस्य सः विश्वमूर्तिः अथवा विश्वा मूर्तयः यस्य सः विश्वमूर्तिः'' असा विग्रह होईल या सामासिक पदाचा. दोहोंचा तात्पर्यार्थ एकच. हें दिसणारें आणि न दिसणारें समग्र विश्वच त्या परमात्म्याची मूर्ति होय, आकृति होय, तनू होय. समग्र हें परमात्म्याचें रूप मानल्यानंतर या समग्र रूपांतील विविध अवयव कोणते त्याची हि कल्पना कवींनीं आपआपल्या रुचीप्रमाणें वा गरजेप्रमाणें केली आहे. ''शिरीं शृंगारला स्वर्ग, उरीं आकाश मोकळें। पदीं पैसावली पृथ्वी, लोकरूपास त्या नमो'' अशी त्रिलोकात्मक वा सप्तलोकात्मक वा चतुर्दश लोकात्मक विश्वमूर्तीची कल्पना केली आहे. आणि कौशल्यानें रेखाटली व रंगविली आहे. ध्यान समग्राचें करावयाचें, गान समग्राचें करावयाचें, पूजा समग्राची करावयाची. एवढ्यासाठींच खण्डितमूर्तीच्या पूजेचा शास्त्रांत निषेध केला आहे. विश्वमूर्ति पद हि परमात्म्याची ही समग्रता, ही अखण्डता विशद करीत आहे.

## ७१८. महामूर्ति

महती मूर्तिर् यस्य सः महामूर्तिः मोठी आहे मूर्ति ज्याची तो महामूर्ति म्हणावयाचा. जे आमच्या बुद्धीच्या शक्तीच्या आंवाक्या बाहेरचें असतें तें आपल्याला महान् वाटतें. तें अनुपेक्षणीय, आदरार्ह, विस्मयावह वाटतें. त्याच्या महत्तेनें आपण दबतों, त्याला शरण जातों. परमात्मा हा तसा महान् आहे. आकाशाहून मोठें या जगांत काय आहे? तें आकाशच परमात्म्याची मूर्ति म्हणजे शरीर आहे. ''आकाश-शरीरं ब्रह्म'' असें उपनिषद्वचन आहे. शरीर हें सगुण साकार हवें. आकाश हें तसें शब्दगुण आणि अतिविशाल आहे. त्याच्या विशालतेचें आकलन होऊं शकत नाहीं आमच्या दृष्टीला वा कल्पनेला. म्हणून त्याला आपण असीम म्हणतों. परंतु कल्पान्तीं जेव्हां ही सकल सृष्टि अव्यक्तलीन होते तेव्हां तें आकाश हि नाहीसें होतेंच. कारण तें सगुण साकार सावयव आहे, सीमित आहे. परमात्म्याचें हें आकाशरूप शरीर जसें आकारयुक्त तसें वर्णयुक्त हि विर्णिलें आहे. आकाश निळें दिसतें. म्हणून परमात्मा हा निळा सांवळा म्हटला आहे. तो निर्गुण निरञ्जन परमात्मा अशा प्रकारें आकाश-शरीरत्वामुळें सगुण सांवळा झाला आहे. आकाश-शरीरत्वामुळेंच त्याला महत्ता हि आली आहे. एरव्हीं जो अव्यक्त आहे, त्याला महान् तरी कसें म्हणावयाचें? अणुत्व महत्त्व लघुत्व गुरुत्व हे सर्व व्यक्ताचे गुणधर्म होत. म्हणून अव्यक्त अक्षर परमात्म्याचें वर्णन श्रुति ''अणोरणीयान् महतो महीयान्'' अशा विलक्षण शब्दांनीं करते. त्यायोगें सर्वच विशेषणांचा छेद उडतो आणि उरतो तो केवल-स्वरूप परमात्मा ''निर्शून्य निरुपम निरञ्जन निर्वाण''.

## ७१९. दीप्तमूर्ति

दीप्ता तेजोमयी मूर्तिर् यस्य सः दीप्तमूर्तिः। दीप्त म्हणजे ज्योतिर्मयी मूर्ति आहे ज्याची तो दीप्तमूर्ति म्हणावयाचा. परमात्मा हा चिन्मात्रमूर्ति असल्यामुळें तो दीप्तमूर्ति होय. हें सर्व विश्व चित्- प्रभेनें प्रकाशित झालेलें आहे. सूर्य चंद्र आणि अग्नि यांची प्रकाशकता हि त्या चित्प्रभेचीच प्रकाशकता होय. चित्सत्तेवांचून स्वतंत्रपणें त्यांच्या ठाईं प्रकाशकता संभवतच नाहीं. म्हणूनच तर गीतेनें म्हटलें आहे:

**यद् आदित्यगतं तेजो जगत् भासयतेऽखिलम्।**
**यत् चन्द्रमसि यच् चाग्नौ तत् तेजो विद्धि मामकम्।।**

असें असल्यामुळें तो परमात्मा, तो चिन्मात्रमूर्ति च एक दीप्त आहे, इतर सारें अदीप्त, अप्रकाश, अंधभूत होय. तें सारें प्रकाश्य आहे, प्रकाशक नव्हे. या दीप्तमूर्ति परमात्म्याची पूजा आम्ही सूर्यांत चंद्रांत अग्नींत करतों, दीपांत करतों. सूर्य उगवला म्हणजे त्याला आम्ही नमस्कार करतो. दिवा लावला म्हणजे हि आम्ही त्याला नमस्कार करतों. हा नमस्कार न त्या सूर्याला आहे, न त्या दिव्याला; तो आहे त्यांच्या रूपानें प्रकाशलेल्या चिद्वस्तूला. तो नमस्कार सूर्यनारायणाला आहे, दीपनारायणाला आहे. वस्तुतः तें जें सूर्यगत वा दीपगत प्रकाशक चित् तत्त्व आहे तेंच माझ्या ठाईं अक्षिगत प्रकाशक तत्त्व आहे. तोच अक्षिपुरुष होय. ''योऽसौ, असौ पुरुषः सोऽहं अस्मि'' या मंत्रांत हेंच तादात्म्य वर्णिलें आहे. ''तत् त्वं असि'' या महावाक्यांतहि तेंच प्रतिपादिलें आहे. जिथें जिथें दीप्ति आहे तिथें तिथें तो दीप्तमूर्ति उभा आहे आणि जें दीप्त नाहीं, प्रकाशित नाहीं, असें मुळीं कांहीं या विश्वांत नाहींच.

## ७२०. अमूर्तिमान्

परमात्मतत्त्व हें अव्यक्त अज अव्यय असल्यामुळें त्याला मूर्तिमान् म्हणतां येत नाहीं. तें व्यक्त म्हटल्यास जन्मणारें व मरणारें असें नाशवंत ठरेल. पण तें तर आहे अक्षर. म्हणून तो परमात्मा सूर्य अग्नि दीप इत्यादि रूपांत दिसत असला तरी ह्या रूपांहून मूर्तींहून तो वेगळा आहे, हें ओळखून त्याला अमूर्तिमान् म्हटलें आहे. लहान-मोठें सरळ वांकडें जसें इन्धन असेल तसा म्हणजे तत्तदाकार अग्नि दिसतो, पण त्या आकारांहून मूर्तींहून तो वेगळाच असतो, तद्वत् परमात्मा हि ह्या अनंत रूपांत मूर्तींत प्रकटलेला दिसतो खरा, पण तो त्या मूर्तींहून वेगळाच आहे. त्या मूर्तींत आणि त्याच्यांत मुळीं कसलें हि साम्य नाहीं. अमूर्तिमान् पद हें साम्य आणि वैषम्य प्रकट करीत आहे. तो मूर्तिमान् दिसतो, पण मूर्तिमान् नाहीं. ''अग्निर् यथैको भुवनं प्रविष्टो रूपं रूपं प्रतिरूपो बहिश्च। एकस् तथा सर्वभूतान्तरात्मा रूपं रूपं प्रतिरूपो बहिश्च।'' मागील पदांत म्हटलें आहे तो विश्वमूर्ति आहे, महामूर्ति आहे, दीप्तमूर्ति आहे. आणि इथें या पदानें जणूं त्यावर बोळा फिरवला आहे अमूर्तिमान् म्हणून. परंतु वस्तुतः तसें नाहीं. दोन विरुद्ध विधानांनीं त्याची व्याप्ति दाखवून दिली आहे. तो परमात्मा मूर्त तसा अमूर्त हि आहे असें तीं विधानें सांगत आहेत. ''रूपं रूपं प्रतिरूपो बहिश्च'' हा चरण हि ती व्याप्तिच व्यक्त करीत आहे. साकार आणि निराकार दोन्ही तोच आहे. अग्नि केव्हां सेन्धन केव्हां निरिन्धन दिसतो तद्वत् परमात्मा. दोन्ही रूपांत जो त्याला ओळखतो तोच ओळखतो म्हणावयाचा. ''तो हा विठ्ठल बरवा। तो हा माधव बरवा''

## ७२१. अनेकमूर्ति

अनेकमूर्ति म्हणजे अनेक वस्तु नव्हे. परमात्मा एक आहे, पण त्याच्या मूर्ति अनेक आहेत. कोणती हि व्यक्ति ही पृथगात्मता घेऊनच जन्मास येते. मृत्तिका एक आहे, पण घट-शरावादि मूर्ति वा आकार अनेक आहेत. तद्वत् चित् वस्तु एक आहे, पण त्या चिद्वस्तूचे विलास वा तरंग म्हणजे हें चराचर जगत् अनेक आहे. नाम रूप गुण कर्म इत्यादि भेदांनीं ह्या व्यक्ति वा मूर्ति भेदिल्या आहेत. ''भेदुनी अभेद, अभेदूनि भेद'' अशी या जगद्-ब्रह्माची स्थिति आहे. त्यामुळें केव्हां एका पक्षावर तर केव्हां दुसऱ्या पक्षावर भार दिला जातो आणि ''एकत्वेन पृथक्त्वेन बहुधा'' त्याचें वर्णन केलें जातें. इथें त्याचें जगद्रूप वैचित्र्य लक्षून त्याला अनेकमूर्ति म्हटलें आहे, तर पुढील अव्यक्त ह्या पदांत वैचित्र्य विसरून एकतत्त्वावर वा एकत्वावर भर दिला आहे. एक, अनेक, असंख्य, अनन्त, शून्य वा केवल अशा विचित्र विशेषणांनीं तो परमात्मा संबोधिला जातो. कारण त्या प्रत्येक विशेषणानें एक विशिष्ट पैलूच तेवढा प्रामुख्यानें पुढें मांडला आहे.

अनेकमूर्ति पदांतून एक दुसरा हि भाव दोहून घेतां येईल. अतत्त्वार्थवत् आणि असहिष्णु अशा एकवादाचा त्यांत निषेध आहे. एक विष्णुच परम देव, दैवत आहे, शिव नव्हे; एक अल्ला, एक पैगंबर, एक कुराण खरें इतर सारें झूट. असें तत्त्वशून्य व्यक्तिपरत्व म्हणजे एकनिष्ठता नव्हे. तर "अनेकीं सदा एक देवासि पाहे" तीच खरी म्हणजे तत्त्वदर्शी एकनिष्ठा होय. यावेगळी एकनिष्ठा म्हणजे तत्त्वच्युति होय. तिचेंच नांव अंधश्रद्धा. तिच्या योगेंच वैर विरोध विग्रह पेटून जग कष्टी झालें आहे. एकाचें अनेकमूर्तित्व तें ओळखील तर सुखी होईल.

## ७२२. अव्यक्त

या मूर्तिसूत्रांत अनेकमूर्ति, शतमूर्ति, विश्वमूर्ति अशीं पदें आलीं आहेत, त्याच बरोबर अमूर्तिमान्, अव्यक्त अशीं हि पदें आलीं आहेत. आणि त्यांचें तात्पर्य काय तें हि आपण पहिल्या विश्वमूर्ति पदाच्या चिंतनांत पाहिलें आहे. निर्गुणांतून सगुण, अव्यक्तांतून व्यक्त, सूक्ष्मांतून स्थूल अशी सृष्टि होते. म्हणजे सर्व दृश्य व्यक्त सगुण सृष्टीचा मूळ आधार तें अव्यक्त अक्षर ब्रह्म होय. तो मूलाधार हें अव्यक्त व्यक्त करीत आहे. अमूर्तिमान् आणि अव्यक्त हीं दोन पदें समानार्थक दिसत असलीं तरी त्यांत सूक्ष्म भेद आहे. लोष्ट स्थूल आहे, मृत्कण सूक्ष्म आहे, पण दोन्ही दृश्य आहेत, मूर्त आहेत. मृद् जल अग्नि हीं उत्तरोत्तर सूक्ष्म तत्त्वें असलीं तरी तीं दृश्य आहेत, पण वायु हें तत्त्व तसें दृश्य नाहीं. पण दृश्य वा मूर्त नसलें तरी ते गोचर आहे, व्यक्त आहे. आकाश हें मूर्त हि नाहीं, व्यक्त हि नाहीं पण तें सगुण आहे. शब्दगुणावरून त्याचा परिचय होतो. एरव्हीं तें शून्यच आहे. परंतु ब्रह्म हें या सर्वांहून पलीकडचें आहे. तें निर्गुण आहे. म्हणजेच केवल अचिन्त्य. या अचिन्त्यालाच केव्हां अमूर्तिमान् केव्हां अव्यक्त म्हणून संबोधिलें जातें, जरी त्यांत वर पाहिल्याप्रमाणें अंतर आहे. प्रकृति ही अव्यक्त आहे, पण इथें अव्यक्त असें नपुंसक पद नसून अव्यक्त: असें पुंल्लिंग पद आहे. आणि तें, परमात्मवाचक आहे. अव्यक्त हें प्रकृतिवाचक पद असून तें अलीकडचें तत्त्व आहे. त्या पलीकडचें तें अव्यक्त आणि अक्षर पद तेंच इथें अभिप्रेत असून तें परमात्मावाचक आहे. "परस् तस्मात् तु भावोऽन्योऽव्यक्तोऽव्यक्तात् सनातन:। य: स सर्वेषु भूतेषु नश्यत्सु न विनश्यति।।" अशा भाषेंत गीतेनें त्या परात्पर अव्यक्त परमात्म्याचें वर्णन केलें आहे. त्या अव्यक्ताचें अक्षर हें व्यावर्तक अनन्य-साधारण लक्षण आहे.

## ७२३. शतमूर्ति

अनेकमूर्ति म्हटलें काय आणि शतमूर्ति म्हटलें काय, तात्पर्य एकच. परमात्म्याच्या मूर्ति अगणित आहेत. पण हें अगणितपण गणितानेंच सांगावें लागतें. सहस्र हें स्वत:च संख्याबद्ध सांख्य आहे. त्यामुळें सहस्रांत पदोपदीं संख्यान येतें "अनेकमूर्ति, चतुर्मूर्ति शतमूर्ति सहस्रमूर्धा इत्यादि. या सर्व संख्या-बहुव्रीहीचें तात्पर्य एक असलें तरी आपआपलें वैशिष्ट्य हि आहेच. येथील शत ही संख्या केवल शंभर आंकड्याची वाचक नाहीं, ती समग्रता-वाचक आहे. सगळ्यांच्या सगळ्या मूर्ति त्या परमात्म्याच्याच आहेत असा आहे ह्या शतमूर्ति पदाचा आशय. शतमख, शतपथ, शतभिषक् शतगुण इत्यादि पदांत शतशब्द पूर्णता-समग्रतावाचक आढळतो. तसाच तो इथें घ्यावयाचा. त्याचीं शंभर वर्षे भरलीं, त्याचें शंभर अपराध झाले. इत्यादि प्रयोगहि आपण त्याच अर्थानें आज हि करीत आहोंच.

अनेकमूर्ति पदांत निषेधमुखानें सांगितलें कीं या परमात्म्याची कांहीं एकच मूर्ति नाहीं, तर शतमूर्ति पदांत विधिमुखानें सांगितलें कीं त्याच्या शंभर मूर्ति आहेत, शेंकडों मूर्ति आहेत. ह्या शतमूर्ति कोणत्या? विभूतियोगांत त्या सांगितल्या आहेत. पण तिथें हि त्या ब्यांयशीच देऊन गणक थकून गेला आहे. आणि

''नास्त्यन्तो विस्तरस्य मे '' म्हणून त्यानें गणनेबाबत असमर्थता प्रकट केली आहे. जें जें श्रीमत् वा ऊर्जित तें तें भगवद्‌विभूति म्हणून ओळखावें हें सूत्रहि तिथेंच देऊन ठेवलें आहे. त्याला अनुसरून शतपूर्ति करून घ्यावी. मूर्ति म्हणजे देह सर्व त्या देहीचे आत्म्याचे होत म्हणून हि तो शतमूर्ति म्हणावयाचा.

### ७२४. शतानन

शतं शतानि वा आननानि यस्य स: शतानन:। ज्याला शेंकडों मुखें आहेत तो शतानन म्हणावयाचा. आनन म्हणजे मुख हें वाग्द्वार असल्यामुळें, त्याला वक्त्रच म्हणत असल्यामुळें तें वाणीचें प्रतीक होय. अर्थात् शेंकडों वाणी ज्याच्या आहेत तो शतानन म्हणावयाचा. निरनिराळ्या योनींच्या निरनिराळ्या वाणी आहेत. मनुष्य पशु पक्षी यांच्या वाणी भिन्न आहेत. इंग्लंडमधील आणि भारतांतील पशूंची व पक्ष्यांची बोली सारखीच आहे, पण मनुष्यांची मात्र वेगळी आहे. हे वेगळेपण वाणीचे न म्हणतां भाषांचें म्हणावयाचें. वाणींत बोली व भाषा दोहोंचा हि अंतर्भाव होतो. बोली स्वाभाविक आहे, तर भाषा संपादित आहे. आणि मानवांतच ती आढळते, हा भेद आहे. अशा प्रकारें बोली आणि भाषा यांची संख्या अगणित आहे. या अगणिततेचेंच दुसरें नांव शत, शेंकडों, असंख्य. ज्या अर्थी सर्व वाणींचा आधार प्राण आणि प्राणाचा आधार जीवात्मा आहे त्या अर्थी जीवात्मभूत सर्वांतर्यामी परमात्मा हा सर्व वाणींचा स्वामी होय. म्हणून तो शतानन म्हटला आहे. विविध कामें करणारे विविध देह धारण करणारा म्हणून जसा परमात्मा हा शतमूर्ति म्हणावयाचा तसा विविध वाणी बोलणारा म्हणून तो शतानन म्हणावयाचा. रावण हा दशानन म्हणून प्रसिद्ध आहे. त्याला खरोखरच दहा तोंडें होतीं का? का तो दहा भाषा बोलूं शकत होता म्हणून दशानन म्हटला गेला? दुसराच कल्प संभवनीय दिसतो. दशवाग्-बलसंपन्न म्हणून दशानन. तसा परमात्मा हा सर्व वागबल-संपन्न म्हणून शतानन म्हटला आहे.

### ७२५. एक

'एको नैक:' अशी इथें पदांची जोडी आलेली आहे. त्यांत हि 'एक' पद आधीं आलें आहे. मागाहून 'नैक' पद आलें आहे. हा क्रम हि चिन्त्य आहे. ''एकमेवाद्वितीयं ब्रह्म'' इत्यादि उपनिषद्‌वाक्यांत परमात्म्याचें एकत्व म्हणजे द्वितीयासहिष्णु एकत्व प्रतिपादिलें आहे. ''एकं सत्'' हें वेदवचन हि प्रसिद्धच आहे. हें जें द्वैतासहिष्णु एकत्व तें या जगांत कुठें दिसत नाहीं. जगांत दिसतें तें सर्वत्र द्वैतच दिसतें. तम:प्रकाश, सदसत्, चराचर, चेतनाचेतन, स्त्री-पुरुष इहपर इत्यादि द्वंद्व, द्वैत वा सद्वितीयताच सर्वत्र दिसून येत नाहीं काय? जगांतील हें द्वैत-प्राधान्य लक्षूनच तर संस्कृत भाषेनें द्विवचन घडवलें आहे. मनुष्य वा जीव आधीं एकटा असतो. मग तो लग्न करून दोन होतो आणि पुढें तीन चार इत्यादि बहु होतो. या कौटुम्बिक म्हणजे घरोघरच्या अनुभवाला अनुलक्षून संस्कृत भाषेनें तीन वचनें केलीं आहेत. हीं अशीं अनेकवचनें जगांत दिसत असलीं आणि जग म्हणजेच अनेकवचन असलें तरी त्याचें मूळ एक वचनच आहे हें विसरतां येत नाहीं आणि तें एकवचन स्वत:सिद्ध आहे. हें जें स्वत:सिद्ध एकवचन तोच एक होय, तोच परमात्मा होय. त्या एकापासून अनेक होतें. आणि त्या एकांतच तें परत लीन होतें. आदौ अन्ते एकच जर असतें तर मध्यें हि, दिसणारें अनेक हें एकच होय हें उघड आहे. म्हणून वेदाचा सिद्धान्त 'एकं सत्' त्याचा अर्थ, एकच एक आहे आणिक कांहीं वेगळें नाहीं.

### ७२६. नैक

परमात्मा एक आहे तसा तो नैक म्हणजे बहु हि आहे. कारणरूपानें तो एक आहे, कार्यरूपानें तो बहु आहे. हें एकत्व आणि नानात्व ज्ञानदेव दृष्टान्तानें असें

विवरितात: "विश्वालंकाराचे विसुंरे। आहाति नाना आकारें। तरी घडिले एकें चि भांगारें। परब्रह्में।" हें वैचित्र्यपूर्ण जग म्हणजे सोन्याचे नाना नग होत. पण ते ब्रह्मरूप एका सोन्याचेच घडलेले आहे. मृद्-घट, जल-तरंग इत्यादि वेदान्तप्रसिद्ध दृष्टांतांनीं हेंच विशद केलें आहे. एकत्व आणि अनेकत्व यांचा समन्वय श्रुतीनें असा केला आहे खरा, पण तिला द्वैताचें अगदीं वावडें आहे. कार्यकारणांत अद्वैत आहे. कार्याचें अनेकत्व हें मुळीं मिथ्याच आहे. आहे तें एक कारणच. त्यामुळें त्यांचा मुळींच विरोध नाहीं. पण कोणी जर म्हणूं लागला कीं या चेतन जगाचें कारण जडचेतन उभयरूप आहे, द्वैतरूप आहे, तर तें श्रुतीला मुळींच मान्य नाहीं. "एकं सत्" हा तिचा सिद्धान्त आहे. "नेह नानास्ति किंचन" हा त्या सिद्धांतापासून निष्पन्न होणारा उपसिद्धान्त आहे. तो कारणगत द्वैताचा निषेध करतो. कार्यरूपानें दिसणारें नानात्व त्याच्या लेखीं नानात्व नव्हे. म्हणून नैक त्याला मान्य होऊं शकतें. त्याचा समन्वय होऊं शकतो. पण या जगाचें कारण ब्रह्माबरोबरच अब्रह्महि आहे अशा विचाराचा नुसता वास हि श्रुतीला सहन होणारा नाहीं. इस्लाम मध्यें हि मुख्य सिद्धान्त हाच आहे आणि त्याबाबत मुळीं तडजोड होणारी नाहीं. अल्लाशीं दुसऱ्या कशाची जोड देणें याला ते महान् अपराध, महापातक समजतात. त्याला ते शिरकत असें म्हणतात. हा इस्लामी वेदान्त-सिद्धांतच आहे. त्यांत आम्हांला नवीन कांहीं नाहीं. कारणांत विजातीय सजातीय स्वगत कसला भेद संभवत नाहीं. तसा संभव कल्पिणें म्हणजेच द्वैत होय आणि याचा श्रुतीनें स्पष्ट भाषेंत व वारंवार निषेध केला आहे. हें एवढें द्वैत वगळून ती कार्यगत नैकता खुशाल गिळते.

### ७२७. सव

सूयते अस्मिन् इति सव:। ज्यांत सोम रस गाळला जातो तो सोमयाग सव म्हणावयाचा. गीतेच्या पुढील श्लोकांत वैदिक धर्माचें स्वरूप थोडक्यांत संगृहीत झालें आहे. "त्रैविद्या मां सोमपा: पूतपापा: यज्ञै रिष्ट्वा स्वर्गतिं प्रार्थयन्ते। ते पुण्यमासाद्य सुरेन्द्रलोकं अश्नन्ति दिव्यान् दिवि देवभोगान्।।" वेदाचे मंत्र घोकावे, यज्ञयाग करावा, त्यांत सोमरस प्यावा आणि इहलोकीं स्त्रीपुत्र गायबैल धनधान्य यांनीं समृद्ध होऊन सुखानें जगावें व परलोकीं स्वर्गीय सुखाची अपेक्षा बाळगावी. असा त्यांचा जीवनाचा आदर्श होता. पण खा प्या मजा करा- असा हा केवळ ऐहिक जीवन जगणाऱ्या लोकायतिकांचा आदर्श नाहीं. ते स्वर्ग मानीत आहेत. आणि तो स्वर्ग पुण्यकर्मांनींच मिळतो असें हि मानीत आहेत. म्हणजे हा एक नैतिक आदर्श आहे. सत्कर्माचें फळ स्वर्ग, स्वैरकर्माचें फळ नरक असें ते मानीत आणि इथेंच म्हणजे वेदार्थाबाबत वेदविधानाबाबत औपनिषदिक ऋषींनीं त्या यज्ञ-कर्मवादी पूर्वमीमांसकांना पछाडलें आहे. कर्मवाद्यांची वेदार्थ-मीमांसा ठीक नाहीं असें ज्ञानवाद्यांनीं सिद्ध केलें आहे. वेदांचें तात्पर्य काय हें ठरविण्याच्या या लढ्यांत कर्मवादी पूर्वमीमांसकांना ज्ञानवादी उत्तरमीमांसकांनीं परास्त केलें आहे. त्यांनीं जो वेद पिळला, जो वेदार्थ छानला तो उपनिषदांत ब्रह्मसूत्रांत आणि गीतेंत उत्तरोत्तर विशद झाला आहे. हाच अन्तिम सव होय. परंतु नखशिखान्त जसा एकच पुरुष असतो तसा कर्म-मीमांसेपासून सुरू होऊन ज्ञानमीमांसेपर्यंत पोंचलेला हा सव हि एकच होय. कां कीं दोहोंचा हि इष्ट तो एक परमात्माच आहे. म्हणून तो सव म्हटला आहे.

### ७२८. क(स्वस्ति+क)

"क:" म्हणजे कोण. परमात्मा हा अमुक आहे असें ठाम विधान करतां येत नाहीं. कारण तो अव्यक्त आहे, त्यामुळें त्याच्याविषयीं जिज्ञासा, कुतूहलच राहतें. तें जें परम जिज्ञास्य, तो जो सदैव अविज्ञात, तोच क: म्हणजे कोण म्हणून म्हटला आहे. "कोणाचें

हें रूप, हा देह कोणाचा?'' असा सदैव ज्याचा शोधच चालला आहे, पण जो कोणाला अद्याप गवसला नाहीं तो जो ''परमे व्योमन्'' दडून बसलेला पण ज्यानें सर्वांना चाळा लावला आहे, कोण म्हणून ज्याची जो तो पृच्छा करतो आहे त्याला दुसरें नांव काय देणार? त्याचें नांव कोणच. या क नें उपनिषदांना इतकें झपाटलें आहे कीं एक सबंध उपनिषद या क च्या नांवानें झालें आहे केनोपनिषद्. ''केनेषितं पतति प्रेषितं मन:, केन प्राण: प्रथम: प्रैति युक्त:। केनेषितां वाचमिमां वदन्ति, चक्षु:श्रोत्रं क उ देवो युनक्ति।।'' वेद प्रश्नोत्तर करतात ''कस्य वयं मनामहे चारु नाम।'' हा प्रश्न हि आहे आणि उत्तर हि आहे. कोणाचें बरें नाम आम्हीं घ्यावें–प्रश्न. कोणाचें बरें नाम आम्हीं घ्यावें–उत्तर. पहिल्या वाक्यांत कोणाचें हें पद प्रश्नार्थक सर्वनाम आहे, तर दुसऱ्या वाक्यांत तें नाम आहे. पहिल्या वाक्यांत बरें क्रियाविशेषण आहे तर दुसऱ्या वाक्यांत तें विशेषण आहे. इतर सर्व नामांची किंमत ज्ञात आहे, पण क या नामाची किंमत अज्ञात आहे. म्हणून तो परमात्मा क आहे. क हें बैजिक नाम आहे. क हें पहिलें व्यंजन असल्यामुळें तें परमात्म्याचें पहिलें नाम व पहिलें रूप होय. त्यालाच स्वस्तिक असें म्हणतात. स्वस्तिक म्हणजे कल्याणरूप 卐 हें चिह्न एकसमयावच्छेदें नाम आहे, रूप आहे, चिह्न आहे. तें व्यक्ताव्यक्तवाचक आहे.

## ७२९. किम्

क: का किम् हीं पुंस्त्रीनपुंसक सर्वनामें किम् या प्रातिपदिकाचीं रूपें मानिलीं जातात. कारण समासांत प्रातिपादिक म्हणून किम् चा स्वीकार झाला आहे. वस्तुत: मूळ सर्वनाम क आहे. त्याचीं पुल्लिंग स्त्रीलिंग नपुंसकलिंग रूपें म्हणजे क: का किम्. या रूपांतील अ आ अम् (इथें इम्) हें लिंग-प्रत्यय होत–जसे मराठींत आ ई एं हे प्रत्यय आहेत. नदीमातृक: नदीमातृका नदीमातृकम् या शब्दांत आपल्याला ते प्रत्यय आढळून येतात. किम् प्रमाणेंच यत् तत् हीं सर्वनामें होत. तीं क्रमानेंच पुढें आलीं आहेत. त्यांचीहि प्रातिपदिकें किम् या नपुंसक रूपाप्रमाणें यत् तत् हीं नपुंसक रूपेंच मानिलीं आहेत. वास्तविक य त हीं अक्षरेंच क प्रमाणें मूळ प्रातिपादिक सर्वनामें म्हटलीं पाहिजेत. तीं तशीं मानिलीं जांत नाहींत याचीं अनेक कारणें असूं शकतील. सामान्यत: सर्वनामें हीं वर्तमान कालीन भाषेच्या इतर नामांहून फार प्राचीन असतात आणि म्हणून त्यांचें मूळ त्यांचीं रूपें हीं नियमित असत नाहींत, हें त्या कारणांपैकीं एक प्रमुख कारण आहे असें म्हणतां येईल. क: च्या चिन्तनांत मुख्यत: किम् चाच ऊहापोह येऊन गेला आहे. क: आणि किम् हीं सर्वनाम दृष्ट्या एकच होत. तथापि क: पुंलिंगत्वामुळें सगुणपर तर किम् हें नपुसंकत्वामुळें निर्गुणपर आहे असें मानतां येईल. ''किं तत् ब्रह्म किमध्यात्मं किं कर्म पुरुषोत्तम। अधिभूतं च किं प्रोक्तं अधिदैवं किमुच्यते।'' इत्यादि किं-पूर्व विचारणा अथवा जिज्ञासावृत्ति, तज्जनित ज्ञानमय जीवन आणि तत्फलित अज्ञान-निवृत्ति हें परमात्म्याचेंच स्वरूप होय. म्हणून तो किम् म्हटला आहे. किम् जिम् इत्यादि नांवें हि आहेतच जगांत कितीहि विचारणा केली आणि कांहींहि उत्तर मिळालें तरी शेवटीं किम् परत उरतेंच. तें जें अतिप्रश्न तत्त्व तेंच किम् होय.

## ७३०. यत्

क: किम् यत् तत् हीं पदें सर्वनामें असल्यामुळें त्यांच्यांत धातु शोधणें अनावश्यक तसेंच अयुक्त आहे. त्यामुळें 'कनति इति क:। पृच्छ्यते इति वा कायते इति वा किम्। यतते इति यत्। तनोति इति तत्। इत्यादि व्युत्पत्ति विरसच म्हणावयाची. यत् म्हणजे जें, हें संबंधवाचक सर्वनाम आहे. त्याचा अनुसंबंधीशीं संबंध जोडला जाऊन त्याविषयीं कांहीं विधान होतें. अर्थात् यत् ने ज्याचा निर्देशक होतो तें आधीं गृहीत धरलें जातें. हा स्वत:सिद्ध वस्तुनिर्देशक

म्हणावयाचा. ब्रह्म ही ती स्वत:सिद्ध वस्तु आहे. म्हणून यत् हें ब्रह्मवाचक होय. ''यद् अक्षरं वेदविदो वदन्ति विशन्ति, विशन्ति यद् यतयो वीतरागा:। यत् इच्छन्तो ब्रह्मचर्यं चरन्ति, तत् ते पदं संग्रहेण प्रवक्ष्ये।।'' अशा प्रकारें 'यत्' नें ज्याचें संबन्धन होतें, तें पूर्वसिद्ध व स्वत:सिद्ध तत्त्वच यत्पदवाच्य होय. अर्थात् तें परमात्मतत्त्व होय. कारण तेंच आद्य आहे. तेंच स्वत:सिद्ध आहे. इतर सर्वांची सिद्धि त्याच्याच अभ्युपगमानें होते. त्याच्याच अभ्युपगमानंतर होते. 'किम्' पदानें जिज्ञासा केली जाते, तर 'यत्' पदानें त्याचा संबन्ध दाखविला जातो; त्याचा संकेत केला जातो. ''अथातो ब्रह्म-जिज्ञासा'' आतां आपण ब्रह्म जाणून घेऊंया. असें म्हटलें म्हणजे 'किं तद् ब्रह्म' कोणतें ब्रह्म अशी पृच्छा केली जाते. त्याचें उत्तर ''जन्माादि अस्य यत:'' असे 'यत्' नें दिलें जातें. ज्याच्या पासून या जगाचा जन्म, ज्याच्या आधारें त्याची स्थिति, आणि अन्तीं ज्यांत त्याची परिणति वा लय होतो तें ब्रह्म होय. अशा प्रकारें किम् यत् आणि तत् हें एक सूत्र आहे. या त्रिकाच्या योगें प्रश्नोत्तरोपनिषत् पूर्ण होतें. किंबहुना ब्रह्मसूत्र सिद्ध होतें. म्हणून हीं तिन्हीं पदें मिळून व स्वतंत्रपणें ब्रह्मवाचक होत.

## ७३१. तत्

ॐतत् सत्। तत् त्वं असि। तत् सवितुर् वरेण्यं भर्गो देवस्य धीमहि। इत्यादि महावाक्यांत ज्या तत् चा उल्लेख आहे तें तत् परमात्मवाचक होय, हें सांगायला नकोच. सर्व नामें आणि सर्वनामें परमात्मवाचकच आहेत. कारण पदें वस्तूचाच निर्देश करतात, अवस्तूचा नव्हे. आणि वस्तु जर आत्मभिन्न दुसरी नाहींच तर तीं पदें दुसऱ्या कोणत्या वस्तूचा निर्देश करणार? तथापि सर्व पदांत तत् हें पद शिरोमणि आहे. तें युगपत् अवस्तूचा निषेध आणि वस्तूचें विधान करतें. अतद्व्यावृत्तिपूर्वक तद्बोधन करतें. ''तदेव ब्रह्म त्वं विद्धि नेदं यद् इदं उपासते'' जे वाणीनें वा मनानें आपण उच्चारतों चिन्तितों तें सारें अतत् आहे, अवस्तु आहे. वस्तु ह्या सर्व आवरणाच्या पलीकडे आहे. म्हणून ती तत् होय. तो तदुपासक औपनिषदिक ऋषि म्हणतो: ''हिरण्मयेन पात्रेण सत्यस्यापिहितं मुखम्। तत् त्वं पूषन् अपावृणु सत्यधर्माय दृष्टये'' हें जें सारें इन्द्रिय-गोचर रमणीय वाटतें आहे, गोड गोड वाटतें आहे तें सारें झांकण आहे. निजधनापासून दूर राखणारा अंतराय आहे. तें सारें झांकण आहे, तें दूर केल्याखेरीज त्याच्या आड दडलेलें तें सत्य 'स्वरूप' हस्तगत होत नाहीं. मी तर 'त्या' सत्याचा उपासक आहे, ह्या इन्द्रियगोचर आणि म्हणून गोड वाटणाऱ्या भुलविणाऱ्या असत्याचा नाहीं. हे आत्मदेवा, म्हणून तूं हें बाह्य भुलावणें दूर सार आणि मला आपलें तें ह्या भुलावण्यापलीकडचें खरें रूप दाखव. आत्मदर्शन दें.

## ७३२. (अनुत्तम) पद

'पदं अनुत्तमम्' हें सविशेषण विशेष्य एक नाम आहे. 'किं यत् तत् पदमनुत्तमम्' हें एक सूत्र आहे. त्या सूत्रांतील सर्व पदांचें प्रतिपाद्य, सर्वांचें उद्दिष्ट सर्वांचें विशेष्य पदं हें पद आहे. पद्यते इति पदम् ''जें गांठलें जातें, ज्या मुक्कामाला पोंचलें जातें तें पद म्हणावयाचें. आणि ज्याच्या पलीकडे कांहीं गन्तव्य उरत नाहीं, तो जो शेवटचा मुक्काम त्याला म्हणावयाचें 'अनुत्तमं पदम्.' त्याहून उत्तम वरचें पलीकडचें, श्रेष्ठ दुसरें पद नाहीं. हिमालयाचें जें अत्युच्च शिखर गौरीशंकर त्याला पोंचल्यावर जसें त्यावर पुढें कुठें जायचें चढायचें रहात नाहीं, तसें ह्या अनुत्तम पदाला पोंचल्यावर सर्व गति कुंठित होते. सर्व प्रवास समाप्त होतो. हें वैकुंठ, हें अनुत्तम पद म्हणजे किम् नें ज्याची विचारणा केली जाते, यत् नें ज्याचें संबंधन होतें, तत् नें ज्याचें निर्देशन होतें तें नित्य शुद्ध बुद्ध अव्यक्त अक्षर होय. जेथून पुनरावर्तन आहे तें पद स्वर्गादि चरम वा परम म्हणतां येत नाहीं. तर ''यद् गत्वा न निवर्तन्ते तद् धाम परमम्'' जियें पोंचल्यावर माघारें फिरणें नाहीं तें शाश्वत स्थानच परम पद होय. त्याहून उत्तम श्रेष्ठ दुसरें पद नाहींच,

म्हणून त्याला अनुत्तम पद म्हटलें आहे. इतर जीं पदें म्हणजे गति वा लोक आहेत ते आहेत. थोर थोर पुण्यकर्मानेंच त्यांची प्राप्ति होते, तथापि ते सगळे अनित्य आहेत. परमेष्ठिपद म्हणजे ब्रह्मदेवाचा लोक घेतला तरी तो हि ब्रह्मदेवाच्या आयुष्याबरोबरच संपणारा आहे. तिथलीं सारीं सुखें हि त्याबरोबरच संपणारीं आहेत. आणि जीं संपून दु:ख देतात त्यांना सुखें तरी कसें म्हणावयाचें? तीं हि परिणामीं दु:खच देणारीं होत. म्हणून हे सगळेच लोक उच्च हि तुच्छ च होत. ते उत्तम नव्हेत मग अनुत्तम म्हणजे सर्वोत्तम कुठून असणार? ते सगळे अनित्य आणि असुख होत.

## ७३२. अनुत्तम (पद)

चतुर्दश भुवनांची वा पदांची कल्पना केली गेली आहे. ही काय कल्पना आहे? उच्चतर आणि निम्नतर चेतन अवस्थांची चढती आणि उतरती भांजणी आहे ही. या उतरंडींत सर्वांत वरचें पद तें पारमेष्ठ्य वा सत्यलोक होय, सर्वांत खालचें पद तें अन्धतामिस्र नरक म्हणूंया. अन्धतामिस्र म्हणजे चेतनावस्थेची निम्नतम भूमिका होय. तिथें जणूं अस्मिता अहंताच लोप पावली आहे. असें नव्हे तर तिचा जणूं मुळीं उदयच झालेला नाहीं, जाणीवच आलेली नाहीं. आणि पारमेष्ठ्य म्हणजे जिथें जाणिवेची चतुर्दशी झाली आहे अशी चेतनावस्था. तिथें सर्वज्ञता आहे. उदुत्तर भूमिका चैतन्याच्या शुद्ध शुद्धतर आविर्भावानें प्राप्त होते आणि हा आविर्भाव तीव्र आणि तीव्रतर तपोबलानें होतो. निरुपाधिक चैतन्य हें अनुत्तम पद होय. तिथेंच शुद्ध चैतन्याची पूर्णिमा होते. चतुर्दशीला हि चंद्रबिंब पूर्ण दिसतें, पण तिथें एक कळा न्यून असते. तिथें क्षुद्र संकुचित देहात्मभाव नाहीं पण विश्वात्मभाव आहे, अत्यन्त व्यापक व शुद्ध अहंता अस्मिता आहे, परंतु ही हि उपाधिच आहे. ती हि गेली कीं चैतन्याची पूर्णिमा झाली. तिथें निखळ चैतन्य नांदतें. त्यामुळें देहात्मभावाचें अज्ञान तिथें नाहींच, पण विश्वात्मभाव असून त्याची जाणीव, त्याचें ज्ञान हि तिथें नाहीं. हेंच अतिज्ञान अनुत्तम पद होय. 'सा काष्ठा सा परागति:' ह्यालाच अनुलक्षून म्हटलें आहे. ज्ञानदेव या संज्ञेचा अनुभव असा वर्णितात : ''जाणोनियां नेणपण अंगीं बाणलें। नेणोनियां जाणपण सहज नेणवलें वो माये। आत्मज्ञानाची गति झाली निवांत। प्रबोधतत्त्व मी पावलें वो माये।'' हें ''प्रज्ञानं ब्रह्म''

## ७३३. लोकबन्धु

''एको नैक: सव: क: किं यत् तत् पदमनुत्तमम्'' या श्लोकार्धांत निर्गुण तत्त्वविचाराच्या पैलतीराकडून सहस्राचा प्रवाह वाहिला आहे. ''लोकबन्धुर् लोकनाथो माधवो भक्तवत्सल:'' या पुढील श्लोकार्धांत तो सगुण लोककल्याणाच्या ऐलतीराकडून प्रवाहित झाला आहे. आमचें जीवन हें व्यक्ताव्यक्त-स्पर्शी असल्यामुळें कोणताहि समग्र विचार उभय-स्पर्शीच असूं शकतो. आपलें चालू जीवन व्यक्त आहे पण त्याचें मूळ अव्यक्त आहे. तरु पत्र-पुष्प-फल-समृद्ध होऊन सफळ व्हायचा तरं त्याच्या मुळाची निगा विशेष केली पाहिजे. त्याची उपेक्षा करून साफल्याची आशा करतां येत नाहीं. त्याच बरोबर मूळ पुष्ट नि हृष्ट म्हणजे शोभिवंत व्हायचें तर शाखापर्णसंभार हि सांभाळलाच पाहिजे. म्हणून व्यक्ताचा विचार हि उपेक्षणीय नाहीं. अव्यक्ताचा विचार, शाश्वताचा विचार म्हणजे तत्त्वज्ञान होय. व्यक्ताचा विचार, प्रस्तुताचा विचार म्हणजे लोकधर्म होय. प्राचीन समाजनेते ऋषिमुनि अव्यक्तासक्त होते तर अर्वाचीन समाज नेते व्यक्तासक्त आहेत. पण या दोहोंपैकीं एकाचीहि उपेक्षा करून चालणार नाहीं. केन्द्र-परिधिवत् ते अभिन्न आहेत. केन्द्रावांचून परिधि असूं शकत नाहीं आणि परिधीवांचून केन्द्र हि असूं शकत नाहीं. परिधिच नसेल तर केन्द्राला केन्द्र कोण म्हणेल? जेव्हां परिधिरहित केन्द्र दिसतो तेव्हां तो निभृतपरिधि केन्द्र असतो, इतकेंच. पण याचा लोकबन्धु पदाशीं संबंध काय? संबंध हा कीं तें पद लोकधर्माचा, लोकजीवनाचा विचार करणारें आहे. लोकबन्धु म्हणजे लोकाचा हितकर्ता: समस्त लोक-

जीवन सुखी कसें होईल याचा विचार आणि आचार पाहणारा. वर्णाश्रमधर्म—प्रतिपादित परमात्मा लोकबन्धु झाला आहे. तो संपूर्ण समाजाचा विचार करतो. एकाद्या व्यक्तीच्या संकुचित स्वार्थाचा विचार तो करीत नाहीं, तर समग्र समाजाच्या समग्र हिताचा तो विचार करतो; म्हणून परमात्मा हा लोकबन्धु म्हटला आहे. आज विनोबा हे असे लोकबन्धु आहेत असें म्हणतां येईल.

### ७३४. लोकनाथ

लोकानां नाथः लोकनाथः। लोकांचा नाथ म्हणजे स्वामी तो लोकनाथ म्हणावयाचा. पण लोक म्हणजे काय? लोक्यते इति लोकः। जो पाहिला जातो तो सगळा लोक होय. अर्थात् हा सगळा व्यक्ताकार म्हणजेच लोक. या लोकांत काय येत नाहीं? सारेंच त्यांत अंतर्भूत होतें. तृणकांडापासून ब्रह्माण्डापर्यंत, मुंगीपासून ब्रह्मदेवापर्यंत. सचराचर समस्त सृष्टि त्यांत अंतर्भूत आहे. अशा या लोकाचा तो परमात्मा नाथ आहे, नियंता आहे. त्याच्या अधीन हें सारें विश्व आहे. लोक व्यक्त आहे, तो अव्यक्त आहे. लोक क्षर आहे, तो अक्षर आहे. ''अव्यक्तो ऽक्षर इत्युक्तः''. हा जो अव्यक्त आणि अक्षर पुरुष तोच या विश्वांत अंतर्यामी रूपानें प्रविष्ट होऊन त्याचें नियमन करीत आहे, त्याला चालवीत आहे. म्हणून तो म्हणावयाचा लोक-नाथ. या लोकनाथालाच पुढील ध्यानांत सर्वलोकैक-नाथ म्हटलें आहे

शान्ताकारं भुजगशयनं पद्मनाभं सुरेशम्
विश्वाधारं गगन-सदृशं मेघवर्णं शुभाङ्गम्।
लक्ष्मीकान्तं कमलनयनं योगिभिर् ध्यान-गम्यम्
वन्दे विष्णुं भवभयहरं सर्वलोकैकनाथम्॥

हा लोकैकनाथ परमात्मा योग्यांनाच ध्यानानें गम्य होतो. कारण तो अव्यक्त आणि अक्षर आहे. पण ज्यांना तें अव्यक्त अक्षररूप न आकळलें तरी परम श्रद्धेनें जे त्याचें नाम-रूप-गुण-कर्म आठवून त्याची सगुण भक्ति करतात त्यांना तो परमात्मा कधीं अंतर देत नाहीं. त्यांच्यासाठीं तो अवतार ग्रहण करतो. तो दुर्जनांचें पारिपत्य करून सज्जनांचा कैपक्ष घेतो आणि या भूतलावर धर्माचें राज्य स्थापतो. त्याला हा उद्योग वारंवार करावा लागतो. कारण जनता विषयासक्तींत सांपडून देवाला विसरून जाते आणि अधर्म बळावतो. अधर्म बळावला म्हणजे त्याच्या पारिपत्यासाठीं त्याला अवतार ग्रहण करावा लागतो. आणि अशा प्रकारें तो आपल्या भक्तांना आणि अभक्तांना दाखवून देतो कीं हा लोक कांहीं अनाथ नाहीं. परमात्मा त्याचा नाथ आहे. परमात्मा नाथ असल्यामुळें भक्त निश्चिंतपणें धर्माचरणच करीत राहतात आणि द्रोही दुष्टांचा दुष्टावा त्यांच्या नाशालाच कारण होतो.

### ७३५. माधव

माधव हें पद इथें तिसऱ्यांदां आलें आहे. पूर्वीं ८ व्या व १८ व्या श्लोकांत तें आलेलें आहे, वारंवार आलें आहे त्यामुळें तें सहस्राचें आवडतें नाम आहे, असें म्हणावयाचें. मा म्हणजे लोकमाता लक्ष्मी तिचा धव म्हणजे पति तो माधव. अथवा मा म्हणजे प्रमा, बुद्धि तिचा पति तो मा-धव. ''यो बुद्धेः परतस् तु सः'' म्हणून म्हटलेंच आहे गीतेनें. या प्रकारें माधव शब्दाची व्युत्पत्ति आणि विवरण पूर्वीं येऊनच गेलें आहे; आतां इथें तो शब्द भिन्न प्रकारें व्युत्पादावा लागेल. ''मधोः अपत्यं पुमान् माधवः'' मधु कुळांत जन्मला म्हणून माधव म्हणावयाचा. यदु पासून जसा यादव तसा मधु पासून माधव. परंतु यदुप्रमाणें मधु प्रसिद्ध नाहीं. वंशज पूर्वजाचें नांव चालवतो. आधीं तो पूर्वजांच्या नावानें प्रसिद्ध होतो. मागाहून तो आपल्या नांवानें पूर्वजांना कीर्तिमंत करतो, सुप्रसिद्ध करतो. कालांतरानें पूर्वजच वंशजाच्या दिगन्त कीर्तीमुळें लोपल्यासारखा होतो आणि लोक त्याला ओळखीनासे होतात. तसेंच मधुविषयीं झालेलें दिसतें. माधव सुप्रसिद्ध, पण मधु अप्रसिद्ध! पण फळावरूनच झाड प्रसिद्ध असतें, होय ना? तर मग प्रसिद्ध फळाचें झाड प्रसिद्ध नाहीं तरी कसें म्हणायचें? शिवाय मधु हा मधुरा (म्हणजेच आजची मथुरा) नगरी, यमुनातीरींचें मधुवन इत्यादि नांवांत

सुप्रसिद्धच आहे. मधुराजाचा प्रदेश मधुरामंडल हा मधुकुल्यांनीं व घृतकुल्यांनीं पूर्ण होता. मथुरेचा पेढा आजहि प्रसिद्ध आहे. खवा आणि साखरेचा रवा म्हणजे पेढा ना? जिथें विपुल दूध दुभतें आणि मधु शर्करा आहे तो देश मधु आणि तिथें जन्मला तो माधव म्हणावयाचा. पण हें चिंतन खरोखर 'माधवो मधुः' या पदांच्या विवेचनांत अधिक सयुक्तिक झालें असतें. इथें तर 'लोकबन्धुर् लोकनाथो' इत्यादि सूत्र आहे. तदनुसार माधव म्हणजे लोकमातृस्वामी असा अर्थ प्रतीत होतो. पुढील पद भक्त-वत्सल हि त्यालाच अनुसरून लोक-वत्सल अशाच आशयाचें होय, असें म्हणतां येईल.

### ७३६. भक्तवत्सल

''लोकबन्धुर् लोकनाथो मा-धवो भक्तवत्सलः'' हा श्लोकार्ध श्लोकाचा झोक पहातां ''लोकबन्धुर् लोकनाथो लोकेशो लोकवत्सलः'' असाच म्हटला पाहिजे. परमात्मा हा या विश्वावर आपल्या अपत्या प्रमाणें प्रेम करतो म्हणून तो लोकवत्सल होय. पण इथें तर भक्तवत्सल म्हटलें आहे? तो भक्तवत्सल असल्याचें कृतज्ञतेनें भक्त म्हणतो इतकेंच, वस्तुतः तो लोकवत्सलच आहे. कारण ''समोऽहं सर्वभूतेषु न मे द्वेष्योऽस्ति न प्रियः। ये भजन्ति तु मां भक्त्या मयि ते तेषु चाप्यहम्।'' असें भगवद्वचन प्रसिद्ध आहे. अग्नि सर्वांना समान आहे, पण जो त्याच्या जवळ बसेल त्याला तो अधिक उष्णता व प्रकाश देईल, हें उघड आहे. तसा परमात्मा हा लोकवत्सल म्हणजे सर्वांना समान आहे, पण त्याच्याकडे येणाऱ्यांना तो विशेष उपकर्ता होतो. असा तो भक्तवत्सल म्हणविला जातो. ''न मे भक्तः प्रणश्यति'' असें त्याचें अभिवचन आहे. पण तें खरें करून घेणें हें भक्तांच्या स्वाधीन आहे. भक्त जर परमात्म्याकडे न वळता त्याच्यापासून दूर दूर गेला तर? तर तो अभक्त झाला आणि मग त्याचें क्षेम नाहीं. म्हटलेंच आहे भगवंतानें ''अप्राप्य मां निवर्तन्ते मृत्युसंसार-वर्त्मनि''. 'मृत्यूची धरिती वाट संसारीं मज सोडुनी' भक्त आपला संसार आणि आपला मोक्ष कसलीच चिंता करीत नाहीं. तो केवळ ईश्वर-परायण होऊन राहतो. आणि अशा भक्ताची सगळी चिंता परमात्मा वाहतो. ''योगक्षेमं वहाम्यहम्'' अशी त्याची प्रतिज्ञाच आहे. हेंच त्याचें भक्तवात्सल्य होय. भगवंताचें हें भक्त-वात्सल्य भक्त-शिरोमणि तुकारामानें असें सांगितलें गाइलें आहे. 'देवाची ते खूण आला ज्याचे घरा। त्याच्या पडे चिरा संसारासी'' इत्यादि.

### ७३७. सुवर्णवर्ण

''सुवर्णवर्णो हेमाङ्गो वराङ्गश्चन्दनाङ्गदी'' या ७९ व्या श्लोकाच्या पूर्वार्धांत सहस्र सूक्ष्माकडून स्थूलाकडे अथवा आभ्यन्तराकडून बाह्याकडे वळलें आहे, असें म्हणतां येईल. निर्गुण, सगुण, साकार अशी ही गति झाली आहे.

सहस्रकारानें गीतेचें अनुसंधान ठेवलें आहे असें ''आदित्यो ज्योतिरादित्यः'' हें सहस्र-वचन-''आदित्यानां अहं विष्णुः, ज्योतिषां रविरंशुमान्'' या गीतावचनाला अनुसरून आहे यावरून म्हणतां येईल. तथापि मुख्यतः त्याचा आधार वेदोपनिषदेंच आहेत. सहस्राच्या प्रास्ताविक भागांत ह्या नामांना ''ऋषिभिः परिगीतानि'' म्हटलें आहे. ऋषिभिः हें पद मंत्रद्रष्ट्या वैदिक ऋषींचें वाचक आहे. आणि ''परिगीतानिः'' हें पद जरी मुख्यतः सामगायनाचा निर्देश करीत असलें तरी तें भगवद्-गीता उपनिषदें यांचें हि सूचन करीत आहे, असें म्हणतां येईल. म्हणून प्राचीनांची परिपाटीं आधीं श्रुतीचा आधार देण्याची आहे. तो न मिळाल्यास, वा मिळून हि अधिक विशदीकरणासाठीं, मागाहून स्मृतीचा आधार देण्याची आहे. आणि ती योग्यच आहे. सुवर्णवर्ण, हें पद वेदांत ''हिरण्यवर्ण'' असें येतें. सुवर्ण हें वेदांत हिरण्याइतकें प्रसिद्ध नाहीं. त्यांत ''हिरण्यवर्णां हरिणीं, ''हिरण्मयेन पात्रेण'' इत्यादि वचनें येतात. सुवर्ण हें मागाहून रूढ झालेलें आहे. पण हिरण्यवर्ण वा हिरण्मय पुरुष वा सुवर्णवर्ण म्हणजे काय? सुवर्णस्य वर्ण इव वर्णो यस्य सः सुवर्णवर्णः हा विग्रह तर स्पष्टच आहे. पण अर्थ स्पष्ट नाहीं. काय

तो आत्मा सोन्याच्या चांदीच्या वर्णाचा आहे? सोन्यासारखा पिवळा का चांदी सारखा पांढरा आहे? तो निरञ्जन परमात्मा तर ''रक्त-श्वेत-कृष्ण-पीत-प्रभाभिन्न चिन्मय'' म्हणून वर्णिला आहे. तेव्हां सुवर्ण-वर्ण या पदाचा अर्थ दीप्तवर्ण असा समजावयाचा. ज्वलद्वर्णाला निकटचा म्हणून तो सुवर्णवर्ण म्हटला आहे.

### ७३८. हेमाङ्ग

हेमेव अङ्गानि यस्य सः हेमाङ्गः। ज्याचीं अंगें सोन्यासारखीं आहेत तो हेमाङ्ग म्हणावयाचा. इथें अंग शब्द वस्तुतः अवयववाची नाहीं, तो शरीरवाची आहे. म्हणून ''हेमेव अङ्गं वपुः यस्य सः हेमाङ्गः'' असें म्हणणें बरें. मराठींत अंग शब्द शरीरवाची आहे. अंग धुणें, अंग ठणकणें, अंगीं लागणें इत्यादि प्रयोगांत तो शरीरवाची आहे, हें उघड आहे. आणि तो संस्कृतांतूनच आलेला आहे. ''अङ्गं गलितं पलितं मुण्डम्'' इत्यादि वचनांतून तो आढळतो हि. शंकारचार्यांनीं तो तसा घेतला हि आहे. पण विष्णु तर मेघवर्ण वर्णिला आहे? तो हेमाङ्ग कसा म्हणावयाचा? परमात्मा चिद्घन आहे. त्याचें तें स्वरूप लक्षून त्याला हेमाङ्ग म्हणणें योग्यच आहे. अथवा ''हेम-सहितानि अलंकृतानि अङ्गानि यस्य सः'' असा विग्रह करावयाचा. लक्ष्मीनें च ज्याच्या ठाईं वसति केली तो सहजच हेमाङ्ग झाला. हें त्याचें लक्ष्मीकान्तत्व दाखविण्यासाठीं तो सर्वांगीं सुवर्णालंकृत वर्णिला जातो. त्याच्या अंगप्रत्यंगातून लक्ष्मी ओसंडते आहे. नीलमण्याच्या सर्वांगांतून जसें त्याचें बहुमूल्य व शोभा प्रकट होते तसें मेघवर्ण विष्णूच्या अंगांगांतून हेमाङ्गत्व प्रकटत आहे. नीलमणिच आहे तो. मेघवर्णामुळें नील, अनर्घतेमुळें मणि. हा नीलमणि विष्णुच सर्वांगीं सुवर्ण म्हणजे समुज्जवल असल्यामुळें हेमाङ्ग म्हटला आहे. स्यमंतक मणि प्रतिदिन एक तोळा सुवर्ण देत असे. पण हा हेमाङ्ग असा आहे कीं ह्याच्या अंगांगांतून निरंतर सुवर्णाची नदीच वाहते आहे. हवें तितकें सुवर्ण लुटा आणि लुटवा. सगळी किंमत आणि शोभा चेतनाला आहे, मढ्याला नव्हे. म्हणून तो चिद्घन परमात्मा हेमाङ्ग होय.

### ७३९. वराङ्ग

वरं सुन्दरं, अङ्गं वपुः यस्य सः वराङ्गः। ज्याचें अंग म्हणजे शरीर वर म्हणजे सुन्दर आहे तो वराङ्ग म्हणावयाचा. कोणतें अंग सुंदर म्हणावयाचें? सौंदर्याची कसोटी काय? तारुण्य आरोग्य नैर्मल्य वेशभूषौचित्य हें मौलिक सौंदर्य होय. यांनीं युक्त तो सुंदर म्हणावयाचा. या सोबतच जर त्याच्या ठाईं अव्यंगता सौष्ठव वर्णलावण्य हा गुणगण असेल तर त्याला विशेष सुदंर म्हणावयाचें. यावर जर त्याच्या ठाईं अनिन्द्यता दैवीगुण ज्ञान या आन्तरिक दिव्यतेचा प्रभाव वसत असला तर तो परम सुन्दर म्हणावयाचा. पहिला गुणगण हे गणिताच्या भाषेंत साधें सौंदर्य होय. दुसरा सौंदर्यवर्ग आणि तिसरा सौंदर्यघन होय. परमात्मा वराङ्ग म्हटला आहे याचें कारण तो परम सुंदर आहे हें होय. बाह्य हा जर अंतराचा प्रकाश मानला तर बाह्य कुरूपता ही अंतराच्या कुरूपतेचाच आविष्कार म्हणावयाचा. आणि अन्तर जर सुंदर मानलें तर त्याचा बाह्य आविष्कार हा कसा हि असला तरी तो सुंदर म्हणावा लागेल. या दुहेरी कसोटीनें अन्तराचें सौन्दर्य हें बैजिक ठरतें, मौलिक ठरतें, अपरिहार्य ठरतें आणि या जगद्वैचित्र्यांत निर्णायक व तारक तत्त्व तेंच आहे. बाह्य सौन्दर्य भ्रामकच होय. राक्षस नाना रूपें धारण करीत आणि फसवीत. पण मरतांना त्यांचें खरें हिडीस रूप प्रकट होई. त्यांची ती माया म्हणावयाची. जग हें हि तसेंच मायिक आहे. त्यांतील सर्व सौन्दर्य हें तसेंच भ्रामक आहे. तें खरें नाहीं. जें खरें नाहीं त्याला सुंदर तरी म्हणण्यांत काय अर्थ? त्याचें हिडीसपण म्हणजे त्याचें अनित्यत्व व असुखत्व होय. तें शेवटीं प्रकट झाल्याशिवाय रहात नाहीं आणि मग त्याचें आकर्षण कुणाला वाटेल? शेणामातीच्या बनविलेल्या चित्रीव फळानें कोणाच्या तोंडाला पाणी सुटेल? परमात्मा हा मृण्मय नाहीं चिन्मय आहे. त्यामुळें त्याला वराङ्ग

म्हटलें आहे. परमात्म्याची मूर्तिहि शेवटीं बोळवावीच लागेल.

## ७४०. चन्दनाङ्गदी

चन्दन म्हणजेच चन्दन-लेप आणि अंगद म्हणजे केयूर वा बाजूबंद या दोहोंनीं युक्त तो चन्दनाङ्गदी. ''सुवर्णवर्णो हेमाङ्गो वराङ्गश् चन्दनाङ्गदी'' हा श्लोकार्ध एखाद्या सुखवस्तु संपन्न विलासी गृहस्थाचें चित्र आपल्या डोळ्यासमोर उभें करणारा आहे. शरीराची कांति सुवर्णगौर आहे, सर्व अंगें सुरेख आहेत, सुवर्णालंकार अंगकांतीला आणि शरीर-सौष्ठवाला खुलवीत आहेत आणि या सोन्यांत सुगंध म्हणजे चंदनाची उटी हि बाहेर शोभा आणि आंत शीतलता देत आहे. याहून अधिक सुखरूप तें काय असायचें? परमात्म्याचें सुखरूपत्व मनुष्य आपल्या मापानें मापतो आहे. त्याचें सारें स्पृहणीय, सारें भोग्यजात त्यानें रेखाटलें आहे. आणि परमात्माच स्पृहणीयतम म्हटला असल्यामुळें सर्व उच्चावच स्पृहणीयांचा त्याच्या ठाईं सहजच समावेश आहे. मग त्या निराकार निरञ्जनाला ''सुवर्णवर्णो हेमाङ्गो वराङ्गश् चन्दनाङ्गदी'' म्हटलें तर त्यांत गैर काय आहे? ''नभ: पतन्त्यात्मसमं पतत्रिण:'' कावळा आपल्या कुवतीप्रमाणें आकाशांत उडतो. हंस आपल्या शक्तीनुसार भरारी मारतो. कावळा म्हणतो, आकाश ४०० कोस पसरलें आहे, हंस म्हणतो खुळा रे खुळा! अरे, तें ४००० कोस पसरलें आहे. हें माप आकाशाचें नाहीं, हंसकाकांच्या अनुमानशक्तीचें आहे. हें वर्णन हि असेंच हंसकाकीय आहे. मानवी सुख-कल्पनेचें आहे आणि जोंवर जीव देहबद्ध आहे तोंवर त्यानें किती हि उंच उडी मारली तरी उड्डाणभूमि देहच राहणार हें नाकारतां येणार नाहीं. अनुभवाचें साधनच देहेन्द्रियें असल्यामुळें त्यांच्याच भाषेंत त्याला आपल्या अत्युच्च आकांक्षांचें आणि अनुभवाचें वर्णन करणें भाग आहे. परंतु हें जरी खरें असलें तरी त्याच्या योगें तो परमात्मा व्यक्त आहे, सगुण आहे, साकार आणि साहंकार आहे असें म्हणतां यावयाचें नाहीं. चंदनाची उटी लावण्याचें सोपस्कार तो घेतो असली भ्रांति होऊं नये. पूजा करतांना हे प्रकार आपण करतों, पण ते उपासनेसाठीं करतों. हें रहस्य विसरतां कामा नये. समर्थ म्हणूनच म्हणतात ''सगूणीं भजे लेश नाहीं भ्रमाचा। जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा।''

## ७४१. वीरहा

त्रिसुपर्णांत ब्रह्महत्या, वीरहत्या आणि भ्रूणहत्या या तीन घोर हत्यां म्हणजे हत्यांचा उल्लेख आला आहे. घोर कर्म आहे हत्या म्हणजे. परंतु ब्रह्महत्या, वीरहत्या, भ्रूणहत्या हें तर आत्महत्येसारखें महाघोर पातक होय. भ्रूणहत्या म्हणजे बीजाचा वा अंकुराचा नाश. ब्रह्महत्या म्हणजे मार्गदर्शक तारक ज्ञानाचा नाश होय. आणि वीरहत्या म्हणजे समाज-संरक्षक प्रजा-संरक्षक बलाचा नाश होय. म्हणून त्या तिन्ही हत्या अनर्थावह होत. पण इथें तर त्या परमात्म्याला वीरहा म्हणजे वीराची हत्या करणारा म्हटलें आहे हें कसें? इथें वीरहा म्हणजे एकटदुकट वीराची हत्या करणारा असा अर्थ नाहीं. तो सर्वच वीरांना वीरगति देणारा आहे म्हणून तो वीरहा होय. जगांत जीं महायुद्धें होतात ती कालरूप परमात्म्याच्या प्रेरणेनेंच होत असतात. तें ईश्वरी सूत्र सामान्य माणसाच्या लक्षांत येत नाहीं. त्यामुळें तो त्या महायुद्धांचीं कारणें राजेलोकांचा लोभ स्पर्धा इत्यादि म्हणतो. परंतु त्या लोभ-द्रोहादि गुणांचा प्रकोप राजे लोकांच्या ठाईं घडवून आणणारा जो काल तोच खरोखर वीरहा होय. गीतेंत भगवान् स्पष्टच म्हणत आहेत :

**कालोऽस्मि लोकक्षयकृत् प्रवृद्धो**
**लोकान् समाहर्तुमिह प्रवृत्त:।**
**ऋतेऽपि त्वां न भविष्यन्ति सर्वे**
**येऽवस्थिता: प्रत्यनीकेषु योधा:।।**

''मयैवैते निहता: पूर्वमेव, निमित्तमात्रं भव सव्यसाचिन्।'' वर्षाकाल आला म्हणजे तृणधान्यें अंकुरून वाढूं लागतात, शरद् ऋतूंत तीं भरतात,

आणि हेमन्त-शिशिरांत त्यांची संवंगणी होते. हें सर्व काल-कर्तृत्व आहे. महान् नरसंहार हि असाच कालकृत आहे. तो माणसाच्या म्हणण्यानें होत नाहीं. म्हणून तो कालस्वरूप परमात्मा चन्दनांगदी म्हणावयाचा, वीरहा म्हणावयाचा. शंकराचार्यांनीं ''धर्मत्राणाय वीरान् असुरमुख्यान् हिरण्यकशिपु'' प्रभृतीन् रागादींश्च हन्तीति वीरहा'', असें भाष्य केलें आहे. पैकीं प्रतिपक्षीयवीर-हा अर्थ पूर्वीं घेतलाच आहे. त्याचें आध्यात्मिक स्वरूप तें रागद्वेषादि होय.

## ७४२. विषम (अविषम)

विगतः समः यस्य सः विषमः। ज्याला सम म्हणजे जोड नाहीं तो विषम म्हणावयाचा. परमात्मा हा सर्व-विलक्षण असल्यामुळें तो विषम होय. परमात्म्याहून वरचढ कोणी नाहींच, पण त्याच्या बरोबरीचा हि कोणी नाहीं, इतकेंच नव्हे तर तत्तुल्य हि कोणी नाहीं. खरोखर तो निरुपम आहे. त्याच्यासारखा तोच आहे. म्हटलें च आहे श्रुतीनें :

''न तस्य प्रतिमा अस्ति''तसेंच स्मृतीनें हि म्हटलें आहे ''न त्वत्समोऽस्त्यभ्यधिकः कुतोऽन्यो, लोकत्रयेऽप्यप्रतिमप्रभावः '' अर्जुन म्हणतो, हे विश्वरूपा, हे प्रभो! तुझ्या सारखा हि कोणी नाहीं, मग तुझ्याहून वरचढ कुठून असायचा? खरोखर या तिन्ही जगांत अप्रतिम आहेस तूं. तुझा प्रभाव अचिन्त्य आहे. या विश्वांत परमात्मसत्तेहून वेगळी दुसरी सत्ताच नाहीं. मग तुलनेला वावच कुठला? चिदचिद् विभाग कल्पून बोलायचें म्हटलें तर चित् ची बरोबरी अचित् कशी करणार? कोणत्याहि दृष्टीनें पहा तो परमात्मा विषम म्हणजे अगदीं मुलखावेगळाच आहे.

''अविषमः असा हि पाठ घेतां येईल परमात्मा सर्वान्तर्यामी सर्वात्मभूत सर्वांचा निजात्माच असल्यामुळें तो सहजच अविषम म्हणजे सर्वांना समान, सर्वांना सानुकूल झाला आहे. ''द्वितीयाद् वै भयं भवति'' दुसरा असेल तर वाद विरोध विग्रह होईल. पण जिथें अभेद आहे, अद्वैत आहे, अैक्य आहे तिथें वादच खुंटला. तिथें सर्व संवादच. वैषम्याला विरोधाला विग्रहाला तिथें कायमचा पूर्णविराम मिळाला.

परमात्मा हा समदृक् आहे. तो सर्वत्र एकत्व म्हणजे आत्मत्व पाहतो, तसाच तो विषमदृक् विषम-लोचन हि आहे. त्याच्या समदृष्टीची आत्मदृष्टीची बरोबरी दुसरी कोणती हि नि कोणाची हि दृष्टि करूं शकत नाहीं. म्हणून तो विषम तसा अविषम म्हटला आहे.

## ७४३. शून्य

शून्य म्हणजे अभावरूप नव्हे, तर सर्वविशेषरहित म्हणून शून्य. परमात्मा हा शून्य आहे म्हणजे तो सर्वविशेषरहित आहे–शून्यासारखा आकाशासारखा. आकाशाला हि शून्य म्हटलें जातें, पण तें ''शून्यम्'' आहे. परमात्मा हा शून्यः म्हटला आहे. आकाश हें शून्य म्हटलें असलें तरी तें अवकाशरूप शब्दगुण आहे. सविशेष आहे. तसा हा परमात्मा नव्हे. त्याला कोणत्याहि पदानें विशिष्ट करतां येत नाहीं. त्याला आहे-नाहीं सुद्धां म्हणतां येत नाहीं. ''न सत् तन् न असत् उच्यते'' असा तो परमात्मा केवळ निर्विशेष आहे. म्हणून तो म्हटला आहे शून्य. शून्यवादी बौद्धांचें शून्य तरी दुसरें काय आहे? तें वस्तुतः वेगळें नाहीं. पण ते त्याला अभावरूप समजतात, अवस्तु समजतात. ही त्यांची गैर समजूत आहे. शून्य जर आहे तर तें अवस्तु कसें? सर्व निषेधून जें शेष राहतें तेंच शून्य होय. त्याचा निषेध कसा होणार? त्यालाच वैदिकांनीं ब्रह्म म्हटलें आहे. त्याचाच गौरव ते ''निषेधशेषो जयताद् अशेषः'' म्हणून करतात. त्यालाच शून्यवादी शून्य म्हणतात. आणि त्यांचा हा शून्यवाद परमात्म्याला

शून्य: म्हणून वैदिकांनीं पचवून टाकला आहे. त्यांचें शून्य अभावरूप कल्पिलें आहे, तर हा 'शून्य:' भावरूप आहे. अगस्त्य ऋषींनीं वातापि पचवून जसा ढेकर दिला तसा वैदिकांनीं शून्य गिळून दिलेला ढेकर म्हणजेच हा 'शून्य:' होय. या शून्यानें अभावरूप शून्य गिळलें आहे म्हणून ज्ञानदेव त्याला निर्‌शून्य म्हणतात. तो ''निर्‌शून्य निरुपम निर्वाण'' असें त्याचें वर्णन करून त्याची ती निर्‌शून्यता ''तो पदपिंडा अतीतु, भवभावविरहितु बाप रखुमादेवीवरु हृदयांतु रया'' या शब्दांत विशद करतात. तो शून्य म्हटलेला परमात्मा निर्‌शून्य आहे. कारण तो हृदयांत विराजमान आहे, तो आत्मप्रत्यय-सार आहे. आत्मप्रत्ययाचा निषेध कोण कसा करणार? जो करील तो हि तोच होय.

## ७४४. घृताशी

घृता: विगलिता: आशिष: यस्य स: घृताशी:। गळाल्या आहेत आशी म्हणजे प्रार्थना कामना ज्याच्या तो घृताशी म्हणाव्याचा. स्वरूपाच्या अज्ञानामुळें जीवाला काम कर्म नि वासना यांच्या चक्रांत सांपडावें लागतें. मी अमुक वर्णाचा, अमुक गुणांचा, अमुक कर्माचा, अमुक पुरुष असा अभिमान बाळगून मनुष्य कांहीं संकल्प करतो, त्यांच्या सिद्धीसाठीं कर्में करतो, त्या कर्मांच्या फळांची वासना धरतो आणि अशा प्रकारें इहलोकीं आयुष्य संपवून परलोकीं प्रस्थान करतो. तिथून मरण समयींच्या वासनेनुसार इहलोकीं परत जन्म घेतो आणि परत संकल्प कर्म आणि तत्फलवासना यांच्या प्रवाहांत सांपडून संसरत राहतो. हें सर्व अविद्याकृत संसरण अविद्यानिवृत्ति होईपर्यंत थांबूं शकत नाहीं. ही अविद्या-निवृत्ति केवळ ब्रह्मविद्येनें, अध्यात्मविद्येनेंच होते. या अध्यात्मविद्येचा परम गुरु तो परमात्मा आहे. अर्थातच तो संसारातून मुक्त आहे. म्हणून तो घृताशी म्हणावयाचा. लोणी जसें अग्नि संपर्कानें विरघळूं लागतें तसें आत्म-ज्ञानाच्या आचेपुढें कामसंकल्प टिकत नाहींत. ते सुटूंच लागतात. पातळ होऊन गळून जातात. ज्याची ममता अहंता गेली, ज्यानें आपलें गुणातीत सच्-चित्-सुख-स्वरूप ओळखलें आहे त्या पूर्णकाम पुरुषाला कोणती कामना, कोणती आशी चिकटूं शकेल? त्याच्या सर्वच आशी घृत झाल्या, विरघळून गेल्या. कोणत्या हि वासनेचा चिकटा वा गंध त्याला उरला नाहीं.

**निर्विष्टविषयस्नेह: स दशान्तं उपेयिवान्।**
**आसीद् आसन्ननिर्वाण: प्रदीपार्चिरिवोषसि॥**

अशी त्या विदितात्म पुरुषाची स्थिति होते. मग त्या निर्वाणस्वरूप परमात्म्याविषयीं काय बोलावयाचें? तो तर महापुरुष होय, पुरुषोत्तम होय.

## ७४५. अचल

न चल: अचल:। जो चळत नाहीं तो अचल म्हणावयाचा. पर्वत चळत नाहीं म्हणून त्याला अचल म्हटलें जातें. मग पर्वत नि परमात्मा एकच झाले म्हणावयाचे! नाहीं, पर्वत चळत नाहीं तो नदीनद वन उपवन यांच्या तुलनेनें होय. नदीचा प्रवाह इकडचा तिकडे होतो, वन हि तोडलें जाऊन इकडचे तिकडे सरकतें. परंतु पर्वत जिथला तिथें राहतो. म्हणून त्याला अचल म्हटलें जातें. परंतु तो हि भूकंपानें चळतो. प्रलयांत कुलाचल हि नुसते चळतच नाहींत तर नाहींसेच होतात. म्हणून त्यांचें अचळपण हें नांवाचें च आहे. परमात्मा जो अचल आहे तो तसा सापेक्ष अचळ नाहीं. तो स्वभावत:च अचळ आहे. तो आपला स्वभाव सोडूं शकत नाहीं. व्यक्तमात्र चल आहे, क्षर आहे. तो अव्यक्त आणि अक्षर आहे. म्हणून तो अचळ म्हटला आहे. व्यक्तमात्र षड्भाव-ग्रस्त आहे. तो 'जायते अस्ति वर्धते विपरिणमते अपक्षीयते म्रियते' या षड्भावांतून मुक्त आहे. म्हणून तो अचळ म्हटला आहे. तो चयापचयरहित कूटस्थ आहे. त्याच्यावर सर्गप्रलयांचा कांहीं परिणाम होत नाहीं. सर्गकालीं तो वाढत नाहीं तर प्रलय-काली तो घटत नाहीं. त्याच्यावर सुखदु:खांचा परिणाम होत

नाहीं. त्याला कोणत्याहि द्रव्यानें वा क्रियेनें सुख होत नाहीं वा दुःख होत नाहीं. सर्वत्र तो समच असतो. स्तुति-निन्देचा हि त्यावर कांहीं एक परिणाम होत नाहीं. स्तुतीनें तो गौरव पावत नाहीं किंवा निन्देनें लघुत्व. ''धिक्कारितां धिक्कारवेना महापुरष''. सारांश, कोणत्या हि शक्तीची मात्रा त्यावर चालत नाहीं. म्हणून तो अचलवत् अचल म्हटला आहे. तो सदैव 'स्वे महिम्नि' प्रतिष्ठित आहे, अचल-प्रतिष्ठ आहे.

### ७४६. चल

ज्याला अचल म्हटलें त्यालाच चल कसें म्हणावयाचें? आणि तें हि पुनः एकाच दमांत? होय, आत्मतत्त्व हें असेंच आहे. त्यांत सर्व विरोध रुद्ध होतात, मावळतात. चलन म्हणजे काय? चलन म्हणजे देशतः आणि कालतः व्यापन. परमात्मा हा अनन्त आहे. त्यानें सर्व दिशा व्यापून टाकल्या आहेत आणि सर्व काल व्यापून टाकला आहे, आतां त्याला कांहीं व्यापायचें उरलें नाहीं म्हणजे तो आतां कुंठित झाला आहे असें म्हणतां यावयाचें नाहीं. तसें म्हटल्यास तो सावयव होईल, समर्याद होईल. पण तो तर अखण्ड आहे, अनंत आहे. याचाच अर्थ असा कीं त्याचें व्यापन अखण्ड चालू आहे. काल सारखा चालला आहे, दिशा सारख्या विस्तारत आहेत. हें अनन्तत्व म्हणजे चलत्वच नव्हे काय? हेंच ''प्रतिक्षणवर्धमानं अविच्छिन्नं सूक्ष्मतरं अनुभवरूपम्'' म्हणून वर्णिलें आहि. परमात्मा हा सर्वतोनन्तरूप आहे, याचाच अर्थ असा कीं देशतः कालतः आणि वस्तुतः त्याची सारखी वाढ होत आहे. आज हि तो अनन्तच आहे आणि पूर्वीं हि तो अनन्तच होता. कारण त्याचा अन्त कधीं कुणाला लागला नाहीं. इतकेंच नव्हे तर लागणें शक्य हि नाहीं. कारण तो अव्यक्त आहे, निर्गुण निराकार आहे, अक्षर आहे. आणि त्याचें हें अव्यक्तत्व व अ-क्षरत्व म्हणजेच त्याचें सर्वतोऽनन्तत्व, प्रतिक्षणवर्धमानत्व होय. आणि हें त्याचें अकुंठत्व म्हणजेच त्याचें चलत्व होय. त्याला कुंठा नाहीं अंत नाहीं म्हटलें म्हणजे सारखी त्याची प्रगति होत आहे हें उघड होय. व्यक्ताच्या गतीला मर्यादा अटक संभवते, अव्यक्ताला ती संभवत नाहीं. म्हणून परमात्मा हा चल म्हणावयाचा. मण्डलांत दोन परस्पर विरुद्ध आणि सुदूर टोकें जशीं एकत्र मिळतात तसें चलाचलत्व परमात्म्याच्या ठाईं एकाकार झालें आहे.

### ७४७. अमानी

''अमानी मानदो मान्यः'' हें एक त्रिक आहे. या त्रिकांत तुम्हांला सन्मान्य व्हायचें असेल तर स्वतः मानाची अपेक्षा करूं नका. मानापानाच्या जागा सोडून सेवेचीं कामें करा. हलकीं सलकीं उष्टीं खरकटीं काढण्याच्या सारखीं सेवेचीं कामें आवडीनें उचला. बहुमानाच्या जागा दुसऱ्यांना द्या. थोरामोठ्यांचें स्वागत करणें, नजराणा आहेर घेणें असलीं उंचीं गौरवाचीं कामें मानप्रिय शिष्टांना विशिष्टांना द्या. असा सदाचार तुम्ही पाळल्यास लोकांना तुम्हीं मान्य व्हाल. आणि जेव्हां अग्रपूजेचा प्रसंग येईल तेव्हां भल्या भल्यांना बाजूला सारून अमानी मानद कृष्णा प्रमाणें तुमची सन्मान्य म्हणून, अग्रपूज्य म्हणून पूजा होईल. या त्रिकांत जणूं भगवान् कृष्णाचें अनुकरणीय असें चरित्र-रहस्यच सांगितलें आहे. भगवान् कृष्ण जो इतका लोकप्रिय झाला आहे त्याचें रहस्य खरोखर त्याच्या ह्या अमानी मानद असण्यामध्येंच नाहीं काय? या अमानी मानद कृष्णानें गीतेंत ज्ञानाचीं जीं वीस लक्षणें सांगितलीं आहेत त्यांत पहिलें लक्षण अमानित्व हें दिलें आहे, हें इथें स्मरणीय आहे. देहाद्यभिमानांतून सर्वदोषमूल अज्ञान अंकुरतें. म्हणून मान नसणें हें ज्ञानाचें पहिलें लक्षण झालें. परमात्मा हा सदैव आत्मत्वानेंच वर्तत असल्यामुळें त्याला देहाद्यभिमान आतळत नाहीं, शिवत नाहीं. आणि म्हणून म्हटलें आहे कीं त्यानें जरी तिन्ही लोक मारून टाकले तरी तो हिंसा करीत नाहीं वा त्या

हिंसाकर्माच्या पापानें बद्ध होत नाहीं. पापी ठरत नाहीं. कारण त्याच्या ठाईं बालकाप्रमाणें अहंकार नसतो, फलहेतु वा उद्देश नसतो.

### ७४८. मानद

परमात्मा हा अमानी असला तरी तो मानद आहे, मान देणारा आहे. सर्वांना तो आत्ममान देतो आत्मीय पाहतो, आत्मरूप पाहतो आणि म्हणून कोणाचा हि तो तिरस्कार वा अवहेलना करीत नाहीं.

**शत्रु-मित्र-अरि-उदासीन-मध्यस्थ-द्वेष्य-बन्धुषु।**
**साधुषु अपि च पापेषु सम-बुद्धिर् विशिष्यते॥**

परमात्मा हा सर्वांना समबुद्धीनें म्हणजे आत्मरूपानें पहात असतो. त्याला हा शत्रु, तो मित्र, हा मध्यस्थ तो उदासीन, हा द्वेष्य म्हणजे रागाचा, तो बन्धु म्हणजे लोभाचा, अथवा हा पुण्यशील तो दुराचारी असला कुठला हि भेदभाव नाहीं. तो सर्वांना आत्मत्वानेंच पाहतो. त्यांच्या वरील इष्टानिष्ट उपाधींना तो ओळखीत नाहीं. त्या ''उपाधींमाजीं गुप्त। जें चैतन्य असे सर्वगत'' तें तेवढें तो पाहतो. ह्याचेंच नांव मान-द, मान देणारा. जो दिव्यांतील ज्योतीला पहात नाहीं तो दिवा काय पाहतो? दिव्याची कदर करतो? प्रत्येक जीव किंबहुना वस्तु म्हणजे पांढरा, निळा, काळा, जांभळा, हिरवा, पिवळा, तांबडा, नारिंगी दिवा आहे. ह्या नाना रंगांच्या दिव्यांत एकच एक निरञ्जन ज्योत तेवत आहे. त्या ज्योतीला जो ओळखतो, तोच दिव्याचा मान करतो म्हणावयाचा. तोच मानद म्हणावयाचा. बाह्य रंगानें जो त्यांच्यांत उच्च-नीचता कल्पितो तो वस्तूचा, आत्म-प्रकाशाचा अवमानच करतो म्हटला पाहिजे. परमात्मा असा अवमान करीत नाहीं. तो सर्वत्र एक तत्त्वच पाहतो. अनात्म परतें सारून आत्मत्वच पाहतो. त्यामुळें तो केव्हां हि आत्मावमानकारी न होतां मानदच होतो. जो मानार्हाचा मान करतो तोच मानद म्हणावयाचा. तो अमानार्ह अनात्म वस्तूची सदैव मान-खंडनाच करीत असतो. म्हणून हि, म्हणजे ''मानं द्यति खण्डयति इति मानदः'' अशा हि व्युत्पत्तीनें तो मानद होय. शंकरानें दक्षाला मान दिला नाहीं. ह्याचें रहस्य सतीला ते समजावून सांगतात.

**प्रत्युद्गम-प्रश्रयणाभिवादनं**
**विधीयते साधु मिथः सुमध्यमे।**
**प्राज्ञैः परस्मै पुरुषाय भूयसे**
**गुहाशयायैव न देहमानिने॥**

मानं सत्कारं ददाति इति मानदः। मानं अभिमानं द्यति खण्डयति इति मानदः।

### ७४९. मान्य

असा जो अमानी आणि मानद तोच मान्य म्हणजे सर्वमान्य होय, विश्वाच्या मानास पात्र होय. जगांत राज-मान्य लोक-मान्य इत्यादि नाना मान्यता आढळतात, परंतु जो युगपत् सर्वांनाच मान्य आहे असा कोण आहे? जगांत हा याला मान्य नाहीं, तो त्याला मान्य नाहीं, असा परस्परविवाद चालू असतो. हे सगळे विचार बाह्य उपाधींना धरून होतात. परंतु स्वात्म्याविषयीं मात्र कोणाचा हि विरोध असत नाहीं. तो प्रत्येकालाच मान्य आहे. ''मी मला आवडत नाहीं, मान्य नाहीं'' असें कोणी स्वप्नांत हि कधीं म्हणत नाहीं. तो जो सर्वांचा स्वात्मा, निरुपाधि परमात्मा, ''यत्र विश्वं भवति एकनीडम्'' तोच मान्य म्हणजे सर्वमान्य होय. जाग्रद्दशेंतील व्यवहारांत प्रत्यक्षच परस्पर-भेद विरोध विग्रह आपण पाहतों. स्वप्नदेशांत हि त्याचें लोण पोंचलेलें असतें. तिथेंहि नानात्व आणि तज्जनित भय-भावना विद्यमान असते. स्वप्नांत चोर आपलें धन लुटीत नसला, वाघ आपल्याला फाडून खात नसला तरी प्रत्यक्षवत् आपल्याला त्याचें भय सतावीतच असतें. आपण चोर चोर, वाघ वाघ, म्हणून ओसणावत असतों, परंतु सुषुप्तींत हें सगळेंच भयावह द्वैत मावळतें. तिथें वाघ आणि बकरी, साप आणि मुंगूस आपले भिन्नत्व टाकून देऊन एकच होऊन जातात. तिथें साप साप रहात

नाहीं. वाघ वाघ रहात नाहीं. सर्व एकाकार होऊन जातात. एकजीव होऊन जातात. असें जें तें परम ऐक्य तेंच मान्य होय. मानार्ह होय. तेंच अग्रपूज्य होय. त्या परम साम्य पदाहून अधिक मान्य, अधिक पूज्य, दुसरें कांहींच नाहीं. सुषुप्तींत हें साम्य लक्षित होतें. पण सुषुप्ति ही स्वत: एक दशा आहे. म्हणजे अस्थायी वृत्ति आहे. तिच्या पलीकडे, सर्व वृत्तींच्या पलीकडे, नित्य विराजमान जें तुरीय तेंच घ्यावयाचें आहे. तेंच सर्वमान्य होय.

## ७५०. लोकस्वामी

परमात्मा हा मान्य म्हणजे सर्वमान्य आहे. कारण शेवटीं सर्व विश्व त्याच्याच ठाईं लीन होतें. त्याच्या विरुद्ध तें कांहीं करूं शकत नाहीं. ही त्याची सर्वंकष सत्ता लौकिक भाषेंत लोकस्वामी म्हणून प्रकट केली आहे. हा लोकस्वामी लोक-रक्षणासाठीं वारंवार अवतरतो. पण त्याला सर्व जण ओळखूं शकत नाहींत. कामक्रोधपरायण विश्वद्रोही लोक आपली दंडेली चालू दिली जाते असें पाहून आपणच या लोकांचे स्वामी आहोंत अशी गैर समजूत करून घेतात. या विश्वांत एक अचिन्त्य अदृश्य शक्ति सर्व विश्वाचें संगोपन व नियमन करीत आहे हें ते अनेकदां आपल्या दंडेलीला यश मिळालें असें पाहून विसरून गेलेले असतात. आपल्याला मिळालेल्या क्षमेची ते जाणीव बाळगीत नाहींत. परंतु जेव्हां त्यांचें शत अपराध पूर्ण होतात तेव्हां ती परमेश्वरी शक्ति त्यांचा शिरच्छेद करून त्यांचा निग्रह करते आणि सज्जनांवर म्हणजे जीव-वत्सल जनांवर अनुग्रह करते. ईश्वर अपराधी जनांना आपलें जीवन सुधारण्याला भरपूर वाव देत असतो. तो निग्रहानुग्रहाची उतावीळ करीत नाहीं. पण योग्य समयीं तो दुष्टांचा निग्रह करून साधुपरित्राण व भक्तानुग्रह केल्यावांचून रहात नाहीं. पण एवढा धीर ज्यांना नसतो ते देवाला बोल लावीत असतात, देव झोपला आहे, का मेला आहे म्हणून. परंतु देव कधीं झोपतहि नाहीं व मरत हि नाहीं. तो सगळें कांहीं पहातो आहे, पण त्याची दया अपार आहे. तो क्षमाशील आहे. तो वाट पहातो. पण जेव्हां पाप असह्य होतें तेव्हां तो आपलें सुदर्शन चालवतो. जेव्हां तो ताप असह्य होतो तेव्हां तो कृष्णमेघ सहस्र धारांनीं कृपावृष्टि करतो. जगाचें पाप धुतलें जातें, ताप शमतो आणि सर्वत्र शान्ति नि सुख नांदतें. ज्ञानदेवांनीं मागितलेलें प्रसाददान तो लोकस्वामी सर्व लोकांना बहाल करतो. तेव्हां मग ''खळाची व्यंकटी सांडे। तया सत्कर्मीं रति वाढे। भूतां परस्परें पडे। मैत्र जीवींचें।। दुरिताचें तिमिर जाए। विश्वीं स्वधर्म-सूर्यो पाहे। जो जें वांछी तें तो लाहे। प्राणिजात।।''

## ७५१. त्रिलोकधृक् (त्रिलोकधृत्)

परमात्मा प्रजावत्सल असल्यामुळें तो लोकस्वामी म्हटला आहे. वात्सल्याच्या पोटींच दुष्ट-निग्रहण हि येतें. त्यामुळें त्याला प्रजाद्रोही कामक्रोध-परायण लोभी असुरांवर वारंवार शस्त्र धरावें लागतें. धर्म-संस्थापनार्थ केलेलें हें निग्रहानुग्रहरूप अवतार-कार्य स्थूल रूपानें वर्णिलेलें असलें तरी तें सूक्ष्म आहे. त्याचें स्वरूप आध्यात्मिक आहे. प्रजेचा द्रोह काम क्रोध लोभ मोह मद मत्सर इत्यादि आसुर गुणगणाकडून होत आहे. त्यांचा निग्रह ब्रह्मचर्य म्हणजे सत्य आणि संयम यांच्या नेतृत्वाखालीं दैवी गुणगणांकडून होतो. हें आध्यात्मिक समाजशास्त्र आहे. याची उपेक्षा करून केवळ बाह्य अमुक एक राज्यपद्धति कायम केल्यानें, लोकसत्ताक वा साम्यवादी वा अन्य कोणती, कार्यभाग सिद्ध व्हावयाचा नाहीं. म्हणून ज्ञानदेवासारखे तत्वज्ञ आणि सर्व भूताहितेरत महापुरुष दैवी संपदेचा संदेश देऊन मोकळे होतात. दैवी गुणांच्या जोपासनेनें सर्वांचे सर्वकाळ सर्व मनोरथ पूर्ण होतील असें त्यांचें दर्शन आहे. परमात्मा हि लोकांचें स्वामित्व करतो, त्रिभुवनांचा प्रतिपाळ करतो, तो हि या गुणांना

अनुसरूनच होय. ''नाहीं देवापाशीं मोक्षाचें गांठोडें। आणुनी निराळें द्यावें हातीं।। इन्द्रियांचा जय साधुनिया मन। निर्विषय कारण असें तेथें।।'' असा तुकोबांनीं त्याचाच अनुवाद केला आहे. त्रीन् लोकान् धारयति इति त्रिलोकधृक् वा त्रिलोकधृत्। इथें त्रिलोक म्हणजे तीन लोक वा बहु लोक एवढाच अर्थ नाहीं. तर तीन म्हणजे समस्त असा अर्थ अभिप्रेत आहे. तो परमात्मा समस्त विश्वाचा धर्ता आहे. हें समस्त चराचर जगत्, हें समस्त व्यक्त विश्व त्या परमात्म-संज्ञक अव्यक्तार्णवांत कमलवत् विराजमान आहे. तो अव्यक्त अक्षर परमात्मा त्याचा मूलकंद आहे. म्हणून तो म्हटला आहे त्रिलोकधृक्.

## ७५२. सुमेधा

सु शोभना मेधा प्रज्ञा अस्य इति सुमेधाः। ज्याची मेधा म्हणजे बुद्धि शोभन आहे तो सुमेधाः म्हणावयाचा. सुरीचें शोभनत्व तिच्या स्वकर्मक्षमतेंत छेदनपटुतेंत आहे, तसें बुद्धीचें शोभनत्व तिच्या तत्त्वग्रहणक्षमतेंत आहे. हेमचंद्रानें बुद्धीचे गुण असे गणले आहेत:—

**शुश्रूषा श्रवणं चैव ग्रहणं धारणं तथा।**
**ऊहापोहोऽर्थ-विज्ञानं तत्त्वज्ञानं च धी-गुणाः।।**

बुद्धीचे असे सप्त गुण गणले असले तरी त्यांत मुख्य तत्त्व-ज्ञानच आहे. इतर सर्व गुण तदुपकारक म्हणून गुण गणले गेले आहेत. तत्त्वज्ञान करून देणें हाच तिचा कार्यभाग. तेव्हां सुमेधाः म्हणजे ज्याची मेधा त्याचा अचूक वेध घेते, तें हस्तगत करते, तो. परमात्मा हा स्वतःच ज्ञेय तत्त्व आहे आणि तें स्वतत्त्व तो स्वतःच आकळतो म्हणून तो सहजच सुमेधाः म्हटला गेला. बुद्धि हें मानवाचें निरुपम उपकरण आहे, शस्त्र आहे. त्या साधनानेंच त्यानें सर्व सिद्धि मिळविली आहे. म्हणून त्याची सर्वांत मोठी सिद्धि म्हणजे ही बुद्धि सिद्ध करणेंच होय. मानवाचा सर्वोत्तम आदर्श स्थितप्रज्ञच. सुमेधाः पदानें हि तोच अभिप्रेत आहे. योगिजन सर्वात्मना आत्मशुद्धीसाठीं झटत असतात. ती आत्मशुद्धि म्हणजे वस्तुतः बुद्धि-शुद्धिच होय. कारण आत्मा स्वतः शुद्धच आहे. बुद्धीची शुद्धि झाली म्हणजे ती स्थित होते आणि बोध-स्वरूपच आत्मा भेटतो. या बुद्धिबोधांच्या ऐक्यालाच आत्मशुद्धि म्हणावयाचें, तत्वज्ञान म्हणावयाचें. परमात्मा हा आत्मभिन्न कांहींच ओळखीत नसल्यामुळें तो स्वदृक् होय आणि जो स्वदृक् तो सुमेधाः।

## ७५३. मेधज

मेधे अध्वरे जायते इति मेधजः। जो मेधांत म्हणजे यज्ञांत उत्पन्न होतो तो मेधज म्हणावयाचा. यज्ञानें जेव्हां मनुष्याची पूर्ण शुद्धि होते, जेव्हां तो यज्ञ-क्षपितकल्मष होतो, तेव्हां आत्मदर्शन होतें. पण आत्मदर्शन हें कांहीं कर्मफल नव्हे, तर तें ज्ञानफल आहे. होय ज्ञानफलच आहे तें, पण तें ज्ञान एकाएकीं होत नाहीं. स्ववर्णाश्रमधर्माचरणरूप कर्म, यजन पूजन ध्यान वाक्य-विचारणरूप उपासना वा विकर्म आणि शेवटीं सर्वसंन्यासपूर्वक प्रयाणसाधना करावी तेव्हां कुठें तें ज्ञान वा अकर्म निष्पन्न होतें. असा जीवन-मेध करावा तेव्हां कुठें ती आत्मशुद्धि होते, तें मेधांजनन होतें जिचें फळ तो परमात्मा आहे. म्हणून तो मेधज म्हणावयाचा. मेधाजननरूप जो यज्ञ तोच मेध होय. आणि तिथेंच म्हणजे त्या मेधेंत, त्या प्रज्ञेंत तो परमात्मा प्रकाशतो. ''नाविरतो दुश्चरितात् नाशान्तो नासमाहितः। नाशान्तमानसो वापि प्रज्ञाने-नैनमाप्नुयात्।।'' या उपनिषद्वचनांत तर प्रज्ञानानें हि त्या परमात्म्याला प्राप्त करून घेतां येणार नाहीं म्हणून म्हटलें आहे, हें कसें? त्याचा आशय हा कीं कोण्या बौद्धिक प्रकर्षानें कोणाला तो अमृतानुभव लाभावयाचा नाहीं. ज्या ज्ञानांत, विषयमृगतृष्णाशमन नाहीं तें आत्मज्ञान नव्हे. ज्या प्रकाशानें नैश अंधकार

नाहींसा होत नाहीं तो सूर्यप्रकाश नव्हे. एक वेळ असें मानणें शक्य आहे कीं एखाद्याला तीव्र वैराग्य झालें पण आत्मज्ञान नाहीं. पण हें मानणें शक्य नाहीं कीं आत्मज्ञान झालें आहे पण वैराग्य मात्र नाहीं. कारण ज्ञानाचा तो सहज परिणाम आहे. अरुणोदय जसा सूर्योदय निकट असल्याचें सूचित करतो तसा वैराग्यप्रधान दैवी गुणोत्कर्ष आत्मज्ञानोदय निकट असल्याचें सूचित करतो. परंतु सूर्योदयाचें चित्र जसें दिवस करीत नाहीं तसें कोरें शाब्दिक पाण्डित्य विकारशमन करीत नाहीं आणि ज्ञानाचें तर लक्षण आहे "तत् ज्ञानं प्रशमकरं यद् इन्द्रियाणाम्" अशा ज्ञानाग्नींत विकार-हवन करून होणाऱ्या यज्ञांतून जो प्रकट होतो तोच मेधज होय.

## ७५४. धन्य

धन्य म्हणजे कृतकृत्य. ज्याला कांहीं अनवाप्त वा अवाप्तव्य आहे त्याला कर्तव्य उरलेंच आहे. त्याला कृतकृत्य म्हणतां यावयाचें नाहीं. पण ज्याला मिळालें नाहीं असें कांहीं नाहीं आणि मिळवावयाचें हि कांहीं उरलें नाहीं त्या सर्वकर्तव्यताप्रहाणि झालेल्या ज्ञानी पुरुषालाच धन्य म्हणावयाचें. परमात्मा हा असा पूर्णकाम असल्यामुळें तो धन्य होय. या धन्य दशेचा ज्यांनीं निश्चय केला आहे, त्यासाठींच ज्यांचें सर्व चिंतन, सर्व भाषण आणि सर्व कर्म चाललें आहे ते धन्य होत. "ते धन्या भुवि परमार्थनिश्चितेहाः, शेषास् तु भ्रम-निलये परिभ्रमन्ति" ज्यांनीं असा परमार्थ-निश्चय केला नाहीं आणि जे देहें प्राणें मनें त्यास वरले नाहींत ते भ्रान्त होत, वंचित होत. या धन्य आणि धिक्कृत जनांविषयीं बायबलांत येशूचे उद्गार असे आहेत: "तेव्हां तो आपल्या शिष्यांकडे दृष्टि लावून म्हणाला. अहो दीनांनो, तुम्ही धन्य आहां. कारण देवाचें राज्य तुमचें आहे. अहो जे आतां भुकेले आहां ते तुम्ही धन्य आहां. कारण तुम्ही तृप्त व्हाल. अहो जे आतां रडत आहां ते तुम्ही धन्य आहां. कारण तुम्ही हंसाल. मनुष्याच्या पुत्रामुळें लोक तुमचा द्वेष करतील, तुम्हांस दूर करतील, निंदितील आणि तुमचें नांव वाईट म्हणून टाकून देतील, तेव्हां तुम्ही धन्य आहां. त्या दिवशीं आनंदित होऊन उड्या मारा, कारण पहा, स्वर्गांत तुमचें प्रतिफळ मोठें आहे (या नंतर अशिष्यांना उद्देशून तो म्हणाला) अहो तुम्हां धनवंतांस धिक्कार असो, कारण तुम्हांला आपलें सांत्वन मिळून चुकलें आहे. अहो जे आतां तृप्त झालां आहां, त्या तुम्हांस धिक्कार असो, कारण तुम्हांला भूक लागेल. अहो जे आतां हंसतां आहां त्या तुम्हांस धिक्कार असो. कारण तुम्ही शोक कराल व रडाल. जेव्हां सर्व लोक तुम्हांला बरे म्हणतील तेव्हां तुम्हांला धिक्कार असो!" या येशूच्या वचनांचें आणि इतरहि सत्पुरुषांच्या वचनांचें तात्पर्य हेंच कीं ज्यांनीं परमार्थ-निश्चय केला नाहीं आणि जे या संसारांत रमले आहेत ते शोचनीय होत. उलट ज्यांनीं परमार्थनिश्चय केला आहे आणि तदर्थ जे या संसारांत अनासक्त झाले आहोत ते धन्य होत. सद्वस्तूचा निश्चय न होणेंच शोचनीय आहे आणि त्याचा निश्चयच धन्य. (बायबल = लूक ६-२०-२६).

## ७५५. सत्यमेधा

"सुमेधा मेधजो धन्यः सत्यमेधा धराधरः" या श्लोकार्धांत मेधा-सूत्र आलें आहे. त्या मेधाबलानेंच मनुष्याचें जीवन धन्य होतें. आणि सर्वोपजीव्य सर्व-फलदात्री धरेला धारण करण्यास तो समर्थ होतो. सर्व विद्या कला व्यापार उद्योग मेधाधीन आहेत. मेधा नसेल तर ते सगळे यथावत् होणार नाहींत आणि त्यांचें फल तितक्या अंशानें लाभणार नाहीं. आंधळ्या माणसाजवळ रत्न असलें तरी तें जसें त्याला दिसत नाहीं आणि हस्तगत होत नाहीं त्याप्रमाणें त्याला या विश्वांत सांठलेली सर्व संपत्ति माणसाजवळ असून ती त्याला मेधाशक्तीच्या अभावीं दिसत नाहीं आणि हस्तगत करतां येत नाहीं. म्हणून म्हटलें आहे "सर्वस्य

लोचनं शास्त्रं यस्य नास्त्यन्ध एव सः'' आणि हें सर्व-प्रकाशक शास्त्र हि त्यालाच उपयोगी कीं ज्याला आपली कांहीं बुद्धि आहे, स्वतंत्र मेधा आहे. आणि म्हणूनच म्हटलें आहे–

**''यस्य नास्ति स्वयंप्रज्ञा शास्त्रं तस्य करोति किम्।**
**लोचनाभ्यां विहीनस्य दर्पणः किं करिष्यति।''**

ही स्वयंप्रज्ञाच प्रज्ञा, मेधा, बुद्धि म्हणावयाची. ती ज्याला नाहीं त्याचें शास्त्रज्ञान मोरपिसांसारखें दृष्टिहीन होय. तो डोळस दिसत असला, शास्त्र पढला असला तरी तो दृष्टिहीन होय. परमात्मा हा चिद्रूप असल्यामुळें तो परम मेधावी तर आहेच. आणि त्याची ही मेधा सत्य म्हणजे अवितथ, अव्यर्थ, अमोघ आहे. तिचा निर्णय अचूक असतो. तिच्या निर्णयांत संशयाला आणि आंशिकतेला वा असमग्रतेला मुळीं वाव असत नाहीं. तिचें दर्शन निःसंशय आणि समग्र असतें. बुद्धीचें सत्यत्व वा वैशारद्य तें हेंच होय. डोळस मनुष्य जसा आडवाटेला जात नाहीं आणि चांचपडत वा ठेंचाळत नाहीं तर थेट निर्विघ्न मुक्क़ाम गांठतो त्या प्रमाणें जो ज्ञेय गांठतो तो सत्यमेधा म्हणावयाचा. परमात्मा हा सहजच सत्यमेधा आहे. साधकाला बुद्धीची शुद्धि करून तें पद पटकवायचें आहे.

### ७५६. धराधर

धरां धारयति इति धराधरः। जो धरेला पृथ्वीला धारण करतो तो धराधर म्हणावयाचा. या धरेला मीं धारण केलें आहे असें कोणी म्हणूं शकत नाहीं. तें परमात्म्याचें कर्म आहे. तोच म्हणूं शकतो–

''गां आविश्य च भूतानि धारयाम्य-हमोजसा''–'धरारूपें धरीतसें' प्रत्येक देहाची एक अभिमानिनी देवता असते. तीच त्याचें धारण करीत असते. तशी या धरेची जी अभिमानिनी देवता तीच या धरेला धारण करीत आहे. ही अभिमानिनी देवता प्रतिव्यक्ति वेगळी दिसत असली तरी वस्तुतः ती सर्व चिच्छक्ति होय. सूर्यबिंब एक आहे, त्याचीं प्रति-बिंबें असंख्य आहेत. त्या प्रत्येक प्रतिबिंबांत जें तेजोरूप आहे तें सारें स्पष्टच त्या सूर्याचें आहे. तद्वत् एकच एक आत्मसत्ता आहे. तिची सारी ही यच्चयावत् दिसणारीं रूपें प्रतिबिंबमात्र होत. सूर्य नसेल तर त्याचीं प्रतिबिंबें पडणार नाहींत. म्हणून सूर्य हा जसा सर्वप्रतिबिंबधर होय तसा तो परमात्मा सर्वजीवनिकायरूप या धरेचा धर्ता होय, धराधर होय. अखिल विश्वाचा विचार वेगळा. तें फार मोठें आहे. पण आम्हां सर्व जीवांचें जीवन या पृथ्वीशीं निगडित आहे. तीच आमची धात्री आहे. तिच्याच कुशींतून आम्ही जन्मलों, तिच्याच मांडीवर आम्ही खेळतों आहों आणि शेवटीं तिच्याच पदराखालीं निजणार आहों. अशी ही धरा आहे. सर्व जीवन, समग्र जीवन तिनें धारण केलें आहे. ती आमची माता आहे, आणि पिता तो परमात्मा आहे. त्यालाच पुढील नामांत तेजोवृष म्हटलें आहे. तो तेजोवृष तो सूर्यभगवान् या धरेच्या ठाईं आपलें ओज ओतून, तिला जीवनधारणक्षम बनवितो. त्यामुळें तो या धरेचा धर वा वर होय. सृष्टीच्या आरंभीं अव्यक्तार्णवांत बुडालेली ही भूमि वराहरूपानें परमात्म्यानें उद्धरिली म्हणून हि तो धराधर म्हणावयाचा.

### ७५७. तेजोवृष

तेजो वर्षति इति तेजोवृषः सूर्यः। जो तेज वर्षतो तो तेजोवृष म्हणावयाचा. सूर्य हा तेजोवृष आहे. गाईच्या कळपांत जो गोपति वळू असतो त्याला वृष म्हणतात. सूर्य हि तसाच गोपति आहे. किरणें हीं विश्वांत चरणाऱ्या गाई असून त्या किरणरूप गाईंच्या ठाईं तो आपला तेजोगर्भ आहित करीत असतो. हें असें गर्भाधान तो करतो, त्याचें पालन व नियमन हि करतो म्हणून तो पति म्हणावयाचा.

तो भूमीच्या ठाईं तेजोवृष्टि करून जीवसृष्टि करीत असतो. म्हणून तो वृष म्हणावयाचा. गीतेंत म्हटलेंच आहे ''तपाम्यहमहं वर्षं निगृह्णाम्युत्सृजामि च।'' ''तापतों सूर्यरूपें मी सोडितों वृष्टि खेंचितों'' म्हणजे उष्णकाल प्रावृट्काल आणि हिमकाल या कालत्रयानें घटित असलेला जो संवत्सररूप कालात्मा सूर्य तो या समस्त सृष्टीचें संपूर्ण जीवन नियन्त्रित करतो आहे. म्हणून तो तेजोवृष म्हटला आहे. पण सूर्य हा इथें प्रतीकरूप आहे. तो तेजाळ खोंड, तो तेजोवृष त्या चित्सूर्याचें प्रतीक होय. सर्व सत्ता त्या चित्सूर्याची आहे. या विश्वांतील सगळीं प्रतिबिंबें त्याच्या अधीन आहेत. सर्व प्रतिबिंबांचें अस्तित्व, त्यांचें जीवनमरण सर्व त्या बिंबाधीन आहे. प्रतिबिंबांच्या अधीन त्याचें कांहीं एक नाहीं. प्रतिबिंबांच्या गतागतानें त्याची समाधि कधीं डहुळत नाहीं. ''जगें येवोत जावोत'' त्या परमात्म्यावर त्याचा कांहीं एक परिणाम होत नाहीं. आणि आपण हि त्या परमात्म्याचेंच प्रतिबिंब आहों, त्याचे च किरण आहों हें जे ओळखतात त्यांच्यावर हि सृष्टीच्या सर्ग-प्रलयांचा कांहीं परिणाम होत नाहीं. त्यांची आत्मस्थिति अभंग राहते. येशूनें जें म्हटलें आहे कीं मी देवाचा पुत्र आहें आणि देवाची इच्छा जगांत चालो, माझी नव्हे. त्यांत तो ह्या बिंबप्रतिबिंबन्यायाचा, या वेदान्ताचाच उल्लेख करीत आहे. यहूदी लोकांनीं त्याला क्रूसावर खिळलें तरी त्याची आत्मनिष्ठा टिकली. तो थोडा चलबिचल झाला होता, पण सावरला. तीन दिवसांनीं मी परत उठेन म्हणून जें त्याच्या तोंडीं घातलें आहे तें वेदान्त-विचार नीट न समजणाऱ्या त्याच्या शिष्यांची गफलत आहे. वास्तविक जो मेलाच नाहीं तो उठणार म्हणण्यांत अर्थ काय? येशू आपलें तत्त्व प्रतिपादित होता. आणि गायत्री मंत्रांत तरी दुसरें काय सांगितलें आहे? आम्हांला त्या परमात्मतेजाचें ध्यान करावयाचें आहे–ज्याला तेजोवृष म्हटलें आहे ''तत् सवितुर् वरेण्यं भर्गो देवस्य धीमहि।''

## ७५८. द्युतिधर

द्युतिं अङ्गकान्तिं धारयति इति द्युतिधरः। जो द्युति म्हणजे अंगकांति धारण करतो तो द्युतिधर म्हणावयाचा. मागील पदांत तेज शब्द आला आहे, इथें द्युति शब्द आला आहे. तेज हें दाहक आहे, द्युति आह्लादक आहे. सूर्य तेजस्वी आहे, अग्नि तेजस्वी आहे. पण चंद्र द्युतिमान् आहे, हिरा मोती द्युतिमान् आहे. अग्नीवर राख, सूर्यावर ढग आले म्हणजे ते द्युतिमान् दिसत नाहींत. त्यांची दीप्ति मंद होते, ते मलिन दिसतात. हें मालिन्य ज्यांच्यावर आलें नाहीं, जे लखलखीत आहेत, ते म्हणावयाचे द्युतिधर. राजा हा तेजस्वी हि असतो आणि द्युतिमान् हि असतो. राजाचें तेज म्हणजे त्याचा दरारा, त्याचें शत्रूंना, डाकू-लुटारूंना, दुष्टांना, उन्मार्गगामी लोकांना वाटणारें भय होय. त्याची द्युति म्हणजे त्याचें चंद्रवत् प्रियदर्शन होय, त्याचें राजस रूप होय, लावण्य होय. राजासारख्या अधिकारी पुरुषाच्या ठाईं हें जें तेज आणि तजेला दिसतो तो परमात्म्याचा प्रतिनिधि म्हणून त्याला लाभलेला असतो. परमात्मा हाच वस्तुतः या चराचर सृष्टीचा राजा आहे, शास्ता आहे. म्हणून त्याला ईश्वर ही संज्ञा मिळाली आहे. राजा शिवाय आमचें चालत नाहीं. कोठल्या ना कोठल्या प्रकारचें शासन आम्हांला लागतेंच. नाहींतर सर्वत्र अराजक माजावयाचें. मग विश्वाला नको का कुठलें शासन? तें जें सर्वोच्च शासन तेंच ईश्वरी राज्य होय. तो परमात्मा या विश्वाचा अधिपति आहे त्याच्या आज्ञेचा भंग कोणी करूं शकत नाहीं, असें त्याचें तेज आहे आणि त्याची सुषमा, द्युति इतकी मोहक आहे कीं कोणी त्याच्या कडे आकृष्ट झाल्यावांचून रहात नाहीं. पतंगवत् सर्व जीव त्याच्या द्युतीवर, त्याच्या अंगकांतीवर झडप घालत आहेत.

## ७५९. सर्वशस्त्रभृतांवर

सर्वेषां शस्त्रभृतां वरः सर्वशस्त्रभृतां वरः। अथवा सर्वाणि शस्त्राणि बिभर्ति इति सर्वशस्त्रभृत्। तेषां

वरः, सर्वशस्त्रभृतां वरः। सर्वविध शस्त्रें धारण करणारांमध्यें श्रेष्ठ तो म्हणावयाचा ''सर्वशस्त्रभृतां वर''. परमात्मा हा शस्त्रें धारण करणाऱ्या सर्वांमध्यें श्रेष्ठ आहे. कारण शस्त्र-धारणाचें प्रयोजन त्याच्या इतकें दुसरा कोणी पूर्ण करूं शकत नाहीं. नखापासून चक्रापर्यंत सर्व आयुधें त्यानें धारण केलीं आहेत. त्यामुळें तो सर्वशस्त्रभृत् आहे. आणि आर्तत्राण हें शस्त्रधारणाचें प्रयोजन आहे आणि तें त्याच्या इतकें कोणीं केलें नाहीं. म्हणून दोन्ही प्रकारें तो सर्वशस्त्र-भृतांवर होय. शस्त्रें हीं भयानक समजलीं जातात. कारण तीं मारक आहेत, संहारक आहेत. हीं शस्त्रें कल्पिलीं आहेत प्रजारक्षणासाठीं. तो उद्देश विसरून जेव्हां तीं प्रजेचें भक्षण करूं लागतात, लोकांचें प्राण, धन, प्रतिष्ठा आणि स्वातंत्र्य यांचा अपहार करूं लागतात, अर्थात् विपरीत उद्देशानें वापरलीं जातात तेव्हांच खरोखर तीं भयानक होत. एरव्हीं तीं तारकच आहेत, मोठीं स्पृहणीयच आहेत. आणि त्यांचें तें तारकत्व लक्षूनच परमात्मा सर्वप्रहरणायुध म्हणून गौरविला आहे. परंतु होतें काय कीं शस्त्रधारक आधीं आर्तत्राणासाठीं शस्त्र उचलतात आणि मागाहून तो उद्देश विसरून आपल्याला धर्मसेवक न समजतां राजे महाराजे म्हणूं लागतात, आणि मग प्रजेचें पीडन सुरूं होतें. अशा प्रजापीडकांचें परशुरामानें एकवीस वेळां निर्दालन केलें, पण तो राजा महाराजा होऊन बसला नाहीं. आणि जेव्हां रामाच्या भेटींत त्याच्या लक्षांत आलें कीं आपलें अवतारकार्य संपलें आहे, क्षत्रियांत धर्मावतार झाला आहे, तो तपस्येसाठीं महेन्द्रपर्वतावर निघून गेला. त्यामुळें तो शस्त्रभृतांवर होय. शस्त्र परजावें केव्हां आणि केव्हां तें म्यान करावें हें ज्याला नेमकें समजतें उमजतें तोच सर्वशस्त्रभृतांवर होय. त्याची बुद्धि सदैव धर्मांत स्थिर असते. तो स्थितप्रज्ञ असतो. जो वशी नाहीं त्याच्या हातांत असलेलीं शस्त्रेंच अनर्थावह होत. राजा वा शासक हा परम धार्मिक असावा लागतो तो एवढ्याचसाठीं. परमात्म्याहून अधिक धार्मिक कोणी नाहीं म्हणून तोच सर्वशस्त्रभृतांवर म्हटला आहे, आणि त्याचे अवतारहि. त्यांत राम राजमणि.

### ७६०. प्रग्रह

''प्रग्रहो निग्रहो व्यग्रः'' या चरणांत वस्तुतः ग्रह् धातूचीं रूपें यायला पाहिजेत. पण धातु नि अर्थ यांचें अनुसंधान राहिलेलें नाहीं. त्यांची जागा अनुप्रासानेंच बळकावली आणि ''प्रग्रहो निग्रहो ग्राहः'' अशा रचनेऐवजीं ''प्रग्रहो निग्रहो व्यग्रः'' असा संचार झाला. या त्रिकांत ग्र चा नि ह चा नि ओ चा अनुप्रास साधला आहे. वचना पासून किमान अपेक्षा श्रुतिसुख आणि हृदयतोष यांची असते. या दोहोंपैकीं जें एक हि देत नाहीं तें हेय होय. जें एक तरी देतें तें अहेय म्हणावयाचें. जें दोन्ही देतें तें मणिकांचनयोगाचें उपादेय होय. उत्तम अर्थ उत्तम शब्दांत उत्तम रीतीनें व्यक्त करणें हें कवि- कौशल होय. पैकीं उत्तम अर्थ हा मणि म्हणजे रत्न असून उत्तम शब्दरचना हे कांचन म्हणजे कोंदण होय. दोहोंना हि आपआपलें मोल आहे. रत्न स्वयंप्रकाशी आहे. तें कोंदणावांचून हि मोलाचें आहे. पण कोंदणांत तें विशेष शोभतें. त्याची शोभा फांकते आणि कोंदण हें तोलाचें ठरतें. तें स्वतः हि सुवर्णच असतें आणि आपल्या सुवर्णानें रत्नाची शोभा द्विगुणित करीत असल्यामुळें तोलाबरोबरच तें मोलाचें हि ठरतें. मोलाचें ठरलें तरी रत्नाचें मोल त्याला नाहीं हें उघड आहे. केवळ या चरणांतच नव्हे तर संपूर्ण श्लोकार्धांतच ग र ओ वर्णांचा अनुप्रास आला असून इथें श्रुतिसुख-प्रधानतेचें सूत्र अनुसरलें गेलें आहे, अर्थाचें नव्हे. पहा- ''प्रग्रहो निग्रहो व्यग्रो नैकशृंगो गदाग्रजः'' आतां प्रग्रह म्हणजे काय? तें पाहूं. प्रग्रह आणि निग्रह हे दोन्ही शब्द समानार्थकच आहेत. पण त्यांत ते एकार्थक नाहींत. प्रग्रह म्हणजे आत्मस्थ राहून बाह्याचा संपर्क टाळणारा. प्रगृह्य शब्द व्याकरणांत प्रसिद्ध

आहे. ''ईदूदेद् द्विवचनं प्रगृह्यम्'' ई-ऊ--एकारान्त द्विवचनी रूपांचा सन्धि पुढील स्वराशीं होत नाहीं असें तें सूत्र सांगतें. तदनुसार प्रग्रह म्हणजे ब्राह्यसंपर्क वर्ज्य करणारा स्व-स्थ अस्पर्शयोगी परमात्मा. ''बाह्य-स्पर्शेष्वसक्तात्मा विन्दत्यात्मनि यत् सुखम्। स ब्रह्मयोग-युक्तात्मा सुखमक्षयमश्नुते।।'' या श्लोकांतील बह्मयोग-युक्तात्मा तो प्रग्रह होय आणि असक्तात्मा तो निग्रह होय.

## ७६१. निग्रह

निगृह्णाति इति निग्रहः। जो निग्रह करतो म्हणजे उपसंहार करतो तो निग्रह म्हणावयाचा. जो विदेह आहे त्याला विषयस्पर्शाचें कारण नाहीं. पण जो सदेह आहे त्याला विषयस्पर्श हा होणारच आणि इन्द्रियांचा विषयांशी संयोग झाला म्हणजे तिथें त्या स्पर्शांत रागद्वेष उत्पन्न होतात. हे रागद्वेष उत्पन्न होतात म्हणजे कुठून बाहेरून येतात असें नव्हे. तो इन्द्रियांचा स्वभावच आहे. त्यांच्या आहारीं माणसानें जातां कामा नये. क्षुधेच्या आहारीं जाऊन वा रसाच्या आहारीं जाऊन माणूस अधिक खातो. हें त्यानें निग्रहपूर्वक टाळलें पाहिजे. असा जो सर्व च विषयांत निग्रह करतो त्याला जीवनाची कला योग साधला म्हणावयाचा. ''भोजनीं न युक्त त्याग किंवा राग। युक्त ती निःसंग कार्य-दृष्टि'' उपवास म्हणजे अनशन, कांहींच न खाणें कठिण नाहीं आणि अत्यशन अध्यशन अयुक्ताशन हें तर सर्वच जण करीत आहेत. पण कमी अधिक न खाणें, युक्ताहार करणें ही गोष्ट सोपी नाहीं. त्यासाठीं निग्रह लागतो. मनावर इंद्रियांवर ताबा लागतो. त्यांना त्या त्या विषयांचें सेवन अमुक इतक्या मात्रेंतच करूं द्यायचें, कमी हि नाहीं व ज्यास्त हि नाहीं ही गोष्ट अनासक्तियोगावांचून साधावयाची नाहीं. अशी ज्याला अनासक्ति साधली तोच निग्रह म्हणजे निग्रह करणारा म्हणावयाचा. प्रग्रह तर सहजच म्हणजे देहरहित असल्यामुळें स्वभावतःच या परीक्षेंतून मुक्त आहे. पण निग्रह हा परीक्षा देऊन मुक्त आहे. तो सदेह असून आणि त्या कारणानें विषयीं वर्तणें त्याला टाळतांच येणारें नसतांना हि तो त्या विषयांत वाहवत नाहीं. त्या विषयौघांना तो तरून जातो. सांसारिकांप्रमाणें त्या विषयांत गटंगळ्या खात नाहीं, बुडत नाहीं. अर्थात् परमात्मा हा विदेह असो सदेह असो तो मुक्त आहे. म्हणून तो प्रग्रह· निग्रह म्हणावयाचा. म्हणजे ह्या तीन कोटी झाल्या. एक मुक्ताची कोटी. तो विदेह आधींचाच परतीरस्थ आहे. त्याला ओघांत पडण्याचें नि त्यांतून उत्तीर्ण म्हणजे पार पडण्याचें प्रयोजनच नाहीं. दुसरी कोटी अनासक्ताची. तो युक्त आहे, तीरस्थ असून त्याला ओघ तरावयाचा आहे. तो प्रवाहांत उतरतो आणि अनासक्तीच्या बळानें उत्तीर्ण होतो. तिसरी कोटी ती आसक्तांची. प्रवाहांत उतरलेलेच आहेत. पण त्या प्रवाहांतून आपल्याला पैल तीराला पोंचायचें आहे याचें त्यांना ज्ञान नाहीं. ज्ञान असलें तर कर्तव्याचें भान नाहीं. भान असलें तर तेवढा निग्रह नाहीं. हे प्रवाहांत बुडतात.

## ७६२. व्यग्र

मागील चिंतनांत परमात्मा हा प्रग्रह म्हणजे मुक्त आणि निग्रह म्हणजे मुमुक्षु आहे असें म्हटलें आहे. इथें तिसरी कोटी जो बद्ध तो हि परमात्म्याचेंच रूप आहे असें व्यग्र पद सुचवीत आहे. मुक्त हा समग्र आहे. मुमुक्षु हा एकाग्र आहे असें व्यग्र पद सुचवीत आहे. तर बद्ध हा व्यग्र आहे. मुक्त म्हणजे आप्तकाम वा पूर्णकाम होय. मुमुक्षु हा मुक्तिकाम होय. मुक्ति हेंच एक टोक, एक दिशा त्याला असते. पण बद्ध? तो आशापाशशतैर् बद्ध असतो. सर्व विषय त्याला चोहोंबाजूंनीं खेंचीत असतात आणि तो खेंचला जात असतो. त्याला

अन्तरात्म्याचें जें एक टोक, ती जी प्रत्यक् दिशा, ती तेवढी लाभत नाहीं. बाकी सर्व दिशा त्याला मोकळ्या आहेत. तिकडे तो सारखा गुंतला आहे. व्यग्र आहे. एकीकडे क्षणभर गुंततो, तों दुसरीकडून खेंचला जातो. तिथें हि जातो न जातो तों तिसरीकडून खेंचला गेलाच. अशा प्रकारें तो सदैव व्यग्र असतो. त्याला एक दिशा नाहीं एक मार्ग नाहीं. ''बहुशाखा ह्यनन्ताचश्च बुद्धयो ऽव्यवसायिनाम्'' अनंत फाटे त्याला फुटतात. आणि तो त्यांनीं उद्भ्रान्तासारखा धावत असतो. त्याला उसंत कशी ती नसते. त्याचा अमुक एक कर्तव्य-निश्चय झालेला नसतो. तो प्रवाह-पतित ओंडक्याप्रमाणें वाहत चाललेला असतो. ज्यांचा परमार्थ-निश्चय झालेला नाहीं अशा बद्ध जीवांची हीं तऱ्हा. आज पैशाच्या मागें लागतील. म्हणतील, अर्थाहून सुखाचें साधन दुसरें नाहीं. उद्यां म्हणतील कामसुख सार आहे. अर्थाचा उपयोग कामोप-भोग च. परवां म्हणतील, कामसुख कामसुख किती दिवस? मेल्यावर काय? तेव्हां धर्माचीच कास धरली पाहिजे. त्याच्या योगानें स्वर्गलोकीं अमृतपान आणि गंधर्वगान लाभेल आणि अप्सरांचा संतत सहवास हि. म्हणून स्वर्गप्रद धर्मच खरा पुरुषार्थ! अशा नाना वासनांच्या नादांत मनुष्य व्यग्र होऊन राहतो. ही व्यग्रता च अखेर माणसाला दमवते शमवते आणि मग तो स्वस्थ बसून विचाराच्या भूमिकेवर येतो. त्याच्यांत तत्त्व-जिज्ञासुता जागते. आणि एकदां का तो विचार करूं लागला म्हणजे मग तो परमार्थ-निश्चयाला पोंचतो. आणि म्हणून व्यग्र हा हि परमात्मा च आहे. तो भावी आहे इतकेंच. परमार्थाच्या सोपानावर जो चढला तो आगेमागें परमार्थाला पोंचणारच आहे. म्हणून तो परमात्म-स्वरूपच होय.

## ७६३. नैकशृंग

नैकानि शृङ्गाणि यस्य सः नैकशृङ्गः। ज्याचीं शिंगें अनेकानेक आहेत तो नैकशृंग म्हणावयाचा. वेदांत परमात्म्याचें वर्णन आलें आहे-''चत्वारि शृङ्गास्, त्रयो अस्य पादा, द्वे शीर्षे सप्त हस्तासो अस्य। त्रिधा बद्धो वृषभो रारवोति महोदेवो मर्त्यां आविवेश।'' तदनुसार नैकशृङ्ग. हा अर्थ ठीकच आहे, परंतु नैकपद असंख्येयता सुचवीत आहे. आणि शृङ्गपद विशेष. तो परमात्मा असंख्य विशेषांनीं नटला आहे. त्याचे विशेष, त्याचे गुणप्रकर्ष किती सांगावे? जितके सांगावे तितके थोडेच. म्हणून तो नैकशृङ्ग म्हणावयाचा. प्रज्ञा, बल, अन्न आणि श्रम हीं चार शिंगें होत. श्रद्धा, संकल्प आणि क्रिया हे तीन पाद होत. सत्य आणि संयम हीं दोन डोकीं होत. शेतकी, सुतारी, लोहारी, चांभारी, विणकरी, कुंभारी आणि बुरुडी हे सात हात होत. भूत भविष्य आणि वर्तमान या तीन कालांच्या ठाईं तो बांधला आहे. तो सर्व सुखाची वृद्धि करीत आहे. सर्व पुरुषार्थांची सृष्टि करीत आहे. असा हा समाजपुरुष हा महादेव या मर्त्य लोकीं गर्जतो आहे, नर्दतो आहे. आपण अठरा पगड जाती म्हणतों. अठरा पगड म्हणजे अठरा प्रकारच्या पगड्या धारण करणारे अठरा जातीचे लोक. एकएकाची जात त्याच्या पगडीवरून ठरत असे. पगडी म्हणजे माणसाचें शिंगच, वैशिष्ट्यच होय. समाज-पुरुष हा असा नैकशृंग आहे. पण ही सृष्टि कांहीं नुसती माणसांचीच बनलेली नाहीं. या सृष्टींत असंख्य जीव आहेत. आणि अजीव हि असंख्य आहेत. या सर्वांची मिळून ही सृष्टि बनली आहे. अशा स्थितींत तिचीं वैशिष्ट्यें किती म्हणून सांगावीं? तीं का चार, चाळीस, चारशें, चार सहस्र सांगून हि पुरीं होणार आहेत? म्हणून तो सर्वात्मा परमात्मा म्हटला आहे नैकशृंग.

### ७६४. गदाग्रज (अगदाग्रज)

गदस्य अग्रजः गदाग्रजः। गदाचा जो वडील भाऊ तो गदाग्रज कृष्ण. कृष्ण हा रामानुज आणि गदाग्रज होता. बलराम मोठा भाऊ व गद धाकटा भाऊ होता कृष्णाचा. म्हणून गदाग्रज म्हणजे कृष्ण. पण गदाग्रज म्हणण्यांत गदाचा जो गौरव करण्यांत आला आहे तशी त्याची खास कांहीं ख्याति नाहीं. शिवाय प्रास्ताविकांत म्हटल्याप्रमाणें विष्णूचीं हीं नामें गौणानि विख्यातानि आहेत. तीं गुणवाचक आणि प्रसिद्ध आहेत. तदनुसार गदाग्रज पद लावायचें तर गदाग्रज म्हणजे पथ्य आहार विहार असा अर्थ होईल. वडील भाऊ धाकट्या भावावर नियंत्रण ठेवतो. ज्येष्ठाच्या अनुशासनांत कनिष्ठ राहतो. पथ्य आहार विहार असला म्हणजे गद उर्फ रोग विकोपाला जात नाहींत, दबून राहतात, ते डोकें वर काढीत नाहींत.

**पथ्ये सति गदार्तस्य किमौषध-निषेवणैः ।**
**पथ्ये ऽसति गदार्तस्य किमौषध-निषेवणैः ।।**

पथ्य आहारविहाराचें इतकें महत्त्व आहे कीं त्यावांचून औषधोपचार वेगळा नाहीं अथवा निरर्थक आहे असें म्हटलें आहे. म्हणून परमात्मा हा पथ्य होय. अपथ्य होतें तेव्हांच गदाची गदा येते. पण पथ्य असेल तर तें सुदर्शनचक्राप्रमाणें चोहोंकडून आपल्या भक्ताचें संरक्षण करीत असतें. त्याला गदाची पीडा, रोग-पीडा होऊं देत नाहीं. असा विचार केला असतां हें पद गदाग्रज ऐवजीं अगदाग्रज पढणेंच योग्य. सर्व अगदांचा अग्रज पथ्यच होय. शंकराचार्य निगदाग्रज असा पाठ कल्पितात. निः शब्द अध्याहृत घेतात आणि ''निगदेन मन्त्रेण अग्रे जायते इति शब्द-लोपं कृत्वा गदाग्रजः'' अशी कांहींतरीच ओढाताण करतात. त्यापेक्षां अगदाग्रज हा पाठ घेणेंच सरळ आणि सयुक्तिक होय.

### ७६५. चतुर्मूर्ति

**चतुर्-मूर्तिश् चतुर्-बाहुश्, चतुर्-व्यूहश् चतुर्गतिः।**
**चतुर्-आत्मा चतुर्-भावश् चतुर्-वेदविद् एकपात्।।**

हा ब्यांयशीवा श्लोक चतुर् चा पाढा आहे. एक-पात् हा शब्द तेवढा वेगळा आला आहे. शेवटचा चरण ''चतुर्वेदश् चतुष्पथः'' असा चातुर्यानें चतुर्मय करतां आला असता. परंतु इथें सहस्रांत चातुर्य नाहीं. भोळा भाव आहे, सहजता आहे. त्याला अनुसरून जें नाम आलें मुखांत तें आलें. '' भोळिवेचें लेणें विष्णुदासा साजे। तेथें भाव दुजे हारपती।''

चार आहेत मूर्ति ज्याच्या तो चतुर्मूर्ति म्हणावयाचा. मनुष्य-समाज हा चतुर्वर्णात्मक कल्पिला आहे. म्हणून श्वेत रक्त पीत आणि कृष्ण वा ब्राह्मण क्षत्रिय वैश्य आणि शूद्र या वर्णांच्या ज्या चतुर्विध मूर्ति तद्रूप तो परमात्मा म्हटला आहे. या व्यक्तविश्वांतील प्रत्येक च व्यक्ति चर वा अचर त्या अव्यक्त परमात्म्याची मूर्ति म्हटली जाईल. परंतु जिथें आत्मतत्त्व विशेषतः आकळलें जातें ती मनुष्ययोनिच परमात्ममूर्ति म्हणून गौरविली गेल्यास नवल काय? ती चतुर्वर्णात्मक म्हणून तो परमात्मा चतुर्मूर्ति म्हटला आहे.

अथवा विराट् सूत्रात्मा अव्याकृत आणि तुरीय या चार मूर्ति. अथवा व्यक्त, अव्यक्त, व्यक्ताव्यक्त आणि नव्यक्त-नाव्यक्त या चार कोटीच चार मूर्ति आहेत. या चार कोटींच्या बाहेर पांचवी कोटी संभवत नाहीं. म्हणून तो परमात्मा चतुर्मूर्ति म्हणावयाचा. अर्थात् चतुर्मूर्ति म्हणजे चतुर्विध मूर्ति.

अथवा गुणानुसार सत्त्वमूर्ति विष्णु रजोमूर्ति ब्रह्मा तमोमूर्ति महेश आणि गुणातीत केवलस्वरूप अशा परमात्म्याच्या चार मूर्ति होतात म्हणून तो चतुर्-

मूर्ति. महिम्नाच्या पुढील श्लोकांत याच चार मूर्ति वर्णिल्या आहेत.

**बहलरजसे विश्वोत्पत्तौ भवाय नमोनमः**
**प्रबलतमसे तत्संहारे हराय नमोनमः।**
**जनसुखकृते सत्वोद्रिक्तौ मृडाय नमोनमः**
**प्रमहसि पदे निस्त्रैगुण्ये शिवाय नमोनमः।।**

## ७६६. चतुर्बाहुः

चत्वारो बाहवो ऽस्य इति चतुर्बाहुः। परमात्म्याला चार बाहु आहेत म्हणून तो चतुर्बाहु म्हटला आहे. जीवाला एक दोनच बाहु आहेत. हस्तीला एक आहे. माणसाला दोन आहेत. इतर प्राण्यांना हात वा भुज नाहींत. ते अहस्त वा बाहुरहितच होत. म्हणजे हस्त वा बाहु हा अपूर्व विकास म्हटला पाहिजे. हा विकास ज्याच्या ठाईं पूर्ण झाला तो चतुर्बाहु म्हणावयाचा. पादप्राधान्यानें सृष्टीचा चराचर असा द्विविध विभाग केला जातो. परंतु तो प्राथमिक विभाग झाला. करवर्ग हा प्रगत विभाग होय. हस्तकौशल्य करांमध्यें; हस्त-भुजरहित प्राण्यांमध्यें कुठून आढळणार? म्हणून करी, हस्तवान् हे प्रगत जीव होत. आणि ज्या अर्थी सर्व हस्तकौशल्य हातांत निहित आहे त्याअर्थी तो चतुर्बाहु म्हणजे सर्वविध कौशल्यसंपन्न म्हणावयाचा. अर्थात् इथें चतुर् पद हें सर्व-वाचक, संपूर्णता-वाचक समजावयाचें. आणि बाहु पद कौशल्यवाचक च घ्यावयाचें. पूर्वी पंधराव्या श्लोकांत चतुर्भुज हें पद येऊनच गेलें आहे. बाहु आणि भुज हीं प्रदें संरक्षक बलवाचक हि घेतां येतील. तें संपूर्ण बल परमात्म्याच्या ठाईं निहित आहे म्हणून हि तो परमात्मा चतुर्बाहु म्हणावयाचा.

पण जगांत सर्वत्र द्विबाहु लोकच आढळत असतो. ही चतुर्बाहु कल्पना चमत्कारिक नव्हे का? हें सुचिह्न कीं कुचिह्न? दोन बाहु दुसऱ्या दोन बाहूंशीं जेव्हां विरोधविग्रहांत एकत्र येतात तेव्हांच ते कुचिह्न म्हणावयाचें. तो आसुर भाव होय. पण जेव्हां ते परस्परसहकार आणि संभूय उद्योग करतात तेव्हां तिथें मानव्य प्रकटतें. हा सहकारच चतुर्बाहु होय. आणि हें सुचिह्नच म्हणावयाचें. पण हा सहकार जेव्हां पति-पत्नी गुरु-शिष्य देव-भक्त या जोडींतल्या प्रमाणें अभिन्नहृदय होतो तेव्हां तो दैवी होय. आणि हाच खरोखर चतुर्बाहु म्हणावयाचा.

## ७६७. चतुर्व्यूह

चतुर्व्यूह हें पद पूर्वी पंधराव्या श्लोकांत येऊनच गेलें आहे. तें परत इथें ब्यांयशीव्या श्लोकांत आलें आहे. अर्थात् त्यानें सहस्रकाराला चांगलेंच प्रभावित केलें आहे, असें दिसतें. ही व्यूहकल्पना काय आहे? व्यूह आणि समूह हीं दोन आज्ञार्थक क्रियापदें ईशोपनिषदांत आलेलीं आहेत. तिथें व्यूह म्हणजे पसर आणि समूह म्हणजे गोळा कर वा आवर असा अर्थ उघड आहे. त्याला अनुसरून व्यूह म्हणजे विस्तार असा अर्थ झाला. हा विस्तार आकारानें तसा प्रकारानें हि घ्यावयाचा. अर्थात् व्यूह म्हणजे विविध विस्तार, आणि चतुर्व्यूह म्हणजे चतुर्दिक् विस्तार. हें विश्वच चतुर्व्यूह होय. त्याचा हा चतुर्दिक् विस्तार अनन्तपार आहे. कोणत्या हि बाजूनें पहा तो व्यूह, तो विस्तार असीमच आहे. त्यांत जो शिरला तो हरवलाच. हा असीम विस्तार चार कोटींत पडतो-१ व्यक्त २ अव्यक्त ३ व्यक्ताव्यक्त आणि ४ नव्यक्त-नाव्यक्त. म्हणजे तो म्हणावयाचा चतुर्व्यूह. या चतुर्व्यूहांतून, या चार कोटींतून कांहीं एक सुटलेलें नाहीं. "न तद् अस्ति पृथिव्यां वा अन्तरिक्षे ऽथवा दिवि। तत्त्वं व्यूहचतुष्केन मुक्तं यत् स्यात् जगत्त्रये।।" असें गीतेचे शब्द घेऊन मी म्हणेन. व्यूह म्हणजे विस्तार हा अर्थ लक्षून संकर्षण वासुदेव प्रद्युम्न आणि अनिरुद्ध हे चौघे व्यूह म्हटले गेल्यास नवल नाहीं. ते सर्व एकात्म होते. कृष्णानें अवतारकार्य ह्या सर्वांनीं मिळून पार पाडलें. हा यदुवंशीय चतुर्व्यूह झाला. रघुवंशीय चतुर्व्यूह म्हणजे राम भरत लक्ष्मण शत्रुघ्न होत. शिवाजी

तानाजी सूर्याजी बाजी हा शिवचतुर्व्यूह होय. गांधी विनोबा महादेव कस्तुरबा, हा गांधी चतुर्व्यूह म्हणावयाचा. अशा प्रकारें समष्टीपासून व्यष्टीपर्यंत व्यूह कल्पना ऊहनीय होय. शंकराचार्य बह्वृचोपनिषदाला अनुसरून शरीरपुरुष छंदःपुरुष वेदपुरुष व महापुरुष असे चतुर्व्यूह होतात, असें म्हणतात.

## ७६८. चतुर्गति

चतस्रः गतयः यस्य सः चतुर्गतिः । चेतनाच्या म्हणजे जीवाच्या चार गति कल्पिल्या जातात. आज जीव ज्या मर्त्य लोकांत आहे ती हि त्याची एक गतिच म्हणावयाची. वस्तुतः ती त्याची स्थिति आहे. इथें या स्थितींत म्हणजे कर्मभूमींत राहून तो जीं कांहीं सदसत् कर्मे करतो तदनुसार मरणोत्तर त्याला जी दशा प्राप्त होते तिला म्हणतात गति वा लोक. ह्या गति पुण्यापुण्य उभयविध आहेत. पुण्य गतीला स्वर्गलोक म्हणतात, अपुण्यगतीला नरकलोक म्हणतात. परंतु ह्या दोन्ही गति कर्मार्जित आहेत. पण जिथें कर्मच संपतें, जी कर्मजित नाहीं पण आत्मज्ञान-जित आहे ती गति या उभय गतींहून वेगळी आणि उत्तम होय. तिलाच म्हणतात मोक्ष लोक. हा मोक्ष जीवाचें सहज निजधन होय. तें करावें मिळवावें सें नाहीं. तें आहे. आत्मज्ञानानेंच तें लब्धच उपलब्ध होतें. अशा प्रकारें हें ऐहिक जीवन आणि मरणोत्तर च्या त्रिविध गति मिळून चार गति होतात. पांचवी गति नाहीं. म्हणून चेतनस्वरूप परमात्मा हा चतुर्गति म्हणावयाचा. पण कोणी म्हणेल, नास्तिकाला कसली आली गति? तर तें म्हणणें फोल आहे. कारण गति ही वस्तुतन्त्र आहे. म्हणजे वास्तविक आहे. ती कल्पित नाहीं पुनर्जन्माची सिद्धि अनेक उदाहरणांवरून प्रकट आहे. प्रत्यक्ष आणि अनुमान दोहोंवरून हि पुनर्जन्माची म्हणजे गतींची हि सिद्धि होत आहे. जे अरबी धर्म पुनर्जन्म मानीत नाहींत ते बालबुद्धि आहेत. जन्म प्रत्यक्ष आहे. पुनर्जन्म हि प्रत्यक्ष अनुभवसिद्ध आहे. त्या दोहोंच्या दरम्यान जीवाची अवस्थिति हि उघडच धरायला पाहिजे. उरला मोक्ष तो तर जीवाचें निजरूपच आहे. इतर गति सकारण आहेत, हा अकारण आहे. स्व-भाव आहे.

## ७६९. चतुरात्मा

चत्वारः आत्मानः अस्य इति चतुरात्मा। अथवा चतुरः आत्मा बुद्धिः अस्य इति चतुरात्मा। चार रूपें आहेत ज्याला तो चतुरात्मा म्हणावयाचा. अथवा चतुर आहे, स्वबोधक्षम आहे, बुद्धि ज्याची तो चतुरात्मा म्हणावयाचा. हा संपूर्ण श्लोक चाराचा पाढा असल्यामुळें दुसरी व्युत्पत्ति सहज नाहीं. ती चतुर कल्पना आहे. मग हे चार आत्मे कोणते? जाग्रत् स्वप्न सुषुप्ति आणि तुरीया या दशांत उपलब्ध होणारा जो आत्मा तोच चतुरात्मा म्हणावयाचा. त्या आत्म्यांनाच विश्व तैजस प्राज्ञ आणि तुरीय अशा संज्ञा मांडूक्योपनिषदांत दिल्या आहेत. चतुर् शब्दाबरोबर मूर्ति व्यूह आत्मा गति आणि भाव हे शब्द या श्लोकांत आलेले आहेत. ते विशिष्ट अर्थानें आले आहेत, हें उघड आहे. मूर्ति शब्द साकार देह, व्यूह शब्द परिवार, आत्मा शब्द अन्तःस्थिति, गति शब्द देहान्तर-प्राप्ति आणि भाव शब्द विभूति वा परिवर्तनें सामान्यतः सुचवितो, असें म्हणतां येईल. तदनुसार त्यांचे वेगवेगळे अर्थ केले तरी ते सर्व परमात्मवाचक असल्यामुळें एकमेकांत सरमिसळ होऊं पहातात. त्याला व्यक्ताकारांत पाहूं जावें तों तो अव्यक्त दिसतो. अव्यक्त म्हणावें तों त्याचा हा व्यक्ताकार दृष्टीसमोर उभा राहतो. त्याला एक म्हणावें तर तो बहुधा भासूं लागतो. त्याला बहु म्हणावें तर तो एकच एक आहे असें दिसतें. त्याला दविष्ठ म्हणून शोधायला जावें तर तो हृदयांतच आढळतो. आणि नेदिष्ठ म्हणून हृदयगह्वरांत शोधावें तर तो बाहेर उभा असतो. असा तो कोणत्या हि एकाच रूपांत न सामावणारा मोठा

फसवा आहे. परंतु भक्त त्याला चाराच्या कोंडींत पकडतात. त्याची ते विश्व म्हणून उपासना करतात. तो सत्, तो असत्, तो सदसत्, तो नसत्-नासत् आहे. बोला, आतां तो कुठें पळतो? विश्व तैजस प्राज्ञ आणि तुरीय म्हटल्या नंतर मग तो कसा निसटतो?

### ७७०. चतुर्भाव

भवति इति भावः, व्यक्तिः। चत्वारो भावा अस्य इति चतुर्भावः। जो होतो तो म्हणावा भाव. अर्थात् व्यक्ति. चार आहेत भाव म्हणजे व्यक्तीभाव ज्याचे तो म्हणावा चतुर्भाव. परमात्म्याचे भाव म्हणजे हें सर्व विश्वच आहे. या अनन्त भावांतून जे चिन्तनीय भाव ते भगवद्-विभूति म्हटले आहेत. गीतेच्या दहाव्या अध्यायांत अर्जुन पुसतोः

**"केषु केषु च भावेषु चिन्त्यो ऽसि भगवन् मया"**

'कोण्या कोण्या स्वरूपांत करावें ध्यान मीं तुझें?' आणि भगवान् सांगतात :

**हन्त ते कथयिष्यामि दिव्या ह्यात्मविभूतयः।**
**प्राधान्यतः, कुरुश्रेष्ठ नास्त्यन्तो विस्तरस्य मे ॥**
**अहं आत्मा गुडाकेश सर्वभूताशय-स्थितः।**
**अहं आदिश्च मध्यं च भूतानां अन्त एव च॥**

या श्लोकांत थोडक्यांत सर्व भाव येऊन गेले आहेत आणि ते आहेत चार : १- आत्मा, जो अक्षर आहे. २- देह जो उत्पति स्थिति लय या तीन भावांनीं युक्त आहे. असे हे चार भाव झाले. या चार भावांत सर्व येऊन गेलें आहे. म्हणून परमात्मा चतुर्भाव होय. आत्मा हा स्वतः अ-भूत आहे. तो अज, अव्यय, अविनाशी आहे. इतर सर्व भूत आहे. तें जन्मतें, वाढतें-घटतें आणि मरतें या चार भावांहून पांचवा भाव कांही आढळत नाहीं. म्हणून तो परमात्मा चतुर्भाव होय.

अथवा चतुर्भाव म्हणजे अधिभूत अधिदैव अधियज्ञ आणि अध्यात्म हे उत्तरोत्तर उन्नत अभिमान होत. अधिभूत म्हणजे तामस देहाभिमान, अधिदैव म्हणजे राजस इन्द्रियाभिमान, अधियज्ञ म्हणजे सात्विक अन्तःकरणाभिमान आणि अध्यात्म म्हणजे गुणातीत स्वरूपसंज्ञान असें म्हणतां येईल. यांनाच जड, चेतन, अधिचेतन आणि अतिचेतन अशा संज्ञा द्यावयाच्या. या चार भावांहून वेगळा पांचवा भाव उपलब्ध होत नाहीं. म्हणून तो परमात्मा चतुर्भाव म्हणावयाचा.

### ७७१. चतुर्वेदविद्

चतुर्वेदान् वेत्ति इति चतुर्वेदवित्। जो चारी वेद जाणतो तो चतुर्वेदवित् म्हणावयाचा. परमात्मा हाच चतुर्वेदवित् आहे. कारण तोच वेदार्थ जाणतो, वेदतात्पर्य जाणतो. गीतेंत म्हटलेंच आहे—

**वेदैश्च सर्वैर् अहमेव वेद्यो**
**वेदान्तकृत् वेदविदेव चाहम्**

मी वेद-वेद्य आहें, मी वेदकर्ता आहें, मीच वेदज्ञ आहें. याचा आशय हा कीं तो चिन्मात्र परमात्मा सर्वकारण आहे. सर्व कारणांत चतुर्वेदवित्त्वहि येऊनच जातें. ज्ञान ही हि एक क्रियाच आहे. आणि कोणती हि क्रिया म्हटली म्हणजे तिचीं तीन अंगें अपरिहार्य असतातः १ कारण २ कर्म, ३ कर्ता. तशीं ज्ञानक्रियेचीं तीन अंगें म्हणजे १, वेद २, वेदन आणि ३ वेत्ता. हीं तिन्ही अंगें तो परमात्माच आहे. तोच वेत्ता आहे, तोच वेद म्हणजे ज्ञानसाधन आहे आणि तोच वेदन म्हणजे ज्ञानक्रिया आहे. कर्त्यांशिवाय करण आणि कर्म निरर्थक होत. तो कर्ताच कर्माला कर्मत्व आणि करणाला करणत्व देण्यास समर्थ असतो. अशा प्रकारें कर्ताच सर्व-कारण म्हटला जातो. ज्ञानाक्रियेच्या बाबतींत तर हें विशेष लागू आहे. इतर क्रियांत कर्ता करण क्रिया आणि कर्मफल एकरूप होऊं शकत नाहीं. परंतु ज्ञानक्रियेंत मात्र तीं सर्व अंगें एकरूप होऊन जातात. ज्ञान ज्ञेय ज्ञाता ही त्रिपुटी तिथें उरतच नाहीं. तीं अंगें, तो

अंगागिभाव सर्व एकाकार होऊन जातें. जो ज्ञाता तोच ज्ञेय आणि जें ज्ञेय-ज्ञातृत्व तेंच ज्ञान. तिन्ही अभिन्न आणि एकरूप हेंच वेदज्ञत्व होय. जो नुसतीं वेदाचीं अक्षरें घोकतो तो वेदज्ञ नव्हे. जो त्यांचा शब्दार्थ जाणतो तोहि वेदज्ञ नव्हे. तर जो वेदाचा आशय जगतो तोच वेदज्ञ. तोच चतुर्वेदवित्. ज्ञात्यांत पल्लवग्राही आणि मूलग्राही असे भेद केले जातात. जे पल्लव ग्राही ते खरे ज्ञाते म्हणजे ज्ञानी नव्हेत. जे मूलग्राही तेच ज्ञानी म्हटले जातात. हेंच गीतेंत १५व्या अध्यायाच्या आरंभीं ''छन्दांसि यस्य पर्णानि यस् तं वेद स वेदवित्'' म्हणून स्पष्ट केलें आहे. तिथें वेदमंत्रांना पानें म्हटलें आहे. मूळ तो अक्षर परमात्मा होय. त्याला जो जाणतो तोच सर्व- वेदवित् म्हणजे चतुर्वेदवित् होय.

## ७७२. एकपाद्

एकः पादः अस्य इति एकपात्। एकच पाय आहे ज्याला तो एकपात् म्हणावयाचा. परमात्मा हा एकीकडे सहस्रपात् म्हटला आहे तर दुसरीकडे एकपात्. उपनिषदांत तो चतुष्पाद हि म्हटला आहे. यांत काय हेतु आहे? पाय म्हणजे आधार. ज्याला दुसऱ्याचा आधार लागतो तो परावलम्बी होय. तो परतंत्र होय. परमात्मा हा कोणावर हि अवलंबून नाहीं. तो स्वतंत्र आहे. त्याचा आधार तो स्वतःच आहे म्हणून तो एकपात् म्हटला आहे. आपल्या पायावर उभें राहतें, पांगुळगाड्याचा वा वडिलांच्या बोटाचा आधार ज्याला लागत नाहीं तें मूल चालायला स्वावलंबी झालें. तसा जो सर्वतंत्रस्वतंत्र झाला तो म्हणावयाचा एकपात्. परमात्म्यानें ही सृष्टि निर्माण केली तेव्हां त्यानें कशाचा आधार घेतला?

**किमीहः किंकायः स खलु किमुपायस् त्रिभुवनं किमाधारो धाता सृजति किमुपादनमिति च''**

त्यानें दुसऱ्या कशाचाच आधार घेतला नाहीं ही सर्व सृष्टि त्यानें आपल्याच आधारें निर्माण केली, कोळी जसा आपलें जाळें स्वतःच निर्माण करतो त्या प्रमाणें. म्हणून तो परमात्मा सर्वतंत्रस्वतंत्र होय. एक आत्माच त्याचा आधार आहे म्हणून तो एकपात् होय. अविभाज्य न्यूनतम जो अंश तो एक होय. तो एक स्वात्माच ज्याचा पाद म्हणजे आधार आहे तो एकपात् म्हणावयाचा. ''पादोऽस्य विश्वा भूतानि त्रिपाद् अस्यामृतं दिवि'' या श्रुतींत परमात्मा चतुष्पाद म्हणजे सकळ कल्पिला असून त्याचा ही व्यक्त सृष्टि एक पाद म्हणजे एकचतुर्थांश म्हटली आहे. उरली ती अव्यक्त आणि अक्षर सृष्टि होय. ती अर्थात् त्रिपाद् म्हणजे तीनचतुर्थांश म्हणावयाची. सहस्रपात् पद परमात्म्याची सर्वव्यापकता व्यक्त करतें. त्यांत सहस्र पद सर्व-वाचक असून पाद पद आक्रामकता-व्यापकता-वाचक होय. म्हणजे पाद पदाचे तीन अर्थ झाले (१) आधार, (२) चतुर्थ भाग, पाव, (३) चरण, व्यापन.

## ७७३. समावर्त

सम्यक् आवर्तयति गुरुकुले प्रोष्य वेदाध्ययनं समाप्य स्वगृहं प्रत्यायाति इति समावर्तः। जो समावर्तन करतो तो समावर्त म्हणावयाचा. समावर्तन म्हणजे सोडमुंज. हा विधि गुरुकुलीं राहून व वेदाध्ययन संपवून म्हणजे विद्याविनयसंपन्न होऊन स्वगृहीं गृहस्थाश्रम स्वीकारण्यास परतण्याच्या वेळीं केला जातो. अर्थात् समावर्त म्हणजे स्नातक होय. वेदविहित वर्णाश्रम धर्मनें व्यवस्थित आंखणी केली आहे. मानव-जीवनाच्या साफल्यासाठीं याहून अधिक सुंदर योजना आढळत नाहीं. नदीला जसे घाट बांधतात त्याप्रमाणें वैदिक धर्मसूत्रकारांनीं स्मृतिकारांनीं मानव-जीवन-प्रवाहाला वर्णाश्रमरूपी घाट बांधले आहेत. या घाटांतून वाहणारा प्रवाह तीर्थरूप होतो. तिथें सुखानें वास करतां येतो. सुखमय जीवन हवें तर

आश्रमावांचून क्षणभर हि राहूं नये असें सांगितलें आहे. ''अनाश्रमी न तिष्ठेत क्षणमेकमपि द्विजः'' ब्रह्मचर्याश्रम हा पहिला घाट. अग्नि आणि आचार्य ह्या तेथील देवता. गृहस्थाश्रम हा दुसरा घाट. अग्नि आणि समाजप्रतिनिधि अतिथि ह्या तेथील देवता. वानप्रस्थाश्रम हा तिसरा घाट, अग्नि आणि निजात्मा ह्या तेथील देवता. संन्यासाश्रम हा चौथा घाट केवल आत्माग्नि तेथील देवता: अशा प्रकारें ज्याचा जीवनौघ घाटबद्ध प्रवाहित झाला तो अनायास कृतार्थ होतो. म्हणून चारी आश्रम हें परमात्मस्वरूपच होत. इथें समावर्त पदानें ब्रह्मचर्याश्रम आणि पुढील अनिवृतात्मा पदानें गृहस्थाश्रम सूचित केला आहे. पुढील संपूर्ण श्लोक दुर् चा पाढा आहे.

## ७७४. अनिवृत्तात्मा (निवृत्तात्मा)

प्रवृत्ति आणि निवृत्ति हीं दोन्ही धर्मांचीं अंगें आहेत. ब्रह्मचर्य आणि गार्हस्थ्य ही प्रवृत्ति आहे. वानप्रस्थ आणि संन्यास ही निवृत्ति आहे. यांनाच उद्देशून गीतेनें म्हटलें आहे:

**आरुक्षोर् मुनेर् योगं कर्म कारणमुच्यते।**
**योगारूढस्य तस्यैव शमः कारणमुच्यते।।**

जोंवर मुलाला चालायला येत नाहीं तोंवर पांगुळगाडा हें चालायला कारण म्हणजे साधन होतें. पण एकदां नीट चालायला येऊं लागलें म्हणजे तो पांगुळगाडा गरजेचा राहत नाहीं. तो सोडून देणेंच चालण्याला उपकारक होतें. तसें समत्वयोगावर चढायला आरंभीं कर्म उपकारक होतें. कर्माच्या आधारें मनाचा तोल सांभाळतां येतो. तामस व राजस कर्मे टाकून द्यायचीं. सात्विक तेवढीं करायचीं. तीं हि फलाशारहित होऊन करायचीं. असा अभ्यास करतां करतां तो समत्वबुद्धिरूप योग लाभतो. तो लाभला म्हणजे मग कर्माची खटापट वा आयास उरत नाहीं कर्मे अनायास होऊं लागतात. हाच शम होय. तो उत्तरोत्तर प्रसन्नतेंत वृद्धि करतो. वसंतागम झाला म्हणजे जशीं जुनीं पानें गळून जातात तशीं त्याचीं सर्व कर्मे गळून पडतात. आणि त्याला नव्या पालवीप्रमाणें शान्तीची अरुणारुण कोवळी कोवळी पालवी सर्वांगावर फुटते. शान्तीच्या फुलोऱ्यानें तो नुसता फुलून जातो. ही धन्य दशा एकाएकीं लाभत नाहीं. क्रमाक्रमानें च ती येते. तोच क्रम ''समावर्तो निवृत्तात्मा'' हीं पदें सुचवीत आहेत. आधीं विधिवत् ब्रह्मचर्य संपवून तो गृहस्थाश्रमांत प्रवेश करतो. तिथें तो आपल्या किल्यांत राहून षड्रिपूंशीं युद्ध करतो. हाच अनिवृत्तात्मा होय. युद्धांतून तो पळ काढीत नाहीं. पण त्यांत शत्रूंना तोंड देतो म्हणून तो अनिवर्ती वीर होय, अनिवृत्तात्मा होय. शत्रु शमला म्हणजे मग हा हि निवृत्त म्हटला जातो. पण वस्तुतः तो अनिवृत्तच असतो. तो आपले शान्तीचे किल्लेकोट रचीत असतो. वैराग्याची ढाल आणि ज्ञानाची तरवार सदैव त्याच्या हातींच असते. वानप्रस्थाश्रमांत तो वैराग्याची ढाल बळकट करतो, संन्यासांत ज्ञानासि पाजळीत रहातो. म्हणून तो अनिवृत्तात्माच म्हणावयाचा. मेल्यावरच तो निवृत्त म्हणावयाचा.

## ७७५. दुर्जय

दु:खेन जीयते असौ इति दुर्जयः। जो मोठ्या कष्टानेंच वश होतो तो म्हणावयाचा दुर्जय. परमात्मा कोणी वेगळा नाहीं. तो निजरूप च आहे. पण तो निज असून हि आमच्या विपरीत ज्ञानामुळें आणि तज्जनित वृजिनामुळें आम्ही त्याला ओळखतच नाहीं, त्याच्यापासून दूर दूर जातो. मग तो निज असून हि पर झाल्यास नवल काय? ज्ञानदेव म्हणतात: ''महत्त्व अवघें विसरिजे। वित्पत्ति पऱ्हां सांडिजे। जैं जगा धाकुटें होइजे। तैं जवळीक माझी।।'' मनुष्याला आपल्या संस्कृतीचा, आपल्या सत्तेचा, आपल्या संपत्तीचा अभिमान असतो. त्या अभिमानानें तो आपल्याला जगाहून वेगळा आगळा समजतो. त्या

भरांत तो जगाची व जगदीशाची अवज्ञा करतो. त्याला तो निरुपाधि निरभिमान सर्वात्मा परमात्मा कसा भेटणार? तो त्याला वश कसा होणार? त्याला तो दुर्‌जयच आहे. परंतु ज्यानें ममतेचें कुंपण मोडलें आहे आणि अहंतेचें बन्धन तोडलें आहे त्या नि:संग आणि निरहंकार पुरुषाला या विश्वांत कोण आपला नि कोण परका राहिला? ''तत्र को मोह: क: शोक: एकत्वं अनुपश्यत:?'' त्याला सारें विश्वच आपलें झालें, आत्मरूप झालें आणि तो हि सर्वांचा झाला. तो कोणाचें निराकरण करीत नाहीं. कोणी त्याचें निराकरण करीत नाहीं. ही धन्य साम्यदशा सुलभ कशी म्हणतां येईल. दुर्‌जयच आहे ती. म्हणून तो परमात्मा दुर्‌जय म्हटला आहे. जीवाला नाना अभिमान चिकटलेले आहेत. त्यांतून एखादा सुटलाच तर तो 'मी निरभिमान आहें' याच अभिमानांत अडकून पडतो. तात्पर्य कोणी तरी मी विशेष आहें या अभिमानाच्या मगर मिठींतून सुटणें सोपें नाहीं. म्हणून तो परमात्मा दुर्‌जय म्हणावयाचा. परमात्म्याचे जे अवतार या जगांत होतात ते हि दुर्‌जय च होत. त्यांच्यावर कोणाला मात करतां येत नाहीं. त्यांना सामान्य समजून असुर विरोध करतात आणि अग्नी-वर झेप घेणाऱ्या पतंगाप्रमाणें नष्ट होतात. म्हणून तो दुर्‌जय.

### ७७६. दुरतिक्रम

दु:खेन अतिक्रम्यते असौ इति दुरतिक्रम:। ज्याला मोठ्या मुश्किलीनें ओलांडतां येतें, पार करतां येतें तो म्हणावयाचा दुरतिक्रम. ज्याची बरोबरी करणें हि जिथें कठिण आहे, त्याचा अतिक्रम करणें, त्याला मागें टाकून पुढें जाणें कसें शक्य आहे? जीवाचें दु:ख विविध आहे. त्याची बरोबरी होते. आपल्या बरोबरीच्या पासून त्याला भय वाटतें कीं हा आपल्यावर मात करील. मात न केली तरी आपणच कोणी विशेष आहों असें म्हणतां येत नाहीं. आपल्याच तोलाचे दुसरेहि आहेत, याचें त्याला वैषम्य वाटत राहतें. कोणी वरचढ असला तर त्याच्यापासून हि जीवाला भय उघडच आहे. त्याचें हि म्हणजे वरचढ-पणाचें हि त्याला वैषम्य वाटत राहतें. आणि आपल्या अर्जित संपत्तीचा कीर्तीचा अखेर नाश होतो याचें हि जीवाला वैषम्य वाटतें. सर्व प्रकारच्या संपत्तीच्या बाबतींत हें त्रिविध दु:ख जीवाला सलत राहतें. परंतु परमात्म्याला या पैकीं एक हि दु:ख नाहीं. त्याची समता तर दूरच पण तुल्यता हि कोणाला येऊं शकत नाहीं. मग त्याचा अतिक्रम कोण करूं शकेल? त्याचा वरचढ कोण होणार? आणि तो स्वत: अविनाशी असल्यामुळें व त्याची सर्व सत्ता व संपत्ति हि तदधीन असल्यामुळें नाशाचें भय त्याला नाहींच असा तो परमात्मा अकुतोभय आहे. आणि जीव मात्र सर्वतो भयग्रस्त आहे. असा जीव मग तो कल्पायुषी, त्रिभुवनेश्वर आणि कुबेर कां असेना तो परमात्म्याचा अतिक्रम काय करणार? म्हणून तो परमात्मा दुरतिक्रम म्हणावयाचा. जीवानें त्याच्या पाया पर्यंत मजल मारली तरी खूप झालें.

### ७७७. दुर्‌लभ

दु:खेन लभ्यते असौ इति दुर्‌लभ:। दु:खानें म्हणजे मोठ्या कष्टानें च जो लाभतो तो म्हणावयाचा दुर्‌लभ. क्षुद्र गोष्टीसाठीं प्रयत्न करावा लागत नाहीं. दगड धोंडे रस्त्यावर मिळतात. परंतु रत्नासाठीं समुद्राच्या तळाला जावें लागतें, विवरांतून पाताळांत जावें लागतें. परमात्मा हें असेंच सुदुर्‌लभ रत्न आहे. तो परम पुरुषार्थ परम पराक्रमानेंच मिळावयाचा. योग्य मोल मोजल्याखेरीज क्षुल्लक वस्तु हि जगांत मिळत नाहीं, मग जी अनमोल वस्तु आहे ती कशी मिळेल? तुकाराम महाराज म्हणतात:

**नाहीं संतपण मिळत तें हाटीं।**
**हिंडतां कपाटीं, रानीं वनीं ।।**
**नये मोल देतां धनाचिया राशी।**
**नाहीं तें आकाशीं पाताळीं तें।**

**तुका म्हणे मिळे जीवाचिया साटीं।**
**नाहीं तरी गोष्टी बोलों नये।**

या परमार्थासाठीं जीवाचें मोल द्यावें लागतें. तेव्हांच तो परमार्थ तें संतपण हस्तगत होतें. जो आपला जीव वांचवूं पाहील, जो अंगचोरपणा करील तो मरेल, जो मरेल तो वांचेल. सोक्रेटिस, ख्रिस्त, गांधी यांनीं जीवाच्या मोबदल्यांत तें "रामरतन" तें अमर जीवन मिळवलें. आम्ही कातडी बचावायची धडपड करीत राहतों आणि जीव गमावून बसतों, त्या अमर जीवनाला पारखे होतों. तें अमर जीवन, तें अमृत किती दुर्लभ आहे याचें वर्णन गीतेनें असें केलें आहे: "मनुष्याणां सहस्रेषु कश्चिद् यतति सिद्धये। यततां अपि सिद्धानां कश्चिन् मां वेत्ति तत्त्वत:।" लक्षावधि माणसांतून एखादाच पुरुष परमार्थाकडे वळतो आणि त्यांतून हि एखादाच भाग्यवंत मुक्कामाला पोंचतो. असा तो परमात्मा दुर्लभ आहे. ज्ञानदेव म्हणतात "बहुता जन्मांचा अभ्यासु। तरीचि होय सौरसु परब्रह्मीं।।

## ७७८. दुर्गम

दु:खेन गम्यते अवगम्यते असौ इति दुर्गम:। जो कष्टानें आकळिला जातो तो दुर्गम म्हणावयाचा. हें पद सुगम च्या विरुद्ध अर्थाचें आहे. सुगम म्हणजे सुबोध तर दुर्गम म्हणजे दुर्बोध. जें गोचर आहे तें सारें पंचविषयात्मक सुगम आहे. त्याचें ज्ञान आपल्याला चटकन होऊं शकतें. परंतु बाह्य विषयांचें ज्ञान करून देणारीं करणें तितक्या सुलभतेनें पाहतां येत नाहींत. डोळ्यांनीं सारें जग आपण पाहतों, पण आपले डोळे आपल्याला आरशाच्या साहाय्यावांचून पाहतां येत नाहींत. या करणांपेक्षां अन्त:करणें आणखीच दुर्गम. त्यांची हालचाल आणि हेतु आपल्या लक्षांत आणणें उडी मारून आपणच आपल्या खांद्यावर उभें राहण्या सारखें कठिण आहे. मग या अन्त:करणांच्या, मनाच्या आणि बुद्धीच्या हि, पलीकडे जो अन्तरतर आत्मा आहे तो किती दुर्गम म्हणावा? खरोखर तो दुर्गम म्हणजे अगम्यच आहे. उपनिषदें विचारतात: "विज्ञातारं अरे केन विजानीयात्" अरे जो स्वत:च जाणणारा आहे त्याचें ज्ञेय म्हणून भेदानें ज्ञान होणार कसें? सर्व ज्ञान क्षेत्र-क्षेत्रज्ञ-भेदानें होतें. ज्ञेयमात्र क्षेत्र होय आणि त्याचा ज्ञाता क्षेत्रज्ञ म्हणावयाचा. हा क्षेत्रज्ञ केव्हांहि क्षेत्रभूत होऊं शकत नाहीं. तो क्षेत्रभूत झाल्यास क्षेत्रज्ञ म्हणतां यावयाचा नाहीं. तो क्षेत्रज्ञ म्हणून नाहींसाच होईल. मी आपलें पात्र गात्र पाहतों. पात्र उपकरण आहे, गात्र करण आहे. यांचें गुणदोष पारखणारें अंत:करण आहे. त्या अन्त:करणाच्या दशा-प्रकाश, प्रवृत्ति, मोह - पाहणारा तो क्षेत्रज्ञ. तो जो मी सर्वसाक्षी, त्या मला आतां दुसरा कोण जाणणार? म्हणून तो म्हणावयाचा दुर्गम.

## ७७९. दुर्ग

दुर्गम आणि दुर्ग दोन्ही पदें दुर् उपसर्ग आणि गम् धातु यांच्या पासून व्युत्पादिलीं जातात. परंतु रूढीनें त्यांच्या अर्थांत भेद होतो. दुर्ग म्हणजे बिकट वाट, अवघड गड, डोंगरांतील वा समुद्रांतील जिथें मोठ्या कष्टानेंच पोंचतां येईल असें स्थान. परमात्म्याला पोंचायला मार्ग सोपा नाहीं. "क्षुरस्य धारा निशिता दुरत्यया दुर्गं पथ: तत् कवयो वदन्ति" कवि म्हणजे परमार्थाला पोंचलेले पुरुष तो परमात्म-प्राप्तीचा मार्ग वस्तऱ्याच्या धारेसारखा सूक्ष्म आहे असें म्हणतात. त्याची सूक्ष्मता वर्णितांना कवींची सूक्ष्मदृष्टि हि दिसून येते. वस्तरा बोथट असूं शकतो म्हणून ते म्हणतात "निशित" सहाणेवर धार लावलेल्या वस्तऱ्यासारखा तो दुर्ग आहे, अगदीं अरुंद आहे. त्यावर पाय ठरत नाहीं. चिंचोळ्या, निसरड्या अवघड वाटेनें जातांना माणसाचा तोल जाऊन तो सारखा मार्गच्युत होत असतो, त्यामुळें मुक्कामाला पोंचणें संकटपूर्ण होय. म्हणून तो मुक्काम, तें गन्तव्य, दुर्ग म्हणावयाचें. जीवाचें, मानवाचें गन्तव्य तो

परमात्माच आहे. आणि तो दुर्ग आहे. त्याला पोंचण्याचा जो शुद्धीचा मार्ग आहे तो क्षुरधारेसारखा सूक्ष्म आहे. जरा गफलत झाली कीं तोल गेला आणि माणूस अशुद्धींत पडलाच. आणि अशा अशुद्ध जीवाला तो शुद्धीचा धवलगिरि परमात्मा कोठून भेटणार? उत्तंकानें चूळ भरली नाहीं, पाय धुतले नाहींत तर त्याला ती सौंदर्याची पुतळी राणी समोर असून दिसूं शकली नाहीं. जेव्हां तो शुद्ध झाला तेव्हांच त्याला तिचें दर्शन झालें व तो कृतकार्य झाला. हा शुद्धीचा मार्ग, जो त्या धवलगिरीला जाऊन पोहोचतो, अत्यंत बिकट आहे. म्हणून तो परमात्मा दुर्ग म्हटला आहे. याचीं शक्ति दुर्गा म्हणून प्रसिद्ध च आहे. शक्ति आणि शक्तिमान् अभिन्नच होत.

## ७८०. दुरावास

दुःखेन आवस्यते अस्मिन् इति दुरावासः। जिथें कष्टानेंच वास होतो तें म्हणावयाचें दुरावास. मागील पदांत तो परमात्मा दुर्गम म्हणजे दुर्धिगम, दुर्ग म्हणजे दुष्प्राप्य अनॲक्सेसिबल, अधृष्य आणि अनभिगम्य म्हणून म्हटला आहे. इथें त्या पुढें जाऊन म्हटलें आहे कीं तो परमात्मा समजा जिथें मोठ्या कष्टानें कोणी पोंचलाच तर तिथें तो टिकूं शकणार नाहीं, राहूं शकणार नाहीं–हिमालयाच्या अत्युच्च शिखराप्रमाणें. हिमालयाचें तें गंगावतरण स्थान, तें हिम-शृंग अत्यंत चिंचोळें आहे. तिथें दोन माणसें मुश्किलीनें उभीं राहूं शकतांत, असें म्हणतात. पण तें शृंग किती हि स्वल्प-विस्तर असलें तरी तिथें पदक्षेप होऊं शकतो. तिथें भूमि आहे, तिला कांहीं लांबीरुंदी आहे. परंतु परमात्मा अमूर्त अव्यक्त निर्गुण. तिथें त्याहून वेगळ्या कोणालाच रहायला जागा नाहीं, अवकाश नाहीं, म्हणून तो दुरावास होय. स्वर्गांत कुणाला सदेह जातां येत नाहीं. परमात्म्याच्या ठाईं हि तसा कोणी आपलें नामरूप घेऊन जाऊं शकत नाहीं. कोणत्याहि विजातीय तत्त्वाला तिथें पूर्ण प्रतिबंध आहे. दुधांत पाणी मिसळतां येतें, सोन्यांत तांबें मिसळतां येतें. कारण तें द्रव व घन पदार्थ सजातीय आहेत. परंतु परमात्म-सजातीय पदार्थच नाहीं मग तो त्यांत मिसळणार कसा? घटाकाश मठाकाशांत मिसळत नाहीं. तें एकरूपच असतें. आत्मा परमात्म्यांत मिसळत नाहीं. तो अभिन्नच आहे. म्हणून गीतेंत म्हटलें आहे: ''मया ततं इदं सर्वं जगद् अव्यक्तमूर्तिना। मत्स्थानि सर्व भूतानि न चाहं तेष्ववस्थितः।। न च मत्स्थानि भूतानि पश्य मे योगमैश्वरम्। भूतभृन् न च भूतस्थो ममात्मा भूतभावनः।।'' इथें तीन विधानें केलीं आहेत:– (१) परमात्मा अव्यक्तस्वरूप आहे आणि सर्व व्यक्ति तदाधार आहेत. (२) पण तो अव्यक्तस्वरूप परमात्मा व्यक्तगत वा व्यक्ताधार नाहीं कारण, कार्य हें कारणाधीन असतें, कारण कार्याधीन नव्हे. शेवटीं म्हटलें आहे (३) त्या अव्यक्त परमात्म्याचे ठाईं व्यक्त राहतें हें म्हणणें हि खोटें. कारण मुळीं दोन नाहींच, एकच वस्तु आहे. 'नासतो विद्यते भावः' म्हणून तो परमात्मा दुरावास म्हटला आहे.

## ७८१. दुरारि-हा

दुरारिहा हें नाम वस्तुतः दुररिहा वा अरिदुराहा असें असायला पाहिजे होतें. परंतु एक आ हा उपसर्ग अधिक जोडून दिला आहे. आणि धातू-ऐवजीं नामाला जोडला आहे. म्हणजे दुर् आ उपसर्गद्वय झालें. नामाच्या बाबतींत तें अर्थांत भर न घालतांच आलें आहे. धातूला जोडून येणें ठीकच आहे. अशीं उपसर्गद्वययुक्त, दुरा-युक्त, आणखी हि कांहीं पदें आलीं आहेत. उदाहरणार्थ दुराधर्ष दुरावास इत्यादि. अरिं हन्ति इति अरिहा। अरिहा हें पद समजण्यासारखें आहे. अरिहा म्हणजे शत्रुघ्न. पण दुरारि म्हणजे काय? अरींत हि कांहीं परी आहेत कीं काय? होय, आहेत. कांहीं प्रकट शत्रु असतात, कांहीं प्रच्छन्न. जे प्रच्छन्न शत्रु असतात ते अधिक घातक समजले पाहिजेत. कूपापेक्षां

अंधकूप हा अधिक भयावह म्हटला पाहिजे. कूप उघड दिसत असतो. तेव्हां मनुष्य त्यांत पडला तरी सावधगिरीनें पडतो. परंतु तो जर तृणाच्छन्न असला तर त्यांत मनुष्य असावधपणें पडतो. आणि त्यांतून तो वांचण्याची शक्यता कमी. म्हणून हा असा अंधकूपसा प्रच्छन्न शत्रु अधिक भयानक म्हटला पाहिजे. याहूनहि अधिक भयावह म्हणजे हितशत्रु होय. तो प्रच्छन्न तर खराच, पण तो नुसता प्रच्छन्न नाहीं, भ्रामक हि आहे. कपटी आहे. तो हित म्हणजे हितकर्ता म्हणून भासवतो आणि असतो मात्र शत्रु. अशाच्या पासून माणूस नुसता असावधच राहत नाहीं तर आपलें मर्म त्याच्या हवालीं करीत असतो. आणि म्हणून त्याचा घात पूर्णच होतो, हमखास होतो. अशा शत्रूलाच म्हणावयाचें दुरारि. कामक्रोधलोभादि विकार हे जीवाचे असेच शत्रु आहेत. ते येतात हित म्हणून आणि करतात मात्र घात. सर्वविकार कामरूप आहेत. ते कमनीय वाटतात, गोड वाटतात म्हणून त्यांना काम वा कामरूप म्हणावयाचें. पण त्यांचें वास्तविक स्वरूप ओळखलें तर तेच मार आहेत, घातक आहेत असें दिसून येतें. गीतेंत त्यांना काम म्हटलें आहे, तर धर्मपदांत त्यांना मार म्हटलें आहे. दुरारि पदांत दोहोंचा समावेश होतो असें म्हणतां येईल. परमात्मा या दुरारीला ओळखून असतो म्हणून त्याचा तो नाश करतो. शत्रूला शत्रु म्हणून ओळखण्यानेंच त्याचा नाश होतो. चोराला चोर म्हणून ओळखतांच तो चोरी करूं शकत नाहीं आणि तो चोरी करूं शकला नाहीं म्हणजे चोर म्हणून त्याचा नाश झाला असेंच म्हटलें पाहिजे. मृगजळाला मृगजळ म्हणून ओळखल्यावर तें आपल्याला अपाय करूं शकत नाहीं.

## ७८२. शुभांग

शुभांग हें नाम पूर्वी हि येऊन गेलें आहे ६३ व्या श्लोकांत. इथें ८४ व्या श्लोकांत तें पुन: आलें आहे. भगवान् विष्णूच्या प्रसिद्ध ध्यानांत तें "मेघवर्ण शुभांगं" म्हणून आलेलें आहे. अर्थात् तें विशेष महत्त्वाचें मानलें आहे हें उघड आहे. आम्ही देही असल्यामुळें देहाचें आकर्षण आम्हांला सहज आहे. त्यामुळें परमात्म्याला हि आम्ही देह कल्पितों. आणि त्याचें ध्यान करतों. परमात्म्याची मूर्ति नाम, गुण, कर्म कांहीं नाहीं म्हटलें म्हणजे आमचीं सर्व इंद्रियें व्यर्थच झालीं म्हणावयाचीं. मग तो तुकाराम "घेईं घेईं माझे वाचे। गोड नाम विठोबाचें। डोळे तुम्ही घ्या रे सुख। पहा विठोबाचें मुख। मना तेथें धांव घेईं। राहें विठोबाचे पाईं। तुका म्हणे माझ्या जिवा। नको सोडूं या केशवा।" असें कसें गाणार? परमात्म्याचें रूप ध्यानासाठीं आहे. म्हणून त्याला ध्यानच म्हटलें जातें. त्याचें नाम स्मरणासाठीं आहे. त्याचे गुण गानासाठींच आहेत. त्याचें कर्म कीर्तनासाठीं आहे. परमात्म्याचें ध्यान चरणापासून सुरूं करून मुखावर स्थिर करावयाचें असतें. "संचिन्तयेत् भगवतश् चरणारविन्दम्" म्हणून भागवतानें हा ध्यान-विधि दिला आहे. माणसाच्या मनाला मूर्तीची मोहिनी पडली आहे. रूप-सौंदर्यानें स्त्रीपुरुष वेडे झाले आहेत. हें कोणाला नाकारतां येणार नाहीं. याचें कारण काय? याची मीमांसा खुशाल करा, परंतु जें सत्य आहे तें सत्यच आहे. त्याचा कोणाला इनकार करतां येणार नाहीं. कारण कांहीं हि असो 'मनाचें मोहन मूर्तीमाजीं' हें तथ्य आहे. आणि हें जर खरें आहे, म्हणजे मानवाचें जर हें चिर अभिलषित आहे, तर त्याच्या साक्षात्कारावांचून तो केव्हांहि स्वस्थ होणार नाहीं हें हि तितकेंच खरें आहे. साक्षात्कार हा शब्दच मुळीं मूर्तीची स्थापना करणारा आहे. म्हणून तो परमात्मा भक्तांनीं शुभांग म्हटला आहे. त्याचें अंग प्रत्यंग परम रमणीय आहे. परम सुंदर आहे. तें निर्दोष, गुणसंपन्न आणि अलंकृत आहे. "निर्दोषं हि समं ब्रह्म."

## ७८३. लोकसारंग

लोकानां सारं लोकसारं आत्मलोकं गच्छति गमयति वा इति लोकसारंगः। स्वर्गादि सर्वलोकांचा

सार तो लोकसार म्हणावयाचा. अर्थात् आत्मलोक, मोक्ष. त्याला जो जातो वा पोंचवतो तो म्हणावयाचा लोकसारंग. ही व्युत्पत्ति ठीकच आहे. परंतु ती कृत्रिम वाटते. सारंग हा शब्द तुरंग, कुरंग प्लवंग, पतंग, तरंग यांच्या प्रकाराचा वा गणांतला आहे हें उघड आहे. तुरं कुरं प्लवं पतं तरं हीं अव्ययें गमन-शैलीचीं वाचक आहेत. घोडा हरिण वानर पक्षी जललहरी यांच्या विशिष्ट गमन-शैलीला तीं क्रियाविशेषणरूप अव्ययें योजिलेलीं आहेत. सारं हें क्रियाविशेषण हि तसेंच आहे. सारंग म्हणजे काळवीट. तो कुंपणें मोडून व वागुरा तोडून जातो आणि आपला कळप हि सोबत घेऊन जातो. यासाठीं सर्व नेतृगुण लागतात "बुद्धि बल कौशल्य". सारं हें क्रियाविशेषण त्या तिहींचा हि समाहार करतें. काळवीट मोठा बुद्धिमान् असतो. तो पारध्यांचें कारस्थान ताडतो. त्यांनीं निर्माण केलेले अडथळे मोडतो, जाळीं तोडतो. ते सर्व अंतराय अंगच्या बळानें उल्लंघून जातो. तो किती उंच व लांब उडी घेतो! आणि अशा उड्या घेत पाहतां पाहतां निसटून जातो. पारध्यांना तो चकवतो आणि आपला कळप सुखरूप घेऊन जातो. परमात्मा हि तसा सारंग आहे. तो या लोकांतून पुण्यापुण्य गतींच्या कोंडींतून नि जाळ्यांतून स्वतः सफाईनें निसटतो आणि आपल्या भक्तगणांना हि बचावून नेतो. तेव्हां "लोके सारंगवत् वर्तते इति लोक-सारंगः" अशी होईल या पदाची स्वाभाविक व्युत्पत्ति.

## ७८४. सुतन्तु

"सु शोभनः तन्तुर् यस्य सः सुतन्तुः" ज्याचा तन्तु म्हणजे धागा चांगला आहे तो सुतन्तु म्हणावयाचा. सुतन्तु आणि तन्तुवर्धन हीं दोन नामें कापूस आणि कांतणें यांचें स्मरण करूण देणारीं आहेत. कापूस हें उपादान म्हणजे कच्चा माल होय. तन्तुवर्धन ही क्रिया आहे आणि तिचा कर्ताहि. परमात्मा हा या विश्वाचें उपादान कारण हि आहे आणि निमित्त कारणहि आहे कोळ्याप्रमाणें. कोळी जसा आपल्याच मुखरसापासून तंतु निर्माण करतो, त्याचें जाळें विणतो आणि तें परत गिळून टाकतो. त्या प्रमाणें परमात्मा कल्पारंभीं हें सृष्टिरूप सूत कांततो. कल्पभर त्याचें हें वैचित्र्यपूर्ण विश्व विणत राहतो. आणि कल्पान्तीं तें सबंध तो गुंडाळून घेतो. हा सबंध विचार सुतन्तु आणि तन्तुवर्धन या दोन नामांत सांठवला आहे. अति प्राचीन काळींच वस्त्रविद्येचा मानवाला शोध लागला आहे. आणि त्या परिभाषेंत त्यानें तत्त्वज्ञान रचलें आहे. सूत्र शब्द आज धागा या अर्थानें नामशेष होऊन तत्त्वविचार या लाक्षणिक अर्थानेंच अधिक प्रचलित आहे. सूत्र म्हटल्यांबरोबर कल्पसूत्रें, ब्रह्मसूत्रें, व्याकरण-न्यायादि सूत्रें डोळ्यांसमोर उभीं राहतात; सुताचा धागा डोळ्यासमोर येत नाहीं. समवाय संबंध सांगावयाचा झाला म्हणजे तंतुपटाचा दृष्टान्त आलाच. असें हें सूत्र तत्त्वज्ञानमय झालें आहे. त्यामुळें सुतन्तु आणि तन्तुवर्धन हे शब्द हि लूतावाचक न राहतां ते परमात्मवाचक बनले आहेत. या सृष्टीचें सर्व कारण तो परमात्मा सुतन्तु म्हणजे सुंदर सूत कांतून त्याचा ताणा करणारा झाला आहे. सुंदर सृष्टिरूप हा विस्तार त्या परमात्म्याचा आहे. म्हणून तो म्हटला आहे सुतन्तु.

## ७८५. तन्तु-वर्धन

तन्तुं वर्धयति छेदति इति तन्तु वर्धनः। जो तन्तु वाढवतो म्हणजे छेदतो तो म्हणावयाचा तन्तुवर्धन. विश्लेषण वा व्यूहन आणि संश्लेषण वा समूहन ही एकाच प्रक्रियेचीं दोन अंगें आहेत. दोन्ही मिळून एक प्रक्रिया संपूर्ण होते. सुतन्तु पदानें व्यूहन आणि तन्तुवर्धन पदानें परिसमूहन निर्देशिलें गेलें आहे. अव्यक्तांतून हा सर्व व्यक्ताकार प्रकटून परत त्या अव्यक्तांतच जेव्हां तो विलीन होतो तेव्हां सृष्टि-

प्रक्रियेचें एक चक्र वा मंडळ पूर्ण होतें. कालौघांत ज्या प्रमाणें संवत्सरामागून संवत्सरें, कालचक्राचीं हीं मंडळें, होत राहतात त्या प्रमाणें विश्वविसर्गाच्या अनाद्यनन्त प्रवाहांत जगदुत्पत्तिस्थितिलयाचीं हीं मंडळें सारखीं चाललींच आहेत. परमात्म्याचें हें विश्वरूप जे ओळखतात ते कोणत्या हि परिस्थितींत गडबडून जात नाहींत. ''सर्गेऽपि नोपजायन्ते प्रलये न व्यथन्ति च'' 'जगें येवोत जावोत ते अभंग जसे तसे.' हें सर्व विश्व पुसून टाकलें जाणार आहे. हें ज्यांना पुरतें कळलें आहे ते अधर्मानें अभिभूत होऊन असत्य व हिंसा ह्यांचा आश्रय करीत नाहींत आणि लोभमूलक पापें आचरून स्वपरद्रोह करीत नाहींत. सर्व तत्त्वज्ञानाचें पर्यवसान हेंच आहे. तत्त्वज्ञान म्हणजे सत्यज्ञान. रज्जूसर्पाचें तत्त्वतः ज्ञान झालें, सत्य ज्ञान झालें म्हणजे माणूस त्या रज्जूला रज्जू म्हणून ओळखतो आणि सर्पभयांतून मुक्त होतो. सर्पभयांतून मुक्त असल्यामुळें तो भयभीताप्रमाणें पळापळ वा हाणामारी करीत नाहीं. ही निर्भय समत्वयुक्त आत्मवशता तत्त्वज्ञानाचा म्हणजे सत्यज्ञानाचा परिणाम आहे. हें तत्त्व-ज्ञान नसल्यामुळें जगांत सर्व गोंधळ उडाला आहे. आणि तत्त्वज्ञानावांचून तो नाहींसा होणें नाहीं. वेदोनिषदांचा नि गीतेचा म्हणजेच वेदान्ताचा हा डिण्डिम आहे.

### ७८६. इन्द्रकर्मा

इन्द्रस्य कर्माण्येव कर्माणि यस्य सः इन्द्रकर्मा। इन्द्राचीं कर्मेंच ज्याचे पराक्रम होत तो इन्द्रकर्मा म्हणावयाचा. वेदांत इन्द्र हें परमात्म्याचें नांव आहे. तिथें इन्द्र म्हणजे कोणी लहानमोठी देवता असा अर्थ नाहीं. तो पौराणिक इन्द्र मागाहून आलेला आहे. इन्द्रानें, परमात्म्यानें, कोणकोणते पराक्रम केले आहेत? त्याचा सर्वांत मोठा पराक्रम म्हणजे गाईंना कोंडून ठेवणाऱ्या वृत्राचा नाश करून त्यानें त्यांना मुक्त केलें हा. हा पराक्रम आध्यात्मिक, आधिदैविक आणि अधिभौतिक अशा त्रिविध रूपांत वर्णिला जाईल. ज्या मोहावरणामुळें मनुष्याच्या आत्मिक शक्ति कोंडून पडल्या आहेत त्याचा भेद करणें हा इन्द्राचा खरा पराक्रम. आत्मज्ञानानेंच मोहावरणघात होतो. हें आत्मज्ञान बाहेरून कुठून होत नाहीं. तें अन्तरात्म्यांतून येतें. म्हणून तो सर्वान्तर्यामी इन्द्र वृत्रघ्न म्हटला आहे. हा इन्द्र वृत्राचा नाश करतो, तसा खोट्या साधकांना हि तो कोल्ह्याकुत्र्यांचें भक्ष्य बनवतो. बाह्य देखाव्यानें आत्मज्ञान सिद्ध होत नाहीं. ''चित्रीं सूर्यबिंब काढूं येईल चांग। प्रकाशाचें अंग काढितां नये। संन्यासाचें सोंग आणूं येईल चांग। वैराग्याचें अंग आणितां नये। ब्रह्मज्ञानमुखें बोलूं येईल चांग। अनुभवाचें अंग आणितां नये। ज्ञानदेव म्हणे गुरुकृपा चांग। तरी चि हें भाग्य येईल हाता।।'' अंगीं बाणलेल्या पूर्ण वैराग्यानेंच तें सिद्ध होतें. हें विषयवैराग्य निर्मोहतेचा सहज परिणाम होय. पुनः निर्मोहता स्वच्छ आत्मज्ञानाचा अनपहार्य असा अवश्यंभावी परिणाम होय. याचें बाह्य अनुकरण करतां येत नाहीं. तथापि तळमळीच्या प्रयत्नांत असिद्धीची विरहव्यथा असते. ढोंगांत सिद्धि नसतेच पण तळमळ हि नसते अशा ढोंग्यांची तो इन्द्र, तो परमात्मा कृमि, विष्ठा आणि भस्म अशी त्रिविध गति करतो. आधिदैविक अर्थानें इन्द्र, सूर्यात्मा इन्द्र, ध्रुवप्रदेशांत सुमारें दोन महिन्यांच्या सुदीर्घ रात्रीच्या कोंडवाड्यांतून किरणांना घेऊन येतो. आधिभौतिक वा ऐतिहासिक दृष्टीनें आर्यांचा नरेन्द्र असुर वृत्रावर विजय मिळवून आपलें राजेन्द्रत्व प्रस्थापित करतो. अशा प्रकारें कोणत्याहि दृष्टीनें पहा परमात्मा हा इन्द्रकर्मा आहे.

### ७८७. महाकर्मा

महान्ति कर्माणि यस्य सः महाकर्मा। महान् आहे कर्म ज्याचें तो म्हणावयाचा महाकर्मा. कोणी

कितीहि मोठा असो आणि त्यानें कितीहि अचाट पराक्रम केलेले असोत, तो आपण च हें जग निर्माण केलें आहे अशी बढाई मारूं शकणार नाहीं. अथवा या जगाचा प्रतिपाळ आपणच करतो आहों असाहि दावा करूं शकणार नाहीं. अथवा या जगाचा संहार आपणच करणार आहों असें हि म्हणूं शकणार नाहीं. असें बोलणें दूर, पण तसें मनांत हि आणणें कोणाला शक्य होणार नाहीं. मग महान् कर्म कुणाचें? तें ज्याचें आहे तोच ईश्वर. तोच महाकर्मा म्हणावयाचा. 'नर करनी करे तो नरका नारायण हो जाय' अशी म्हण आहे. पण हा नराचा नारायण झाला तरी तो जगदुत्पत्तिस्थितिलय करण्याचें सामर्थ्य नाहीं राखीत. तें ईश्वराचें राखीव खातें आहे. तिथें जीवाचा प्रवेश नाहीं. त्याला जगद्-व्यापार वर्ज्य आहे. शत क्रतु करून कोणी इन्द्र झाला, तरी त्यानें इन्द्राणीची अभिलाषा धरायची नाहीं. तशी ती धरणें म्हणजे पतन पावणें होय. जगद्व्यापाराची अभिलाषा तशीच आहे. तें महाकर्म आहे. तें ईश्वरी कर्म आहे. जीवाला तिथें प्रवेश नाहीं. अधिकार नाहीं. कर्तुं अकर्तुं अन्यथाकर्तुं सामर्थ्य ज्याचें, तो ईश्वर होय. म्हणून हि तो महाकर्मा म्हणावयाचा. जीवाला झोप म्हटल्याबरोबर झोपतां येत नाहीं. झोपूं नको म्हटलें तर अनावर झोप आवरतां येत नाहीं. वृद्धाचा तरुण बाल होतां येत नाहीं. पण ईश्वर काय करूं शकत नाहीं? 'देव करी तरी काय न होई। दगडाचेनि नई तरिजेल'' म्हणून तो महाकर्मा. अवतारांच्या चरित्रांत ज्या अद्भुत गोष्टी आहेत त्या परमेश्वराचें हें महाकर्मत्व प्रकट करण्यासाठींच होत.

## ७८८. कृतकर्मा

'इन्द्रकर्मा महाकर्मा' ही जशी नामांची एक जोडी आहे तशीच ''कृतकर्मा कृतागमः'' ही हि एक जोडीच आहे. इन्द्र म्हणजे त्या त्या वर्गांतील ज्येष्ठ श्रेष्ठ पुरुष. देवेन्द्र नरेन्द्र असुरेन्द्र गजेन्द्र कपीन्द्र इत्यादि पदांत इन्द्रपद त्या अर्थानें आलेलें आहे. इन्द्र हा निरुपपद प्रयोग सर्वेन्द्रत्व सुचवितो, थोरपण सुचवितो. थोरांचीं कर्में करणारा तो इन्द्रकर्मा तसा थोर थोर कर्में करणारा तो महाकर्मा म्हटला आहे. इथें ''कृतकर्मा कृतागमः'' या ज़ोडींत जीवनसाफल्याचीं दोन अंगें, संस्कार आणि शास्त्रज्ञान, सुचविलीं आहेत. संस्कारपूत जीवनांत जीवनाचें रहस्य आकळूं लागतें. आणि जेव्हां तें रहस्य गुरुमुखानें आत्मप्रत्ययानें त्याला अवगत होतें तेव्हांच तो कृतागम होतो, गृहीतागम होतो. वर्णाश्रमधर्माचें हें तात्पर्य आहे. खनिजावर संस्कार केले म्हणजे तें निजरूपानें सिद्ध होतें. चित्तत्त्व जें जीवखाणींतून लाभलें आहे तें हि तसेंच संस्कृत केलें म्हणजे सर्व विजातीय उपाधिरूप हीण जळून जाऊन निखळ स्वरूपानें सिद्ध होतें. हे संस्कार दोन प्रकारचे आहेत : १. कर्मप्रधान आणि २. ज्ञानप्रधान. कर्मप्रधान प्राथमिक वा पूर्व संस्कार होत, ज्ञानप्रधान अन्तिम वा उत्तर संस्कार होत. शरीर आणि शरीरी यांच्या अनुषंगानेंच हा द्विविध भेद झाला आहे. वस्तुतः ते दोन्ही परिणामतः एकच आहेत. तेव्हां कृतकर्मा म्हणजे ज्यानें वेदविहित सर्व वर्णाश्रम-संस्कार संपादिले आहेत असा. शास्त्रानें सोळा संस्कार सांगितले आहेत. आत्मचन्द्राचें सौन्दर्य सोळा हि कलांनीं प्रकटावें असा सोळा संस्कारांचा उद्देश आहे. सोळा संख्या तशी लाक्षणिकच म्हटली पाहिजे. दोषापनयन आणि गुणप्रकाशन हें संस्कारांचें द्विविध प्रयोजन आहे. संस्कारांनीं गुणाधान होत नाहीं. गुण हे स्वाभाविक आहेत. संस्कारांनीं ते वीर्यवत्तर होतात. परमात्मा हा निर्दोष व सर्वसद्गुणसंपन्न असल्यामुळें तो सहजच कृतकर्मा आहे. जीवाला संस्कारांच्या योगें ती पदवी प्राप्त करून घ्यावयाची आहे.

## ७८९. कृतागम

कृतः संपादितः आगमः शास्त्रं येन सः कृतागमः। अथवा कृतः निर्मितः आगमः येन सः कृतागमः।

परमात्म्याला दोन्ही अर्थांनीं कृतागम म्हणावयाचें. कृत: म्हणजे अधीत: संपादित: हा अर्थ धात्वर्थाला सोडून वाटतो. कृत: निर्मित: हा अर्थ म्हणून घेणें योग्य असें वाटेल. तसा तो घेतां येतोच परंतु कृत: म्हणजे अधीत: संपादित: हा अर्थ हि योग्यच आहे. कारण कृ धातु हा सर्वार्थक आहे. सर्व धातु क्रियावाचक आहेत आणि क्रियामात्राचा कृ धातु वाचक आहे. त्यामुळें तो एक मूल धातु आहे. सर्व नामें हि धातुज आहेत. त्यामुळें त्यांचा बोध कार हें पद करतें. जसें ॐकार, होकार, नकार, देकार इत्यादि. तेव्हां कृतागम म्हणजे कृतशास्त्राधीति, ज्यानें शास्त्राचें अध्ययन केलें आहे तो. ज्यांनीं आपलें संपूर्ण जीवन संस्कारपूत केलें आहे त्यांच्या ठाईं शास्त्राध्ययनाची पात्रता येते. ज्याची नीट झोप झालेली नाहीं, ज्याचा प्रातर्विधि आटोपलेला नाहीं, ज्याचा प्रातराश झालेला नाहीं तो छात्र विद्याध्ययनास पात्र होत नाहीं विद्येचा रस त्याच्या पात्रांतून गळून जाईल. त्या प्रमाणें ज्याला सत्य आणि संयम या दोहोंचा यथेष्ट संस्कार नाहीं तो आगमास, ज्ञानास पात्र होत नाहीं. शास्त्रानें बुद्धीचे डोळे उघडतात. गुरुमुखी विद्येनें ह्या डोळ्यांत दृष्टि येते आणि आत्मप्रयत्नानें दर्शन होतें. यांनाच शास्त्र-प्रतीति गुरुप्रतीति आणि आत्मप्रतीति म्हणावयाचें. या तिहींचा समुच्चय म्हणजेच आगम होय. कारण तेव्हांच सम्यग्ज्ञानाचा आगम होतो, लाभ होतो. आणि हा लाभ म्हणजेच कृतकर्मता नि कृतागमता होय. कारण त्यानंतर कांहीं कर्तव्य रहात नाहीं. म्हणजेच कांहीं ज्ञातव्यहि रहात नाहीं. अर्थात् कांहींएक अनवाप्त वा अवाप्तव्य रहात नाहीं. तो कृतकृत्य होतो, तो सर्वविद् होतो.

### ७९०. उद्भव

उद्भवति भूतमात्रं अस्मात् इति उद्भव:। ज्याच्या पासून हें भूतमात्र उद्भूत होतें तो उद्भव म्हणावयाचा. भव, उद्भव, प्रभव, संभव इत्यादि भू धातूचीं कृदन्तें समानार्थकच आहेत. त्या सर्वांचा अर्थ उत्पत्ति वा उत्पत्ति-कारण असा आहे. गीतेच्या पुढील वचनांत आपल्याला तीं आढळून येतात. 'भवोऽभाव:' 'मृत्यु: सर्वहरश्चाहं उद्भवश्च भविष्यताम्' 'अहं सर्वस्य प्रभव:' 'संभव: सर्वभूतानां ततो भवति भारत' इत्यादि. 'मृत्यु: सर्वहरश्चाहं उद्भवश्च भविष्यताम्' या वचनांत परमात्मा हा सर्वांचा अंत तसा आरंभ म्हटला आहे. अंत जन्मलेल्याचा म्हणजे भूतांचा, आरंभ जन्मणाऱ्यांचा म्हणजे भावींचा. त्याला अनुसरून च आधीं मृत्यु आणि मग उद्भव पद आलें आहे. हा क्रम साभिप्राय आहे. जीवांच्या वा सत्वांच्या दोनच कोटी होतात: १. उत्पन्न झालेले म्हणजे भूत आणि २. उत्पन्न व्हावयाचे म्हणजे भविष्यत्. (या क्षणीं उत्पन्न होत असलेलें म्हणजे भवत् हें पाहतां पाहतां भूतसात् होऊन जातें. म्हणून तें भूतांत च गणलें आहे.) परमात्मा हा भूतांना मृत्युरूप आणि भविष्यतांना उद्भवरूप आहे. अशीं त्याचीं हीं द्विविध रूपें, परस्पर-विरुद्ध रूपें परस्पर-विरुद्ध दिसलीं तरी तीं एका अव्यक्त अक्षर परमात्म्याचींच होत. सर्व भूतें शेवटीं त्या अव्यक्तांतच लीन होतात. सर्व (व्यक्त) होणारें त्या अव्यक्तांतूनच उद्भूत होतें. म्हणून मृत्यु म्हटल्यानें भ्यायचें वा उद्भव म्हटल्यानें हरखायचें कारण नाहीं. या व्यक्तमध्य विश्वाचा आदि-अंत सदैव अव्यक्ताधीन च आहे.

उत् उत्तम: भव: जन्म यस्य स: उद्भव:। ज्याचा उत्तम आहे भव, मंगल आहे जन्म तो म्हणावयाचा उद्भव. अथवा उद्गत: निर्गत: भव: यस्य स: उद्भव:। ज्याचा भव उद्गत म्हणजे बाहेर पडला आहे, दूर झाला आहे. तो म्हणावयाचा उद्भव. शंकराचार्यांनीं ह्या दोन व्युत्पति दिल्या आहेत. परंतु त्यांचें खास प्रयोजन नाहीं. उद्भव पद जगदुद्भव म्हणून सरळ लागणारेंच आहे. मुद्दाम आडवाटेला जाण्याचें कारण नाहीं.

### ७९१. सुंदर

मृदु मृदुल, बहु बहुल, पृथु पृथुल तशीं मुख मुखर, सुंद सुन्दर, कुन्द कुन्दर हीं रूपें होत. दोन्ही समानार्थक आहेत. व्यक्षर पद विशेषण आहे तसें त्र्यक्षर पदहि विशेषणच आहे. पण ते अतिशय-वाचक आहे. मृदु म्हणजे मऊ, पण मृदुल म्हणजे खूपच मऊ अथवा मऊ मऊ. ल आणि र हे स्वार्थे प्रत्यय आहेत. स्वार्थे म्हणजे मूल अर्थानें आलेले, मूळच्या अर्थांत बदल न करणारे-जसे बाल बालक. क, र, ल हे स्वार्थ प्रत्यय मूल पदाच्या अर्थांत फरक करीत नसले तरी भावांत फरक करतात. बाल म्हणजे मुलगा व बालक म्हणजे हि मुलगाच, प्रौढ माणूस नव्हे. पण क प्रत्यय आत्मीयता, वात्सल्य इत्यादि भाव सुचवितो. राम तोच रामू, पण रामू पदांत वात्सल्य सूचित होतें, आत्मीयता सूचित होते. त्या प्रमाणें सुंद म्हणजे छान, तर सुन्दर म्हणजे छान-छान, अतिशय सुरेख,परम रमणीय. परमात्मा हा परम सुन्दर आहे. कारण त्याचें नाम रूप गुण कर्म सारेंच सुंदर आहे. जगांत असे निर्दोष परिपूर्ण सुन्दर कांहीं आढळत नाहीं. नांव सोनूबाई हातीं कथलाचा वाळा, अशीच स्थिति प्राय: आढळून येते. पण नाम हि सुन्दर नाहीं असे किती तरी लोक समाजांत आढळतात. दगड्या धोंड्या पुंज्या कचऱ्या लांडगे कोल्हे वनकुतरे बोकडे माकडे हीं कसलीं नांवें? सुंदर नांव ठेवणें तुमच्या हातचें आहे. त्याला पैसे पडत नाहींत, पण ती उच्च अभिरुचि पाहिजे ना! रूप देवाचें देणें आहे, पण जें रूप देवानें दिलें तें स्वच्छ प्रसन्न नीट नेटकें ठेवणें तुमच्या हातीं आहे. पण नाहीं, माणूस मलिन दुर्मुख गबाळ राहतो. गुण चांगले अंगीं बाणवून घेतां येतात. पण आळसानें अनास्थेनें माणूस वायां जातो. तो आळस अनाचार व्यसन आणि पाप यांच्या आहारीं जातो. कर्में पुण्य अशीं करतां येतात. पण तो पाप आचरून नरकाला जातो. अशा प्रकारें माणूस सुन्दर परमात्म्याचा द्रोह करून आनंदलोकाला मुकत असतो. जो सुंदराची उपासना करील तो सुंदरच होईल. नाम रूप गुण कर्म सुन्दर बनेल, सर्व सुंदर, परम सुंदर होईल.

### ७९२. सुन्द

सुंद आणि सुंदर एकार्थकच मानल्यानंतर सुन्द पदाचें विवेचन परत करायला नको. सुंदर शब्द सुंद+र असा बनला आहे असे आपण पाहिलें आहे. पण सुंद शब्द कसा बनला आहे? वैयाकरणांची पद्धति सर्व शब्द धातूंवरून व्युत्पादिण्याची असते. ते सुन्द् धातूवरून सुन्द: आणि सुन्दर: हीं पदें आलीं म्हणतील. परंतु सर्वच शब्द धातूवरूनच निष्पादिले आहेत असें म्हणणें सत्याला धरून होणार नाहीं. उदाहरणार्थ उच्चावच हा शब्द पाहिला तर तो उत् + च आणि अव +च अशा केवळ निपातांच्या गटांचा बनला आहे असें आढळून येईल. म्हणजे व्युत्पादन आणि निपातन अशा दोन्ही प्रकारांनीं वा त्यांच्या मिश्रणानें शब्द-सिद्धि होते असें म्हणावयाचें. इथें सुंद पदांत सु आणि द या दोन प्रतीकरूप अक्षरांनीं शब्दसिद्धि केली आहे. अनुस्वार द्वितीयेचा प्रत्यय आहे. पैकीं सु हा निपात व द हें धातुबीज होय. सुं सुखं ददाति इति सुन्द: जो सुख देतो तो सुंद. सुंदर वस्तूच्या दर्शनानें श्रवणानें स्पर्शानें आस्वादनानें वा अवघ्राणनानें जीवाला सुख होतें. इतकेंच नव्हे तर त्याच्या स्मरणानें हि जीव सुखावतो. म्हणजे ज्याची कल्पना हि सुखद आहे तें वस्तुत: किती सुंद म्हणावयाचें? सुंद हें नाम आज प्रचलित नाहीं. पण एके काळीं तें होतें. तिलोत्तमा आणि सुन्दोपसुन्द यांची पौराणिक कथा प्रसिद्धच आहे. तिलोत्तमेच्या सौंदर्यानें सुंद आणि उपसुंद यांना मरण हि गोड झालें. सौंदर्याची गोडी ही अशी अद्‌भुत आहे. मोरोपंत म्हणतात "सुन्दाची उपसुन्दीं उपसुन्दाची गदा पडे सुन्दीं। तन्मरण-मुदुद्धासें गणपतिच्या कळ नुठेल कां तुन्दीं ।।" सौंदर्याची

मीमांसा करणें, त्याचें विश्लेषण करणें सोपें नाहीं. त्याची व्याख्या करतां येत नाहीं. पण तिचें तात्पर्य सुंद पदाच्या 'सुखं ददाति इति सुन्दः' या व्युत्पत्तींत सांठलें आहे असें म्हणतां येईल. परमानन्द-रूप म्हणून परमात्मा उघडच सुन्द होय.

## ७९३. रत्ननाभ

पद्मनाभ पद प्रसिद्ध आहे तसें रत्ननाभ पद नाहीं. वस्तुतः पद्म वा रत्न कोणाच्या नाभीच्या ठाईं असत नाहीं. मग हीं पदें कोणत्या अर्थानें घ्यावयाचीं? नाभि पद योनि या अर्थानें घ्यावयाचें. योनि म्हणजे उत्पत्ति-हेतु. परमात्मा हा या लोकपद्माचा उत्पत्तिहेतु आहे. हें अष्टदल लोकपद्म त्या अव्यक्तगत अक्षरकंदापासून उगवलें आहे. म्हणून तो परमात्मा पद्मनाभ म्हटला आहे. तसाच तो रत्ननाभ आहे. रत्नमात्र त्या परमात्म्याच्या पासून आलें आहे. म्हणून तो रत्ननाभ म्हणावयाचा. पण रत्न म्हणजे काय? चमकदार लालहिरव्या गारगोट्या? नाहीं. रत्न म्हणजे धन. पण धन म्हणजे तरी काय? पिवळे ढवळे सोन्याचांदीचे दगड? नाहीं. धन म्हणजे जीवनोपाय. इसापाचा कोंबडा खरा रत्नपारखी. तो उकिरड्यावर सांपडलेलें रत्न लाथाडून दाणा टिपतो. परमात्मा हा सकल जीवनोपाय आहे. म्हणून तो रत्ननाभ म्हटला आहे. परमात्म्यानें हीं पंच महा भूतें जीवांच्या जीवनासाठीं निर्मिलीं आहेत. तींच महारत्नें होत. त्यांचा जीवनोपकारक उपयोग करून घेणेंच रत्नपारखीपणा होय. तसा तो न करतां तथाकथित रत्नांच्या, हिऱ्यामाणकांच्या व सोन्यारुप्यांच्या पाईं स्व-पर जीवनाचा द्रोह करणें म्हणजे गाजरपारखी-पणा होय. गाजरपारखीशब्द गाजराचा अपमान करणारा आहे. सोनेरी गाजर सत्वयुक्त असून तें जीवनदायी आहे, उलट हिराहिरकणी खाल्यास प्राणान्त होतो. पण गाजर शिळें होतें, विटतें, कुजतें, नाहींसें होतें. आणि तें खाऊन लाभणारें भौतिक जीवन हि तसेंच नश्वर असतें. रत्न असें नाहीं. तें टिकाऊ आहे. तसें जें आत्मतत्त्व त्याचें जें जीवन तें शाश्वत होय. तेंच खरें रत्न म्हणावयाचें आणि त्या चिरंतन जीवनाचा झरा आहे परमात्मा. म्हणून तो म्हटला आहे रत्ननाभ. ज्ञानदेव म्हणतात: "अमोलिक रत्न लाभलें रे तुज। कां रे ब्रह्मबीज नोळखसी। न फुटे न तुटे न भिये चोरा।। ते वस्तु चतुरा सेविजेसु।।

## ७९४. सुलोचन

सु शोभने लोचने अस्य इति सुलोचनः। सुंदर आहेत डोळे ज्याचे तो सुलोचन म्हणावयाचा. पाहणें हें डोळ्याचें कार्य. तें जो उत्तम करील तो सुलोचन म्हटला जाईल. जागृतींत आमचे डोळे सारखी उघडझाप करीत असतात. आणि निद्रेंत तर ते पार मिटलेले असतात. म्हणजे सतत ते पाहूं शकत नाहींच, पण त्यांच्या दृष्टीचा टप्पाहि फारच छोटा असतो. शिवाय जवळचें बरें, दूरचें अंधुक अंधुकच त्यांना दिसतें. निरनिराळ्या जीवांची दृक्शक्ति वेगळी वेगळी आहे. माणसाला जितकें लांबचें व स्वच्छ दिसतें त्यापेक्षां गृध्राला खूपच लांबचें व अगदीं स्पष्ट दिसतें. परंतु ही त्याची दृक्शक्ति कांहीं झालें तरी परिमितच आहे. परमात्म्याची दृक्शक्ति असीम आहे, अपरिमित आहे. तो तिन्ही लोक आणि तिन्ही काळ यांचा निरंतर साक्षी आहे आणि या सर्वसाक्षित्वाला अनुलक्षूनच त्याला सुलोचन म्हटलें आहे. परमात्म्याचें हें सर्वसाक्षित्व सूर्याच्या ठाईं दिसून येतें. तो तिन्ही लोक स्वर्लोक अन्तरिक्ष आणि भूलोक सारखा प्रकाशित करीत आहे. तोच काल प्रकाशित करीत होता, तोच आज करीत आहे, तोच उद्यां प्रकाशित करणार आहे. त्यानेंच मागील कल्पांत विश्वप्रकाशन केलें आहे. चालू कल्पांतहि तोच करीत आहे. आणि आगामी कल्पांत हि तोच करणार आहे. वेदानें म्हटलें आहे - "सूर्याचन्द्रमसौ धाता यथापूर्व

अकल्पयत्'' या सर्वसाक्षित्वामुळें तो भगवन्नेत्र झाला. आणि हें लक्षूनच कदाचित पुढील पद अर्क असें आलें आहे. पण हें सादृश्य आणि गौरव इथेंच संपतें. सूर्य सर्व विश्वाला प्रकाशित करीत असला तरी आपल्याला तो जाणत नाहीं म्हणून एक चित्सूर्य च सर्वसाक्षी होय. त्याला अज्ञात असें या सृष्टींत कधीं कांहीं घडूंच शकत नाहीं. म्हणून तो चिदात्मा सुलोचन होय.

## ७९५. अर्कः

अर्च्यते इति अर्कः । जो पूजनीयतम ब्रह्मादिकांकडून अर्चिला जातो तो म्हणावयाचा अर्क. परमात्मा हा सर्व देवनमस्कृत, सर्व लोकनमस्कृत होय, म्हणून तो अर्क म्हटला आहे. त्या परमात्म्याचा प्रतिनिधि म्हणून सूर्य हि अर्क म्हटला जातो. तो हि देवदेव आहे.

**'' यस्योदयास्तसमये**
**सुरमुकुट-निघृष्टचरणकमलोऽपि।**
**कुरुतेऽञ्जलिं त्रिनेत्रः**
**स जयति धाम्नां निधिः सूर्यः।।''**

ऋचांनीं अर्चिला तो अर्क. यजूंनीं यजिला तो यज्ञ आणि सामांनीं सामिला तो म्हणजे गाइला तो साम होय. तीन वेदांनीं स्तविलेल्या वेद-पुरुषाचीं हीं तीन नामें होत. अर्क हें त्यांत पहिलें आणि ऋग्विषय होय. ''ऋचांनीं अर्चिती ज्यास यजूंनीं यजिती जया।। सामें सामावलीं जेथ वेदरूपास त्या नमो।।'' असें जें वेदपुरुषाचें नमन महाभारतांत आलें आहे तें हि परमात्म्याचें ऋग्विषयत्व आणि अर्कत्व द्योतित करीत आहे. असा हा अर्क विश्वाच्या अन्तर्यामांत परमात्मरूपानें, अंतरिक्षांत सूर्य रूपानें आणि नेत्रांत नेत्रज्योतीरूपानें विराजमान आहे. यालाच ''हंसः शुचिसद् वसुरन्तरिक्षसद् आणि अतिथिर् दुरोणसद्'' म्हटलें आहे. तें जें अर्चनीयतम परमात्म-तेज आहे, ज्याला इथें अर्क म्हणून म्हटलें आहे, वेदसार गायत्रींत ज्याचें ध्यान करायला सांगितलें आहे, तोच निरभ्र आकाशांत प्रखर सूर्य-रूपानें, साभ्र आकाशांत सगर्जन विद्युद्रूपानें आणि घरीं यज्ञकुंडांत दिव्यांत वा चुलींत सधूम अग्निरूपानें वसला आहे. आम्ही जेव्हां जेव्हां भवन-भास्कर दिव्याला वा भुवनभास्कर सूर्याला नमस्कार करतों तेव्हां तो नमस्कार त्या अर्चनीयतम अर्काला परमात्म्याला असतो. ''सर्वदेव-नमस्कारस् तं अर्कं प्रतिगच्छति.''

## ७९६. वाजसन

वाजं अन्नं सनोति ददाति इति वाजसनः। जो अन्नदान करतो तो वाजसन म्हणावयाचा. कोणता हि यज्ञ असृष्टान्न होतां कामा नये. मन्त्रहीन आणि अन्नदानहीन यज्ञ तामस म्हटला आहे. मन्त्र म्हणजे देवाचें नाम होय. आणि दान म्हणजे देवाचें काम होय. या दोहोंनीं मिळून आस्तिकता होते. जो देवाचें नाम मात्र घेतो पण अन्नदान मात्र करीत नाहीं, तो भेटणाऱ्या भूतांत देवाला ओळखीत नाहीं हें उघड आहे. अशाला आस्तिक कसें म्हणावयाचें? म्हणून प्रत्येक धर्मांत म्हणजेच आस्तिक मतांत देवाच्या नामानें देवाचें काम हि झालें पाहिजे असा दण्डक आहे. कारण आस्तिकतेचें तें प्रत्यक्ष प्रमाण आहे. मंत्र वा नामग्रहण म्हणजे शाब्दिक प्रमाण होय. प्रत्यक्ष प्रमाण असल्यावर शाब्दिक प्रमाण देण्याची गरज मानलेली नाहीं. कोणी नैवेद्य वैश्वदेव श्राद्धतर्पण अतिथिअभ्यागत-पूजन करीत असल्यावर तो वैदिक आहे म्हणून नामोच्चार करावा लागत नाहीं. पण कोणी मन्त्रोच्चार करीत असला आणि यज्ञयाग श्राद्ध-तर्पण, दानधर्म कांहीं करीत नसला तर त्याला वैदिक वा आस्तिक केवळ मन्त्रोच्चारावरून वा नामोच्चारावरून मानतां येत नाहीं. त्यासाठीं दानधर्मरूप प्रत्यक्ष प्रमाण हवें. तेव्हां वाजसन हा आस्तिक होय आणि

अवाजसन हा नास्तिक म्हणावयाचा. त्यालाच वेदांनीं केवलादी म्हटलें आहे. ''मोघं अन्नं विन्दते अप्रचेताः, सत्यं ब्रवीमि वध दूत् स तस्य। नार्यमणं पुष्यति नो सखायं केवलाघो भवति केवलादी।। केवलादी म्हणजे आप्पलपोट्या. जो देवांना पितरांना आप्तेष्टांना अतिथि-अभ्यागतांना आणि भूतमात्राला उपेक्षून त्यांच्यांत आपल्या कमाईचा संविभाग न करतां केवळ आपलेंच पोट भरतो तो वास्तविक आत्मद्रोही होय. त्यालाच गीतेनें ''अघायुरिन्द्रिया-रामो मोघं पार्थ स जीवति'' म्हणून म्हटलें आहे. केवळ परार्थ जीवन हा उत्तम आदर्श होय. त्याचेंच नांव यज्ञ. त्या खालोखाल म्हणजे यज्ञशेष-ग्रहण करून जगणें म्हणजेच संविभज्य जीवन होय. असंविभज्य जीवन म्हणजे केवलादिता होय. हें निंद्य, अधम होय. आणि परद्रोह करून जगणें म्हणजे अधमाधम जीवन होय. अशी ही जीवनाची चतुर्विध स्थिति आहे. माणसानें निदान परद्रोह आणि आप्पलपोटेपणा न करतां जगायला शिकावें असें वाजसन पद सांगत आहे. हीच वाजसनेयी संहिता होय.

### ७९७. शृंगी

शृंगवान् तो शृंगी म्हणावयाचा. पण शृंगी आणि शृंगवान् या दोन पदांत इन् आणि मत् असे वेगवेगळे प्रत्यय आहेत. त्यांना अनुसरून कांहीं वेगळा भाव त्यांत असला पाहिजे. इन् प्रत्यय मुख्यतः जाति-वाचक आहे, तर मत् प्रत्यय व्यक्तिवाचक आहे. हस्ती म्हणजे ज्याला हस्त, सोंड असते असा प्राणी; हस्तवान् म्हणजे ज्याला विशेष कुशल हस्त आहेत असा कारागीर. म्हणजे इन् प्रत्यय नित्यत्व सुचवतो, तर मत् प्रत्यय गौरव सुचवितो असें म्हणावयाचें. तदनुसार शृंगी म्हणजे शृंगधर प्राणिवर्ग समजावयाचा. प्रत्येक प्राण्याला दैवानें कांहीं विशेष दिलेले आहेत. ते विशेष त्या प्राण्यांना शोभा हि देतात आणि गौरवहि देतात. शृंग हा तसाच एक विशेष आहे. त्यावरून च शृंगार शब्द आला आहे. शृंगार म्हणजे शृंगाकारच होय. शृंगाच्या योगें प्राणी नजरेंत भरतो. एडके, काळवीट, सांबर, बैल, गवे, म्हैसे, गेंडे यांचीं शिंगें किती सुंदर दिसतात. त्यांनीं शिकारी आपले दिवाणखाने सजवितात. वनजारी म्हणजे वनचारी लोकांत तर स्त्रिया, ज्या शृंगाराच्या शौकीन म्हणून सर्वत्रच प्रसिद्ध आहेत, केसांत एक शृंगसदृश काडीच खोवून घेतात आणि आपल्याला शृंगी बनवतात. पण शृंग हें केवळ भूषण नाहीं. तें शस्त्र हि आहे. म्हणून म्हटलें आहे:

**शृंगीणां च नखीनां च नदीनां शस्त्रपाणिनाम्।**
**विश्वासो नैव कर्तव्यः सद्यःप्राणहरा हि ते।।**

बैल शिंग केव्हां मारील त्याचा नेम नाहीं, म्हणून जपूनच रहावें. मांजर खेळत असलें तरी खेळतां खेळतां आपलीं वाघनखें काढून केव्हां ओरबाडील त्याचा नेम नाहीं. नदीचें पाणी चढून केव्हां गांव वाहून जाईल त्याचा हि भरवसा नाहीं. तसेंच शस्त्रधारी शिपाई केव्हां वरदळीवर येऊन मारील त्याचा हि नेम नसतो. म्हणून त्या सर्वांपासून फार जपूनच राहिलें पाहिजे, असा आशय. पण हा परमात्मा शृंगी म्हटला आहे तो प्राणहर म्हणून नव्हे, तर संरक्षक म्हणून होय. त्यानें प्रलय-पयोधिजलांत आपल्या शिंगाला बांधून मनूच्या तरणीचें तारण केलें, मनूला आणि वेदरूप प्राचीन ज्ञानाला प्रलयांतून वांचवलें म्हणून तो शृंगी म्हणून स्मरला आहे. एरव्हीं हि वैशिष्ट्यरूप त्याचीं शिंगें असंख्यच आहेत. म्हणून हि तो शृंगी होय.

### ७९८. जयन्त

जी जय् धातूपासून वर्तमानकालवाचक कृदन्त होतें जयत्, मग हें जयन्त कसें? त्याचें पुंल्लिंग प्रथमा बहुवचनाचें रूप आहे तें. तेंच एकवचनाचें कल्पिलें आहे. मराठींत भगवान् आणि भगवन्त, श्रीमान् आणि

श्रीमंत अशीं दोन्ही नामें चालत आहेत त्याच प्रमाणें हें संस्कृतमध्यें हि आहे. या सारखाच दुसरा शब्द सन्त हा आहे. भगवान् श्रीमान् सन् हे प्रथमेचे एकवचनी शब्द प्रायः विशेषणें होत आणि भगवन्त श्रीमन्त सन्त हे शब्द नामें होत. तसाच प्रकार जयन् म्हणजे जिंकता आणि जयन्त म्हणजे नित्यजयशील या शब्दांबाबत हि दिसतो. जयन्त सन्त हीं पदें प्रथमा एकवचनाचीं म्हणून आलीं आहेत, त्यांची व्यवस्था व्याकरण मग कशी का लावीना. व्याकरण हें प्रयोगशरणच आहे. तसा भाषाप्रयोग व्याकरण-शरण नाहीं. तो स्वतंत्र आहे. भाषेचें हें तन्त्र शोधून त्याची व्यवस्था व्याकरण लावत असतें. शिवाय गच्छन्ती हसन्ती जयन्ती इत्यादि ईकारान्त स्त्रीलिंगी रूपें गच्छन्त हसन्त जयन्त अशी पुल्लिंगी पदांची अपेक्षा करतात, असें म्हणतां येईल. वसन्त, हेमन्त हे शब्द हि तसेच आहेत. श्रीमन्त भगवन्त हे शब्द ''मत्-वत्'' प्रत्ययान्त आहेत तसे हे नाहींत. ते शत्रन्तच आहेत. ही झाली शब्द-चिकित्सा. अर्थ सरळ आहे. जो नित्य जयशील आहे तो म्हणावयाचा जयन्त. जो आधीं प्रतिपक्ष कल्पितो, त्यामुळें द्वंद्व वा प्रतिकार कल्पितो, आणि त्यांत प्रतिपक्ष-पराभव-पूर्वक जय मिळवितो तो भलें विजयी म्हणवो. परंतु तो जयन्त नव्हे. जयन्त हा सहज जयवन्त आहे. त्याला कोणी परका नाहीं. सर्व तोच आहे. त्यामुळें त्या अद्वितीयाला कुणाचें व कशाचें हि भय नाहीं आणि असें असल्यामुळें तो परमात्मा जयन्त म्हटला आहे. जयन्ताचे भक्त हि जयन्त होत. ते म्हणतात ''नहि कोई बैरी नहि बेगाना सकलसंग हमरी बनी आई। जो प्रभु किन्हो सो भल मान्यो यह सुमति साधुते पाई।'' आणि ह्यामुळें ते हि जयन्त झाले.

## ७९९. सर्वविद् (जयी)-१

सर्वविद् जयी अशीं दोन पदें न घेतां तें एक जोडनाम कल्पिलें आहे सहस्रसंख्या-निर्वाहा-करितां. पण सहस्र संख्येचा इतका बाऊ करण्याचें कारण नाहीं. शेंकडे जर १०५, १०८, ११४, १२० असे शतातिरिक्त होऊं शकतात, तर सहस्रहि सहस्रातिरिक्त व्हायला हरकत कोणती? चार आठ नामांच्या आधिक्यानें सहस्रत्व भंगण्याचें कारण नाहीं. अशी दृष्टि ठेवली म्हणजे ''सर्वविज्जयी'' असलीं अनर्थक नव्हे पण असंबद्ध जोडनामें कल्पिण्याचें कारण राहणार नाहीं. सृष्टि महोदार आहे. तींत मोजलेमापलेपणाची कुंजूषी नाहीं. ती अमितं-द आहे. पारिजाताचीं स्वर्गीय फुलें म्हणजे तारे किती आहेत, त्याची मोजदाद नाहीं. तशींच त्याचीं अतिस्वर्ग म्हणजे भौम फुलें किती येतात नि किती गळतात त्यांची हि गणति नाहीं. अशी ही प्रतिभेची लीला आहे. तिथें संख्याबन्धन नाहीं. सहस्राला तसेंच संख्येचें बन्धन नाहीं, केवळ निबन्धन. आहे. म्हणून सर्वविद् आणि जयी हीं दोन स्वतंत्र पदें घ्यायला कांहींच हरकत नाहीं. तशीं घेतल्यास ''सर्वं वेत्ति विन्दते वा इति सर्वविद्'', आणि ''जयवान् इति जयी'' असें त्यांचें व्युत्पादन होईल. परमात्मा चिद्रूप असल्यामुळें सर्ववेत्ता आहे आणि ज्ञानाधीन च सर्व संपादन असल्यामुळें आणि ज्ञानपर्यवसायीच असल्यामुळें सर्ववित्त हि तोच आहे. अशा प्रकारें तो वेत्ति विन्दते या उभय अर्थानें एकसमयावच्छेदें करून सर्वविद् आहे. आणि त्यामुळेंच तो जयी हि आहे. ज्ञानावांचून संपादन नाहींच आणि संपादनीय हि नाहींच. त्यामुळें ज्ञानावांचून इतर कांहीं जो संपादील तो मुळीं जयी नव्हे. कारण जयी म्हणजे वस्तु-जयी, शून्यजयी नव्हे.

## ७९९. (सर्वविद्) जयी-२

सर्वविद् आणि जयी हीं दोन नामें आपापतः असंबद्धशीं वाटतात. आणि म्हणून तीं वेगळीं वेगळीं घ्यावीं असें म्हटलें. पण जरा अधिक खोल पाहतां या जोडनामांत सामाजिक संबंध दिसून येतो. आणि त्या दृष्टीनें तीं नामें सुसंबद्धच होत. चतुर्वर्णबद्ध

समाजांत ब्राह्मण आणि क्षत्रिय यांचें वरिष्ठत्व आहे. आणि त्याचा संकेत सर्वविद् आणि जयी हीं पदें करीत आहेत. ज्ञान हें ब्राह्मणाचें लक्ष्य तर दिग्विजय हें क्षत्रियाचें लक्ष्य. तीं दोन्ही संपादणारे सर्वज्ञ ब्राह्मण आणि चक्रवर्ती राजे हे परमेश्वरी आविर्भाव होत. कारण परमात्मा हाच परिभू आहे. त्यानें सर्व कवळिलेलें आहे. त्याच्या अधीनच हें सर्व कांहीं आहे. त्याचें ज्ञान सर्वातिशायी आहे, त्याचें बल सर्वातिशायी आहे. परमात्म्याचें ज्ञान आणि बल सर्वातिरिक्त सर्वंकष असलें तरी तें विभक्त नाहीं. तें एकवटलें आहे. आणि हेंच रहस्य हें जोडनाम सांगत आहे. समाजांत हि जोंवर ज्ञानाधीन बल राहतें आणि बलयुक्त ज्ञान राहतें तोंवरच जय असतो. जेव्हां राजसत्ता धर्मज्ञानाची अवज्ञा करते तेव्हां ती आसुरी होऊन स्वक्षयासच कारण होते. जेव्हां ज्ञान समाज-नियन्त्रणतन्त्रस्वरूप राजसत्तेची उपेक्षा करतें तेव्हां तें अरण्यरुदन ठरतें. व्यासांना म्हणावें लागतें: ''ऊर्ध्वबाहुर् विरौम्येष, नच कश्चित् शृणोति माम्। धर्माद् अर्थश्च कामश्च स धर्मः किं न सेव्यते।।'' ज्ञानावर रडायची व सत्तेवर उन्मत्त होऊन स्वक्षय करून घ्यायची पाळी येऊं नये म्हणून दोहोंचा समुच्चय पाहिजे, समन्वय पाहिजे, असें हें जोडनाम सुचवीत आहे. खरें म्हणजे ज्ञान बल पोषण आणि परिचर्या या चारी तत्त्वांचें सत्कारपूर्वक सम्यक् सेवनच कल्याणप्रद आहे. एकाची हि उपेक्षा असुखावहच होय. संतुलन पाहिजे तेंच तारक. प्रस्तुत मुख्य विचार हा कीं समाजनियंत्रणाचें आभ्यंतर व बाह्य तंत्र, ज्ञान व शासन यांपैकीं एकाची हि उपेक्षा होतां कामा नये. आणि तीं परस्परपूरक असावीं किंवा असलीं पाहिजेत. ज्ञान सत्ताधिकारी पाहिजे, सत्ता ज्ञानाधीन पाहिजे, तरच 'जय जगत्' होणार.

### ८००. सुवर्ण-बिन्दु

सुवर्ण-बिन्दु हें आठशेवें नाम गणलें आहे. परंतु इथून नवीन श्लोक सुरू होत आहे. नवीन श्लोकापासून नवीन शतक गणतां आल्यास चांगलें. प्रत्येक शतक नवीन श्लोकानें सुरू होऊन श्लोकसमाप्तीबरोबरच तें संपेल अशी रचना वा गणना करतां आल्यास ती सुरूप होईल. पण ही दशशतक-रचना नसून एक सहस्ररचना असल्यामुळें शतकांचे असे सर्ग इथें पडत नाहींत. त्यामुळें शतक मधूनच सुरू होऊन मध्येंच समाप्त होतें. सुवर्ण-बिन्दु आणि अक्षोभ्य हीं दोन नामें क्रमानें आलीं आहेत. हा क्रम साभिप्राय दिसतो. बिन्दुपदाच्या विरोधानें नव्हे तर पार्थक्यानें सिन्धुवाची अक्षोभ्य पद आलें आहे. बिन्दु तरल आहे तर सिन्धु अचलप्रतिष्ठ आहे. पण इथें तर हा बिन्दु सुवर्ण म्हटला आहे. आणि सुवर्ण तर आहे एक घनिष्ठ द्रव्य. परमात्मा हा सुवर्णबिन्दु म्हटला आहे. त्यांत सुवर्णानें त्याचें आकर्षकत्व आणि बिन्दूनें त्याचें सूक्ष्मत्व द्योतित केलें आहे. योगी एकाग्रतेसाठीं बिन्दुध्यान करतात, नादानुसंधात करतात. नयन-मनोयोगपूर्वक करावयाच्या ध्यानाचें आलंबन तो बिन्दु होय. हा बिन्दु परमात्मस्वरूपच होय: तो स्थूलांतून सूक्ष्मांत, सुक्ष्मांतून अव्यक्तांत, अव्यक्तांतून निर्गुणांत योग्याला वाहून त्या परमात्मसंज्ञक अमृत-सिन्धूंत नेऊन सोडतो. बिन्दूचें हें बिन्दुत्व होय, तरलत्व होय, प्रवाहित्व होय. या बिन्दूच्या साहाय्यानें योगी सिन्धु गांठतो त्यामुळें तो बिन्दु त्याला सोन्यासारखा किंमती वाटल्यास नवल काय? त्याला त्यानें सुवर्ण बिन्दु म्हणणें युक्तच आहे.

## शतक नववें

### ८०१. अक्षोभ्य

न क्षोभ्यः अक्षोभ्यः। जो मुळीं क्षोभच पावत नाहीं तो म्हणावयाचा अक्षोभ्य. सामान्यतः शान्तीला अक्षोभ्य हें विशेषण जोडलें जातें. कित्येक लोक उथळ असतात. थोड्याशा कारणानें ते क्षुब्ध होतात आणि परत लवकरच शान्त हि होऊन जातात. दुसरे कांहीं गंभीर असतात. ते सहसा

क्षुब्ध होत नाहींत. याहून हि एक तिसरी कोटी आहे. त्या पराकोटीचे लोक मुळीं कधीं क्षोभच पावत नाहींत. पहिले क्षुद्र जलाशयासारखे, दुसरे समुद्रासारखे तर तिसरे आकाशा सारखे म्हणावयाचे. परमात्मा हा तिसऱ्या कोटीचा. सृष्टीच्या सर्गप्रलयांचा यत्किंचित् हि परिणाम होऊं शकत नाहीं त्यावर. ''जगें येवोत जावोत तो अभंग जसा तसा'' असतो. याच लक्षणाला अनुसरूच ''अक्षरं ब्रह्म परमम्'' ''निर्दोषं हि समं ब्रह्म''. इत्यादि वचनें आलीं आहेत. जो मुळीं क्षोभच पावत नाहीं त्याला शान्त म्हणणें म्हणजे त्यावर आधीं अशान्तीचा आरोप करण्यासारखेंच होय. म्हणून परमात्म्याला शान्त म्हणण्याऐवजीं अक्षोभ्य म्हटलें आहे. तो अक्षुब्ध हि म्हटला नाहीं. कारण समुद्र हा अक्षुब्ध दिसला तरी तो प्रलय काळीं प्रक्षुब्ध होतो. एरव्हीं हि तो क्षुब्धच असतो, पण त्याच्या सखोलतेमुळें व विशालतेमुळें तसें दिसत नाहीं इतकेंच. म्हणजे तो क्षोभ्य आहे. पण परमात्मा हा मुळीं क्षोभ पावणेंच शक्य नाहीं. म्हणून तो अक्षोभ्य म्हणावयाचा. तो अविकार शान्त म्हणजेच निर्दोष सम असतो. त्याच्या साम्यांत, त्याच्या सहज स्थितींत केव्हां हि चलबिचल व्हावयाची नाहीं; त्याच्या आंत हि नाहीं आणि बाहेर हि नाहीं. कारण त्याला मुळीं आंत बाहेरच नाहीं. तो 'पाठ ना पोट अवघा निघोट' आहे.

### ८०२. सर्ववागीश्वरेश्वरः

सर्वेषां वागीश्वराणां ईश्वरः सर्ववागीश्वरेश्वरः। जो समस्त वाक्पतींचा पति तो म्हणावयाचा सर्ववागीश्वरेश्वर. वाणी चार मानिल्या आहेत. परा पश्यन्ती मध्यमा आणि वैखरी. आपले सर्व व्यवहार वैखरीनें चाललेले असतात. अर्थात् वैखरी म्हणजे व्यक्त वाणी. या व्यक्त वाणीचे भेद असंख्यच आहेत. त्यांपैकीं एक म्हणजे आपली मातृभाषा. तिच्या व्याकरणावर व शब्दसंपत्तीवर आणि तद्द्वारा साहित्यावर ज्याचें प्रभुत्व असेल त्याला वाक्प्रभु म्हणतां येईल. असे वाक्प्रभु हे गौरवानेंच वाक्प्रभु म्हणावयाचे. कारण वैखरी च्या अंशांशाचेच ते प्रभु असतात. पुनः वैखरी ही वाणीचा एक पाद होय. तिचे तीन पाद तर निगूढच राहतात. म्हणून अन्वर्थकतेनें वागीश्वर कोणी विरळाच म्हणावा लागेल. तो कोण? विचार उच्चार आणि आचार हे आत्मप्रकाशनाचे उत्तरोत्तर स्थूल प्रकार आहेत. या तिहींवर हि ज्याचें पूर्ण प्रभुत्व आहे तोच वागीश्वर म्हणावयाचा. या तिन्ही विधांत आत्मनिष्ठारूप वा सत्यनिष्ठारूप एकता ज्यानें संपादिली तो वागीश्वर. तो सत्याचा विचार करतो, सत्याचा उच्चार करतो, सत्याचाच आचार करतो. मनानें असत्याचें चिंतन, वाणीनें असत्याचें उच्चारण आणि देहानें असत्याचें आचरण त्याच्याकडून होत नाहीं. असे जे वागीश्वर त्या सर्वांचा ईश्वर तो अव्यक्त अक्षर परमात्मा होय. कारण त्याच्याच आधारानें मन चिन्तन करीत असते, वाणी उच्चारण करीत असते आणि देह आचारण करीत असतो. ''केनेषितं पतति प्रेषितं मनः, केन प्राणः प्रथमः प्रैति युक्तः। केनेषितां वाचमिमां वदन्ति, चक्षुः श्रोत्रं कउ देवो युनक्ति।।'' परा पश्यन्ती मध्यमा आणि वैखरी अथवा मन प्राण वाणी आणि इन्द्रियें यांचा प्रेरक व नियन्ता तो परमात्मा आहे. म्हणून तो सर्ववागीश्वरेश्वर म्हटला आहे. परा व पश्यन्ती अथवा मन व प्राण हे अन्तर्गत आहेत. मध्यमा व वैखरी अथवा वाणी आणि इन्द्रियें बहिर्गत आहेत.

### ८०३. महाह्रद

महांश् च असौ ह्रदश् च महाह्रदः। जो मोठा असून ह्रद आहे तो महाह्रद म्हणावयाचा. ह्रद म्हणजे डोह. मराठी डोह शब्द हि संस्कृत ह्रद वरूनच वर्ण-व्यत्यासानें आलेला आहे.

महाह्रद पदापासून सुरू होणाऱ्या श्लोकार्धांत महाचें सूत्र आहे. त्यांत हि दोन दोन पदांची जोडी आहे. महाह्रद पद अथांग खोली दाखवितें तर महागर्त

पद अनुलंघ्य अंतर दाखवितें. एक जलीय आहे, तर दुसरें स्थलीय आहे. दुसऱ्या जोडींत महाभूत पद भूशृंगाचा संकेत करतें तर महानिधि पद भूगर्भाचा. एक प्रकट तर दुसरें गूढ.

परमात्म्याला महाह्रद म्हणण्यांत काय आशय? सरीसृप पशु पक्षी इत्यादि सर्व जीव वणव्याच्या वा सूर्याच्या तापापासून आपला बचाव करण्यासाठीं जलाचा आश्रय करतात. जलांतील जीव उथळ जलाशयें सोडून खोल जलाशयांत आश्रय घेतात. हिमालयाच्या जंगलांतील वणव्यांत सांपडलेला गजेन्द्र आपल्या कळपाला घेऊन गंगेच्या पात्रांत जाऊन उभा राहतो. खोल जलांत जाऊन डुंबतो. डबक्यांतला जीव तलावांत जातो, तीरावरील डोहांत शिरतो, अशा प्रकारें जल आणि त्याची हि खोली जीवाचें शरण आहे, सुखधाम आहे. परमात्मा हा तसा आध्यात्मिक आधिदैविक व आधिभौतिक या त्रिविध तापांपासून जीवाला वांचविणारा व निरुपाधिक आन्तरिक परम शीतलता देणारा आहे. म्हणून त्याला महाह्रद म्हटलें आहे. महाह्रदाप्रमाणें परम आह्लाद देणारा म्हणून तो महाह्रद म्हणावयाचा. महिम्नांत म्हटलें आहे "यदालोक्याह्लादं ह्रद इव निमज्यामृतमये, दधत्यन्तस्तत्त्वं किमपि यमिनस् तत् किल भवान्।

## ८०४. महागर्त

महांश् च असौ गर्तश् च महागर्तः। जो महान् म्हणजे खोलच खोल आणि गर्त म्हणजे खड्डा आहे तो म्हणावयाचा महागर्त. परमात्म्याला मागील नामांत खोलच खोल डोह म्हटलें तर इथें खोलच खोल खड्डा म्हटलें आहे. एका बाजूनें तो अथांग जीवन आहे तर दुसऱ्या बाजूनें तो सर्व जीवनाचा अन्त आहे. खोल खड्ड्यांत पडलेला प्राणी जसा तिथेंच गडप होऊन जातो त्याप्रमाणेंच या परमात्म्याच्या ठायीं हीं विश्वें गडप होऊन जातात. त्यांचा कुठें मागमूस हि लागत नाहीं. दरींत पडलेल्या वरीचा शोध कसा लागायचा? कुठें ती तळहीन खोली आणि कुठें हें अकिंचित् विश्व! तो परमात्मा 'शान्तं शिवं अद्वैतम्' म्हणून वर्णिला आहे. त्याच्या ठाईं त्याच्या त्या निःस्पंद अगाधतेंत सृष्टीची सारी धडपड, खटपट यातायात शान्त होते, सगळें अशिव, सगळें पाप भस्म होऊन जातें, मंगल होऊन जातें. श्मशानांत सारें सडकें कुजकें दुर्गन्ध जळून निर्मळ होतें, उज्वल होतें सुंदर होतें. तिथें द्वैत उरत नाहीं, तिथें दुजा नाहीं दुजाची छाया उरत नाहीं, त्याचें नांव नाहीं. सगळें एकाकार. तें जें शान्त शिव तत्त्व तेंच इथें महागर्त म्हणून संबोधिलें आहे. त्यांत विश्व आणि त्याची सारी हालचाल त्याचें सारें अमंगल आणि अशुभ, त्याचें सारें द्वैत, भय नि भांडण समाप्त होतें. उरतें तें एक अचिन्त्य नि अगाध खोलच खोल तत्त्व. तोच महागर्त होय. गर्त शब्द रथपर्याय म्हणून हि नैरुक्तिकांनीं दिला आहे. तदनुसार महागर्त म्हणजे महारथ. पण संदर्भावरून इथें रथ हा अर्थ अभिप्रेत दिसत नाहीं. कदाचित् गर्त शब्द मूलतः कर्त असा असावा.

## ८०५. महाभूत

महांश् च असौ भूतश् च महाभूतः। जो महान् असून भूत म्हणजे सत्व होय तो महाभूत म्हणावयाचा. पंचमहाभूतें वेगळीं. तीं सगळीं कल्पांन्तीं अव्यक्तांत लीन होतात. म्हणून अव्यक्त हें त्या महाभूतांहून हि महान् होय. पण तें हि अक्षरांत लीन होतें. आणि अक्षर असतें 'स्वे महिम्नि प्रतिष्ठित.' तें कोणांतच लीन होत नाहीं. म्हणून तेंच एक महाभूत होय. तें चिन्मय असल्यामुळें त्याला पुरुष संज्ञा आहे. इतर महाभूतें जड होत. म्हणून तीं नपुंसक लिंगानें निर्देशिलीं जातात. महाभूतः आणि महाभूतानि यांमधील हें अन्तर लक्षणीय आहे. हाच आशय गीतेंत असा आला आहे:

**अव्यक्ताद् व्यक्तयः सर्वाः प्रभवन्त्यहरागमे।
रात्र्यागमे प्रलीयन्ते तत्रैवाव्यक्तसंज्ञके॥**

भूतग्राम: स एवायं भूत्वा भूत्वा प्रलीयते।
रात्र्यागमे ऽवश: पार्थ प्रभवत्यहरागमे।।
परस् तस्मात् तु भावो ऽन्यो
ऽव्यक्तो ऽव्यक्तात् सनातन:।
य: स सर्वेषु भूतेषु नश्यत्सु न विनश्यति।।
अव्यक्तो ऽक्षर इत्युक्तस् तं आहु: परमां गतिम्।
यं प्राप्य न निवर्तन्ते तद् धाम परमं मम।।
पुरुष: स पर: पार्थ भक्त्या लभ्यस् त्वनन्यया।
यस्यान्त:स्थानि भूतानि येन सर्वं इदं ततम्।।

इथें आलेले भाव आणि पुरुष शब्द लक्षांत घ्या. ते पुंल्लिग असून नपुंसक भूत आणि अव्यक्त या शब्दांच्या पार्थक्यानें आलेले आहेत. लिंगाबरोबरच वचनाचें हि अंतर लक्षणीय आहे. तीं अनेक आहेत. हा एकच आहे. अव्यक्त प्रकृति आणि अव्यक्त पुरुष याच्यांमधील अंतर प्रकृतीचे भाव सर्व क्षर आहेत तर परमात्मा हाच एक अक्षर आहे असें म्हणून दाखविलें आहे. अव्यक्त संज्ञा प्रकृति व पुरुष या दोहोंनाहि असली तरी अक्षर ही संज्ञा केवल एका परमात्म्यालाच आहे. आणि तोच महाभूत. कारण तोच अव्यक्तासगट सर्व व्यक्तांना गिळून उरतो.

## ८०६. महानिधि

निधीयते अस्मिन् इति निधि:। महांश्च असौ निधिशच् महानिधि:। निधि म्हणजे सांठा. ज्यांत सर्व सांठलें आहे तो सांठा होय, निधि होय. जो महान् म्हणजे सर्वांत मोठा निधि तो म्हणावयाचा महानिधि. परमात्मा हा असा महानिधि आहे. कारण तो अक्षर आहे, अव्यक्त आहे. अक्षर असल्यामुळें तो अखूट आहे. त्याच्या खाणींतून कितीहि काढा त्याचें अक्षय भांडार रितें होण्याचें नांव नाहीं. जितक्या जितक्या म्हणून व्यक्ति म्हणजे प्रकटनें होतात तीं सर्व त्या अक्षर आणि अव्यक्त भावांतून, त्या महानिधींतूनच येतात. आणि तीं सगळीं निहित होतात, शेवटीं गडप होतात तीं हि त्यांतच. समुद्रांतून वाफ उठते, मेघ बनतात, ते वर्षतात, नद्या नाले वाहतात आणि हे सर्व प्रवाह शेवटीं येऊन मिळतात समुद्रांत. त्या प्रमाणें जें कांहीं या सृष्टींत दिसतें तें सगळें नामरूपात्मक मूलत: त्या अव्यक्त अक्षर संज्ञक महानिधींतूनच येतें आणि शेवटीं आपलें नाम व रूप हारवून त्यांतच विलीन होतें. असा तो परमात्मा नामरूपाचा महानिधि आहे. सर्व नामें व सर्व रूपें त्यांतूनच निघून त्यांतच निमालीं आहेत. आरंभीं आणि अंतीं असतो तो एक अनाम नि अरूप महानिधि-संज्ञक परमात्मा. मध्यंतरीं जें भासमान होतें तें सगळें हें नामरूपात्मक विश्व नाहीसेंच आहे. म्हणजे आहे एकच. दुसरें मुळीं नाहींच. ''एकं सत् नेह नानास्ति किंचन'' हा सर्व वेदान्त-सिद्धांतच सहस्रनाम प्रतिपादीत आहे, जो गीतेनें पुढील शब्दांत ग्रथित केला आहे.

नासतो विद्यते भावो नाभावो विद्यते सत:।
उभयोरपि दृष्टोऽन्तस् त्वनयोस् तत्त्व-दर्शिभि:।।

''महाह्रदो महागर्तो महाभूतो महानिधि:'' या श्लोकार्धांत परमात्म्याचें हें दिक्कालाद्यनवच्छिन्नत्वरूप महत्त्वच परोपरीनें गाईलें आहे. परमात्मतत्त्व अगाध आहे, अनन्त आहे, असीम आहे, अक्षय आहे. असा त्याचा आशय. वस्तूला खोली लांबी रुंदी या त्रिपरिमाणांनीं मापलें जातें शिवाय द्रव्यहि असतें वस्तूचें. हें चतुर्विध लक्षण लक्षून तें परमात्मतत्त्व सर्वविलक्षण आहे असें हीं चार महापदें सुचवीत आहेत. परमात्मा हा सर्वथा अप्रमेय आहे.

## ८०७. कुमुद:

कुं पृथिवीं उदति क्लेदयति आर्द्रयति इति कुमुद:। जो भूमीला भिजवतो तो कुमुद म्हणावयाचा. परमात्मा संवत्सररूपानें या भूतधात्री धरेला वृष्टीने भिजवितो, आपलें तेज तिच्या ठाई बीजरूपानें पेरतो आणि शेवटीं पिकाची कापणी करतो. अशा प्रकारें तो आपल्या विश्वकुटुंबाचें भरण पोषण करीत आहे. ही एक संपूर्ण प्रक्रिया आहे. हें एक जीवन-चक्र आहे.

आणि ''कुमुदः कुंदरः कुंदः'' या पदत्रयीनें तेंच व्यक्त केलें आहे. ''तपाम्यहं, अहं वर्षं निगृह्णाम्युत्सृजामि च'' या गीतावचनांत तेंच संवत्सरचक्र वा जीवनचक्र निर्दिष्ट झालें आहे. तिथें तें उन्हाळा (तपामि) (वर्षं निगृह्णामि) (हिवाळा) आणि पावसाळा (वर्षं उत्सृजामि) अशा उलट क्रमानें आलें आहे. इथें कुमुदः कुंदरः कुंदः मधें तें पावसाळा हिवाळा आणि उन्हाळा वा पेरणी निंदणी कापणी अशा सरळ क्रमानें आलें आहे. पावसाळ्यांत जलवृष्टि होते, तर हिवाळ्यांत दंववृष्टि होते, पण भूमि भिजल्या शिवाय पेरणी नाहीं. त्यानंतर पिकाच्या वाढीसाठीं वृष्टिनिग्रहाची गरज असते. तोच हिवाळा. त्यानंतर पीक पिकण्यासाठीं उष्णाची गरज असते. तोच उन्हाळा. कुमुदः कुंदरः कुंदः या तीन पदांत कुं हें द्वितीयान्त पद घेतलें आहे. शंकराचार्य कु-मुदः असा विभाग करतात. त्यांना मुद् णिजन्त म्हणजे प्रेरणार्थकहि घ्यावा लागला आहे. त्याला हि हरकत नाहींच. कुं धरणिं भारावतारणं कुर्वन् मोदयति इति कुमुदः। असें त्यांनीं व्युत्पादिलें व प्रतिपादिलें आहे. भारावतारण क्वचित् क्वचित् होतें. परंतु मेघवृष्टि नित्य नियमित होते. तिनें तो परमात्मा या धरणीला मुदित करतो म्हणून तो कुमुद असें म्हणणें सयुक्तिक आहे. कुं उदति वा कुं मोदयति घ्या अर्थांत अंतर नाहीं. मेघालोकनानें सर्व जीव सुखावतात. वृष्टीनें तृप्त होतात. म्हणून पर्जन्य रूपानें परमात्मा हा कुमुद म्हटला आहे.

## ८०८. कुन्दरः १

कुन्दर नामाची व्युत्पत्ति अनेक प्रकारें करतां येते (१) कुन्दं राति, (२) कुन्दं लाति, (३) कुं दारयति अशा तीन व्युत्पत्ति शंकराचार्यांनीं दिलेल्या आहेत. कुन्दपुष्पतुल्यानि शुद्धानि धर्मानुबन्धीनि फलानि राति ददाति इति कुन्दरः। कुन्दपुष्पतुल्यानि शुद्धानि फलानि लाति आदत्ते इति वा कुन्दरः, रलयोर् एकत्वस्मरणात्। कुं धरां दारयामास हिरण्याक्ष-जिघांसया। वाराहं रूपमास्थाय'' इति वा कुन्दरः। शिवाय र हा युक्तार्थक प्रत्यय घेऊन धीर वीर प्रमाणें कुंद-बहुल वा कुन्दयुक्त या अर्थानें कुन्दर वा कुन्दल शब्द लावतां येईल. परंतु प्रकरणानुसार अर्थ घ्यावयाचा असतो. सैन्धव म्हणजे मीठ व घोडा असे दोन्ही अर्थ होत असले तरी भोजनप्रकरणीं मीठ अर्थ घेणेंच योग्य, युद्ध-प्रकरणीं घोडा अर्थ घेणेंच प्रशस्त. त्या प्रमाणें इथें 'कुमुदः कुन्दरः कुन्दः' या कु म्हणजे भू प्रकरणांत जो अर्थ प्रकृत असेल तोच घेणें प्रशस्त. तदनुसार ''कुं भूमिं लांगलादिना बीज-वपनार्थं दारयति इति कुन्दरः'' ही व्युत्पत्ति ग्राह्य व्हावी. परमात्म्याचा वराहावतार हा नैमित्तिक आहे, पण त्याचा कृषकावतार नित्य आहे. नित्य धर्म नैमित्तिक धर्मानें तात्पुरता बाधित होऊन मागें पडत असला तरी खरें व स्थायी महत्त्व नित्य धर्मालाच आहे. त्याची उपेक्षा अयोग्य. नैमित्तिका चा आदर योग्यच आहे. त्याला असाधारण महत्त्व मिळणें हि स्वाभाविक आहे. पण म्हणून नित्याचा विसर पडणें वा त्याचें महत्त्व कमी लेखणें क्षम्य नाहीं. म्हणून जगज-जीवनदायी अन्नधान्याच्या निर्मितीसाठीं भूमि-विलेखन करणारा तो परमात्मा कुंदर म्हटला आहे. वराहानें रदाग्रानें धरा उचलली आहे. ती दीर्ण केली असें म्हणतां येत नाहीं म्हणून वराहापेक्षां हलधर कृषक च खरा कुंदर होय.

## ८०८. कुन्दर २

विष्णुसहस्रांत प्रकरण वा सूत्र कल्पिणें सयुक्तिक असलें तरी प्रत्येक नाम हें स्वतंत्र आहे. तसें त्याचें चिंतन करायचें म्हटलें म्हणजे मागें पुढें काय आहे, हें पहाण्याचें कारण नाहीं. तसा विचार केल्यास कुन्दर नाम वेदवेदान्त-रहस्य प्रकट करणारें आहे असें दिसून येतें. ''आदित्यानां अहं विष्णुः'' म्हणजे अदिति-पुत्रांत, प्राचीपुत्रांत, देवांत, ज्योतिर्गणांत मी विष्णु

आहें. अर्थात् विष्णु हें आदित्यांचें, सूर्याचेंच एक नाम झालें. आणि त्या विष्णूचीं जीं नामें तीं हि त्याचींच म्हणजे सूर्याचींच झालीं. कुंदर हें हि त्यापैकींच. अर्थात् तें हि सूर्यवाचकच. कुं कुहकं, कुत्सितं अन्धकारं, आविद्यान्धकारं दारयति इति कुन्दरः असें तें मी लावतों. हें रहस्य सूर्योपस्थान करीत असतां, गायत्री-जप करीत असतां, मला लाभलें आहे. तसा मला साक्षात्कार झाला आहे. "तत् सवितुर् वरेण्यं भर्गः" म्हणजे तें अंधकाराला विदीर्ण करून-प्रकट होणारें, अज्ञानाला जिंकून प्रकाशमान होणारें, विजयी तेज 'धीमहि' म्हणजे आपण ध्याऊं या. या वेदरहस्याचाच अनुवाद गीतेनें हि "आदित्यवर्णं तमसः परस्तात्" असा केला आहे. भागवतानें तो "धाम्ना स्वेन सदा निरस्तकुहकं सत्यं परं धीमहि" असा व शंकराचार्यांनीं "तं संसार-ध्वान्त-विनाशं हरिमीडे." असा केला आहे. वैदिक ऋषि आध्यात्मिक सत्याचें आकलन करून उपासनेसाठीं तें अतीन्द्रिय तत्त्व सूक्ष्म आणि स्थूल रूपानें निरूपीत. आत्मविषयक तें अचिन्त्य सत्य जपासाठीं त्यांनीं गायत्री मंत्रांत ग्रथित केलें आणि त्याची उपासना सूर्योपस्थानानें करावी असा धर्म लावून दिला. आम्ही देहप्राणमनोरूप तीन कर्मपथांनीं व्यवहार करीत असतों. त्या तिहींसाठीं तीन गोष्टी त्यांनीं लावून दिल्या आहेत. देहानें उपस्थान, प्राणानें जपयुक्त प्राणायाम आणि मनानें ध्यान. त्यांची ही त्रिविध धर्मकल्पना परिपूर्ण आहे. या वैदिक धर्मांत संपूर्ण जीवनाचा तामस अनुपयोग व राजस दुरुपयोग टाळून सार्थक सदुपयोग शिकविला आहे.

## ८०८. कुंदर ३

'उद्भवः सुन्दरः सुन्दः' प्रमाणें 'कुमुदः कुन्दरः कुन्दः' हें वचन आलें आहे. या वचनांत सुन्द सुन्दर, कुन्द कुन्दर अशा जोड्या आल्या आहेत. त्यावरून 'मधु मधुर' या शब्दांप्रमाणें हे समानार्थक शब्द होत, असें दिसतें. मधु हें मूलतः नाम आहे, मधुर हें त्या मधूनें युक्त या अर्थीं विशेषण आहे. अर्थात् मधूनें युक्त म्हणण्यापेक्षां साक्षात् मधु म्हणणें हें अधिक गौरवाचें होय. तदनुसार आधीं कुंदर म्हणून मागाहून कुन्द म्हटलें आहे. तसेंच सुन्दर आणि सुन्द. पण ह्या दोन जोड्या सुन्दर कुन्दर, सुन्द कुन्द परस्पर विरुद्ध दिसतात. सुन्दर सुन्द वा कुन्दर कुन्द या क्रमिक नामांत जसा उत्कर्षक्रम दिसून येतो, तरतम भाव दिसून येतो तसा सुन्द सुन्दर, कुन्द कुन्दर या जोड्यांत हि तो आहे. या जोड्यांत जो आपाततः विरोध दिसतो तो सुरूप कुरूप अशा स्वरूपाचा नाहीं, तर बाह्य सौन्दर्य विरुद्ध अन्तःसौन्दर्य अशा स्वरूपाचा आहे. बाह्य सौन्दर्यांत रूपसौन्दर्यानें नटलेलें तें सुन्दर म्हटलें तर अन्तःसौन्दर्यानें गुणसौन्दर्यानें कोंदलें आहे तें कुन्दर म्हणावयाचें. पण पळसाचें वा कण्हेरीचें फूल सुवर्ण असतें, रंगीत असतें पण सुगन्ध नसतें. उलट कुन्दाचें वा मोगऱ्याचें फूल सुवर्ण नसतें, रंगीत नसतें पण सुगन्ध असतें. दोन्ही सुन्दर आहेत एक रूपसुन्दर आहे, तर दुसरें गुणसुन्दर आहे. एक नेत्रवेधक आहे तर दुसरें चित्तवेधक आहे. या दोहोंत अधिक सुन्दर कोणतें? जें हृदयाला संतोष देतें तें. तेंच कुन्दर. कुन्द पुष्प बाह्यतः निर्मल, अन्तरतः समुज्जवल अशा आदर्शाचें प्रतिमान आहे. म्हणून ज्ञानदेवता सरस्वतीचें रूप 'या कुन्देन्दुतुषारहार-धवला' असें वर्णिलें आहे. अर्थात् कुन्दवत् अन्तर्बाह्य निर्मलोज्वल जें आत्मज्ञान त्यानें युक्त तो कुन्दर अथवा 'कुन्दं राति ददाति' तें आत्मज्ञान जो देतो तो कुन्दर. अथवा 'कुन्दं लाति आदत्ते' तें आत्मज्ञान जो ग्रहण करतो तो कुन्दर. अन्तःसौन्दर्यच खरें सौन्दर्य होय. म्हणून समर्थ म्हणतात "वस्त्रें शृंगारें शरीर। चातुर्यें शृंगारें अन्तर। दोहोंमध्यें कोण थोर। बरें पहा।।"

## ८०९. कुन्द

कुन्दः कुन्दोपमसुन्दरः। कुन्दोपमसुन्दराङ्गत्वात् स्वच्छस्फटिकवत् निर्मलः कुन्दः। कुं पृथिवीं कश्यपाय अदात् इति वा कुन्दः। शंकराचार्यांनीं अशा प्रकारें

त्रिधा व्युत्पादिला आहे हा शब्द. आणि तें यथास्थितच आहे. कुं पृथिवीं द्यति खण्डयते इति कुंद:। यावर त्यांनीं मार्मिक टिप्पणी दिली आहे. "कुं शब्देन पृथ्वीश्वरा लक्ष्यन्ते" परमात्मा पृथ्वीला म्हणजे तिला भारभूत झालेल्या राजांना खच्ची करतो, म्हणून तो कुंद म्हणावयाचा. अशा लक्षणा घेऊन परमात्मा हा कुमुद पदाच्या चिंतनांत म्हटल्याप्रमाणें पृथ्वीची म्हणजे पृथ्वीवरील पिकांची कापणी करतो म्हणून तो कुंद. तो वर्षण करून भूमीला भिजवतो, कर्षण करून तिला पेरतो आणि वृष्टि व ओल यांचें आकर्षण करून म्हणजे सुकवून तापवून तिला तोडतो. सूर्यरूपानें परमात्माच हें असें सृष्टिरूप यज्ञचक्र चालवीत आहे. त्याच्याच प्रेरणेनें हें सर्व होत असतें. शेतकरी तें नांगरतो वखरतो, पेरतो लावतो, आणि शेवटीं सवंगतो कापतो. हें सर्व परवश होऊन म्हणजे परमात्म्याच्या प्रेरणेला वश होऊनच होय. परंतु परमात्म्याची ही प्रेरणा अत्यन्त व्यापक म्हणजेच अव्यक्त असल्यामुळें ढोबळ बुद्धीच्या जीवाच्या लक्षांत येत नाहीं. तो समजतो कीं हें सर्व आपण च आपल्याच इच्छेनें करतो आहों. वस्तुत: तो निमित्तमात्र आहे. चांगलें किंवा वाईट सर्व परेच्छेनें होत असतें. "मयैवैते निहता: पूर्वमेव निमित्तमात्रं भव सव्यसाचिन्"या वचनांत भगवंतानें हें रहस्य सांगून टाकलें आहे. तें लक्षांत घेऊन ज्ञानी कोणत्याहि कर्माचें कर्तृत्व आपल्या अंगाला चिकटूं देत नाहींत. हेंच ज्ञान कुन्दोपम अंतर्बाह्य सुंदर आहे, निर्लेप आहे. आणि परमात्मा हा केवलज्ञानस्वरूप असल्यामुळें तो कुन्द म्हटला आहे.

कुन्द म्हणंजे भूदानी हा अर्थ हि स्पष्टच आहे. परमात्म्यानें परशुरामावतारांत सर्व पृथ्वीचें दान केलें होतें. म्हणून तो कुंद म्हणजे भूदानी होय. हरिवंशांत म्हटलें आहे:

**सर्वपापविशुद्ध्यर्थं वाजिमेधेन चेष्टवान्**
**तस्मिन् यज्ञे महादाने दक्षिणां भृगुनन्दनः**
**मारीचाय ददौ प्रीतः काश्यपाय वसुंधराम्।।**

भूदानयज्ञ आज त्याचाच नवा अवतार आहे. भूदान हें महादान होय. इतर दानें अल्पच.

## ८१०. पर्जन्य

पर्जन्यवत् आध्यात्मिकादि तापत्रयं शमयति, सर्वान् कामान् अभिवर्षति इति वा पर्जन्य:। पावसामुळें ताप शमतो आणि सर्व पिकें पिकतात. जिकडे तिकडे सर्व आबादीआबाद होते. त्या प्रमाणें परमात्म्याच्या प्रसादानें सर्व ताप आध्यात्मिक आधिदैविक आणि आधिभौतिक शांत होतात, सर्व खळमळ बाह्य तसा आभ्यन्तर धुतला जातो आणि सर्व दैवी गुणांची अभिवृद्धि होते, जीव निजधन-संपन्न होऊन स्वे महिम्नि प्रतिष्ठित होतो. म्हणून परमात्म्याला पर्जन्य म्हणावयाचें. अशा लाक्षणिक अर्थानें परमात्मा पर्जन्य आहे हें तर ठीकच आहे, पण आधिभौतिक अर्थानें, सरळ शब्दार्थानें हि तो पर्जन्य आहे. पाऊस जर आला नाहीं तर नद नदी तडाग वापी कूप भरणार नाहींत. प्यायला पाणी आणि खायला अन्न मिळायची पंचाईत होईल. असें ज्याचें निरतिशय महत्त्व आहे तो पर्जन्य, तो पाऊस परमात्माच होय. अव्यक्त परमात्म्याचें हें व्यक्त गमक आहे. त्याची ती खूण आहे. गीतेनें म्हटलें आहे.

**अन्नाद् भवन्ति भूतानि, पर्जन्याद् अन्न-संभव:**
**यज्ञाद् भवति पर्जन्यो, यज्ञ: कर्म-समुद्भव:।**
**कर्म ब्रह्मोद्भवं विद्धि, ब्रह्माक्षर-समुद्भवम्।**

अक्षरब्रह्मापासून भूतापर्यंतच्या या मालिकेंत आम्हांला गोचर केवळ पर्जन्य, अन्न आणि भूतेंच आहेत. अक्षर, प्रकृति आणि कर्म हीं अगोचर च आहेत, गूढच आहेत. अक्षर ब्रह्मापासून त्रिगुणात्मिका प्रकृति वा त्रैगुण्य-विषय वेद कसे झाले आणि त्यांचें

स्वरूप व तात्पर्य काय आणि त्यांपासून कर्म कोणतें आणि कसें झालें आहे कीं ज्यापासून पर्जन्याची सृष्टि होते हा सगळा विषय, हें त्रिक निगूढच आहे. परंतु तेथून पुढील त्रिक मात्र प्रकट आहे. आणि त्यांत पहिला आहे पर्जन्य. म्हणून पर्जन्य हा परमात्म्याचा पहिला आविर्भाव होय, अवतार होय. ''अप एव ससर्जादौ'' इत्यादि वेदोपनिषद्-वचनें वरील विधानाला उपोद्बलक आहेत, असें म्हणतां येईल. ही अभिधा झाली. लक्षणेनें तर तो परमात्मा सर्व तापोपशमन व सर्वकामाभिवर्षण करीत असल्यामुळें उघड च पर्जन्य होय.

## ८११. पावन

''पर्जन्य: पावनोऽनिल:'' या चरणांत पर्जन्य व अनिल म्हणजे पाणी आणि वारा या दोहोंच्या दरम्यान पावन पद आलें आहे. म्हणून त्याचा आशय पावक असा आहे असें म्हणतां येईल. पावन आणि पावक एकाच पूधातूचीं रूपें आहेत. पर्जन्य हा यज्ञांतून होतो असें गीता सांगत आहे. हा यज्ञ सूर्याग्निस्वरूप वा तेजोरूपच आहे. पुन: हा यज्ञ गीतेच्या मताप्रमाणें कर्म-संभव आहे. तें कर्म सर्व हालचालींचा चालक जो वायु तद्रूप म्हटलें तर ते सयुक्तिक नाहीं असें कोण म्हणेल? हें कर्म, ही प्रेरणा त्रिगुणात्मिका अव्यक्त प्रकृतींतून येते. आणि ही प्रकृति अक्षर ब्रह्माच्या ठाईं निहित असते. असें हें गीतोक्त यज्ञचक्र आहे. ''पर्जन्य: पावनोऽनिल:'' या चरणांत मला पूर्व पूर्व कार्याचीं उत्तरोत्तर कारणभूत् तत्त्वें पर्जन्य यज्ञ आणि कर्म दिसत आहेत. ''आकाशात् वायु:, वायो: तेज:, तेजस: आप:'' या क्रमाशीं हि तीं जुळतीं आहेत.

''पुनाति इति पावन:'' पावक म्हणजे अग्नि जसा सर्व कांहीं जाळून साफ करतो, आणि त्यामुळेंच त्याला पावक म्हटलें जातें, त्या प्रमाणें परमात्मा हा सर्व संगाचा मलाचा पापाचा सफाया करतो म्हणून तो पावन म्हटला आहे. गीतेनें म्हटलेंच आहे:

**यथैधांसि समिद्धोऽग्निर् भस्मसात् कुरुतेऽर्जुन।**
**ज्ञानाग्नि: सर्व कर्माणि भस्मसात् कुरुते तथा।।**

''नहि ज्ञानेन सदृशं पवित्रं इह विद्यते'' ज्ञान हें परम पवित्र आहे आणि परमात्मा हा चिन्मात्रमूर्ति म्हणजे केवल ज्ञानस्वरूप आहे. म्हणून तो पावन म्हटला गेला यांत नवल काय? देहाद्यभिमान धरून जीव नाना कर्में करतो आणि त्यांच्या बऱ्या वाईट फळांचा भोक्ता म्हणवतो. हा कर्तृत्व-भोक्तृत्वरूप लेप समूळ नाहींसा होतो आत्मज्ञानानें. म्हणून तें पवित्र व तत्स्वरूप परमात्मा पावन म्हटला आहे.

## ८१२. अनिल (निल)

इलति चेष्टते इति इल:। न इल: अनिल:, अव्यक्तम्। अथवा ''अन: सर्वक्रियाकारक: प्राण: तेन युक्त: अनिल:, अव्यक्तम्'' अशा दोन प्रकारें अनिल पद व्युत्पादिलें जाईल. अर्थांत तादृश भेद नाहीं. दोहोंचा हि अर्थ अव्यक्त म्हणजे गुणसाम्यरूप प्रकृति. परमात्मा हा निर्गुण निष्क्रिय निराकार आहे. तर प्रकृति वा अव्यक्त हें सगुण क्रियागर्भ निराकार आहे. आणि हा सगळा विसर्ग सगुण सक्रिय साकार आहे. या आकाराचा आविर्भाव म्हणजे आगति जशी आणि ज्या क्रमानें होते तशी आणि त्याच्या उलट क्रमानें गति होते. गति होते म्हणजे तिरोभाव. प्रथम वायु-पक्षी या देहपंजरांतून मोकळा होतो. नंतर तो उडून त्या अव्यक्तांत लीन होतो आणि तिथून ज्ञानसंपन्न झालेला असल्यास तो त्या अमृतांत—निर्गुण निष्क्रिय निराकारांत विलीन होतो. हाच आशय ''वायु: अनिलं अमृतम्'' या ईशवचनांत आला आहे. तिथें म्हटलें आहे कीं मनुष्य मेला म्हणजे त्याचा व्यष्टिगत प्राण समष्टिगत वायूंत प्रथम मिसळतो. नंतर तो समष्टिगत वायु अनिलांत म्हणजे अव्यक्तांत कालान्तरानें लीन होतो. आणि तें अव्यक्त शेवटीं यथाकाल म्हणजे ज्ञानोत्पत्तिरूप कल्पान्तीं अमृतांत विलीन होतें आणि इकडे या देहाची राख होते.

जीविताचा हा असा इत्यर्थ आहे. यांत अनिल हें जें एक मधलें वा उपान्त्य पद आहे तें सृष्टिकारणभूत अव्यक्त तत्त्व आहे. तें हि परमात्म्याचें एक रूप आहे. म्हणून परमात्म्याला अनिल म्हटलें आहे. अमृत म्हणजे निर्गुण तत्त्व. हें देवळांतील अचल-प्रतिष्ठ देवता आहे, तर अनिल ही उत्सव-मूर्ति आहे. व्यवहारासाठीं तीच देवता. तीच प्रतिबिंबवत् आविर्भूत होते. तीच तिरोहित होते. बिंबवत् तें अमृत, तें निर्गुण तत्त्व सदैव चयापचयरहित अविकृतच राहतें. निल असा हि पाठ घेतां येईल. पण गरजेचा नाहीं.

## ८१३. अमृताश

'अमृतं अश्नाति इति अमृताश:।' अथवा 'अमृता आशा यस्य स: अमृताश:।' अशा दोन प्रकारें लावतां येईल. जो नित्य स्वानन्दामृताचें अशन करतो तो अमृताश होय. जीवाच्या अंतरांत सदैव शाश्वत जीवनाची अभिलाषा राहिली आहे. मृत्यूची म्हणजे आत्मनाशाची अभिलाषा कोणी हि करीत नाहीं. आपण सदैव सुखी असावें अशीच अभिलाषा जीव करीत असतो. ही जी अभिलाषा ती अमृताचीच अभिलाषा होय. ती ज्याला आहे तो अमृताश म्हणावयाचा. ही अभिलाषा आत्मविषयक असल्यामुळें ती त्याची सदैव कृतार्थच आहे. इतर सर्व आशा अनात्मविषयक असल्यामुळें त्या त्याच्या कधींच पूर्ण वा सफल व्हावयाच्या नाहींत. त्या सर्व आशा खण्डिताशा हताशा वा मृताशाच होत. बाह्य वस्तु असुख असते आणि आरंभीं असुख न वाटली तरी तिचा अवश्यंभावी वियोग झाला म्हणजे ती असुखावह झाल्यावांचून राहत नाहीं. अशा प्रकारें असुखता हें त्या बाह्य वस्तूचें स्वरूपच होय. कामरूप राक्षस मेले म्हणजे त्यांचें भयानक स्वरूप प्रकट होई तसें हें बाह्य कामरूप पदार्थ नाहींसे झाले म्हणजे त्यांचे असुखरुप प्रकट होतेंच. जे आरंभींच नकोसे वाटतात ते तर असुख आहेतच, पण जे आरंभीं हवेसे वाटतात ते हि अंतीं असुखच असल्याचें प्रत्ययास येतें. सारांश असुखतेंत अनित्यता आणि अनित्यतेंत असुखता भरलेलीच आहे. एकाच वस्तूच्या ह्या दोन बाजू होत. "अनित्यं असुखं लोकं इमं प्राप्य भजस्व माम्" या भगवंताच्या कळकळीच्या उपदेशांत म्हणून दोन्ही दोषांचा एकत्र व लागोपाठ उल्लेख केला आहे. तथापि खरी कसोटी नित्यत्वच आहे हें "अनित्यं" ला पहिलें स्थान देऊन सूचित केलें आहे. तें जें नित्य तेंच अमृत होय. त्या अमृतांत नित्यत्व व सुखत्व दोहोंचा एकपद उल्लेख आहे. अमृतस्वरूप जो स्वानंद तो नित्य सेवन करीत आहे तो परमात्मा. अमृतात्मा अमृताश होय आणि त्याचा उपासकहि. भगवंतानें म्हणूनच "भजस्व माम्" म्हटलें आहे. "यज् ज्ञात्वामृतमश्नुते" त्याला जाणल्यानें अमृतभोजी होतो.

## ८१४. अमृत-वपु

मृतं मरणं, तद्रहितं वपुः अस्य इति अमृतवपुः। अमृत म्हणजे मोक्ष हेंच ज्याचें वपु म्हणजे रूप होय तो अमृतवपु म्हणावयाचा. परमात्मा निराकार आहे. त्याला वपु म्हणजे शरीर कुठलें? त्याचें शरीर म्हणजे त्याची ओळखण ज्या वरून आम्हांला पटेल तीं सर्व लक्षणें म्हणजेच त्याचें रूप. त्या नित्यशुद्धबुद्धमुक्त-स्वभाव परमात्म्याचें गीतेनें असें वर्णन केलें आहे:–

अनादिमत् परं ब्रह्म न सत् तन् नासद् उच्यते।।
सर्वत: पाणि-पादं तत् सर्वतोऽक्षि-शिरो-मुखम्
सर्वत: श्रुतिमल् लोके सर्वम् आवृत्य तिष्ठति।।
सर्वेन्द्रियगुणाभासं सर्वेन्द्रियविवर्जितम्।
असक्तं सर्वभृत् चैव निर्गुणं गुण-भोक्तृ च।
बहिर् अन्तश् च भूतानां अचरं चरम् एव च
सूक्ष्मत्वात् तद् अविज्ञेयं दूरस्थं चान्तिके च तत्।।

**अविभक्तं च भूतेषु विभक्तम् इव च स्थितम्।**
**भूतभर्तृ च तज् ज्ञेयं ग्रसिष्णु प्रभविष्णु च।।**
**ज्योतिषां अपि तज् ज्योतिस् तमसः परम् उच्यते**
**ज्ञानं ज्ञेयं ज्ञान-गम्यं हृदि सर्वस्य धिष्ठितम्।।**

या सर्व लक्षणांत शेवटचें लक्षण 'हृदि सर्वस्य धिष्ठितम्, हें विशेष लक्षणीय आहे. तो अमृतवपु परमात्मा सर्वांच्या हृदयांत समान वसला आहे आणि तो ज्ञानस्वरूप आहे. हें ज्ञानस्वरूप हि अमानित्वादि ज्ञानलक्षणें अंगीं बाणवून घेऊन आकळावयाचें आहे. म्हणून त्याला म्हटलें आहे – ज्ञानगम्यं ज्ञेयं ज्ञानम्. अर्थात् अमानित्वादि साधनभूत ज्ञानाच्या योगें जाणावयाचें साध्यभूत ज्ञान. हें जें साध्यभूत, ध्येय-भूत ज्ञान तेंच अमृत होय. आणि त्याचीं जीं हीं लक्षणें दिलीं तींच त्याचें वपु म्हणजे लक्षणीय विशेष होत, अंगें होत. परमात्मा असा हा अमृत-वपु म्हटला आहे. जगांत जें कांहीं भूतजात आहे तें सारें मर्त्यामर्त्यात्मक आहे. देह मर्त्य आहे, आत्मा अमर्त्य आहे. परंतु परमात्मा हा असा आहे कीं तिथें हा भेद नाहीं. तो केवळ अमृत आहे. तिथें मृत म्हणजे मरण-धर्मी शरीर नाहीं. म्हणून तो अमृतवपु.

'अमृताशोऽमृतवपु : या क्रमांत कार्यकारणभाव सुचविला आहे, जो अमृत सेवन करतो तो अमृतस्वरूप होतो. जो विटणारें अन्न खाणार त्याचा देह मृतच होणार.

## ८१५. सर्वज्ञ

सर्वं जानाति इति सर्वज्ञः। जो सर्व जाणतो तो सर्वज्ञ म्हणावयाचा. पण खरोखर या विश्वांतील यच्चयावत् स्थूल सूक्ष्म व्यक्ताव्यक्त सर्व वस्तु जाणणें हें कोणा एका व्यक्तीला, मग ती किती का मोठी असे ना, शक्य आहे का? तत्त्वतः आणि व्यवहारतः हि हें अशक्यच म्हणावें लागेल. तत्त्वतः अशक्य, कारण विश्व अनन्त आहे. व्यवहारतः अशक्य, कारण व्यक्तिशक्तीच्या आवाक्याबाहेरचें आहे. मग परमात्मा सर्वज्ञ कसा? दुन्दुभीच्या ध्वनिलहरी सहजासहजीं मोजतां येत नाहींत आणि धरतां हि येत नाहींत. परंतु दुन्दुभिच ताब्यांत घेतला म्हणजे सर्व ध्वनिलहरी पकडल्या असें होतें. कारण त्या ध्वनिलहरींचें मूळ कारण तुम्ही हस्तगत करतां. त्याप्रमाणें सर्वज्ञानाचें मूळ कारण चिदात्मा आहे. आणि चिद्रूपता हा त्याचा स्वभावच असल्यामुळें तो सहजच सर्वज्ञ आहे. कोणतीहि वस्तु वा घटना त्यानें जाणल्यावांचून मुळीं असूंच शकत नाहीं, अस्तित्वांत येऊं शकत नाहीं. अस्तित्वमात्र ज्ञानाधीन असल्यावर ज्ञानाला ठाऊक नाहीं असें कांहीं मुळीं संभवतच नाहीं. आणि त्यामुळें तो चिन्मात्रमूर्ति, तो ज्ञानस्वरूप परमात्मा सर्वज्ञ म्हणावयाचा. विश्व अनन्त असो कीं सान्त असो तें चित्सत्ताधीन आहे. आणि ही चित्-सत्ता दिक्-काल-कार्यकारणभावादिकांनीं अपरिच्छिन्न आहे म्हणजे सर्वतोनन्तरूप आहे. त्यामुळें तत्त्वतः व व्यवहारतः हि तो परमात्मा सहजच सर्वज्ञ आहे. सर्वज्ञतेसाठीं त्याला कांहीं खटपट नाहीं करावी लागत. इथें अभूततद्भाव नाहीं. आधीं असर्वज्ञ असून कांहीं प्रयत्नानंतर तो सर्वज्ञ होतो असें नाहीं. तो स्वभावतःच सर्वज्ञ आहे, मूळचाच सर्वज्ञ आहे.

## ८१६. सर्वतोमुख

'अमृताशोऽमृतवपुः' ही जशी एक जोडी आहे, तशीच 'सर्वज्ञः सर्वतोमुखः' ही हि एक जोडीच आहे. दोहोंत हि कार्यकारणभाव सूचित झाला आहे. अमृत सेवन करतो म्हणून तो अमृतवपु होतो, तसा तो सर्वज्ञ आहे म्हणून तो सर्वतोमुख म्हणावयाचा. जिकडे माणसाचे तोंड असतें तिकडचें त्याला दिसतें, पाठीमागचें त्याला दिसत नाहीं. तिकडे वळून पाहूं लागल्यास इकडचें दृष्टीआड होतें. एकसमयावच्छेदें करून तो सर्वत्र पाहूं शकत नाहीं. पण परमात्मा तसा देहाधीन नाहीं. देहाधीन ज्ञान हें असेंच एकांगी असावयाचें. परमात्मा विदेह आहे म्हणून तो सर्वज्ञ आहे. सर्वतोमुख आहे. ही सर्वज्ञता सर्वतोमुखता त्याला चतुर्मुख कल्पून व्यक्त केली आहे. पण चतुर्मुखाला वर खालीं आणि आंतबाहेर एकदम पहातां येणार नाहींच. म्हणून त्याला सर्वतोमुख म्हणणेंच योग्य. समोर मागें, डावीकडे उजवीकडे,

वर खालीं आणि आंत बाहेर, अशा ह्या अष्ट दिशा आहेत. या आठी दिशांत आणि भूत भविष्य वर्तमान या तिन्ही कालांत जो जाणतो आहे, पाहतो आहे तो सर्वज्ञ होय आणि तोच सर्वतोमुख. त्यालाच वेदांत 'सहस्रशीर्षा: पुरुष: सहस्राक्ष :' म्हटलें आहे. तोच क्रम 'सर्वज्ञ: सर्वतोमुख:' मध्यें हि आहे. शीर्ष ज्ञानाचें आणि अक्षि साक्षित्वाचें उपलक्षण आहे. तो विदेह पुरुष तो परमात्मा देहावयवांनीं वर्णिला आहे. कारण वाणी ही व्यक्ताच्याच भाषेंत बोलूं शकते. ती अव्यक्ताचें सूचन च करूं शकते. यथार्थ वर्णन करायला ती असमर्थच आहे. पण ती वाणीच असल्यामुळे, आपल्या वर्णनव्यवसायापासून, विरक्त वा विरत होऊं शकत नाहीं; कारण तो तिचा स्वभाव आहे. म्हणून हें एकाचें सहस्रनाम. पण ह्या अनल्पजल्पानें समाधान न होऊन शेवटीं तिनें ॐ नम: म्हणून डोकें टेकलें आहे. मौनच महत्तम प्रवचन आहे.

## ८१७. सुलभ

सुखेनैव अनायासेन लभ्यते इति सुलभ:। जो सुखानें म्हणजे कष्टांवांचून लाभतो तो सुलभ म्हणावयाचा. परमात्मा हा सुलभ कसा? तो तर योग्यांना हि दुर्लभ म्हटला आहे. ज्ञान्यांना हि कांहीं तो सहज मिळत नाहीं. म्हटलेंच आहे'—बहुनां जन्मनां अन्ते ज्ञानवान् मां प्रपद्यते'. आणि वेदपाठ, तप, यज्ञ, दान हीं तर उघडच महाकठिण कर्मेंच होत. हीं सगळीं आत्मदर्शनाचीं वा भगवत्-प्राप्तीचीं साधनें नि:संशय सोपीं नाहींत. प्रेमभक्ति हें साधन यांच्याहून सोपें म्हटलें जातें. पण तें प्रेम ती भक्ति हि कांहीं सोपी नाहीं. हृदयांत तो ओलावा उत्पन्न झाला पाहिजे ना? तो प्रेमपूर जीवन नौका सहज वाहून नेईल. पण खडकाळ जमिनीवरून नौका सरकवणें किती कष्टाचें! सारांश, कोणते हि साधन करा, त्या वेगवेगळ्या साधनांत कांहीं उजवें डावें खुशाल असूं द्या, परंतु तीं सर्व सुलभ म्हणतांच येत नाहींत. तीं अनायास नाहींत. त्यांत सायास आहे, अशा सायासांनीं जो लाभावयाचा तो परमात्मा सुलभ कसा म्हणतां येईल? पण खरोखर तो अत्यन्त सुलभ आहे. कारण तो निजरूप आहे. एखादी बाहेरची वस्तु मिळवणें कठिण सोपें म्हणतां येईल. पण जी वस्तु तुम्ही स्वत:च आहां ती मिळविणें सोपें कठिण म्हणणें याला कुठें वाव आहे? स्मरण करतांच ती तुम्हांला मिळते इतकी ती सुलभ आहे. किंबहुना एवढें हि कष्ट नकोत. तुम्ही विसरून गेलां तरी तुम्हांला ती सदैव प्राप्तच आहे. याहून अधिक सुलभ दुसरें कांहीं असूं शकत नाहीं म्हणून तो निजरूप परमात्मा सुलभ म्हटला आहे.

## ८१८. सुव्रत

शोभनं व्रतं यस्य स: सुव्रत:। ज्याचें व्रत शोभन आहे तो सुव्रत म्हणावयाचा. व्रत म्हणजे वर्तन, आचरण, नियम. ज्याचें वर्तन स्वाभाविक असतें, स्वभावानुरूप असतें, त्याला सुव्रत म्हणतां येईल. म्हणजे त्याचें वर्तन शोभन आहे असें म्हणतां येईल. एखाद्या माणसाला दूषण द्यावयाचें झाल्यास म्हटलें जातें, काय तूं माणूस आहेस का जनावर? त्यांत हि अगदीं निर्बुद्धता आणि अमंगलता सुचवायची झाल्यास म्हटलें जाईल : माणूस आहेस का गाढव? आपल्या स्वाभाविक कार्यांत अदक्ष आणि अपटु कारागिरास म्हटलें जाईल, सुतार आहेस का हजाम? म्हणजे अशोभनता ही अनौचित्यांत आणि अनौचित्य अस्वाभाविकतेंत भरलें आहे. ज्याचा जो सहज धर्म त्याला अनुसरून त्याचें वर्तन असल्यास तो सुव्रत म्हटला जाईल. एखादा प्रौढ माणूस बालिशता करूं लागल्यास त्याला काय पोरकट माणूस आहे असें म्हटलें जाईल. म्हणजे त्याच्या वयापासून जी अपेक्षा आहे तिला तो उतरत नाहीं. याप्रमाणें सर्वच विषयांत जो स्वाभाविक वर्तन करणारा आहे तोच सुव्रत म्हणावयाचा. परमात्मा हा असा सुव्रत आहे.

"सत्यं वद, धर्मं चर, स्वाध्यायात् मा प्रमदः" अशा धर्माच्या आज्ञा त्याला कराव्याच लागत नाहींत. सत्य दया स्वाध्याय इत्यादि सद्गुण व सदाचार त्याच्या अंगीं उपजतच आहेत. मुरलेले आहेत. सत्य बोलायचें नाहीं तर दुसरें काय बोलायचें? दया नाहीं करायची तर दुसरें काय बरें करायचें? स्वाध्याय नाहीं करायचा तर दुसरें काय करायचें? असा त्याला प्रश्नच पडेल? फुलाला जसें सुवास देणेंच ठाऊक तसें हें सारें त्याला असतें. म्हणून तो सुव्रत होय. या अशा सुव्रत परमात्म्याचें व्रत जे घेतात, म्हणजे त्या परमात्म्याला जें आवडेल तेंच करायचें, दुसरें वर्ज्य असा जे नियम घेतात ते हि सुव्रत होत. कारण त्यांचा तो नियम स्वस्वरूपानुसंधानरूपच होय. इतर सारें वागणें तद्विपरीत म्हणून वृजिन होय, पापरूप होय, अशोभन होय.

## ८१९. सिद्ध

सृष्टींत तीन वस्तु आढळतातः जीव जगत् आणि ईश्वर. पैकीं जीव आणि जगत् या दोन वस्तु असिद्ध आहेत, अपूर्ण आहेत. त्यांच्या ठाईं अनित्यत्व व असुखत्व आढळतें. अनेक दोष भरलेले आढळतात. परंतु तिसरी वस्तु जो परमात्मा तो मात्र निर्दोष आहे, परिपूर्ण आहे, म्हणून तोच एक सिद्ध होय। त्याला अनवाप्त असें कांहीं नाहीं आणि म्हणून अवाप्तव्य हि कांहीं उरत नाहीं. असा तो कृतार्थ असतो, कृतकृत्य असतो. परंतु जीव व जगत् ह्यांची स्थिति सदैव याच्या विपरीतच असते. सदैव त्यांना दैन्यानें ग्रासलेलें आहे. अनिष्ट-निवारण आणि इष्ट-संपादन या कार्यांत तीं सदैव धडपडत च आहेत. त्यांना विश्राम कसा तो नाहींच. जिथें दैन्य आहे तिथें तृष्णा आहे. तृष्णा आहे तिथें कर्म आहे. कर्म आहे तिथें अशान्ति आहे. आणि अशान्ति म्हणजेच अस्वस्थता आणि अस्वस्थता म्हणजेच असिद्धि. परमात्मा हा आप्तकाम वा पूर्णकाम अथवा अकाम असल्यामुळें तो सिद्ध आहेच, पण तो साध्य नाहीं वा साधक हि नाहीं या अर्थानें हि तो सिद्धच आहे. सिद्ध म्हणजे स्वतःसिद्ध. प्रमाणांनीं सिद्ध करावयाचा पदार्थ तो नव्हे. अथवा साधनांनीं सिद्ध करावयाचा हि पदार्थ तो नव्हे. जगांत जे पदार्थ आढळतात ते आप्य, कार्य, संस्कार्य वा विकार्य असें असतात. परंतु आत्मा या कोणत्याहि कोटींत पडत नाहीं. म्हणून तो म्हणावयाचा सिद्ध. आत्मा म्हणजे निजरूप आप्य म्हणजे बाहेरून कुठून मिळवावयाचें नाहीं. तें घट-पटवत् कार्य हि नव्हे. अशुद्ध खनिजांतून शोधून सोनें काढावें तसें तें संस्कार्य हि नाहीं अथवा दुधाचें दही बनवावें तसें तें विकार्य हि नव्हे. कोणती हि क्रिया त्यावर संभवत च नाहीं म्हणून तो म्हणावयाचा सिद्ध. अर्थात् सिद्ध म्हणजे (१) अक्रिय, (२) स्वतःप्रमाण आणि (३) साधन- निरपेक्ष स्वयंभू.

## ८२०. शत्रुजित्

शत्रून् जयति इति शत्रुजित्। जो शत्रूंना जिंकतो तो शत्रुजित्. शत्रु मित्र मध्यस्थ तटस्थ, त्याच प्रमाणें परका आणि आप्त असले संबंध संभवतात. आणि तद्नुसार त्यांचे परस्पर व्यवहार होत असतात. परंतु ज्याला देहाभिमान नाहीं आणि देह हि नाहीं त्या परमात्म्याला हे देहौपाधिक संबंध संभवत नाहींत. मग तद्नुसार होणारा व्यवहार तरी कुठून होणार? शत्रु च नाहीं, मग त्याला जिंकणार काय? हा युक्तिवाद बिनतोड आहे. परंतु देही जीवांच्या दृष्टीनें तो परमात्मा शत्रुजित् म्हटला जातो. तो स्वतः तसे जाणत नाहीं वा वागत नाहीं. सूर्य अन्धकाराचा हन्ता, तमोनुद्, म्हटला जातो. आणि तसा तो असल्याचें आपण प्रत्यहींच पहातच आहों. आणि म्हणूनच तर आपण त्याला तें नांव दिलें आहे. पण तुम्हीं जर सूर्याला म्हटलें कीं "बा सूर्या, तूं अन्धकारान्तक आहेस, तुझा जयजयकार असो!" तर तो म्हणेल, हे तुम्हीं काय बोलतां? अहो, अन्धकार कसा असतो

तेंच मुळीं मला ठाऊक नाहीं, आणि तुम्ही मला खुशाल अन्धकारान्तक म्हणून गौरवीत आहांत. कमाल आहे तुमची! जरा चिमूटभर अन्धकाराचा नमूना तरी दाखवा मला. परंतु तसें करणें कधीं तरी शक्य आहे का? तात्पर्य, शत्रुजित् इत्यादि सारीं त्या परमात्म्याचीं गौरवपर नामें आमच्या दृष्टीनें होत. त्याच्या दृष्टीनें तीं सर्व कल्पित आणि जल्पित मात्र होत. पण तें कसें हि असलें तरी आमच्या दृष्टीनें सर्व शंभर टक्के सत्य आहे. सूर्य अंधाराचा नाश करतो याबद्दल कोणाला कांहीं शंका आहे का? परमात्मा हि तसाच शत्रुजित् आहे. त्याच्या विरुद्ध जें जें उभें होईल तें तें परास्त होईल. त्याचा टिकाव लागावयाचा नाहीं. तो परमात्मा नरसिंहवत् हिरण्यकशिपूसारख्या शत्रूंना लीलया जिंकतो. त्या चित्सूर्यापुढें सारें अज्ञान त्याच्या विकार-रोग-शत्रु-गणांसह पार नामोहरम होतें. म्हणून तो परमात्मा शत्रुजित् म्हटला आहे. 'सत्यमेव जयते नानृतम्' या उपनिषद्वचनांत परमात्म्याचें हें शत्रुजितृत्वच स्पष्ट केलें आहे.

## ८२१. शत्रु-तापन

'शत्रुजित् शत्रुतापन' ही एक जोडी आहे. परस्पर-पूरक नामें आहेत हीं. दोहोंचें तात्पर्य एकच आहे. पण अर्थच्छटा भिन्न आहेत. रणांगणावर जो शत्रूंना जिंकतो तो म्हणावयाचा शत्रुजित् आणि एरव्हीं प्रत्यक्ष युद्ध चालू नसतांना ज्याचा शत्रूंना वचक आहे, धाक आहे, जरब आहे तो म्हणावयाचा शत्रुतापन. जो शत्रुपक्षाला अनुकूल, पोषक, सहायक वर्तन करतो तो शत्रुनंदन म्हटला जातो. कारण त्याच्या वागणुकीनें शत्रूंनाच आनंद होत असतो. त्याच्या उलट हा शत्रुतापन होय. त्याच्या नांवानें रूपानें गुणानें कर्मानें शत्रु सदैव रडत राहतो, कण्हत राहतो. परमात्मा हा असा शत्रुतापन आहे. सूर्योदयाबरोबर अंधार नेस्तनाबूद होतो. पण सूर्याचे नांव ऐकूनच अरुणोदय होत आहे असें पाहूनच, दिवाभीत आणि कोल्हीं आपलें तोंड काळें करतात. त्याप्रमाणें नित्यशुद्ध बुद्ध मुक्त परमात्मा प्रकट झाला म्हणजे अज्ञानाचें पुरतें वाटोळें होतें. पण दैवी गुणांचा अरुणोदय झाला तरी कामक्रोधादि मनोविकार, आणि तज्जनित शीत-ज्वरोन्मादादि शरीररोग व दंभ-हिंसादि सामाजिक अनर्थ दूर होतात. अशा प्रकारें तो परमात्मा शत्रुजित् तसा शत्रुतापन आहे. शत्रूंना अटकेंत ठेवणें, त्यांना धाकांत ठेवणें, त्यांना सेवक करून ठेवणें आणि शेवटीं त्यांना भक्त करून सोडणें म्हणजे त्यांना नाहींसें करणें होय. ज्ञानानें हृदय अनासक्त, बुद्धि स्थिर, मन नि:संकल्प, इन्द्रियें शान्त आणि शरीर निरोग व सत्प्रवृत होतें. आणि अशा प्रकारें तें अंतर्-गत म्हणजे मनोविकार बहिर्गत म्हणजे शरीरज रोग आणि त्यांचे प्रतिबिंबरूप सृष्टिगत व समाजगत शत्रु यांचें म्हणजेच आधि व्याधि उपाधींचें नियंत्रण नियमन आणि निर्मूलन करतें. परमात्मा हा असा सहज शत्रुतापन आहे. त्यासाठीं त्याला सायास नाहीं करावे लागत.

## ८२२. न्यग्रोध (न्यग्रोधोदुम्बर)

'न्यग्रोधोदुम्बरो ऽश्वत्थ:' हा चरण वृक्षवाची आहे आणि हे वट उदुंबर आणि अश्वत्थ वृक्ष पूज्य मानिले आहेत. पूज्य कां? कारण ते भगवद्-विभूति होत. भगवद्-विभूतीचें लक्षण काय? गीतेंत तें सांगून ठेवलें आहे. ''यद् यद् विभूतिमत् सत्त्वं श्रीमद् ऊर्जितमेव वा । तत् तदेवावगच्छ त्वं मम तेजोंश-संभवम्॥'' जिथें जिथें शोभारूप वा बलरूप ईश्वरी तेजाचा आविर्भाव झालेला आढळेल तें तें सत्त्व म्हणजे जडचेतन भूत विभूतियुक्त म्हणून जाणावें. हे तीन वृक्षविशेष हि असेच विभूति युक्त आहेत, म्हणून ते भगवद्रूप म्हणून इथें उल्लेखिलें आहेत.

न्युक् नीचैरपि रोहति इति न्यग्रोध: । जो वरून खालीं हि वाढतो पारंब्यांच्या रूपानें तो म्हणावयाचा न्यग्रोध. सर्व बीजें कंद कलमें अंकुर रूपानें

भूम्यादि कवचांचा उद्‌भेद करून वाढतात. परंतु वड हा असा वृक्ष आहे कीं तो वरून हि खालीं पारंब्या सोडून वाढतो. हे त्याचें वैशिष्ट्य लक्षून त्याला न्यग्रोध म्हटलें आहे. परमात्म्यांत हि हें वैशिष्ट्य आढळून येतें. तो सर्वोपरि आहे. आणि हा विश्वविस्तार त्याच्यापासूनच झालेला असून तो त्याच्या खालच्या बाजूला पसरलेला आहे. म्हणून तो हि न्यग्रोध म्हणावयाचा. गीतेंत १५ व्या अध्यायांत 'ऊधर्वमूलं अध:शाखं अश्वत्थं प्राहुरव्ययम्।' म्हणून याच न्यग्रोधाचें वर्णन आलें आहे. पण तिथें वडाची साल पिंपळाला चिकटविली गेली आहे. वडाचें रूप व अश्वत्याचें नाम असा प्रकार झाला आहे. पारंबी धरून जसा माणूस झाडावर चढतो तसें साधकानें या विश्वविस्ताराला धरून, शिडी प्रमाणें त्याचा उपयोग करून घेऊन त्याचें ऊर्ध्व-मूळ जो परमात्मा त्याला गांठावें, खालच्या विस्तारांत च गुरफटून राहूं नये हें तात्पर्य. पूर्वीं जंगलें विपुल व वस्ती तुरळक होती. तेव्हां कुठल्या गांवाला जायचें झाल्यास जंगलाचें अंतर कापून जावें लागत असे. अंतर कापणें हा प्रयोग हि जंगल तोडून मार्ग तयार करण्याचाच द्योतक आहे. परमात्मा हा तसा या संसाराटवीच्या पलीकडे आहे. त्याला भेटायला जायचें तर या संसाररूप जंगलाला वैराग्याच्या कुऱ्हाडीनें पार सोडून टाकलें पाहिजे असें गीतेचा १५ वा अध्याय सांगत आहे.

## ८२३. उदुम्बर

'न्यग्रोधो दुम्बर:' हीं दोन पदें आहेत. पण न्यगरोध या पदाचा विसर्ग लोप पावून पुढील पदाच्या उकाराशीं त्याचा संधि झाला आहे. नियमानुसार असा संधि निषिद्ध आहे. परंतु निरंकुशा: कवय: या न्यायानें इथें कविकुंजरानें व्याकरणाचा अंकुश जुमानलेला नाहीं.

न्यग्रोधाच्या पारंब्या हें जसें त्याचें वैशिष्ट्य आहे तसें उंबराचें हि वैशिष्ट्य आहे. इतर वृक्ष-वनस्पतींचीं फुलें व फळें वेगवेगळीं दिसतात पण उंबराचें फूल वेगळें दिसत नाहीं. त्याचें फूल आणि फळ एकच. त्याचें फळ पुष्पगर्भ असतें. फळाच्या आंत पुष्पराजि गुंडाळलेली असते. फूल आधीं येतें मागाहून फळ धरतें असा सृष्टिक्रम आहे; परंतु उंबरांत जणूं तो लुप्त आहे, गुप्त आहे. हें विश्व हि उंबरासारखेंच आहे. कोणत्या फुलापासून हें विश्वोदुम्बर उत्पन्न झालें आहे तें कळत नाहीं. तें हि पुष्पगर्भ आहे. त्याचें कारणभूत पुष्प, तो परमात्मा, त्याच्या पोटांत लपला आहे. विश्व दिसतें, पण त्याचें कारण तो परमात्मा दिसत नाहीं. म्हणून तो विश्वरूप परमात्मा उदुम्बर म्हटला आहे. उंबरांत जशीं असंख्य पुष्पकें गुप्त असतात, तशीं असंख्य विश्वें अव्यक्त परमात्म्याच्या पोटांत सांठवलेलीं आहेत. म्हणून तो स्वरूप परमात्मा उदुम्बर म्हटला आहे. परस्परांना गिळून प्रकटणारीं हीं स्वरूप-विश्वरूपें उदुम्बर रूपानें निर्देशिलीं आहेत. तें फळ म्हणाल तर फळ आहे, फूल म्हणाल तर फूल आहे. तें व्यक्तहि आहे आणि अव्यक्त हि आहे. तें व्यक्ताव्यक्त, आहे हि आणि नाहीं हि. तें व्यक्ताकार दिसणारें फळ नाहीं. अव्यक्त पुष्पच आहे ,कारणरूपच आहे. पण कार्यरूप नाहीं म्हटलें म्हणजे कारण तरी कसें म्हणतां येईल? म्हणून तें कारण हि नव्हे, अव्यक्त हि नव्हे. अशा प्रकारें कोणता हि क्रियाकारकवान् शब्द त्याचें यथार्थ वर्णन करूंच शकत नाहीं. हा सगळा आशय उदुम्बर पद व्यक्त करतें. तें उदुम्बरवत् पूर्ण आहे. म्हणून तो परमात्मा उदुम्बर म्हटला आहे. ''चरन् वै मधु विन्दते। चरन् स्वादु उदुम्बरम्'' जो गृहासक्त आहे त्याला हें मधु हें उम्बर मिळत नाहीं, जो प्रव्रजन करतो, ग्रामसेवा सोडून अरण्यसेवन करतो, त्यालाच तें मधु तें उंबर मिळते.

## ८२४. अश्वत्थ

अश्वत्थ म्हणजे पिंपळ. ''अश्वत्थ: सर्व वृक्षणाम्'' ह्या वचनानुसार पिंपळ हा भगवद्-विभूति आहे. लोकांत हि तसा त्याचा मोठा मान

आहे. कोणत्या गुणामुळें खरोखर हा भगवद् विभूति म्हणून गौरविला गेला आहे? वृक्षापासून १ फल २ पुष्प, ३ गृहोपयोगी काष्ठ, ४ इन्धन, ५ औषधिद्रव्य वा अन्य रंग तेल इत्यादि उपयुक्त पदार्थ आणि ६ छाया असे मुख्य लाभ होतात. परंतु अश्वत्थापासून यांच्यापैकीं एकहि गुण उत्कटत्वानें लाभतो असें म्हणतां येत नाहीं. फल-वृक्षांत आंबा, पुष्प-वृक्षांत बकुळ, काष्ठ-वृक्षांत शाक साग, इंधन-वृक्षांत खदिर, औषधी द्रव्यादि वृक्षांत निम्बचन्दनादि आणि छाया वृक्षांत वट सुप्रसिद्ध आहे. पिंपळ शोभा- वृक्ष म्हणावा तर तो तसा हि खास दिसत नाहीं. अशोक सुरू इत्यादि वृक्षांकडेच तो मान जाईल. मग पिंपळाचें वैशिष्ट्य कोणतें? त्याचें चलपर्णत्वच त्याचें वैशिष्ट्य आहे. त्याचीं पतंगाकार पानें इवल्याशा वायुलहरीने हि सळसळतात. तीं जणूं सदैव नाचतच असतात. तो जणूं साक्षात् चैतन्यच आहे. जिथें अश्वत्थ आहे तिथे वायुवीजन होत राहतें. शिवाय तो यज्ञीय वृक्ष आहे. त्याच्या समिधा यज्ञांत लागतात. आणि म्हणूनच तो विभूति म्हणून गौरविला आहे. आपल्या चंचल पर्णांनीं तो जणूं कुजबुजतो कीं हें जें सारें वैभव आहे तें चंचल आहे. तें अचंचल परमात्म्याच्या ठाईं समर्पण करून कृतार्थ व्हा. तो पदार्थ जीवनाचा आदर्श आहे. नित्यदान आणि त्याग याचा आदर्श आहे. तो रोजच्या रोज पानें गाळत असतो, काटक्या अर्पीत असतो. वैराग्याचा तो संदेष्टा आहे. तो आरण्यक आहे, ग्राम्य नव्हे. या अश्वत्थानेंच बुद्धाला बोध दिला आहे. म्हणून त्याला बोधिवृक्ष म्हणतात. खरोखर तो असा मुनि होय. देशिक होय. 'गुरोस्तु मौनं व्याख्यानम्' हें वचन त्याला किती अन्वर्थकतेनें लागू पडतें. असा हा अश्वत्थ परमात्म-रूप आहे. अश्वत्थ हें पद कपित्थ, गोष्ठ इत्यादि वर्गाचें आहे. कपित्थ म्हणजे कविठ कपीचें वसतिस्थान. गोष्ठ गाईचें तसें अश्वत्थ अश्वाचें.

## ८२५. चाणूरान्ध्रनिषूदन

"चाणूर नामानं अन्ध्रं निषूदितवान् इति चाणूरान्ध्र-निषूदनः" ज्यानें चाणूर नामक आन्ध्राला, अनार्याला, ठार केलें तो म्हणावयाचा चाणूरान्ध्रनिषूदन. हा ऐतिह्य वा पौराणिक स्वरूपाचा उल्लेख आहे. परमात्मा हा दिक्कालादिकांनीं अपरिच्छिन्न अव्यक्त अक्षर स्वरूप असतां त्याला अैतिहासिक व्यक्ति मानणें म्हणजे त्याला पदच्युत करण्यासारखेंच होय. हें अज्ञान होय, प्रमाद होय. गीतेंत ह्याचा स्पष्ट निषेध केला आहे.

**"अव्यक्तं व्यक्तिमापन्नं मन्यन्ते मां अबुद्धयः।**
**परं भावं अजानन्तो ममाव्ययमनुत्तमम्"**

अर्थात् परमात्मा हा परमार्थतः केव्हांहि व्यक्ति मानतां येत नाहीं. ह्या बरोबरच व्यक्तींना हि निव्वळ व्यक्ति मानणें हें हि चूकच आहे. कारण त्या व्यक्ति वस्तुतः अव्यक्तच होत. अव्यक्तांतूनच त्यांचा उद्भव झाला आहे आणि अव्यक्तांतच त्यांचा अंत होतो आहे. अशा स्थितींत मध्यंतरीं भासमान होणाऱ्या त्यांच्या आकाराला, व्यक्तीला खरेंच व्यक्त मानणें म्हणजे सत्याला मिथ्या मानणेंच नव्हे काय? राजाला रंक मानण्यासारखेंच हें आहे. अर्थात् अव्यक्त परमात्मरूप असलेल्या ह्या सर्व व्यक्तींना मातृ पितृ भ्रातृ रूप वा शत्रु मित्र तटस्थ मध्यस्थ रूप मानणें हा हि महान् मोह होय, प्रमाद होय. महान् अपराध आहे हा. अव्यक्त हा व्यक्तीभूत होतो असें मानणें अथवा व्यक्तमात्राला वस्तुतः अव्यक्त न मानणें असा हा दुहेरी प्रमाद आहे. उभयत्र वस्तूला वस्तु न मानतां अवस्तु मानणें हाच प्रमाद होतो. व्यक्ताला वस्तुतः अव्यक्त म्हणून न ओळखण्यांत परमात्म्याचा अवमान होतो. या तथ्याकडे गीतेनें लक्ष वेधून घेतलें आहे भगवान् म्हणतात "अवजानन्ति मां मूढा मानुषीं तनुमाश्रितम्। परं भावं अजाननन्तो मम भूत-महेश्वरम्।।" वरील आणि या श्लोकांत "परं भावं अजानन्तः" हा भाग समानच आहे. इथें चाणूरान्ध्रनिषूदन पदांत जरी व्यक्तांचा वास असला,

तरी असुर-हनन रूप स्थूल कर्म दिसत असलें तरी, तें सर्व अव्यक्तकृत आहे असें ओळखावयाचें. ''मयैवैते निहताः पूर्वमेव निमित्तमात्रं भव सव्यसाचिन्'' या वचनांत हाच भाव स्पष्ट केला आहे. विश्वांत जें कांहीं बरें वाईट होतें तें सर्व अव्यक्तकृत होय. व्यक्ति केवळ निमित्त होत. हा सर्व आशयच चाणूरान्ध्रनिषूदन पदांत निहित आहे. अव्यक्त मूळ असल्यामुळें त्याचें कर्म हें सदैव 'पूर्वमेव' असतें व्यक्तीचें वर्णन सदैव पिष्टपेषणच.

## ८२६. सहस्रार्चि

सहस्राणि अर्चीषि यस्य सः सहस्रार्चिः। ज्याच्या ज्वाला सहस्रावधि आहेत तो म्हणावयाचा सहस्रार्चि. तेजोनिधि सूर्य सहस्रांशु म्हटला जातो. अंशु म्हणजे किरण. परंतु हे त्याचे किरण कोणीं मोजले का आहेत? तथापि त्याला असंख्य-किरण-माली म्हणून सहस्रांशु म्हटलें जातें. सहस्रांशु आणि सहस्रार्चि एकच. पण अंशु पद मुख्यतः प्रकाशकिरणावाची आहे, तर अर्चिस् पद तापांशवाची आहे. अर्थात् सहस्रार्चि म्हणजे अमितदाहकशक्तिसंपन्न. आमच्या परिचयाचे तेजः-पुंज म्हणजे भूमीवर उपलब्ध होणारा अग्नि, अन्तरिक्षगत विद्युत् आणि आकाशस्थ सूर्य होय. या तिहींच्या हि ठाईं दाहकता आणि प्रकाशकता आहे आणि ती उत्तरोत्तर गणित श्रेष्ठीनें नव्हे, अगणित श्रेष्ठीनें वाढत गेली आहे. तेंच अगणितत्व सहस्र पदानें अभिप्रेत आहे. गीतेंत 'दीप्तानलार्कद्युतिं अप्रमेयम्' या वचनांत हाच आशय व्यक्त झाला आहे. त्यांत अनलार्क हा मध्यमपदलोपी समास आहे. अनलार्क म्हणजे 'अनलेन विद्युताच सहितः अर्कः' असा भाव. परंतु अग्नि विद्युत् सूर्य एकत्र केले आणि त्यांचें तें एकवटलेलें तेज दशशत-गुणित केलें तरी तें चित्तेजाची कधीं तरी आणि नखभर तरी बरोबरी करूं शकेल काय? तें शक्यच नाहीं. जड-चेतनांची बरोबरी कशी होणार? म्हणून गीता म्हणते—

**दिवि सूर्य सहस्रस्य भवेद् युगपदुत्थिता।**
**यदि भाः सदृशी सा स्याद् भासस् तस्य महात्मनः॥**

आमच्या जवळ त्या परमात्म-तेजाचें वर्णन करायला समर्थ शब्द नाहींत, म्हणून आम्ही त्याला सहस्रार्चि म्हणतों. सहस्र आणि अर्चि हे आमच्या आटोक्यांतील शब्द आहेत. त्यांनींच आम्ही त्या अप्रमेय तेजाची वाखाणणी करतों, ज्याचें ध्यान गायत्री मंत्रांत आलें आहे.

## ८२७. सप्त-जिह्व

''सहस्रार्चिः सप्त-जिह्वः सप्तैधाः सप्त-वाहनः'' हा श्लोकार्ध तेजस्तत्त्वाचें निरूपण करणारा आहे. पैकीं सहस्रार्चि हें पद त्या तेजाच्या अनन्तत्वाचें, सर्वातिशायित्वाचें वर्णन करतें, तर ''सप्तजिह्वः सप्तैधाः सप्तवाहनः'' हीं पदें त्याच्या विशिष्टत्वाचें वर्णन करतात. तो तेजोनिधि परमात्मा सूर्यरूपानें सहस्रार्चि आहे तर अग्निरूपानें तोच 'सप्त-जिह्वः सप्तैधाः सप्तवाहनः' हि आहे. अग्नीच्या सप्त जिह्वा उपनिषदांतील पुढील श्लोकांत दिल्या आहेतः

**काली कराली च मनोजवा च**
**सुलोहिता या च सुधूम्रवर्णा।**
**स्फुलिंगिनी विश्वरुची च देवी**
**लेलायमाना इति सप्त जिह्वाः॥**

काली म्हणजे शिव आणि शान्त स्वरूप अव्यक्त अग्निदेवाच्या अंकावर नाचणारी व्यक्ताकृति ज्वाला. कराली म्हणजे उग्ररूपिणी ज्वाला. मनोजवा म्हणजे अव्यक्त व अतिवेगवती ज्वाला. सुलोहिता म्हणजे तांबडी भडक निर्धूम ज्वाला. सुधूम्रवर्णा म्हणजे सधूम ज्वाला. स्फुलिंगिनी म्हणजे तडतडणारी ठिणग्या विखुरणारी ज्वाला. आणि विश्वरुची म्हणजे नाना वर्णांची ज्वाला, काळी निळी, हिरवी, पिवळी, लाल तांबडी आणि पांढरी ज्वाला. या सर्व ज्वाला देवी म्हणजे तेजोरूप होत. आणि लेलायमान म्हणजे

लपलपणाऱ्या होत, गतिमान होत. या सात जिभांनीं तो जातवेदा परमात्मा जातमात्राचें म्हणजे विश्वाचें वेदन म्हणजे रसन आणि ग्रसन करीत आहे. जिह्वा हें ज्ञानेंद्रिय आहे. त्याच बरोबर तें कर्मेंद्रिय हि आहे. जिह्वेच्या साहाय्यानें शब्दोच्चारण होतें. अग्नीच्या ज्वाला चटपट कडकड इत्यादि ध्वनि हि करतात. वेदाचे सात छंद ह्या हि सात जिभा च होत. त्यांच्या साहाय्यानें वेद बोलत असतात. वेद जगत्-प्रकाशक आहेत. म्हणून ते हि अग्निस्वरूपच होत. अशा प्रकारें अग्निस्वरूप व वेदस्वरूप वा उभयस्वरूप परमात्मा हा सप्तजिह्व होय.

## ८२८. सप्तैधाः

सप्त एधांसि यस्य सः सप्तैधाः। ज्याच्या सात समिधा आहेत तो यज्ञात्मा अग्नि सप्तैधा म्हणावयाचा. ''सप्त ते अग्ने समिधः सप्त जिह्वाः'' असें श्रुतीचें वचन आहे. तदनुसारच सप्तजिह्वः सप्तैधाः हीं नामें आलेलीं आहेत. वेद आणि यज्ञ म्हणजे मंत्र व तंत्र होत. ते परस्परसंबद्ध आहेत. मंत्र उच्चारावयाचा व तंत्र आचारावयाचें, मंत्राचा विनियोग नुसता 'जपे' नाहीं, तो 'क्रतौ यज्ञकर्मणि' च आहे. कारण 'वेदा हि यज्ञार्थमभिप्रवृत्ताः' आणि जप म्हणजे तरी काय आहे? ती हि एक सूक्ष्म क्रिया च आहे, तो हि एक यज्ञच आहे, ज्यांत यज्ञपुरुष मंत्रात्माच आहे. आणि हव्यवाट्, हवन होता आणि हवि इत्यादि सर्व यज्ञ-सामग्री मंत्रात्मक च आहे. म्हणूनच गीतेंत ''यज्ञानां जपयज्ञो ऽस्मि'' म्हटलें आहे. पण हा जप कसा करायचा? मनुष्य माळ हातीं घेतो, स्मरणी हातीं घेतो व एक एक मणि ओढीत असतो. यज्ञांत तीच क्रिया होते. मनानें ईश्वराचें स्मरण करायचें, मुखानें त्याचें नाम घ्यायचें आणि हातांनीं त्याला समर्पण करायचें अशी ही एक प्रक्रिया आहे. या प्रक्रियेचीं दोन प्रकट अंगें म्हणजे मंत्रोच्चार व हवन होत. छन्दोवाणी सप्तधा आहे तशी यज्ञाहुति सप्तधा आहे. सात समिधा अग्नींत होमिल्या जातात. कोणत्या ह्या सात समिधा? ''अर्कः पलाशः खदिरः, अपामार्गोऽथ पिप्पलः। औदुम्बरः शमी चैव समिधः सप्त कीर्तिताः॥'' रुई, पळस, खैर, आघाडा, पिंपळ, उंबर आणि शमी ह्या त्या समिधा. मंत्रानें देवाचें ध्यान करावयाचें, वाणीनें त्याचें स्तोत्र गावयाचें आणि हातांनीं यज्ञाग्नींत एक एक आहुति, एक एक समिधा समर्पावयाची. अशा प्रकारें आपलें अंतर्बाह्य सर्व जीवन ह्या परमात्म्याशीं निगडित करून टाकायचें. देहें प्राणें मनें त्या परमात्म्याशीं एकजीव होऊन जायचें. असें होण्याची जी प्रक्रिया तिचें नांव यज्ञ होय. या प्रक्रियेंत पंच प्राण आणि मन व बुद्धि त्या परमात्मतेजांत, त्या ब्रह्माग्नींत होमावयाचीं आहेत. म्हणून तो परमात्मा सप्तैधाः म्हटला आहे.

## ८२९. सप्त-वाहन

सप्त वाहनानि वाहाः यस्य सः सप्तवाहनः। अथवा सप्तकं वाहनं यस्य सः सप्तवाहनः। सात घोडे वा घोड्यांचें सप्तक हें ज्याचें वाहन आहे तो सूर्य म्हणावयाचा सप्तवाहन. या पासूनच सातवाहन हें राजाचें नांव आलेलें आहे. वेदांत तेजोनिधि परमात्म्याचें च परोपरीनें वर्णन केलेलें आहे. आणि म्हणून तो सप्तच्छन्दोमय वेद परमात्म्याचें वाहन होय. परमात्मा चित्सूर्य आहे आणि उपासनेसाठीं भौतिक सूर्य त्याचें प्रतीक म्हणून मानिला आहे. तो हि सप्तवाहन आहे. त्याचें सप्तवर्ण किरण हेंच त्याचें वाहन होय. सूर्य-किरण सप्तवर्णात्मक आहे म्हणून त्याला सप्तिः असें म्हणतात. आणि त्यावरून सप्तवाहन प्रमाणें सप्तसप्ति हें हि एक सूर्यनाम प्रसिद्ध आहे. पण सप्ति म्हणजे तर घोडा. किरण आणि घोडा यांच्यांत काय साम्य? किरण पुढें दौडतो, अति वेगानें दौडतो म्हणून तो घोडा होय. पवनः ''पवतां अस्मि'' 'वेगवतांत मी वायु' असें म्हटलें आहे. पण वेगवंतांत किरणाची बरोबरी दुसरा कोण करूं शकेल? मिनिटांत प्रकाशकिरण हजारों मैल जातो. म्हणून तो अति वेगवान् वाहन होय. तो आपल्या तेजोदेवतेला वाहून नेतो. जिथें किरण पोंचला तिथें किरणमाली हि पोंचला च आहे.

सप्तच्छन्दोमय वेद वा सप्तकिरणमाली सूर्य हा परमात्मस्वरूप आहेच पण त्याबरोबरच हा पुरुष म्हणजे जीव हि सप्तवाहन आहे. अंत:करण, प्राण आणि पंचेद्रियें हें सप्तक त्या जीवाचें वाहन होय. यांच्या योगें तो या विश्वांत संचार करीत आहे. म्हणून तो हि सप्तवाहन होय. वेद सूर्य जीव हे तिन्ही सप्तवाहन असून परमात्म्याचें प्रतीक होत. परमात्मा वस्तुत: सर्वव्यापी आहे. त्याला वाहन कशाला? तथापि तो आम्हांला सप्त वाहनांतून येऊन भेटतो म्हणून आम्ही त्याला सप्तवाहन म्हणतों इतकेंच.

## ८३०. अमूर्ति

न मूर्तिर् यस्य स: अमूर्ति:। ज्याला मूर्ति नाहीं तो अमूर्ति म्हणावयाचा. ज्याला मूर्ति नाहीं असे पदार्थ जगांत किती तरी आहेत. आकाश, मन, बुद्धि, अहंकार, प्रकृति आणि तिचे गुण हे सर्व अमूर्त भावच होत. त्यांना आकार नाहीं, अवयव नाहींत. जे सावयव आहेत तेच मूर्त वा मूर्तिमान् म्हणावयाचे. परमात्मतत्त्व हें साकार सावयव नाहीं. जें साकार सावयव असतें तें दृष्ट असतें. आणि ''यत् दृष्टं तत् नष्टम्'' असा सिद्धांत आहे. परमात्मतत्त्व अविनाशी असल्यामुळें तें दृष्ट नाहीं, साकार सावयव नाहीं. वायुहि दिसत नाहीं, पण तो सावयव आहे. त्याचे अवयव आम्हांला स्पर्श करतात. स्पर्श करतात त्या अर्थी तो सावयव आहे आणि साकार हि आहेच. त्याचा आकार दृग्गोचर होत नाहीं याचें कारण तो आकार स्थूल नसून सूक्ष्म तरल विरल आहे हेंच होय. वायु अच्छाय अनणु म्हणतां येणार नाहीं. त्याचा छायालेख घेतां येईल. त्याचा भार मोजतां येईल. आणि ज्याला भार आहे, त्याला अनणु म्हणजे निरवयव आणि अच्छाय म्हणजे अरूप कसें म्हणतां येईल. तेव्हां परमात्मा हा अमूर्ति आहे याचा वरवरचा अर्थ तो स्थूल नाहीं, गोचर नाहीं एवढाच घ्यावयाचा नाहीं. त्याचा खोल अर्थ तो अव्यक्त निर्‌गुण अक्षर स्वरूप आहे असा आहे. जो मूर्तिमान् म्हणजे सदेह आहे त्याला जन्म आहे, त्याला वासना आहे, त्याला कर्म आहे, त्याला कर्माचें पाप-पुण्य आहे. परमात्मा या सर्वांतून मुक्त आहे. परमात्मा जर अमूर्ति आहे, तर जे लोक त्याची मूर्ति कल्पितात आणि तिची पूजा करतात त्यांचें काय? ते काय भ्रांत म्हणावयाचे? परमात्मा हा वस्तुत: अव्यक्त अक्षर स्वरूप आहे ही ओळख जर त्यांना नसेल तर ते मूर्तिपूजक भ्रांतच होत. भगवंतानें त्यांच्या बद्दलच म्हटलें आहे : ''न तु मां अभिजानन्ति तत्वेनातश् च्यवन्ति ते'' परमात्म्याविषयीं लोकव्यवहाराबाबत ज्ञानदेवांनी योग्यच म्हटलें आहे : ''देव आहे जैसा तैसा नेणवे सहसा। भांबावला कैसा विश्वजनु''.

## ८३१. अनघ

परमात्मा अमूर्ति म्हणजे अदेह आहे. म्हणून त्याला जन्म नाहीं. जन्म नाहीं म्हणून कर्म हि नाहीं. आणि कर्म नाहीं तर त्या कर्माचें पापपुण्य कुठून असणार? असा परमात्मा हा अनघ म्हणजे निर्मल आहे, निर्‌लेप आहे. ईशोपनिषदांत त्याचें वर्णन : ''अकायं अव्रणं अस्नाविरं आणि अपापविद्धं'' अशा विशेषणमालिकेनें केलें आहे. शेवटीं अपापविद्ध म्हणून त्याला एका पदांत गौरविलें आहे. त्यांत त्याचें सारें वैशिष्ट्य आहे. कोणत्या हि पापाचा वेध त्यावर चालत नाहीं. पण जो देह धारण करतो तो जीव पापांतून सुटूं शकत नाहीं. जन्ममृत्युजराव्याधिदु:ख-दोष-परंपरेंत तो सांपडलाच आहे. तेव्हां या चक्रांत न सांपडण्याची जी युक्ति तेंच अनघत्व होय. आणि ती युक्ति म्हणजे आत्मज्ञान होय. म्हणूनच म्हटलें आहे गीतेंत:

**अपि चेद् असि पापेभ्य: सर्वेभ्य: पापकृत्तम:।**
**सर्वं ज्ञानप्लवेनैव वृजिनं संतरिष्यसि।।**

ज्यानें ज्ञानानें आपलें स्वरूप ओळखलें, ज्यानें आपण नित्य शुद्ध बुद्ध मुक्त-स्वभाव आहों हें अनुभवलें तो सर्व पापांतून सुटला. तो अनात्म देहाशी. आणि तत्कृत कर्मांशीं आणि कर्मजनित गतींशीं आपला कसलाहि संबंध मानत नाहीं. नट वा बहुरूपी ज्याप्रमाणें आपण घेतलेल्या राजाच्या सोंगानें सुखी व भिकाऱ्याच्या सोंगानें दु:खी होत नाहीं, पण त्या दोन्हींहि स्थितींत आत्मत्वानें सुखदु:ख रहित असतो तद्वत् तो सदैव स्वरूपस्थित असतो. त्याला सुखदु:खादि अनात्मभावरूप अघाचा स्पर्शच होत नाहीं. म्हणून परमात्मा हा अनघ होय. जो त्या निजरूप परमात्म्याचें स्मरण करतो तो हि त्या परमात्मपदाला, अनघ पदाला पोंचतो.

## ८३२. अचिन्त्य

परमात्मा हा 'अमूर्ति अनघ अचिन्त्य' असें एका चरणांत सूचित केलें आहे. त्यांत हेतु आहे. स्थूल सूक्ष्म आणि सुसूक्ष्म असा त्यांत क्रम दर्शविला आहे. तो अमूर्ति म्हणजे देहरहित आहे. देहरहित आहे इतकेंच नव्हे तर तो कर्मरहित हि आहे. आणि केवळ कर्मरहितच नव्हे तर तो अचिन्त्य म्हणजे गुणरहित हि आहे. त्याच्या विषयीं मनानें कसलें हि चिन्तन करतांच येत नाहीं. पाऱ्याचा रवा जसा चिमटींत धरतां येत नाहीं, त्याप्रमाणें आत्मतत्त्व मनानें स्पर्शतां येत नाहीं. तिथें मनाचा लाग नाहीं. म्हणून तो परमात्मा अचिन्त्य म्हणावयाचा. आपण एखाद्याचें नांव ऐकून असतों. त्याबरोबर त्याच्या आकृतीची वर्णाची मुद्रेची कल्पना आपण करतों. त्याचे गुण स्मरतों, कर्म वाखाणूं लागतो. अशा प्रकारें नामरूप-गुणकर्मांच्या योगें समग्र निरूपण आपण आपल्याशीं करीत असतों. तद्द्वारा च आपल्याला त्याचा परिचय होत असतो. परंतु परमात्म्याचा असा परिचय करून घेतां येत नाहीं कारण तो नामरूप-गुणकर्म-रहित आहे. जो जन्मतो त्याचें नामकरण होतें. ज्याला जन्मच नाहीं त्याचें नांव काय सांगणार? रूप काय वर्णणार? गुण काय सांगणार आणि पोवाडे ते तरी काय गाणार? म्हणून त्या परमात्म्याचें वर्णन श्रुति निषेधमुखानें करीत असते. तो अज आहे, अकाय आहे, अक्रिय आहे, अचिन्त्य आहे. ''एतद् वै तद् अक्षरं गार्गि ब्राह्मणा अभिवदन्ति अस्थूलं अनणु, अन्हस्वं अदीर्घं, अलोहितं, अस्नेहं अच्छायं अतम:! बृहदारण्यक ३।८।८ 'अमूर्तिरनघोऽचिन्त्य:' हा त्याचाच अनुवाद होय, संक्षेप होय. माणसाला जसें आपल्याच खांद्यावर बसतां येत नाहीं त्याप्रमाणें आत्मतत्त्व आपल्यालाच विषयत्वानें जाणूं शकत नाहीं. तें विषयी आहे. ''विज्ञातारं अरे केन विजानीयात्'' असें श्रुति आक्षेपिते. अचिन्त्य पदाचा तोच अभिप्राय आहे. परमात्मतत्त्वाविषयीं कुठला हि मनोव्यापार संभवत नाहीं ते सारे तिथें कुंठित होतात. तें परमात्मतत्त्व स्मरण-विषय होत नाहीं आणि विस्मरणविषय हि. असें तें अचिन्त्य आहे.

## ८३३. भयकृत्

भयं करोति इति भयकृत्। जो भिववितो तो भयकृत् म्हणावयाचा. आपल्याहून जो बलवान् आहे, जो आपला निग्रहानुग्रह करूं शकतो त्याचें भय वाटत असतें. चतुष्पदांना द्विपद मानवाचें भय आहे. मानव प्रजेला राजाचें, राजांना अधिराजाचें, अधिराजांना सम्राटाचें भय आहे. अशा प्रकारें वरिष्ठाचें भय कनिष्ठाला सर्वत्र आहे. सर्वांहून वरिष्ठ आणि बलिष्ठ तो परमात्मा आहे. सर्व सत्ता त्याची आहे. त्यामुळें तो सर्वांना भयकृत् म्हटला आहे. त्याच्या आज्ञेंत हें सारें विश्व वागत आहे. सगळे अधिकारी देव मानवादि त्याच्या दिलेल्या अधिकारानुसार वर्तत आहेत. त्याच्या धाकानें सूर्य नियमित प्रकाशतो, वारा वाहतो, मेघ वर्षतात, भूमि पिकते. सर्वांचा स्वभाव हा ईश्वरदत्त अधिकार आहे. त्याचें अतिक्रमण कोणी करूं शकत नाहीं, जो करील त्याला भय आहे.

वर्णाश्रम-धर्म हि स्वाभाविक आहेत. जो त्यांचें अतिक्रमण करील त्याला भय आहे. यालाच अनुलक्षून म्हटलें आहे "स्वधर्मे निधनं श्रेय: परधर्मो भयावह:". अर्जुनाला गीतेंत भगवंतानें युद्धाचें घोर कर्म करायला नाहीं सांगितलें, त्याला स्वधर्म पाळायला सांगितलें आहे. अर्जुन स्पष्ट आज्ञा मागतो—

"ज्यायसी चेत् कर्मणस् ते मता बुद्धिर् जनार्दन।
तत् किं कर्मणि घोरे मां नियोजयसि केशव।।
व्यामिश्रेणेव वाक्येन बुद्धिं मोहयसीव मे।
तद् एकं वद निश्चित्य येन श्रेयो ऽहमाप्नुयाम्।।

याचें उत्तर भगवंतानें शेवटीं दिलें आहे:

यदहंकारमाश्रित्य न योत्स्य इति मन्यसे।
मिथ्यैव व्यवसायस् ते प्रकृतिस् त्वां नियोक्ष्यति।।
स्वभावजेन कौन्तेय निबद्ध: स्वेन कर्मणा।
कर्तुं नेच्छसि येन् मोहात् करिष्यस्यवशो ऽपि तत्।।
ईश्वर: सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति।
भ्रामयन् सर्व भूतानि यन्त्रारूढानि मायया।
तमेव शरणं गच्छ सर्वभावेन भारत
तत्प्रसादात् परां शान्तिं स्थानं प्राप्स्यसि शाश्वतम्।।

तात्पर्य, ईश्वरदत्त स्वभाव ही ईश्वरी आज्ञा आहे. तिला अनुसरून वागलें पाहिजे. त्या स्वभावरूप ईश्वराज्ञेचें भय सर्वांना आहे. त्यांतून कोणीहि सुटूं शकत नाहीं. म्हणून तो परमात्मा भयकृत् होय.

### ८३४. भय-नाशन

भयं नाशयति इति भयनाशन:। जो भय नाहींसें करतो तो भय-नाशन म्हणावयाचा. परमात्मा केवळ भयकृत् च नाहीं, भयनाशन हि आहे. जो परमात्म्याच्या आज्ञेंत वागतो त्याचें भय तो परमात्मा नाहींसें करतो. परमात्म्याची आज्ञा कोणती?

सर्वकर्माणि मनसा संन्यस्याध्यात्मचेतसा।
निराशीर् निर्ममो भूत्वा युध्यस्व विगतज्वर:।।

सर्वकर्तृत्व त्या परमात्म्याचें आहे हें ओळखून कोणता हि स्वार्थ मनांत न आणतां भागास आलेलें कर्तव्य माणसानें करीत असावें. त्या कर्माच्या फळाची आशा धरूं नये. अशा प्रकारें निष्काम स्वधर्माचरण केल्यानेंच भय-नाश होतो; जो कर्मच करणार नाहीं असा हेका धरील, अथवा कर्मफलाच्या लोभानेंच कर्म करील त्याला भय आहे. "यज्ञार्थात् कर्मणोऽन्यत्र लोकोऽयं कर्म-बन्धन:". तो कर्तृत्व-भोक्तृत्वाच्या परधर्मांत सापडेल. कर्तृत्व-भोक्तृत्व-रहितता हा स्वधर्म आहे, आत्म-धर्म आहे. कर्तृत्वभोक्तृत्व हा अनात्म-धर्म आहे. परधर्म आहे. तें ओझें जो आपल्या डोक्यावर घेतो तो कष्टी झाल्यावांचून कसा राहील? पण जो हें परक्याचें ओझें उचलतच नाहीं त्याला तें डोक्यावरून उतरविण्याचे हि श्रम होत नाहींत. ह्याचेंच नांव संन्यास. हा मनसा करावयाचा आहे. आणि हा सर्वकर्म-संन्यास आहे. त्यांत निवडानिवड नाहीं. कांहीं कर्मे करायचीं, कांहीं टाकायचीं, असा प्रकार नाहीं. हा कर्ममात्राचाच संन्यास आहे. ही स्थूल क्रिया नाहीं. वस्तूचें दान, फलवासनेचा त्याग आणि सर्वकर्मांचा संन्यास ही स्थूल, सूक्ष्म आणि सूक्ष्मतर प्रक्रिया आहे. वस्तुत: संन्यास हा साक्षात्कार आहे. ती मुळीं क्रियाच नाहीं. हा आत्मसाक्षात्कारच भयनाशन आहे. कारण त्यानंतर द्वैत उरत नाहीं. "तत्र को मोह: क: शोक: एकत्वं अनुपश्यत:। द्वितीयाद् वै भयं भवति। भयं द्वितीयाभिनिवेशत: स्यात्" इत्यादि वचनें अद्वैताचें, एकत्वाचें अभयत्व प्रतिपादितात. द्वैतरूप अज्ञानच भय आहे आणि तें आत्मज्ञानानें नाश पावतें. म्हणून ज्ञानस्वरूप परमात्मा हा भयनाशन होय.

### ८३५. अणु

अणुर बृहत् कृश: स्थूलो,
गुणभृन् निर्गुणो महान्।

या श्लोकांत परस्पर विरोधी विशेषणांच्या जोड्या आल्या आहेत. त्या परमात्म्याची व्यापकता दाखविण्यासाठीं होत. तो अणु म्हणजे अतिसूक्ष्म आहे

आणि त्याच बरोबर तो बृहत् म्हणजे अति विशाल हि आहे. तो कृश आहे आणि त्याचबरोबर तो स्थूलहि आहे. तो गुणभृत् आहे त्याच बरोबर निर्‌गुण आहे, सारांश, त्याला कोणत्याहि एकाच विशेषणानें विशिष्ट करणें म्हणजे त्याचें सर्वात्मकत्व हिरावून घेण्यासारखें आहे. म्हणून त्याला परस्पर विरोधी विशेषणांच्या जोड्यांनीं आळवून शेवटीं महान् म्हणून संबोधिलें आहे. हा महान् एकेरी बृहत् पदानें विशिष्ट महान् हून वेगळा आहे. यांत अणुबृहत् दोहोंचा हि समावेश आहे. अणूचा निषेध करणारा बृहत् नाहीं हा. तसा कोणाचा हि निषेध जर तो करील तर तो संकुचित होऊन अव्यापक होऊन महान् या पदवीस पात्र होणार नाहीं. सर्व निषेधांचा निषेध करून शेष राहणारा असा हा अशेष आहे. त्यालाच महान् म्हणावयाचें. हा महान् इतका महान् आहे कीं तो आपल्या अतिसूक्ष्मत्वामुळेंच आणुत्वामुळें आकळतां येत नाहीं. म्हणून उपनिषदांनी म्हटले आहे :

''अणोः अणीयान्'' तो परमात्मा अणूहून अणु आहे. ''किती अणु, किती सूक्ष्म'' असें विचाराल तर म्हणावें लागेल कीं तो अनणु आहे. अणूचा आशय हाच. आतां त्याला तुम्ही अणु म्हणा कीं बृहत् म्हणा, तो तुमच्या आकलनांत येत नाहीं आणि म्हणून तो महान् म्हणावयाचा. गीतेनें हाच भाव ''सूक्ष्मत्वात् तद् अविज्ञेयम्'' या शब्दांत व्यक्त केला आहे.

## ८३६. बृहत्

बृहत् म्हणजे विशाल, ऐसपैस, लांबरुंद. जें व्याप्य आहे तें बृहत् म्हणतां येत नाहीं. व्यापकालाच बृहत् म्हणतां येईल. आकाश असें बृहत् आहे. त्यानें सर्व व्यापिलेलें आहे. तें असीम आहे. परमात्मा हा तसा व्यापक आहे. तो सर्वांच्या आंत बाहेर व्यापून आहे. आकाश शब्दगुण आहे. म्हणजे त्याला व्यावर्तक व्यक्तित्व आहे. परंतु परमात्मा हा अव्यक्त आहे, निर्‌गुण आहे. त्यामुळें तो सर्वांहून व्यापक आहे. त्याला व्यापील असें दुसरें कोणतें हि तत्त्व नाहीं. म्हणून तोच एक बृहत् होय. अणु जसा सूक्ष्मत्वामुळें पकडतां येत नाहीं, आकळतां येत नाहीं, तसा बृहत् हि त्याच्या अतिविशालत्वामुळें पकडतां येत नाहीं, आकळतां येत नाहीं. जसा पाऱ्याचा रवा चिमटीनें धरतां येत नाहीं, तसा डोंगर हि कवट्यांत धरतां येत नाहीं. सूक्ष्म म्हणून वा स्थूल म्हणून त्याची इयत्ता वा परिमिति तुम्हांला करतांच यावयाची नाहीं. म्हणून म्हटलें आहे:

''अणोः अणीयान्, महतो महीयान्.'' परस्पर-विरोधी विशेषणांनीं विशेषिलेली ही वस्तु, हें आत्मतत्त्व एकच आहे. तें एकसमयावच्छेदें करून अणोः अणीयान् नि महतो महीयान् आहे. पहा, आकाश हें किती सूक्ष्म आहे आणि त्याच बरोबर तें किती विशाल हि आहे ? या दोहोंत कांहीं विरोध येत नाहीं. त्याप्रमाणें परमात्मतत्त्व हि सर्व परस्पर-विरुद्ध विशेषणांची संवाद-भूमि आहे. ऋषींच्या आश्रमांत वाघ आणि गाय सहज वैर विसरून एकत्र नांदतात त्याप्रमाणें या परमात्म्याच्या ठाईं सर्वांचे सर्व विरोध मावळतात. सर्व विश्व इथें एकनीड होतें. ''यत्र विश्वं भवत्येकनीडम्'' सर्वांचें तें माहेर आहे. तो परमात्मा इतका विशाल आहे, इतका बृहत् आहे कीं कोणाला हि तिथें मतजाव नाहीं, कोणाचा हि निषेध नाहीं. तिथें सर्वांचेंच स्वागत आहे आणि समान स्वागत आहे.

## ८३७. कृश

कृशता हा दोष म्हटला जाईल. पण ती कृशता जर सत्कारणीं आली असेल तर तो गुणच ठरेल. गुरूपासकाचें वर्णन करतांना ज्ञानदेवांनीं म्हटलें आहे कीं तो ''गुरुदास्यें कृश, गुरुप्रेमें सपोष'' असतो तो आचार्योपासक गुरुदास्यानें कृश झालेला दिसतो, पण त्याच बरोबर गुरुप्रेमानें वस्तुतः तो पुष्ट झालेला हि असतो. बाह्यतः तो कृश दिसला तरी ती त्याची

कृशता वस्तुत: आंतरिक पुष्टिच असते. तपस्येनें देह कृश होतो, पण वस्तुत: ती आत्मबलाची पुष्टिच होय. ज्ञानदेवांनीं म्हटलें आहे:

**जयाचे मनीं आलस्य। देहीं अति कार्श्य**
**शमदमीं सौरस्य। जयासि गा॥**

परमात्म्याचा भक्त कसा असतो? देहगेहाच्या विषयीं त्याच्या मनांत अति आळस भरलेला असतो आणि तत्परिणामीं त्याचा देह अति कृश होतो. पण इकडे जसजशी त्याची कृशता वाढत असते तसतशी शमदमादि षट्संपत्ति वाढत जाते. त्याच्या त्या आत्मसंपत्तीचें जणूं मापच त्याची ती कृशता असते. भक्ताची, दासाची ही स्थिति तर स्वत: परमात्म्याची ती काय वर्णावी? तो इतका कृश आहे कीं त्याचा मुळीं देहच लोप पावला आहे, तो विदेहच आहे. ज्या अज्ञानापासून देह संभव व्हायचा त्या उपादानाचाच अभाव असल्यामुळें तो कृश आहे. लाकडाची बाहुली लाकूडच नसल्यास जितकी कृश होईल तितका तो कृश आहे.

## ८३८. स्थूल

परमात्मा इतका कृश आहे कीं तो विदेहच म्हणावा लागतो. तसा तो इतका स्थूल आहे कीं तो विश्वात्मकच म्हणावा लागतो. विश्वाहून स्थूल दुसरें काय बरें आहे? आणि तें विश्व परमात्म्याहून जर वेगळें म्हणतां येत नाहीं तर तो परमात्मा स्थूल स्थविष्ठ कसा नव्हे? चिमट्याच्या दोन भुजा असतात. त्या भुजांनीं तो वस्तु पकडतो. अणु बृहत्, कृश स्थूल, गुणभृत् निर्गुण ह्या जोड्या हि तशाच पकडीच्या आहेत. त्यांच्या पकडींत सर्व वस्तु पकडल्या जातात. एकाच तीराची जशी नदी संभवत नाहीं त्या प्रमाणें ही सृष्टिरूप नदी हि ह्या जोड्यांवाचून संभवत नाहीं. सर्व वस्तु उभयगुण-संपुटित आहेत. एखादा मनुष्य कृश नाहीं स्थूल नाहीं, जसा असावा तसा बेतशीर आहे, असें म्हटलें तरी तें कृश स्थूल शब्दांच्या साहाय्यानेंच म्हणावें लागतें. त्या अर्थाला डावलून तो भाव प्रकट करतांच येत नाहीं. अशी ही सर्वंकष पकड हेंच त्या परमात्म्याचें स्वरूप. जो सर्वात्मक आहे, त्याच्या पकडींतून कोण कसा सुटणार? परमात्म्याची ही व्याप्ति, ही विश्वात्मकता दाखविण्यासाठींच त्याला जोडीनें अणु-बृहत्, कृश-स्थूल, गुणभृत्-निर्गुण म्हटलें आहे. तोच सर्व आहे, सर्व तोच आहे, हें अन्वयव्यतिरेकानें प्रत्ययास आणून देणें हें आहे शास्त्राचें प्रयोजन. त्याच्या सिद्धीसाठीं शास्त्र परोपरीनें झटत असतें. वेद उपनिषदें गीता ब्रह्मसूत्रें भारत भागवतादि इतिहास पुराणें यांनीं आपआपल्या परीनें हाच एक सत् चा संदेश उपदेश आदेश दिला आहे. सहस्रनाम हि तोच सहस्रधा देत आहे.

## ८३९. गुणभृत्

गुणान् सत्त्व-रजस्-तमांसि बिभर्ति इति गुणभृत्। जो सत्त्व रज आणि तम हे तीन गुण धारण करतो तो गुणभृत् म्हणावयाचा. सृष्टीची उत्पत्ति स्थिति आणि लय परमात्मा रज सत्त्व आणि तम या त्रिगुणांचा अवलंब करून करीत असतो. सृष्टीच्या उत्पत्तिकाळीं रज:प्रधान ब्रह्मदेवाचें रूप धारण करून तो हा सृष्टि-विसर्ग करतो. सत्त्वप्रधान विष्णु रूपानें त्या सृष्टि-विसर्गाचें तो पालन करतो आणि प्रलय काळीं तम:प्रधान रुद्र रूप धारण करून तो सृष्टीचा संहार करतो, या विसर्गाचें विसर्जन करतो. अशा प्रकारें गुणाधारें हीं सृष्टीचीं स्थित्यंतरें सतत चालूच असतात. एक लाट उठते, ती कांहीं काळ टिकते आणि शेवटीं ती निमते. हा जसा अखंड क्रम समुद्रांत चालला असतो. तसा प्रकृतींत गुणांचा हा सृष्ट्युत्पत्ति स्थिति लय रूप खेळ अखंड चालू आहे. आणि तटस्थ परमात्मा कमरेवर हात ठेवून तो केवळ पहात आहे. वस्तुत: तो गुण-कर्मांना या म्हणत नाहीं कीं जा म्हणत नाहीं. तीं गुण कर्में आपल्या स्वभावानुसार येत असतात आणि जात असतात. परंतु सगळीं कर्में गुणाधीन आणि गुण प्रकृती-अधीन आणि ती

आत्माश्रित असल्यामुळें त्या आत्म्याला गुणभृत् म्हणजे सूत्रधार म्हटलें जातें. हा एक आरोप आहे. तमोगुणाची ऊर्मि येते तेव्हां मी निद्राधीन होतों. ती ओसरते तेव्हां सत्त्वाधीन होऊन जागृतीच्या अधीन होतों. ती सत्त्वोर्मिहि क्षीण होऊन रजोगुणोर्मीसरशीं मी नाना कर्मे करूं लागतों. अशा प्रकारें सारें कर्तृत्व प्रकृतीच्या गुणांचें आहे. आत्मा अकर्ता आहे. तरी आपण मी झोपतों, मी जागतों, मी काम करतों असें मिथ्या आरोपण करीत असतों. त्याला अनुसरूनच परमात्मा गुणभृत् म्हणावयाचा. एरव्हीं तो तर निर्‌गुण आहे. पुढील पद तेंच सांगत आहे.

## ८४०. निर्‌गुण

निर्‌गुण म्हणजे गुणशून्य. मागें शून्य म्हणून एक नाम आलें आहे. त्याचा आशय हाच. तो परमात्मा आत्मपूर्ण आणि गुणशून्य आहे. विश्वांत जी काय घडामोड होते ती प्रकृतीच्या गुणानुसारच होत असते. ह्या सगळया जगद्व्याल घडामोडींचा ज्याच्यावर कांहीं एक परिणाम होत नाहीं, तो परमात्मा निर्‌गुण म्हणावयाचा. वायूच्या गुणानें समुद्रांत लहान मोठे तरंग उठतात, परंतु आकाशांत ते उठूं शकत नाहींत. कारण तें आकाश जल-शून्य आहे. अति सूक्ष्म आहे. परंतु शब्दरूप स्पंद तिथें हि उठतात. परमात्मा त्या आकाशाहून हि सुसूक्ष्म आहे. त्याच्या ठाईं इवलीशी हि हालचाल कोणत्या हि कारणानें होऊं शकत नाहीं. ती हालचाल, तो स्पंद, तो विकास सर्व गुण-जनित होय. आणि आत्मतत्त्व हें केवळ निष्क्रिय नि:स्पंद निर्‌विकार आहे. कारण तें गुणशून्य आहे. गुण आणि त्यांचीं कर्मे यांचा संपर्क त्याला केव्हांहि होऊं शकत नाहीं. तें जर गुणविशिष्ट झालें तर तें जगांतील इतर वस्तूं प्रमाणेंच नश्वर ठरेल. पण तें तर शाश्वत आहे. तें षड्भाव-रहित आहे. ''जायते अस्ति वर्धते विपरिणमते अपक्षीयते म्रियते'' असें म्हणतां येत नाहीं. आणि याचें कारण तें निर्‌गुण आहें, प्रकृतीच्या गुणांच्यापलीकडचें आहे, हें होय. गुणांचें साम्राज्य सर्वत्र आहे, त्यांतून देव दानव मानव कोणीच सुटलें नाहीं. ''न तद् अस्ति पृथ्वियां वा दिवि देवेषु वा पुनः । सत्वं प्रकृतिजैर् मुक्तं यद् एभि : स्यात् त्रिभिर् गुणै : ।'' हे गुण म्हणजे च यमपाश होत. यांतून मुक्त फक्त एक आत्मतत्त्व आहे. त्या गुणाधार परंतु निर्‌गुण आत्मतत्त्वाचें नमन महिम्नांत असें केलें आहे :

**बहलरजसे विश्वोत्पत्तौ भवाय नमोनम:**
**प्रबलतमसे तत्‌संहारे हराय नमोनम:।**
**जनसुखकृते सत्त्वोरिक्तौ मृडाय नमोनम:**
**प्रमहसि पदे निस्‌त्रैगुण्ये शिवाय नमोनम:।।**

## ८४१. महान्

परमात्मा हा निर्‌गुण असल्यामुळें तो महान् होय. जें सगुण आहे तें सक्रिय आहे, जें सक्रिय आहे तें साकार आहे, साकार आहे तें सावयव आहे आणि सर्व सावयव हें षड्भाव-ग्रस्त आहे. अशा सदोष व विकारशील वस्तूला महान् म्हणतां येत नाहीं. तर जें निर्‌दोष आहे आणि निर्‌विकार आहे, तेंच महान् होय. म्हणून त्यालाच ब्रह्म अशी संज्ञा आहे. वडील महान् म्हटले जातात, मुलगा लहान म्हटला जातो. कारण हें महान् होय, कार्य हें सदैव लहानच म्हणावयाचें. हा व्यक्त विश्वाकार किती हि मोठा दिसत असला तरी तो त्या अव्यक्ताहून लहान च म्हणावा लागेल. कारण तें अव्यक्त व्यक्ताचें मातृस्थान आहे. आणि तें अक्षर पितृस्थान आहे. त्या अक्षराच्या पलीकडे दुसरें कोणतें हि तत्त्व नाहीं म्हणून तेंच महान् होय. तें सर्वाधार असल्यामुळें त्यालाच 'महतो महीयान्' म्हटलें आहे. हें विश्व पांचभौतिक आहे. पृथ्वी आप तेज वायु आकाश हीं तीं पांच भूतें होत. यांतील पहिलेंच तत्त्व पृथ्वी म्हणजे मोठें म्हटलें आहे. परंतु या पांचींत तें सर्वांत लहान आहे. उत्तरोत्तर तत्वें मोठमोठीं आहेत. आकाश त्या सर्वांत मोठें आहे. परंतु मनोबुद्धि-अहंकार

हीं तत्वें त्या आकाशाहून हि मोठीं आहेत. कारण तीं सुसूक्ष्म आहेत. परंतु हीं तत्त्वें किती हि सूक्ष्म आणि विशाल असलीं तरी तीं गुणजनित आहेत, गुणात्मक आहेत. प्रकाश-प्रवृत्ति-मोह-वश आहेत. म्हणून तीं समर्याद आहेत, सीमित आहेत. आत्मतत्त्वच गुणातीत असून तेंच एक महान् या पदवीस पात्र आहे. इतर तत्त्वें सापेक्ष महान् आहेत, पण हें आत्मतत्त्व निरपेक्ष केवल महान् होय.

## ८४२. अधृत (अ-धृत, 'अ'-धृत)

न धृतः अधृतः । जो कोणीं धरलेला नाहीं तो म्हणावयाचा अधृत. परमात्मा हा सर्वाधार होय. परंतु स्वतः तो निराधार आहे. निराधार म्हणजे ज्याला आत्मभिन्न दुसऱ्या कशाचा आधार नाहीं असा. अधृतचा हा आशय स्पष्ट करण्यासाठींच पुढील पद 'स्व'-धृत आलें आहे. स्वधृत म्हणजे स्वाधार. भागवतांत म्हटलें आहे-

"विश्वास कारण, अकारण जें स्वतः पैं" परमात्मा हा ह्या विश्वाचें कारण आहे खरा, परंतु त्याला कोणी कारणभूत नाहीं. तो अकारण आहे, स्वयंभू आहे.

परमात्मा हा महान् आहे, कारण तो अधृत आहे, स्वधृत आहे. जो परतंत्र आहे, पराधीन आहे तो महान् कसा म्हणतां येईल? 'महान् अधृतः स्वधृतः' ही आनुपूर्वी हा आशय व्यक्त करीत आहे.

"अ" नें धृत तो अ-धृत असा हि अर्थ करतां येईल. अ हें नञ् समासाचें द्योतक व्यावृत्ति-कारक अव्यय आहे. त्यानें धरलेला, म्हणजे अतद्-व्यावृतीनें जो निश्चित केलेला, तो परमात्मा अ-धृत म्हणावयाचा. वेदोपनिषदांत ठाईं ठाईं नेति नेति गान गाइलें आहे:—

**एतद् वै तद् अक्षरं गार्गि! ब्राह्मणा अभिवदन्ति अ-स्थूलं, अन्-अणु, अ-ह्रस्वं अ-दीर्घं, अ-लोहितं, अ-स्नेहं, अच्छायं, अ-तमः। बृहदारण्यक ३।८।८**

यांतील अ-स्थूलादि प्रत्येक पद अ-घटित आहे, अ-धृत आहे. आणि तें ब्रह्मवाचक आहे. म्हणून हि तो परमात्मा अ-धृत म्हणावयाचा. "अक्षराणां अकारोऽस्मि" या भगवद्वचनाप्रमाणें अ ही अक्षर-विभूति आहे. सर्व वर्णमालेचा तो आदि आहे. आणि म्हणून समस्त वाङ्मयाचा हि. त्यानें म्हणजे पर्यायानें वाङ्मयानें धारण केलेला म्हणून हि परमात्मा हा अ-धृत म्हणावयाचा. अशा प्रकारें अधृत पद त्रिधा व्युत्पादिलें जाईल : (१) न धृत तें अधृत, (२) व्यावर्तनानें धृत तें अधृत आणि (३) शब्द-शक्तीनें धृत तें अ-धृत.

## ८४३. स्वधृत

स्वेन, आत्मना, धृतः इति स्वधृतः। आपणच आपल्याला धारण करतो म्हणून तो परमात्मा स्व-धृत आहे म्हणावयाचा. धारक तत्त्वें अनेक आहेत. पृथ्वी ही हि एक धारकच आहे. सर्व जीवांची ती धात्रीच होय. म्हणून तिला धरणी, धरा म्हणतात. परंतु ती नुसती धारकच नाहीं, धृत हि आहे. तिला शेषानें धारण केलें आहे. हा व्यक्त विश्वकदंब ज्या अव्यक्ताच्या भूमिकेवर फुलला आहे ती अव्यक्त भूमिकाच तो शेष होय. आणि तोच स्वधृत होय. त्याला दुसऱ्या कुणीं धारण केलेलें नाहीं. तो स्वाधार आहे. तो स्वप्रतिष्ठित आहे. अशेष व्यक्ताकार मावळल्या नंतर जो शेष राहतो तो अव्यक्त संज्ञक परमात्माच अधृत आणि स्वधृत होय. त्याला दुसऱ्या कोणाचा आधार नाहीं, पण तोच सर्वांचा आधार आहे. पिंड-ब्रह्मांडांत सर्वत्र हेंच आढळून येतें. इंद्रियांचा आलंब मन. मनाचा आलंब प्राण. प्राणाचा आलंब जीवात्मा. हें झालें पिंडांत-ब्रह्मांडांत हि तेंच. सर्व भूतांचा आलंब महाभूतें. पंच महाभूतांचा आलंब प्रकृति. प्रकृतीचा आलंब परमात्मा. आत्मा-परमात्मा हा दुसऱ्या कोणावर अवलंबून नाहीं. तो स्वाधार, स्वालंब आहे. जगांतील सर्व तत्वें दुसऱ्या तत्त्वांना

आधार देतात आणि स्वत: हि दुसऱ्या तत्वांचा आधार घेतात. तीं त्या आपल्याहून सुसूक्ष्म व व्यापक तत्त्वांच्या ठाईं प्रतिष्ठित असतात. पण परमात्मतत्त्वच एक असें आहे कीं जें 'स्वे महिम्नि' प्रतिष्ठित आहे. तो परमात्मा आपल्याच बळावर प्रतिष्ठित आहे. तो पराश्रित नाहीं, स्वाश्रित आहे. म्हणून तो म्हणावयाचा स्वधृत.

स्वधृतचा आणखी हि एक वेगळा पण विरोधी नसलेला अर्थ संभवतो. स्व म्हणजे स्वजन. स्वजनांनीं म्हणजे भक्तांनीं जो आपल्या हृदयांत धरला आहे तो भगवान् स्वधृत होय. अभक्तांना तो कळतच नाहीं मग आकळणार कुठून? वश होणार कुठून?

## ८४४. स्वास्य

सु शोभनं आस्यं मुखं यस्य स: स्वास्य:। ज्याचें आस्य म्हणजे मुख शोभन आहे तो म्हणावयाचा स्वास्य. जे पराधीन असतात त्यांची मुखमुद्रा शोभन राहूं शकत नाहीं. कारण त्यांना सदैव भय असतें. परंतु जे स्वाधीन आहेत, त्यांना तृष्णा भय क्रोध या विकारांना बळि पडावें लागत नाहीं. परमात्मा हा संपूर्ण स्वधृत स्वाधीन असल्यामुळें त्याला कशाची तृष्णा नाहीं. तृष्णा नाहीं म्हणून तृष्णा-विषय मिळविण्याची चिंता, मिळाल्यावर तो जाईल वा कमी होईल याचें भय, गेल्यास वा कमी झाल्यास क्रोध इत्यादि विकारांचा स्पर्श नाहीं. असा केवळ निर्विकार असल्यामुळें तो सदैव प्रसन्नवदन असतो. अनात्म विषयांचें चिंतन करणारा जीव पराधीन होतो. संग, काम, क्रोध, संमोह, स्मृतिविभ्रंश आणि बुद्धिनाश अशा अनर्थ-परंपरेला तो प्राप्त होतो. त्याचें मुख प्रसन्न राहणार कसें? तें अंतरांतील नाना विकारांसरशीं नानावर्णाकृति वेडेंविदरें होत राहतें. राक्षसांचीं तोंडें सदैव वेडीविदरीं भयानक असतात. कारण राक्षसांचीं तोंडें म्हणजे काम, क्रोध, लोभांचे पुतळेच. उलट देव सर्व सुमुख सुंदर. कारण दैवी गुणांचे ते अवतारच. परमात्मा तर केवळ निर्दोष सकळ गुणालंकरण. मग तो स्वास्य कसा बरें नसेल? जो स्वस्थ आहे, निर्विकार आहे, नीरोग आहे तोच स्वास्य म्हणावयाचा. निष्पाप बालक आणि महापुरुष यांच्या ठाईं हि स्वास्यता दिसून येते. इतर स्त्रीपुरुषांचे चेहरे गोरेगोमटे हि विकार-विकृत आणि भयावहच असतात. स्वास्थ्य आणि स्वास्यता याचें रहस्य स्थित-प्रज्ञाच्या श्लोकांत गीतेनें विशद केलें आहे : "विधेयात्मा प्रसादं अधिगच्छति."

## ८४५. प्राग्वंश

वंशात् प्राक् प्राग्वंश:। जो वंशाच्या आधींचा तो म्हणावयाचा प्राग्वंश. वंशाच्या आधीं कोण असतो? मूळ पुरुष. मुळापासूनच वंश-विस्तार होतो. म्हणून तो मूळभूत पुरुषच प्राग्वंश म्हणावयाचा. परमात्मा हा असा या जगद्-वृक्षाचा मूळ पुरुष होय. त्याच्या पासूनच हा सर्वतोदिश विश्वविस्तार झाला आहे.

अथवा प्राक् प्राक्तन: वंश: प्राग्वंश:। अथवा वंशाचे दोन भाग केल्यास एक प्राचीन वंश व दुसरा अर्वाचीन वंश म्हटला जाईल. आपण जो हा विश्वविस्तार पाहतो आहों तो अर्वाचीन होय. अर्वाचीन म्हणजे व्यक्त क्षर. आणि जो अव्यक्त आहे, अक्षर आहे जो म्हणावयाचा प्राचीन. आपण काळाचे दोन भाग करीत असतो "ऐतिहासिक व प्रागैतिहासिक." तशाच सारखा हा विभाग झाला. विश्वाचा जितका विस्तार आपण पाहूं कल्पूं शकतों तो सगळा अर्वाचीन होय. आणि जो आमच्या चर्मचक्षूच्या आणि कल्पनाचक्षूच्या हि पलीकडचा आहे तो प्राचीन होय. परमात्मा हा उभयात्मक आहे, पण इथें तो आधीं प्राग्वंश म्हटला आहे. आणि तेंच योग्य होय. आधीं मोठ्याचें नि मुळाचेंच नांव घ्यायला पाहिजे. अव्यक्त स्वरूप हें मूळ आहे. आणि तें अपरिमित हि आहे. अव्यक्ताच्या अफाट सागरांत व्यक्ताकार हा तृणवत् आहे. मग तृणाचें नांव आधीं

घेणार कीं सागराचें? उघडच महान् वस्तुच आधीं डोळ्यांत भरणार नि तिचाच उच्चार होणार. ''प्राग्वंशो वंशवर्धनः'' या पदांमध्यें हि तसेंच झालें आहे. आधीं प्राग्वंश मागाहून वंशवर्धन.

## ८४६. वंशवर्धन

वंशं वर्धयति इति वंशवर्धनः। जो वंश वाढवतो तो वंश-वर्धन म्हणावयाचा. वृध् वर्ध् धातूचे दोन अर्थ होतात.—१ वाढवणें, २ तोडणें, तासणें दोन्ही अर्थांनीं परमात्मा वंशवर्धन आहे. हा सृष्टीचा वेल तो वाढवीत आहे म्हणून तो वंशवर्धन होय. सुप्त-गुप्त-चेतन दगडापासून सर्वचेतन ब्रह्मदेवापर्यंत चौऱ्यांशी लक्ष योनींचा विस्तार त्या परमात्म्यानें आत्मशोधांत केला आहे. तो एकएका योनींतील सुखदुःखाचा आंबट गोड अनुभव घेत जियें त्याला अमृतानुभव आला त्या मनुष्ययोनीपर्यंत आला आणि तियेंच त्याचा वंश सुफळ होऊन कुंठित झाला. कणिस येऊन तें पक्व झालें म्हणजे यवगोधूमादि ओषधींचा अंत होतो. त्या कृतार्थ होऊन वाळतात. आत्मज्ञान हें सर्वजन्म सफळ करणारें आणि म्हणून त्या सर्व जन्मांतून मुक्त करणारें, त्या सर्वजन्मांचा अंत करणारें होय. आणि परमात्मा हा केवळ ज्ञानस्वरूप असल्यामुळे, सर्व साधनांचाच फलरूप असल्यामुळें तो सर्व वंशाचा अंत करणारा होय. त्यानंतर कोणता हि उच्चावच जन्म घेण्याचेंच प्रयोजन राहत नाहीं. म्हणून वंश खुंटवणारा या अर्थानें हि तो परमात्मा वंशवर्धन होय. संस्कृत वर्धकि व मराठी वाढी हे शब्द याच अर्थानें वर्ध् धातू-पासून आलेले आहेत. बांगडी वाढणें या प्रयोगांत हि तो त्याच अर्थानें आलेला आहे. वंश-वर्धन प्रमाणें तंतुवर्धन हें नाम हि सहस्रांत अन्यत्र आलेलें आहे. तियें तें तंतु-च्छेदन अशा अर्थानेंच घेतलें आहे. शिवाय वाढ ही शेवटीं कुठें तरी थांबायचीच असते. म्हणजे तिचा अवश्यंभावी परिणाम अन्तच होय. म्हणून वाढणें म्हणजे संपणें हा अर्थ सुव्यवस्थितच होय. तथापि आम्हांला सृष्टीचा आदि आणि अंत हि दिसत नाहीं. दिसतो तो केवळ सृष्टीचा वृद्धि-विस्तार. म्हणून त्या परमात्म्याला म्हटलें आहे प्राग्वंश आणि वंशवर्धन. ह्या सृष्टिरूप मध्याच्या दोन्ही टोकांना तो परमात्मा आहे. त्याच्या पासूनच हा सृष्टि-प्ररोह झाला असून त्याचें पर्यवसान हि त्यांतच व्हावयाचें आहे.

## ८४७. भारभृत्

अनन्त (वराहादि) रूपेण भूगोलस्य भारं बिभर्ति इति भारभृत्। परमात्मा हा अनन्तशेषाच्या रूपानें ह्या पृथ्वीचा भार आपल्या डोक्यावर धारण करून आहे म्हणून तो म्हणावयाचा भारभृत्. 'कोऽतिभारः समर्थानाम्' या न्यायानें परमात्म्यानें हा सगळा विश्वाकार धारण केलेला असला तरी तो त्याला कांहीं भार नाहीं. झाडाला फुलाचा भार होत नाहीं तसा ह्या विश्वाचा परमात्म्याला भार नाहीं. तें त्याच्या डोक्यावरील फूल आहे. शोभा आहे. परंतु अनीश जीवाला तो भारच आहे. त्यानें तो भार घेण्याचा प्रयत्न केला तर तो चिरडूनच जाईल. सर्व सामर्थ्य त्या परमात्मशक्तीचें आहे. तीच विश्वोत्पत्ति-स्थिति-लय-समर्थ आहे. तें सामर्थ्य दुसऱ्या कोणांत हि नाहीं. आम्ही हि जें कांहीं करायला समर्थ होतों तें हि सामर्थ्य त्या परेशाचेंच असतें. परंतु आम्हांला तें त्या शक्तीच्या अतिसूक्ष्मतेमुळें आणि सर्वव्यापकते मुळें जाणवत नाहीं. भगवान् कृष्णानें गोवर्धन-धारण केलें तेव्हां सर्व गोपाळांनीं आपआपल्या काठ्या त्याला टेकू म्हणून लावल्या होत्या. त्या सर्वांच्या नर-शक्तीच्या समुच्चयानें बनणाऱ्या बळाहून अधिक बळ तियें कार्य करीत होतें. तेंच नारायणीय बळ होय. तेंच ईश्वरी बळ होय. त्याच सर्वगत आणि सर्वातिरिक्त शक्तीनें तो पर्वत उचलला होता. त्या शक्तीचें नांव कृष्ण. तोच भारभृत्. प्रत्येक जीवानें एक देह धारण केला आहे. हा देहभार कोण बरें धारण

करीत आहे कोणी असद्वस्तु तो धारण करूं शकत नाहीं. कारण तो वदतो-व्याघात होय. कोणी अचिद्वस्तु धारण करूं शकत नाहीं. कारण अचित् हेतुमत् असूं शकत नाहीं. कोणी अनानन्द वस्तु तो धारण करूं शकत नाहीं. कारण कोणी हि दुःखासाठीं झटत नसतो. तात्पर्य देहभार काय किंवा विश्वभार काय एका सच्चिदानंद परमात्म्यानेंच धारण केलेला आहे. तें तदितर कोणाला शक्यच नाहीं.

## ८४८. कथित

कथित हें नाम प्रथित असें असावें. कथित हा पाठ प्रामादिक असावा–जरी शंकाराचार्यांनीं तो तसाच घेतला आहे. गीतेंत आलेंच आहे–''अतोऽस्मि लोके वेदे च प्रथितः पुरुषोत्तमः'' परमात्मा लोकांत म्हणजे व्यवहारांत आणि वेदांत म्हणजे शास्त्रांत हि पुरुषोत्तम म्हणजे तिन्ही पुरुषांत उत्तम म्हणून प्रथित आहे, प्रसिद्ध आहे. पण ''स्थितस्य गतिश् चिन्तनीया'' या न्यायानें कथित पदाचा विचार केला पाहिजे. कथित म्हणजे आख्यात, ज्याच्या विषयीं कांहीं तरी विधान केलें गेलें आहे असा–मग तें विधान कांहीं का असेना. परमात्मा हा वेद-प्रतिपादित म्हटला जातो. वेद-प्रतिपादितच कां? कारण इतर विषय अन्य शास्त्रें प्रतिपादूं शकतात पण परमात्म्याचें प्रतिपादन वेदेतर प्रमाणें करूं शकत नाहींत. तिथें प्रत्यक्ष वा अनुमान हें प्रमाण चालत नाहीं. परंतु इथें कथित पदानें वेदादि-शास्त्र-प्रतिपादित हा एवढाच अर्थ घ्यावयाचा नाहीं, तर निरुपपद प्रयोगामुळें सर्व(-पद) प्रति पादित असा अर्थ घ्यावयाचा. तुम्ही कोणतें हि पद उच्चारा, त्याचा अर्थ परमात्मा आहे. शब्दांच्या नाम आणि धातु अशा दोन; नाम, धातु, उपसर्ग आणि निपात अशा चार; अथवा नाम, सर्वनाम, विशेषण, क्रियापद, क्रिया-विशेषण, शब्दयोगी, उभयान्वयी आणि उद्गारवाची अशा आठ जाति कल्पिल्या जातात. त्या सर्वांनीं पृथक् पृथक् वा संभूय जो अर्थ व्यक्त केला जातो तो सर्व एका परमात्म्याचेंच कथन करतो, सरळ वा पर्यायानें. जसे सर्व जलौघ समुद्रालाच मिळतात त्याप्रमाणें सर्व पदें सरळ वा पर्यायानें त्याचें कथन वा प्रतिपादन करीत असतात. कारण सर्व पदांचा आणि अर्थाचा आश्रय एक सद्वस्तु च असूं शकते. अगदीं शशशृंग म्हटलें तरी त्याला सत्तेचा आधार आहे. ससा आहे आणि शृंगहि आहे. शशशृंग नसलें म्हणून काय झालें?

## ८४९. योगी

जो युक्त आहे तो योगी म्हणावयाचा. पण युक्त कुणाशीं? स्वरूपाशीं. सर्व जीव हे वियोगी आहेत. त्यांचा आपल्या स्वरूपाशीं वियोग झाला आहे. सत् चित् आनंद हें आहे त्यांचें स्वरूप. पण ते अभिमानी बनून मी अमुक वर्ण जाति कुल आकृति रंग वस्त्र विद्या नातें इत्यादींचा आहे असें म्हणत असतात. मी ब्राह्मण, ऋग्वेदी, देशस्थ, उंच, गोधूमवर्ण, मध्यम वयाचा, वेदवेदान्तशास्त्री, अमक्याचा पुत्र, अमक्याचा पिता इत्यादि म्हणवीत असतो. पण असें म्हणतांना वस्तुतः मी वियोगी होत असतो, आपल्या निजरूपास पारखा होत असतो. अनात्मवस्तूचा आपल्यावर आरोप करून घेत असतों. मला जन्मच नाहीं, मग नामरूप गुणकर्म कुठलें? मी ना पुत्र ना पिता. हे सगळे अनात्म-संबंध होत. ते घेऊन मी सुखदुःखाचें ओझें कां वाहावें? असे भारवाही होण्यांत काय हंशील? हासिल कांहींच नाहीं, पण अज्ञानामुळें जीव भारवहन करीत असतो आणि कुंथत असतो. परंतु योगी म्हणजे स्वरूपयोगी यांतून मुक्त असतो. त्याला हें कसलेंच ओझें नाहीं. त्याचा देहगेहाशीं संबंध मद्यप्याचा जसा आपल्या वस्त्राशीं तसा असतो. एखाद्या दारू पिऊन झिंगून पडलेल्या माणसाच्या अंगावर वस्त्र दैवयोगानें असलें तर असतें, नसलें तर नसतें. त्याची शुद्ध त्याला नाहीं. पिसें नेसलें कीं नागवें लोकीं येऊन जाणावें? योगी हा तसा सदैव 'आत्मन्येव आत्मना तुष्ट' असतो. त्याला देह गेहाची शुद्ध नसते.

असा योगी हा परमात्मस्वरूपच होय. परमात्मा तर विदेहच आहे. त्याचा देहाशीं दुरून हि संबंध पोंचत नाहीं. म्हणून पुढील पदांत त्याला योगीश म्हटलें आहे. योगीश म्हणजे योग्यांचा राजा, सर्वोच्च योगी.

### ८५०. योगीशः

योगिनां ईशः योगीशः। योग्यांचा ईश तो योगीश म्हणावयाचा. योग्यांचा ईश या पदाचे दोन अर्थ होऊं शकतील. १ योग्यांचा शिरोमणि २ योग्यांचा आराध्य. परमात्मा हा दोन्ही अर्थांनीं योगेश आहे. परमात्मा हा केवळ आत्मनिष्ठ असल्यामुळें मुळीं अनात्मस्पर्शच त्याला नसल्यामुळें तो योगिशिरोमणि होय.

लघुत्वमारोग्यमलोलुपत्वं
वर्ण-प्रसादः स्वर-सौष्ठवं च।
निद्राल्पता मूत्रपुरीषमल्पं
योग-प्रवृत्तिं प्रथमां वदन्ति।।

अर्थात् देहाचें आरोग्य ही योगाची पहिली पायरी होय. इन्द्रियें प्राण आणि मन यांचें वशित्व ही मधली पायरी होय. आणि देहासकट विश्वाची विस्मृति व केवळ आत्मनिभृतता उर्फ समाधि ही अन्तिम पायरी होय. परमात्मा हा सदैव या योग निद्रेंत निमग्न आहे, समाधिस्थ आहे. म्हणून तो योगीश म्हणजे योगिशिरोमणि म्हणावयाचा. आणि तोच योग्यांचें, साधकांचें आराध्य हि होय. कारण तोच परम आदर्श आहे. म्हणून हि तो योगीश म्हणजे योगिजनांचें परम ध्येय म्हणावयाचा, उपास्य म्हणावयाचा. प्रजा आपल्या योगक्षेमासाठीं राजाकडे पहात असते, त्या प्रमाणें सगळे योगी योगीशाकडे आपल्या ''योग''-क्षेमासाठीं पाहत असतात. नखांच्या गुंडाळ्या आणि जटांच्या चुंबळी असें योग्याचें प्राचीन दर्शन बीभत्स आहे. अर्वाचीन दर्शन क्लृप्तनख व क्लृप्तकेश असें सुमृष्ट राजस आहे. पण हीं दोन्ही बाह्य आहेत. अन्तस्तत्त्व वेगळेंच आहे. तें आहे आत्मनिष्ठता. ती जियें जितक्या मात्रेनें आहे तियें तितका योग आहे. योगीशाच्या ठाईं योगाची पूर्ण मात्रा असते आणि म्हणून तो योगेश हि म्हणवतो.

### ८५१. सर्वकामद

सर्वान् कामान् ददाति वा द्यति वा इति सर्वकामदः। जो सर्व काम पुरवून जीवाचे सर्व काम खंडित करतो तो सर्वकामद म्हणावयाचा. काम म्हणजे अभिलाष. जीवाचें समग्र जीवन अभिलाषमय च आहे, काममयच आहे. किंबहुना काममयता हेंच जीवन आहे. ज्याला कसलाहि काम नाहीं तो कामोपलब्धीचें साधन हा देह धारण करीलच कशाला? सारांश जीव म्हटला म्हणजे तो कामार्थी असावयाचाच. हा कामच नसावा असा हि एक काम आहे आणि त्यालाच मुमुक्षा असें म्हणतात. सारांश, काममुक्ति केव्हांहि शक्य नाहीं. शक्य व इष्ट आहे केवळ कामशुद्धि. ती जर जीव करीत गेला तर तो काममुक्त होतो. कामनेचें स्वरूप नीट समजून घेणें जरूर आहे. त्याशिवाय ती नियमित नियंत्रित आणि निर्मूलित होणार नाहीं. जोंवर तिचें वैयर्थ्य पटलें नाहीं तोंवर ती सुटत नाहीं. ज्या क्षणीं तें पटतें त्या क्षणीं तिची मिठी गळून पडते आणि जीव तींतून मुक्त होतो. असें अनात्ममात्रा विषयीं जेव्हां होतें तेव्हां केवळ आत्मनिष्ठ झालेला पुरुष सर्वकाममुक्त होतो. त्यालाच आत्मकाम वा आप्तकाम म्हणावयाचें. ही दशा एकाएकीं बळेंच आणतां येत नाहीं. कामोपभोग, तज्जनित सुख-दुःखानुभव, तदुत्थ विषादोदय, शास्त्राध्ययन, गुरुबोध आणि आत्मप्रतीति या क्रमानें काम-निवृत्ति होते आणि जीवाला शांतिलाभ होतो. या कृतार्थ जीवनाची जी शास्त्रीय परिकल्पना तिचें नांव आहे वर्णाश्रमधर्म. तद्द्वारा परमात्मा हा सर्वकामद झाला आहे. अर्थात् तद्द्वारा तो सर्व काम

पुरवतो आणि त्या कामांतून जीवाला सोडवितो. पुढील पद आश्रम एवढ्या साठींच आलें आहे.

## ८५२. आश्रम

आ किंचित् श्रम्यते अस्मिन् इति आश्रमः। जिथें जीव बेताचा परिश्रम करून सफल होतो तो म्हणावयाचा आश्रम, परमात्मा हा आश्रमस्वरूप आहे. या आश्रमांत जीवाला आपले सर्व काम सिद्ध करून घेतां येतात. या आश्रमाची काय कल्पना आहे? नदीला घाट असले म्हणजे ती सुखगाह्य होते. तिचा यथेष्ट उपयोग होतो. त्याप्रमाणें जीवनाला हि बन्धन पाहिजे, शिस्त पाहिजे म्हणजे तें सुखावह होतें, सुफल होतें. श्रम हा श्रम नाहीं, जर मन निवान्त असेल, विश्रान्त असेल. मनाला विसांवा देण्याची ही युक्ति म्हणजे आपलें दैनंदिन जीवन, आपला आयुष्यक्रम स्वैर न ठेवतां नियमबद्ध ठेवणें होय. सर्व आश्रमांचें हें सार आहे. ''काय करूं कसं करूं'' ही चिंताच श्रम होय. ती गेली म्हणजे श्रम हा खेळ आहे, विनोद आहे. आश्रमधर्मानें जीवनाला असें आनन्दमय करून सोडलें आहे. जीवाच्या विकासाला अनुसरून शास्त्रकारांनीं वर्णधर्माची व आश्रमधर्माची योजना केली आहे. स्वाभाविक वृत्तीला अनुसरून वर्णधर्म आणि स्वाभाविक वयोविकासाला अनुसरून आश्रमधर्म कल्पिलेले असल्यामुळें शरीर कार्य-व्यापृत व मन चिन्तामुक्त राहतें आणि स्वाभाविक विकास होऊन जीवन सफळ होतें. एखादें वन जसें स्वाभाविक विकास पावून यथा काल अंकुरित, पल्लवित, पुष्पित आणि फलित होतें त्या प्रमाणें (चतुर्) आश्रम-धर्मानुसार वागून मनुष्य-समाज हि होतो. हा धर्मच सूक्ष्म निरीक्षणानें आणि जीवनाच्या खोल चिन्तनानें वैदिक ऋषींनीं चतुराश्रमांत व्यवस्थापिला आहे. ही आश्रम-व्यवस्थाच आश्रम होय. आणि ती सत्य-मूलक, सत्य-प्रधान आणि सत्य-फला असल्यामुळें परमात्म-स्वरूप होय.

## ८५३. श्रमण

श्राम्यति इति श्रमणः। जो सुखनिःस्पृह होऊन परमार्थासाठीं झटतो तो म्हणावयाचा श्रमण. वस्तुतः जो म्हणून आश्रम-धर्म पाळतो तो प्रत्येकच ब्रह्मचारी गृहस्थ वानप्रस्थ वा संन्यासी श्रमण होय. कारण, प्रत्येक जण कांहीं तरी प्राप्तव्य प्राप्त करून घेण्यासाठीं झटत असतो, श्रमत असतो. पण त्या सर्वांत ज्याला परम अर्थाचें स्वच्छ ज्ञान आहे आणि त्यासाठीं ज्यानें आपलें सर्व जीवन समर्पिले आहे असा जो संन्यासी तोच श्रमण म्हणून प्रथित आहे. कारण सर्वांत श्रेष्ठ प्राप्तव्यासाठीं सर्वांत अधिक परिश्रम तोच करतो. म्हणून श्रमण ही पदवी त्याचीच.इतर श्रमतात पण श्रम-फलापासून वंचित राहतात म्हणून ते नुसते श्रमी होत. ज्ञानावांचून केलेला सर्व श्रम व्यर्थ होय. उलट ज्ञाननिष्ठायोग्यता लाभावी म्हणून केलेला प्रत्येक श्रम सार्थक होय. चारी आश्रमांची योजना ज्ञानसिद्धीसाठींच आहे. सत्यज्ञान म्हणजेच आत्मज्ञान हें त्याचें केंद्र असून त्या भोवतीं चार आश्रमांचीं चार वर्तुळें आहेत. ब्रह्मचर्याश्रम हें दूरस्थ वर्तुळ आहे तर संन्यासाश्रम हें निकटस्थ वर्तुळ आहे. आणि म्हणून संन्यासाला सर्वांत अधिक मान. त्याचें गौरव सर्वाधिक. सत्याचा शोध म्हणजे परम अर्थाचा शोध होय. त्यासाठीं ज्यांनीं आपलें जीवन समर्पित केलें आहे असें वैदिक अवैदिक तपस्वी श्रमण पदवीस पात्र आहेत. श्रमण पद त्यासर्वांचें समावेशक आहे. वैदिकावैदिक श्रमणांचा उल्लेख श्रमण-ब्राह्मण अशा जोड नांवानें केला जातो. इथें श्रमण पदांत सर्वांचाच समावेश आहे वैदिक जैन बौद्ध आणि अन्य. ''सो ब्राह्मणो सो समणो स भिक्खु'' या धम्मपदाच्या वचनांत वेदानुयायी, जिनानुयायी आणि

बुद्धानुयायी यांना क्रमानें ब्राह्मण श्रमण व भिक्षु म्हणून संबोधिलें आहे. तथापि सत्याचा शोध आणि त्यासाठीं जीवन-समर्पण हें सर्वत्र समानच आहे. म्हणून ते सगळेच श्रमण होत. परमात्मा हा श्रमण म्हटला आहे. कारण श्रमण श्रमून जें मिळवतात तें आत्मज्ञान त्यानें सहजच मिळविलें आहे. तो हि सारखा श्रमतच आहे, पण कांहीं मिळवण्यासाठीं नव्हे तर श्रमणें हेंच जीवन आहे, जीवनाधार आहे, महान् सत्य आहे म्हणून. जीव ज्ञान नाहीं म्हणून श्रमत असतो, ईश्वर ज्ञान आहे म्हणून श्रमत असतो. तुम्ही ज्ञानी असां कीं अज्ञानी, श्रम अपरिहार्यच आहे.

## ८५४. क्षाम

श्रमण पदानंतर क्षाम पद आलें आहे. तें सुचवितें कीं श्रमण हा क्षामच असावयाचा. क्षाम म्हणजे क्षीण. जो पिंडपोषक आहे तो अज्ञान व निर्दय संसारी जीव क्षाम कसा होणार? तो गलेलठ्ठच असावयाचा. परंतु ज्यांना परमात्म्याचा ध्यास लागला आहे आणि त्यासाठीं जे आपली देहेन्द्रियमनोबुद्धि चंदनाप्रमाणें घासत आहेत ते मुमुक्षु, ते श्रमण क्षामच असावयाचे. गोरक्षनाथ आपल्या दोह्यांत शिष्यांना तोतयाची व गुरूची खूण सांगतात :

मोटे मोटे कुल्हे राते राते नेत । नहिं रे पूता गुरुसों भेंट ॥
दुबरे दुबरे गात निर्मल निर्मल नेत । भई रे पूता गुरुसों भेंट ॥

बेटा, मोठ्या मोठ्या ढुंगणांचा व तांबड्या तांबड्या डोळ्यांचा साधु भेटला म्हणजे समजून चल कीं हा गुरु नव्हे. परंतु तुला जर कृशकाय व निर्मल दृष्टीचा सत्पुरुष भेटला तर समजून चल कीं भेटला रे भेटला गुरु! महाभारतांत हि ब्राह्मणाचें म्हणजे ब्रह्मपरायण विज्ञात्या पुरुषाचें वर्णन असेंच आलें आहे. ''येन केनचिदाच्छन्नः येन केनचिदाशितः। यत्रक्वचनशायी च तं देवा ब्राह्मणं विदुः॥'' असा ब्राह्मण ''कृश'' व ''धमनि-संतत'' च असावयाचा, क्षामच असावयाचा. महावीर, बुद्ध हे श्रमण असेच क्षाम होते. त्यांनीं देहाचा पडदा, ज्याच्या आड तो अत्यंत क्षाम, केवळ विदेह परमात्मा उभा आहे, पार झिरझिरित करून टाकला होता. परमात्मा हें महाभूत आहे. तें ज्याला झडपतें त्याचा तें अस्थिपंजर करून सोडतें. म्हणून त्याला क्षाम म्हणजे क्षीण करणारा म्हटलें आहे. ''तत् करोति तद् आचष्टे इति णिचि पचाद्यचि कृते संपन्नः क्षामः'' असें भाष्य शंकराचार्यांनीं केलें आहे. म्हणजे क्षाम हें कर्मणि नव्हे तर कर्तरि अ प्रत्यय, लावून सिद्ध केलेलें रूप होय. क्षाम करणारा म्हणून क्षाम हा त्याचा अर्थ. परमात्मा हा क्षाम हि आहे आणि क्षाम करणारा हि आहे, म्हणून तो क्षाम म्हणावयाचा.

## ८५५. सुपर्ण

''आश्रमः श्रमणः क्षामः सुपर्णो वायुवाहनः'' या श्लोकार्धांत एक विकासक्रम, एक परिणति सूचित केलेली आहे. ब्रह्मचर्य गार्हस्थ्य वानप्रस्थ आणि संन्यास या चार आश्रमांत आचार्योपासन अतिथिसेवा अध्यात्मचिंतन आणि प्रयाणसाधना यासाठीं जीवनभर श्रमून क्षाम व्हायचें परिग्रहाचें व आसक्तीचें सर्व ओझें फेकून देऊन हलकें व्हावयाचें आणि मग देहपंजरांतून सुटून ज्ञान व वैराग्य या दोन सुंदर पंखांनीं परमात्म्याच्या लहरीवर आपल्याला लोटून द्यायचें, केवळ तदधीन होऊन रहायचें हें वैदिक जीवन-दर्शन या श्लोकार्धांत आलें आहे. सुपर्ण हें पद उपनिषदाच्या पुढील सुप्रसिद्ध वचनांत आलें आहे. ''(द्वौ) सुपर्णौ सयुजौ सखायौ, समानं वृक्षं परिषस्वजाते। तयोर् एकः पिप्पलं स्वादु अत्ति, अनश्नन् अन्यो अभिचाकशीति॥'' या देहरूप एकाच वृक्षाच्या आश्रयानें दोन जुळे भाव एक सांसारिक व दुसरा असांसारिक राहतात.

त्यांनाच सुपर्ण म्हटलें आहे. (सुपर्ण म्हणजे गरुड) सुपर्ण कां? कां कीं ते गगन-विहारी आहेत. या वृक्षावर ते कायमचे राहणारे नाहींत. कांहीं काळासाठीं वसतीस आलेले आहेत. ते जुळे आहेत इतकेंच नव्हे तर ते सनाम आहेत, सखे आहेत. एक फळभक्षी आहे, दुसरा केवळ साक्षी आहे. असें मोठें मार्मिक रूपक उपनिषदाच्या वरील श्लोकांत आलें आहे. ज्ञान झालें कीं सांसारिक भाव नाहींसा होतो व उरतो तो केवळ असांसारिक नित्य शुद्ध बुद्ध मुक्त भाव. तो भाव आपल्याच ठाईं स्वानंद-गगनांत मुक्त विहार करीत राहतो. तो पंजरबद्ध होऊन राहत नाहीं. तसा तो राहत नाहीं म्हणून सुपर्ण म्हणावयाचा. पंजरस्थ राहिल्यास तो सुपर्ण न म्हटला जातां अपर्ण वा अपक्षच म्हटला जाईल. ''शोभनानि पर्णानि छन्दांसि संसारतरुरूपेण अस्य इति सुपर्णः'' असें भाष्य शंकराचार्यांनीं केलें आहे. पण इथें आचार्य 'द्वौ सुपर्णौ' हें उपनिषद्वचन विसरले आहेत असें दिसतें. त्यांचें लक्ष 'छन्दासि यस्य पर्णानि' या गीतावचनाकडे आहे. तेंच त्यांनीं उद्धृत हि केलें आहे.

### ८५६. वायु-वाहन

वायुर् वाहनं अस्य इति वायु-वाहनः। वायु ज्याचें वाहन आहे तो म्हणावयाचा वायु-वाहन. परमात्मा हा वास्तविक सर्वव्यापी आहे. त्याला वाहनाची गरजच नाहीं. परंतु जीवमात्र उपहत असल्यामुळें त्याला वाहनाची गरज असूं शकते. इथें जीवरूपानें देही झालेला जो परमात्मा त्यालाच वायुवाहन म्हटलें आहे. कां कीं सामान्यतः प्राणाबरोबरच चैतन्य लोप पावतें, असा आपला अनुभव आहे. जोंवर प्राण आहे तोंवर तें चैतन्य, तो जीव देहांत वास्तव्य करून आहे असें आपण म्हणतों. वस्तुतः चैतन्याच्या मागोमाग, जीवाच्या मागोमाग प्राण व इन्द्रियें जातात. परंतु त्यांची स्पष्ट खूण प्राण-प्रयाणच होय. म्हणून त्याला वायु-वाहन म्हणावयाचें. आणि या स्थूल दर्शनाला अनुसरूनच ईशोपनिषदांत हि आलें आहे. 'वायुः अनिलं अमृतम्' म्हणजे तो प्राणवायु तो प्राणात्मा जीव त्या निःस्पंद अमृत तत्त्वांत, परमात्म्यांत लीन होवो. समाधींत प्राणापान व हृदयगति सर्व बंद असते परंतु तरी तिथें जीवात्मा सुखरूप असतो. अर्थात् तो वायुवश नाहीं तर प्राणेन्द्रियेंच तद्वश आहेत. राजा निघाला म्हणजे त्याचा लवाजामा हि निघतो, परंतु लवाजमा निघाला म्हणजे राजा निघालाच असे नव्हे. असें जरी असलें तरी ज्या अर्थीं प्राण गेले म्हणजे जीव गेला असें आपण म्हणतों त्या अर्थीं तो वायु- वाहन होय. वस्तुतः घटाकाश मठाकाशांत विलीन होत नाहीं तें एकच एक अखंड आहे. पण उपाधीमुळें आपल्याला जन्म-मृत्यूचा भास होतो. तद्वत् प्राण रूपानें जीव चळवळ करीत असतो ती त्या निःसंपद अमृतांत, त्या परमात्मरूप महावायूंत विलीन होवो, असें म्हटलें जातें. वस्तुतः ही भाषा उपाधिकल्पित आहे. तथापि जोंवर उपाधि आहे तोंवर ती भाषा हि राहणारच. म्हणून तो परमात्मा, तें निरुपाधि चैतन्य वायु-वाहन म्हणावयाचें.

### ८५७. धनुर्धर

धनुः धारयति इति धनुर्धरः। जो धनुष्य धारण करतो तो धनुर्धर म्हणून प्रसिद्ध आहे. धनुष्य तर इतर हि धारण करणारे धनुर्धर होतेच, पण राम धनुर्धर म्हणून जो प्रसिद्ध आहे तो त्याच्या यज्ञ-रक्षणार्थ धनुर्धारणामुळें होय. केवल धर्मपालनासाठींच जो शस्त्र धारण करतो तो शस्त्रधारी ईश्वरी अवतार होय. ईश्वराचें अवतार-कार्य धर्मसंस्थापन हें आहे. आणि त्यासाठींच जो शस्त्र धारण करतो तो ईश्वराचें कार्य करणारा होय. धर्म-संस्थापनेसाठीं केवल शस्त्रच धारण करावें लागतें असें नाहीं, तर तें त्यागावें हि लागूं शकतें. म्हणून शस्त्र-धारण वा शस्त्र-संन्यास ही क्रिया महत्त्वाची नाहीं, हेतु महत्त्वाचा आहे. त्या

हेतूच्या सिद्धीसाठीं ज्याची प्रत्येक क्रिया आहे तो धर्मात्मा ईश्वरी अवतार होय. राम असा होता. त्यानें म्हटलें आहे:–

नाहं अर्थपरो देवि लोकं आवस्तुमुत्सहे।
विद्धि मां ऋषिभिस् तुल्यं केवलं धर्ममाश्रितम्।।

म्हणून ''रामः शस्त्रभृतां अहम्'' असा भगवद्-विभूति म्हणून प्रभु रामचंद्राचा गौरव झाला आहे. परशुराम हि शस्त्रभृतां वरः होता. परंतु ब्राह्मण असल्यामुळें शस्त्र-धारण हें त्याचें वर्णीय कर्तव्य नव्हतें. दुसरें त्यानें एकवीस वेळां ज्या क्षत्रिय निर्मूलनाच्या मोहिमा केल्या त्या धर्म्य म्हणतां येत नाहींत. म्हणून तो भर्गव राम शस्त्र-विद्येचा परम आचार्य असला तरी ''रामः शस्त्रभृतां'' या वचनानें त्याचा उल्लेख झालेला नाहीं. शिवाय त्याला हि राघव रामानें, धनुर्धर रामानें प्रणामानें व प्रभावानें तेजोभंग करून तपश्चर्येचा आपला वर्णधर्म पाळायला पाठवून दिलें आहे. धनुर्धर रामाची ही हि धर्म-संस्थापनाच होय. परमात्मा हा असा 'परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृतां।' धनुर्धर आहे.

## ८५८. धनुर्वेद

''धनुर्धरो धनुर्वेदो दण्डो दमयिता दमः'' हा श्लोकार्ध संबंधच दण्डनीतिपर आहे. दण्डनीति म्हणजे काय? दण्डनीति म्हणजे हिंसा नव्हे, तर स्वैर हिंसेचा प्रतिबंध दण्डनीति होय. समाज हा बहुमुखी आणि इष्टानिष्ट अनेक प्रवृत्तींचा आश्रय असतो. त्यांतील अनिष्ट प्रवृत्तींचें नियमन व नियंत्रण आणि इष्ट प्रवृत्तींचें संगोपन व संवर्धन करणें हा धर्मशास्त्राचा व राजनीतीचा विषय आहे. धर्मशास्त्र हें त्याबाबतचें तज्ज्ञमत होय. तें कायदे कानू करणारें अंग आहे. राजनीति हें त्याची अंमलबजावणी करणारें अंग आहे. अशी ही द्विदल व्यवस्था आहे. पैकीं अंमलबजावणी करतांना जी अपरिहार्य हिंसा करावी लागते तिचें नांव दण्ड होय. ती नियमानुसार व परिमित असते आणि विशिष्ट हेतूच्या सिद्धीसाठीं असते. तिला धर्मज्ञांची संमति व सामान्य जनांची मान्यता असते. हिंसा ही अहिंसाच होऊन जाते. इथें अहिंसा म्हणजे हिंसेचा अभाव नव्हे तर अल्पभाव होय, अहिंसा-तुल्यता होय. आदर्श अहिंसेचाच आहे, पण तो अमलांत आणतांना ज्या मर्यादा येतात त्याबाबत अगतिकता आहे. ज्यांना हा सामाजिक धर्म हि पाळतां येत नाहीं, ते अहिंसेची गोष्ट च बोलूं शकत नाहींत. पण ज्यांनीं हा सामाजिक धर्म उत्तम प्रकारें पाळला आहे आणि ज्यांना अनुत्तम धर्म अहिंसामय संन्यास पाळावयाचा आहे त्यांना कोणत्या हि समाजांत तशी मोकळीक असतेच. आज ही जे Conscientious objectors कान्शन्सस आब्जेक्टर्स आहेत, त्यांना त्या कायद्यांतून मुक्त करण्यांत आलेलें आहे. परंतु जे मर्यादित अहिंसेचा सामाजिक धर्म हि पाळूं शकत नाहींत त्या अपराधी लोकांना संन्यासांत स्थान नाहीं. ती अतिसामाजिक गति आहे. हें सर्व जो जाणतो तो धनुर्वेद होय शस्त्रास्त्रें त्यांचा विनियोग आणि मर्यादा जाणणारा होय. ''धनुर्विद्यां वेत्ति इति धनुर्वेदः'' परमात्मा हा धर्म-संस्थापक असल्यामुळें तो सहजच धनुर्वेद म्हणजे दण्ड-नीतिज्ञ म्हटला आहे.

## ८५९. दण्ड

परमात्मा हा दण्डस्वरूप आहे. कारण त्याला सर्व प्रजांचें शासन करावयाचें आहे. त्यांना धर्ममार्गांवर चालवावयाचें आहे, अधर्ममार्गापासून वारायचें आहे. हा दण्ड ज्ञान आणि करुणा यांच्या पोटीं उत्पन्न झाला आहे. जें काय श्रेय व्हायचें आहे तें धर्माचरणापासूनच होय. हें निश्चित ठाऊक असल्यामुळें आणि ज्यांना हें ज्ञान नाहीं त्यांच्या कळवळ्यामुळें सर्वत्र दण्डशक्ति प्रवृत्त होत असते. आई बाप आपल्या मुलांना, गुरु आपल्या शिष्यांना, राजा आपल्या प्रजेला, देवदेवता प्राणिमात्राला शासन करीत असतात. अमुक कर,

तमुक करूं नको. असें केल्यास तुझें भलें होईल. तसें केल्यास तुझें अकल्याण होईल, असें सांगून तसें वागायला त्यांना प्रेरित करीत असतात आणि तसें न वागल्यास त्यांना दण्ड होत असतो. हा दण्ड जितका अप्रत्यक्ष आणि सहज तितका तो अधिक परिणामकारक होतो. अग्नीला हात लावल्यास तो भाजतो. म्हणजे मर्यादा-उल्लंघन होतांच त्याचें शासन मिळतें. त्यांत विलंब नाहीं. हातोहात अपराध आणि दण्ड होत असतो. पण ही भौतिक गोष्ट झाली. सामाजिक गोष्टींत राजपुरुष अपराध शोधील आणि दण्ड करील तेव्हां तो व्हायचा. नैतिक गोष्टींत तर तो त्याचा त्यालाच कळायचा. त्याचें प्रायश्चित्त्य त्यानेंच घ्यायचें. अशा स्थूल सूक्ष्म नि सूक्ष्मतर दण्डाच्या परी आहेत. पण मर्यादा-भंगाबरोबर दण्ड हा ठेवलेला च आहे. अपराधावांचून दण्ड नाहीं. पण धर्माचें नीट ज्ञान नसल्यामुळें अथवा असून हि मोहामुळें जीवाच्या हातून सतत प्रमाद होत राहतो, अपराध होत राहतो, पाप होत राहतें. आणि त्याचें शासन हि अर्थातच मिळत असतें. आरोग्याच्या नियमांच्या भंगाखेरीज रोगोद्भव होत नाहीं, तसा धर्ममर्यादांचा भंग झाल्याखेरीज दण्ड होत नाहीं. दण्ड ज्या अर्थी भोगावा लागत आहे त्याअर्थीं धर्ममर्यादाभंग झाला आहे, हें उघड आहे. मग तो कशास्वरूपाचा वा केव्हां झाला हा तपशील आपल्याला न का कळेना. म्हणून मनुष्याचें कर्तव्य हें कीं त्यानें धर्मज्ञान करून घ्यावें व तदनुसार धर्माचरण करावें आणि हेंच नित्य निरंतर करीत रहावें. दण्डांतून सुटण्याचा दुसरा मार्ग नाहीं.

## ८६०. दमयिता

दण्ड आहे तिथें दण्डाधिकारी हा असलाच पाहिजे. मातापिता, गुरु, राजा, देवदेवता हे सगळे दण्डाधिकारी होत. यांच्या द्वारा तो दमयिता परमात्मा उन्मार्गगामी लोकांचें दमन करीत असतो. ''दण्डो दमयतां अस्मि'' असें दण्डाचें विभूतित्व गीतेनें गाइलें आहेच. पण तो दण्ड अव्यक्त आहे. व्यक्त आहे दमयिता. म्हणून तो हि परमात्मस्वरूपच होय. वस्तुतः धर्म म्हणजे कायदा हाच शासन करीत असतो. त्याची अंमलबजावणी तेवढी राजा करीत असतो, आपल्या सेवकांकरवीं करवीत असतो. पण ही राजव्यवस्था नसेल तर राज्य चालावयाचें नाहीं. म्हणून धर्मसंविधान, धर्मशास्ता आणि धर्मशासनतंत्र हें समग्रच परमात्मस्वरूप म्हटलें आहे. त्यालाच इथें ''दण्डो दमयिता दमः'' या पदत्रयीनें संबोधिलें आहे. धर्मतत्त्व निर्गुण आहे, संविधान सगुण आहे आणि शास्ता व शासनतंत्र साकार आहे. बीज, प्ररोह आणि फल हा जसा एकाच तत्त्वाचा विस्तार आहे तसा ''दण्डो दमयिता दमः'' हा हि एकाच विचाराचा विस्तार आहे. एकाच विचाराची तीं तीन अंगें होत. त्यांचा परस्परांत समावेश होतो आणि आवश्यकतेप्रमाणें त्याची गणना एकानेक होते. कुठें नुसतेंच दण्ड पद येईल, कुठें दमयिताच येईल. कुठें, दमच येईल. कुठें ''दमयिता दमः'' अशीं दोन पदें येतील, कुठें, ''दण्डो दमयिता दमः'' अशीं तिन्ही येतील. पण सर्वत्र विचार एकच आहे. विचाराचीं अंगें अनेक असलीं तरी तो एक समग्र आहे, हें लक्षांत घेतलें म्हणजे कोणतें अंग उल्लेखिलें आहे वा कोणत्या अंगाला महत्त्व दिलें आहे ही बाब गौण ठरते. जाळ्याचें कोणतें हि अंग स्पर्शिलें तरी संबंध जाळें स्पर्शिलें जातें व कर्षिलें जातें. विचाराचें हि तसेंच आहे.

## ८६१. दम

दण्डसंविधान, दण्डधर आणि दण्डनक्रिया या क्रमाचा निर्देश ''दण्डो दमयिता दमः'' हा पदक्रम करीत आहे. तदनुसार दम म्हणजे दमनक्रिया. क्रिया महत्त्वाची आहे. संविधान आहे, शास्ता आहे पण त्याचें शासन, त्याची अंमलबजावणी जर होत नसेल तर तें राज्य असून नसून सारखेंच. त्याला राज्य म्हणतां येत नाहीं. कारण ''राज्यं किम्? आज्ञाफलम्'' राजाज्ञेचें पालन होणें हेंच राज्य होय. नाहीं तर

दारूबंदीचा कायदा करायचा आणि त्याचा अंमल मात्र कुठेंच नसावयाचा, याला का राज्य म्हणायचें? हें राज्य नसून राज्याचें सोंग होय. धर्माचें पालनच सर्वांत महत्त्वाचें आहे. तें झालें म्हणजे कृतकृत्यता झाली.

**पठका: पाठकाश्चैव ये चान्ये शास्त्र-चिन्तका:।**
**सर्वे व्यसनिनो मूर्खा य: क्रियावान् स पण्डित:।।**

शास्त्राज्ञेचें, वेदाज्ञेचें परिपालन महत्त्वाचें आहे, नुसतें शास्त्राचें पठन पाठन वा चिन्तन व्यर्थ आहे. ''वेदस्योपनिषत् सत्यं, सत्यस्योपनिषद् दम:'' वेदशास्त्राचें रहस्य सत्य होय आणि त्या सत्याचें हि रहस्य दम म्हणजे इन्द्रियनिग्रह होय. इन्द्रियनिग्रहाधीन प्रज्ञेची स्थिरता आहे आणि प्रज्ञास्थैर्याधीन सत्योपलब्धि आहे. म्हणून सर्वांत महत्त्वाची गोष्ट दम होय, इन्द्रिय-निग्रह होय. ज्याच्यांत कांहीं दम नाहीं त्याच्यांत कांहीं राम नाहीं. म्हणूनच गीतेंत स्थितप्रज्ञाच्या श्लोकांत वारंवार ''वशे हि यस्येन्द्रियाणि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता'' असा निष्कर्ष काढला आहे. असें हें इन्द्रियशासन सर्वांत महत्त्वाचें आहे. ते जो करतो तो राजा होय. म्हणून चाणक्यानें म्हटलें आहे. ''राज्यमूलं इन्द्रिय-जय:'' स्वत: राजाच दारू पितो त्याच्या राज्यांत दारूबंदी होणार कशी? यथा राजा तथा प्रजा. म्हणून दम पाहिजे. तोच परमात्मा.

### ८६२. अपराजित

न पराजित: अपराजित:। ज्याला कोणीं पराजित केलें नाहीं तो अपराजित म्हणावयाचा. जो दान्त आहे, दमवन्त आहे त्याच्यावर कोणाची हुकूमत चालूं शकत नाहीं. परंतु जो इन्द्रियाधीन आहे त्यावर शब्द स्पर्श रूप रस गन्ध हे विषय हुकूमत चालवतात. असा इन्द्रियाधीन जीव कुरंग मातंग पतंग मीन भृंगवत् विषय-लोलुप होऊन तदधीन होऊन बसतो, पराभूत व पराजित होऊन बसतो. परंतु जो जितेन्द्रिय आहे, विजितात्मा आहे, 'तो स्वामित्वें विषयीं वर्ते'. तो सर्व व्यवहारांत स्वतंत्रपणें वागत असतो. त्याची बुद्धि इन्द्रियें असन्मार्गानें जात नाहींत. म्हणून तो अपराजित म्हणावयाचा.

**कान्ता-कटाक्ष-विशिखा न लुनन्ति यस्य**
**चित्तं, न निर्दहति कोप-कृशानु-ताप:।**
**कर्षिन्ति भूरि विषयाश् च न लोभ-पाशैर्**
**लोकत्रयं जयति कृत्स्नमिदं स धीर:।।**

भर्तृहरीच्या या श्लोकांत म्हटल्याप्रमाणें असा विधेयात्मा धीर पुरुष सर्वत्र अपराजित राहून त्रिभुवनविजयी होतो. पुढील सर्वसह पदानें तेंच सांगितलें आहे.

विश्वांत ज्या सत्ता आहेत त्यांत सर्वांत वरचढ सत्ता म्हणजे देवांची. त्यांचा अधिपति इंद्र तो कोणाला हि आपल्याहून वरचढ होऊ देत नाहीं. अर्थात् आपल्या इन्द्रियविषयाचा अतिक्रम कोणी करूं लागल्यास त्याला तो आपल्या मारसेनेनें परास्त करतो. नरननारायण ऋषींना हि त्यानें असेंच एकदा आपली मारसेना पाठवून जिंकायचा प्रयत्न केला. परंतु तो आत्मनिष्ठ नारायण मदनाच्या पंच बाणांनीं, त्याच्या प्रलोभनांनीं जरा हि चळला नाहीं उलट हंसला आणि, त्यांनाच उर्वशी देऊन इन्द्राला लज्जित केलें. म्हणून तो परमात्मा सदैव अपराजितच होय.

### ८६३. सर्वसह

सर्वान् सहते जयति इति सर्वसह:। जो सर्वांना जिंकून घेतो तो म्हणावयाचा सर्वसह. इथें सह् हा धातु प्राचीन वैदिक अर्थानें आला आहे. आज सह् धातु, सहन करणें, प्रतिकार न करतां स्वीकारणें अशा अर्थानें वापरला जातो. वैदिक अर्थाचाच तो एक भिन्न प्रकार आहे. नरनारायणापुढें देवेन्द्रानें पाठविलेल्या सुरसुन्दरींनीं नाना हावभाव केले पण त्याचा त्या ऋषीवर कांहीं एक परिणाम झाला नाहीं. त्याचें चित्त

आकृष्ट झालें नाहीं, व्यथित झालें नाहीं, मोहित झालें नाहीं. अर्थात् तें अविकृत राहिलें. याचा तरी अर्थ काय? ऋषीनें तें सारें सहन केलें, गिळून टाकलें, जिरवून टाकलें. त्यापासून होणारी अपेक्षित विक्रिया होऊं दिली नाहीं, हाच. वस्तुतः हेंच जिंकणें होय, परास्त करणें होय. ज्यानें ती मारसेना पाठविली होती ती अकृतकार्य होऊन परत त्याच्याकडे गेली. परत गेली इतकेंच नव्हे, तर नारायणानें दिलेली उर्वशी हा अनुग्रह घेऊन गेली. कोणा पक्षकारानें न्यायाधीशाकडे लाच म्हणून एक सोन्याची सुरई पाठविली. त्यानें ती रत्नजडित करून त्याच्याकडे परत केली. तसें हें झालें. न्यायाधीशाची निर्लोभता आत्मतृप्तता आणि उदारता असे उत्तरोत्तर उत्कर्ष यांतून प्रकट झाले. तसेंच तें नारायणाच्या उदाहरणांतहि झालेले दिसून येतात. नारायणाप्रमाणें भगवान् बुद्धाच्या मार-विजयांत ही खुबी, हा निर्विकारतेचा प्रकर्ष आढळत नाहीं. सुभाषित आहे- ''अक्रोधेन जयेत् क्रोधं, असाधुं साधुना जयेत्। जयेत् कदर्यं दानेन, सत्येनालीकवादिनम्।।'' परमात्मा हि असाच सर्वसह म्हणजे सर्वजयी आहे. त्यानें आपल्या निर्विकारतेनें आत्मनिष्ठतेनें आणि उदारतेनें सर्वांना जिंकून घेतलें आहे. ज्याला जें हवें त्याला तें तो देत आहे, पण त्याला त्याची स्पृहा नाहीं, हेवा नाहीं. असा तो समुद्रवत् वितृष्ण आत्मतृप्त आणि महोदार असल्यामुळें सर्वसह होय.

### ८६४. नियन्ता

''दण्डो दमयिता दमः।'' या पदत्रयी प्रमाणेंच ''नियन्ता नियमो यमः'' ही पदत्रयी आहे. यम् आणि दम् या धातूंच्या अर्थांत जो काय भेद असेल तेवढाच. दण्ड् वा दम् धातु हा मुख्यतः राजनीतीचा शब्द आहे, यम् हा मुख्यतः आध्यात्मिक क्षेत्रांतील शब्द आहे. असें असलें तरी दोन्ही धातु परस्परांऐवजीं वापरले जातात. नियन्ता पद आत्म-नियमन सुचवितें, दमयिता पद पर-दमन सुचवितें. नियन्ता हा आपलें नियमन विशिष्ट नियमांनीं करीत असतो. ते नियम स्थूल असतात. त्यांचें जें सूक्ष्म तत्त्व ते यम म्हटले जातात. या यम-नियमांची परिगणना आणि व्याख्या पतंजलीनें आपल्या योगसूत्रांत केली आहे. या यम-नियमांचा विवेकपूर्वक अवलंब करावा. मनूने त्याबाबत पुढील प्रमाणें मोलाची सूचना देऊन ठेवली आहे.

**यमान् सेवेत सततं न नित्यं नियमान् बुधः।**
**यमान् पतत्यकुर्वाणो नियमान् केवलान् भजन्।।**

अशा विवेकशीलतेनें जो यम-नियमांच्या योगें आत्म-नियमन करतो तोच नियन्ता म्हणावयाचा. असा नियन्ता आपल्या देहेन्द्रियमनोबुद्धींना सन्मार्गावर चालवून सुखरूप निजधामास पोंचतो. परमात्मा हा तर सदैवच निजधामीं वास्तव्य करून सुखरूप आहे. म्हणून तो सहजच नियन्ता होय. आम्हीं संसाराटवींत भटकलों आहों. आम्हांला आत्म-नियमन करून तें निजधाम गांठावयाचें आहे. अशा नियंत्याला च उप-निषदांत रथी म्हटलें आहे.

**आत्मानं रथिनं विद्धि शरीरं रथमेव तु।**
**बुद्धिं तु सारथिं विद्धि मनः प्रग्रहमेव च।।**
**इन्द्रियाणि हयान् आहुः विषयान् तेषु गोचरान्।**

### ८६५. अनियम (नियम)

नियमयति इति, नियम्यते अनेन इति वा, नियमः। जो नियमन करतो वा ज्याच्या योगें नियमन केलें जातें तो नियम म्हणावयाचा. नियन्ता हा नियमांच्या साहाय्यानें आत्मनियमन करीत असतो. पैकीं यम हे ज्ञानांगभूत असल्यामुळें नित्य आहेत. नियम हे जितक्या अंशानें आणि जोंवर यमोपयोगी म्हणून आवश्यक तितक्या अंशानें व तोंवर सेव्य होत. शम दम शौच संतोष स्वाध्याय ईश्वर-प्राणिधान हे नियम म्हणून सांगितले आहेत. यांच्या बरोबरच अनेक उपनियम हि कल्पिले जातील ते सर्व नियमच

म्हणावयाचे. गांधींच्या एकादश व्रतांत आपल्याला ते दिसून येतात.

**अहिंसा सत्य अस्तेय ब्रह्मचर्य असंग्रह।**
**शरीरश्रम अस्वाद सर्वत्र भय-वर्जन।।**
**सर्व धर्मी समानत्व स्वदेशी स्पर्श-भावना**
**हीं एकादश सेवावीं नम्रत्वें व्रतनिश्चयें।।**

अहिंसा सत्य अस्तेय ब्रह्मचर्य अपरिग्रह हे पांच यम होत. उरलेले नियमोपनियम. हे नियमोपनियम देशकाल-परिस्थिति-सापेक्ष आहेत. त्यांची संख्या, स्वरूप आणि त्यांचें महत्त्व आवश्यकतेप्रमाणें बदलेल. विनोबा त्यांत अनिन्दा हें एक नवें व्रत, नवा उपनियम जोडत आहेत. अशा प्रकारें नियमोपनियम चंद्रकले-प्रमाणें परिवर्तनशील आहेत, परंतु यम हे चन्द्रवत् सदैव स्थिर स्थायी आहेत. शंकराचार्यांनीं यम नियम हीं पदें अयम अनियम अशीं हि कल्पिलीं आहेत. पण तशी कल्पना करण्याचें खास प्रयोजन नाहीं आत्मा आत्मज्ञान यांना यम नियम अविरोधी असल्यामुळें तशी कल्पना करण्याची गरज नाहीं. तसें करणें ओघाच्या विरुद्ध हि आहे. कृत्रिम हि. म्हणून नियम हा आत्मज्ञानोपकारक म्हणून परमात्मस्वरूप म्हटला आहे.

## ८६६. अयम (यम)

यमयति इति यम:। जो यमन म्हणजे अत्यंत व्यापक असें नियमन करतो तो यम म्हणावयाचा. परमात्मा या विश्वाचें जें नियमन करीत आहे तें स्थूल दण्ड घेऊन जसे शासक करतात तसें करीत नाहीं. तो सुसूक्ष्म किंबहुना अव्यक्त तत्त्वांच्या योगें नियमन करीत आहे. तीं जीं सूक्ष्म तत्त्वें तींच यम होत. अहिंसा सत्य अस्तेय ब्रह्मचर्य अपरिग्रह हीं तीं तत्त्वें होत. यांचें उल्लंघन केल्यानें जीव दु:खभाक् होतो. त्यांचें परिपालन केल्यानें तो दु:खसंयोगापासून बचावतो. इथें किरकोळ दु:खाचा विचार नाहीं. इथें दु:ख म्हणजे दु:खमात्र. मुख्य दु:ख म्हणजे देहयोगच होय. त्या देहयोगानें जीव सुखदु:खांचा अनुभव करीत असतो. तीं दोन्ही हि इथें दु:खच समजावयाचीं आहेत. कारण तीं दोन्ही हि स्पर्शजच आहेत, विषयेन्द्रियसंनिकर्षांतूनच उत्पन्न होत आहेत. आणि खरें सुख हें स्वतंत्र असतें, तें विषयेन्द्रिय-पराधीन नसते.

**बाह्यस्पर्शेष्वसक्तात्मा विन्दत्यात्मनि यत् सुखम्।**
**स ब्रह्मयोगयुक्तात्मा सुखमक्षयमश्नुते।।**

हें अस्पर्शज आत्मसुख ज्यायोगें हस्तगत होतें तो यम होय. हा परम आनन्दमय आहे. कारण तो सर्व अनात्म धर्मांचा अन्तक आहे. यम म्हणजे अन्तक, मृत्यु असें आपण मानतों. त्यामुळें तो भयंकर अशी कल्पना केली गेली आहे. पण तो अन्तक अनन्ताचा का अन्त करणार आहे? जें अविनाशी आत्मतत्त्व तिथें त्याची मात्रा चालत नाहीं. किंबहुना त्या आत्म-तत्त्वाचा लाभ करून देणें आणि तदितर सर्वांची हानि करणें हेंच तर त्याचें कार्य आहे. अशा हितकर्त्याला कां भ्यावें? तो तर अध्यात्मविद्येचा महान् आचार्य आहे. नचिकेता त्याच्या कडे गेला होता आणि त्यानें त्याच्या पासून ती हस्तगत केली. कठोपनिषदांत ही आख्यायिका आली आहे. तेव्हां यम म्हणजे सर्व दु:खांचा अन्त करणारा अध्यात्मविद्येचा परम गुरु तो परमात्मा होय. आणि त्याला पोंचवणारे जे धर्म ते हि पर्यायानें यमच होत. फळावरून च तर झाडाची ओळख होते. बदामाचें फळ धरणारें झाड बदामच तद्वत्. पण संयमस्वरूप परमात्म्याचें फळ ज्याला येतें तो वृक्ष यम च होय. आणि तो हि परमात्मस्वरूपच होय.

## ८६७. सत्त्ववान्

सत्त्वेन युक्त: सत्त्ववान्। जो सत्त्वानें युक्त तो सत्त्ववान्. म्हणावयाचा पण सत्त्व म्हणजे काय? सत्त्व

म्हणजे सत्त्वं, चांगुलपणा, भलेपणा, निष्ठा. सत्त्व-परीक्षा या शब्दप्रयोगांत आपल्याला तो त्या अर्थानें आढळतो. जो आपल्या ब्रीदाला जागतो, प्राण गेला तरी तें सोडीत नाहीं तो सत्त्ववान् म्हणावयाचा. शिबिराजा सत्त्ववान् होता. शरणागताला अभय देणें हें त्याचें ब्रीद होतें आणि तें त्यानें स्वत:चें मांस देऊन राखलें. याचा अर्थ, तो आपल्या अंगीकृत कार्यापासून, कर्तव्यापासून, आपल्या धर्मापासून ढळला नाहीं. अशाला म्हणतात सत्त्ववान्. अग्नीचा धर्म उष्णता. तो केव्हां हि तो सोडत नाहीं. मिठाचा धर्म खारटपणा, तो तें केव्हांहि सोडत नाहीं. त्याप्रमाणें जो आपलें सत्त्व सोडीत नाहीं तो सत्त्ववान् म्हणावयाचा. हें सत्त्व सत्त्व- गुणाच्या उत्कर्षानें माणसाच्या ठाईं येतें. म्हणून हि त्याला सत्त्व म्हटलें आहे. तमोगुण जडता आहे, रजोगुण अस्थिरता आहे. सत्त्वगुण प्रकाश आहे. तिथें तमोगुणाची जड़ता नाहीं, पण स्थिरता आहे. तिथें रजोगुणाची चंचलता नाहीं, पण क्रियाशीलता आहे. आणि प्रज्ञेची प्रभा तर आहेच आहे. त्यामुळें सत्त्व हेंच बळ होय. सत्त्वांत प्रज्ञा, भावना आणि आरोग्य यांचा म्हणजे सर्व इष्ट तत्त्वांचा संगम आणि समुच्चय आहे. याहून अधिक कार्यक्षमता, अधिक मोठें बळ दुसरें कोणतें असूं शकेल? या सत्त्वाचाहि आश्रय तो निर्‌गुण परमात्मा असल्यामुळें तो सत्त्ववान् म्हणावयाचा. आणि सत्त्ववान्‌च त्याला प्राप्त करून घेऊं शकतो. म्हणूनच म्हटलें आहे ''नित्यसत्त्वस्थो भव.''

## ८६८. सात्त्विक

सात्त्विक म्हणजे सत्त्वगुणमय, सत्त्वगुणप्रधान. ही सृष्टि म्हणजे त्रैगुण्य होय. तो स्रष्टा परमात्मा निस्त्र-गुण्य आहे, निर्‌गुण आहे. तरी तो सात्त्विक म्हटला आहे. कारण रजोगुण-कार्य जें सृष्टिविसर्ग, विश्वोत्पत्ति तें एक टोक आहे. तमोगुण-कार्य त्यासृष्टीचा संहार हें दुसरें टोक आहे. आणि या दोहोंच्या दरम्यान आहे सत्त्वगुण-कार्य सृष्टिस्थिति. ती आम्हांला प्रत्यक्ष व इष्ट आहे. म्हणून आमच्या दृष्टीनें सत्त्वच प्रधान आहे. तेव्हां सृष्टिस्थितीची जी अधिदेवता तीच आमची विशेषत: उपास्य म्हणावयाची. तिलाच इथें सात्त्विक म्हटलें आहे. त्या सत्त्वमूर्तीला च भगवान् विष्णु असें पारिभाषिक नांव आहे. पण आम्हांला गुणोपासना करायची आहे कीं निर्‌गुणोपासना? उपासना तर सद्‌वस्तूची करायची आहे, आणि ती सद्‌वस्तु आहे निर्‌गुण. परंतु या गुणप्रवाहांत केवळ निर्‌गुणाची उपासना कशी करायची? इथला अणुरेणु गुणमय आहे. तुमचीं देहेन्द्रियमनोबुद्धि गुणमय आहेत. अशा या गुणांच्या प्रवाहांत निर्‌गुणाचें दर्शन कसें व्हायचें? तें दर्शन सत्त्वगुणांतच होऊं शकतें. देह तमोगुणाचा पुतळा, इन्द्रियें मन रजोमय आणि बुद्धि तेवढीं सत्त्वस्पृष्ट आहे. त्या बुद्धिरूप सत्त्वाणूची शुद्धि म्हणजे सत्त्व-शुद्धि होय. ती झाली म्हणजे तिथें त्या निर्‌गुणाचें प्रतिबिंब पडतें. तें पडावें म्हणून जो प्रयास करावयाचा तीच साधना होय, उपासना होय. ही सत्त्वशुद्धि प्रत्येक गोष्ट सात्विकच सेवन करायची या निश्चयांतून होते. सत्त्वोदय सत्त्ववृद्धि आणि सत्त्वोत्कर्ष या क्रमानें ती पूर्ण होते. जेव्हां पूर्ण होते तेव्हां ''सत्त्वशुद्धौ ध्रुवा स्मृति:'' या वचनाप्रमाणें साधकाला ध्रुव म्हणजे कायमचा आणि स्मृति म्हणजे आत्मप्रत्यय होतो. साधक विज्ञानी होतो. निर्‌गुण परमात्मा अशा प्रकारें सत्त्वांत प्रकटत असल्यामुळें तो सात्त्विक म्हटला जातो.

## ८६९. सत्य

सत्य म्हणजे सत्यस्वरूप. अग्नि जसा औष्ण्य स्वरूप आहे तसा परमात्मा हा सत्यस्वरूप आहे. सर्वांचा मूल आधार तें सत्य आहे. सर्वांचा म्हणजे तिन्ही पुरुषांचा. माझ्या समोर जो दिसतो आहे त्याचा, जो दिसत नाहीं त्याचा आणि जो दिसतो वा दिसत नाहीं म्हणजे म्हणतो त्याचा हि. तें सत्य म्हणजे तो सत्स्वरूप परमात्मा ती सद्‌वस्तु तूं तो नि मी या तिन्ही पुरुषांचा

आधार आहे. आणि हें अद्वैत, हें ऐक्य जो पाहतो त्याला सत्याचें दर्शन झालें, परमात्म्याचा साक्षात्कार झाला म्हणावयाचें. सर्व उपासकांची अभिलाषा हीच असते. म्हणून त्यांची सनातन प्रार्थना आहे:—

**हिरण्मयेन पात्रेण सत्यस्यापिहितं मुखम्।**
**तत् त्वं पूषन् अपावृणु सत्यधर्माय दृष्टये।।**

हे विश्वपोषका, या विश्वाचें जें सत्य आहे तें या मोहक मायेच्या मुखवट्यानें झांकलेलें आहे. तो मुखवटा दूर सारून आपलें तें सत्य मुख मज सत्याच्या उपासकाला, सत्यच ज्याचा धर्म आहे आणि सत्यच ज्याचें कर्म आहे, त्या मला दाखव.

हा सत्यदेव कसा आहे? सत्य हेंच त्याचें स्वरूप आहे. त्याचें नांव हि सत्यच आहे आणि रूप हि 'स' आणि 'त्य' असेंच आहे. सारांश, नाम रूप गुणकर्म सर्व सत्यच आहे त्याचें. त्या सत्यदेवाचें कर्म म्हणजे ही सृष्टि होय. ही हि सत्यच आहे. कारण ती सत्यमूलक, सत्यस्वरूप आणि सत्यफल आहे. एथपर्यंत तर ठीकच आहे. पण या सत्याचें आराध्य हि सत्यच आहे म्हणून पुढील पद आलें आहे—सत्यधर्म-परायण:. तो परमात्मा सत्यस्वरूप आहे इतकेंच नव्हे तर सत्योपासक हि आहे. तोच देव आहे. तोच भक्त आहे आणि नाम म्हणजे उपासना हि तोच आहे.

## ८७०. सत्यधर्म-परायण

सत्यधर्म: परायणं यस्य स: सत्यधर्म-परायण:। सत्यधर्मच परम अयन म्हणजे गति आहे ज्याची तो सत्यधर्म-परायण म्हणावयाचा. सत्य हें स्वत: अनन्त आहे आणि म्हणून त्याचा शोध हि अनन्तच आहे. गंगेचें प्राप्तव्य सागर आहे. तो मिळाल्यावर हि ती जशी सागराला मिळतच राहते त्याप्रमाणें सत्यच ज्याचें प्राप्तव्य आहे आणि सत्याचा शोध ज्याचा सतत चालूच आहे तो म्हणावयाचा सत्यधर्म-परायण. जोंवर सत्याहून वेगळें आपलें जीवन शिल्लक आहे तोंवर तें त्या सत्याच्या शोधासाठींच आहे हें उघड आहे. म्हणून देहेन्द्रियमनोबुद्धीचा प्रवाह सतत सत्याभिमुख वाहता ठेवणें म्हणजे सत्यधर्म-परायणता होय. अभिषेकपात्रांतील सर्व जलबिंदु जसे एकवटून अखंड धाराप्रवाह शिवाभिषेक करीत राहतात त्या प्रमाणें आपल्या सर्व शक्तींचा एकवटलेला जीवनौघ सत्याला अखंड समर्पित होत राहतो, आपल्या जीवनाचा एक अंश हि आणि एक क्षणभर हि इतरत्र जात नाहीं तेव्हां सत्यधर्म-परायणता साधली म्हणावयाची. अभिषेक-पात्राचा हा दृष्टांत जसा परायणता म्हणजे काय तें विशद करतो तसा दीप ज्योतीचा दृष्टांत हि गीतेंत आला आहे:—

**यथा दीपो निवातस्थो नेङ्गते सोपमा स्मृता।**
**योगिनो यत-चित्तस्य युञ्जतो योगमात्मन:।।**

परमात्मा हा असा अखण्ड आत्मसमाधिस्थ आहे. म्हणून तो सत्यधर्मपरायण म्हटला आहे. 'सत्य: सत्यधर्मपरायण:' हीं दोन पदें तो परमात्मा आत्मस्वरूप व आत्मनिष्ठ आहे असें सांगत आहेत. बाह्यार्थ जोंवर तुमचें अभिलषित आहे तोंवर भय आहे. तोंवर अपूर्णता आहे. परमात्मा हा निर्भय आणि परिपूर्ण आहे. वैदिक धर्म म्हणजे सत्यधर्म होय. सत्यच साध्य आणि सत्यच साधन. वेदोपनिषदें इतिहास पुराणें यांत परोपरीनें या सत्याचा च महिमा गाइला आहे.

१. "एकं सत्।"—वेद्
२. "सत्येन लभ्य:।"—उपनिषत्
३. "सत्येषु यतितव्यं व:
सत्यं हि परमं बलम्।"—महा-भारत.

## ८७१. अभिप्राय

अभिप्रेयते इति अभिप्राय:। काय वाक् मन:-प्रवृत्ति ज्याला उद्देशून चालतात तो परमात्मा अभिप्राय म्हणावयाचा. काय वाक् आणि मन हे तीन कर्म-पथ आहेत. आमच्या सर्व क्रिया या तीन मार्गांनीं

चालतात. त्या कोणत्या रोखानें चालतात? त्यांचें अन्तिम गन्तव्य काय असतें? क्रिया म्हटली म्हणजे तिला हेतु आलाच. एक वेडा सोडून दिला तर प्रत्येकाच्या कृतीला कांहीं उद्देश्य असतो. वेड्याच्या हि कृतीला उद्देश असतो, पण तो आम्हांला समजत नाहीं आणि त्याला हि. पण त्याचें हि वागणें निरुद्देश वा निरभिप्राय असूं शकत नाहीं. तात्पर्य प्रत्येक जीवन म्हणजे एक साभिप्राय कर्मच आहे. तात्पर्य प्रत्येक व्यक्ति समाज विश्व या एकापेक्षां एक मोठ्या संस्था आहेत आणि त्यांचें जीवन साभिप्राय आहे. प्रत्येक जण आपआपल्या हेतूनें जगत आहे. पण त्या सर्वांचें अन्तिम प्रयोजन एकच असतें. ते प्रत्येकाला स्पष्ट कळत नाहीं. कारण तें विश्वप्रयोजन आहे. त्या विश्वप्रयोजनाचें अंगभूत असें तें व्यक्तींचें प्रयोजन असतें. त्याला वास्तविक स्वतंत्र अर्थ नसतो, पण व्यक्ति तशी कल्पना करीत असते. तिच्या त्या वृथा अहंकाराला पूर्ण वाव देऊन विश्वप्रयोजन सिद्ध होत असतें. घड्याळांत अनेक लहान मोठीं चक्रें आपआपलें काम करीत असतात. त्यांचें आपलें विशिष्ट काम असतें. पण तीं सगळीं वेगवेगळीं आणि आपापत: असंबद्ध वाटणारीं कामें घड्याळाच्या मुख्य कामाचीं अंगभूतच असतात. तद्वत् या विश्वरचनेचें आहे. तिचा अभिप्राय तो परमात्मा आहे, त्याची इच्छा आहे. त्याच्या इच्छेनें तुम्ही इच्छा करतां, कामें करतां. पण त्या कर्मांचें फळ त्या परमात्म्याच्या हातांत आहे. तुमच्या हातांत नुसतें करणेंच आहे. आणि तेंच करावयाचें आहे.कशासाठीं? परमात्म्यासाठीं. म्हणून तो परमात्मा म्हटला आहे अभिप्राय.

## ८७२. प्रियार्ह

प्रियं अर्हति इति प्रियार्ह:। जें जें प्रिय आहे त्याला त्याला जो पात्र होय तो म्हणावयाचा प्रियार्ह. जगांत जितक्या म्हणून प्रिय वस्तु आहेत त्यांत सर्वांत प्रिय आपला आत्मा आहे. त्याहून अधिक प्रिय कोणी नाहीं. त्याला प्रिय म्हणण्यांत स्वारस्य नाहीं. कारण तो तर निजात्माच आहे. प्रियाप्रिय निजेतर वस्तूला म्हटलें जातें म्हणून निजवस्तूला प्रियार्ह म्हणावयाचें. तो स्वात्मा सर्व प्रिय वस्तूंस पात्र होय. सर्व प्रिय आपण त्यालाच अर्पण करीत असतों. आपला देह हा आपल्याला फार प्रिय आहे. इतका कीं त्यालाच आपण आत्मा मानून बसतों. सर्व प्रियोपचार त्याला करीत असतों. म्हणजे तो प्रियार्ह झाला. परंतु हा असा देह हि अनेकदां माणसाला नकोसा होतो. तो गतार्थ होतो. त्याच्या पासून माणसाला सुखाची आशा राहत नाहीं आणि मग तो आत्महत्या करून बसतो. तो देह फेकून देतो. याचा अर्थ असा झाला कीं त्या देहाहून वेगळा असा दुसराच प्रिय आहे, ज्याच्या साठीं हा देह होता. तो जो देहभिन्न स्वात्मा, ज्याच्यासाठीं हा देह आणि देहानुबद्ध सारें माणसाला प्रिय होतें, तो च प्रियार्ह होय. मैत्रेयी-याज्ञवल्क्य-संवादांत हा विषय विशद झाला आहे. त्याचे ध्रुवपद आहे:

- "आत्मनस्तु कामाय सर्वं प्रियं भवति" तात्पर्य तो सर्वांचा निजात्मा असणारा परमात्मा हाच प्रियार्ह होय. त्याच्यासाठींच सारें प्रिय होतें. "न वा अरे पत्यु: कामाय पति: प्रियो भवति, आत्मनस्तु कामाय पति: प्रियो भवति। न वा अरे जायाया: कामाय जाया प्रिया भवति, आत्मनस्तु कामाय जाया प्रिया भवति।"

## ८७३. अर्ह

प्रियार्हो ऽर्ह: प्रियकृत् प्रीतिवर्धन:" या प्रिय-प्रवाहांत मधेंच अर्ह पद आलें आहे बेटासारखें. प्रियार्हहून वेगळा त्याचा आशय आहे, हें उघड आहे. कोणता तो आशय? अर्ह हें पद निरुपपद आहे. त्यामुळें सर्वार्ह असा त्याचा आशय प्रतीत होतो. तो परमात्मा प्रियार्ह तर आहेच पण जें जें प्रियतर आहे त्याला हि तो अर्ह आहे, पात्र आहे. कारण तो स्वत: प्रियतम आहे. सर्व कल्याणांचें तो निधान आहे. सर्व मंगलांचें माहेर आहे. कारण, तो सर्वाधार सद्वस्तु

आहे. सर्व अर्ह, सर्व मूल्य आहे त्या सद्वस्तूचें. सत् नसेल तर सारें मूल्य त्या सत् चें असत् होणार. मरायला टेकलेल्या माणसाला कशांत गोडी वाटत नाहीं, कारण "आप मुए पीछे डूब गई दुनिया" आपण मेल्यावर आपल्याला जग मेलेंच! त्याचा उपयोग कोणता? सद् वस्तु आत्मा असेल तर त्याच्या आधारानें सारें जग आहे. तो नसेल तर कांहींच नाहीं. म्हणून तो परमात्मा सर्वार्ह होय. जें काय मूल्य आहे तें सारें त्याचें आहे. असताला मुळीं कांहीं मूल्यच नाहीं. स्वप्नांतल्या आराला आणि हाराला काय किंमत? आर गिळील म्हणून भय नको किंवा हार मिळाला म्हणून हर्ष नको. पण सद् वस्तु जर मिळाली, आपला आत्मा जर उपलब्ध झाला तर मग काय मिळायचें राहिलें? सारेंच मिळालें. म्हणून तो परमात्मा अर्ह होय. "नासतो विद्यते भावो नाभावो विद्यते सतः। उभयोरपि दृष्टोऽन्तस् त्वनयोस् तत्त्व-दर्शिभिः।।"

## ८७४. प्रियकृत्

प्रियं करोति इति प्रियकृत्। जो आपलें प्रिय करतो तो प्रियकृत् म्हणावयाचा. परमात्मा हा असा जीवाचा प्रियकृत् आहे. तो आपलें प्रिय करीत असतो. परका माणूस आपलें कितीसें प्रिय करणार? जोंवर त्याचा कांहीं स्वार्थ साधत असेल तोंवरच तो आपलें भलें करील. म्हणजे त्याचें अनुकूल वर्तन हें वस्तुतः आम्हांला अनुकूल नसून त्याला स्वतःलाच तें अनुकूल असतें. आईबाप हे पुत्रावर निरपेक्ष प्रेम करतात असें समजलें जातें. परंतु त्यांत हि स्वार्थ मुळींच नसतो असें म्हणतां येत नाहीं. पुत्र आपल्याला सद्गति देईल, जगांत आपलें नांव चालवील, संकटांत व्याधींत वार्धक्यांत आपल्याला साहाय्य करील अशी अपेक्षा त्यांची असते. म्हणजे हें हि पुत्रावर प्रेम नसून आपल्यावरच प्रेम म्हटलें पाहिजे. सारांश, जगांत कोणी कोणाचा प्रियकर्ता नाहीं जो तो आपला प्रियकर्ता आहे. म्हणून हा जो सर्वांचा निजात्मा परमात्मा तोच एक प्रियकृत् होय. तो आपल्यावर जें प्रेम करीत असतो, आपलें जें प्रिय करीत असतो तें स्वभाव म्हणून करीत असतो. त्याचें कुठलें निमित्त वा कारण नाहीं. तो अकारण, अहैतुक आपलें प्रिय करीत असतो. म्हणून तो म्हणावयाचा प्रियकृत्. हा जो हृदयस्थ प्रियकृत् परमात्मा त्याला अग्निरूपानें यज्ञकुंडांत वैदिक ऋषि परोपरीनें आळवीत आले आहेत. ते त्याला म्हणतातः

**स नः पितेव सूनवे अग्ने सूपायनो भव।**
**सचस्वा नः सुअस्तये।।**

हे (जीवनाची ऊब देणाऱ्या) अग्निदेवा बाप मुलासाठीं जशा नित्य नवीन चांगल्या गोष्टी घेऊन येतो तशा आमच्यासाठीं घेऊन ये आणि आमच्या क्षेमासाठीं सदैव आमच्या जवळ रहा. अशा प्रकारें आमचा योगक्षेम चालविणारा तूं आमचा प्रियकृत् आहेस.

## ८७५. प्रीति-वर्धन

परमात्मा हा पितृवत् प्रियकृत् आहे तसा तो पुत्रवत् प्रीति-वर्धन हि आहे. तो पुराण पुरुष परमात्मा आम्हांला रक्षण पोषण आणि शिक्षण देऊन आमचें प्रिय करीत असतो. इकडे चिरंजीव जीव आपल्या बाललीलांनीं, तरुण पराक्रमांनीं आणि वृद्ध तपो-ज्ञानानें त्या परमात्म्याच्या आमच्यापासूनच्या आशा सफळ करून त्याची प्रीति वाढवीत असतो. हा जो प्रीति वाढविणारा जीवात्मा आहे तो कोण आहे? तो हि परमात्माच आहे. मानव-समाजाच्या आशा त्याच्या येत्या पिढ्या सफल करीत असतात. अशा प्रकारें मानव-समाज, किंबहुना हा समस्त विश्वाकार अनादि कालापासून विकास पावत आला आहे. मागील पिढी पुढील पिढीला रक्षण पोषण नि शिक्षण देऊन प्रियकृत् होत असते आणि येती पिढी आपल्या

मागील पिढ्यांना आपल्या आदर्शाभिमुख पराक्रमांनीं संतोषवीत त्यांच्या आशा पल्लवित करीत राहते. हेंच प्रीति-वर्धन होय. हें प्रीति-वर्धन करणारा कोण आहे? मानवाचा तो अमर आशावान् आत्मचंडोलच होय. जीवात्मा कधींच निराश होत नाहीं. तो आपल्या उद्दिष्ट कार्यांत या जन्मीं सफळ झाला नाहीं तर पुढील जन्मीं त्याचा ध्यास घेऊन तें कार्य तो तडीस नेतो. समाज आणि व्यक्ति दोहोंच्या हि बाबतींत आपण हें पाहतों. भरत आणि भगीरथ यांचीं उदाहरणें हीं व्यक्ति आणि समाज यांच्या अमर आशेचीं उदाहरणें होत. हा जो आशिष्ठ द्रढिष्ठ बलिष्ठ आत्मा तोच प्रीति-वर्धन होय. तोच परमात्मा.

## ८७६. विहायस-गति

''विहायस-गति'' पासून नवीन श्लोक (९४ वा) सुरू होत आहे. या श्लोकांत अग्नि आणि सूर्य या दोन तेजांचा प्रामुख्यानें विचार केला आहे. पूर्वार्धांत अग्नीचा आणि उत्तरार्धांत सूर्याचा. तेज इथून तिथून एक आहे पण त्याचें जे विशेष आविर्भाव ते अग्नि आणि सूर्य इथें उल्लेखिले आहेत. विहायसगति हें पद उभयांना समान आहे. ''विहायस आकाश: गति: यस्य स: विहायस गति:।'' विहायस म्हणजे आकाश हें ज्याचें गति म्हणजे पर्यवसान आहे तो म्हणावयाचा विहायस-गति. तेजोरूप परमात्मा हा विहायस-गति आहे. अग्नीच्या ऊर्ध्वगामी ज्वाला आकाशांत उठतात, तिथेंच त्या चळवळ करतात आणि शेवटीं निमतात हि तिथेंच. म्हणून तो विहायस-गति होय. अग्नि हा मूळचा दिव्य. तो आमच्या दाराशीं अतिथि म्हणून आला आहे. तो 'अतिथिर् दुरोणसद्' आहे. त्याची आम्हाला चांगली बडदास्त राखली पाहिजे. आम्ही जेव्हां स्वर्गांत त्याच्या कडे जाऊं तेव्हां तो आमची सोबत आणि सोय करील. तोच आमचा पथ-प्रदर्शक आहे. त्याला त्या विहायसाच्या परमानन्दाच्या, सर्व वाटा ठाऊक आहेत. म्हणून आम्ही त्याला म्हणतों: हे देदीप्यमान प्रभो, विश्वांतील सर्व वाटा तुला ठाऊक आहेत. आम्हांला सरळ वाटेनें निजधामाकडे त्या परमानन्दाकडे घेऊन चल, आड वाटांपासून आमचें निवारण कर. तुला आम्ही नम्र वाणीनें पुन: पुन: विनवीत आहोंत. विहायस-गति म्हणजे अव्यक्तगति. परमात्मा हा अव्यक्त-गति आहे. तो त्याच्या कर्माचा आणि ज्ञानाचा प्रतीक आहे. एवढ्याच साठीं तिरडीसमोर गृह्याग्नि घेऊन चालतात. त्याचा पुढचा प्रवास यथाकर्म यथाश्रुत व्हावयाचा आहे. ह्याचें तें द्योतक आहे. चिद्रूप परमात्मा विहायस- गति म्हणजे अव्यक्तगति आहे. आणि तद्रूप च असलेला जीवात्मा हि, त्याचें प्रतीक अग्नि विद्युत् सूर्य रूप तेजहि, विहायस-गतिच आहे.

## ८७७. ज्योति

द्योतते इति ज्योति:। जें स्वयं प्रकाशमान होय तें तेज म्हणजे ज्योति. जगांत जीं सगळीं तेजें आहेत तीं स्वयंप्रकाशमान नाहींत. तीं पेटवावीं लागतात, त्यांना इन्धन पुरवावें लागतें. परंतु आत्मज्योति अशी आहे कीं ती पेटवावी लागत नाहीं. किंवा तिला इंधन हि पुरवावें लागत नाहीं. ''तेल न बाती बुझ नहीं जाती—आत्मज्योति'' दिव्याला तेलवात लागते, तो पेटवावा लागतो आणि तेलवात संपली वा मोठा वारा आला कीं तो विझतो. अग्नि विद्युत् सूर्य हीं तिन्ही सारखींच. अग्नींत साधें तेलवात वा सनकाडी हें पेटवण असतें आणि तें पेटवून द्यावें लागतें. विजेंत सूर्यांत त्याऐवजीं धातूंचे अणु जळतात इतकेंच. आणि कालान्तरानें हीं सगळीं विझतात हि. परंतु आत्म-ज्योति ही अशी नाहीं. तें निरिन्धन निरिद्ध वा अज्वालित तेज आहे, जें कधींच विझत नाहीं. ''न तद् भासयते सूर्यो न शशाङ्को न पावक:'' ती स्वयंप्रकाश आत्मज्योति सूर्य चंद्र अग्नि यांनीं प्रकाशित होत नाहीं तर आकाशगत सूर्यादि तेजें अन्तरिक्षगत चन्द्र-विद्युतादि तेज आणि भूलोकींचीं दीप-प्रदीपादि

भौम तेजें त्या आत्मज्योतीच्या प्रकाशानें प्रकाशित होत आहेत : ''तस्य भासा सर्वमिदं विभाति''. सर्व ज्ञान ज्याच्या योगें होतें तो जो ज्ञाता, तो जो उपलब्धा तोच ज्योति होय. त्या ज्योतीनें हें सारें जग पेटलें आहे. ''तेजोभिरापूर्य जगत् समग्रं भासस् तवोग्राः प्रतपन्ति विष्णो'' असें जें अर्जुनानें म्हटलें आहे तें ह्याच ज्योतीला उद्देशून. सर्व दिशा सर्व काल सर्व वस्तु या चिदग्नींत जणूं पेटून उठल्या आहेत. त्या जणूं सारख्या जळत आहेत. पाजळत आहेत. विश्ववणवा पेटवून ती मौज पाहणारा जो परमात्मा तोच ज्योतिबा होय. त्याचें तें विश्वरूप आम्हांला अनाकलनीय व असह्य आहे. म्हणून आम्ही त्याला विनवितों. ''अदृष्टपूर्वं हृषितोऽस्मि दृष्ट्वा भयेन च प्रव्यथितं मनो मे। तदेव मे दर्शय देव रूपं प्रसीद देवेश जगन्-निवास।। किरीटिनं गदिनं चक्रहस्तं इच्छामि त्वां द्रष्टुमहं तथैव। तेनैव रूपेण चतुर्भुजेन सहस्रबाहो भव विश्वमूर्ते।। त्या उग्र विश्वरूपाचें जें सौम्य चतुर्भुज रूप तें म्हणजे हा आमच्या घरीं यज्ञकुंडांत मंदमंद हसणारा अग्नि होय. तोच ज्योति.

## ८७८. सुरुचि

सु शोभना रुचिः दीप्तिः यस्य सः सुरुचिः। शोभन आहे ज्याची रुचि म्हणजे दीप्ति तो म्हणावयाचा सुरुचि. अग्नि हा सप्तजिह्व म्हटला आहे. काळी निळी लाल पिवळी हिरवी ढवळी नि चित्रविचित्र अशी अग्नीची सप्तवर्ण* ज्वाला आपण पाहतों. सूर्य-किरणांचा सप्तरंगी पिसारा इन्द्रधनुष्य हि आपल्या दृष्टीचें विलोभन होऊन बसलें आहे. अशाच प्रकारें विजेच्या चमका नि चन्द्राच्या कला हि आपलें मन हरण करून घेतात. प्रत्येक कलेची शोभा कांहीं न्यारीच असते, प्रत्येकीची चमक कांहीं औरच असते. अशा प्रकारें भौम दिव्य व आन्तरिक्ष तेजाचे हे आविर्भाव सुरुचि होत. ही भौतिक तेजें सुरुचि म्हणजे विरोचमान, अत्यन्त दीप्तिमन्त, आहेतच परंतु ज्या तेजाचीं हीं प्रकाशनें होत तें तेज सर्वांत सुरुचि होय. कारण तें अणुरेणूंत विराजमान आहे. त्यानेंच हें सर्व विश्व प्रकाशमान आहे. त्याची चमक कांहीं न्यारीच आहे. तें तेज सूर्याप्रमाणें दिवसांच वा चन्द्राप्रमाणें केवळ रात्रींच अथवा अग्नीप्रमाणें केवळ जवळच अथवा सूर्याप्रमाणें दूरच विरोचमान होणारें नाहीं. तें नित्य निरंतर नि अत्रतत्र सर्वत्र विरोचमान आहे. किंबहुना त्या तेजाच्या नाना वर्णाकृति म्हणजे हें विश्व होय. सिनेमाला चलच्चित्रपट म्हणतात. वास्तविक तो ज्वलच् चित्रपट आहे. प्रकाशाच्या त्या चालत्या बोलत्या आकृति आमच्या समोरील पट-फलकावर प्रक्षेपित होत असतात. विद्युत्-प्रवाह थांबला कीं त्यांचें अदर्शन होतें. अर्थात् प्रकाश-तरंग-मयच त्या आहेत. त्याप्रमाणें हें सारें विश्व नानावर्णाकृति चिद्विलास मात्र होय. ज्या चिदग्नीचे हे सारे रंगतरंग तो सुरुचि म्हणावयाचा.

## ८७९. हुतभुक्

हुतं भुङ्क्ते इति हुतभुक्। जो हवन केलेलें खातो तो म्हणावयाचा हुतभुक्। अग्नींत हवन होतें म्हणून तो अग्नि हुतभुक् होय. यज्ञाग्नींत समिधा आणि होमद्रव्यांच्या आहुति होमिल्या जातात. हा बाह्य स्थूल अग्नि होय आणि तीं होमद्रव्यें हि स्थूलच होत. परंतु याहून एक वेगळा शारीर अग्नि आहे. त्या जठराग्नींत हि अन्नाच्या आहुति द्याव्या लागतात. हा आयुर्होम आयुष्यभर चालत राहतो. यांत होमिलीं जाणारीं अन्नें हि स्थूलच आहेत आणि तीं परिमित आहेत. या स्थूल सूक्ष्म यज्ञाग्नीहून आणि जाठराग्नीहून वेगळा व आगळा एक चिदग्नि आहे. त्यांत या साऱ्या विश्वाचा होम होत आहे. अग्नि हा सर्वभक्षक म्हटला जातो. पण तो वायूला जाळूं शकत नाहीं, आकाशाला जाळूं शकत नाहीं. पण अग्नि नुसता जाळणारा नाहीं, जाणणारा हि आहे. या जाणण्यालाच जाळणें वा भक्षिणें असें

लक्षणेनें म्हटलें जातें. आणि म्हणून त्याला 'जातवेदा:' म्हटलें आहे. ''जातमात्रं वेत्ति इति जातवेदा:'' तो चिदग्निच असा जातवेदा: आहे. त्यालाच सर्व-भक्षक म्हणावयाचें. आणि तोच हुतभुक् आहे. त्यालाच अनुलक्षून गीतेंत म्हटलें आहे:

भोक्तारं यज्ञ-तपसां सर्वलोक-महेश्वरम्।
सुहृदं सर्वभूतानां ज्ञात्वा मां शान्तिमृच्छति ।।''

देहें प्राणें मनें जें कांहीं आम्ही करतों तें सर्व या चिदग्नींतच होमिलें जातें. तें सर्व तप त्याच्याच साठीं होत असतें. जाग्रत्स्वप्नसुषुप्ति या तिन्ही लोकांचा तो महेश्वर आहे. अध्यक्ष आहे. तो सर्व भूतांचा समान सुहृत् म्हणजे सर्वांचें समान भलें इच्छिणारा आहे. त्याला जाणल्यानेंच शान्तिलाभ होतों. मुळाला पाणी दिलें म्हणजे सर्व झाड तुष्ट पुष्ट होतें. त्याप्रमाणें या हुतभुक् परमात्म्याचें यजन केलें म्हणजे सारें विश्व यजिलें जातें. सर्वजग त्याचेंच हवन करीत असतें. पण त्याची जाणीव त्याला नाहीं.

## ८८०. विभु

विभववान् भवति इति विभुः । जो विभवशाली होय तो विभु म्हणावयाचा. जीव नि जगत् हीं उपाधिविशिष्ट आहेत. म्हणून तीं एकदेशी होत. परमात्मा हा निरुपाधि असल्यामुळें तो विभु म्हणजे सर्वव्यापी आहे. जीव विशिष्ट अभिमान बाळगून संकुचित झाला आहे. परंतु ज्यानें असा कुठलाच अभिमान वा अहंकार बाळगला नाहीं त्याला मर्यादा कुठली? घराला चार भिंती आहेत, वर छप्पर आहे खाली जमीन आहे म्हणून तें घर म्हटलें जातें. त्याच्या ह्या मर्यादा आहेत, परिसीमा आहेत. त्यामुळें त्याला लांबी रुंदी खोली आहे. मोजमाप आहे. परंतु जियें ही उपाधि नाहीं त्या आकाशाला भिंती नाहींत, परिमिति नाहीं. तें असीम आहे, अपार आहे. त्याच्या वैभवाला पारावार नाहीं. म्हणून तें विभु म्हटलें जातें. घटाकाश नि मठाकाश असा त्याचा तुकड़ा पडत नाहीं. तें घट-मठांच्या आंत बाहेर अखंड एकच एक संचलें आहे. परमात्मा हि तसाच आहे '' तो एकवट एकला। रचला ना वेंचला। आदि-अंतीं संचला। अनन्तपणें।'' असें ज्ञानदेवानें त्या परमात्म्याचें विभुत्व वर्णिलें आहे. आकाश तत्त्वच विभु आहे असें नाहीं. अग्नि तत्त्व हि तसेंच आहे. आणि इथें ''हुतभुक् विभु:'' असा अनुक्रम असल्यामुळें विभु पदानें अग्निवत् विभुत्व अभिप्रेत आहे, असें म्हणावयाचें. उपनिषदांत म्हटलेंच आहे:

अग्निर् यथैको भुवनं प्रविष्टो
रूपं रूपं प्रतिरूपो बहिश् च।
एकस् तथा सर्वभूतान्तरात्मा
रूपं रूपं प्रतिरूपो बहिश् च।।

हें विश्व म्हणजे त्या चिदग्नीचा प्रकाश होय. या विविध तेजोमूर्तींतून आंत बाहेर तो एकच एक तेजोमय प्रभु संचला आहे. तोच सर्वव्यापकत्वामुळें विभु म्हटला आहे.

## ८८१. रवि

पूर्वार्धांत अग्निस्वरूप तेजाचा प्रामुख्यानें विचार आला आहे. इथून पुढें उत्तरार्धांत सूर्यरूप तेजाचा विचार होत आहे. ''रविर् विरोचन: सूर्य: सविता रविलोचन:'' 'रौति रावयति इति रवि:' जो रव करतो रव करायला लावतो, तो रवि म्हणावयाचा. 'मित्रो जनान् यातयति ब्रुवाण:' अशी श्रुति प्रसिद्धच आहे. तो जगन्-मित्र सूर्य पूर्वाचलावर येऊन जणूं सर्व लोकांना हांका मारतो. उठा, जागे व्हा, आप-आपल्या कर्तव्यास लागा, असेंच जणूं तो उच्च रवानें सांगत सांगत फिरत असतो, (आपलें कर्तव्य करीत असतो) आणि फिरत फिरत सांगत असतो. सूर्योदयाबरोबर सारें जग जागें होतें आणि त्याचें

बोलणें चालणें सुरू होतें, हें आपण प्रत्यहीं पाहतच आहों. त्यामुळें तो उघडच रवि आहे. हांकारे करणारा आहे आणि हांकारे करवणारा हि आहे. सूर्योदयाबरोबर दिशा फांकतात, वारा वाहूं लागतो, जळें प्रसन्न होतात, झाडांचीं पानें उघडतात, फुलें उमलतात. पक्षी किलबिल करूं लागतात. गाई गुरें हंबरतात, सारें जग जगूं लागतें. ''सूर्य आत्मा जगतस् तस्थुषश् च'' सूर्य हा या चर व अचर सृष्टीचा प्राण होय, हें दर्शन सूर्योदयाबरोबर आपल्याला होतें. पण हा रवि म्हणजे बोलका बोलतांना तर कांहीं दिसत नाहीं मग तो रवि कसा? जो जितका वरचा अधिकारी तितकी त्याची क्रिया सूक्ष्म आणि कर्म म्हणजे क्रियाफळ मोठें असें आपण जगांत पाहतों. साधा शिपाई आरडा- ओरडा करतो, धावपळ करतो. त्याचा वरिष्ठ नायक त्याला हलकेंच तोंडी हुकूम देतो. त्याचा हि वरिष्ठ दलपति त्याला लेखी आज्ञा देतो. त्याचा हि वरिष्ठ सेनापति योजना करतो. प्रधानमंडळ कार्यनिश्चय करतें. राजा संकल्प मात्र करतो. अशा प्रकारें वरवर क्रिया सूक्ष्म व कार्यक्षमता तीव्र होत गेलेली आपण पाहतों. परमात्म-शक्तीच्या बाबतींत हें किती तरी पटीनें अधिक लागू आहे. म्हणून रवीला हांकारे करण्याची गरजच नाहीं. तो नुसता येतो आहे असें कळलें कीं कार्य होतें. बाहेर जसा तो रवि आहे तसा तो अंतरांत हि आहे. त्याचा तो आदेश गांधीसारखे महात्मे ऐकतात.

### ८८२. विरोचन

विशेषेण रोचते इति विरोचनः। जो सर्वातिरिक्त तेजानें तळपतो तो म्हणावयाचा विरोचन. जितके ग्रह तारका नक्षत्रादि तेजःपुंज आपण पाहतों त्या सर्वांत सूर्य हा अतिशय देदीप्यमान आहे. म्हणून तो विरोचन म्हणावयाचा. एकच व्यक्ति असते, पण-तिला अनेक नातीं संभवतात. ती पुत्र, पति, पिता, भ्राता, काका, मामा इत्यादि नात्यांनीं नाना परी संबोधिली जाते. त्याचप्रमाणें तो परमात्मा आणि त्याचे आविर्भाव हि. तो विश्वान्तर्यामी परमात्मा सूर्यरूपानें जगाला जागवितो म्हणून तो रवि म्हटला आहे. तो परमात्मा अंतर्यामीरूपानें प्रत्येक जीवाला सदसत् निवडून सांगत असतो. म्हणून हि तो रवि होय. हें पाप आहें, हें करूं नको. हें पुण्य आहे, हें कर, असें तो प्रत्येक जीवाला सांगत असतो. हा अति सूक्ष्म आवाज कोणीहि बंद करूं शकत नाहीं. तो परमात्मा हा असा बोलका आहे म्हणून तो रवि म्हटला आहे. तसा तो परम प्रकाशक आहे म्हणून तो विरोचन होय. सूर्य दिवसां तळपतो पण रात्रीं तो मावळलेला असतो. रात्रीं चंद्र आपली चंद्रिका पसरवून राज्य करीत असतो, पण दिवसां तो निस्तेज होतो. परंतु परमात्म-तेजाला अशी दिवस रात्र ठाऊकच नाहीं. तो सदैव तळपतच आहे. अहोरात्र निरंतर तोच एक तळपतो आहे. म्हणून तो म्हणावयाचा विरोचन. जितकीं तेजें आहेत त्या सर्वांना उदयास्त आहेत, कलाक्षयवृद्धि आहे परंतु आत्मतेज हें असें आहे कीं त्याला चयापचय नाहीं, उदयास्त नाहीं. तें नित्य परिपूर्ण आणि निरन्तर प्रकाशमान आहे. म्हणूनच त्याला विरोचन म्हणावयाचें. बालसूर्य रवि आहे, तर प्रौढसूर्य विरोचन होय. म्हणून लागोपाठ रवि व विरोचन हीं पदें आलीं आहेत.

### ८८३. सूर्य
(सूतेः सुवतेर् वा सूर्य शब्दो निपात्यते)

सूर्यति इति सूर्यः। जो जगाला प्रेरणा देतो तो सूर्य म्हणावयाचा. जगाच्या या प्रचंड यंत्राला कोण बरें चालना देत आहे? कोणती बरें ती प्रेरक शक्ति आहे? कोळसा तेल वायु वीज हे एकापेक्षां एक तरल विरल आणि अक्षय असे शक्तिस्रोत आहेत. दगडी कोळशाचें भांडार अद्याप कैक दशकें पुरण्या इतकें असलें तरी

हळूं हळूं ते संपुष्टांत येणार. तेलाचें हि तसेंच. रॉकेल पेट्रोल इत्यादि खनिज तेलें जरी भरपूर असलीं, त्यांचीं नवीं नवीं भांडारें म्हणजे विहिरी सांपडत असल्या, तरी त्याहि कालान्तरानें आटणारच. इन्धन-वायु म्हणजे गॅस हि तसाच विपुल असला तरी तो सांठवून ठेवतां येत नाहीं. बराचसा तर उडूनच जातो. वीज हि हवी तितकी निर्मितां येत असली आणि तिचा सांठा करून ठेवण्याचा प्रश्न नाहीं तरी तिची निर्मिति सुलभ नाहीं. परंतु या सर्व शक्तिस्रोतांचा मूल स्रोत सूर्य-शक्तिच आहे. सूर्याच्या ठाई जें अणुस्फोटन प्रतिक्षण होत आहे त्या पासून या सूर्यमालेंतील सर्व ग्रहोपग्रहांना शक्तीचा पुरवठा होत आहे. हा सूर्यरूप मूल शक्तिस्रोत हि कधीं तरी आटणारच आहे पण तो कल्पान्त मानवाच्या कल्पनेला हि सुदूरच आहे. त्यामुळें सूर्यशक्ति अनन्त आहे असें म्हणायला हरकत नाहीं. या अनन्त आणि अपरिमित शक्तीनें हें विश्वचक्र चाललेलें आहे. आमचें विश्वचक्र म्हणजे आमची ही सूर्यमाला. इतर मालेचें आम्हांला तादृश ज्ञान नाहीं. म्हणून हा जो या ग्रहमालेचा चालक सूर्य तोच आमचा चालक म्हणावयाचा. त्याला अनुकूल जें जीवन तेंच सफळ होणार. म्हणून सूर्योपासना हाच आमचा धर्म. सूर्योपासना म्हणजे सूर्याला अर्घ्य देणें नव्हे, तर सूर्यशक्तीचा अधिकांत अधिक लाभ करून घेणें होय. जो रात्रीं जागून दिवसां झोप काढतो तो सूर्यशक्तीच्या विरुद्ध वागतो, निसर्गाच्या विरुद्ध वागतो. असा प्रतिकूल व्यवहार व्यक्तीच्या समाजाच्या आणि त्यांच्या हिताच्या नाशास च कारण होतो. सर्व अनर्थांचें मूळ हा अधर्म म्हणजे सूर्योपासनेची अनास्था च होय. सूर्य भौतिक आणि त्याची उपासना हि भौतिक म्हणूं नये. कारण या भौतिकतेच्या मुळाशीं अतिभौतिक आहे. तेंच पुढील नामांत सविता म्हणून संबोधिलें आहे.

### ८८४. सविता

बाह्य विश्वांत जो सूर्य म्हणविला तोच अन्तर्विश्वांत सविता म्हटला आहे. ब्रह्माण्डाची चालना सौर शक्ति करते तर पिण्डाची चालना सवितृ-शक्ति करते. आणि नीट पाहिलें म्हणजे लक्षांत येतें कीं पिंड नि ब्रह्मांड आणि त्यांच्या चालक शक्ति सविता नि सूर्य ह्या तत्त्वतः एकच आहेत. देह नि विश्व ह्या त्यांच्या बाह्य उपाधि तेवढ्या भिन्न आहेत. त्याहि भिन्न आकारानेंच. प्रकारानें त्याहि एकराशिच आहेत, पांचभौतिक आहेत. दोहोंच्या हि ठाईं चालक तत्त्व एकच आहे. तें अतिभौतिक तत्त्व आध्यात्मिक आहे. ह्या अतिभौतिक आध्यात्मिक चालक तत्त्वाचेंच आम्ही, गायत्रीमंत्रांत आवाहन करीत असतों. "तत् सवितुर् वरेण्यम्। भर्गो देवस्य धीमहि। धियो यो नः प्रचोदयात्।।" त्या सवितृ-देवाचें तें वरेण्य तेज आपण ध्याऊं या. अशा साठीं कीं तेणेंकरून आपल्या सगळ्या बुद्धिशक्ति प्रचोदित व्हाव्यात, संजीवित व्हाव्यात. पिण्डांत आणि ब्रह्माण्डांत कार्यासाठीं जी शक्ति लागते ती ज्याच्या पासून येते त्या मूळ शक्तिस्रोताला जो विसरतो तो आत्मघात करून घेतो. अशांनाच उपनिषदांनीं "आत्महनः" म्हटलें आहे. हे तेजो-विमुख लोक अन्धतमांत जाऊन पडतात अशी त्यांची गति वर्णिली असून त्यांना असुर्य म्हणजे असूर्य म्हटलें आहे. त्याचेंच तिसरें रूप आहे असुर.

**असुर्या नाम ते लोकाः अन्धेन तमसाऽऽवृताः।**
**तांस् ते प्रेत्याभिगच्छन्ति ये के चात्महनो जनाः ।।**

या असुरांचा दैत्यांशीं नि राक्षसांशीं कांहीं संबंध नाहीं. जे सूर्योपासक ते सुर, जे दिव्योपासक ते देव. जे तसे नव्हेत ते असुर, अदेव. हा अध्यात्मयोग सूर्याला परमात्म्यापासून अवगत झाला आणि त्याच्यापासून तो जगांत प्रसार पावला, मानवी प्रजेंत प्रसृत झाला आहे, असें गीतेंत म्हटलें आहे. त्याचा

आशय हाच कीं भौतिक तेजहि आध्यात्मिक तेजाचाच प्रकाश होय, जडाचें मूल चेतन होय. चेतनापासूनच हें सारें चराचर वा जडाजड जगत् प्रसवलें आहे, म्हणून त्या चेतनाला म्हणावयाचें सविता.

### ८८५. रविलोचन

रविर् लोचनं यस्य सः रविलोचनः। रवि म्हणजे सूर्य हा ज्याचा डोळा आहे, तो म्हणावयाचा रविलोचन. "अग्निर् मूर्धा, चक्षुषी चन्द्रसूर्यौ" अशी श्रुति आहे. अग्नि हें त्या परमात्म्याचें मुख असून चन्द्र व सूर्य हे त्याचे नेत्र होत.. सूर्याला नेत्राची पदवी दिली याचें कारण काय? कारण हें कीं तो परमात्मा सर्वसाक्षी आहे. त्याचें हें सर्वसाक्षित्व या जगांत उत्कटत्वानें सूर्याच्या ठाईं दिसून येतें. तो या त्रिभुवनाला, भूमि अन्तरिक्ष आणि आकाश यांना, प्रकाशित करतो.

**यथा प्रकाशयत्येकः कृत्स्नं लोकं इमं रविः।**
**क्षेत्रं क्षेत्री तथा कृत्स्नं प्रकाशयति भारत।।**

असें गीतेंत स्पष्टच म्हटलें आहे. म्हणजे क्षेत्रज्ञ परमात्म्याला रवीचीच उपमा दिली आहे. मोरोपंतांनीं हि आपल्या केकावलींत परमात्मा हा सर्वसाक्षी रविलोचन आहे असें म्हटलें आहे, त्याचें हि इथें सहज स्मरण होतें. त्यांनीं म्हटलें आहे -' नसेन दिसलों कसा? नयन सर्वसाक्षी रवि।' परमात्मा हा सर्व शक्तिमान् आहे. त्याच्या त्या सर्वशक्तिमत्तेचें यथार्थ उपमान या जगांत सांपडणें शक्यच नाहीं. पण दिग्दर्शनापुरतीं सूर्यादि उपमानें घेतलीं जातात. एकटा सूर्य नेत्र म्हणावा तर तो दिवसांच पाहतो. पण परमात्मा तर रात्रंदिवस निरंतर साक्षी आहे. म्हणून श्रुतीनें 'चक्षुषी चन्द्र-सूर्यौ' म्हटलें आहे. त्यांत केवळ डोळे दोन असतात म्हणून चन्द्र-सूर्य या दोन ज्योति उल्लेखिलेल्या नाहींत, परमात्म्याचें सर्वसाक्षित्व एकट्या सूर्यानें द्योतित होत नाहीं म्हणून 'चक्षुषी चन्द्रसूर्यौ' म्हटलें आहे. सूर्य समग्र विश्वाला प्रकाशित करतो खरा, पण सर्व काळ दिवसांप्रमाणें रात्रीं हि तो प्रकाशित करतो असें म्हणतां येत नाहीं. हें वैगुण्य दूर करण्यासाठीं चन्द्र हि जोडीस दिला आहे. म्हणजे तो परमात्मा या समग्र स्थळाचा तसा तसा समग्र काळाचा साक्षी आहे. उपमा ही केव्हां हि एकदेशीच असणार. पण तिचा आशय व्यापक घ्यावयाचा. तसा तो घेतला म्हणजे रविलोचन म्हणजे सर्वसाक्षी सनातन साक्षी असा अभिप्राय लक्षांत येतो.

### ८८६. अनन्त

नास्ति अन्तः यस्य सः अनन्तः। देशतः आणि कालतः ज्याला अन्त नाहीं तो म्हणावयाचा अनन्त. परमात्मतत्त्व हें दिक् काल निमित इत्यादींनी अपरिच्छिन्न असल्यामुळें तें अनन्त होय. परमात्मतत्त्व हें मुलखावेगळें आहे. मुलखावेगळें म्हणजे लोक- विलक्षण. या लोकाचें जें जें लक्षण तें तें त्याला लागू होत नाहीं. त्याहून तें वेगळें च आहे. सान्तता वा अन्तवत्ता हें आहे जगाचें लक्षण. जगांत अशी कोणती वस्तु आहे कीं जिला स्थल कालाचीं बन्धनें नाहींत, जी कार्यकारण-भावानें-निगडित नाहीं? स्थल, काल आणि कार्यकारण भाव यांचें फलित म्हणजे हा संसार आहे. या त्रैगुण्यांतून मुक्त अशी एक हि वस्तु, लहान वा मोठी दाखवतां यावयाची नाहीं. परंतु परमात्मतत्त्व याहून अगदीं वेगळेंच आहे. त्याला देशाचें बन्धन नाहीं. म्हणजे तें इथें आहे नि तिथें नाहीं असें म्हणतां यावयाचें नाहीं. त्याला कार्यकारण भावाचें बन्धन नाहीं. म्हणजे अमुक एका कारणापासून तें झालें वा त्यापासून अमुक एक कार्य झालें असें म्हणतां येत नाहीं. हें त्रिविध लक्षण ज्याला लागू होतें तें लहान वा मोठें सारें अन्तवत् आहे, सान्त आहे. परमात्मा तद्-विलक्षण असल्यामुळें तो अनन्त म्हणावयाचा.

"अनन्तश् चास्मि नागानाम् " म्हणून ज्या विभूतीचा उल्लेख गीतेनें केला आहे, जिच्या नांवानें अनन्तचतुर्दशी साजरी होते, ती विभूति अनन्तनाग हि वस्तुत: या अनन्ताहून वेगळी नाहीं. या अनन्त आत्मतत्त्वाचें तें रूपकरण आहे. उपासनेसाठीं कल्पिलेलें तें आलंबनमात्र आहे. कारण "देहवंतास अव्यक्तीं सुखें बोध घडेचि ना " तळाशीं अव्यक्त राहिलें आहे म्हणून शेषानें हें विश्व धारण केलें आहे अशी आणि असल्याच अन्य उत्प्रेक्षा कवींनीं केल्या आहेत. त्यांचें तात्पर्य न समजल्यामुळें लोक भ्रांत झाले आहेत.

## ८८७. हुतभुक्

"हुतं भुङ्क्ते इति हुतभुक् यज्ञाग्नि:" या व्युत्पत्तीनें मागील ९४ व्या श्लोकांत हुतभुक् पद येऊन गेलें आहे. इथें तें परत आलें आहे तें " हुतं होमं भुनक्ति रक्षति इति हुतभुक् यज्ञ-गोप्ता" अशा व्युत्पतीनें घ्यावयाचें. रामानें धनुर्बाण धारण करून विश्वामित्राच्या यज्ञाचें रक्षण केलें. हें ऐतिहासिक सत्यच नाहीं, तें आध्यात्मिक सत्यहि आहे. तो हृदयस्थ परमात्मा आमचे सत्य संकल्प तडीस नेत असतो. तो आम्हांला सत्य संकल्पांची प्रेरणा देतो, संकल्प-साधनेचें बळ देतो, आणि सिद्धि देऊन कृतकृत्यता हि तोच देतो. इतकें सर्व करणें म्हणजे हुतभुक्त्व होय, यज्ञ-रक्षण होय.

सर्व गोष्टींचें मूळ निजात्माच आहे. अग्नीपासून जसे स्फुलिंग निघतात त्या प्रमाणें आत्मशक्तीपासून सर्व संकल्प उठत असतात. हे संकल्प टिकून राहतात आणि शेवटीं सफळ होऊन कृतकृत्य होतात. या सर्वांमागील धारक आणि पोषक शक्ति तो आत्माच असतो. तो आत्मा आत्मदर्शनावधि सक्रिय राहतो. हें आत्मदर्शन नित्यनवें होत राहतें, त्याला अन्तच नाहीं. अन्त नाहीं याचें कारण आत्मशक्ति ही स्वत:च अनन्त आहे. अमुक एक दर्शन अन्तिम आहे असें म्हणतांच येत नाहीं. त्यामुळें आत्मदर्शन होऊन होतच राहणारें आहे. गंगा सागराला मिळून हि प्रतिक्षण मिळतच आहे. आत्मशक्ति अचिन्त्य आहे. त्या शक्तीचें दर्शन तिच्या कार्यावरून होतें. पण अमुक एक कार्य अन्तिम, अमुक एक पराक्रम चरम असें म्हणतांच येत नाहीं. जें एकाला शक्य झालें नाहीं तें दुसरा करून दाखवितो आहे. अशा प्रकारें आत्मदर्शनाची ही प्रेरणा आणि सफलता निरन्त आहे, अनन्त आहे. रडारची कल्पना आजवर मानवाला नव्हती. पण जी मानवाला ठाऊक नव्हती ती वटवाघळाला अनादि कालापासून अवगत आहे आणि तदनुसार त्याचा संचार अप्रतिहत चालू आहे. अशा प्रकारें आत्मदर्शनाची इच्छा आणि दर्शनें अनन्तच आहेत. हें जें हुत आहे, हा जो जीवनयज्ञ आहे त्याचें रक्षण तो परमात्मा करीत आहे. म्हणून तो म्हटला आहे हुतभुक्.

## ८८८. भोक्ता

परमात्मा हा हुतभुक् म्हणजे यज्ञगोप्ताच नाहीं नुसता, तर तो यज्ञभोक्ता हि आहे. वेदाभ्यास, तप, दान, यज्ञ यांच्या रूपानें होणारी जी सगळी साधना ती अखेर कोणाला पोंचते? सगळ्या नद्या जशा अखेर समुद्रालाच मिळायच्या तशा सगळ्या साधना अखेर आत्मदेवाला च पावायच्या. त्यांना अन्य गति नाहीं. असें असल्यामुळें तो परमात्मा भोक्ता म्हटला आहे. सर्व धर्मकर्मांचें फळ त्यालाच समर्पित होतें. सर्व मार्ग जसे शेवटीं मुक्कामाला च पोंचायचे, तसे सर्व उद्योग त्यालाच प्राप्त व्हायचे आहेत. म्हणून तो परमात्मा या सर्व साधनांचा भोक्ता म्हटला आहे. गीतेंत म्हटलेंच आहे-

**भोक्तारं यज्ञ-तपसां सर्वलोक-महेश्वरम्।**
**सुहृदं सर्वभूतानां ज्ञात्वा मां शान्तिमृच्छति।।**

तिथेंच पुन: स्पष्ट आदेश हि दिला आहे-

**यत् करोषि यद् अश्नासि यज् जुहोषि ददासि यत्।**
**यत् तपस्यसि कौन्तेय तत् कुरुष्व मदर्पणम्।।**

कायिक वाचिक मानसिक जी कोणती लहान मोठी क्रिया आम्ही करूं ती सर्व परमेश्वराला समर्पावयाची आहे. तिचा भोक्ता तो परमात्मा आहे. याचें स्वच्छ भान जर आम्हांला राहिलें तर आमच्या हातून अनुचित गोष्ट कधीं तरी घडेल का? आमच्या मनोवृत्तींचा हि तो परमात्मा साक्षी आहे, म्हणजे भोक्ता आहे हें जर आमच्या पक्कें लक्षांत राहिलें तर मग आम्ही कोणाविषयी दुर्भावना दुर्वासना कशी राखूं? असत् संकल्प कसा करूं? परमात्मा हा भोक्ता म्हटल्यानंतर कोणत्या हि कर्मफळाची अभिलाषा आपण बाळगणें म्हणजे त्या कर्मफळाचा भोक्ता होऊं पाहणें होय. याचा गीतेनें निषेध केला आहे-

**कर्मण्येवाधिकारस् ते मा फलेषु कदाचन।**
**मा कर्मफलहेतुर् भूर् मा ते सङ्गो ऽस्त्वकर्मणि।।**

## ८८९. सुखद (अ-सुख-दः)

सुखं ददाति इति सुखदः। अथवा असुखं द्यति खण्डयति इति असुखदः।। जो सुख देतो तो सुखद म्हणावयाचा. हें पद ''असुखदः'' असें हि घेतलें तरी अर्थ तोच. जो असुख खंडितो तो असुखद म्हणावयाचा. असुख म्हणजे दु:ख हें सहज आहे, सुख प्रयत्नसाध्य आहे असें मानलें जातें. दु:खासाठीं कोणीहि जीव प्रयत्न करीत नाहीं सर्व जीव सुखासाठींच झटत असतात. परंतु वस्तुतः सुखासाठीं झटण्याची गरज नाहीं. कारण सुख हा जीवाचा स्वभावच आहे. तें सहज आहे. झटायचें तें दु:ख-निवारणासाठीं. त्यालाच सुखाचा उद्योग म्हटलें जातें. पण हा विपर्यासच नव्हे काय? म्हणून च म्हटलें आहे ''प्रतीकारं व्याधेः सुखमिति विपर्यस्यति जनः।'' परमात्मा हा सुखद आहे याचा अर्थ तो सुखरूपच आहे. जसजसा जीव अतत्त्याग करीत जातो तसतसें त्याला सुख होत जातें. संपूर्ण अतत्-त्याग, संपूर्ण अनात्म-त्याग म्हणजेच पूर्ण सुख. असें सुख हें सहज आहे, स्वाभाविक आहे, किंबहुना स्वरूपच आहे. आणि असें असल्यामुळें तो परमात्मा सुखद म्हटला आहे.

परमात्मा हा स्वभक्तजन-सुखद आहे असें हि सहजच म्हणतां येईल. ''न मे भक्तः प्रणश्यति'' अशी त्याची प्रतिज्ञाच आहे. आणि त्यांत नवल कसलें? जो अग्नीच्या जितका जवळ राहील तितका त्याचा अंधकार, त्याचें शीत आणि भय अधिक दूर होईल हें उघडच आहे. त्याप्रमाणें जो परमात्म्याचा जितका आश्रय घेईल, जितका त्याच्या संनिध राहील तितका तो अधिक सुखी होईल. हें सांगायला का पाहिजे?

परमात्मा हा स्वभक्तजन-सुखद आहे. तसा तो अभक्तजन-असुखद हि आहे. जो अग्नीची अभक्ति करील, त्याच्यापासून दूर राहील, त्याला अंधकार शीत आणि भय यांची बाधा ही होणारच. त्याप्रमाणें जो परमात्मापासून दूर दूर जाईल, त्याची अभक्ति करील त्याला दु:ख हें ठेवलेलेंच आहे. अशा प्रकारें तो परमात्मा असुख-द हि आहे. असा एकूण तीन प्रकारें हा शब्द लावतां येतो. सुख-द, असुख-द (द्यति) आणि असुख-द. सुखद पद हि असुख-द पदाप्रमाणें द्विविध लावल्यास 'सुखं द्यति अभक्तानां वैभवं क्षिणोति इति सुखदः' चवथा प्रकार होईल. हे सर्वच अर्थ त्या परमात्म्याला लागू आहेत. कारण, तुकारामानें म्हटल्याप्रमाणें 'जें जें बोला तें तें साजे या विठ्ठला'.

## ८९०. नैकज

न एकजः अनेकजः। अनेकजः चें च दुसरें रूप नैकजः. अनेक हा नञ समास आहे खरा,पण त्यांत

एकाचा निषेध तितका नाहीं जितका बहुत्वाचा बोध आहे. नैक पदांत बहुत्वाचा तितका बोध नाहीं जितका कोणा एकाचा निषेध आहे.

परमात्मा हा नैकज आहे म्हणजे तो कोणा एका पासून वसुदेवापासून झाला आहे असें म्हणतां येत नाहीं. याचा अर्थ तो अनेकांपासून झाला आहे असें नव्हे, तर तो स्वयंभू आहे असा समजावयाचा. तो एका हि पासून झालेला नव्हे, म्हणून नैकज.

अथवा नैकज म्हणजे अमुक एका पासून झालेला म्हणतां येत नाहीं. त्याच्या संभवाला अनेकांचें किती एकांचें साहाय्य झालेलें आहे असा अर्थ. दत्तात्रेयानें चोवीस गुरु केले होते. त्यांच्यापासून त्याला ज्ञान झालें. तसें परमात्म्याचें ज्ञान कोणा एकाच पासून होईल असें नाहीं. त्यासाठीं अनेकांचे पाय धरावे लागतात. शास्त्र गुरु आणि आत्मा यांच्या द्वारा तें ज्ञान प्राप्त होतें. शास्त्रांत आधीं त्या परमात्म्याचें ज्ञान मिळतें. पण त्या शास्त्रज्ञानांत परोक्षता आहे. त्यांत कांहीं संशय आणि अनिश्चय हि राहूं शकतो. तो संशय आणि अनिश्चय गुरुमुखानें जातो. अनुभवी गुरूच्या शब्दांत जिवंतपणा असतो, प्रत्यक्षता असते. पण ही प्रत्यक्षता हि स्वानुभूतीहून वेगळीच राहते. जेव्हां मनुष्याला त्या गोष्टीचा स्वानुभव येतो, तेव्हांच त्याला पूर्ण ज्ञान होतें. म्हणून परमात्मा म्हणजे त्याचें ज्ञान, हें नैकज म्हणावयाचें. शास्त्रावरून कळलें गूळ गोड असतो. गुरूनें सांगितलें खा. मी तो खाल्ला, तेव्हां मला पूर्ण व पक्कें ज्ञान झालें. हाच नैकज. हेंच विज्ञान.

### ८९१. अग्रज

अग्रे जायते इति अग्रजः। अग्रज म्हणजे सर्वांच्या आधीं जन्मलेला. मागाहून झालेला तो अवरज म्हणावयाचा. जो पाठचा असतो त्याला म्हणावयाचें अनुज. असे हे तीन शब्द आहेत-अग्रज अवरज आणि अनुज. राम हा अग्रज होता. अग्रजालाच पूर्वज असें हि म्हटलें जातें. पण अग्रज आणि पूर्वज यांत हि सूक्ष्म भेद आहे. अग्रज म्हणजे लगेच आधींचा. आणि पूर्वज म्हणजे आधींचा खरा पण मध्यंतरीं इतर हि आणखी कोणी होऊन गेलेला असला, एकाधिक अंतर असलें म्हणजे मग तो पूर्वज म्हणावयाचा. रामाचे सगळे भाऊ रामाला अवरज आहेत. परंतु भरताला राम हा अग्रज आहे तर लक्ष्मण-शत्रुघ्नांना तो पूर्वज आहे. रामाला भरत, भरताला लक्ष्मण आणि लक्ष्मणाला शत्रुघ्न अनुज होय. रामाला अनुज एकटा भरत, तर अवरज लक्ष्मण-शत्रुघ्न होत. म्हणजे तीन ऐवजीं चार शब्द आहेत हे : अग्रज आणि पूर्वज, अनुज आणि अवरज. राम लक्ष्मण भरत शत्रुघ्न हीं चारी त्यांचीं उदाहरणें होत. राम भरताग्रज पण लक्ष्मण-पूर्वज. भरत रामानुज पण लक्ष्मण शत्रुघ्न रामावरज. ह्या दृष्टीनें पाहतां ''बोध्यं रामानुजयोर् दृष्टान्तेन'' या साम्यसूत्रांतील रामानुजयोः हें पद किंचित् सदोष म्हणावें लागेल. भरत रामानुज आहे पण लक्ष्मण रामावरज आहे. दोघांना अवरज पद लावतां येईल, पण अनुजपद लावणें प्रशस्त म्हणतां येणार नाहीं. म्हणून रामानुजयोः ऐवजीं रामावरजयोः असा सुधार सुचतो. परमात्मा हा सृष्टिपूर्वज आहे पण तो जीवाग्रज आहे. परमात्मा कांहीं आमचा पिता नाहीं. तो आमचा भ्राताच आहे. ज्या चैतन्याचा तो झाला आहे. त्याच चैतन्याचे आम्ही हि झालों आहों. तो आमचा वडील भाऊ आहे. आम्ही त्याच्या पाठचे आहों. पाठचे एवढ्याच साठीं म्हणावयाचें कीं तो अनादि आणि अनंत आहे. तो निरुपाधि आहे आम्ही सोपाधिक म्हणून सादि सान्त. आणि म्हणूनच पाठचे. आणि आम्ही पाठचे म्हणूनच तो अग्रज म्हणावयाचा. एरव्हीं तो ना अग्रज ना अनुज ना पूर्वज ना अवरज. वस्तुतः तो तर अजच आहे.

### ८९२. अनिर्विण्ण

न निर्विण्णः अनिर्विण्णः। ज्याला निर्वेद प्राप्त झाला आहे तो म्हणावयाचा निर्विण्ण. जो निर्विण्ण नव्हे तो अनिर्विण्ण होय. पण निर्वेद म्हणजे काय? हा एक फार मार्मिक शब्द आहे. श्लिष्ट शब्द आहे. उपनिषदांत आणि गीतेंत तो आला आहे. "ब्राह्मणो निर्वेदं आयात्, नास्ति अकृतः कृतेन" उपनिषद्. "तदा गन्तासि निर्वेदं श्रोतव्यस्य श्रुतस्यच" गीता. वेदांत नाना सकाम कर्मे सांगितलीं आहेत, यज्ञ सांगितले आहेत. अर्थात् हें जें सगळें सकाम कर्मकाण्ड त्याचेंच नांव वेद होय. या वेदांतून सुटायला उपनिषदें गीता सांगत आहेत :-

त्रैगुण्यविषया वेदा निस्त्रैगुण्यो भवार्जुन।
निर्द्वंद्वो नित्यसत्त्वस्थो निर्योगक्षेम आत्मवान्॥

सारांश, त्रैगुण्यांतून सुटणें, संसारांतून सुटणें याचें नांव निर्वेद होय. हें केव्हां होतें? जेव्हां ऐहिक आणि आमुष्मिक भोगांचें कांहीं कौतुक उरत नाहीं तेव्हां. हा कौतुकाभाव ही वितृष्णता, ही समता म्हणजे निर्वेद होय.

यावन् अर्थ उदपाने सर्वतःसंप्लुतोदके ।
तावान् सर्वेषु वेदेषु ब्राह्मणस्य विजानतः ॥

विज्ञानी ब्रह्मवेत्याला वेदांचें काय प्रयोजन? नदीच्या पात्रांत सर्वत्र पाणीच पाणी झालें असतांना झिऱ्याचें काय काम? अशा या सर्वत्र आणि सदैव समाधान पावलेल्या पुरुषाला कोणत्या गोष्टीचें कौतुक वाटायचें आहे. यालाच म्हणतात निर्विण्ण. परंतु निर्विण्ण तो होणार ज्याला आधीं सांसारिक गोष्टींचें कौतुक असेल. परमात्म्याला असें हि कौतुक केव्हांच वाटलें नाहीं. म्हणून तो अनिर्विण्ण म्हणावयाचा. जो जेवून ढेकर देत आहे त्याच्या तोंडाला पंचपक्वान्नांचें ताट हि पाहून पाणी सुटावयाचें नाहीं, मग आंबील पाहून कुठून सुटणार? परमात्मा हा सदैव पूर्णकामच आहे. म्हणून तो अनिर्विण्ण होय. त्याला निर्वेद काय असतो तें माहीतच नाहीं.

### ८९३. सदामर्षी

सतः साधून् आमृष्यते क्षमते यः स सदामर्षी। सदा नित्यं मृष्यते इति वा सदामर्षी। अथवा न मृष्यते इति अमर्षी; सदैव अमर्षी सदामर्षी। मृष् धातु दोन अर्थांनीं येतो. एक अर्थ क्षमा करणें, दुसरा अर्थ धुणें, स्वच्छ करणें. पैकीं पहिल्या अर्थीं तो कमीच येतो आणि पुष्कळदां तर तो अकरणरूपानेंच असतो. उदाहरणार्थ "अमर्षशून्येन जनस्य जन्तुना न जातहार्देन न विद्विषादरः।" या प्रसिद्ध वचनांत तो तसा आला आहे. दुसऱ्या अर्थाचें उदाहरण "अघ-मर्षण" हें प्रसिद्ध सूक्तनाम आहे. अघमर्षण सूक्त म्हणजे पाप धुऊन टाकणारें सूक्त.

परमात्मा हा सज्जनांना क्षमा करीत असतो. त्यांना सहन करीत असतो. कारण त्यांच्या हातून चुका, अपराध, पापें झालीं तरी तीं हेतुपुरःसर नाहींत, अजाणतां होतात. तीं झाल्याचें समजल्यावर त्याबद्दल ते पश्चात्ताप करतात. त्या बद्दल प्रायश्चित्त करतात आणि अनेक सत्कर्मे करून त्यांची निष्कृति करतात. त्यामुळें परमात्मा त्यांना क्षमा करतो.

परमात्मा हा सज्जनांनाच क्षमा करतो, कारण सज्जन ईश्वर-कार्य करीत असतात. जगाची स्थिति हें ईश्वरी कार्य आहे. जग चालावें या साठीं आवश्यक असलेली वृत्ति विचार आणि वर्तन ईश्वराला आवडतें. तेंच सज्जनत्व होय.

पण सज्जनांच्या रक्षणासाठींच दुर्जनांचें पारिपत्य करणें आवश्यकच आहे. म्हणून ईश्वर तें हि करीत असतो. त्यामुळें तो सदा अमर्षी आहे. तो दुर्जनता क्षणभर हि सहन करीत नाहीं. क्रियेची प्रतिक्रिया तत्काळ होतच असते. चांगल्याची चांगली वाइटाची वाईट. अशा प्रकारें जरी ईश्वर सज्जनांना

क्षमावन्त व दुर्जनांना शास्ता वाटला तरी वस्तुतःतो या निग्रहानुग्रहाहून पर आहे. हा निग्रहानुग्रह ज्याचा तोच करून घेत आहे. म्हणून तो परमात्मा वैषम्य-नैर्घृण्य दोषांतून मुक्त आहे. तो सर्वत्र सम आहे, सर्वत्र क्षमाशीलच आहे. तो सज्जनासज्जनांवर समानच वृष्टि करतो. सर्वांचें पापपुण्य समान धुऊन टाकतो म्हणून तो म्हणावयाचा सदामर्षी।

## ८९४. लोकाधिष्ठान

लोकानां अधिष्ठानं अधिकरणम् लोकाधिष्ठानम्। परमात्मा हा या विश्वाचें अधिष्ठान आहे. अधिष्ठान म्हणजे आधार भूमि. हा आधार त्रिविध आहे. दिक् काल आणि निमित्त. कोणती हि वस्तु घ्या तिला या तिहींचा आधार हवाच. त्या शिवाय ती असूंच शकत नाहीं. कोणत्या तरी काळीं, कोणत्या तरी स्थळीं आणि कोणत्या तरी कारणापासून ती झालेली असते. हा त्रिविध आधार त्या परमात्म्याच्या ठाईं एकवटला आहे. तोच अव्यक्त अक्षर परमात्मा सर्व निमित्त आहे, तोच काळ आहे आणि तोच दिशा आहे. त्या अव्यक्त नि अक्षर तत्त्वाच्या ठाईं हा विश्वाकार, हे सगळे चतुर्दश लोक अधिष्ठित आहेत. म्हणून त्याला म्हणतात विश्वाधार, म्हणून त्याला म्हणतात लोकाधिष्ठान. भागवतांत परमेश्वराचें हें लोकाधिष्ठानत्व व्यक्त करण्यासाठीं विश्वरूपाचें वर्णन करतांना त्याच्या तळपायाच्या ठाईं अमुक लोक आहे आणि शीर्षाच्या ठाईं अमुक आहे अशी चतुर्दश लोकांची कल्पना केली आहे. कुठें ती सप्त लोकांची व कुठें त्रिलोकांची केलेली आढळते. भीष्मस्तवराजांत हि तशी ती आली आहे, ज्याचें तात्पर्य विनोबांनीं मराठींत नमोदशकांत संगृहीत केलें आहे.

**शिरीं शृंगारला स्वर्ग उरीं आकाश मोकळें।**
**पदीं पैसावली पृथ्वी लोकरूपास त्या नमो।।**

हा व्यक्त विश्वाकार म्हणजे अव्यक्ताक्षर परमात्म्याची मूर्ति होय. आणि मूर्ति म्हटली म्हणजे तिला नाना अवयव आलेच. विश्वरूपाचे ते अवयव लोक रूपानेंच वर्णावे लागतात. म्हणून तो परमात्मा लोकाधिष्ठान म्हटला आहे. निर्गुणापेक्षेनें इथें नपुंसक लिंग आलें आहे. अथवा छन्दोनुरोधानें. नाहींतर सदर पद लोकाधिष्ठानः असें पुंल्लिंग आलें असतें.

## ८९५. अद्भुत

परमात्मा हा एका बाजूनें लोकाधिष्ठान म्हटला असला तरी तो त्यासर्व लोकांहून अगदीं वेगळाच आहे. म्हणून तो अद्भुत होय, लोक-विलक्षण होय. लोकांचें कोणतें हि लक्षण त्याला लागू होत नाहीं. त्याला व्यक्त म्हणावें तर तो त्याहून वेगळाच आहे. अव्यक्त म्हणावें तर तें व्यक्त सापेक्ष आहे. त्यामुळें त्याला अव्यक्तहि म्हणणें अ-यथार्थ होईल. व्यक्ताव्यक्त म्हणावें तर तें असंबद्ध आहे व द्वैतरूप आहे. व्यक्ताव्यक्त दोन्ही नाहीं म्हणावें तर त्याचा निषेध केल्यासारखें होईल, त्याची व्याप्ति मर्यादित केल्यासारखें होईल. सारांश, कोणत्या हि प्रकारें त्याचें यथार्थ वर्णन करतांच येत नाहीं. मग त्याला अद्भुत नाहीं तर काय म्हणायचें? या अद्भुताचे अवतार हि अद्भुतच आहेत. त्यांना नर म्हणावें तर ते देव आहेत, देव म्हणावें तर नरवत् ते जन्मतात, कर्मे करतात, हें अद्भुतच नव्हे काय? नरसिंह हा अवतार सर्व अवतारांचें अद्भुतत्व प्रकट करणारा आहे. तो नर म्हणावा तर नर नाहीं, सिंह म्हणावा तर सिंह नाहीं उभयरूप म्हणावा तर तो त्या दोहोंहून वेगळा नि आगळाच आहे. तो दोन्ही नाहीं म्हणावें तर तें प्रत्यक्षाशीं विसंगत आहे. अशा प्रकारें त्याचें यथार्थ वर्णन करतांच येत नाहीं. म्हणून तो अद्भुत. ध्रुवाच्या समोर शंखचक्रगदापद्मधर तो भगवान् विष्णु येऊन उभा राहिला. पण ध्रुवाचे डोळे समाधींत लावलेले होते. त्याला तो आंत, हृदयांत दिसूं लागला. त्याला समजेच ना कीं तो प्रत्यक्ष पाहत आहे कीं स्वप्न पहात आहे? त्यानें डोळे

उघडले तों समोर तो भगवान्. आपण आंत पाहिलें तें रूप हेंच म्हणून परत डोळे मिटले तर आंत पुन: तेंच. पुन: उघडले, समोर तेंच. असा तो प्रत्यक्ष अप्रत्यक्ष, प्रत्यक्षाप्रत्यक्ष आणि उभयभिन्न कांहीं अद्‌भुतच आहे. म्हणूनच तर उपनिषदें नि गीता गातात "आश्चर्यो वक्ता: कुशलो ऽस्य लब्धा आश्चर्यो ज्ञाता कुशलानुशिष्ट:।।" "आश्चर्यवत् पश्यति कश्चिदेनं आश्चर्यवद् वदति तथैव चान्य:। आश्चर्यवच् चैनं अन्य: शृणोति श्रुत्वाप्येनं वेद नचैव कश्चित्।।

## ८९६. सनात्

सनात् हें एक अव्यय आहे. त्याचा अर्थ चिर, सदैव. जो चिरंतन आहे, सदैव आहे, सदैव आहेच आहे, त्याला सनात् नाहीं तर काय म्हणावयाचें? सनात् चें दुसरें रूप सनत्कुमार. सनक सनंदन सनात् सनत्कुमार हे मुनिचतुष्क म्हणजे काल आज उद्यां नि सदासर्वदा हे जे कालाचे भिन्नाभिन्न चार प्रकार तेच होत. ते पृथगात्म दिसून हि एकात्मच आहेत. ज्याला आपण उद्यां म्हणतों तो उद्यां आज होतो. ज्याला आज म्हणतों तो उद्यां काल होतो. ज्याला काल म्हटलें तो काल आज होता नि परवां उद्यां होता. सारांश एकच एक अखंड एकरूप कालप्रवाह ज्यावर काल आज उद्यां चे तरंग सतत उठत व फुटत राहतात, तोच सनात् होय.

आज काल उद्यां हे कालखंड जसे कल्पित आहेत तसेंच पूर्व पश्चिम उत्तर दक्षिण हे दिक्खंड हि कल्पितच आहेत. आणि कल्पितच आहे सारा कार्यकारणभाव जो विश्वोत्पत्तीची उपपत्ति मानला जातो. जर कांहीं असेल, म्हणजे परमार्थत: असेल, तर ती एक चित्सत्ता मात्र आहे. तिच्यावरच देश काल निमित्त कल्पना केली जाते, वृथारोप केला जातो. हें असें महदभुत दर्शन झालें म्हणजे विश्वरूप दर्शनानें चकित झालेल्या अर्जुनाप्रमाणें आपल्या हि तोंडून उद्‌गार निघेल : "सनातनस् त्वं पुरुषो मतो मे" सनातन तोच सनात्.

## ८९७. सनातनतम

सनात् म्हटल्यानंतर पुन: सनातनतम म्हटलें त्या परमात्म्याला. हा मनाचा छंद आहे, जिभेचा चाळा आहे. तोंडांत खडीसाखरेचा खडा आपण टाकतों. पण कडाकडा चावून खाऊन मोकळे होत नाहीं. त्या साखरेचा तो गोड रस जिभेवर घोळत राहतों. मनानें तो आस्वादत राहतों. ती गोडी जाणूं जिभेनेंच नव्हे तर सर्वेन्द्रियांनीं आम्ही चाखतों. ती गोडी जणूं जिभेंतून मनांत, मनांतून हृदयांत पाझरत राहते आणि आमचें सर्वांग निववितें, परितृप्त करते. आणि मग जर विचारलें कीं काय कशी आहे खडीसाखर? तर उत्तरतों वा, गोड; खूपच गोड! हें जसें आपण द्विवार आणि सविशेष प्रशंसन करतों तसेंच इथें हि झालें आहे. तो परमात्मा सनात् काय, सनातनतम आहे. असे सहजोद्‌गार निघाले आहेत. हा रसानुभावाचा उद्रेक झाला आहे. कल्लोळ उसळला आहे. वस्तुत: इथें तरतम भावाला वाव कुठें आहे? प्राचीन वा अर्वाचीन, पुरातन वा नूतन, या विशेषणांना तरतम भाव असूं शकतो. परंतु सनातनाला, सर्वकालिकाला तो कसा असणार? सनातनांत न्यूनाधिकता संभवतच नाहीं. तरी नित्याच्या संवईनें त्याला हि तम प्रत्यय जोडून दिला आहे. पूर्ण म्हणजे अन्यून पूर्णच. परंतु त्या पूर्णाला हि आपण संपूर्ण परिपूर्ण म्हणून म्हणतच असतों. त्यांतलाच हा प्रकार. नित्य म्हणजे सनातन शाश्वत. पण त्या नित्याला आपण निरंतर पद जोडून देतों आणि नित्यनिरंतर असा प्रयोग करतों. नित्यानें प्रतिदिनता तर निरन्तरानें प्रतिक्षणता आणि त्याहून हि निबिडता व्यक्त केली आहे. तशाच सारखा भाव सनातनतम पदानें घ्यावयाचा. तो परमात्मा सनात् म्हणजे सनातन

आहे, तो सनातनतम आहे, लवनिमिषार्धहि त्यावांचून नाहीं.

## ८९८. कपिल

कपिल म्हणजे काळसर. कपिला गाय प्रसिद्धच आहे. उपनिषदांत आणि गीतेंत हि कपिल पद आलें आहे. ''ऋषिं प्रसूतं कपिलं यस् तमग्रे ज्ञानैर् बिभर्ति जायमानं च पश्येत्'' असा उल्लेख उपनिषदांत आला आहे. ''सिद्धानां कपिलो मुनिः'' असा उल्लेख गीतेंत आला आहे. पहिला कपिल हा ब्रह्मदेव आहे, तर दुसरा सांख्याचार्य महामुनि आहे. आणि हा इथला उभयरूप असून शिवाय वेगळाच आहे. ब्रह्मदेव हा परमात्म्याचा एक आविर्भावच आहे. सांख्याचार्य हि विभूतिच आहे. पण इथें तो सर्वसामान्य जीवरूप घ्यावयाचा आहे. जो कोणता जीव जन्मतो तो कपिल होय. तो अज्ञानशबल वा मायामलिन होऊनच जन्मत असतो. एरव्हीं स्वरूपतः तर तो अज आहे, नित्य शुद्ध बुद्ध मुक्त आहे. आणि असा तो आहे म्हणूनच तो परमात्मस्वरूप म्हणावयाचा. म्हणूनच तो परमात्माचें एक रूप होय.गीतेंत म्हटलेंच आहे :

''ममैवांशो जीवलोके जीवभूतः सनातनः'' मागील सनात् सनातनतमः या आनुपूर्वींत कपिल पद आलें असून'' जीवभूतः सनातनः'' इथें हि सनातन पद आलें आहे. तें वरील अर्थाला पोषक आहे असें म्हणतां येईल. मायामलिन असल्यामुळें जीव कपिल आहे. तसा प्रत्येक जीव जन्मतः उल्बांतून बाहेर पडल्यावर बाहेरच्या हवेंत किंचित् काळसर पडतो म्हणून हि तो कपिल होय. जीव हा मूलतः ब्रह्मस्वरूप शुक्ल असून तो अज्ञानवशतः कपिल होतो. अग्नि हि तसाच मूलतः शुक्लोज्जवल आहे. परंतु जगाच्या स्पर्शानें तो काळसर पडतो. म्हणून तो हि कपिल होय. अशा प्रकारें अग्नि वा परमात्मा वस्तुतः अत्यन्त निर्मल उज्ज्वल असून त्याचें बाह्य रूप मात्र काळसर दिसतें आणि त्यामुळेंच तो कपिल म्हटला जातो. दिसायला कपिल, असायला धवल असा हा परमात्माग्नि आहे. शंकराचार्यांनीं कपिल म्हणजे वडवानल असा अर्थ केला आहे. वडवानल काळा कल्पिला आहे. म्हणून तो कपिल.

## ८९९. कपि

कपि हें एक विभूतिमत् सत्त्व आहे. जें जें विभूतिमत् सत्त्व आहे तें तें भगवद्‌विभूति होय असें गीता सांगते. पण ह्यासाठीं गीता हवी कशाला? जिथें जिथें कांहीं अद्‌भुत शक्ति वा शोभा आढळते त्यानें मनुष्य प्रभावित झाल्याशिवाय राहत नाहीं. अद्‌भुताचें मनुष्याला असें सहज आकर्षण आहे. अशा स्थितींत वानरासारख्या पराक्रमी प्राण्यानें तो प्रभावित न झाला तरच नवल. जमिनीला पाय न लावतां झाडावरून झाडावर उड्या घेत जाणारा जंगलांचा ज्याला अडथळा नाहीं अशा शक्तिशाली आणि युक्तिशाली प्राणी वानराचा नराला हेवा वाटल्यास नवल काय? नराला एक एक पाऊल टाकत जावें लागतें तो जमीन सोडूं शकत नाहीं. त्याला जंगल म्हणजे अंतराय होय, मोठें विघ्नच होय. पण वानराला तें अन्तराय नाहीं, तर उपाय आहे. जंगल म्हणजे त्याचें घरच. रहायला, खायला, हिंडाफिरायला जंगलाहून सोपें नि सुरक्षित दुसरें कांहीं नाहीं. जगांत पूर्वीं शेकडों मैल जंगलेंचीं जंगलें होतीं नि वानरांचें साम्राज्य होतें. वानरच वनराज होता. पण नराला जंगल म्हणजे मंगल नव्हतें. त्याला तें भयंकर होतें. त्यानें जंगलें तोडलीं आणि जाळलीं. तेव्हां कुठें तो भूपति झाला. पण त्या अवधींत त्यानें वानरांची संख्या नि शक्ति दोन्ही पाहिल्या होत्या. आणि त्या दोहोंच्या हि योगें तो प्रभावित झाला होता हे खास. आणि म्हणून अशा प्रभावी प्राण्याचें नांव त्यानें परमात्म्याला दिलें. वानर हा ग्राम्य नाहीं, गृही नाहीं. तो विजनांत

अनिकेत राहतो कंदमूलफलाशन करतो. अन्तराय उल्लंघून जातो. परमात्मा हि तसाच आहे. म्हणून तो म्हटला आहे कपि.

यतते इति यतिः। तसा कपते प्लवते इति कपिः जो सर्व अडथळे उल्लंघून जातो तो म्हणावयाचा कपि.

## ९००. अप्यय (अव्यय)

अप्यय म्हणजे विलय, प्रलय. परमात्मा हा लूतावत् म्हणजे कोळ्याप्रमाणें हा सृष्टीचा धागा आपल्यांतून काढतो आणि परत कल्पान्ताच्या वेळीं तो गिळून घेतो. असा तो विश्वाकाराला गिळून टाकणारा असल्यामुळें त्याला अप्यय म्हणावंयाचें. त्याच्या ठाई हा सबंध व्यक्त विश्वाकार अपीत होतो, विलीन होतो. सूर्योदयाला वृक्षाची छाया त्याच्या पासून निघून लांबवर पसरलेली असते. पण जसजसा सूर्य चढत जातो तसतशी कमी कमी होऊन मध्याह्नीं ती वृक्ष तळीं येऊन नाहींशी होते. सृष्टि ही हि तशीच परमात्म्याची छाया आहे. ती सृष्ट्युत्पत्तीच्या काळीं लांबवर पसरलेली असते आणि कल्पान्तापर्यंत पसरते आणि पसरलेलीच राहते. परंतु जेव्हां कल्पान्त होतो तेव्हां ती परत परमात्म्याच्या पायातळीं येऊन नाहींशी होते. या नाहीसें होण्यालाच अपीति, अप्यय म्हणतात. इथें ज्याच्या चरणीं ती सृष्टिरूप छाया विसावते त्याला हि म्हणजे परमात्म्याला हि अप्यय म्हणतां येईल. कारण अधिष्ठानावांचून कोणती क्रिया होऊं शकत नाहीं. आणि तें अधिष्ठान इथें परमात्माच आहे. म्हणूनच त्याला अप्यय म्हटलें आहे. गीतेंत हा अप्यय शब्द प्रलय वा संहार या अर्थानें आलेला आहे:

**भवाप्ययौ हि भूतानां श्रुतौ विस्तरशो मया।**
**त्वत्तः कमलपत्राक्ष माहात्म्यमपि चाव्ययम्।।**

भवाप्यय म्हणजे आविर्भाव व तिरोभाव. अप्यय म्हणजे अप्ययकारी असा अर्थ न घेतला व केवळ अप्यय म्हणजे अपीति, तिरोभाव म्हटलें तरी कांहीं बिघडावयाचें नाहीं. कारण विश्वाचा तिरोभाव म्हणजेच परमात्माविर्भाव होय, पर त्म-दर्शन होय. म्हणून त्याला अप्यय म्हणणें योग्यच आहे. उलट परमात्म्याचा तिरोभाव म्हणजे विश्वाभास होय.

अप्यय ऐवजीं अव्यय असाहि पाठ संभवतो. आचार्यांचा पाठ अप्यय आहे. कल्पान्ते अस्मिन् अपियन्ति जगन्ति इति अप्ययः।

## शतक दहावें

## ९०१. स्वस्तिद

हा सबंध श्लोकार्ध स्वस्तिमय आहे. आणि इथूनच सहस्राचें दशम व शेवटचें शतक सुरू होत आहे. सहस्र सबंधच पावन आहे, पण हें कलश-शतक विशेषतः पावन आहे. स्वस्तिद आहे.

स्वस्ति ददाति इति स्वस्तिदः। जो स्वस्ति देतो तो स्वस्तिद म्हणावयाचा. परमात्मा हा स्वस्ति देणारा आहे. जें काय स्वस्ति आहे, कल्याण आहे, भलें आहे तें सारें त्याच्या पासून च मिळत असतें. परका अहित चिंतूं शकतो, करूं शकतो. परंतु कोणी आपलेंच अहित चिंतीत नाहीं, करीत नाहीं. आणि परमात्मा तर सर्वांचा निजात्मा आहे. सर्वभूतात्म-भूत आहे, त्यामुळें तो कोणाचें हि अहित चिंतूं शकत नाहीं, करूं शकत नाहीं. तो केवळ कल्याण च चिंतूं शकतो, कल्याणच करूं शकतो. म्हणून तो म्हटला आहे स्वस्तिद. माता पिता गुरु बन्धु हे सगळे आमचे आप्त आहेत आणि सहज स्वस्तिद आहेत. पण ते किती हि आप्त असले, निकटचे असले तरी ते आपल्या निजात्म्याइतके निकटचे केव्हांहि म्हणतां येत नाहींत. म्हणून ते सगळे स्वस्तिद असले हित-कर्ते असले तरी आपल्या निजात्मरूप परमात्म्याहून अधिक स्वस्तिद नव्हत. तो परमात्माच खरा स्वस्तिद

आहे. कारण तो कधीं कुणाचें अहित चिंतूंच शकत नाहीं. माता पिता गुरु हे परम हितकर्ते हि प्रसंगीं माणसावर उलटतात, पण आपला निजात्मा आपला कधींच द्रोह करीत नाहीं, करूं शकत नाहीं. म्हणून तो एक सर्वांतर्यामी परमात्मा च स्वस्तिद होय.

## ९०२. स्वस्तिकृत्

जो स्वस्तिद तोच स्वस्तिकृत्. बाप मुलाला रक्षण पोषण शिक्षण कामधंदा नि घरदार देऊन त्याचें भलें करीत असतो. कारण बापाची मुलाविषयीं आत्मभावना असते. तो त्याचा आदर्श असतो. त्यांत तो आपलें रूप पाहत असतो. आपलें सुंदर रूप पाहत असतो. आपलें उत्तम रूप पाहत असतो. आपली सफलता नि सार्थकता पाहत असतो. आणि म्हणून तो स्वस्तिद होतो. उलट मुलगा जाणतो नि मानतो कीं आपल्याला जें कांहीं लाभलेलें आहे, हें सुंदर शरीर आणि तदनुगत सारे सुखोपभोग, तें सर्व बापापासून मिळालें आहे. म्हणून त्याला जेणें करून सुख होईल तें करणें हेंच आपलें कर्तव्य. मुळाच्या सिंचनानेंच शाखापल्लव टवटवतात. आपण शाखापल्लव आहोंत पिता मूळ आहे. असें म्हणून तो आजीवन पित्राज्ञेंत वागत असतो, पित्याच्या मरणोत्तर त्याचें श्राद्ध करीत असतो. त्याचें अभिलषित म्हणजे आपलें स्वस्ति करीत असतो. अशा प्रकारें तो स्वस्तिकृत् होतो. आपल्याला रुचिकर व सुखकर वाटेल तें तो नाहीं करींत, तर जें हितकर आहे, जें पित्याला इष्ट होतें तें तो करतों, जें आपल्याला सुखकर आहें तें नव्हे. म्हणून तो स्वस्तिकृत् होय. मूलसिंचन स्वस्ति आहे, शाखापल्लव सिंचन नव्हे. परमात्मा हा सर्वांचें मूळ होय. म्हणून त्याला जें अभीष्ट तें जो करतो तो स्वस्तिकृत् होय. परमात्मा तर सहजच स्वस्तिकृत् आहे. कारण तो अनात्मधर्म कोणताच स्वीकारीत नाहीं. त्याप्रमाणें जो अनात्मधर्मापासून दूर राहतो तो स्वस्तिकृत् होय. जो आत्मधर्माचें अनुसरण करतो तो स्वस्तिकृत् होय. परमात्मा स्वभावत:च स्वस्तिकृत् असल्यामुळें वैदिक ऋषि परोपरीनें त्याच्या पासून स्वस्तिकामना करतात:

> " स्वस्ति न इन्द्रो वृद्धश्रवा:
> स्वस्ति न: पूषा विश्ववेदा:।
> स्वस्ति नस् तार्क्ष्यो अरिष्टनेमि:
> स्वस्ति नो बृहस्पतिर् दधातु।।"

## ९०३. स्वस्ति

परमात्मा स्वस्ति-द आहे, स्वस्ति-कृत् आहे हें काय सांगायला हवें? तो तर स्वयं स्वस्तिरूप आहे. म्हणून त्याला स्वस्ति म्हटलें आहे. स्वस्ति हें एक अव्यय आहे. तें नाम कसें झालें? परमात्म्याची व्याप्ति नामापुरतीच नाहीं, तो शब्दाच्या सर्व जाति व्यापून आहे. तो नाम आहे, तो क्रिया आहे. तो नाम, धातु, उपसर्ग नि निपात आहे. तुम्ही शब्दाच्या जाति दोन वा चार न कल्पितां आठ कल्पिल्या तर तो परमात्मा नाम, सर्वनाम, विशेषण, क्रियापद, क्रिया विशेषण, शब्दयोगी, उभयान्वयी नि केवलप्रयोगी आहे. मग तो स्वस्ति म्हटला म्हणून कुठें बिघडलें? तें अव्यय आहे, तसा परमात्मा हि अव्ययच आहे. तो अव्यय स्वस्ति, अक्षय कल्याण आहे. स्वस्ति हें अव्यय "सु अस्ति" या दोन पदांचें बनलें आहे. सु हा सुखाचा संक्षेप आहे, त्याचें आद्य अक्षर आहे. तो एक उपसर्ग आहे. आणि अस्ति हें एक क्रियापद आहे. अस्ति म्हणजे आहे. सु अस्ति म्हणजे सुख आहे. सुखाची भावना म्हणजे सुरक्षिततेची निर्भयतेची भावना. ही अभीष्ट स्थिति दाखविण्यासाठीं जें चिह्न कल्पिलें त्याचें नांव स्वस्तिक. चारी दिशांनीं सुरक्षित, सर्वतो भद्र म्हणून तें 卐 असें काढलें जातें. तें परमात्म्याचें प्रतीक आहे. स्वस्ति अव्ययाला स्वार्थे क प्रत्यय जोडून स्वस्तिक नाम बनविलें आहे. परमात्मा हा अकुतोभय

आहे म्हणून तो स्वस्ति होय. त्याच्यावर कोणाची कुदृष्टि चालत नाहीं. आत्मनिष्ठावर कोणत्याहि अनात्म वस्तूची सत्ता चालूं शकत नाहीं. परमात्मा स्वस्ति आहे. म्हणजे तो आत्मनिष्ठारूप आहे.

### ९०४. स्वस्तिभुक्

यज्ञांत देवतेला उद्देशून आहुति द्यावी लागते. आणि होत्रादि ब्राह्मणांना दक्षिणा. संतर्पणयज्ञांत हि ब्राह्मणादिकांना भोजन दिलें जातें आणि दक्षिणा हि. अशा प्रकारें हवन भोजन आणि दक्षिणा हीं कोणत्या हि यज्ञाचीं प्रधान अंगें होत, मुख्य विधि होत. परमात्म्याच्या प्रीत्यर्थ जो यज्ञ करावयाचा त्यांत स्वस्ति हेंच हवन व स्वस्ति हीच दक्षिणा. म्हणून त्याला विशेषेंकरून स्वस्तिभुक् व स्वस्तिदक्षिण म्हणावयाचें.

स्वस्ति न इन्द्रो वृद्धश्रवाः
स्वस्ति नः पूषा विश्ववेदाः ।
स्वस्ति नस् ताक्ष्योंऽरिष्टनेमिः
स्वस्ति नो बृहस्पतिर् दधातु।।

हें जें स्वस्तिवाचन त्याचाच तो परमात्मा भोक्ता आहे. तोच त्याचा यज्ञ. प्रत्यक्ष यज्ञाग्नींत तांदूळ तीळ तूप होमून जो यज्ञ केला जातो तो द्रव्ययज्ञ होय. जो वाचेनेंच केला जातो तो वाचिक होय. जो मनांतच भाविला जातो तो मानसिक म्हणावयाचा. हे तिन्ही स्वस्तियुक्त केले म्हणजे ते स्वस्तियज्ञ झाले. आवश्यकते प्रमाणें ते करावयाचे. द्रव्य उपलब्ध नसेल व तशी गरज नसेल तेव्हां केवल वाचिक स्वस्तियज्ञ करतां येईल. त्याची हि शक्यता नसेल तर मनोमन मानसिक हि तो होऊं शकेल. आणि श्रद्धामय तर तो या तिन्हींवांचून हि होऊं शकतो. पण स्थूल सूक्ष्म कोणती ना कोणती क्रिया ही यज्ञाला आवश्यक आहेच. अगदीं ज्ञानमय यज्ञ घेतला तरी तो निष्क्रिय म्हणतां यावयाचा नाहीं. परमात्मा हा या सर्वच यज्ञांचा भोक्ता आहे. मात्र तो स्वस्तियुक्त असला पाहिजे.

"स्वस्ति प्रजाभ्यः परिपालयन्तां,
न्याय्येन मार्गेण महीं महीशाः।
गोब्राह्मणेभ्यः शुभमस्तु नित्यम्,
लोकाः समस्ताः सुखिनो भवन्तु।।

सर्वेऽत्र सुखिनः सन्तु सर्वे सन्तु, निरामयाः।
सर्वे भद्राणि पश्यन्तु मा कश्चित् दुःखमाप्नुयात्।।

हें हि स्वस्तिवाचनच होय.

### ९०५. स्वस्ति-दक्षिण

स्वस्ति एव दक्षिणा यस्मिन् यस्य वा, स स्वस्ति-दक्षिणः। स्वस्तिवचन हीच ज्यांत वा ज्याची दक्षिणा होय तो स्वस्ति-दक्षिणम्हणावयाचा. यजनीय देवता प्रसन्न व्हावी म्हणून आपण यज्ञ करतों. त्या यज्ञांत यज्ञदेवतेला हवि देतों हें योग्यच आहे, पण होत्राहि ब्राह्मणांना दक्षिणा कशासाठीं? हा मध्यस्थ हवाच कशाला? यजमानच यज्ञ करीत असला तरी त्याला तज्ज्ञाची मन्त्रज्ञ व तन्त्रज्ञ ब्राह्मणाची, क्रिया-सिद्धीसाठीं आवश्यकता असते. त्याची ही मध्यस्थता त्यानें लादलेली नाहीं, आम्हीं मागितलेली आहे. सुइणीची गरज बाळंत होणारणीला असते, सुइणीला नव्हे. ती जी ऐनबिकट प्रसंगीं मदत करते तिचें मोल होऊं शकत नाहीं. पण कृतज्ञतेनें तिला यथाशक्ति कांहीं द्रव्य दिलें जातें. ही कांहीं मजुरी वा मोबदला नव्हे. मजुरी मोबदला यांचें प्रमाण ठरविणें शक्य असतें. इथें तें शक्य नाहीं. इथें तें श्रद्धादेय आहे. त्याचेंच नांव दक्षिणा. दक्षिणा किती दिली जाते याचें महत्त्व नाहीं, पण कशी दिली जाते याचें फार महत्त्व आहे. ती श्रद्धेच्या, कृतज्ञतेच्या, प्रेमादराच्या पाण्यांत किती भिजलेली आहे याचें निरतिशय महत्त्व आहे. अशी ही दाक्षिण्याची खूण दक्षिणा ज्या यज्ञांत दिली जात नाहीं तो यज्ञ तामस होय, असें गीता म्हणते. अर्थात् ज्यांत श्रद्धा नाहीं, त्याग नाहीं, कृतज्ञता नाहीं,

गौरव नाहीं तो यज्ञ होऊं शकत नाहीं. दक्षिणा भिक्षा नव्हे, तें मानदेय आहे. तें गौरवपूर्वक द्यावयाचें आहे. अशी ही दक्षिणा कांहीं हि होऊं शकेल. एक तुलसीदल हि होऊं शकेल. पण त्या तुलसीदलाचें तोलमोल अदक्षिणेच्या खंडोगणती सोन्यानाण्याला यावयाचें नाहीं. परमात्म्याच्या यज्ञांत स्वस्ति शब्दच दक्षिणा आहे. ''स्वस्ति सर्व-भूतेभ्यः'' असें म्हटलें म्हणजे सर्व दक्षिणा मिळाली. स्वस्ति शब्द हाच हवि, स्वस्ति शब्द हीच दक्षिणा. असा तो परमात्मा स्वस्तिभुक्, स्वस्तिदक्षिण आहे. स्वस्तिच देवता, स्वस्तिच दक्षिणा, स्वस्तिच मंत्र, स्वस्तिच तंत्र, स्वस्तिच फल. असें हें स्वस्तिसूक्त इथें पूर्ण झालें.

## ९०६. अरौद्र

न रौद्रः अरौद्रः। जो रौद्र नव्हे तो अरौद्र म्हणावयाचा. रौद्र कशाला म्हणावयाचें? जें जीवाला रडवतें तें रौद्र होय. आत्मविषयक अज्ञान, तज्जनित काम आणि कर्म हीं माणसाला रडवत असतात. म्हणून तीं रौद्र होत. सर्व आसुर संपद्, दम्भ दर्प अभिमान क्रोध पारुष्य हा सगळा अज्ञानवर्ग रौद्र होय. मनुष्य जीं काम क्रोध लोभ-प्रेरित कर्मे करतो तीं सगळीं रौद्र होत. त्यांचे परिणाम, तद्द्वारा संपादिलेली सत्ता संपत्ति संस्कृति, रौद्र होत. तद्द्वारा होणारी गति नरकादि उघडच रौद्र होय. सारांश अज्ञान, विकार, रोग आणि भोग ही संपूर्ण मालिका रौद्र होय. परमात्मा या सर्वांतून मुक्त आहे. कारण अज्ञानाचा परिणाम जें शरीर त्यांतूनच तो मुक्त आहे. शरीराबरोबरच जन्म मृत्यु जरा व्याधि इत्यादि अनर्थ-मालिका येते. शरीराबरोबरच हा सारा संसार येतो, प्रपंच येतो आणि तें परमात्मतत्त्व तर ''प्रपंचोपशमं शान्तं शिवं अद्वैतम्'' आहे. म्हणून तें अरौद्र होय. वैराग्य जीवाला कडू वाटतें, संसार गोड वाटतो. पण संसाराचें गोडपण हें विषारी पण सुंदर फळासारखें, तर वैराग्याचें कडूपण हें कडू पण संजीवनी औषधीसारखें आहे. पण हें ज्ञान जीवाला नसतें. त्यामुळें तो फसत असतो. या फसवणुकींतून गुरु सोडवितात. परमार्थ-मार्ग हा दिसायला रौद्र आहे पण परिणामतः तो सुखकर आहे. म्हणून तो परमात्मा अरौद्र म्हणावयाचा. सौम्य कां नाहीं म्हटला? अरौद्र कां? त्यांत हेतु आहे. हेतु हा कीं तो दिसायला रौद्र च आहे, पण रौद्र समजूं नये; कारण परिणामीं तो अमृत आहे, हसविणारा आहे, हें प्रकट व्हावें. ''यत् तद् अग्रे विषमिव परिणामे ऽमृतोपमम्'' असा आहे परमार्थ-मार्ग. म्हणून तो म्हटला आहे अरौद्र.

## ९०७. कुण्डली

अरौद्रः कुण्डली चक्री विक्रम्यूर्जित-शासनः। शब्दातिगः शब्दसहः शिशिरः शर्वरीकरः।। हा संपूर्ण श्लोक परमात्म्याचें निर्दोषत्व व गुणाकरत्व प्रकट करणारा आहे. परमात्मा दंभ दर्प अभिमान क्रोध परुषता इत्यादि दाहक दोषांपासून मुक्त आहे, हें अरौद्र पद सूचित करतें. तर ''शिशिरः शर्वरीकरः'' हीं पदें तो शीतल सौम्य गुणनिधान आहे असें द्योतित करतात.

परमात्मा रौद्र नाहीं इतकेंच नव्हे तर तो कुण्डली म्हणजे कुण्डलवान् आहे, अलंकृत आहे. एखादा पुरुष वा स्त्री नुसती अव्यंग असून भागत नाहीं त्या व्यक्तीच्या ठाईं गुण हि हवेत. ती विद्या कला कांचन यांनीं संपन्न हि हवी. तेव्हांच ती सर्वांगसुंदर, सर्वजन-नयन-मनोहर म्हटली जाते. परमात्म-मूर्ति ही अशीच आहे. ती अरौद्र म्हणजे प्रसन्न आहे. सौम्य, प्रियदर्शन, सुहास्य-वदन आहे. त्याच्या भोंवतीं सर्वत्र त्याची प्रसादचन्द्रिका पसरली आहे. ती सर्व मंगल गुणांचा आश्रय, सर्व विद्यांचा नि कलांचा आकर आणि सुवर्णवस्त्रावृत व मणिभूषण-भूषित आहे. गायक गायिका नर्तक नर्तिका यांच्या गायन

नर्तनावर लुब्ध होऊन लोक त्यांच्यावर चंदेरी बरसात करतात हें आपण पाहतों. म्हणजे गुण व कला यांच्यावरून सोनें नाणें हिरे माणकें ओवाळून टाकावीं अशीं तीं गुण कला आहेत. मग परमात्मा जो सर्व गुणांचा नि कलांचा निधान तो कां बरें कुण्डल-मण्डित असणार नाहीं, सर्व संपत्ति त्याची दासी होय. त्याच्या दिव्य गुणांवर लुब्ध होऊन श्री त्याच्या पायांची दासी झाली आहे. कुण्डली च काय पण तो श्रीपाद आहे. ती कर्णलग्नच नव्हे तर पदलग्न आहे. कुण्डली पद या सर्व अर्थाचें वाचक आहे.

## ९०८. चक्री

परमात्मा कुण्डली म्हणजे श्री-मन्त आहे तसा तो चक्री म्हणजे शक्तिमन्त हि आहे. चक्र हें निग्रहानुग्रहसामर्थ्याचें प्रतीक आहे. आपल्या सुदर्शन चक्रानें त्यानें वैऱ्यांचीं मुंडकीं उडविली आहेत, आपल्या भक्तांचें परित्राण केलें आहे. हें चक्र म्हणजे केवळ स्थूल वर्तुलाकृति शस्त्र नव्हे, तर कर्माचा अभंग कायदा होय. तुमचीं कर्मेंच तुमचें रक्षण वा भक्षण करतात. तुमचीं कर्में चांगलीं असलीं तर तीं तुमचें रक्षण करतील. तुम्ही किती हि विपत्तींत सांपडलां तरी तीं तुमची सोडवणूक करतील. तुम्ही कसें बचावलां तें तुमचें तुम्हांलाच कळणार नाहीं. पण ते सर्व तुमच्या पूर्व सुकृताचें फळ असतें. तसेंच तुम्ही सर्व सौख्य अनुभवीत असतां, सुखाच्या राशीवर लोळत असतां एकाएकीं तुमच्यावर आपत्ति येऊन कोसळते आणि पाहतां पाहतां तुम्ही भिकेस लागतां. हें असें अकल्पित दु:ख कुठून येतें? तें हि तुमच्या पूर्व दृष्कृताचेंच फळ असतें. कौरवपांडवांचा इतिहास आपल्याला हा कर्म-सिद्धांत समजावून सांगत आहे. ऐन वेळीं कर्णाचें रथचक्र पृथ्वींत रुततें. काय कारण? कारण त्याचें दैव म्हणजे पूर्व कर्म. ऐन वेळीं धर्माला यक्ष भेटतो आणि त्याला वर देतो. काय कारण? कारण त्याचें दैव म्हणजे पूर्व कर्मच. अशा प्रकारें आपलें बरें वा वाईट कर्म हेंच एक आपलें तारक नि मारक आहे. आणि तें आहे आपल्याच हातीं, आपल्याच आत्म-शक्तीच्या हातीं. म्हणून तो सर्वान्तर्यामी सर्व शक्तिमान् परमात्मा चक्री म्हटला आहे.

## ९०९. विक्रमी

परमात्मा हा निर्दोष गुणी आहे. आणि त्याच्या त्या गुणांत ब्राह्मणांचें शब्दबल, क्षत्रियांचें भुजबल आणि वैश्यांचें धनबल हि आहे. कुण्डली पदानें त्याचें सर्वगुणाश्रय धनगुणशालित्व प्रकट झालें आहे. चक्री विक्रमी आणि ऊर्जित-शासन या पदत्रयीनें त्याचें भुजबलगुणान्वितत्व प्रस्फुट झालें आहे. आणि शब्दातिग: शब्दसह: या पदद्वयीनें त्याचें शब्दबलशालित्व किंबहुना शब्दातिबलगुण-शालित्व प्रकाशित झालें आहे असें म्हणतां येईल. त्याचें निर्दोषत्व अरौद्र पदानें आणि सर्वमंगल-गुण-सुखास्पदत्व 'शिशिर: शर्वरीकर:' या पदद्वयीनें सूचित झालें आहे. असा एकूण श्लोकाचा भावार्थ आहे.

चक्रीपद शक्तियुक्तिमत्ता प्रकट करतें तर विक्रमी पद त्याची पराक्रमशालिता प्रकट करतें. आणि ऊर्जितशासन हें पद त्याचें प्रजापालकत्व प्रकट करतें. आधीं शरीरबल आणि शस्त्रबल हवें, त्यानंतर पराक्रम हवा, शत्रुंजयता हवी. आणि शेवटीं हवी चक्रवर्तिता, सर्वत्र राजाज्ञा-शासन. चक्री विक्रमी आणि उर्जितशासन हीं तीन पदें त्याचेंच सूचन करीत आहेत.

प्राचीन काळीं आपलें रणपाण्डित्य आपला पराक्रम आपलें सर्वातिशायित्व सिद्ध करण्यासाठीं राजे लोक राजसूय यज्ञ करीत, दिग्विजय करीत. असा दिग्विजय करून राजसूय यज्ञ करणाराच चक्रवर्ती

म्हणून राजमान्य होई. तोच खरा विक्रमी म्हणावयाचा. परमात्मा हा असा विक्रमी आहे. त्यानें हें विश्व जिंकून टाकलें आहे. त्याच्या विरुद्ध कोण उभा राहूं शकला आहे? तो विश्वजित् आहे. तो सद्रूप असून एक त्याचीच सत्ता या विश्वांत चालते आहे. त्याचेंच चक्र या विश्वांत अप्रतिहत प्रवर्तित होत आहे. इतरांची सत्ता कुठल्या तरी कोपऱ्यांत नि ती हि चार दिवस चालते आणि बंद पडते. परंतु परमात्माची सत्ता ही सबंध विश्वांत निरंतर एकच एक चालली आहे. म्हणून तो विक्रमी.

## ९१०. ऊर्जित-शासन

ऊर्जितं प्रबलं शासनं यस्य सः ऊर्जित-शासनः। ज्याचें शासन ऊर्जित म्हणजे प्रबल आहे तो म्हणावयाचा ऊर्जित-शासन. ज्याच्या शासनाचें अतिक्रमण करतां येत नाहीं तो म्हणावयाचा ऊर्जितशासन. जगांत जितकीं राज्यें आहेत त्यांच्यांत एक हि असें नाहीं कीं लोक ज्याचे कायदे सर्वच सर्व सर्वांशानें पाळतात. आणि ज्या विधि-निषेधांचें आणि जितक्या अंशानें अवज्ञान होतें त्याबद्दल त्यांना अवश्य शासन होतें, दण्ड होतो असें हि नाहीं. म्हणजे हें राजे लोकांचें शासन ऊर्जित, प्रबल नव्हे, तर तें क्षीण व अवज्ञात आहे. अशा शासनाला कीं ज्याचें पालनच होत नाहीं शासन म्हणणें हि अनुचितच. परंतु परमात्म्याचें शासन असें नाहीं. तें सार्वभौम आहे. आणि सर्वाकालिक आहे. कोणी हि त्यांतून सुटूं शकत नाहीं. आणि जितक्या अंशानें अवज्ञा होते तितक्याच अंशानें त्याला शासन हि होतें. म्हणून परमात्म्याचें शासन हें कांटेकोर आहे, उर्जित आहे. हें कसें होतें? हें कर्मसिद्धान्तानुसार होतें. करावें तसें भरावें हा ईश्वरी नियम आहे. त्याचें उल्लंघन कोणाला हि करतां येत नाहीं. मनसा वाचा कर्मणा जें बरें वाईट कर्म मनुष्य करतो त्याचें फळ त्याला अवश्य मिळतें. मनांत जरी किंचित् वाईट आलें तरी तें त्या हृदयस्थ परमात्म्याला कळल्यावांचून राहत नाहीं. आणि त्याचें अनिष्ट फळ त्याला मिळाल्यावांचून राहत नाहीं. तसेंच त्यानें किंचित् जरी सत्कर्म केलें तरी त्याचें इष्ट फळ हि त्याला मिळतेंच मिळतें. तें इतकें कांटेकोर असतें कीं तुम्हांला तें कळो वा न कळो मिळाल्या वांचून राहत नाहीं. प्रत्येक सुख हें तुमच्या सुकृताचा आणि प्रत्येक दुःख हें तुमच्या दुष्कृताचा अवश्यंभावी परिणाम होय. हें अवश्यंभावित्वच ऊर्जितत्व होय. जगांतील कोणते हि विधिनिषेध ईश्वरी नियमाची अवज्ञा करूं शकत नाहींत. म्हणून ते अनूर्जितच होत. आणि एरव्हीं हि ते अकिंचित्करच होत.

## ९११. शब्दातिग

शब्दं अतिगच्छति इति शब्दातिगः। जो शब्दाला उल्लंघून जातो तो म्हणावयाचा शब्दातिग. परमात्मा हा असा शब्दातीत आहे. शब्द ही एक महान् शक्ति आहे. अव्यक्त आणि व्यक्त यांच्या मधील तो सांधा आहे. दोहोंमधील तो दुवा आहे. त्याच्या द्वाराच सर्व व्यवहार होतो. परा पश्यन्ती मध्यमा वैखरी अशा त्याच्या चार परी आहेत. त्या विचारांत घेतल्या म्हणजे तर तो अक्षर ब्रह्मच म्हणावा लागतो. म्हणून शब्दोपासना ही महान् उपासना होय. ती उपासकाला कल्पवल्लीच आहे. त्याच्या सर्व कामना ती पुरविते. म्हणून च म्हटलें आहे " एकः शब्दः सम्यग् ज्ञातः सम्यक् प्रयुक्तः स्वर्गे लोके कामधुग् भवति।" याचें कारण शब्द हा वस्तुतः अर्थच होय. अर्थाहून भिन्न तो राहूंच शकत नाहीं. नाण्याच्या दोन बाजूंप्रमाणें शब्दार्थ हें संलग्न किंबहुना अभिन्न होत. एकवेळ नामावांचून एखादें रूप असूं शकेल पण नाम हें रूपावांचून राहूंच शकत नाहीं. म्हणून नाम हातीं आलें कीं त्याचें दुसरें टोंक

रूप वा वस्तु आपण हस्तगत करूं शकतों. नामावरून त्याचें स्वरूप त्याच्या प्राप्तीचा उपाय, प्रेरणा आणि बळ सर्वच आपल्याला अवगत होत असतें. म्हणून शब्दच सर्वस्व होय.

पण इथें तर तो परमात्मा शब्दातिग म्हटला आहे हें कसें? याचें कारण शब्द हा वस्तूचें यथार्थ वर्णन करूं शकत नाहीं हें आहे. तो वाचक नाहीं तो संकेतरूप आहे, सूचक आहे. शब्दाला व्यक्ताचें सुद्धां यथार्थ वर्णन करतां येत नाहीं. गूळ गोड आहे म्हटल्यानें गोडीची यथार्थ कल्पना होत नाहीं. गोडीच्या परी असंख्यच आहेत आणि गुळाच्या हि गोडी समान नाहींत. अशा स्थितींत गोड शब्दानें आपण जें काय समजतों तें इतकेंच कीं तो पदार्थ आंबट, खारट, तुरट, कडू वा तिखट नाहीं. म्हणजे वस्तु वा अर्थ हा शब्दातिग झाला. हें जर मूर्त वस्तुविषयीं झालें तर जी वस्तु निराकार अव्यक्त नि निर्गुण आहे तिच्या विषयीं हें किती अधिक लागू म्हणावयाचें? शिवाय यथार्थ वर्णन अलाहिदा पण जो मुळीं वर्णनाचाच शब्दांचाच विषय नव्हे तो निर्गुण परमात्मा सहजच शब्दातिग होय.

### ९१२. शब्दसह

शब्दं सहते जयति वा इति शब्दसहः । जो शब्द सहन करतो वा जिंकतो तो म्हणावयाचा शब्दसह. परमात्मा हा शब्दातिग असला, शब्दाची पोंच तिथवर नसली, तरी तो शब्द-विरोधी नाहीं. तो शब्द सहन करून घेतो, कारण तो असा नाहीं तसा नाहीं हें हि अखेर शब्दानेंच सांगावें लागतें. 'नेति नेति' हेहि अखेर शब्दच. शिवाय दुसरें म्हणजे तो भाव ओळखतो. शब्दावरून विरोध विग्रह अज्ञच करतात. बाप रागावला आणि मुलाला 'तुझें तोंड पाहणार नाहीं म्हणाला' याचा अर्थ इतकाच कीं तो मुलावर फार रागावला आहे. त्याचा शब्दार्थ घ्यावयाचा नाहीं. जे शब्दार्थालाच चिकटून बसतात ते नेहमीं गोत्यांत येतात आणि त्यांना शब्दाच्या खोड्यांतून सोडवावें लागतें. विवेकी मनुष्य अशा खोड्यांत सांपडत नाहीं. तो तें शब्दजाल तोडून मोकळा होतो. गांधींनीं गाईचें दूध प्यायचें नाहीं असें ठरविलें आणि जेव्हां दुधावांचून जगणें अशक्य झालें तेव्हां शब्दाला चिकटून राहून बकरीचें दूध प्यायला सुरवात केली. यांत ते समजतात कीं आपण प्रतिज्ञाभंगच केला आहे. पण वस्तुतः त्यांनीं विवेकच केला असें मानलें पाहिजे. त्यांनीं प्रतिज्ञा केली ती त्या वेळीं त्यांना प्रतीत झालेल्या सत्याला अनुसरून होय. पण मागाहून जेव्हां त्यांच्या लक्षांत आलें कीं ही प्रतिज्ञा योग्य नाहीं, निदान आपल्या पुरती तरी ती अनुचितच आहे, तेव्हां त्यांनीं मागील प्रतिज्ञेचा बाऊ न करतां आपलें मत-परिवर्तन झालें असल्याचें वा आपली शक्ति नसल्याचें जाहीर करून खुशाल गाईचें दूध घ्यायला पाहिजे होतें. परंतु ते आपल्या शब्दाच्या जाळ्यांतच जणूं अडकून राहिले. हें शब्दातिगत्व नव्हेच, पण शब्दसहत्व हि नव्हे. हें झालें शब्दबद्धत्व वा शब्ददास्य. आत्मा हा शब्ददास नाहीं. तो सर्वतंत्रस्वतंत्र आहे. त्याला निर्गुण म्हटल्यानें तो आपलें सगुणत्व बाधित होऊं देत नाहीं. अथवा सगुण म्हटल्यानें निर्गुणत्व बाधित होऊं देत नाहीं. दोन्हीहि तो पचवतो आणि दोहोंतून हि स्वतंत्र म्हणजे केवल-स्वरूप राहतो. म्हणून तो म्हटला आहे शब्दसह.

### ९१३. शिशिर

"शृ शिरति इति शिर :। पुन : पुनः शिरति इति शिशिर :।" शृ म्हणजे झाडणें गाळणें. डोकें केस गाळत असतें म्हणून ते शिर होय. जो ऋतु सारखा जुनीं पानें झाडतच राहतो तो 'शिशिर' म्हणावयाचा. परमात्मा हा शिशिर ऋतूप्रमाणें आपल्या सर्व उपाधि झाडून टाकतो, सर्व ताप

निववितो म्हणून तो शिशिर होय. जीवाला आध्यात्मिक आधिदैविक आणि आधिभौतिक ताप सारखे पोळत असतात, जाळत असतात. त्यांत तो सारखा होरपळून निघत असतो. एखाद्या जळावेगळया झालेल्या मासोळी सारखा तो तडफडत असतो खालून रेती पोळत आहे, वरून सूर्य जाळत आहे. आंतून क्षुधातृष्णा व्याकुळ करीत आहे, शोषीत आहे. अशा आंतून बाहेरून जळणाऱ्या जीवाला शांति अमृताच्या डोहांतच लाभावयाची. तोच तो परमात्मा. म्हणून तो म्हटला आहे शिशिर. तो परमात्मा जीवाचे सर्व ताप निववून त्याला आंतून बाहेरून गारीगार करतो. सुधासिन्धूंत डुंबणाऱ्या जीवाला जसें अन्तर्बाह्य सर्वांग परम शीतल सुखरूप वाटतें तसें परमात्म-भेटीनें जीवाला. म्हणून तो परमात्मा म्हटला आहे शिशिर. महिम्नांत म्हटलेंच आहे.

यदालोक्याह्लादं ह्रद इव निमज्यामृतमये।
दधत्यन्तस्तत्त्वं त्वमसि यमिनस् तत् किल भवान्।।

परमात्मा दाहक अविद्याकामकर्ममय संसारानें शून्य आणि शिशिर-शीतल वैराग्य-ज्ञानानें परिपूर्ण आहे. ''बाह्यस्पर्शेष्वसक्तात्मा विन्दत्यात्मनि यत् सुखम्। स ब्रह्मयोगयुक्तात्मा सुखमक्षयमश्नुते।।'' या शब्दांत परमात्म्याचें अरौद्रत्व नि शिशिरत्व प्रकट केलें आहे. एक निषेधक लक्षण आहे, दुसरें विधायक. दोन्ही मिळून पूर्णता.

## ९१४. शर्वरीकर

शर्वरीं क्षणदां करोति इति शर्वरीकरश् चन्द्रमा। शर्वरी म्हणजे सुखदायिनी पुनवेची रात्र. ती जी करतो तो पूर्णचन्द्र म्हणजे शर्वरीकर म्हणावयाचा. परमात्मा हा शर्वरीकर आहे. रात्र म्हणजे दिवसाच्या सर्व तापाची समाप्ति सर्व कर्म कटकटीची समाप्ति. रात्र म्हणजे शान्ति, रात्र म्हणजे विश्रान्ति. रात्रीं मनुष्य सर्व श्रम आणि चिंता यांपासून मुक्त होऊन देहामनानें पूर्ण विश्रान्ति व शान्ति अनुभवीत असतो, सुख अनुभवीत असतो. सुषुप्तींत त्याला परमानन्द लाभत असतो. तिथूनच दुसऱ्या दिवसासाठीं त्याला नवी स्फूर्ति, नवें बळ प्राप्त होतें, संजीवन मिळतें. चंद्रमा रात्रींच्या वेळीं आपल्या अमृतदृष्टीनें नि वृष्टीनें ओषधींमधें रसोत्कर्ष करीत असतो. सूर्य रसशोष करीत असतो, तर चन्द्रमा रसपोष करीत असतो. सर्व जीवांना शान्तिः पुष्टिस् तुष्टिः देणारी शर्वरी करणारा हा जो चन्द्रमा तो परमात्माच होय. आणि परमात्माच जीवाला शान्तीची नि सौख्याची पूर्णिमा करीत असतो. म्हणून तो शर्वरीकर म्हणावयाचा. अनिष्टपरिहार आणि इष्ट-संप्राप्ति करून देणारा, सर्व दोष-निवारण आणि सर्व गुण-संनिधान करणारा. सर्व पापताप-निवारण करून षोडशकल मंगल कलश, अमृताचा पूर्ण कुम्भ हातीं देणारा परमात्मा हा शर्वरीकर नाहीं तर काय म्हणावयाचा? शंकराचार्यांनीं '' या निशा सर्वभूतानां तस्यां जागर्ति संयमी। यस्यां जाग्रति भूतानि सा निशा पश्यतो मुनेः।। हा गीतेचा श्लोक उद्धृत करून ब्रह्मरूप व संसाररूप शिवाशिव रात्रि करणारा तो शर्वरीकर म्हटलें आहे. मी निशा आणि शर्वरी यांच्यांतील साभिप्रायता लक्षून आणि संदर्भ हि लक्षांत घेऊन वरील अर्थदोहन केलें आहे.

## ९१५. अक्रूर

न क्रूरः अक्रूरः। परमात्मा हा क्रूर नाहीं तर क्रौर्याचा अभाव आहे. क्रौर्याच्या अभावापासून आरंभ करून उत्तरोत्तर गुणोत्कर्षानें या श्लोकार्धांत त्याला 'क्षमिणां वरः' म्हटलें आहे : '' अक्रूरः पेशलो दक्षो दक्षिणः क्षमिणां वरः,'' तो क्रूर कठोर नसून पेशल म्हणजे सदयहृदय व व्यवहारांत मृदुमसृण आहे, तो कर्तव्यदक्ष असून दक्षिण म्हणजे दाक्षिण्य-शील आहे. किंबहुना तो ''क्षमिणां वरः''

आहे. सर्वांचें सर्व कांहीं पोटांत घालणारा आहे. असा दैवी गुणांचा परमोत्कर्ष त्याच्या ठाईं झाला आहे. तो सकलानिष्टशून्य आणि सकल - मंगलपरिपूर्ण असा आमचा आदर्श आहे. सकल अनिष्टांचा अर्क म्हणजे क्रूरता, निर्दयता, ती त्याच्या ठाईं नाहीं. ही निषेधमर्यादा आरंभबिंदु तिथून विधायक गुणांचा जो उत्कर्ष झाला त्याचा परमोच्च बिन्दु म्हणजे क्षमा ऊर्फ साम्य. या दोन बिन्दूंना, आरंभक व समापक बिन्दूंना, जोडणारी जी सुरेखा तिचें नांव शान्ति होय. ही आरंभीं हि आहे, मध्यें हि आहे आणि अन्तीं हि आहे. म्हणून तिचा त्रिवार घोष होतो ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः।

क्रूरता म्हणजे काय? क्रूरता म्हणजे आत्मौपम्याचा विसर. सर्व जीव समान आहेत. सर्वांचें सुखदुःख समान आहे. म्हणून जें आपल्याला नको तें दुःख कोणाला देऊं नये आणि जें हवें तें सुख सर्वांना द्यावें याचें नांव आत्मौपम्य होय. यालाच म्हणावयाचें अक्रूरत्व. जो केवळ आपल्याच सुखाचा विचार करतो तो क्रूर होय. असा देहधारी जीव सर्व जगाचा आपल्या देशासाठीं, देशाचा आपल्या गांवासाठीं, गांवाचा आपल्या कुटुंबासाठीं, कुटुंबाचा आपल्या बायकोपोरांसाठीं आणि बायकोपोरांचा आपल्या देहाच्या सुखासाठीं द्रोह करायला कचरत नाहीं. म्हणजे देहाभिमान ही क्रूरता होय. परमात्मा अभिमानरहित असल्यामुळें तो अक्रूर होय.

### ९१६. पेशल

पेशल म्हणजे सुकुमार, नाजुक, सर्वथा कोमल. ज्याच्या ठाईं मानसिक क्रौर्य, वाचिक कठोरता, कायिक काठिण्य यांचा सर्वथा अभाव आहे, त्याला म्हणावयाचें पेशल. जसें अर्भक. त्याचें अन्तःकरण प्रेममय असतें. त्याच्या मनांत कोणाविषयीं हि दुर्भाव असत नाहीं. वैर असत नाहीं, दुजाभाव असत नाहीं. विषधराशीं हि तें खेळतें. रोम्यूलसूप्रमाणें वृकीला मातृवत् चिकटतें. तिचें स्तन्य पिऊन धन्य होतें. त्याला सारें विश्व मातृवत् वाटतें. शकुंतले-प्रमाणें शकुन्त हि त्याला येऊन भरवतात. शाकुंतलांत म्हणे शृंगाररस भरला आहे! विद्वान् रसिकांच्या मताचा अधिक्षेप कसा करायचा? पण मला आपलें शाकुन्तल म्हणजे मूर्तिमन्त वात्सल्य वाटतें. शकुंतला आहे संस्कृत नांव. त्याचेंच मराठी म्हणजे चिमणाबाई. सारी जादू या नामांतच आहे. त्यांतच शाकुंतल आहे. चिमण्या जिवाची चिवचिव किती गोड वाटते कानाला? ज्यानें ती कधीं ऐकली नसेल तोच म्हणेल वीणा गोड आहे! "तें बोलणें सुकुमार। मुख मोहाचें माहेर। माधुर्या फुटले अंकुर। दशन तैसे।।" हें वर्णन त्यालाच लागू पडतें. बालकाच्या बोबड्या बोलाहून मृदु मधुर वाणी अद्याप झाली नाहीं नि पुढें होणार नाहीं. कानामनाला मोहिनी घालण्याचें सामर्थ्य त्या बोबड्या बोलांत कुठून बरें येतें? तें हि त्याच्या प्रेममयतेंतूनच होय. जसें त्याचें मन, जसें त्याचें वचन, तसेंच त्याचें तन हि किती कोमल असतें? सांवरीच्या कापसासारखें मऊ मऊ आणि गुबगुबीत! स्पर्शसुखाची ती परमावधिच होय. त्याहून सुखस्पर्श या जगांत दुसरें कांहीं आहे का? शोधून हि सांपडावयाचें नाहीं. असें हें त्रिगुणित सौकुमार्य म्हणजे पेशलत्व होय. बालकाच्या ठाईं आपल्याला तें आढळतें. कारण बालक हा देवाघरून आलेला आहे. त्याचा वारस आहे. हा वारसा वाढवणें वा उधळून टाकणें माणसा हातीं आहे. उधळून टाकून तो दानव होतो. रक्षण आणि संवर्धन करून तो देव होतो. म्हणून म्हटलें आहे श्रुतीनें " पाण्डित्यं निर्विद्य बाल्येन तिष्ठासेत." परमात्मा हा प्रेमस्वरूप आहे म्हणून तो म्हटला आहे पेशल.

### ९१७. दक्ष

परमात्मा हा दक्ष आहे. पण दक्ष म्हणजे काय? दक्ष म्हणजे अप्रमादी. आपल्या कर्तव्यांत कसूर न

होऊं देणारा. निधिभुजंग जसे आपल्या निधीचें अनिमेष नेत्रांनीं निरीक्षण रक्षण करीत असतात त्याप्रमाणें आपल्या स्वत्वाचें जो संगोपन करीत असतो, तो दक्ष होय. सूर्य सदैव पेटला आहे, वारा वाहतो आहे, पाणी द्रवतें आहे, धरा धरते आहे आणि आकाश सदैव सामावतेंच आहे. अशी ईश्वरी सृष्टि स्वकर्तव्यदक्ष आहे. जो तो आपल्या कर्तव्याला जागतो आहे. याचें नांव दक्ष. ब्राह्मण ज्ञानदान करतो आहे, क्षत्रीय प्रजा-पालन करतो आहे, वैश्य भूत-भरण करतो आहे, शूद्र सर्व-सेवा करतो आहे, हें सर्व असें चाललें आहे म्हणून ही सृष्टिसंस्था टिकून आहे. भगवान् आपली दक्षता आपल्या श्रीमुखानें गीतेंत वर्णीत आहेत:

यदि ह्यहं न वर्तेयं जातु कर्मण्यन्द्रितः।
मम वर्त्मानुवर्तेरन् मनुष्याः पार्थ सर्वशः।।
उत्सीदेयुरिमे लोका न कुर्यां कर्म चेदहम्।
संकरस्य च कर्ता स्यां उपहन्यां इमाः प्रजाः।।

परमात्म्याची ही दक्षता उर्फ स्वकर्तव्यनिष्ठा अनुकरणीय आहे. पण पुष्कळदा धर्मविचिकित्सा निर्माण होते, कर्तव्याकर्तव्यसंदेह निर्माण होतो. ''किं कर्म किमकर्मेति कवयो ऽप्यत्र मोहिताः'' तेव्हां कर्तव्यनिर्णय करणें कठिण होऊन बसतें? अर्जुन युद्धाला उभा राहिला आणि स्वजन-समूह पाहून गडबडला, गोंधळला.

न चैतद् विद्मः कतरन् नो गरीयो
यद् वा जयेम यदि वा नो जयेयुः।
यानेव हत्वा न जिजीविषामस्
तेऽवस्थिताः प्रमुखे धार्तराष्ट्राः।।

या धर्मसंकटांत धर्मनिर्णयाची, स्वकर्तव्यनिश्चयाची कसोटी कोणती? कसोटी आहे ''कोऽहम्'' चें उत्तर. रामानें आपल्याला हा प्रश्न विचारला आणि त्याला उत्तर मिळालें ''मी दशरथाचा पुत्र.'' आणि तदनुसार पित्राज्ञापालन हें त्याचें कर्तव्य ठरून तो वनवासाला निघाला. अर्जुनाला हें उत्तर मिळेना म्हणून तो गोंधळला. पण मागाहून कृष्णाच्या उपदेशानें त्याच्या लक्षांत आलें कीं आपण क्षत्रिय आहों. आपल्या राज्याचे हक्कदार. आणि त्या नात्यानें लढणें हेंच झालें कर्तव्य. तदनुसार तो लढला. परमात्मा हि आपण आत्मरूप म्हणून केवळ आत्मधर्म पाळतो तो अनात्मवश होत नाहीं. म्हणून तो दक्ष. विश्वेश्वर या नात्यानें तो सृष्टि-स्थिति-संहार करतो. म्हणून तो दक्ष.

## ९१८. दक्षिण

घर काय नि सृष्टि काय ज्या गुणांवर सुरळीत चालते ते हे दैवी गुण ''अक्रूरः पेशलो दक्षो दक्षिणः क्षमिणां वरः।'' या श्लोकार्धात आले आहेत, गुण-विशेषणांच्या रूपानें. मनुष्य क्रूर नसावा. तो दीनांचा दयाळू, मनाचा मवाळू असावा. त्याचेंच नांव पेशल. तो आपआपल्या कामधंद्यांत दक्ष असावा. त्याचबरोबर तो दक्षिण म्हणजे सरळ, ऋजु असावा. लोकांना सानुकूल असावा. सावकार सावकारींत दक्ष असावा, पण तो इतका दक्ष नको कीं कर्जदाराचें रक्तच पिऊं बघेल. त्याच्या ठाईं दक्षिणता हवी. दुसऱ्याच्या अडी-अडचणीचा विचार हवा. प्रसंगीं त्यानें व्याज सोडून द्यावें. एखादे वेळीं मुद्दलहि सोडून देण्यास मागें पुढें पाहूं नये. याचें नांव दक्षिण. याचें नांव ऋजु. दाक्षिण्य म्हणजे समोरच्याला अनुकूल वागणें. पाणी हें दक्षिण आहे. तें आपला धर्म सोडीत नाहीं. पण तसें करतांना तें जगाला अनुकूल होऊन चालतें. ''पानी तेरा रंग कैसा, जिसमें मिलाया वैसा'' हें त्याच्या दाक्षिण्याचें लक्षण आहे. त्याच्या वाटेंत खाच खळगे येवोत, दगडधोंडे येवोत, दऱ्याखोरीं वा डोंगर टेकड्या येवोत, तें तकरार करीत नाहीं. त्यांना भरून आणि पुरून तें पुढें सरकतें. तें वळणें वांकणें

घेऊन प्रवाहित होते. ''न्यून तें पुरतें, अधिक तें सरतें'' करून घेऊन तें आपला मार्ग काढीत आपल्या प्राप्तव्याला पोंचत असतें. असें तें दक्षहि आहे आणि दक्षिण हि आहे. परमात्मा हा तसा आहे. तो सर्वांना दक्षिण आहे, ऋजु आहे, सानुकूल आहे. म्हणून त्याला दक्षिणामूर्ति म्हटलें आहे. ''फेडीत पाप ताप। पोखीत तीरींचे पादप। समुद्रा जाय आप। गंगचें जैसें।।'' तसें ज्याचें शुद्ध, परार्थ जीवन आहे तो म्हणावयाचा दक्षिण. आपल्या कडील विधवा विकेशा संन्यासिनी स्त्रियांना आपण गंगाभागीरथी म्हणतों. फार थोर पदवी आहे ही. पवित्र नि परार्थ जीवन. त्यांत कामकल्मश नाहीं, स्वार्थ नाहीं. केवळ परोपकार. 'तुका म्हणे आतां। उरलों उपकारा पुरता' अशी स्थिति. सर्वांना दक्षिण होतां येईल, वक्रता वांकडेपणा टाकतां येईल, जर ते आपला स्वार्थ सोडतील. परंतु देहाभिमानामुळें स्वार्थ सुटत नाहीं आणि स्वार्थामुळें मनुष्य नाना पापें आचरतो. हीं पापेंच कुटिलता होय. ती ज्याच्या ठायीं नाहीं तो दक्षिण होय, ऋजु होय. परमात्मा निरभिमान असल्यामुळें तो सहजच निःस्वार्थ, म्हणून निष्पाप आणि निष्पाप म्हणून दक्षिण होय. सर्व-सानुकूल होय.

## ९१९. क्षमिणांवर

परमात्मा हा क्षमाशीलांमध्यें क्षमाशील आहे.परम क्षमावन्त आहे. पृथ्वीला तर क्षमाच नांव आहे. म्हणजे ती मूर्तिमंत क्षमाच होय. आमचे सर्व जीवनिकायांचे सर्व अपराध ती पोटांत घालत आहे. तिला आपण सारखे तुडवीत असतों. तरी ती रागावत नाहीं. मनांत वैर द्वेष बाळगीत नाहीं. कसला हि प्रतिकार करीत नाहीं. ही क्षमाच विश्वविजयी आहे. अनादि कालापासून राजे लोक पृथ्वीसाठीं भांडत आले आहेत. पण आज ते कुठें आहेत? कुठें आहे त्यांचें राज्य नि साम्राज्य ? ते सर्व निमाले. पृथ्वी मात्र कायम आहे, आणि तिचेंच राज्य आहे. युद्धें निमालीं क्षमा मात्र टिकली. अशी ही क्षमा ब्राह्मणांचें ब्रीद आहे. कारण ''क्षमावतां अयं लोकः, परश्चैव क्षमावताम्''. विश्वामित्राला त्यामुळेंच अखेर म्हणावें लागलें:

**धिग् बलं क्षत्रिय-बलं, ब्रह्म-तेजोबलं बलम्।**

वस्तुतः क्षमा आणि तेज हीं परस्पर विरुद्ध तत्त्वें होत. पण इथें क्षमेला (ब्रह्म-) तेज म्हटलें आहे. कारण मात करणारें तत्त्व आहे तें. या क्षमातत्त्वाचा, या शान्ततेजाचा परमोत्कर्ष-बिन्दु म्हणजे ब्रह्म होय. कसें आहे तें? 'शान्तं शिवं अद्वैतम्'. तिथें कशाला प्रतिकार नाहीं. सर्वांची ती समन्वयभूमि आहे. सर्व विरोधकांचे विरोध नि परस्पर-विरोध इथें अविरुद्ध होतात, अवरुद्ध होतात, शान्त होतात, म्हणून त्याला उपमा दिली आकाशाची. खं ब्रह्म. पृथ्वीला तुम्हीं एक मणाची धडक दिली तर उलट ती तितक्याच वजनाची धडक तुम्हांला देते. पण आकाशांत विमानें नि अग्निबाण प्रचंड धडका देतात, पण त्यांना आकाश अणुमात्र हि प्रतिकार करीत नाहीं. म्हणून वस्तुतः आकाशच क्षमामूर्ति म्हटलें पाहिजे. पण तें हि व्यक्त आहे. त्याचा हि प्रतिकार संभवतो, परंतु परमात्मा तर अव्यक्त निर्गुण आहे. म्हणून तो म्हणावयाचा क्षमिणां वरः.

## ९२०. विद्वत्तम

परमात्मा हा सहजच विद्वत्तम म्हणजे निरतिशय ज्ञानवान् आहे. निखळ सोन्याच्या लगडींत जसें सोन्यावांचून दूसरें कांहींच नसतें, ती केवळ सोनेंच सोनें असते तसें परमात्मतत्त्व हें निखळ ज्ञानच ज्ञान आहे. त्याहून अधिक निबिड ज्ञान आढळावयाचें नाहीं. म्हणून तो म्हटला आहे विद्वत्तम. ''प्रज्ञानं ब्रह्म'' या महावाक्यांत हीच विद्वत्तमता प्रज्ञान पदानें वर्णिली आहे. चिद्घन, चैतन्यघन, चिन्मात्रमूर्ति इत्यादि प्रयोग हि तेंच विद्वत्तमत्व प्रकट

करण्यासाठीं योजिले जातात. विश्वांत कोणती हि वस्तु वा घटना जिच्या विषयीं ती आहे वा नाहीं, झाली वा गेली असें कसलें विधान होतें तें चैतन्याच्या जाणिवेंतूनच होत असतें. म्हणून हि तो परमात्मा विद्वत्तम होय. त्याच्या जाणिवेंत जें आलें नाहीं तें मुळीं आहे असें म्हणतांच येत नाहीं. त्यामुळें तो चैतन्यमूर्ति परमात्मा सर्वज्ञ होय. गीतेंत म्हणूनच म्हटलें आहे:

**वेदाहं समतीतानि वर्तमानानि चार्जुन।**
**भविष्याणि च भूतानि मां तु वेद न कश्चन।।**

चिद्रूप असल्यामुळें तो स्वाभाविकच विद्वत्तम आहे इतकेंच नव्हे तर बाह्य ज्ञान म्हणजे भौतिक ज्ञान, अन्तर्ज्ञान म्हणजे मनोविज्ञान आणि अन्तरतर ज्ञान म्हणजे आत्मज्ञान यांत हि तो पारंगत असल्यामुळें तो विद्वत्तम होय. आमचें भौतिक विज्ञान अणुस्फोटनापर्यंतच पोंचलें आहे. मानवाला अद्याप सृष्टीचें संपूर्ण रहस्य उलगडलें आहे असें नाहीं. मनोविज्ञानाच्या बाबतींत तर तो अगदीं पोरच आहे. काम क्रोध लोभांवर कसा ताबा मिळवावा हें त्याला समजत नाहीं आणि आत्मज्ञान तर त्याला मुळींच नाहीं. तो प्रान्त च जणूं त्याच्या गांवीं नाहीं. परंतु परमात्म्याला या सर्व विषयांचें समग्र आणि निःसंशय ज्ञान आहे. ही सृष्टिच त्याचें प्रमाण आहे. म्हणून हि तो परमात्मा विद्वत्तम होय.

## ९२१. वीतभय

विगतं भयं यस्मात् सः वीतभयः। ज्याचें भय विगत झालें,दूर झालें तो म्हणावयाचा वीतभय. परमात्मा हा वीतभय आहे. कारण, तो विद्वत्तम आहे. जिथें ज्ञान तिथें अभय हें असावयाचेंच. ज्ञानाचा तो अपरिहार्यपरिणाम आहे. जोंवर रज्जूसर्पाची भ्रांति आहे तोंवरच भय आहे. ती भ्रांति, तें अज्ञान गेलें कीं भय पळालें. भयमुक्ति हीच खरी मुक्ति होय आणि ती आहे ज्ञानाचें कार्य. "या विद्या सा विमुक्तये" हें वचन प्रसिद्धच आहे. याज्ञवल्क्यानें जनकाला आत्मविद्या दिली आणि सांगितलें "अभयं वै जनक प्राप्तोऽसि" जनका, आतां तू अकुतोभय झाला आहेस, अभयास पावला आहेस. हें झालें उपनिषद्. गीतेंत हि शेवटीं अर्जुन म्हणतो:

"नष्टो मोहः स्मृतिर् लब्धा। स्थितोऽस्मि गतसंदेहः"
मी मारणारा, हे मरणारे हा माझा मोह, ही माझी भ्रांति गेली, "मी न मारीं न मरें" असें तें आत्मतत्त्व आहे ही स्मृति हें ज्ञान मला झालें. आतां मी गत-संदेह म्हणजे निःशंक झालों आहें. पापभयमुक्त झालों आहें. आतां मी देवा तू सांगशील तसें करीन. म्हणजे आत्मविचारानें निर्भय व्यवहार करीन. ही जी निःशंकता, ही जी वीतभयता, तिचेंच नांव मुक्ति होय आणि ती आत्मज्ञानाचा अवश्यंभावी परिणाम होय. परमात्मा हा केवळ ज्ञानस्वरूपच असल्यामुळें तो सहजच वीतभय आहे. परमात्मा हा वीतभय आहे, याचा अर्थ त्याला कोणापासून भय नाहीं एवढाच नाहीं. तर त्याच्या पासूनहि कोणालाहि भय नाहीं. याला दृष्टांत आकाशाचा. आकाशाला कोणाचें भय नाहीं. आणि आकाशाचें कोणाला भय नाहीं. आकाशांतच सारें विश्व तरंगतें आहे आणि साऱ्या विश्वांत आकाश ओतप्रोत आहे. जसें आपलें आपल्याला भय असूं शकत नाहीं, तसें परमात्म्याला ह्या स्वात्मरूप विश्वाकाराचें भय नाहीं. अद्वैत आहे मग भय कसलें? म्हणून परमात्मा हा वीतभय म्हणावयाचा.

## ९२२. पुण्य-श्रवणकीर्तन

पुण्यं पावनं श्रवणं कीर्तनं च यस्य सः पुण्य-श्रवण-कीर्तनः। ज्याचें श्रवण आणि कीर्तन पावन आहे, अघहर आहे, तो म्हणावयाचा पुण्य-श्रवणकीर्तन. परमात्म्याच्या नामरूप-गुणकर्मांचें श्रवण पापनाशन आहे. अर्थातच त्यांचें कीर्तन हि पापनाशन आहे.

कारण कोणीं तरी तें कीर्तन केल्यावांचून श्रवण होणारें नाहींच. म्हणजे श्रवण कीर्तन ही एक जोड क्रिया आहे. दुहेरी क्रिया आहे. एक क्रिया पावन म्हटली म्हणजे दुसरी हि झालीच. म्हणून दोहोंचा समाहार केला आहे, एकत्र उल्लेख केला आहे. पूर्वी पुण्यकीर्ति म्हणून पद येऊनच गेलें आहे. पण तिथें ही दुहेरी प्रक्रियां प्रकट झाली नव्हती. ती या नामांत विशद झाली आहे. कीर्ति म्हणजे नांव-लौकिक. हें नांव कोणी तरी घेतो, कोणी तरी त्याचा लौकिक त्याचें रूप गुण नि कर्मे वाखाणितो आणि कोणी तरी तें श्रवण करतो. असें होतें तेव्हांच कीर्ति होते. म्हणून पुण्यकीर्ति म्हटलें तरी त्यांत श्रवण कीर्तन गृहीतच आहे. इतकेंच कीं त्या प्रक्रियेकडे नव्हे तर तिच्या फलिता कडेच तिथें अधिक लक्ष दिलेलें आहे. अभिप्रेत फलित आहे, त्याची प्रक्रिया नव्हे. इथें मात्र त्याची स्पष्ट फोड केली असून त्या प्रक्रिया पुण्यप्रद आहेत, पापहर आहेत असें म्हटलें आहे. कशाप्रकारें होतात त्या पापहर आणि पुण्यप्रद? आत्मविषयक अज्ञानाचीं पुटें दूर करून तीं आत्मस्वरूपाचा आविष्कार करीत जातात आणि अशा प्रकारें तीं पापहर आणि पुण्यप्रद होतात. सत्य हें नाम घेतलें म्हणजे असत्यमात्राचा निषेध झाला. सत्य-नामश्रवणानें वा कीर्तनानें मनुष्य मननास प्रवृत्त व्हावा. तो सत्याचा शोध घेत जाईल. जसजसा शोध घेईल तसतसा बोध होईल. आणि त्या बोधावरोबर कायिक वाचिक मानसिक असत्याचीं पुटें गळून पडतील. हेंच अघनाशन होय आणि तेंच पुण्य-प्रकाशन होय. जसजसा आत्मा अज्ञान-मलापासून मुक्त होतो तसतसा तो पुण्योज्ज्वल आणि स्वरूपसुंदर होत जातो. म्हणून तो परमात्मा म्हटला आहे पुण्य-श्रवणकीर्तन. नामाप्रमाणेंच त्याचें रूप, त्याचे गुण, त्याचें कर्म हि समजावयाचें. वस्तुतः कर्मावरून गुणावरून आणि स्वरूपावरून च तर नामें पडलीं आहेत. म्हणून नामरूप-गुणकर्मात्मक कीर्ति एकरूप च होय.

## ९२३. उत्तारण

तारण म्हणजे बुडत्याला वांचवणारा आणि उत्तारण म्हणजे पैल तीराला पोंचवणारा. जुन्या काळीं जेव्हां नद्यांवर पूल नव्हते तेव्हां नदी पार करण्याचें साधन म्हणजे नाव. आणि जो त्या नावेंतून पैल तीराला न्यायचा तो नावाडी उत्तारण म्हणावयाचा. या आपल्या नदीनद-बहुल देशांत कुठें हि जायचें म्हटलें म्हणजे नदी नाले ओलांडण्यावांचून गत्यंतर नाहीं. आज हि तें कमी झालेलें नाहींच. अशा प्रकारें नदी नाले म्हणजे मार्गांतील मोठें विघ्नच होय. पुष्कळदां तर तें प्राणसंकटच असायचें. त्यांतून तो सही सलामत वांचवतो तो नावाडी, तो उत्तारण, कसा बरें कृतज्ञता-भाजन होणार नाहीं? परमात्मा हा हि तसाच उत्तारण आहे. तो जीवाला भवनदीच्या पार नेतो. या भवनदींत मायेचें पाणी आहे, आसक्तीची धार आहे, काम क्रोध लोभ मद मत्सर या नक्रसर्पादि भयंकर जलचरांचा त्यांत सुळसुळाट आहे, अभिमानाचा भोंवरा आहे. अशी ही भवनदी जीव पार कशी करणार? कुशल कर्णधारावांचून तिच्यांतून पार पडणें शक्य नाहीं. जीवाला तो कुशल कर्णधार, कैवर्तक परमात्मा आहे. जीवाला तोच त्या परमानंदाच्या पैलतीराला पोंचवतो. कोणी म्हणेल कीं मी आपल्या भुजबळानें तरून जाईन तर त्याचें तें साहस साहसच आहे. तें व्यर्थ आहे. त्याला निरभिमान झाल्यावांचून आणि परमात्म्याला अनन्यभावानें शरण गेल्या वांचून गत्यंतर नाहीं. इथें केवळ केशव-कैवर्तक-कृपाच कामाची आहे. इतर सर्व उपाय व्यर्थ नाहींत. केशवकृपेला उपकारक म्हणून ते मान्यच आहेत, परंतु स्वतंत्ररीत्या ते अकिंचित्करच होत. म्हणून गीतेंत भगवान् श्रीमुखानें सांगत आहेतः

नाहं वेदैर् न तपसा न दानेन न चेज्यया।
शक्य एवंविधो द्रष्टुं दृष्टवान् असि मां यथा।।
भक्त्या त्वनन्यया शक्य अहं एवंविधोऽर्जुन।
ज्ञातुं द्रष्टुं च तत्त्वेन प्रवेष्टुं च परंतप।।

महाभारतीय रूपकाच्या भाषेंत परमात्म्याचें उत्तारणत्व असें वर्णिलें आहे :

**भीष्म-द्रोणतटा जयद्रथ-जला गान्धार-नीलोपला**
**शल्य-ग्राहवती कृपेण वहनी कर्णेन वेलाकुला।**
**अश्वत्थाम-विकर्ण-घोरमकरा दुर्योधनावर्तिनी**
**सोत्तीर्णा खलु पाण्डवै रणनदी कैवर्तक: केशव:।।**

## ९२४. दुष्कृति-हा

दुष्कृतिं हन्ति इति दुष्कृति-हा। जो दुष्कर्माचें हनन करतो तो म्हणावयाचा दुष्कृति-हा. परमात्मा हा दुष्कृतिहा आहे. कशा प्रकारें करतो तो दुष्कृति-हनन? काय तो लोहारा प्रमाणें कच्चें लोखंड भट्टींत घालून जाळतो चाळतो गाळतो? काय त्याला घणाघातांनीं पिटून पिटून नरम करतो, सरळ करतो, घाट देतो? त्याला असें कांहीं एक करावें लागत नाहीं. मूळ हें भूमिगत असतें. तें वरून दिसत नाहीं. त्यासाठीं खोलांत शिरावें लागतें. सर्व अनर्थाचें मूळ आत्मविषयक अज्ञान आहे. आपण कोण, याचा बोध नसल्यामुळें मनुष्य देहाद्यभिमान धारण करतो. देह म्हणजे मी आणि देहसंबद्ध ते माझे, अशा अविवेकानें तो व्यवहार करूं लागतो. यांतूनच भूतद्रोह होतो आणि सर्व दुष्कृति, झऱ्यांतून पाण्याप्रमाणें, त्यांतून निघत राहतात. हें ओळखून शंकराचार्य आपल्या शिरोमणि स्तोत्रांत, षट्पदींत, देवापाशीं मागतात:

**"अविनयमपनय विष्णो,**
**दमय मन:, शमय विषयमृगतृष्णाम्।**
**भूतदयां विस्तारय**
**तारय संसार-सागरत:।।**

समोरच्याला अविवेकानें परका मानून मी जो व्यवहार करतो तो माझा अविनय दूर कर. माझी हाव आणि हव्यास, माझा अविनय आप्पलपोटेपणा दिवसेंदिवस झडूं दे, गळूं दे. आणि अशा प्रकारें भूत-द्रोहाचें तण निंदून काढून माझ्या ठाईं भूतदयेचें अमूप पीक पिकव. भूतदयेचे बाग जिकडे तिकडे फुलूं दे, फळूं दे. संसार-सागरांतून अशा प्रकारचें माझें उत्तारण होऊं शकेल. दुष्कृतीच्या मगर-मिठींतून जीव-गजेन्द्राची सुटका तो भगवान् ज्ञान-सुदर्शनानें अशी करीत असतो. जोंवर आत्मज्ञानानें देहात्मबुद्धि क्षीणतर होत जाऊन नाहींशीच होत नाहीं, तोंवर दुष्कृतींतून नि:शेष सुटका होत नाहीं. परमात्मा केवळ ज्ञानस्वरूप असल्यामुळें तो सहजच दुष्कृतिहा आहे. अंधारच नाहीं मग अंधारांत होणारीं दुष्कर्में कुठून असणार? सूर्य रात्रीलाच नाहींशी करून जसें रात्रिकृत भय नाहींसें करतो, तसा परमात्मा अज्ञान नाहींसें करून अज्ञानकृत दुष्कृतींचें हनन करतो. आणि म्हणून तो दुष्कृति-हा म्हणावयाचा.

दुष्कृति म्हणजे दुराचारी असा अर्थ घेतला तरी तो परमात्मा दुष्ट-संहारक हि आहेच!

## ९२५. पुण्य

पुनाति इति पुण्यम्। जो पावन करतो, पाप-प्रक्षालन करतो तो म्हणावयाचा पुण्य. परमात्मा हा नुसता पुण्यरूप नाहीं तर तो परम पुण्यरूप आहे. "पवित्राणां पवित्रं यो मंगलानां च मंगलम्" असें या नामसहस्राच्या प्रास्ताविकांत म्हटलेंच आहे. पुण्य-श्रवणकीर्तन, पुण्यकीर्ति इत्यादि पदें पूर्वीं येऊनच गेलीं आहेत. इथें त्याला केवळ पुण्यरूप म्हटलें आहे. म्हणजे अमुक एक त्याचें पुण्यरूप आहे असें नव्हे तर तो सबंधचा सबंध च पुण्यरूप आहे, जसें चंदन हें सर्वांगीं चंदन आहे. त्याचें तोंड चंदनी आहे, त्याचा श्वास चंदनी आहे असें नाहीं, तो सबंधचा सबंध च चंदनी आहे किंबहुना चंदनच आहे. तसा परमात्मा हा सबंधच पुण्यात्मा आहे. त्याचें सर्व कांहीं पुण्यरूपच आहे. नाम रूप गुण कर्म सर्व च पुण्यरूप पुण्यप्रद. त्याचें जनन म्हणजे आविर्भाव पुण्य तसें त्याचें मरण म्हणजे तिरोभाव हि पुण्य. परमात्म्याच्या

बाबतींत मरण शब्द कानाला कसासांच वाटतो. परमात्म्याच्या अवतारांची जयंती असते, पुण्यतिथि नसते. साधुसंत पुण्य परमात्म्यांत मिसळून जातात म्हणून त्यांची मरण-तिथि हि, अभद्र वाटणाऱ्या मरणाची तिथि हि, पुण्य तिथि होते. परमात्मा हा स्वरूपापासून केव्हांहि च्युत होत नसल्यामुळें, वियुक्त होत नसल्यामुळें स्वरूपाशीं त्याचें पुनर्मीलन संभवनीय नाहीं. म्हणून त्याची पुण्यतिथि नाहीं. ''क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशन्ति'' हें पुण्यात्मा परमात्म्याच्या बाबतींत अशक्यच. अर्थात् त्याची अपुण्यतिथि म्हणजे जन्मतिथि हि नाहीं. स्वरूपा पासून तो केव्हांहि वियुक्त व्हावयाचा नाहीं, च्युत व्हावयाचा नाहीं. तो अच्युतच आहे सदैव. म्हणून म्हटलें आहे गीतेंत :

**जन्म कर्म च मे दिव्यं एवं यो वेत्ति तत्त्वतः।**
**त्यक्त्वा देहं पुनर् जन्म नैति, मां एति सो ऽर्जुन।।**

ज्यांना मरण मान्य नसेल त्यांनीं जननहि मानूं नये आणि जनन मानावयाचें असेल तर मरण मानावयास हि तयार व्हावें व दोन्ही हि समानच पुण्य आहेत असें म्हणावें. कांहीं हि मान्य केलें तरी तो परमात्मा तत्त्वतः अच्युतच होय आणि म्हणूनच पुण्य.

### ९२६. दुःस्वप्न-नाशन

दुःस्वप्नं नाशयति इति दुःस्वप्ननाशनः। जो दुःखस्वप्न नाहींसें करतो तो म्हणावयाचा दुःस्वप्ननाशन. स्वप्नहि जर एक मिथ्या वस्तु असेल, तर तें चांगलें पडलें म्हणून हर्ष नको, वा वाईट पडलें म्हणून विषाद नको. परंतु स्वप्न हें स्वतः मिथ्या असलें तरी तें भावी घटनांचें सूचक मानलें आहे. आणि म्हणून मनुष्य सुस्वप्नांनीं हरिखतो व दुःस्वप्नांनीं धास्तावतो. त्यामुळें दुःस्वप्नांची शान्ति करणें आवश्यक होऊन बसतें. परमात्म्याचें नाम हें सकल अनिष्टांचें निवारक आणि सकल इष्टांचें कारक असल्यामुळें तो परमात्मा सहजच दुःस्वप्ननाशन होय. लहान मोठ्या अनिष्टांच्या परिहारासाठीं, निरनिराळीं नामें वा मन्त्र जपार्थ विनियोजिले जातात. आणि त्यांच्या जपसंख्याहि अनिष्टाच्या गुरुतेनुसार वेगवेगळ्या कल्पिल्या जातात. तज्ज्ञ वैद्यच औषधोपचार करूं शकतो तसा तज्ज्ञ गुरु वा आचार्यच असा मंत्रोपचार करूं शकतो. जपसामर्थ्य अचिन्त्य आहे. ''अलौकिको हि मणि-मन्त्र-ओषधीनां प्रभावः'' मंत्रजपानें काय होतें याचें उदाहरण स्वतः वाल्मीकि आहे. मंत्र-जपानें त्यानें आपल्या सर्व दुष्कृति म्हणजे ताप आणि सर्व मनोमल म्हणजे पाप धुऊन टाकून आपल्याला पुण्य पुरुष बनविलें होतें.तो आंतून बाहेरून निष्कलंक झाला होता, शुद्ध नि सिद्ध झाला होता. मग दुःस्वप्ननाशन ही कोणती मोठी गोष्ट झाली? परमात्म्याच्या नामानें ती सहजच होते. हें असें दुःस्वप्नांचें निवारण हा लौकिक अर्थ झाला. त्याचा खोल आणि आध्यात्मिक अर्थ हि आहे. आणि खरोखर तोच मुख्यार्थ आहे. हा सारा संसार, हा प्रपंच म्हणजे एक भलें मोठें दुःस्वप्नच आहे आणि त्यांत सगळे जीव विव्हळत आहेत. हें दुःस्वप्न आत्मजागृतीबरोबर नाहींसें होतें आणि म्हणूनच तो परमात्मा दुःस्वप्ननाशन म्हणावयाचा.

### ९२७. वीर-हा

वीरं प्रतिवीरं प्रतिमल्लं हन्ति इति वीरहा। जो प्रतिस्पर्धी वीराला ठार करतो तो म्हणावयाचा वीरहा. हा शब्द पूर्वीं हि एकदां येऊन गेला आहे. अर्थात् इथें तो पुनरुक्त झाला आहे. पुनरुक्ति हा केवळ दोषच नाहीं. तो गुण हि आहे. पुनरुक्ति ही त्या विषयांचें विवक्षितत्व आणि महत्त्व प्रकट करते. ग्रंथाचें तात्पर्य हेरण्याचें जें तंत्र आहे त्यांत अभ्यास म्हणजे पुनरुक्ति वा पुनःपुनरुक्ति हें हि एक लक्षण सांगितलें आहे.

**उपक्रमोपसंहारौ अभ्यासो ऽपूर्वता फलम्।**
**अर्थापत्तिः षडेतानि लिङ्गं तात्पर्य-निर्णये।।**

विष्णुसहस्रनाम हा तसा ग्रंथ नसला, तरी तो एक विचार आहे. त्याचें एक तात्पर्य आहे. आणि त्यावर भर दिला जाणें स्वाभाविक आहे. ईश्वरी अवतारांचें मुख्य कार्य धर्मसंस्थापन हें आहे. तें धर्मसंस्थापन साधूंच्या म्हणजे धर्मनिष्ठांच्या परित्राणानें व दुष्कृतांच्या म्हणजे धर्मपरिपंथींच्या विनाशानें अवतारी पुरुष पार पाडीत असतात. म्हणून वीरहा म्हणजे असुर-सूदन. हिरण्याक्ष-हिरण्यकशिपु रावण-कुम्भकर्ण आणि दुर्योधन-दुःशासन इत्यादि धर्मद्रोह्यांचा विनाश करणारा आणि तद्द्वारा प्रह्लाद, सीता, द्रौपदी यांच्यासारख्या धर्मनिष्ठांचे परित्राण करणारा. हें विधायक अंग पुढील पद रक्षण स्पष्ट करीत आहे. ते वीरहा या पदाच्या अर्थावर हि अशा प्रकारें प्रकाश पाडीत आहे. ''वीरहा रक्षणः सन्तो जीवनः पर्यवस्थितः'' हा सबंध श्लोकार्धच गीतेच्या ''परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम्। धर्म-संस्थापनार्थाय संभवामि युगे युगे।।'' या अवतारकार्य-बोधक श्लोकाचें सूचन करणारा आहे, असें म्हणतां येईल. शंकराचार्यांनीं ''विविधाः संसारिणां गतीः मुक्ति-प्रदानेन हन्ति इति वीरहा'' असें भाष्य केलें आहे. मागील वीरहा पदाहून वेगळा अर्थ करण्यासाठीं मला तें गरजेचें वाटत नाहीं.

## ९२८. रक्षण

रक्षण म्हणजे संरक्षण करणारा. परमात्मा हा धर्मनिष्ठाचें रक्षण करतो. त्याच्यासाठीं तो अवतार घेतो. जगांत तीन प्रकारचे लोक आढळतातः १-धर्मनिष्ठ, २-धर्मपरिपंथी आणि ३-उदासीन. धर्म हेंच आपलें सर्वस्व मानून त्यासाठीं आपला जीव हि द्यायला जे सदैव तयार असतात ते धर्मनिष्ठ होत. जसे प्रह्लाद, राम, युधिष्ठिर इत्यादि. देव धर्म, साधु-संत इत्यादि हें सर्व थोतांड आहे, बुवाबाजी आहे, त्याला केव्हांहि थारा देतां कामा नये, त्याचा कसून विरोध केला पाहिजे, त्याचा बींमोड केला पाहिजे अशा विचाराचे हि कांहीं लोक असतात. त्यासाठीं ते हि हिरण्यकशिपु, रावण दुर्योधन इत्यादींप्रमाणें प्राणांची पर्वा करीत नाहींत. या दोन टोकांच्या दरम्यान सर्वसामान्य जनता असते. ती या दोहोंना हि योगक्षेमासाठीं वश होत राहते. ना थंड ना उष्ण अशी ही कोमट जनता अकिंचित्कर होय. अशा अल्पप्राण अल्पश्रद्ध लोकांसाठीं नाहीं देव अवतार घेत. तो अवतार अशा बहुसंख्य लोकांसाठीं नाहीं होत. तो अवतार होतो धर्मनिष्ठाच्या रक्षणासाठीं मग तो या विश्वांत मनु-मार्कंडेयांसारखा एकाकी वा एक का असेना? त्याचें रक्षण म्हणजे विश्वाचें रक्षण. कारण विश्वाचें मूळ धर्म आहे. तो नाहींसा झाल्यास विश्व टिकूं शकत नाहीं. ''धर्मो विश्वस्य प्रतिष्ठा.'' तो धर्म वेदांत प्रतिपादिला आहे म्हणून वेद-रक्षण. तो वेद ब्राह्मणांनीं धारण केला आहे म्हणून त्यांचें रक्षण. त्यांचेंच दुसरें नांव सन्त. कारण संतांच्याच ठाईं सत्यधर्म प्रतिष्ठित असतो. ''सन्तो भूमिं तपसा धारयन्ति'' सन्त सत्यरूप तपानें या धरेला धारण करीत आहेत. म्हणून परमात्मा त्यांच्या रक्षणासाठीं अवतार घेतो. तो कांहीं पक्षपात नव्हे. त्यांत समदृष्टिच आहे. राजा चोराला सुळीं देतो व संन्याशाला पोळी देतो यांत पक्षपात नाहीं. ती न्यायाची समदृष्टि आहे. तो न्यायपाल आहे, तसा परमात्मा धर्मपाल आहे. धर्मगोप्ता आहे. धर्मरक्षणानेंच सर्वांचें रक्षण होतें. म्हणून तो परमात्मा रक्षण म्हणजे धर्म-रक्षण द्वारा विश्व-रक्षण करणारा म्हटला आहे.

## ९२९. सन्त

सन्तः हें बहुवचन कीं एकवचन? नियमानुसार तें बहुवचन आहे. पण सन्तः हें एकवचन घेणें हि शक्य आहे. ''प्रयोगशरणा वैयाकरणाः''. लोकांत प्रचलित असा हा अकारान्त शब्द आहे, असें व्याकरणाला मान्य व्हावें. आणि परमात्मा जर

एकच आहे तर त्याचें नाम बहुवचनी कां? तो परमात्मा एकवचनी म्हणून प्रसिद्धच आहे. "रामो राजमणि: सदा विजयते" इत्यादि प्रसिद्ध श्लोकांत एवढयासाठींच रामशब्दाचें केवळ एकवचन दिलें आहे साती आठी विभक्तींत. अर्थात् अद्वैतांत, अद्वय परमात्म्यांत, द्वैत संभवत नाहीं. बहुत्व संभवत नाहीं. म्हणून सन्त: हें एकवचन. सहस्रांत सर्वत्र एकवचनच आलें आहे. लिंगें तिन्ही आहेत, पण वचन एकच आहे. त्यामुळें हि सन्त: हें एक वचन घेणें योग्य. शंकराचार्यांनीं इथें झांकली मूठ ठेवली आहे. "सन्मार्गवर्तिन: सन्त:, तद्रूपेण विद्याविनयवृद्धये स एव वर्तते इति सन्त:" असें त्यांचें भाष्य आहे. म्हणजे सन्त: हें पद जणूं उभय-वचनी त्यांनीं घेतलें आहे.

परमात्मा हा अव्यक्त आहे, पण व्यक्त देहधारी जीवाची अभिलाषा त्याला आपल्यासारख्या सगुण साकार रूपांत पाहण्याची असते. त्यावांचून त्याचें समाधान होत नाहीं. हा असा मूर्तिमंत देव त्यांना संतामध्यें उपलब्ध आहे. देव पहायचा तर तो तिथें जाऊन पहा, असें स्वत: संतच सांगतात आणि भगवंत हि या सन्त या पदानें सांगत आहेत. "तीर्थीं धोंडा पाणी । देव रोकडा सज्जनीं. सन्तांचे संगती मनोमार्गें गति। आकळावा श्रीपति येणें पंथें," अशीं सहस्रावधि वचनें आपल्या धर्मग्रंथांत भरलीं आहेत. जितकी भगवंताची गाथा तितकीच संतांची हि आहे. त्या संतांचीं लक्षणें भगवद्गीतेनें "स्थितप्रज्ञ: स उच्यते" आणि "यो मद्भक्त: स मे प्रिय:" इत्यादि श्लोकांत स्पष्ट निरूपिलीं आहेत. तीं लक्षणेंच सन्त होत. हीं सर्व लक्षणें एकाच्या ठाईं आढळणें कठिण म्हणून सन्त: हें बहुवचन. असे सकळ संत एकत्र केले कीं भगवन्त मूर्तिमंत झाला. शिवाय भगवंत आहे चतुर्भुज. तो किमान दोन व्यक्ति एकत्र आल्या म्हणजेच सिद्ध होतो. म्हणून हि सन्त: हे बहुवचन. अथवा आदरार्थीं बहुवचन.

## ९३०. जीवन

जीवयति इति जीवन:। जो जीववितो तो म्हणावयाचा जीवन. या विश्वाला कोण बरें जीववीत आहे? विश्वाचें अस्तित्व कोणाच्यामुळें आहे? प्रत्येक जण, प्रत्येक अणुरेणु म्हणत असतो मी. या मीच्या बळावर तो जगत असतो. हा जो मी त्याची मीमांसा केली म्हणजे तो विश्व-जीवनाचा गुप्त झरा सांपडतो. शंकराचार्यांनीं उत्तरमीमांसेच्या आपल्या शास्त्रीय भाष्याचा आरंभ इथूनच केला आहे:

"युष्मदस्मत्-प्रत्ययगोचरयो: विषय-विषयिणो: तम:-प्रकाशवत् अत्यन्तविरुद्धस्वभावयो: इतरेतर-भावानुपपत्तौ" इत्यादि. आपल्या लौकिक स्तोत्रांत हि त्यांनीं हा विषय हाताळला आहे "कस् त्वं कोऽहं कुत आयात: , का मे जननी को मे तात:। इति परिभावय सर्वमसारं विश्वं त्यक्त्वा स्वप्नविचारम्।।" इत्यादि या सर्व मीमांसेचा इत्यर्थ हा निघतो कीं सर्वत्र एक चित्सत्ता व्याप्त आहे. त्या वेगळें दुसरें कांहीं नाहीं "नेह नानास्ति किंचन" आणि तें जें एकमेवाद्वितीय ब्रह्मसंज्ञित परमात्मतत्त्व तेंच जीवन म्हणजे विश्वजीवन आहे. सर्व अस्तित्वाचें मूळ तें आहे. त्यापासूनच हें विश्व उत्पन्न होत आहे, त्याच्या आधारें जगतें आहे, त्यांतच तें विलीन होत आहे. ही तिहेरी अखंड प्रक्रिया म्हणजे विश्वजीवन आहे आणि तें त्या परमात्म-सत्तेनें, जिला जीव अज्ञानानें मी मी म्हणत आहे, चाललें आहे. परमात्म्याचें हें जीवनत्व, हें संजीवन आपल्याला हि प्रत्यहीं अनुभवास येत असतें. रात्रीं वा दिवसां आपण गाढ झोपीं जातों तेव्हां आपल्याला कांहीं एक कळत नाहीं: 'मी आहें' ही अस्मिता हि त्याची त्या क्षणीं लोप पावते. मग मी अमुक आहें, असा अभिमान कुठून असणार? परंतु तशा त्या मृतवत् अवस्थेंतून तो परत जीवित होतो. त्याला पूर्वस्मृति आणि सर्व पूर्वभाव प्राप्त होतो. कोण देतो

हें सगळें? तो परमात्माच हें संजीवन करीत असतो. म्हणून तो म्हणावयाचा जीवन. मरणोत्तर व जननोत्तर जीवाला जी स्मृति होते ती कुणापासून? तें सर्व जीवन त्या परमात्म्यापासूनच प्राप्त होतें. म्हणून तो म्हटला आहे जीवन. ध्रुवानें त्याचेंच स्तवन केलें आहे :

**योऽन्त: प्रविश्य मम वाचमिमां प्रसुप्तां**
**संजीवयत्यखिलशक्तिधर: स्वधाम्ना।**
**अन्यांश् च हस्तचरणश्रवणत्वगादीन्**
**प्राणान्, नमो भगवते पुरुषाय तुभ्यम्।।**

## ९३१. पर्यवस्थित

परमात्मा हा पर्यवस्थित म्हणजे सर्वत्र कोंदलेला आहे. परि म्हणजे परित:, सर्वत्र, जिकडे पहावें तिकडे. आणि अवस्थित म्हणजे भरलेला, भरून राहिलेला. समर्थ म्हणतात: ''नभासारिखें रूप हें राघवाचें। अभाग्यास हें दृश्य पाषाण भासे'' तो परमात्मा आकाशाप्रमाणें सर्वत्र व्याप्त आहे. एक हि ठाव त्यावांचून रिता नाहीं. आकाश जसें सर्व वस्तूंच्या ठाईं आंतून बाहेरून भरून आहे तसा तो परमात्मा सर्वत्र संचरला आहे. ''तद् अन्तर् अस्य सर्वस्य तदु सर्वस्यास्य बाह्यत:'' परमात्मा हा असा सर्वत्र घनदाट भरून राहिला असला तरी तो अभाग्याला, म्हणजे ज्याला ती ज्ञानदृष्टि नाहीं, त्याला, पाषाण भासे. पाषाण भासे म्हणजे दगड दिसतो, देव दिसत नाहीं. प्रह्लाद ज्ञानदृष्टि सेवून तो परमात्मा पर्यवस्थित आहे, सर्वत्र आहे असें म्हणत होता. परंतु हिरण्यकशिपु चर्मदृष्टि घेऊन विचारीत होता, कुठें आहे तो तुझा देव? या खांबांत आहे? हा तर निव्वळ दगडोबा आहे, मूकस्तम्भ आहे! पण तो मूकस्तम्भ नव्हता. त्यांतला देव, तो आकाशरूप देव बोलला. तो गुरगुरला. शब्दगुण आकाश बोललें. म्हणजे काय कीं जें आम्ही पोकळ समजतों, शून्य समजतों, तें पोकळ नाहीं. तें भरीव आहे, अव्यक्त रूपानें हें सर्व दृश्य विश्व भरलेलेंच आहे. तें जें अव्यक्त आणि अक्षर तत्त्व तेंच पर्यवस्थित होय. आणि जें आम्हांला पर्यवस्थित दिसत आहे, म्हणजे आमच्या चोहों बाजूला हें जें सारें दगडासारखें निबर व्यक्त विश्व दिसत आहे तें वस्तुत: अनवस्थित आहे. पाण्याचा मोठा बुडबुडा दिसतो पण हातीं घेऊन पाहूं लागतों तर काय? कांहीं नाहीं, नुसतें पाणी! तसें हें भलें मोठें विश्व, हातांत घेऊन पाहूं लागलों, ज्ञानदृष्टीनें त्याची चांचणी करूं लागलों तर अव्यक्तमात्र ठरतें. व्यक्त कांहीं शिल्लकच राहत नाहीं. म्हणजे ज्याला आम्ही मोठें भरीव समजतों तें जग निव्वळ पोकळ आहे. त्याला भक्कम समजून त्यावर पाय ठेवायला जावें तर गटंगळ्या खातों, बुडतों. उलट ज्याला आम्ही कांहीं नाहीं निव्वळ पोकळ समजून बसलों होतों, त्याच्या विरोधांत गेलों तर कपाळमोक्ष होतो हिरण्यकशिपूसारखा. सारांश, वस्तुच पर्यवस्थित आहे, भरीव आहे, भरोशाची आहे, अवस्तु ही अनवस्थित आहे, पोकळ आहे, धोक्याची आहे. परमात्माच वस्तु असून तदितर सारें अवस्तु आहे. ''नासतो विद्यते भावो नाभावो विद्यते सत:। उभयोरपि दृष्टोऽन्तस् त्वनयोस् तत्त्व-दर्शिभि:।।''

## ९३२. अनन्तरूप

अनन्तानि रूपाणि यस्य स: अनन्तरूप :। अनन्त आहेत रूपें ज्याचीं तो म्हणावयाचा अनन्तरूप. ही अनन्त वैचित्र्यानें नटलेली सृष्टि म्हणजे परमात्म्याचीं अनंत रूपें होत. हीं रूपें नित्य नवीं होतच आहेत. कालचें रूप आणि रंग आज नाहीं. आजचें उद्यां नाहीं. अशी ही सृष्टि नित्यनूतन आहे. देशत: नि कालत: ही सृष्टि अनन्त आहे. आणि तिचें रंगरूप हि प्रतिक्षण बदलत आहे. त्यामुळें ती सर्वतोनन्तरूप आहे. परमात्मा हा उभयथा अनन्तरूप आहे. अव्यक्त रूपानें तो अनन्त आहे तसा व्यक्त रूपानें हि तो अनन्त

आहे. सर्व व्यक्ताकाराचा अव्यक्तांत लय होतो पण अव्यक्ताचा लय केव्हांच होत नाहीं. म्हणून अव्यक्त हें अनन्त रूप होय. व्यक्ताचा हि देशत: नि कालत: अन्त लागत नाहीं म्हणून तें हि अनन्तच म्हणावें लागतें. व्यक्त रूपानें तें लुप्त होतें असें मानलें तरी तें नाहींसे झालें असें म्हणतां येत नाहीं तें अव्यक्ताच्या पोटांत गुप्त असतें इतकेंच. एखादा नट पडद्याआड गेला म्हणजे अदृश्य होतो पण नाहींसा होत नाहीं तद्वत् व्यक्ताकार अव्यक्तसात् झाला तरी तो नाहींसा झाला असें नव्हे. तो परत पडद्यावर येण्यासाठीं गेलेला आहे. म्हणजे अव्यक्तांत व्यक्त आणि व्यक्तांत अव्यक्त सदैव स्थितच आहे. म्हणून तो परमात्मा तुम्ही कसा हि पहा, व्यक्त पहा कीं अव्यक्त पहा, अनन्तरूपच आहे. सोनेपण न मोडतां सोन्याचे नाना अलंकार होतात. तद्वत् अव्यक्ताचें अव्यक्तपण न मोडतां तें व्यक्त होतें आणि त्यामुळें त्याच्या अनन्तरूपत्वाला कुठें कसला हि बाध येत नाहीं. म्हणून व्यक्ताव्यक्ताची भाषा सोडून त्याला अन्तहीन अनन्त म्हणणेंच समर्पक.

### ९३३. अनन्त-श्री

अनन्ता: श्रिय: यस्य स: अनन्त-श्री: । अनन्त आहेत श्रिया ज्याच्या तो अनन्तश्री म्हणावयाचा. परमात्मा हा अनन्तरूप आहे तसा तो अनन्तश्री आहे. प्रत्येक रूपाची श्री, शोभा, न्यारीच असते. एक रूप दुसऱ्या रूपासारखें नाहीं. प्रत्येकांत आपलें कांहीं वैशिष्ट्य हें असतेंच. तीच खरोखर त्याची श्री होय. या वैचित्र्यामुळेंच जग इतकें आकर्षक बनून राहिलें आहे. तें अगदीं एकरूप असतें तर कंटाळवाणें झालें असतें. त्यांत गंमत राहिली नसती. त्याचें कुतूहल वाटलें नसतें. नाना योनि, त्या योनींत स्त्री- पुरुषभेद, त्या स्त्री-पुरुषांत वयोरूप-गुणकर्मभेद इत्यादि वैचित्र्यानें नटलेलें हें जग म्हणजे एक प्रचंड कॅलडस्कोपच आहे. प्रतिक्षण त्याचें दर्शन अपूर्व आहे, अद्भुत आहे. दृश्याच्या या वैचित्र्याला द्रष्ट्याच्या दर्शन वैचित्र्यानें गुणिलें कीं जो वैचित्र्याचा गुणाकार होतो तो खरोखर च अनन्त म्हणावा लागतो. स्त्री एकच पण तिचें दर्शन आई बाप भाऊ बहिण आणि तिऱ्हाईत यांचें प्रत्येकाचें वेगवेगळें असेल. वाघाच्या दृष्टीला तर तो एक सुस्वादु मांसपिंडमात्र भासेल. पालखी वाहणाऱ्या भोयाच्या दृष्टीनें ती मण दोन मणाची लाश असेल, तर प्रियकराला ती प्राणप्रिया वाटेल. प्रत्येकाचें दर्शन वेगळें! ही जी सृष्टि आणि दृष्टि यांची संसृष्टि तिला कुठेंच इतिश्री नाहीं म्हणून तो परमात्मा अनन्त-श्री म्हणावयाचा.

### ९३४. जित-मन्यु

जित: मन्युर् मान: येन स: जितमन्यु:। ज्यानें मन्यु म्हणजे मान जिंकला आहे तो म्हणावयाचा जितमन्यु. सामान्यत: मन्यु म्हणजे क्रोध असा अर्थ केला जातो आणि शंकराचार्यांनीं हि तो तसाच घेतला आहे. परंतु मागें जित-क्रोध हें पद येऊन गेलें आहे. म्हणून पुन: त्याच अर्थानें जितमन्यु हें पद घेणें प्रशस्त नाहीं. शिवाय क्रोधाहून मन्यु हें पद वेगळें आहे. तें समान अर्थाचें कां घ्यायचें? समान अर्थाचीं मानलेली पदें हि सूक्ष्म पाहिल्यास वेगळीं अर्थच्छटा असलेलीं दिसून येतील. इथें तर त्यांचे धातु हि वेगळेच आहेत. क्रुध् धातु पासून क्रोध आला आहे तर मन् धातूपासून मन्यु. मूलत: दोन्ही भिन्न आहेत. क्रोध स्थूल आहे, मन्यु सूक्ष्म आहे. मन्यु म्हणजे मान, अभिमान, अतिमान. मनुष्य जेव्हां स्वत:ला कोणी विशेष मानून बसतो तेव्हां तो आपल्याला संकुचित व विरुद्ध करून घेत असतो. त्यांतूनच मग क्रोधादि विकार उत्पन्न होतात. म्हणून मन्यु हा मूल विकार होय. सर्व अनर्थाचें मूळ होय. तो धर्माचा प्रतिपक्षी होय. महाभारतांत दुर्योधन ''दुर्योधनो मन्युमयो महान् द्रुम:'' तसेंच ''युधिष्ठिरो धर्ममयो महान्

द्रुम'' असें द्विविध रूपक आलें आहे. त्यांत मन्यु-द्रुमाचें फळ घोर विनाश आणि धर्म-द्रुमाचें फळ थोर शान्ति सुख समृद्धि असल्याचें दाखविलें आहे. म्हणजे मन्यु हा साक्षात् अधर्म होय, असें सुचविलें आहे. परमात्मा हा आत्मनिष्ठ असल्यामुळें सहजच जितमन्यु आहे, निरभिमान आहे. जो पुरुष आत्मधर्माचे अनुसरण करतो तो हि धर्मनिष्ठ जितमन्यु होतो, निरभिमान होतो. निरभिमान झाल्यामुळें देहग्रहणहेतुभूत दोषांपासून मुक्त होऊन अन्तीं देहांतून हि विमुक्त होतो. कारण-लिंग-स्थूल-देहांतून विमुक्त झाल्यामुळें तो सर्व काम-कर्म-भोगरूप संसारांतून परिमुक्त होत्साता परमानन्द रूप स्वानन्दांत विहरत राहतो.

## ९३५. भयापह

भयं संसारजं उपहन्ति इति भयापहः। जो संसाराचें भय दूर पिटाळून लावतो तो म्हणावयाचा भयापह. परमात्मा संसाराचें भय दूर करतो म्हणून तो भयापह होय. संसार समस्त भयावह आहे. जगांत जीव सुखासाठीं धडपडत आहे. परंतु तें सुख चन्द्रवत् सदैव त्याच्यापासून दूरच राहतें त्याच्या पदरीं निराशाच पडते. त्यामुळें संसारांत सुख शोधणें म्हणजे वाळूंतून तेल पिळून काढणें च होय. निम्बाच्या वृक्षापासून आम्र-फळाची अपेक्षा करणें व्यर्थ आहे. त्याप्रमाणें बाह्य पदार्थापासून, इन्द्रियार्थापासून सुखाची अपेक्षा करणें फुकट आहे. इन्द्रियांचे विषय शब्द स्पर्श रूप रस गन्ध अनित्य हि आहेत आणि असुख हि आहेत. जगांतील सुमधुर शब्द संगीत. त्या संगीतांतील निवडक चिजा रेडियोच्याद्वारा घरबसल्या आपल्याला उपलब्ध होतात. म्हणून तो रेडियो आपल्याला सुखाचें साधन वाटतो. परंतु तो बिघडतो फुटतो तुटतो वा चोरीला जातो. इकडे आमचा कान हि बिघडतो वा फुटतो. दोन्ही प्रकारें शब्दसुखाला आम्ही अंतरतों. हें झालें इन्द्रियें आणि इन्द्रियार्थ यांचें अनित्यत्व. त्यांचें असुखत्व हि तसेंच स्पष्ट आहे. कानानें शब्द-श्रवण होतें तें सुखावह असतेंच असें नाहीं. माझ्या समाधीचा तें भंग करते. गोड संगीतहि थोडा वेळ बरें वाटतें. पण तें जर सारखें अष्टौ प्रहर कानीं कपाळीं आदळत राहिलें तर त्याचा वीट येतो, त्रास होतो. वाटतें ही पीडा टळली तर बरी ! बहिऱ्याला ही पीडा नाहीं अथवा समाधींत ही पीडा नाहीं. सारांश, जगाचें स्वरूप हें असें अनित्य आणि असुख आहे. आणि तेंच खरोखर भय आहे. त्यांतून सुटका म्हणजे आत्मनिष्ठ होऊन राहणें. म्हणून परमात्मा हा भयापह म्हटला आहे. गीतेंत अर्जुनाला आणि भागवतांत उद्धवाला भगवान् कृष्णानें भयापहतेचा हाच मार्ग उपदेशिला आहे. ''अनित्यं असुखं लोकं इमं प्राप्य भजस्व माम्'' गीता. मनें वाचा दिठी जें हें घेपे कीं श्रवणादिकीं। जाण नश्वर तें सारें मायामय मनोमय।।'' अयुक्ता भ्रम नानार्थ गुणदोषेनि युक्त तो। गुण दोष तिथें भेद कर्माकर्मविकर्म हा। तरी आवरुनी सारीं इन्द्रियें चित्त रोधुनी। आत्म्यांत विश्व हें पाहें आत्मा तूं मज ईश्वरीं।। ज्ञानविज्ञान-संयुक्त जीवांचा जीव होउनी। आत्मानुभवसंतुष्ट होसी निर्विघ्न उद्धवा।। भागवत ११.७.७-१०.

## ९३६. चतुरस्र (चतुरश्रः)

चारी भुजा ज्याच्या समान आहेत त्याला चतुरस्र कोण म्हणतात. तसा जो चोहों बाजूंनीं समान अन्यून आहे, तो म्हणावयाचा चतुरस्र. आपल्या जीवनाच्या धर्म अर्थ काम आणि मोक्ष ह्या चार बाजू मानल्या तर जो या चारींत परिपूर्ण आहे तो म्हणावयाचा चतुरस्र. परमात्मा हा तसा चतुरस्र आहे. या चार पुरुषार्थांपैकीं ज्यानें एक हि संपादिला नाहीं त्याचें जीवित निरर्थक म्हटलें आहे.

**धर्मार्थकाममोक्षाणां यस्यैको ऽपि न विद्यते।**
**अजागल-स्तनस्येव तस्य जन्म निरर्थकम्।।**

जो या चारी पुरुषार्थांचें समग्र संपादन करतो तो म्हणावयाचा चतुरस्र. एकाच्याच मागें लागलेले एकांडे लोक पुष्कळ आहेत, परंतु ते जीवनाच्या तितक्याच महत्त्वाच्या अन्य तीन अंगांपासून वंचित राहतात. त्यांचें जीवन एकांगी होतें. ते पूर्ण सुखी होत नाहींत. कोणत्याहि पुरुषार्थाला न उपेक्षितां आणि न पीडितां सर्वांचें यथावत् संपादन ही चतुरता होय. ती ज्यानें संपादिली तो चतुरस्र म्हणावयाचा. भगवान् कृष्ण हा पूर्णावतार म्हटला जातो. कारण तो पूर्ण मानव होता. मानव जीवनाचीं चारी अंगें त्यानें यथावत् संपादिलीं होतीं. धर्म अर्थ काम आणि मोक्ष सर्वांची समग्र संपादणी त्यानें केली होती. म्हणून तो पूर्णावतार. तोच चतुरस्र. मानव जीवनाचें एकांगी दर्शन एकांगी जीवन पद्धतीला जन्म देतें. त्यांतून भल्या बरोबर बरेंचसें वाईट हि निर्माण होतें. आणि तें वाईट भल्याला हि खाऊन टाकतें. म्हणून दर्शन आणि तदुत्थ पद्धति अशीं हवींत कीं जीं वाइटाला वाव न देतां भल्याचीच भलावणी करतील. वर्णाश्रम धर्म हा तसा आहे. म्हणून तोच चतुरस्र. तोच परमात्मा. त्याचेंच सेवन केल्यानें जीव चतुरस्र होतो.

## ९३७. गभीरात्मा

गभीर: आत्मा स्वरूपं यस्य स: गभीरात्मा। ज्याचा आत्मा म्हणजे स्वरूप गंभीर आहे, तो म्हणावयाचा गभीरात्मा. समुद्र गंभीर आहे. खोल आहे. त्याच्या पृष्ठभागाच्या दर्शनानें त्याचें स्वरूप आकळत नाहीं. तो रत्नाकर आहे. त्याच्यांत प्रवालांचे पर्वत दडले आहेत. त्याच्यांत असंख्य जलचर आहेत. घोर मकर आणि थोर वरुण त्यांत वसति करून आहेत. तो अफाट पसरला आहे. आणि अथांग खोल आहे. असा सागर आश्चर्याचें आगरच आहे. त्याचीं आश्चर्ये संपतच नाहींत. त्यांचें तळ बूड लागतच नाहीं. म्हणून तो गंभीर म्हणजे खोल म्हटला जातो. पण तो किती हि खोल असला तरी त्याला मर्यादा आहे. कारण तो व्यक्त आहे. परंतु परमात्मा अव्यक्त आहे. अचिन्त्य आहे. त्याच्या खोलींत कोणाचाच प्रवेश होत नाहीं. कारण तिथें व्यक्ताला पूर्ण मतजाव आहे आकाशवत्. आकाशांत कोणाचाच प्रवेश होत नाहीं. कारण तें अत्यंत सूक्ष्म आणि निबिड आहे. तें मात्र सर्वांच्या आरपार शिरलें भरलें नि उरलें आहे. परमात्मा हि तसाच सर्व व्यक्ताला भेदून अभिन्न अव्यक्त आहे. या अथांग अव्यक्तार्णवाला गभीरात्मा नाहीं म्हणावयाचें तर काय बरें म्हणायचें? हें व्यक्त लोकपद्म त्या अव्यक्तार्णवांतच उगवलें आहे. त्या अव्यक्ताचें जर वर्णन करतां आलें तर त्याला व्यक्त च म्हणावें लागेल. म्हणून त्याचें यथार्थ वर्णन करतां येत नाहीं. जें कांहीं वर्णन होतें तें त्या अव्यक्त अक्षराच्या पडछायेचें होतें म्हणावयाचें. त्या पडछायेचें वर्णन मनुस्मृतींत असें आलें आहे:

**आसीद् इदं तमोभूतं अप्रज्ञातं अलक्षणम्।**
**अप्रतर्क्यं अविज्ञेयं प्रसुप्तमिव सर्वत:।।**

वस्तुस्थिति अशी आहे कीं सर्व बाह्य वस्तु ज्ञेय आहेत आणि म्हणून त्या उथळ होत. उलट आत्मतत्त्व हें अन्तरतर असून ज्ञातृस्वरूप आहे आणि म्हणून गभीरात्मा म्हटलें आहे. त्याला दुसरा कोण जाणणार? "विज्ञातारं अरे केन विजानीयात्."

## ९३८. विदिश

विदिशो व्यादिशो दिश:। हें एक सूत्र आहे, एक विचार आहे. दिश् धातुचा तो विस्तार आहे. दिशति इति दिश:। विविधं दिशति इति विदिश:। आणि विविधं आदिशति इति व्यादिश:। अशी त्यांची व्युत्पत्ति आहे. तदनुसार जो वेदरूपानें समस्त कर्मांचीं फळें देतो तो वेदात्मा परमात्मा दिश म्हणावयाचा. विशिष्ट फळें विशिष्टांना देतो, सात्विकांना सात्विक, राजसांना राजस व तामसांना तामस फळें

देतो, गुणकर्मानुसार ब्राह्मण क्षत्रिय वैश्य शूद्रांना विशिष्ट कर्तव्यें, विशिष्ट विधिनिषेध देतो तो व्यादिश म्हणावयाचा.

अथवा ''दिगात्मना दिशति निर्दिशति इति दिश: विदिश:, व्यादिश:'' असें हि म्हणतां येईल. चार मुख्य दिशा पूर्व पश्चिम उत्तर दक्षिण दाखवितो तो दिश म्हणावयाचा. त्यांच्या मधील उपदिशा ईशान्य, आग्नेय, नैर्ऋत्य आणि वायव्य दाखवितो तो विदिश म्हणावयाचा. आणि त्या उपदिशांमधील उपोपदिशा म्हणजे उत्तर ईशान्य, पूर्व ईशान्य, पूर्व आग्नेय, दक्षिण आग्नेय, दक्षिण नैर्ऋत्य, पश्चिम नैर्ऋत्य आणि पश्चिम वायव्य व उत्तर वायव्य, दाखवितो किंबहुना समग्र दिक्- चक्रवालच दाखवितो, तो म्हणावयाचा व्यादिश.

साम्प्रयानें संपूर्ण सूत्र पाहिल्या नंतर आतां एक एक पद पहावयाचें. इथें दिश: विदिश: व्यादिश: असा युक्ति-संगत क्रम न घेतां तो छन्दाच्या सोईसाठीं विदिशो व्यादिशो दिश: असा घेतला आहे.

विदिश म्हणजे विशिष्टांना विशिष्ट फल देणारा. परमात्मा हा आपल्या मर्जीस येईल त्याप्रमाणें कोणाला हि कोणतें हि फल देईल अथवा कोणत्याहि कर्माला कोणतें हि फल देईल तर संकर होईल. वैषम्य-नैर्घृण्यादि दोष त्याला चिकटेल. पण तो सम आहे, निर्दोष आहे. तो ज्याला त्याला त्याच्या कर्मानुसार फळ देतो. म्हणून तो विदिश.

### ९३९. व्यादिश

विविधं आदिशति इति व्यादिश:। ज्याला त्याला आपआपल्या गुणकर्मानुसार जो आदेश देतो, कर्तव्याचा निर्देश देतो, तो म्हणावयाचा व्यादिश. परमात्माच व्यादिश आहे. तोच सर्व जीवांना आपआपल्या गुण-कर्मानुसार वेगळे वेगळे स्वभाव व धर्म लावून देतो. जीव तदनुसार वागत असतात. गाय बैल चरतात, व्याघ्रसिंह शिकार करून जगतात. कावळे चिमण्या उजेडतांच उठतात आणि अंधारतांच आपआपल्या घरट्यांत दडतात. उलट, घुबडें नि वटवाघळें दिवसां दडून बसतात आणि रात्रींच संचार करतात. हें जें स्वभाव-वैचित्र्य या सृष्टींत दिसून येतें तें सर्व प्रकृतीच्या गुणानुसार होय. आणि प्रकृति ही पुरुषाश्रित असल्यामुळें तो तिचा शास्ता म्हटला जातो. म्हणून तो व्यादिश म्हणावयाचा. एरव्हीं त्याचा ह्या सगळ्या घडामोडींशीं काडीचा हि संबंध नाहीं. तो केवळ द्रष्टा आहे.

> न कर्तृत्वं न कर्माणि लोकस्य सृजति प्रभु:।
> न कर्मफल-संयोगं स्वभावस्तु प्रवर्तते।।
> नादत्ते कस्यचित् पापं न चैव सुकृतं विभु:।
> आज्ञानेनावृतं ज्ञानं तेन मुह्यन्ति जन्तव:।।

प्रत्येक जीवाचा हा जो स्वभाव, ज्याला अनुसरून तो वर्तत असतो तो अपरिवर्तनीय आहे. त्याच्या बाहेर त्याला जातां येत नाहीं. जो तसें करूं पाहील तो ईश्वरी आदेशाचें उल्लंघन करूं पाहतो असें म्हणावें लागेल. त्यालाच अभ्यसूया म्हटलें आहे. तोच अधर्म होय. गीतेचें प्रतिपाद्य स्वधर्म-निष्ठा आहे. ज्यानें त्यानें आपल्या स्वभावधर्माप्रमाणें चालावें. जो तसें करायचें नाकारतो तो त्याचा हट्ट फुकट आहे. ''सदृशं चेष्टते स्वस्या: प्रकृतेर् ज्ञानवान् अपि। प्रकृतिं यान्ति भूतानि निग्रह: किं करिष्यति।। यद् अहंकारमाश्रित्य न योत्स्य इति मन्यसे। मिथ्यैष व्यवसायस् ते प्रकृतिस् त्वां नियोक्ष्यति।। या श्लोकांत गीतार्थ स्पष्ट झाला आहे. ''करिष्ये वचनं तव'' या अर्जुनाच्या स्वीकारोक्तींत त्याचाच स्वीकार आहे.

### ९४०. दिश

दिशति कर्मिणां कर्मफलानि इति दिश:। जो कर्त्याला आपल्या कर्माचीं फळें देतो तो दिश म्हणावयाचा. देहधारी कोणता हि जीव अकर्मा राहूं शकत नाहीं. प्रकृतीचे गुण त्याला कर्मप्रेरणा देत

असतात. त्या प्रेरणेला वश होऊन तो जाग्रत् स्वप्न सुषुप्ति या अवस्थांतून जात असतो. तो त्यांचा विरोध करूं शकत नाहीं. आणि त्या अवस्थांत कांहीं ना कांहीं कर्म होतेंच आणि कर्म म्हटलें कीं त्याचें फळ हि त्याबरोबर आलेंच. तें टळूं शकत नाहीं. हें कर्म आणि त्याचीं फळें कोण देतो? तीं आपोआप मिळतात असें म्हणतां येत नाहीं. कारण कोणतें हि कर्म हें कर्त्यावांचूनच परभारें च होतें असें कुठें हि आढळून येत नाहीं. मग तें कर्म जो करतो तोच त्याचीं फळें हि देतो असें म्हटल्यास तें हि बरोबर नाहीं. कारण राजपुरुष कर्में करतो आणि त्याच्या सेवेचें फळ राजा देत असतो असें आपण पाहतों. म्हणजे कर्म करावयाचें एकानें व त्याचें फळ देणारा दुसराच, असा प्रकार सर्वत्र आढळून येतो. आतां हा फळदाता कोणी तरी पुरुषच असावा लागेल. कर्म जड आहे. तेंच आपलें फळ मिळवतें वा देतें असें म्हणतां येणार नाहीं. म्हणून पूर्व मीमांसकांनीं जी अपूर्व नामक कर्माची वा फलदात्याची कल्पना केली आहे ती युक्तिसंगत नाहीं. अर्थात् फलदाता हा चेतनच हवा. आणि हा फलदानसमर्थ चेतन परमात्म्यावांचून दुसरा कोण आहे? म्हणून तो परमात्माच फळदाता म्हणावा लागतो. म्हणून तो दिश म्हणजे फलदानी म्हटला आहे. ''क्व कर्म प्रध्वस्तं फलति पुरुषाराधनमृते?'' असा पूर्व मीमांसकांना वेदान्त्याचा सवाल आहे. ''अतस् त्वां संप्रेक्ष्य क्रतुषु फलदान-प्रतिभुवं श्रुतौ श्रद्धां बद्ध्वा कृतपरिकर: कर्मसु जन:।'' तुम्ही वेदविहित कर्में करा. त्याचें प्रतिफल द्यायला परमात्मा प्रतिभू म्हणजे जामीन बसला आहे, असें श्रुति सांगते. आणि आस्तिक जन त्यावर विश्वास ठेवून कर्में करीत असतात; आणि परमात्मा त्यांना कर्मानुसार फल देत असतो म्हणून तो दिश म्हणावयाचा.

## ९४१. अनादि

न आदि: कारणं यस्य स: अनादि:। ज्याला आदि म्हणजे कारण नाहीं तो अनादि म्हणावयाचा. झाडाला मूळ असतें. पण मुळाला पुन: मूळ नसतें. म्हणूनच तें मूळ म्हटलें जातें. परमात्मा हा तसा या विश्वकदंबाचें मूळ आहे. त्याला दुसरें मूळ नाहीं, कारण नाहीं, म्हणून तो अनादि म्हटला आहे. या विश्वांतील प्रत्येक वस्तु आदिमत् आहे. म्हणजे कुठल्यातरी कारणापासून कार्यरूपानें परिणत झालेली आहे आणि प्रत्येक आदिमत् वस्तु अन्तवत् हि असते. म्हणून ती नाशवन्त हि आहे. अशा प्रकारें हें समस्त विश्व कार्यकारणबद्ध असून नाशवन्त आहे. परमात्मतत्त्वच हें एक असें आहे कीं त्याला आदि नाहीं. आणि आदि नाहीं म्हणून अन्त हि नाहीं. तें ''जायते अस्ति वर्धते विपरिणमते अपक्षीयते म्रियते'' या वस्तूंच्या षड्भावांतून परिमुक्त आहे. अर्थात् कार्यकारणभावाच्या मालिकेंत तें कुठेंच सांपडणारें नाहीं. एक कण वा क्षण दुसऱ्या कणाला वा क्षणाला जन्म देतो. तो स्वत: हि कुठल्या तरी कणा वा क्षणापासून जन्म पावलेला असतो. अशा प्रकारें प्रत्येक वस्तु ही कारण हि असते आणि कार्य हि असते. परमात्मा हा तसा नाहीं. तो विश्वाचें कारण मानिला जातो खरा, पण तो हि त्याच्यावर आरोपच आहे. रज्जूवर सर्पाचा आभास होतो आणि आम्ही रज्जूला सर्पकारण म्हणतों. परंतु रज्जूच्या बाजूनें पाहिल्यास ती केव्हां हि सर्पालाच नव्हे तर त्याच्या आभासाला हि जन्म देत नाहीं. तो आरोप आम्ही आमच्या दृष्टिदोषामुळें भ्रमामुळें करीत असतो. तद्वत् परमात्म्याला या विश्वाचा आदि म्हणणें हि गैरच आहे आणि या हि दृष्टीनें तो परमात्मा अनादि म्हणजे कारणभूत नसलेला असा आहे. अशा प्रकारें अनादि हें पद बहुव्रीहि तसें तत्पुरुष हि घेतां येण्यासारखें आहे. कसें हि पहा तो परमात्मा अनादिच आहे.

## ९४२. भूर् (भुर् भुवः)

''भूर् भुवो लक्ष्मीः'' हें एक पद कीं अनेक? शंकराचार्यांनीं तें अनेक मानिलें असून अनेक प्रकारें विवरिलें आहे. (१)भुवो भूः (२) भुवो भूः लक्ष्मीश् च (३) भूर्भुवो लक्ष्मीः अशा तऱ्हांनीं त्यांनीं व्याख्यान केलें आहे. भू म्हणजे पृथिवी ही सर्व भूतांचा आधार आहे तिची हि भू म्हणजे आधार परमात्मा होय. म्हणून तो भुवो भूः म्हणावयाचा. तो नुसता भूचा भूच नाहीं, या पृथ्वीचा आधारच नाहीं, तिची लक्ष्मी म्हणजे शोभा हि आहे. म्हणून तो म्हणावयाचा भूर् भुवो लक्ष्मीश् (च) या दोन व्याख्या भूर् भुवः आणि लक्ष्मीः ही तीन वेगळीं असमस्त पदें मानून केल्या आहेत. तिसरी व्याख्या तें एक समस्त पद घेऊन केली आहे. भूर्लोक व भुवर्लोक यांची लक्ष्मी म्हणजे शोभा असलेली जी अध्यात्मविद्या ती म्हणावयाची भूर् भुवो लक्ष्मीः आतां हें एक नाम घ्यायचें कीं दोन याचा निर्णय सहस्रसंख्येला जें अनुकूल असेल तदनुरोधानें करावयाचा. एक च नाम घेणें गरजेचें असल्यास भूर्भुवो-लक्ष्मीः असें एक सामासिक पद घेणें बरें. दोन नामें घेणें गरजचें असल्यास हीं तिन्ही पदें असमस्त राहतील आणि भूवः हें षष्ठ्यन्तपद घेऊन देहली दीपकन्यायानें तें दोन्ही कडे अन्वित होईल. भूवः भूः आणि भुवः लक्ष्मीः अशी तीं दोन नामें होतील. आणि संख्यापूर्त्यपेक्षेनें इथें तशीं हीं दोन नामें घ्यावयाचीं आहेत. अर्थात् हें नाम भुवो भूः असें झालें. परमात्मा हा आधाराचा हि आधार आहे, मूलाधार आहे. म्हणून तो उघडच भुवो भूः म्हणावयाचा.

## ९४२. (भूर्) भुवः (लक्ष्मीः)

भूर् भुवो लक्ष्मीः या पदांचीं दोन नामें जरी संख्या-पूर्तीसाठीं कल्पिलीं तरी तीं तिन्ही स्वतंत्र पदें घेणें गैर नाहीं. कारण संख्या-निर्वाहासाठीं भुवो भूः आणि भुवो लक्ष्मीः अशीं दोन नामें कल्पिलीं तरी तीं कृत्रिम आहेत. भुवो भूः म्हणण्यांत कांहीं विशेष स्वारस्य नाहीं. परमात्मा विश्वाधार आहे तिथें तो भूमीचा वा भूर्लोकाचा आधार आहे असें म्हणण्यांत काय अर्थ? त्याच प्रमाणें भुवो लक्ष्मीः हें नाम हि कृत्रिमच आहे. तो परमात्मा साक्षात् विश्वलक्ष्मी असतांना त्याला केवळ भूलोकाची लक्ष्मी म्हणण्यांत काय स्वारस्य? तेव्हां संख्यानिर्वाहाचा बाऊ न करतां भूर् भुवर् लक्ष्मीः अशीं तीन पदें घेणेंच प्रशस्त. पण तसें करूं जातां दुसरीच अडचण उपस्थित होते पुनरुक्तीची. पण पुनरुक्तीचा दोष पत्करला, कृत्रिमता हा महादोष आहे. बळेंच ओढून ताणून एखादें नाम कल्पिणें अयोग्य होय. ''यानि नामानि गौणानि विख्यातानि महात्मनः। ऋषिभिः परिगीतानि तानि वक्ष्यामि भूतये। '' या प्रतिज्ञेशीं हि तें विसंगत होईल (१) गौण म्हणजे गुणवाचक अर्थात् विशिष्ट गुण प्रकट करणारीं, (२) मंत्र-द्रष्ट्यांनीं (वेदांत) गाइलेलीं आणि (३) लोकांत विख्यात अशीं हीं सहस्र नामें आहेत. जें नाम या तिहीं पैकीं एका हि प्रकारांत बसत नसेल तें अप्रशस्त होय, अप्रस्तुत होय. पुनरुक्तिदोष- परिहार अनेक प्रकारें होऊं शकतो. (१) समानवर्ण असून अर्थभिन्नता असणें, (२) समान अर्थ असून वर्णभिन्नता असणें आणि (३) समानवर्ण व समान अर्थ असून क्रमभिन्नता असणें अशा तिन्ही प्रकारें पुनरुक्ति हि अपुनरुक्ति होते. शिवाय सर्व नामें एका विष्णूचींच म्हटल्यानंतर पुनरुक्ति अपुनरुक्ति हा प्रश्नच उत्पन्न होत नाहीं आणि पुनरुक्ति झाली तरी ती दोषास्पद नव्हे. म्हणून भुवर् हें नाम भुवः असें भूचें षष्ठ्यन्त न घेतां भुवर् लोक म्हणून स्वतंत्र हि घेतां येईल. परमात्मा हा भू आहे आणि भूरतिरिक्त भुवर् हि आहे म्हणून भुवर्.

## ९४३. लक्ष्मी (लक्ष्मी, लक्ष्मी:)

लक्ष्मी: हें पद लक्ष्मी असें इन्नन्त हि घेणें शक्य आहे. लक्ष्मवान् तो लक्ष्मण वा लक्ष्मी म्हणावयाचा. आणि लक्ष्मी: असें स्त्रीलिंग घेतलें तरी अर्थांत फरक नाहीं. ती देवता झाली. पुंल्लिंग देव झाला. तर नपुंसकलिंग दैवत झालें. सर्व नामें विशेषणेंच होत आणि तीं विशेष्यनिघ्नच असावयाचीं. म्हणून लिंगव्यवस्था देव देवता दैवत या पुंस्त्रीनपुंसकलिंगी विशेष्यानुसार सहजच बसते. तेव्हां लक्ष्मी: घ्या कीं लक्ष्मी अर्थांत अंतर नाहीं. लक्ष्मी म्हणजे सर्व सुलक्षण-संपन्न. परमात्म्याचे ठाईं सर्व शुभ लक्षणें एकवटलीं आहेत, म्हणून तो लक्ष्मी होय. परमात्म्याच्या ठाईं सर्व शुभ लक्षणें एकवटलीं तीं कोणकोणतीं? पहिलें लक्षण अव्यंगता, दुसरें निर्मलता, तिसरें सुरूपता, आणि चौथें सुगुणता. या शिवाय परमेश्वरी तेज हें पांचवें लक्षण होय. हीं पंचलक्षणें जिथें एकवटलीं आहेत तिथें लक्ष्मी आहे. ही लक्ष्मी जिथें आहे तिथें लक्ष्मीपति आहे आणि जिथें लक्ष्मीपति आहे तिथें लक्ष्मी आहे. लक्ष्मी नि लक्ष्मीनारायण दोन नाहींत. सूर्य नि सौरी प्रभा वेगळीं नाहींत त्या प्रमाणें. हा सूर्य आहे हें कोणत्या लक्ष्मावरून ओळखायचें? त्याच्या प्रभेवरून. तसा हा भगवान् आहे हें कोणत्या लक्ष्मावरून ओळखायचें? त्याच्या भगवत्तेवरून, लक्ष्मीवरून. जगांत खरोखर कांहीं सर्वातिरिक्त आकर्षक असेल तर तें सौंदर्य आहे, लक्ष्मी आहे. म्हणून गीतेंत भगवद्विभूतितत्त्व सांगतांना श्रीमत् पद आधीं योजिलें आहे, मागाहून ऊर्जित चा उल्लेख केला आहे. ''यद् यद् विभूतिमत् सत्त्वं श्रीमद् ऊर्जितमेव वा'' मानव जीवनाचीं जीं सारभूत मूल्यें आहेत तीं 'सत्य शिव सुन्दर' अशीं त्रिविध वर्णिलीं आहेत. हीं तिन्ही वस्तुत: एकरूपच आहेत. परंतु त्यांत डावें उजवें करायचें झाल्यास सुन्दर हें सर्वोपरी म्हणावें लागेल. तिथें तुमची बुद्धि कुंठित च होतें. तें पाहिल्या बरोबर तुम्ही तद्वश च होता. त्याचा प्रतिकार करण्याचें सामर्थ्य कुणांतच नाहीं. असें जें हें तत्त्व तेंच लक्ष्मी होय.

## ९४४. सुवीर

सु शोभनो वीर: सुवीर:। जो उत्कृष्ट वीर आहे तो म्हणावयाचा सुवीर. जो आपल्या प्रतिपक्षाला नामोहरम करतो तो वीर म्हटला जातो. जो एकसाथ अनेक शत्रूंशीं एकटा लढा देतो आणि विजयी होतो तो महावीर म्हणावयाचा. पण हे वीर नि महावीर बाह्य शत्रूंवर विजय मिळवीत असले तरी ते आपल्या अन्त:शत्रूंवर विजय मिळविण्यास असमर्थ असतात. रावणानें त्रिभुवन जिंकलें पण आपला कामविकार त्याला जिंकतां आला नाहीं. कुंभकर्ण महापराक्रमी परंतु निद्रेपुढें त्याचें कांहीं चाललें नाहीं. सारें जग हें असें रजतमादि गुण आणि गुणकार्यें यांना वश आहे. त्यामुळें त्यांतील कोणी हि वीर नि महावीर हा सुवीर नव्हे. सुवीर तर तो परमात्मा आहे जो गुणातीत आहे, गुणस्वामी आहे. त्याच्यावर प्रकाश प्रवृत्ति नि मोह या सत्त्वरजस्तमांच्या कार्यांचीं मात्रा चालत नाहीं. ही कार्यें येतात नि जातात तो आपला केवळ साक्षी अविकृत राहतो. असा तो अविकृत राहिल्यामुळें तो शोभन होय आणि वीर हि होय. म्हणून तोच एक सुवीर म्हणावयाचा. ''न तदस्ति पृथिव्यां वा दिवि देवेषु वा पुन:। सत्त्वं प्रकृतिजैर् मुक्तं यद् एभि: स्यात् त्रिभिर् गुणै:।।'' हें विश्व म्हणजे गुणांचा पसारा आहे. यांत कांहींएक गुणमुक्त आढळावयाचें नाहीं. गुणमुक्त आहे तें ब्रह्मच. म्हणून त्याला सुवीर म्हणावयाचें. तेंच या सगळ्या गबाळ काल्यांत केवळ अलिप्त असून त्याला शिवायचें लेशमात्र हि सामर्थ्य प्रकृतीच्या गुणांत नाहीं. म्हणून तो परमात्मा म्हणावयाचा सुवीर.

## ९४५. रुचिराङ्गद

रुचिराणि अङ्गदानि यस्य स: रुचिराङ्गद:। ज्याचीं बाहुभूषणें म्हणजे बाजूबंद सुंदर आहेत तो म्हणावयाचा रुचिराङ्गद. नामें परमात्म्याचीं असून परमात्मा

हा निर्‌गुण सगुण दोन्ही आहे. त्यामुळें हीं नामें हि द्विविध विवरिलीं जातील. कुठें सगुणाची पाठ दृष्टीस पडते, तर कुठें निर्गुणाचें पोट. पण पाठपोट मिळून वस्तु एकच आहे. त्यामुळें केव्हां पाठीकडून पोटाकडे दृष्टि जाते तर केव्हां पोटाकडून पाठीकडे हि. पाण्यांत मासा इकडून तिकडे सुळकन् जात येत असतो. त्यावेळीं जसें कधीं त्याचें पोट तर कधीं पाठ दृष्टीस पडते. आणि पाहणारा पाहत राहतो तसेंच इथें हि आहे. परमात्म्याच्या अनंत गुणसागरांत नामाच्या ह्या सहस्र मासोळ्या खेळत आहेत. त्यांचा हा खेळ पाहतांना केव्हां त्याची पाठ तर केव्हां पोट नजरेस पडतें. निर्‌गुण केवलस्वरूप आहे तर सगुण नानावर्णाकृति आहे. आणि नुसतें नानावर्णाकृतिच नव्हे तर अनेकदिव्याभरण हि. त्या दिव्य आभरणां-पैकीं इथें अंगद म्हणजे केयूर वा बाहुभूषणें यांचा उल्लेख आला आहे. हीं नाना रूपें वस्त्रें आभरणें गंधें नि माल्यें अवतारानुसार आलीं आहेत. तथापि त्या सर्व अवतारांत मुख्यत: इथें कृष्णावताराकडे अधिक दृष्टि आहे. कारण तो ग्रंथकाराला वर्तमान अवतार आहे. भगवान् रामचंद्र राजा होता पण त्याचें ध्यान तापस आहे. उरुजटामंडलधारी आहे. उलट कृष्ण गवळी, पण त्याचें ध्यान राजस आहे. तो नखशिखांत नटला आहे राजासारखा. परमात्मा सुवीर आहे त्या अर्थीं तो या सर्व भुवनांचा अधिपति आहे आणि अर्थातच सर्व ऐश्वर्याचा नि वैभवाचा स्वामी आहे. त्याचें द्योतक त्याचें लेणें होय. रुचिरांगद त्याचेंच दिग्‌दर्शन.

## ९४६. जनन

जनन म्हणजे जन्मास घालणारा, जनक. परमात्मा हा या विश्वाचा जनक आहे. राणी माशी जशी निरंतर अंडीं घालीत असते, त्या प्रमाणें परमात्मा सारखा हें विश्व निर्मीत आहे. प्रतिक्षणीं काल वाढतो आहे, दिग्‌देश वाढतो आहे आणि भूतें हि सारखीं वाढतच आहेत. या जननप्रक्रियेंत अणुमात्र हि खंड कधीं पडला नाहीं. पडायचा नाहीं. सृजनशीलता हा स्रष्ट्याचा स्वभाव आहे आणि स्वभावाला अन्त असत नाहीं. त्यामुळें सृष्टिकर्म निरंतर चालूच राहणार. कोणता हि जीव स्वस्थ बसून राहत नाहीं. कांहीं तरी नवीन करण्याची त्याची सारखी खटपट सुरू असते. एक बीज वाऱ्याच्या झोताबरोबर उडून कुठल्या तरी डोंगराच्या दरींत पडतें. तिथें दगडधोंड्यांत हि तें अंकुरतें, पल्लवतें आणि त्याचा मोठा वटवृक्ष होतो. त्याचीं मुळें पाताळांत पसरतात. त्याचा विस्तार पृथ्वीला व्यापतो. पारंब्यांच्या रूपानें जणूं तो सहस्रपाद होतो आणि चारी दिशांत चालूं लागतो. त्याच्या शाखा आकाशाला आलिंगितात. त्याचें शिर स्वर्गाला टेकतें. एवढें अचाट सामर्थ्य त्या एवढ्याशा बीज-कणिकेंत असतें. तो तिचा स्वभाव होय. तोच जनन. प्रत्येकाच्या ठाईं तो निहित आहे. नवनवनिर्मितीची ही सहज आणि अनिवार प्रेरणा च या सृष्टींचें कारण आहे. "एकाकी न रमते। एको ऽहं बहुः स्याम्, प्रजायेय।" या संकल्पाच्या रूपानें तीच सृष्टीच्या आरंभीं अवतरते आणि त्या संकल्पांतून सृष्टि होते. असा मूल संकल्प आणि सृष्टि यांचा आधारभूत तो चेतन परमात्माच जनन होय.

## ९४७. जन-जन्मादि

जनस्य जन्मन: आदि: जनजन्मादि:। जो जीवांच्या जन्माचा हेतु तो परमात्मा जनजन्मादि म्हणावयाचा. जायते इति जन:। जो जन्मतो तो जन होय. अर्थात् जीवमात्र. जन म्हणजे केवळ मानव योनींतील च जीव नव्हेत, तर चराचर स्थूलसूक्ष्म समस्त जीव-जन्तु. या सर्व जीवयोनींचा जन्म प्रकृतींतून होतो. म्हणून ती प्रकृतिच सर्व जीवांचें जन्म आहे, जन्मस्थान आहे, सर्व जीव चेतन वा अवचेतन प्रकृतींतूनच उत्पन्न होतात. अव्यक्त प्रकृतीच्याच गर्भातून हा सगळा व्यक्ताकार जन्मास आलेला आहे. म्हणून जीवांचें मूळ, जन्म प्रकृति

म्हणावयाची. पण प्रकृति हें अव्यक्त तत्व असलें आणि त्यांतूनच व्यक्ताकार आलेला असला तरी तें अन्तिम तत्त्व नव्हे, चरम तत्त्व नव्हे. **चरम तत्त्व** आहे अक्षर परमात्मा. कारण **तो चेतन** आहे. प्रकृति जड आहे. ती मूल असूं **शकत नाहीं** अचेतनापासून चेतन निर्माण होत नाहीं. चेतनापासूनच चेतन आणि अवचेतन (ज्याला अज्ञानामुळें अचेतन म्हटलें जातें) निर्माण होतात. म्हणून तो अव्यक्त आणि अक्षर परमात्माच या व्यक्त आणि क्षर विश्वाचा आदि होय. भूतें, प्रकृति आणि परमात्मा असा हा मूलानुसारी क्रम आहे. गीतेनें याचाच उल्लेख पुढील प्रमाणें केला आहेः

**अव्यक्ताद् व्यक्तयस् सर्वाः प्रभवन्त्यहरागमे।**
**रात्र्यागमे प्रलीयन्ते तत्रैवाव्यक्त-संज्ञके।।**

**भूतग्रामः स एवायं भूत्वा भूत्वा प्रलीयते।**
**रात्र्यागमे ऽवशः पार्थ प्रभवत्यहरागमे।**
**परस् तस्मात् तु भावो ऽन्यो ऽव्यक्तो ऽव्यक्तात् सनातनः।**
**यः स सर्वेषु भूतेषु नश्यत्सु न विनश्यति।।**
**अव्यक्तोऽक्षर इत्युक्तस् तमाहुः परमां गतिम्।**

तो जो अक्षर पुरुष तोच परमगति होय. आणि त्यालाच इथें जनजन्मादि म्हटलें आहे.

## ९४८. भीम

भीम म्हणजे भयंकर. माणसाला अंधाराचें भय वाटतें. कारण अंधारांत कांहीं दिसत नाहीं, सुचत नाहीं. कुठल्या खड्ड्यांत पडूं वा कुठल्या धोंड्यावर आपटूं याचा कांहीं नेम नाहीं. परंतु प्रकाशांत असें भय वाटत नाहीं. तिथें सर्वकांहीं ज्ञात आहे. खड्डा असला तर तो टाळतां येतो. धोंडा असला तर तो वाळतां येतो. वाघ आला तर त्याशीं दोन हात करतां येतात. पण अंधारांत जिथें कांहींच कळत नाहीं तिथें मनुष्य असहाय बनतो. त्याला भय भरतें. परमात्मा हा अज्ञात आणि अज्ञेय असल्यामुळें भयंकर होय. ''आश्चर्यवत् पश्यति कश्चिदेनं, आश्चर्यवद् वदति तथैव चान्यः। आश्चर्यवच् चैन-मन्यः श्रुणोति, श्रुत्वाप्येनं वेद न चैव कश्चित्।। त्याला पाहणारा आ वासून पाहत राहतो. त्याची बोबडीच वळते. त्यांतून एखादा सावरला आणि बोलूं लागला तर तो काय बोलतो तें चमत्कारिकच असतें. असलें असंबद्ध चमत्कारिक कोण ऐकतो? आणि कोणी एखादा निघालाच तें ऐकणारा तर तें एक आश्चर्यच म्हणावयाचें! आणि ऐकलें तरी त्याला कळणार काय कपाळ? असें जें केवळ अगोचर परमात्मतत्त्व तें भीम म्हणजे भयंकर नव्हे तर काय म्हणावयाचें? खरोखर मृत्यूचें भय हि अज्ञात-भयच आहे. मृत्यु म्हणजे काय? मृत्यूनंतर काय होतें? तिथें कोणत्या यातना आहेत वा काय व्यवस्था आहे याचें जें माणसाला अज्ञान आहे तेंच भयंकर आहे. परमात्मा हा या विश्वाचा अन्तकच आहे. त्यांत हें सारें विश्व विलीन होतें. त्यामुळें तो भीम म्हटला आहे.

## ९४९. भीम-पराक्रम

भीमः पराक्रमः यस्य सः भीम-पराक्रमः। ज्याचा पराक्रम भयंकर आहे तो म्हणावयाचा भीम-पराक्रम. पर म्हणजे परका, शत्रु. त्याच्या विरुद्ध जो आक्रम म्हणजे चाल तो पराक्रम होय. परमात्म्याची शक्ति अनंत आहे. तो सर्वशक्तिमान् आहे. कर्तुं अकर्तुं अन्यथा कर्तुं समर्थ आहे तो. तसें सामर्थ्य कोणाचें नाहीं. म्हणून तो परमात्मा उघडच भीम-पराक्रम म्हणावयाचा. त्याच्या विरुद्ध जो उभा झाला तो पडलाच म्हणून समजा. आपले पाय तोडून कोणी उभा राहूं शकत नाहीं. तसा कोणी हि परमात्म्याविरुद्ध उभा होऊं शकत नाहीं. परमात्माच सर्वाधार आहे. तोच जीवरूपानें सर्वांचा निजात्मा आहे. त्याच्याविरुद्ध कोण कसा उभा राहणार. रज्जूसर्पाचा उद्भव स्थिति आणि संहार जसा केवळ रज्ज्वधीन असतो

तसा या विश्वाचा परमात्माधीनः म्हणून तो भीम-पराक्रम म्हणावयाचा. आणि अवतारदृष्ट्या हि तो भीम-पराक्रम तर आहेच. प्रत्येक अवतारांत त्यानें आपल्या प्रतिपक्षाला लोळवलें आहे आणि धर्माची द्वाही फिरविली आहे. जगांत सत्याचें राज्य आहे, धर्माचें राज्य आहे, न्यायाचें राज्य आहे, असत्य, अधर्म, अन्याय यांचें नव्हे. कारण या जगाचा शास्ता परमात्मा आहे. तो सर्वांच्या हृदयांत राहून त्या सर्वांना व्यक्तिशः आणि संघशः धर्म-प्रेरणा देत असतो. हिरण्यकशिपूच्या घरींच प्रह्लाद निर्माण होतो. माणसाच्या हृदयांत च सदसद्-द्वंद्व सुरू होतें आणि परमात्मा आपलें बळ सत्पक्षाला देऊन त्याला विजयी करतो. या अंतरतर धर्मगोप्त्यापुढें मोठमोठे जुलमी सम्राट् आणि त्यांचीं साम्राज्यें यांचें कांहीं चालत नाहीं. तीं शेवटीं नष्टच होतात. म्हणून तो परमात्मा भीम-पराक्रम म्हणावयाचा.

## ९५०. आधार-निलय

आधाराणां निलयः आधार निलयः। अथवा आधारश्च असौ निलयश्च आधारनिलयः। सर्व आधारांचें माहेर असलेला परमात्मा हा आधारनिलय म्हणावयाचा. अथवा तो आधार असून निलय हि आहे म्हणून आधार निलय म्हणावयाचा. ज्या गोष्टींवर जीवाची मदार असते त्या गोष्टी त्याचे आधार होत. शरीर, करणें, अंतःकरणें आणि प्राण हे जीवाचे आधार होत. यांच्या आधारेंच त्याचें सर्व जीवन चाललेलें असतें. पण जीवासगट या सर्वांचा आधार तो परमात्मा आहे. त्या परमात्म-सत्तेच्या आधारेंच हे सारे जीव जगत असतात. सूर्याच्या आधारेंच जसे सर्व किरण, विद्युद्गण आणि अग्निकण जगत असतात त्याप्रमाणेंच सर्व जीवांचें जीवन परमात्मसत्तेच्या आधारें चाललेलें आहे. सूर्य मावळला तर दिवस हि नाहीं, इन्द्रधनुष्य हि नाहीं, नि मृगजळ हि नाहीं. सूर्याची सत्ता आहे म्हणून विद्युन्माला आहेत, अग्निज्वाला आहेत. अशा प्रकारें सूर्य हा तेजोमात्राचा मूळ आधार आहे, उद्गम आहे. तसेंच सारें तेज शेवटीं सूर्यांतच विलीन होतें म्हणून तोच निलय हि होय. त्याप्रमाणेंच परमात्म-सत्तेच्या आधारेंच हें जग प्रतीत होत आहे आणि तें त्या परमात्मसत्तेंतच निलीन होणारें आहे. मृगजळ सूर्य-किरणांवर भासमान होतें म्हणून सूर्य हा आधार म्हणावयाचा. किरण अस्तसमयीं सूर्यांत निलीन होतात. त्याबरोबर मृगजळ हि निलीन होतें, लुप्त होतें. म्हणून सूर्य हा निलय म्हणावयाचा. अशा प्रकारें सूर्य हा मृगजळाचा आधार आणि निलय दोन्ही झाला. तसा अव्यक्त परमात्मा हा या व्यक्ताकाराचा आधार हि आहे आणि निलय हि आहे. अव्यक्ताच्या आधारावर हा व्यक्ताकार भासत आहे आणि त्या अव्यक्तांतच तो शेवटीं विलीन व्हावयाचा आहे. आणि व्यक्त रूपानें आभासित होण्यापूर्वीं हि तो तिथेंच निलीन होता. अशा प्रकारें तो परमात्मा आधारांचा निलय आहे आणि आधार व निलय हि आहे.

## ९५१. (धाता) अधाता

दधाति इति धाता। जो धारण पोषण करतो तो म्हणावयाचा धाता. आधार-निलयो धाता, हीं पदें मिळून एक संपूर्ण विचार प्रकट झाला आहे. परमात्मा या विश्वाचें मूळ आहे म्हणून तो आधार म्हणावयाचा. तोच या विश्वाचें जीवन आहे, त्याचें धारण पोषण करणारा आहे म्हणून तो धाता म्हणावयाचा. आणि या विश्वाचें पर्यवसान हि शेवटीं त्यांतच व्हावयाचें आहे, त्यांतच विश्व विलीन व्हावयाचें आहे म्हणून तो निलय म्हणावयाचा. अर्थात् उत्पत्ति स्थिति आणि लय हें समग्र विश्वजीवन तदधीन आहे. तोच या विश्वाचे आदि अन्त आणि मध्य आहे. मृगजळ सूर्य किरणांवाचून संभवत नाहीं म्हणून सूर्यकिरणें त्याचा उद्भव वा आदि होत. सूर्य किरणांवरच तें भासमान होत असतें. म्हणून सूर्य

किरणेंच त्याची स्थिति वा मध्य होत. आणि सूर्य किरणांबरोबरच तें हि संहार पावतें म्हणून सूर्य किरणेंच त्याचा संहार वा अन्त होत. त्याप्रमाणेंच परमात्मा या विश्वाभासाचा आधार, धाता आणि निलय आहे, उद्‌भव स्थिति संहार आहे.

धाता हें पद पूर्वीं हि येऊन गेलें आहे. म्हणून इथें धाता ऐवजीं अधाता असा पाठ कल्पितां येण्यासारखा आहे आणि शंकराचार्यांनीं तो तसा कल्पिला हि आहे. परंतु आनुपूर्वी लक्षांत घेतां धाता हाच पाठ समीचीन वाटतो. तथापि अधाता पदाची हि उपपत्ति बसवतां येण्यासारखी आहेच. सूर्य किरणांवर मृगजळाचा भास होत असला तरी तें अज्ञानकार्य आहे. तो द्रष्ट्याचा दृग्भ्रम आहे. वस्तुतः सूर्यकिरणें त्या आभासाला ना जन्म देत, ना त्याचें धारण करीत, ना त्याचा संहार करीत असतात. तसा परमात्मा हि या विश्वाभासाचा ना आधार ना संहार होय. म्हणून तो अधाता.

## ९५२. पुष्पहास

पुष्पाणि एव हासः यस्य सः पुष्पहासः। पुष्पें हींच ज्याचें हास्य होत तो म्हणावयाचा पुष्पहास. पुष्पहास हा शब्द चंद्रहास शब्दासारखा आहे, पण त्याचा विग्रह चंद्र इव हासः यस्य सः, असा होईल. हा उपमानपूर्वपद बहुव्रीहि झाला. पुष्पहास हा अवधारण पूर्वपद बहुव्रीहि आहे.

हें विश्व म्हणजे परमात्म्याची मूर्ति होय, परमात्म्याचें शरीर होय. देहवान् जसा हसतो रुसतो, तसा हा विश्वरूप परमात्मा हि हसत रुसत आहे. त्याचें हास्य कुठें दिसतें? कवि तें पुष्पांत पाहतो. पुष्पें म्हणजे त्या परमात्म्याचें हास्य होय. हसणारा जीव आपली प्रसन्नता प्रगट करीत असतो आणि सभोंवती ती पसरीत असतो, पेरीत असतो. फुललेली वाटिका पाहून खिन्न मन प्रसन्न होतें. तें निर्मल होतें. उज्जवल होतें सुंदर होतें. तें सुखावतें व सुख देऊं लागतें. अशा रीतीनें बाहेरची फुलबाग अंतरांत फुलते आणि आजूबाजूला हि अशा फुलबागा फुलवूं लागते. कारंज्यांतून ज्याप्रमाणें संतत तुषारवृष्टि होत राहते त्याप्रमाणें पुष्पांतून निरंतर श्रीवृष्टि होत राहते. शौच सौरभ सौन्दर्य सौख्य यांचा अजस्र स्रोत म्हणजे पुष्प होय. तें मनाला सुखवितें म्हणून तें सुमन म्हटलें जातें. सु-मनच सुखवतें, दुर्मन दुखवतें. म्हणून सुमनाची लागवड हाच मानव-धर्म.

विश्वरूप परमात्म्याचें हास्य पुष्पांत, भ्रूभंग विजांत, क्रोध प्रलयांत, भूक अग्नींत, करुणा नदींत, क्षमा पृथ्वींत, स्थैर्य पर्वतांत, गांभीर्य समुद्रांत, ज्ञान गुरूंत, वात्सल्य गाईंत, त्याग वृक्षांत, सत्ता सत्यांत आणि मत्ता सर्वत्र प्रकट आहे.

## ९५३. प्रजागर

प्रकर्षेण जागर्ति इति प्रजागरः। प्रकृष्ट म्हणजे निरवकाश आणि जागर म्हणजे जागरण वा जागृति. अर्थात् प्रजागर म्हणजे परम जागरूक. परमात्मा हा जाग्रत् स्वप्न सुषुप्ति या अवस्थात्रयाहून भिन्न आहे. अवस्था ह्या येतात जातात. त्या अनित्य आहेत आणि परमात्मा तर नित्य आहे. त्यामुळें कोणती हि अवस्था तो असूं शकत नाहीं. परंतु आम्हांला या अवस्थांहून भिन्न वस्तूची जाणीव नाहीं. त्यामुळें आम्ही त्यांच्याच पैकीं एकीच्या सादृश्यानें परमात्म्याला जागृति-स्वरूप म्हणतों. जागृतींत स्मृति आहे, जाणीव आहे, स्वप्नांत हि ती आहेच पण विकृत आहे, विसंगत आहे. सुषुप्तींत ती नाहींशीच आहे. आत्मा हा स्वयं ज्ञानस्वरूप असल्यामुळें कोणत्याहि अवस्थेंत केवळ अज्ञान वा विस्मृति असूं शकत नाहीं. ज्ञान वा स्मृति न्यूनाधिक उपहित असते. सुषुप्तींत ज्ञान तमसावृत, स्वप्नांत रजसावृत आणि जागृतींत तें सत्त्वावृत असतें. सत्त्वांतच आत्मप्रकाश अधिक स्थिर व

स्वच्छ असतो. म्हणून ती अवस्था, ती उपाधि आत्म्याला अधिक जवळची म्हणावयाची. म्हणून त्याला जागर म्हणावयाचें. परंतु आत्म्याची स्थिति ही अवस्था-निरपेक्ष अशी केवलस्वरूपाची आहे. ती अवस्थांप्रमाणें गतागतकारी नाहीं, अखंडमंडलाकार आहे. ही नित्यनिरन्तरता आणि ज्ञानरूपता प्रजागर पद प्रकट करतें. एकादशीला शिवरात्रीला जागर करण्याचा प्रघात आहे. त्याला हरिजागर वा शिवजागर म्हणतात. तो जागर म्हणजे प्रजागराचा अभ्यासच होय. शेवटीं आम्हांला प्रजागर पद प्राप्त करून घ्यावयाचें आहे. प्रकाश-प्रवृत्ति-मोहरूप गुण-कर्मांचा नि गुणांचा अत्यय करूनच तें निस्त्रैगुण्यपद, ती तुरीय स्थिति वा ती गणेशचतुर्थी साधतां येईल.

## ९५४. ऊर्ध्वग

ऊर्ध्वं गच्छति इति ऊर्ध्वगः। परमात्मा हा गुणातीत असल्यामुळें तो ऊर्ध्वग होय. दुधांत वा पाण्यांत लोणी जसें आपल्या विजातीयत्वामुळें सदैव वर राहतें, त्याप्रमाणें परमात्मा हा विश्वाचा विजातीय असून तो सदैव त्याच्यावर विराजमान आहे. पाणी आणि लोणी दोन भिन्न राशि विजातीय वस्तु होत. पाण्यांत लोणी मिसळत नाहीं. तें वेगळेंच राहतें आणि पाण्यावर तरंगतें. तसा परमात्मा हा या गुणकार्यरूप प्रपंचापासून अगदीं भिन्न असून तो त्यांत मिसळत नाहीं. तो उसळतो. त्यामुळें तो ऊर्ध्वग होय. ऊर्ध्वगमन हा आत्म्याचा स्वभावच आहे. "केला जरी पोत बळेंचि खालें। ज्वाला तरी ते वरती उफाळे" ऊर्ध्वज्वलन हा अग्नीचा धर्म आहे. मशाल उलटी केली तरी ज्वाला वरच उठणार. अंशी सूर्य वर आकाशांत स्थित आहे. त्याला भेटायला अंशरूप ज्वाला वर उठतात. परमात्मा हि तसा या विश्व-प्रपंचापासून वर आहे. त्याला भेटायला सारे जीव धडपडत असतात. त्यामुळें तो अंशी परमात्मा तसे त्याचे अंशभूत जीवहि ऊर्ध्वग होत. परमात्मा सिद्ध आहे. जीव साधक आहे. ब्रह्म निष्ठारूप आहे, जीवन साधनरूप आहे, इतकेंच. गुणांचें बंधन असल्यामुळें जीव प्रकृतिपराधीनसा भासला तरी तो ऊर्ध्वमुख असतो, ऊर्ध्वगति असतो. पतंगाची झेप वरच असते, पण दोरा त्याला खालीं खेचीत असतो. तो त्याला उडून जाऊं देत नाहीं. तें बंधन तुटलें म्हणजे तो ऊर्ध्वग झाला. त्याची अधोगति संपली. आत्मा स्वभावतः ऊर्ध्वग आहे. तो उत्तरोत्तर वरवरच चढण्याचा प्रयत्न करीत राहतो. याला कोणती हि सीमा नाहीं. कारण सीमा दुःखरूप होईल म्हणून हा ऊर्ध्व आणि ऊर्ध्वतर गमन करीतच राहणार.

## ९५५. सत्पथाचार

सतः पथं आचरति इति सत्पथाचारः। जो सत्याच्या मार्गाचें अनुसरण करतो तो सत्पथाचार म्हणावयाचा. प्रजागर स्वरूप आदर्शाला पोंचायचें, त्या तुरीय पदाला पोंचायचें तर गुणांचा अतिक्रम करून त्या ऊर्ध्वगतीला लागलें पाहिजे. परंतु तें देहोपाधि जीवाला कसें जमणार? तो उत्तुंग आदर्श आहे देहनिरपेक्ष, आणि आम्ही आहों देहबद्ध. दोहोंतील हें महत् अंतर ज्या मार्गानें कमी करावयाचें त्याचें नांव आहे सत्पथ. परमात्म्याला पोंचायला पथ हि परमात्माच आहे. कारण सत्याला सत्यानेंच गांठतां येईल, असत्यानें केव्हांहि नाहीं. म्हणून सत्यस्वरूप परमात्म्याला गांठायचा मार्ग सत्पथ होय. आणि तो आचारणारा हा सत्पथाचार म्हणावयाचा. सारांश तो परमात्माच साध्य आहे. त्याचें साधन हि तोच आहे आणि साधनाचा अवलंब करणारा साधक हि तोच आहे. तो सत् आहे, तो सत्-पथ आहे आणि तोच सत्पथाचार आहे. त्या गुणातीत उत्तुंग आदर्शाला कसें पोंचायचें? ती ऊर्ध्वगति कशी लाभायची? कोणत्या क्रमानें हें साधायचें? हा सगळा

विचार गीतेच्या चौदाव्या अध्यायांत आला आहे. त्याचें सार हें कीं माणसानें तीन गुण व त्यांचीं कार्यें लक्षांत घ्यावीं. सत्त्व गुणाचें सेवन केल्यानें ऊर्ध्वगति लाभते, हें लक्षांत घेऊन देह आहे तोंवर सत्त्वस्थ होऊन रहावें. परंतु त्याबरोबर हें ओळखून असावें कीं आपण गुण आणि गुणकार्यें ह्यांहून वेगळे आहों. असा विवेक केला म्हणजे गुणांच्या बऱ्या वाईट कर्मांपासून, व त्यांच्या कर्मफलांपासून आपण मुक्त होतों. आणि हीच परम सिद्धि होय, गुणातीतता होय. ''निस्त्रैगुण्ये पथि विचारतां को विधिः को निषेधः'' असें म्हणून कोणी जर स्वैराचार करील तर तें मान्य नाहीं. कारण देह आहे तोंवर कोणी हि गुणातीत झाला असें मानतां येणार नाहीं. एवढ्याचसाठीं सोळाव्या अध्यायाशेवटीं स्पष्ट सूचना दिली आहे

**''यो शास्त्रविधिमुत्सृज्य वर्तते कामकारतः।**
**न स सिद्धिं अवाप्नोति न सुखं न परां गतिम्।।**

## ९५६. प्राणद

प्राणद हें नाम वारंवार आलें आहे. प्राण्याला प्राणाचें महत्त्व किती आहे तेंच त्यावरून दिसून येतें. प्राण हेंच मुख्य अन्न आहे. त्यावरच सर्व जीव जगतात. जीव हे जें कांहीं आहरतात तें सर्व प्राणरूपच आहे. श्वास हा उघडच प्राणरूप आहे. पाणी म्हणजे दोन भाग उद्‌वायु व एक भाग प्राणवायु आहे. अर्थात् पाणी हें प्राणरूपच होय. आणि धान्यादि सर्व अन्नें हि प्राणरूपच होत; कारण तीं सर्व जठराच्या भट्टींत जळणारीं असून कर्बप्रधान आहेत. अशा प्रकारें जीवमात्राचा सर्व आहार हा प्राणरूपच होय. मन प्राण उदक आणि अन्न हीं उत्तरोत्तर स्थूल अन्नें होत. परमात्माच प्राण उदक अन्न आणि तत्पुष्ट मन या चतुर्विध आहाराचा दाता आहे. म्हणून तो चार वेळां प्राणद म्हटला आहे. आकाशकल्प परमात्म्याच्या ठाईं वायुकल्प हें विश्व निहित आहे. वायूचें वीजन कोणाच्या प्रेरणेनें सुरूं होतें? तें चेतन परमात्म्याच्या प्रेरणेनेंच होतें. म्हणून तो परमात्माच प्राणद होय.

वायूची हालचाल मेघमाला घेऊन येते तशी अग्निज्वाला हि घेऊन येते, विजा हि घेऊन येते. म्हणून परमात्मा हा प्राण देणारा तसा हरण करणारा हि म्हटला जातो. 'प्राणान् द्यति खण्डयति इति प्राणदः' असा त्याचा व्युत्पाद होईल. सर्व कर्तृत्व चेतनाचें आहे. अचेतनाला स्वातंत्र्य नाहीं. अचेतन परतंत्र म्हणजे परमात्माधीनच राहूं शकतें. आणि म्हणून तो प्राणद म्हणजे प्राण देणारा तसा प्राण हरणारा हि आहे. सारांश सर्वच जीवन जन्म, स्थिति आणि संहार परमात्माधीन आहे म्हणून कोणत्याहि प्रकारें पाहिलें तरी तो परमात्मा प्राणद च होय. तो देही जीवा च्या ठाईं प्राणसंचार करून त्याला जन्मास घालतो. अन्नोदक देऊन पोसतो आणि तें अन्न क्षीण करून त्याचा संहार करतो.

## ९५७. प्रणव

प्रणौति इति प्रणवः। प्रणव म्हणजे प्रकृष्ट नव. 'नु स्तुतौ' पासून नव शब्द आला आहे. आणि त्याचा अर्थ स्तव असा होतो. अर्थात् प्रणव म्हणजे प्रकृष्ट स्तव, सर्वोत्तम नाम. ॐ हें परमात्म्याचें सर्वोत्तम नाम होय. म्हणून त्यालाच प्रणव असें म्हणतात. सर्वोत्तम **स्तव म्हणजे** तो स्तव कीं ज्यांत परमात्म्याचें निःसंशय आणि समग्र वर्णन आलें आहे. अर्थात् यथार्थ वर्णन. पण हें कसें शक्य आहे? बुद्धिमंतांना सर्व कांहीं शक्य आहे. सर्व ज्ञान म्हणजे वेद वाङ्मय आहेत. वाक् वर्णमय आहे. आणि त्या वर्णांचा संक्षेप आहे अ उ म. अ कंठ्य, उ ओष्ठ्य आणि म नासिक्य आहे. आणि या तीनच सर्व वर्णांच्या परिसीमा होत. म्हणून अउम चा समाहार असलेला ॐकार हा सर्वज्ञानाचा समाहार झाला आणि म्हणून तोच प्रणव म्हणजे प्रकृष्ट स्तुति, सर्वोत्तम नाम म्हटला गेला. ॐकार हा एकाक्षर ब्रह्म होय, एकाक्षर वेद होय. यालाच अक्षर ब्रह्म म्हणतात. अक्षर म्हणजे अक्षररूप आणि क्षर नसलेलें. तसेंच ब्रह्म म्हणजे वेद आणि परब्रह्म. अशा दुहेरी श्लिष्ट अर्थानें अक्षर ब्रह्म हा शब्द योजिला

आणि म्हणून तो प्रणव म्हणजे सर्वोत्तम स्तुति आणि सर्वोत्तम स्तुत्य होय. असा हा प्रणव म्हटलेला ॐ साक्षात् परब्रह्म आहे. त्यालाच कवींनीं नि मूर्तिकारांनीं गणेश बनविलें आहे. त्याचा महिमा गायला वेद नि उपनिषदें सरसावलीं आहेत. वेदारंभीं तो उच्चारिला जातो. पूजारंभीं तो पूजिला जातो. मांडुक्य हें संपूर्ण उपनिषद् त्याचेंच व्याख्यान करतें. असा हा प्रणव सर्वोत्तम होय. विष्णुसहस्रनामाचा हि आरंभ ॐ म्हणूनच झाला आहे, जरी वैष्णवांनीं हरि: ॐ असा नवा शब्दप्रयोग रूढविला आहे.

महिम्नांत त्याचा महिमा असा गाइला आहे :

**त्रयीं तिस्रो वृत्तीस् त्रिभुवनम् अथो त्रीन् अपि सुरान्**
**अकाराद्यैर् वर्णैस् त्रिभिर् अभिदधत् तीर्णविकृति।**
**तुरीयं ते धाम ध्वनिभिर् अवरुन्धानम् अणुभिस्**
**समस्तं व्यस्तं त्वां शरणद गृणात्योमिति पदम्।।**

## ९५८. पण

पणति मूल्ये व्यवहारं करोति इति पण:। बदल्यांत देवघेव करतो तो म्हणावयाचा पण. अर्थात् 'पण' म्हणजे सौदागर, व्यापारी, दुकानदार, गिऱ्हाइक. 'आपण' म्हणजे बाजारओळ, 'पण्य' म्हणजे देवघेवीची खरेदीविक्रीची वस्तु, सौदा. 'पण्' धातूचींच हीं कृदन्तें. मानव आणि पशु यांच्यात अनेक भेद आहेत. त्यांत 'पणन' हा हि एक आहे. मानव- समाजांत पणन आहे, पशुपक्ष्यादिकांत हा प्रकार नाहीं. पणन जर वगळलें तर मानव-समाज परत पशुदशेला पोचायला वेळ लागायचा नाहीं. पणन हा असा मानव-समाजाचा विशेष आहे. मानवाचें समाजीकरण त्यामुळेंच झालें आहे. तें जर वगळलें तर मानवाचें जीवन संकोच पावून तो एक द्विपाद पशु होईल. जीवन अनन्त आहे आणि त्याचा विकास हि अनन्त आहे. परंतु कोणत्याहि एका देहांत तें सामग्र्यानें एकवटणें शक्य नाहीं. त्यामुळें भिन्न भिन्न क्षमतेच्या व्यक्तींना परस्परांशीं सहकार करावाच लागतो. या सहकाराचें स्वरूपच देवाणघेवाण होय. देवाणघेवाण सोनें नाणें, चीजवस्तु या वस्तूंची, श्रम कौशल्य या क्रिया-गुणांची अथवा वात्सल्य, प्रणय, मैत्री इत्यादि कोमल भावनांची असेल. पण देवाणघेवाणीशिवाय सहकार नाहीं. आम्ही कुत्र्याला पाळतों कारण तो आम्हांला सोबत रक्षण आणि भक्ति देत असतो. हें पणनच आहे. अशा प्रकारें जीव परस्परांशीं देवघेवीचा व्यवहार करून जगत असतात. हा जो जीवांच्या जीवनाचा स्थायी भाव तोच पण होय. मी कोणाला कांहीं देणार नाहीं आणि कोणापासून कांहीं घेणार नाहीं, असें म्हणणें म्हणजे व्यवहारच खुंटला; आणि त्याबरोबरच जीवन हि. मी विश्वांतून मुक्त दान घेऊनच जन्माला आलों, तें घेऊनच जगत आहें आणि तसेंच मुक्त दान करीत जाणें हा माझा धर्म आहे. तो मी सोडणें म्हणजे मी आपल्याला विश्वाला सोडचिठ्ठी देण्यासारखेंच आहे.

## ९५९. प्रमाण

प्रमाणं प्राणनिलय: प्राणभृत् प्राणजीवन:। हा 'प्र' चापाठ आहे, अथवा प्राणाचा पाठ आहे म्हणा. पुढील श्लोकार्थ तत्त्वाचा पाठ आहे, असें म्हणतां येईल. जगांत म्हणा वा जीवनांत म्हणा, दोनच तत्त्वें आढळून येतात. एक क्रियाशील, दुसरें अक्रिय. क्रियाशील म्हणजे सतत हालचाल करणारें तत्त्व प्राण. आणि अक्रिय म्हणजे केवळ साक्षिरूप आत्मतत्त्व. पहिल्या श्लोकार्धांत प्राणाचें महिमान तर दुसऱ्यांत द्रष्ट्याचें महिमान गाइलें आहे. इतर पदें आनुषंगिक असून त्यांचा अर्थ प्रकरणानुरोधानें घ्यावयाचा.

प्रमाण म्हणजे प्रमेयाचें ज्ञान करून देणारें साधन. प्रमेय कोणतें? परब्रह्म हें प्रमेय होय. कारण अन्तिम सत्य तेंच आहे. त्या निर्गुण निराकाराचा साक्षात्कार वा अनुभव कशानें होतो? तो होतो अन्तरात्म्याच्या वा प्रत्यगात्म्याच्या द्वारा. संस्फुरत् संविद्रूप म्हणून स्वात्माच प्रमाण होय. ज्ञानदेवानें म्हटलेंच आहे–

''ज्ञानदेवा प्रमाण आत्मा हा निधान'' सर्व अनुभव आत्म्याच्याच द्वारा येत असल्यामुळें आत्मतत्त्वच प्रमाण होय. हाच विचार गीतेंत ''ब्रह्मणो हि प्रतिष्ठाहं अमृतस्याव्ययस्य च। शाश्वतस्य च धर्मस्य सुखस्यैकान्तिकस्य च।। या श्लोकांत आला आहे. निजात्माच परमात्म्याची उपलब्धि करून घेतो. म्हणून तोच ब्रह्माची प्रतिष्ठा होय, आधार होय. अमृत म्हणजे मोक्ष. त्याचा हि आधार तोच होय. कारण मोक्षप्राप्ति त्यालाच व्हायची आहे. तो नसेल तर ज्ञान आणि तत्फलित मोक्ष लाभणार कोणाला? प्रेम आणि तद्जनित सायुज्य वा ऐक्य अथवा जीवाशिवाची भेट याचा हि आधार आत्मा च आहे. निजात्मा नसेल तर कुणाची भक्ति आणि कुणाची नामरूप-विभक्ति? स्वरूपभूत आत्मा हा आपला आधार असून तो पररूपभूत परमात्म्याचा वा परब्रह्माचा आधार आहे. प्रथम पुरुष 'तो', मध्यम पुरुष 'तू', यांचा हि आधार 'मी' च होय. म्हणून च तो उत्तम पुरुष म्हणावयाचा आणि म्हणून च तो प्रमाण.

## ९६०. प्राण-निलय

विश्वाची घडामोड करणारा प्राण होय. तोच विश्वकर्मा आहे. विश्वाची उत्पत्ति स्थिति आणि लय तोच करतो. पण प्राण हें कांहीं अन्तिम तत्त्व नाहीं. कारण तें सक्रिय आहे. अन्तिम तत्त्व आहे अक्रिय. त्या अकाशकल्प अक्रिय ब्रह्माच्या ठाईं हें सक्रिय प्राणतत्त्व निहित आहे. म्हणून त्या ब्रह्माला, त्या परमात्म्याला म्हणावयाचें प्राणनिलय. निलीयते अस्मिन् इति निलयः। प्राणस्य प्राणानां वा निलयः प्राणनिलयः। प्राणाच्या हालचालीबरोबर जीवन प्रकट होतें. जन्मतांच मूल रडलें नाहीं, त्यानें कांहीं हालचाल केली नाहीं, तर तें मृतजात (Still born) मानलें जातें. प्राणाची हालचाल थांबली, नाडी बंद पडली म्हणजे प्राणी मेला असें समजलें जातें. मरणाऱ्याच्या नाकासमोर सूत धरतात. प्राणापानाच्या गतीनें तें हलत राहतें. तें हलणें थांबलें कीं प्राण शांत झाला असें मानलें जातें. हाच मृत्यु. जिजीविषा सोडून प्राण जेव्हां स्वेच्छेनें निरोधून आत्म्याच्या ठाईं विलीन केले जातात तेव्हां त्या प्राणशांतीला समाधि असें म्हणतात. जेव्हां जिजीविषा तर सुटलेली नसते पण वार्धक्यानें वा रोगानें प्राण-धारणाची क्षमताच उरत नाहीं म्हणून अनिच्छेनें प्राणत्याग करावा लागतो तेव्हां त्याला मृत्यु म्हणतात. जेव्हां एखादा ब्राह्मण वा श्रमण कृतकृत्य झाल्यामुळें वा होण्यासाठीं प्रायोपवेशन करून वा पूर्ण जीवन जगून प्राणत्याग करतो तेव्हां त्याला निर्वाण वा धीरगति म्हणावयाचें. जेव्हां एखादा क्षत्रिय धर्मयुद्धांत लढतां लढतां धारातीर्थी देह ठेवतो तेव्हां ती वीरगति म्हणावयाची. जेव्हां एखाद्या जिजीविषूचें बलानें वा छलानें प्राण-हरण केलें जातें तेव्हां त्याला हत्या म्हणतात. जेव्हां एखादा मनुष्य जिजीविषा असून हि हताश होऊन मोहावेशांत स्वतःच जीव देतो तेव्हां त्याला आत्महत्या म्हणतात. जिजीविषा असून जगण्याची क्षमता नाहीं, मुमूर्षा करून हि मृत्यु लवकर येत नाहीं. आत्महत्या करण्याचें बल नाहीं. अशा जीवाला गाय, बैल, वासरूं यांना तत्काळ ठार मारून यातना-मुक्ति देणें हा हत्यापराध नसून हत्योपकार आहे. या सर्व प्राणगतिच होत आणि त्या सर्व परमात्म्याच्या ठाईं संपतात म्हणून तो प्राण-निलय.

## ९६१. प्राणभृत्

प्राणान् बिभर्ति इति प्राणभृत्। तो प्राणांचें धारण करतो तो प्राणभृत् म्हणावयाचा. परमात्मा हा प्राणांचा निलय आहे. जल-प्रवाह जसे समुद्रांत तसें सर्व प्राण-प्रवाह परमात्म्यांत अस्तंगत होतात. पण तो नुसताच प्राण-निलय नाहीं. तो प्राणांचा उद्गम हि आहे. सर्व प्राण-प्रवाह त्याच्यापासूनच उगम पावतात तिथूनच त्यांना पुरवठा होत राहतो. म्हणून तो म्हटला आहे प्राणभृत्. अक्रिय आकाशाच्या अंकावर सक्रिय प्राणाची चळवळ चाललेली असते. अनन्तपार आकाशांत कुठल्या कोपऱ्यांत जिरून निःस्पंद झालेला वायु स्वभावतः प्रेरित होऊन परत वाहूं लागतो, परत

उसळी मारतो. त्याच्या ह्या उसळीला आधार तो आकाशकल्प अविचल परमात्मा आहे. म्हणून तो प्राणभृत् म्हटला आहे. त्या परमात्म्याच्या धक्क्यापासूनच सगळ्या प्राण-नौका जीवनाच्या सागरांत सुटतात. सर्व जलप्रवाह शेवटीं समुद्रांत विलीन होतात म्हणून समुद्र हा जलनिलय होय, सर्व जलप्रवाह मूलत: समुद्रांतूनच उगम पावलेले असतात. म्हणून समुद्र हा जलभृत् होय. तद्वतच परमात्मा हा हि प्राणनिलय आणि प्राणभृत् आहे. परमात्मा हा प्राण-प्रवाहांचा उद्गम म्हणणे आदि आणि निलय म्हणजे अन्त आहे. एवढेंच नव्हे तर ह्या दोन अंतांच्या मध्यें प्रवाहरूपानें विद्यमान असणारा जो मध्य तो हि तोच आहे हें पुढील प्राणजीवन सांगत आहे. अशा प्रकारें ह्या त्रिपदीनें एक पूर्ण विचार इथें मांडला आहे. परमात्मा हाच सर्वतोपरी प्राणाधार आहे, प्राणसर्वस्व आहे–मग हा प्राण पिंडांतला घ्या कीं ब्रह्मांडांतला घ्या. ''केन प्राण: प्रथम: प्रैति युक्त:'' अशी उपनिषदें पृच्छा करतात आणि त्याचें उत्तर तो प्राणभृत् परमात्मा असें देतात.

## ९६२. प्राण-जीवन

प्राणस्य प्राणानां वा जीवन: प्राण-जीवन:। जो प्राणाचें जीवन आहे तो प्राणजीवन म्हणावयाचा. आम्ही प्राणानें जगतों. पण प्राण कशानें जगतो? त्याचा प्राण कोणता? जो तो प्राणांचा हि प्राण तोच प्राणजीवन होय. आम्ही प्राणी हि वस्तुत: त्याच्याच आधारें प्राणधारण करीत असतों–जगत असतों, प्राणाच्या आधारें नव्हे. परंतु चर्मदृष्टीला तर प्राणच दिसत असतो, तो प्राणांचा प्राण दिसत नाहीं. तो जो न दिसणारा प्राणांचा प्राण त्यालाच प्राण-जीवन म्हटलें आहे:

**न प्राणेन नापानेन मर्त्यो जीवति कश्चन।**
**इतरेण तु जीवन्ति यस्मिन्नेतौ उपाश्रितौ।।**

मर्त्य प्राणी प्राणापानाच्या योगें नाहीं जगत. वेगळ्याच कुठल्यातरी तत्त्वाच्या आधारें तो जगत असतो. त्याच तत्त्वाला प्राणापान दोन्ही जुंपलेले असतात. तें जें मुलखावेगळें आत्मतत्त्व तेंच प्राणजीवन होय. तुकारामानें त्यालाच ''जीवाचें जीवन अमृताची तनु। ब्रह्माण्डभूषणु नारायण'' म्हणून आळविलें आहे. पिण्डब्रह्माण्डाचे सर्व व्यापार प्राणाधीन आहेत. मनोवाक्‌कायकर्मे प्राणबलानेंच चालतात. प्राण क्षीण झाले तर देह काम करूं शकत नाहीं. इन्द्रियांची शक्ति क्षीण होते. वाणी हि क्षीण होते. बोलणें मन्द आणि बन्द पडतें. मनोव्यापार हि क्षीण आणि क्षीणतर होऊन मोहाचें म्हणजे अचेतनतेचें साम्राज्य पसरतें. अशा अवस्थेंत प्राणोत्क्रमण झाल्यास जीव दुर्गतीस जातो. म्हणून योगी जीवनभर प्राणोपासना करतात. आणि प्रयाणकालीं प्राणनिरोध करून केवल अक्रिय व साक्षिरूप प्राणजीवनास प्राप्त होतात. ''भ्रुवोर् मध्ये प्राणमावेश्य सम्यक् स तं परं पुरुषमुपैति दिव्यम्।''

## ९६३. तत्त्व

प्राण हें सगुण सक्रिय तत्त्व आहे तर चित् हें निर्गुण निष्क्रिय तत्त्व आहे. इथें तत्त्व या पदानें हें चित्तत्त्वच अभिप्रेत आहे. मागील श्लोकार्धांत सगुणाचा, प्राणाचा, महिमा गाइला आहे, तर इथें तत्त्वाचा म्हणजे निर्गुणाचा गाइला आहे. जें हें नव्हे तें तें होय. तें चा भाव तो तत्त्व म्हणावयाचा. इन्द्रियांना वाणीला मनाला जें गोचर आहे, तें हें म्हटलें जातें. जें हें नव्हे तें 'तें' होय, तें म्हटलें जातें तें तेंच राहतें. कारण तें ह्या गोचराच्या आवरणामागें दडलेलें आहे. ऋषि त्याच्या दर्शनासाठीं प्रार्थना करतात: ''हिण्मयेन पात्रेण सत्यस्यापिहितं मुखम्। तत् त्वं पूषन् अपावृणु सत्यधर्माय दृष्टये।।'' हे प्राण-पोषक परमात्म्या! आम्हा सत्यशोधकांना सत्याचें दर्शन करव. तें निर्मोह सत्य या असत्य जगाच्या मोहक आवरणानें झांकलेलें आहे. तें इन्द्रियांना भुरळ पाडणारें विषयांचें आवरण बाजूला सारून आम्हांला त्या अंतरतर निर्गुण निष्क्रिय निराकाराचें मुख पाहूं

दे. हें तत्त्वदर्शन वा आत्मदर्शन केव्हां होतें? गीतेनें तें एका श्लोकांत स्पष्ट विवरिलें आहे

बाह्यस्पर्शेष्वसक्तात्मा विन्दत्यात्मनि यत् सुखम्।
स ब्रह्मयोगयुक्तात्मा सुखमक्षयमश्नुते॥

जोंवर देह आहे तोंवर बाह्य विषय-स्पर्श होतच राहणार. पण त्यांत शरीरानें यावदर्थ व्यवहार करून जो मनानें असक्त राहतो त्याला आत्मसुखाचा आस्वाद म्हणजे मधून मधून अनुभव होत राहतो. तोच जेव्हां विदेह होतो म्हणजे प्रारब्धक्षयानें त्याचा देह गळून पडतो तेव्हां मात्र तो ब्रह्माचा योग झाल्या कारणानें निरन्तर आत्मसुख भोगीत राहतो. अर्थात् देहाचा संबंध संपल्याकारणानें त्याच्या आत्मसुखांत अंतरायच उरत नाहीं. तें अक्षय होतें. जो सत्‌चित्-सुखरूप अकृत सहज भाव तोच तत्‌त्व होय. तोच परमात्मा.

## ९६४. तत्त्ववित्

तत्त्वं वेत्ति इति तत्त्ववित्। जो तत्त्व जाणतो तो तत्त्वविद् म्हणावयाचा. परमात्माच तत्त्व आहे. आणि तोच तत्त्वविद् आहे. कारण तो स्वसंवेद्य आहे. तो विषय नाहीं, विषयी आहे, जें जें ज्ञान विषयभूत होऊन जाणलें जातें तें सगळें क्षेत्र होय. पण तो क्षेत्रज्ञ आहे. आमचें सगळें ज्ञान क्षेत्र-क्षेत्रज्ञ-विभागानेंच होतें. जिथें असा विभाग होत नाहीं तिथें ज्ञान संभवत नाहीं. आत्मतत्त्व हें क्षेत्रज्ञ असल्यामुळें त्याचें ज्ञान होऊं शकत नाहीं. "विज्ञातारं अरे केन विजानीयात्" जो स्वत:च जाणारा आहे, त्याला कसें जाणणार? कशानें जाणणार? त्याला जाणणें शक्य नाहीं, पण त्याला आपली संवेदना मात्र होते, उपलब्धि मात्र होते. म्हणून त्याला संवित् म्हणतात. दगडाला ज्ञान नाहीं. कारण त्याला संवेदन नाहीं. ज्याला संवेदन आहे तेंच तत्त्व होय. आणि तेंच स्वत:ला अनुभवूं शकत असल्यामुळें, स्वोपलब्धि करूं शकत असल्यामुळें तेंच तत्त्ववित् होय. त्यालाच विषयज्ञान हि होऊं शकतें. म्हणून तेंच क्षेत्रज्ञ हि होय. गीतेंत ह्यालाच अनुलक्षून म्हटलें आहे: "न हि ते भगवन् व्यक्तिं विदुर् देवा न दानवा:। स्वयमेवात्मनात्मानं वेत्थ त्वं पुरुषोत्तम॥" तसेंच "वेत्तासि वेद्यं च" म्हणून हि म्हटलें आहे. सारांश, जगांत सर्वत्र क्षेत्र आणि क्षेत्रज्ञ असा विभाग आहे. क्षेत्र हें क्षेत्रज्ञ होऊं शकत नाहीं आणि क्षेत्रज्ञ क्षेत्र होऊं शकत नाहीं. मात्र क्षेत्रज्ञाला आपली जाणीव असते. किंबहुना आपली जाणीव असणें हेंच, त्याचें स्वरूप होय. त्याच्याच आधारें त्याला क्षेत्राचें हि ज्ञान होत असतें. हें सगळें तत्त्व होय आणि हें जो स्वच्छ जाणतो तो तत्त्ववित् म्हणावयाचा. ज्या ज्ञानाचा विषय आणि विषयी अभिन्न असतात तें आत्मज्ञान होय. आणि तें ज्याला झालें तोच आत्मवित् होय आणि तोच तत्त्ववित्.

## ९६५. एकात्मा

एकश्च असौ आत्माच इति एकात्मा। जो एक असून आत्मा आहे तो एकात्मा म्हणावयाचा. एकात्मा म्हणजे एकरूप आत्मा. सुवर्णाचे नाना अलंकार घडवले जातात पण त्यांची सुवर्णात्मता एकरूपच राहते. तींत कुठला हि बदल होत नाहीं. तिचेंच नांव एकात्मता होय. हें विश्व-वैचित्र्य हि तसेंच एकात्म आहे. हा सगळा विश्वाकार चिदात्मक आहे. ज्ञानदेवानें विश्ववैचित्र्याची एकात्मता सुवर्णालंकाराच्या दृष्टान्तानेंच विवरिली आहे.

विश्वालंकाराचे विसुरे। जऱ्ही आहाति नाना आकारें। तऱ्ही घडिले एकें चि भांगारें। परब्रह्में॥

उपनिषदें पंचमहाभूतांच्या दृष्टांतांनीं तेंच ऐकात्म्य विवरितात. इथें त्यांपैकीं अग्नीचा दृष्टांत दिला आहे. "अग्निर् यथैको भुवनं प्रविष्टो रूपं रूपं प्रतिरूपो बहिश्च। एकस् तथा सर्वभूतान्तरात्मा रूपं रूपं

प्रतिरूपो बभूव।।'' ठिणगी दिवा वीज वा सूर्य सर्व एकाच तेजाची विविध रूपें होत. तसें हें उच्चावच सर्व विश्व एक आत्मरूप आहे. वेदोपनिषदांत गीतेंत एकत्वावर भर दिला आहे:

(१) एकं सद् विप्रा बहुधा वदन्ति। – वेद्

(२) तत्र को मोहः कः शोकः
एकत्वं अनुपश्यतः। –उपनिषत्

(३) भजत्येकत्वमास्थितः। – गीता

पण शंकराचार्य एकत्वाऐवजीं अद्वैत हा शब्द अधिक पसंत करतात. त्यांत त्यांचा हेतु आहे. जग भिन्नात्मक दिसत आहे. त्याचा इन्कार करतां येत नाहीं, मडकें नि माती एक म्हणतां येत नाहीं. मडकें नि माती एकच असल्यास 'आमची माती आम्हांला द्या व आपलें मडकें खुशाल घेऊन जा' असें मृद्वादी म्हणूं शकेल. उलट घटवादी हि म्हणूं शकेल 'ही घ्या आपली माती नि भरा पाणी.' दोन्ही प्रकारें अनवस्था प्रसंग ओढवेल म्हणून जगद्ब्रह्म संबंध हा अद्वैतरूप आहे. जग एक नाहीं, एकात्म आहे.

## ९६६. जन्ममृत्युजरातिग

जन्ममृत्युजरादि-षड्भावविकारान् अतिगच्छति इति जन्ममृत्युजरातिगः। जन्म मृत्यु जरादि पदार्थांच्या सहा विकृतींना वा अवस्थांना उल्लंघून जातो तो म्हणावयाचा जन्म-मृत्यु-जरातिग. आत्मतत्त्व हें अनात्म-धर्मांत कुठेंच सांपडत नाहीं. ''जायते अस्ति वर्धते विपरिणमते अपक्षीयते म्रियते वा नश्यति'' हे आहेत भावांचे म्हणजे वस्तुमात्राचे षड् विकार. त्यांत तो कुठेंच सांपडत नाहीं. तो आधीं जन्मतच नाहीं. म्हणून त्याला जन्माबरोबर येणारी विकाररूप अनर्थ-परंपरा हि बाधत नाहीं. जो जन्मतो त्याला नामरूपात्मक अस्तित्व संभवतें. ज्याला अस्तित्व आहे त्याचीच वाढ होते. सशाचें शिंग वाढत नाहीं. तें विपरिणाम पावत नाहीं म्हणजे भुऱ्याचें काळें इत्यादि होत नाहीं. तें अपक्षय पावत नाहीं. जशी त्याची वाढ होत नाहीं तशी झीज ही होत नाहीं आणि शेवटीं तें नाहींसें हि होत नाहीं. असे हे पदार्थमात्राचे षड्विकार, हे सहा अनात्मधर्म आत्मतत्त्वाला संभवत नाहींत म्हणून तें म्हणावयाचें जन्ममृत्युजरातिग. इथें या पदांत जन्म हा आदि विकार मृत्यु हा अन्त्य विकार आणि जरा हा आद्यन्तांमधील सर्व विकारांचा वाचक विकार समजावयाचा आहे. तसा जरा हा प्रकार म्हणजे विपरिणाम व अपक्षय हे दोन विकार एकत्र होत. जरेंत काळे केस पांढरे होतात. जीवनशक्ति क्षीण होते. पदार्थांचे हे सहा विकार स्पष्ट स्वतंत्र आहेत आणि ते क्रमिक आहेत. एकाचा दुसऱ्यांत समावेश होत नाहीं आणि पूर्वपूर्वांवांचून उत्तरोत्तर संभवत नाहीं. जन्मावांचून अस्तित्व नाहीं. अस्तित्वावांचून वृद्धि नाहीं इत्यादि. जन्ममृत्यु स्पष्ट दिसतात. मधल्या अवस्था केव्हां केव्हां दिसत हि नाहींत. त्या सूक्ष्म आणि त्वरित होऊं शकतात. मृतजात वा बालमृत व्यक्तीच्या बाबतींत मधल्या अवस्था दिसत नाहींत पण त्या होऊन गेलेल्या असतात. अध्याहृत असतात.

## ९६७. भूर्-भुवस्-स्वस्-तरु (१)

भूर्लोक भुवर्लोक आणि स्वर्लोक या त्रिकांडांचा मिळून बनलेला जो तरु तो म्हणावयाचा भूर्भुवःस्वस्-तरु. वृक्षाचे तीन मुख्य अवयव म्हणजे मूळ, बुंधा आणि शाखा-पत्र-फळादि विस्तार होय. संसाराला गीतेनें अश्वत्थवृक्षाची उपमा दिली आहे. वृक्ष हा खुडला तोडला तरीं तो पुनः पुनः वाढतो. कारण तो सुविरूढमूल असतो. त्याचीं मुळें खोल रुजलेलीं असतात. तीं मूळेंच तोडलीं पाहिजेत, उपटून टाकलीं पाहिजेत. तेव्हांच तो निर्मूळ होतो, त्याचा बीमोड करायचा तर त्याचीं सगळीं फळें जाळून टाकलीं पाहिजेत. गीतेचें तत्त्वज्ञान हेंच:

**कामनारूप मूळें उपटून टाका, फळवासनारूप बीजें जाळून टाका, सकाम कर्मे करूं नका. निष्काम कर्मे करून त्यांचीं फळें सोडून द्या. तीं ज्ञानाग्निदग्ध करा.**

शेती करायची म्हणजे खोडें खणून टाकावीं लागतात आणि तृणबीजें जाळून टाकावीं लागतात. कृष्ण-हलधर शेतकरीच होते. त्यांनीं आपली धंद्याची भाषा तत्त्वज्ञानांत वापरली आहे. आणि म्हणून संसारावर वृक्षाचें रूपक केलें आहे. जीवाचा वासना-संसार हा वृक्ष आहे. वृक्ष हा वृश्च्य म्हणजे छेद्य आहे. परंतु हा परमात्म्याचा विश्वकदंब तरु आहे. तरु म्हणजे तरणसाधन. तरु पाण्यांत तरतो आणि तारतो. म्हणून तो तरु म्हटला आहे. परमात्म्याच्या सृष्टीचें चिंतन केल्यास तें तारक होतें. परमात्मा सृष्टीच्या द्वारेंच जीवाला रक्षण पोषण आणि शिक्षण देत आहे. त्यानें विवस्वानाला योग देऊन ठेवला. त्याच्या पासून तो मनूला म्हणजे आद्य विचारी मानवाला मिळाला. अशा प्रकारें तो विश्वतरु झाला आहे.

## ९६७. भूर्-भुवस्-स्वस्-तरु (२)

स्व:स्थ सूर्यापासून योग शिकायचा. तो आमचा योगविद्येचा गुरु. अनंत सृष्टीपैकीं सूर्यच कां? कारण आमची ही पृथ्वी सूर्यमालेंत आहे. सूर्यमालेचा गुरु तोच. तोच आम्हांला प्रत्यक्ष उपलब्ध आहे तो स्वर्लोकांत राहतो आणि आपल्या तेजानें आम्हांला प्रचोदित करतो. त्याचें तेज पिऊनच आमची ही पृथ्वी आणि तिच्यावरील जीव जगत आहेत. म्हणून म्हटलें आहे:

''सूर्य आत्मा जगतस् तस्थुषश् च'' सूर्य हा चर आणि अचर, स्थावर आणि जंगम, दोहोंचा हि आत्मा आहे. म्हणून आम्ही त्याचें ध्यान करतों. त्याच्या त्या तेजाचें पान करतों. ॐ। तत् सवितुर् वरेण्यं भर्गो देवस्य धीमहि। धियो यो नः प्रचोदयात्।। असें गान करतों. सूर्य जसा नैश तमावर मात करून उदित होतो त्याप्रमाणें अज्ञानावर मात करून आम्हांला उन्नत व्हावयाचें आहे. सर्व दुष्प्रवृत्तींवर नि दुर्वृत्तींवर आम्हांला विजय मिळवायचा आहे. यासाठीं आम्हांला सूर्याप्रमाणें अविरत कर्मयोग आचरला पाहिजे. देह आहे तोंवर कर्मत्याग करतांच येत नाहीं. तें कर्म आपल्या स्वाभाविक गुणांनीं नियत झालेंच असलें पाहिजे. तें नियत कर्म कष्ट भयानें टाळतां कामा नये, किंवा सुख-लोभानें कवटाळतां कामा नये. तर केवळ राग- द्वेषरहित वृत्तीनें करावयाचें. कर्म करण्यापूर्वी काम- संकल्प, करतांना राग-द्वेष आणि केल्यानंतर त्याच्या फळाची आकांक्षा असतां कामा नये. असें जो करतो तो कर्म करून कर्म-किल्मिषांतून मुक्त होतो. सूर्यानें शिकविलेला योग तो हाच.

## ९६७. भूर्-भुवस्-स्वस्-तरु (३)

हा योगोपदेष्टा सूर्य स्वर्गांत राहिला. त्याचा अंतरिक्षांतील अवतार म्हणजे विद्युर्गर्भ मेघ होत. ते विजांची आणि जलधारांची वृष्टि करून या पृथ्वीला सस्य-शालिनी व पुष्पमालिनी करतात. ते हि हें आपलें कर्म सूर्याप्रमाणेंच योगयुक्त होऊन करीत असतात.

**नापेक्षा न च दाक्षिण्यं न प्रीतिर् न च संगति:।**
**तथापि हरते तापं लोकानां उन्नतो घन:।।**

कारण तो त्यांचा स्वधर्म आहे. स्वधर्म हा केव्हांहि टाकावयाचा नसतो. तसें करणें अधर्म विधर्म वा परधर्म आचरणें होय. आणि तें भयावह आहे. भय आहे कर्मबन्धनाचें. जो स्वभाव-नियत कर्म निष्काम बुद्धीनें, रागद्वेषरहित वृत्तीनें आणि फलाशा न धरतां करीत नाहीं त्याला कर्माचें बरें वाईट फळ अवश्य चिकटतें आणि त्यायोगें तो संसारचक्रांत सांपडतो. त्याला कर्मफलभोगासाठीं स्वर्गनरकादि गति आणि पुनर्जन्म याची यातायात करावी लागते. आणि ही अशी यातायात म्हणजे नुसता क्लेश होय. हा मुक्तीचा मार्ग नव्हे. मुक्ति म्हणजे नैष्कर्म्य. त्याचा उपाय निष्काम स्वधर्माचरण च होय. तोच योग. तो

योगोपदेश सूर्यापासून, सूर्याच्या अन्तरिक्षगत विद्युद्रूप नि भूमिष्ठ अग्निरूप अवतारापासून मनूला म्हणजे विचारी मानवाला लाभतो. भूर् भुवर् स्वर् या त्रिलोकांतील देवतांचा हा उपदेशच तरु म्हणजे तारक आहे. सूर्योपासना विद्युदुपासना आणि अग्न्युपासना त्याच साठीं. या दिव्य तेजाच्या उपासनांनाच यज्ञ अशी संज्ञा आहे. सूर्य आकाशांत राहिला. वीज हि अंतरिक्षांत दूरच आहे. पण अग्नि हा भूमीवरील हातचा आहे. म्हणून यज्ञांत अग्नि-उपासना केली जाते. जें गूढ तेज सर्वांतर्यामीं आहे तें अरणिमंथन करून यज्ञांत प्रकट केलें जातें आणि त्याची उपासना होते.

## ९६७. भूर्-भूवस्-स्वस्-तरु (४)

भूर् भुवर् आणि स्वर् या त्रिभुवनाला तरु म्हटलें आहे. कारण हें त्रिभुवन आपल्याला भरणपोषण रक्षण आणि शिक्षण देत आहे. वृक्ष आपल्याला निवारा देतो, आसरा देतो. ऊन थंडी वारा पाऊस यांच्यापासून आपलें रक्षण करतो. तो आपल्या कंदमूळ-पत्रपुष्प-फळांनीं आपलें भरण पोषण करतो. त्याच्या छायेंत बसून मानवानें ध्यान केलें आणि ज्ञान मिळविलें आहे. त्यामुळें तो ज्ञानदाता गुरु झाला आहे. भगवान् बुद्धाला तरुतलीं ज्ञानलाभ झाला आहे. गुरु तरुतळीं बसून ज्ञानोपदेश देतात.

**चित्रं वटतरोर् मूले वृद्धाः शिष्या गुरुर् युवा।**
**गुरोस्तु मौनं व्याख्यानं शिष्यास्तु च्छिन्नसंशयाः।।**

हा श्लोक प्रसिद्धच आहे. त्यांतील गुरु शिष्य कोणी हि असोत, मला तर मौन तरुच युवा गुरु आणि त्याच्या छायेंत एकांतांत विचार करीत बसलेला प्रौढ मानवच शिष्य दिसतो. हें चित्र मला चित्र म्हणजे विचित्र वाटत नाहीं, पण स्वाभाविक वाटतें. अशा तारक वृक्षाची उपमा या त्रिकांड विश्वाला दिली आहे. ती योग्यच आहे. हा विश्वकदंब परमात्मा च आहे. त्याच्या छायेंत आपलें जीवन चाललें आहे. सर्व लाभ आपल्याला त्याच्यापासून होतात. सर्व पुरुषार्थ-सिद्धि त्याच्या कृपेनें होते. हा विश्वकदंब तारकापुष्पांनीं फुलला आहे. चंद्रसूर्य-फळांनीं फळला आहे. दश दिशांच्या शाखांनीं विस्तारला आहे. त्याचें मूळ खोल भूमिगत आहे, अव्यक्त अक्षर आहे. असा हा भूर् भुवस् स्वर् लोकात्मक तरु आहे, आमचा तारक आहे.

## ९६८. तार

तारयति इति तारः। जो संसारसागरांतून स्वभक्ताला तारतो तो तार म्हणावयाचा. गीतेंत भगवंतानें म्हटलेंच आहेः–

**ये तु सर्वाणि कर्माणि मयि संन्यस्य मत्पराः।**
**अनन्येनैव योगेन मां ध्यायन्त उपासते।।**
**तेषां अहं समुद्धर्ता मृत्यु-संसार-सागरात्।**
**भवामि नचिरात् पार्थ मय्यावेशित-चेतसाम्।।**

परमात्म्याचा भक्त म्हणजे सत्याचा शोधक, विश्वाचें तत्त्व काय आहे तें शोधणारा. त्याला सृष्टींतील पदार्थमात्र षड्विकार-ग्रस्त आहे हें लक्षांत येतें, त्याच बरोबर त्या विकारांतून मुक्त असलेलें आत्मतत्त्व हि परिलक्षित होतें. विश्वतरूचीं पानें फुटतात वाढतात पिकतात, गळतात, पण तरु कायमच राहतो. तसें कायम राहणारें एक तत्त्व आहे आणि तदितर सारें नश्वर आहे, हें त्याच्या लक्षांत येतें. तदनुसार तो शाश्वताची कास धरतो आणि अशाश्वताचा त्याग करतो. शाश्वताविषयीं सोऽहंता धरून अशाश्वताविषयीं तो निरहं निर्मम होतो. आणि अशा प्रकारें मृत्युसंसार-सागरांतून त्याचें तारण होतें. जें सत्चित्सुखरूप असून जें स्वप्नजागर-सुषुप्त या अवस्थांचें नित्य साक्षी आहे तें ब्रह्म मी आहें, हा पांचभौतिक देह मी नव्हें, असा बोध जेव्हां होतो तेव्हां तो पुरुष ''मिथिलायां प्रदीप्तायां न मे दह्यति किंचन'' असें म्हणूं शकतो. मिथिलाच काय

सारी सृष्टि प्रलीन झाली तरी त्याचें कांहीं जात नाहीं. आत्मतत्त्व हें असें तार म्हणजे तारक आहे. जो तार सोडील तो मार खाईल हें उघडच आहे. भगवंतानें म्हटलेंच आहे:

''अप्राप्य मां निवर्तन्ते मृत्युसंसार-वर्त्मनि'' 'मृत्यूची धरिती वाट संसारीं मज सोडुनी.'

## ९६९. सपिता (सविता)

''स पिता स पितामह:'' असा पाठ असूं शकेल. आज तो 'सपिता प्रपितामह:' असा आहे. सपिता ऐवजीं 'सविता' असा हि एक पाठभेद आहे. परंतु सविता पद पूर्वीं हि येऊन गेलें आहे हें एक, आणि दोन म्हणजे प्रपितामह पदाच्या सांनिध्यामुळें सदर पद सपिता असेंच अधिक संभाव्य दिसतें, शंकराचार्यांनीं हि तें तसेंच घेतलें आहे. पण त्यांनीं सपिता हें एक पद मानिलें आहे. त्याऐवजीं 'स पिता स पितामह:', असें वाक्यरूप घेतल्यास सपिता हा एक कृत्रिम समास घ्यावा लागत नाहीं. ''स सर्वस्य पिता सपिता'' असा विग्रह शंकराचार्य करतात. एकच पद घेणें झाल्यास मग पुढील पदाच्या सांनिध्यानें आणि सहस्राच्या संवई प्रमाणें तें प्रपिता (प्रपितामह:) असें घेणें योग्य होईल. प्राचीन हस्तलिखितांत प्र चा स झाला असणें शक्य आहे. परंतु या पाठांत थोडी अडचण निर्माण झाली. प्रपिता असा शब्द कल्पावा लागतो. तो रुढ नाहीं. तथापि सपिता या कृत्रिम समासा पेक्षां तो व्याकरणशास्त्राला नि व्यवहाराला हि मान्य होणार आहे. त्याचा अर्थ पितामह होईल. आणि परमात्मा हा पितामह आहे, प्रपितामह असा सुसंगत अर्थ त्यांतून निघेल. पाठ 'स पिता स पितामह:' असा घ्या वा 'प्रपिता प्रपितामह:' असा घ्या. दोन्ही पाठांत क्रमिकता साधली जाईल. प्रवाहाचा हि निर्वाह होईल. 'सपिता प्रपितामह:' या आजच्या रुढ पाठांत दोन्ही नाहीं. परमात्मा हा आमचा प्रपिता आहे म्हणजे आमच्या जनकांचा जनक आहे, तो प्रत्यक्ष जनक नाहीं. म्हणून तो प्रपिता म्हटला जाणें योग्य च आहे. तो आमचा सरळ जनक नाहीं इतकेंच नव्हे तर आमच्या जनकांचा हि सरळ जनक नव्हे. म्हणून तो प्रपितामह: म्हटला आहे. तात्पर्य, तो पूर्वज आहे, प्रपूर्वज आहे.

## ९७०. प्रपितामह:

परमात्मा पिता नाहीं पितामह हि नाहीं तर तो प्रपितामह आहे. म्हणजे या सृष्टीशीं आणि जीवांशीं त्याचा अत्यन्त दूरचा संबध आहे. त्याचें नातें फार दूरचें आहे अगदीं अनादि. सृष्टि ही पांचभौतिक आहे. पंचभूतें हीं तिचें सरळ वा प्रत्यक्ष कारण होत. भूतें हीं अव्यक्तजनित आहेत. आणि अव्यक्त हें अक्षर ब्रह्माश्रित आहे. म्हणजे अक्षर हें प्रपितामह झालें आणि अव्यक्त हें पितामह झालें. या अव्यक्तालाच ब्रह्म वा ब्रह्मा अशी हि संज्ञा आहे. याचें स्वरूप त्रिगुणात्मक आहे. म्हणून तो त्रिगुण यज्ञोपवीत धारण करतो आहे आणि चार वेद त्रैगुण्याचेंच प्रतिपादन करीत असल्यामुळें तो चतुर्मुख झाला आहे. तो यज्ञशील असल्यामुळें त्याच्या हातांत स्रुक्स्रुवादि यज्ञोपकरणें आहेत. गीता आणि सहस्र दोन्ही महाभारतांतीलच आहेत. आणि त्यांचा घनिष्ट संबंध आहे. गीतेंत ''प्रजापतिस् त्वं प्रपितामहश् च'' हें वचन आलें आहे. त्याचाच इथें ''प्रपिता प्रपितामह:'' असा अनुवाद आला आहे असें म्हणतां येईल. प्रपिता वा सपिता म्हणजे सर्वांचा पिता अर्थात् प्रजापति. ब्रह्मदेवालाच प्रजापति म्हटलें जातें. पहा : ''सहयज्ञा: प्रजा: सृष्ट्वा पुरोवाच प्रजापति:'' म्हणून प्रपिता पद घेणें आणि तें 'प्रजानां पिता प्रपिता' असें लावणें शक्य आहे. स हा जर सर्वार्थी येऊं शकतो तर प्र हा प्रजार्थीं घ्यायला हरकत नसावी. शिवाय तो प्रपितामह इत्यादि पदांत आला आहे. या आणि असल्या कारणांनीं 'सपिता' 'सविता' या पदांपेक्षां प्रपिता हा पाठ अधिक सयुक्तिक होय. जिथें नानात्व आहे तिथेंच पितृपुत्रादि संबंध कल्पितां येतो. परंतु जिथें मुळांत

अद्वैत आहे, किंबहुना एकत्वच आहे तिथें कुठल्याहि संबंधाची कल्पना कशी करतां येईल? केली तरी ती परमार्थत: स्वीकारतां येणार नाहीं..म्हणून व्यवहारत: जरी परमात्म्याला पिता प्रपिता प्रपितामह इत्यादि संबंध चिकटविले तरी ते मिथ्या होत. कल्पित सृष्टीच्या आणि जीवाच्या दृष्टीनें ते आरोपिलेले आहेत. वस्तुत: तर

"नासतो विद्यते भावो नाभावो विद्यते सत:।"
"नेह नानास्ति किंचन।" "आत्मैव इदं सर्वम्।"

हीच परमार्थता आहे.

## ९७१. यज्ञ

यज्ञो यज्ञपतिर् यज्वा यज्ञाङ्गो यज्ञ-वाहन:। हा संपूर्ण उत्तर श्लोकार्ध आणि पुढील संपूर्ण श्लोक प्राय: यज्ञाला वाहिलेला आहे. यज्ञ हा अति प्राचीन काळापासून वैदिक आर्यांच्या जीवनाचा गाभा राहिला आहे. त्यांच्या विचाराचें, जीवन-पद्धतीचें म्हणजे संस्कृतीचें आणि प्रत्यक्ष दैनंदिन जीवनाचें केन्द्र यज्ञच होता. यज्ञासाठीं मंत्र, यज्ञासाठीं तंत्र. सर्व विद्यांचा, कलांचा विकास त्यांतून झाला. जेव्हां एखादा समाज अशा एखाद्या विचारानें झपाटला जातो तेव्हां त्याचा सर्वांगीण विकास त्यांतूनच कसा होतो ह्याचें भारतीय आर्यांची यज्ञप्रधान संस्कृति हें एक उत्तम निदर्शन आहे. घराची उभारणी जशी पायावर होते तशी जीवनाची उभारणी ज्या तत्त्वावर होतें त्याचें नांव श्रद्धा. आजतागायत भारतीय आर्यांचें हें श्रद्धास्थान यज्ञच राहिलें आहे. कोणताहि विचार, कोणता हि उच्चार आणि कोणता हि आचार यज्ञाशीं जोडल्यावांचून त्याला समाधान वाटत नाहीं. त्याविना तो पावन होत नाहीं, ग्राह्य होत नाहीं. विचारक ब्रह्मविचार करतो. त्याला तो यज्ञाच्याच परिभाषेंत मांडतो. ब्रह्मार्पणं ब्रह्म हविर् ब्रह्माग्नौ ब्रह्मणा हुतम्। ब्रह्मैव तेन गन्तव्यं ब्रह्मकर्मसमाधिना।। कवि काव्य करतो आणि म्हणतो माझा हा वाग्यज्ञ आहे. शूर लढतो आणि म्हणतों, मी हा समर-यज्ञ करीत आहे. कोणी धनी उतारूंसाठीं घर बांधतो त्याला तो नांव देतो धर्मशाळा म्हणजे यज्ञशाळा. कोणी सदाव्रत घालतो त्याला म्हणतात अन्नसत्र म्हणजे अन्नयज्ञ. सारांश संपूर्ण जीवन यज्ञमय बनविण्याची ही प्रेरणाच, आमचें मूल धन असून त्याभावनेनें केलेलें प्रत्येक कर्म यज्ञ होय.

## ९७२. यज्ञपति

कोणता हि मंत्र घेतला तर त्याला ऋषि, दैवत आणि छंद ह्या तीन गोष्टी असावयाच्याच. ऋषि म्हणजे तो मंत्र पाहणारा मंत्रद्रष्टा. दैवत म्हणजे ज्या भावाला उद्देशून तो मंत्र संबोधिला आहे तो भाव वा विषय. आणि छंद म्हणजे मंत्र-वर्णांची रचना ज्या विशिष्ट पद्य प्रकारांत झाली आहे तो गायत्री अनुष्टुभ् इत्यादि वाग्बंध. मंत्र म्हणजे वैदिक शब्द ही एक कृति आहे आणि कृति म्हटली म्हणजे तिला कर्ता, उद्दिष्ट वा हेतु आणि क्रिया ही अंगें असलींच पाहिजेत. तदनुसारच ऋषि दैवत छंद हीं मंत्रांची कारणें होत. यज्ञ ही देखील अशीच एक कृति आहे, कर्म आहे. म्हणून त्याला कर्माचा कायदा लागू होतो. यज्ञ-कर्माचा जो उद्देश तोच यज्ञाचा नियामक असल्यामुळें त्यालाच यज्ञपति म्हटलें आहे. परमात्म्यालाच उद्देशून यज्ञ होतो. म्हणून तो परमात्माच यज्ञपति होय. परंतु प्रत्येक यज्ञाचें प्रयोजन परमात्मा असतो असें कसें म्हणतां येईल? याचें उत्तर हें कीं जें प्रयोजन असतें तोच त्याचा परमात्मा समजा. दशरथानें पुत्रासाठीं यज्ञ केला. तेव्हां दशरथाच्या त्या यज्ञाचा देव, त्याचा यज्ञपति, तो पुत्र झाला. तो भगवान् रामचंद्र म्हणून प्रसिद्ध आहे. त्यानें पित्याचा पुत्र-काम पुरविला आणि विश्वामित्राच्या यज्ञाचें रक्षण केलें. जीवाच्या सर्व कामना, ज्यांनीं प्रेरित होऊन तो नाना कर्में करतो अन्तरात्म्याचीं जीवनाच्या दर्पणांत उमटलेलीं प्रतिबिंबें होत. प्रतिबिंब हें जसें बिंबाहून वेगळें म्हणजे स्वतंत्र

नसतें तशा पुरुषाच्या कामना त्याच्याहून स्वतंत्र नाहींत. म्हणून सगळे पुरुषार्थ हे वस्तुत: परमात्मरूपच होत. म्हणूनच म्हटलें आहे वेदांत : हे देवा तूं गाय मागणाराची गाय होतोस नि अश्व मागणाराचा अश्व होतोस. ''गोकामाय गव्यसे, अश्वकामाय अश्वसे।'' सारांश, यज्ञांत पूजिला जाणारा यज्ञपुरुष हा यजमानाचा कामरूप आत्मभावच असतो. म्हणून तो यज्ञपति म्हणावयाचा.

## ९७३. यज्वा

यज्वा म्हणजे-यज्ञकर्ता यजमान. परमात्मा हा हेतु रूपानें यज्ञकर्माचा प्रेरक आहे म्हणून तो यज्ञपति म्हटला. पण प्रत्यक्ष यज्ञकर्म करणारा जो जीव तो हि तोच आहे. म्हणून तो यज्वा म्हणावयाचा. 'कर्ता करविता नारायण' असें म्हटलें आहेच. परोक्षरूपानें प्रेरणा देऊन करविणारा आणि प्रत्यक्ष यज्ञकर्म करणारा हे दिसायला वेगळे आहेत, परंतु तत्त्वत: ते एकच आहेत. कर्माचा प्रेरक काम हा एक आत्मशक्तीचा आविर्भाव आहे. त्याच आत्मशक्तीचा दुसरा आविर्भाव म्हणजे कर्मक्षम कर्तृत्व आहे. एक भाव प्रेरणा देतो, एक तदनुसार उद्यम करतो, कर्म करतो. एक पूर्वरूप आहे, एक उत्तररूप आहे. सर्व खेळ एकाच तत्त्वाचा आहे. ऐंद्रजालिक म्हणजे मायावी एकच असतो. तो आपल्या मायेच्या योगें नाना रूपें, नाना नामें, नाना कर्में आणि नाना फळें धारण करीत असतो. तद्वत् या विचित्र विश्वाचें हें बहुरंगी जीवन एकाच चिच्छक्तीचा विलास आहे. या वस्तुस्थितीला उद्देशूनच म्हटलें आहे: ''इन्द्रो मायाभि: पुरुरूप ईयते.'' यज्ञाची भाषा बोलतांना इथें यज्ञ आणि तत्संबद्ध सारें तो परमात्माच आहे, हा विचार आला आहे. तो परमात्मा यज्ञ आहे म्हणजे तो यज्ञ-पति आहे, यज्वा आहे, यज्ञांगें आहे, यज्ञकर्म आहे, यज्ञफल आहे आणि यज्ञफल-भोक्ताहि तोच आहे, असें सामग्रयानें समाजावयाचें आहे. यज्ञ हें ब्रह्म म्हणजे सर्वकारण म्हटल्यानंतर यज्ञसिद्धीसाठीं आवश्यक असणारें सगळें कांहीं तोच आहे. हें ओघानेंच आलें. तेंच परोपरीनें विस्तारून सांगितलें आहे. आणि तसें करतांना कित्येक नामें समानार्थक पूर्णत: वा अंशत: आलीं आहेत.

## ९७४. यज्ञाङ्ग

यज्ञस्य अङ्गानि एव अङ्गानि यस्य स: यज्ञाङ्ग:। यज्ञांगें हींच ज्याचीं अंगें होत तो यज्ञाङ्ग म्हणावयाचा. परमात्मा हा यज्ञ आहे म्हटल्यानंतर यज्ञाचीं जीं अंगें तीं सर्व त्याचीं अंगें झालीं हें सांगायला नकोच. शंकराचार्यांनीं ''यज्ञा अंगानि अस्य इति यज्ञाङ्गो वराहमूर्ति:'' असें म्हणून यज्ञमूर्ति वराहाचें हरिवंशांत केलेलें वर्णन उद्धृत केलें आहे. यज्ञांगाचा परिचय त्यावरून होतो. तीं अंगें क्रमानें वा सामग्र्यानें आलीं आहेत असें नाहीं किंवा तींच घेतलीं पाहिजेत असें हि नाहीं. महानारायणीयोपनिषदांत त्रिसुपर्णाच्या शेवटीं यज्ञमय झालेल्या पुरुषाचें वर्णन आलें आहे. त्यांत हि यज्ञांगें आलीं आहेत. हीं दोन्ही रूपकात्मक उद्धरणें पुढें दिलीं आहेत.

वेद-पादो यूप-दंष्ट्र: क्रतु-हस्तश् चितीमुख:।
अग्निजिह्वो दर्भ-रोमा ब्रह्म-शीर्षो महातपा:।।
अहोरात्रेक्षणो दिव्यो वेदान्तश्रुति-भूषण:।
आज्य-नास: स्रुव-तुण्ड: सामघोष-स्वनो महान्।।
धर्मसत्यमय: श्रीमान् क्रमविक्रम-सत्क्रिय:।
प्रायश्चित्तनखो घोर: पशु-जानुर् महाभुज:।।
उद्गात्रन्त्रो होम-लिङ्ग: फलबीजमहौषधि:।
वायुवन्तरात्मा मन्त्र: स्फिक् विकृत: सोमशोणित:।।
वेदी-स्कन्धो हविर्-गन्धो हव्यकव्यास्थिवेगवान्
प्राग्वंश-कायो द्युतिमान् नानादीक्षाभिरर्चित:।।
दक्षिणा-हृदयो योगी महासत्रमयो महान्।
उपाकर्मेष्टि रूचक: प्रवर्ग्यावर्तभूषण:।।
नानाछन्दो गतिपथो गुह्योपनिषदासन:।
छायापत्नीसहायो वै मेरुशृङ्ग इवोच्छ्रित:।।
—हरिवंश

तस्य एवं विदुषो यज्ञस्य, आत्मा यजमान:, श्रद्धा पत्नी, शरीरं इध्म, उरो वेदी, लोमानि बर्हि: इत्यादि

तैत्तिरीयोपनिषत्

सत् कर्मानें मनुष्य सद्गतीला जातो ही श्रद्धा आहे. सर्व कर्मांत पवित्रतम कर्म म्हणजे यज्ञ होय. यज्ञाच्यायोगें क्षपित-कल्मष होत्साता मनुष्य केवल दोषरहित असा पुण्यमय यज्ञरूपच होऊन जातो. याच परिणतीला स्वर्ग म्हटलें आहे. पण कर्माच्या योगें प्राप्त होणारी उत्तमोत्तम गति हि सदोषच असणार अशा विचारानें नैष्कर्म्यवादी ज्ञानोपासनेवरच भर देतात. 'सर्वं कर्माखिलं पार्थ ज्ञाने परिसमाप्यते' असा त्यांचा सिद्धान्त आहे या दोन्ही विचारांना एकवटून जीवाची मरणोत्तरगति यथाकर्म व यथाश्रुत होते असें निष्कर्षिलें आहे. स्थूल यज्ञक्रिया शेवटीं सूक्ष्म विचारप्रक्रियेंत परिणत होऊन ब्रह्मकर्मसमाधींत पर्यवसित झाली आहे आणि कर्म व ज्ञान यांचें अद्वैत साधलें आहे. अन्तिम निष्ठेंत आदर्शात द्वैत राहूं शकत नाहीं.

### ९७५. यज्ञ-वाहन

यज्ञं वाहयति इति यज्ञवाहनः। यज्ञस्य वाहनः इति यज्ञ-वाहनः। यज्ञो वाहनं अस्य इति वा यज्ञ-वाहनः। यज्ञाला वाहतो तो यज्ञवाहन म्हणावयाचा अथवा यज्ञच ज्याचें वाहन आहे तो यज्ञवाहन म्हणावयाचा. यज्ञकर्माची प्रेरणा, यज्ञकर्माची शक्ति नि साधनें, आणि शेवटीं यज्ञकर्माचें फळ हि तो परमात्माच देतो आणि म्हणून तो परमात्मा यज्ञ-वाहन म्हणावयाचा. कोणत्याहि कर्माच्या निर्वाहासाठीं, सिद्धीसाठीं संकल्प, शक्ति नि फल-निष्पत्ति या तीन गोष्टी आवश्यक आहेत. यापैकीं एका हि गोष्टीची उणीव असल्यास त्या कर्माचा निर्वाह होत नाहीं. तें कर्म लंगडें होतें. तें कर्म उभें राहूं शकत नाहीं. तिपाईचा एक हि पाय नसल्यास ती उभी राहूं शकत नाहीं त्याप्रमाणें. या तीन तत्त्वांचा हि आधार एक महान् तत्त्व आहे श्रद्धा. ती आत्मश्रद्धा नसेल तर या कर्मनिष्पादक तत्त्वांचा कांहीं उपयोग नाहीं. त्यांना कर्म-रचनेला अधिष्ठानच लाभत नाहीं. म्हणून म्हटलें आहे:

अश्रद्धया हुतं दत्तं तपस् तप्तं कृतं च यत्।
असत् इत्युच्यते पार्थ न च तत् प्रेत्य नो इह॥
गीता

श्रद्धयाग्निः समिध्यते श्रद्धया हूयते हविः।
श्रद्धां भगस्य मूर्धनि श्रद्धे श्रद्धापयेह नः॥
ऋग्वेद

"असत्यं अप्रतिष्ठं ते जगद् आहुर् अनीश्वरम्" ही नास्तिकता म्हणजे जगांत शाश्वत कांहीं नाहीं हा शून्यवाद अश्रद्धा होय. या उलट अशाश्वत, परस्परांच्या संयोगानें निर्माण झालेल्या आणि अकर्तृक भासणाऱ्या जगाच्या पसाऱ्याच्या बुडाशीं एक शाश्वत तत्त्व आहे, त्याच्याच आधारें हें जग निर्माण झालें आहे, चाललें आहे आणि शेवटीं त्यांतच विलीन व्हायचें आहे किंबहुना होत आहे या दर्शनाचें नांव आहे श्रद्धा. ही श्रद्धा नसेल तर सर्व कर्मांचा खटाटोप व्यर्थच होय. कारण त्या सर्वांचा परिणाम शून्य होय. आस्तिक शून्यवादी नाहीं. तो ब्रह्मवादी आहे, पूर्णवादी आहे. त्या आधारें त्याचें जीवन चालतें, सफल होतें. पूर्ण होतें. दक्ष नास्तिक होता. म्हणून त्याचा यज्ञ ध्वस्त झाला. "ध्रुवं कर्तुः श्रद्धाविधुरमभिचारायहि मखाः" परमात्मा हा अशा प्रकारें श्रद्धवंतांचा यज्ञ-वाहन तर अश्रद्धांना यज्ञ-विध्वंसक आहे.

परमात्मा हा अधियज्ञ असल्यामुळें म्हणजे यज्ञ द्वारा आत्मशुद्धि होत असल्यामुळें तो 'यज्ञ आहे वाहन ज्याचा असा' यज्ञवाहन होय. इन्द्र जीमूतवाहन आहे कुबेर नरवाहन आहे तसा परमात्मा यज्ञवाहन.

### ९७६. यज्ञभृत्

यज्ञं बिभर्ति इति यज्ञभृत्। जो यज्ञाला धारण करतो तो यज्ञभृत् म्हणावयाचा. आम्ही सर्व जीव देहभृत् आहों म्हणजे देहधारी आहों. पण यज्ञभृत् ही पदवी त्यांतील फार थोड्यांनाच लाभते. हें जग काय आहे? याचें स्वरूप काय आहे? आम्ही जीव कोण आहोंत? आमचें स्वरूप काय आहे? अशी तत्त्वजिज्ञासा

ज्यांच्यांत उदित होते असे मानव प्राणी या जीवविश्वांत, या चौऱ्यांशी लक्ष योनींत कितीसे आहेत? योनि या नात्यानें आधीं मानव असंख्यांपैकीं एक. त्या मानव योनींत हि खाणें पिणें विणें या पलीकडे ज्यांची दृष्टि जाते असे थोडे. ते हि साहित्य संगीत कला इत्यादि आत्ममोहनाच्या मार्गे लागलेले. म्हणजे व्यसनी. एकांना दृष्टिच आलेली नाहीं, तर एक दृष्टि असून मदान्ध आहेत. या दोन कोटी सोडल्या म्हणजे मनुष्य समाजांत फारच थोड्या व्यक्ति अशा आढळतात कीं ज्यांना तत्त्व-जिज्ञासा शिवली आहे असें म्हणतां येईल. या जिज्ञासूंत हि क्षणिकच फार. ज्यांची जिज्ञासा टिकाऊ स्वरूपाची आहे असे चिवट जिज्ञासेचे कितीसे आढळतात? जे कांहीं आढळतात त्यांतून संप्रदायरूप जडतेंत सांपडणारेच अधिक. देहनिरपेक्ष विशुद्ध आदर्श डोळ्यासमोर अविचल ठेवून तदर्थ काया वाचा मनें निरन्तर निरलस झटणारे केवळ विविक्त दृष्टीचे परम हंस पुरुष खरोखरच सुदुर्लभ. त्या अशांनाच उद्देशून गीतेंत म्हटलें आहे.

**मनुष्याणां सहस्रेषु कश्चिद् यतति सिद्धये।**
**यततामपि सिद्धानां कश्चिन् मां वेत्ति तत्त्वतः।।**

हे पुरुष यज्ञभृतां वर होत. परंतु आत्मशुद्धीचा ज्यांचा निश्चय झाला असून त्या वाटेला जे लागले आहेत ते सगळे साधक यज्ञभृत् होत. परमशुद्धिस्वरूप आदर्श म्हणजे ब्रह्म होय. आणि त्याच्या प्राप्तीचे म्हणजे आत्मशुद्धीचे सर्व उपाय यज्ञ होत. हाच विचार गीतेच्या भाषेंत 'एवं बहुविधा यज्ञा वितता ब्रह्मणो मुखे। कर्मजान् विद्धि तान् सर्वान्' असा आला आहे. अंश हा अंशीहून वेगळा नसतो. म्हणून प्रत्येक यज्ञभृत् हा यज्ञपुरुष परमात्माच होय.

### ९७७ यज्ञकृत्

यज्ञं करोति इति यज्ञकृत्। जो यज्ञ करतो तो यज्ञकृत् म्हणावयाचा. गुण आणि गुणकार्यें यांच्याशीं अज्ञानामुळें मनुष्य जें आपलें तादात्म्य कल्पितो आणि त्या कल्पनेंत जें कांहीं करतो तें सगळें त्याला स्वरूपापासून दूर नेतें, आडवाटेस लावतें. याचेंच नांव आहे 'जुहुराणं एनः' वांकडें जाणारें पाप. हें पाप ज्या ज्ञानदृष्टीनें नाहीसें होतें तिचें नाव पुण्य आहे. त्या ज्ञानदृष्टीला पोषक जो विचार उच्चार वा आचार तो हिं उपचारानें पुण्य म्हटला जातो. तोच यज्ञ होय. स्वरूपज्ञान हें अव्यक्त आहे. तें देहवंताला व्यक्त क्रियेच्या द्वारा हळूं हळूं आकलन होतें. सामान्य विषय-ज्ञान हि आपल्याला व्यक्त पदार्थांच्या व क्रियांच्या साहाय्यानेंच अवगत होतें. दोन नि दोन चार होतात. मुलाला तें आपण दोन चिंचोक्यांत आणखी दोन चिंचोके घालून आणि मोजायची क्रिया करायला लावून शिकवतो आणि अशा प्रकारें तें अमूर्त ज्ञान तो मूर्तांच्या साहाय्यानें शिकतो. यज्ञ हा हि असाच एक पदार्थपाठ आहे. त्यांत हवनीय अग्नि, हवन-द्रव्य आणि हवन-क्रिया यांच्या द्वारा आपण 'अग्नये स्वाहा, इदं न मम' असें म्हणत गुण आणि गुणकार्यें यांहून मी वेगळा आहें हें आत्म-ज्ञान आत्मसात् करीत असतों. हा देह मी नव्हे, हे कलत्रपुत्रमित्रादि देहसंबंध आणि हयगजरथादि वा सुवर्णरजतादि द्रव्यें माझीं नव्हेत. हे सगळे अनात्म होत आणि मी यांचा ज्ञाता केवळ चितिस्वरूप आत्मा आहे हें ज्ञान यज्ञाच्या द्वारा माणसाच्या ठाईं उगवूं लागतें. किंबहुना ज्या स्थूल कर्मांच्या द्वारा हा ज्ञानोपकार होतो तीं सगळीं कर्मेंच यज्ञ होत. अग्निदेवता द्रव्य आणि क्रिया या यज्ञीयांचें स्वरूप शेवटीं ब्रह्मच होतें. कारण "ब्रह्मार्पणं ब्रह्म हविर् ब्रह्माग्नौ ब्रह्मणा हुतम्। ब्रह्मैव तेन गन्तव्यं ब्रह्मकर्म-समाधिना।।" 'सर्वं कर्माखिलं पार्थ ज्ञाने परिसमाप्यते' हें आहे कर्ममय यज्ञाचें पर्यवसान. तें लक्षून जें केलें जातें तेंच कर्म यज्ञ होय. आणि तेंच मोचक. अन्य सर्व कर्म बन्धक होय. "यज्ञार्थात् कर्मणोऽन्यत्र लोकोऽयं कर्म-बन्धनः" परमात्मा हा कर्मबन्ध-मुक्त असल्यामुळें तो उघडच यज्ञकृत् होय.

### ९७८. यज्ञी

यज्ञी म्हणजे यज्ञवान्. जीव जसा स्वभावत: देही आहे, देही जसा स्वभावत: कर्मी आहे, तसा कर्मी हा स्वभावत: यज्ञी नाहीं. तो तशी इच्छा करील तर यज्ञी होऊं शकतो इतकेंच. स्वाभाविक गुणानुसार देह आणि कर्मे जर लाभतात तर त्याच स्वाभाविक गुणांना अनुसरून स्वधर्मरूप यज्ञ हि माणसाला लाभला आहे असें म्हणणें योग्य होईल आणि तसा तो स्वभावत: यज्ञी आहे हें ''सहयज्ञा: प्रजा: सृष्ट्वा पुरोवाच प्रजापति:। अनेन प्रसविष्यध्वम् एष वोऽस्त्विष्ट-कामधुक्।।'' या वचनावरून दिसून हि येतें. परंतु हा स्वधर्मरूप सहज यज्ञ माणसाकडून सहजासहजीं आचरला जात नाहीं. त्यासाठीं त्याला आत्मज्ञान आणि तज्जनित आत्मसंयम याची आवश्यकता असते. ज्ञान आणि संयम यांच्या अभावीं सहज हि असलेला स्वधर्म आचरला जात नाहीं. मनुष्य स्वरूपानुसंधान ठेवण्या ऐवजीं विषयध्यान करूं लागतो आणि त्यांतून संग काम क्रोध मोह स्मृतिभ्रंश या परंपरेनें बुद्धिनाशाची निष्पत्ति होते. विषय-ध्याना-ऐवजीं जेव्हां मनुष्य आत्मस्मृतिमान् होऊन जितात्मा होतो तेव्हां तो स्वधर्मरूप यज्ञ करण्यास समर्थ होतो. असा आत्मबलवान् धीर पुरुषच स्वधर्मयज्ञक्षम असून तोच यज्ञी होय. इतर नुसते कर्मी वा कर्मसंगी होत. आम्हीं गुण-संग, गुणकर्म-संग आणि गुणकर्मफल-संग टाकून आत्मस्मृतिमान् स्वधर्मनिष्ठ आणि कर्मफलत्यागी व्हायला पाहिजे. अशालाच गीता यज्ञी म्हणजे कर्म-योगी आणि संन्यासी म्हणजे कर्मफलसंन्यासी म्हणते. केवळ अग्निहोत्र राखल्यानेंच कोणी योगी होत नाहीं, तर आत्मा कर्ता भोक्ता नाहीं ह्या आत्मज्ञानाची ज्योति प्रज्वलित राखल्यानेंच तो योगी होतो. केवळ कोणतें कर्म न करण्यामुळेंच कोणी संन्यासी होत नाहीं तर सर्व कर्मांच्या फलाचा त्याग केल्यानेंच तो संन्यासी होतो. ''अनाश्रित: कर्मफलं कार्यं कर्म करोति य:। स संन्यासी च योगी च न निरग्निर् न चाक्रिय:।।'' गीतेनें अशा उभयदोषरहित व उभयगुणसमन्वित आदर्शाचा पुरस्कार केला आहे. हा आदर्श आचारणारा यज्ञी होय. परमात्मा हा सदैव स्वरूपस्थित असल्यामुळें तो सूर्यवत् यज्ञी आहे. कर्मे करीत असून हि फलाशा त्याला नाहीं, फलाशा नसून हि तो सदैव कर्मरत आहे.

### ९७९. यज्ञभुक्

यज्ञं भुञ्जते भुनक्ति इति वा यज्ञभुक्। जो यज्ञाचा भोक्ता आहे अथवा रक्षिता आहे तो यज्ञभुक् म्हणावयाचा. परमात्मा च सर्व यज्ञ दान तपें आणि कर्मे यांचा हेतु असल्यामुळें त्याच्याच प्रीत्यर्थ सगळे यज्ञ, सगळीं दानें, सगळीं तपें आणि सगळीं कर्मे होत असल्यामुळें तो यज्ञभुक् होय. 'सत्य संकल्पाचा दाता भगवान् सर्व करी पूर्ण मनोरथ' या लोकोक्तीप्रमाणें तो परमात्मा सर्व संकल्पांना सर्व क्रतूंना, जन्म देऊन त्यांना तडीस नेणारा आहे. म्हणून तो यज्ञभुक् म्हणजे यज्ञरक्षणकर्ता हि आहे. हे दोन्ही अर्थ गीतेच्या 'अहं हि सर्वयज्ञानां भोक्ता च प्रभुरेव च'. या वचनांत क्रमानें आले आहेत, असें म्हणतां येईल. सर्व भूतांच्या अन्तर्यामीं वास करणारा तो परमात्मा त्यांच्या त्या त्या क्रतूंना, त्यांच्या त्या त्या संकल्पांना वा मनोरथांना सुफलित करून त्यांच्या योगें प्रसन्न होत असतो, प्रीयमाण होत असतो. आत्मप्रसादच शेवटीं सर्व फलितांचें फलित आहे. तें फलित जोंवर हातीं लागत नाहीं तोंवरच सर्व स्वाध्याय यज्ञ दान तप आदि साधनें करावयाचीं. आत्मप्रसाद लाभल्यानंतर मग तीं सगळीं निष्प्रयोजन होतात, पण त्याआधीं केव्हांहि नाहीं. आणि ज्या अर्थी आत्मप्रसाद हा जोंवर देह आहे तोंवर पूर्ण झाला आहे असें म्हणतांच येत नाहीं. त्याअर्थी साधनें हि निष्प्रयोजन होऊन कुंठित झालीं असें कधींच होत नाहीं. जो सदेह असून तशी कल्पना करील तो मिथ्यावादी आहे, वा भ्रान्त आहे, वा भविष्यद्वृत्तीनें बोलत आहे असें समजावें. गीतेंत एवढयाच साठीं म्हटलें आहे :

"अभितो ब्रह्मनिर्वाणं वर्तते विदितात्मनाम्" ज्यांनीं आत्मतत्त्व ओळखलें आहे त्यांच्या निकट देहाच्या अंतरपटाच्या आड ब्रह्माचें निर्वाण म्हणजे भावरूप पूर्ण शान्ति वसत असते. ब्राह्मी स्थिति अनुभवणाऱ्या, विदितात्म पुरुषांची हि प्रयाण-साधना तरी अवशिष्ट राहतेच. सर्वसाधना-पर्यवसानभूत ब्रह्मनिर्वाण आत्म्याचें स्वरूपच असल्यामुळें तो परमात्मा यज्ञभुक् होय.

### ९८०. यज्ञ-साधन

यज्ञं साधयति, यज्ञस्य साधनः इति वा यज्ञ-साधनः। अथवा यज्ञः साधनं अस्य इति यज्ञ-साधनः। यज्ञ साधतो तो यज्ञ-साधन म्हणावयाचा. यज्ञाचें साधन म्हणून हि तो यज्ञ-साधन म्हटला जाईल. अथवा यज्ञ हेंच ज्याचें साधन आहे तो यज्ञ-साधन म्हणावयाचा. क्रियोपकारक तें कारक म्हटलें जातें. सर्व कारकांत कर्ता प्रधान म्हणून प्रथम तें कारक झालें, परंतु इतर हि कारकें आहेतच आणि तीं गौण म्हटलीं तरी कारकेंच आहेत. यज्ञ ही एक क्रिया आहे, तेव्हां तिचीं कारकें वा करणें हि असणारच तीं सगळीं यज्ञक्रियोपकारक वा यज्ञसाधक असल्यामुळें त्यांना साधन म्हटलें आहे. यज्ञाचीं सगळीं साधनें अग्नि, हविर्द्रव्य, हवन-क्रिया, हवनोपकरणें, हवनमंत्र, होता आणि स्वतः पत्नीसह यजमान हे सगळे यज्ञसाधनीभूत झालेले परमात्मस्वरूपच होत. कारण त्यांच्यावांचून यज्ञ-सिद्धि होत नाहीं. चंदनाचे अवयव जसे चंदनच होत, तद्वत् यज्ञ-पुरुषाची अंगोपांगें हि यज्ञच होत. म्हणून तो यज्ञपुरुष परमात्मा यज्ञसाधन म्हटला आहे.

यज्ञ हें साधन आहे ज्याचें तो यज्ञ-साधन, असा बहुव्रीहि समास घेऊन वेगळा अर्थ करतां येतो आणि तो हि समर्पकच आहे. कारण परमात्मा हा यज्ञ-क्षपित-कल्मष पुरुषांनाच भेटतो. आमची बुद्धि गुणावृत असल्यामुळें निर्गुण परमात्म्याचा बोध होत नाहीं. ते गुणावरण जेव्हां दूर होतें तेव्हांच आत्मदर्शन होतें. यासाठींच योगी काया वाचा मनें म्हणजे सर्वात्मना सतत झटत असतात. या झटण्याचें खपण्याचेंच नांव यज्ञ आहे. हा आत्मशुद्धीचा यज्ञ अप्रमत्त राहून रात्रंदिवस वर्षानुवर्ष नि जन्मानुजन्म करावा तेव्हां कुठें तें आत्मदर्शन होतें. "बहूनां जन्मनां अन्ते ज्ञानवान् मां प्रपद्यते"

ज्ञानदेवो म्हणे

"बहुतां जन्मांचा अभ्यासु।
तरीचि होय सोरसु परब्रह्मीं ।।"

### ९८१. यज्ञान्तकृत्

यज्ञस्य अन्तं करोति इति यज्ञान्तकृत्। जो यज्ञाचा अन्त करतो तो यज्ञान्तकृत् म्हणावयाचा. कोणती हि क्रिया ही कितीहि दीर्घ काल चालली तरी ती केव्हांना केव्हां तरी संपणारच. ज्या गोष्टीला आरंभ आहे तिला अंत हि असलाच पाहिजे. आत्मशुद्धीच्या अभीष्ट प्रक्रियेला हि हा नियम लागू आहे. ती हि कुंठित होते. ती जिथें कुण्ठित होते. तो यज्ञान्त होय आणि जो यज्ञान्त तोच यज्ञान्तकृत्. परमात्मा हा सर्व साधनांचें अन्तिम फलित असल्यामुळें त्याच्या दर्शनाबरोबर सर्व क्रिया निरुद्ध होऊन निवृत्त होतात. तो अक्रिय आहे. अ-क्रियाविषय आहे. त्याच्यांत कोणतीहि क्रिया प्रविष्ट होत नाहीं. "यतो वाचो निवर्तन्ते अप्राप्य मनसा सह" असें त्याचें स्वरूप आहे. देहेन्द्रियांची गति स्थूल व परिमित आहे. त्या पलीकडे प्राणाची आणि प्राणात्म वाणीची गति होते. कारण तीं सूक्ष्म आहेत. पण मनाची गति या दोहोंहून फार फार मोठी आहे. तुलनाच होऊं शकणार नाहीं इतकी ती विलक्षण आहे. कारण मन हें अत्यन्त सूक्ष्म आहे आणि त्याचा वेग प्रचंड आहे. पण त्याचा हि लाग आत्मतत्त्वाच्या ठाईं लागत नाहीं. कारण तें आत्मतत्त्व निर्गुण आहे आणि मन आहे गुणजनित. तात्पर्य, कियामात्र जिथें निरुद्ध होते तें आत्मतत्त्वच यज्ञान्तकृत् होय. पण त्याला इथें विशेषतः यज्ञान्तकृत् म्हणण्यांत एक हेतु आहे. यज्ञ ही आत्मशुद्धीची क्रिया आहे. आत्मशुद्धीची

जी परिसीमा, ती तो नित्य शुद्ध बुद्ध मुक्त स्वभाव आत्मा आहे, ती परिसीमा गांठल्यानंतर आत्मशुद्धीची प्रक्रिया सफल होऊन आपोआपच कुंठित होते. गन्तव्य गांठल्यानंतर गति कुंठित होते हें खरें पण या कुंठित होण्याला कुंठितता न म्हणतां सफलता म्हटलें जातें, कृतार्थता म्हटलें जातें. म्हणून या स्थितीला वैकुंठ असें नांव आहे. इथें सर्व कुंठा कुंठित झाली आहे म्हणून तिचें नांव वैकुंठ होय. तोच यज्ञान्तकृत् नि यज्ञान्त. कारण, स्वभाववंताहून स्वभाव वेगळा असत नाहीं.

## ९८२. यज्ञ-गुह्य

यज्ञस्य गुह्यम् यज्ञगुह्यम्। यज्ञाचें गुह्य तें यज्ञगुह्य म्हणावयाचें. प्रत्येक गोष्टीचें एक बाह्य व एक आभ्यंतर रूप असतें. बाह्य तो देह होय, आभ्यंतर तो आत्मा. जीवात्म्यासाठीं देह असतो, देहासाठीं आत्मा नसतो. त्याप्रमाणें प्रत्येक कर्माचें आहे, कलेचें आहे, विद्येचें आहे. त्यांचें बाह्य रूप त्यांच्या अन्तरतर आत्म्याच्या प्रकाशनासाठीं असतें. जिथें तें अन्तरतर अन्तर्यामी तत्त्व प्रकाशित होत नाहीं तिथें तें अन्तरतर कर्म, ती कला, ती विद्या विकल नि विफल होते. द्रोणाचार्यापासून धनुर्विद्या सर्वच कौरव पाण्डव शिकले होते, परंतु त्या विद्येचें गुह्य वा रहस्य जसें अर्जुनानें आत्मसात् केलें होतें तसें इतर कोणी करूं शकला नाहीं; म्हणून सर्व वीरांत तो एकवीर झाला. अभिमन्यु हि महारथ होता, परंतु त्याची विद्या रहस्यज्ञानांत उणी होती. त्यामुळें चक्रव्यूह भेदूं शकला तरी त्यांतून त्याला बाहेर पडतां आलें नाहीं. तो मारला गेला. जी गोष्ट समरयज्ञाची तीच ब्रह्मयज्ञाची, वा कोणत्याहि यज्ञाची. जोंवर त्या कर्माचें, धर्माचें, कलेचें वा विद्येचें रहस्य आत्मसात् केलें जात नाहीं तोंवर त्याचें उत्तम फल, समग्र फल आणि यथाकाल फळ मिळत नाहीं. "तत् तत् कर्म कृतं यदेव मुनिभिस् तत्तत्फलैर् वञ्चितम्" असें म्हणण्याची पाळी त्या रहस्य-ज्ञान नसणारावर येते. म्हणून यज्ञकर्त्यानें यज्ञगुह्य आधीं समजून घेतलें पाहिजे. तदधीनच यज्ञाचें साफल्य आहे. यज्ञो यज्ञपतिर् यज्वा इत्यादि यज्ञ-प्रकरण संपवतांना म्हणूनच शेवटीं यज्ञगुह्य हें नाम आलें आहे. कोणतें आहे हें यज्ञ-गुह्य? फलहेतु ठेवून कर्म न करणें आणि कर्म करून फलाकांक्षा न धरणें हें तें गुह्य होय. (१) शास्त्रविहित, (२) केवळ धर्मबुद्धीनें, (३) समत्वयुक्त चित्तानें आणि फलाकांक्षा न धरतां जो यज्ञ केला जातो तोच निर्दोष म्हणजे सात्विक यज्ञ होय. त्यांतहि फलत्याग रहस्य होय.

## ९८३. अन्न

अद्यते इति अन्नम्। जें अदन केलें जातें तें अन्न होय. या विश्वाचें विश्लेषण अनेक प्रकारें संभवतें. त्यापैकीं अन्न आणि अन्नाद हा एक प्रकार आहे. या दृष्टीनें पाहिल्यास विश्वांत दोनच वस्तु दिसून येतात. अन्न आणि अन्नाद. यांनाच जीव आणि जगत् म्हणावयाचें. जीवाच्यासाठीं जगत् आहे. म्हणून तें अन्न होय. अन्नाचा अन्नाला कांहीं उपयोग नाहीं. तें अन्नादाच्या च उपयोगाचें. जडाचा जडाला कांहीं उपयोग नाहीं. तें चेतनाच्याच उपयोगाचें. गर्भ राहिला कीं स्तन्य वाढूं लागतें. स्तनंधयाच्या जन्माबरोबर तें वाहूं लागतें. स्तनंधय तर्णक झाल्यावर तें आटूं लागतें. तद्वत् पुरुषार्थ सिद्ध झाला म्हणजे प्रकृतीचे कृतकृत्य गुण प्रतिप्रसूत होऊन निलीन होतात. पण जोंवर पुरुषाचा अर्थ सिद्ध होत नाहीं तोंवर प्रकृतीच्या गुणांचा खेळ चालूच रहायचा. परमात्मा चेतन आहे, तेव्हां त्याला अन्न कसें म्हणतां येईल? तो तर अन्नादच म्हटला पाहिजे. पण अन्न आणि अन्नाद, जड आणि चेतन हा विभाग वरवरचा आहे. वस्तुतः तें उभयात्मक एकच तत्त्व आहे. अनात्म वस्तु, असात्म्य वस्तु आत्मसात् कशी होईल. सात्म्य वस्तुच आत्मसात् होऊं शकते. म्हणून अन्न आणि अन्नाद, जड आणि चेतन एकराशिच होत.

एक गूढ चेतन आहे, दुसरें रूढ चेतन आहे इतकेंच. ''पुरुष एव इदं सर्वं यद् भूतं यच्च भव्यम्। उतामृतस्य ईशानो यद् अन्नेनातिरोहति।'' या ऋचेचाच अनुवाद ''अन्नं अन्नाद एव च'' हा चरण करीत आहे. या जगांतील सर्व चराचर जीवन, जीव आणि जगत् दोन्ही, शेवटीं परमात्मसात् व्हावयाचें असल्यामुळें तें अन्न होय.

## ९८४. अन्नाद (एव च)

परमात्मा हा नुसतें अन्न नाहीं, तो त्याबरोबरच अन्नाद हि आहे. एव च या पदद्वयांतून हा अर्थ निघतो. सहस्रांत सर्वत्र नामेंच आलीं आहेत, नामेंच आहेत. त्यांत चवैतुहि पादपूरण क्वचितच आहे. आणि जिथें तें आलें आहे तिथें तें पादपूरण नाहीं तर साभिप्राय आलें आहे इथल्या सारखें. जगांत प्रकृति आणि पुरुष, क्षेत्र आणि क्षेत्रज्ञ अथवा क्षर आणि अक्षर अशीं दोन तत्त्वें दिसून येतात. आणि तीं दोन्ही परमात्म्याचीं च नामरूपें होत. म्हणजे प्रकृति होत. परमात्मा हा त्या दोहोंहून वेगळा आणि वरिष्ठ आहे, असें पुरुषोत्तम-योगांत म्हटलें आहे. वेदान्ताचा हा सिद्धान्त आहे. सांख्यशास्त्र प्रकृति आणि पुरुष म्हणजे जड आणि चेतन असें द्वैत प्रतिपादितें. योगशास्त्र त्याला क्षेत्र आणि क्षेत्रज्ञ असें रूप देतें. हें द्वैत नसून विभाग मात्र आहे. पण वेदान्तशास्त्र या दोहोंना क्षर व अक्षर पुरुष म्हणून अद्वैतच प्रतिपादितें. तीं दोन जड चेतन अशीं परस्पर भिन्न तत्त्वें न म्हणतां तीं दोन्ही पुरुष म्हणजे चेतनच होत असें म्हणतें. अन्नं आणि अन्नाद ही परिभाषा वेदोपनिषदांची आहे. प्राचीनतर आहे. अन्न खाऊन अन्नाद वाढतो. परमात्मा हा क्षर जगत् नि अक्षर जीव या दोहोंना हि आपलें अन्न करतो. या दोन्ही परा अपरा प्रकृतींना गिळतो. म्हणून तोच शेवटीं एक अन्नाद होय. जगद्भाव आणि जीवभाव दोन्ही औपाधिक च होत. परम तत्त्व म्हणा वा सनातन पुरुष म्हणा एक परमात्माच आहे. ''द्वाविमौ पुरुषौ लोके, क्षरश्चाक्षर एव च। क्षरः सर्वाणि भूतानि कूटस्थो ऽक्षर उच्यते।। उत्तमः पुरुषस् त्वन्यः परमात्मेत्युदाहृतः। यो लोकत्रयमाविश्य बिभर्त्यव्यय ईश्वरः। यस्मात् क्षरमतीतोऽहम् अक्षरादपि चोत्तमः। अतोऽस्मिलोके वेदे च प्रथितः पुरुषोत्तमः।।''

## ९८५. आत्म-योनि

आत्मा एव योनिर् यस्य सः आत्मयोनिः। आत्माच ज्याचें उपादान कारण होय तो आत्मयोनि म्हणावयाचा. घट-शरावादिकांचें उपादान मृतिका होय. कटक-कुंडलादिकांचें उपादान सुवर्ण होय. पण मृतिकेचें वा सुवर्णाचें उपादान घट-शरावादिकांच्या वा मणि-कुंडलादिकांच्या पुरतें बोलायचें झाल्यास दुसरें नाहीं. मृत् सुवर्ण स्वोपादान होय, आत्मयोनि होय. परमात्मा हि तसाच या विश्वाचें उपादान असून त्याचें आपलें उपादान हि तोच आहे. कारण, तो सर्वकारण आहे. झाडाला मूळ असतें, पण मुळाला मूळ असत नाहीं. कारण स्वतःच तें मूळ आहे. तें स्वतःच झाडाचें मूळ असतें, त्याचें दुसरें मूळ नसतें. म्हणूनच तर त्याला मूळ म्हटलें जातें. तद्वत् या विश्वकदंबाचें मूळ तो परमात्मा असून तो स्वतः आत्ममूळ म्हणजेच आत्मयोनि आहे.

योनि शब्द कारण या अर्थानें प्राचीन वाङ्मयांत रूढ आहे. 'शास्त्रयोनित्वात्' हें ब्रह्मसूत्र प्रसिद्धच आहे. लिंगशब्द हि तसाच कारण या अर्थानें रूढ आहे. जगाचें उपादान आणि निमित्त उभय कारण परमात्मा आहे हें योनि (साळुंका) व (शिव) लिंग यांच्या प्रतीकाच्या रूपानें प्रतिभावंत कवींनीं कल्पिलें आहे. पुढचें नाम स्वयंजात परमात्म्याचें निमित्त-कारणत्व सुचवीत आहे.

## ९८६. स्वयंजात

स्वयं स्वतो वा स्वेच्छया वा जातः स्वयंजातः। जो आपल्याच प्रेरणेनें झाला आहे तो स्वयंजात वा स्वयंभू म्हणावयाचा. परमात्मा हा अज असल्यामुळें त्याला

स्वयंजात असें म्हटलें असलें तरी तें लाक्षणिक होय. त्याचें तात्पर्य इतकेंच कीं त्याच्या सत्तेचें निमित्त हि तोच स्वत: आहे. मडकें घडतें तेव्हां त्या मडक्यासाठीं माती लागते आणि मडकें घडविणारा कुंभार हि लागतो. हीं दोन्ही असल्यावांचून मडकें घडूं शकत नाहीं. तसें कोणतें हि कार्य घडावयाचें झालें म्हणजे त्याला मृद्वत् उपादान कारण लागतें आणि कुलालवत् निमित्तकारण हि लागतें. परमात्म्याच्या सत्तेला हीं दोन्ही कारणें स्वत:च आहे तो. आपल्याच चित् धातूपासून आणि आपल्याच चिद्बलानें आपली सत्ता घडवून आहे म्हणून तो म्हटला आहे आत्मयोनि नि स्वयंजात. आमच्याजवळ देहाच्या भाषेहून वेगळी दुसरी भाषा नसल्यामुळें आम्ही अयोनिजाला आत्मयोनि नि आणि अजाताला स्वयंजात म्हणून संबोधीत आहोंत. वस्तुत: त्याला ना माता, ना पिता. प्रसव-पवनाचा त्याला मुळीं स्पर्शच नाहीं. तो या विश्वाचें कारण आहे पण स्वत: तो अ-कारण आहे. खरें म्हणजे त्याला विश्वाचें कारण म्हणणें हा हि आरोपच करणें होय. कारण तें हि विश्वाच्या अपेक्षेनें बोलणें झालें आणि तो आहे विश्वनिरपेक्ष केवलस्वरूप. त्याच्या दृष्टीनें आपल्यावेगळें दुसरें मुळीं कांहीं नाहींच. त्यामुळें कार्यकारणभाषाच मुळीं लटकी ठरते तथापि भावनेच्या भरांत आई जशी बाळाला अडगुलं मडगुलं सोन्याचं कडगुलं म्हणून आळवीत असते तसें भक्त भगवंताला सहस्रावधि नामांनीं आळवतांना दिसतें. त्या सर्वांनीं त्याचें निरतिशय प्रेमास्पदत्व मात्र प्रकट होतें. अन्य सर्व शून्यच होय.

## ९८७. वैखान

विशेषेण खनति इति विखान:। तस्य अयं इति वैखान:। जो विशेषत: खणतो तो विखान म्हणावयाचा. त्याचा जो पुत्र तो म्हणावयाचा वैखान. सामान्य खनक खणून आपल्या शेतांतील खोड-कुंदा काढून टाकतो. परंतु विशिष्ट खनक संसाराचीं पाळें मुळें खणून टाकतो. कर्माचीं मुळें खोलवर पसरलेलीं आहेत. त्याचें मुख्य मूळ अविद्या आहे. तज्जनित काम सर्व कर्मांचा हेतु आहे. त्या कर्मांच्या फलांची वासना ह्या नवनवीन फुटणाऱ्या आणि परत परत रुजणाऱ्या पारंब्या होत. असा हा जीवाचा संसारवृक्ष जन्मोजन्मीं वाढत जाऊन त्याचें वनच बनलें आहे. तें जो सर्व कर्मजटा खणून काढून साफ करतो आणि तिथें नैष्कर्म्याचें पीक घेतो तो विखान होय. आणि त्याचें तें नैष्कर्म्य, त्याचा तो स्वरूप-लाभ हाच वैखान. पूर्वरूप जीव होय. उत्तररूप परमात्मा होय. म्हणून तो परमात्मा जणूं त्या विखान जीवाचा, साधकाचा पुत्र म्हणावयाचा, वैखान म्हणावयाचा. हा संसार-वृक्ष, त्याचा छेद करणारा साधक, त्याचें असंगरूप शस्त्र आणि त्यानें कापून साफ करावयाचा मार्ग आणि तद्द्वारा गांठावयाचें तें वनाच्या पलीकडचें गन्तव्य म्हणजे मुक्काम, परमधाम हा सगळा चित्रपट गीतेनें पंधराव्या अध्यायाच्या आरंभीं फार थोड्या आणि म्हणून सूचक शब्दांत चितारला आहे. तिथें विखान आणि वैखान याचें वर्णन पुढीलप्रमाणें क्रमानें आलें आहे:

निर्मानमोहा जितसंगदोषा
अध्यात्मनित्या विनिवृत्त-कामा:।
द्वंद्वैर् विमुक्ता: सुखदु:खसंज्ञैर्
गच्छन्त्यमूढा: पदमव्ययं तत्।।
न तद् भासयते सूर्यो न शशाङ्को न पावक:।
यद् गत्वा न निवर्तन्ते तद् धाम परमं मम।।

## ९८८. साम-गायन

सामानि गायति इति साम-गायन:। जो सामें गातो तो सामगायन म्हणावयाचा. पण साम म्हणजे काय? साम म्हणजे इतिकर्तव्यता झाल्यावर माणसाला प्राप्त होणारी धन्यता. जींत कुठल्या हि विषमाला स्थान नाहीं त्या साम्य-दशेचें नांव होय साम. काम हें एक टोक, साम हें दुसरें टोंक. जोंवर कांम आहे, कर्तव्याची जाणीव आहे, तोंवर माणसाला चैन कुठली? तो

सदैव बेचैन च रहायचा. पण ज्याचे काम-संकल्प संपले आहेत, कुठलें कर्तव्य म्हणून शेष राहिलेलें नाहीं त्याचें काम एकच, स्वानंदांत डुंबत रहायचें आणि स्वानन्दोद्गार काढत जायचे. हे जे धन्योद्गार त्याचेंच नांव साम होय. आणि तें जो काढत राहतो तो होय साम-गायन. इथें गायक न म्हणतां गायन म्हटलें आहे. त्यांत हेतु आहे. गायक हा कर्मवाचक शब्द आहे, तर गायन हा स्वभाववाचक शब्द आहे. तो नैष्कर्म्यास पोंचलेला साधक स्वभावत: सामगान करीत राहतो. तो दुसरें काय करणार? स्वधर्माच्या रगड्यांत ज्ञानाचा सोमरस गाळून तो पिऊन जे तर्र झाले ते सामगान करीत राहतात. हाउ हाउ हाउ असें साम आलापत राहतात. हाउ हाउ हाउ या शब्दाचा काय अर्थ? इथें शब्दाला अर्थाला, भावाला वाव नाहीं. हा त्या स्थूल सूक्ष्म आणि सूक्ष्मतर भूमिकांच्या पलीकडचा निभृत आनंदाचा कल्लोळ आहे. तृप्तीचा तो ढेकर आहे. उपाशी माणसाला जसा तृप्तीचा ढेकर येणें नाहीं तसा परमसाम्यरूप परमात्म्याला पोंचल्या वांचून सामगायन हि करतां यावयाचें नाहीं. अर्थात् जो सामगायन करील तो सामरूप झालेलाच समजला पाहिजे. म्हणून तो परमात्माच सामगायन होय. उपचारानें त्या अवस्थेला पोंचण्याची पात्रता बाळगणारे हि सामगायन म्हणावयाचे! "इहैव तैर् जित: सर्गो येषां साम्ये स्थितं मन:। निर्दोषं हि समं ब्रह्म तस्माद् ब्रह्मणि ते स्थिता:।।"

## ९८९. देवकी-नन्दन

देवक्या: नन्दन: देवकी-नन्दन:। देवकीं नन्दयति इति वा देवकी-नन्दन:। देवकीच्या पोटीं जन्मून ज्यानें तिला कंसाच्या कैदेंतून मुक्त करून आनन्दित केलें तो देवकीनन्दन म्हणावयाचा. प्रत्येक पुत्रच आपल्या जन्मानें आईला आनन्दवीत असतो, म्हणून तो नन्दन होय. तसा देवकीचा प्रत्येक पुत्रच देवकीनन्दन होय. परंतु इथें देवकीनंदन म्हणजे भगवान् कृष्ण होय. कारण त्यानेंच कंसाला मारून आपल्या आईबापांची कैदेंतून सुटका केली आणि त्यांना विशेषत: सुखविलें आहे. आईचें व बापाचें दु:ख समानच होतें. परंतु आईच्या नितान्त असहायताजनित तीव्र भावनेमुळें तिचें दु:ख परमावधीचें होतें. म्हणून तिलाच तो विशेषत: नन्दन म्हणजे सुखविणारा झाल्यास नवल नाहीं. म्हणून हि तो कृष्ण परमात्मा देवकीनन्दन म्हणविला आहे. हाच भाव प्रसिद्ध नमनाच्या श्लोकांत 'देवकीपरमानन्दं' म्हणून प्रकट झाला आहे. चन्द्र सर्व जगालाच आह्लादवीत असतो, परंतु अनन्यगतिक चकोराला तो विशेषत: सुखवीत असतो. हा विशेष चन्द्रांत तितका नाहीं जितका तो चकोरांत आहे. म्हणून तो कृष्ण परमात्मा वसुदेव-सुत असला तरी देवकी-नन्दन आहे. परमानन्द आहे, देवकी-परमानन्द आहे. जोंवर जीव आपल्याला देवकीप्रमाणें सर्वस्वीं असहाय समजून परमात्म्याला अनन्यभावानें शरण जात नाहीं तोंवर त्याला तो देवकीनन्दन या जीवत्वाच्या कारेंतून मुक्त करून तो आत्मानन्द देत नाहीं. इथून पुढें ग्रंथ-समाप्तीपर्यंत सर्व नामें कृष्ण परमात्म्याला अनुलक्षून आलीं आहेत. कारण भीष्माला आणि व्यासाला कृष्ण हा वर्तमान अवतार होता.

## ९९०. स्रष्टा

सृजति इति स्रष्टा। जों सृष्टि करतो तो स्रष्टा म्हणावयाचा. देवकीचा नंदन हा मर्त्य-बुद्धीनें पाहतां कामा नये. तो देव आहे, या सृष्टीचा कर्ता आहे, या पृथ्वीचा पति आहे, क्षितीश आहे, तो सर्व पाप नाहींसें करणार पाप-नाशन आहे. "देवकीनन्दन: स्रष्टा क्षितीश: पापनाशन:" हा संपूर्ण श्लोकार्ध कृष्णाचें दिव्य जन्म कर्म सांगणारा आहे, अर्थात् त्याचें मर्त्यत्व निरस्त करणारा आहे. कृष्णाचें विश्वरूप पाहून अर्थात् त्याचें दिव्यत्व ओळखून आपण आजवर त्याच्याशीं मर्त्यबुद्धीनें वागलों याबद्दल अर्जुन खेद करतो, क्षमा मागतो आणि प्रसन्न हो म्हणून विनवितो आहे:

सखेति मत्वा प्रसभं यदुक्तं
हे कृष्ण हे यादव हे सखेति।
अजानता महिमानं तवेदं
मया प्रमादात् प्रणयेन वापि।।
यच्चावहासार्थमसत्कृतोऽसि
विहार-शय्यासन-भोजनेषु।
एको ऽथवाप्यच्युत तत्समक्षं
तत् क्षामये त्वामहमप्रमेयम्।।
तस्मात् प्रणम्य प्रणिधाय कायं
प्रसादेत्वामहमीशमीड्यम्।।

जोंवर दिव्यत्वाची प्रतीति होत नाहीं, तोंवर जीव इतरांशीं मर्त्यबुद्धीनें वागत राहतो. पण जेव्हां त्याला दिव्यत्वाची ओळख पटते, त्याला खेद होतो. तो क्षमा मागतो. तो कृपा भाखतो. भगवन्तानें स्वत:च म्हटलें आहे:

नाहं प्रकाश: सर्वस्य योगमाया-समावृत:।
मूढोऽयं नाभिजानाति मामेभ्य: परमव्ययम्।।

भगवन्ताचें हें अभिज्ञान करून घेण्याची आस्था न बाळगणारे ते दुष्कृति होत, पापी होत. स्वरूपाची ओळख करून न घेतल्यामुळें ते शेवटीं आसुर भावास प्राप्त होतात. परंतु जे हें अभिज्ञान करून घेऊं इच्छितात ते मोहांतून सुटून पुण्यमार्गानें शेवटीं देवत्वास पावतात. अशा चतुर्विध भक्तांमध्यें ज्ञानी हा शिरोमणि होय. कारण तो परमात्म्याचें तत्त्वत: ज्ञान राखतो. ''आस्थित: स हि युक्तात्मा मामेवानुत्तमां गतिम्।'' इतर भक्त जिज्ञासु असतात. श्रद्धेनें भजत असतात. परमात्मा ह्या सृष्टीचा कर्ता आहे या पृथ्वीचा पालक आहे, आम्हा भक्तांचें पाप हरण करणारा आहे, असें म्हणून ते त्याला भजत असतात. परमात्मा अशा श्रद्धावंत पुण्यात्म्यांना हि बुद्धियोग देऊन स्वरूप-साक्षात्कार करवितो.

## ९९१. क्षितीश

क्षिते: ईश: क्षितीश:। क्षितीचा म्हणजे पृथ्वीचा जो ईश तो क्षितीश म्हणावयाचा. सृष्टि क्षिति आणि देह हे उत्तरोत्तर निकटवर्ती परिधि होत. आमचें अगदीं लगतचें आवरण म्हणजे देह. हाच भूर्लोक होय. आमचा देह ज्या लोकांत वावरत आहे तो भूलोक म्हणजे भुवर्लोक होय. आणि आमचा भूगोल आणि इतर सगळे गोल ज्या विश्वांत वावरत आहेत तो स्वर्लोक होय. अशी ही आमची त्रिलोकी आहे. हेंच आमचें विश्व. या विश्वाची सृष्टि करणारा तो स्रष्टा होय. त्यांतील ज्या भूगोलाशीं आमचें जीवन विशेषत: निगडित आहे त्या भूगोलाचा शास्ता तो क्षितीश होय. आणि ज्या विशिष्ट देहांत राहून आम्ही सुख-दु:ख अनुभवतो आहों, जो घेऊन आम्ही स्वर्ग-नरकादि उच्चावच लोकांत संसरत आहों, तो देहच पाप होय. आणि त्या पापाचा नायनाट करणारा तो पाप-नाशन होय. तो देवकीनन्दन कृष्ण परमात्माच स्रष्टा आहे, क्षितीश आहे आणि पापनाशन हि तोच आहे. म्हणून क्रमानें स्रष्टा क्षितीश: पापनाशन: हीं पदें आलीं आहेत. या पृथ्वीवर मानवाचें शासन चालत नाहीं तें त्या परमात्म्याचें आहे. परमात्मा धर्माचें रक्षण आणि अधर्माचें पारिपत्य करून या क्षितीचें ईशन करीत आहे. जे राजे महाराजे आणि शासक-वर्ग या ईश्वरी कार्यांत सहायभूत होतात ते तितक्या अंशानें ईश्वरी कार्यच करतात. जे त्याच्या विरुद्ध वागतात ते धर्मद्रोही रावण-दुर्योधनाप्रमाणें नाश पावतात. परमात्म्याचें हें ईशन अत्यंत व्यापक आणि सूक्ष्म असल्यामुळें जीवाच्या लक्षांत येत नाहीं आणि वृथाच हा आपल्याला राजा म्हणवत असतो. वस्तुत: राजा तो आहे, क्षितीश तो आहे.

## ९९२. पाप-नाशन

पापं नाशयति इति पाप-नाशन:। पाप नाहींसें करतो तो पापनाशन म्हणावयाचा. स्वरूपाचें विस्मरण म्हणजे मरण होय आणि तेंच पाप. हें पाप कशामुळें घडतें? देहात्मबुद्धीमुळें घडतें. म्हणून ती देहात्मबुद्धि नि तो देह पाप होय. याच गोष्टीला अनुलक्षून आम्ही म्हणतों:—

**पापो ऽहं पापकर्माहं पापात्मा पापसंभवः।**
**त्राहि मां पुण्डरीकाक्ष सर्वपापहरो हरिः।।**

देहात्मबुद्धीच्या योगेंच आम्ही देहधारी होतों, म्हणून म्हणावयाचें पाप-संभव, पापापासून जन्मलेला. जो पापाचा झालेला तो म्हणावयाचा पाप, म्हणजेच पापी. जो पापी असतो त्याचें बाह्य कर्म तर पापमय असतेंच पण त्याचें अंतर हि पापमय च असतें. कारण, जसें अंतर तसेंच त्याचें कर्म होत असतें. म्हणून म्हटलें आहे– पापकर्मा आणि पापात्मा. अशा या पापी जीवाचें पाप कोण नाहींसें करतो ? तें तो पुण्डरीकाक्ष हरि करतो. पुण्डरीक म्हणजे श्वेतकमल. त्याप्रमाणें ज्याची निर्मल ज्ञानदृष्टि अनात्म देहादिकांच्या ठाईं सर्वत्र असक्त आहे तो विविक्तदृक् परमात्मा पुण्डरीकाक्ष होय आणि तोच देहात्मबुद्धीचें हरण करतो म्हणून तो हरि. आणि जो हरि तोच पापनाशन. देहात्मबुद्धीच्या अंधाऱ्या रात्रीं माणूस सहजच पापाच्या आडवाटेस लागतो आणि जितका जितका तो भटकत जातो तितका तितका तो अधिकच मार्गापासून नि मुक्कामापासून दूर पडतो. हें सगळें पाप आत्मबुद्धि-रूप दिवाकराच्या उदया बरोबर नाहींसें होतें म्हणून तो हरि, म्हणून तो पाप-नाशन म्हणावयाचा.

### ९९३. शंखभृत्

शङ्खभृत् शंखं बिभर्ति इति शंखभृत्। जो शंख धारण करतो तो म्हणावयाचा शंखभृत्. ''शंखभृत् नन्दकी चक्री'' इत्यादि हा श्लोक सहस्राचा शेवटचा श्लोक आहे. इथें परमात्म्याचें नुसतें नाम नाहीं गाइलेलें, त्याचें रूप रेखाटलेलें आहे. डोळ्यांसमोर त्याची मूर्ति उभी केली आहे. कशी आहे ती मूर्ति ? अक्षोभ्य. म्हणजे शान्ताकार. तो सर्वलोकैकनाथ परमात्मा आपल्या अचिन्त्य शक्तीच्या सामर्थ्याच्या प्रभावामुळें शान्त आहे. सर्व भयें केवळ त्याच्या सत्तेनेंच निरस्त झालेलीं आहेत. सर्व दुष्टांचा कायमचा बन्दोबस्त झाला आहे आणि सर्व सज्जनांचा सांभाळ झाला आहे. सदासर्वकाळ सर्वत्र धर्माची स्थापना झाली आहे. अशुभाचें कुठें नांव उरलेलें नाहीं. सर्वत्र परिपूर्ण मंगल आहे. हें आश्वासन गर्जत त्याचा पाञ्चजन्य शंख त्याच्या हातांत विराजमान आहे. म्हणून तो म्हटला आहे शंखभृत्. आरंभींच हें आश्वासन देणारें त्याचें शंखभृत् ध्यान अगदीं योग्य असेंच आहे. शंखचक्रगदापद्मधारी चतुर्भुज विष्णूच्या ध्यानांत हि आधीं शंखच येतो. तिथें तो दिग्तत्त्वाचा वाचक आहे. सगळया दिशा त्याच्या मुठींत आहेत. चक्र कालतत्त्वाचें वाचक आहे. सर्व काल त्याच्या हातांत आहे. भूतभविष्यवर्तमानात्मक कालचक्राचा तो नियन्ता आहे. गदाभृत् हें निग्रह-शक्तीचें गमक असून पद्म हें अनुग्रहशक्तीचे गमक होय. तो सर्वशक्तिमान् परमात्मा दिक्कालातीत असून सर्व लोकांचा नि सर्व काळांचा शास्ता आहे. निग्रहानुग्रह-सामर्थ्य त्याचें आहे. हें रहस्य त्याचें शंखचक्र-गदापद्मधारी चतुर्भुज रूप उलगडून सांगतें. शंख हा जसा दिक्तत्त्वाचा वाचक आहे तसा तो शब्दगुण आकाशाचा हि वाचक आहे. सत्यस्वरूप परमात्म्याचा शब्द म्हणजे वेदशास्त्र होय. सर्वज्ञान त्यांत निहित आहे. त्या सत्यज्ञानमय वेदशास्त्राचें प्रतीकच असा तो शंख भगवंताच्या हातांत आहे. तो विधिनिषेधमुखानें दुहेरी घोष करतो. निषिद्ध आचराल तर तुम्हांला भय आहे, विहित आचराल तर अभय आहे, असें तो गर्जून सांगत आहे. त्यांतच दुष्टांना शिक्षण व सज्जनांना रक्षण आहे. आणि सर्व अमंगल नष्ट होऊन केवल मंगलच मंगल नांदेल याचें आश्वासन आहे.

### ९९४. नन्दकी

नन्दकी म्हणजे नन्दक नांवाचे खड्ग धारण करणारा. शिवाजी महाराजांची भवानी तलवार प्रसिद्ध आहे, तसें भगवंताचें नन्दक खड्ग. वीरांची शस्त्रें त्यांच्या पराक्रमी धर्मकार्यामुळें नावानें प्रसिद्ध आहेत, मग भगवंताचीं आयुधें, त्याचा रथ, त्याचे

अश्व, त्याचा सारथि इत्यादि नांवानें प्रसिद्ध असल्यास नवल नाहीं. कारण तो परमात्मा तर जगदेकवीर आहे. तिन्ही लोकीं आणि तिन्ही काळीं तो दुष्टांचें निर्दलन, सज्जनांचें पालन आणि सद्धर्माची स्थापना करणारा आहे. या भगवत्कार्यास सहायभूत नन्दक असीला पाहून जगाला अभय मिळतें आणि तें आश्वस्त होतें, आनंदित होतें. म्हणून त्या भवभयभंजन, मुनिजनरंजन खड्गाचें नांव नन्दक होय. शत्रु-संकटांत सांपडलेल्यांना आपली सुटका करण्यासाठीं आलेल्या मुक्तिसेनेचीं शस्त्रें पाहून किती आनंद होतो! तशीं भगवंताचीं सगळीं शस्त्रें सुदर्शन आहेत, नन्दक आहेत. तीं परमानन्द देणारीं आहेत, परम दु:खांतून भवभयांतून सोडवणारीं आहेत. निरनिराळ्या रोगावरील निरनिराळ्या शस्त्र-क्रियांसाठीं शल्यचिकित्सक ज्या प्रमाणें निरनिराळीं शस्त्रें बाळगतो आणि वापरतो त्याप्रमाणें भगवंताचीं नाना शस्त्रें भवरोगनिवारणांतील नाना कार्यासाठीं वापरलीं जाणारीं आहेत. धडापासून मुंडकें वेगळें करायला तलवार वापरली जाते, त्याप्रमाणें अविद्येचें मूळच छेदून टाकण्यासाठीं विद्यामय नन्दक असि वापरला जातो. यमनियमांच्या वा शमदमांच्या गदा-घातानें अर्धमेल्या झालेल्या अविद्येची उरली सुरली धुगधुगी तिचें मुंडकें मारलें जातांच संपते. हा अंतिम सफाईचा हात विद्यामय नंदक मारतो. त्यानंतरच निर्भेळ परमानन्द लाभायचा. म्हणून भगवंताच्या हातांतील असीचें नाव नंदक.

## ९९५. चक्री

चक्री म्हणजे सुदर्शनचक्रधारी. शंखचक्रगदापद्म हीं आहेत चतुर्भुज विष्णूचीं मुख्य आयुधें वा आभूषणें. जें जीवितकार्य असतें त्याचीं उपकरणें म्हणजे आयुधेंच त्याचीं आभूषणें होतात. कृषिवलाचें कृषि हें जीवितकार्य होय. त्या कृषिकार्याचीं जीं उपकरणें तींच त्याचीं आयुधें म्हणावयाचीं. आयुध शब्दापासूनच आउत शब्द आलेला आहे. मनुष्यसमाज हा मुख्यत: कृषिजीवी आहे. त्यामुळें चक्र हल मुसल हीं त्याचीं सहजच आयुधें झालीं. चक्री म्हणजे गाडीवान. शेताचे बांधबंधारे बांधण्यासाठीं दगडमाती वहावी लागते. शेतांत खतमूत वहावें लागतें, कुंपणासाठीं कांट्या वाहाव्या लागतात. शेतांतून घरीं लांकूडफाटा आणावा लागतो, शेतमाल आणावा लागतो, कडबा कुटार आणावें लागतें. गाड्या वांचून हें होऊं शकत नाहीं म्हणून तो चक्री हवा. कृष्ण धाकटा भाऊ म्हणून त्याच्या कडे गाईगुरें राखायचें व गाडी हांकायचें हलकें काम आलें. बलराम वडील भाऊ म्हणून त्याच्याकडे नांगर धरायचें व मुसळानें मळणी करायचें भारी काम आलें. ह्या कामाच्या वांटणीमुळें कृष्ण गोपाळ व चक्री म्हणजे चक्रधर म्हणून प्रसिद्ध आहे तर बलराम हली व मुसली म्हणून प्रसिद्ध आहे. मनुष्याचा देव मनुष्याकृति आणि त्याचा धंदा करणाराच असावयाचा. तदनुसार आमचा देव चक्री म्हणजे गाडीवान गडी आहे. तो कृषि गौरक्ष्य वाणिज्य काम करणारा आहे. त्याच्या रक्षणासाठीं त्याला केव्हां केव्हां आउत सोडून हत्यार हि धरावें लागतें हातीं. त्याहि कारणानें तो मग रथांगपाणि होतो. शस्त्रपाणि होतो. प्रसंगीं कर्तव्यमोह होऊन क्षोभ झाला असतां त्याला आउत नि आयुधहि बाजूला ठेवून अक्षोभ्य वृत्तीनें ज्ञानोपदेश देऊन मोह-निवारणहि करावें लागतें. अशा हि प्रकारें तो धर्मचक्र-प्रवर्तनामुळें चक्री होय.

## ९९६. शार्ङ्गधन्वा

शार्ङ्गनाम धनु: अस्य अस्ति इति शार्ङ्गधन्वा। ज्याचें धनुष्य शृंगाचें बनलेलें आहे तो म्हणावयाचा शार्ङ्गधन्वा. भगवान् विष्णु शार्ङ्गधन्वा म्हटला आहे. विष्णूचें म्हणजे आदि पुरुषाचें हत्यार गदा आहे. परंतु त्याच्या दश अवतारांत धनुर्धारी म्हणून प्रसिद्ध दाशरथी रामच आहे. एक दगडाचा गोळा आणि

त्याला सुलभतेनें हाताळायला एक दांडा जोडला कीं झाली तयार गदा. अश्मयुगीन मानवाचें तें हत्यार आहे. पण त्याला धार नव्हती. त्यालाच धार करून आणि वजनानें हि हलकें करून परशु बनला आहे. पण हा काळ पर्यंत लोहाचा शोध लागला होता. तेव्हां प्रस्तर व ताम्र मागें पडून हत्यारें लोखंडाचीं बनूं लागलीं व लोहयुगांत पहिलें महत्त्वाचें हत्यार तयार झालें परशु म्हणजे नवकुठार. त्याचा जंगी प्रयोग भार्गव रामानें केला म्हणून तो परशुराम म्हणून प्रसिद्ध आहे. पण परशूला धार आली तरी तो लांब फेकतां येत नव्हता. दूरच्या सावजाला त्यानें मारतां येत नव्हतें. त्यासाठीं धनुष्याचा शोध झाला. धनुष्यानें बाण म्हणजे सूक्ष्म भाला फेकून मारतां येऊं लागला. हें धनुष्य म्हणजे बाण फेकायचें साधन, ज्याला चाप वा इष्वास म्हणतात, शिकारी मानवानें प्रथम धनुराकार सावजाच्या जोड-शिंगापासून, शिंगाच्या कांबीपासून व त्याच्याच आंतड्याची तांत जोडून करणें अगदीं स्वाभाविक होय. आणि त्यामुळेंच आदिपुरुष भगवान् विष्णु हा शार्ङ्गधन्वा झाला आहे. गदा हें अमुक्त शस्त्र आहे. बाण हें मुक्त शस्त्र आहे आणि भाला हें मुक्तामुक्त शस्त्र आहे. हे सगळे प्रकार माणसाला यथावसर वापरावे लागतात त्यामुळें तो सर्वप्रहरणायुध होतो. आणि त्यामुळेंच त्याचा आदर्श तो सर्वशक्ति परमात्मा परम पुरुष हि सर्वप्रहरणायुध म्हटला आहे शेवटीं. पण तत्पूर्वीं गदा, असि म्हणजे भाला आणि धनुर्बाण यांचा व चक्राचा हि उल्लेख केला आहे. तो केवळ सूचक समजावयाचा. तो इयत्तावाचक नव्हे.

## ९९७. गदाधर

गदां धारयति इति गदाधरः। जो गदा धारण करतो तो म्हणावयाचा गदाधर. आदि मानवाचें हत्यार गदाच होतें. म्हणून त्याचा तत्कालीन आदर्श हि गदाधर भगवान् झाला. पण पुढें जसजशीं नवीं नवीं हत्यारें आलीं. तशीं तीं त्याच्या हातीं देणें जरूर होतें. परंतु इतके हात आणि इतकीं शस्त्रें कशीं दाखविणार? म्हणूनच चतुर्भुज रूपच असंख्य हस्तांचें प्रतीक मानून घ्यावयाचें. दोन हात त्या अव्यक्त परमात्म्याचें आणि दोन हात व्यक्त परमात्म्याचे म्हणजे विश्वाचे मिळून परमात्म्याची सांगसंपूर्ण चतुर्भुज मूर्ति झाली. तिच्या हातांत सर्व सत्ता आहे. निग्रह शक्तीचे प्रतीक गदा ही अशा प्रकारें नुसती गदा नसून सर्व शस्त्रास्त्रांची प्रतिनिधि होय. हा भाव सर्वप्रहरणायुध या अन्तिम पदानें शेवटीं स्पष्टच व्यक्त केला आहे. विष्णूचें ध्यान चतुर्भुज, आणि त्यानें धारण केलीं आहेत असंख्य शस्त्रें! ह्याचा मेळ कसा बसवावयाचा? गदेंत सर्व शस्त्रांचा समावेश करून. केकावलींत ''गदारिदरनन्दकांबुजधरा नमस् ते सदा''. असा चरण आला आहे. तिथें प्रश्न उत्पन्न झाला कीं हात चार आणि धारण करावयाच्या वस्तु तर पांच उल्लेखिल्या आहेत–(१) गदा, (२) अरि म्हणजे चक्र, (३) दर म्हणजे शंख, (४) नन्दक खड्ग आणि (५) अम्बुज म्हणजे कमळ. लोकमान्यांनीं नन्दक खड्ग कमरेला अडकवून त्याची व्यवस्था लावून दिली. धनुष्याचा उल्लेख असतां तर तें खांद्याला देतां आलें असतें अडकवून. परंतु सर्व प्रहरणें म्हटल्यानंतर ही युक्ति चालणार नाहीं. तिथें तीं सर्व शस्त्रें एका गदेंतच समाविष्ट समजावयाचीं. अर्थात् गदा म्हणजे निग्रह-शक्ति समजावयाची. तींत भूत भविष्य वर्तमान सर्व शस्त्रें निहित आहेत.

## ९९८. रथाङ्गपाणि

रथाङ्गं पाणौ यस्य सः रथाङ्ग-पाणिः। ज्याच्या हातीं रथांग म्हणजे चक्र आहे तो म्हणावयाचा रथांग-पाणि. याच श्लोकांत चक्री हें पद येऊन गेलें आहे आणि पुनः हें रथांग पद आलें आहे. ही उघडच पुनरुक्ति आहे. त्याऐवजीं अम्भोजपाणि असतें तर शंखचक्रगदापद्म या चारी भगवत्-चिह्नांचा क्रमानें

उल्लेख आला असें झालें असतें. म्हणजे पुनरुक्तीचा दोष टळून अपेक्षापूर्तीचा गुण जोडला गेला असता. परंतु वक्ता वक्तृत्वाच्या ओघांत पुष्कळदा पुनरुक्ति करतो, एखादा मुद्दा मांडायचा योजलेला असून हि बोलतांना विसरून जातो. त्या प्रमाणेंच हें इथें झालें आहे. हा दोष असला तरी त्यांत स्वाभाविकता वा अकृत्रिमता हा महान् गुण आहे. तें जिवंतपणाचें लक्षण आहे. एखादी मूर्ति अगदीं सर्वांगसुंदर असेल, तिच्यांत शोधूनहि दोष सांपडावयाचा नाहीं. पण तिथें जिवंतपणा तेवढा नसतो. तसें हें आहे. हें सहस्र सदोष भासलें तरी जिवंत आहे. निर्दोष आणि निर्जीव नाहीं. त्याच्या जिवंतपणानें त्याचे किरकोळ दोष क्षम्य ठरतात. पण निर्दोषत्वानें निर्जीवपण समर्थनीय ठरणार नाहीं. मद्यांत गुण शोधून सांपडावयाचा नाहीं. तें संपूर्णच त्याज्य. जित्यांत दोष न शोधतां हि आढळतील, पण ते त्याच्या जिवंतपणांत बुडून जातात. म्हणून तें दोषांसगट हि गोड होय. भगवंताच्या शंख चक्र गदा पद्म या चतुरंग चिह्नांत चक्र हें वस्तुत: आयुध नव्हेच. शंख व पद्म हीं आयुधें नव्हेत. एक गदा तेवढें आयुध आहे. आणि हीं सगळीं भगवत्चिह्नें भगवत्तेची भगवत्-शक्तीचीं प्रतीकें आहेत. काल ही भगवंताच्या हातांतील म्हणजे भगवद्धीन एक महान् शक्ति आहे. आणि तिच्या अधीन हें सारें विश्व आहे. सारें व्यक्त विश्व अव्यक्त कालाच्या अधीन आहे. तें कालवश होतें. म्हणून कालचक्र हें भगवंताच्या हातात शस्त्ररूपानें विराजमान आहे. इतर कोणी अनीश तें शस्त्र हाताळूं शकत नाहीं. तें केवळ भगवच्छस्त्र आहे.

## ९९९. अक्षोभ्य

क्षोभ्य: क्षोभार्ह:। न क्षोभ्य: अक्षोभ्य:। जो क्षोभणें शक्य नाहीं तो म्हणावयाचा अक्षोभ्य. क्षोभ कुणाला होतो? ज्याला योगक्षेमाची चिंता असेल त्याला. ज्याला कांहीं मिळवावयाचें आहे आणि मिळवलेलें राखावयाचें आहे त्याला. जो परमात्मा परिपूर्णतास्वरूप आहे त्याला काय मिळवावयाचें असणार आणि काय राखावयाचें असणार? पूर्णात्मा कुठल्या हि वस्तूच्या अभावानें पीडित होत नसल्यामुळें तो वीतराग आहे. रजोगुणसमुद्भव राग हा तृष्णा आणि संग यांना जन्म देतो. अप्राप्त इष्ट वस्तूची आकांक्षा म्हणजे तृष्णा होय. प्राप्त इष्ट वस्तूचा वियोग होऊं नये, ती आपल्याजवळ सतत रहावी असें वाटणें हा संग होय. राग हा असा उभयात्मक आहे. ज्याला हा राग असतो त्याला इष्टानिष्टवस्तूंच्या वियोगायोगांचें सतत भय राहतें. आणि जिथें हें भय असतें तिथें क्रोध म्हणजेच क्षोभ असतो, कंप असतो. आणि जिथें अन्त:करण कंपित आहे तिथें स्वच्छ आणि स्थिर आत्मदर्शन होत नाहीं. म्हणजेच तिथें आत्म-स्वरूपोपलब्धि नसते, स्वरूपावस्थान नसतें. हीच जीवदशा होय. परंतु परमात्मा हा सदैव स्वरूपावस्थित असल्यामुळें तो या राग-भय-क्षोभरूप अनर्थ-परंपरेंतून सर्वथा मुक्त असतो. म्हणून तो म्हणावयाचा अक्षोभ्य. अक्षोभ हें निवर्तक पद आहे. त्याचेंच प्रवर्तक वा भाव रूप शम होय. परमात्मा हा शमस्वरूप आहे, शान्ताकार आहे. अक्षोभ आणि शम हीं दोन्हीं पदें निवर्तक व प्रवर्तक स्वरूपाची असून तीं सापेक्ष आहेत. एकाच नाण्याच्या दोन बाजू होत त्या. मग इथें नाणें कोणतें? नाणें आहे साम्य. परिपूर्ण साम्य. तेंच पूर्ण होय. या पूर्णाचें पूर्णत्व वेदोपनिषदांनीं ''ॐ। पूर्णं अद: पूर्णं इदं, पूर्णात् पूर्णं उदच्यते। पूर्णस्य पूर्णं आदाय पूर्णमेवावशिष्यते।'' असें पूर्णपणें गाइलें आहे.

## १०००. सर्वप्रहरणायुध

सर्वाणि प्रहरणानि आयुधानि यस्य स: सर्वप्रहराणायुध:। सर्वच हत्यारें ज्याचीं आयुधें होत तो म्हणावयाचा सर्वप्रहरणायुध:. परमात्मा हा सर्वशक्तिमान् आहे. त्यामुळें तो सर्व प्रहरणायुध होय. त्याच्या वर कोणाची मात्रा चालत नाहीं, पण तो मात्र

सर्वांवर मात करतो म्हणून तो सर्वशक्तिमान् म्हणावयाचा, सर्वप्रहरणायुध म्हणावयाचा. अमुक एक त्याचें शस्त्र नाहीं असें नाहीं. जीं जीं प्रहरणें म्हणजे हत्यारें होणें संभवतें तीं तीं सर्व त्याचीं आयुधें होत. ढाल आणि तरवार हीं दोन्ही हत्यारेंच. एक बचावाचें, दुसरें उठावाचें. दोहों मिळून संरक्षण. शंख हें जलचराचें संरक्षक कवच त्याचें हत्यारच होय. कच्छपाचें कठिन पृष्ठ त्याचें हत्यार होय. वराहाचा सुळा हें त्याचें खड्ग होय. नरसिंहाचीं नखें हें त्याचें शस्त्र होय. वामनाची गूढ वाणी त्याचें हत्यार होय. परशुरामाचा परशु, रामाचें धनुष्य, कृष्णाचें चक्र तर उघडच शस्त्रें होत. पण बुद्धाची सत्यपूत व दयामय वाणी हि शस्त्र होय. कारण ती प्रतिपक्षावर मात करते. शेवटीं शस्त्रास्त्रांच्या विकासांत सत्याग्रह म्हणजे अहिंसक तपच सर्वोत्तम आयुध होय. जीवाच्या उत्क्रांतींत आणि मानव्याच्या विकासांत गांठला गेलेला परमोच्च बिंदु होय. उर्वशी हें इन्द्राचें सुकुमार प्रहरण होय. तसें सत्याग्रह म्हणजे अहिंसक तप हें परमात्म्याचें कुसुम-कोमल वज्र आहे. दधीचि ऋषीच्या अस्थींपासून बनलेल्या ह्या वज्रानेंच तर इन्द्र परमात्म्यानें वृत्रासुराचा वध केला आहे. आणि हें अहिंसक तप करीत तो नर-नारायण बदरिकाश्रमांत आज हि विराजमान आहे. चिन्यांची धाड त्यानेंच परतविली आहे.

## १००१. "सर्वप्रहरणायुध ॐ नम इति"

द्विर्वचन म्हणजे अन्तिम पदाचा पुनरुच्चार, ग्रंथ-समाप्ति सुचवितो. जणूं दोन रेघा मारून खातें बंद केलें आहे. शेवटीं एकाक्षर ब्रह्माचा, ॐकाराचा उच्चार करून नमस्कार केला आहे. ॐकार सर्वांचें मूळ आहे म्हणून तो आरंभीं उच्चारला जातो. ॐ विश्वम् म्हणून सहस्राचा आरंभ झाला आहे. ॐकार च सर्वांचें फळ आहे, म्हणून तो अन्तीं उच्चारला जातो. 'ॐ नम:' म्हणून सहस्राचा समारोप केला आहे. ॐ ही वैदिक धर्माची मुद्रा आहे. देवमंदिरांत देवमूर्ति षोडषोपचार-पूजित विराजमान असते. आपण दर्शन घेतों, प्रदक्षिणा करतों आणि नमस्कार करून देवदर्शन संपवितों. तसें इथें केलें आहे. अनन्ताच्या या विश्वमंदिरांत त्याच्या सहस्रावधि मूर्तींचें दर्शन घेऊन त्यांची सहस्र प्रदक्षिणा करून नम: म्हणून नमस्कार केला आहे. कायेनें दण्डवत् प्रणिपात केला आहे, वाणीनें जप केला आहे, चित्त लीन झालें आहे. सर्वात्मना त्याच्या चरणीं हा जीवभाव समर्पित आहे. ॐ तत् सत्.

**घेईं घेईं माझे वाचे। गोड नाम विठोबाचें.**
**डोळे तुम्ही घ्या रे सुख। पहा विठोबाचें मुख।**
**तुम्ही आइका रे कान। माझ्या विठोबाचे गुण।**
**मना तेथें धांव घेईं। राहें विठोबाचे पाईं।**
**तुका म्हणणे माझ्या जीवा। नको सोडूं या केशवा।।**

□□□

# उपसंहार

श्लोक : १

इतीदं कीर्तनीयस्य केशवस्य महात्मन:।
नाम्नां सहस्रं दिव्यानां अशेषेण प्रकीर्तितम्।।

अर्थ

असें हें कीर्तनीय विश्वात्मा विष्णूच्या दिव्य नामांचें सहस्र संपूर्ण सांगून झालें.

टिप्पणी

१. इथें सहस्र संख्येचा उल्लेख उक्त नामें सहस्र-परिमित आहेत, एक न्यून वा एक अतिरिक्त नाहीं, हें सांगण्यासाठीं आलें आहे. अर्थात् कुणालाहि तीं न्यून-अधिक कल्पिण्याची अनुज्ञा नाहीं.

२. कीर्तनीय म्हणजे भक्तांनीं एकत्र मिळून गावयाचा. हें नामसहस्र जेव्हां उपासक एकान्तांत एकटाच जपतो तेव्हां तें जप्य होय. जेव्हां अनेक भक्त त्याचा घोष करतात तेव्हां तें कीर्तनीय म्हणावयाचें. अर्थात् हें स्तोत्र जप्य हि आहे आणि कीर्तनीय हि आहे. भगवान् हा मनोमन मौनानें ध्येय आहे, एकान्तांत उपांशुजपानें जप्य आहे, आणि भक्त-समाजांत कण्ठरवानें कीर्तनीय आहे, गेय आहे.

३. महात्मा म्हणजे विदेह विश्वव्यापक परमात्मा. जोंवर देह-बद्धता आहे तोंवर महात्मता कुठली? ज्याची देहासक्ति अहंता ममता परिक्षीण झाली आहे, जो समदर्शी आहे, त्याला आपण गौरवानें महात्मा म्हणतों. पण खरा महात्मा हा कधीं देहवंत असत नाहीं. कारण देह ही अहंकार असल्याचीच खूण आहे.

४. दिव्य हें नामांचें विशेषण त्यांची अलौकिकता सूचित करतें. हीं नामें प्राकृत म्हणजे प्रकृतिगुणांच्या कार्याचीं म्हणजे संसाराचीं द्योतक नाहींत, तर त्या संसाराचा उपशम करणारीं, त्या संसाराच्या पलीकडे असलेल्या परमात्म्याचीं वाचक आहेत.

श्लोक : २

य इदं शृणुयान् नित्यं यश् चापि परिकीर्तयेत्।
नाशुभं प्राप्नुयात् किंचित् सो ऽमुत्रेह च मानव:।।

अर्थ

जो हें नामसहस्र नित्य स्वत: श्रवण करील अथवा इतरांना श्रवण करवील त्या मानवावर इह लोकीं वा परलोकीं कसलें हि अरिष्ट ओढवणार नाहीं.

टिप्पणी

१. श्रवण म्हणजे स्वत:च उपांशु जप करणें अथवा पाठ करणें. कीर्तन म्हणजे इतरांच्या कानीं आणि तद्द्वारा त्यांच्या अंतरीं पोंचविणें. नित्य श्रवण करायचें म्हणजे दुसरा कोणी तरी पाठ वा कीर्तन करणारा हवा. नित्य कीर्तन करायचें म्हणजे दुसरा कोणी तरी श्रोता हवा. ही पराधीनता होईल. म्हणून श्रवण आणि कीर्तन यांचा अर्थ अनुक्रमें उपांशु जप आणि घोष असा घ्यावयाचा. जप आपला आपण ऐकतों म्हणून ते श्रवण होय. घोष इतरांच्या कानीं जातो म्हणून तें कीर्तन होय.

२. अशुभ म्हणजे अनिष्ट-योग आणि इष्ट-वियोग. पुरुषार्थांची सिद्धि हें शुभ होय. त्यांची असिद्धि अशुभ होय. देहधारी जीवाला प्रियाप्रियांचा योग नित्यच होत राहतो. त्यांतून त्याची सुटका नाहीं. त्यांच्या योगें होणाऱ्या सुख-दु:खाची धार आत्मज्ञान-जनित समत्व-बुद्धीनें बोथट होते आणि विदेह झाल्यानंतर तें सुख दु:ख मुळींच उरत नाहीं, निर्विषय नि:सुखदु:ख साम्यरूप स्वानन्दानुभूति तेवढी उरते. हाच परम पुरुषार्थ.

३. इह आणि अमुत्र म्हणजे सदेहतेंत आणि विदेहतेंत. आम्ही देहधारी जीव सदेहावस्थेंत सुख-दु:ख अनुभवतच असतों. पण हा चालू देह सुटल्यावर

आणि नवा असलाच देह धारण करण्यापूर्वीं जी गति होते तींत आमचें कसें होणार याची चिंता विचारी माणसाला वाटणें स्वाभाविकच आहे. पण जो निर्‌योगक्षेम झाल्यामुळें निश्चिन्त झाला आहे त्या तत्परायण पुरुषाला इहलोकाची वा परलोकाची चिंता रहात नाहीं. आणि त्या परम साम्याला ज्यांची अशी पोंच अद्याप झालेली नाही असे हि भक्त सद्‌विचार सद्‌वाणी आणि सदाचार यांच्यायोगें सत्परायण होऊन तसेच निश्चिन्त होतात. कारण सदनुवर्तनाचें फल इथें या देहीं वा मरणोत्तर सत्‌च असणार असा त्यांचा पक्का विश्वास असतो. नामस्मरणाचें असें दुहेरी फल आहे.

श्लोक : ३

**वेदान्तगो ब्राह्मणः स्यात् क्षत्रियो विजयी भवेत्।**
**वैश्यो धन-समृद्धः स्यात् शूद्रः सुखमवाप्नुयात्।।**

अर्थ

(सहस्राचा श्रवणकर्ता) ब्राह्मण आपल्या वेदविद्येचा अन्त गाठून पंडित होईल. क्षत्रीय शत्रूंवर जय मिळवून विजयी होईल. वैश्य आपल्या व्यापारांत यशस्वी होऊन धन-समृद्ध होईल आणि शूद्र पडेल ती सेवा करीत खाऊन पिऊन सुखी होईल.

टिप्पणी

१. मागील श्लोकांत श्रवणाचें फल अशुभ-निवारण सांगितलें. इथें शुभ-प्राप्ति सांगत आहेत. अनिष्ट-परिहार आणि इष्ट-संप्राप्ति मिळून पूर्ण कल्याण होतें.

२. समाजाचे जे घटक ब्राह्मण क्षत्रीय वैश्य आणि शूद्र ते आपआपल्या अधिकृत कार्यांत श्रवणानें सफल होतात. बागेला दिलेल्या पाण्यानें जशीं बागेंतलीं सर्व झाडें फुलून फळतात, त्याप्रमाणें सारा समाज परमात्म-स्मरणानेंच सफल होतो, कृतकृत्य होतो. सर्वसाफल्याचें मूळ परमात्मनिष्ठा आहे.

जीवनांत ब्राह्मणाचें प्राप्तव्य ब्रह्म आहे. वेदांचें सांग संपूर्ण अध्ययन आहे. त्याचसाठीं त्याची सारी धडपड चाललेली असते. त्यालाच वेदान्त म्हणजे वेदाचें फळ म्हटलें आहे. वेदाचें शिखर म्हटलें आहे. स्वाध्यायानें आणि तपानें तें तो गांठतो.

क्षत्रियाची मुख्य अभिलाषा विजयाची असते. आपल्या शत्रूवर विजय मिळविण्यांत त्याला धन्यता वाटते. त्यापाई देह पडला तरी बेहत्तर अशी त्याची वृत्ति असते. आणि त्या प्रमाणें तो करतो.

वैश्य हा धनप्राण आहे. ब्राह्मण विद्येसाठीं, क्षत्रिय विजयासाठीं जीवावर उदार होईल. पण वैश्य आपल्या पुंजीला प्राणापलीकडे जपेल. एका एका कवडीसाठीं तो जीव टाकतो. पुंजी दिवसेंदिवस वाढत असलेली पाहून तो सुखी होतो. त्यांतच त्याला धन्यता वाटते.

परंतु शुद्राला असा कोणताच ध्येयध्यास नाहीं कीं ज्यासाठीं त्यानें जिवावर उदार व्हावें, प्राणसंकटासकट सर्व संकटें आनंदानें झेलावीं. त्याला आपलें खायला प्यायला मिळालें कीं तो सुखी. तो आपल्या देहाच्या पलीकडे आणि आजच्या पलीकडे पाहत नाहीं. आज आपली पोळी पिकली ना? बस मग दुसरी चिंता कसली? त्यानें हेंच अभीष्ट, सर्वस्व.

सारांश, ज्याचें जें सर्वस्व, ज्यांत ज्याचा परमसंतोष तें त्याला परमात्म-प्रसादानें लाभतें आणि तो कृतकृत्य होतो व त्याबरोबर समाज हि.

श्लोक : ४

**धर्मार्थी प्राप्नुयाद् धर्मं अर्थार्थी चार्थमाप्नुयात्।**
**कामान् अवाप्नुयात् कामी प्रजार्थी चाप्नुयात् प्रजाम्।।**

अर्थ

(सहस्राचें नित्य श्रवण करणारा) धर्मार्थी असेल त्याला धर्म,अर्थार्थी असेल त्याला अर्थ कामार्थी

असेल त्याला काम आणि प्रजार्थी असेल त्याला प्रजा लाभेल.

टिप्पणी

१. मागील श्लोकांत समाजाचे घटक जे ब्राह्मणादि चतुर्वर्ण त्यांना त्यांचें अभिलषित सभेंत, रणांत, उद्यमांत आणि जगण्यांत जय व सुख लाभेल म्हणून सांगितलें. इथें व्यक्तिश: ज्याचा जो अभिलाष, तो पूर्ण होईल म्हणून आश्वासन दिलें आहे.

२. समाज हा स्थूल आणि बाह्य आहे. व्यक्ति ही सूक्ष्म आणि आन्तरिक आहे. समाजाचें जीवन-साफल्य व्यक्तीच्या जीवन-साफल्यावरच अवलंबून आहे. म्हणून समाजांतील घटक वर्ग आणि त्यांचें इष्ट त्याचबरोबर समाजनिरपेक्ष व्यक्ति व तिचें इष्ट असा दुहेरी विचार केला आहे. समाजधारणा आणि व्यक्तिसंतोष हीं दोन्ही मूल्यें इथें अभिप्रेत आहेत.

३. इथें धर्म अर्थ काम आणि मोक्ष या चार पुरुषार्थांचा म्हणजे जीवाच्या जिव्हाळ्यांचा क्रमानें उल्लेख केला आहे. प्रजा हा प्रजामृतत्वाचा म्हणजे प्रजारूप मोक्षाचा उल्लेख आहे. जीवाच्या ज्या कांहीं अभिलाषा असूं शकतात त्या सर्व या चारींत वर्गीकृत केल्या आहेत. पहिला वर्ग धर्म. धर्म म्हणजे सद्गतीचा उपाय. धर्म हा सर्व पुरुषार्थांचें मूळ म्हणून आधी उल्लेखिला जातो. तदधीनच अर्थ आणि काम हे पुरुषार्थ असून मोक्ष हि धर्माधिष्ठितच आहे. कारण धर्म हा चित्तशुद्धीच्या द्वारा ज्ञानोदयाला उपकारक होतो आणि ज्ञानोदय झाला म्हणजेच अज्ञान-निवृत्ति होऊन मोक्ष-सिद्धि होते. योगक्षेमाच्या चिंतेनें जीव अर्थ आणि काम यांची म्हणजे द्रव्य आणि दारा (वा मैथुनसुख) यांची अभिलाषा करीत असतो. परंतु द्रव्य आणि दारा यांची प्राप्ति धर्माची उपेक्षा आणि अनादर करून केल्यास तीं सुखावह होत नाहीं आणि तीं अनित्य तर आहेतच. धर्माचें फल जें स्वर्ग वा सद्गति तें धर्माचरण न केल्यास मिळावयाचें नाहीं. हें उघडच आहे. महाभारतांत कौरवपांडवांच्या इतिहासाच्या मिषानें व्यासांनीं हेंच तत्त्व विशद केलें आहे. कौरवांनीं अधर्मानें पांडवांचें राज्य व त्यांची स्त्री उपटण्याचा प्रयत्न केला आणि त्यांत ते शेवटीं राज्यश्री, स्त्री नि स्वर्ग सर्वच गमावून बसले, उलट पांडव धर्मानें वागून त्रिवर्ग मिळवते झाले असे दाखविलें आहे. व्यासांनीं हें तात्पर्य स्वमुखानें हि सांगून टाकलें आहे.

अधर्मेणैधते तावत् ततो भद्राणि पश्यति।
ततः सपत्नान् जयति समूलं च विनश्यति॥

याचें उदाहरण कौरव होत.

ऊर्ध्वबाहुर् विरौम्येष न च कश्चित् शृणोति मे।
धर्माद् अर्थश्च कामश्च स धर्मः किं न सेव्यते॥

यांतील मुख्य प्रतिपाद्य धर्माद् अर्थश्च याचें उदाहरण पांडव होत. धर्म म्हणजे सज्जीवन हेंच या लोकाचें नि परलोकाचें हि साधन आहे. परंतु दीर्घदर्शन नसलेल्या सामान्य माणसाला प्रत्यक्षाचा मोह पडतो, तात्कालिकाचा मोह पडतो आणि तो धर्मविमुख होतो. परिणामीं 'तेल गेलें तूप गेलें, धुपाटणें हातीं आलें' अशी त्याची फसगत होते. म्हणून व्यासांनीं महाभारत सांगितलें आणि भीष्मांनीं त्याचें लोणी आपल्या राज्य स्त्री विरक्त जीवनानें नि भगवद्भक्तीच्या उपदेशानें लोकांना दिलें आहे.

४. परम पुरुषार्थ मोक्ष असला तरी अर्थ आणि काम यांची आकांक्षा जीविताकांक्षेमुळें माणसाला राहतेच. ती कोणाला हि टाळतां येणारी नाहीं. त्याच बरोबर मरणोत्तर जीवनाची हि माणसाला चिंता राहणारच. त्यामुळें धर्माची हि आस्था बाळगावीच लागते. असे हे चारी, पुरुषाचे म्हणजे जीवाचे, जिव्हाळे आहेत. जीव त्यांत गुंतून राहिला आहे.

५. प्रजा हा प्रजामृतत्वामुळें पुरुषार्थच आहे. प्रजेच्या रूपानें, संतानाच्या रूपानें जीव हा चिरंजीव होत असतो. म्हणून तो प्रजेची कामना करतो.

मोक्षाची आकांक्षा म्हणजे अमृतत्वाचीच आकांक्षा होय. ती सन्तानरूपानें तो सफल झालेली पाहतो. आणि म्हणून प्रजेचा स्वतंत्र उल्लेख केलेला आहे. काम या पुरुषार्थाहून हा वेगळा पुरुषार्थ आहे. तो कामान्तर्गत नाहीं.

६. तिसऱ्या आणि चौथ्या श्लोकांत सर्व सामान्य जीवांचे जे अभिलाष आहेत ते सारे श्रवणानें पूर्ण होतील असें सांगितल्या नंतर आणखी कांहीं फळ सांगायचें उरत नाहीं. म्हणून मुख्य फलश्रुति इथेंच संपली असें म्हटलें पाहिजे.

श्लोक : ५, ६, ७

भक्तिमान् यः सदोत्थाय शुचिस् तद्‌गत-मानसः।
सहस्रं वासुदेवस्य नाम्नां एतत् प्रकीर्तयेत्॥
यशः प्राप्नोति विपुलं ज्ञाति-प्राधान्यमेव च।
अचलां श्रियमाप्नोति श्रेयः प्राप्नोत्यनुत्तमम्॥
न भयं क्वचिदाप्नोति वीर्यं तेजश्च विन्दति।
भवत्यरोगो द्युतिमान् बलरूपगुणान्वितः॥

अर्थ

५. जो भक्तिमान् पुरुष प्रत्यहीं उठून शौचादि आटोपून हृदयस्थ परमात्माच्या ठाईं चित्त स्थिर करून त्याचें हें नामसहस्र म्हणतो

६. त्याला विपुल यश लाभतें, तो आपल्या ज्ञातिबान्धवांत गौरव पावतो. त्याला स्थिर वैभव-लाभ होतो. (शेवटीं) त्याचें सर्वोत्तम कल्याण होतें.

७. तो अकुतोभय होतो. त्याचें वीर्य म्हणजे आत्मबल वाढतें आणि तेज म्हणजे दरारा व प्रभाव पसरतो. अनारोग्याची विवर्णता जाऊन आरोग्यानें तो तेजःपुंज दिसतो. त्याचें बल वाढतें. तसा त्याचा आकार भरदार व उठावदार होऊन त्याच्या व्यक्तिमत्त्वाची सर्वत्र छाप पडते.

टिप्पणी

१. 'सदोत्थाय प्रकीर्तयेत्' या पदांनीं पुनः फलश्रुति सांगायला सुरवात झालेली आहे हें दिसून येतें. आरंभीं "श्रुणुयात् नित्यम्" हीं पदें येऊन गेलेलींच आहेत. म्हणजे ही एक प्रकारें फलश्रुतीची आवृत्ति होत आहे.

२. "सहस्रं वासुदेवस्य नाम्नाम्" या पदांवरून हें फलश्रुतीचें आवर्तन वासुदेवसंप्रदायानें प्रक्षिप्त केलेलें दिसतें. पुढील श्लोकांत वासुदेव हें नाम पांच वेळां आलें आहे. इतर नामें हि तसा संशय येऊं नये म्हणून वापरलेलीं आहेतच. पण प्राधान्य वासुदेवनामालाच आहे. ॐ नमो भगवते वासुदेवाय" हा त्यांचा द्वादशाक्षरी मंत्र आहे. हें विष्णु-सहस्र आहे, वासुदेव-सहस्र नाहीं आणि गोपाल-सहस्र तर मुळींच नाहीं. वासुदेव हें नाम प्राचीनच आहे. परंतु विष्णु प्राचीनतर. आणि गोपाळ तर अर्वाचीनतरच म्हणावें लागेल. विष्णु हें नाम वेदांत येतें, वासुदेव वेदांत आढळत नाहीं. तें पुराणकालीन दिसतें.

३. "भक्तिमान् यः सदोत्थाय" या श्लोकांत नित्य उपासना कशी करावी त्याचा विधि सांगितला आहे. नित्य सकाळीं उठावें, शुचिर्भूत व्हावें. ध्यान धरावें आणि पाठ करावा. यांत "तद्‌गतमानस" पद आलें आहे. तद्‌गतमानस होणें म्हणजे हृदयस्थ परमात्म्याच्या ठाईं चित्त स्थिर करून राहणें होय. लहान मूल जेव्हां शौचविधि करतें तेव्हां तें तद्‌गतमानस झालेलें असतें. त्याचे इतर बाह्य व्यापार मंदावलेले असतात, दृष्टि अन्तर्मुख झालेली असते आणि मन तत् (क्रिया) गत झालेलें असतें. त्याची शौचक्रिया संपली कीं तें त्या समाधींतून व्युत्थित होतें आणि परत सामान्य व्यवहार करूं लागतें. तद्वत् हृदयस्थ परमात्मगत चित्तानें पाठ करावा, तद्भावभावित होऊन पाठ करावा.

४. "वीर्यं तेजश्च विन्दति" वीर्य आणि तेज ही एक कार्यकारणांची जोडी आहे. ज्याच्या ठाईं वीर्य

म्हणजे आत्मबल आहे, संकल्पशक्तीचें बळ आहे, त्याचेंच तेज म्हणजे प्रभाव लोकांत पडतो. ज्याच्या ठाईं संयमाचें बळ नाहीं त्याच्या बोलण्यांत नि वागण्यांत तें तेज येत नाहीं. धमक असेल त्याचा धाक वाटेल. तेल असेल तर ज्योत पाजळेल.

५. ''भवत्यरोगो द्युतिमान् बलरूपगुणान्वित:'' या वाक्यांत एक कार्यकारण-शृंखला आहे. रोगानें शरीर विवर्ण होतें, दुर्बळ होतें, त्याचा गुण म्हणजे व्यक्तिमत्त्व पुसट होतें. उलट आरोग्यानें वर्ण उजळतो, गात्रांत बल संचरतें आणि माणसाचें व्यक्तिमत्त्व उमटतें. सारांश अनारोग्यानें सर्वतोपरी ऱ्हास होतो तर आरोग्यानें सर्वतोमुखी विकास होतो.

बल म्हणजे सर्वेन्द्रियांची कार्यक्षमता, रूप म्हणजे सर्वावयवांची प्रविभक्तता आणि पुष्टता, आणि गुण म्हणजे माणसाचें एकूण व्यक्तिमत्त्व. गुण तसे असंख्य आहेत. पण त्या सर्व गुणांचा समाहार म्हणजे व्यक्तिमत्त्व होय. हें ज्याचें त्याचें आपलें स्वतंत्र आहे.

श्लोक : ८, ९

रोगार्तो मुच्यते रोगात् बद्धो मुच्येत बन्धनात्।
भयात् मुच्येत भीतस् तु मुच्येतापन्न आपद:।।
दुर्गाण्यतितरत्याशु पुरुष: पुरुषोत्तमम्।
स्तुवन् नाम-सहस्रेण नित्यं भक्तिसमन्वित:।।

अर्थ

८. (सहस्राचा पाठ करणारा भाविक) अल्पमहा-रोगानें पीडिलेला असल्यास त्या रोगांतून तो मुक्त होतो; राजा, सावकार, चोर वगैरेंच्या बंधनांत पडला असल्यास त्यांतून तो सुटतो; तस्कराच्या, राजाच्या वा यमाच्या भयानें भयभीत असल्यास त्या भयापासून त्याची सुटका होते आणि कुठल्या धन जन प्राण-संकटांत सांपडला असल्यास त्या संकटांतून तो बचावतो.

९. (सारांश) या नामसहस्राच्या द्वारा परमात्म्याचे नित्य भक्तियुक्त अन्त:करणानें स्तवन करणारा पुरुष अविलम्बें सर्व प्रकारच्या संकटांतून पार पडतो.

टिप्पणी

१. नामस्मरणानें जीव सर्व संकटांतून सही सलामत पार पडतो हे प्रतिपाद्य आहे. सर्व इष्टलाभ हीच मुख्य फलश्रुति आहे. त्याच बरोबर सर्व अनिष्टांचा परिहार ही गौण फलश्रुति होय. ती इथें दिली आहे. रोग, राजादिकांचें बन्धन म्हणजे कारागार, भूतप्रेत-चौरव्याघ्रादि भय आणि लहान मोठ्या आपत्ति हीं सर्व नानाविध संकटें होत. या सगळ्या दु:खांना त्रिविध दु:ख म्हणजे आध्यात्मिक, आधिदैविक आणि आधिभौतिक म्हणून संबोधिलें आहे. हीं सगळीं दु:खें नामस्मरणानें निरस्त होऊन जीव परमानन्दभाक् होतो. सर्व अनिष्टांचा परिहार झाल्यावांचून सर्व इष्टांची संप्राप्ति होऊं शकत नाहीं. तसेंच सर्व इष्टांची प्राप्ति म्हटली कीं त्या सर्व अनिष्टांची निवृत्ति ही गृहीत च असते. परंतु नि:संदेहतेसाठीं आणि शास्त्रपूर्तीसाठीं दोन्ही अंगांचा उल्लेख केला जातो. आधीं आरंभींच्या फलश्रुतींत मुख्यत: इष्टसंप्राप्ति उल्लेखिली आहे. आणि नंतरच्या ह्या फलश्रुतींत विशेषत: अनिष्टपरिहार उल्लेखिला आहे. अशा प्रकारें या दुसऱ्या फलश्रुतीच्या भागाची हि उपयुक्तता सिद्ध होत आहे.

२. फलश्रुतीची इष्ट-संप्राप्ति आणि अनिष्ट-परिहार हीं दोन अंगें आपण पाहिलीं. आतां एक तिसरेंच फलश्रुतीचें उत्तमांग आपल्याला पहावयाचें आहे. पुढील श्लोकांत त्याचाच प्रामुख्यानें विचार आला आहे–विकारमुक्ति आणि आत्मगुणलब्धि.

श्लोक : १०, ११, १२, १३

वासुदेवाश्रयो मर्त्यो वासुदेवपरायण:।
सर्वपाप-विशुद्धात्मा याति ब्रह्म सनातनम्।।

न वासुदेवभक्तानां अशुभं विद्यते क्वचित्।
जन्ममृत्युजराव्याधि-भयं नैवोपजायते।।
इमं स्तवं अधीयानः श्रद्धाभक्तिसमन्वितः।
युज्येतात्मसुख-क्षान्ति-श्री-धृति-स्मृति-कीर्तिभिः।।
न क्रोधो न च मात्सर्यं न लोभो नाशुभा मतिः।
भवन्ति कृत-पुण्यानां भक्तानां पुरुषोत्तमे।।

अर्थ

१०. जो वासुदेवाचा शरणागत आहे, वासुदेवच ज्याची परम गति आहे. तो मनुष्य सर्व पापांतून परिमुक्त होऊन सनातन ब्रह्माला पावतो.

११. वासुदेव-भक्ताचें इह वा परत्र कुठें हि अशुभ होत नाहीं. इतकेंच नव्हे तर जन्म मृत्यु जरा व्याधि यांचें हि भय त्याला उरत नाहीं.

१२. या नामसहस्र-स्तोत्राचा जो श्रद्धेनें आणि भक्तिभावानें पाठ करतो त्याला आत्मसुख, तितिक्षा, श्री, धृति, स्मृति आणि कीर्ति यांचा लाभ होतो.

१३. पुरुषोत्तमाचे जे भक्त आहेत अर्थात् जे पुण्यशील आहेत त्यांच्या ठाईं क्रोध मत्सर लोभ वा अहंता ममता इत्यादि अशुभ मति असत नाहीं.

टिप्पणी

१. सर्व अशुभाचें म्हणजे पापाचें नि दुःखाचें मूळ अशुभ मति आहे. अशुभ मति म्हणजे अविद्या. आत्म्याविषयींचें अज्ञान. या अज्ञानांतूनच अहंता ममता म्हणजे देहात्मबुद्धि वा स्वपरभेदभाव निर्माण होतो. आणि त्यांतूनच सर्व पापें घडतात व त्या पापांचीं फळें भोगावीं लागतात. परंतु जो ''वासुदेवः सर्वम्'' अशा सर्वत्र समदृष्टीनें पाहतो तो वासुदेवभक्त कोणावर क्रोध आणि कोणाचा मत्सर करणार? आणि लोभ तरी कशाचा धरणार? तो सर्वत्र सम पाहत असल्यामुळें त्याला आत्मसुख लाभतें. तो स्वस्थ असतो. आणि त्या स्वास्थ्यांतूनच क्षांति म्हणजे सर्व-सहिष्णुता श्री म्हणजे प्रसन्नता, धृति म्हणजे अविक्रियता, स्मृति म्हणजे निरनिमानतापूर्वक स्वरूप-स्थिति आणि कीर्ति म्हणजे सर्व भूतात्मभूतता वा सर्वात्मकता इत्यादि दैवी गुणगण त्याच्या ठाईं येऊन वास करतात. उत्तमोत्तम फल तें हेंच आणि म्हणून फलश्रुतीचें हें उत्तमांग होय.

श्लोक : १४, १५, १६

द्यौः सचन्द्रार्कनक्षत्रा खं दिशो भूर् महोदधिः।
वासुदेवस्य वीर्येण विधृतानि महात्मनः।।
ससुरासुरगन्धर्वं सयक्षोरगराक्षसम्।
जगद् वशे वर्ततेदं कृष्णस्य सचराचरम्।।
इन्द्रियाणि मनो बुद्धिः सत्त्वं तेजो बलं धृतिः।
वासुदेवात्मकान्याहुः क्षेत्रं क्षेत्रज्ञ एव च।।

अर्थ

१४. चन्द्र सूर्य नक्षत्रें यांनीं युक्त दिसणारा हा ऊर्ध्वलोक, उर्ध्व लोक व पृथ्वी यांच्या मध्यें पसरलेलें अंतराल, या दश दिशा, ही भूमि आणि तिला वेष्टून असलेला हा महासागर हें सर्व त्या विश्वात्म्या वासुदेवाच्या सत्तेनें धारण केलेलें आहे.

१५. या तिन्ही लोकांत वसणारे सुर असुर गन्धर्व यक्ष रक्ष नि सर्प यांच्या समट हें सर्व चराचर जगत् त्या सर्वेश कृष्ण परमात्म्याच्या अधीन आहे.

१६. प्रत्येक देहधारी जीवाच्या ठाईं वसणारीं सगळीं इन्द्रियें मन बुद्धि आणि सत्त्व तेज बल धृति सारांश सगळें क्षेत्र आणि क्षेत्रज्ञ हीं वासुदेवसंज्ञक त्या चिद्रूपाचेच आविर्भाव होत, ते सर्व चिन्मयच होत.

टिप्पणी

१. ज्याचें स्तोत्र हें नामसहस्र आहे तो भगवान् विष्णु म्हणा, वासुदेव म्हणा, सर्वाधार सर्वरूप आणि सर्वेश आहे. त्यामुळें त्याच्या स्मरणाचें फळ हें मिथ्या

नव्हे, तें यथार्थ च आहे असा विश्वास त्याचें माहात्म्यज्ञान झाल्यानें होतो. म्हणून या त्रिकांत त्याचें माहात्म्य वर्णिलें आहे. हा अर्थवाद नव्हे. रोचनार्थ फलश्रुति नव्हे.

२. माहात्म्य हें कीं त्या भगवान् वासुदेवाच्या अधीन हें सगळे भूरादि लोक, त्यांत वसणारे जीव आणि त्यांच्या ठाईं असणाऱ्या सर्व शक्ति आहेत.

३. वर्ततेदं 'वर्तते' व 'इदम्' या दोन पदांचा पूर्वरूप सन्धि आर्ष वा छांदस समजावयाचा.

श्लोक : १७, १८, १९, २०

सर्वागमानां आचार: प्रथमं परिकल्प्यते।
आचार-प्रभवो धर्मो धर्मस्य प्रभुरच्युत:।।
ऋषय: पितरो देवा महाभूतानि धातव:।
जङ्गमाजङ्गमं चेदं जगन् नारायणोद्भवम्।।
योगो ज्ञानं तथा सांख्यं विद्या: शिल्पादि कर्म च।
वेदा: शास्त्राणि विज्ञानं एतत् सर्वं जनार्दनात्।।
एको विष्णुर् महद् भूतं पृथग् भूतान्यनेकश:।
त्रींल् लोकान् व्याप्य भूतात्मा भुङ्क्ते विश्वभुगव्यय:।।

अर्थ

१७. सर्व शास्त्रांत आचाराला प्राथम्य दिलेलें आहे. कारण आचार-मूलक धर्म आहे आणि धर्माचा प्रभु म्हणजे धर्मफलदाता तो सनातन परमात्मा आहे.

१८. ऋषि, पितर, देव, त्याच प्रमाणें पंच महाभूतें नि सगळे धातु असें हें सगळें चराचर जगत् त्या नरसमाजाच्या दैवत परमात्म्यापासूनच झालेलें आहे.

१९. योग आणि ज्ञान, सांख्य आणि विद्या त्याचप्रमाणें शिल्पादि सर्व कला, सारांश सर्व वेदशास्त्रें नि विज्ञान हें सगळें त्या जनन्नियन्त्या परमात्म्यापासूनच झालेलें आहे.

२०. किंबहुना, तो सनातन विश्वव्यापक विष्णुच एकमात्र महासत्व असून इतर सगळीं भूतें त्याचे अंश होत. त्यांच्या योगें हीं तिन्ही भुवनें व्यापून तो विश्वात्मा या सर्वांचें (सूर्यवत्) साक्षित्वानें ग्रहण करीत आहे.

टिप्पणी

१. वेदोक्त धर्म हा सर्व विधिनिषेधरूप आहे. म्हणजे अमुक कर्म करा अमुक करूं नका अशा स्वरूपाचा आहे. अर्थात् धर्म हा आचारमूलक आहे. जो वर्णाश्रमकर्तव्यरूप स्वधर्माचें, यज्ञ दान तप आदि रूप चित्तशुद्धिकारक उपासनेचें आणि वेदशास्त्र नामसहस्रादि श्रवणरूप स्वाध्यायाचें आचरण करणार नाहीं, त्याला धर्म घडणार नाहीं आणि धर्म-फल लाभणार नाहीं. म्हणून आचारवान्च खरा धार्मिक होतो आणि तोच धर्मफळाचा अधिकारी. हा मुद्दा मुद्दाम सर्वशास्त्रार्थसार म्हणून इथें फलश्रुतींत उल्लेखिला आहे. वेदस्योपनिषत् सत्यम्। सत्यस्योपनिषद् दम:।

२. सूर्यापासून सर्व किरणें जशीं निघतात त्याप्रमाणें एका परमात्म्यापासून हीं सर्व भुवनें त्यांतील थोर अधिकारी पुरुष आणि त्यांचीं सर्व थोर थोर ज्ञानें निघालेलीं आहेत. म्हणून त्याची उपासना या स्तवाच्या रूपानें करणें हा थोर धर्म होय आणि त्यापासून सर्व फलप्राप्ति होते, असा आशय.

श्लोक : २१, २२

इमं स्तवं भगवतो विष्णोर् व्यासेन कीर्तितम्।
पठेद् य इच्छेत् पुरुष: श्रेय: प्राप्तुं सुखानि च।।
विश्वेश्वरं अजं देवं जगत: प्रभवाप्ययम्।
भजन्ति ये पुष्कराक्षं न ते यान्ति पराभवम्।।

अर्थ

२१. असें हें भगवान् विष्णूचें नामसहस्रस्तोत्र व्यासमहर्षींनीं गाइलेलें आहे. ज्या पुरुषाला आपल्याला सर्व सुखें मिळावीं व आपलें मोक्षरूप कल्याण व्हावें अशी इच्छा असेल त्यानें ह्याचा पाठ करावा.

२२. ज्याच्यापासून हें जग झालें आहे आणि ज्याच्या ठाईंच लीन व्हायचें आहे त्या विश्वेश्वराला

त्या सनातन देवाला जे भजतात, त्यांना कुठें हि अपेश येत नाहीं. सर्वत्र ते विजयी होतात.

टिप्पणी

१. व्यासेन कीर्तितम्। हें विष्णु-सहस्रनाम-स्तोत्र व्यासांनीं म्हणजे विष्णूच्याच एका अवतारानें नि विभूतीनें गाइलेलें आहे. कारण विष्णूचा महिमा विष्णूहून वेगळा दुसरा कोण बरें जाणूं शकतो? नाटकांत थोर पात्रांच्या तोंडीं घातलेली वाणी आणि विचार हीं जशीं नाटककाराचीं होत तशीं काव्यांत निरनिराळ्या थोर विभूतींच्या मुखानें व्यक्त झालेलीं वाणी आणि विचार कवींचीच होत. महाभारताचा महाकवि कृष्ण द्वैपायन व्यास. कृष्णमुखानें त्यानें गीता वदविली, भीष्म मुखानें नामसहस्र वदविलें, आपणाकडे कर्तृत्व घेतलें नाहीं. ''तस्य कर्तारमपि मां विध्य-कर्तारमव्ययम्।'' अशी त्याची कुशलता आहे ही.

बहुरूपी नाना सोंगें घेतो पण शेवटीं सर्व सोंगें टाकून देऊन आपल्या खऱ्या रूपानें लोकापुढें येतो तसें इथें झालें आहे. भीष्ममुखांत हें नामसहस्र घातलें असलें तरी तें व्यासकृत आहे हें ''व्यासेन कीर्तितम्'' या पदांनीं प्रकट झालें आहे. इथें बुरखा टाकून दिलेला आहे, मुखवटा काढून टाकला आहे. गीतेंत हि शेवटीं ''व्यासप्रसादात् श्रुतवान्'' म्हणून व्यासकृतत्व स्पष्ट झालें आहे.

तथापि ज्ञान हें अनादि आहे. म्हणून तें शिवपार्वती या जगदादि-विभूतींच्या मुखानें वदविलें जातें. ज्ञान हें थोर आहे म्हणून तें भगवान् कृष्ण आणि भीष्माचार्य यांच्या सारख्या थोरांच्याच मुखांतून वदविलें जातें. नदीचा उगम आजचा वा इथला मानतां येत नाहीं तो अनादि आणि पर्वतासारख्या महोच्च पदापासूनच असावयाचा. म्हणून सर्व ज्ञान-संप्रदाय हे मूलत: परमात्म्यापासूनच आलेले आहेत. आणि हें असें असल्यामुळें त्यांचें कर्तृत्व कोणाहि मानवाला आपल्याकडे घेतां येणार नाहीं. आदिकादि वाल्मीकीला हि नाहीं नि महर्षि व्यासाला हि नाहीं. याची त्यांना जाणीव आहे म्हणून ते थोर पूर्वजांच्या मुखानेंच तें सांगतात. 'इति शुश्रुम पूर्वेषाम्' असें म्हणतात.

२. ''न ते यान्ति पराभवम्'' परमात्म्याचा भक्त हा केव्हां हि पराभूत होत नाही. कारण त्यानें सत्याचा आश्रय केलेला असतो. सत्याग्रहीला पराभव ठाऊक नाहीं. कारण सत्य हें सदैव विजयी तत्त्व आहे. महाभारत हें सत्याचा असत्यावरील शाश्वत विजय गाणारें महाकाव्य आहे. तो कोणा व्यक्तींचा इतिहास नाहीं. तो महेतिहास होय. ''जयो नामेतिहासो ऽयम्'' हा जय नामक इतिहास आहे. ''न ते यान्ति पराभवम्'' हा चरण त्याचें स्मरण करून देतो. जें महाभारताचें अनुशीलन करतील, जे परम सत्याला भजतील त्यांचा केव्हां हि पराभव व्हायचा नाहीं, त्यांचा सदैव जय च आहे.

असें हें इथें विष्णुसहस्रनाम समाप्त झालें.



प्रमाणम् ४६ ख, १०३ क
बीजम् अव्ययम् ४६ ख
ब्रह्म ७१ ख
भेषजम् ६२ ख
भोजनम् १६ क
मंगलं परम् ७ घ
यज्ञगुह्यम् १०५ ग
लोकाधिष्ठानम् ९५ घ
विश्वम् १ क
शरणम् १० क
शर्म १० क
सत् ५१ ख
सत्रम् ४८ ख
सनात् (अव्यय) ९६ क
स्तोत्रम् ७३ क
स्वस्ति ९६ ग
हविः ७४ ख

स्त्रीलिंग नामें (१७)
कृतिः ९६
निष्ठा ६२ घ
(अ) भूः ४७ क
भूतिः ६७ ग
भूर् भुवः १०१ क
मुक्तानां परमा गतिः २ ख
लक्ष्मीः १०१ क
विश्वयोनिः १३ ख, १६ ख
विहायसगतिः ९४ क
शान्तिः ६२ घ,
सतां गतिः २० ख, ४८ ख
सत्कीर्तिः ६६ घ
सत्कृतिः ७५ क
सत्ता ७५ क
सद्गतिः ७५ ख
सद्भूतिः ७५ ख
सिद्धिः ११ ख

वचनदृष्ट्या सहस्रांत विचारणीय विशेष कांहीं दिसत नाहीं. सर्व नामें एकवचनीच आहेत. एक ''सन्त'' हें नाम मात्र बहुवचनी दिसतें. परन्तु तेंहि जयन्त वसन्त प्रमाणें शब्दशः एकवचनी अथवा समूहवाचक घेतल्यास अर्थतः तरी एकवचनी कल्पितां येईल 'अक्षताः' 'सिकताः' इत्यादीप्रमाणें. अथवा तें बहुमानार्थी बहुवचन समजावें ''दाराः'' इत्यादि नामांप्रमाणें. परमात्मा हा सहस्राप्रमाणें ''एको नैकः'' उभयविध आहे, तर एकवचनाबरोबर अनेकवचन हि आलें तर त्यांत गैर कांहीं नाहींच. सूर्य एक आहे, पण किरणात्मना तो अनेक आहे त्याप्रमाणें. आकाशस्थ म्हणजे अव्यक्त परमात्मा एकच आहे, पण या व्यक्त भूमीवर सन्तरूपानें अवतरलेला परमात्मा अनेक आहे म्हणून हि सन्तः हें बहुवचन. ''विदिशो व्यादिशो दिशः'' हीं तीन नामेंहि दिश् प्रातिपदिक कल्पिल्यास बहुवचनी होतील. परन्तु दिश् धातूचीं तीं रूपें कल्पिल्यास तीं एकवचनींच म्हणावीं लागतील आणि शंकराचार्यांनींहि तीं एकवचनीच घेतलीं आहेत. इत्यर्थ हा कीं सहस्रांत अनेकवचनी नाम नाहीं. अनेकवचनी भासणारेंहि वस्तुतः एकवचनीच आहे.

□□□

# १२. नामांचें वर्गीकरण शब्दजाति-दृष्ट्या

सहस्रांत नाम, सर्वनाम, विशेषण आणि अव्यय या चारच जातींचे शब्द आले आहेत.

नामसहस्रांत नामजातीचे शब्दच बहुसंख्य असणार हें उघड आहे. कारण त्याचें नांवच मुळीं नाम-सहस्र आहे. पण या नामाचेहि द्रव्यवाचक व गुणवाचक असे दोन मुख्य भेद होतात. द्रव्यवाचकाचे जातिवाचक व व्यक्तिवाचक असे उपभेद होतात, तर गुणवाचकाचे संख्यावाचक व भाववाचक असे पोटभेद होतात. वस्तुत: सर्व पदें परमात्मवाचकच असल्यामुळें तीं सर्वच विशेषनामें या एकाच वर्गांत पडतील. तथापि, तो परमार्थ बाजूला ठेवून लौकिक दृष्ट्या वर्गीकरण करायचें तर तें वरीलप्रमाणें होऊं शकेल. त्याचीं उदाहरणें देण्याचें प्रयोजन नाहीं. तीं सूचींतून सहज शोधतां येतील. तथापि, दिग्दर्शनार्थ इथे कांही दिलीं आहेत.

**जातिवाचक वा सामान्य नामें**–भू, वह्नि, वायु, वृक्ष इत्यादि.

**व्यक्तिवाचक वा विशेष नामें**–वासुदेव, कपिल, मनु, अश्वत्थ इत्यादि.

**संख्यात्मक भाववाचक नामें**–एक, नैक, असंख्येय, अनन्त इत्यादि विशेषणांपासून एकत्व नैकत्व इत्यादि नामें कल्पिल्यास तीं संख्यागुण-वाचक नामें होतील. सहस्रांत तीं तशीं नाहींत. अनन्ताच्या पोटांत अनन्तत्व आहे. त्याहून वेगळें तें नाहीं. म्हणून अनन्त म्हणजेच अनन्तत्व आणि अनन्तत्व म्हणजेच अनन्त. परमात्म्याच्या ठाईं द्रव्यगुणभेद मावळतो.

**गुणात्मक भाववाचक नामें**–सहस्रांत जशीं एकत्व, बहुत्व इत्यादि संख्यात्मक भाववाचकें नाहींत, तशीं शौर्य, धैर्य, कर्तृत्व इत्यादि गुणात्मक भाववाचकेंहि नाहींत. परंतु तत्तत्-धर्मवाचक विशेषणें वा नामें मात्र आहेत. एक ''तत्त्व'' हें पद तेवढें भाववाचक म्हणतां येईल. पण तें सुद्धां वस्तुत: तत्भाववाचक नसून रहस्य वा सार या अर्थाचें साधें नामच आहे. तत्त्वविद् इत्यादि नामांत तें त्याच अर्थानें आलेलें आहे, असें दिसून येईल.

वरील विवेचनाचा इत्यर्थ हा कीं सहस्रांत भाववाचक नामें नाहींत. जीं आहेत तीं सगळीं सामान्य वा विशेष नामें आहेत.

२. **सर्वनाम** : सहस्रांत यत् तत् आणि किम् हीं तीन सर्वनामें आलीं आहेत. तीं अर्थातच नपुंसकलिंगी प्रथमेचीं एकवचनी रूपें आहेत. क: हें एक आणखी रूप आलें आहे. तें अकारान्त कचें रूप असूं शकेल वा किम्चें पुंल्लिंगी प्रथमा एकवचनहि. परमात्मा कसंज्ञक प्रजापति होय. त्यानें आपल्या एका अर्धापासून नर आणि दुसऱ्या अर्धापासून नारी निर्मिली अशी आख्यायिका प्रसिद्धच आहे. तत्पूर्वीची सर्व सृष्टि मानस होती. इथून पुढें ती मिथुन-जात म्हणावयाची.

३. **विशेषण**–संस्कृतांत नाम आणि विशेषण ह्या जाति भिन्न असूनहि समान आहेत. त्यांना लिंग-वचन-विभक्ति-विकार समानच होतात. परस्पर-विनिमेयच त्या आहेत. त्यामुळें कृष्ण हा शब्द नाम तसा विशेषणहि होतो. इथें सहस्रांत सर्व नामें परमात्म्याचे भिन्न भिन्न गुण-विशेषच व्यक्त करीत असल्यामुळें वस्तुत: तीं सर्व विशेषणेंच होत. आणि त्यांचें विशेष्य तो एक परमात्माच आहे. या दृष्टीनें सहस्रांतील नाम, सर्वनाम, अव्यय ह्या शब्दजाति, किंबहुना त्यांतील सर्वच शब्द, विशेषणभूत असून परमात्माच एक त्यांचें विशेष्य आहे.

जीं नामें आहेत त्यांना रूप, आत्म, इत्यादि उत्तर पदें जोडून तीं विशेषणें होतात. आनंद हें नाम होय, पण आनंदस्वरूप वा आनंदात्मक हें झालें विशेषण.

अशा प्रकारें सहस्रांतील सर्व नामें विशेषणरूपच म्हणावयाचीं.

४. **अव्यय** : यत्, तत्, किम्, भूर्, भुवर्, स्वर्, आणि सनात् हीं अव्ययें सहस्रांत नाम म्हणून आलेलीं दिसतात. पैकीं यत् तत् किम् हीं सर्वनामांचीं रूपें मानल्यानंतर त्यांना अव्ययें समजण्याचें कारण नाहीं. आणि अव्ययें अव्ययें जीं म्हटलीं आहेत, तीं सर्व मूळचीं नामें वा नामाचीं रूपेंच आहेत. भूर्, भूवर्, स्वर् ह्या व्याहृति स्वतंत्र नाम म्हणून आलेल्या नाहींत. 'भूर्भुवःस्वस्-तरु' या सामासिक नामांत त्या आलेल्या आहेत. त्यामुळें त्यांचीहि गणना इथें अव्यय म्हणून करण्याचें प्रयोजन नाहीं. उरलें एक सनात् हें नाम. तें मात्र निपात आहे. पण 'हठात्' 'साक्षात्' या अव्ययांप्रमाणे तें सनचें पञ्चम्यन्त रूप दिसतें. म्हणजे तें अव्ययवत् असलें तरी मूळचें तें नामच आहे. ''सनात् सनातनतमः'' या जोड नामावरून सनात् हें सनातन या अर्थाचें विशेषण असावें असें म्हणतां येईल. सनक, सनंदन, सनत्-कुमार आणि सनत्सुजात हे चौघे ब्रह्मपुत्र म्हणून प्रसिद्धच आहेत. ते सर्व चिरंजीव आहेत आणि त्यांच्यापासून जगांतील विद्यावंश विस्तारला आहे. सनात् हें अव्यय असूनहि तें ब्रह्मवाचक नाम होय. सनत्कुमार या नामांत सनत् हें शत्रन्त म्हणजे वर्तमानकालवाचक कृदन्त रूप दिसतें. कदाचित् त्याची विकृति 'सनात्' असूं शकेल. सनंदन हें रूपहि मुळांत सनंतन असें असावें. म्हणजे तेंहि विकृत रूप आहे. त्यांत स+नन्दन अशीं पदें नसून सन+तन अशीं पदें असावींत. सारांश, सनात् हें आज अव्यय असलें तरी मूळचें तें सन् धातूचें शत्रन्त रूप अथवा सन या कृदन्त नामाचें पञ्चम्यन्त रूप म्हणतां येईल. सनात् शिवाय स्वस्ति हेंहि एक अव्यय सहस्रांत आलें आहे. पण तें मुळांत नाम होतें. पहा. ''सचस्वा न स्वस्तये'' ऋग् १-१-९ इथेंहि सहस्रांत तें ज्या श्लोकार्धांत आलें आहे तिथें म्हणजे ''स्वस्तिदः स्वस्तिकृत् स्वस्ति स्वस्तिभुक् स्वस्ति- दक्षिणः'' मध्यें तें नामरूपच दिसतें. आहे तें सु+अस्ति मुळांत.

सहस्रनामांत या शिवाय दुसरें अव्यय नाहीं. पादपूरणार्थ आलेलीं 'अथ' 'एव' आणि 'च' हीं तीन अव्ययें अर्थातच वेगळीं. त्यांची गणना सहस्रनामांत नाहीं. यावेगळीं ॐ आणि नमः हीं आद्यन्तीं आलेलीं आनुषंगिक अव्ययेंहि सहस्राच्या संहितेबाहेरचींच होत.

□□□

## १३. नामांचें विविध वर्गीकरण

नामांचें वर्गीकरण अनेक प्रकारें होऊं शकेल. पुढें कांहीं प्रकार दिले आहेत.

वर्णानुक्रमः अ १०७, आ ११, इ ३, ई ३, उ ८, ऊ ३, ऋ ३, ए ३, ओ १, औ १ अशीं स्वरादि नामें एकूण १४३ एकशें त्रेचाळीस आहेत.

क ५७, ख १, ग २४ । च १९, छ १, ज २२। त १९, द ३६, ध २२, न ३३ । प ८४, ब १६, भ ४०, म ६६ । य २२, र ११, ल ९, व ११८। श ७१, स १७३ । ह १३ ॥

अशीं व्यंजनादि नामें एकूण ८५७ आठशें सत्तावन्न आहेत.

द्विरावृत्त नामें

अक्षर, अक्षोभ्य, अच्युत, अनघ, अनन्त, अनल, अनिरुद्ध, अनिर्देश्यवपु, अनिर्विण्ण, अनिल, अपराजित, अगित-विक्रम, अमेयात्मा, अमोघ, आदित्य, आदिदेव, ईश्वर, उद्भव, ऋद्ध, कान्त, कुमुद, कृतज्ञ, कृतागम, कृष्ण, केशव, क्षाम, गहन, गोपति, गोप्ता, गोविन्द, चक्री, चतुरात्मा, चतुर्व्यूह,

तार, दक्ष, दुश्‍चर, निवृत्तात्मा, पावन, पुण्य, पुरुष, पुष्कराक्ष, प्रजापति, अर्णव, प्रभु, प्रमाण, भीम, महाकर्मा, महीधर, मार्ग, यज्ञ, वसुप्रद, वसुमना, वायुवाहन, विक्रमी, विधाता, विभु, विशिष्ट, विश्वयोनि, वेदवित्, शिव, शुचि, शुभाङ्ग, शौरि, श्रीनिवास, संवत्सर, सतांगति, सर्वज्ञ, सहिष्णु, सिंह, सिद्धं, सुखद, सुपर्ण, सुव्रत, स्थविष्ठ, स्रष्टा, हिरण्यगर्भ, हुतभुक् अशीं एकूण द्विरावृत्त नामें ७७.

### त्रिरावृत्त नामें

अज, पद्मनाभ, प्राण, भोक्ता, माधव, वसु, वासुदेव, विष्णु, वीर, वीरहा, सत्य अशीं एकूण त्रिरावृत्त नामें ११ (अकरा) आहेत.

### चतुरावृत्त नामें

प्राणद, श्रीमान् अशीं एकूण चतुरावृत्त नामें २ दोन आहेत.

अशीं हीं पुनरुक्त नामें एकूण ९० नव्वद असून पुनरावृत्तिस्थळें १०५ एकशें पांच आहेत. अर्थात् सहस्रांत अपुनरुक्त नामें [१०००– १९५ = ८०५] आठशें पांचच आहेत. तीं इथें देण्याचें कारण नाहीं. वर्णानुक्रमणींत तीं आहेतच.

### नञ्-घटित नामें

अक्रूर, अक्षर[२], अक्षोभ्य[२], अग्राह्य, अचल, अचिन्त्य, अच्युत[२], अज[३], अजित, अतुल, अदृश्य, अधाता, अधृत, अनघ[२], अनन्त[२], (अन्त, अनन्तजित्, अनन्तरूप, अनन्तश्री, अनन्तात्मा) अनय, अनर्थ, अचल, अनादि, अनादिनिधन, अनामय, अनिमिष, अनियम, अनिरुद्ध[२], अनिर्देश्यवपु[२], अनिर्विण्ण[२], अनिल[२], अनिवर्ती, अनिवृत्तात्मा, अनीश, अनुत्तम[२], अनेकमूर्ति, अपराजित[२], अप्रतिरथ, अप्रमत्त, अप्रमेय, अप्रमेयात्मा, अभू, अमरप्रभु, अमानी, अमित-विक्रम[२], अमिताशन, अमूर्ति, अमूर्तिमान्, अमृत, (अमृतप, अमृतवपु, अमृताश, अमृतांशूद्‌भव) अमृत्यु, अमेयात्मा[२], अमोघ[२], अयम, अरौद्र, अविज्ञाता, अविधेयात्मा, अव्यक्त, अव्यक्तरूप, अव्यङ्ग, अव्यय, अव्यय (निधि), अशोक, असत्, असंख्येय, नैक, (नैककर्मकृत्, नैकज, नैकमाय, नैकरूप, नैकशृंग, नैकात्मा)।।

नञ्घटित नामांचीं हीं अशीं ९० पदें आहेत. पाठभेदानें वा प्रकारान्तरानें तीं किंचित् कमीअधिक होऊं शकतील. अनन्त हें स्वतंत्र नञ्घटित आहे. पण सामासिक पदांत त्याचें नञ्रूप न राहतां त्याला स्वतंत्र भावरूप अर्थ प्राप्त होतो. अन्तजित् नव्हे तो अनन्तजित् हा नञ्समास म्हणावयाचा. तसा तो इथें अभिप्रेत नाहीं, तर अनन्त वीरांना वा द्रव्यांस जिंकितो तो अनन्त-जित् असाच तो सोडवला पाहिजे. हा समास उपपद समास म्हटला जाईल आणि म्हणून त्याची गणति वस्तुत: नञ्घटितांत होऊं नये. अशा प्रकारें विचार केल्यास वरील ९० पदें कमी-जास्त होतील हें उघड आहे.

□□□

# १४. पुनरुक्त नामें

सहस्रांत ७३ + १२ + २ = ८७ नामें पुनरुक्त असून पुनरुक्ति-स्थळें १०३ आहेत अर्थात् अक्षरशः सहस्रांत १०००–१०३ = ८९७ अपुनरुक्त नामें आहेत. खालीं द्विरुक्त त्रिरुक्त चतुरुक्त नामें वर्णानुक्रमानें दिलीं असून त्यांच्या पुढील अंक श्लोकांचे आहेत.

**द्विरुक्त**

अक्षोभ्यः ८६, १०७
अच्युतः ११, ३५ (५९)
अनघः १६, ८९
अनन्तः ७०, ९५
अनलः ३२, ७६
अनिरुद्धः २०, ६८
अनिर्देश्यवपुः १९, ७०
अनिर्विण्णः ४७, ९५
अनिलः २५, ८७
अपराजितः ७६, ९२
अमित-विक्रमः ५५, ६८
अमेयात्मा ११, १९
अमोघः १२, १७
आदित्यः ५, ६०
आदि-देवः ३६, ५२
ईश्वरः ४, ९
उद्भवः ४१, ८५
ऋद्धः ३०, ३८
कान्तः ३२, ७०
कुमुदः ६३, ८७
कृतज्ञः ९, ५७
कृतागमः ७०, ८४
कृष्णः ७, ५९
केशवः ३, ६९
क्षामः ४७, ९१
गहनः ४१, ५८
गो-पतिः ५३, ६३
गोप्ता ५३, ६३
गोविन्दः २०, ५८
चक्री ९७, १०७
चतुरात्मा १५, ८२
तारः ३७, १०४
दक्षः ४५, ९८
दुर्धरः २९, ७६
पावनः ३२, ८७
पुण्यः ७३, ९९
पुरुषः २, ४४
पुष्कराक्षः ५, ५९
प्रजापतिः ८, २१
प्रणवः ४४, १०२
प्रभुः ४, ३२
प्रमाणम् ४६, १०३
प्राणः ८, ३५
भीमः ३९, १०१
महाकर्मा ७२, ८४
महीधरः ३४, ४०
मार्गः ४०, ४३
यज्ञः ४८, १०४
वसु-प्रदः ७४, द्वि. ७४ तृ.
वसुमनाः १२, ७४
वायुवाहनः ३६, ९१
विक्रमी ९, ९७
विधाता ५, ५१
विभुः २६, ९४
विशिष्टः २७, (३४)
विश्वयोनिः १३, १६
वेद-वित् १४ तृ. १४ च.
शिवः ४, ६४
शुचिः १७, २७
शुभाङ्गः ६३, ८४
शौरिः ३७, ६९
श्री-निवासः २०, ६५
संवत्सरः १०, ४५
सतां गतिः २०, ४८
सर्वज्ञः ४८, ८७
सहिष्णुः १६, ६०
सिंहः २२, ५२
सिद्धः ११, ८८
सुपर्णः २१, ९१
स्थविष्ठः ६, ४७
स्रष्टा ६३, १०६
हिरण्य-गर्भः ८, ४४
हुतभुक् ९४, ९५

एकूण द्विरुक्त नामें ७३

**त्रिरुक्त**

अजः ११, २२, ५६
निवृत्तात्मा २५, ६४, (८३)
पद्मनाभः ६, २१, ३८
प्राणः ८, ३५, ४४
भोक्ता १६, ५३, ९५
माधवः ८, १८, ७८
वसुः १२, २९, ७४
वासुदेवः ३६, ७४, ७६
विष्णुः १, २८, ७०
वीरः ४३, ६९, ७०
वीरहा १८, ७९, ७०
सत्यः १२, २३, ९३

एकूण त्रिरुक्त नामें १२

**चतुरुक्त**

प्राणदः ८, ३५, ४४, १०२
श्रीमान् ३, १९, २४, ६५

एकूण चतुरुक्त नामें २

# १५. नामांचीं द्विकें, त्रिकें, चतुष्कें

सहस्रांत सर्वत्र जोड नामें आलेलीं दिसतात. प्राय: प्रत्येकच श्लोकांत आपल्याला एखादें तरी द्विक वा त्रिक आढळून येईल. द्विकें कुठें दिसायला विरुद्धार्थक असून वस्तुत: तीं व्याप्तिवाचक आहेत. उदाहरणार्थ 'अणुर् बृहत्', 'कृश: स्थूल:', 'गुणभृत् निर्गुण:', इत्यादि. तो परमात्मा अणुहि आहे आणि बृहत् हि आहे. कृशहि आहे आणि स्थूल हि आहे. तो सगुणहि आहे आणि निर्गुणहि आहे. कुठें तीं उत्तरोत्तर उत्कर्षसूचक आहेत. उदाहरणार्थ 'इज्यो महेज्य:' गुरुर् गुरुतम:' 'सनात् सनातनतम:' 'सहस्रजित् अनन्तजित्' इत्यादि. कुठें तीं कार्यकारण-सूचक आहेत. उदाहरणार्थ 'विश्वं विष्णु:', विद्वत्तमो वीतभय:', 'महाभोगी महाधन:' इत्यादि. परमात्मा कार्यरूप विश्व आहे, कारण तो विष्णुरूप कारण आहे. तो परम निर्भय आहे, कारण तो परम ज्ञानवान् आहे, विद्वान् आहे. तो परम भोग-संपन्न आहे, कारण तो परम धनवान् आहे. कुठें तीं परस्पर-पूरक आहेत. उदाहरणार्थ 'स्थविष्ठ: स्थविर:', 'ज्येष्ठ: श्रेष्ठ:' 'अग्रणीर् ग्रामणी:' 'नारायणो नर:' इत्यादि. तो परमात्मा स्थविष्ठ म्हणजे देशत: अत्यंत विशाल आहे तसा कालत: तो अत्यन्त वृद्ध आहे. तो अग्रणी म्हणजे विश्ववरेण्य आहे तसा तो ग्रामणी म्हणजे ग्रामगुरु वा गांवाचा सरपंच आहे. सृष्टींत ऐश्वर्याचीं एकापेक्षां एक वरचढ स्थानें आहेत. त्यांत ग्रामराज्य हा एकम आहे तर विश्वराज्य हा परम आहे. त्या दोन्ही स्थानीं परमात्माच नेतृत्व करीत आहे म्हणून तो म्हटला आहे अग्रणी आणि ग्रामणी. नारायण हा नरसमूहाचा आदर्श आहे, दैवत आहे; तर त्या आदर्शाला पोंचणारा परम पराक्रमी नरहि तोच आहे. कुठें तीं द्विकें कर्म-कर्तृ-वाचक आहेत. उदाहरणार्थ 'भोजनं भोक्ता', 'वेदो वेदवित्', 'भेषजं भिषक्' इत्यादि. परमात्मा हा भोजन म्हणजे भोज्यहि आहे आणि तें भोज्य सेवणारा भोक्ताहि आहे. तो ज्ञेयरूप वेदहि आहे आणि ज्ञातृरूप वेदवित्हि आहे. तो भेषज म्हणजे चिकित्साद्रव्यहि आहे आणि ते देणारा भिषक् म्हणजे चिकित्सकहि आहे. कुठें तीं स्वगत-भेद-वाचक वा प्रकार-वाचक आहेत. उदाहरणार्थ 'प्रकाशात्मा प्रतापन:', 'चन्द्रांशुर् भास्कर-द्युति:', 'क्रतु: सत्रम्'. तेजाचे दोन गुण उष्णता आणि प्रकाश. ते प्रकाशात्मा आणि प्रतापन: हीं जोडनामें सांगत आहेत. तेजाचे दोन प्रकार शीतल आणि प्रखर, चन्द्रांशु आणि भास्करद्युति हीं जोडनामें सांगत आहेत. 'क्रतु: सत्रम्' ही जोडनामें तो परमात्मा सर्व ह्रस्व-दीर्घ-यज्ञ-स्वरूप आहे असें सांगत आहेत. कुठें तीं विकासवाचक आहेत. उदाहरणार्थ 'अक्रूर: पेशल:' 'वनमाली हलायुध:' 'विजितात्मा विधेयात्मा' इत्यादि. तो परमात्मा क्रूर नाहीं इतकेंच नव्हे तर तो कोमल आहे. तो क्रूरत्व-दोषरहित आहे इतकेंच नव्हे तर कोमलत्व-गुणयुक्त हि आहे. तो वनमाली म्हणजे नुसता रानोमाळ भटकणारा आणि शिकारीवर वा कंदमूळफळांवर निर्वाह करणाराच नाहीं, तर तो हलानें म्हणजे नांगरानें कृषि करून ग्रामीण स्थिर जीवन जगणाराहि आहे. यालाच पुढें नागर म्हटलें आहे. म्हणजे नांगरानें आजीविका संपादणारा तो नागर, आणि तसें न करणारा तो जंगली. 'वनमाली हलायुध' हीं जोडनामें परमात्म्याच्या म्हणजे मानव-समाजाच्या विकासाचीं दोन युगें, दोन क्रांति, सूचित करीत आहेत. 'सुधन्वा खण्डपरशु:' हीं रानटी जीवनाचीं द्योतक आहेत. तर 'वनमाली हलायुध:' हीं जोडनामें ग्रामीण नि नागर जीवनाचीं द्योतक आहेत. 'विजितात्मा जितेन्द्रिय:, हीं जोड-नामें सांगत आहेत कीं मन जिंकावें म्हणजे इंद्रियें वश होतात. नुसतींच इंद्रियें ताब्यात ठेवणें पुरेसें नाहीं आणि शक्यहि नाहीं. इंद्रियें जिंकून मन ताब्यांत ठेवावें, मन ताब्यांत ठेवून इंद्रियें जिंकावीं. दोन्ही मिळूनच पूर्ण विजय.

अशा प्रकारें द्विकें वा जोडनामें हीं विरोध, विशेष, कार्यकारण, पूरण, कर्मकर्तृभाव, भेद, विकास इत्यादि नाना भावांच्या योगें परमात्म्याची व्याप्ति वा समग्रता सूचित करतात.

लहानपणीं आमच्या मावशीनें मला एक कॅलीडोस्कोप (Kaleidoscope) म्हणजे एक चित्रादर्श दिला होता. तो हलवून वा गोल फिरवून पाहिला म्हणजे प्रत्येक वेळीं त्यांत एक नवें चित्र, नवी रचना दिसायची. तसेंच या विश्वरूपाचें आहे. अनन्ताद्भुत-दर्शनच तो आहे. पहावें तें रूप आगळेंच! सहस्रनामाच्या नळकांड्यांतून तें आगळेपण व्यासांनीं साठविलें आहे. एककें द्विकें त्रिकें चतुष्कें यांच्या योगें विशालबुद्धि व्यासांनीं तें ग्रथित केलें आहे.

त्रिकें व चतुष्कें हीं सहस्रांत आलीं आहेत. पण द्विकांच्या मानानें थोडीं.

द्विकांची त्रिकांची नि चतुष्कांची सूचि श्लोकानुक्रमानें पुढें दिली आहे–

**द्विकें**

**(अंक श्लोकांचे आहेत)**

| | |
|---|---|
| विश्वं विष्णुः | १ |
| भूतात्मा भूतभावनः | १ |
| पूतात्मा परमात्मा | २ |
| क्षेत्रज्ञोऽक्षर एव च | २ |
| भूतादिर् निधिरव्ययः | ४ |
| शर्वः शिवः | ४ |
| प्रभुः ईश्वरः | ४ |
| धाता विधाता | ५ |
| स्थविष्ठः स्थविरः | ६ |
| प्राणदः प्राणः | ८ |
| ज्येष्ठः श्रेष्ठः | ८ |
| हिरण्यगर्भो भूगर्भो | ८ |
| माधवो मधुसूदनः | ८ |
| विक्रमः क्रमः | ९ |
| कृतज्ञः कृतिः | ९ |
| सिद्धः सिद्धिः | ११ |
| वृषकर्मा वृषाकृतिः | १२ |
| सर्वगः सर्वविद् | १४ |
| वेदो वेदवित् | १४ |
| चतुरात्मा चतुर्व्यूहः | १५ |
| भोजनं भोक्ता | १६ |
| उपेन्द्रो वामनः | १७ |
| वामनः प्रांशुः | १७ |
| नियमो यमः | १७ |
| वेद्यो वैद्यः | १८ |
| महोत्साहो महाबलः | १८ |
| महेष्वासो महीभर्ता | २० |
| गोविन्दो गोविदांपतिः | २० |
| सुपर्णो भुजगोत्तमः | २१ |
| संधाता संधिमान् | २२ |
| गुरुर् गुरुतमः | २३ |
| सत्यः सत्यपराक्रमः | २३ |
| निमिषोऽनिमिषः | २३ |
| अग्रणीर् ग्रामणीः | २४ |
| आवर्तनो निवृत्तात्मा | २५ |
| सुप्रसादः प्रसन्नात्मा | २६ |
| सत्कर्मा सत्कृतः | २६ |
| नारायणो नरः | २६ |
| असंख्येयो ऽप्रमेयात्मा | २७ |
| सिद्धार्थः सिद्धसंकल्पः | २७ |
| वर्धनो वर्धमानश् च | २८ |
| वसुदो वसुः | २९ |
| नैकरूपो बृहद्रूपः | २९ |
| शिपिविष्टः प्रकाशनः | २९ |
| प्रकाशात्मा प्रतापनः | ३० |
| स्पष्टाक्षरो मन्त्रः | ३० |
| चन्द्रांशुर् भास्करद्युतिः | ३० |
| भानुः शशबिन्दुः | ३१ |

□□□

## १६. अर्थदृष्ट्या नामांचें वर्गीकरण

नामें सामान्यत: जन्मादि-संबन्ध, रूप, गुण आणि कर्म यांचीं वाचकें आढळतात. नाम हें नामवाचक आहे या म्हणण्यांत अर्थ नाहीं असें नाहीं. कोणत्याहि रूप-गुण-कर्मांचें सूचन न करतां नुसतेंच तें नाम असूं शकेल. आणि नामाचें नामत्व खरोखर त्यांतच आहे असें म्हटलें पाहिजे. ''नांव सोनुबाई हातीं कथलाचा वाळा'' अथवा ''अमर को मैंने मरते देखा, धनपति पिटत पुआल। लछमी के तन बस्तर नाहीं, भलो मैं ठंठनपाल।।'' या म्हणी नामाचा अर्थाशीं कांहीं संबंध नसतो हेंच सूचित करतात आणि त्या दृष्टीनें नामांचें अर्थदृष्ट्या वर्गीकरण हा विचार च कुंठित होतो. नाम म्हणजे नाम, त्याहून तें अधिक नाहीं, कमी नाहीं. आणि हा विचारहि खरोखर मनोरम आहे. वेदमंत्र हे वेदमंत्र आहेत; त्यांचा अर्थ कसला करायचा? त्याप्रमाणें देवाचें नांव हें देवाचें नांव आहे, त्याचा वेगळा अर्थ कसला? तें देवाचें नांव आहे यांत सगळा अर्थ येऊन गेला.

परंतु हा महाविचार, हें महान् सत्य मान्य करूनहि, जेव्हां आपण नामाकडे पाहूं लागतों तेव्हां त्यांतील अर्थ-विशेष आपल्या लक्षांत आल्यावांचून राहत नाहीं. आणि त्यामुळेंच तर वरील सारख्या म्हणी वा उक्ति प्रचलित झाल्या आहेत. सोनूबाई म्हटली म्हणजे तिच्या अंगावर चार सोन्याचे दागिने असले पाहिजेत, अशी अपेक्षा सहजच होते. कारण सोनें-शब्दाचा अर्थ-वियोग आपण सहन करूं शकत नाहीं. शब्द हे निरर्थक असूं शकत नाहींत. शब्द आणि अर्थ हे नित्य संबद्ध आहेत, किंबहुना अभिन्न आहेत, अशी आपली धारणा असते, म्हणून दसऱ्याला सोनें म्हणून दिलेलीं पानेंहि आपण सोनें म्हणून ग्रहण करतों. कारण तीं पानें देण्यांतील भक्ति, आदर, प्रेम, वात्सल्य हा गुणच तिथें सोनें आहे. पानें तत्प्रतीक मात्र आहेत, हें आपण ओळखत असतों. म्हणजे शब्द हें केव्हाहि निरर्थक नाहींत. ते वाच्यार्थानें लागू पडत नसल्यास त्यांची लक्षणा घ्यावयाची, पण निरर्थकता केव्हांहि मान्य नाहीं. तात्पर्य सोनूबाईच्या हातीं कथलाचा वाळा असला, तरी, 'सोनूबाई' शब्दाच्या हातीं सोन्याचींच कांकणें किणकिणत असतात. अर्थात् सर्व शब्द सार्थ असून त्यांची अर्थवत्ता सदैव अबाधितच राहते. आणि म्हणून नामांची अर्थवत्ता विचारणीय आहे.

नामांकडे या दृष्टीनें पाहूं लागल्यास तीं जन्म, रूप, गुण, आणि कर्म यांचीं वाचकें असल्याचें आढळून येतें. या चतुष्कापैकीं कोणा एकाचें वा अनेकांचें सूचन त्यांत असूं शकेल. उदाहरणार्थ—

यदुश्रेष्ठ, वृष्णि, शौरि हीं नामें कृष्णावतारी देवाचा वंश कुल गोत्र सूचित करतात, तर वासुदेव, देवकीनन्दन त्याच्या पितरांचें द्योतन करीत आहेत. गदाग्रज, रामानुज हीं त्याच्या भ्रात्यांचीं वाचकें आहेत सुयामुन हें नाम त्याचा देश सूचित करीत आहे. जन्म नि जन्मानुसंबंधी संबंध सूचित करणारीं नामें आहेत हीं.

कृष्ण, केशव, सुमुख, सुलोचन, शुभांग, मनोहर, कुंडली, कनकांगदी, शिखंडी, वनमाली, गदाधर, गरुडध्वज इत्यादि नामें त्याचा वर्ण, वेश, आकृति, आभूषणें नि आयुधें यांचें वर्णन करतात. अनघ, पुण्य, अशोक, आनन्द, ब्रह्मण्य, गोहित, भयनाशन, लोकबन्धु, वत्सल, वरद, विक्रमी, जितामित्र, मेधावी, वेदवित् इत्यादि नामें त्याचे गुण- गौरव गातात.

केशिहा, चाणूरान्ध्र,-निषूदन, जनेश्वर, धर्मगुप् योगविदां नेता, गोविदां पति, जितमन्यु, जितक्रोध तत्त्वविद् गुरु इत्यादि नामें त्याचें कर्म, त्याचा पराक्रम, त्याची कीर्तिगाथा गातात.

अव्यक्त परमात्मा अथवा त्याचा व्यक्त अवतार यांचें सृष्टि-कर्म वा अवतारकार्य हीं नामें सगुण-निर्‌गुण-परतेनें परोपरीनें वर्णन करतात. याहून अधिक बारीक विश्लेषण वा वर्गीकरण नि त्यांच्या जंत्र्या देण्याची गरज नाहीं. राजा नि भिकारी, स्त्री नि पुरुष, बाल नि वृद्ध, इत्यादि नाना रूपें (त्याच बरोबर नामें हि) बहुरूपी धारण करतो खरा, पण तो त्या सर्वांहून वेगळाच असतो. तद्‌वत् अव्यक्त परमात्मा हा या नानावर्णाकृति व्यक्त विश्वाकाराहून वेगळाच आहे, आणि वेगळा असूनहि हीं सारीं रूपें त्याचींच आहेत, किंबहुना तोच आहे, हेंच अद्वैत-दर्शन होय, हीच एकतत्त्व-स्थिति होय. ज्यानें हें जाणलें, ओळखलें ''त्याचें कर्तव्य संपलें''. मग या नामरूपांचें तो विश्लेषण काय करणार, नि वर्गीकरण कसें करणार? त्या सर्व पाण्यावरच्या रेघोट्याच, लिहितां लिहितां पुसल्या जाणार. म्हणून दिग्दर्शनार्थ वर थोडीं उदाहरणें दिलीं आहेत. तदनुसार सर्व ऊहनीय, वर्गीकरणीय.

□□□

## १७. निर्‌गुण-वाचक नामें

अक्षर, अक्षोभ्य, अग्राह्य, अचल, अचिन्त्य, अच्युत, अज, अतीन्द्रिय, अदृश्य, अधिष्ठान, अधोक्षज, अनघ, अनन्त, अनन्तरूप, अनादि, अनादिनिधन, अनामय, अनिमिष, अनिरुद्ध, अनिर्‌देश्यवपु, अनीश, अनुत्तम, अप्रमेय, अमूर्ति, अमूर्तिमान्, अमृत, अमेयात्मा, अव्यय, अशोक, आत्मयोनि, एक, जगतः सेतु, जगदादिज, जन्ममृत्यु-जरातिग, ज्ञानगम्य, ज्योति, तत्, तत्त्व, ध्रुव, निर्‌गुण, निर्‌वाण, पुरातन, ब्रह्म, लोकाध्यक्ष, विक्षर, विभु, विरज, विराम, विविक्त, विशोक, शब्दातिग, शम, शरण, शान्त, शान्ति, शाश्वत, शुचि, शून्य, सत्य, सनात्, सनातनतम, सम, सर्वग, सर्वदर्शी, साक्षी, स्वयंजात, स्वयंभू इत्यादि.

□□□

## १८. गुण-वाचक नामें

सहस्रांतील सर्वनामें ''गौण'' म्हणजे गुणवाचक असलीं तरी साक्षात् गुणवाचक वा भाववाचक नामें अक्रूरता, दयालुता इत्यादि इथें मुळींच नाहींत म्हटलें तरी चालेल. सर्व नामें प्रायः गुणविशेषणरूप आहेत. जीं विशेष्यनामरूपच दिसतात तीं हि धात्वर्थानें प्रायः विशेषणरूपच होत, असें आढळून येतें. उदाहरणार्थ आनंद म्हणजे आनंदाचा भाव हा अर्थ विशेष्यरूप वाटेल. तथापि ''आनन्दयति इति आनन्दः'' जो आनंदवितो तो आनंद म्हटला म्हणजे तो शब्द विशेषणरूपच झाला. वस्तुतः परमात्माच एक विशेष्य असून शब्दमात्र त्याचें विशेषण होय. आणि त्याच अर्थानें सबंध सहस्र हें गौण आहे. तथापि जीं विशेष्यरूप नामें आढळतात तीं अशीं: अधिष्ठान, आनन्द, उद्‌भव, क्रम, जय, ज्ञान, तत्त्व, दण्ड, दम, धर्म, नय, नियम, निर्‌वाण, निष्ठा, प्रत्यय, प्रभव, प्रमाण, ब्रह्म, योग, विजय, शम, शर्म, शान्ति, श्रेय, संग्रह, संभव, सह, साम, स्वस्ति, हेतु इत्यादि.

□□□

# १९. जगदुत्पत्ति-स्थिति-संहारवाचक नामें

सर्व नामें दोन विभागांत विभागितां येतील. एक विभाग कूटस्थ ब्रह्माचा म्हणजे निर्गुणाचा आणि दुसरा विभाग व्यक्त क्षर साकाराचा म्हणजे त्रैगुण्याचा. या दुसऱ्या विभागांत जगाची उत्पत्ति स्थिति आणि संहार करणाऱ्या परमात्म्याचीं तत्तत्कार्यवाचक नामें त्रिधा विभागून देतां येतील. उदाहरणार्थ–

जगदुत्पत्ति-सूचक नामें

उद्‌भव, कर्ता, कारण, क्षोभण, जनन, जन-जन्मादि, जीवन, धाता, प्रजाभव, प्रभव, ब्रह्मा, भूतकृत्, भूतभावन, भूतादि, युगादिकृत्, लोकाधिष्ठान, विधाता, विश्वकर्मा, विश्वयोनि, विश्वरेता, वेधा, सर्ग, स्रष्टा, इत्यादि.

जगत्स्थिति-सूचक नामें

त्रिककुब्धाम, त्रिलोकात्मा, त्रिलोकधृक्, धरणीधर, धराधर, प्रजापति, भर्ता, भारभृत्, भाव, भावन, भूतभव्यभवन्नाथ, भूतभृत्, भूतावास, महीधर, रक्षण, लोकत्रयाश्रय, लोकबन्धु, लोकस्वामी, वर्धन, वर्धमान, विश्वधृक्, विष्णु, शास्ता इत्यादि.

जगत्संहार-सूचक नामें

अन्तक, अप्यय, ईशान, ईश्वर, त्रिलोकेश, दमयिता, दण्ड, प्रतर्दन, प्रतापन, भूतभव्यभवत्प्रभु, भूतमहेश्वर, रुद्र, लोकनाथ, विदारण, विश्वभुक्, संकर्षण, संग्रह, संप्रमर्दन, सर्वेश्वर इत्यादि.

□□□

# २०. व्यक्ति-वाचक नामें

सहस्रांत सर्व नामें गौण म्हणजे गुणवाचक आहेत, असें सहस्रच सांगत आहे. त्यामुळें त्यांत व्यक्तिवाचक नामें असण्याचें कारण नाहीं. तथापि कांहीं कांहीं व्यक्ति लोकातिग सामर्थ्याच्या होऊन जातात आणि त्यांना कांहीं केल्या वगळतां येत नाहीं. त्यांचा अनुल्लेख, उपेक्षा वा विरोध करतां येत नाहीं. अशीं कांहीं व्यक्तिवाचक नामें सहस्रांतहि आलीं आहेत. उदाहरणार्थ कपिलाचार्य, मनु आणि व्यास. ब्रह्मा विष्णु आणि रुद्र या नामांत जगदुत्पत्ति-स्थिति-लयकारी त्रिदेवांचा उल्लेख आढळतो. वैदिक देवतांमध्यें सविता, वायु, वरुण, अग्नि, यम, सूर्य, सोम, इन्द्र, प्रजापति, विश्वकर्मा, त्वष्टा, धनेश्वर, स्कंद इत्यादि व्यष्टिदेवता आणि आदित्य, रुद्र, वसु इत्यादि समष्टिदेवता वा गणदेवता आढळून येतात. वैदिक देवता द्युलोक, अन्तरिक्ष आणि भूमि यांच्या ठाईं विभागलेल्या आहेत. उदाहरणार्थ सूर्य हा द्युलोकगत, विद्युत् अन्तरिक्ष-गत आणि अग्नि हा भूमिगत मानिला आहे. त्याप्रमाणें ही हवी तर त्या वैदिक देवतांची विभागणी होऊं शकेल. पौराणिक देवतांत आणि अवतारांत मत्स्य, कच्छप, वराह, नारसिंह, वामन, परशुराम, राम, कृष्ण, बुद्ध आणि कल्कि यांचा उल्लेख पुढील नामांत आढळून येईल.. शृंगी (शृंगधर मत्स्य); महाद्रिधृक् भारभृत् (महाद्रि मेरूचा भार धारण करणारा कच्छप), महावराह, नारसिंहवपु, वामन, खण्ड-परशु, राम, कृष्ण, सिद्धार्थ आणि सर्वप्रहरणायुध. तथापि हीं वा असलींच इतर नामें विशिष्ट अवतार-वाचकच आहेत असें मानण्याचें हि कारण नाहीं. तीं अवतारपूर्व परमात्म्याचीं आहेत.

अवतार अर्वाचीन आहेत आणि परमात्मा अति प्राचीन आहे. शिवाय अवतार दहाच झाले असेंहि नाहीं. ते हि किती झाले, कोणीं सांगावें? भागवतांत त्यांची संख्या २४ दिली आहे. तीर्थंकर चोवीस, बुद्ध चोवीस तर अवतारच दहा कां? तेहि चोवीस कल्पिले! वस्तुत: त्यांची मिति नाहीं. भगवन्तानें "संभवामि युगे युगे" म्हणून म्हटलेंच आहे. तेव्हां त्यांचें संख्यान होऊंच शकत नाहीं. तीच गोष्ट विभूतींची हि. विभूतींची गणति नाहीं. "नास्त्यन्तो विस्तरस्य मे" असें भगवन्तानें म्हटलेंच आहे. तथापि दिग्दर्शनार्थ कांहीं विभूति सांगितल्या आहेत. विष्णु, शंकर, ब्रह्मा इत्यादि कांही देवता; भृगु, नारद, कपिल, इत्यादि कांहीं व्यक्ति; सागर, हिमालय, गंगा, ऐरावत, उच्चै:श्रवा, कामधेनु, वासुकि, अनन्त, मकर, वैनतेय, अश्वत्थ, कुसुमाकर, मार्गशीर्ष, इत्यादि स्थल, पशुपक्षी, वनस्पति प्रभृति सृष्टपदार्थ; अध्यात्मविद्या, बृहत्साम, गायत्री, जप इत्यादि उपासना-विषय; ज्ञान, मौन, नीति, दण्ड, क्षमा इत्यादि गुण; द्यूत, तेज, सत्त्व, व्यवसाय, जय इत्यादि ऐतिह्य गीतेच्या विभूति योगांत आलें आहे. सहस्रांत हि हें सर्व प्रकारान्तरानें आलें आहे. इथें विष्णु, शिव, ब्रह्मा, इन्द्र, चन्द्र, सूर्य, वायु, वरुण, यम इत्यादि देवता आहेत. सिद्धार्थ, वर्धमान, तीर्थंकर, सर्वदृग् व्यास महर्षि, कपिलाचार्य, हिरण्यगर्भ, सनत्, मनु, ध्रुव, जह्नु, धर्म, भीम, धनंजय, राम, कृष्ण, हलायुध, प्रद्युम्न, अनिरुद्ध, संकर्षण, शूरसेन, यदुश्रेष्ठ, चाणूरान्ध्रनिषूदन, केशिहा, देवकीनंदन, वासुदेव, नारायण, माधव, नर, शिखण्डी, नहुष, शत्रुघ्न, कपीन्द्र, दामोदर, शार्ङ्गधन्वा, कालनेमिनिहा, वनमाली, विश्वकर्मा, अक्रूर, विष्णु, गरुड, सुपर्ण विष्णु, शिव, वासवानुज, नारसिंहवपु, वामन, महावराह, खण्डपरशु, वैकुंठ, वैखान, शूर, शूरजनेश्वर, शौरि, श्रवण, समितिंजय, सुषेण, स्कंद, सुधन्वा, सुपर्ण, रुद्र, महादेव, पृथु, पूर्ण, पुरुषोत्तम, पुरुष, पुरुजित्, पुरंदर, परमेष्ठी, गरुडध्वज, गदाधर, गदाग्रज, गोविन्द, जनार्दन, जयन्त, त्वष्टा, त्रिविक्रम, दामोदर, नन्द, पद्मनाभ, प्रतर्दन, ब्रह्मा, वरुण, शंभु, सहस्राक्ष, सुदर्शन, सुयामुन, सुषेण, स्रग्वी, हंस, हृषीकेश, इत्यादि व्यक्ति आहेत, अथवा म्हणायचें हीं सगळीं व्यक्ति-गन्धि नामें आहेत सृष्ट पदार्थांत. कालवाचक निमिष, अहर्, ऋतु, वत्सर, संवत्सर, आहेत. तेजोवाचक आहेत अह:, संवर्तक, ज्योति, अर्क, ज्योतिरादित्य, ज्योतिर्गणेश्वर, तेजोवृष, द्युतिधर, भानु, भास्करद्युति, रवि, सप्तवाहन, सहस्रांशु, सहस्रार्चि, सूर्य, नक्षत्रनेमि, नक्षत्री, सोम; अर्चिष्मान्, सप्तजिह्व, सप्तैधा:; इत्यादि; जलवाचक आहेत अम्भोनिधि, अपांनिधि. महान्हद, पर्जन्य इत्यादि; वायुवाचकांत आहेत: अनिल, पवन, वायु, समीरण इत्यादि; अचल, धरणीधर, धराधर, महीधर, इत्यादि पर्वतवाचक आहेत; सुपर्ण, हंस, चतुर्दंष्ट्र, शरभ, सिंह, वृष, वृषभ, कपीन्द्र, वृषाकपि, महावराह, भुजगोत्तम, महोरग, व्याल हीं नामें तिर्यग्वाचक आहेत. अश्वत्थ, उदुम्बर, न्यग्रोध, वृक्ष इत्यादि वृक्षवनस्पतिवाचक आहेत. बीज, अन्न, औषध, भेषज इत्यादि खाद्यवाचक आहेत.

□□□

## २१. संध्येंतील चोवीस नामें

( चोवीस ह्या संख्येला एक विशेष महत्त्व आहे. तें आलें आहे वेदसार गायत्री मंत्राच्या चोवीस अक्षरांमुळें त्या संख्येला अनुसरून संध्येंतील चोवीस नामें कल्पिलीं आहेत. ती झाली प्राकृत संध्या. गायत्रीच्या चोवीस अक्षरांना अनुलक्षून च दत्तात्रेयाचे चोवीस गुरू, जैनांचे चोवीस तीर्थंकर आणि बौद्धांचे चोवीस बुद्धावतार कल्पिले आहेत असें दिसतें. )

(अंक श्लोकांचे आहेत)

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| १ | केशवः | ३, ६९ | १३ | संकर्षणः | ५९ |
| २ | नारायणः | २६ | १४ | वासुदेवः | ३६, ७४, ७६ |
| ३ | माधवः | ८, १८, ७८ | १५ | प्रद्युम्नः | ६८ |
| ४ | गोविन्दः | २०, ५८ | १६ | अनिरुद्धः | २०, ६८ |
| ५ | विष्णुः | २८, ७० | १७ | पुरुषोत्तमः | ३ |
| ६ | मधुसूदनः | ८ | १८ | अधोक्षजः | ४४ |
| ७ | त्रिविक्रमः | ५६ | १९ | नारसिंह (वपुः) | ३ |
| ८ | वामनः | १७ | २० | अच्युतः | ३५, ५९ |
| ९ | श्रीधरः | ६५ | २१ | जनार्दनः | १४ |
| १० | हृषीकेशः | ६ | २२ | उपेन्द्रः | १७ |
| ११ | पद्मनाभः | ६, २१, ३८ | २३ | हरिः | ६९ |
| १२ | दामोदरः | ४० | २४ | (श्री) कृष्णः | ७, ५९ |

□□□

## २२. नामें आणि नामेतर पदें

सहस्राच्या १०७ श्लोकांत नामेतर पदें कमींत कमी आलीं आहेत. नामें सहस्र आहेत आणि तदितर पदें आहेत—'च' 'एव' आणि 'अथ'. च २ क, २ घ, २८ ग, ३३ ग, ४८ क, १०५ घ, एकूण ६ वेळां; एव २ घ, १०५ घ, एकूण २ वेळां; अथ ७६ घ, केवळ एकदां; अशीं केवळ ९ वेळां आलीं आहेत हीं ३ पदें.

[येथें अंक श्लोकांचे असून क ख ग घ हीं अक्षरें १, २, ३, ४ चरण सूचित करतात.]

□□□

## २३. संख्या-विचार

या नामांचा विचार करतांना त्यांच्या संख्यावाचक सहस्र या पदाचा विचार प्रथम येणें स्वाभाविकच आहे. खरोखर हीं नामें सहस्र आहेत का? आणि सहस्रच कां? कमी अधिक कां नाहींत?

आमचा धर्म वेदमूलक आहे. त्यामुळें आमच्या सर्व विचाराचें उच्चाराचें नि आचाराचें मूळ वेदांत सांपडतें–प्रकट वा प्रच्छन्न. सहस्रच कां, याचें उत्तर वेदांत सहस्रनामाचा उच्चार आला आहे म्हणून. वेदाच्या प्रसिद्ध पुरुषसूक्ताचा आरंभ "सहस्रशीर्षा पुरुषः सहस्राक्षः सहस्रपात्" असा झाला आहे. तेथूनच सहस्र पद घेऊन तो विश्वरूप परमात्मा सहस्रनामा कल्पिला आहे. "सहस्रमूर्धा विश्वात्मा सहस्राक्षः सहस्रपात्" (सहस्रश्लोक २४) असा त्या सूक्ताच्या वचनाचा अनुवादच नामसहस्रांत आला आहे. त्यावरून सहस्राचें मूळ कोणतें आणि सहस्रच कां ह्याचा उलगडा होतो. अर्थात् सहस्र हें संख्यावाचक पद अनन्ताचें उपलक्षण मात्र आहे. हें उघड आहे, तथापि सहस्र या संख्येलाहि महत्त्व आहे. सहस्र ही संख्या पूर्णतावाचक वा अनन्तवाचक कशी झाली? हाताचीं दहा बोटें हें आमचें पहिलें स्वाभाविक गणन आहे. त्याची दसपट म्हणजे शंभर आणि त्याचीहि दसपट म्हणजे सहस्र. तीन ही संख्या बहुत्ववाचक आहे. एक केवलतावाचक आहे, तर दोन पार्थक्यवाचक आहे पण बहु म्हणायला दोहोंहून अधिकाची अपेक्षा असते. त्यामुळें दश चा घन (१०×१०×१०=१०००) म्हणजे सहस्र ही संख्या मंगल संख्या होय आणि म्हणून ती पूर्णतावाचक वा अनन्तवाचक म्हणावयाची.

संख्याबद्ध ज्ञान म्हणजे सांख्य होय. १ म्हणजे पुरुष, २ म्हणजे पुरुष आणि प्रकृति, ३ म्हणजे तीन गुण, ४ म्हणजे चित्तचतुष्टय, ५ म्हणजे पंच महाभूतें, ६ म्हणजे षड् भावविकार इत्यादि इत्यादि. अशा प्रकारें जें संख्यात होत नाहीं तें ज्ञान होत नाहीं. म्हणून सांख्य म्हणजेच ज्ञान. इथें सहस्र-संख्यात नाम हें ज्ञानाची पूर्णता दाखवीत आहे. सांख्यांचें तत्त्वसंख्यान

मूलप्रकृतिरविकृतिर्
महदाद्याः प्रकृति-विकृतयः सप्त।
षोडशकस् तु विकारो
न प्रकृतिर् न विकृतिः पुरुषः॥

अशा प्रकारें २५ या संख्येवर संपतें; परन्तु सहस्र जणूं तें संख्यान सहस्रावधि आहे, अगणित आहे, अनन्त आहे, असें सुचवितें. सहस्रांतच सहस्रजित् अनन्तजित्" अशीं दोन नामें जोडून आलीं आहेत. तीं सुचवितात कीं जो सहस्रजित् म्हटला, तोच अनन्तजित् आहे. म्हणजे सहस्र हें पद अनन्तवाचकच समजावयाचें. शेषाचेंच दुसरें नांव अनन्त आहे आणि तो सहस्रमुख आहे हें प्रसिद्धच आहे.

सहस्राचा हा आध्यात्मिक अर्थ सोडून देऊन आपण त्याच्या भौतिक अर्थाकडे वळूं. इथें सहस्र म्हणजे नऊशें नव्व्याण्णव अधिक एक असाच अर्थ घ्यावयाचा, त्याहून अधिक नाहीं, उणा नाहीं. कारण ती संख्या निश्चितार्थवाचक आहे अर्थात् नामसहस्रांत एकूण बरोबर हजार नामें आलीं आहेत. तीं कमी वा जास्त मोजण्याचा आम्हांला अधिकार नाहीं.

पण कित्येक नामें द्विवार, त्रिवार वा चतुर्वार आलीं आहेत, त्याचें काय? तीं सर्व वेगवेगळींच समजावयाचीं आहेत. तसें न केल्यास संख्यानिर्बन्ध मोडावा लागेल. तीन प्रकारें नामांचें भिन्नत्व कल्पितां येतें १. वर्णभेद, २. अर्थभेद, ३. क्रमभेद. राम आणि कृष्ण हे शब्द उघडच वेगवेगळे आहेत.राम आणि कृष्ण शब्द हे भिन्नवर्ण आहेत. पण द्विवार आलेले कृष्ण शब्द हे वर्ण समान असून हि अर्थभेदानें भिन्न होत. एक व्यक्तिवाचक, तर दुसरा गुणवाचक. एक

वसुदेव-पुत्र, तर दुसरा कृषक आणि काळा आणि म्हणून आकर्षक. परंतु जियें वर्णभेदहि नाहीं आणि अर्थभेदहि नाहीं. (उदाहरणार्थ ७४ व्या श्लोकांत एकापुढें एक वसुप्रद शब्द आला आहे) तियें त्या दोन शब्दांचें भिन्नत्व त्याच्या क्रमभेदानें मानलें पाहिजे. त्यांची आनुपूर्वी भिन्न असल्यामुळें ते भिन्न होत. संख्येंतील अंकांमध्यें आपल्याला हें चटकन समजतें. ११ या संख्येंत एक १ दशम स्थानीय आहे, तर दुसरा १ एकम स्थानीय आहे. त्यामुळें त्यांत अन्तर आहे. तसाच पहिला प्रहार आणि सहस्रावा, प्रहार या नात्यानें एकरूपच असले तरी ते सर्व क्रमाच्या योगें भिन्न असून त्यांचे परिणामहि भिन्न भिन्नच आहेत. पहिल्या प्रहारानें दगडाला टवकाहि पडत नाहीं, तर शेवटच्या प्रहारानें तो पार दुभंगतो. म्हणून क्रमालाहि किंमत आहे. अशा प्रकारें वर्ण, अर्थ आणि क्रम यांच्या पृथक्त्वाच्या कारणानें सर्व नामें भिन्न आहेत. द्विवार त्रिवार वा चतुर्वार आवृत्त नामेंहि भिन्नच आहेत. त्यांच्या भिन्नत्वाचें मुख्य कारण कुठें एकेरी, कुठें दुहेरी, कुठें तिहेरी, असूं शकेल. क्रमभेद तर सर्वत्र आहेच. त्याच्या जोडीला वर्णभेद आणि अर्थभेदहि यथावसर असणार. अशा तिहेरी उपपत्तीनें सहस्राचें सहस्रत्व सिद्ध होतें.

□□□

## २४. शतक-निर्णय

सहस्रांतील एकूण नामांची संख्या सहस्र ह्या संख्यावाचकामुळें सुनिश्चित झालेली असली, तरी विचारभेदामुळें पाठभेद आणि पाठभेदामुळें गणना-भेद होतो. त्यामुळें शतकें वेगवेगळीं होतात. पुढें शांकर व रामानुजीय शतक-निर्णय दिले आहेत. याहून वेगळा हि निर्णय होऊं शकेल. रामानुजसंप्रदायांतील पराशर भट्टांच्या भगवद्गुण-दर्पण नामक भाष्यानुसार असलेल्या शतक-निर्णयाला इथें रामानुजीय म्हटलें आहे. शंकराचार्यांप्रमाणें रामानुजाचार्यांनीं विष्णुनाम-सहस्रावर भाष्य केलेलें आढळांत नाहीं. अंक श्लोकांचे व क ख ग घ हीं अक्षरें चरणांचीं होत. विनोबांनी सोईसाठीं श्लोकान्त शतक निर्णय केला आहे. म्हणून मी त्याला विनोबाकृत श्लोकानुकूल शतकनिर्णय म्हणतों.

| शांकर | | | रामानुजीय | | | विनोबाकृत श्लोकानुकूल | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| शतक | आदि | अन्त | शतक | आदि | अन्त | आदि | अन्त |
| १ | विश्वम् | अच्युतः | १ | विश्वम् | सर्वादिः | १ | ९ |
| | १ क | ११ ख | | १ क | ११ ख | १ | ८४ |
| २ | वृषाकपिः | सिंहः | २ | अच्युतः | अमृत्युः | १० | २० |
| | ११ ग | २२ क | | ११ ख | २२ क | ८५ | १८८ |
| ३ | संधाता | युगादिकृत् | ३ | सर्वदृक् | प्रभुः | २१ | ३२ |
| | २२ ख | ३३ क | | २२ क | ३२ घ | १८९ | २९९ |

| शांकर | | | रामानुजीय | | | विनोबाकृत श्लोकानुकूल | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| शतक | आदि | अन्त | शतक | आदि | अन्त | आदि | अन्त |
| ४ | युगावर्तः<br>३३ क | अनयः<br>४३ ख | ४ | युगादिकृत्<br>३३ क | नयः<br>४३ ख | ३३/३०० | ४२/३९३ |
| ५ | वीरः<br>४३ ग | भोक्ता<br>५३ ग | ५ | अनयः<br>४३ ख | पुरातनः<br>५३ ख | ४३/३९४ | ५२/४९३ |
| ६ | कपीन्द्रः<br>५३ घ | शिवः<br>६४ ख | ६ | शरीरभूतभृत्<br>५३ ग | गोप्ता<br>६३ ग | ५३/४९४ | ५३/५९५ |
| ७ | श्रीवत्सवक्षाः<br>६४ ग | सत्कृतिः<br>७५ क | ७ | वृषभाक्षः<br>६३ घ | वासुदेवः<br>७४ ग | ६४/५९६ | ७४/६९८ |
| ८ | सत्ता<br>७५ क | सुवर्णबिन्दुः<br>८६ क | ८ | वसुः<br>७४ घ | सुलोचनः<br>८५ ख | ७५/६९९ | ८५/७९९ |
| ९ | अक्षोभ्यः<br>८६ क | अव्ययः<br>९६ ख | ९ | अर्कः<br>८५ ग | कपिः अव्ययः<br>९६ ख | ८६/८०० | ९५/८९५ |
| १० | स्वस्तिदः<br>९६ ग | सर्वप्रहरणायुधः<br>१०७ घ | १० | स्वस्तिदः<br>९६ ग | सर्वप्रहरणायुधः<br>१०७ घ | ९६/८९५ | १०७/१००० |

□□□

## २५. वर्णक्रमानुसार नामांची संख्या

सहस्रांत ऋ, ऌ, ऐ, घ, ङ, झ, ञ, टठडढण थ, फ, आणि ष या एकूण १५ वर्णांनीं आरंभ होणारें एक हि नाम नाहीं. संपूर्ण ट वर्गच नाहीं हें विशेष. स्वरादि नामें १४४ आहेत, तर व्यञ्जनादि नामें आहेत ८५६.

| अनुक्रम | वर्ण | संख्या |
|---|---|---|
| १ | अ | १०८ |
| २ | आ | ११ |
| ३ | इ | ३ |
| ४ | ई | ३ |
| ५ | उ | ८ |
| ६ | ऊ | ३ |
| ७ | ऋ | ३ |
| ८ | ए | ३ |
| ९ | ओ | १ |
| १० | औ | १ |
| एकूण स्वरादि नामें | | १४४ |

| अनुक्रम | वर्ण | संख्या |
|---|---|---|
| ११ | क | ५७ |
| १२ | ख | १ |
| १३ | ग | २४ |
| एकूण क वर्गीय | | ८२ |
| १४ | च | १९ |
| १५ | छ | १ |
| १६ | ज | २२ |
| एकूण च वर्गीय | | ४२ |

| अनुक्रम | वर्ण | संख्या | अनुक्रम | वर्ण | संख्या |
|---|---|---|---|---|---|
| १७ | त | १९ | २५ | य | २२ |
| १८ | द | ३६ | २६ | र | ११ |
| १९ | ध | २२ | २७ | ल | १० |
| २० | न | ३२ | २८ | व | ११८ |
| एकूण त वर्गीय | | १०९ | एकूण अन्त:स्थादि | | १६१ |
| २१ | प | ८४ | २९ | श | ७१ |
| २२ | ब | १६ | ३० | स | १७३ |
| २३ | भ | ३९ | ३१ | ह | १३ |
| २४ | म | ६६ | | | |
| | | | एकूण ऊष्मादि | | २५७ |
| एकूण प वर्गीय | | २०५ | | | |

□□□

## २६. बहुसंख्यक अल्पसंख्यक नामें

| क्रमांक | आरंभवर्ण | संख्या | क्रमांक | आरंभवर्ण | संख्या |
|---|---|---|---|---|---|
| १ | स | १७३ | ११ | ग | २४ |
| २ | व | ११८ | १२ | ज | २२ |
| ३ | अ | १०८ | १३ | ध | २२ |
| ४ | प | ८४ | १४ | य | २२ |
| ५ | श | ७१ | १५ | च | १९ |
| ६ | म | ६६ | १६ | त | १९ |
| ७ | क | ५७ | १७ | ब | १६ |
| ८ | भ | ३९ | १८ | ह | १३ |
| ९ | द | ३६ | १९ | आ | ११ |
| १० | न | ३२ | २० | र | ११ |

| क्रमांक | आरंभवर्ण | संख्या | क्रमांक | आरंभवर्ण | संख्या |
|---|---|---|---|---|---|
| २१ | ल | १० | २६ | ऋ | ३ |
| २२ | उ | ८ | २७ | ए | ३ |
| २३ | इ | ३ | २८ | ओ | १ |
| २४ | ई | ३ | २९ | औ | १ |
| २५ | ऊ | ३ | ३० | ख | १ |
| | | | | छ | १ |

□□□

## २७. सहस्राची श्लोकशः नाम-संख्या

| श्लोक | नाम-क्रमांक | संख्या | श्लोक | नाम-क्रमांक | संख्या |
|---|---|---|---|---|---|
| १ | १-९ | ९ | १८ | १६३-१७२ | १० |
| २ | १०-१७ | ८ | १९ | १७३-१८० | ८ |
| ३ | १८-२४ | ७ | २० | १८१-१८८ | ८ |
| ४ | २५-३६ | १२ | २१ | १८९-१९७ | ९ |
| ५ | ३७-४५ | ९ | २२ | १९८-२०८ | ११ |
| ६ | ४६-५४ | ९ | २३ | २०९-२१७ | ९ |
| ७ | ५५-६३ | ९ | २४ | २१८-२२७ | १० |
| ८ | ६४-७३ | १० | २५ | २२८-२३५ | ८ |
| ९ | ७४-८४ | ११ | २६ | २३६-२४६ | ११ |
| १० | ८५-९४ | १० | २७ | २४७-२५५ | ९ |
| ११ | ९५-१०३ | ९ | २८ | २५६-२६४ | ९ |
| १२ | १०४-११३ | १० | २९ | २६५-२७४ | १० |
| १३ | ११४-१२२ | ९ | ३० | २७५-२८२ | ८ |
| १४ | १२३-१३२ | १० | ३१ | २८३-२८९ | ७ |
| १५ | १३३-१४० | ८ | ३२ | २९०-२९९ | १० |
| १६ | १४१-१५० | १० | ३३ | ३००-३०७ | ८ |
| १७ | १५१-१६२ | १२ | ३४ | ३०८-३१७ | १० |

| श्लोक | नाम-क्रमांक | संख्या |
| --- | --- | --- |
| ३५ | ३१८-३२६ | ९ |
| ३६ | ३२७-३३५ | ९ |
| ३७ | ३३६-३४५ | १० |
| ३८ | ३४६-३५४ | ९ |
| ३९ | ३५५-३६२ | ८ |
| ४० | ३६३-३७२ | १० |
| ४१ | ३७३-३८३ | ११ |
| ४२ | ३८४-३९३ | १० |
| ४३ | ३९४-४०४ | ११ |
| ४४ | ४०५-४१५ | ११ |
| ४५ | ४१६-४२५ | १० |
| ४६ | ४२६-४३४ | ९ |
| ४७ | ४३५-४४४ | १० |
| ४८ | ४४५-४५४ | १० |
| ४९ | ४५५-४६४ | १० |
| ५० | ४६५-४७४ | १० |
| ५१ | ४७५-४८५ | ११ |
| ५२ | ४८६-४९३ | ८ |
| ५३ | ४९४-५०२ | ९ |
| ५४ | ५०३-५१२ | १० |
| ५५ | ५१३-५२० | ८ |
| ५६ | ५२१-५३० | १० |
| ५७ | ५३१-५३७ | ७ |
| ५८ | ५३८-५४६ | ९ |
| ५९ | ५४७-५५७ | ११ |
| ६० | ५५८-५६६ | ९ |
| ६१ | ५६७-५७३ | ७ |
| ६२ | ५७४-५८५ | १२ |
| ६३ | ५८६-५९५ | १० |
| ६४ | ५९६-६०४ | ९ |
| ६५ | ६०५-६१४ | १० |
| ६६ | ६१५-६२३ | ९ |
| ६७ | ६२४-६३२ | ९ |
| ६८ | ६३३-६४१ | ९ |
| ६९ | ६४२-६५० | ९ |
| ७० | ६५१-६६० | १० |
| ७१ | ६६१-६७० | १० |
| ७२ | ६७१-६७८ | ८ |
| ७३ | ६७९-६८९ | ११ |
| ७४ | ६९०-६९८ | ९ |
| ७५ | ६९९-७०७ | ९ |
| ७६ | ७०८-७१६ | ९ |
| ७७ | ७१७-७२४ | ८ |
| ७८ | ७२५-७३६ | १२ |
| ७९ | ७३७-७४६ | १० |
| ८० | ७४७-७५६ | १० |
| ८१ | ७५७-७६४ | ८ |
| ८२ | ७६५-७७२ | ८ |
| ८३ | ७७३-७८१ | ९ |
| ८४ | ७८२-७८९ | ८ |
| ८५ | ७९०-७९९ | १० |
| ८६ | ८००-८०६ | ७ |
| ८७ | ८०७-८१६ | १० |
| ८८ | ८१७-८२५ | ९ |
| ८९ | ८२६-८३४ | ९ |
| ९० | ८३५-८४६ | १२ |

| श्लोक | नाम-क्रमांक | संख्या | श्लोक | नाम-क्रमांक | संख्या |
|---|---|---|---|---|---|
| ९१ | ८४७-८५६ | १० | १०० | ९३२-९४० | ९ |
| ९२ | ८५७-८६६ | १० | १०१ | ९४१-९४९ | ९ |
| ९३ | ८६७-८७५ | ९ | १०२ | ९५०-९५८ | ९ |
| ९४ | ८७६-८८५ | १० | १०३ | ९५९-९६६ | ८ |
| ९५ | ८८६-८९५ | १० | १०४ | ९६७-९७५ | ९ |
| ९६ | ८९६-९०५ | १० | १०५ | ९७६-९८४ | ९ |
| ९७ | ९०६-९१४ | ९ | १०६ | ९८५-९९२ | ८ |
| ९८ | ९१५-९२२ | ८ | १०७ | ९९३-१००० | ८ |
| ९९ | ९२३-९३१ | ९ | | | |

□□□

सहस्रश्लोकींत विष्णुसहस्रनामाची श्लोकश: संहिता आली आहे. प्रत्येक श्लोकांतील नामाचा क्रमांक आला आहे आणि प्रत्येक नामाचा भावार्थ हि एकाच श्लोकांत निरूपिला आहे. अशी ती सारं सुष्ठु मितं मधु आहे. गीतेप्रमाणें नित्यपाठाला उपयोगी. शंकराचार्यांनी म्हटलें च आहे—गेयं गीता-नामसहस्रम. त्याप्रमाणें त्यांचा मंदिरामंदिरांत आणि घराघरांत नित्यपाठ व्हावा, घोष व्हावा. ब्रह्मघोषाचा अनुकार च आहे तो, प्रतिध्वनि च का म्हणाना!

# श्रीविष्णु-सहस्र-नाम : सहस्रश्लोकी

## निवेदन

### गुरु-स्मरण

१ जेणें रत्नमयी सृष्टि दृष्टि देऊनि ती निज
केली त्या वंदितों देवा सेवा घ्यावी विनायका

२ गुंफूनि नामरत्नांची साहस्री चरणांवरी
अर्पिली त्याचिया भावें मियां नरहरीचिया

### कुल-वृत्त

३ सरस्वतीचें माहेर विदर्भाख्य प्रदेश जो
सह्य-बाहु अजिंठ्याच्या अंकीं तेथें वसे पुर

४ बुलढाणा, तिथें जन्म; शाखा ऋक्, गोत्र आमुचें
वसिष्ठ, मातापुरची रेणुका कुलदेवता

५ बलवंत पिता थोर पापभीरु नि सात्त्विक
माता कृष्णा भक्तिमती मातामह सुवैदिक

६ भ्राते ज्येष्ठ तिघे; दोघे मनोहर मधुकर
ब्रह्मचारी महात्यागी विद्वान् धीर गुणाकर

७ हरिलें मन सेवेनें जनतेचें मनोहरें
कुष्ठपीडित- सेवार्थ त्याचें अर्पित जीवन

८ प्रसन्न होउनी तेणें शासकें भारताचिया
पद्मश्री - पदवीयोगें तया गौरविलें बहु

९ केलें मधुकरें देह - विसर्जन नदीमधें
करितां पार वरदा बल्लाळेश्वरसंनिध

१० महाबाहु वृषस्कंध देहयष्टि समुन्नत
निर्‌भीक शील-गुणवान् कला-विद्या -विशारद

११ सोडिला मोह देहाचा साह्याचा हात सोडिला
वरुणालया स्वयें गेला भ्राता तो करुणालय

१२ भ्राता प्रभाकर असे तिसरा तो गृहाश्रमी
काव्यतीर्थ उदारात्मा काशी-स्नात परिश्रमी

१३ कनिष्ठ हा मी सर्वांत नामें कुंदर सुंदर
सेवूनि नाम देवाचें कृतकृत्य फिरे जगीं

१४ नामाचा लागला छंद फंद अन्य न जाणतो
वानतों नाम देवाचें 'दे वाचे नाम' मागतों

१५ नाम मंत्र असे थोर घोरपाप - विनाशन
संसार-दाव-शमन सर्वमंगल-कारण

### परमात्म-नमन

१६ ज्याच्या स्मरणमात्रें चि भवबंधांतुनी सुटे
नमो त्या प्रभविष्णूतें विष्णूतें परमात्मया

१७ नमो समस्तभूतांच्या आदिभूतास भूभृता
सहस्ररूपें नटल्या विष्णूतें प्रभविष्णुतें

### वेद आणि वेद-सावित्री

१८ ॐकार अक्षर - ब्रह्म मौन नि:स्पंद निष्कल
तेथूनि ध्वनि अव्यक्त मूळ जो सर्व वाङ्मया

१९ अव्यक्त ध्वनित: त्याचि आले व्यक्तीस वर्ण हे
ते मूळ वर्ण वेदाचे मंत्र होत अपौरुष

२० वेदार्थ सांठला त्यांत ऋषींनीं तो तपोबलें
पाहूनि दोहिला शब्दीं ऋग्-यजु:-सामरूप जे

२१ सर्व वेदार्थ- संदोह सावित्रींत सुरक्षित
म्हणूनि नित्य संध्येंत असे विहित तज्जप

ॐ । भूर् भुवः स्वः ॥
ॐ । तंत् सवितुर् वरेण्यम्
भर्गो देवस्य धीमहि ।
धियो यो नः प्रचोदयात् ॥

२२ ध्याऊं सवितृ- देवाचें तेज तें ध्वान्त-नाशन
प्राणेन्द्रिय- मनो -बुद्धि -संजीवन करो सदा

### महाभारत आणि भारत-सावित्री

२३ सृष्ट्युत्पत्ति-स्थिति-लय नाना लोक नि तीं युगें
भू-गोल हा नि तेथील चराचर समस्त चि
२४ वेद शास्त्रें नि आख्यानें इतिहास पुराणकें
नाना विद्या कला शिल्पें कर्मे वृत्ति विभिन्न त्या
२५ वर्ण आश्रम तद्- धर्म आपद्-धर्म नि संकर
ऋषिवंश राजवंशादि धर्माधर्म समस्त चि
२६ जीवांच्या गति तद्हेतु मोक्ष-धर्मोपदेश तो
लोक-जीवन संपूर्ण निरूपित यथास्थित-
२७ जेथ, तो पांचवा वेद महाभारत बोलिला
आदर्शवत् जिथें स्पष्ट धर्म ज्ञान नि संस्कृति
२८ तेथ जें तें न अन्यत्र न जें तेथ न तें कुठें
विश्वकोश चि तो होय महाभारत-नामक
२९ गायत्रीच्या जपें जेवीं सर्व वेदार्थ पावला
तेवीं भारत-सावित्री-जपें तो भारतार्थ हि

### भारत-सावित्री

३० ''माता-पितृ-सहस्राणि पुत्र-दार- शतानि च ।
संसारेष्वनुभूतानि यान्ति यास्यन्ति चापरे ॥
हर्षस्थान-सहस्राणि भयस्थान-शतानि च ।
दिवसे दिवसे मूढं आविशन्ति न पण्डितम्॥
उर्ध्व-बाहुर् विरौम्येष न च कश्चिच् छृणोति मे।
धर्मात् अर्थश्च कामश्च स किमर्थं न सेव्यते॥
न जातु कामात् न भयात् न लोभात्
धर्मं त्यजेत् जीवितस्यापि हेतोः
नित्यो धर्मः सुख-दुःखे त्वनित्ये
जीवो नित्यो हेतुरस्य त्वनित्यः ॥''

(क) सहस्रावधि संसारीं पिता माता नि स्त्री सुत
सेविलीं सेविजेतील पुढें कैक चि तीं दुजीं
(च) संसारीं या विमूढास हर्षशोक -प्रसंग ते
सहस्रावधि येताती पंडितास न ते कधीं
(ट) सांगें उभारुनी बाहु हा मी कोणी चि नायके
धर्म-मूल चि कामार्थ धर्म तो कां न सेवितां
(त) न कामा न भया लोभा कारणें धर्म तो कधीं
सोडावा न मुळीं धर्म जीविता कारणें हि तो
(प) नित्य तो बोलिला धर्म सुखदुःखें अनित्य तीं
जीव तो बोलिला नित्य हेतु त्याचा अनित्य तो

### व्यास-महिमा

३१ स्वाध्यायें नि तपोयोगें ब्रह्मभूत चि जाहला
निरीक्षिता हें सकल बाह्याभ्यन्तर विश्व जो
३२ जाणूनि वेद- लोकांतें जेणें सर्वार्थ- संग्रह
निधानवत् दिलें लोकां महाभारत अद्भुत
३३ विधाता इतिहासाचा सनातन महाद्भुत
इतिहासार्थ तो जेथ असे सुस्पष्ट अंकित
३४ ''चढे अधर्में तो आधीं संपादी मग वैभव
जिंकी शत्रूंस, अंतीं तो नाश पावे समूळ चि
३५ वनवास जरी धर्मे राज्य-श्री-मान- हानि हि
विजयी होय तो अंतीं स्वर्गीं नांदे सुरांसवें''
३६ इत्यर्थ इतिहासाचा जेणें एवं निरूपिला
''धर्मेंचि लाभे सर्वार्थ अधर्में तों अनर्थ चि''
३७ नमो त्या व्यासदेवातें वेद-लोकार्थ-सार हें
दिलें अज्ञजनां हातीं जेणें ज्ञान-दयाकरें
३८ तेणें चि ग्रथिलें नाम- सहस्र अनुशासनीं
सार जें सर्व वेदांचें साधनांचें हि सार जें

३९ नामें आरंभ तो होय होय नामें चि अंत तो
नाम विस्तारिलें जेणें व्यासदेवा नमो तया

## भीष्म-गौरव

४० जन्म अद्भुत भीष्माचें कर्म त्याचें महाद्भुत
त्याचें मरण तें धन्य त्याचें स्मरण पावन

४१ त्रिलोक-पावनी गंगा तिचा तो पुत्र आठवा
राजर्षि शंतनूचा जो युवराज प्रियात्मज

४२ सर्वशस्त्रास्त्र-कुशल सर्वशास्त्र-विशारद
शिष्य तो परशुरामाचा कुरुवृद्ध पितामह

४३ पितृभक्त महान् त्याग पित्याच्या कारणें करी
साम्राज्यैश्वर्य तृणवत् त्यजी स्त्रीसुख सर्वथा

४४ केली प्रतिज्ञा ही भीष्म तेणें भीष्म चि बोलिला
देवव्रत महाप्राज्ञ तपोज्ञान-महानिधि

४५ महाभारत-काळीं जें होतें ज्ञान सनातन
शौर्य क्षत्रकुलांमध्यें त्या सर्वांचा समुच्चय

४६ उत्कर्ष पावला होता भीष्माठाईं अलौकिक
ज्ञानें तपें वयें वृद्ध ज्येष्ठ श्रेष्ठ वरिष्ठ तो

४७ राज्यशासन तेवीं चि धर्मशासन जाणता
तत्तुल्य दुसरा कोणीचि नव्हता वृद्ध भारतीं

४८ गंगासागर गंगौघें महाभारत हें तसें
महाभारत भीष्माच्या झालें ज्ञानें पराक्रमें

४९ महाभारत जो आज त्याचा तो वंश-पूरुष
तर्पणीय समस्तांस भीष्मदेवास त्या नमो

५० तेणें युधिष्ठिरा कष्टी कुलनाशें कुरूचिया
ज्ञानोपदेश देऊनि केलें शांत समाहित

५१ नाम तें भगवंताचें सर्व-पाप-प्रणाशन
युधिष्ठिरा दिलें तेणें सर्व-पुण्य-फलप्रद

५२ सर्व शास्त्रार्थ-संदोह साधनीं साधनोत्तम
कुलवृद्धें कुलीनास दिलें त्या शरणागता

## युधिष्ठिर-प्रशंसा

५३ वंश- वर्धन पांडूचा पृथेचा पुत्र धर्मज
युधिष्ठिर पुसे भीष्मा धर्म उत्तम कोणता

५४ धर्मसा धर्म-संप्रष्टा वक्ता धर्मज्ञ भीष्मसा
अन्यत्र आढळे कोठें असा अमृत-योग हा

५५ ज्यांच्या पासूनि श्रोत्यांस धर्मामृत अलभ्य हें
लाधलें त्या नमो वक्त्या संप्रष्ट्यास हि त्या नमो

५६ न इच्छी राज्य पृथ्वीचें न वा तो स्वर्गलोक हि
धर्मीं चि एक ज्या आस्था धर्मराजास त्या नमो

५७ त्रिवार यमधर्में जो युधिष्ठिर परीक्षिला
खरा उतरला धर्मीं धर्मराजास त्या नमो

५८ यक्षा मागे वरें एक 'नकुलस् तात जीवतु'
करी उभय मातांस जीवत्-पुत्रा समान तो

५९ स्वर्गद्वारीं सहचरा श्वानातें त्या निवारितां
स्वर्गीं प्रवेश न करी स्वभक्ता सोडुनी, म्हणे-

६० न लगे मज राज्य-श्री न स्वर्ग-सुख तें मज
ज्या कारणें स्वभक्तातें सोडावें लागतें असें

६१ पुनः स्वर्गांत ऐकूनि द्रौपदी-भीम- दुःख त
न चळे तेथुनी बोले जेथ बंधु तिथें चि मी

६२ शरण्य जीवनीं एक असे धर्म चि केवळ
राज्य श्री स्त्री भोग्यजात अनित्य असुखावह

६३ जाणूनि जीवनाचें हें रहस्य जगला नृप
न अर्थ-काम-परता धर्म धर्मार्थ सेविला

६४ धर्मराज अशी ख्याति तेणें तो पावला नृप
धर्म-कर्ता धर्म-गोप्ता धर्म-जीवन धर्मज

६५ भगवान् कृष्ण तो ज्यांचा झाला दूत नि सूत हि
नमो त्या पांडुपुत्रांस नमो धर्मा युधिष्ठिरा

६६ करिती पाठ जे ह्याचा होत भूरिद ते जन
गांठिती वांटिती वित्त भगवान्-नामरूप जें

६७ भगवन्-नाम तें थोर शरण्या हि शरण्य चि
घेती देती वाढविती सुख बाहिर भीतरीं

## आरती सहस्रमूर्ति ( परमात्म्या ) ची

सहस्र-शीर्षा पुरुषा सहस्र-नेत्रा हे ।
सहस्र-करचरणा हे सहस्र-श्रोत्रा हे ।।
सहस्र हीं तव रूपें सहस्र तव नामें ।
सहस्र गुण कर्मे तव सहस्र तव धामें ।।
जय देवा जय देवा जयजय देवा हे ।
तुझिया चरणीं मस्तक हस्तकयुग वाहें ।।



## मंगलाचरण

| | |
|---|---|
| यस्य स्मरणमात्रेण जन्मसंसार-बन्धनात् । | ज्याच्या स्मरणमात्रें चि भवबंधांतुनी सुटे |
| विमुच्यते नमस् तस्मै विष्णवे प्रभविष्णवे ।। | नमो त्या प्रभविष्णूतें विष्णूतें परमात्मया |
| नमः समस्तभूतानां आदिभूताय भूभृते । | नमो समस्तभूतांच्या आदिभूतास भूभृता |
| अनेकरूपरूपाय विष्णवे प्रभविष्णवे ।। | सहस्ररूपें नटल्या विष्णूतें प्रभविष्णुतें |

| | |
|---|---|
| **वैशम्पायन उवाच** | **वैशंपायन (जनमेजय राजास) म्हणाला** |
| १ श्रुत्वा धर्मान् अशेषेण पावनानि च सर्वशः । | १ वर्णादि-धर्म सगळे यज्ञदानादि पावनें |
| युधिष्ठिरः शान्तनवं पुनरेवाभ्यभाषत ।। | ऐकूनिया पुनरपि पुसे भीष्मा युधिष्ठिर |
| **युधिष्ठिर उवाच** | **युधिष्ठिर म्हणाला** |
| २ किमेकं दैवतं लोके किं वाप्येकं परायणम् । | २ एक दैवत तें कोण कोणतें तें परायण |
| स्तुवन्तः कं कमर्चन्तः प्राप्नुयुर् मानवाः शुभम्।। | पूजूनि स्तवितां कोणा पावती श्रेय मानव |
| ३ को धर्मः सर्वधर्माणां भवतः परमो मतः । | ३ तुमच्या मतें असे धर्म कोणता उत्तमोत्तम |
| किं जपन् मुच्यते जन्तुर् जन्मसंसारबन्धनात् ।। | जपें त्या कोणत्या मुक्ति भवबंधांतुनी नरा |
| **भीष्म उवाच** | **भीष्म म्हणाले** |
| ४ जगत्प्रभुं देवदेवं अनन्तं पुरुषोत्तमम् । | ४ जगत् -प्रभू देवदेवा अनन्ता पुरुषोत्तमा |
| स्तुवन् नामसहस्रेण पुरुषः सततोत्थितः ।। | स्तवी नाम-सहस्रें तो सर्व दुःखांतुनी सुटे |
| ५ तमेव चार्चयन् नित्यं भक्त्या पुरुषमव्ययम् । | ५ ज्यास आदि न तो अन्त न विकार हि सर्वथा |
| ध्यायन् स्तुवन् नमस्यंश्च यजमानस् तमेव च ।। | सर्वांच्या हृदयीं नांदे सर्वलोकैकनाथ जो |
| ६ अनादिनिधनं विष्णुं सर्वलोकमहेश्वरम् । | ६ ब्रह्मण्य सर्वधर्मज्ञ भक्त-कीर्ति-विवर्धन |
| लोकाध्यक्षं स्तुवन् नित्यं सर्वदुःखातिगो भवेत् ।। | लोकनाथ महद्भूत सर्वभूतभवोद्भव |
| ७ ब्रह्मण्यं सर्वधर्मज्ञं लोकानां कीर्तिवर्धनम् । | ७ विष्णूतें त्या भजे भावें ध्याई चित्तें निरंतर |
| लोकनाथं महद्भूतं सर्वभूतभवोद्भवम् ।। | गाई वाचा, यजी पूजी नमी देहें, विमुक्त तो |
| ८ एष मे सर्वधर्माणां धर्मो ऽधिकतमो मतः । | ८ सर्व धर्मांत उत्कृष्ट धर्म तो हा चि मन्मतें |
| यद् भक्त्या पुण्डरीकाक्षं स्तवैरर्चेन्नरः सदा ।। | जे भावें भगवन्तातें भजावें स्तवनें सदा |
| ९ परमं यो महत् तेजः परमं यो महत् तपः । | ९ असे जो तेज परम असे परम जो तप |
| परंम यो महद् ब्रह्म परमं यः परायणम्।। | असे परम जो ब्रह्म असे जो तें परायण |
| १० पवित्राणां पवित्रं यो मङ्गलानां च मङ्गलम्। | १० पवित्र जो पवित्रांत मंगलांत सुमंगल । |
| दैवतं देवतानां च भूतानां यो ऽव्ययः पिता ।। | जो दैवत चि देवांचें सनातन पिता जगा ।। |

११ यतः सर्वाणि भूतानि भवन्त्यादियुगागमे ।
यस्मिंश्च प्रलयं यान्ति पुनरेव युगक्षये ।।
१२ तस्य लोकप्रधानस्य जगन्नाथस्य भूपते ।
विष्णोर् नामसहस्रं मे श्रुणु पापभयापहम् ।।
१३ यानि नामानि गौणानि विख्यातानि महात्मनः
ऋषिभिः परिगीतानि तानि वक्ष्यामि भूतये ।।

११ ज्याच्या पासूनि हीं भूतें युगारंभीं प्रवर्तती ।
निवर्तती जया ठायीं युगान्तीं सर्व तीं पुनः ।।
१२ त्या जगन्नाथ विष्णूचें ऐक तूं मजपासुनी ।
सहस्रनाम हें राजन् सर्वपापभयापह ।।
१३ ऋषींनीं गाइलीं नांमें गुणांचीं जीं प्रसिद्ध चि ।
सांगतों तुज मी ऐक विश्वकल्याणकारक ।।

□□□

॥ ॐ नमो भगवते वासुदेवाय ॥

# नाम-साहस्री

## श्री विष्णु-सहस्रनामाची सहस्रश्लोकी

( १ )

**ॐ विश्वं विष्णुर् वषट्कारो भूत-भव्य-भवत्-प्रभुः ।**
**भूतकृद् भूतभृद् भावो भूतात्मा भूत-भावनः ॥**

ॐ नमो अक्षराव्यक्ता व्यक्ता सर्वासि मूळ तूं
विश्वा वेदा नि यज्ञा तूं आदि अन्त नि मध्य तूं

१ जें हें समोर जें मागें जें खालीं आणि जें वर
आंत बाहेर जें नांदे **विश्वरूपास** त्या नमो

२ विश्व निर्मूनि हें त्यांत सद्रूपें शिरला असे
वसे व्यापूनिया विश्व **विष्णुरूपास** त्या नमो

३ विश्वांत वसला विष्णु इज्य सर्वत्र लक्षुनी
यजिणें दान-मानें जें **वषट्कारास** त्या नमो

४ झालें जें व्हायचें होत भूत तें भव्य तें भवत्
प्रभु जो ह्या समस्तास **प्रभुरूपास** त्या नमो

५ जें जें व्यक्त-दशे आलें तें सारें भूत बोलिलें
भूतकृत् जो अभूतत्वें **भूतकर्त्यास** त्या नमो

६ भूतमात्रास देऊनि सत्ता ती आपुली निज
भूतभृत् जो असा झाला **भूतभर्त्यास** त्या नमो

७ सत् एक चि असे भाव अभाव चि तदन्य जें
स्व-भावें भावितो सर्वा **भावरूपास** त्या नमो

८ पुत्ररूपें पिता वर्ते भूतरूपें जगत्- पिता
म्हणूनि बोलिला लोकीं **भूतात्मा** तो तया नमो

९ आत्म-संभूत हीं भूतें आकाशादिक सर्व हि
म्हणूनि परमात्मा तो **भूत-भावन** त्या नमो

( २ )

**पूतात्मा परमात्मा च मुक्तानां-परमा-गतिः ।**
**अव्ययः पुरुषः साक्षी क्षेत्रज्ञो ऽक्षर एव च ॥**

१० यज्ञ-दान-तपोयोगें स्वाध्यायें शुद्ध चेतन
जीवात्मा होय पूतात्मा **पूतात्म्यास** तया नमो

११ ब्रह्मा स्तम्ब पृथक् जीव शुध्दाशुध्द उपाधितः
निरुपाधि परी आत्मा **परमात्म्यास** त्या नमो

१२ परमात्मा निरवधि शुध्दिरूप असे तया
शुध्दि-साम्यें मिळे मुक्त **मुक्तांची गति** त्या नमो

१३ जें जें घटित तें कालें विघटे व्ययशील तें
जें ना रचे न वा वेंचे तें **अव्यय** तया नमो

१४ नव -द्वार पुरीं जो हा वसे कीं जीवरूप चि
तेणें पुरुष तो होय **पुरुषास** तया नमो

१५ कर्मे शुभाशुभें जीव करितो वसुनी पुरीं
भोगितो तीं फळें त्यांचीं आत्मा **साक्षी** तया नमो

१६ देहेन्द्रियें मनोबुद्धि प्राण आणिक तत्क्रिया
क्षेत्र हें सर्व जो जाणे तो **क्षेत्रज्ञ** तया नमो

१७ हें विश्व, मूल प्रकृति आणि जीवदशा तशी
तिन्ही क्षर चि त्यापैल तो **अक्षर** तया नमो

( ३ )

**योगी योगविदां- नेता प्रधान-पुरुषेश्वरः**
**नारसिंह-वपुः श्रीमान् केशवः पुरुषोत्तमः ॥**

१८ आत्मस्थिति असे योग सर्वत्र समदर्शन
निर्द्वंद्व स्व-स्थ जो नित्य **योगरूपास** त्या नमो

१९ साधिती योग जें कर्मे निरोधें स्मरणें तसे-
विचारें, अग्रणी त्यांत **योगविन्-नेतया** नमो

२० जड चेतन चिन्मात्र **प्रधान-पुरुषेश्वर**
हिम-वारि-बाष्पवत् एक **ईश्वरास** तया नमो

२१ सिंहवत् नखदन्तांनीं दांडगा दैत्य दारिला
पावला नरसिंहाख्या **नरसिंहास** त्या नमो

२२ सूर्या सौरी प्रभा जैशी सोडुनी जाय ना क्षण
आत्मश्रिया सदा दीप्त **श्रीमन्तास** तया नमो

२३ 'के' अव्यक्तार्णवीं जो हा शवासन करी हरि
तेणें केशव तो होय **केशवास** तया नमो

२४ क्षर तो जो जडोपाधि चेतनोपाधि अक्षर
निरुपाधि असे आत्मा **पुरुषोत्तम** त्या नमो

( ४ )

**सर्वः शर्वः शिवः स्थाणुर् भूतादिर् निधिरव्ययः।**
**संभवो भावनो भर्ता प्रभवः प्रभु रीश्वरः ॥**

२५ वस्तुमात्रास जो आदि मध्य आणिक अन्त जो
समग्र होय तो सर्व **सर्वरूपास** त्या नमो

२६ कालरूपें करी शीर्ण वस्तुमात्रा स्वभावतः
संहर्ता होय तो शर्व **शर्वरूपास** त्या नमो

२७ न प्रारब्ध, न वा देह, न कर्म, न फळें हि तीं
शिवती ज्यास तो होय **शिवरूप** तया नमो

२८ जगत् जंगम हें सर्व इथें स्थावर कोण तें
गुण-प्रवाहीं ह्या आत्मा असे **स्थाणु** तया नमो

२९ आकाशदिक हीं भूतें ज्याच्यापासूनि उद्‌गत
सृष्टिप्रवाहोद्‌गम तो **भूतादीस** तया नमो

३० सृष्टिप्रवाह ज्यांतूनि निघे नित्य रिघे जियें
चपायचय ना ज्यास **निधि अव्यय** त्या नमो

३१ जें जें कुठें कधीं कांहीं संभवे तें जिथूनि कीं
तो व्यक्तिहेतु अव्यक्त **संभवास** तया नमो

३२ उद्‌भावन करी सर्व भावांचें जो स्वभावतः
सर्वभावन तो होय **भावनास** तया नमो

३३ भावें भरी तो सकलां स्वकार्यक्षम त्यां करी
तेणें चि सर्व हें चाले विश्व, **भर्त्यास** त्या नमो

३४ भूतें गुणांतुनी होती अव्यक्तांतूनि ते गुण
अव्यक्त अक्षरांतूनि **प्रभवास** तया नमो

३५ प्रजा निर्मूनि ही सारी प्रजापालन जो करी
प्रजापतित्वें प्रभु तो **प्रभुरूपास** त्या नमो

३६ अव्यक्त अक्षरांतूनि विश्व व्यक्तीस ये तया
अव्यक्तीं जो करी लीन **ईश्वरास** तया नमो

( ५ )

**स्वयंभूः शंभुर् आदित्यः पुष्कराक्षो महास्वनः।**
**अनादिनिधनो धाता विधाता धातुरुत्तमः ॥**

३७ वृक्षास मूळ तें होय मूळा मूळ नसे पुनः
अमूळ मूळ जें विश्वा **स्वयंभूस** तया नमो

३८ शमरूप असे, विश्वा शम-सौख्य-प्रदायक
म्हणूनि बोलिला शंभु **शंभुरूपास** त्या नमो

३९ देवमाता अदिति ती प्राची, पुत्र तिचा महान्
मातृमोचक आदित्य **आदित्यास** तया नमो

४० जडाचा स्पर्श ज्या नोहे जळीं पुष्कर-पत्रवत्
चित्सूर्याभिमुखध्यायी **पुष्कराक्षास** त्या नमो

४१ सिंहवत् गर्जना ज्याची हृदयाच्या गुहेंतुनी
उठली निर्दळी दोषां तो **महास्वन** त्या नमो

४२ नुपजे न मरे नोहे वृद्धि क्षय विकार वा
सर्वथा निर्विकारा त्यां **अनादिनिधना** नमो

४३ बीजाधान करी क्षेत्रीं प्रकृतीच्या पुमान् पर
तेणें तो होय विश्वाचा धाता धात्यास त्या नमो

४४ गुणानुसार तीं कर्में वेदीं विहित या जना
करी विधान जो वेदें विधात्यास तया नमो

४५ विचित्र विश्वालंकार धातूचा ज्या विनिर्मित
चिद्धातु सर्वोत्तम तो तया धातूत्तमा नमो

( ६ )

**अप्रमेयो हृषीकेशः पद्मनाभो ऽमर-प्रभुः ।**
**विश्वकर्मा मनुस् त्वष्टा स्थविष्ठः स्थविरो-ध्रुवः**

४६ प्रमाता चि जिथें होय प्रमेय मग कोण त्या
करी मान प्रमाणांनीं **अप्रमेयास** त्या नमो

४७ विषयाकार जी वृत्ति हृषीका म्हणती तिज
तिचा जो ईश तो होय **हृषीकेश** तया नमो

४८ कालनाल नि दिक्पत्र जेथुनी लोकपद्म हें
अव्यक्त-कंद तो होय **पद्मनाभ** तया नमो

४९ व्यक्तमात्र असे मर्त्य अव्यक्त चि अमर्त्य तें
अक्षर प्रभु त्यांचा तो **अमरप्रभु** त्या नमो

५० वैचित्र्यपूर्ण हें विश्व कर्म ज्याचें असें महत्
बोलिला विश्वकर्मा तो **विश्वकर्म्यास** त्या नमो

५१ वेदार्थ लक्षुनी जेणें वर्णाश्रम- विभागशः
धर्म सांगितला सर्वां **मनुराजास** त्या नमो

५२ कांसार घडितो भांडीं ठोकुनी पिट्टुनी जशीं
नामरूपें तशीं केलीं जेणें **त्वष्ट्यास** त्या नमो

५३ अनन्तपार हें विश्व देशतः अतिविस्तृत
ऐसपैस महाकाय **स्थविष्ठास** तया नमो

५४ स्थविष्ठ देशतः होय कालतः **स्थविर** प्रभु
स्थलकालचलाधार अचल **ध्रुव** त्या नमो

( ७ )

**अग्राह्यः शाश्वतः कृष्णो लोहिताक्षः प्रतर्दनः ।**
**प्रभूतस् त्रिककुब्-धाम पवित्रं मंगलं परम् ॥**

५५ हाताळतां ये तें सारें इंद्रिय-ग्राह्य बोलिलें
मनःप्राणेन्द्रियातीत **अग्राह्यास** तया नमो

५६ व्यक्त हें इन्द्रियग्राह्य अशाश्वत चि बोलिलें
जें अतीन्द्रिय चिद्रूप **शाश्वतास** तया नमो

५७ अंधारीं न दिसे कांहीं तसा अज्ञेय कृष्ण तो
अज्ञेय राहुनी कर्षी **कृष्णरूपास** त्या नमो

५८ (अ) अजरामर जो नित्य-यौवनें पूर्ण सुन्दर
आरक्तनेत्र भगवान् **लोहिताक्षास** त्या नमो

(आ) रागावला अधर्मास डोळे लाल करूनिया
जो धर्मगोप्ता भगवान् **लोहिताक्षास** त्या नमो

५९ संहरी कालरूपें जो विश्व हें सचराचर
प्रलयंकर तो रुद्र **प्रतर्दन** तया नमो

६० अव्यक्ताक्षर तें बीज विश्वाकार प्रभूत हा
प्रभूत होय तें बीज **प्रभूतास** तया नमो

६१ परिमाणें वा दिशा तीन खालीं वर मधें अशा
वस्तुरूपें तदाधार **त्रि-ककुब्-धाम** त्या नमो

६२ अविद्या वासना कर्म तत्फळें शिवती न ज्या
ज्ञान-वैराग्य-संन्यास-**पवित्रास** तया नमो

६३ सर्वथा अशुभा दूर पवित्रांत पवित्र तो
जो केवळ शुभाकार **सर्व-मंगल** त्या नमो

( ८ )

**ईशानः प्राणदः प्राणो ज्येष्ठः श्रेष्ठः प्रजापतिः।**
**हिरण्य-गर्भो भू-गर्भो माधवो मधु-सूदनः।।**

६४ ईशंमन्य विरिंच्यादि सगळे गुण- तंत्र चि
स्व-तंत्र एक तो आत्मा तेणें **ईशान** त्या नमो

६५ प्राण अन्नोदकाधीन तें जो देत असे जगा
तो चि प्राणद सूर्यात्मा प्राणदास तया नमो

६६ अन्नोत्पति जलाधीन वायु-प्रेरित तें जल
तेजः-प्रेरित तो वायु सूर्य प्राण तया नमो

६७ वडील होय जो विश्वा धाकटे ज्यास सर्व चि
वंशा पुरुष जो मूळ ज्येष्ठ-ज्येष्ठास त्या नमो

६८ वयो-वृद्ध ज्ञान-वृद्ध ज्येष्ठ नि श्रेष्ठ बोलिला
सर्ववृद्ध स्वभावें जो ज्येष्ठ -श्रेष्ठास त्या नमो

६९ मिरवी जो भृगू-लत्ता निरहं क्षमिवर्य जो
प्रजा-वत्सल तो होय प्रजापति तया नमो

७० तेजोरूपें हिरण्यानें ज्याचा संभृत गर्भ तो
हिरण्यगर्भ सूर्यात्मा स्रष्टा आदि तया नमो

७१ सर्व जीवनिकायांची जननी जन्मभूमि ही
भू अपत्य असें ज्याचें भू-गर्भास तया नमो

७२ सर्वस्व मक्षिकांचें तो मधुकोश असे जसा
तसा जो सर्व जीवांचा जीव, माधव त्या नमो

७३ विषयेन्द्रियसौख्याचा मधु गोळा करी जन
नेई झाडूनिया काळ मधु-सूदन त्या नमो

( ९ )

**ईश्वरो विक्रमी धन्वी मेधावी विक्रमः क्रमः ।
अनुत्तमो दुराधर्षः कृतज्ञः कृतिरात्मवान् ॥**

७४ ईशिती ईश पार्थक्यें सुरासुरनरेश ते
हृत्स्थ जो आत्मरूपानें ईशी ईश्-वर त्या नमो

७५ प्रतिक्षेत्रीं पुढें जाई अति सर्वांस लंघुनी
रूप-वीर्य-ज्ञानशाली विक्रमी तो तया नमो

७६ धनु ज्याचें असे श्रेष्ठ सज्ज जें यज्ञ-रक्षणीं
अचूक लक्ष्यवेधी जो रणीं, धन्वीस त्या नमो

७७ धनूसमान जो पेली मेधा शास्त्रीं अखंडित
समितिंजय तत्त्व-ज्ञ मेधावी तो तया नमो

७८ सृष्टीचा क्रम हा होय जन्म स्थिति निरोध जो
तो ज्यास न मुळीं स्पर्शे तो विक्रम तया नमो

७९ कार्य कारणतः होय क्रम सर्वत्र हा असे
सर्व-कारण तो आत्मा बोलिला क्रम त्या नमो

८० न्यूनतुल्याधिक असे वस्तूंचे वर्ग तीन कीं
ज्यास तुल्याधिक नसे तो अनुत्तम त्या नमो

८१ सलगी जवळीकेनें धृष्टता सलगीमुळें
जवळीक न अव्यक्ता दुराधर्षास त्या नमो

८२ (अ) देहें प्राणें मनें कर्म होय तें कृत बोलिलें
तें जाणे साक्षिरूपानें कृत-ज्ञास तया नमो

(आ) भक्तोपकृत जें कांहीं स्मरणोपहृतादिक
बहुमान करी त्याचा तो कृत-ज्ञ तया नमो

८३ कर्ता चि कृतिरूपानें प्रकटी आपणा सदा
कर्ता मरे कृति उरे कृतिरूपास त्या नमो

८४ जेणें ओळखिलें रूप आपुलें, बाणलें दृढ
तो आत्मप्रत्ययी धीर आत्मवंत तया नमो

( १० )

सुरेशः शरणं शर्म विश्व-रेताः प्रजा-भवः ।
अहः संवत्सरो व्यालः प्रत्ययः सर्व-दर्शनः ॥

८५ सु होय सुख सौभाग्य तें जो दे सुर बोलिला
सौख्यमूल असें ज्ञान तो सुरेश तया नमो

८६ कष्टूनि जगतीं जीव रिघे जेथ विसांवण्या
लोकीं शरण तें होय शरणास तया नमो

८७ दोष-दु:ख-विपद्-दैन्य-निवारण चि जें मुळीं
स्वास्थ्य तें बोलिलें शर्म शर्मरूपास त्या नमो

८८ अपत्य विश्व हें खेळे अव्यक्तांकीं निजे उठे
पिता अक्षर तो होय विश्वरेत्यास त्या नमो

८९ जरायुजाण्डजोद्भिज्जस्वेदजादि पृथक् प्रजा
ज्याच्यापासूनि होती तो **प्रजाभव** तया नमो

९० आणी प्रकाशा जो विश्व अंधारांतूनि नित्य चि
कालात्म विश्वस्रष्टा तो **अहोरूप** तया नमो

९१ अहर्गणांनीं मित जो पक्षमासर्तु-भिन्न हि
अयन- द्विपदीं चाले **संवत्सर** तया नमो

९२ जागवी जो अहोरूप प्रेरी संवत्सरात्मक
निजवी व्याल-रूपें जो **काल-व्यालास** तया नमो

९३ ज्ञेय ज्ञाता असा भेद जिथें तें ज्ञान बोलिलें
ज्ञेय ज्ञाता जिथें एक तो **प्रत्यय** तया नमो

९४ आत्मज्ञान जया होय विषय-ज्ञान त्यास चि
म्हणूनि प्रत्ययी आत्मा **सर्वदर्शन** त्या नमो

( ११ )

अजः सर्वेश्वरः सिद्धः सिद्धिः सर्वादिरच्युतः।
वृषाकपिर् अमेयात्मा सर्वयोग-विनिःसृतः॥

९५ नसे जन्म चि ज्या आधीं न त्या व्याधि जरा मृति
म्हणूनि निर्विकारा त्या बोलती **अज** त्या नमो

९६ देहेन्द्रियें मनोबुद्धि प्राणादिक समस्त हें
पिण्ड-ब्रह्माण्ड वश ज्या **सर्वेश्वर** तया नमो

९७ आत्मत्वें जो असे धाला तिन्ही लोकीं नसे स्पृहा
नुरलें कार्य ज्या कांहीं तोचि **सिद्ध** तया नमो

९८ पुत्र वित्त नि तो स्वर्ग कष्टती जीव ह्यांस्तव
ह्यांतूनि मुक्ति नैष्कर्म्य **सिद्धिरूपास** त्या नमो

९९ हीं भूतें अन्न पर्जन्य सूर्य सृष्टिक्रिया तसें
अव्यक्त आदि त्यांचाहि तो **सर्वादि** तया नमो

१०० स्वरूपापासुनी झाला च्युत जीव धरी तनु
विदेह जो असे स्वस्थ तो **अच्युत** तया नमो

१०१ **वृषाकपि** असे अग्नि आरण्यक असंग जो
जाळूनि देहयोगातें स्वरूपस्थित त्या नमो

१०२ देह व्यक्त तया मान अव्यक्ता मान कोणतें
चिदग्नि अनवच्छिन्न **अमेयात्म्यास** त्या नमो

१०३ (अ) देहयोगें उठे काम तेणें कर्म नि तत्फळें
नमो विदेहा जो मुक्त **सर्वयोग-विनिःसृत**

(आ) नित्योपलब्ध जो आत्मा तो लाभावा कशापरी
म्हणूनि योगीं न पवे **सर्वयोग-विनिःसृत**

( १२ )

वसुर् वसु-मनाः सत्यः समात्मा संमितः समः।
अमोघः पुण्डरीकाक्षो वृष-कर्मा वृषाकृतिः॥

१०४ कायाग्निरूप जीवोष्मा देहावासीं वसे वसु
यदाश्रयें वसे प्राण **वसुरूपास** त्या नमो

१०५ जिथें वित्त तिथें चित्त जीवाचा हा स्वभाव चि
आत्मा चि वसु तो ज्यातें तया **वसुमना** नमो

१०६ नव्हे पालट रूपासि ज्याच्या तो सत्य बोलिला
पालटे जग तद्भिन्न **सत्यरूपास** त्या नमो

१०७ दिक्काल-द्रव्य-धर्मांनीं वैषम्य न जया घडे
सर्वत्र सम जो नित्य **समात्म्यास** तया नमो

१०८ मशकीं मशकाकार गजाकार गजीं वसे
आत्मसंमित जो सर्वां **संमितास** तया नमो

१०९ सम जो सर्वभूतांस प्रियाप्रिय नसे जया
गुण ना गुण-वैषम्य सम तो; त्या **समा** नमो

११० संकल्प वाणी करणी नव्हे मोघ अमोघ तो
अनात्म न शिवे तेणें तो **अमोघ** तया नमो

१११ जडा भेदूनि निर्लिप्त चित्सेवी पुण्डरीक तें
विविक्त-दृष्टि तो तद्वत् **पुण्डरीकाक्ष** त्या नमो

११२ वर्णाश्रमस्वरूपें जो वर्षे जीवार्थ सर्वचि
वृषवत् कर्म तें त्याचें **वृषकर्म्यास** त्या नमो

११३ दम-दान-दया-सत्य-चतुष्पाद असे वृष
धर्म-स्वरूप तेणें तो **वृषाकृति** तया नमो

( १३ )

**रुद्रो बहु-शिरा बभ्रुर् विश्व-योनिः शुचि-श्रवाः।**
**अमृतः शाश्वत-स्थाणुर् वरारोहो महा-तपाः॥**

११४ देह देहानुगत जें त्यांत आसक्त जे तयां
वियोगें रडवी काल-अग्नि तो **रुद्र** त्या नमो

११५ भूत-भव्य-भवद्-रूप कालाग्नीचीं शिरें बहु
त्रिशिरें ग्रासिलें सर्व तया **बहुशिरा** नमो

११६ (अ) कालाग्नींत जळे विश्व जाळ त्याचे विचित्र चि
ढवळे तांबडे काळे **बभ्रुरूपास** त्या नमो

(आ) ज्याचा प्रकाश हें विश्व ज्यात संभृत लोक हे
चिदग्नि विश्वभर्ता तो **बभ्रुरूपास** त्या नमो

११७ श्वेत रक्त तसें कृष्ण यज्ज्वालामय विश्व हें
चिदग्नि मूळ विश्वा तो **विश्वयोनि** तया नमो

११८ भेद-विश्वास जाळूनि निवाला जो निरिंधन
चिदग्नि शिवनामा तो **शुचिश्रव** तया नमो

११९ चित्-प्रकाशाविना जें जें तें सारें मृत बोलिलें
चित् अग्नि एक अमृत **अमृतास** तया नमो

१२० चिदग्नि चि असे नित्य चिदग्नि चि असे स्थिर
एर तें पालटे जाय **शाश्वतस्थाणु** त्या नमो

१२१ (अ) विश्व बालक हें ज्याच्या अंकीं खेळे निजे उठे
तो चिदग्नि वरारोह **वरारोहास** त्या नमो

(आ) अग्नि विद्युत् सूर्य तेजें यांना लंघूनि जाय जो
तो चिदात्मा वरारोह **वरारोहास** त्या नमो

१२२ भस्मसात् होय तो भेद आत्मसात् होय विश्व हें
चिदग्नि पेटला आहे **महातप** तया नमो

( १४ )

**सर्वगः सर्वविद्-भानुर् विष्वक्-सेनो जनार्दनः।**
**वेदो वेदविदव्यङ्गो वेदाङ्गो वेदवित् कविः॥**

१२३ कार्यमात्रास व्यापूनि वसे कारण तत्त्वतः
तेणें सर्व-ग सत्-तत्त्व **सर्वगास** तया नमो

१२४ प्रकाशी हे जगत् भानु नोळखे आपणा परी
ओळखे आपणातें हि **सर्वविद्-भानु** त्या नमो

१२५ सेना सर्वत्र ती ज्याची यदाज्ञांकित विश्व हें
तो विष्वक्सेन विश्वेश **विष्वक्सेनास** त्या नमो

१२६ जन्मते जन्तु हे सारे कालधर्मास पावती
तेणें तो होय कालात्मा **जनार्दन** तया नमो

१२७ स्वैराचार निवाराया वेदशास्त्रस्वरूप जो
धर्माधर्म करी स्पष्ट **वेदरूपास** त्या नमो

१२८ आजन्म ऐकिला वेद पढला पढविला तसा
वेदमूर्ति चि जो झाला **वेदविद्** तो तया नमो

१२९ ऐकिला वेद तो ज्यानें केला धारण तो मुखीं
अंगें आचरिला सांग तो **अव्यंग** तया नमो

१३० शिक्षा कल्प व्याकरण निरुक्त च्छंद ज्योतिष
अंगें हीं होत वेदाचीं तो **वेदांग** तया नमो

१३१ वेद जाणे तदंगें वा वेदविद् तो हि बोलिला
वेदार्थ-यत्न करितो **वेदविद्** तो तया नमो

१३२ पढला वेद-वेदांगें यजिला यज्ञ-याग हि
झाला निर्वेद विज्ञानें तज्ज्ञ तो **कवि** त्या नमो

( १५ )

**लोकाध्यक्षः सुराध्यक्षो धर्माध्यक्षः कृताकृतः।**
**चतुरात्मा चतुर्व्यूहश् चतुर्दंष्ट्रश् चतुर्भुजः॥**

१३३ भूरादि लोक जे सर्व पाहे त्यांचें गतागत
साक्षित्वें दीपवत् तोचि **लोकाध्यक्ष** तया नमो

१३४ लोकाध्यक्ष सुरांतें हि पाहे लोकांसवें चि जो
बोलिला तो सुराध्यक्ष **सुराध्यक्षास** त्या नमो

१३५ लोक लोकेश यांचे जे गुणधर्म स्वभावतः
जो निर्गुण स्वयें पाहे **धर्माध्यक्षास** त्या नमो

१३६ कृत तें कार्य, अकृत होय कारण तत्त्वतः
कार्यकारणरूपें जो **कृताकृत** तया नमो

१३७ जाग्रत्-स्वप्न-सुषुप्तींचा अभिमानी तुरीय हि
विश्व-तैजस-प्राज्ञादि **चतुरात्मा** तया नमो

१३८ सृष्ट्युत्पत्ति-स्थिति-लय करी जो गुणयोगतः
तो निर्गुण चतुर्व्यूह **चतुर्व्यूहास** त्या नमो

१३९ (अ) जन्म-मृत्यु-जरा-व्याधि दंष्ट्रांनीं ह्या चतुर्विध
कालात्मा चघळी लोकां **चतुर्दंष्ट्रास** त्या नमो

(आ) हिरण्य-कशिपूतें जो हरिरूपें धरी चिरी
दाढांहीं रगडी चाटी **चतुर्दंष्ट्रास** त्या नमो

१४० ज्ञानशंख कलापद्म भक्तरक्षण चक्र तें
धरी गदा दैत्यहंत्री **चतुर्भुज** तया नमो

( १६ )

**भ्राजिष्णुर् भोजनं भोक्ता सहिष्णुर् जगदादिजः।**
**अनघो विजयो जेता विश्व-योनिः पुनर्वसुः॥**

१४१ रात्रौ चंद्र दिवा भानु वीज ती चमके क्वचित्
चित्तेज नित्य भ्राजिष्णु **भ्राजिष्णूस** तया नमो

१४२ करी प्राणक्षुधाशान्ति पुष्टि तुष्टि तना मना
विश्वपोषण जें होय **भोजनास** तया नमो

१४३ देहें प्राणें मनें जीव करी जें काय भोजन
वैश्वानरास तें पावे तो **भोक्ता** त्यास हा नमो

१४४ करी सहन जो सारें क्षमारूपें कृताकृत
घेई जिंकूनि विश्वातें तो **सहिष्णु** तया नमो

१४५ जगाचें बारसें ज्यानें केलें तो जगदादिज
आधीं जगाच्या तो झाला नमो त्या **जगदादिजा**

१४६ अज्ञानांतूनि तो काम देह त्यांतूनि पाप तें
ज्ञानी निष्काम निष्पाप **अनघास** तया नमो

१४७ स्वरूपस्थिति सांडूनि गुणवृत्ति पराभव
विजयी गुण जिंकूनि **विजयास** तया नमो

१४८ अंधाराशीं न भिडतां सूर्य जेता स्वभावतः
तसें जेता सदा सत्य **सत्य-जेत्यास** त्या नमो

१४९ व्यक्ता अव्यक्त दे जन्म अव्यक्ता व्यक्त तें तसें
तेणें उभयथा आत्मा **विश्वयोनि** तया नमो

१५० शोधाया वसु तें नैज नाना योनींत जीव हा
पुनः पुनः करी वास **पुनर्वसु** तया नमो

( १७ )

**उपेन्द्रो वामनः प्रांशुरमोघः शुचिरूर्जितः।**
**अतीन्द्रः संग्रहः सर्गो धृतात्मा नियमो यमः॥**

१५१ इन्द्र इन्द्रियशक्तींचा राजा देहपुरीं वसे
उपस्थित तयापाठी तो **उपेन्द्र** तया नमो

१५२ उगवे क्षितिजीं तेव्हां सूर्य तो होय वामन
बालरूप मना मोही **वामनास** तया नमो

१५३ क्षितिलग्न खुजा वाढे करी आकाश ठेंगणें
मध्याह्नीं सूर्य तो प्रांशु **प्रांशुरूपास** त्या नमो

१५४ संकल्प कर्म फळ हें जीवाचें मोघ जीवन
निःसंकल्प निरारंभ **अमोघास** तया नमो

१५५ प्रकृतीच्या गुणीं सारें रंगलें हें जगत्त्रय
निरंजन गुणातीत **शुचिरूपास** त्या नमो

१५६ गुणोर्मींच्या सवें विश्व असहाय चळे वळे
आत्मा अचल अक्षोभ **ऊर्जितास** तया नमो

१५७ इंद्र इंद्रियवान् जीव त्याच्या होय पलीकडे
निरुपाधि महान् आत्मा **अतीन्द्रास** तया नमो

१५८ वृक्ष-संग्रह तें बीज तद्वत् जो विश्व-संग्रह
जिथें एकवटे विश्व **संग्रहास** तया नमो

१५९ जेथूनि अंकुरे सृष्टि मूळांतूनि जसा तरु
विश्वमूळ चि तो सर्ग **सर्गरूपास** त्या नमो
१६० बुद्धि चित्तेन्द्रियें देह सगळा आत्म-वर्ग हा
आज्ञांकित असे ज्याचा तो **धृतात्मा** तया नमो
१६१ धृतात्मा जो करूं इच्छी संयमें आत्म-धारणा
सहाय तेथ शौचादि **नियमास** तया नमो
१६२ शौच स्वाध्याय नियम, अहिंसा सत्य हे यम
काम-क्रोधादिकां काळ **यमरूपास** त्या नमो

( १८ )

**वेद्यो वैद्यः सदायोगी वीरहा माधवो मधुः।**
**अतीन्द्रियो महामायो महोत्साहो महाबलः॥**

१६३ यज्ञ-दान-तपोयुक्तें स्वाध्यायें जाणिजे तसें
तत्परायण विप्रांहीं **वेद्यरूपास** त्या नमो
१६४ वेद आचार्य नि स्वात्मा असे ही प्रत्ययत्रयी
त्रयी-विद्येश तो वैद्य **वैद्यरूपास** त्या नमो
१६५ आत्म्यांत विश्व जो पाहे विश्वीं आत्म्यास जो सदा
ऐक्यानुदर्शी तो होय **सदायोगी** तया नमो
१६६ मधु-कैटभवीरांना काम- क्रोधादि वैरियां
भूतद्रोह्यांस जो मारी **वीर-हा** तो तया नमो
१६७-१६८ मधु-माधव हे मास चैत्र-वैशाख बोलिले
न ते शीत न वा उष्ण नमो त्या **मधुमाधवा**
(अ) कुसुमाकर मासांत चैत्रीं होय मधूद्गम
मधुमास तसा जीवा **मधुरूपास** त्या नमो
(आ) कुसुमाकर मासांत वैशाखांत पिके मधु
मधुकोश तसा जीवा **माधवास** तया नमो
१६९ इंद्रियीं सेविला अर्थ असे विषयमात्र चि
विषयी तो असे आत्मा **अतीन्द्रिय** तया नमो
१७० (अ) जगदाकार हा भासे ब्रह्म-भाव न भंगितां
माया अद्भुत ही ज्याची **महामायास** त्या नमो
(आ) न द्रव्य नोपकरणें रची विश्व विचित्र हें
असें लाघवें तें ज्याचें **महामायास** त्या नमो
१७१ संकल्पमात्रें जो नित्य घडी मोडी जगत्त्रय
उत्साह हा असा ज्याचा **महोत्साहास** त्या नमो
१७२ उत्साह ही मन:शक्ति देहशक्ति असे बल
तद्द्वारा विरची विश्व **महाबल** तया नमो

( १९ )

**महाबुद्धिर् महावीर्यो महाशक्तिर् महाद्युतिः।**
**अनिर्देश्यवपुः श्रीमान् अमेयात्मा महाद्रिधृक्॥**

१७३ कलाकृति करायातें पाहिजे बुद्धि-वैभव
विचित्र विश्व रचिलें **महाबुद्धीस** त्या नमो
१७४ अनीश सगळे वीर रचाया विश्व हें महान्
रची जो विश्व हें लीलां **महावीर्यास** त्या नमो
१७५ अनन्त कोटि ब्रह्माण्डें घडी मोडी स्वशक्तित:
नेमी निजाधिकारीं त्यां **महाशक्तीस** त्या नमो
१७६ अग्नि विद्युत् सूर्य तेजें आणि अंधार द्वैत हें
तेजोभिन्न नुरे जेथ **महाद्युति** तया नमो
१७७ इदंतया सुनिर्देश्य असे विश्व समस्त हें
तद्वाच्य तो **अनिर्देश्य-वपु** निर्लिंग त्या नमो
१७८ आत्मरत्न-प्रभा फांके सच्चिदानन्द-लक्षणा
ज्याच्यापासूनिया नित्य **श्रीमन्तास** तया नमो
१७९ सूक्ष्म-स्थूल लघु-गुरु द्रव्य मेय असे जगीं
अच्छाय अनणु ब्रह्म **अमेयात्म्यास** त्या नमो
१८० अन्तर्यामि-स्वरूपें जो नियमी ह्या कुलाचलां
महाद्रिधृक् तो कमठ नमो त्या जो **महाद्रिधृक्**

( २० )

**महेष्वासो महीभर्ता श्रीनिवासः सतां-गतिः ।**
**अनिरुद्धः सुरानन्दो गोविन्दो गोविदां-पतिः ॥**

१८१ यज्ञ-रक्षणकार्यार्थ धनु ज्याचें असे महान्
धर्मगुप् तो महेष्वास **महेष्वासास** त्या नमो
१८२ धर्मलंडास दंडूनि धर्मिष्ठा प्रतिपाळितो
महीभर्तृत्व हें होय **महीभर्त्यास** त्या नमो

१८३ ज्ञान-निर्मोहता-शौच-शील-सौख्यादि- संपदा
आत्म-श्री ही वसे जेथ श्री-निवासास त्या नमो

१८४ समुद्रा मिळती ओघ सर्व सज्जीवनें तशीं
कृतार्थ जेथ मिळती तो सतांगति त्या नमो

१८५ मृत्यु-रुद्ध असे सर्व आत्मा हा रुद्ध-मृत्यु चि
त्रिकालातीत संचारी अनिरुद्धास त्या नमो

१८६ देहाभिमान नि द्रोह असुरानन्द-लक्षण
निर्वैर निरहंकार सुरानन्दास त्या नमो

१८७ गोवत् जीं चरती क्षेत्रीं इंद्रियें त्यांस जो वळी
तो वश्येन्द्रिय गोविन्द गोविन्दास तया नमो

१८८ गोवत् जी सर्व विषयीं वेदवाणी चरे तिचे
ज्ञाते गोविद् वरा त्यांच्या गोविदांपतये नमः

( २१ )

मरीचिर् दमनो हंसः सुपर्णो भुजगोत्तमः ।
हिरण्यनाभः सुतपाः पद्मनाभः प्रजापतिः ।।

१८९ संवत्सरात्मा जो सूर्य वर्षे तो जलदागमीं
अन्नोदकें जगा तर्पी मरीचीस तया नमो

१९० शरद् ऋतूंत तो घेई वृष्टि खेंचूनि मागुतीं
करी दमन वृष्टीचें दमनास तया नमो

१९१ आकाशाचा फिटे केर भूमीची धूलिका बसे
शुचिषद् तेथ जो सूर्य हंसरूपास त्या नमो

१९२ नभोमानसतीरीं जो प्रभातीं हंस पोहतो
तो जाय उड्डुनी पार सुपर्णास तया नमो

१९३ रात्रिरूपें प्रसर्पे तो गिळी दृश्य समस्त हें
अव्यक्ताच्या बिळीं बैसे भुजगोत्तम त्या नमो

१९४ ज्या चिद्रूप हिरण्याचा विश्वालंकार हा घडे
हिरण्यनाभ तत्केन्द्र हिरण्नाभास त्या नमो

१९५ चित्सूर्य पेटला आहे तत्प्रकाश चि विश्व हें
प्रकाशे नि प्रकाशी जो सुतपास तया नमो

१९६ ज्या अव्यक्ताक्षरांतूनि निघालें लोक-पद्म हें
पद्मनाभ तया नांव पद्मनाभास त्या नमो

१९७ चतुर्दशदलाकार लोक-पद्मांत ज्या प्रजा
नांदती त्यांस जो पाळी प्रजापति तया नमो

( २२ )

अमृत्युः सर्वदृक् सिंहः संधाता संधिमान् स्थिरः।
अजो दुर्मर्षणः शास्ता विश्रुतात्मा सुरारिहा।।

१९८ जो पाहे जातमात्राचा अन्त्यसंस्कार नित्यशः
आत्मा अजात अजर तो अमृत्यु तया नमो

१९९ सा-ही विकार भावांचे जो पाहे अविकार चि
द्रष्टृस्वरूप जो आत्मा सर्वदृक् तो तया नमो

२०० ग्राम्यवृत्ति रुचे ना ज्या जो आरण्य जटाधर
महाशब्द महासत्त्व सिंहरूपास त्या नमो

२०१ पूर्वोत्तर क्षणां सांधी संधाता स्मृतिरूप तो
सांधिले सर्व हें जेणें संधात्यास तया नमो

२०२ पूर्व-जन्म तसे जन्म आगामी वर्तमान हि
संधि हे होत जीवाचे संधिमंतास त्या नमो

२०३ संधि येती तसे जाती त्यांसवें ये न जाय जो
सदैकरूप तो आत्मा बोलिला स्थिर त्या नमो

२०४ रक्त श्वेत तशी कृष्ण गुणात्मक अजा- प्रजा
नाना योनींत तत्संगें बागडे अज त्या नमो

२०५ कर्ता भोक्ता गुणीं गुंते द्रष्टा राहे अलिप्त चि
गुण-संग न साहे चि दुर्मर्षण तया नमो

२०६ गुण-शासित हें विश्व न एथ गुणमुक्त जें
गुणातीत परी आत्मा शास्ता होय तया नमो

२०७ वेदशास्त्रीं नि लोकीं हि असे विश्रुत सर्वथा
परोपरीनें श्रुत जो विश्रुतात्म्यास त्या नमो

२०८ ज्ञानाचे गुण ते देव अज्ञानगुण राक्षस
अज्ञाना ज्ञान तें मारी नमो त्या तो सुरारि-हा

( २३ )

**गुरुर् गुरुतमो धाम सत्यः सत्यपराक्रमः ।**
**निमिषो ऽनिमिषः स्रग्वी वाचस्पतिरुदारधीः॥**

२०९ स्तन्यें प्रावरणें ज्ञानें भरवी बालकास जो
माता पिता ज्ञानदाता **गुरुरूप** तया नमो

२१० माता पिता ज्ञानदाता या गुरूंचा हि जो गुरु
अतीत गौरवें सर्वां नमो **गुरुतमा** तया

२११ तमाच्या पर जें स्थान तेज तें धाम बोलिलें
सर्वास्पद असे तें चि सार्व **धामास** त्या नमो

२१२ ॐ हें एकाक्षर ब्रह्म व्यक्षर ब्रह्म सत्य चि
सद् त्यत् मिळूनि तो सत्य सत्त्यत्-**सत्यास**
त्या नमो

२१३ नाम सत्य असे त्याचें त्याचें रूप हि सत्य चि
पराक्रम हि तो सत्य नमो **सत्य-पराक्रमा**

२१४ प्रतीतिमात्र तो काल कल्पान्त निमिषान्त वा
कालाची जी कला एक **निमिषास** तया नमो

२१५ वस्तुतः काल हें तत्त्व अच्छेद्य अविभाज्य चि
प्रतीतिमात्र अकल तया **अनिमिषा** नमो

२१६ सुगंधें आपल्या दिव्य तर्पी घ्राणा मना अशी
अम्लान सुमन-स्रक् जो सेवी **स्रग्वीस** त्या नमो

२१७ उदार धी असे ज्याची वाणी ती सत्य नि प्रिय
नमो तया तो संसिद्ध **वाचस्पति उदार-धी**

( २४ )

**अग्रणीर् ग्रामणीः श्रीमान् न्यायो नेता समीरणः।**
**सहस्रमूर्धा विश्वात्मा सहस्राक्षः सहस्रपात् ॥**

२१८ समाज ज्ञाति कुल वा नाना उद्योग-संघ जे
मार्गदर्शक सर्वांचा **अग्रणी** तो तया नमो

२१९ ग्राम हा विश्वराज्याचा असे एकम, राज्य तें
त्याचा नायक जो होय **ग्रामणी** तो तया नमो

२२० जिथें सत्य तिथें सत्ता, तिथें चि गुण-संपदा,
स्पृहणीयता तिथें होय तो चि **श्री-मन्त** त्या नमो

२२१ निश्चयें आय तो न्याय आत्मौपम्यस्वरूप जो
सर्वत्र सम जो पाहे **न्याय** निष्पक्ष त्या नमो

२२२ नेई जो सत्य-नीतीनें सर्व लोकांस सर्वदा
गन्तव्या प्रति नेता तो **नेता** होय तया नमो

२२३ समान सर्व भूतांस प्राणसूत्रेंनि चालवी
समान ईरणें होय **समीरण** तया नमो

२२४ जीवाची बुद्धि अंशात्म आत्म्याची ती समग्र कीं
**सहस्रमूर्धा** म्हणुनी परमात्मा तया नमो

२२५ एकदेशी असे जीव मोटका औटहात चि
विदेह व्याप्त सर्वत्र **विश्वात्मा** तो तया नमो

२२६ जीवाची दृष्टि ती पाहे मोजकें दृश्य जें दिसे
सर्वसाक्षी परात्मा तो **सहस्राक्ष** तया नमो

२२७ द्विपाद नि चतुष्पाद जीवांची गति ती किती
जो सर्वगत आहे चि नमो त्या तो **सहस्रपाद्**

( २५ )

**आवर्तनो निवृत्तात्मा संवृतः संप्रमर्दनः।**
**अहःसंवर्तको वह्निर् अनिलो धरणीधरः॥**

२२८ जन्मूनिया करी कर्में कर्मांनीं जन्म घे पुनः
संसार-चक्र फिरवी **आवर्तन** तया नमो

२२९ संसारीं शिणला जीव तत्त्व-जिज्ञासु होउनी
कर्मच्छेद करी ज्ञानें **निवृत्तात्मा** तया नमो

२३० प्रकृतीच्या गुणांनीं हा असे पुरुष वेढिला
स्वरूप न कळे तेणें **संवृतास** तया नमो

२३१ कोंडिला देह-कोंडींत गुणसंगामुळें बुध
निवटी संग-दोषांतें **संप्रमर्दन** त्या नमो

२३२ गिळूनि तम रात्रीचें करी दिवस भास्कर
स्वबोधदिनकर्त्या त्या **अहःसंवर्तका** नमो

२३३ वाही देवांस यज्ञांत हवि तो देवतां प्रति
जीवा लोकान्तरा वाही तेणें वह्नि तया नमो

२३४ थारा न यास कोठें हि अनिकेत फिरे जगीं
देहात् देहान्तरा जाय अनिलास तया नमो

२३५ जीवमात्रास धरिती धरणी व्यक्त भूमिका
तिला धरी जो अव्यक्त धरणीधर त्या नमो

( २६ )

सुप्रसादः प्रसन्नात्मा विश्वधृग् विश्वभुग् विभुः।
सत्कर्ता सत्कृतः साधुर् जह्नुर् नारायणो नरः॥

२३६ स्पृहा न विषयाची ज्या जो आत्मरत सर्वदा
प्रसाद-वर्षी तो होय सुप्रसाद तया नमो

२३७ निष्पंक आणि निष्कंप चित्त ज्याचें असे सदा
अगाध शांत ह्रदवत् प्रसन्नात्मा तया नमो

२३८ ग्रह-नक्षत्र-तारात्म विश्व जें हें असे स्थित
यच्छेषशक्ति-विधृत विश्वधृक् तो तया नमो

२३९ जें जें जन्मे मरे वर्ते तत्-साक्षी तो पुमान् पर
विश्वभोग करी ज्ञानें विश्वभुक् तो तया नमो

२४० मूर्त व्यक्त नि अव्यक्त सारें सगुण सीमित
असे निर्गुण निःसीम विभु तो चि तया नमो

२४१ जें जें करी हा सत्कर्म साधु साधु म्हणूनिया
सत्करी अन्तरात्मा तें सत्कर्ता तो तया नमो

२४२ विवाद अन्तरात्म्याशीं नव्हे ज्याचा कुठें कधीं
तो पुण्यशील सत्कर्मा होय सत्कृत त्या नमो

२४३ सिद्ध होऊनि जो वर्ते साधकत्वें चि सर्वदा
साधना न विसंबे चि साधु तो चि तया नमो

२४४ सत्कर्मदर्पहर जें ज्ञान तें जह्नु बोलिलें
कर्मौघ गिळुनी श्रौत चालवी जह्नु त्या नमो

२४५ नरायण-कुळीं झाला तो नारायण बोलिला
तपोमग्न विशालेंत नारायण तया नमो

२४६ नारायण स्वभावें चि तपोमग्न निरन्तर
बुद्ध्या वरी तें तद्भक्त नरदेव तया नमो

( २७ )

असंख्येयो ऽप्रमेयात्मा विशिष्टः शिष्टकृच् छुचिः।
सिद्धार्थः सिद्धसंकल्पः सिद्धिदः सिद्धिसाधनः॥

२४७ द्रव्यास होती घटक संख्येय चि विशेष ते
न निर्गुणा निर्विशेषा असंख्येयास त्या नमो

२४८ प्रमाणांनीं असे मेय प्रमेय म्हणती तया
प्रमाणाविषया आत्म्या अप्रमेयात्मया नमो

२४९ आगळा जो असे सर्वां वर्णिला जो परोपरी
विरुद्ध वचनीं एक विशिष्टास तया नमो

२५० आत्मानुशासनें शिष्ट करी सर्वांस जो परी
शास्ता म्हणूनि न कळे शिष्टकृत् तो तया नमो

२५१ त्रिगुणें रंगलें सर्व विश्व हें सचराचर
गुणनिर्लिप्त जो आत्मा शुचि तो त्या शुची नमो

२५२ आत्मभिन्न नसे अर्थ तेणें आत्मा स्वभावतः
असे सिद्धार्थ सर्वत्र सिद्धार्थास तया नमो

२५३ असत्संकल्प तो जीव सत्य-संकल्प ईश्वर
संकल्पें चि रची विश्व सिद्धसंकल्प त्या नमो

२५४ स्वरूपस्थिति ती सिद्धि ती जो दे साधका बुधा
अज्ञान करुनी दूर तो सिद्धिद तया नमो

२५५ सिद्धिदाता चि आदाता सिद्धीचा होय तत्त्वतः
आत्मभिन्न न तो होय सिद्धि-साधन त्या नमो

( २८ )

वृषाही वृषभो विष्णुर् वृषपर्वा वृषोदरः।
वर्धनो वर्धमानश् च विविक्तः श्रुतिसागरः॥

२५६ द्वादशाहादि जे यज्ञ बोलिलेत वृषाह ते
इष्ट धर्मदिनांचा तो वृषाही प्रभु त्या नमो

२५७ अग्रणी जो असे लोकीं जो परार्थैकजीवित
वर्षी धर्मार्थिकामांतें **वृषभास** तया नमो

२५८ वृष्णु वर्षणशीलत्वें वर्षी तो तेज आपुलें
तेजें जल, जलें अन्न वृष्णु **विष्णूस** त्या नमो

२५९ ब्रह्मचर्यादि पर्वांनीं उत्तरोत्तर वाढला
संन्यासफल तो वृक्ष **वृषपर्वा** तया नमो

२६० मनो- वाक्-कायकर्मात्म अहिंसा-सत्य-मूलक
जो धर्माचार शास्त्रोक्त तो **वृषोदर** त्या नमो

२६१ प्रपंच वाढतो आहे विश्वाचा हा अनावर
वाढवी जो तयातें तो होय **वर्धन** त्या नमो

२६२ बीज वाढे बने वृक्ष त्याचें वन महावन
बीजभाव चि हा सारा **वर्धमान** तया नमो

२६३ व्यक्त तो कार्यविस्तार होय अव्यक्त कारण
विलक्षण द्वयातीत तो **विविक्त** तया नमो

२६४ सरिता सागरीं लीन तसा शब्द जिथें बुडे
त्रैगुण्यवाची सगळा **श्रुति-सागर** त्या नमो

( २९ )

**सुभुजो दुर्धरो वाग्मी महेन्द्रो वसुदो वसुः।**
**नैकरूपो बृहद्रूपः शिपिविष्टः प्रकाशनः॥**

२६५ प्रलंब मांसल स्निग्ध निग्रहानुग्रह-क्षम
भुज ज्याचे जगत्त्राण **सुभुजास** तया नमो

२६६ कर्मे ध्यानें नि ज्ञानें जो ना कळे चि हृदिस्थ हि
प्रेमभक्तीविना सम्यक् **दुर्धरास** तया नमो

२६७ असत्य कटु अन्याय्य न बोले जो कुठें कधीं
हितवाक् मितवाक् वाग्मी **वाग्मिरूपास** त्या नमो

२६८ इन्द्र इन्द्रियशक्तींचा स्वामी जीव असे जगीं
स्वामी जो सर्व जीवांचा **महेन्द्रास** तया नमो

२६९ जो करी वास या देहीं तो जीव चि असे वसु
तें मूलधन जो देई **वसुदास** तया नमो

२७० प्रतिवस्तु करी वास म्हणूनि वसु बोलिला
वसे विश्व जिथें सारें **वसुरूपास** त्या नमो

२७१ आपुल्या गुणमायेनें बहुधा प्रतिबिंबित
एकरूप नसे कोठें **नैकरूपास** त्या नमो

२७२ भेदीं अभेदुनी राहे जो हा एक चि एकला
तेजःस्वरूप बिंबात्मा **बृहद्रूपास** त्या नमो

२७३ किरणां सृष्टिरूपा या कल्पान्तीं खेंचुनी निज
आत्मलीन वसे एक **शिपिविष्ट** तया नमो

२७४ कल्पारंभीं पुनः जो हा करी आत्म-प्रकाशन
नाना रूपें प्रकट तो **प्रकाशन** तया नमो

( ३० )

**ओजस्तेजोद्युतिधरः प्रकाशात्मा प्रतापनः।**
**ऋद्धःस्पष्टाक्षरो मन्त्रश् चन्द्रांशुर्**
**भास्करद्युतिः॥**

२७५ बल-बुद्धि-कांतिसंपन्ना प्रभामंडल-मंडिता
**ओजस्-तेजो-द्युतिधरा** श्रीवरास तया नमो

२७६ आदित्यविद्युदग्नींत चन्द्रतारादिकांत हि
प्रकाश ज्याचा विलसे **प्रकाशात्म्यास** त्या नमो

२७७ तेजाचे धर्म ते दोन प्रकाश नि प्रताप तो
अग्नि-विद्युत्-सूर्यतापें **प्रतापन** तया नमो

२७८ तपः-स्वाध्याय-यज्ञांनीं वाढलें ब्रह्मवर्चस
ज्याचें तो बोलिला ऋद्ध कर्म-**ऋद्धास** त्या नमो

२७९ स्पष्ट आज्ञा करी वेद विधि तेवीं निषेध हि
स्पष्टाक्षर असे तेणें नमो **स्पष्टाक्षरा** तया

२८० मननावांचुनी मंत्र नाकळे चि कुणास हि
ॐकार नेति हे मंत्र **मंत्ररूपास** त्या नमो

२८१ अहिंसा सत्य इत्यादि दैवी संपद्गुणें जना
आह्लादवी चंद्रवत् जो **चंद्रांशूस** तया नमो

२८२ प्रखरें ज्ञान-वैराग्य-तापें जो भाजितो निज
अविद्या-दोष-बीजांतें **भास्करद्युति** त्या नमो

( ३१ )

**अमृतांशूद्भवो भानुः शशंबिन्दुः सुरेश्वरः ।**
**औषधं जगतः-सेतुः सत्यधर्मपराक्रमः ।।**

२८३ निघाला चन्द्र जेयूनि तो आश्चर्य-महोदधि
अव्यक्त परमात्मा त्या **अमृतांशूद्भवा** नमो

२८४ प्रभेनें आपुल्या लोक स्वप्नादि उजळीतसे
जगद्भासक तो भानु **भानुरूपास** त्या नमो

२८५ शश-लांच्छन जो चन्द्र चन्द्रिकेनें जगास ह्या
न्हाणी नि निववी पोषी **शशबिन्दूस** त्या नमो

२८६ सद्गुणात्मक ते देती सुख लोकांस ह्या सुर
सुखदीं वरिष्ठ सद्रूप **सुरेश्वर** तया नमो

२८७ औषधें हरिती रोग महारोग असे भव
भव-भञ्जन तो देव **औषधास** तया नमो

२८८ सेतु तो म्हणिजे पाळ जगाची पाळ धर्म तो
धर्मे हें धरिलें विश्व **जगत्सेतूस** त्या नमो

२८९ आक्रमी सत्यधर्मे चि परांस अपराजित
नमो तया स्वभावें जो **सत्यधर्म-पराक्रम**

( ३२ )

**भूतभव्यभवन्नाथः पवनः पावनो ऽनलः ।**
**कामहा कामकृत् कान्तः कामः कामप्रदः प्रभुः ।।**

२९० झालें होणार जें होत सर्वांचा नाथ जो असे
**भूत-भव्य-भवन्-नाथ** बोलिला तो तया नमो

२९१ एके ठाईं न थारे चि सदा चळवळे पळे
सुसाट वाहे नाटोपे **पवनास** तया नमो

२९२ (अ) चळे पवन तो एक चाळवी तो जगास ह्या
तेणें पावन तो होय **पावनास** तया नमो

(आ) तेजस्तरंग, लहरी जळाच्या, वायुवीजनें
प्रवाहें सर्व हे पूत होती **पावन** त्या नमो

२९३ पवनें प्रकटे अग्नि प्राणेंविण तगे न तो
अन-प्रचुर जो होय **अनलास** तया नमो

२९४ आत्मज्ञानें हणी कामा तेणें तो काम-हा असे
मुमुक्षूंचा हरी काम **कामहा** तो तया नमो

२९५ काम-हा जो मुमुक्षूस कामकृत् तो चि कामुका
जलवत् विविधा बीजां **कामकृत्** तो तया नमो

२९६ कमनीय आत्मरूपें जो सर्वाधिक असे प्रिय
बोलिला कान्त तो आत्मा **कान्तरूपास** त्या नमो

२९७ जिव्हाळा सर्व जीवांचा पुरुषार्थ चतुर्विध
बोलिला काम सर्वार्थ **कामरूपास** त्या नमो

२९८ सर्वांतें पुरवी काम कुणा कण कुणा मण
उच्च तुच्छ न पाहे चि **कामप्रद** तया नमो

२९९ कर्तुं अकर्तुं जो शक्त कर्तुं वा अन्यथा तसा
समर्थ सर्व करण्या प्रभु तो त्या **प्रभू** नमो

( ३३ )

**युगादिकृद् युगावर्तो नैकमायो महाशनः ।**
**अदृश्यो ऽव्यक्तरूपश्च सहस्रजिदनन्तजित् ।।**

३०० युगाचा आदि जो होय कल्पारंभ जियूनि चि
**युगादिकृत्** तो कालाचा पिता चित्तत्त्व त्या नमो

३०१ युगाचा अंत करुनी नवें युग करी पुनः
बोलिला तो युगावर्त **युगावर्तास** त्या नमो

३०२ माया शक्ति अनिर्वाच्य कार्ये विविधरूपिणी
परमात्मा तिचा स्वामी **नैकमाय** तया नमो

३०३ विषवत् गिळितो विश्व कल्पान्तीं तो महेश्वर
चिद्रूपें सर्वभुक् तेणें **महाशन** तया नमो

३०४ जें जें दिसे तें सगळें नासे काळें अवश्य चि
तद्भिन्न तो असे आत्मा **अ-दृश्यास** तया नमो

३०५ अदृश्य आणि अव्यक्त अनिर्देश्य अचिन्त्य तो
रूपरेखा नसे त्यास नमो **अव्यक्तरूप** तो

३०६ संग्रामीं नि सभेमध्यें तेवीं द्यूतीं सहस्रशः
जिंकी जो अपराजेय नमो त्या तो **सहस्रजित्**

३०७ हार-जीत नसे ज्यास साम्यें सर्वत्र वर्ततो
स्थितप्रज्ञ फलत्यागी नमो त्या तो **अनन्तजित्**

( ३४ )

**इष्टो ऽविशिष्टः शिष्टेष्टः शिखण्डी नहुषो वृषः।**
**क्रोधहा क्रोधकृत्-कर्त्ता विश्वबाहुर् महीधरः।।**

३०८ अनुकूल आत्मरूपें जो सर्वांना सारखा असे
यजिला सर्वभोगीं जो **इष्टरूपास** त्या नमो

३०९ अहंरूपें स्फुरे सर्वां-अंतरीं जो निरन्तर
अविशिष्ट सर्व-सामान्य **अविशिष्टास** त्या नमो

३१० शिष्टांनीं इच्छिला आणि यजिला जो निरन्तर
मनो-वाक्-काय-कर्मांनी **शिष्टेष्टास** तया नमो

३११ गाई चारी, वनीं खेळे गोपाळांसह गोप तो
तुरा मोर पिसांचा ज्या **शिखण्डीस** तया नमो

३१२ नोळखे आपणातें चि यन्मायानद्ध-नेत्र हा
पचे अन्धतमीं जीव **नहुषास** तया नमो

३१३ सत्यमूल असे नीति नीतिमूल चि धर्म तो
धर्ममूल असे वृष्टि सुखवर्षी **वृषा** नमो

३१४ अज्ञान बीज, जो क्रोध पुष्प तें, फल नाश तो
विकार आपुला कापी **क्रोध-हा तो** तया नमो

३१५ सतीस छळिती दैत्य साधूतें पीडिती बळें
धर्मा न मानिती तेव्हां **क्रोधकर्त्यास** त्या नमो

३१६ विशाल विश्व रक्षाया विश्वतो-बाहु जाहला
रक्षी विश्वास बाहूंनीं **विश्वबाहु** तया नमो

३१७ जननी सर्व जीवांची महनीय असे मही
धर्म-गोप्ता तिचा धर्ता **महीधर** तया नमो

( ३५ )

**अच्युतः प्रथितः प्राणः प्राणदो वासावानुजः।**
**अपांनिधिर् अधिष्ठानं अप्रमत्तः प्रतिष्ठितः।।**

३१८ जन्म अस्तित्व संवृद्धि ऱ्हास क्षय तशी मृति
नसे विकारच्युति ही **अच्युतास** तया नमो

३१९ जगत्-प्रसिद्ध जो लोकीं वेदीं ब्रह्म-प्रसिद्ध जो
कार्य-कारण-रूपानें **प्रथितास** तया नमो

३२० निरंतर करी ये-जा आंत-बाहेर प्राण जो
जग हें जगतें जेणें **प्राणरूपास** त्या नमो

३२१ आज्ञेनें चेष्टती ज्याच्या मनासह दशेन्द्रियें
प्राणसूत्र धरी हातीं **प्राणदास** तया नमो

३२२ अष्टावसूंचा गण तो जीव वासव बोलिला
तदनु ज्ञान आत्म्याचें **वासवानुज** त्या नमो

३२३ समस्त पावती अस्त कर्मौघ रिघुनी जिथें
अव्यक्ताक्षर तो होय **अपांनिधि** तया नमो

३२४ विश्वाभास जिथें होय ती जी चिन्मय भूमिका
सर्वाधार निराधार **अधिष्ठान** तया नमो

३२५ प्रमत्त जीव हे सारे अनर्थीं अर्थ पांहते
स्वदृग् अद्वय निर्द्वंद्व **अप्रमत्तास** त्या नमो

३२६ इंद्रियार्थीं अनाकृष्ट धर्मनिष्ठ अहैतुक
आत्मभिन्न न पाहे चि **प्रतिष्ठित** तया नमो

( ३६ )

**स्कन्दः स्कन्दधरो धुर्यो वरदो वायुवाहनः।**
**वासुदेवो बृहद्भानुर् आदिदेवः पुरंदरः।।**

३२७ गृह त्यागूनि जो जाय जो कुमार चि राहिला
सेनानी देवसेनेचा **स्कंदरूपास** त्या नमो

३२८ निम्न प्रवृत्ति रोधूनि ऊर्ध्व क्रमण जो करी
उत्तरा-पथ-यात्री तो नमो **स्कंदधरा** तया

३२९ वेदाची जो धुरा वाहे यज्ञाचा जो पुरोहित
अग्रणी ब्रह्मलोकाचा **धुर्यरूपास** त्या नमो

३३० वरणीय असे लोकीं जें जें लोकहितावह
सर्वतोभद्र वर तो देई **वरद** त्या नमो

३३१ मरुद्गणांस जो वाही आकाशात्मा दिशोदिश
वायु वाहन वा ज्याचें **वायुवाहन** त्या नमो

३३२ तपो-विशुद्ध जें सत्त्व बोलिलें वसुदेव तें
प्रकटे वसुदेवीं जो **वासुदेवा** तया नमो

३३३ ज्याच्या प्रकाशें सूर्यादि तेजें सर्व प्रकाशित
स्वयंप्रकाश तो आत्मा **बृहद्भानु** तया नमो

३३४ ज्याच्या द्युतीनें हे देव प्रकाशित प्रकाशिती
तो आदिदेव देवेश **आदिदेवास** त्या नमो

३३५ पुरा-पुरास भेदूनि कोंडी-कोंडीस फोडुनी
विदीर्ण-देह विचरे **पुरंदर** तया नमो

( ३७ )

**अशोकस् तारणस् तारः शूरः शौरिर् जनेश्वरः।**
**अनुकूलः शतावर्तः पद्मी पद्मनिभेक्षणः॥**

३३६ शोकमोहादि षड् ऊर्मि आत्मवेत्त्या न बाधती
नेणे जो शोकमोहादि **अशोकास** तया नमो

३३७ झाला अशोक जो ज्ञानें दीनांची करुणा मनीं
शिष्यांस उतरी पार गुरु **तारण** त्या नमो

३३८ ज्ञानमूलक जो मार्ग तपोमय विशुद्धिकृत्
क्रिया चि पालटे जेणें **ताररूपास** त्या नमो

३३९ नुरलें द्वैत तें ज्यास ज्यास आत्मा चि सर्व हें
प्रतिमल्ल नसे ज्यास **शूररूपास** त्या नमो

३४० देवकी-वसुदेवांच्या घरीं जो जन्मला असे
शूरसेन-कुळीं, तेणें बोलिला **शौरि** त्या नमो

३४१ जन्मले जीव जे लोकीं बोलिले जन सर्व ते
जन-जीवन-यन्ता जो तो **जनेश्वर** त्या नमो

३४२ आत्मत्वें जो असे सर्वां सानुकूल चि सर्वथा
नुरला भेद तेणें तो **अनुकूल** तया नमो

३४३ अनुकूल स्वात्मरूपें भेदें आवर्त शंभर
हर्ष-शोक-शतावर्त **शतावर्तास** त्या नमो

३४४ पद्मवत् इंद्रियें ज्याचीं लीला-पद्म करीं धरी
पद्मेचा जो असे स्वामी **पद्मी** तो चि तया नमो

३४५ नेत्र प्रसन्नता-वर्षी पद्मवत् नव-सुंदर
तया विविक्त-दृक् देवा नमो **पद्मनिभेक्षणा**

( ३८ )

**पद्मनाभो ऽरविन्दाक्षः पद्मगर्भः शरीरभृत् ।**
**महर्द्धिर् ऋद्धो वृद्धात्मा महाक्षो गरुडध्वजः॥**

३४६ ज्याच्या नाभींतुनी थोर उदेलें लोक-पद्म हें
जो अव्यक्तार्णवीं लीन **पद्मनाभास** त्या नमो

३४७ फुल्लारविन्दवत् ज्याचे नेत्र आरक्त आयत
बोलिला अरविन्दाक्ष **अरविन्दाक्षा** तया नमो

३४८ पद्मकन्दीं वसे पद्म गर्भवत् कारणात्मना
लोकपद्मोदर तसा **पद्मगर्भास** त्या नमो

३४९ शरीरें होत हीं सारीं व्यक्ति ज्या दिसती इथें
अव्यक्त परमात्म्याचीं त्या **शरीरभृता** नमो

३५० ऋद्धि संख्येय जी होय परार्धावधि अल्प चि
ज्याची ऋद्धि असंख्येय **महर्द्धीस** तया नमो

३५१ नसे क्षय धना ज्याच्या जो वाढूं न घटूं शके
तो अकिंचन संपूर्ण बोलिला **ऋद्ध** त्या नमो

३५२ तो नसे आजचा पोर थोर प्राचीन तो अति
ज्ञानें वृद्ध वयें वृद्ध **वृद्धात्म्यास** तया नमो

३५३ नेत्र आकर्ण ते ज्याचे फुल्लकल्हार-शोभन
टपोरे आणि तेजस्वी **महाक्षास** तया नमो

३५४ नागान्तक – महावेग– गरुडाङ्क ध्वजावरी
मिरवी आपुल्या प्रेमें **गरुडध्वज** त्या नमो

( ३९ )

**अतुलः शरभो भीमः समयज्ञो हविर्हरिः ।**
**सर्वलक्षणलक्षण्यो लक्ष्मीवान् समितिंजयः ॥**

३५५ वस्तुजात असे गौण आत्मा निर्गुण केवल
तुला त्यास कशी होय **अतुलास** तया नमो

३५६ अत्यद्भुत महासत्व लोकीं जें नाढळे कुठें
मसिंग* लोकोत्तर तें **शरभास** तया नमो

३५७ गुणात्मक असे विश्व त्यास भीषण निर्‌गुण
निर्‌गुणीं तें विरे अन्तीं तेणें तो **भीम** त्या नमो

३५८ यथाकाल घडे ना जें तें सिद्धीस न जातसे
समयज्ञता अशी थोर **समय-ज्ञास** त्या नमो

(आ) शम हा चि असे यज्ञ ज्याचा तो शम-यज्ञ कीं
सर्वत्र समता यज्ञ **सम-यज्ञास** त्या नमो

३५९ पावे जीवात्मया भोग अर्पिला भिन्न इंद्रियां
हविर्‌मात्र जया पावे **हविर्‌हरि** तया नमो

३६० बत्तीस लक्षणें ज्याचीं असती सर्व मंगल
**सर्व-लक्षण-लक्षण्य** बोलिला तो तया नमो

३६१ लक्ष्मीतें कांक्षिती त्यांतें लक्ष्मी कांक्षी न सर्वथा
अनाकांक्ष अनादान **लक्ष्मीवान्** तो तया नमो

३६२ वादीं समिति वेत्त्यांची योध्द्यांची संगरीं तशी
जिंके समिति दोन्ही हि **समितिंजय** त्या नमो

---

*म = मकर, सिं = सिंह, ग= गरुड
सर्वातिशायी सर्वगामी

( ४० )

**विक्षरो रोहितो मार्गो हेतुर् दामोदरः सहः ।**
**महीधरो महाभागो वेगवान् अमिताशनः ।।**

३६३ क्षर नाशवंत हीं भूतें तीं जियें नुरलीं मुळीं
विगत-क्षर तो नित्य **विक्षरास** तया नमो

३६४ अंगुष्ठमात्र जो स्वान्तीं व्यापुनी भुवनें उरे
तो रोहित महान् आत्मा **रोहितास** तया नमो

३६५ न सरे जो पुढें नेई यात्रिकास निरन्तर
मार्गितव्य चि जो नित्य **मार्गरूपास** त्या नमो

३६६ सर्व-कारण विश्वाचें उपादान निमित्त हि
बोलिला हेतु संपूर्ण **हेतुरूपास** त्या नमो

३६७ उदरीं सांठलें ज्याच्या सृष्टीचें या चऱ्हाट चि
नसे आदि न ज्या अंत तया **दामोदरा** नमो

३६८ सर्व साहूनि जो जिंकी सर्वातें अपराजित
सर्वथा अप्रतीकार **सहरूपास** त्या नमो

३६९ स्थैर्यवद्-गिरिरूपें जो धरी ताणूनि सर्वतः
नेदी फुटूं महीतें तो **महीधर** तया नमो

३७० नवयौवन संपत्ति प्रभुत्व नि सुकीर्ति हें
महत् भाग्य असे ज्यास **महाभागास** त्या नमो

३७१ वेगवंतांत तो वायु वेगवान् मन त्याहुनी
त्याहूनि वेगवान् आत्मा **वेगवंतास** त्या नमो

३७२ मितंपच चि हीं सारीं इंद्रियें मन बुद्धि कीं
अत्ता चराचरांचा तो **अमिताशन** त्या नमो

( ४१ )

**उद्भवः क्षोभणो देवः श्रीगर्भः परमेश्वरः ।**
**करणं कारणं कर्ता विकर्ता गहनो गुहः ।।**

३७३ उद्‌भवे जो जगद्रूपें संहारांतूनि नित्यशः
संहारीं चि जणूं पोसे **उद्‌भवास** तया नमो

३७४ विश्वारंभक तत्त्वांतें सृष्ट्यारंभीं स्वमायया
क्षोभवी सृष्टिकार्या जो **क्षोभणास** तया नमो

३७५ द्योतनें दीवनें देव वसुदानें हि देव तो
न मागे आणि दे-देई **देवरूपास** त्या नमो

३७६ विश्वश्री ज्याचिया पोटीं कल्पान्तीं दडुनी बसे
कल्पारंभीं चि प्रगटे **श्री-गर्भास** तया नमो

३७७ पंचभूतांस तन्मात्रें, तन्मात्रां गुण, त्यांस ती
गिळी प्रकृति, तीतें तो **परमेश्वर** त्या नमो

३७८ सृष्टिसाधन जें होय तें तें करण बोलिलें
परमात्मा चि तें सर्व करणास तया नमो

३७९ परमात्मा चि सृष्टीचें उपादान असे स्वयें
निमित्त हि असे तो चि कारणास तया नमो

३८० कराया न कराया वा अन्यथा वा करावया
स्वतंत्र तो असे तेणें कर्ता; कर्त्यास त्या नमो

३८१ ज्यास राग न वा द्वेष फल-हेतु न वा शिवे
वर्ते जो अनहं कर्मीं विकर्त्यास तया नमो

३८२ इंद्रियांचा मनाचा वा वाणींचा हि प्रवेश तो
न होय सर्वथा ज्यांत गहनास तया नमो

३८३ पटानें झांकिला तन्तु गुणीं निर्गुण तो तसा
कार्यें कारण तें गूढ गुहरूपास त्या नमो

( ४२ )

**व्यवसायो व्यवस्थानः संस्थानः स्थानदो ध्रुवः।**
**परर्द्धिः परमस्पष्टस् तुष्टः पुष्टः शुभेक्षणः ॥**

३८४ महावाक्योपनिषदीं ज्याचा निश्चय होतसे
परमात्मतत्त्व तें होय व्यवसाय तया नमो

३८५ व्यवसायास लक्षूनि वेदीं वर्णाश्रमात्मक
व्यवस्था लावुनी देई व्यवस्थानास त्या नमो

३८६ आदिमध्यावसानीं जो करी विश्वा स्वसंस्थित
सर्वावसान संस्थान संस्थानास तया नमो

३८७ विश्वाचें जो अधिष्ठान सर्पाभासास रज्जुवत्
सद्रूपे स्थान दे सर्वां स्थानदास तया नमो

३८८ पंचावयव संसारीं नामरूप चि अध्रुव
सच् चिद् आनंद हे अंश ध्रुव होत तया नमो

३८९ ऋद्धि वाढे घटे कालें नभीं चन्द्रकला जशी
वृद्धिक्षय नसे ज्यास परर्द्धीस तया नमो

३९० अहंप्रत्ययरूपें जो जन्मान्धास हि स्पष्ट चि
तो सर्वान्तःस्फुरद्रूप परमस्पष्ट त्या नमो

३९१ विषयेन्द्रियसंयोग या त्रयीच्या अधीन जो
तो अतुष्ट चि; स्वाधीन तुष्ट; तुष्टास त्या नमो

३९२ तुष्ट जो निरपेक्षत्वें विदेहत्वें चि पुष्ट जो
आंतबाहेर अन्यून पुष्टरूपास त्या नमो

३९३ पाहे सर्वत्र जो एक आत्मतत्त्व चि केवळ
शुभदृष्टि असे तो चि शुभेक्षण तया नमो

( ४३ )

**रामो विरामो विरजो मार्गो नेयो नयो ऽनयः।**
**वीरः शक्तिमतां श्रेष्ठो धर्मो धर्मविदुत्तमः ॥**

३९४ रमती योगिये ज्यांत जो रमे सकलांतरीं
सदा स्वरूपीं रमला रामरूपास त्या नमो

३९५ विराम पावती सर्व साधना ज्यांत सर्वथा
विराम श्रममात्राचा विरामास तया नमो

३९६ रागमूलक ती तृष्णा रागमूलक संग तो
निमाला राग तो ज्याचा विरजास तया नमो

३९७ उभा तेथूनि गन्तव्या नेई तो मार्ग बोलिला
स्वरूपा मेळवी मार्ग मार्गरूपास त्या नमो

३९८ गम्य मार्गें नेय जीवा नेई नय गुरूत्तम
गन्तव्या अनयातें कीं नेयरूपास त्या नमो

३९९ नयतीति नयो नेता गुरुरूप सुहृत्तम
गन्तव्या सुपथें नेई नयरूपास त्या नमो

४०० अयास हालचालीस नसे वाव मुळीं जिथें
कूटस्थ सिद्धिरूपास अनयास तया नमो

४०१ काम-क्रोधादि शत्रूंशीं मृत्यूपर्यंत झुंजतो
न घे माघार केव्हांहि वीररूपास त्या नमो

४०२ वृक्षांतें वायु उन्मूली धांवे वायूपुढें मन
सांपडे न मना आत्मा शक्तिमत्श्रेष्ठ त्या नमो

४०३ इहलोकीं सुखोपाय परलोकीं भयापह
परमानन्द -सोपान धर्मरूपास त्या नमो

४०४ वेद आचार्य नि स्वात्मा हे उत् उत्तर उत्तम
धर्मतत्त्वज्ञ या लोकीं नमो **धर्मविदुत्तमा**

( ४४ )

**वैकुण्ठः पुरुषः प्राणः प्राणदः प्रणवः पृथुः ।**
**हिरण्यगर्भः शत्रुघ्नो व्याप्तो वायुरधोक्षजः ॥**

४०५ गुणांची न जिथें कुंठा त्या विकुंठांत जो वसे
तो वैकुंठ गुणातीत **वैकुंठास** तया नमो

४०६ स्वामित्वें जो करी वास नवद्वारपुरीमधें
मायागुणगणाधीश **पुरुषास** तया नमो

४०७ देहेन्द्रियांतें वाणीतें चालवी जो बळें निज
प्राणापानांस जो हांकी जीव **प्राण चि** त्या नमो

४०८ वैकुंठ पुरुष प्राण सिद्ध शुद्ध अशुद्ध जो
प्राणोदयास्तकारी जो तोचि **प्राणद** त्या नमो

४०९ प्रकर्षें नव तो होय प्रणव स्तव उत्कट
समस्त व्यस्त संपूर्ण **प्रणवास** तया नमो

४१० जो सर्वाधार पृथु तो टांचें आधेयमात्र तें
वात्सल्य जगदाधार **पृथुरूपास** त्या नमो

४११ हिरण्यरूप अव्यक्त ज्याच्यापासूनि संभवे
नमो **हिरण्यगर्भा** त्या देवेशा जगदादिजा

४१२ कामक्रोधादि दोषांस रोगां शीतज्वरादिकां
हिरण्याक्षादि शत्रूंतें मारी **शत्रुघ्न** त्या नमो

४१३ त्या विश्वरूप कार्यांत स्वरूपें कारणात्मना
व्याप्त होऊनि जो ठेला **व्याप्तरूपास** त्या नमो

४१४ आंत-बाहेर जो वाहे पिंड- ब्रह्माण्ड-संपुटीं
आयुरूप चि तो वायु **वायुरूपास** त्या नमो

४१५ अधोमुख करी जेव्हां विषयोन्मुख इन्द्रियां
संभवे तैं तिथें ज्ञान **अधोक्षज** तया नमो

( ४५ )

**ऋतुः सुदर्शनः कालः परमेष्ठी परिग्रहः ।**
**उग्रः संवत्सरो दक्षो विश्रामो विश्वदक्षिणः ॥**

४१६ न चुके चि कधीं ज्यांचें प्रवर्तन निवर्तन
अमोघ फल-दातृत्व **ऋतुरूपास** त्या नमो

४१७ सर्वतोभद्र जो आहे ज्याचें दर्शन शोभन
संवत्सरात्मा तो सूर्य **सुदर्शन** तया नमो

४१८ व्यक्तमात्रास जो काल गणी आयु क्षणोक्षण
अव्यक्तगति तो काल **कालरूपास** त्या नमो

४१९ न कालवश जो एक गगनातीत जो तसा
परमे स्थीयते येन **परमेष्ठीस** त्या नमो

४२० जीवनोपाय म्हणुनी घेइजे जो निरंतर
नाना वस्तु-मिषें लोकीं तो **परिग्रह** त्या नमो

४२१ विश्वरूप असे उग्र तेज त्याचें न साहवे
मानवी चर्मचक्षूंस **उग्ररूपास** त्या नमो

४२२ संपूर्ण ऋतुचक्राची करी पूर्ण परिक्रमा
वर्षानुवर्ष कालात्मा **संवत्सर** तया नमो

४२३ सर्व क्रिया यथाकाल यथावत् जो करीतसे
निरहंकार उत्साही बोलिला **दक्ष** त्या नमो

४२४ अनारंभें प्रमादें वा विश्राम न मिळे कुणा
स्वकर्मीं दक्ष जो पावे तो **विश्राम** तया नमो

४२५ अनुकूल कुणा तो चि प्रतिकूल दुजा कुणा
अनुकूल विश्वमात्रास **विश्वदक्षिण** त्या नमो

( ४६ )

**विस्तारः स्थावर-स्थाणुः प्रमाणं बीजमव्ययम्।**
**अर्थो ऽनर्थो महाकोशो महाभोगो महाधनः॥**

४२६ देशतः कालतः ज्याचा वस्तुतः हि निरंतर
विस्तार विश्वतः होय **विस्तारास** तया नमो

४२७ लोकीं सर्वगतत्वें तो स्थिर **स्थावर** बोलिला
युगें येती नि जाती तो उभा **स्थाणु** तया नमो

४२८ संविद्रूपें स्वप्रमाण प्रमाणांचें प्रमाण तो
तेणें प्रमाण तो एक **प्रमाणास** तया नमो

४२९ एकदा रुजलें बीज वेंचे होऊनि अंकुर
अंकुरे, न परी वेंचे, बीज **अव्यय** त्या नमो

४३० जो अर्थनीय सर्वांस जेणें अर्थास अर्थता
स्वात्मा परात्मा सर्वात्मा **अर्थरूप** तया नमो

४३१ आत्मभिन्न पदार्थातें बोलिती अर्थ लौकिकीं
तद्भिन्न चि असे आत्मा **अनर्थास** तया नमो

४३२ स्वर्ण-रत्नादि-राजस्व-कोश अल्प चि भंगुर
निजस्व-कोश तो नित्य **महाकोशास** त्या नमो

४३३ अल्पकोशीं अल्पधन तेणें भोग हि अल्प चि
जिथें अनल्प हें सारें **महाभोगास** त्या नमो

४३४ अनल्प भोग आत्म्याचा अनल्पचि तिथें धन
म्हणूनि बोलिला लोकीं **महाधन** तया नमो

( ४७ )

**अनिर्विण्णः स्थविष्ठो ऽभूर् धर्मयूपो महामखः।**
**नक्षत्रनेमिर् नक्षत्री क्षमः क्षामः समीहनः ॥**

४३५ निर्वेद बाह्य वस्तूंचा सुप्रियांचा हि येतसे
न आपुला कधीं कोणा **अनिर्विण्णास** त्या नमो

४३६ पादपीठ असे पृथ्वी अंतराळ शरीर कीं
स्वर्ग माथा विश्वरूप **स्थविष्ठास** तया नमो

४३७ जो सारखा असे होत भू तो भवनशील तो
कारणात्म चि तें कार्य; **अ-भू** तेणें तया नमो

४३८ धर्मरूप असे यूप बांधिले बळि जीव हे
सृष्टियज्ञ असे होत **धर्मयूपास** त्या नमो

४३९ मख अल्प दिसीं मासीं होती संपन्न वत्सरीं
मख जीवन-पर्यंत **महामख** तया नमो

४४० नेमि ती रथचक्राची ज्याची नक्षत्र-मंडित
**नक्षत्रनेमि** तो चन्द्र-सूर्यरूप तया नमो

४४१ हें तारकित आकाश यच्-छरीर असे निळें
मुक्ता-मंडितवत् रम्य **नक्षत्री** तो तया नमो

४४२ उत्पत्ति स्थिति विश्वाची करण्या क्षम संहृति
क्षमी सर्व चि जो शक्त **क्षमरूपास** त्या नमो

४४३ अशक्त स्पर्शनातें हि वस्तुमात्रा अनात्मका
स्वसंवित्तनुमात्रास **क्षामरूपास** त्या नमो

४४४ संकल्पोद्गारकर्मात्म समीहन समग्र हें
सृष्टिकर्मार्थ करितो तो **समीहन** त्या नमो

( ४८ )

**यज्ञ इज्यो महेज्यश्च क्रतुः सत्रं सतां-गतिः।**
**सर्वदर्शी विमुक्तात्मा सर्वज्ञो ज्ञानमुत्तमम् ॥**

४४५ यजनीय असे सर्वां यजिती सर्व ज्यास चि
जाणतां नेणतां किंवा **यज्ञरूपास** त्या नमो

४४६ यज्ञ तो थोरला देव इज्य देव अवान्तर
गुणरूप चि ते त्याचे **इज्यरूपास** त्या नमो

४४७ महनीय महन्तां हि इज्या हि यजनीय जो
महान् असूनि जो इज्य **महेज्यास** तया नमो

४४८ संकल्प-वाक्-क्रिया-युक्त पुण्य कर्म असे क्रतु
क्रतुरूप चि हा जीव **क्रतुरूपास** त्या नमो

४४९ यज्ञ जो दीर्घकालीन सत्र तो बोलिला असे
असे जीवन हें सत्र **सत्ररूपास** त्या नमो

४५० असन्तां न मुळीं गम्य, गम्य सन्तांस केवळ
सर्वसत्सरिदम्भोधि **सतांगति** तया नमो

४५१ चिद्रूपत्वें सर्वदर्शी न स्पर्शे चि कशास हि
न च पाप न वा पुण्य **सर्वदर्शी** तया नमो

४५२ नित्य शुद्ध असे आत्मा असे बुद्ध नि मुक्त तो
मुक्तरूप स्वभावें चि **विमुक्तात्मा** तया नमो

४५३ सर्व होऊनि जो जाणे सर्व तो बोलिला असे
सर्वज्ञ, ज्ञप्तिमात्रात्मा सर्वज्ञास तया नमो

४५४ ज्ञेयज्ञातृ-विभेदें जें होय तें ज्ञान भेदकृत्
होय अद्वय जें ज्ञान ज्ञान उत्तम त्या नमो

( ४९ )

सुव्रतः सुमुखः सूक्ष्मः सुघोषः सुखदः सुहृत् ।
मनोहरो जितक्रोधो वीरबाहुर् विदारणः ॥

४५५ आत्मरूपें जनां सर्वां देई सुख चि केवळ
हरी अनित्या असुखा सुव्रतास तया नमो

४५६ स्वरूप-स्थित जो नित्य बाह्यार्थे न डगे चि जो
हर्षशोक नसे ज्यास सुमुखास तया नमो

४५७ देह क्रिया फलें भोग हर्षशोक प्रपंच हा
असे स्थूल चि, तद्‌भिन्न आत्मा सूक्ष्म तया नमो

४५८ घोष सर्व चि शब्दात्म द्वंद्वरूप अनित्य चि
मौन निःशब्द निःस्पंद सुघोषास तया नमो

(आ) ॐकाररूप वेदात्म गीतादिस्मृतिरूप वा
घोष ज्याचा घुमतसे सुघोषास तया नमो

४५९ सच्चिदानन्दमय तो स्वरूपस्थिति दावुनी
सुख-द स्मरणें होई सुखदास तया नमो

४६० आत्मत्वें सर्व भूतांचा इष्ट मित्र सुहृत् सखा
अकारण सुहृत् आत्मा सुहृदास तया नमो

४६१ मना क्षोभविती अर्थ इंद्रियांचे निरंतर
मना त्या संहरी स्वान्तीं मनोहर तया नमो

४६२ चित्ताचा क्षोभ जो तो चि क्रोध, तन्मूल काम तो
जिंकी काम-जयें क्रोधा जित-क्रोध तया नमो

४६३ रक्षणा जीवमात्राच्या तक्षणा द्रोहियांचिया
वीर्यानें स्फुरती बाहु वीरबाहूस त्या नमो

४६४ अनात्म वस्तु साहेना फोडफोडोनि टाकितो
राखितो आपुलें स्वत्व विदारण तया नमो

( ५० )

स्वापनः स्ववशो व्यापी नैकात्मा नैककर्मकृत्।
वत्सरो वत्सलो वत्सी रत्नगर्भो धनेश्वरः ॥

४६५ त्रिगुणात्मक मायेच्या झोपेनें झोपवीत जो
जन्मतः भूतमात्रास स्वापनास तया नमो

४६६ मायावश असे विश्व गुणबद्ध चि जीव हा
मुक्त मायागुणांतूनि स्व-वशास तया नमो

४६७ कनकें कुण्डलें व्याप्त न तें कनक कुण्डलीं
सर्वकारण तो व्यापी व्यापिरूपास त्या नमो

४६८ असे पुरुष नैकात्मा देहेन्द्रियमनोमय
वृक्षवत् अंगबहुल नैकात्म्यास तया नमो

४६९ पुरुषा इन्द्रियें नाना नाना कर्मे करीत तो
प्राणेन्द्रियमनोयोगें नैककर्मकृता नमो

४७० यथावत् जें सरे लोकीं ऋतुचक्र चि वत्सर
मास-वत्सें असे युक्त वत्सरास तया नमो

४७१ भक्ताचे दोष वारूनि गुणें मंडित त्या करी
प्रेमें ज्ञानें हि भरवी वत्सलास तया नमो

४७२ वत्सा अनुसरे वत्सी भक्तासि भगवंत तो
लोकवत्सा चारिताहे वत्सिरूपास त्या नमो

४७३ निजात्मा आपुल्या ठाईं अज्ञात मणिवत् वसे
रत्नगर्भ चि तो तेणें रत्नगर्भास त्या नमो

४७४ जेणें हा जीव हो धन्य वित्त तें धन बोलिलें
आत्मज्ञान-धनें धन्य धनेश्वर तया नमो

( ५१ )

धर्मगुब् धर्मकृद् धर्मी सदसत् क्षरमक्षरम् ।
अविज्ञाता सहस्रांशुर् विधाता कृतलक्षणः ॥

४७५ न पाहे राज्य संपत्ति न दारा देह सौख्य वा
धर्म-संगोपन करी धर्मगुप् तो तया नमो

४७६ धरिला देह ज्यासाठीं धर्म तो आचरीतसे
सत्य-संयम-संपन्न **धर्मकृत्** तो तया नमो

४७७ कर्तव्यवान् असे धर्मी धर्मकृत् धर्म जो करी
धर्मगुप् करवी धर्म **धर्मिरूपास** त्या नमो

४७८ सन्मूल चि असे सर्व तेणें एक चि सत् असे
'एकं सत्' घोष वेदाचा **सद्रूपास** तया नमो

४७९ बहु-धा दिसतें जें हें नानाविध जगत् असत्
नसूनि दिसतें आहे **असद्रूपास** त्या नमो

४८० लोकीं पदार्थत्रय हें जगत् जीव नि ईश्वर
पालटे जीव नि जगत् क्षर तें त्या **क्षरा** नमो

४८१ पालटे न कदाकाळीं असें ईश्वरतत्त्व जें
तें चि अक्षर कूटस्थ **अ-क्षरास** तया नमो

४८२ क्षराक्षर न जो जाणे नेणे अक्षरता निज
देहयोगें रडे हांसे **अविज्ञात्यास** त्या नमो

४८३ सहस्रांशु असे सूर्य तो हि अंशु यदीय कीं
चित्सूर्य तो सहस्रांशु **सहस्रांशूस** त्या नमो

४८४ धाते जगाचे ते नैक पंचतत्त्वें गुण-त्रय
प्रधानादि विनिर्मी जो **विधात्यास** तया नमो

४८५ सच्-चिद्-आनन्द हें ज्याचें असे लक्षण निश्चित
वेदोपनिषदीं तो चि **कृत-लक्षण** त्या नमो

( ५२ )

**गभस्तिनेमिः सत्त्वस्थः सिंहो भूतमहेश्वरः ।**
**आदिदेवो महादेवो देवेशो देवभृद्गुरुः ॥**

४८६ प्रभा-मंडल-मध्यस्थ- तेजो-राशि असे रवि
तद्वत् **गभस्तिनेमि** जो नेमिवंत तया नमो

४८७ सत्त्वें आरोग्य तें देहीं वाढे बुद्धींत शुद्धि ती
तिथें तो प्रकटे आत्मा **सत्त्वस्थास** तया नमो

४८८ सिंहवत् गर्जनेनें चि ज्याच्या दोष निवारित
अज्ञान-दोष-हरि तो बोलिला **सिंह** त्या नमो

४८९ भूतांतें जन्म दे पाळी तो भूतेश्वर बोलिला
आत्मसात् जो करी त्यांस नमो **भूतमहेश्वरा**

४९० लोकीं त्यां देवता नाना देवाच्या गुणमूर्ति चि
सन्मात्रमूर्ति जो आहे **आदिदेवास** त्या नमो

४९१ महादेव असे देव जेणें हें विश्व व्यापिलें
व्यापूनि उरला विश्व **महादेव** तया नमो

४९२ जगतां ईशिती ईश ईशां ईश्-वर ईशितो
बोलिला तो चि देवेश **देवेशास** तया नमो

४९३ अमृतें भरवी देवां ज्ञानें हि भरवी तसा
माता पिता ज्ञानदाता **देवभृद्-गुरु** त्या नमो

( ५३ )

**उत्तरो गोपतिर् गोप्ता ज्ञानगम्यः पुरातनः ।**
**शरीरभूतभृद् भोक्ता कपीन्द्रो भूरिदक्षिणः ॥**

४९४ पूर्व रूप असे जीव ब्रह्म उत्तर रूप तें
उत्तरोत्तर जें रूप **उत्तरास** तया नमो

४९५ गो इन्द्रियें तयांतें जो कर्मयोगांत राबवी
गो-स्वामी तो विधेयात्मा **गो-पतीस** तया नमो

४९६ इन्द्रियांतें असन्मार्गीं जाऊं नेदी क्षणार्ध हि
करी पाळत जो त्यांची आत्म-**गोप्त्यास** त्या नमो

४९७ ज्ञानस्वरूप तो आत्मा असे ज्ञानें चि गम्य तो
न कर्में ज्ञानकर्में वा **ज्ञान-गम्यास** त्या नमो

४९८ आजचा तो नसे तेणें म्हटलासे पुरातन
तयाअलीकडे काळ तो **पुरातन** त्या नमो

४९९ पाञ्च-भौतिक हा देह आणि भूतें हि तीं तशीं
धरी मायागुणें देही **शरीरभूतभृता** नमो

५०० धरूनि देह हा जीव भोगी कर्मफळें निज
लोक-लोकान्तरा जाय **भोक्तृरूपास** त्या नमो

५०१ जेणें उद्धरिली पृथ्वी यज्ञसूकर होउनी
हिरण्याक्षघ्न बलवान् कपीन्द्रास तया नमो

५०२ यज्ञपूरुष हा हृत्स्थ भूरि-दक्षिण कीं असे
अर्पिजे ज्यास सर्वस्व नमो त्या भूरिदक्षिणा

( ५४ )

**सोमपो ऽमृतपः सोमः पुरुजित् पुरुसत्तमः ।**
**विनयो जयः सत्यसन्धो दाशार्हः सात्वतां पतिः ।।**

५०३ सोमयाग करी, देवा अर्पुनी हवि, आपण
करी प्राशन जो सोम सोमपास तया नमो

५०४ पिऊनि सोम तो एथ स्वर्गीं अमृत प्राशितो
सोमामृतप तो होय तया अमृतपा नमो

५०५ वांटूनि गाळिला जाई पवित्रांतूनि सोम जो
नर देव पिती यज्ञीं सुत सोमास त्या नमो

५०६ जो जिंकी संगरीं शौर्यें सैनिकांस सहस्रशः
जिंकी द्यूतीं बहुद्रव्य पुरुजित् तो तया नमो

५०७ पुरु-सत्तम तो होय पुरु-वंशावतंस जो
पुरु नाम नराचें कीं नमो त्या पुरु-सत्तमा

५०८ वर्जूनिया अधर्मास परधर्मास टाळुनी
स्वधर्मे सत्पदा नेई विनयास तया नमो

५०९ असे सत्य चि तें एक टिके सत्य चि एकलें
सदाजय असे सत्य जयरूपास त्या नमो

५१० संपूर्ण धारणा ज्याची वृत्ति वाणी नि वर्तन
सत्याश्रित असे नित्य सत्य-संधास त्या नमो

५११ "ब्रह्म दासा ब्रह्म दाशा ब्रह्मैव कितवा इमे"
त्या दाशांस हि जो सेव्य दाशार्हास तया नमो

५१२ जो असे पतितांजोगा पावनांस हि पावन
सात्वतां पति तो तेणें सात्वतांपतये नमः

( ५५ )

**जीवो विनयिता साक्षी मुकुन्दो ऽमितविक्रमः।**
**अम्भोनिधिर् अनन्तात्मा महोदधिशयो ऽन्तकः।।**

५१३ नसे जड नसे शुद्ध वासना-वश चेतन
कर्ता भोक्ता लोक-यात्री जीवरूपास त्या नमो

५१४ तो चि दोषज्ञ होऊनि दोषापनयना झटे
तेणें विनयिता होय तया विनयित्या नमो

५१५ अविद्या-कृत दोषांतें सारूनि परतें बघे
आत्मभिन्न नसे कांहीं असाक्षीस तया नमो

५१६ मुक्तीमागूनि ती मुक्ति जीवा देत चि जाय जो
अमितविक्रम तो तेणें मुकुंदास तया नमो

५१७ अविज्ञात असे सर्व अम्भोधिगत काय जें
तद्वत् गहन अज्ञेय नमो अम्भोनिधीस त्या

५१८ रूपा अन्त नसे ज्याच्या वस्तुतः देश-काल-तः
म्हणावा तो अनन्तात्मा अनन्तात्म्यास त्या नमो

५१९ नाम रूप नसे जेथें जेथें खूण न वा गुण
त्या अव्यक्तार्णवीं लीन महोदधिशया नमो

५२० करी अन्त समस्तां जो प्रलयान्ता हि अन्त चि
अनात्मकान्तका देवा अन्तकास तया नमो

( ५६ )

**अजो महार्हः स्वाभाव्यो जितामित्रः प्रमोदनः।**
**आनन्दो नन्दनो नन्दः सत्यधर्मा त्रिविक्रमः ।।**

५२१ न जन्मे अज तो होय करी अजन तो अज
अ असे नि ज जन्मे हि अजरूपास त्या नमो

५२२ मह पूजा तिला पात्र तो महार्ह गुणाकर
महान् अर्ह असे ज्याचा महार्हास तया नमो

५२३ स्व-भावरूप जो राहे स्वभावें चि अयत्नतः
स्वभावता चि यद्रूप स्वाभाव्यास तया नमो

५२४ राग-द्वेषादि अन्तःस्थ रावणादिक बाह्य हि
वैरी उभय जिंकी जो **जितामित्रास** त्या नमो

५२५ निर्विकार - प्रसन्नत्वें आपुल्या जगतास जो
करी मुदित अत्यन्त तो **प्रमोदन** त्या नमो

५२६ अनित्य क्षोभकृत् सर्व होती विषय ऐन्द्रिय
तद्भिन्न आत्मसुख तें **आनन्दास** तया नमो

५२७ आनन्दरूप जो आहे तो चि आनन्दवी जगा
सुखवी न जगा दुःख **नन्दनास** तया नमो

५२८ ज्ञान वैराग्य आरोग्य धर्म श्री कीर्ति षड् गुण
ह्यांनीं संपन्न जो नांदे तो चि **नन्द** तया नमो

५२९ स्व-भाव चि असे सत्य तन्निष्ठा धर्म बोलिला
स्वभाव-स्थिति ज्याची तो **सत्यधर्मा** तया नमो

५३० देहें प्राणें मनें सत्य आचरी जो निरन्तर
तिन्ही कर्म-पथें वर्ते **त्रिविक्रम** तया नमो

( ५७ )

**महर्षिः कपिलाचार्यः कृतज्ञो मेदिनीपतिः ।**
**त्रिपदस् त्रिदशाध्यक्षो महाशृङ्गः कृतान्तकृत् ॥**

५३१ जेथूनि तत्त्व-संख्यान लोकीं विश्रुत अद्भुत
**महर्षि कपिलाचार्या** नमो मात्रुपदेशका

५३२ कृत क्रिया ती जी होय काया वाचा मनें हि वा
जाणे जो साक्षिरूपानें **कृत-ज्ञास** तया नमो

५३३ संपूर्ण पृथिवीचा या पति कोण असे जगीं
पति अंशलवाचे हे **मेदिनीपति** त्या नमो

५३४ विश्व तैजस नि प्राज्ञ पदें हीं तीन बोलिलीं
तुरीयाचीं चि तीं होत **त्रिपदास** तया नमो

५३५ जाग्रत्-स्वप्न-सुषुप्तींच्या दशा तीन तयांस जो
साक्षिरूपें बघे तो चि **त्रिदशाध्यक्ष** त्या नमो

(आ) भू अन्तरिक्ष आकाश ह्यांच्या ज्या तीस देवता
परमात्मा चि तत्-स्वामी **त्रिदशाध्यक्ष** त्या नमो

५३६ कल्पान्तीं जैं बुडे विश्व एकार्णव-जळीं तदा
तारी मनूस जो मत्स्य **महाशृंग** तया नमो

५३७ कृताचा जो करी अन्त बोलिला तो कृतान्तकृत्
नसे भी अकृतातें ज्या त्या **कृतान्तकृता** नमो

( ५८ )

**महावराहो गोविन्दः सुषेणः कनकाङ्गदी ।**
**गुह्यो गभीरो गहनो गुप्तश् चक्रगदाधरः ॥**

५३८ भू-गोल आणिला जेणें मुसंडीसरसी वरी
त्या अव्यक्तार्णवांतूनि **वराहा** त्या नमो **महान्**

५३९ वेद-वेदान्त-वाक्यांनीं जाणुनी घेइजे जनीं
विन्दते वेत्ति वा गोभिर् **गोविन्दास** तया नमो

५४० दैवीगुणगणांची ती सेना ज्याची सुशोभना
निवटी आसुरी दोषां **सुषेणास** तया नमो

५४१ लेऊनिया नित्य नवीं स्वर्णाचीं बाहु-भूषणें
देऊनि टाकी दीनांतें नमो त्या **कनकाङ्गदी**

५४२ असूनि जो स्फुरद्रूप हृदयीं नाढळे कुणा
प्रकटूनि असे गूढ **गुह्यरूपास** त्या नमो

५४३ असे गभीर अत्यन्त तळ बूड न कांठ ज्या
असे जो नुसता खोल **गभीरास** तया नमो

५४४ सर्वथा वृत जो गुह्य गंभीर अतलस्थल
सर्वेन्द्रियां अनागाह्य **गहनास** तया नमो

५४५ सुरक्षित असे पूर्ण द्वितीय न मुळीं जया
द्वितीयापासुनी भीति तेणें **गुप्त** तया नमो

५४६ स्वयें निर्भय अत्यन्त स्वभक्ता रक्षिण्यास जो
धरी चक्र गदा हातीं नमो **चक्रगदाधरा**

(आ) वैराग्याची गदा ठेंची ज्ञानाचें चक्र तोडितें
मोहाचें मुंडकें पार नमो **चक्रगदा-धरा**

( ५९ )

**वेधाःस्वाङ्गोऽजितः कृष्णो दृढः संकर्षणोऽच्युतः।**
**वरुणो वारुणो वृक्षः पुष्कराक्षो महामनाः ॥**

५४७ वेदस् वेधस् असे एक वेधा तो विश्व जाणतो
जातमात्रास जो जाणे विश्व-वेधा तया नमो

५४८ अंगांगिभाव साहे ना अंग अंगी स्वयें चि जो
असे चन्दनवत् स्वांग **स्वाङ्गरूपास** त्या नमो

५४९ जेतृरूप हि जो आहे तो कसा जित होय बा
जिंकिला हि न जिंके चि **अजितास** तया नमो

५५० वासुदेव असे कृष्ण कृष्ण अर्जुन तत्सखा
कृष्ण तो व्यास तद्रूप **कृष्णरूपास** त्या नमो

५५१ आत्मतत्त्व कदाकालीं अनात्म न बनूं शके
तेणें सुदृढ तो आत्मा **दृढरूपास्** त्या नमो

५५२ अशेष विश्व गिळुनी कल्पान्तीं शेष जो उरे
सृष्टि-संकर्षणें तो चि **संकर्षण** तया नमो

(आ) च्युति स्वरूपापासूनि स्वत्वापासूनि जो तसा
कर्तव्यापासुनी नेणे **अच्युतास** तया नमो

५५३ जेणें आवृत हें विश्व विश्वीं ओत नि प्रोत जो
शील आवरणाचें ज्या **वरुणास** तया नमो

५५४ जाणूनि वरुणा झाला वसिष्ठ ऋषि वारुण
ज्ञानें जो शमला पूर्ण **वारुणास** तया नमो

५५५ वरुणाचा असे वृक्ष विश्व हें, खाय तत्फल
न पूजितां, तया दण्ड **वृक्ष वारुण** त्या नमो

५५६ अक्षि पुष्करवत् ज्याचा नील पाटल पक्ष्मल
विविक्त-दृष्टि विषयीं **पुष्कराक्षास** त्या नमो

५५७ महान् मन असे ज्याचें देहदृष्टि नसे जया
मी माझें न म्हणे कोणा नमो त्या तो **महामना**

( ६० )

**भगवान् भगहाऽऽनन्दी वनमाली हलायुधः ।**
**आदित्यो ज्योतिरादित्यः सहिष्णुर् गतिसत्तमः॥**

५५८ धर्म ज्ञान नि वैराग्य यश श्री आणि ऐश्वर
यांचें सामग्र्य भग तें **भगवन्तास** त्या नमो

५५९ देह देहानुगत जें तारुण्य धन राज्य वा
भाग्यजात अनात्मश्री संहरी **भगहा** नमो

५६० भाग्यजात फुलो वाळो हर्ष-शोक नसे मुळीं
स्वानन्दें नित्यसंतृप्त **आनन्दी** तो तया नमो

५६१ ग्राम्य जीवन सांडूनि वनमाली रमे वनीं
वृत्ति आरण्यकी स्वैर **वनमालीस** त्या नमो

५६२ घेऊनि हल तो झुंजे जिंकी भूमीस भूप तो
कृषि-कर्में प्रजा पाळी **हलायुध** नमो तया

५६३ अदितीचा असे पुत्र विष्णु वामनरूप जो
पादाक्रांत करी विश्व **आदित्यास** तया नमो

५६४ आदित्य दुसरा एक ज्योतीरूप पराक्रमी
तमो-विश्वास जो जिंकी **ज्योतिरादित्य** त्या नमो

५६५ करी सहन जो सर्व अप्रतीकारपूर्वक
साहूनि जिरवी सर्वां **सहिष्णूस** तया नमो

५६६ गति उच्चावच जगीं स्वर्गादिक कितीक त्या
अपवर्ग तयांमध्यें **गति-सत्तम** त्या नमो

( ६१ )

**सुधन्वा खण्डपरशुर् दारुणो द्रविणप्रदः ।**
**दिविस्पृक् सर्वदृग्व्यासो वाचस्पतिरयोनिजः ॥**

५६७ धनु प्रणव तो ज्याचें शर एकाग्र चित्त तें
वेधी जो ब्रह्मलक्ष्यास **सुधन्वा** तो तया नमो

५६८ अखण्ड-योग- परशु ज्याचा चाले सहस्रशः
शाखा मनाचिया खांडी **खण्डत्-परशूस** त्या नमो

(आ) घेऊनि खण्ड परशु खांडी वन सहस्रशः
करी वसति आर्यांची **खण्डत्-परशूस** त्या नमो

५६९ अविद्या-मूढ सक्तास भूत-द्रोह्यास दारुण
भोगवी यातना-भोग **दारुणास** तया नमो

५७० आत्म-ज्ञानें अनासक्त अनादान अकिंचन
तृप्ति-द्रविण त्यां देई नमो त्या **द्रविण-प्रदा**

५७१ लोक जो अपवर्गाख्य सर्वोपरि विराजित
स्पर्शूनि जाय जो त्यास **दिविस्पृक्** तो तया नमो

५७२ वेदोपनिषदें सूत्रें पुराणें स्मृति भारत
सर्वत्र दृष्टि ती ज्याची **सर्वदृक्** तो तया नमो

(आ) समस्त वेद तो जाणे जाणे जो लोक-तत्त्व हि
विस्तरूनि जनां सांगे **व्यासरूपास** त्या नमो

५७३ सर्व क्रियांचा रस वाक् वाचेचा रस मौन तें
तें चि वाचस्पति असे नमो **वाचस्पतीस** त्या

(आ) शब्द वाङ्मय ते होत वाक् प्राणमय ती असे
प्राण कायाग्निमय ते तो **अयोनिज** त्या नमो

( ६२ )

**त्रिसामा सामगः साम निर्वाणं भेषजं भिषक् ।**
**संन्यासकृत् शमः शान्तो निष्ठा शान्तिः परायणम् ।।**

५७४ ऱ्हस्वाऱ्हस्वबृहत् सामें, मन्द्र मध्यम तार वा
स्वरीं, जो गाइला जाय **त्रिसामा** तो तया नमो

५७५ निर्दोष सम जो झाला जो तदर्थ करी तप
जो त्यास आदरें गाय तो **सामग** तया नमो

५७६ वेद तीन जगीं मान्य गद्य पद्य नि गेय कीं
तेथ जें गेय तें साम **सामरूपास** त्या नमो

५७७ आधिभूत नि आध्यात्म ताप जो आधिदैव हि
निवाला जेथ बुडुनी **निर्वाणास** तया नमो

५७८ भव-रोग हरे जेणें ज्ञानोपास्तिक्रियात्मकें
योगें भेषज तो योग **भेषजास** तया नमो

५७९ भव-रोग निवाराया चिकित्सा जो करी सदा
समर्पी स्वास्थ्य संपूर्ण **भिषगास** तया नमो

५८० देहवन्तास नैष्कर्म्य कर्मयोगें चि बोलिलें
विदेहा कर्मसंन्यास नमो **संन्यासकृत्** तया

५८१ कांहीं न करणें हा चि शमधर्म अनुत्तम
संन्यासिधर्म तो थोर **शमरूपास** त्या नमो

५८२ नानात्व हरिलें ज्याचें बोधें एकत्व फांकलें
कर्तव्य नुरलें कांहीं झाला **शान्त** तया नमो

५८३ निष्ठा ती जेथ जीवाची इतिकर्तव्यता असे
जेथ ती साधना संपे **निष्ठारूपास** त्या नमो

५८४ ज्ञानें अज्ञान निरसे तेणें मोह नि शोक तो
उरे स्वात्मस्थ ती शान्ति **शान्तिरूपास** त्या नमो

५८५ शान्ताकार असे जें तें विष्णूचें पद अन्तिम
ज्याच्या पैल नसे कांहीं तें **परायण** त्या नमो

( ६३ )

**शुभाङ्गः शान्तिदः स्रष्टा कुमुदः कुवलेशयः।**
**गोहितो गोपतिर् गोप्ता वृषभाक्षो वृषप्रियः।।**

५८६ सर्वावयव ते ज्याचे निर्मलोज्ज्वल-सुन्दर
निर्दोष सर्व-गुण जो तो **शुभाङ्ग** तया नमो

५८७ सर्व ताप निवारूनि परमाह्लाद अन्तरीं
भरी जो सच्चिदानन्द तो **शान्तिद** तया नमो

५८८ रची अनन्त ब्रह्माण्डें त्यांत जीव असंख्य चि
कर्मे आणि फलें त्यांचीं सृजी **स्रष्टा** तया नमो

५८९ कु पृथ्वी जो तिच्या ठाईं आपुलें तेज पेरुनी
मोदवी तिजला सस्यें **कुमुदास** तया नमो

५९० मातीचा पिण्ड हा देह तिथें शयन जो करी
कुवलेशय तो देही नमो त्या **कुवलेशया**

५९१ वेद प्रवृत्त यज्ञार्थ यज्ञ संभृत गोधनें
गोधना हित जो होय तो **गोहित** तया नमो

५९२ गो वेदवाणी गो पृथ्वी गो धेनु नि दीन गो
पाळी जो त्या समस्तांतें तो **गोपति** तया नमो

५९३ धर्मसंगोपनें होय प्रजारक्षण सर्वथा
धर्म-गोप्ता चि तो तेणें होय **गोप्ता** तया नमो

५९४ वृषभासम ते ज्याचे डोळे काळे टपोर हि
पाणीदार दयावर्षी **वृषभाक्षास** त्या नमो

५९५ प्रजांवरी करी वृष्टि सुखाची जो निरन्तर
वृष तो धर्म प्रिय ज्या तो **वृषप्रिय** त्या नमो

(आ) दम सत्य दया दान धर्म जो हा चतुष्पद
करी वृष्टि सुखाची तो तेंणें तो वृष बोलिला

( ६४ )

**अनिवर्ती निवृत्तात्मा संक्षेप्ता क्षेमकृत् शिव:।**
**श्रीवत्सवक्षा: श्रीवास: श्रीपति: श्रीमतां वर:॥**

५९६ स्वरूपापासुनी नैज न निवर्ते चि जो कधीं
अनिवर्ती रणीं जो वा **अनिवर्तीस** त्या नमो

५९७ निवृत्त बुद्धि ती ज्याची अनात्म्यापासुनी सदा
स्वरूपस्थित जो नित्य **निवृत्तात्म्यास** त्या नमो

५९८ भेदास छेद देऊनि उरे संक्षिप्त एक जो
संक्षेप्ता भेदमात्रा तो **संक्षेप्त्यास** तया नमो

५९९ इष्ट संपादणें योग त्याचें रक्षण क्षेम तें
अनिष्ट परिहारें चि **क्षेमकृत्** तो तया नमो

६०० दु:खरूप अनित्यात्म असे अशिव हें जड
तद्भिन्न सच्चिदानन्द **शिवरूपास** त्या नमो

६०१ चिह्न श्रीवत्स मिरवी जो वक्षावर आपुल्या
भगवान् विष्णु **श्रीवत्स-वक्षा** होय तया नमो

६०२ श्री वसे ज्याचिया ठाईं तो चि श्रीवास बोलिला
भगवान चि श्रीवास **श्रीवासास** तया नमो

६०३ श्री स्वयं वरिती झाली नि:स्पृहा पुरुषोत्तमा
ज्ञान-वैराग्य-भाक् तो चि होय **श्रीपति** त्या नमो

६०४ गुणानुरक्त श्री ज्यांस वरी श्रीमंत ते खरे
त्यांत नि:स्पृह सर्वोच्च **श्रीमतांवर** त्या नमो

( ६५ )

**श्रीद: श्रीश: श्रीनिवास: श्रीनिधि: श्रीविभावन:।**
**श्रीधर: श्रीकर: श्रेय: श्रीमाँल्लोकत्रयाश्रय:॥**

६०५ मोक्षश्री दे स्वभक्तांस जे निष्काम अनन्यभाक्
सानुकंप सकामा हि दे श्री **श्रीदा** तया नमो

६०६ जगीं सकाम सारे चि दास श्रीचे; अकाम जो
श्रीचा तो चि असे ईश नमो **श्रीशास** त्या सदा

६०७ श्रीचा निवास जो होय बोलिला श्रीनिवास तो
आत्माश्रयें वसे ती श्री **श्रीनिवासा** तया नमो

६०८ वल्ली निहित ती कंदीं श्री ठाईं ज्याचिया तशी
सर्वदा होय निहित **श्रीनिधीस** तया नमो

६०९ आत्मश्री जो करी व्यक्त नानारूपें स्वभावत:
श्रीविभावन तो होय नमो त्या **श्रीविभावना**

६१० जियें जियें श्री विलसे ती ती ज्याची विभूति चि
श्री-वैभवें जो नटला **श्रीधरास** तया नमो

६११ अस्तित्वें आपुल्या लोकीं जो करी श्री विभूषित
वस्तुजातास सर्वत्र तो **श्रीकर** तया नमो

६१२ श्रेय जें सर्व जीवांचें जीव-सर्वस्व जें असे
आत्म-स्वरूप तें श्रेष्ठ **श्रेयरूपास** त्या नमो

६१३ जो एक चि असे सत्य ज्याच्या सत्ते जगत्-स्थिति
स्वामी संपत्तिजाताचा **श्रीमन्तास** तया नमो

६१४ भू अन्तरिक्ष आकाश तिन्ही लोक यदाश्रयें
वर्तती सकलाधारा नमो **लोकत्रयाश्रया**

( ६६ )

**स्वक्ष: स्वङ्ग: शतानन्दो नन्दिर् ज्योतिर्गणेश्वर:।**
**विजितात्मा विधेयात्मा सत्कीर्तिश् छिन्नसंशय:।।**

६१५ तत्त्व-दर्शन-नैपुण्य वसे संपूर्ण ज्यांत, तो
अक्षि ज्याचा असे सुष्ठु तोचि **स्वक्ष** तया नमो

६१६ सर्वोत्तमाङ्ग तो अक्षि अङ्गें अन्य हि त्या सवें
ज्याचीं निपुण अव्यङ्ग तो चि **स्वङ्ग** तया नमो

६१७ समग्रतेचा संकेत शत-संख्या करीतसे
ज्याचा आनन्द अन्यून तो **शतानन्द** त्या नमो

६१८ स्वानन्दें नन्दतो नन्दि बाह्यापेक्षा नसे मुळीं
ज्याचा स्वभाव आनन्द तो चि **नन्दि** तया नमो

६१९ ग्रह नक्षत्र तारा हा ज्योतिर्गण असंख्य चि
नियन्ता ध्रुवरूपें त्या नमो **ज्योतिर्गणेश्वरा**

६२० देहेन्द्रियमनोबुद्धि ह्यांना जिंकूनि राबवी
स्वायत्तभावें स्वहितीं **विजितात्म्यास** त्या नमो

६२१ विजितात्मा चि आज्ञापूं शके आत्म्यास आपुल्या
विधेयात्मा तया नांव **विधेयात्म्यास** त्या नमो

-(आ) चित्तेन्द्रियां जो आज्ञापी न तीं चित्तेन्द्रियें जया
अविधेयस्वरूपा त्या **अविधेयात्मया** नमो

६२२ सन्मात्र तो असे तेणें लोकीं सत्-कीर्ति बोलिला
कीर्ति लोकीं असे सत्य **सत्-कीर्तीस** तया नमो

६२३ जाणे जो लोकतत्त्वातें हस्त-स्फटिकगोलवत्
नुरे संशय, तो होय **छिन्न-संशय** त्या नमो

( ६७ )

**उदीर्ण: सर्वतश्चक्षुर् अनीश: शाश्वतस्थिर:।**
**भूशयो भूषणो भूतिर् विशोक: शोकनाशन:।।**

६२४ सर्वातिरिक्त सामर्थ्यें कीं गुणातीत तो असे
तेणें उदीर्ण तो होय **उदीर्णास** तया नमो

६२५ पुढें मागें वरीं खालीं कडे आंत नि बाहिर
पाहे सर्वत्र साक्षित्वें **सर्वतश्चक्षु** त्या नमो

६२६ ईशिती ईश ते होती ईशित्वें बद्ध आपुल्या
ईशितव्य न आत्मत्वें तो **अनीश** तया नमो

६२७ नित्यत्वें कालधर्मास न पावे विक्रियेस वा
अजरामर कूटस्थ नमो त्या **शाश्वत-स्थिरा**

६२८ ब्रह्मचारी वनी भिक्षु गृहस्थ हि व्रतस्थ तो
पर्यंकीं न करी शय्या **भूशयास** तया नमो

६२९ भूषवी जो जडातें ह्या ज्याविना देह हा मढें
वस्त्रालंकार-देहादि- **भूषणास** तया नमो

६३० जन्मणें वंश -विस्तार करणें धन-संग्रह
भूति ही बोलिली सर्व **भूतिरूपास** त्या नमो

६३१ आपुलें जें असे साचें हानि त्याची न संभवे
नुरे शोका मुळीं हेतु **विशोकास** तया नमो

६३२ आत्मज्ञानें मोहनाश मोहनाशें विशोकता
शोकनाशन तो तेणें नमो त्या **शोकनाशना**

( ६८ )

**अर्चिष्मान् अर्चित: कुम्भो विशुद्धात्मा विशोधन:।**
**अनिरुद्धो ऽप्रतिरथ: प्रद्युम्नो ऽमितविक्रम:।।**

६३३ यत्-तेजें पेटल्या ज्योति चन्द्रसूर्याग्निरूप ह्या
चिदात्मा जो प्रकाशी हें **अर्चिष्मान्** तो तया नमो

६३४ सूर्यें ओवाळिलें ज्यास पूजिलें तारका-सुमीं
वाहिलें चन्द्रफळ ज्या **अर्चितास** तया नमो

६३५ जलबिन्दु जसे कुम्भीं विश्व कुक्षींत ज्याचिया
असे सामावलें पूर्ण पूर्ण **कुम्भास** त्या नमो

६३६ गुणसङ्ग नसे ज्यास जो गुणातीत सर्वथा
तो निर्गुण विशुद्धात्मा **विशुद्धात्म्यास** त्या नमो

६३७ विशुद्धि आपुली देई जीवभाव धुऊनिया
तो विशोधन चिद्रूप नमो त्यातें **विशोधना**

६३८ निरोध इन्द्रियांचा तो चित्ताचा हि प्रयत्नतः
होऊं शके, न आत्म्याचा **अनिरुद्धास** त्या नमो

६३९ नसे ज्यातें प्रतिरथ तो अप्रतिरथ प्रभु
युद्धीं प्रतिरथी नेणें त्या **अप्रतिरथा** नमो

६४० प्रकृष्ट द्युम्न तें ज्याचें तो प्रद्युम्न महौजस
रूप-वित्त-बलोद्दाम **प्रद्युम्नास** तया नमो

६४१ विक्रमा मिति ना ज्याच्या रूपें वित्तें बलें श्रुतें
असे सर्वातिशायी त्या नमो **अमित-विक्रमा**

(i) संकर्षण वासुदेव प्रद्युम्न अनिरुद्ध हे
चतुर्व्यूह महासत्त्व न ह्यां अधिक तुल्य वा

(ii) परेशाचे चतुर्भाव सारे अमित-विक्रम
सारे चि अप्रतिरथ हीं तों नित्यविशेषणें

(iii) चतुर्व्यूहा नमो देवा नमो अमित-विक्रमा
नमो त्या अप्रतिरथा नमो नित्यविशेषणा

( ६९ )

**कालनेमिनिहा वीरः शौरिः शूरजनेश्वरः।**
**त्रिलोकात्मा त्रिलोकेशः केशवः केशिहा हरिः॥**

६४२ व्यक्तमात्रास आटोपी काळाची नेमि सर्वथा
काल-नेमीस त्या तोडी **कालनेमि-निहा** नमो

-(आ) विश्वद्रोही देवशत्रु कालनेमि महासुर
त्यास जो निवटी युद्धीं **कालनेमि-निहा** नमो

६४३ वीर तो जो न भी कोणा न दावी पाठ जो रणीं
न डगे चि कधीं वीर **वीररूपास** त्या नमो

६४४ शूरवंशांत तो झाला तेणें तो शौरि बोलिला
शूर भक्त-कुळीं नांदे भगवान् **शौरि** त्या नमो

६४५ शास्ता जनपदाचा जो शूर नामक आणि ज्या
भजती शूर त्या देवा नमो **शूरजनेश्वरा**

६४६ अरूपा रूप तें कोण? रूप लोक समस्त हे
म्हणूनि परमात्मा तो **त्रिलोकात्मा** तया नमो

६४७ ईश तो सर्व लोकांचा अधमोत्तम-मध्यम
म्हणूनि परमात्मा तो **त्रिलोकेश** त्या नमो

६४८ काळे नि कुरळे ज्याचे केश लांब नि दाट हि
मृदु स्निग्ध सुगंधी हि **केशवास** तया नमो

६४९ भरूनि अंग ते केस राठ दाट नि आखुड
मारी त्या केशि-दैत्यास **केशिहास** तया नमो

६५० हरी अविद्या तज्-जन्य दोष मोह नि शोक जो
पाप ताप हरी भीति नमो **भव-हरीस** त्या

( ७० )

**कामदेवः कामपालः कामी कान्तः कृतागमः।**
**अनिर्देश्यवपुर् विष्णुर् वीरो ऽनन्तो धनंजयः॥**

६५१ जीवमात्रांत सृष्टीच्या वृद्धीस्तव व्यवस्थित
हेतु जो मिथुनीभावा **कामदेवास** त्या नमो

६५२ पुरवी काम कामींचा देउनी प्रतिसाद त्या
कामपूर्ति करी काम्यें **कामपालास** त्या नमो

६५३ पुरुषार्थ-चतुष्कांत काम मौलिक एक तो
तद्भाव त्यास जो देई **कामी** तो मान्य त्या नमो

६५४ रूपें रमवितो नेत्रा मना मोही स्व-पौरुषें
कमनीय स्त्रियेतें जो प्रिय तो **कान्त** त्या नमो

६५५ जेणें संस्कारिला आत्मा ब्रह्मचर्यें अखंडित
स्वाध्यायें नि तपें पूत **कृतागम** तया नमो

६५६ गुण कर्म नाम ना रूप दाखवूं ये इदंतया
त्या अव्यक्ता अनिर्देश्या **अनिर्देश्य-वपू** नमो

६५७ विश्वीं शिरूनि जो राहे आंत बाहेर व्यापुनी
विश्वातिरिक्त निःसीम **विष्णुरूपास** त्या नमो

६५८ जो षड्वैऱ्यांस वधुनी होय निर्वैर वीर तो
षड्वैरिवैर सांडीना नमो **वीरास** त्या सदा

६५९ देशतः कालतः अन्त वस्तुतः हि नसे जया
तो अनन्त महान् आत्मा **अनन्तास** तया नमो

६६० हरवी आपणातें जें धन तें निधन बोलिलें
जेणें तरे तया जिंकी धनंजय तया नमो

( ७१ )

**ब्रह्मण्यो ब्रह्मकृद् ब्रह्मा ब्रह्म ब्रह्मविवर्धन:।**
**ब्रह्मविद् ब्राह्मणो ब्रह्मी ब्रह्मज्ञो ब्राह्मणप्रिय:॥**

६६१ वेद, वेदार्थ तप जें, जें कीं वेदार्थ-जीवन
उपासना करी त्यांची तो **ब्रह्मण्य** तया नमो

६६२ ब्रह्माचें जो रची स्तोत्र लक्षुनी ब्रह्म जीवनीं
प्रतिभावंत ब्रह्मर्षि **ब्रह्मकृत्** तो तया नमो

६६३ चतुर्मुखें चतुर्वाणी वेदाची वदला, तथा
चतुर्दिक् रचिली सृष्टि ब्रह्मा तो **ब्रह्मया** नमो

६६४ ब्रह्मचर्य असे ब्रह्म प्रकटे ब्रह्म तें जिथें
ब्रह्मार्थ व्रत तें ब्रह्म व्रत-ब्रह्मास त्या नमो

६६५ ब्रह्मचर्यासवें वाढे ब्रह्मवर्चस आपुलें
वाढवी ब्रह्मधन त्या नमो **ब्रह्मविवर्धना**

६६६ संहिता पद जो साड्ग जाणे अर्थ रहस्य हि
विनियोग यज्ञकर्मांत **ब्रह्मविद्** तो तया नमो

६६७ निष्णात शब्द-ब्रह्मीं जो पर-ब्रह्मीं हि होतसे
तदा ब्राह्मण तो होय **ब्राह्मणास** तया नमो

६६८ नसो निष्णात तो शब्दीं पर ब्रह्मीं नसो गति
ब्रह्मग्रंथीं असे आस्था **ब्रह्मी** तो द्विज त्या नमो

६६९ नेणे ग्रंथ न वा पंथ ब्रह्मनिष्ठ असे स्वत:
तो ब्रह्मनिष्ठ ब्रह्मज्ञ **ब्रह्मज्ञास** तया नमो

६७० प्रिय ब्राह्मण ते ज्यास ब्राह्मणा प्रिय जो असे
ब्राह्मण-प्रिय तो होय नमो त्या **ब्राह्मण-प्रिया**

( ७२ )

**महाक्रमो महाकर्मा महातेजा महोरग:।**
**महाक्रतुर् महायज्वा महायज्ञो महाहवि:॥**

६७१ जेणें एकें पद-क्षेपें व्यापिली सर्व ही धरा
द्वितीयें अन्तरिक्षातें तो **महाक्रम** त्या नमो

६७२ सर्वाश्चर्यास्पद असें विश्व जेणें विनिर्मिलें
परेश विश्वकर्मा तो **महाकर्मा** तया नमो

६७३ ज्या विलक्षण तेजाचे चंद्रसूर्य स्फुलिंग हे
सर्वादि तो बृहद्भानु **महातेजा** तया नमो

६७४ आदि अन्त न तो ज्यास सर्पतो जो अगोचर
गिळिलें विश्व हें जेणें तो **महोरग** त्या नमो

६७५ विश्वसृष्टि असे ज्याचें फल, संकल्प तो महान्
करी जो सृष्टि-प्रारंभीं तो **महाक्रतु** त्या नमो

६७६ सृष्टिरूप महायज्ञ जेणें आरंभिला असे
संपादी गति नाना, तो **महायज्वा** तया नमो

६७७ क्रियामात्र चि तें ज्याचें सदा यजन चाललें
तो महायज्ञ-पुरुष **महायज्ञास** त्या नमो

६७८ पाहणें ऐकणें खाणें निजणें श्वसणें हि वा
सर्व भोग असे ज्याचा तो **महाहवि** त्या नमो

( ७३ )

**स्तव्य: स्तवप्रिय: स्तोत्रं स्तुति: स्तोता रणप्रिय:।**
**पूर्ण: पूरयिता पुण्य: पुण्यकीर्तिर् अनामय: ॥**

६७९ जो एकमात्र स्तुत्यर्ह स्तविती ज्या नवे जुने
आज काल उद्यां नित्य **स्तव्यरूपास** त्या नमो

६८० आवडे स्तव त्या फार कीं तो सत्यानुरूप चि
निर्दोष नि गुणागार **स्तवप्रिय** तया नमो

६८१ स्तोत्र जें तें हि तो अंगें कीं तें गुणकथात्मक
धर्म-धर्मी नसे भिन्न **स्तोत्ररूपास** त्या नमो

६८२ स्तुति क्रिया हि तो होय स्तव्यत्वें तो चि कारण
अयस्कान्त अया प्रेरी **स्तुतिरूपास** त्या नमो

६८३ पूर्वरूप असे स्तोता स्तव्य उत्तररूप तो
क्रिया करण सामग्री तो चि स्तोत्यास त्या नमो

६८४ नरवीर असे स्तव्य रणाची आवडी जया
सत्-पक्ष घेऊनी झुंजे रणप्रिय तया नमो

६८५ परमात्मा असे पूर्ण न्यून तेथ नसे मुळीं
निर्दोष नि गुणोदार पूर्णरूपास त्या नमो

६८६ नसे केवळ तो पूर्ण दे अपूर्णास पूर्णता
नामोच्चारें पूरयिता नमो पूरयित्यास त्या

६८७ नामोच्चारें अघ हरी स्मरणें पुण्य-संपदा
तेणें तो बोलिला पुण्य पुण्यरूपास त्या नमो

६८८ ज्याचें कीर्तन तें पुण्य बोलिला पुण्य-कीर्ति तो
नामोच्चारें करी पूत पुण्य-कीर्तीस त्या नमो

६८९ आमें हा घडिला देह तेणें देह चि आमय
न ज्या देह न तद्धेतु तो अनामय त्या नमो

( ७४ )

मनोजवस् तीर्थकरो वसुरेता वसुप्रदः ।
वसुप्रदो वासुदेवो वसुर् वसुमना हविः ॥

६९० मनाच्यासारखा वेग जयाचा अतिशायन
जो सर्वगत आधीं चि तो मनोजव त्या नमो

६९१ उत्तराया भवनदी स्वभक्ता सेतुरूप जो
योगेश तीर्थकर तो नमो तीर्थकरा तया

६९२ वसु जीव असे रेत चिह्न ज्याचें परेश तो
वसुरेता बोलिलासे वसुरेत्यास त्या नमो

६९३ जेणें जीव दिला दान प्राणिमात्रास प्रेष्ठ जो
न दिलें काय तें तेणें तो वसुप्रद त्या नमो

६९४ भुकेला जीव ज्यासाठीं वसु दे मोक्षरूप हि
भक्त-वत्सल तो दाता वसुप्रद तया नमो

६९५ वसुदानी वासुदेव वसुदेवात्मसंभव
देव सर्वत्र वसला वासुदेवास त्या नमो

६९६ जीव वित्त नि मोक्षाख्य फल तें वसु बोलिलें
तें जो असे स्वरूपें चि वसुरूपास त्या नमो

६९७ जिथें वित्त तिथें चित्त जीवाचें हें स्वभावतः
तेणें वसु-मना होय नमो वसुमना तया

६९८ यज्ञीं तो हव्यवाट् होता आणि ती हवन-क्रिया
हव्याधीन असें तेणें हवि मुख्य तया नमो

( ७५ )

सद्गतिः सत्कृतिः सत्ता सद्भूतिः सत्-परायणः
शूरसेनो यदुश्रेष्ठः सन्-निवासः सुयामुनः ॥

६९९ यथा मति तथा कर्म यथा कर्म तथा मति
अन्ते मति गति तथा सद्गतीस तया नमो

७०० सन्मतीतें अनुसरे सत्क्रिया तेथवां चि ती
स्थिरावे जीवनीं सत्ता सत्कृतीस तया नमो

७०१ सत्ता त्याची चि ती चाले जो सत् सर्वात्मना असे
सत्-शरीर चिदात्मा हा नमो सत्ता-स्वरूपिणे

७०२ सन्मात्र भूति ती ज्याची तो चि सद्भूति बोलिला
असत् अवदशामात्र सद्भूतीस तया नमो

७०३ लक्ष्य सत्, मार्ग सत्याचा, मनो-वाक्-कर्म तत्पर
सत्-परायण तो होय नमो त्या सत्परायणा

७०४ शूर सेना असे ज्याची बोलिला शूरसेन तो
शूरसेन-प्रदेशीय शूरसेनास त्या नमो

७०५ यदूंत जो असे श्रेष्ठ देवकी-वसुदेव-ज
धर्मगोप्ता धर्मवक्ता यदुश्रेष्ठास त्या नमो

७०६ सत्यार्थ जगती सत्यें लोकीं सद्गत होत जे
वसे त्यांत नि ते ज्यांत सन्-निवासास त्या नमो

७०७ यमुना-लाल जो झाला मर्दिला कंस- कालिया
मातेचे फेडिले पांग सुयामुन तया नमो

( ७६ )

भूतावासो वासुदेवः सर्वासु-निलयो ऽनलः।
दर्पहा दर्पदो दृप्तो दुर्धरो ऽथापराजितः।।

७०८ वसती सर्व हीं भूतें ज्यांत तोय- तरंग- वत्
तो भूतावास सर्वात्मा भूतावासास त्या नमो
७०९ भूतें तीं वसती त्यांत वसे तो हि तयांमधें
तेणें तो वासुदेवाख्य वासुदेवास त्या नमो
७१० प्राण्यांचे प्राण ते जाती विरुनी जेथ त्या महान्
आकाशकल्प अव्यक्ता सर्वासु-निलया नमो
७११ जें जें ये भक्षितो तें तें न म्हणे चि अलं पुरें
अनलासम विश्वात्ता अनलास तया नमो
७१२ अधर्म-मार्गी उद्दाम कंसादि बल-दर्प जो
वाहती तो करी चूर्ण दर्प-हास तया नमो
७१३ विनाशाकारणें देई असुरां बल-दर्प जो
स्वभक्तां दे दम दया दर्पदास तया नमो
७१४ सद्बलें तो असे दृप्त असता न जुमानितो
जिह्मा क्षयो जयो सत्या तेणें दृप्त तया नमो
७१५ देहवंतास अव्यक्त नाकळे नाकळे सुखें
तेणें दुर्धर तो होय दुर्धरास तया नमो
७१६ स्वरूपस्थित जो नित्य जो स्वधर्मस्थ सर्वदा
स्वमर्यादा न जो सोडी अपराजित त्या नमो

( ७७ )

विश्वमूर्तिर् महामूर्तिर् दीप्तमूर्तिर् अमूर्तिमान् ।
अनेकमूर्तिर् अव्यक्तः शतमूर्तिः शताननः ।।

७१७ असे विश्व चि यन्मूर्ति बोलिला विश्वमूर्ति तो
पदोपदीं तया भेटी विश्वमूर्तीस त्या नमो
७१८ आकाशाहूनि तो वाड जाड पृथ्वीहुनी असे
सर्वथा अपरिच्छिन्न महामूर्तीस त्या नमो
७१९ शोधावें न लगे त्यास सूर्य-सोमाग्नि-दीप्त तो
सारा प्रकाश त्याचा चि दीप्त-मूर्तीस त्या नमो
७२० वस्तुतः परमात्मा तो अतीन्द्रिय अचिन्त्य चि
आकार वर्ण गुण ना नमो त्या जो अमूर्तिमान्
७२१ असर्वज्ञ अतत्त्वज्ञ मूर्ति एक चि मानुनी
न्यूनत्व आणिती देवा नमो अन्-एकमूर्ति त्या
७२२ न देवा एक तें रूप न अनेक न वा शत
व्यक्तिबद्ध न तो होय अव्यक्तास तया नमो
७२३ रूपें सर्व चि रूपीचीं शतशो ऽथ सहस्रशः
अव्यक्त-संज्ञकाचीं हीं शतमूर्तीस त्या नमो
७२४ वक्त्रें तीं शेंकडों ज्याचीं वाणी जो शेंकडों वदे
शतानन असे तेणें नमो देवा शतानना

( ७८ )

एको नैकः सवः कः किं यत्तत्पदमनुत्तमम् ।
लोकबन्धुर् लोकनाथो माधवो भक्तवत्सलः ।।

७२५ एक तो चि असे विश्वीं विश्वात्मा कारणात्मना
अद्वितीय चि कीं तेणें बोलिला एक त्या नमो
७२६ कार्यरूपें परी तो चि अनेक हि असे प्रभु
वृक्ष-शाखान्यायतः हि नैकरूपास त्या तया नमो
७२७ सोम तो गाळिती ज्यांत यज्ञ तो सव बोलिला
जेथ आनन्द-निष्यन्द सवरूपास त्या नमो
७२८ कोण कर्ता असे विश्वा ? ह्याचें उत्तर कोण चि
जिज्ञास्य चि सदा राहे 'कोण' रूपास त्या नमो
७२९ उपादान तया काय ? ह्याचें उत्तर काय चि
जिज्ञास्य चि सदा राहे 'काय' रूपास त्या नमो
७३० जें असे मूळ विश्वाचें जें विश्वाधार बोलिलें
जें विश्वा संहरीं अन्तीं 'जें' रूपास तया नमो

७३१ उल्लेखिजे जें संबन्धें तें चि यद्-रूप त्या नमो
पारोक्ष्यें जें दर्शविजे तें चि **तद्रूप** त्या नमो

७३२ असे चरम जें तें चि बोलिजेतें अनुत्तम
तें चि सर्वोत्तम तया **अनुत्तम पदा** नमो

७३३ निर्विशेष समस्तास अनुकूल असे सदा
चराचर-सुहृत् तो चि **लोक-बन्धु** तया नमो

७३४ चन्द्रवत् सुखवी बन्धु नियमी नाथ सूर्यवत्
तो लोकबन्धु तो नाथ **लोकनाथास** त्या नमो

७३५ गुरु जो मधुविद्येचा मायेचा पति माधव
मधुकंद सर्व जीवांचा **माधवास** तया नमो

७३६ लोक-बन्धु असे देव परी तो भक्त-वत्सल
भक्त-कार्य करी अंगें नमो त्या **भक्त-वत्सला**

( ७९ )

**सुवर्णवर्णो हेमाङ्गो वराङ्गश् चन्दनाङ्गदी।**
**वीरहा विषमः शून्यो घृताशीर् अचलश् चलः॥**

७३७ देहकान्ति घनश्याम अन्तरीं स्वर्णवर्ण तो
स्वर्णासिवत् कृष्णकोशीं **स्वर्णवर्णास** त्या नमो

७३८ सर्वधातुमयाचें त्या हेम हें अंग एक चि
हेमालंकार अंगांगीं **हेमांगास** तया नमो

७३९ देहावयव ते ज्याचे असती क्षम सुन्दर
वरांग बोलिला तो चि **वरांगास** तया नमो

७४० चन्दनें चर्चिले बाहु ज्याचे केयूर-मण्डित
तो चन्दनाङ्गदी देव नमो त्या **चन्दनाङ्गदी**

७४१ करिती वैर ते वीर कामक्रोधादि आन्तर,
बाह्य कंसादि; त्यां मारी, **वीर-हा** तो तया नमो

७४२ जो अद्वय स्वभावें चि द्वैत साहील तो कसा
नसे सम तया कोणी **विषमास** तया नमो

७४३ अनात्मत्वें असे शून्य तेणें तो शून्य बोलिला
शून्य सर्व-विशेषें जो **शून्यरूपास** त्या नमो

७४४ आशा विघरल्या ज्याच्या अपेक्षा याचना तशा
वीततृष्ण घृताशी तो **घृताशीस** तया नमो

७४५ कामनेनें चळे जीव आपुल्या पूर्णतेहुनी
अ-कामहत जो तो चि असे **अचल** त्या नमो

७४६ स्वरूपीं कल्पुनी न्यून जीव जैं कामना करी
स्वरूप-च्युत तो तेव्हां बोलिला **चल** त्या नमो

( ८० )

**अमानी मानदो मान्यो लोकस्वामी त्रिलोकधृक्।**
**सुमेधा मेधजो धन्यः सत्यमेधा धराधरः॥**

७४७ देहाभिमान ज्या नाहीं 'मी कुलीन धनी गुणी'
अनात्मश्री-विरक्तास **अमानीस** तया नमो

७४८ आपणा न मनी कांहीं आत्मरूप मनी जग
दानं-मानें जगा पूजी **मानदास** तया नमो

७४९ देहाभिमान पशुवत् धरुनी वैर ना करी
आत्म-संमान तो पावे **सर्व-मान्यास** त्या नमो

७५० चतुर्दश हि लोकांचा कर्ता हर्ता नि पालक
परेश लोक-स्वामी तो **लोकस्वामीस** त्या नमो

७५१ भू अन्तरिक्ष आकाश देव गन्धर्व मानुष
यांच्या लोकांस धरितो नमो त्या तो **त्रिलोकधृक्**

७५२ अनर्थीं अर्थ आरोपी न वा अर्थी अनर्थ तो
सम्यग् बुद्धि अशी ज्याची **सुमेधा** तो तया नमो

७५३ देहात्मबुद्धि होमूनि अहंता ममता गळे
तदा तो जो उरे भाव **मेधजास** तया नमो

७५४ कृतार्थ जो असे झाला बोलिला धन्य तो जगीं
कृतार्थ आत्मलाभानें झाला तो **धन्य** त्या नमो

७५५ देहात्मबुद्धि ती खोटी आत्मबुद्धि चि ती खरी
आत्मबुद्धि जया होय **सत्यमेधास** त्या नमो

७५६ जिनें हें धरिले जीव त्या धरे जो धरी प्रभु
सत्तेनें आपुल्या वृत्तीं **धराधर** त्या नमो

( ८१ )

**तेजोवृषो द्युतिधरः सर्वशस्त्रभृतां वरः।**
**प्रग्रहो निग्रहो व्यग्रो नैकशृङ्गो गदाग्रजः॥**

७५७ जो तेजोमेघ तेजाची विश्वीं वृष्टि करी सदा
आकाश-गंगा ज्यांतूनि तो **तेजोवृष** त्या नमो

७५८ खद्योतापासुनी अग्नि-विद्युत्-सूर्यादिकांत जी
आढळे द्युति ती ज्याची तया **द्युतिधरा** नमो

७५९ धर्मसंस्थापनेसाठीं शस्त्रें ज्यांचीं समस्त तीं
श्रेष्ठ शस्त्रधरीं त्या जो नमो त्या **शस्त्रभृद्वरा**

७६० प्रगृह्य जो असे लोकीं संधि नोहे कुणासवें
आवरी आपणा आप **प्रग्रहास** तया नमो

७६१ नातळे प्रग्रहो कोणा आतळूं दे न निग्रह
आवरी नि निवारी हि **निग्रहास** तया नमो

७६२ रेषेला असती अग्रें मंडलाला न होत तीं
अखंड मंडलाकार **व्यग्ररूपास** त्या नमो

७६३ शृंग तो होय उत्कर्ष असे उत्कर्ष नैक ज्या
महाद्रिवत् नैक-शृंग **नैकशृंगास** त्या नमो

७६४ गदाचा थोरला भाऊ तो गदाग्रज बोलिला
दादा गदेचा तें चक्र तें **गदाग्रज** त्या नमो

( ८२ )

**चतुर्मूर्तिश् चतुर्बाहुश् चतुर्व्यूहश् चतुर्गतिः॥**
**चतुरात्मा चतुर्भावश् चतुर्वेदविद् एकपात्॥**

७६५ मूर्ति पार्थिव मन्त्रात्म होत मानस निर्गुण
चारी जयाच्या ह्या मूर्ति **चतुर्मूर्तीस** त्या नमो

७६६ शंख चक्र गदा पद्म चार तत्त्वें धरी करीं
बोलिला तो चतुर्बाहु **चतुर्बाहूस** त्या नमो

७६७ बद्ध-मुक्त-मुमुक्षूंचा नित्यमुक्तासवें जगीं
चतुर्धा होय विस्तार **चतुर्व्यूहास** त्या नमो

७६८ स्वर्गापवर्ग-नरक इहलोक अशा गति
जीवाच्या बोलिल्या चार तो **चतुर्गति** त्या नमो

७६९ विश्व तैजस नि प्राज्ञ तुरीय हि तसा असे
दशानुगत तो आत्मा **चतुरात्म्यास** त्या नमो

७७० गुणानुसार आत्म्याचे भाव सात्त्विक राजस
तमोमय गुणातीत **चतुर्भावास** त्या नमो

७७१ गद्य पद्य नि तो गेय तेवीं मिश्र चतुर्विध
समग्र वेद जो जाणे **चतुर्वेदविदा** नमो

७७२ द्विपाद न चतुष्पाद अतिर्यक् अतिमानव
क्षीणपाद् तो वृद्धबाहु **एकपादा** नमो तया

( ८३ )

**समावर्तो ऽनिवृत्तात्मा दुर्जयो दुरतिक्रमः।**
**दुर्लभो दुर्गमो दुर्गो दुरावासो दुरारिहा॥**

७७३ करूनि गुरु-सेवा जो वेद-स्नात यथाविधि
समावर्तनकारी तो **समावर्त** तया नमो

७७४ करूनि अतिथी-सेवा संपादी गृह-मेध जो
करी वनातें प्रस्थान **निवृत्तात्मा** तया नमो

७७५ मन दुर्जय हें, याचे रागद्वेष अनावर
अतीत त्या असे आत्मा **दुर्जयास** तया नमो

७७६ असे चरम तें तत्त्व त्याचा केवीं अतिक्रम
पदें स्वर्गादि त्या खालीं नमो त्या **दुरतिक्रमा**

७७७ सदाचारें चित्त-शुद्धि चित्त-शुद्धी स्व-बोध तो
संपादिजे महायासें **दुर्लभास** तया नमो

७७८ आत्म-बोध न तो होय विवेकावांचुनी स्फुट
तो कृपेवांचुनी नोहे दुर्गमास तया नमो

७७९ जाणे देशिक तो देश न कळे देशिकाविना
मार्ग तो म्हणती दुर्ग ज्ञाते दुर्गास त्या नमो

७८० न जेथ सोय जाण्याची राहणें तेथ तें कसें
देश निर्गुण तो होय दुरावास तया नमो

७८१ दुरारि दानवांतें, जे दुर्मार्गी वर्तती तयां,
मारी जो आपुल्या शक्ती नमो त्या तो दुरारिहा

( ८४ )

शुभाङ्गो लोकसारङ्गः सुतन्तुस् तन्तुवर्धनः ।
इन्द्रकर्मा महाकर्मा कृतकर्मा कृतागमः ।।

७८२ अस्पृष्ट- पंक -जल तीं पद्मपत्रें जशीं जळीं
जडीं चेतन जो तेवीं शुभांगास तया नमो

७८३ लोक-पद्म असे चित्र नाना-वर्ण-रसाकृति
भृंगवत् सार तें घेई लोकसारंग त्या नमो

७८४ तन्तु हा ताणला तेणें सृष्टिरूप विचित्र चि
दिसे आदि न त्या अन्त सुतन्तूस तया नमो

७८५ लूतावत् तन्तु तो ताणी यथाकाळ गिळी हि तो
तन्तु-वर्धन तो तेणें नमो त्या तन्तुवर्धना

७८६ विश्वकर्मा असे देव इन्द्राचे हि पराक्रम
सारे त्याचे चि केलेले इन्द्रकर्मा तया नमो

-(आ) इन्द्र इन्द्रिय-शक्तींचा स्वामी कर्म न तो करी
कर्मे ऐंद्रिय त्याचीं चि इन्द्रकर्मा तया नमो

७८७ पृथ्वी आप तसें तेज वायु आकाश पांचवें
निर्मी पंच महाभूतें महाकर्मा तया नमो

७८८ कर्म तें संपलें ज्याचें कृतकृत्य निरिच्छ जो
बोलिला कृतकर्मा तो कृतकर्म्यास त्या नमो

७८९ कर्तव्य संपलें त्याचें तें श्रोतव्य हि संपलें
कृतागम तया नांव नमो त्यास कृतागमा

( ८५ )

उद्भवः सुन्दरः सुन्दो रत्ननाभः सुलोचनः ।
अर्को वाजसनः शृङ्गी जयन्तः सर्वविज्जयी ।।

७९० लोक प्रजा कला विद्या सर्व उद्भूत ज्यांतुनी
उत्पत्ति-हेतु सर्वांचा तो उद्भव तया नमो

७९१ सौन्दर्याचा झरा मूळ सर्व-सौन्दर्य-भाजन
निर्दोष गुण-संपन्न सुन्दरास तया नमो

-(आ) सुखा विदारिता तो जो विषयासक्तिरूप चि
भाव सर्वेन्द्रियां मोही सुन्दरास तया नमो

७९२ भाव तो बोलिला सुंद सुख दे नयना मना
युक्त सुंद-र तें तेणें सुंदरूपास त्या नमो

७९३ नाभींतूनि जयाच्या हें लोक-रत्न सुमद्गत
आश्चर्यमय शोभाढ्य रत्ननाभास त्या नमो

७९४ पाहती सूक्ष्म तत्त्वास ज्याचे लोचन निर्मल
तो सूक्ष्मदृक् विशालाक्ष सुलोचन तया नमो

७९५ ब्रह्मा-विष्णु-महेशादि अर्चनीयां हि अर्च्य जो
जो नमस्कृत लोकांहीं ऋगात्मा अर्क त्या नमो

७९६ उपासना करी अन्न-ब्रह्माची जो निरंतर
वितरी क्षुधितां अन्न तो वाजसन त्या नमो

७९७ एकशृंग महाकाय मत्स्य जो विचरे जळीं
एकार्णवाच्या कल्पान्तीं नमो शृंगीस त्या महान्

७९८ युगीं युगीं जो संग्रामीं जिंकी दैत्यांस निश्चयें
रणीं विजयशाली त्या जयन्तास नमो सदा

७९९ सर्वशस्त्रीं सुनिपुण सर्वशास्त्रीं विशारद
समितिंजय सर्वत्र नमो त्या सर्वविज्-जयी

( ८६ )

सुवर्णबिन्दुर् अक्षोभ्यः सर्ववागीश्वरेश्वरः।
महान्हदो महागर्तो महाभूतो महानिधिः।।

८०० सोनेरी कातडी ज्याची चंदेरी बिंदु ज्यावरी
सुवर्ण-बिन्दु मृग तो स्वर्णबिन्दूस त्या नमो

-(आ) बिन्दुयुक्त असे सुष्ठु वर्ण ज्यांत मनोज्ञ तो
सुवर्णबिन्दु ॐकार **स्वर्णबिन्दूस** त्या नमो

८०१ क्षोभ तो विषय-स्पर्शे राग-द्वेषात्म होतसे
आत्मभिन्न नसे ज्यास **अक्षोभ्यास** तया नमो

८०२ अर्था अनुसरे वाणी ते वागीश्वर बोलिले
वाणी अनुसरे अर्थ नमो **वागीश्वरेश्वरा**

८०३ नामरूप जयामध्यें टाकिती बुडवूनिया
होती शीतल निर्द्वंद तो **महान्हद** त्या नमो

८०४ महान्हद जलें पूर्ण महागर्त सुका दर
ज्यांत होती गडप् विश्वें **महागर्तास** त्या नमो

-(आ) महा-गर्त नव्हे, कर्त असे संसार हा, जियें-
जीव हे कांतले जाती **महाकर्तास** त्या नमो

८०५ शिलोच्चय महाभूत यदायाम अचिन्त्य चि
लांबी रुंदी नि उंची हि **महाभूतास** त्या नमो

८०६ महानिधि असे गुप्त अव्यक्तांत निगूढ तो
सांठा धनाचा न कळे तो **महानिधि** त्या नमो

( ८७ )

**कुमुदः कुन्दरः कुन्दः पर्जन्यः पावनो ऽनिलः ।**
**अमृताशो ऽमृतवपुः सर्वज्ञः सर्वतोमुखः।।**

८०७ आपुल्या कौमुदीनें जो काळ्या मातेस मोदवी
कौमुदीनाथ कुमुद **कुमुदास** तया नमो

८०८ अविद्यारूप काळोख असे कुहक कुत्सित
कुत्सितास विदारी जो **कुंदरास** तया नमो

८०९ आपुल्या मूल-शूकांनीं ठाई ठाई भुईस ह्या
करी जो दीर्ण तो कुंद **कुंदरूपास** त्या नमो

-(आ) कुंदवत् कोंदला ज्याचा यशोधवलिमा जगीं
ढवळें धवळिलें जेणें **कुंदरूपास** त्या नमो

८१० पर्जन्य पिकवी शेतें सुधेचे शिंपुनी सडे
समृद्धि-हेतु विश्वाचा **पर्जन्यास** तया नमो

८११ आकाश धुउनी काढी करी हृदय निर्मल
करी पवित्र विश्वातें **पावनास** तया नमो

८१२ प्राणवान् वायु अनिल मेघ-यूथास दौडवी
मारी विजांचे आसूड **अनिलास** तया नमो

८१३ आशा अमर ती ज्याची अमृताशन वा करी
अमृताश म्हणावा तो **अमृताशास** त्या नमो

८१४ वपु त्याचें अमृत चि अमृताशन जो करी
समदृष्टि अहिंसात्मा नमो त्या **वपुषामृता**

८१५ चिद्रूप तो असे तेणें जाणे झालें नि होत जें
जाणे जें व्हायचें तें हि **सर्वज्ञास** तया नमो

८१६ नसे त्या पाठ ना पोट नसे आंत नि बाहिर
सर्वतो-मुख तो तेणें नमो त्या **सर्वतो-मुखा**

( ८८ )

**सुलभः सुव्रतः सिद्धः शत्रुजित् शत्रुतापनः।**
**न्यग्रोधोदुम्बरो ऽश्वत्थश् चाणूरान्ध्रनिषूदनः।।**

८१७ सर्वांच्या हृदयीं नांदे संस्फुरद्रूप सर्वदा
तेणें सुलभ सर्वांना **सुलभास** तया नमो

८१८ हांकेसवें दे ओकार सिद्ध सेवेस सर्वदा
व्रत शोभन हें ज्याचें **सुव्रतास** तया नमो

८१९ न आप्य कार्य संस्कार्य सिद्ध आत्मा असे स्वतः
तेणें तो बोलिला सिद्ध **सिद्धरूपास** त्या नमो

८२० रजस्-तमांस जिंकूनि रावणा कुम्भकर्णका
सत्त्वा बिभीषणा स्थापी **शत्रुजित्** तो तया नमो

८२१ पोषी दैवी गुणगणा शोषी आसुर वर्ग जो
शत्रु-तापन तो होय नमो त्या **शत्रु-तापना**

८२२ मूळें नवीं नवीं रोवी खालीं, वाढे चतुर्दिशा
सर्वाश्रमास्पद गृही **न्यग्रोधास** तया नमो

८२३ ब्रह्मचारी बटु असे तीर्थवासी उदुम्बर
फलवान् होय सर्वांगीं नमो बटु **उदुम्बरा**

८२४ वनी तो होय अश्वत्थ गांवाबाहेर जो वसे
प्रयाण-साधनाकारी **अश्वत्थास** तया नमो

८२५ मुष्टि-मोदक चारूनि चाणूरान्ध्रास मर्दिलें
नमो त्या अति मल्लास **चाणूरान्ध्र-निषूदना**

( ८९ )

**सहस्रार्चिः सप्तजिह्वः सप्तैधाः सप्तवाहनः।**
**अमूर्तिर् अनघो ऽचिन्त्यो भयकृद् भयनाशनः॥**

८२६ सहस्रशः विखुरल्या ग्रह-नक्षत्र-तारका
ज्या तेजोराशितः शून्यीं **सहस्रार्चीस** त्या नमो

८२७ काळी निळी नि ढवळी ताम्र पीत नि जांभळी
हिरवी अग्नि-जिह्वा ह्या **सप्तजिह्वास** त्या नमो

८२८ पलाश अर्क खदिर अपामार्ग नि पिप्पल
उदुम्बर शमी एधें **सप्तैधास** तया नमो

८२९ सप्तवर्ण असे रश्मि तेणें तो सप्त-वाहन
बोलिला भगवान् सूर्य नमो त्या **सप्तवाहना**

८३० नसे मूर्ति नसे रेखा नाद बिन्दु नसे तया
अमूर्त अव्यक्ताचिन्त्य **अमूर्तीस** तया नमो

८३१ नसे देह नसे कर्म नसे पूर्व न उत्तर
अघ हें सर्व ज्या नाहीं **अनघास** तया नमो

८३२ इन्द्रियें सेविती अर्थ मन चिंती तयांस चि
इन्द्रियार्थ न तो तेणें **अचिन्त्यास** तया नमो

८३३ भयें सूर्य तपें ज्याच्या भयें वाहे धरा प्रजा
स्वभाव-भय भूतांतें **भयकृत्** तो तया नमो

८३४ परी स्वभावें जो वर्ते 'अहं कर्ता, फलं मम'
न म्हणे, भय त्या नाहीं **भय-नाशन** त्या नमो

( ९० )

**अणुर् बृहत् कृशः स्थूलो गुणभृन् निर्गुणो महान्।**
**अधृतः स्वधृतः स्वास्यः प्राग्वंशो वंशवर्धनः॥**

८३५ व्यापकत्व प्रकटिती विरुद्धार्थ विशेषणें
तो शून्यवत् असे सूक्ष्म **अणुरूपास** त्या नमो

८३६ अणूसवें बृहत् तो चि न तो अणु चि केवळ
आकाशवत् अणु बृहत् **बृहद्रूपास** त्या नमो

८३७ अत्यन्त कृश तो आहे कलाशेष विधूपरी
विदेहकृश जो आत्मा **कृशरूपास** त्या नमो

८३८ कृशासवें चि तो स्थूल षोडशांश विधूपरी
रजाकार गजाकार **स्थूलरूपास** त्या नमो

८३९ गुणात्मिका ती प्रकृति तिचा आश्रय तो पुमान्
बोलिला गुणभृत् तेणें तया **गुणभृता** नमो

८४० चयापचय ना चन्द्रा तो कलेचा चि सर्वथा
गुण प्राकृत; आत्म्या न; **निर्गुणास** तया नमो

८४१ परस्पर-विरोधी ह्या भावांतें युगपत् वरी
न कसा तो महान् आत्मा **महानास** तया नमो

८४२ कार्यातें कारण धरी न कदा कार्य कारणा
कारणात्मा अधृत तो **अधृतास** तया नमो

८४३ कार्यातें कारण धरी परी स्वाधार कारण
तेणें स्वधृत तो आत्मा **स्वधृतास** तया नमो

८४४ कामें अखंडित मन स्वानन्दें नित्यतृप्त जो
वदन प्रसाद-सदन तेणें **स्वास्य** तया नमो

८४५ ज्यास पूर्वज आहेत पिढ्यांची गणना नसे
अनादि परमात्मा तो होय **प्राग्वंश** त्या नमो

८४६ ज्यास वंशज आहेत ज्याचा विस्तार वाढता
प्रजामृतत्व-संबंधें **वंशवर्धन** त्या नमो

( ९१ )

**भारभृत् कथितो योगी योगीशः सर्वकामदः।**
**आश्रमः श्रमणः क्षामः सुपर्णो वायुवाहनः॥**

८४७ विश्वाधार असे तेणें बोलिला भारभृत् प्रभु
भूभार वाहे शेषात्मा **भारभृत्** तो तया नमो

८४८ कथा त्या कथिती ज्याच्या इतिहास-पुराणकें
वेदोपनिषदें गीता **कथितास** तया नमो

८४९ एकत्व आपुलें पाहे दुजें नेणे अनात्म जो
आत्म-बोधें सदायुक्त योगी; **योग्यास** त्या नमो

८५० उपाय बोलिले योग आत्मज्ञान-सहायक
योगवेत्त्यांत जो ज्ञानी **योगीशास** तया नमो

८५१ ज्याच्यापासूनि हे प्राप्त इष्ट भोग समस्त हि
सर्व-कामद तो आत्मा नमो त्या **सर्वकामदा**

८५२ संसारीं श्रमते जीव जेथ विश्राम पावती
तो आश्रम असे स्वात्मा **आश्रमास** तया नमो

८५३ अज्ञान-मूळ उपटूं निवटूं कर्म-जाल हि
श्रमवी श्रमणा देव **श्रमणास** तया नमो

८५४ तपोयोगें करी क्षाम जिज्ञासु श्रमणा वनीं
झटे झिजे जो ज्ञानार्थ **क्षामरूपास** त्या नमो

८५५ तप:-स्वाध्याय-पक्षांनीं आत्मज्ञानोदयाकडे
घे झेप घरटें सांडी **सुपर्णास** तया नमो

८५६ वायुवाहन हा जीव जाय प्राणासवें नि ये
वायुवाहन तो तेणें नमो त्या **वायुवाहना**

( ९२ )

**धनुर्धरो धनुर्वेदो दण्डो दमयिता दम:।**
**अपराजित: सर्वसहो नियन्ता नियमो यम:।।**

८५७ धरिलें धनु तें जेणें धर्म-संरक्षणार्थ चि
श्रीराम दाशरथि तो **धनुर्धर** तया नमो

८५८ सरहस्य धनुर्वेद मूर्तिमंत चि जो असे
तो धनुर्वेद-विद् राम **धनुर्वेद** तया नमो

८५९ उत्पथीं चालती त्यांस दण्डी जो अविलंब चि
थोरांचा दण्ड अव्यक्त **दण्डरूपास** त्या नमो

८६० वैवस्वत-नरेन्द्रादि-रूपें जो ह्या प्रजा दमी
तो धर्मगुप् दमयिता नमो **दमयित्या** तया

८६१ दण्ड्यांस दण्ड जो होय अपराधानुरूप चि
बोलिला दम तो न्याय्य **दमरूपास** त्या नमो

८६२ पराजित न जो होय रणीं वादसभेंत वा
प्रतिपक्षाचिया हातीं **अपराजित** त्या नमो

८६३ न पराजय जो पावे जिंकी सर्वांस संगरीं
बोलिला सर्वसह तो नमो **सर्वसहा** तया

८६४ अश्वा सारथि तो जैसा नियमी चालवी पथीं
प्रजा स्वधर्मीं नियमी **नियन्ता** तो तया नमो

८६५ अश्वांतें नियमी यन्ता प्रग्रहें तेविं इंद्रियां
आत्मवान् नियमी नेमें **नियमास** तया नमो

८६६ योगाचा यम हा प्राण असे नियम देह तो
यमाविना वृथा नेम **यम-धर्मास** त्या नमो

( ९३ )

**सत्त्ववान् सात्त्विक: सत्य: सत्यधर्मपरायण:।**
**अभिप्राय: प्रियार्हो ऽर्ह: प्रियकृत् प्रीतिवर्धन:।।**

८६७ पौरुषाच्या बळें होय इष्ट-सिद्धि जगीं नरा
तें पौरुष असे सत्त्व **सत्त्ववंतास** त्या नमो

८६८ वाढवी सत्त्व आरोग्य देहीं, चित्तीं प्रकाश तो
जो सत्त्वगुण जोपासी **सात्त्विकास** तया नमो

८६९ सत्स्वरूप असे आत्मा न असत् हों शके कधीं
तेणें तो बोलिला सत्य **सत्यरूपास** त्या नमो

८७० गन्तव्य सत्य अव्यक्त सत्य तन्मार्ग व्यक्त जो
नमो सत्यव्रता वीरा **सत्यधर्मपरायणा**

८७१ जलौघांचा अभिप्राय जेवीं सागर-संगम
तेवीं जो सर्व जीवांचा **अभिप्रायास** त्या नमो

८७२ जें जें प्रिय असे जीवा तें तें पावे जयास तो
प्रियार्ह बोलिलो स्वात्मा **प्रियार्हास** तया नमो

८७३ पूजार्ह सर्व लोकांतें तसा सर्वविधानतः
सर्वोपचारीं पूजार्ह बोलिला **अर्ह** त्या नमो

८७४ पुरवी प्रिय सर्वांचें अश्वकामास अश्व तो
गोकामा होय तो गाय **प्रियकृत्** तो तया नमो

८७५ पितृवत् प्रियकर्ता तो पुत्रवत् प्रीतिवर्धन
गुणांनीं वाढवी प्रीति नमो त्या **प्रीतिवर्धना**

( ९४ )

**विहायसगतिर् ज्योतिः सुरुचिर् हुतभुग् विभुः।**
**रविर् विरोचनः सूर्यः सविता रविलोचनः॥**

८७६ आकाशीं तो विरे वायु प्राण अव्यक्त अक्षरीं
तेणें विहायस-गति **विहायसगती** नमो

८७७ ज्योतिःस्वरूप तो आत्मा विज्ञाता तो असे स्वयें
स्वयंप्रकाश ती ज्योति **ज्योतीरूपास** त्या नमो

८७८ ती दीप्ति आत्मज्योतीची आकर्षक अतीव चि
पतंगवत् जिथें जीव **सुरुचीस** तया नमो

८७९ यज्ञाग्नि हुतभुग् होय आत्मा हा विषयी तसां
करी ग्रहण सर्वांचें **हुतभुक्** तो तया नमो

८८० ज्ञप्तिस्वरूप तो आत्मा सर्वव्यापी असे विभु
न संभवे चि तद्रिक्त **विभुरूपास** त्या नमो

८८१ उषेच्या उदयानें चि आराव करवी रवि
जग जागे हले बोले **रविरूपास** त्या नमो

८८२ विरोचन चि हा सूर्य नानारंगीं भरी नभ
रंगाकृति चितारी हा **विरोचन** तया नमो

८८३ प्रेरी स्वकर्मीं जगता सूर्य देऊनि चेतना
तेणें तो बोलिला सूर्य **सूर्यरूपास** त्या नमो

८८४ अव्यक्तांतूनि व्यक्तास प्रसवे जो स्वशक्तितः
विश्व-प्रसविता देव **सविता** तो तया नमो

८८५ ह्या विश्वरूप देवाचे रवि-चंद्र चि लोचन
बोलिलें मुख तो अग्नि नमो त्या **रविलोचना**

( ९५ )

**अनन्तो हुतभुग् भोक्ता सुखदो नैकजो ऽग्रजः।**
**अनिर्विण्णः सदामर्षी लोकाधिष्ठानमद्भुतः॥**

८८६ न दिक्-काल-निमित्तें जो होय सान्त अनन्त तो
कल्पान्तीं जो उरे शेष **अनन्तास** तया नमो

८८७ यज्ञभोक्ता असे देव यज्ञ-गोप्ता हि तो असे
रक्षूनि भोगी जो यज्ञ **हुतभुक्** तो तया नमो

८८८ कार्य कारण कर्तृत्व हें सारें प्रकृती-गुणें
पुरुषाकारणें भोग पुरुषा **भोक्तया** नमो

८८९ असुखा दवडी दूर देई स्वसुख संतत
तेणें सुखद तो आत्मा **सुखदास** तया नमो

८९० शास्त्रें आकळिजे आधीं निःसंशय गुरूमुखें
आत्मप्रत्यय तो अन्तीं **नैकजास** तया नमो

८९१ सर्वादि तो असे आत्मा विश्व मागूनि सर्व हें
तेणें अग्रज तो आत्मा **अग्रजास** तया नमो

८९२ सिद्धा न कर्मकंटाळा कर्म निष्काम आचरी
आत्म-शुद्ध्यर्थ तत्त्वज्ञ **अनिर्विण्णास** त्या नमो

-(आ) बद्धा न कर्मकंटाळा वेदोक्तें स्वर्ग-कामुक
भोगार्थ आदरी काम्य **अनिर्विण्णास** त्या नमो

८९३ जाईल विलया पाप नांदेल शुभ सर्वथा
तेणें सदा क्षमाशील **सदामर्षीस** त्या नमो

८९४ अव्यक्ताक्षर तें होय ह्या व्यक्ता नि क्षरात्मका
लोकां आधार तेणें तें **लोकाधिष्ठान** त्या नमो

८९५ असूनि लोकाधिष्ठान असे लोक-विलक्षण
तेणें अद्भुत तो होय **अद्भुतास** तया नमो

( ९६ )

सनात् सनातनतमः कपिलः कपिरप्ययः।
स्वस्तिदः स्वस्तिकृत् स्वस्ति स्वस्तिभुक् स्वस्तिदक्षिणः॥

८९६ आज-काल-उद्यांचा जो असे आधार तो सनात्
सनातन असे तेणें सनादूष्पास त्या नमो

८९७ न सापेक्ष सनात्, होय तो केवल सनातन
तेणें सनातनतम सनातनतमा नमो

८९८ विदेह ज्योतिर्मय तो देहयोगें मळे जन
जन्मतां होय कपिल कपिलास तया नमो

८९९ भुभुःकारें नि उत्पातें कांपवी जो वनान्तरा
अनिकेत विहारी जो कपिरूपास त्या नमो

९०० सगळा भव हा ज्यांत अपीत उपसंहृत
अनन्त सर्वान्तक तो होय अप्यय त्या नमो

९०१ ज्यांचें जें स्वस्ति तें त्यांस चतुर्वर्गात्म देतसे
तेणें स्वस्तिद तो होय स्वस्तिदास तया नमो

९०२ स्वस्ति चिंती स्वस्ति बोले करी स्वस्ति चि स्वस्तिकृत्
सर्वतोभद्र तें स्वस्ति नमो स्वस्तिकृता तया

९०३ ';' कल्याण असे स्वस्ति बोलती त्यास स्वस्ति-'क'
सर्वतोमुख कल्याण स्वस्तिरूपास त्या नमो

९०४ स्वस्ति-मंत्रासवें हव्य करी ग्रहण स्वस्तिभुक्
स्वस्ति सेवी स्वस्ति जेवी स्वस्तिभुक् तो तया नमो

९०५ स्वस्ति-वाचन होऊनि होतसे स्वस्ति-यज्ञ तो
तयाची दक्षिणा स्वस्ति स्वस्ति-दक्षिण त्या नमो

( ९७ )

अरौद्रः कुण्डली चक्री विक्रम्यूर्जितशासनः ।
शब्दातिगः शब्दसहः शिशिरः शर्वरीकरः ॥

९०६ दुःखदायी असे रौद्र सारे रौद्रास टाळिती
अन्तर्यामी कसा रौद्र ? अरौद्रास तया नमो

९०७ अव्यंग सुंदरातें त्या अलंकरण कासया
अलंकरूं अलंकारा कुंडली तो तया नमो

९०८ सर्वशक्ति निरस्तारि देवा शस्त्रें कशास तीं
द्याया सामर्थ्य शस्त्रांतें झाला चक्री तया नमो

९०९ पादाक्रान्त करी सारें रणांगण पराक्रमें
परंतप परास्तारि विक्रमी तो तया नमो

९१० तपे सूर्य भयें याच्या वारा वाहे, धरी धरा
आज्ञा ज्याची अनुलंघ्य नमो ऊर्जित-शासना

९११ यथार्थ वर्णना ज्याच्या शब्द-शक्ति उणी पडे
करी स्तुति घडे निंदा नमो शब्दातिगा तया

९१२ न वाचक जरी शब्द तरी द्योतक तो असे
तेणें शब्द हि तो साहे नमो शब्द-सहा तया

९१३ भव-दावाग्नि-दग्धास ज्ञानवैराग्य-शीतल
जीवनें जो करी गार शिशिरास तया नमो

९१४ भेद-विश्वास मिटवी एकाकार करी जगा
शान्त निःशब्द निःस्पन्द नमो त्या शर्वरीकरा

( ९८ )

अक्रूरः पेशलो दक्षो दक्षिणः क्षमिणां वरः ।
विद्वत्तमो वीतभयः पुण्यश्रवणकीर्तनः ॥

९१५ अज्ञानें भेद, भेदानें भय द्वेष नि वैर तें
वैरें क्रूरत्व; न ज्ञान्या अक्रूरास तया नमो

९१६ न अक्रूर चि तो ज्ञानी तो सुन्दर तनें मनें
काया वाचा मनें गोड पेशलास तया नमो

९१७ उदासीन असे देहीं स्वरूपीं दक्ष तो असे
तेणें तो बोलिला दक्ष आत्म-दक्षास त्या नमो

९१८ सर्वानुकूल तो होय तेणें दक्षिण बोलिला
दाक्षिण्यें आर्जवें युक्त तो दक्षिण तया नमो

९१९ आत्मीयत्वें स्वपुत्रास पितरें करिती क्षमा
स्वात्मा चि जो असे तो चि क्षमिणांवर त्या नमो

९२० चिद्रूपें सर्व जो जाणे तो विद्वत्तम बोलिला
चिदज्ञात नसे कांही नमो विद्वत्तमा तया

९२१ आत्मरूप चि हें ज्यास द्वितीय न तया असे
अद्वितीया नसे भीति नमो वीतभया तया

९२२ ऐकणें सांगणें तत्त्व कथा वा पुण्य बोलिलें
नमो तया पापहरा पुण्य-श्रवणकीर्तना

( ९९ )

उत्तारणो दुष्कृतिहा पुण्यो दुःस्वप्ननाशनः ।
वीरहा रक्षणः सन्तो जीवनः पर्यवस्थितः ।।

९२३ संसार-सागरापार उतारी शरणागता
ज्ञानप्लवें जो आचार्य नमो उत्तारणा तया

९२४ देहात्मबुद्धि हें मूळ पापांचें, त्यावरी चि जो
आत्मबुद्धी करी घाव तया दुष्कृतिहा नमो

९२५ देहात्मबुद्धि-उच्छेद-पूर्व सोऽहंजपादिकें
निर्धूम अग्निवत् जीवा करी तो पुण्य त्या नमो

९२६ कृति उक्ति मनोवृत्ति स्वप्न क्रम सुसूक्ष्म हा
दुःस्वप्न हि निवारी त्या नमो दुःस्वप्न-नाशना

९२७ करी जो आपुलें वैर कामरूप दुरासद
त्या वीरा जो करी ठार वीरहा तो तया नमो

९२८ कामक्रोधादि अन्तःस्थ वाटमाऱ्यांस मारुनी
जपे आत्मधनातें जो तो रक्षण तया नमो

९२९ जाणे संतत जो आप आपणा विसरे न जो
नित्योपलब्ध तो आत्मा होय सन्त तया नमो

९३० न केवल चि तो आहे हें जगत् जगवी हि तो
जगज्जीवन सर्वात्मा जीवनास तया नमो

९३१ तो आहे तो चि जगवी सचराचर हें जगत्
जीव्य-जीवनरूपें तो पर्यवस्थित त्या नमो

( १०० )

अनन्तरूपो ऽनन्तश्रीर् जितमन्युर् भयापहः ।
चतुरस्रो गभीरात्मा विदिशो व्यादिशो दिशः।।

९३२ रूपें अनन्त हीं ज्याचीं पहावें तेथ जो दिसे
अनन्तरूप तो तेणें अनन्तास नमो तया

९३३ रूपें अनन्त तीं ज्याचीं रूपश्री हि तशीच ती
नाना-वर्णाकृतिगुण अनन्तश्रीस त्या नमो

९३४ अभिमान असे मन्यु वर्ण रूप वयो बल
विद्या प्रभुत्व श्री यांचा जितमन्यूस त्या नमो

९३५ संसाररूप भय जें असे अज्ञान-संभव
ज्ञानें तें जो निवारी तो भयापह तया नमो

९३६ चतुरस्र असे धर्म आर्ष वर्णाश्रमात्मक
समत्वें सेव्य संपूर्ण चतुरस्रास त्या नमो

९३७ तळबूड नसे ज्यास असे खोल चि खोल जो
समुद्रवत् जो गंभीर गभीरात्म्यास त्या नमो

९३८ कर्मानुरूप जो देई फळें विविध या जना
असे विदिश तो देव विदिशास तया नमो

९३९ देई विविध आदेश जना वर्णाश्रमोचित
तेणें व्यादिश वेदात्मा व्यादिशास तया नमो

९४० देई तो वासना जन्म देई कर्म तथा गति
ज्ञान वैराग्य दे मोक्ष देई तो दिश त्या नमो

( १०१ )

अनादिर् भूर्-भुवो लक्ष्मीः सुवीरो रुचिराङ्गदः।
जननो जनजन्मादिर् भीमो भीमपराक्रमः।।

९४१ कारणा म्हणती आदि नसे कारण ज्यास तें
तो अनादि चि सर्वादि अनादीस तया नमो

९४२ भूर्लोक होय विश्वात्मा भुवर्लोक हि होय तो
दोन्ही दलें असे तो चि भूर्भुवास नमो तया

९४३ अविद्या ती अवदसा होय देहात्मबुद्धि जी
आत्मविद्या चि ती लक्ष्मी आत्म-लक्ष्मीस त्या नमो

९४४ बाह्य शत्रूंस संग्रामीं जिंकिती नर वीर ते
अन्तःशत्रूंस जो जिंकी तो सुवीर तया नमो

९४५ विजयी वीर तो स्वामी राज्य संपत्ति भोग त्या
केयूर शोभती त्यास नमो त्या रुचिरांगदा

९४६ सारें जनन ज्यांतूनि झालें जेथूनि हें जग
सर्वादि तो चि जनन त्या विश्व-जनना नमो

९४७ जन तो जन्म तो आणि असे आदि हि तो प्रभु
कार्य क्रिया कारण तो जनजन्मादीस त्या नमो

९४८ भयहेतु असे भीम यम सर्वां भयंकर
यमस्वरूप तो तेणें असे भीम तया नमो

९४९ कल्पान्तीं संहरी विश्व परमात्मा समस्त हें
आपुल्या शेष शक्तीनें नमो भीम-पराक्रमा

( १०२ )

**आधारनिलयो धाता पुष्पहासः प्रजागरः।**
**ऊर्ध्वगः सत्पथाचारः प्राणदः प्रणवः पणः॥**

९५० होती पंच महाभूतें जगदाधार, त्यास हि
धरी अव्यक्तरूपें त्या **आधार-निलया** नमो

९५१ भूम्यादि भूतें कल्पान्तीं गिळी अव्यक्त तो प्रभु
कल्पारम्भीं तीं उगिळी तेणें **धाता** तया नमो

-(आ) अव्यक्त जननीचें जो स्तनपान करी शिशु
व्यक्ताकार जगद्रूप नमो **धात्या** स्तनंधया

-(इ) अधाता वा असे तो चि न तो पालक पाल्य वा
तेणें अधाता तो होय **अधात्यास** तया नमो

९५२ पुष्पीं हास्य हसे ज्याचें बोलिला पुष्पहास तो
चन्द्रार्क-नेत्र विश्वात्मा **पुष्पहास** तया नमो

९५३ जागृति स्वप्न सुष्वाप अवस्थात्रय लंघुनी
अखंड एकरस जो **प्रजागर** तया नमो

९५४ अग्निज्वाला सूर्यबिंबा मिळाया उठती वरी
तद्वत् जीव शिवाभेटी **उर्ध्वगास** तया नमो

९५५ सत्पथें चालुनी नेमें गांठिती सत्य सज्जन
सत्पथें आचरी सत्य **सत्पथाचार** त्या नमो

९५६ प्राण जीव, प्राण बल, प्राण कर्म समस्त हें
तो प्राण देई जो विश्वा **प्राणदास** तया नमो

९५७ असे प्रणव ॐकार समस्त स्तुति-संग्रह
एकाक्षर असे वेद वेदात्म **प्रणवा** नमो

९५८ जगूं विनिमयें आम्ही म्हणा विनिमया पण
व्यापिलें जीवना जेणें **पणरूपास** त्या नमो

( १०३ )

**प्रमाणं प्राणनिलयः प्राणभृत् प्राणजीवनः।**
**तत्त्वं तत्त्वविद् एकात्मा जन्ममृत्युजरातिगः॥**

९५९ प्रमाण न लगे अन्य ज्यास, आत्मा प्रमाण तो
संवित्स्वरूप विज्ञाता **प्रमाणास** तया नमो

९६० प्राणाधीन असे सर्व सचराचर हें जगत्
निमे प्राण जिथें अन्तीं त्या **प्राण-निलया** नमो

९६१ प्राणाधीन असे सर्व सचराचर हें जगत्
निपजे प्राण जेथूनि **प्राणभृत्** तो तया नमो

९६२ प्राणाधीन असे सर्व सचराचर हें जगत्
ज्याच्या सत्ते चळे प्राण **प्राण-जीवन** त्या नमो

९६३ असत् जड नव्हे दुःख, सत् चित् आनन्द केवळ
असूनि निज तत्शब्दें वाच्य **तत्त्वास** त्या नमो

९६४ परमार्थतः असे सत्य तथ्य तें तत्त्व बोलिलें
अहं ब्रह्मास्मि जो जाणे **तत्त्ववित्** तो तया नमो

९६५ परमार्थतः असे सत्य एक आत्मा चि केवळ
तेणें तो होय एकात्मा नमो **एकात्मया** तया

९६६ जन्म आदि, जरा मध्य, मृत्यु अन्त नसे जया
नमो विकारातीता त्या **जन्म-मृत्यु-जरातिगा**

( १०४ )

**भूर्भुवस् स्वस्-तरुस् तारः सविता प्रपितामहः।**
**यज्ञो यज्ञपतिर् यज्वा यज्ञाङ्गो यज्ञवाहनः॥**

९६७ भूर्लोक नि भुवर्लोक स्वर्लोक हि मिळूनि हा
फलवान् तरु वेदात्म **भूर्भुवःस्वस्-तरू** नमो

९६८ तरु तारक वेदात्म यज्ञप्लव-विनिर्मिता
संसार-सागरांतूनि तारी **तार** तया नमो

९६९ ज्याच्यापासूनिया झाले सचराचर लोक हे
लोक-प्रसविता होय **सविता** तो तया नमो

९७० पाञ्चभौतिक हा पुत्र, पिता भूतें, पितामह-
अव्यक्त, अक्षर असे **प्रपितामह** त्या नमो

९७१ यजनीय असे देवां असुरां मानवांस हि
यज्ञकर्मात्मका देवा **यज्ञरूपा** तया नमो

९७२ यथाविधि यथासाङ्ग यज्ञीं जो यजिजे जनीं
आराध्य देवता, होय तो **यज्ञपति**, त्या नमो

९७३ श्रद्धेनें शास्त्र-विधितः मनोयोगें अदाम्भिक
यजमान करी यज्ञ **यज्वा** तो होय त्या नमो

९७४ कर्ता क्रिया नि करणें स्थल कालानुकूलता
पञ्चाङ्गें यज्ञकर्माचीं **यज्ञाङ्गास** तया नमो

९७५ पञ्चाङ्गें युक्त होऊनि यज्ञ-निर्वाह जो करी
करी सुफल संपूर्ण **यज्ञ-वाहन** त्या नमो

( १०५ )

**यज्ञभृद् यज्ञकृद् यज्ञी यज्ञभुग् यज्ञसाधनः।**
**यज्ञान्तकृद् यज्ञगुह्यं अन्नं अन्नाद एव च॥**

९७६ सृष्टिरूप महायज्ञ विश्वीं हा चालला असे
जो सृष्टिस्थितियज्ञाचा भर्ता तो **यज्ञभृत्** नमो

९७७ यज्ञादि ही असे सृष्टि असे यज्ञान्त ती पुनः
यज्ञरूप चि ती होय **यज्ञकृत्** तो तया नमो

९७८ सृष्टिरूप चि जो यज्ञ ती चि मूर्ति असे तया
तेणें तो बोलिला यज्ञी **यज्ञी** यज्ञात्मया नमो

९७९ ज्याच्या प्रीत्यर्थ हे सारे होती यज्ञ दिने दिने
त्या सर्वांचा असे भोक्ता **यज्ञभुक्** तो तया नमो

९८० न दैवताविना यज्ञ तेणें तो यज्ञ-साधन
यज्ञें चि साध्य तो होय **यज्ञ-साधन** त्या नमो

९८१ करी सुफल संपूर्ण यज्ञ जो देउनी फल
यज्ञान्तकृत् तो फलद नमो **यज्ञान्त-कारका**

९८२ कर्में समस्त ज्ञानांत होती फलित गुह्य हें
तद्वत् तीं यज्ञकर्मे हि **यज्ञगुह्यास** त्या नमो

९८३ जाग्रत्-स्वप्न-सुषुप्तींत जाणिजे जें समस्त तें
बोलिलें अन्न आत्म्याचें **अन्नरूपास** त्या नमो

९८४ समस्त ज्ञेय तें अन्न चेतनाचें अचेतन
ज्ञानस्वरूप जो आत्मा तो चि **अन्नाद** त्या नमो

-(आ) विश्वीं या अन्न-अन्नादापरतें दुसरें नसे
तेणें उभयरूपा त्या देवा सर्वात्मका नमो

( १०६ )

**आत्मयोनिः स्वयंजातो वैखानः सामगायनः।**
**देवकीनन्दनः स्रष्टा क्षितीशः पापनाशनः॥**

९८५ जननी ती असे त्याची आपुली तो चि आपण
स्वोपादान स्वयें तेणें **आत्मयोनि** तया नमो

९८६ बीजप्रद पिता त्याचा आपुला तो चि आपण
स्वनिमित्त स्वयें तेणें **स्वयंजात** तया नमो

९८७ खणती कर्म-काशा जे त्यांच्या क्षेत्रीं चि जो पिके
तो आत्मबोध वैखान **वैखानास** तया नमो

९८८ ज्ञान-दीक्षित होऊनि जो विद्या-सोम गाळितो
'अहं ब्रह्मास्मि' तो गातो **साम-गायन** त्या नमो

९८९ अज्ञान-कंस वधिला देह-बंदींत जन्मुनी
सुखवी भक्ति-वैराग्या **देवकी-नन्दना** नमो

९९० न तो सृष्ट, असे स्रष्टा या सृष्टीचा समग्र चि
तेणें तो बोलिला स्रष्टा **जगत्-स्रष्ट्यास** त्या नमो

९९१ तेणें चि सृजिलें विश्व असे तेणें चि पाळिलें
क्षिति-पालक तो होय **क्षितीशास** तया नमो

९९२ रचिलें विश्व हें जेणें जेणें हें विश्व पाळिलें
संहरी तो चि पापातें नमो त्या **पाप-नाशना**

( १०७ )

**शङ्खभृन् नन्दकी चक्री शार्ङ्गधन्वा गदाधरः।**
**रथाङ्गपाणिर् अक्षोभ्यः सर्वप्रहरणायुधः।।**

९९३ पाञ्चजन्य करीं ज्याच्या भक्तां अभय द्यावया
अभक्तां भय तो देई नमो **शंखभृता** तया

९९४ अज्ञान-संशय-च्छेदी आत्मज्ञानासि नन्दक
कटीस शोभतो ज्याच्या **नन्दकी** तो तया नमो

९९५ सुदर्शन धरी चक्र अनाक्रोश-क्षमामय
संरक्षी जें सदा भक्ता देवा **चक्रीस** त्या नमो

९९६ शार्ङ्ग तें धनु शृंगाचें भगवद्-भुज-भूषण
तत्त्व-वेध-क्षम धरी **शार्ङ्गधन्वा** तया नमो

९९७ गदा कौमोदकी देव मिरवी दोष-सूदन
वैराग्य-गुरु गंभीर **गदाधर** तया नमो

९९८ भक्ताचा रथ सांभाळी रथचक्र करीं धरी
नमो **रथांगपाणी** त्या देवेशा भक्तवत्सला

९९९ धर्म संस्थापिला आहे नांदती धर्मनिष्ठ ते
सदाचे संपले दुष्ट तेणें **अक्षोभ्य** त्या नमो

१००० अज्ञान-दोष-दैत्यांतें माराया सजला असे
सर्वास्त्रीं, त्या नमो देवा **सर्वप्रहरणायुधा**

।। सर्वप्रहरणायुध ॐ नम इति ।।

**इति श्री नामसाहस्री**

□□□

# उपसंहार

इतीदं कीर्तनीयस्य केशवस्य महात्मनः ।
नाम्नां सहस्रं दिव्यानाम् अशेषेण प्रकीर्तितम्॥

१ असें हें कीर्तनीयाचें केशवाचें महात्मया
सहस्र दिव्य नामांचें झालें निःशेष सांगुनी

य इदं शृणुयात् नित्यं यश् चापि परिकीर्तयेत्।
नाशुभं प्राप्नुयात् किञ्चित् सोऽमुत्रेह च मानवः॥

२ हें ऐकेल हि जो कोणी संकीर्तील वा नर
न परत्र न या लोकीं कांहीं अशुभ त्या घडे

वेदान्तगो ब्राह्मणः स्यात् क्षत्रियो विजयी भवेत्।
वैश्यो धनसमृद्धः स्यात् शूद्रः सुखमवाप्नुयात्॥

३ वेद- पारग तो विप्र क्षत्र तो रण- पारग
धन- संपन्न तो वैश्य शूद्र होय सुखी सदा

धर्मार्थी प्राप्नुयात् धर्मं अर्थार्थी चार्थमाप्नुयात्।
कामान् वा अप्नुयात् कामी प्रजार्थी प्राप्नुयात्प्रजाम्॥

४ धर्मार्थीस लभे धर्म अर्थार्थीस हि अर्थ तो
कामार्थीस लभे काम प्रजार्थीस प्रजा तशी

भक्तिमान् यः सदोत्थाय शुचिस् तद्गतमानसः।
सहस्रं वासुदेवस्य नाम्नाम् एतत् प्रकीर्तयेत्॥

५ सकाळीं उठुनी नित्य शुचि होऊनि जो नर
ध्यानस्थ होऊनी भावें करी पाठ सहस्र हें

यशः प्राप्नोति विपुलं ज्ञातिप्राधान्यमेव च।
अचलां श्रियमाप्नोति श्रेयः प्राप्नोत्यनुत्तमम्॥

६ लाभे यश तया थोर लाभे ज्ञातींत गौरव
लाभे त्या स्थिरसंपत्ति लाभे श्रेय अनुत्तम

न भयं क्वचिदाप्नोति वीर्यं तेजश् च विन्दति।
भवत्यरोगो द्युतिमान् बलरूपगुणान्वितः ॥

७ न ये संकट त्या कांहीं लाभे वीर्य नि तेज तें
नीरोग कान्तिमान् होय बल-रूप -गुणान्वित

रोगार्तो मुच्यते रोगात् बद्धो मुच्येत बन्धनात्।
भयात् मुच्येत भीतस्तु मुच्येतापन्न आपदः॥

८ रोगांतूनि सुटे रुग्ण बंधनांतूनि बद्ध तो
आपन्न आपदांतूनि सुटे भीत भयांतुनी

दुर्गाण्यतितरत्याशु पुरुषः पुरुषोत्तमम्।
स्तुवन् नामसहस्रेण नित्यं भक्तिसमन्वितः॥

९ सहस्रनाम- स्तोत्रें जो भक्तीनें पुरुषोत्तमा
स्तवी नित्य, सुटे शीघ्र संकटांतूनि तो निज

वासुदेवाश्रयो मर्त्यो वासुदेवपरायणः ।
सर्वपापविशुद्धात्मा याति ब्रह्म सनातनम्॥

१० भजे जो वासुदेवास वासुदेव चि ज्या गति
निष्पाप होउनि पावे अन्तीं ब्रह्म सनातन

न वासुदेवभक्तानां अशुभं विद्यते क्वचित्।
जन्ममृत्युजराव्याधिभयं नैवोपजायते ॥

११ न वासुदेव- भक्तांचें होई अशुभ तें कधीं
जन्म मृत्यु जरा व्याधि यांचें भय नसे तयां

इमं स्तवं अधीयानः श्रद्धाभक्तिसमन्वितः।
युज्येतात्मसुखक्षान्तिश्रीधृतिस्मृतिकीर्तिभिः ॥

१२ स्तवाचा पाठ ह्या भावें श्रद्धापूर्वक जो करी
लाभे आत्मसुख क्षान्ति श्री धृति स्मृति कीर्ति त्या

न क्रोधो न च मात्सर्यं न लोभो नाशुभा मतिः।
भवन्ति कृतपुण्यानां भक्तानां पुरुषोत्तमे॥

१३ पुरुषोत्तम- भक्तांच्या ठाईं अशुभ ना वसे
न क्रोध लोभ मात्सर्य न वा ती पापवासना

द्यौः सचन्द्रार्कनक्षत्रा खं दिशो भूर् महोदधिः।
वासुदेवस्य वीर्येण विधृतानि महात्मनः॥

१४ नक्षत्रलोक आकाश दिशा भूमि महोदधि
धरिलीं सर्व हीं देवें वासुदेवें स्वशक्तितः

ससुरासुरगन्धर्वं सयक्षोरगराक्षसम्।
जगद् वशे वर्ततेदं कृष्णस्य सचराचरम्।।

१५ देव गन्धर्व असुर यक्ष राक्षस पन्नग
यांसवें जग हें सारें कृष्णाधीन चराचर

इन्द्रियाणि मनो बुद्धिः सत्त्वं तेजो बलं धृतिः।
वासुदेवात्मकान्याहुः क्षेत्रं क्षेत्रज्ञ एव च।।

१६ इंद्रियें हीं मनोबुद्धि सत्त्व तेज बलादिक
तसें क्षेत्र नि क्षेत्रज्ञ वासुदेवात्म बोलिलीं

सर्वागमानामाचारः प्रथमं परिकल्पते।
आचारप्रभवो धर्मो धर्मस्य प्रभुरच्युतः।।

१७ सर्व शास्त्रांत तो आधीं असे आचार कल्पिला
आचारांतूनि तो धर्म धर्माचा प्रभु अच्युत

ऋषयः पितरो देवा महाभूतानि धातवः।
जङ्गमाजङ्गमं चेदं जगन् नारायणोद्भवम्।।

१८ ऋषि ते देव पितर महाभूतें नि धातु ते
स्थिर- जंगम हें विश्व असे नारायणोद्भव

योगो ज्ञानं तथा सांख्यं विद्याः शिल्पादि कर्म च
वेदाः शास्त्राणि विज्ञानं एतत् सर्वं जनार्दनात्।।

१९ योग ज्ञान तसें सांख्य विद्या शिल्प कलादिक
वेद शास्त्रें नि विज्ञान सर्व हें त्याचि पासुनी

एको विष्णुर् महद् भूतं पृथग् भूतान्यनेकशः।
त्रींल्लोकान् व्याप्य भूतात्मा भुङ्क्ते विश्वभुगव्ययः।।

२० एक विष्णु महद् भूत पृथक् भूतें अनेक तीं
व्यापूनि तीन लोकांतें विश्वभुक् विश्व भोगितो

इमं स्तवं भगवतो विष्णोर् व्यासेन कीर्तितम्।
पठेद् य इच्छेत् पुरुषः श्रेयः प्राप्तुं सुखानि च।।

२१ स्तव हा भगवंताचा विष्णूचा व्यास-कीर्तित
करावा पाठ तेणें ज्या श्रेय प्रेय हि तें हवें

विश्वेश्वरं अजं देवं जगतः प्रभवाप्ययम्।
भजन्ति ये पुष्कराक्षं न ते यान्ति पराभवम्।।

२२ परमात्मा अजन्मा जो विश्वेश्वर जगत्-प्रभु
भजती त्यास जे भावें न शिवे त्यां पराभव

ॐ तत् सत्। इति श्रीमहाभारते, शतसाहस्त्र्यां
संहितायां वैयासिक्यां, आनुशासनिके
पर्वणि, भीष्मयुधिष्ठिरसंवादे,
श्रीविष्णोर्दिव्यसहस्रनामस्तोत्रम्।।

।। इति श्री महाभारतीं, अनुशासन पर्वीं,
एकशें पस्तीसावा अध्याय समाप्त।।

१ अष्टादशोननवति शक श्रावण मास तो
असे सोमवती पुण्य ग्रंथ हा पूर्ण होतसे

२ अशी ही श्लोक-साहस्री अर्पिली चरणांवरी
श्रीहरीच्या हरो अश्री मोक्षश्री देउनी जना

३ नमो अनन्तास सहस्र-मूर्तिका
सहस्र-शीर्षाक्षि-करोरु-पादका
सहस्र-नामा पुरुषा सनातना
अनन्त-ब्रह्माण्ड-युगान्त-धारका

।। इति श्री विष्णु-सहस्रनाम सहस्रश्लोकी ।।

# नाम हें परमात्म स्वरूपच आहे

नाम म्हणजे भगवंताचें नाव. देवाच्या कोणत्याहि नावांत फरक नाही. नाम हा जीव आणि शिव यांच्यामधला दुवा आहे. नाम हें साध्य आहे आणि साधनहि आहे. नाम सगुण आहे आणि निर्गुणहि आहे. नामाचा आरंभ सगुणांत आहे तर शेवट निर्गुणांत आहे. आरंभ सगुणात आहे असें म्हणण्याचें कारण भगवंत मुळांत जो निराकार, निर्गुण आहे तो जेव्हां सगुणांत आला तेव्हांच त्याला नामरूप लागलें आणि सगुणरूप नाहींसें झालें तरी नाम शिल्लकच राहिलें म्हणून तें निर्गुणहि आहे. तेव्हां सगुण किंवा निर्गुण भक्तीला नामाचा आधार आहे. नाम हा सत्संगाचा पाया आहे आणि कळसहि आहे. नाम म्हणजे आपली वृत्ति आणि भगवंत यांना जोडणारी साखळीच आहे. वृत्ति नामरूप बनली पाहीजे. पंढरपूरला जायला पुष्कळ रस्ते आहेत. परंतु सर्वांना शेवटी बारींतून जाऊन दर्शन घ्यावें लागतें. त्याप्रमाणें इतर साधनें जरी केलीं तरी नामसाधन केल्यावरच आत्मस्वरूपाची प्राप्ति होते. आपण नाम घ्यावें. तें आपणच आपल्या कानांनीं ऐकावें आणि तें घेतां घेतां त्यांत शेवटीं स्वतःला विसरून जावें. हाच नामसाधनेतला आनंदाचा मार्ग आहे.

जसें आपलें आपलेपण आपल्या नावांत आहे तसें देवाचें देवपण हें त्याच्या नामांत आहे. आपण जें नाम घेतों तेंच शेवटपर्यंत कायम रहातें. परंतु आपली देहबुद्धि जसजशी कमी होईल तसंतसें तें नाम अधिकाधिक व्यापक आणि अर्थगर्भ बनत जातें आणि शेवटीं नाम हें परमात्म स्वरूपच आहे, असा अनुभव येतो. पाणी जसें शरीराचें जीवन आहे. तसें नाम हें मनाचें जीवन बनलें पाहीजे. अंतकाळी अगदीं शेवटीं सुटणारी वस्तु म्हणजे भगवंताचें नाम, नामांतच शेवटचा श्वास गेला पाहिजे. नामांत एका आनंदाशिवाय दुसरें कांहीं नाहीं.

**(गोंदवलेकर महाराज)**